# सार संग्रह

अर्थात्

# केसरीचें छोटें फाईल



( सन १९२९. )

# प्रस्तावना



## केसरीचें छोटें फाईल अर्थात् 'सारसंग्रह'

केसरींतील महत्त्वाचा व संग्राह्य असा थोडा बहुत तरी मजकूर आपल्याला कायमचा संग्रहीं ठेवतां आला तर बरें, असें अनेक वाचकांना नेहमीं वाटत असते. तथापि ही गोष्ट जितकी इष्ट वाटते तितकी ती कठीणहि असते. केसरीचीं काय किंवा दुसऱ्या कोणत्याहि वर्तमानपत्रांचीं काय, फाइलें नीट बांधून संग्रहीं ठेवणारे वाचक फारच थोडे असतात. त्याचें कारण प्रथम असें कीं, एका वर्तमानपत्रावर अनेक वाचकांची भूक भागावयाची असते, यामुळें कोणताहि अंक एकदां हातोहात गेला म्हणजे सहसा परत येत नाहीं. आला तर फाटून, विसकटून, मळून परत येतो. आणि मग तो फायलींत ठेवावासा वाटत नाही. बरें, कोणाच्या अंकावर इतरांच्या उड्या नसल्या तरी प्रत्येक अंक वाचून, वेळींच नीट बाजूला काढून शिल्लक ठेविला जातो असें क्वचितच घडतें. कोणी वर्षाचे सर्व अंक अशा रीतीनें ठेविले तरी केसरीच्या ५१ अंकांचें फाईल इतकें जड व अवजड होतें कीं, तें पुठ्ठा घालून बांधवून घेण्याला बराच खर्च येतो. तसेंच कोणताहि विषय हुडकून काढण्याकरितां अंक चाळीत बसण्याला फार वेळ व श्रम लागतात. याशिवाय महत्त्वाची गोष्ट ही कीं, कोणतेंहि वर्तमानपत्र घेतलें तरी त्यांतील सगळाच्या सगळाच मजकूर संग्रहीं ठेवण्यासारखा असतो असें नाहीं. अर्थात् ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणें कांहीं थोडा मजकूर बाजूला काढून ठेवण्यासारखा असतो. पण तो तसा कातरून व चिकटवून ठेवणें हें देखील तितक्याच परिश्रमाचें काम असून तसे करण्याला लागणारी चिकाटी, फुरसत किंवा व्यवस्थितपणा पुष्कळांना असत नाहीं. संग्रहालयें वगैरे संस्था ज्या काय समग्र फाइली ठेवतील तितक्याच. पण अशांच्याहि हातून हें काम नेहमीं तडीस जातें असें नाहीं. इतिहासदृष्ट्या जुनी माहिती कारणपरत्वें ज्यांना काढण्याचा प्रसंग येतो, त्यांना हा अनुभव पूर्णपणें अवगत आहे. वरील कारणांमुळें केसरीच्या दर अंकांतील कांहीं निवडक मजकुराचा टाईप बाजूला काढून घेऊन केसरी छापखान्यांतच त्याच्या कांहीं वेगळ्या प्रती छापवाव्या, व त्याचें पुस्तक बांधून वर्षाअखेर तें केवळ छपाईचा खर्च घेऊन फक्त केसरीच्या वाचकांना द्यावें अशी कल्पना घरच्याच एका केसरीच्या हितचिंतकानें १९२७च्या जुलै महिन्यांत सुचविली. आणि प्रयोगादाखल ती ताबडतोब अमलांतहि आणण्यांत आली.

वरील कल्पनेप्रमाणें ता. २ ऑगस्ट १९२७ च्या अंकापासून, केसरीच्या दर अंकापैकीं सुमारें ८ कॉलम, म्हणजे रॉयल साइझचीं सुमारें ८ पृष्ठें इतका मजकूर निवडून बाजूला काढून तो वेगळा छापण्यास आम्हीं सुरुवात केली. परंतु केव्हांहि डिसेंबरअखेर वर्षाचा मेळ पडावा म्हणून या सारसंग्रहाचें अथवा छोट्या फाइलाचें पहिलें वर्ष दिडकें धरून १९२८ च्या डिसेंबरच्या शेवटच्या अंकापर्यंत हा क्रम आम्हीं चालू ठेवून त्याप्रमाणें होणारें सुमारें सहाशें पृष्ठांचें पुस्तक छापून गेल्या वर्षी प्रसिध्द केलें.

यानंतर हाच क्रम १९२९ सालींहि चालू ठेवण्यांत आला. गेल्या ऑगस्ट महिन्यांत 'केसरी आठवड्यांतून दोनदां निघूं लागला तरीहि दोनहि अंकांतील महत्त्वाचा व संग्राह्य असा मजकूर निवडून प्रत्येक आठवड्यांत मजकुराचीं आठ पानें काढण्याचा क्रम चालू होता. याप्रमाणें वर्षअखेर सुमारें ५०० पानांचें पुस्तक तयार झालें. यांत मजकूर निवडतांना सामान्यतः वाचकाला संग्रह करण्यासारखा जो भाग वाटेल तोच बहुधा घेतला आहे. अशा रीतीनें या वर्षांतील महत्त्वाच्या घडामोडी व त्यावर वेळोवेळीं केसरीनें प्रगट केलेले विचार आणि संग्राह्य अशी माहिती व लेख हे सर्व या संग्रहांत एकत्र वाचावयास मिळणार आहेत. हाच क्रम प्रतिवर्षी असाच चालू ठेवण्याचा विचार आहे.

न. चिं. केळकर,
धों. वा. विद्वांस,
ट्रस्टी—केसरी व मराठा.

# सारसंग्रहाची अनुक्रमणिका.

# केसरी सारसंग्रह १९२९

पुस्तक २ रें } वर्षारंभ ता. १ जानेवारी १९२९. { वर्ष २ रें

## स्वातंत्र्याची डांबरवत्ती पेटली !

कलकत्ता येथें तिरंगी सामना चालू होता तो संपला. हा सामना दिसण्यांत तिरंगी असला तरी खरा दुरंगी होय, हें आम्ही मागील अंकीं दर्शविलेंच होतें. आणि अखेरीला तसेंच घडून आलें. किती झालें तरी स्वातंत्र्यवादी आणि स्वराज्यवादी हे दोघेहि एकाच पक्षांतले उपपक्ष. एकाच काळजाचे दोन कप्पे. त्यांच्यांतलें भांडण संपून समजुत पटावयाला वेळ लागणार नाहीं.पण या सामन्यांतला तिसरा पक्ष हा बोलूनचालून वेगळा. त्याचें उद्याचें ध्येय वेगळें. त्याची आजची दृष्टि वेगळी. त्याचें पूर्वीपासूनचें धोरण वेगळें. अर्थात् त्याची समजूत पडावी तशी न पडली तर त्यांत आश्चर्य नाहीं. हा तिसरा पक्ष म्हणजे मुसलमान पक्ष.

स्वराज्यवादी व स्वातंत्र्यवादी यांच्या दरम्यानचा हा तंटा वाढला इतकाहि वाढण्याचें कारण नव्हतें. पण कांहीं माणसें इतकीं फाजील कुशाग्रबुद्धीचीं असतात कीं, दर्भाच्या टोकावर ज्याप्रमाणें कोणत्याहि प्राण्याचे दोन पाय टेकण्याला जागा नसते, त्याप्रमाणें यांच्या बुद्धीला दोन मतांचा समन्वय करण्याइतकीहि रुंदी नसते. 'मला या लोकांच्या कारस्थानांची घाण येते' असें जें म.गांधी एका पक्षाला उद्देशून बोलले तें यांच्याचसंबधानें. जवाहरलाल नेहरू स्वातंत्र्यवादी असले तरी त्यांची गणना या 'कुशाग्र' बुद्धीच्या लोकांत होत नाहीं. कारण ते स्पष्टवक्ते आहेत.त्यांच्या मनांत एक व जनांत एक असें नाहीं.

वास्तविक स्वातंत्र्यवादी लोकांचेंच म्हणणें तात्विक दृष्ट्या अखेर खरें आहे हें कोणास कळत का नाहीं ? ब्रिटिश साम्राज्याच्या पाशांत किंवा जाळ्यांत राहून स्वतः इंग्रजाखेरीज दुसऱ्या कोणाचें अंतिम हित साधणार ! कानडा, आस्ट्रेलिया आदिकरून वसाहतींना नेहरू रिपोर्टांत रेखाटल्याच्या पलकिडचें स्वराज्य पूर्वींच मिळून चुकलें आहे. असें असतां दिवसानुदिवस त्यांचेहि पाऊल निर्भेळ स्वातंत्र्याच्या मार्गावर अधिकाधिक पुढें पडत आहे त्याचें कारण हेंच.वसाहती व इंग्लंड यांना जोडणारा संबंध पूर्वी लोखंडी साखळदंडासारखा बळकट होता. आतां त्या संबंधाला सोन्याच्या सांखळीसारखें सौम्य मोहक स्वरूप आलें आहे. पण उद्यां ही सोन्याची सांखळीहि जाऊन त्या जागीं कोळ्याच्या तंतूचा धागा आलेला दिसेल !

पण या एका मुद्द्यावर जसा वसाहतींचा दाखला घ्यावयाचा तसा तो दुसऱ्या एका मुद्द्यावरहि घ्यावा लागतो. ज्या वसाहती आज स्वतंत्रप्राय आहेत, त्यांना ही स्थिति एकदम प्राप्त झाली नाहीं. त्या अनेक टप्पे एकदम उडून गेल्या. पण त्यांनाहि जिना चढावाच लागला. एका हाडामासाच्यांची ही स्थिति. मग आयर्लंड तर काय ? बोलूनचालून भिन्न वंशीयांचें दुष्मानासारखें मानलेलें राष्ट्र. त्यालाहि आज स्वराज्य मिळालें आहे. पण तेंहि मर्यादित आहे. कारण इंग्लंडच्या राजाच्या नांवानें शपथ घ्यावी लागते व गव्हर्नरजनरलची नेमणूक राजाकडूनच होते. स्वातंत्र्य मिळविण्याच्या बाबतीत वसाहती व आयर्लंड यांच्यापेक्षां हिंदुस्थानाला आज तरी अनुकूलता अधिक आहे असें कोण म्हणेल ?

वर 'आज' हा जो शब्द आम्ही घातला तो सहेतुक आहे. त्याच्यायोगानें हिंदुस्थानाच्या कमकुवतपणाची जाणीव होते हें खरें. तथापि ती जाणीव तात्पुरती व तात्कालीनच आहे हें विसरता कामा नये. पण आजची मागणी जबाबदार स्वराज्यापुरतीच असावी याला दुसरेंहि एक कारण आहे. तें असे कीं, या मागणीवर देशांत आज जितकी एकी संभवते तितकी स्वातंत्र्याच्या मागणीवर संभवत नाहीं. एकीशिवाय केवळ आपल्याच जोरावर ज्यांना आजहि स्वातंत्र्य मिळवूं असें वाटत असेल त्यांची गोष्ट वेगळी. चिनांतल्याप्रमाणें हिंदी राष्ट्रीय पक्ष जेव्हां सशस्त्र व अत्याचारित्वाची फिकीर न करण्या इतका लढाऊ बनेल, तेव्हां स्वराज्यावर संतुष्ट रहा असें त्याला कोण म्हणेल? पण आज तरी एकी हेंच या देशाचें बळ होय. ती जितकी अधिक साधेल तितकी बरी.

'अंतिम ध्येय' व 'आजच्या आज मागण्याची स्वराज्यघटना' या दोन गोष्टींत फरक आहे. प्रत्येक राष्ट्रीय वृत्तीच्या मनुष्याचें अंतिम ध्येय हिंदुस्थानाचें स्वातंत्र्य, संपूर्ण स्वातंत्र्य, हेंच आहे व असणारच. मग पं. नेहरू यांचेंहि तें ध्येय कां नसेल? पण स्वराज्य 'घटने' चा प्रश्न आला असतां, नेहरू कमिटीनें तयार केली अशीच कांहीं तरी घटना करणें प्राप्त हे उघड आहे. स्वातंत्र्यवादी पक्षहि 'आजच्या आज' स्वातंत्र्य मागत नाहीं. तसें तो मागता तर त्यानें स्वातंत्र्याच्या मागणीला 'ध्येय' हा शब्दच लावला नसता. स्वतःची अशी वेगळी एखादी घटना तयार केली असती, व राष्ट्रीय सभेच्या ठरावांत 'बंडाचें निशाण उभारावें' असेच शब्द सुचविले असते. इंग्रजी 'गोल' हा शब्द अंतिम ध्येयाचा सूचक आहे. ताबडतोबीच्या योजनेचा नाहीं.

पण स्वातंत्र्यवादी पक्षाला खरोखर काय हवें तेंच कोणाला कळत नाहीं. त्याला आज जबाबदारीची स्वराज्यघटना नको.पण तो आज स्वातंत्र्यहि मागत नाहीं व मिळवीन असेंहि म्हणत नाहीं! त्याला वातंत्र्य मिळविण्याच्या तयारीला मुदत पाहिजे आहे. शेतकरी कामकरी यांच्यावरच त्याची भिस्त आहे. पण ते दोनहि वर्ग तो हळूहळू तयार करणार आहे. हें सर्व ठीक आहे. पण ही तयारी सिद्ध होईपर्यंत तरी बिनजबाबदारीचें आजचें राज्य त्याला चालतें व ठीक वाटतें काय? आणि स्वातंत्र्याचें निशाण उभारीपर्यंत तरी दरम्यान आजच्याहून अधिक चांगली अशी जबाबदारीची स्वराज्यघटना हवी तर मग पं. नेहरू यांनीं केली तीच काय वाईट आहे?

त्यांतूनहि जे आज निर्वाणपदावरच उभे राहिले असतील त्यांची गोष्ट वेगळी आहे. राष्ट्राच्या तयारीला स्वतःपासूनच तयारी करावी लागते.जे आज विद्यमान राज्यघटनेला व सत्तेला मुळीच जुमानीत नाहीत, म्हणजे ज्यांनीं असहकारिता खऱ्या स्वरूपानें व अर्थानें आजहि अमलांत आणली आहे, त्यांनीं नेहरू रिपोर्टाचा निषेध करणें शोभेल. पण जे अजून कायदे–कौन्सिलांत जातात, बसतात, शपथ घेतात, तेथील नियम पाळतात, बरें--वाईट होईल तसें काम करतात, कौन्सिलांच्या बाहेरहि सरकारी हुकूम पाळतात, न्यायकोर्टें व पोलीस यांचा आश्रय घेतात, त्यांनीं स्वातंत्र्याच्या गप्पा माराव्या याचा अर्थ ढोंगीपणाचा समंद पुन्हा वेगळ्या स्वरूपांत डोकावूं लागला इतकाच आम्ही समजतों!

आपण श्रीनिवास अय्यंगार यांचेंच उदाहरण घेऊं, 'जहालपणांत मी कोणालाहि हार जाणार नाहीं अशी त्यांची प्रतिज्ञाच आहे व ती सर्वथा खरी आहे! पहिल्या दिवसापासूनें अखेरपर्यंत सर्वपक्षीय परिषदेंत ते बसलेले होते. इतकेंच नव्हे तर नेहरू कमिटीपुढील योजनेंत बिंदु पद अक्षर मात्रा विराम येथपर्यंत लक्ष घालून त्यांनीं आपल्या कायदेपंडितगिरीचा फायदा कमिटीला दिला.केवळ स्वातंत्र्य-कमलाच्या स्निग्ध सुगंधांत गुंगणाऱ्या या भ्रमराला स्वराज्य घटनेच्या कागदी कमल पुष्पाच्या पाकळ्यांना 'शोभिवंत' मुरड घालीत बसण्याची रुक्ष उठाठेव कशाला हवी होती? किंबहुना स्वातंत्र्यवादी राष्ट्रीय सभेनें तरी सर्व--पक्षीय परिषद बोलावण्याची खटपट कशाला केली? 'सर्वांच्या' विचारानें योजना ठरविण्यालाच ना? मग सर्व पक्ष एकासारखे एक स्वातंत्र्यवादी नाहींत हें तिला तेव्हां माहीत नव्हतें कीं काय? पण कांहीं कांहीं लोकांना मी आपला इतरांपेक्षां जहाल आहे असें भासविल्याशिवाय समाधानच होत नाहीं त्याला काय करणार?

'आज स्वराज्य उद्यां स्वातंत्र्य' ही समस्या फारशी चुकीची नाहीं. इंग्रज तिला खुशाल हरकत घेवोत. पण वसाहतींचें उदाहरण हें हिंदुस्थानाला नावें ठेवण्याच्या बाबतींत इंग्रजांनाहि नडणारें आहे. आज स्वातंत्र्य नाहीं, पूर्ण जबाबदारीचें स्वराज्यहि नाहीं, तर केवळ प्रांतापुरती पूर्ण लोकसत्ता इतकी सकुंचित योजना मांडली, तरी ती ज्यांना मान्य होत नाहीं, त्यांना आम्हांला "मर्यादित मागणीचें शहाणपण" शिकविण्याचा अधिकार काय? आमची मागणी अमर्याद असली तरी ती बरोबर आहे. मर्यादित असली तर ती बरोबर आहेच आहे. पण ही मर्यादा आमची आम्ही ठरवूं. व ती ठरवितांना एकीचा संभव अधिक कशांत आहे हेंच आम्ही पाहणार.

यावर कोणी असें म्हणेल कीं, "स्वातंत्र्यवादी सोडले पण नेहरू रिपोर्टावर इतरांची तरी एकी कोठें आहे? मुसलमान ती योजना कोठे सर्वस्वी मान्य करतात?" यावर उत्तर हेंच कीं,कोणाहि इंग्रजाला नेहरू रिपोर्ट जितका मान्य असेल त्यापेक्षां तरी कोणाहि मुसलमानाला तो खचित अधिक अंशानें मान्य आहे. मुसलमान पुढाऱ्यांत झाले तरी जबाबदारीचें स्वराज्य आज नको असें म्हणणारा एकहि मिळणार नाहीं. त्यांचा वाद आहे तो फक्त मतदारसंघ व प्रतिनिधीसंख्या यांच्यापुरता. या मुद्द्यावरहि नेहरू रिपोर्टाला मान्यता देणारे अनेक मुसलमान पुढारी आहेतच. हिंदु व मुसलमान हे दोघे मिळून जितकें मागतात तितकें निदान देण्याची ज्यांची तयारी असेल त्यांनाच हिंदू--मुसलमानांच्या मतभेदाची बाब पुढें आणण्याचा अधिकार आहे!

शिवाय हेंहि सांगितलें पाहिजे कीं, हल्लींच्या परिस्थितींत एकी होणार होणार म्हटलें तरी ती किती होईल याची मर्यादाहि ओळखलीच पाहिजे.

आम्हांला केव्हां केव्हां असेंहि वाटतें कीं, किरकोळ गोष्टींवर पं. मोतिलाल यांनीं एकीचा जितका अट्टाहास केला तितका केला नसता तरीहि कांहीं फार बिघडलें नसतें. आधी व्यक्ति म्हटली कीं ती स्वतःच्या मताची अभिमानी कमी–अधिक असणारच. नेमस्तांना स्वातंत्र्याची भाषाहि खपत नाहीं तर जवाहरलाल यांना वसाहतीचें नाव वावडे वाटतें. मुसलमान आपला हिस्सा कमी करण्याला तयार नाहींत. पण या सर्वांचें खरें कारण हेच कीं, या सर्वांनीं मतभेदाचे हे सर्व मुद्दे सोडून दिले तरी सरकार त्या एकीला तरी महत्त्व देईल, व एकमुखी मागणीचा तरी आदर करील, अशी आशा कोणालाच नाहीं ! अर्थात् थोडथोड्या मतभेदांसह मुख्य योजना मान्य झाली तरी ती मोठीच गोष्ट होय.

इतका मतभेद असतांहि, म. गांधी यांच्या प्रयत्नामुळें राष्ट्रीय सभेपुरतें तरी एकमत झालें ही गोष्ट कांहीं सामान्य नाहीं. किंबहुना गांधीजी मध्यस्थ होते म्हणूनच ही गोष्ट घडून आली. गांधी यांनीं समेटादाखल सुचविलेल्या मूळच्या ठरावांतून कांहीं गोष्टी स्वतः त्यांनाहि काढून टाकाव्या लागल्या. आणि कांहीं नव्या घालाव्या लागल्या.नेहरू रिपोर्टावरील ठराव व्हाइसरॉयसाहेबांकडे पाठविण्याची कल्पना खरोखरच वाईट होती. सायमन कमिशनवरील बहिष्काराला त्यामुळें कमीपणा खचित आला असता ! उलट वसाहतीच्या स्वराज्ययोजनेला सरकार मान्यता न देईल तर काय या प्रश्नाला उत्तर हवें होतें ते घातलें हे चांगलेंच झालें. अशा रीतीनें स्वातंत्र्य–वाद्यांचें समाधान झालें. मुसलमानांचें समाधान करण्याची आशा गांधींनाहि नव्हती म्हणून त्यांनी त्या दिशेनें फारसा व्यर्थ प्रयत्नहि केला नाहीं.

असो. अशा रीतीनें मतभेदाच्या गंडांतरांतून राष्ट्रीय सभा पार पडली ही गोष्ट अभिनंदनीय होय. कारण सरकारला जें उत्तर राष्ट्राकडून आज द्यावयास पाहिजे होतें तें तिच्या ठरावानीं दिलें गेलें. नेहरूंनीं आपल्या योजनेला वसाहतीच्या नमुन्याचें जबाबदारीचें स्वराज्य हा पाया घेतला,या सबबीवर इंग्रजसरकारहि जर आम्हापुढें साम्राज्याचें गुणवर्णन करूं लागेल तर तें मात्र फुकट आहे. स्वातंत्र्यवाद्यांइतकेंच नेहरू यांनाहि स्वातंत्र्य हवें आहे. त्यांनी स्वराज्ययोजनेतील मागणी एका अंशाने, एका पायरीनें, कमी धरली असेल तर ती हिंदुस्थानच्या परिस्थितीकडे पाहून, साम्राज्याचे गुण पटले म्हणून नव्हे. जगांत स्वतंत्र राष्ट्रांचेहि परस्पर स्नेहसंबंध असतात. तसे इंग्लंड व हिंदुस्थान यांचे वाटले तर खुशाल राहोत. पण दास्यभावावर रचलेलें साम्राज्य धुळीला मिळालेच पाहिजे. मग त्या उत्पाताचा धक्का आम्हालाहि बसून हिंदुस्थानांत अराजक झाले तरी पुरवलें !

जगांत आज चोहोंकडे पाहिलें तर काय दिसतें? जगाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत स्वतंत्र राष्ट्रांची ओळच ओळ लागून गेली आहे. स्वातंत्र्याच्या बाबतींत कांहीं राष्ट्रें ईश्वरकृपेनें गर्भश्रीमंत आहेत,ज्यांना मूळचें स्वातंत्र्य नव्हते त्यांपैकीं कांहींनीं स्वपराक्रमानें तें मिळविलें. अंगीं पराक्रम असतांहि कांहींना स्वातंत्र्य मिळविण्याच्या कामीं जी परिस्थिति आडवी येत होती, ती या महायुद्धांत स्वयंनिर्णयाच्या तरवारीनें कापून निघाली. येऊन जाऊन हतभागी हिंदुस्थान. हा एकटा एकच देश आशिया खंडांत असा उरला कीं, त्याच्या कपाळावरच्या परतंत्रतेच्या छापाकडे व डागाकडे लोकांनी अंगुलिनिर्देश करून उपहास करावा. पण ही स्थिति यापुढे टिकणें शक्य नाहीं. गोष्ट १९३० सालीं घडो वा तिला चार वर्षें अधिक लागोत.पण इग्रजांनीं हे लक्षांत ठेवावें कीं त्यांच्या जड बुडाच्या साम्राज्याखालीं भवितव्यतेचा सुरुंग तर पोखरला गेला आहेच, पण तो उडविणारी डांबरबत्तीहि शिलगावली गेली असून हळू हळू सुरुंगाकडे पेट घेत चालली आहे. भडका होईल तेव्हां फक्त साम्राज्याचे तुकडे पडूनच भागेल कीं खुद्द इंग्लंडांतहि राज्यक्रांति होईल हे कोणी सांगावें ?

ब्रिटिश साम्राज्याचा वीट पराधीन हिंदुस्थानातल्या लोकांना तर आलाच आहे. पण खुद्द विलायतेतल्या अनेक लोकांनाहि तो आला आहे. लॉर्ड आयर्विन यांनी परवा रोटरी क्लबांत भाषण केल्याप्रमाणें, प्रत्येक मनुष्याची कोणत्या तरी ध्येयावर निष्ठा असते. तशीच नवयुगीन हिंदी मनुष्याची निष्ठा स्वातंत्र्यावर आहे. लॉर्डसाहेबांनी या भाषणांत जें एक उदाहरण दिलें तेंच घेऊन, त्याच्याच शब्दांचें थोडें रूपांतर करून, आपण बोलूं. " विलबर फोर्सनें इंग्लंडांत गुलामगिरि विरुद्ध चळवळ केली तिला तत्कालीन त्याच्याच लोकांनीं अनेक कारणांनी विरोध केला. पण तो विरोध टिकला नाहीं आणि अखेर गुलाम वर्गाची मुक्तता झालीच झाली."अगदीं बरोबर. मग तोच दाखला हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्याला लावण्याला लॉर्डसाहेबांनीं कां हरकत घ्यावी ?

लॉर्ड आयर्विन म्हणतात " वेस्ट इंडीज देशाचा आर्थिक उत्कर्ष होण्याला गुलामगिरी उपयुक्त आहे असें विलबरफोर्सला विरोध करणारे लोक म्हणत होते!" मग आज ईस्ट इंडीजचा म्हणजे हिंदुस्थानचा आर्थिक उत्कर्ष व्हावा म्हणून विलायती भांडवल हवें व त्या भांडवलाला जामिनकी म्हणून हिंदुस्थान परतंत्र राहावे असें इंग्रजहि म्हणत नाहींत काय ? " गुलामांच्या पद्धतीमुळे आमच्या दर्यावर्दी व्यापाराचा फायदा होतो, व हीं व्यापारी जहाजें म्हणजे

आमचें आयतेंच दुय्यम प्रतिचें आरमार बनतें असें दाक्षिण—अमेरिकेंतील संस्थानें तेव्हां म्हणत" असें बोलून लॉर्ड आयर्विन यांनी त्यांचा उपहास केला आहे ! मग हिंदुस्थानाच्या गुलामगिरीचाहि ब्रिटिश साम्राज्याला असाच उपयोग होतो ही गोष्ट साम्राज्यवाद्यांच्या मनांत असते म्हणून त्यांचाहि उपहास आम्ही तसाच कां करूं नये ?

"अमेरिकेंतील गुलामांना ख्रिस्ती धर्मदीक्षा दिल्याने त्यांचा आत्मा स्वर्गाला जाईल अशा शब्दांनीं गुलामगिरीचे समर्थन करण्यांत येत होतें!" आज ख्रिस्ती मिशनरी हिंदुस्थानावरील इंग्रजांच्या अधिराज्याचें समर्थन करतात तें अशाच हेतूनें कीं नाहीं तें लॉर्ड आयर्विन यांनींच सांगावें. तात्पर्य, गुलामगिरीचें समर्थन करणाऱ्या लोकांच्या ठिकाणीं आपणाला व आपल्या जातभाईंना आणि गुलामगिरींत सांपडलेल्या नीग्रो लोकांच्या जागीं हिंदी राष्ट्राला कल्पून, लॉर्ड आयर्विन यांनीं थोडा विचार करावा. म्हणजे 'लेकी बोले सुने लागे' असेंच काय, पण 'लेकी बोले सासवे लागे' अशीहि म्हण बनवितां येते असे लॉर्ड आयर्विन यांना कळून येईल.

# काशीचें संमेलन व धर्मगुरु

बनारस येथे सुमारे दोन महिन्यांपूर्वी 'अखिल भारतीय ब्राम्हण—महासंमेलन' भरले. त्यांत अनेक धार्मिक स्वरूपाच्या सामाजिक विषयांची चर्चा होऊन अखेर मध्यस्थांचे निर्णय धर्मगुरूंच्या तोंडून प्रगट करण्यात आले. परंतु या संमेलनानें, या चर्चेने, व या निर्णयानी या वादग्रस्त प्रश्नांचा निकाल न लागतां उलट त्यामुळे चोहोंकडे बरीच खळबळ उडाली. आणि ही खळबळ आणखी बरेच दिवस थांबेल असे वाटत नाही.

या विषयासंबंधानें पुणे शहरात गेल्या दोन आठवड्यांत अनेक जाहीर सभा झाल्या, व त्यांतून जीं भाषणे झालीं ती पुष्कळशी विचाराला उद्बोधक अशीं झालीं या भाषणांपैकी एकहि भाषण संमेलनातील निर्णयांचें सर्वथा समर्थन करणारं असं झालें नाही. पुष्कळशी भाषणे सर्व निर्णयांना प्रतिकूल अशी झाली. समर्थनाच्या स्वरूपाचीं जी दोन भाषणे झाली, त्यांपैकी एका व्याख्यात्यांनीं म्हणजे श्री. जोशी यांनीं धर्मशास्त्राचा उल्लेखहि न करितां चर्चा केली व ती केवळ आधुनिक शास्त्रे म्हणजे प्राणिशास्त्र व समाजशास्त्र यांच्या दृष्टीने केली. फक्त वेदशास्त्रसपन्न रंगाचार्य रड्डी यानी अनेक निर्णयांचे मंडन केलें. परंतु एक-दोन निर्णयांसबंधानें तेहि स्पष्ट बोलले नाहीत. एका निर्णयासंबंधाने ते असे म्हणाले कीं, "लोक त्या निर्णयाचा अर्थ करतात तसा तो नाहीं." आणि दुसऱ्या एका निर्णयासबंधानें तर ते असे स्पष्ट म्हणाले की, "मी याचे खंडन करीत नाहीं किंवा मंडनहि करीत नाही !"

उलटपक्षी वे. शा. संपन्न पाठकशास्त्री, वे. शा. सं. लक्ष्मणशास्त्री जोशी, व श्री. चितामणराव वैद्य यानी शास्त्राचाच आधार घेऊन सर्व निर्णयाचें खंडन केलें. चितामणराव वैद्यांना जरी कोणी शास्त्री ही सज्ञा लावीत नाही, तरी कोणाहि शास्त्र्याइतके त्यांचे संस्कृताचें ज्ञान आहे. इतकेंच नव्हे तर आपल्या धर्मशास्त्राच्या अभिमानांत ते कोणाहि शास्त्र्याला हार जाणार नाहींत ही गोष्ट सर्वश्रुत आहे. तात्पर्य, पुण्यास झालेल्या या चर्चेतून एक गोष्ट निष्पन्न झाली ती ही की, काशी येथील ब्राम्हण—संमेलनांत झालेले निर्णय आधुनिक सुशिक्षितांसच नव्हे तर जुन्या पद्धतीच्या शास्त्री लोकांसहि अमान्य आहेत!

काशीस ब्राह्मण-संमेलन भरविण्यांत चालकांचा हेतु काय होता हें सर्वांना माहीतच आहे. पण हें संमेलन हा या दिशेचा पहिलाच प्रयत्न नसून, त्या प्रयत्नाच्या वाढत्या श्रेणीतील तो एक प्रसंग होय. कारण "सुशिक्षित लोकांनीं हिंदुधर्म बुडविण्याचा कट केला आहे, व आतां जुन्या मताचे शास्त्री-पंडित कंबर बांधून पुढें न येतील तर धर्मनाश झाल्याशिवाय खचित राहात नाहीं" अशा ईर्षेने अलीकडे काहीं दिवस शास्त्री-पंडितांकडून प्रतिक्रियेचे प्रयत्न सुरू आहेत.

पूर्वीप्रमाणें हल्लीं ग्रामण्याचे दिवस उरले नाहींत. तथापि शुद्धिसंघटन, अस्पृश्यतानिवारण, पतित-परावर्तन, अहिंदूंचे हिंदूकरण वगैरे गोष्टी हीं धर्मावर प्राणनाशक अशीं गंडांतरें आलीशीं वाटून उलट दिशेची चळवळ सुरू झाली. कांहीं वर्षांपूर्वी खानदेशांत सोनगीर येथे ह. भ. प. कुकुरमुंडेकर महाराज यांनीं एक 'पंडित—परिषद' भरविली व कांही निर्णय केले. त्या परिषदेंत प्रमुख भाग घेणारे शास्त्री-पंडितच काशी येथील ब्राह्मण-संमेलनाचे चालक होते ही गोष्ट लक्षांत घेतली असतां या प्रयत्नांची परंपरा स्पष्ट दिसून येणारी आहे.

पण या प्रयत्नांनी आम्हाला कांहींच वाईट वाटत नाही उलट अशा प्रयत्नांनी नवीन विचाराच्या लोकांना उमेदच येते. कारण ज्याच्या बाजूला सत्य तत्त्व आहे त्याला प्रतिपक्षी वादाला उभा

राहिला असतां आनंदच होतो. 'वादे वादे जायते तत्त्वबोधः' ही म्हण अक्षरशः खरी आहे. जुन्या मताचे लोक उदासीन राहून रंजीस मनानें आपापल्या स्थानीं मूकवृत्ति धरून बसले तर त्यापासून समाजाचा कांहींच फायदा नाहीं. कारण सुशिक्षितांच्या मतांमध्यें धर्मशास्त्राची जर कांही खरोखरच चूक असेल तर ती प्रगट होणे यांत सनातन धर्मदृष्ट्या समाजाचा फायदा आहे. उलट धर्मशास्त्रदृष्ट्या कांहीं चूक नसतां, नव्या पद्धतीचे आचार जर समर्थनीय ठरतील तर समाजाचा फायदा आहेच आहे. अशा रीतीनें समाजाचा उभयपक्षीं फायदाच असल्याकारणानें, या नवीन चळवळीबरोबर तिच्या प्रतिक्रियेचें अभिनंदनच केलें पाहिजे.

सुदैवानें, वर सांगितल्याप्रमाणें, हल्लींच्या वाग्युद्धाला जुन्या ग्रामण्य-प्रकरणांतील वाग्युद्धाचें स्वरूप नाही ही गोष्ट फार चांगली आहे. हीं जुनी ग्रामण्यें प्रायः व्यक्तिद्वेषानें उत्पन्न होत. आणि त्यांच्यामुळें धर्मगुरूंच्या 'दरबारी कारभारा'चे इतके अनिष्ट प्रदर्शन होई की, त्यामुळे धर्मगुरूंच्या पीठाविषयीं आधीच थोडा असलेला आदर आणखीहि कमी होण्याला मदत होई. हल्लींच्या वादांत व्यक्तिशः कोणाची कोणावर फिर्याद नाहीं. कोणाला कोणाचा दुष्टावा साधावयाचा नाहीं. कोणी कोणाचा अपमान करूं इच्छित नाहीं. धर्मगुरूंच्या दरबारांत कारस्थानी वकिलांचा प्रवेश नाहीं. तेथील दाखल्यांची उलटापालट नाही. निग्रहानुग्रहाचा लिलाव होत नाहीं. लांचलुचपतीचा व भीडेभाडेचा प्रकार नाहीं. मध्यस्थांच्या न्यायकोर्टांत व्यक्तिशः उखाळ्यापाखाळ्या निघत नाहींत. किंवा कोणास प्रायश्चित्तांचा निकाल मिळवून स्वतःचा सूड साधून दुसऱ्याची मानहानी करावयाची नाहीं.

हल्लीं चालू असलेला वाद शुद्ध बुद्धीनें व प्रांजल मनानें होत असून फारच झालें तर त्यांत बुद्धिचातुर्याची ईर्षा असेल. पण हेहि म्हणणे मर्यादितच होय. कारण हें बुद्धिचातुर्य केवळ अहंकारामुळें प्रगट होत नसून, त्याच्या मुळाशीं हिंदू समाजाची धारणा व प्रगति यांविषयीं खरी कळकळ आहे. यामुळें हल्लींच्या चर्चेनें जरी वादग्रस्त प्रश्नांचा सर्वसंमत असा निकाल न लागला तरी, शरीरावरील जखमांच्या वणाप्रमाणें जुन्या ग्रामण्यांच्या योगानें व्यक्तींच्या मनांत विषादकारक आठवणी राहात असत, तशा हल्लींच्या वादांनीं राहणार नाहीत याविषयीं आम्हाला खात्री वाटते.

अखिल भारतीय ब्राम्हण महासंमेलनाची फलश्रुति समाधानकारक झाली नाहीं. वास्तविक प्रसंग सामान्य नव्हता. काशी क्षेत्रासारखें संमेलनस्थान, गंगेसारख्या पवित्र तीर्थाचें सान्निध्य, श्रीविश्वेश्वरासारखी अधिष्ठात्री देवता, धर्मगुरूंसारखे अध्यक्ष, शास्त्री-पंडितांसारखे सदस्य, दरभंगा महाराजांसारखे आश्रयदाते, व वे. शा. सं. अनंत कृष्ण शास्त्री, लक्ष्मणशास्त्री द्रवीड यांसारखे विद्वान सूत्रचालक अशी सामुग्री असतां, झाली अशी चर्चा व दिले असे निर्णय निष्पन्न व्हावेत हें दुर्दैव होय. डोंगर पोखरला व उंदीर निघाला असें फिरून एकवार घडलें खरें !

संमेलनाच्या कार्याला ज्या नियमांचें बंधन घालण्यांत आलें होतें त्यांच्याविषयीं बरीच तक्रार आहे. मध्यस्थांच्या योजनेविषयींहि तशीच तक्रार आहे. तथापि आम्ही त्यांना विशेष महत्त्व देत नाहीं. अशा सभाच्या रीतीप्रमाणे मध्यस्थांची 'नेमणूक' न होतां प्रत्यक्ष 'निवड'च व्हावयास पाहिजे हें खरें. पण मोठ्या सभांतून निवडणुकी कशा होतात हेंहि आम्हास माहीत आहे. काशीस जमलेला समाजच बहुधा असा होता कीं चालकांनीं सुचविलेल्या नांवांनाच बहुमत पडलें असतें. पण तसें झालें असतें म्हणजे आज जी निर्णयाबद्दल तक्रार करण्याला जागा आहे तीहि उरली नसती !

मध्यस्थांनींच दिलेले निर्णय बंधनकारक व्हावयाचे तर मग सभेला पाचारलेल्या धर्मगुरूंना काय काम उरले ? या सभेत मध्यस्थांना कोर्टांतील असेसरांचा अधिकार होता, ज्यूरीचा नव्हता; आणि स्वतः ज्यूरींत एकमत न झाल्यास व ज्यूरीशीं मतभेद झाल्यास न्यायाधीशाला ज्यूरीचा निकाल अमान्य करण्याचा अधिकार सरकारी कायद्यानेच दिलेला असतो. तात्पर्य, चूक झाली असल्यास ती धर्मगुरूंना अध्यक्ष नेमण्यातच झाली. एकदां त्यांचें अध्यक्षत्व ठरल्यावर मध्यस्थांच्या निर्णयाची संभावना अशीतशीच व्हावयाची !

विद्यमान परिस्थितीच अशी होती कीं धर्मगुरूंकडे निर्णय देण्याचें काम गेलें याबद्दल आम्हाला फारशी तक्रार करतां येईलसें वाटत नाहीं. पण खरी तक्रार हीच कीं धर्मगुरूनीं निर्णय देतांना आपली जबाबदारी नीट ओळखली नाहीं; व घेऊं नये ते काम हातीं घेतलें तर त्यांत स्वतंत्र बुद्धि चालविली नाहीं. विलायतेंत राजकारणांत असा एक संकेतच आहे कीं 'राजाच्या हातून चूक घडूंच शकत नाही. जी चूक घडेल ती प्रधान व मंत्री यांचीच.' पण हा संकेत पार पडावयाचा तर आधीं राजानें स्वतः कांहीं करतांच कामा नये !

आणि खरोखरच विलायतेचा राजा स्वतः कांहीं करीत नाहीं. पार्लमेंट व प्रधानमंडळच सर्व कांहीं करते. राजा फार तर पार्लमेंट उघडावयाला व बंद करण्याला हजर राहतो. म्हणजे थट्टेनें असें म्हणतां येईल कीं तो फक्त प्रतिष्ठित 'चपराशाचें' काम करतो. तो जर पार्लमेंटांत अध्यक्ष होऊन बसेल

तर त्याच्या विषयीं अवज्ञा होण्याला उशीर लागणार नाहीं. तसेंच न्यायदानाचें सर्व काम जरी त्याच्या नांवानें चालतें तरी तो स्वतः न्यायाधीशाच्या खुर्चीवर बसेल तर त्याचे वाभाडे निघण्याला वेळ लागणार नाहीं.

तात्पर्य, निर्णय देण्याचें काम अ. भा. ब्राह्मण-संमेलनाच्या चालकांनीं धर्मगुरूंना उपस्थित ठेवून त्यांजकडे सोंपविलें यांत त्यांनीं आपली कातडी बचावली, पण धर्मगुरूंना लोकमताच्या 'वाघाच्या' तोंडाशीं दिलें हें बरें झालें नाहीं. त्यामुळें चूक दुरुस्त करून घेण्याचें साधन गेलें. न्यायाची निष्ठुरता दयेनें भरून निघते तें घडून येण्याला जागा उरली नाहीं. दोन सैन्यांच्यामध्यें कोणी उभा राहिला तर त्याला दोहों कडच्या गोळ्या खाव्या लागतात. त्याप्रमाणें पुराणमतवाद्यांनीं म्हणावें 'आम्ही निर्णयाचें मंडन करीत नाहीं.' व प्रागतिक तर बोलूनचालून खंडन करण्याला सिद्धच झालेले !

पण नसती गोष्ट केल्यावर तिचे परिणाम धर्मगुरूंनाहि भोगावे लागल्यास काय इलाज? धर्मगुरूंची आज्ञा हें निर्वाणीचें शस्त्र असावें. ती वासवी शक्ति. अमोघ पण एकदांच केव्हां तरी परिणाम करणारी ! मरू घातलेल्या मनुष्याचे प्राण क्षणभर वांचावे, त्याला आपल्या मुलांना आशीर्वादात्मक निरोप देतां यावेत, किंवा रामनाम तोंडून निघावें, अथवा गुप्त धनाच्या स्थळाचा निर्देश करतां यावा म्हणून उपयोगांत आणण्याची ती त्रैलोक्यचिंतामणीची मात्रा !

असे असतां काशीसंमेलनाच्या चालकांनीं धर्मगुरूंना भरीला घालून त्यांच्या अधिकाराचा भलताच उपयोग केला. यामुळें आतां 'शंकराचार्यांचा निर्णय सशास्त्र व योग्य असेल तरच तो मान्य !' असें म्हणण्याची जनतेवर पाळी आली. आणि असें म्हणणारांत नवीन मताचे आधुनिक विचारांचेच लोक नाहींत, तर जुन्या मताचे शास्त्री–पंडितहि आहेत ही गोष्ट पुण्याच्या सभांतून स्पष्टपणें सिद्ध झाली !

# अमेरिकेंतील लजपतराय यांचा जीवनक्रम

( लेखक—**ना. सु. हर्डीकर हुबळी.** )

## लेखांक ३ रा

## लो. टिळक यांचें साहाय्य

आम्ही उभयतां एकाच घरांत राहात असून, स्वयंपाक करणें, आपापलीं भांडीं घासणें, झाडलोट करणें, वस्त्रें धुणें इत्यादि हरएक काम करांत होतों. याच वेळी आम्हांस परस्पर पूर्ण ओळख पटली. माझे गुणदोष त्यांनीं ओळखिले व त्यांच्या उदात्ततेचा माझ्या मनावर प्रभाव पडला ! घरात आम्हीं दोघेच असल्यामुळें, वेळोवेळीं त्यांच्या मानसिक व शारीरिक कष्टांचे चित्र मूर्त रूपानें माझ्यापुढें येई. मलाहि तसेच कष्ट भोगावे लागत, परंतु अगदीं निष्कांचन घराण्यांतच जन्म घेऊन, तशाच परिस्थितींत वाढलेल्या मला स्वतःच्या कष्टांचें कांहींच वाटत नसे. परंतु लालाजींची गोष्ट निराळी आहे असें मला वाटे. आणि म्हणूनच त्यांच्या हालअपेष्टा मला असह्य होत ! मी माझ्या घरच्या मंडळींना पत्रें पाठवितांना साहजिकच ही परिस्थिति लिहीत असल्यामुळें, घरच्या मंडळींना ती समजत असे. अशाच एका पत्रामधून, पुण्यांत राहणाऱ्या माझ्या बंधूंना लालाजींच्या खडतर जीवनक्रमाची हकीकत समजली.

लालाजींनीं अमेरिकेंत सुरू केलेल्या संस्थांचें कार्य द्रव्याभावीं कसें मागें पडत आहे ती हकीकतहि प्रसंगानुसार लिहिलेल्या माझ्या पत्रांमधून माझ्या बंधूंना कळली. सुदैवानें माझ्या बंधूंनीं तें पत्र लो. टिळकांना दाखविलें. लोकमान्यांनीं पत्र वाचून पाहिल्यानंतर आपल्या देशाविरुद्ध परराष्ट्रांत चाललेली चळवळ हाणून पाडण्याकरितां लालाजी कशा कष्टमय स्थितींत झगडत आहेत हें जाणून त्यांनीं मोठ्या कळवळ्यानें सहानुभूति व्यक्त केली आणि ताबडतोब पांच हजार डॉलर्स अदमासें १७००० रुपये मिसेस ॲनी बेझंटच्या मार्फत लालाजींच्याकडे पाठविले ! या वेळीं आम्हांस पैशाची अत्यंत जरूर होती हें सांगणें नकोच. आणि अशा प्रकारें लोकमान्यांची मदत ऐनवेळीं मिळाल्यामुळें आम्हांस फारच आनंद झाला व जोरांत कार्य करण्यास उमेदहि वाटली.

लोकमान्यांच्या औदार्याचें व खऱ्या देशभक्तीचें नेहमींप्रमाणें वर्णन करून लालाजी मला म्हणाले, "हें पाहा हर्डीकर, परराष्ट्रांतील हिंदुस्थानाविषयक प्रचाराचें महत्त्व व आवश्यकता एकटे लोकमान्यच काय ते जाणतात, या गोष्टीची तुला आतां खात्री पटली असेलच. हिंदुस्थानाचे खरे पुढारी किंवा धुरीण तेच

आहेत. तूं हिंदुस्थानास परत गेलास म्हणजे प्रथम त्यांच्याजवळ कांहीं महिने राहा, राजकारणाचे व इतर शिक्षण घे, व नंतर लाहोरला येऊन मला माझ्या कार्यांत साहाय्य कर." परंतु दुर्दैवानें माझे राजकारणांतले शिक्षक लाला लजपतराय, यांच्या उपदेशानुरूप लोकमान्याचें शिष्यत्व पत्करण्याइतकें, आणि त्यांजपासून राजकारणाचे व इतर धडे घेण्या-इतकें सद्भाग्य मला लाभले नाहीं!

लोकमान्यांनीं पाठविलेली मदत, आमच्या संस्थेला त्या वेळीं अत्यंत उपयोगी पडली. मिळालेल्या द्रव्याच्या मदतीनें लालाजींची मोठीच चिंता दूर झाली. लगेच त्यांनीं ती सर्व रक्कम पैन पैसुद्धां बँकेंत ठेवून, फक्त प्रचारकार्याकडेच तिचा विनियोग करण्याची त्यांनीं मला आज्ञा केली. त्यांनीं त्यांतील एक कपर्दिकाह स्वतःच्या खर्चाकडे किंवा प्रचारकार्याखेरीज अन्य कार्याकडे खर्च कली नाहीं. लालाजींविषयीं लिहितांना या देशांतील कांहीं पत्रांनी, लोकमान्यांनीं पाठविलेली ही रक्कम लालाजींनीं परत केली असें म्हटलें आहे. त्यांनीं ती स्वतःकरितां घेतली नाहीं हे खरें. पण तिचा विनियोग प्रचारकार्याकडे केला. कारण त्यांनीं हातीं घेतलेलें कार्य या पैशाच्या अभावीं थबकून राहिलें असते!

आपण पाठविलेले पैसे आम्हास पोंचले कीं नाहीं याचा लोकमान्यांस बराच काळपर्यंत संशय होता. कारण जें सरकार आमचीं साधीं पत्रें देखील फोडून पाहून कधीं कधीं त्यांपैकीं कांहीं आमच्या हातींहि लागूं देत नसे तें सरकार इतकी मोठी रक्कम आम्हाला मिळूं देईल तरी कसें! सरकारास तर शक्य त्या मार्गांनीं आमची चळवळ हाणून पाडावयाची होती. त्या दृष्टीनें आम्हास पैसे न मिळूं देण्याचे सरकारने उपाय योजले असावेत असा संदेह लोकमान्यांस साहजिकच आला असला पाहिजे. म्हणून त्यांनीं लंडनहून ता. ११-१-१९१९ च्या पत्रांत आम्हास विचारलें 'आपणास पाठविलेले 'पांच' पोंचले कीं नाहीं तें शक्य तितक्या त्वरित कळवा.' या पत्रांतील 'पांच' हा शब्द पांच हजार डॉलर या रकमेस उद्देशून होता व तो लोकमान्यांनीं स्पष्ट न लिहितां असा मोघम कां लिहिला हे उघडच आहे. सरकारनें आम्हा सर्वांच्या पत्रव्यवहारावर सक्त नजर ठेविली होती हे ते जाणून होते म्हणूनच त्यांनीं असें लिहिलें. असो. शेवटीं आम्हास ती रक्कम मिळाली असल्याचें त्यांस कांहीं एका मार्गानें समजलें व लवकरच त्यांनीं पुण्यांतील केसरी-मराठा ऑफिसास कळवून तेथून आणखीहि एक हजार डॉलर्स आम्हाला पाठविण्याची तजवीज केली. यावरून लालाजींनीं अमेरिकेंत चालविलेल्या कार्याकडे लोकमान्यांचे कसें लक्ष होतें व ते त्यास किती महत्त्वाचें समजत हें उघड आहे.

असो. लालाजींच्या पुस्तकांनीं मिळालेला पैसा, लोकमान्यांची मदत आणि अमेरिकेंतील आमच्या सर्व दर्जाच्या मित्रांनीं केलेलें धनसाहाय्य यामुळें आमची आर्थिक अडचण पुष्कळ अंशीं दूर होऊन आमचें कार्य सुकर झालें.

# र जः क ण

ज्यांनीं चोरी करून पचनीं पाडली ते प्रामाणिक-पणाची स्तुति करतातच, पण ज्यांना पुढे चोऱ्या करावयाच्या आहेत तेहि ती स्तुति आगाऊच करूं लागतात. इंग्लंड फ्रान्स वगैरे लढाऊ राष्ट्रांनीं शांततादेवीची पूजा आरंभिलीच होती. पण आतां अमेरिकेनेंहि ती सुरू केली आहे. कारण आपणाला पुढें युद्धें करावी लागणार अशीं स्वप्नें तिला पडूं लागलीं आहेत.पाहा! दुःस्वप्नाचा आगाऊच परिहार!

***

अमेरिकन मंत्री केलॉग यांनीं शांततावादी तह लिहिला. त्यावर युरोपियन राष्ट्रांनीं उड्या घालघालून सह्या केल्या. कांहीं राष्ट्रे तर असेंहि म्हणत हातीं म्हणतात कीं "अरेरे, हा तहाचा मसुदा इतका चांगला आहे कीं, त्यावर आम्ही एक सोडून दोन हातांनीं सह्या केल्या असत्या.पण—पण काय करावें! दुसरा हात जरासा गुतला आहे." हा दुसरा हात बार भरलेल्या पिस्तुलाच्या घोड्यावर होता.

हल्लींचे दिवस शांततावादाचे असल्यामुळें सगळीं नांवें त्याला शोभतील अशींच ठेवलीं पाहिजेत. फ्रान्सने असे ठरविलें आहे कीं आपल्या युद्ध-खात्याला यापुढे 'शांततारक्षक खातें' असें कागदोपत्रीं म्हणावें. इंग्लंडाने 'युद्धमंत्री' हें नांव काढून टाकून 'लष्करमंत्री' हे नांव चालू केलें आहे. पण अजून त्यांत कोणीकडून तरी शांतता असा शब्द घुसडावयाचा राहिला आहे. 'तोफे' ला 'अलगुज,' 'बाँबला' 'कंदुक,' 'तलवारी'ला 'लोहलता,' 'विषारी धुरा'ला 'ऐंद्रजाल,' 'हल्ला' याला 'प्रगति,' 'तोफेच्या मारगिरी'ला 'गुलाल-गोट्याचा खेळ,' 'रक्ता'ला 'लाल पाणी,' व 'मृत्यू'ला 'परम सुख' अशीं इतर नांवें सुचविण्यांत आलीं आहेत!

***

पण युद्धाचीं स्मारकें म्हणून शत्रूकडून पाडाव करून आणलेल्या व इतर तोफा शहराशहरांच्य

पदार्थसंग्रहालयांत ठेवल्या आहेत व लहान मुलें त्या भयंकर वस्तू पाहातात त्याची वाट काय ? असा प्रश्न इंग्लंडांतल्या एका मेयॉरनें केला आहे. पण त्या तोफा दृष्टीआड करण्याला त्या मोडून-तोडूनच टाकावयाला कशाला हव्या ? शांतता परिषद व केलॉगचा तह हा ज्यांत कशिद्यांत विणला आहे अशा रेशमी झुली या तोफांवरून घातल्या म्हणजे झाले.

***

जातवार संघाच्या मागणीला दिवसेदिवस तरतरी येऊं लागली आहे. आजवर फक्त ब्राह्मणेतर संघ होता. त्यानंतर आतां 'मराठेतर-ब्राह्मणेतर' संघ स्थापन झाला आहे. उद्यां 'शाणव कुळेतर–मराठेतर–ब्राह्मणेतर' संघ निर्माण होणार. व परवां 'अकरमासेतर–शाणव–कुळेतर–मराठेतर–ब्राह्मणेतर' संघ निर्माण होईल.

***

सायमन कमिशनाचा खरा उद्देश असा आहे कीं, राजकीय सुधारणांच्या प्रगतीच्या नांवानें 'कमीत कमी' किती हक्क हिंदी जनतेला देता येताल. पण हेच काम विलायतेतल्या 'शिंपी संघा' कडे सोंपविलें असतं तरी चाललें असतं.कारण स्त्रियांचा लहंगा 'कमींत कमी' किती कापड खर्चून तयार करतां येईल याविषयीं या शिंपी संघानें हल्लीं चौकशी सुरू केली आहे.

***

विलायती स्त्रियांनींहि अलीकडे दैवी संपत्तीचा शोध चालविला आहे. ईश्वराच्या बागेत (ईडन) पतीसह नांदणाऱ्या आदिमस्त्री ईव्हनें लज्जारक्षणार्थ वस्त्र म्हणून अंजिराचें एक पान लावून घेऊन काम भागविलें होतें. व त्याने तें काम तेव्हां भागतहि होतें.विसाव्या शतकांतल्या सुधारलेल्या स्त्रीचा निश्चय ही मितव्ययी सात्विक दैवी संपत् आपलीशी करण्याचा आहे असें म्हणतात.

***

हिंदु लोकांत 'तेरावा' दिवस हा मृताच्या उत्तर-कार्यासंबंधानें प्रसिद्ध असल्यानें तो अशुभ मानितात. इंग्रज लोकांत 'तेरावा' हा संख्यावाचक शब्द अशुभवाचक मानितात हें प्रसिद्धच आहे. यावरून एक 'तुलनात्मक संस्कृतिसंशोधक' कळवितात कीं, हिंदु लोक व इंग्रज लोक हे मूळ एकाच वंशाचे होत असा सिद्धांत अवश्य काढावा. खोट्या 'साम्या' च्या समुद्रावरून जितके तरून गेले त्यापेक्षां त्यात बुडालेल्यांचीच संख्या अधिक भरेल.

***

'बोल्शेव्हिक' हा शब्द दिसण्यांत नवा दिसला तरी तो संस्कृताचाच अपभ्रंश होय असेंहि या संशोधकांचें मत आहे. 'बोल्शेव्हिक' म्हणजे 'बलसेवक' दुसरें तिसरें कांहीं नाहीं. अचा ओ होणें व अची इ होणें हें फायलॉलजीच्या शास्त्राला धरूनच आहे.आणि श व स यांतील अभेद तर प्रसिद्धच आहे. अर्थात् हिंदुस्थानांत बोल्शेव्हिझम आली तर त्याला बलसेवक या शब्दाचा जुनाच आधार आहे.

***

युवक–संघाचें उदाहरण पाहून हिंदुस्थानांतील कांहीं वृद्धांनीं एक 'वृद्धसंघ' नांवाची संस्था काढण्याचें ठरविलें आहे म्हणतात. युवकसंघानें जसें ३५ व्या वर्षापुढचा कोणी सभासद घ्यावयाचा नाहीं असे ठरविलें आहे तसेच, या वृद्धसंघांत ६० वर्षांच्या आंतला कोणीहि घ्यावयाचा नाहीं. कार्यक्रमांतहि तसाच स्पष्ट भेद ठेविला आहे.'युवकसंघ' जर 'काय वाटेल ते करणार' तर 'वृद्धसंघ' कांहींहि करणार नाहीं. या दोन संघांत प्रौढांना जागा नसल्यानें त्यांनीं आतां आपलाहि एक संघ बनविला पाहिजे नव्हे काय?

***

हिंदुस्थानांत दोनतीन आठवडे घालवितांच त्या देशाविषयीं लिहिण्याची पात्रता आली असें समजून किती तरी इंग्रजांनीं आजवर हिंदुस्थानविषयक पुस्तकें लिहिलीं आहेत. दोनतीन आठवडेच का होइनात, पण त्या अवधींत प्रवाशाला हिंदी लोक डोळ्याला दिसतात तरी. पण अशीं पुस्तकें लिहिण्याची पात्रता विमान-विद्येबरोबर वाढीस लागली आहे. कराचीवरून एकदम रंगूनला जाणाऱ्या एका विमानांतील प्रवाशानें 'A bird's eye-view of India' या नांवाचे पुस्तक प्रसिद्ध करण्याची जाहिरात दिली आहे. यांत मिस मेयोच्या पुस्तकावर ताण होणार आहे असें म्हणतात. या नव्या पुस्तकांतील 'A bird's viye–vew of India' हें मात्र अगदीं खरें असणार !

***

ग्लासगो येथील रेक्टरच्या निवडणुकींत मुख्य प्रधान मि. बाल्डविन हे निवडून आले. या निवडणुकीनें स्कॉच लोकांचा वंश नामशेष होत आहे अशी हाकाटी करण्यांत आली. आहे. स्कॉटलंडमध्यें आयरिश लोकांचा भरणा होऊं लागला आहे. ब्रिटिश लोक युनिव्हर्सिटीच्या निवडणुकी जिंकूं लागले. पार्लमेंटांत स्कॉटलंडच्या हितसंबंधाची हेळसांड होते. इत्यादि कारणांनीं आतां स्कॉच जातीचें संरक्षण करण्याकरितां जातवार संघ बनविण्यांत येत आहेत. हिंदी लोकांत जातिभेद आहे म्हणून त्यांना हंसा म्हणावें !

***

हिंदी संस्थानांचा 'संबंध' आजवर हिंदुस्थान-सरकाराशीं होता हें प्रसिद्धच आहे. पण त्यांना त्याची भीति वाटावयास लागलेली असून त्यांना तो 'संबंध' यापुढें खुद्द राजे बादशहीशीं जोडण्याची इच्छा झाली आहे. पण स्वतः बादशहांना हा 'संबंध' पसंत आहे काय? पूर्वी बादशहांनीं 'स्नेहसंबंध' जोडला तो प्रत्येक वेळीं एकेकट्या संस्थानाशीं. पण शेंकडो संस्थानांशीं एकदम स्नेह-संबंध जोडणें जरासें चमत्कारिकच नव्हे काय? कोणत्याहि गोत्रांतील एका मुलीशीं विवाह करणें वेगळें. पण हें तर एका गोत्रांतील सर्व मुलीशीं एकदम विवाह करण्यासारखें होत आहे!

***

हिंदुस्थानांत जातीच्या बाहेर लग्नें होत नाहींत. तेव्हां त्यांच्या जात्यभिमानाला कारण तरी आहे. विलायतेंत, 'बाप महमदखान आई साळुबाई' अशीं लग्नें सर्रास होतात. अर्थात यामुळें जातिद्वेष हटावा. पण केवळ पितृरक्ताच्या म्हणजे आठ आणे शुद्धीच्या अभिमानानें विलायतेंत हा इंग्रज, हा स्कॉच, हा आयारश, हा वेल्श, असा भेद कडकडीत रीतीनें पाळतात. परस्परांत हेवादेवा मत्सर बेसुमार असतो. मुं. टाईम्स पत्रांत स्कॉच लोकांच्या कृपणपणाची व दारुबाजीची थट्टा केली नाहीं असा एकहि दिवस जात नाहीं. व थट्टा इतकी वाईटहि असते कीं, एखादा स्कॉच मनुष्य चाबूक घेऊन संपादकावर धांवत कसा नाहीं याचें आश्चर्य वाटतें. विलायतेंतला जातिभेद सर्वस्वी निष्कारण म्हणूनच तर या जातिद्वेषाच्या प्रदर्शनाची मौज वाटते.

# दाणे गणंग निवडून निघाले!

कलकत्याच्या तिरंगी सामन्यापैकीं कॉंग्रेस-पक्षांतील दोन उपपक्षांच्या समेटाविषयीं आम्हीं मागील अंकीं पहिली हकीकत दिलीच आहे. पण त्यानंतर स्वातंत्र्य पक्षानें फिरून उचल खाऊन भांडण निकरावर आणलें. विषयमंडळानें स्वीकारलेला समेटाचा ठराव त्यानें अमान्य केला. आपल्याला हवी तशी उपसूचना भर राष्ट्रीयसभेपुढें मांडली व प्रत्यक्ष प्रांतवार मतें मोजण्यापर्यंत पाळी आणली. अखेर तेथेंहि बहुमतानें पंडित नेहरू यांची स्वराज्याची योजनाच मंजूर झाली. पण येवढें झाल्यावर परस्पर विरोध संपला. आणि उभय पक्षांनीं मोठ्या गोडीगुलाबीनें राष्ट्रीय सभेचें उरलेलें काम शेवटास नेलें. यावरून या दोन उपपक्षांना 'मांजरी आणि तिचीं पिलें' यांच्या भांडणाची उपमा आम्ही मागच्या अंकीं दिली ती बरोबरच आहे हें वाचकांना कळून येईल.

शीख लोक सर्वपक्षीय परिषदेंतून उठून गेले होते तरी त्यांनीं राष्ट्रीय सभेंत अखेरपर्यंत भाग घेतला. उत्कल प्रांतांतील उरिया प्रतिनिधी उठून गेले होते तेहि परत आले. पं. नेहरू यांनीं त्यांचें स्वागत केलें व त्यांनींहि उलट सांगितलें कीं, "आमचा प्रांत स्वतंत्र व्हावा येवढीच आमची तळमळ आहे. नहून आम्हीं राष्ट्रीय सभावालेच आहों, तिला सोडून कोठें जाऊं? व कां जाऊं?" श्रीनिवास अय्यंगार यांनींच स्वातंत्र्याच्या ध्येयाचा झेंडा उभारून पं. नेहरू यांना आज पांचसहा महिने नुसतें सतावून सोडलें होतें. पण शेवटीं त्यांनींच गांधींच्या ठरावाला अनुमोदन दिलें; व ज्या स्वातंत्र्य पक्षाचे ते अध्यक्ष त्यानें ठराव केला असतांहि त्याविरुद्ध मत दिलें. बरें, हा सर्व बखेडा ज्यांच्या आग्रहामुळें झाला त्यांपैकीं एक म्हणजे जवाहरलाल हे तर पं. नेहरूंचे पुत्रच आहेत, आणि त्यांचे जोडीदार 'सुभाष बोस हे मला माझ्या मुलासारखे वाटतात' असें पंडितजींनीं जाहीर केलें. अशा रीतीनें या दोन उपपक्षांतला हा तंटा संपला.

आतां दुसरा म्हणजे जो मुसलमानांचा पक्ष त्याचें काय झालें तें पाहूं. एकंदर मुसलमानपक्षात किती उप-पक्ष झाले आहेत याची गणना करणें देखील कठीण होऊन बसले आहे. पण आहे ती वस्तुस्थिति क्रमानें वाचकांपुढें मांडूं म्हणजे संख्यागणित करण्याचें कारण नाहीं. राष्ट्रीय सभेत आतां स्वराज्यवादी व स्वातंत्र्यवादी हा भेद न मानतां 'संयुक्त राष्ट्रीय पक्ष' असें नांव दिलें, तर त्याला अगदीं चिटकून राहिलेले मुसलमान म्हणजे डॉ. अन्सारी, अबुल कलाम अझाद, डॉ. किश्लू वगैरे होत. पण म्हणींतल्या प्रमाणें ते खरोखरच 'हाताच्या बोटांनीं मोजण्याइतके थोडे आहेत.' हे सर्वपक्षीय परिषदेंत अखेर-पर्यंत बसले व राष्ट्रीय सभेशींहि त्यांनीं अखेरपर्यंत इमान ठेवलें.

यानंतर बॅ. जिना बॅ. छागला वगैरे मुसलमान-पैकीं छागला यांनीं नेहरू रिपोर्टाला त्यांतील मतदार-संघाच्या मुद्द्यांसकट संमति जाहीर रीतीनें दिली होती. पण बॅ. जिना हे विलायतेहून आल्यापासून त्यांचें स्थान किंचित् डळमळलें. हेहि लोक हाताच्या बोटांवर मोजण्याइतके थोडे आहेत. ते सर्वपक्षीय परिषदेंत अखेरपर्यंत बसले, जातवार प्रकरणाखेरीज बाकी सर्व शिफारसींना त्यांनीं संमति दिली, इतर रीतीनें नेहरू रिपोर्टाचे गोडवे गाइले, पण

'जातवार प्रकरणांतील शिफारसी आम्हाला मान्य नाहींत म्हणून यापुढे परिषदेंत आम्हाला बसतां येत नाहीं' असें म्हणून ते ती सोडून गेले. पण ती सोडून जातांना त्यांनीं कोणताहि अप्रशस्त प्रकार केला नाहीं. उलट बॅ. जिना हे असेंहि म्हणाले कीं "तुमचीं आमचीं मतें या मुद्यावर कांहीं केल्या जुळत नाहींत, याला इलाज नाहीं. पण आम्हीं परिषद सोडून गेलों तरी तुम्ही आम्ही स्नेहीच राहूं, वैरी नाहीं." बॅ. जिना यांनीं राष्ट्रीय सभा पूर्वींच सोडून दिली होती. आतां त्यांनीं सर्व-पक्षीय परिषदहि सोडली. ते नेमस्त पक्षांतहि नाहींत. अर्थात आतां ते नुसत्या अखिल भारतीय मुस्लीम संघांतच उरले.

पण मुस्लीम संघहि आतां जुना राहिला नाहीं. त्याचीं दोन शकले झालीं आहेत. एकाचें चालकत्व बॅ. जिना यांजकडे आहे व दुसऱ्याचे चालकत्व सर महंमद शफी यांजकडे गेलें आहे. असो; यापलीकडचे मुसलमान पक्षातले लोक म्हटले म्हणजे फाजल इब्राहिम रहिमतुल्ला, शफी दाउदी वगैरे होत. पैकीं शफी दाउदी हे असेंब्लींत स्वराज्यपक्षांत असून कोणत्याहि राष्ट्रीय कामांत सरकारला पूर्ण विरोध करणारे आहेत. फाजल इब्राहिम हे असेंब्लीतील स्वतंत्र पक्षांत आहेत व अनेक वेळां तेहि सरकारच्या विरुद्ध मत देतात. पण राष्ट्रीय वृत्तीच्या या दोघांना नेहरू रिपोर्टांतील जातवार प्रकरणांतील शिफारसी मान्य नाहींत. त्या इतक्या की, या कामीं बॅ. जिना याच्यासारखे तीक्ष्ण बुद्धीचे लोकहि चकले, फसले, आणि वरपासून खालपर्यंत हिंदू व मुसलमान यांचे सुभे सवते असल्याशिवाय मुसलमानांचा निभाव लागणार नाहीं असें त्यांच्या मनाने घेतलें आहे !

याच्याहिपलीकडे गेलों म्हणजे सर महंमद शफी, सर महंमद इकबल यांच्यासारख्या मुसलमानांचा संघ दिसतो. त्यांना राष्ट्रीय वृत्तीचे असे म्हणतांच येत नाही. पण राजकारणात मधून मधून ते लक्ष घालतात. आणि हिंदु--मुसलमान यांच्या संबंधांत केवळ धार्मिक स्वरूपाच्या बाबतींत जरी ते लक्ष घालीत नाहींत, तरी भावी राज-कारणाच्या दृष्टीने ते डोळ्यांत तेल घालून मुसलमानांचे हित पाहणारे आहेत, व त्या कामीं बॅ. जिना यांच्याइतकेहि नमते घेणारे ते नाहीत.

याच्याहि पुढचा वर्ग म्हटला म्हणजे आगाखान यांचा. हे जितके मुत्सद्दी आहेत तितकेच सरकार-जमा आहेत. म्हणजे दुर्दैवानें त्यांच्या दूरदर्शीपणाचा आणि बुद्धिमत्तेचा उपयोग लोकांपेक्षां सरकारलाच प्रायः अधिक होतो.आणि जेव्हां लोकपक्षाच्या हिताचें म्हणून कांहीं करतांना ते दिसतात तेव्हां त्यांत मुख्यतः आपल्या मुसलमान बंधूंचेंच हित त्यांनीं डोळ्यापुढे ठेवलेलें असतें.

पण अजूनहि एक वर्ग राहिला आहे. तो ज्यांना मौलाना व मौलवी म्हणतात त्या मुसलमानांचा. हा शब्द नक्की कोणाला लावावा किंवा लावतात हें समजणें कठीण आहे. परंतु या पदवीनें उल्लेखिल्या जाणाऱ्या मुसलमानांत सगळ्या सातहि रंगांचे लोक आहेत. मौलवी अबुल कलाम अझाद हे घेतले तर आज ते स्वराज्यवादी व स्वातंत्र्यवादी अशा राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीचे सभासद आहेत. पूर्ण असहकारितेच्या काळीं ते गांधींचे सहकारी होते. बोलूनचालून मुसलमान असल्यामुळे मुसलमान समाजाचें हित ते दृष्टीआड करूं शकत नाहींत. तथापि प्रमुख खिलाफतवाले असताहि ते नेहरू रिपोर्टाचे एक आधारस्तंभ आहेत. अगदीं याच्या उलट म्हटले म्हणजे दिल्ली येथें भरलेल्या सर्व-पक्षीय मुसलमान परिषदेतील एकदोन मौलवी. म्हणजे राजकारणांत ते सर्वस्वी सरकारच्या बाजूचे आणि जातवारीच्या प्रकरणांत कट्टे हिंदु-द्वेष्टे.

या दोन टोकांच्या दरम्यान मधल्या उपपक्षा-मध्ये एक एक मौलवी किंवा मौलाना वानगीदाखल समाविष्ट झालेला आढळेल. उदाहरणार्थ मौलाना महंमदअली व मौ० शौकतअली हे राजकारणांत बंडखोर म्हणविणारे असतां सर आगाखान यांच्या परिषदेंत सामील होते. हसरत मोहानी हे जातील तिकडे कट्टरच असावयाचे. राष्ट्रीय सभेंत आले म्हणजे त्यांना स्वातंत्र्याशिवाय दुसरें कांहीं खपत नाहीं. मुस्लीम लीगमध्ये ते गेले म्हणजे बॅ. जिना यांना मवाळ म्हणून ते तुच्छ मानतात. आणि जातवारीचा प्रश्न निघाला म्हणजे केवळ मुसलमानांच्या दृष्टीने पाहण्याइतका लहरीपणा त्यांच्या अंगी आढळतो.

अशा रीतीने मुसलमानांतील वर्गवारी वाचकांच्या सोयीकरितां आम्ही करून मांडली. यांत मुख्य सांगावयाची ती गोष्ट ही की,नेहरू रिपोर्ट व सर्वपक्षीय परिषद यांच्या प्रसंगानें एकंदर मुसलमान समाजा-पैकीं राष्ट्रीय वृत्तीचे, म्हणजे राजकारणाकडे जातीच्या दृष्टीनें पाहण्याचें साफ नाकारणारे, असे कितां थोडे लोक आढळतात हें कळून आलें. उलट हिंदुसमाजाकडे पाहिलें तर अशा विचाराचेच लोक किती तरी आढळून येतील.नेमस्त पक्ष राष्ट्रीय सभेंत नाहीं, तथापि जातिविषयक व धर्मविषयक प्रश्नां-संबंधानें तो सर्वस्वी राष्ट्रीय व मनानें अलिप्त आहे,हें सप्रू-चिंतामणी यांसारख्या लोकांच्या उदाहरणावरून स्पष्ट होते. इकडे सरकारजमा असून का होईना, पण दुसरीकडे निदान आपल्या म्हणजे हिंदु समाजाच्या दृष्टीनें चळवळींत भाग घेणारे, व हिंदु-समाजाला शुद्धिसंघटन वगैरे चळवळींत द्रव्यानें

किंवा निदान उघड मतप्रतिपादनानें मदत करणारे, हिंदु संस्थानिक किंवा राजेरजवाडे किंवा जमीनदार कितीसे आहेत हे सांगणें नकोच ! तेंच मुसलमानांकडे पहा !

कॉंग्रेस पक्षाकडे पाहिलें तर तेथील बहुधा यच्चयावत् प्रमुख हिंदु लोक हे हिंदुसभेपासून अगदीं फटकून वागणारे आहेत. याविषयीं महात्मा गांधीसारखे दुसरें ठळक व खात्री पटविणारें उदाहरण कोणतें देतां येईल ? पंडित नेहरू घेतले तरी ते तसेच. ते बोलूनचालून म्हणूनच दाखवितात कीं, "संस्कृतीनें पाहिलें तर हिंदूंपेक्षां मी मुसलमानच अधिक भरेन !" सरोजिनीबाईहि याच वर्गांत पडतात. या उभयतानीं शुद्धिसंघटनाच्या चळवळी-विरुद्ध शेंकडों वेळां भाषणें केलीं, पण 'तुम्ही हिंदूंना व्यर्थ कां बाटवितां ? " असें त्यांनीं मुसलमानाना एकदांहि चरचरीत विचारलेलें आठवत नाहीं. श्रीनिवास अय्यंगार हे आचारविचारानें चांगले हिंदु आहेत, व एखाद्या प्रसंगीं अभिमान–पुरस्सर हिंदुत्वाचा पुरस्कार करतातहि. पण राजकारणाच्या दृष्टीनें देशांत एकी राहावी म्हणन मुसलमानां-कडेच झुकतें पारडें देण्यास ते तयार असतात.

म. गांधी यांच्या अनुयायी वर्गापैकीं पुष्कळ प्रमुख राष्ट्रीय सभावाले हिंदू असे दाखविता येतील कीं, त्यांना हिंदु समाजाची पीछेहाट मुसलमानांच्यामुळें झालेली दिसत आहे. ही गोष्ट ते खासगी संभाषणांत कबूलहि करतात. हिंदुत्वाचा त्यांना अभिमानाह आहे. परंतु एकाने गाय मारली म्हणून दुसऱ्यानें वासरूं मारूं नये, असली विचारसरणी पुढे करून हिंदुसभेच्या कोणत्याहि चळवळींत ते पडत नाहींत, फक्त आतून मनानें झुरतात व कांचणी लावून घेतात !

राहता राहिले हिंदु–महासभेचे पुरस्कर्ते. त्यापैकीं लाला लजपतराय हे गतवर्षी सायमन कमिशन आल्यापासून हिंदू–सभेकडे कानाडोळा करूं लागले होते. आणि पं. मदन मोहन मालवीय यांना, हिंदु-सभेच्या एकांगीपणाविषयीं विषाद वाटण्याची, सायमन कमिशनमुळेंच इतकी लहर आली कीं, गतवर्षी जबलपूर येथें हिंदुमहासभेच्या अधिवेशनांत राष्ट्रीय सभेच्या निर्लेप धोरणाचें समर्थन करण्याचे पायीं त्यांनीं आपली जुनी पुण्याई व्यर्थ पणास लावून हार खाल्ली. त्याचप्रमाणें परवां सर्वपक्षीय परिषदेंत जिना यांना विरोध करण्याचा प्रसंग बॅ. जयकर यांजवर आला. पण जाति व धर्म यांच्या कल्पनांपासून त्यांचें मन किती मुक्त असतें ही गोष्ट सर्व हिंदुस्थानच जाणत असल्यामुळें आम्ही त्याचें वेगळें विवेचन करण्याचें कारण नाहीं.

अशा रीतीनें बहुतेक सर्व प्रमुख हिंदु पुढाऱ्यांना संक्षेप दिल्यानंतर, ज्यांच्यावर हिंदु-धर्माचा फाजील–म्हणजे राष्ट्रीयत्वविनाशक–अभिमान धरण्याचा आरोप आणला जातो असे लोक डॉ. मुंजे, राजा नरेंद्रनाथ, डॉ. गोकुळचंद नारंग व भाई परमानंद असे हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच थोडे लोक उरतात. पैकीं भाई परमानंद हे एकटेच काय ते जात्यभिमानाच्या उत्कट कोटीला जाऊन पोंचले आहेत. त्यांच्याविषयीं वाटेल तर आम्ही कांहीं म्हणत नाहीं. राजा नरेंद्रनाथ व गोकुळचंद नारंग हेहि स्वभावानें भांडखोर नाहींत. परंतु सायमन कमिशनपुढें हिंदूंची बाजूच मांडली जात नाहीं, मुसलमानांची मात्र सगळीच्या सगळी बाजू मांडली जात आहे, ही गोष्ट प्रामाणिकपणें न पटल्यामुळेंच ते बंडखोरी पत्करून या कामांत पडले.

पण डॉ. मुंजे सायमन कमिशनासंबंधीं पूर्ण बहिष्कारवादी राहिलेले असून, सर्वपक्षीय परिषदेंत त्यांनीं पं. नेहरू यांच्या जातिविषयक व धर्मविषयक शिफारसींचा अक्षरशः पाठपुरावा करण्यापलीकडे अधिक गुन्हा कोणताच केलेला नाहीं हें सूक्ष्म विचारांतीं कोणासहि दिसून येईल. डॉ. मुंजे हे उत्तरास प्रत्युत्तर या न्यायानें वेळीं तोंड टाकून बोलेत. परंतु स्वराज्याच्या घटनेंत त्यांनीं हिंदूंकरितां असें वेगळे काय मागितलें आहे तें कोणीहि सांगावें असें आम्ही आव्हान करतों.

असो. वर जी ही आम्ही निरनिराळ्या वर्गांची व व्यक्तींची चांचणी घेतली, तिजवरून स्वराज्याकरितां एकी ठेवण्याचा प्रयत्न खरा कोण करीत आहेत व स्वराज्याचें नांव घेत असतां इकडे आपल्या जातिविषयक स्वार्थाची पोळी कोण भाजून घेत आहेत, हें वाचकांना स्पष्ट समजून येईल. गांधींनीं हल्लीं मुसलमानांचें नांव टाकलें आहे. आणि राष्ट्रीय सभेच्या विधायक कार्यक्रमांत हिंदू-मुसलमानांच्या एकीचें नेहमींचें कलमहि घातलें नाहीं. यावरून काय बोध घ्यावयाचा हें आतां स्पष्ट करून सांगण्याचें कारणच नाहीं.

---

# केसरी--मराठा ट्रस्टसंबंधीं दाव्यांचा अर्धा निकाल

केसरी-मराठा संस्थेचे ट्रस्टी श्री. केळकर व विद्वांस आणि लोकमान्य टिळकांचे चिरंजीव यांचे दरम्यान पुणें येथील फर्स्ट क्लास कोर्टांत जे दावे चालू होते त्यांची पूर्वीची हकीकत थोडीबहुत वाचकांना विदित आहेच. मूळ एक दावा टिळकांच्या चिरंजीवांविरुद्ध निरंतरच्या ताकीदी मागण्याचा ट्रस्टींनीं केला होता. उलट टिळकांच्या चिरंजीवांनीं दोन दावे एक ट्रस्टीविरुद्ध व एक एक्झिक्यूटर विरुद्ध असे केले होते. पैकीं एक केसरी ट्रस्टकडे भाड्यानें असलेल्या जागेसंबंधीं होता, तो सुनावणीच्या तारखेस वादींनीं काढून घेतला. आणि त्याच दिवशीं ट्रस्टींनींहि, ताकिदीच्या दाव्यांत रामभाऊ टिळक यांजवर तर्तातूर्त ताकीद तोडल्याचा अर्ज आपणाला चालवावयाचा नाहीं, असें सांगून तो काढून घेतला. अशा रीतीनें हे अप्रिय वाद तुटण्यास सुरुवात झाली होती.

मध्यंतरी उरलेल्या दाव्यांसंबंधानेहि तडजोडीचें बोलणें वकिलामार्फत सुरू होते. या कामीं ट्रस्टींचें वकील श्री. आण्णासाहेब भोपटकर यांनीं रामभाऊ टिळक यांचे सॉलिसीटर यांना अनेक पत्रे पाठवून अखेरचें म्हणून असें कळविलें होते कीं, "तुमचे काय म्हणणे मागणें असेल तें कलमवार व निश्चित अशा स्वरूपाचें कळवा, म्हणजे ट्रस्टी हे त्याचा विचार करून ते स्वतः काय करण्यास तयार आहेत हें तसेंच उलट लेखी वकिलामार्फत कळवितील. तुम्हास याप्रमाणें मागण्या कळवावयाच्या नसतील तर तुम्हाला तडजोड कर्तव्यच नाहीं असें आम्ही समजूं." अशा प्रकारचें पत्र एक महिन्यापूर्वी गेलें. त्याला सॉलिसिटर मजकूर यांजकडून कोणतेंच उत्तर परवांपर्यंत आलें नाहीं.

यानंतर एक्झिक्यूटर रा. विद्वांस यांच्यावरील हिशेब मागण्याचा दावा रामभाऊ टिळकांचा उरलेला होता त्याची तारीख, मुद्दे काढण्यावर आणि ट्रस्टींनीं रामभाऊ टिळकांवर केलेल्या ताकिदीच्या दाव्याची तारीख, पुराव्याच्या तजविजीसाठीं होती. या दोनहि एकाच दिवशीं म्हणजे ता. ५ जानेवारी रोजीं कोर्टानें ठेवल्या होत्या. हे दावे पुढें चालावयाचे तर प्रत्येक पक्षकारानें आपापल्या तर्फे पुराव्याची तजवीज साक्षी दरखास्ती देऊन भत्ते भरून करावयाची हें काम सदर तारखेस व्हावयाचें होतें. तडजोडीच्या कामीं सॉलिसिटर यांजकडून पुढें कांहीच लिहून न आल्यामुळें ट्रस्टीतर्फे वकिलांनीं आपली पुराव्याची तजवीज केली, व उलट बाजूहि आपली तजवीज करील अशी त्यांची अपेक्षा होती. परंतु शनिवारी दोनहि दावे कोर्टांत सुनावणीस निघाल्यावर रा. रामभाऊ टिळक यांनीं वकीलामार्फत कोर्टास असें कळविलें कीं 'मला या दाव्यांत काम चालवावयाचें नाहीं या दोनहि दाव्यांतील त्यांच्या अर्जांत वादी किंवा प्रतिवादी या नात्यानें योग्य तो बदल करून पण खालीलप्रमाणें जवळ जवळ एकच मजकूर आहेः—

"ट्रस्टीच्या दाव्याचें कामीं प्रतिवादीतर्फे पुरशीस कीं, प्रतिवादी नंबर १।२ यांस सदरहू दाव्याचें कामीं हजर राहावयाचें नाहीं. त्या बाबतींत अलाहिदा-अर्ज दिलेला आहे. तरी सदरहू दाव्याचें काम Ex Parte म्हणून चालविण्यांत यावें."

ता. ५-१-१९२९.

( सही ) **रामचंद्र बळवंत टिळक,**
स्वतःकरितां व अज्ञान
**जयंत श्रीधर टिळक,**
याचें पालन करणार म्हणून.

**एन. डी. डांगे**, वकील.

---

वर उल्लेख केलेला अलाहिदा अर्ज खालीलप्रमाणेः—

"सदरहू कामीं प्रतिवादीतर्फे अर्ज कीं,

मूळ प्रतिवादी नं. २, म्हणजे प्रतिवादी नं. १ चे धाकटे बंधु कै. श्रीधर बळवंत टिळक, यांचे आत्महत्येमुळें प्रतिवादी नं. १ च्या मनःस्थितींत जो फरक झाला आहे त्यामुळें स्वतः प्रतिवादी नं. १ तर्फे सदरहू दाव्याचें काम पुढें चालविणें प्रतिवादी नं. १ यांस अशक्य झालें आहे. तसेंच प्रतिवादी नं. १ च्या सदरहू कै. बंधूनीं प्रतिवादी नं. १ यांस आपल्या अज्ञान मुलांचा पालन करणार नेमल्यामुळे, व अज्ञानांचें आईनें व मे. कोर्टानेंहि त्यांस संमति दिल्यामुळें, प्रतिवादी नं. १ वर अज्ञानाचे पालनपोषणाची वगैरे जी जबाबदारी आली आहे, त्यामुळें हल्लींच्या परिस्थितींत तरी अज्ञानांच्या हिताचा एकटा खरा व पूर्ण माहितगार The only best judge या दृष्टीनेंहि प्रतिवादी नं. १ यांस सदरहू दाव्यांतून अंग काढून घेऊन प्रतिवादी नं. २ विरुद्धहि सदरहू दाव्याचे कामीं एकतर्फे निकाल ( Ex-parte decision ) होऊं देणें योग्य वाटत आहे. वास्तविक प्रतिवादी नं. १ यानें उभयतां प्रतिवादींकरितां ही गोष्ट पूर्वीच करावयास पाहिजे होती. परंतु मध्यंतरीं तडजोडीचें घाटत असल्यामुळे ह्याप्रमाणें करतां आलें नाहीं. परंतु आतां तडजोड फिसकटल्यामुळे मे. कोर्टास चालू अर्ज करणें प्रतिवादी यांस भाग झालें आहे. तरी

प्रतिवादीतर्फे विनंति कीं, वरील एकंदर परिस्थितींत सदरहू दाव्याचें काम वादी यांस पुढें चालवावयाचें असल्यास, दाव्याचें कामीं आतांपर्यंत जो काय एकंदर पुरावा व कागदपत्र हजर झाले असतील त्यावरून मे. कोर्टानें एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन व अज्ञानाचें हिताचे दृष्टीनें योग्य तो निकाल खर्चाचे व इतर सर्व बाबतींत द्यावा ता. ५ माहे जानेवारी सन १९२९."

(सही) रामचंद्र बळवंत टिळक,
स्वतःकरितां व अज्ञान
जयंत श्रीधर टिळक,
यांचा पालन करणार म्हणून.
एन. डी. डांगे, वकील.

---

हिशेबाच्या दाव्यांत रामभाऊ टिळक हे वादी असल्यामुळें कोर्टानें लगेच अर्जावर शेरा मारून दावा निकालांत काढला. दुसऱ्या म्हणजे ट्रस्टींनीं केलेल्या दाव्यात रामभाऊ टिळक हे प्रतिवादी आहेत. यामुळें या दुसऱ्या दाव्यांत त्यांनीं आपल्याला काम चालवावयाचे नाहीं, व वादीचें काम एकतर्फी चालण्यास माझी हरकत नाहीं, असें लिहून दिलें आहे. तथापि तेवढ्यानें व त्यामुळें तो दावा निकालांत निघूं शकत नाहीं. याकरितां पुढील काम एकतर्फी चालून पुढील एकाच तारखेस बहुधा तोहि दावा निकालात निघेल.

अशा रीतीनें या सर्व दाव्यांचें काम स्वतः रामभाऊ टिळक यांच्या पुरतें तरी संपलें. एक्झिक्यूटरवरील दाव्यांत कोर्टखर्चाचें काय करावयाचें असा प्रश्न निघाला असतां 'आम्हाला रामभाऊ टिळक यांजकडून कोर्टखर्च वसूल करून घेण्याची इच्छा नाहीं' असें एक्झिक्यूटर रा. विद्वांस यांचेतर्फे कळविण्यांत आलें.

वर रामभाऊ टिळक यांनीं कोर्टास लिहून कळविलेला म्हणून जो मजकूर दिला आहे, त्यावरून हें दिसून येईल कीं, रामभाऊ टिळकांबरोबर त्यांचे धाकटे बंधु कै. श्रीधरपंत टिळक हे एका दाव्यांत समाईक वादी व एका दाव्यांत समाईक प्रतिवादी होते. ते मृत्यू पावल्यावर त्यांचे जागीं त्यांचा अज्ञान मुलगा जयंत याचें नांव दाखल होऊन, कोर्टातील कामाकरितां रामभाऊ टिळक यांस त्याचे पालनकर्ते म्हणून नेमण्यांत आलें होतें. परंतु रामभाऊ टिळक यांनीं स्वतः-पुरतें दाव्यांतून अंग काढून घेतलें तरी आपल्या अज्ञान पुतण्यातर्फे तसेंच करण्याची सर्वस्वी जबाबदारी घेण्याची त्यांची इच्छा नव्हती. यामुळें रामभाऊ टिळकांपुरते हुकूमनामे झाले तरी कै. श्रीधरपंत यांच्यापुरते अधिकार शिल्लक राहातातच. पण उरलेलें हे काम आपल्यातर्फे चालवावयाचें कीं नाहीं हें अखेर ठरविण्याचा अधिकार स्वतः अज्ञान मुलासच आहे, व तो सज्ञान झाल्यावर मग हा अधिकार बजावून नवीन फिर्यादी कराव्याशा वाटल्या तर तो करील; व त्यापुरती परवानगी आज कोर्टानें देऊनहि ठेविली आहे. पण तेव्हांहि झालें तरी या दाव्यांचें काम पुनः सुरू होईल असें आम्हांस आज तरी वाटत नाहीं.

ट्रस्टींनीं केलेल्या कायमच्या ताकिदीच्या दाव्याचे काम पुढील एका तारखेस एकतर्फी चालून संपेल. तेव्हां कोर्ट रीतसर निकाल देईल तो आम्ही वाचकांस कळवूंच.

# पेशावरचें बातमीपत्र

(आमच्या प्रवासी प्रतिनिधीकडून)

पेशावर २५-१२-२८

घोडा निकामी कां झाला, भाकरी कां करपली विड्याचीं पानें कशानें कुजलीं या तीनहि प्रश्नांस "न फिरविल्यानें" असें एकच उत्तर लागू पडतें. तीच गोष्ट विमानाचीहि दिसते. कारण येथें रोज सकाळीं सूर्योदयाबरोबर निदान दोन विमानें तरी आकाशांत गंभीर ध्वनि करीत संचरताना दिसतात. सध्याच्या अफगाण परिस्थितीमुळें प्रातःकालीन टेहळणीस प्रारंभ होतो अशांतला मुळींच प्रकार नाहीं. कारण "हवाई जहाज" येथील जनतेच्या इतकें आंगवळणीं पडलें आहे कीं डोक्यावरून कितीहि फेऱ्या झाल्या तरी तिकडे त्यांना पाहावेसें वाटत नाहीं. उलट पेशावरांत आलेला परकी मनुष्य ओळखण्याची खूण म्हणजे तो आकाशांतील विमानाकडे मान वर करून पाहात असतो हीच समजतात. सुभाषितकारांना 'अतिपरिचयादवज्ञा' कशी होते हं दाखविण्यास आणखी एक ताजें उदाहरण मिळालें!

## विमानांची फेरी

या आकाशयानाचा उपयोग नुकताच फार महत्त्वाचे कामीं झाला. काबूलशीं दळणवळण थांबून बरेच दिवस झाले. तेथील खुशालीची खबर आणण्यासाठीं येथून विमान गेल्याचें लिहिलें आहेच.

त्यानंतर म्हणजे गेल्या दोन-तीन दिवसांत आणखीहि विमानें काबूलला गेलीं होतीं व परतहि आलीं. इंग्रज वकिलातींतील अधिकाऱ्यांचीं बायकापोरें हल्लींच्या धांदलीच्या काळीं काबूलला राहाणें इष्ट नसल्यानें त्यांना पेशावरला आणण्यासाठीं या आकाशायानांचीच योजना शक्य होती व तदनुसार तें काम पूर्णपणें यशस्वी झालें. इतकेंच नव्हे तर फ्रेंच व जर्मन वकिलांच्या कुटुंबांतील कांहीं मंडळी येथें सुरक्षिततेसाठीं आली आहेत. अर्थातच यांच्याकडून काबूलमधील परिस्थितीची खरी माहिती मिळण्याचा संभव होता. पण मोठ्या कडेकोट बंदोबस्तांत या राजकीय पाहुण्याची सोय केली असल्यानें त्यांचें दर्शन होणेंच मुष्कील झालें आहे. पुष्कळ प्रयत्न केल्यानंतर त्यांच्याशीं बोलण्यासाठीं म्हणून गेल्यावर त्यांना कोणाजवळ कांहींहि न बोलण्याची सक्त ताकीद असल्याचें कळलें ! शिवाय त्या पडल्या जर्मन अथवा फ्रेंच स्त्रिया. त्यांना इंग्रजी पूर्णपणें येत नाहीं ही एक अडचण कशी तरी दूर करावी तर "आळी मिळी गुप चिळी"ची धोंड मधली हलत नाहींच ! बरें, इंग्रज वकिलांची पत्नी लेडी हंफ्रे डेव्हीस या बाईची गांठ घ्यावी म्हटलें तर त्या चीफ कमिशनराकडे उतरलेल्या ! वायव्य प्रांताच्या 'राजा'कडे त्या खास पाहुण्या ! तेव्हां अगोदर दाद लावण्यासच वेळ लागला! चीफ कमिशनराचे सेक्रेटरी चौकशीला आले कीं, कोणत्या पत्राचे प्रतिनिधि पाहुण्या बाईची भेट घेऊं इच्छितात! 'केसरी'चे नांव सांगतांच त्यांना काय वाटलें कोणास ठाऊक, त्यांनीं आतून जाऊन कमिशनराचा निरोप आणला कीं, इंटेलीजन्स खात्याच्या (सी. आय. डी.) वरिष्ठांकडे जा व तुमच्या वर्तमानपत्रासंबंधीं त्यांचें मत लिहून आणा. चीफ कमिशनरांनीं मागितलें आहे.

## मुलाखतीचा निष्फळ प्रयत्न

सी. आय. डी. च्या वरिष्ठांकडे जातांच त्यांनीं कशासाठीं मत पाहिजे असा प्रश्न केला. सर्व हेतु सांगतांच ते म्हणाले, 'केसरी'हे दैनिक का साप्ताहिक आहे? कोठें निघतें हें वर्तमानपत्र ! संपादक कोण !

त्यांची शंकानिवृत्ति करण्यासाठीं सर्व प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. श्री. केळकरांचें नांव घेतांच गुप्त पोलिसाधिकारी म्हणाले कीं, "ओ, मि. केळकर माझ्या परिचयाचे आहेत. त्यांना आम्ही सरहद्दीवर नेलें होतें." इतर कांहीं बोलणें झाल्यावर त्यांनीं टेलिफोनमधून आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्याकडून 'केसरी' संबंधीं माहिती विचारली आणि "मि. केळकरांचें 'केसरी' हें साप्ताहिक जबाबदारीनें चालविलें जात आहे" असें आपलें मत लिहून दिलें.

एवढ्यानें लाटांचें समाधान झालें. म्हणजे लेडी हंफ्रे यांना मुलाखत देतां कां असा प्रश्न विचारण्यास अनुज्ञा मिळाली! परंतु अस्वस्थ मन असल्यानें किंवा कांहीं अन्य कारणानें त्यांनीं दिलगिरी प्रदर्शित करून नकार दिला! समाधानाला जागा इतकीच कीं दुसऱ्या कोणत्याहि वर्तमानपत्राच्या प्रतिनिधींस त्यांनीं मुलाखत दिली नाहीं व बहुधा देणारहि नाहींत !

असो. अफगणिस्थानांतून तारा व टपाल सध्या कंदाहारमार्गें येत आहे. नेहमींचा खैबर घाटामधला डाका–जलालाबाद हा रस्ता बंद आहेच, पण ताराहि तोडल्या गेल्या असल्याचें समजतें. लंडीखाना म्हणजे ब्रिटिशांचें अखेरचें ठाणें हें खैबर घाटांत आहे. तेथपर्यंत तार व टेलिफोन असल्यास नवल नाहीं. पण तेथून पुढें अफगणिस्थानाची हद्द आहे व त्या प्रांतांतून गेल्याविना तर चालत नाहीं. काबूलशीं हिंदुस्थानाचा तारायंत्रद्वारा संबंध असणें व्यापारी दृष्टीनें आवश्यक नसलें तरी लष्करी दृष्ट्या त्याला विशेष महत्त्व असल्यानें इ. स. १९२२ मध्यें हिंदुस्थानसरकारनें उदारपणानें अफगाण अमीरांस एक मोठी देणगी दिली. ती कोणती म्हणाल तर लंडीखान्यापासून पुढें काबूलपर्यंत लागणाऱ्या तारा व खांब याची! आणि अफगाण–सरकारनेंहि दान घ्यावयाचें नाहीं अशा वृत्तीचें प्रदर्शन करण्यापुरतेंच धोरण ठेवलें. राजकारणी प्रेमानें पुढें आलेलें बक्षीस स्वीकारून अफगाण हद्दींत तारांचे खांब रोवण्यासाठीं लागलेली मजुरी मात्र काबुलाधिपतींनीं दिली. अशा प्रकारें या निकटवर्ती देशांत विद्युत्संदेशांचें दळणवळण १९२२ पासून स्थापित झालें. वर्तमानपत्रांसाठीं इतरत्र असणाऱ्या सवलती या पेशावर–काबूलमार्गानें तारा गेल्या असतां मिळत नाहींत. प्रतिशब्दास तीन आणे हा अफगाणिस्थानास पाठवावयाच्या तारांचा दर आहे. अद्याप तेथें वर्तमानपत्रांचा प्रसार व्हावा तितका झाला नसल्यानें ही सवलत मिळाली नाहीं; पुढें यथाकाल अवश्य मिळेल अशी आशा आहे.

पेशावरपासून कोहाटला जाण्याची सडक मध्यंतरीं ५-७ मैल गैरमुलखांतून म्हणजे स्वतंत्र प्रदेशांतून जाते. रेलवेनें कोहाटशीं दळणवळण असलें तरी सडकेचा प्रवास थोडक्यांत व जलदीनें होतो. रेलवेमार्गानें कोहाट १३१ मैल पडतें तर मोटाररस्त्यानें केवळ ४१ मैलांचाच प्रवास करावा लागतो. या रस्त्यावरून प्रवास करतांना कांहीं काळ स्वतंत्रतेचें वारें लागतें. त्या प्रांतावर अफगाण निशाणहि फडकत नाहीं आणि ब्रिटिशांचें यूनियन जॅक तर दृष्टीसहि पडणार नाहीं. निशाणासारख्या चिंधोट्या मात्र ठिकठिकाणीं पुष्कळशा लागलेल्या आढळतात. स्मशानभूमींत कोणा 'पुण्य' पुरुषाच्या थडग्याच्या

बाजूस लोकांनीं आपापलीं जीर्ण वस्त्रें फाडून लावलेलीं असतात. कारण खेडवळ जनतेस औषधपाण्याचा उपाय म्हणजे हाच ! थोर साधूच्या कापडाची चिंधी बांधणें म्हणजे नवस करण्यापैकींच प्रकार आहे. तेथील झाडास विशेषच थोरवी येते. त्या झाडाचा पाला सर्व रोगांवर किंवा हरप्रकारच्या जखमांवर रामबाण उपाय मानला जातो. अशा फाटक्या चिंध्याशिवाय दुसरें कापड फडकतांना दिसत नाहीं.

## आफ्रिडी लोकांची स्वतंत्र वृत्ति

या प्रांतांत विशेष प्रामुख्याने गोष्ट दिसत असेल तर ती म्हणजे लोकांची स्वतंत्र वृत्ति. मुसलमान म्हणजे अदबीनें कंबर लववून सलाम करणारा असा आपणाला ठाऊक असतो. परंतु इकडील प्रांतीं त्याचा नूर अगदीं पालटलेला दिसतो. अत्यंत स्वतत्र आचाराचे हे लोक पाहिले कीं त्यांच्या बेफाम वर्तनाचें कौतुक करावेसें वाटतें. आणि आपणास असें भाग्य कधीं लाभेल काय ? हा विचार मनांत येतो... सर्वांत मौज वाटते ती त्या स्वतंत्र लोकांना भिऊन वागणाऱ्या आपल्या लोकांची. ब्रिटिश अधिकारी असोत किंवा दुसरे व्यापारी अथवा इतर साधे लोक असोत, ते या स्वतंत्र प्रांतील लोकांना भिऊन इतके नरम येतात कीं अगदीं लवून सलाम करून किंवा अशाच नम्रतेनें त्याच्यापुढे हाजी–हांजी करतात! रस्त्याच्या अगदी बाजूला म्हणजे १०-१२ पावलावरच बंदुका तयार करण्याचा मोठा कारखाना आहे. ब्रिटिश मुलखांत बंदुका बाळगण्यास परवाना लागतो तर येथें तीं शस्त्रें दिवसाढवळ्या अगदीं भररस्त्यावर बनवीत असतात. हें दृश्य प्रथमतः जरासें विचित्रच दिसतें ! पण लष्करी अधिकारी तेथें ते कारखाने पाहाण्यास येऊन आचंब्यानें चकित होतात. रानटी लोक–अक्षरशत्रु, पाश्चात्य यंत्रशास्त्रांची जानपछान नसलेले–अगदीं नवीन प्रकारच्या रायफल्स व बंदुका तयार करतात हें आश्चर्य करण्यासारखें नाहीं असें कोण म्हणेल ? आधुनिक सुधारणेचा थोडासा गंध या स्वतंत्र रानटी लोकांना लागलेला असेल तो या शस्त्रांचा आणि तीं तयार करण्यासाठीं लागणाऱ्या साध्या यंत्रांचाच. अगदीं साधीं यंत्रें वापरूनहि इंजिनाच्या साहाय्याशिवाय उत्तम तऱ्हेचीं शस्त्रें तयार करतां येतात हें या आफ्रिडी लोकांनीं जगाच्या निदर्शनास आणलें आहे! सर्वच काम माणसांकरवीं चालत असल्यानें अर्थातच ८ दिवसांत एक बंदूक–रायफल–तयार होते व सुमारें ८०–९० रुपयांस ती त्या कारखानदारांना पडते. त्याच बंदुकीची विक्रीची किंमत सुमारें २५०-३०० रु. असते. म्हणजे बंदुकांना भारोभार रुपये मिळतात असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

हा बंदुकांचा कारखाना भररस्त्यावर आहे; आणि असे किती तरी कारखाने या स्वतंत्र मुलखांत आहेत. बंदुकांना अतिशय मागणी असल्यानें दिवसभर त्यांचें काम चालू असतें. लांकडी, लोखंडी हाताचें किंवा यंत्राचें काम करणारे सर्व कारागीर पठाणच आहेत. देखरेखीसाठींहि वेगळा 'तज्ज्ञ' असा कोणी नाहीं ! सर्वच स्वतंत्र आणि सर्वच मालक असा प्रकार असल्यानें कारखाना फारच उत्तम व्यवस्थेनें चालतो. अशा मुलुखांतून येणाऱ्या दरवडेखोरांची भीति साहजिकच असावयाची.

## नाताळाचा सण

अफगाणिस्थानाचा रस्ता बंद असल्यानें इकडील व्यापाऱ्यांचें फारच नुकसान झालें आहे. तसेंच तिकडील लोकांची बरीच गैरसोय झाली असली पाहिजे ! सुमारें दीड महिना झाला, मालाची जा–ये सर्व थाबली आहे. कालच 'बडा दिन' नाताळ झाला. त्यासाठीं लागणारीं फळें व सुका मेवा काबूलहून आला नाहीं म्हणून होता तोच माल जरा तेजीनें विकला गेला. काबूलला तर नाताळांतील मेजवानीसाठीं युरोपियनांना डब्यांतल्या पदार्थांचा तुटवडा पडला. मदिरा संपुष्टांत आली असल्यानें त्यांना मोठी काळजी होती कीं हा मोठा धार्मिक सण सुका जाणार कीं काय ? पण काबुलांतच दरवडेखोरांची टोळी आल्यानें दुकाने वगैरे बंद होतीं आणि कित्येकांचीं आवडतीं कुटुंबांतील माणसें या नाताळाच्याा आदले दिवशींच हिंदुस्थानांत निघून आलीं ! मोठ्या सणाचा हा बेरंग झाला खरा; परंतु जिवावर बेतलें होतें ते शेपटावरच बचावलें असें म्हणतात तशापैकीं हा प्रकार होय. येथें पेशावरला मात्र या सणाचें स्वरूप स्पष्ट दिसलें. छावणीभागात सोजिरांची गंमत पाहून सर्व लोकांना फार मौज वाटली ! मोठमोठ्या रस्त्यावरून केवळ तास दीड तासासाठींच दुपारीं हिंडावें लागलें. तेवढ्यांत तीन सोजीर तीन ठिकाणीं झिंगत गटारांत लोळत असलेले दिसले. मदिरेचा पूर्ण अमल त्यांजवर बसलेला होता आणि या सणाचें माहात्म्य त्यांतच आहे!

आपल्याकडे फाल्गुनांत पौर्णिमेला होळी करतात तशीच इकडे संक्रांतीस होते. आतांपासूनच सायंकाळीं लहान मुलें घोळका करून लांकडें गोळा करण्यासाठीं गाणीं म्हणत हिंडत असतात. विशेषकरून डोळ्यांत भरण्यासारखी गोष्ट म्हणजे मुलींचीहि वेगळी होळी होते. त्याहि कंपू करून पैशासाठीं क्रिंवा

लांकडासाठीं शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे मागणी करतात. थंडीचा कडाका जरा जास्त होऊं लागला आहे. दिवस तर पांच सवापांच वाजण्याचे सुमारासच मावळतो. पाऊस बरेच दिवसांत पडला नाहीं. १०-१२ मैलांवर दिसणाऱ्या निळसर टेकड्यांच्या माथ्यावर शुभ्र बर्फ पडलेलें दिसतें.

# अस्पृश्य-दीक्षासमारंभ

## सनातन्यांची गुंडगिरी

ता. ३० रोजीं सकाळीं कलकत्ता येथे गंगा-तटाकीं लोहघाटावर पं. मदन मोहन मालवीय यांच्या नेतृत्वाखालीं अस्पृश्यादि हिंदूंना समंत्रक ओंकारपूर्वक दीक्षा देण्यासाठीं तयारी झाली. समारंभासाठीं एक शामियाना उभारण्यांत आला असून होमाची व दीक्षेची तयारीहि करण्यांत आली. पं. मालवीयजी आठाच्या सुमारास येऊन हजर झाले. व्यवस्थापक मंडळी व दीक्षा घेणारे लोक जमतात न जमतात तोंच कांहीं मारवाडी व जुन्या मताचे कांहीं शास्त्री बरोबर बरेचसे गुंड घेऊन समारंभाच्या ठिकाणीं उपस्थित झाले. व एकदम उभारलेला शामियाना उखडून समारंभासाठीं जमवलेला साहित्यसंभार त्यांनी उधळून टाकला. मालवीयजींनीं हा प्रकार पाहातांच ते तेथून नदीच्या पात्राजवळ गेले व तेथें समारंभ करण्याची सिद्धता करूं लागले. परंतु सनातनी लोकांनीं गोळा केलेल्या गुंडांनीं त्यांचा तेथेंहि पाठलाग केला व त्यांच्या कामांत व्यत्यय आणूं लागले. पंडितजींनीं त्यांच्या पुढाऱ्यांना शांतपणें सांगितलें कीं यासंबधानें कोणाचा शास्त्रतः विरोध असल्यास मी त्यांच्यापैकीं कोणाहि पंडिताशीं वाद करण्यास तयार आहे. इतक्यांत गुंडांनीं पंडितजींस वेढा दिला व त्यांच्या अंगावर चिखलमाती उडवूं लागले. परंतु मालवीजयी अत्यंत शांततेनें व सहास्य मुद्रेने हा प्रकार सहन करीत होते व गुंडांची धर्मश्रद्धा जरी अनाठायीं असली तरी तीबद्दल त्यांचें त्यांनीं कौतुक केलें.

हें वादळ बराच वेळ चालल्यावर विरोधी लोकां-पैकीं पं. लक्ष्मणशास्त्री, राजेश्वरशास्त्री, रामचरण न्यायाचार्य व इतर कांहीं शास्त्री आपला विरोध मांडण्यास पुढें सरसावले. विरोधी पक्षाच्या वतीनें पं. राजेश्वरशास्त्री यांनीं सुमारें तीन तास आपली कैफीयत मांडली. त्यांचा शब्दन् शब्द टिपून घेण्यांत आला. या प्रकारांतच ११॥ होऊन गेले. राजेश्वर-शास्त्री यांचें भाषण संपण्याचें चिन्ह दिसेना व पंडितजींच्या कार्यांत विघ्न उपस्थित करण्यासाठींच त्यांचें व्याख्यान सुरू आहे असा लोकांना संशय येऊं लागला व ते उतावीळ होऊं लागले. पं. राजेश्वरशास्त्री यांनीं आपलें भाषण आतां पुरें करावें असें लोकांनींच त्यांस सांगितलें.

पं. राजेश्वरशास्त्री यांच्या विरोधी विधानास उत्तर देण्यास पं. मालवीयजी उभे राहतांच सगळीकडून प्रचंड जयजयकार झाला. उत्तर देण्या-पूर्वी पंडित मालवीयजी यांनीं विरोधी शास्त्री-पडितांना विवादाच्या निर्णयासाठीं कोणते धर्मग्रंथ मान्य आहेत हे विचारून घेतले व त्यानंतर त्यांनीं आपल्या सरबत्तीस सुरवात केली शास्त्री-पंडितांनीं आपणास मान्य म्हणून ज्या धर्मग्रंथांचीं नांवें सांगितलीं त्यांतूनच मालवीयजी यांनीं आपल्या बाजूला पोषक असे एकामागून एक शेंकडो दाखले दिले व शास्त्री-पंडितांनीं उभारलेली इमारत पत्त्याच्या बंगल्याप्रमाणें कोठेंच्या कोठें नाहींशी झाली.

पंडित मालवीयजी यांची विचारसरणी लोकांस अतिशय पटली व त्यांनीं प्रचंड जयजयकार करून पंडितजींचा गौरव केला. व दुपारीं दोन वाजण्याच्या सुमारास विरोधी पक्ष अपयश घेऊन माघारा परतला.

त्यानंतर पं. मालवीय यांनीं पुनः स्नान केलें व सुमारें ३॥ वाजेपर्यंत दीक्षामंत्र देण्याचें कार्य चालू राहिलें. दीक्षा घेण्यासाठीं शेंकडो लोक जमले होते. परंतु वेळेच्या अभावामुळें फक्त ४०० लोकांना दीक्षा देण्यांत आली व इतरांस लवकरच दीक्षा देण्याचें आश्वासन देण्यांत आलें. हा सर्व समारंभ शामियान्यांत झाला. कारण एवढ्या वेळांत सनातन्यांनीं पाडलेला शामियाना पुनः उभारण्यांत आला होता.

हिंदुमहासभेचे अध्यक्ष डॉ. मुंजे, श्रीमत्स्वामी सत्यानंदजी, श्री. पद्मराज जैन वगैरे प्रमुख गृहस्थ व इतर बरेच स्वयंसेवक मालवीयांबरोबर प्रातःकाला-पासून दुपारीं दीक्षासमारंभ होईपर्यंत सारखे खडे होते. दीक्षामंडपांत होमाग्नि प्रदीप्त झाला होता व पवित्र वस्त्रें परिधान करून वैदिक काळांतील निष्ठावंत आचार्याप्रमाणें अग्निसेवा करतांना पंडितजी शोभत होते.

महामहोपाध्याय पं. प्रमथनाथ तर्कभूषण-बंगाल हिंदुमहासभेचे अध्यक्ष हेहि समारंभास उपस्थित होते.

दीक्षासमारंभांत मुख्यतः पुढील गोष्टी करण्यांत येतात. ज्यांना दीक्षा घ्यावयाची असेल त्यांनीं

स्नान करून शुचिर्भूत झाल्यावर त्यास मंचगव्य देऊन नंतर ' ॐ नमः शिवाय ' ' ॐ नमो भगवते वासुदेवाय ' किंवा ॐ नमो नारायणाय ' या मंत्राची विधिपूर्वक दीक्षा- देण्यांत येते. ही दीक्षा दिल्यावर वरील मंत्र ज्यावर छापले आहेत असें वस्त्र त्या मनुष्यास देण्यांत येतें. नंतर बत्तासे-फुटाणे यांचा प्रसाद देऊन विधि समाप्त होतो.

# अमेरिकेंतील लजपतराय यांचा जीवनक्रम

( लेखक—**ना. सु. हर्डीकर हुबळी.** )

**लेखांक ४ था**

## लालाजींचा वाङ्मय-व्यवसाय

होमरूल-लीगचें काम करीत असतांना लालाजी वाङ्मयाच्या क्षेत्रांतहि तितक्याच दक्षतेनें लक्ष घालीत असत आणि एक क्षणहि वांया दवडीत नसत. त्यांचें वाचन दांडगें होतें. हिंदुस्थानांतून येणारीं हिंदी, उर्दू व इंग्रजी नियतकालिकें ते स्वतः काळजीपूर्वक वाचीतच; शिवाय लोकमान्यांचे विचार व मते समजून घेण्याकरितां दरआठवड्यास ' केसरी ' तील महत्त्वाचा भाग मजकडून ते वाचवून घेत. लालाजींनीं इतर अनेक व्यवसायांबरोबरच इंग्रजी राजकारणाचाहि मार्मिक अभ्यास चालू ठेविला होता. अमेरिकन राजकारणाचीहि माहिती असणे अगत्याचें वाटल्यावरून त्यांनीं तेथीलहि मासिकें व वृत्तपत्रें आस्थापूर्वक वाचण्याचा क्रम ठेविला होता. घरीं असोत किंवा लीगच्या ऑफिसांत असोत, त्यांच्या हातीं वाचनाकरितां पुस्तक किंवा लिहिण्याकरितां लेखणी ही केव्हांहि असावयाचीच. लालाजींना इनसॉम्निया नांवाचा निद्रानाशाचा रोग होता. त्यामुळें त्यांना झोंप फारच थोडी येई. ते जरी रात्रीं १२ चे सुमारास झोपत असत तरी, मध्यंतरीं उठून 'यंग इंडिया' मासिकाकडे अभिप्रायार्थ आलेलीं पुस्तकें वाचू लागत. अनेकदां त्यांनीं मला म्हणावें "हर्डीकर, माझे अंग ठणकतें आहे. मला झोंप येतच नाहीं,काय करूं बरें ! या वेळीं मी घरीं असतों तर किती बरें झालें असतं !" अशा प्रसंगीं मी उठून त्यांचें अंग रगडीत असे, आणि त्यांना निद्रा यावी म्हणून प्रयत्न करीत असे. परंतु अंग रगडण्याने कांहीं विशेष फायदा न वाटल्यामुळे ते मला म्हणत, " नको बेटा, निष्कारण आपली झोंपमोड करूं नकोस, अंग रगडण्यानें मला कांहीं फारसा फायदा दिसत नाहीं. तूं झोंपीं जा. तुजवरहि सकाळीं उठतांच कामाचा बोजा आहेच. जा, जा, नीज जा ! मी वाचतांवाचतांच झोंप येते कीं काय पाहीन."मी उठून गेल्यावर,लालाजींना कांहीं वेळानें थोडीशी झोंप लागावी, पण दुसऱ्याच क्षणीं ते जागे होऊन वाचत असल्याचें आढळून येई ! अशा प्रकारें त्यांनीं फारच कष्ट सोसले, पण त्यांची पर्वा न करतां, त्यांनीं आपले अंगीकृत कार्य पुढे चालविलें होतेंच.

## हिंदुस्थानाच्या हिताची तळमळ

' यंग इंडिया ' पुस्तकामागून त्यांनीं ' इंग्लंडस् डेट टू इंडिया '( हिंदुस्थानाचें इंग्लंडावरील ऋण ) नांवाचे पुस्तक लिहिलें. ज्या वेळीं महायुद्धांत हिंदुस्थानानें दीड अब्ज रुपये देणगी ( ! ) म्हणून दिल्याची वार्ता लालाजींच्या कानीं आली त्या वेळीं संतप्त होऊन लालाजींनीं ' ओपन लेटर टु लॉइड जॉर्ज ' ( लॉइड जॉर्ज यांना अनावृत पत्र) या नांवाचें एक मोठें पत्रवजा छोटें पुस्तक, इंग्लंडाच्या मुख्य प्रधानांना उद्देशून लिहिलें. हें मोठे पत्र त्यांनीं एकाच बैठकींत संपविलें ! इतके ते त्या वेळीं, त्या बातमीमुळे बेभान होऊनहि त्या विषयाशीं एकजीव झाले होते ! लवकरच ते पत्र वृत्तपत्रांमधून प्रसिद्ध झालें, व पुस्तकरूपानेंहि त्याची एक आवृत्ति निघाली. पुढें लवकरच मॉटेग्युसाहेबांना उद्देशूनहि असेंच एक पत्र लिहिण्यांत आलें. लालाजींनीं या पत्राचा मजकूर सांगितल्याची आठवण मला अद्यापिहि होत आहे. त्या दिवशीं लालाजी, डॉ. के. डी. शास्त्री व मी असे तिघेहि न्यूयॉर्कपासून सुमारें २०।२२ मैलांवर सहल करण्याकरितां निघालों होतो. समुद्रप्रवास असल्यामुळें आम्ही एका स्टीम लॉंचमध्यें बसलों. त्यावर चढण्यापूर्वीच आमच्या हातीं इंग्लंडाचें टपाल आलें होतें, आणि त्यांतील वृत्तपत्रांवरून हिंदुस्थानाच्या स्वयंनिर्णय-तत्त्वाविषयीं मॉटग्युसाहेबांनी काढलेल्या उद्गारासंबंधीं माहिती आमच्या वाचण्यांत आली. लालाजींनीं तत्क्षणीं लॉंचमध्यें तेथल्या तेथेंच पत्राचा मजकूर सांगण्याची आपली इच्छा दर्शविली. आसपासचे निसर्गनिर्मित अवर्णनीय देखावे पाहण्याची मला उत्कट इच्छा होती, पण लालाजींचें मन इतके व्यग्र झालें होतें कीं, त्यांना त्या पत्रासंबंधीं सांगावयाच्या मजकुरा-

पुढें आसपासचे सुंदर देखावे कांहींच वाटतना! जणुं काय त्या पत्रावांचून त्यांना इतर कांहींच दिसेना! ही त्यांची इच्छा मी ताडली, आणि वनश्रीची शोभा पाहण्याची स्वतःची लालसा बाजूस ठेवून, त्यांच्या सांगण्याप्रमाणें मजकूर ऐकून लिहिण्यास सुरवात केली. सहल संपवून घरी येण्यापूर्वीच पत्र पूर्ण होऊन, टाईप करावयास देखील रवाना करण्यांत आले! लालाजींच्या अंगीं मोठी तरतरी असून, हिंदुस्थानाच्या हिताहिताची कोणतीहि गोष्ट का असेना, तिजविषयी विचार करण्यांत ते अत्यंत दक्ष असत आणि त्याशिवाय त्यांना चैन पडत नसे, हें यावरून सहज दिसून येणार आहे.

सन १९१८ मध्यें त्यांनी कांहीं लहान लहान पुस्तकें लिहिली. 'दि फाइट फॉर क्रम्स' (तुकड्यांबद्दल तंटा) आणि 'ए कॉल टु यंग इंडिया' (हिंदी तरुणांना आव्हान) अशीं अमेरिकेंतील हिंदी लोकांना उद्देशून दोन छोटीशीं पुस्तकें त्यांनीं लिहिलीं. 'सेल्फ-डिटरामिनेशन फॉर इंडिया' (हिंदुस्थानाचा स्वयंनिर्णय) हे अमेरिकेंतील युरोपियन लोकांस उद्देशून लिहिलेलें त्यांचें छोटेंसे पुस्तक होय. सन १९१८ च्या अखेरी-अखेरीस 'दि पोलिटिकल फ्यूचर ऑफ इंडिया' (हिंदुस्थानाचे राजकीय भवितव्य) हें पुस्तक त्यांनी लिहिलें, आणि सन १९१९ सालाच्या आरंभीच तें प्रसिद्ध झालें. त्यांनीं इतरहि बरेच लेख लिहिले. त्यांचें 'इंडिया ए ग्रेव्हयार्ड' (हिंदुस्थान-स्मशानभूमि) हें छोटे पत्रक विशेष लोकप्रिय झालें. त्याच्या एक लाखावर इंग्रजी प्रती निघाल्या! आणि साऱ्या युनायटेड स्टेटसमध्ये त्याचा प्रसार होऊन, बहुतेक मोठ्या वृत्तपत्रांमधून ते प्रसिद्ध करण्यांत आलें. त्याचीं इटालियन, स्पॅनिश, जर्मन, रशियन, फ्रेंच, पर्शियन व हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व भाषांमधून भाषांतरेंहि प्रसिद्ध झालीं, इतकें तें पत्रक लोकप्रिय झालें.

## परराष्ट्रीय विचारणामंडळ

युनायटेड स्टेटसच्या सेनेटनें नेमलेली फॉरीन रिलेशन्स कमिटी (परराष्ट्रासंबंधी विचार करणारें मंडळ) लहानसान राष्ट्रांचा व पददलित लोकांच्या स्थितीचा आणि त्यांस स्वयंनिर्णयाचा अधिकार असावा कीं नसावा या प्रश्नांचा विचार करण्यास बसली असतां तिजपुढें लालाजींनीं हिंदुस्थानाबद्दलची तक्रारी कैफीयत मांडावी, अशा प्रकारचा आग्रह मी व माझ्या सहाध्यायी मंडळींनीं लालाजींच्याजवळ धरला. पण त्या मंडळासंबंधानें त्यांना तितकासा विश्वास न वाटल्यामुळें, त्यांनीं तिकडे दुर्लक्ष केले, परंतु मंडळापुढें हिंदुस्थानाविषयीं तक्रार मांडणेंच योग्य आहे असें आमच्या मनानें घेतलें होतें. तरी पण लाला लजपतराय यांच्यासारख्या पुढाऱ्यांस वगळून, केवळ आमच्याकडूनच हें कार्य तडीस जाणें शक्य नाहीं ही गोष्ट आम्ही जाणून होतों. तेव्हां मंडळापुढें ही कैफीयत सादर करण्यास लालाजींना भाग पाडावें, या उद्देशानें वाशिंग्टन येथील सेनेटच्या माझ्या कांहीं सभासदांना मी न्यूयॉर्कहून टेलीफोन करून मंडळापुढे तक्रारी कैफीयत मांडण्याबद्दल आम्हास परवानगी मिळवून द्यावी अशी विनंति केली. माझ्या स्नेह्यांनीं यासंबंधीं चौकशी करून टेलीफोननें उत्तर दिलें व 'सेनेटच्या मंडळापुढे तुमची कैफीयत सादर करण्यास परवानगी देण्यांत आली असून परवांचा दिवस मुक्रर केला आहे, तुम्ही हजर राहावें' असें सांगण्यांत आलें. माझ्या टेलीफोनचें उत्तर सायंकाळीं आले. त्या वेळीं मी ऑफिसमध्यें नसून, लालाजी होते, व त्यांनींच ते उत्तर ऐकून घेतले! त्यांना यासंबंधींची पूर्वीची माहिती नसल्यामुळे आश्चर्य वाटलें, व आमच्या "अधिक प्रसंगाबद्दल" रागहि आला असें दिसून आले! पण प्राप्तप्रसंग जाणून, त्यांनीं तें कार्य हातीं घेतलेंच. सर्व तयारी करून निघण्यास अवधि काय तो फक्त एकाच दिवसाचा होता. तेव्हा लालाजींनी रात्रींच्या रात्रीच या कैफियतीची अदमासें छापील बारा पानांची माहिती लिहून काढली.

शक्य तितक्या त्वरेने माहिती गोळा करून ती छापविण्यास पाठविल्यानंतर आमचे अमेरिकन वकील डड्ले फील्ड मलोन (Dudley Field Malone) यांच्या शोधार्थ लालाजींची स्वारी लागली आणि त्यांची गांठ घेऊन त्यांना आपल्या कैफियतीची साग्र हकीकत त्यांनीं निवेदन केली व वॉशिंग्टनला बरोबर चलण्यास सांगितले. दुसरे दिवशी सायंकाळपर्यंत कैफियतीचीं पुस्तकें तयार करून घेतल्यानंतर मध्यरात्रीच्या गाडीनें आम्ही त्रिवर्ग वॉशिंग्टनला निघून गेलों. मनांत नसतांना सुद्धां आपणास हें काम करण्यास भाग पाडल्याबद्दल लालाजी मजवर आधींच संतप्त झाले होते. पुनः वॉशिंग्टन शहरीं त्यांस बिलकुल विश्रांति सुद्धां न मिळूं दिल्याकारणानें त्यांचा संताप अनावर झाला. आमचेवर खूप ताशेरा झाडून "मला तूं मारणार" असे त्यांनीं उद्गार काढले! "कांहीं झालें तरी येवढें काम संपविलेंच पाहिजे. या कार्यापासून आपल्या चळवळीला जोर येईल; तुमचीं बाकीचीं कामें मी करतों; आपण मलोन; साहेबांच्या सहकार्यानें कमिटीपुढील कार्य तेवढें साधा म्हणजे झालें; विश्रांतीसाठीं सायंकाळीं आपण एखादे नाटक पाहावयास जाऊं" अशा प्रकारच्या भाषणानें मी वेळ भागवून नेली, आणि काम आटोपून आम्ही न्यूयॉर्क शहरीं परत आलों.

तसेंच एकदां एका सेनेटरास सेनेटपुढील आपल्या भाषणांत हिंदुस्थानाचा उल्लेख करावयाचा होता.

त्यानें आपल्या भाषणाचे मुद्दे सांगून त्या मुद्द्यावर भाषण लिहून काढण्यास आम्हास सांगितलें. पुनः लालाजींस त्रास देण्याचा प्रसंग आला. पण पूर्वीच्या कार्याचा बराच परिणाम झालेला त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें या वेळीं त्यांनीं हरकत न घेतां सेनेटराच्या इच्छेप्रमाणें भाषण लिहून दिलें.

या वेळेपासून लालाजींस वॉशिंग्टनमध्यें जाऊन "लॉबी वर्क" करावे असें वाटूं लागलें व मधून मधून तेथें जाण्यास त्यांनीं मला आज्ञा केली.

## स्वावलंबन

लाला लजपतराय हे आपला पत्रव्यवहार स्वतःच करीत असत. आम्ही तिघे–चौघे त्यांचे मदतनीस म्हणून होतों, आणि ते सांगत तो मजकूर उतरून घेण्याचीहि आमची तयारी असे. पण तसे करण्याचा प्रसंग ते क्वचितच आणीत, शक्य तों सर्व कामें स्वतःच करण्याचा त्यांचा बाणा असे. आणि स्वतःस शक्य अशा कोणत्याहि कामामध्यें ते दुसऱ्यावर फारसे अवलंबून राहत नसत. आम्हाला देखील सर्व कामें स्वतःच करण्याविषयीं व दुसऱ्यावर विसंबून न राहण्याविषयीं त्यांचें वरचे वर सांगणे असे. कोणत्याहि कार्यांत सिद्धि मिळविण्याचा हा एक मार्ग आहे, असें ते नेहमीं म्हणत असत.

## लालाजींचें वाचन

कोलंबिया युनिव्हर्सिटीच्या ग्रंथालयांत व न्यूयॉर्कमधील सार्वजनिक ग्रंथालयांतहि वाचनाकरितां लालाजी नेहमी जात असत. अमेरिकेंत प्रमुख मानलेल्या त्या दोन ग्रंथसंग्रहालयांतील महत्त्वाच्या विषयावरील अशीं बहुतेक सर्व पुस्तकें त्यांनीं वाचलीं होतीं. त्या ग्रंथसंग्रहालयाच्या चालकांनीं लालाजींना खास सवलती दिल्या होत्या. एवढेंच नव्हे तर लालाजींच्या सूचनेवरून हिंदी राजकारणविषयक व हिंदुस्थानाशीं संबंध असलेल्या इतर विषयावरील अशा अनेक पुस्तकांचा भरणा चालकांनीं ग्रंथसंग्रहालयांत केला.

# माजी पंजाबी सैनिकांचा सत्याग्रह

गेल्या महायुद्धांत पंजाबमधून अनेक लढवय्ये रणभूमीवर नेण्यांत आले. युद्धांत अनेक वीर धारातीर्थी पडले व पुष्कळ जायबंदी होऊन निकामी झाले. महायुद्ध संपतांच जादा सैन्यास रजा देण्यांत आली. पैकीं धडधाकट लोक दुसरा धंदा करून कसेंबसें पोट भरीत आहेत. परंतु जे निकामी झाले व ज्यांचे पोशिंदे कामास आले या लोकांची वाट काय ? या लोकांच्या चरितार्थाची व्यवस्था सरकारनें करावयास पाहिजे. त्याप्रमाणें या लोकांनीं सरकाराकडे वेळोवेळीं आपल्या तक्रारी कळविल्या. परंतु त्यांचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. अखेरीस या लोकांनीं आपलें म्हणणें खुद्द ना. गव्हर्नरांच्या कानावर घालण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें गेल्या ता. ६ रोजीं सर्व पंजाब प्रांतांतून हजारों निकामी सैनिक व सरकारकामास आलेल्या सैनिकांचीं बायकामुलें लाहोरास जमा झालीं.

या लोकांचें पुढारीपण रिसालदार अनुपसिंग नांवाच्या एका माजी लष्करी अधिकाऱ्याकडे आहे. या लोकांना लष्करी शिस्त पूर्ण असल्यानें दंगाधोपा करण्याकडे त्यांची वृत्ति वळलेली नाहीं.

ता. ७ रोजीं या लोकांनीं आपली जंगी मिरवणूक काढून ना. गव्हर्नरसाहेबांच्या बंगल्याकडे त्यांना भेटण्यासाठीं आपला मोर्चा फिरविला. परंतु पोलिसांनीं त्यांचा रस्ता अडवून त्यांस थोपवून धरलें. व त्यांचा पुढारी रिसालदार अनुपसिंग यांस पोलिसांनीं अटक केली, रस्ता बंद झाला, पुढाऱ्यांस अटक करण्यांत आली. तथापि लोकांचा निश्चय अढळच राहिला व त्यांनीं रस्त्यावर पडून सत्याग्रह करण्याचा निश्चय केला. अशी स्थिति पाहतांच आपल्या तक्रारी मांडण्यासाठीं लोकांनीं आपले पांच प्रतिनिधी निवडून द्यावें, मग सरकार चौकशी करील असे सरकारतर्फे सांगण्यांत आलें. परंतु सत्याग्रही लोकांस ही मागणी रुचली नाहीं. आपले पुढारी अनुपसिंग व समपूरणसिंग यांची प्रथम सुटका करा अशी मागणी केली व सत्याग्रहाचा निर्धार कायम केला.

परंतु इभ्रतीस बळी पडणाऱ्या नोकरशाहीस लोकांचें हें म्हणणें मान्य झालें नाहीं. सत्याग्रह सुरू झाला. लाहोरसारखी कडक थंडी, जवळ वस्त्रपात्रें नाहींत, शिधासामुग्री नाहीं. अशी स्थिति असतांहि निग्रहानें सत्याग्रह सुरू केला व थंडीवाऱ्यांत ते तसेंच पडून राहिले. या लोकांनीं मेलाराम रोडवर आपला तळ दिला आहे. थंडीच्या निवारणासाठीं पोलिसांनीं ब्लँकेटें देऊं केलीं. व लोकांना निजण्यासाठीं ब्रॅडलॉ हॉल देण्याचें नागरिकांनीं कळविलें तरीहि त्यांनीं ब्लँकेटें घेण्याचें नाकारलें व हॉलमध्यें जाण्यास तयार झाले नाहींत. प्रथम ६४ तास म्हणजे ४ दिवस पोटांत अन्नाचा एक कण अगर पाण्याचा एक थेंबहि त्यांनीं घेतला नाहीं.

अखेर सरदार बहादुर मेहताबसिंग व तेथील गुरुद्वारमंडळांतील मंडळींनीं फार आग्रह केला तेव्हां त्यांनीं अन्नग्रहण करण्याचें कबूल केलें.

शिरोमणि गुरुद्वारप्रबंधक कमिटीनें त्यांस अन्न दिलें व पांघरण्यास वस्त्रेंहि दिलीं. रस्त्यावरून न उठण्याचा त्यांचा निर्धार कायमच आहे. त्यांचा संख्या सारखी वाढतच आहे. थंडीच्या तापानें कित्येक माणसें आजारीहि झालीं आहेत. शि. गु. प्र. कमिटी व आर्यसमाज त्यांना शक्य ती मदत करीत आहेत. रिसालदार अनुपसिंग व सरदार समपूरसिंग यांजवर क्रि. प्रो. को. कलम १०७ प्रमाणें खटला करण्यांत आला आहे. त्यांजपासून प्रत्येकीं तीस हजारांचा जामीन व १५००० हजारांचा जातमुचलका मागण्यांत आला. या संबंधांत चौधरी रहमन अल्ली नांवाच्या माणसानें साक्ष दिली तींत रिसालदार यांनीं ता. ५ व ता. ७ रोजीं केलेल्या भाषणांची माहिती सांगितली व सरकारवाड्याकडे जाण्याबद्दल त्यांनीं उपदेश केला व लोकांनींहि त्यास मान्यता दिल्याचें साक्षीदारानें सांगितलें.

यासंबंधानें कांहीं तडजोड झाल्यास पाहावी म्हणून सरकारचे प्रयत्न चालूच आहेत. मे. मेहताबसिंग, कर्तारसिंग, पोलीस कमिशनर, कार्यकारी मंडळाचे सभासद, व इतर पोलीस अधिकारी यांचा एक सभा झाली. ना. गव्हर्नर-साहेबहि हजर होते. तींत कांहाच निष्पन्न झालें नाहीं. तेव्हां सरकारवाड्यात दुसरी सभा ना. गव्हर्नरांच्या अध्यक्षतेखालीं झाली. या सभेलाहि वरील गृहस्थ हजर होते. जथेदाराचें म्हणणें असें आहे कीं आमचे पुढारी तुम्ही अटकेंतून सोडा. ते आमच्या तक्रारी तुमच्यापुढें मांडतील. त्यांची सुटका झाल्याखेरीज आम्ही सत्याग्रह बंद करणार नाहीं. नोकरशाहीस जथेवाल्यांचें हें म्हणणें मान्य झालें नाहीं व तडजोडहि कांहीं झाली नाहीं.

जथेवाल्यांस अन्न पुरविण्यासाठीं ना. गव्हर्नरांनीं दोन हजार रुपये दिले. परंतु सरकारवाड्यावर मात्र यांनीं येतां कामा नये असें बजावलें. मेहताबसिंग यांनीं जथेवाले यांची गांठ घेतली. रिसालदार अनुपसिंग याचीहि तुरुंगांत भेट घेतली व अनुपसिंगानें अन्नग्रहण करण्याबद्दल चिठी दिली तेव्हां जथेवाल्यांनीं अन्नग्रहण केलें.

तुमच्यातर्फे ५ सभासद निवडून त्यांचें शिष्टमंडळ म्हणजे त्यांच्या आमच्या विचारें कांहीं तडजोड आमचेकडे पाठवा करूं असें सरकारतर्फे जथेवाल्यांस सांगितलें. परंतु रिसालदार अनुपसिंग हे एकटेच या कामाची तडजोड लावतील असा त्यांजवर आमचा विश्वास आहे असें जथेवाल्यांनीं सांगितलें. त्यामुळें तडजोड घडून आली नाहीं व सत्याग्रह सुरू आहे.

सत्याग्रही लोक शिष्टमंडळ निवडण्यास तयार नाहींत असें समजल्यावरून ना. गव्हर्नर दौऱ्यावर निघून गेले. पुढाऱ्यांवरील जमानतीची रक्कम तीस हजारांची दोन हजार करण्यास सरकार तयार आहे. पण त्यांस सोडण्यास तयार नाहीं. त्यामुळें सत्याग्रही लोकांचाहि निश्चय कायम आहे.

# कलकत्यास हनुमानमंडळ

कलकत्याच्या ४३ व्या राष्ट्रीय महासभेच्या स्वागतसमितीने आणि युवक कॉंग्रेसने उमरावतीच्या श्रीहनुमान व्यायामप्रसारक मंडळास आपले खेळाडू घेऊन येण्यास आणि प्रदर्शनविभागांत खेळ करून दाखविण्यास निमंत्रण पाठविलें आणि तें स्वीकारून मंडळाचे अध्यक्ष डॉ. शिवाजीराव पटवर्धन हे आपल्या १३० खेळाडूंना बरोबर घेऊन ता. २४ ला सकाळीं हौरा स्टेशनावर उतरले वाटेंत या सर्व मंडळींचें धामणगांव, पुलगांव, नागपूर, गोंदिया, रायपूर, खडगपूर इत्यादि ठिकाणीं पानसुपाऱ्या, पुष्पहार, उपाहार आदि रीतीने चांगलें थाटाचे स्वागत झालें. डॉ. पटवर्धन हे आपल्या मल्लवीरांसह त्यांचे पौरुषी खेळ दाखविण्याकरितां जात होते हें तर खरेंच, परंतु त्यापेक्षांहि कलकत्ता येथें प्रो. राममूर्तींनीं बोलाविलेल्या भारतीय व्यायामसंमेलनाचे ते अध्यक्ष नियोजित होते म्हणून त्यांचें व्यक्तिशः महत्त्व अधिक होतें. डॉ. पटवर्धन आणि त्यांची मंडळी यांचें स्वागत करण्याकरितां आपल्या स्वयंसेवकांसह दे. सुभाषचंद्र बोस, नृपेंद्रचंद्र बानर्जी, भय्यासाहेब गोडबोले, प्रो. राममूर्ती आदि मंडळी हौरा स्टेशनावर आलेली होती. ता. २५ व २६ रोजीं भारतीय व्यायाम-संमेलन झालें. ता. २६ व २७ रोजीं मंडळाच्या मल्लांचे खेळ झाले. खेळांना कॉंग्रेसच्या प्रदर्शन-विभागानें चार आण्यांपासून २० रु. पर्यंत तिकिटें ठेवलीं होती. तथापि दोनहि दिवस मिळून एकंदर वीस हजाराच्यावर लोक खेळ पाहाण्यास आले होते. दोनहि दिवस पं. मदन मोहन मालवीय अध्यक्ष होते. मंडळाचे नेहमीं-प्रमाणे कवायतीचे व वैयक्तिक असे भिन्न भिन्न ३० खेळ झाले. सर्वच खेळ अत्यंत चित्ताकर्षक आणि प्रभावशाली होते. प्रेक्षकसमुदायांत प्रो. राममूर्ति, जगज्जेता गामा व त्यांचे शिष्य, बंगालमधील बहुतेक प्रसिद्ध व्यायामसमित्यांचे चालक, प्रो. पुलिनबाबू आदि मोठमोठा व्यायाम-प्रेमी व तज्ज्ञ मंडळी, आणि डॉ. मुंजे, पद्मराज

जैन, डॉ. चंदूलाल, डॉ. हर्डीकर, राजगोपालाचार्य, श्रीनिवासराव कौजलगी, घनश्यामदास बिर्ला, दुर्गादास खैतान, वल्लभदास, आदि मोठमोठे पुढारी खेळ पाहण्यास उपस्थित होते. सर्वांवर सर्व खेळांचा सुपरिणाम तर झालाच, परंतु डॉ. पटवर्धन यांच्या साखळदंड तोडणे व मोटार थांबविणे या प्रयोगांनीं, सचालक वैद्य व पेंढारकर यांचे असिचर्म-युद्ध आणि तरवारींचा कृतकयुद्धयोग व त्यांतील हर हर महादेवाची रोमांचकारी गर्जना इ. गोष्टींनीं सर्व प्रेक्षकांच्या मनावर कायमचा ठसा उमटविला. कॉंग्रेसनें खेळांची व्यवस्था फारच चांगली ठेवली होती. शेवटीं पं. मदन मोहन मालवीय यांचें भाषण झालें. पंडितजींचें भाषण मंडळाच्या कार्यावर एकंदर योग्य प्रकाश टाकणारें आणि व्यायाम, ब्रह्मचर्याचें उत्कृष्ट महत्त्व पटविणारें होतें. नंतर अखिल भारतीय हिंदुमहासभेनें पं. मालवीयजी यांच्या हस्तें एक अस्सल तरवार संचालक वैद्य यांना नजर केली. त्याचप्रमाणें श्री. दुर्गादास खैतान यांनीं कलकत्ता नागरिकांच्यातर्फे एक हजार रुपयांची एक सोन्याचांदीची ढाल मंडळास देण्याचें पं. मालवीयजीकडून जाहीर करविलें. मंडळाच्या जाण्यायेण्याची व भोजनादिकांची व्यवस्था कॉंग्रेसच्या प्रदर्शनविभागानें स्वखर्चानेंच केलेली होती.

# काशीनिर्णयांनीं आलेली अडचण

काशी येथील ब्राह्मणसंमेलनांत कोणते विषय चर्चेला व निर्णयाला निघाले होते ते प्रथम पाहू. हे विषय असे.—(१) स्त्रीपुरुषांच्या विवाहाची कालमर्यादा कोठपासून काठपर्यंत शिष्टसमत आहे व ऋतुप्राप्तीनंतर विवाह झाल्यास त्या गोष्टीचा निर्वाह कसा करावयाचा ? (२) ब्राह्मणादि जाती-मधील पोटजातींत परस्पर विवाहसंबंध होणें इष्ट आहे की नाहीं ? (३) विधवाविवाह व विवाह--संबंध--परित्याग शिष्टसमत आहे की नाहीं ? (४) अस्पृश्यत्व हें जन्मामुळे येतें की कर्मामुळें येतें ? म्लेंच्छ व अंत्यज याच्यामध्ये काहीं तारतम्य मानावयाचें कीं काय ? भागवतधर्मदीक्षेनें जातिहीनत्व जाऊं शकते काय ? (५) देवलस्मृति, जिचा संबंध शुद्धिकार्याशीं आहे, ती प्रमाण मानावी कीं नाहीं ? (६) म्लेच्छसंसर्गासंबंधानें प्रायश्चित्ताची मर्यादा कोणती ? (७) व्रात्यसंस्कार किती पिढ्यांपर्यंत करता येतो ? (८) चातुर्वर्ण्य हें जन्मसिद्ध आहे कीं कर्मसिद्ध आहे? (९) धर्मज्ञ कोण ? व धर्मपरिवर्तन होऊं शकतें काय? व झालें तर तें कसे व किती ? इत्यादि.

वरील प्रश्न पाहिले म्हणजे जुन्या मताचे व नव्या मताचे लोक यांच्यामध्ये जी वादभूमि आहे ती बहुधा सगळीच्या सगळी या प्रश्नांनी आक्रमण केली आहे. काशी येथें धर्मगुरूंनीं केलेले निर्णय इतके स्पष्ट व निस्संदेह आहेत कीं ते मान्य करावयाचे तर त्यामुळें आज सगळाच्या सगळा ब्राह्मण समाज, व ब्राह्मणच काय पण इतर कांहीं वर्गहि, पतित चांडाल या सदराखाली कायमचे जाऊन बसतील ! इतकेंच नव्हे तर सामाजिक सुधारणा म्हणून कांहीं करावयाची तर तिला अनंत कालापर्यंत सवड किंवा आशा नाहीं असें ठरते, व ही आपत्ति उघड दिसत असतां निर्णयांनीं येणाऱ्या अडचणींचा परिहार मात्र त्यांत कांहींच सांगितला नाहीं.

अर्थात् हे निर्णय नवीन मताच्या लोकांना तर मान्य होणार नाहींतच,परंतु जुन्या मतांच्या लोकांनाहि मान्य होऊं शकणार नाहीत.कारण ते कितीहि धर्मगुरु-निष्ठ असले तरी आपल्या भोंवतालची जगांतील परिस्थिति व स्वतःच्या समाजाची स्थिति या गोष्टी-विषयीं त्यांना डोळे झांकून घेतां येत नाहींत. काशी संमेलनाच्या चालकांनीं धर्मगुरूंचे निर्णय मिळ-विण्याचा घाऊक व्यापार केला! पण दुर्दैवानें तो त्यांना बाधक होणार हे त्यांनी लक्षांत ठविलें नाहीं. कारण एखाद दुसऱ्या गौण मुद्द्यासंबंधानें, म्हणजे ज्याच्या-विषयीं समाजांतील आचार अद्यापि रूढ व शिष्ट-संमत झाला नाहीं, अशा एखाद्याच मुद्द्यासंबंधानें धर्मगुरूंचे निर्णय लोकमताच्या विरुद्ध गेले असते तर, धर्मगुरूंचा अनुनय करून कालांतरानें त्यांची अनुज्ञा मिळवावी पण आज आहे ती स्थिति मान्य करावी, असें त्यांना वाटले असतें. पण येथें सर्वच मुद्द्यावर बोळा फांसला गेला!

धर्मगुरूंच्या निर्णयावर आक्षेप घेण्याचा प्रसंग कठीण खरा. पण त्याला आतां इलाज नाहीं. आपलें महत्त्व हे ज्याचें त्यानेंच रक्षिलें पाहिजे. धर्मगुरु झाले तरी त्या सर्वांची पात्रता विद्वत्तेच्या दृष्टीनें सारखीच असते असे नाहीं. नुसता शास्त्रार्थ सांगणे ही गोष्टहि पुष्कळशी विद्वत्तेवर अवलंबून असते. आणि त्यांतूनहि जेव्हां शास्त्रार्थ सांगण्याची पात्रता नाहीं व समाजस्थितिहि ओळखण्याची पात्रता नाहीं अशी सजोड अपात्रता एखाद्या धर्मगुरूच्या ठिकाणी आढळते, तेव्हां त्याच्या निर्णयाविषयीं अनादर न दर्शविणे हें काम फार कठीण होतें.

उलटपक्षीं केवळ धर्मगुरूंच्या निर्णयांना कोणी नापसंती दाखविल्यानें तो धर्माभिमानशून्य किंवा नास्तिक ठरतो असें नाहीं. महाराष्ट्रच घेतला तर आज वे. शा. सं. पाठकशास्त्री, नारायणशास्त्री

मराठे, चित्रावशास्त्री, लक्ष्मणशास्त्री जोशी, महादेवशास्त्री दिवेकर या मंडळींना नास्तिक म्हणण्याची कोणाची छाती आहे ? धर्मगुरु कुर्तकोटी यांच्यासंबंधानें तर बोलावयासच नको. त्यांची विद्वत्ता सर्वश्रुत व सर्वमान्य आहे. तात्पर्य, नास्तिक या शब्दाचा उपयोग प्रतिपक्षी शिवीसारखा कोणावर करूं लागतील तर त्या शब्दाचेंच महत्त्व नाहींसें होईल हें लक्षांत ठेवावें.

'नास्तिक' याचा अर्थ 'वेदनिंदक' असा आहेच. पण 'वेदप्रामाण्य न मानणारा' असा अर्थ घेतला तरी देखील, उपरिनिर्दिष्ट समयज्ञ शास्त्रीवर्गच काय पण त्याच्याहून अधिक धिटाईनें नवीन मताचा पुरस्कार करणारे गृहस्थहि नास्तिक ठरूं शकत नाहींत. किंबहुना स्वतःस हिंदु म्हणवून घेणारा कोणीहि नास्तिक होऊंच शकत नाहीं. कारण लो. टिळकांनीं 'प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु' अशी जी हिंदुधर्माची एका अंगानें व्याख्या केली आहे ती हिंदुमात्रास मान्यच आहे.फक्त वेदांचें प्रामाण्य काय कसें किती इतकाच प्रश्न उरतो.

थोडें बारीक दृष्टीनें पाहिलें तर असें दिसून येईल कीं, जुन्या पद्धतीच्या शास्त्री-पंडितांइतकाच नव्या दृष्टीच्या विद्वानांनाहि वेदांचा अभिमान असतो. व वेदप्रामाण्यबुद्धिहि त्यांची कमी नाहीं. परंतु वेदांचा अभिमान कशाबद्दल बाळगावयाचा व वेदप्रामाण्य म्हणजे काय याविषयीं मात्र दोघांचा अर्थ कदाचित् थोडा भिन्न असेल. धर्मदृष्टीची परीक्षा राजनिष्ठेच्या परीक्षेसारखी कांहीं अंशीं करिता येते. अस्सल राजनिष्ठ म्हणजे 'ना विष्णुः पृथ्वीपतिः' या न्यायानें राजा म्हटला कीं तो देवच असें समजून त्याची आज्ञा मानणारे, एवढेंच नव्हे तर तें कर्तव्य करण्यांत आनंद मानणारे, असे मनुष्य कोणत्याहि राज्यांत जसे थोडेच सांपडतात, तसेंच वेदवाक्य हें अगदी ईश्वरवाक्य असें मानून, त्याप्रमाणें वागणारे सश्रद्ध व तत्त्वनिष्ठ असेहि थोडेच आढळतील. राज्यांत खोटें किंवा भोंदू 'राजनिष्ठ' अनेक असतात; म्हणजे ते राजावर जी निष्ठा दाखवितात ती स्वार्थ साधण्याकरितां. पण त्यांचा स्वार्थ बुडाला कीं, ते राजालाहि नांवें ठेवण्याला माघार घेत नाहींत. त्याचप्रमाणें वेदावर आपली श्रद्धा आहे असा बहाणा स्वतःची मान्यता राखण्याकरितां करणारे, पण स्वतःची गैरसोय झाली कीं वेदालाहि नांवें ठेवणार लोक धर्माच्या राज्यांत अनेक असतात.

राजसंस्थेविषयीं सामान्यतः आदर बाळगणारे पुष्कळ. कारण ती संस्था परंपरापुनीत आहे. त्याचप्रमाणें वेदपद्धतीचीहि परंपरा जुनी असल्याकारणानें, तिच्याविषयीं अनुकूल ग्रहानें अभिमान बाळगणारे लोक हिंदुस्थानांत पुष्कळ आहेत. राजसंस्थेविषयीं आदर बाळगणारे परंतु व्यक्तीच्या अधिकाराला व हक्कांना महत्त्व देणारे लोक जसे राजकारणाच्या क्षेत्रांत आढळतात, त्याचप्रमाणें वेदाचे अधिकार मान्य करतांना त्याचबरोबर व्यक्तिस्वातंत्र्य व बुद्धिस्वातंत्र्य यांची जाणीव असणारे कांहीं लोक धर्मक्षेत्रांतहि आढळतात. राजाज्ञा अमान्य केली तर जे परिणाम भोगावे लागतील ते परिणाम भोगण्याला तयार असणारे लोकहि राजकारणांतील अनवस्था वांचविण्याकरितां नमतें घेऊन वागणारे आढळतात, त्याचप्रमाणें ग्रामण्य-बहिष्कारादि सोसण्याची तयारी असतांहि, एकट्यानें समाजांतून फुटून जाण्यांत अर्थ नाहीं आणि समाजाची काळजी न करतां आम्ही मनःपूत वागूं तर अनवस्था होईल, असें मानणारे लोक संक्रमणाच्या कालीं राजकारणाप्रमाणें धर्मांतहि आढळतात.

'बंडखोरांची' संख्या दोन्हिं राज्यांत कमीच.पण बंडखोरालाहि ज्याप्रमाणें राज्यपद्धतीचा अभिमान नसला तरी आपल्या देशाचा अभिमान असतो, त्याप्रमाणें श्रुतिस्मृति यांनीं सांगितलेला धर्म अपुरा पडतो म्हणून त्याचें परिवर्तन करण्याला सज्ज झालेला बंडखोर सुधारकहि नेहमीं व हटकून वेदाची अवमानना करणारा असतोच असें नाहीं. तात्पर्य, केवळ दुष्टपणा किंवा विक्षिप्तपणा यानें प्रवृत्त झालेला, व स्वकीयांचा अभिमान नष्ट होऊन परकीय तेवढें चांगलें अशा विपरीत कल्पनेचा मनुष्य जसा कोणत्याहि राज्यांत क्वचितच मिळतो, त्याप्रमाणें वैदिक धर्माच्या राज्यांतहि, परधर्माच्या किंवा परसंस्कृतीच्या प्रेमानें बहकलेला व हिंदुधर्म बुडविण्याची प्रतिज्ञा करून निघालेला माथेफिरू विक्षिप्तहि एखादाच आढळणार !

म्हणून जुन्या शिष्टपंडित लोकांनीं नव्या विचाराच्या पिढीवर धर्मद्वेषाचा किंवा धर्मद्रोहाचा आरोप करतांना स्वतःच पूर्ण विचार करावा. कारण आमची अशी खात्री आहे कीं, हे जुने शास्त्री-पंडित देखील मूळच्या वैदिक धर्मापासून इतके च्युत झालेले आहेत कीं, त्यांनाहि कोणी पतित म्हटलें तर त्याचें साधार समर्थन करतां येईल. परिस्थितीच्या पाशांत एखादा मनुष्य यदृच्छेनें कोणा दुसऱ्याहून अधिक गुरफटला जावो. परंतु 'श्रुतिस्मृत्युक्त अस्सल धर्माचारी' ही खरी कसोटी लावली असतां जुने शास्त्री-पंडित झाले तरी त्या कसोटीला किती उतरतील हा प्रश्नच आहे. त्यांना वाटतें कीं, 'आम्ही वेदप्रामाण्य मानणारे आहों' असें म्हटलें कीं, मग आम्हाला १०० गुन्हे माफ होतील. पण नव्या विचाराचे लोकहि वेदप्रामाण्य कोठें मानीत नाहींत ! पण तें वेदप्रामाण्य तोंडानें मानीत असतां, आपले आचार

हल्लींच्या परिस्थितीशीं मिळतें घेण्याकरितां शास्त्रांचा अर्थ आपल्या बुद्धीनें हवा तसा लावण्याचा अधिकार हा जर शास्त्री-पंडितांना आहे तर तो नव्या मताच्या लोकांना कां नसावा ! इतकाच काय तो प्रश्न आहे.

उलट कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, शुद्धि-संघटन, पतित-परावर्तन, अहिंदूंचें हिंदूकरण वगैरे चळवळींत जे हिंदु पुढारी आज अग्रभागीं दिसतात ते जितके खरे हिंदुधर्माप्रमाणें वागणारे निदान धर्मरक्षणाची काळजी घेणारे आहेत तितके जुने शास्त्रीपंडितहि नाहींत. कारण धर्मालाहि शरीर मन आत्मा वगैरे गोष्टी आहेतच, पण हिंदु या नांवानें निर्देश केला जाणारा समाजच जर उद्यां नष्ट झाला तर हिंदु-धर्म कोणत्या आधारावर जगणार ! व गेल्या ५-७ शतकांत भरतखंडांतील धष्टपुष्ट असा हिंदु समाज जो रोडावला व चिपाडासारखा बनला त्याचें कारण हे पुराणमतवादी शास्त्रीपंडितच होत. हिंदुस्थानांत मूठभरच का होईना, पण ते आमच्या मताप्रमाणें अस्सल वैदिक धर्माप्रमाणें वागणारे हिंदु असतील व राहतील तर तितकेच आम्हाला पुरेत, असें म्हणणाराहि एखादा वावदूक शास्त्रीपंडित भेटेल, पण शुद्ध वैदिक धर्माची ऐट मारणाऱ्या या शास्त्रीपंडितांनीं, विधर्मी मुसलमानांच्यायोगानें बुजबुजलेल्या पंजाब प्रांतांतल्या एखाद्या गांवीं जाऊन राहावें, किंवा १-२ वर्षांपूर्वी जेथे सत्य-समाजिस्ट लोकांचे दुष्ट अत्याचारी खेळ चालू होते अशा महाराष्ट्रांतल्या एखाद्या गांवी त्यांनीं जाऊन राहावयाचें होतें म्हणजे त्यांना संख्याबलाशिवाय धर्मरक्षण कितपत होतें तें कळून येईल !

# पुस्तकपरीक्षण

**महाभारत** भाग १ ला व २ रा—( प्रकाशक भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट, पुणें )

भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूट या संस्थेनें महाभारताची शुद्ध आवृत्ति सचित्र काढण्याचें मोठ्या जोखमीचें व खर्चाचें पण आवश्यक असें काम आपल्या अंगावर घेतलें आहे. महाभारताच्या अनेक प्रती आजवर अनेकांनीं निरनिराळ्या प्रांतांत प्रसिद्ध केल्या आहेत. तथापि त्यांत एका प्रतीचा दुसऱ्या प्रतीशीं मेळ बसत नसल्यानें खरा मूळचा शुद्ध पाठ कोणता याविषयीं निर्णय करण्यास कांहींच साधन उपलब्ध नाहीं. यास्तव विद्यमान प्रतींचें चिकित्सा-पूर्वक परीक्षण करून शुद्ध आवृत्ति तयार करावी अशी कल्पना भांडारकर इन्स्टिटयूटच्या चालकांच्या मनांत आली व तें कार्य त्या संस्थेनें अनेक विद्वानांच्या साहाय्यानें हल्लीं सुरू केलें आहे.

प्रारंभीं नमुन्यादाखल म्हणून **विराटपर्वाचा** तेवढा भाग याच संस्थेनें छापवून प्रसिद्ध केला. त्याचें परीक्षण पूर्वी केसरींत आलेंच आहे त्यानंतर आतां आदिपर्वापासून या शुद्ध आवृत्तीच्या छपाईस सुरवात झाली असून आतांपर्यंत दोन भाग मिळून १३६ पानें प्रसिद्ध झालीं आहेत. पहिल्या भागांत आदिपर्वांतले पहिले दोन अध्याय प्रसिद्ध झाले असून त्यांची श्लोकसंख्या ४५३ भरेल, दुसऱ्या भागांत आदिपर्वांतील २५ व्या अध्यायापर्यंत मजल गांठण्यांत आली असून या भागांतील श्लोक-संख्याहि जवळ जवळ वरच्याइतकीच भरेल.

केवळ पृष्ठसंख्या व श्लोकसंख्या लक्षांत घेतल्यास आतांपर्यंत झालेलें काम फारच थोडें आहे असें वाटेल. पण शुद्ध पाठांची छाननी करण्याकरितां घेतलेले परिश्रम व स्वीकारलेली आधुनिक शास्त्रीय पद्धति विचारांत घेतल्यास संपादकांच्या परिश्रमाची कल्पना येऊं शकेल. ही प्रत तयार करण्याचे कामीं अनेक विद्वानांचें साहाय्य मिळत असलें तरी कामाची मुख्य जबाबदारी **डॉ. सुखठणकर** यांच्यावर आहे. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतून महाभारताच्या जितक्या निरनिराळ्या प्रती उपलब्ध झाल्या तेवढ्या एकत्र जमा करण्यांत आल्या आणि ज्या प्रती येथे आणतां आल्या नाहीत त्यांतील पाठ-भेदाची चिकित्सा त्या त्या भागांत पोटमंडळें स्थापन करून त्यांच्याकडून करविण्याची योजना झाली. अशा रीतीनें सुमारें पन्नास भिन्न भिन्न प्रतींची तुलना करून मूळ पाठ चिकित्सापूर्वक ठरविण्यांत येत आहे. यावरून हें कार्य किती अवघड आहे आणि यांत चिकित्सक बुद्धि किती तारतम्यानें चालवावी लागते याची वाचकांस कल्पना येईल.

उपलब्ध झालेल्या प्रतींचे सामान्यतः काश्मिरी, देवनागरी, बंगाली, तेलगू, मल्याळी, पंजाबी, मैथिली व नेपाळी असे भाग पडतात. या सर्व प्रतींत बंगाली प्रती सर्वांत अधिक शुद्ध आहेत असा डॉ. सुखठणकर यांचा अभिप्राय आहे. आणि जेथें जेथें प्रक्षिप्त भागाचा संशय येईल तेथें तेथें बंगाली प्रतींत जो पाठ नाहीं तो बहुतकरून प्रक्षिप्त असतो असें समजून तो गाळण्यांत येत आहे. तथापि असा प्रक्षिप्त ठरविलेला आणि मुख्य भागांतून वगळलेला कथाभाग टीपांतून दाखल करण्यांत येतो. यामुळें वाचकवर्ग कोणत्याहि प्रक्षिप्त मानलेल्या भागास कायमचा मुकत नाहीं. आदिपर्वाच्या दुसऱ्याच अध्यायांत

धृतराष्ट्राचा जो विलाप आहे व ज्यांतील श्लोकांचा प्रारंभ 'यदाश्रौषं' या पदांनीं झाला आहे, त्यांतील बरेच श्लोक प्रक्षिप्त असावेत असा समज आहे. त्या भागांतील ५५ श्लोक मुख्य भागांत आले असून २१ श्लोक प्रक्षिप्त ठरवून टीपेंत देण्यांत आले आहेत. अशा रीतीनें प्रसिद्ध झालेल्या दोन भागांत मिळून ३०१ श्लोक टीपेंत दिलेले आहेत. म्हणजे मूळ भागाच्या ⅓ भाग प्रक्षिप्त ठरला आहे. हें प्रमाण अर्थातच पुढें पुढें कमी होत जाईल असें मानण्यास हरकत नाहीं.

प्रक्षिप्त भागापेक्षां पाठभेदाची चिकित्सा करण्याचें काम अधिक त्रासाचें व किचकट असें आहे. पण तेंहि काम विचारपूर्वक व काळजीपूर्वक करण्यांत आलेलें दिसून येत आहे. पुस्तकाची छपाई निर्णयसागराची ठळक ठशाची असून टीपा देण्यांत ज्या अनेक संज्ञा वापराव्या लागतात त्यांची छपाईहि निरलसपणानें विविध प्रकारच्या ठशांनीं करण्यांत आली आहे. प्रत्येक भागाबरोबर एकेक रंगीत चित्र देण्यांत येत असून ह्या चित्रांची कामगिरी **श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी** यांनीं आपल्याकडे घेतली आहे; व त्यांनीं दिलेलीं चित्रेंहि त्यांच्या लौकिकास साजणारीं अशींच आहेत.

सबंध महाभारताची शुद्ध आवृत्ति इतक्या चिकित्सक पद्धतीनें छापून काढणें मोठ्या खर्चाचें काम असून त्यास धनिक वर्गानें साहाय्य केलें तरच संस्थेच्या हातून हें महत्कार्य पार पडणार आहे. वाचक वर्गानेंहि ग्राहक होऊन या कार्यास हातभार लावणे जरूर आहे. एकंदर महाभारताच्या कागदी प्रतीची आगाऊ किं. १४० रु. व कापडी प्रतीची आगाऊ किं. १५० रु. ठेवण्यांत आली आहे. हप्तेबंदीनें किंमत द्यावयाची असल्यास अनुक्रमें १६५ व १७५ द्यावे लागतील. भांडारकर इन्स्टिटयूटच्या सभासदांस सवलतीच्या दरानें या प्रती अनुक्रमे ११२ व १५० रुपयांस मिळतील. या किंमती सध्याच्या अंदाजावरून ठरविण्यांत आल्या आहेत, पण छपाईचें काम अधिक खर्चाचें होत आहे असें दिसल्यास या सर्व किंमती आणखी वाढण्याचा संभव आहे. यास्तव ज्यांना ग्राहक व्हावयाचें असेल त्यांनीं आतांच या संधीचा फायदा घ्यावा. पहिले दोन भाग प्रसिद्ध होण्याला बराच अवधि लागला, पण यापुढें छपाईचें काम त्वरेनें होऊन नवीन भाग ग्राहकांच्या हातीं लवकरच पडूं लागतील तर संस्थेला साहाय्यहि वाढत्या प्रमाणांत मिळूं लागेल.

# ज्ञातिहित कीं राष्ट्रहित ?

**डॉ. सैफुद्दिन किच्लू** व **मि. ब्रेलवी** यांनीं पुढील आशयाचें पत्रक प्रसिद्ध केलें आहे.

राष्ट्रीय सप्ताहांत हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नाबाबत तडजोड झाली नाहीं ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. कलकत्ता येथें भरलेल्या मुस्लीम लीगमधील पुष्कळ प्रतिनिधींना नेहरू रिपोर्ट मान्य होता. व लीगनें कन्व्हेन्शनशीं वाटाघाट करण्यासाठीं निवडलेल्या कमिटींतहि अशा मताचे बरेच प्रतिनिधी होते. खासगी संभाषणांत व लीगच्या विषय-नियामक कमिटींत झालेल्या चर्चेवरूनहि असेंच दिसून आलें कीं, नेहरू रिपोर्टांत कांहीं फेर केल्यास बऱ्याच सभासदांना नेहरू रिपोर्ट मान्य आहे. आमच्या मताप्रमाणें न्यायतः पाहातां नेहरू कमिटीच्या सूचना निरपवाद ( अनएक्सेप्शनल ) आहेत. राखीव जागांमुळें ज्ञातिविषयक भावना वाढतात म्हणून राखीव जागांच्या सूचनांना आमचा विरोध आहे. व सर्वांच्या संमतीनें नेहरू कमिटी आपल्या शिफारसींत योग्य तो फेरबदल करण्यास तयार आहे.

मध्यवर्ती कायदेमंडळांत ⅓ जागा याव्यात ही मुसलमानांची मागणी उदारपणें मान्य करावी असें सर तेजबहादुर सप्रू यांनीं सर्वपक्षीय परिषदेंत सांगितलें. कन्व्हेन्शन व लीग यांच्या संयुक्त कमिट्यांची बैठक झाली तींत म. गांधी यांनींहि सर तेजबहादुर याच्या सूचनेस पाठिंबा दिला होता. पं. मोतिलाल व कॉंग्रेसचे इतर पुढारीहि या सूचनेस विरोधी नव्हते. कन्व्हेन्शननें मुसलमानांच्या मागण्या नाकारल्यानंतर आमच्यापैकीं मि. ब्रेलवी यांनीं लीगच्या विषयनियामक कमिटींत, नेहरू रिपोर्टांतील कलम १३ अ यांत दुरुस्ती सुचवून सर्व रिपोर्ट मान्य करावा अशी उपसूचनाहि आणली होती. व लीगची बैठक तहकूब झाली नसती तर लीगच्या खुल्या बैठकींतहि ही उपसूचना आणण्यांत आली असती.

नेहरू रिपोर्टासंबंधानें आमचें असें मत आहे. व मुसलमानांनीं नेहरू रिपोर्टांत आपला हक्क म्हणून जादा मागण्या करणें गैर आहे. तडजोड म्हणून बहुमतवाल्यांनीं उदार अंतःकरणानें मुसलमानांना त्यांच्या मागण्या दिल्याहि असत्या. बहुमतवाल्यांबद्दल अविश्वास व भीति दाखविणें हें अयोग्य आहे. यामुळें स्वतःबद्दल आत्मविश्वासाचा अभाव मात्र दिसतो. आमच्या धर्मबांधवास आम्हास इतकेंच सांगावयाचें आहे कीं, हिंदुस्थानांत मुख्य प्रश्न अल्पसंख्याकांचा नसून स्वातंत्र्याचा आहे. व उभय ज्ञातींत सख्य होऊन एकजुटीनें काम करण्याच्या कामीं आपल्याच देशबांधवांबद्दल अविश्वास

दाखवून देशकार्यघात करूं नका. हिंदु बांधवांनींहि हा म्हण ध्यानीं ठेवावी कीं, न्याय मिळावा असें नुसतें म्हणण्यापेक्षां प्रत्यक्ष न्याय देऊन लोक संतुष्ट राखावेत.

# मुस्लीम सर्वपक्षीय परिषद

## दिल्ली येथील अधिवेशन

ता. ३१ डिसेंबर १९२८ रोजीं दिल्ली येथें **ना. आगाखान** यांचे अध्यक्षतेखालीं राष्ट्रीय पक्षाला सोडलेल्या मुसलमानांची सर्वपक्षीय परिषद झाली. स्वागताध्यक्ष हकीम अजमलखान यांचे चिरंजीव **हकीम महमद जमीलखान** हे होते. त्यांनीं प्रतिनिधींचें स्वागत केल्यावर ते आपल्या भाषणांत म्हणाले, "नेहरू रिपोर्टानें मुसलमानांच्या अस्तित्वावरच घाला पडल्यासारखें झालें असल्यानें भावी राज्यघटनेंत मुसलमानांचें स्थान ठरविण्यासाठीं ही परिषद भरविण्यांत आली आहे. नेहरू कमिटीनें उत्तम काम केलें याबद्दल वादच नाहीं; पण कोणतीहि मानवी कृति पूर्ण नसते त्याप्रमाणें या रिपोर्टांतहि कांहीं उणीवा आहेतच, व त्यामुळें देशांतील सर्व ज्ञातींमध्यें जसें ऐक्य घडावयास पाहिजे होते तसें घडलें नाहीं, व याच कारणाकरितां नेहरू रिपोर्ट आम्हाला मान्य नाहीं. मुसलमानांची बाजू योग्य रीतीनें मांडणारी एकहि संस्था नसावी ही फार दुःखाची गोष्ट आहे."

या आशयाचें स्वागताध्यक्षाचें भाषण झाल्यावर परिषदेचे चिटणीस खासदार **मि. फाजल रहिमान तुल्ला** यांनीं आपणास स्वतंत्र परिषद कां भरवावी लागली याचा खुलासा वाचून दाखविला. त्यांत त्यांनीं नेहरू रिपोर्ट मुसलमानास मान्य नाहीं व मुसलमानांनीं राज्यघटनेसंबंधानें आपले मत व्यक्त करणें जरूर असल्यानें मुसलमानांतील सर्व पक्षांची ही परिषद बोलवावी लागली, व यासाठीं मुसलमानी संस्था, कायदेमंडळाचे सभासद इत्यादि ६०० गृहस्थांना निमंत्रण दिलें होतें, आम्हालाहि स्वराज्यच पाहिजे इ आशयाचा खलास होता.

### आगाखानांचें भाषण

या खुलाशानंतर ना. आगाखान यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें. त्यांनीं प्रथम बादशहांना आयुरारोग्य चिंतून आपण जें बोलणार तें अनुभवाचें व पूर्ण विचार केलेलें असेंच भाषण आहे असा खुलासा केला, व ते पुढें म्हणाले, "सद्गृहस्थ, नीट ध्यानीं धरा, आपल्या भावी हिताच्या हिंदुस्थानांत ज्या सुधारणा होणार त्या एका दिवसांत होणार नाहींत. किंवा रात्रीं घरांत चोर शिरावा, याप्रमाणें त्या रशियांत झाल्या तशाहि त्या येथें होणार नाहींत. मुसलमानांचें हित पाहाण्यासाठीं आजपर्यंत अनेक परिषदा झाल्या व पुढेंहि होतील; परंतु या परिषदेसारखी मुसलमानांच्या खऱ्या कळकळीची परिषद दुसरी नाहीं हें लक्षांत ठेवा.

मला एक गोष्ट सांगावयाची. ती ही कीं, मुसलमानांनीं हिंदूसंबंधानें नेहमीं शंकित वृत्ति धरतां कामा नये. अशी वृत्ति धरल्यास त्यांस सुखानें येथें राहतांच येणार नाहीं, व त्यामुळे हिंदी उत्कर्षालाहि बाध येईल, व जावत्कालपर्यंत आपण आपलें स्वतःचें संरक्षण करूं शकत नाहीं व रक्षण करणें ब्रिटिशांच्या हातीं आहे तोंपर्यंत ब्रि. लोक येथें वरचढ राहाणार हेंहि लक्षांत ठेवा. नुसत्या कल्पनेच्या वातावरणांत वावरण्यापेक्षां प्रत्यक्ष व्यावहारिक गोष्टी पाहून वागणें हितकर असते. मुसलमानांनीं आपल्या ज्ञातिहितापुरतेंच पाहून भागणार नाहीं. सर्व हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीनें राष्ट्रीय प्रश्नांचा विचार करावा लागतो.

स्वतंत्र मतदारसंघाच्या प्रश्नावर बरीच चर्चा हल्लीं सुरू आहे. ज्ञातिविषयक मतदारसंघ असावेत असें लोक म्हणतात. मुसलमानांच्या बाबतींत मला असें सांगावयाचें आहे कीं, हिंदी मुसलमान ही एकच जात नसून अनेक ज्ञातींचें असलेलें एक राष्ट्रच आहे. कारण त्यांची संख्याच जर्मन साम्राज्यापेक्षां मोठी आहे. कायदेमंडळांतील व इतर संस्थांतून मुसलमानांचें काय प्रमाण असावें हा खरा प्रश्न आहे, व निर्विकार मनानें हा सोडविला पाहिजे.

हिंदू-मुसलमानांत अलीकडे जे कलह उत्पन्न होत आहेत त्यासंबंधीं मला कळकळीनें इतकेंच सांगावयाचें आहे कीं, यापुढें असे कलह होऊं देऊं नका. या कलहाचें मुख्य कारण गोवध हें आहे. यावर उपाय आपण काढला पाहिजे. इब्राहाम यानें मूळ कुरबानी केली; परंतु त्यानें गाय केव्हांहि मारली नाहीं, **गोवध आपल्या धर्मांत सांगितलाच नाहीं**. उंट अगर मेंढी यांचाच उल्लेख आढळतो. इस्लामधर्माची मूळ गादी जे अरबस्थान तेथें हाजी लोकांनीं कधीं गोवध केला आहे काय ! व त्यांनीं जर गोवध केला नाहीं तर त्यांनीं अधर्माचरण केलें असें तुम्ही म्हणाल का? याचें उत्तर तुम्हाला नकारार्थींच द्यावें लागेल. मग हिंदुस्थानांतच तुमची दृष्टि अशी कां फिरली ! अकबर, हुमायून, अमीर हबीबुल्लाखान यांनीं गोवधास बंदी केली

होती. काश्मीरमधील मुसलमान गोवध कधींच करीत नाहींत. रक्त मांस हीं परमेश्वरास पोहोंत नाहींत असें मुळीं आपलें धर्मसूत्रच आहे. कोणीहि उलेमांनीं मात्र हें विधान खोडून काढावें. त्यांना खोडतांच येणार नाहीं. गोवध ही गोष्ट धर्मात नाहीं. ती तुम्ही सोडली असतां हिंदू-मुसलमानांचे संबंध खात्रीने जास्त सलोख्याचे होतील व देशांत शांतता उत्पन्न होऊन आपल्या ज्ञातीचें कल्याण होईल."

## प्रतिगामी ज्ञातिनिष्ठ ठराव

या आशयाचें भाषण झाल्यावर पहिल्या दिवसाचें काम समाप्त झालें.

ता. १ रोजीं परिषद पुनः भरली. पहिल्या दिवशीं गाडी चुकल्यामुळें हजर राहतां न आलेल्या अलिबंधूंची जोडी दुसऱ्या दिवशीं हजर होती. पुढील ठराव सर महंमद शफी यांनीं पुढे मांडला' तो ठराव असा—

"हिंदुस्थानाचा विस्तृतपणा, भाषा, जाति, भौगोलिक व सांस्कृतिक भेद पाहातां हिंदुस्थानाला संयुक्त राष्ट्राच्या पद्धतीची राज्यघटना योग्य आहे. या राज्यघटनेत प्रांतिक सरकारला पूर्ण स्वातंत्र्य असावें. फक्त सर्व देशाच्या हिताच्या प्रश्नावर मध्यवर्ती सरकाराचें नियंत्रण असावें, व हे नियत्रण कोणत्या प्रश्नाबाबत असावे हे घटनेत नमूद केलें जाईल.

हिंदू अगर मुसलमान यांच्या मधील अंतर्ज्ञातीय प्रश्न कोणत्याहि कायदेमंडळांतील हिंदू अगर मुसलमान या सभासदांपैकीं तीन-चतुर्थांश सभासदांना बाधक वाटेल अगर कसलेहि बिल-ठराव अगर सूचना बाधक वाटेल तर अशी सूचना, ठराव अगर बिल कायदेमंडळांत येतां कामा नये.

आपल्या स्वतंत्र मतदारसंघामार्फत कायदेमंडळांत आपले प्रतिनिधी निवडून देण्याचा मुसलमानांचा हक्क कायम झाला असल्यानें तो संमतीखेरीज कोणासहि काढून घेतां येणार नाहीं.

प्रस्तुतच्या हिंदुस्थानाच्या स्थितींत व ही स्थिति कायम आहे तोंपर्यंत मुसलमानांनीं आपल्या स्वतंत्र मतदारसंघामार्फत कायदेमंडळांत व इतर स्थानिक स्वराज्यादि संस्थांतून आपले प्रतिनिधी निवडून देणे अत्यावश्यक आहे. यामुळें लोकशाहीचीं खरीखुरीं तत्त्वें अमलांत आणल्याप्रमाणें होणार आहे. स्वराज्यघटनेंत योग्य अशी आपल्या हितसंरक्षणाची जोंपर्यंत मुसलमानांना हमी मिळाली नाहीं तोंपर्यंत कोणत्याहि अटीवर मुसलमान संयुक्त मतदारसंघाला मान्यता देणार नाहीत, व यासाठीं मध्यवर्ती व प्रांतिक प्रधानमंडळांत मुसलमानांना योग्य प्रतिनिधित्व मिळालें पाहिजे.

मुसलमानांना मध्यवर्ती कायदेमंडळांत ३३ $\frac{1}{3}$ इतक्या जागा मिळाल्या पाहिजेत.

सिंध प्रांत मुंबई इलाख्यांशीं सर्वतोपरी सर्व बाबतींत भिन्न असल्याने तो प्रांत स्वतंत्र करावा. ज्या प्रांतांत मुसलमान अल्पसंख्य आहेत त्यांना ज्या सवलती देण्यांत येतील त्याच सिंधमधील हिंदूंनाहि देण्यांत येतील.

वायव्य प्रांत व बलुचिस्थान यांनाहि इतर प्रांतांप्रमाणें सुधारणा लागू कराव्या.

मुसलमानांना योग्य प्रमाणांत नोकऱ्या देण्यांत याव्या.

मुसलमानांचे शिक्षण, भाषा, धर्म यांना योग्य संरक्षण देण्यांत यावें व मुसलमानी धर्मसंस्थांना योग्य प्रमाणांत ग्रँट्स मिळाव्या.

सर्व प्रांतांनीं संमति दिल्याखेरीज मध्यवर्ती सरकारच्या घटनेंत फेरबदल करण्यांत येऊं नये.

मुसलमानांच्या वरील मागण्या ज्या घटनेंत मान्य केल्या गेल्या नाहीत अशी कोणतीहि घटना, मग ती कोणीहि करो, ती मुसलमानांना मान्य होणार नाहीं."

या ठरावाला मौ. महंमदअली, सर गझनवी, मौ. शफी दाऊदी, सर महंमद इक्बल, सरफुद्दीन हफीज, हिदायत हुसेन, मौ. महंमद याकुब व अबदुल अजीझ यांनीं पाठिंबा दिला.

या ठरावाला अमृतसरचे मि. सादिक यांनीं विरोध केला. ते म्हणाले, या ठरावानें तडजोडीचीं सर्व भाषाच बंद केली आहे. ठराव सर्वस्वी एकांगी, केवळ ज्ञातिविषयक व प्रतिगामी आहे. त्यानें तडजोडीचा मार्गच बंद केला आहे.

ठरावावर मतें तो सर्वानुमतें मंजूर झाल्याचें जाहीर करण्यांत आलें, व आभारप्रदर्शन होऊन परिषद समाप्त झाली. (केसरी अंक ८।१।२९)

# काशी ब्राह्मण-महासभेंतील निर्णयांची शास्त्रशुद्धता

## लेखांक ३ रा

( ले.—तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वांई.)

पतितपुत्रः पतितो भवति अन्यत्र स्त्रियाः सा हि परगामिनी तामरिक्थामुपेयात्।

" पतिताचा मुलगा पतित असतो, मुलगी नव्हे. कारण, ती दुसऱ्याच्या घरांत जावयाची असते. तिच्या पित्याकडून कांहींहि धन न घेतां तिच्याशीं विवाह करावा." वृद्धहारित धर्मसूत्रांतहि असेंच म्हटलें आहे. वसिष्ठ व हारित यांच्या मताने पतितपुत्र पतित असतो. याकरितां त्यांच्या मताच्या अनुसारानें बौधायनानें पतितपुत्राचा शुद्ध जातींत समावेश करण्याच्या वेळीं पुढीलप्रमाणें प्रायश्चित सांगितलें आहे. अशुचिशुक्रोत्पन्नानां तेषामिच्छतां प्रायश्चित्तिः पतनीयानां तृतीयोऽशः। " पतिताच्या शुक्रापासून उत्पन्न झालेल्या पुत्रांना इच्छा असल्यास त्रैवार्षिक व्रताच्या तृतीयांश प्रायश्चित द्यावें." अशा तऱ्हेच्या महत्त्वाच्या स्मृतिवचनांकडे संमेलनाच्या निर्णायक धर्माचार्यांनी कानाडोळा केला आहे. हीं वचनें विचारसभेत आम्ही मांडलीं होतीं. पण दुराग्रहाला औषध नाहीं. सर्व वंगीय पंडितांनीं या आमच्या शास्त्रार्थास ऐकमत्यानें पाठिंबा दिला होता. अनंत कृष्णशास्त्री यांच्या अवडत्या शूलपाणीनें वरील वचनांचा अभिप्राय आमच्याप्रमाणेंच दाखविला आहे. पण शक्य तितक्या अनुदार व कृपणदृष्टीनेच विचार करण्याचा ज्यांचा पण, त्यांना इतक्या लवकर या वचनाचा अर्थ कळणार नाहीं. देवलय स्मृतीचें प्रामाण्य कबूल करण्यास ज्या-माणें ४ वर्षें लागलीं, त्याचप्रमाणें वरील सूत्रार्थ मान्य करण्यास हे पंडित ४ वर्षें लावतील. पण पंडितांना हें ठाऊक असावयास पाहिजे कीं, जर ओढून धरिलें नाहीं व धर्माचा उदारपणें विचार केला तर बहुजनसमाज धर्माच्या बाबतींत त्यांचा अनुयायी होईल.

पोटजातींच्या परस्पर विवाहाविरुध्द अनंत कृष्ण-शास्त्री यांनीं सनातनधर्मप्रदीपांतील एकच प्रमाण दिलें आहे.त्याचा आतां थोडक्यांत विचार करूं. यत्र स्वपितृमातृवंशयोरन्यतरस्यसंन्बध ऽनादिकालमारन्य प्रचलिस्तत्कुलं विवाहार्थं ग्रहणीयमिति। (पृ.४४९ शु. प्र. स. ध. प्र.) अत्रान्यथाकरणे शास्त्राविरोधो वर्तनेन वेति विचारे त्वस्माकमिदमेव वक्तव्यं यदनादि सिद्धाचाराख्यः शास्त्रविरोधो वर्तत इति सर्वविदित-मिदम्(पृ.४४२ शु.प्र.स.धप्र.)"ज्या जातींत आपल्या मातृवंशाचा व पितृवंशाचा विवाहसंबंध अनादि-कालापासून चालत आला असेल तेंच कुल विवा-हार्थ संग्राह्य होय. ह्यावर कोणी असें विचारील कीं, तसें न केल्यास शास्त्राचा विरोध आहे काय ? त्यावर आमचें उत्तर हेंच की, आचार हेंच शास्त्र असून त्याच्याशीं विरोध येतो " असें अनंत कृष्णशास्त्री यांनीं लिहिलें आहे. त्यावर त्यांस आमचा असा प्रश्न आहे कीं, मनुज्यजात तरी अनादिकालापासून आहे काय ? व समजा असली तरी देशस्थ, कोंकणस्थ कऱ्हाडे इत्यादि पोटभेद अनादिकालापासून आहेत काय ? देश, कोंकण इत्यादि विभाग अनादिकालापासून आहेत असें सृष्टि उत्पन्न झाली आहे असें मानणारा कोणणाहि मनुष्य म्हणणार नाहीं. पुराणांप्रमाणें पाहिलें असतां विंध्य पर्वताच्या दक्षिणेस एका काळीं सर्व अरण्य होतें. तसेंच देशस्थ कोंकणस्थ इत्यादिकांचें परस्पर रिवाह अनादिकालापासून बंद आहेत यास प्रमाण काय ? प्रत्येक अनादिसिद्ध आचार शास्त्ररूप मानण्यास काय प्रमाण ? जो आचार रूढ होण्यास कोणतेंहि लौकिक कारण सांपडत नाहीं, असा आचार शास्त्राप्रमाणे प्रमाण मानवा, असा मीमांसकांचा सिध्दान्त आहे. देशभेद, दूरत्व इत्यादि कारणांमुळें जे जे आचार रूढ झाले त्यांपैकींच हे पोटजातींतील विवाह निर्बंध आहेत. म्हणून यांना प्रमाण्य देण्याचें कारण नाहीं.

### निर्णय ३ रा

"हल्लींच मुसलमान, ख्रिश्चन इत्यादि म्लेंच्छ व चांडाल हे अस्पृश्य आहेत. देवालयें, सभास्थानें इत्यादि स्थळीं त्यांना येऊं देणें अधर्म्य आहे. विहिरी इत्यादि ज्या जलाशयांस त्यांच्या भांड्याच्या स्पर्श झाला आहे. त्या ठिकाणीं स्पृश्य जातींनीं पाणी भरणें शास्त्राविरुद्ध आहे. या शास्त्र-मर्यादेचें पालन अवश्य केले पाहिजे." अस्पृश्य-स्पर्शाच्या बाबतींत बरींच शास्त्रवचनें विरुद्ध आहेत. पण कांहीं शास्त्रवचनांत त्या बाबतींत अप-वाद सांगितले आहेत.

आत्र स्मृतींतील पुढील २ वाक्यें 'संवत्सरप्रदीप' नांवाच्या निबंधग्रंथांत उद्धृत केलीं आहेत.

देवयात्राविवाहेषु यज्ञप्रकरणेषु च ।
उत्सवेषु च सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ॥
विष्णवालयसमीपस्थान्विष्णुसेवार्थमागतान् ।
चण्डालान्पतितान्वाऽपि न स्पृष्ट्वा स्नानमाचरेत्॥

"देवतांच्या यात्रा, विवाह, यज्ञप्रसंग व सर्व तऱ्हेचे उत्सव अशा प्रसंगीं स्पर्शास्पर्शदोष नाहीं. विष्णुमंदिराच्या जवळ असलेल्या व विष्णुसेवेकरितां आलेल्या चंडाल, पतित इत्यादिकाचा स्पर्श झाल्यास स्नान करूं नये." या दोन वाक्यांतील १ लें वाक्य अत्यजांबद्दल नसून सुतकी, रजस्वला इत्यादिकांबद्दल आहे असें अनंतकृष्णाशास्त्री म्हणतात. पण वरील वाक्य आनंदाश्रमामध्ये मुद्रित असलेल्या अत्रिस्मृतींत .चंडालस्पर्शप्रकारणांत आहे ही गोष्ट ते विसरतात. त्या ठिकाणीं सुतकी किंवा रजस्वला इत्यादिकांचा मुळीं उल्लेख नाहीं.बृहस्पति स्मृतींतील पुढील दोन वाक्यें अनेक निबंधग्रंथांत प्रसिद्ध आहेत.

उत्सवे वासुदेवस्य स्नायाद्यो शुचिशंकया ।
तादृशं कल्मषं दृष्ट्वा सवासा जलमाविशेत् ॥
तीर्थे विवाहे यात्रायां संग्रामे देशविप्लवे ।
नगरग्रामदाहेच स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ॥

"वासुदेवाच्या उत्सवांत विटाळ झाला अशी शंका येऊन जो स्नान करतो त्या पापी पुरुषाच्या दर्शनाबरोबर सचैल स्नान करावें. तीर्थ, विवाह, यात्रा, युध्द, देशसंकट, ग्रामदाह इत्यादि प्रसंगी स्पर्शास्पर्श दोष नाहीं." ह्या वाक्याच्या बाबतींत अनंत कृष्णशास्त्री यांचा असा आक्षेप आहे कीं, हीं वाक्यें निबधकारांनीं सुतकी,रजस्वला इत्यादिकांना लागू केलीं आहेत. मूळ बृहस्पतिस्मृति सांपडत नाहीं. अर्थात् निबधकारांचा अर्थ प्रमाण मानिला पाहिजे. पण या आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं·शास्त्रीबुवांस मान्य व प्रिय असलेल्या शूलपाणी व स्मार्तभट्टाचार्य या निबंधकारांनीं हीं वाक्यें चांडालादिकांच्या अस्पृश्यतेचीं अपवादक मानिलीं आहेत. स्मृत्यर्थसार या ग्रंथात पुढील वाक्य आलेलें आहे.

संग्रामे हट्टमार्गे च यात्रादेवगृहेषु च ।
अग्न्युत्पाते महापत्सु स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ॥

" युद्ध, बाजार रस्ता, यात्रा, देवालय, आग व महा आपत्त अशा ठिकाणीं स्पर्शदोष नाहीं. "

चाण्डालपतितादीनां पुष्करिण्यां हृदेऽपि वा ।
जानुदध्नाच्छुचि ज्ञेयमधस्तादशुचि स्मृतम् ॥

" चंडाल, पतित इत्यादिकांच्या पुष्करणींत व डोहांत गडघ्या इतके पाणी असल्यास तें शुद्ध होय. खालीं असल्यास अशुध्द असतें" असें वाक्य 'शुद्धिचंद्रालोक' या निबंधग्रंथांत देवलाच्या नांवानें उद्धृत केलें आहे. त्याच निबंधांत पुढे औशनस्मृतींतील वाक्य सांगितलें आहे ते असे—

नद्यः कूपतडागानि सरांसि सरितस्तथा ।
असंवृतान्यदोषाणि मनुः स्वायंभूवोऽब्रवीत्

"नद्या, आड, तलाव, सरोवर, झरे इत्यादि मोकळे जलाशय निर्दोष असतात असें स्वायंभुव मनूनें सांगितले आहे. 'कल्पतरु' या निबंधांत वृध्द याज्ञवल्क्याचें वाक्य आलें आहे.

समन्ताच्चास्पृस्तस्तु जलाशयो भवेद्यदि ।
अन्त्यजैरपि सपुष्टः पूतो भवनि सर्वथा ॥

"औरसचौरस ४ हात असलेल्या जलाशयाला अंत्यजांचा जरी स्पर्श झाला तरी तो सर्वस्वीं पवित्र असतो."

वरील सर्व वचनांचा विचार केल्यास सार्वजनिक जलाशय, देवळे, सभा वगैरे ठिकाणीं अस्पृश्य जातींचा स्पर्श शास्त्रकारांच्या मतें निषिद्ध नाहीं असें स्पष्ट दिसतें. वरील वाक्यांच्या विरुद्ध जरी कांहीं वाक्यें असलीं तरी तीं देशकालपरिस्थिती-प्रमाणे लावण्यास हरकत नाहीं. शास्त्रवाक्यांत परस्पर विरोध आल्यास देशकालभेदानें त्यांची व्यवस्था निबंधकार लावीत असतात.

वरील निर्णयांत म्लेच्छ व अंत्यज यांची सारखीच वाट लाविली आहे. पण हें शास्त्रविरुद्ध आहे. म्लेंच्छ हे अंत्यजांनाहि अस्पृश्य आहेत ही गोष्ट मनुस्मृतीच्या आधारानें सिद्ध होते. ब्राम्हण स्त्रियांच्या ठिकाणीं शूद्रापासून उत्पन्न झालेला चंडाल असतो, असा स्मृतीचा सिद्धान्त आहे. कोणत्याहि खालच्या जातीच्या पुरुषापासून उच्च जातीच्या स्त्रियांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली संतति अस्पृश्य असते. अशा अस्पृश्य लोकांपासून उच्च जातींच्या स्त्रियांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेली संतति अस्पृश्यांनाहि अस्पृश्य असतें. हिंदुस्थानांत विद्यमान असलेल्या मुसलमानांत ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य, शूद्र व अंत्यज जातींचे हजारों व लक्षावधि लोक मिसळले आहेत ह्यांचा परस्पर संकर सारखा सुरू आहे. अनुलोम व प्रतिलोम असें दोनहि संकर त्यांच्यांत घडत आहेत त्यामुळे अंत्यजांनाहि अस्पृश्य असें हल्लींचे मुसलमान आहेत, असें म्हणावें लागतें.

ते चापि बाह्यान्सुबहूंस्ततोऽप्याधिकदूषितान् ।
परस्परेषु दारेषु जनयन्ति विगर्हितान् ॥
यथैव शूद्रो ब्राह्मण्यां बाह्मं जन्तुं प्रसूयते ।
तथा बाह्यतरं बाह्यश्चातुर्वर्ण्ये प्रसूयते॥
मनु अ० १० – २९, ३०

"संकर जातीच्या लोकांत संकर झाल्यास तो संकर त्यांच्यापेक्षां दूष्य व गर्ह्य असतो.

ज्याप्रमाणें शूद्रापासून ब्राह्मणीच्या ठिकाणीं अस्पृश्य जात निर्माण होते,त्याप्रमाणें या अस्पृश्यांचा चातुर्वर्ण्याशीं संकर झाल्यास त्यांना अस्पृश्य अशी संतति निर्माण होते."

पं. राजेश्वरशास्त्री यांनीं संमेलनाच्या विचार-सभेंत म्लेंच्छ हे अनुलोमसंकर असल्यामुळें अंत्यजापेक्षां उच्च आहेत, असें अट्टाहासानें प्रतिपादिलें! परंतु सूतसंहितेमध्यें म्लेंच्छ प्रतिलोम-संकराचाहि संकर आहे, असे प्रतिपादिलें आहे. मुसलमानांना जे लोक स्पर्श करतात, त्यांना अंत्यजस्पर्शापासून दोष नाही, कारण जास्त अस्पृश्य वस्तूस स्पर्श करण्यास कमी अस्पृश्य वस्तूच्या स्पर्शापासून दोष लागत नाहीं, ही गोष्ट धर्मशास्त्रांशी परिचय असलेल्यांस माहीत आहे.

"बलात्काराने दास बनवून म्लेंछादिकांशी संसर्ग घडलेल्या पतितांचा प्रायश्चित्तपूर्वक ३ वर्षें-पर्यंत शुद्धि करतां येते. बुद्धिपूर्वक म्लेंच्छस्त्रीगमन एकदां जरी केलें तरी पातित्य येतें. एका ताटांत मुसलमानदिकांबरोबर २४ वेळां बुध्दिपूर्वक जेवल्यास पातित्य येतें. एका पंक्तीत बुध्दिपूर्वक वर्ष-भर जेवल्यास पातित्य येतें. वर सांगितलेल्या त्या त्या अवधींनंतर प्रायाश्चित जरी केलें तरी व्यावहार्यता होत नाहीं. तसेंच बिलायतेस जाऊन आलेल्यांबद्दल समजावें." हा निर्णय देवल स्मृतीच्या अनुसारानें दिलेला आहे. देवलस्मृति ३ वर्षांपूर्वी अनंत कृष्णशास्त्री प्रक्षिप्त म्हणून म्हणत होते. संमेलनांत त्यांनीं त्या स्मृतीस मान्यता दिली. बंगाल्यांतील शूलपाणि नांवाच्या पंडितानें लिहिलेल्या प्रायश्चित्त-विवेक नांवाच्या निबंधांत देवल स्मृतींतील ७ श्लोक उद्धृत केले आहेत. त्या श्लोकांच्या स्पष्टी-करणांत प्रायाश्चित देऊनहि ४ वर्षांनंतर शुध्दि होऊं शकत नाही, असा निर्णय केला आहे. एक वर्षपर्यंत म्लेंच्छादिकांशी भोजनादि संसर्ग केलेल्या ब्राह्मणांस एक चांद्रायण प्रायश्चित्त, क्षत्रिय-वैश्यांस पराक नांवाचें एक प्रायश्चित्त व शूद्रास अर्धमास प्रायश्चित्त देवल स्मृतींत सांगितले आहे. त्यास देवल स्मृतीचा आधार दिला आहे. त्यानंतर पुढील श्लोक आले आहेत—

ऊर्ध्वं संवत्सरात्कल्प्यं प्रायश्चितं द्विजोत्तमैः।
संवत्सरैश्चतुर्भिश्च तद्भावं सोऽधिगच्छति ॥
ऱ्हासो न विद्यते तस्य प्रायश्चित्तैर्दुरात्मनः।

"एका वर्षानंतर पुढें प्रायश्चित कसें द्यावें याचा विचार विद्वान ब्राह्मणांनीं करावा. बाटलेला मनुष्य ४ वर्षांनीं म्लेंच्छांशीं तद्रूप होतो. प्रायश्चित्तांनीं त्या दुरात्म्याच्या पापाचा नाश होत नाहीं." या श्लोकांच्या आधारानें शूलपाणीनें निर्णय केला आहे. वल स्मृतींत २० किंवा २५ वर्षांच्या मर्यादा-सांगितल्या आहेत, त्या म्लेंच्छसहवास व म्लेंच्छ दास्य यांबद्दल आहेत, असें अनंत कृष्णशास्त्री म्हणतात. त्यांच्या म्हणण्याचा अभिप्राय असा आहे कीं, भोजनादि संसर्ग घडल्यास ३ किंवा ४ वर्षेपर्यंतच शुध्दि होऊं शकते. सहवास, सहासन, संभाषण, दास्य इत्यादि संसर्ग घडल्यास २० वर्षां-पर्यंत शुध्दि होऊं शकते, केवळ सहवास घडल्यास २५ वर्षांची मर्यादा समजावी; असा देवल स्मृतीचा आशय आहे. देवल स्मृतीची सूक्ष्म छाननी करून वरील निष्कर्ष अनंत कृष्णशास्त्री यांनीं काढिला आहे. वरील निर्णयांत ४ वर्षें न म्हणतां ३ वर्षें म्हटलीं आहेत याचें कारण प्रायश्चित्तमयूखांतील आपस्तंब स्मृतिवाक्यांत ३ वर्षांची मर्यादा स्पष्ट सांगितली आहे. एकंदरींत हा निर्णय शुध्दीला अंशतः अनुकूल झाला यांत शंका नाहीं. हे पंडित सोनगीर येथील विद्वत्परिषदेंत म्लेंच्छांशीं एक दिवस भोजन केल्यासहि शुद्धि होऊं शकत नाहीं, असें आग्रहाने प्रतिपादीत होते. आतां ते एक वर्षभर बुद्धिपूर्वक म्लेंच्छसहभोजन केलें तरी शुद्धि होऊं शकते असें म्हणूं लागले, हा शुद्धि-कार्याचा लहानसहान विजय नाहीं. शास्त्र उदार असतें. पंडितजींचीं मनें मात्र संस्कारानें अनुदार बनलीं आहेत. केवळ देवल स्मृतीचेंच आलोचन केल्यास ४ वर्षांनंतर शुद्धि होऊं शकत नाहीं ही गोष्ट कोणीहि निःपक्षपाती मनुष्य कबूल करील. पण इतर स्मृतिवाक्यांशीं या वचनांचा समन्वय केल्यास भ्रमाचा भोपळा फटतो तो असा.

इतर स्मृतिवाक्यांशीं तुलना केल्यास "४ वर्षां-नंतर पतिताचे पाप प्रायचित्तानें नाहींसे होत नाहीं, तो म्लेंच्छांशीं तद्रूप पावतो" हें देवलवाक्य निंदारूप अर्थवादआहे असें सिद्ध होतें. बौधायन धर्म सूत्रांत पतितास त्रैवार्षिक प्रायश्चित्त सांगितलें आहे. त्याची उपपात्ति ४ वर्षांपुढें शुद्धि न मानल्यास लागत नाही. कारण, देवल स्मृतीच्या अनुसारानें एक वर्ष बाटलेल्यास एक चाद्रांयण प्रायश्चित्त तर४ वर्षांस ४ चांद्रांयणें प्राप्त होतात. ४ चांद्रांयणें हीं त्रैवार्षिक व्रतांच्या जवळ जवळ पंचमांश आहेत. म्हणून त्रैवर्षिक व्रताचें अनुष्ठान कोणीच करणार नाहीं. त्यामुळे अननुष्ठानलक्षण अप्रामाण्य 'नांवाचा दोष बौधायनवाक्यावर येतो. तसेंच आपस्तंब धर्मसूत्रांत पतितात द्वादश वार्षिक व्रतरूप प्रायश्चित्त सांगितले आहे व प्रायचित्त सांगितल्यानंतर असें म्हटलें आहे—

ततः शुद्धिः अथ संप्रयोगः स्यादार्यैः।

"हें प्रायश्चित्त केल्यानंतर पूर्ण शुद्धि होते आणि नंतर शुद्ध आर्यांशीं व्यवहार्यता पूर्णपणें येते."

आपस्तंब धर्मसूत्रम् १-२८-१२

आपस्तंब धर्मसूत्राप्रमाणेंच हिरण्यकेशि धर्म-सूत्रांतहि असेंच सांगितलें आहे. हीं धर्मसूत्रें वेदप्रमा-

णेंच वैदिकाच्या पाठान्तरांत असतात. आनंदाश्रमांत छापिलेली देवल स्मृति प्रक्षिप्त आहे अशी शंका पंडितांना होती, त्यापेक्षां वैदिकांच्या परिपाठांत असलेलीं धर्मसूत्रें निःसंशय प्रमाण होत. व देवल स्मृतींत सांगितलेलीं ४ वर्षेपर्यंत म्लेच्छसंसर्ग करणाऱ्यास ४ चांद्रायणें द्वादश वार्षीक व्रताचा सरासरी विसावा अंश देखील भरणार नाहींत. अशा स्थितींतहि धर्मसूत्रांतील पतिताच्या प्रायश्चित्तांतील अनेक वाक्यें पूर्ण अप्रमाण ठरविणें न्यायविरुध्द आहे; म्हणून वरील देवल स्मृतींतील वाक्य पतिताची निंदा करणारा अर्थवाद आहे, असें मीमांसापध्दतीशीं अल्प परिचय असलेल्या मनुष्यासही कबूल करावें लागेल. एवंच देवल स्मृतीचा इतर शास्त्रींशीं समन्वय केल्यास ४ किंवा ३ वर्षांनंतर शुध्दि होतच नाहीं अशी मर्यादा ठरत नाहीं.

बुध्दिपूर्वक एक वर्षापेक्षा अधिक कालपर्यंत म्लेंच्छांशीं सहभोजन झाल्यास शुध्दि होत नाहीं असें वरील निर्णयांत म्हटलें आहे. पण या निर्णयास कांहीं आधार नाहीं.

संवत्सरेण पतति पतितेन सहाचरन् ।
भोजनासनशय्यादि कुर्वाणः सार्वकालिकम् ॥

"पतितांशीं सहभोजन, सहासन व सहशयन एक वर्षपर्यंत सर्व काळ केल्यास पतित होतो." हे वचन संमेलनांतील कांहीं पंडितांनीं वरील निर्णयास आधार म्हणून दाखविलें आहे. या वचनांत म्लेंच्छसंसर्गाबद्दल उल्लेख मुळींच नाहीं. 'पतितेन' यांतील पतित शब्दाचा अर्थ 'ब्रह्महत्यादि महापातकांनीं पतित' असा बहुतेक निबंधकारांनीं केलेला आहे. हें वाक्य म्लेच्छसंसर्गाच्या बाबतींत लागू पडत नाहीं. रघुनंदन भट्टाचार्यांनीं मात्र 'स्मृतितत्त्व' या निबंधांत म्लेंच्छांचाहि पतित शब्दानें संग्रह केला आहे. पण तसा जरी अर्थ घेतला तरी एक वर्षाच्या पुढे शुद्धि होऊं शकत नाहीं यास काय प्रमाण? पतित झालेल्या पुरुषास कृच्छ्रापासून तो द्वादश वार्षिक व्रतापर्यंत शेंकडों प्रायश्चित्तें सांपडतात. कालतारतम्याचा विचार करून तीं प्रायश्चित्तें पतितांस सांगणें योग्य आहे. आम्हीं संमेलनाच्या विचारसभेत हे सर्व आक्षेप मांडले होते. या आक्षेपांचें कांहींच उत्तर न देतां अनंत कृष्णशास्त्री यांनीं मध्यस्थ व धर्माचार्य या आक्षेपांचा विचार करतील असें उत्तर दिलें!

पतिताच्या संततीबद्दल स्पष्ट व लखलखीत प्रमाणवचनें विचारसभेपुढें आम्हीं हजर केलीं होतीं. त्यांतील महत्त्वाचीं दिग्दर्शनार्थ मांडतो.

अथ पतितः समवयास धर्मांश्चरेयुरितरेतरयाजका इतरेतराध्यापका मिथो विवदमानाः पुत्रान्संनिष्पाद्य ब्रूयुर्विप्रव्रजतास्मभ्यमेवमार्यान्संप्रतिपत्स्यथेति ।

बौधायनधर्मसूत्रम् ।

"ज्यांनीं प्रायश्चित घेतलेलें नाहीं अशा पतितांनीं आपला संघ करून पतितांनीं विहित अशा धर्मांचें आचारण करावें. त्यांनीं परस्परांतच यजन, अध्यापन व विवाह करावेत. पुत्र निर्माण करून त्यांना असें सांगावें कीं, आमच्यापासून वेगळे व्हा व अशा रीतीनें शुध्द आर्यांत जाऊन मिसळा" हेंच वचन आपस्तंब धर्मसूत्रांतहि आलें आहे.

पतितपुत्रः पतितो भवति अन्यत्र स्त्रियाः सा हि परगामिनी तामरिक्थामुपेयात् ।

वसिष्ठ--धर्मसूत्रम् ।

"पतिताचा मुलगा पतित असतो. मुलगी नव्हे कारण ती दुसऱ्याच्या घरांत जावयाची असते. तिच्या पित्याकडून कांहींहि धन न घेतां तिच्याशीं विवाह करावा."

वृध्दहारित धर्मसूत्रांत असेंच म्हटलें आहे. वसिष्ठ व हरित यांच्या मतानें पतितपुत्र पतित असतो. याकरितां त्यांच्या मताच्या अनुसारानें बौधायनानें पतित पुत्राचा शुध्द जातीत समावेश करण्याच्या वेळीं पुढीलप्रमाणें प्रायश्चित्त सांगितलें आहे.

असुचिशुक्रोत्पन्नानां तेषामिच्छतां प्रायश्चित्तिः पतनीयानां तृतीयोऽशः ।

"पतिताच्या शुक्रापासून उत्पन्न झालेल्या पुत्रांना इच्छा असल्यास त्रैवार्षिक व्रताच्या तृतीयांश प्रायश्चित्त द्यावें." अशा तऱ्हेच्या महत्त्वाच्या स्मृतिवचनाकडे संमेलनाच्या निर्णायक धर्माचार्यांनीं कानाडोळा केला आहे. हीं वचनें विचारसभेंत आम्ही मांडलीं होतीं, पण दुराग्रहाला औषध नाहीं. सर्व वंगीय पंडितांनी या आमच्या शास्त्रार्थास ऐकमतानें पाठिंबा दिला होता. अनंत कृष्णशास्त्री यांच्या आवडत्या शूलपाणीनें वरील वचनाचा अभिप्राय आमच्याप्रमाणेंच दाखविला आहे. पण शक्य तितक्या अनुदार व कृपण दृष्टीनेंच विचार करण्याचा ज्यांचा पण, त्यांना इतक्या लवकर या वचनांचा अर्थ कळणार नाहीं. देवल स्मृतीचें प्रामाण्य कबूल करण्यास ज्याप्रमाणें ४ वर्षें लागलीं, त्याचप्रमाणें वरील सूत्रार्थ मान्य करण्यास हे पंडित ४ वर्षें लावतील. पण पंडितांना हें ठाऊक असावयास पाहिजे कीं, जर ओढून धरलें नाहीं व धर्माच्या उदारपणें विचार केला तर बहुजनसमाज धर्माच्या बाबतींत त्यांचाच अधिकार मानण्यास तयार आहे.

परदेशगमनाची या कलियुगांतच अत्यंत आवश्यकता भासूं लागली आहे. परदेशगमनाविरुध्द साऱ्या शास्त्रांत एकच वाक्य आहे तें, असें:--

द्विजस्याब्धौ त नौयातः शोधितस्याप्यसंग्रहः

"समुद्रांतून नौकेनें गमन करणाऱ्या द्विजाला प्रायश्चित्त देऊनहि जातींत घेतां येत नाहीं." या वाक्यांत 'नौयातृ' ह्या शब्दांत ताच्छील्याधिक तृन् प्रत्यय लागला आहे. त्यामुळें समुद्रांतून नौकेनें नेहमीं जाणारा-येणारा असा अर्थ होतो. त्याचें तात्पर्य खलाशाचा धंदा करणारा किंवा नावेंतून व्यापार करणारा असें निघतें, पण इतकी भानगड न करतां निराळ्याच वचनानें याची वाट लागते. धर्मतत्त्व या निबंधांत असें वाक्य आहे.

अब्ध्याजीवी न संग्राह्यो नित्कृत्याऽपि कलौ युगे।

"समुद्रावर उपजीविका करणारा प्रायश्चित्तें देऊन देखील संग्राह्य होत नाहीं!" या वाक्याचा वर सांगितलेल्या वाक्यार्शी समन्वय' केल्यास नावाड्याचा धंदा करणारा द्विज असंग्राह्य असा अभिप्राय निघतो; म्हणून विद्यार्जन, देशपर्यटन इत्यादि कारणास्तव जाणाऱ्या द्विजांची प्रायश्चित्तानें शुद्धि होते असें म्हटल्यास हरकत नाहीं. हा विषय विचारसभेंत न मांडतांच यावर धर्माचार्यांनीं निर्णय दिला हें सभे नियमा-विरुद्ध झालें.

# अफगाणिस्थानाच्या मार्गावर

( आमच्या प्रवासी प्रतिनिधीकडून )

आम्ही हिंदुस्थानाचे राज्यकर्ते आहोंत ही गुर्मीची भावना। इंग्रजांच्या मनांत कशी प्रबल असते हें पाहण्याचा एक प्रसंग आला. काबूलहून "हवाई जहाजें" वरचेवर येऊं लागलीं आणि त्यांतून बरीच मंडळी पेशावरास आली. त्यांच्याकडून मिळालेली माहिति कित्येक वरिष्ठ अधिकाऱ्यांना असावयाची अशा अधिकाऱ्यांना भेटण्याचा व प्रचलित परि-स्थितिसंबंधानें बोलण्याचा उपक्रम मी चालविला याच सुमारास लाहोरच्या वातावरणांत मुरलेले आणि अँग्लो-इंडियनी धोरणाचे पुरस्कर्ते असे एक गृहस्थ भेटले. त्यांच्याशीं संभाषण करतांना वरचे वर "आम्ही अगदी तटस्थ वृत्तीनें सर्व हालचाली पाहात आहोंत," "शिनवरी आम्हाला मुळींच त्रास देत नाहींत" इत्यादि वाक्यांत 'आम्ही' या शब्दाचें राहून राहून आश्चर्य वाटे. सरकारी अधिकारीहि 'सरकार' असा तृतीय पुरुषी निर्देश करीत असतां या भाडोत्री इसमांनीं प्रथम पुरुषी बहुवच-नाचा मान आपण होऊनच लाटावा हें विचित्र होय. पुढें आणखी बोलणें चाललें असतां ते गृहस्थ म्हणाले "आम्ही या सर्व पाहुण्यांची आमच्या खर्चानें तजवीज करीत आहोंत. त्यांची इतक्या उत्तम प्रकारें सरबराई आम्हास आणखी बरेच दिवस करावी लागेल." या वेळीं मात्र मध्यें बोलल्या-वांचून राहवेना. "म्हणजे हे सर्व खास हिंदुस्थान-सरकारचेच पाहुणेना ? प्रजाजनांकडून मिळालेल्या करांतूनच यांचें आदरातिथ्य व्हावयाचें. तेव्हां पर्यायानें हिंदी प्रजाजनांनींच या पाहुणे मंडळींचें आदरातिथ्य चालविलें आहे असेंचना आपलें म्हणणें ?" असा त्याला परत प्रश्न करतांच स्वारी शुध्दीवर आली व म्हणाली कीं, "हो, हो; तसेंच. पण हा खर्च वैमानिकखात्यांत घातला जाईल. आणि तो कायदेमंडळापुढें चर्चेलाहि येऊन चालणार नाहीं." अँग्लो—इंडियनी कुर्रा म्हणतात तो हा असला ! बाकी वरिष्ठ कायदे मंडळाच्या एखाद्या सभासदानें या खर्चाचा आंकडा प्रश्न विचारून मागवून पाहावा.

हिंदू—मुसलमानांची तेढ वायव्यसीमा प्रांतांत विशेष दिसून येते. आणि ती चटकन् डोळ्यांत भरते. हिंदू हे संख्याबलानें अनदींच कमी असले तरी समाजांत त्यांचें स्थान महत्त्वाचें आहे. कोण-तेहि गांव घ्या. तेथील प्रमुख व्यापारी हिंदूच आढळावयाचे ( शीख हे हिंदूंत समाविष्ट होतात ). हिंदूंचा व्यापारी बाणा व तज्जन्य धन धन हीं मुसलमानांना पाहावत नाहींत. आणि म्हणून ते हिंदूंचा द्वेष करतात. शिवाय इतिहासानें शिकविलेला अनुभव अगदीं कायमचा असा हिंदूंना ठाऊक आहे.त्यामुळें मुसलमानांच्या सहवासांत कोणी हिंदू राहूं लागला कीं तत्काळ स्थानिक पुढारी त्याच्या हालचालीवर पाळत ठेवतात. येथे आल्यावर एक असाच प्रसंग आला कीं त्यायोगें हिंदु पुढाऱ्यांचे स्तुत्य वर्तन स्पष्टपणें दृष्टीस पडलें.

शहरांतील एका चांगल्या सुस्थितींतल्या कुटुंबां-तील दोन सुशिक्षित भाऊ कांहीं मुसलमानांनीं फुसलावून पळवून आणले होते. हिंदु मुलें मुसलमानांशीं इतक्या सलोख्यानें वागतात हें पाहातांच पेशावरच्या हिंदु पुढाऱ्यांनीं तत्संबंधीं चौकशी केली. तेव्हां त्यांना असें कळलें कींXXX त्या मुलांना एका मुसलमानानें इकडे आणून बाटविण्याचा प्रयत्न चालविला आहे. मुलांच्या वडिलांची व त्या मुसलमानाची ओळख आहे इतकेंच नव्हे तर त्यांचा आपसांत पत्रव्यवहारहि चालतो असें समजलें. मुसलमानबुवाजी "धर्मगुरूचा" आव आणून मांत्रिक व औषधी तज्ज्ञाचें सोंग घेतात.त्याच्याकरवीं ताईत, गंडे,

दोरे, औषधी घेणारे पूर्वी पेशावरास बरेच हिंदू होते. परंतु त्यांना या गुरूंचा अनुभव आल्यानें आतां केवळ परप्रांतीयांनाच ते आपल्या कळपांत ओढतात. सर्वांत आश्चर्य करण्यासारखी गोष्ट म्हणजे या दोन बंधूंबरोबर एक तरुणी होती. वडील बंधूची ती पत्नी असेच भासविण्यांत आल्यानें व ती देखील गुरुसेवेस जात असल्यानें हिंदु लोकांनीं अत्यंत करडी नजर ठेवून एके दिवशीं त्या वडील बंधूस गांठले. त्यांच्या परिस्थितीविषयीं चौकशी केली तेव्हां × × × हून कॉलेजाचा अभ्यासक्रम सोडून ते येथें आले असें कळले. अर्थातच त्यांना या मुसलमान गुरूनेच इतक्या दूर आणलें हें स्पष्ट झालें. त्यांना सहानुभूति दाखविणारें असें कोणीच न भेटल्यानें ते मुसलमानी जाळ्यांत पूर्णपणे गुरफटणार इतक्यांत एका हिंदु भल्या गृहस्थानें दोनहि भावांस नोकरी देऊन सर्व प्रकारें सहाय्य देण्याचें आश्वासन दिलें व मुलसमानांचा संबंध सोडण्याची अट घातली.

कांहीं दिवसांनीं। गुरूचे प्रताप उघडकीस आले. व ही तीन तरुण मंडळी त्या तावडींतून सुटली. परंतु अद्याप त्या गुरूवरील त्यांची भक्ति पूर्णपणे उडालेली नाहीं. आईबापांनीं या 'चुकलेल्या' मेंढरांची कांहींच वास्तपुस्त केली नाहीं असा पेशावर प्रांतीय हिंदूंचा ग्रह झालेला असून तो स्पष्टपणें बोलूनहि दाखवितात. हिंदूंनीं मुसलमान गुरूपासून तांईत गंडे इत्यादि घेतांना अतःपर दक्षता बाळगावी आणि त्यांना घरच्या मंडळीशीं सलगी करूं देऊं नये असा निरोप तिकडील हिंदूंचा आहे.

उपर्युक्त मुलांची खरी परिस्थिति काय आहे! घरांतून तीं बाहेर कां पडलीं? ह्या गोष्टी निश्चित पणे कळल्या नसल्या तरी त्यांचेबरोबर असलेली तरुणी ही विवाहित स्त्री नसावी असें समजण्यास पुष्कळ जागा आहे. "माझी सोडवणूक करा" अशा आशयाचें एक पत्र त्या स्त्रीनें आपल्या घरीं लिहिले आहे असें कळतें. तेव्हां मातापित्यांनीं व इष्टमित्रांनीं या प्रकाराकडे अवश्य-लक्ष पुरवावें अशी विनंति येथें करावीशी वाटते. कारण तीं मुले मराठी बोलणारीं आहेत. तेव्हां हा मजकूर त्या मुलांच्या आप्तेष्टांच्या नजरेस पडेलच.

अफगाणिस्थानांतून सर्व वकिलातींतलीं बायका-मुलें पेशावरला आणीत असतां तुर्कस्थानांतील लष्करी तज्ज्ञांचे एक मंडळ इस्तंबूलहून येऊन मुंबईमार्गे काबूलला जातें याचा अर्थ काय? असें कोडें बरेच-जणाना पडलें. कारण काबूलहून आलेल्या स्त्रियांत तुर्की, इराणीहि स्त्रिया होत्या. परंतु खरी गोष्ट अशी आहे कीं, याच वेळीं त्या तुर्की लष्करी मिशनची आवश्यकता काबुलाधिपतीस विशेष भासली असल्यास आश्चर्य नव्हे. स्वधर्मी म्हणून म्हणा किंवा दुसरें कांहींहि कारण असो, अफगाणिस्थानांत तुर्कांचें प्राबल्य सध्या जास्त आहे. अमानुल्लाचे सगळे सल्लागार बहुधा तुर्कस्थानाहून आले आहेत. कांहीं महिन्यापूर्वी अफगाणी तरुण मुलें व मुली तुर्कस्थानला शिक्षणासाठीं गेल्याचें सर्वांस ठाऊक आहेच. या लष्करी तज्ज्ञांचा मूळ हेतु अफगाणसेनेला योग्य शिस्त लावून तिची घटना कशी करावी यासंबंधींची योजना आखून देणें हा असल्यानें प्रचलित बंडाळीच्या वेळींहि या महत्त्वाच्या पाहुण्यांना अफगाणिस्थानांत न्यावें लागलें. तेथें काय वाटाघाट होते हें अर्थातच गुलदस्तात राहील.

# पुस्तकपरीक्षण

## शुद्धिसर्वस्व

( ले. सदाशिवशास्त्री भिडे )

### पूर्वार्ध

सुमारें ३।४ वर्षांपूर्वी सोनगीर येथें एक पंडित-सभा झाली होती. सदर सभेंत महाराष्ट्रीय पंडित व काशीकर पंडित यांच्यांत तात्त्विक मतभेद होऊन दोन पक्ष स्पष्टपणें त्याच वेळीं लोकांचे निदर्शनास कसे आले हें केसरीच्या वाचकांस माहीत असलेंच. यापूर्वीच अदमासें सन १९२४ सालीं सतोजी महाराज व केशवदत्त महाराज यांजकडून धार्मिक प्रश्नांची एक याही तयार करण्यांत आली व ती सदर वर्षीं केसरींत प्रसिद्धहि झाली होती. यादींतील प्रश्न धार्मिक खरे, पण त्यांचा नुसत्या ब्राह्मण ज्ञातीशींच संबंध नसून अखिल हिंदुधर्माशीं संबंध होता, हें ती यादी ज्यांनीं पाहिली असेल त्यांच्या सहज लक्षांत येण्याजोगें होतें. या सर्व प्रश्नांचा विचार करून शास्त्री मंडळींनीं व आधुनिक सुशिक्षित मंडळींनीं देखील विस्तृत निबंध तयार करून आमचेकडे विवक्षित मुदतीचे आंत पाठवावेत

म्हणजे योग्य विद्वानांकडून परीक्षण करून त्यांचें तारतम्य ठरविण्यांत येईल, असें प्रश्नपत्रिका तयार करणाऱ्या महाराजांनीं जाहीर केलें होते. तदनुसार कांहीं ठिकाणच्या शास्त्री लोकांकडून निबंध पाठविण्यांत आले व त्यांच्या निकालाबद्दल मार्गप्रतिक्षाहि सुरू झाली. परंतु पुढे बरेच दिवसांनीं सोनगीर यथें भरलेल्या पंडित परिषदेमध्यें असें जाहीर करण्यांत आलें कीं, महामहोपाध्याय अनंत कृष्णशास्त्री वगैरे मंडळीकडून एक धर्मशास्त्र वर ग्रंथ तयार केला जाणार आहे, त्यात या सर्व निबंधांचा परामर्ष घेण्यांत येईल. याचा सरळ अर्थ असाच झाला कीं, मागविलेले निबंध खरोखर परीक्षणाकरितां नसून तयार होणाऱ्या धर्मशास्त्र ग्रंथांत पूर्वपक्षाचे उपन्यास करण्याला त्यांचा सर्वस्वी उपयोग व्हावा या हेतूने केलला तो एक बहाणा किंवा युक्ति होती. सोनगिरीस जाहीर केल्याप्रमाणें हा ग्रंथ तयार होऊं लागला. तेव्हां 'संतोजी धर्मप्रदीप' असें त्याचें नाभाभिधान प्रसिद्ध करण्यांत आलें होतें. परंतु पुढें जेव्हां हा ग्रंथ प्रत्यक्ष जन्मास आला तेव्हां सनातन धर्मप्रदीप असे त्याचें नांव ठेवण्यांत आलें.

"विनायक प्रकुर्वाणो रचयामास वानरम्।

ह्या म्हणीप्रमाणें ग्रंथकर्त्याला आपली कृति विपरीत वाटून नांवांत हा फरक झाला कीं काय कोण जाणे ! महामहोपाध्याय अनंत कृष्णशास्त्री हे ह्या सनातन धर्मप्रदीप ग्रंथाचे मुख्य कर्ते असले तरी या कामीं त्यांना आणखीहि मंडळीचे साहाय्य आहे. या साहाय्यक मंडळींत प्रगातपर विचारसरणीचे आचार्य असे समजले जाणारे एक महाराष्ट्रीय गृहस्थ आहेत. अशा रीतीनें ' सनातन धर्मप्रदीप ' हा ग्रंथ तयार झाला व त्याच्या १०००-१५०० छापील प्रती सर्व देशभर वाटण्यांत आल्या. तरी देखील आम्ही हा ग्रंथ प्रसिद्ध केला नाहीं असेंच लोकांनीं समजावें, अशी ग्रंथकारानीं जाहीर घोषणा केली होती, आजपर्यंत खासगी अगर सार्वजनिक रीतीनें या ग्रंथाची समग्र चर्चा महाराष्ट्रात कोणी केली नाहीं. कारण हा ग्रंथ म्हणजे एक भलें मोठें बाडच आहे. शिवाय त्याची भाषा इतकी बोजड व पांडित्यप्रचुर आहे कीं एखाद्या सहृदय मनुष्यास हें सबंध अवजड प्रकरण वाचावयाचें म्हटल्यास ती एक प्रकारे शिक्षाच वाटेल यांत शंका नाहीं. या ग्रंथाचा योग्य परामर्श घ्यावा, अशाबद्दल महाराष्ट्रांतील कांहीं मंडळींनीं प्रयत्न करण्याचें मनांत आणलें होतें. परंतु सदर पुस्तकाच्या अनवश्यक विस्तारामुळे विद्वान लोकांना मनांतून एक प्रकारचा कंटाळाच वाटत होता. कारण डोंगर पोखरून उंदीर काढण्याप्रमाणें सर्व ग्रंथाचें परीक्षण केलें तरी अखेरीस कांहीं हातीं लागावयाचें नाहीं, असें ज्ञात्या मडळींना कळून चुकलें होतें. निर्णयसिन्धु, पुरुषार्थचिन्तामणी यासारख्या सर्वसाधारण निबध ग्रंथांपेक्षां विशेष असे या ग्रंथांत कांहींच नाहीं. किंबहुना पुराणप्रिय लोकांना आमच्या लहानशा धर्मसिंधूचा जितका उपयोग होतो तितका सुद्धां या ग्रंथापासून उपयोग होणें शक्य नाहीं.

अशी वस्तुस्थिति असल्यामुळें महाराष्ट्रीय पंडितानीं ही गोष्ट बाजूलाच टाकली होता. वस्तुतः असें करणें बरोबर नाहीं हे कबूल करणें भाग आहे. कारण पुढें आलेली विचारसरणी, मग ती कितीहि गाबाळग्रथी असली तरी तिचा परामर्ष घेऊन सत्यासत्याचा निर्णय लावणे महाराष्ट्राला अवश्य होते. अशा स्थितीत वाई प्राज्ञपाठशाळेचे तरुण अध्यपक वे. शा. सं. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं श्री अनंत कृष्णशास्त्री यांच्या ग्रथाचें समग्र परीक्षण करावयाचें ठरवून त्याचा पहिला हप्ता म्हणून ' शुद्धिसर्वस्व ' नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. सनातन धर्मप्रदीपावर धडाडीनें पाहला हल्ला चढविला येवढ्याच गोष्टीबद्दल देखील लक्ष्मणशास्त्री यांचा हा प्रयत्न अत्यंत अभिनंदनास्पद आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. सनातन धर्मप्रदीपाचे चार प्रकाश किंवा भाग आहेत. त्यांपैकीं 'शुद्धिप्रकाश ' या नांवाच्या भागांत जे विवेचन करण्यात आलें आहे त्या समग्र विवेचनाचा खरपूस समाचार घेण्याकरितां श्री. जोशी यांनीं 'शुध्दिसर्वस्व ' या नांवाचा हा संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. या पुस्तकाची मूर्ति लहान असली तरी कृति मोठी आहे. पुस्तक संस्कृतांत असून ' यादृशो यक्षस्तादृशो बलिः ' या न्यायाने या पुस्तकाची भाषा देखील बरीच पांडित्यप्रचुर आहे असें म्हटल्यावाचून आमच्याने राहवत नाहीं. अनन्त कृष्णशास्त्र्यांच्या ग्रंथास उत्तर द्यावयाचें असल्यामुळें त्यांच्या भाषेसारखीच उत्तराची भाषा असावयास पाहिजे असें लेखकांच्या वतीनें म्हणतां येईल हें खरें. तथापि एकट्या अनंत कृष्णशास्त्र्यांकरिताच हें पुस्तक नसून इतर सहृदय वाचक वर्गाकडे देखील लेखकानें लक्ष द्यावयास पाहिजे होतें. असो. दुसऱ्या आवृत्तीचे वेळीं तरी या गोष्टीचा अवश्य विचार केला जावा अशी शास्त्रीबुवांना सूचना आहे.

प्रस्तुत पुस्तक इतकें लहान होण्याचीं दोन कारणें असावीं असा आमचा तर्क आहे. पहिलें असें कीं, अनंत कृष्णशास्त्र्यांच्या पुस्तकांत ग्राह्यांश फार थोडा आहे. दुसरें कारण यापेक्षा उघड आहे. तें असें कीं, अनंत कृष्णशास्त्र्यांना आपलें जगद्व्याळ

पुस्तक छापून प्रसिद्ध करण्यास जसे एक धनाढ्य महाराज मिळाले तसें आमच्या शास्त्र्यांना कोठून मिळणार? असा. आम्ही वर म्हटल्याप्रमाणें पुस्तक अगदीं लहान असले तथापि त्यांतील प्रतिपाद्य विषय फारच महत्त्वाचा असल्यामुळें त्याच्या विषयाचें आविष्करण करणें तितकेंच अगत्याचें आहे. पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लेखकांनीं नमूद केल्याप्रमाणें धर्मशास्त्राचा विचार करतांना जनतेच्या नुसत्या पारमार्थिक कल्याणाकडेच दृष्टि ठेवून चालत नाहीं. परमार्थाप्रमाणेंच लोकांच्या व्यवहाराकडेहि लक्ष देणें अवश्य आहे. किंबहुना हिंदु राष्ट्राची सांप्रत काळाची विपन्नावस्था लक्षांत घेतल्यास परमार्थापेक्षां देखील लोकांच्या व्यवहाराकडे अधिक लक्ष देणें जरूर आहे असें ठरतें. कारण व्यवहार हें परमार्थाचें मुख्य साधन होय असा आमच्या धर्मप्रणेत्यांचा कटाक्ष आहे. "ऐहिकेन तु वृत्तेन पारत्रमनुमीयते" असें महाभारतांत म्हटलें आहे. परंतु देशकालपरिस्थितीचा किंवा वर्तमान व्यवहाराचा धर्मशास्त्रांत मुळींच विचार करावयाचा नाहीं असें जुन्या पंडितांनीं ठरवून टाकलें असल्यामुळें आपल्या प्रदीपाचा प्रकाश लोकयात्रेवर न पडेल अशी पुराणमतवादी अनंत कृष्ण शास्त्र्यांसारख्या पंडितांनी अत्यंत काळजी घेतली असल्यास फारसें नवल नाहीं!

# पुरुषसूक्त व शब्दप्रामाण्य

( ले.—**का. न. केळकर, वकील.** )

जुने शास्त्री लोक शब्दप्रामाण्याचें अवसान आणून वाद घालूं लागले म्हणजे कित्येक वेळां कशा घोडचुका गळ्यांत घेतात याचीं पुष्कळशीं उदाहरणें, काशी-संमेलनासंबंधानें पुण्यास जी जाहीर चर्चा झाली त्यांत, श्रोत्यांस ऐकावयास मिळालींच आहेत. पण ही केवळ शास्त्रीय वादाची गोष्ट झाली. बाणानें बाण काढून काढावा त्याप्रमाणें कोटीनें कोटी परतवावी हा केवळ वाग्युद्धांतील एक पराक्रम होय. पण कित्येक वेळां शब्दप्रामाण्याच्या हटवादानें समाजद्वेष उत्पन्न झालेला पाहिला म्हणजे हंसू न येतां वाईट वाटतें. याबद्दल नमुनेदार उदाहरण पुरुषसूक्ताचें देतां येईल.

पुरुषसूक्त हें ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलांतील एक सूक्त आहे. त्यांत मुख्यतः सृष्टीच्या उत्पत्तीचें वर्णन रूपकालंकारानें केलें आहे. ब्राम्हण क्षत्रिय वैश्य व शूद्र यांचा उल्लेख त्यात आल्याकारणानें, चातुर्वर्ण्य हें जन्मसिद्ध कीं गुणकर्मसिद्ध, या वादाला या सूक्ताचा आधार सर्वांनीं घेतला आहेच. पण "ब्राम्हणोऽस्य मुखमासीत्" म्हणून ब्राम्हण श्रेष्ठ, व "पद्भ्यां शूद्रोऽजायत" म्हणून शूद्र सर्वांत कनिष्ठ, अशा भलत्याच गैरमुद्यावर वितंडवाद चालू असतो. आणि अलीकडे तर समतेचें (?) पीक पिकून "धर्मशास्त्रांतच वर्णविषयक असमता सांगितली आहे" असाहि बूट निघाला आहे. तेव्हां पुरुषसूक्ताचे बाबतींत शब्दप्रामाण्य म्हणजे काय, या सूक्ताचा खरा अर्थ काय, व त्यांत वर्णविषयक असमता कोठें आहे हें पाहणें प्राप्त आहे.

वास्तविक पाहतां रूपकनामक अलंकार योजून केलेल्या काव्यखंडांत 'शब्दप्रामाण्या'चा आग्रह चालविणें यासारखा अप्रयोजकपणा दुसरा कोणताहि नसेल. "अरसिकेषु कवित्वनिवेदनं" अशासारखाच पुढें प्रकार होणार आहे अशी कल्पना पुरुषसूक्तकर्त्या ऋषीच्या स्वप्नांतहि आली नसेल! शब्दप्रामाण्यवादी लोकांना वाटतें कीं वेदांना आपण 'प्रमाण' मानतो यासारखा त्यांचा दुसरा मान गौरव नाहीं! पण वर्णविषयक समता कीं असमता; अगर जन्मसिद्ध किंवा गुणकर्मसिद्ध जातिभेद? यासारखे अजब मुद्दे त्यांतून निघालेले पाहून खुद्द सूक्तकर्त्या ऋषीच्या तोंडूनहि असे शब्द निघतील कीं "परमेश्वरा! या मित्रां(?)पासून माझें रक्षण कर! शहाण्याचे व्हावें चाकर, पण अडाण्याचे होऊं नये धनी! माझ्या काव्याचा अर्थ न समजून हे लोक त्याचा अगदीं अनर्थ करीत आहेत!" पण आपण मूळ या वैदिक काव्याकडेच वळूं.

### पुरुषसूक्तांतील रूपक

पुरुषसूक्तांतील रूपक असें आहे—"अनंत मस्तकें अनंत डोळे आणि अनंत पाय यांनीं युक्त असणारा हा परमेश्वर, सर्व जगाला व्यापून जगाच्या पलीकडे हि उरला आहे. त्या परमेश्वरापासून हें विस्तृत जग उत्पन्न झालें, व ब्रह्मांडामध्यें जीव उत्पन्न झाला. नंतर जीवांनीं वेगवेगळीं रूपें धारण केलीं. पृथ्वी निर्माण झाली आणि वेगवेगळे शरीराचे आकारहि निर्माण झाले. नंतर देवांनीं जीवस्वरूपी हविर्द्रव्यांनीं यज्ञ केला तेव्हां, वसंत ऋतु हा त्या यज्ञांत आज्य, ग्रीष्म हा इंधन आणि शरद् ऋतु हा हविर्द्रव्य अशी कल्पना

करण्यांत आली. जो विराटपुरुष उत्पन्न केला, तो कोणत्या प्रकारानें केला? त्याचें तोंड कोणतें? हात कोणते? मांड्या कोणत्या? आणि पाय कोणते?" या प्रश्नांचीं उत्तरें बाराव्या ऋचेंत दिली आहेत—

ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः।
ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत॥

याचा अर्थ असा कीं, "ब्राह्मण हें त्याचें मुख, क्षत्रिय हे त्याचे बाहू, वैश्य हे त्याच्या मांड्या आणि शूद्र हे पायापासून उत्पन्न झाले." यापुढील वर्णनांतहि रूपकाचा अलंकारच कायम ठेविला आहे. "त्याच्या (विराटपुरुषाच्या) मनापासून चंद्र झाला, डोळ्यापासून सूर्य झाला, तोंडापासून इंद्र व अग्नि, आणि प्राणापासून वायु उत्पन्न झाला. त्याच्या नाभीपासून अंतरिक्ष, मस्तकापासून स्वर्ग, पायापासून भूमि आणि कानापासून दिशा उत्पन्न झाल्या. देवांनीं विराटपुरुषालाच म्हणजे जीवसृष्टीला यज्ञीय कल्पिलें. त्यांनीं सर्वस्वाचा यज्ञ करून यज्ञानें श्रेष्ठ पदवीला चढलेल्या जीवांचा सत्कार केला. आणि तींच कृत्यें जगाच्या वाढीला कारण झालीं."

## अर्धे रूपक अर्धी वस्तुस्थिति

पुरुषसूक्ताचा वर जो सारांश दिला आहे त्यावरून हें एक रूपक आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. त्यांतील कोणतीच गोष्ट शब्दार्थानें घ्यावयाची नाहीं. ब्राह्मण हे 'तोंडापासून जन्मले' असें म्हटलें नाहीं. ब्राम्हण हे '**मुखाच्या ठिकाणीं**' आहेत अशीच कल्पना केली आहे.—"पद्भ्यां शूद्रो अजायत" म्हणजे शूद्र हे पायापासून निर्माण झाले, असें स्पष्ट म्हटलें आहे हें खरें. पण ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य यांच्याप्रमाणेंच शूद्र हे "पायाचे ठिकाणीं कल्पिले आहेत" असाच अर्थ रूपकानें केला पाहिजे. कारण ऋचेचा अर्धा भाग रूपक व अर्धी वस्तुस्थिति असें होऊं शकत नाहीं. तसेंच याच्याच पुढच्या तेराव्या ऋचेंत 'विराटपुरुषाच्या तोंडापासून इंद्र व अग्नि उत्पन्न झाला.' व चौदाव्या ऋचेंत 'पायापासून भूमि उत्पन्न झाली' असें म्हटलें आहे. मुखापासून ब्राह्मण, अगर पायापासून शूद्र निर्माण झाले, एवढेंच सूक्तकर्त्याला विशेषपणानें सांगावयाचें नाहीं. कारण असें असतें तर 'तोंडापासून इंद्र व अग्नि, व पायापासून भूमि उत्पन्न झाली' या इतर गोष्टी त्यानें सांगितल्याच नसत्या!

"शूद्र पायापासून उत्पन्न झाले" असें स्पष्ट सांगितलें आहे, त्यावरून "ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्" वगैरे इतर तिहींचाही अर्थ, ब्राम्हण हा **मुखापासून** झाला, क्षत्रिय हा बाहूपासून झाला, वैश्य ऊरूपासून झाला, असाच घेतला पाहिजे, असा कित्येक भाष्यकारांचा आग्रह आहे. पण तसा अर्थ घेतला तरी काय निष्पन्न होतें? परमेश्वराच्या निरनिराळ्या अवयवांपासून चार वर्ण निर्माण झाले, असें मानलें तरी, चातुर्वर्ण्य हें "जन्मसिद्ध" आहे, असा त्यावरून अर्थ कसा निष्पन्न होतो? या सूक्तांत चातुर्वर्ण्य हे जन्मसिद्ध आहे असें सांगितलें नाहीं; त्याचप्रमाणें तें जन्मसिद्ध नाहीं असेंहि पण सांगितलें नाहीं. कारण चातुर्वर्ण्याविषयीं कांहीं सांगण्याचा सूक्तकर्त्याचा हेतूच नव्हता! तसा असता तर सूक्तकर्त्यानें तसें स्पष्ट विधान केलें असतें. सृष्टीच्या अलंकारिक वर्णनांत शिरण्याची त्याला गरज वाटली नव्हती. परमेश्वरानें सर्व प्राणी समान दृष्टीनें सारखेच निर्माण केले असल्यामुळे, चातुर्वर्ण्य भेद व उच्चनीचता केवळ जन्मसिद्ध आहे, गुणकर्मसिद्ध नाहीं, असें शाबीत करण्याची जबाबदारी तसें प्रतिपादन करणावरच आहे हें उघड आहे. 'जन्मसिद्ध' जातिभेदाच्या अस्तित्वाला खरोखर एवढाच पुरावा असेल, तर ती आश्चर्याचीच गोष्ट मानली पाहिजे!

## परमेश्वराच्या पायापासून निघाले!

पुरुषसूक्तांत शूद्राची उत्पत्ति परमेश्वराच्या पायापासून झाली असें म्हटल्याबद्दल कित्येक मूर्ख व अविचारी लोक श्रुतिस्मृतिग्रंथ जाळण्यासहि तयार झाले आहेत. पण रूपकाचें स्वारस्य ज्यांना कळत नाहीं, त्यांना खरोखर काय म्हणावें हेंच आम्हास समजत नाहीं. चातुर्वर्ण्य हें ईश्वरानें निर्माण केलें असे म्हटल्याचा ज्यांना राग येतो त्याना हें कळत नाहीं कीं, सर्व सृष्टीच जेथे ईश्वरानें निर्माण केली, त्यांत चातुर्वर्ण्यहि त्यानें निर्माण केलें असें म्हटलें तर त्यांत काय बिघडलें? मग चातुर्वर्ण्याचा अर्थ तुम्ही वाटेल तो माना, त्याची तुम्हास मोकळीक आहे. परमेश्वराच्या पायापासून उत्पन्न झाल्याबद्दल, शूद्रांना वाईट वाटत असेल, तर त्यांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, परमेश्वराचे पाय खरोखर इतके पूज्य आणि वंदनीय आहेत कीं ईश्वरमुखापासून उत्पन्न झालेले ब्राह्मणहि त्याच पायावर सदैव डोकें ठेवतात. पवित्र गंगा नदी ही परमेश्वराच्या पायापासूनच निर्माण झाली, तर शूद्र हे त्या पायापासून निघाले, असे म्हटल्याचा त्यांना विषाद कां वाटावा?

## ऋचेंत बदल केला

पण या बाबतींत **शब्दप्रामाण्याची प्रतिष्ठा** माजविणारे सुज्ञ लोक हेच दोषाचे मुख्य भागीदार आहेत. बिचाऱ्या शूद्रादि लोकांना तुमच्या त्या रूपकाचा अर्थ कळत नाहीं, म्हणून त्यांनीं रागवावें हें ठीक आहे. पण ज्यांना शास्त्राचा अर्थ कळतो, त्यांनीं शब्दप्रामाण्याचें स्तोम माजवून निष्कारण वितंडवाद वाढविण्यास मदत करावी, याचा मात्र खेद होतो. पण अतिरेकानें कोणत्याहि चांगल्या गोष्टीची माती होते हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. वेदांवर आत्यंतिक श्रद्धा ठेविली

पाहिजे अशा केवळ अर्थवादजन्य हेतूने, कोणी वेद हे अपौरुषेय आहेत व त्यांचे ठिकाणी शब्दप्रामाण्य मानले पाहिजे असें म्हटलें तर ते कोणासहि पटण्यासारखें आहे. पण लोकाच्या श्रद्धेची व आस्तिक्यबुद्धीची कोणी सत्त्वपरीक्षाच पाहूं लागला तर त्याच्या आंगावर बाजू उलटल्याखेरीज राहाणार नाहीं! पुरुषसूक्तांत वादग्रस्त असलेल्या बाराव्या ऋचेचीच गोष्ट घेऊं- 'ऊरु तदस्य यद्वैश्यः' म्हणजे वैश्य हे मांड्यांपासून उत्पन्न झाले असें म्हटले आहे. पण, मूळ ऋचा तशी नाही. "वैश्य हे जननेंद्रियापासून निर्माण झाले" अशी मूळ ऋचा आहे व तशी ती अथर्व वेदांत दिली आहे. वैश्य म्हणजे राष्ट्राची आर्थिक उत्पादनशक्ति होय असे सूक्तकर्त्यास ध्वनित करावयाचें आहे पण अश्लीलता-दोष टाळण्यासाठी, शब्द बदलून 'वैश्य हे ऊरूपासून निर्माण झाले' असा मूळ ऋचेत 'बदल' करण्यात आला. वेदाच्या एका अक्षरांतहि जर बदल करतां येत नाहीं, तर हा बदल कसा झाला? व या वेळीं भाष्यकारांचें शब्दप्रामाण्य कोठें गेलें होतें?

## मनुस्मृति व शब्दप्रामाण्य

शब्दप्रामाण्य मानणाऱ्यांची स्थिति कित्येक वेळां हलत्या तारेवर उभे असल्यासारखी नाजूक व अस्थिर कशी असते, याबद्दल दुसरें एक उदाहरण मनुस्मृतीचे देतां येईल. सध्याची मनुस्मृति ही केवळ भृगुसंहिता असून पहिल्या अध्यायांत सृष्टीच्या उत्पत्तीची हकीकत आली आहे. वेदप्रामाण्याला अनुसरून १ ल्या अध्यायाच्या ३१ व्या श्लोकांत परमेश्वराने मुख, बाहू ऊरू व पाय यांपासून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांस 'निर्माण' केले. असे सांगितले आहे. पण, ही सृष्टीची उत्पत्ति अस्वाभाविक आहे, असे वाटूनच कीं काय त्याने लगेच पुढल्या श्लोकांत असें सांगितले आहे कीं, "ब्रह्मदेवाने आपल्या देहाचे दोन भाग केले. एका भागानें तो स्त्री झाला व दुसऱ्या भागाने पुरुष झाला. व त्या स्त्रीच्या ठायीं सृष्टिधर्मानें तो विराट नामक पुरुषास उत्पन्न करता झाला." आता शब्दप्रामाण्य मानावयाचें तर या-पैकीं, कोठली तरी एक उत्पत्तीच खरी मानणें हें अनिर्वाह्य आहे. व वेदांत सागितलेला चार वर्णांची उत्पत्ति जर खरी, तर ब्रम्हदेवाने आपल्या देहाचे स्त्री व पुरुष असे दोन भाग केले, ही उपपत्ति स्वाभाविक असली तरी खोटीच मानणें भाग पडतें. पण बुद्धि चालविणारा भेटला तर, या दोन श्लोकांचाहि सुसंगत अर्थ लावून समन्वय करतां येईल तो असा कीं, स्त्री व पुरुष हें जगाचेंच मूळ आदितत्त्व होय. सर्व जगाचा विस्तार या दोन तत्त्वांच्या संयोगानेंच झाला. चातुर्वर्ण्यां-लाहि अर्थात् ही कल्पना लागू आहे. स्त्री–पुरुष-संयोगानें जनतारूपी विराट-पुरुष निर्माण झाल्यानंतर चातुर्वर्ण्याची कल्पना बसविली गेली. व रूपकानें अशा कल्पना केली कीं, ब्राम्हण हे या विराट-पुरुषाच्या मुखाच ठिकाणीं आहेत, क्षत्रिय हे बाहू आहेत, वैश्य ऊरू आहत व शूद्र हे पाय आहेत. पण वेदाक्षरांचें शब्दप्रामाण्य क्षणभर बाजूला ठेविलें तरच सारासार दृष्टीनें हा समन्वय लावतां येतो, एरवीं लावतां येत नाहीं.

## वामनाचीं तीन पावलें

चातुर्वर्ण्याचे धर्म सांगण्याकरितां मनुस्मृतींत सर्व जगाची उत्पत्ति केव्हां झाली येथपासून सुरवात केली आहे. कारण चातुर्वर्ण्याची महति सांगावयाची म्हणजे चातुर्वर्ण्य अनादि आहे असे म्हटले पाहिजे. व चातुर्वर्ण्य अनादि म्हटलें म्हणजे त्याच्या उत्पत्तीची वेळ व सृष्टीच्या उत्पत्तीची जन्मवेळ ही एक आलीच!! पण जगाच्या आरंभापासून आतांपर्यंतचा 'इतिहास' खरोखर कोणाला तरी सागतां येईल काय? परमेश्वराने प्रथम ब्रह्मदेवाला उत्पन्न केलें. ब्रह्मदेवाने स्वायंभुव मनूला उत्पन्न केले. पुढे मनूने मरीचि, अत्रि, नारद व स्वतः भृगु इत्यादि दहा प्रजापति महर्षींस निर्माण केले. व सृष्टिकर्त्या स्वायंभुव मनूने लोकांच्या कल्याणा-करितां जी स्मृति सांगितली तीच त्याने या भृगूला सांगितली! अशी परंपरा या ग्रंथांत दिली आहे. प्रथम परमेश्वर, नंतर ब्रह्मदेव, नंतर स्वायंभुव मनु व शेवटी भृगु अशा तीन पावलांतच सृष्टीचा लाखों वर्षांच्या इतिहासाचा धागा या संहिताकारास थेट अनादि परमेश्वरापर्यंत पोचवितां आला! वामनानें अवतार घेऊन तीन पावलात पृथ्वी पाताळ व अंतरिक्ष हीं आक्रमण केलीं त्यासारखाच हाहि एक अद्भुत पराक्रम नव्हे काय? पण परमेश्वराच्या अनादित्वाचाहि असा अंत दिसूं लागला तर ते अनादित्त्व एक प्रकारें खोटेच ठरले नाहीं काय? अशा अतिरेकाच्या वर्णनाने जी अश्रद्धा स्मृतिकार निर्माण करतात, त्यापेक्षां वेदांवर सामान्यपणें श्रद्धा असली तरी त्यातील प्रत्येक शब्द व अक्षर प्रमाण आहे असें न मानणें हा कांहीं मोठासा गुन्हा नव्हे. शब्दप्रामाण्य मान्य आहे असें नुसतें तोंडानें म्हणणारांना वाटेल तीं हास्यास्पद वर्णनें करण्याचा, विसंगत श्लोक लिहून ठेवण्याचा, किंबहुना वेदांच्या अक्षरांत बदल करण्याचाही हक्क आहे. पण वेदांसंबंधाने अर्थवाद व सारासार बुद्धि हा नुसता शब्द जे उच्चारतात त्यांना तशी मोकळीक नहीं हे म्हणणे कोण ऐकून घेईल?

## वेदांचा अर्थ कळत नाहीं

पण, अश्रद्धावादी लोकांप्रमाणेंच अंधश्रद्धावादी लोकांवर टीका करण्याची गोष्ट आपण तूर्त बाजूस

ठेवूं. एका दृष्टीनें असें म्हणतां येईल कीं, केवळ आदरार्थी म्हणून कोणाहि वेद प्रमाण मानावे; पण त्याचे बाबतीत 'शब्दप्रामाण्य' कोणाला मानतां येतच नाहीं. कारण शब्दाचा खरा अर्थ कोणाला कळेल तेव्हां शब्दप्रामाण्याची गोष्ट! वेद हे आज हजारों वर्षे जशाचे तसे त्याच स्थितींत राखले गेले आहेत. म्हणून फार तर त्याचे अ–'क्षर' प्रामाण्य मान्य करतां येईल. पण निरनिराळ्या अक्षरांच्या समुच्चयानें जो शब्द निर्माण होतो, त्याचा अर्थ हटकून कळेलच अशी दुर्दैवानें आज स्थितीच नाहीं. वेदांचा अर्थ करण्याचा प्रयत्न करण्यांत मॅक्समुल्लरसारख्या पंडितांनीं आपले सर्व आयुष्य खर्च केलें. पण वेदाक्षरांचा नक्की शब्दार्थ आपणास उलगडतां येत नाहीं, अशीच त्यांनीं अखर कबुली दिली! तत्कालीन इतिहास व आजचा काळ यामध्यें हजारो वर्षांचे अंतर पडल्याकारणानें त्या वेळच्या समाजाच्या कल्पना व विचार यांचा व्याकरण व व्युत्पत्तिशास्त्र यांच्या साहाय्यानें पूर्णपणे अर्थ लागणं शक्य नाहीं. टिळकांनीं आपल्या आर्क्टिक होम या ग्रंथांत असे म्हटलें आहे कीं, "वेदांचा अर्थ लावण्यांत हीच मोठी अडचण आहे. वेदामध्ये कित्येक वाक्यें अशीं आहेत कीं त्यांतील शब्द तर अगदीं साधे. पण कोणत्याहि कल्पनेवर त्यांचा अर्थ बसत नाहीं. अशा प्रकारची वाक्यें आलीं म्हणजे सायणाचार्यासारखे टीकाकार केवळ शब्दास प्रतिशब्द देतात. नाहीं तर आपल्याला हवा असेल तो अर्थ त्यांतून निघावा म्हणून, त्या शब्दाची वाटेल तशी ओढाताण करतात." वैदिक काळाच्या कल्पना आजच्या काळीं आपणास सर्वस्वी अपरिचित असल्याकारणानें मॅक्समुल्लर यानें अशी स्पष्ट कबुली दिली आहे कीं, "ऋग्वेदाचें भाषांतर करण्याचें काम पुढील शतकांतील लोकांचे आहे. आजच्या पंडितांचें काम येवढेच कीं, यास्कप्रभृति भारतीय पंडितांनीं ज्याप्रमाणें कठीण वाक्यें जीं आहेत त्यांचा विचार करून त्याचें काठिण्य होईल तितकें कमी करावयाचें."

## ऐतिहासिक दृष्टि

आज विसाव्या शतकामध्यें ऐतिहासिक चिकित्सक पद्धति अगर ऐतिहासिक टीकापद्धति ही उदयाला आल्याकारणानें प्राचीन शास्त्रसंशोधनाला केवढी मदत झाली आहे हें कोणाला सांगण्याचें कारण नाहीं. सायणाचार्य अगर यास्काचार्य यांच्यासारख्या वेदवेत्त्या पंडिताना आर्य लोकांचे उत्तर ध्रुवावरील मूलस्थानाची कल्पना करतां आली नाहीं, व ती टिळकांना करतां आली यांतील मर्म हेंच होय. ज्योतिष हा वेदांचा डोळा आहे असें वेदांगशिक्षेंत सांगितलें आहे, त्याचप्रमाणें ऐतिहासिक दृष्टि (Historical Criticism) हा सर्व प्राचीन विद्यासंशोधनाचा नेत्र आहे असे यथार्थपणानें म्हणतां येईल. दयानंदसरस्वतींनीं वेदांचा आजन्म विद्याभ्यास केला, पण त्यांना इंग्रजी ज्ञान नसल्याकारणानें त्यांना या ऐतिहासिक पाश्चात्य टीकापद्धतीची फारशी माहिती नव्हती, असे लाला लजपतराय यांनींच त्यांच्या चरित्रांत म्हटलें आहे. या टीकापद्धतीची माहिती नसणारे लोक कल्पना करण्यांत काहीं एक मर्यादेच्या पलीकडे जाऊं शकत नाहींत. उदाहरणार्थ, दयानंद यांनीं आपल्या सत्यार्थप्रकाशांत 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' या ऋचेचा अर्थ सांगण्याकरितां अशी कोटि केली आहे कीं, "जे कोणी आम्ही ईश्वराच्या मुखापासून उत्पन्न झालों असें म्हणत असतील त्यांना असें सांगा कीं तुम्हा आपल्या आईच्या गर्भशयांतून उत्पन्न झाला, त्याअर्थीं तुम्ही ब्राह्मण नव्हे!" पण हे केवळ शाब्दिक युद्ध झालें. यानें ऋचेचा खरा अर्थ लागत नाहीं व कोणाचें समाधानहि होत नाहीं.

वाच्यार्थ अगर अर्थवाद या दोहोंनीहि वेदप्रामाण्याचा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं. प्राचीन इतिहासाचें संशोधन होऊन ऐतिहासिक दृष्टीनें या सूक्ताच्या वेळीं समाजस्थिति काय असेल हे कळण्याचें साधन निर्माण होईल, आणि शब्दार्थ व अर्थवाद या दोहोंशींहि त्याचा मेळ घालतां येईल, तरच या प्रश्नाचा कांहीं तरी समाधानकारक उलगडा होईल. नुसता शब्दार्थ घेतला तरी पुरुषसूक्ताचा अर्थ आज सुसंगत रीतीनें बसवून दाखवितां येत नाहीं. उदाहरणार्थ, ज्या पुरुषाचें वर्णन पुरुषसूक्तांत केलें आहे त्याचा अर्थ परमेश्वर, त्यानें उत्पन्न केलेला विराटपुरुष, किंवा सृष्टीच्या आरंभीं उत्पन्न झालेले मंत्रद्रष्टे ऋषी, यांपैकीं कोणता आहे हें निश्चित सांगतां येत नाहीं व कोठलाहि एक अर्थ घेतला तरी ग्रंथ नीट लागत नाहीं. कारण याच सूक्तांत विराटपुरुषाला यज्ञीय कल्पून ऋषींनीं त्याचें हवन केले असा उल्लेख आहे. बाराव्या ऋचेंत आलेला 'राजन्य' शब्दहि क्षत्रिय या एकाच अर्थाचा नव्हे. कारण ऋग्वेदांत राजन् शब्द केवळ क्षत्रियवाचक नसून एकदां तर तो अंगिरसांनाहि लावलेला आहे असें टिळकांनीं आर्क्टिक होम या पुस्तकांत म्हटलें आहे. ब्राह्मण क्षत्रिय वगैरे शब्द वेदकालीं वर्णवाचक असले तरी ते जातिवाचक होते कीं नाहीं, या संबंधानें इतिहाससंशोधकांत अद्याप वाद आहे. या सर्व गोष्टींवरून केवळ शब्दार्थानें निर्वाह भागण्यासारखा नाहीं, हे कोणाच्याही लक्षांत येईल.

# अफगाणिस्थानांतील राज्यक्रांति

चार आठवड्यांपूर्वी अफगाणिस्थानांत जी राज्यक्रांतीची आग धुमसूं लागली तिनें आतां पुरा पेट घेऊन अमीर अमानउल्ला यांचे राजपद जाळून जमीनदोस्त केलें आहे. वास्तविक चार आठवड्यापूर्वीहि बरेंच दिवस हें प्रकरण सुरू झालें होतें. परंतु तेव्हां त्याची खरी बातमी बाहेर पडत नव्हती. अमीं बंडाचा कट म्हटला म्हणजे तो गुप्तच असावयाचा. त्याचा बाहेर स्फोट होऊं लागला तरी तिकडचें तारायंत्र अमीरसरकारच्या हातीं आणि इकडचें इंग्रज सरकारच्या हातीं ! अमीराला प्रथम अशी आशा असावी कीं ही बडाळी मूठभर मुल्लांची असेल आणि आपण ती सहज दडपून टाकूं. म्हणून होतां होई तो बंडाळीची बातमी बाहेर पसरू न देणें हेच त्याला इष्ट वाटलें असावें. पण कोणतेंहि दुखणें चोरून ठेवण्याला मर्यादा असते, व ही मर्यादा संपतांच बंडाच्या बातम्या अफगाणिस्थानभर आपोआप पसरूं लागल्या. तारायंत्र आपलें म्हणून अमीरानें तें प्रथम आपल्या हातीं ठेवून आपल्यापुरता व आपल्याला अनुकूल असाच त्याचा उपयोग चालविला. पण पुढें बंडवाल्यांनीं तारायंत्रच उध्वस्त करून टाकलें. यामुळें मुळींच बातम्या बाहेर जाईनात. पण याचा परिणाम मात्र उलटा झाला.

'बातमी येत नाहीं म्हणजे बातमी चांगली आहे असें समजावें' अशी एक म्हण इंग्रजींत आहे. पण ती निवळ म्हण झाली. ती नेहमीं खरीच ठरते असा अनुभव नाहीं. दुखणाईत मनुष्य मधून मधून दीर्घ श्वास टाकीत असतां, पुढें त्याचे श्वास मुळींच ऐकूं येतनासे झाले म्हणजे, त्याची इजा थांबली असण्यापेक्षां त्याचा प्राण गेला असल असेंच अधिक संभवते. त्याप्रमाणें अफगाणिस्थानाकडच्या तारा येत नाहींशा झाल्या याचा अर्थ लोकांनीं भयंकर केला व तोच अखेर खरा ठरला. इंग्रज सरकारलाहि अडचण झाली. कोणती बातमी प्रसिद्ध करावी व कोणती करू नये याविषयीं त्यांना पंचाईत पडली. अमीराला अनुकूल अशी बातमी प्रसिद्ध करावी तर फारशी खरी नाहीं, व प्रतिकूल अशी प्रसिद्ध करावी तर ती कदाचित द्वेषबुद्धीचा आरोप यावयाचा म्हणून ती प्रसिद्ध करणें अवघड झालें. पण बातमीला या दिवसांत शेंभर तोंडे फुटतात, यामुळें हल्ली काबूलच्या बातम्या लंडनहूनच काय पण पारिस, बर्लिन व मास्को येथूनहि प्रसिद्ध होत आहेत.

अफगाणिस्थानातील बंडाचें मूळ खरें कारण काय झालें हें आजच नक्की कळणें कठीण आहे. महायुद्ध संपून गेल्यानंतरच त्या युद्धाचीं आश्चर्यकारक कारणें हळूहळू प्रगट होऊं लागलीं, जो तो लिहीत सुटला. कागदपत्र गुप्त ठेवण्याचें कारण राहिलें नाहीं. प्रसिद्धीप्रतिबंधक कायदे रद्द झाले. आपण केलेलीं कारस्थानें प्रगट करण्यांत मुत्सद्यांना भूषण वाटूं लागलें. त्याप्रमाणें अफगाणिस्थानांत स्थिरस्थावर झाल्यावर याहि बंडासंबंधानें घडून येईल. तूर्त इतकेंच कारण पुढें आलें आहे कीं, अमीर अमानउल्ला यानें युरोपच्या प्रवासांत गोळा करून बरोबर आणलेल्या सुधारणांच्या कल्पना लोकांना अप्रिय होण्यासारख्या होत्या, असें असतां त्यानें त्या सक्तीनें लोकांवर लादण्याचा प्रयत्न केला. परतु हें कारण दिसण्यांत ठीक असलें तरी याशिवाय अंतस्थ अशीं दुसरीं कित्येक कारणें असणार, व तीं पुढेमागें प्रगट झाल्याशिवाय राहाणार नाहींत याविषयीं आम्हांस शंका वाटत नाहीं.

या बंडामध्यें तीन प्रकारचे लोक सामील दिसतात. जलालाबादेकडील शिनवारी, काबूलच्या पश्चिमेकडील व उत्तरेकडील बच्चा सेखू याचे अनुयायी, व तिसरे खुद्द अमीराच्या सैन्यांतले फितुरी लोक. यांपैकीं व्यक्तिद्वेषानें पछाडलेले कोण, धर्मवेडानें माथेफिरू बनलेले कोण, जुलमानें गांजलेले कोण, लुटीच्या अभिलाषानें सरसावलेले कोण, राजघराण्यांतील मत्सरबुद्धीनें प्रवृत्त झालेले कोण, आणि जवळच्या व दूरच्या परराष्ट्रांतील हितशत्रूंच्या लाचलुचपतीनें लोभावलेले कोण याचा निर्णय कालानेंच लागेल. पैकीं आज बच्चा सेखू याचेंच पाऊल सर्वांत पुढें पडलें असून, अमानउल्ला व इनायतउल्ला या दोघांना एकामागून एक राज्यपदाचा राजीनामा देण्याला लावून, स्वतःला 'हबीबउल्ला गाझी' अशी पदवी घेऊन, तो गादीनशीन झाला आहे इतकें खास. बच्चा सेखू हा हलक्या कुळांतला व केवळ एका लष्करी भिस्त्याचा मुलगा आहे असें म्हणतात. प्रथम पेशावरास त्याचें चहाचें दुकान होतें. नंतर तो रस्त्याच्या कामावर मजुराचें काम करूं लागला. त्यानंतर तो शिपाई होऊन सैन्यांत शिरला. पण शिपाईगिरीपेक्षां त्याला दरोडेखोरीचा अनुभव व आवड अधिक आहे असें दिसते. मात्र तो साधा दरोडेखोर खास नाहीं. त्याच्या दरोडखोरींत एका प्रकारची नियत असून, श्रीमंतांना लुटून ते पैसे गरीबांना वाटून टाकण्याच्या त्याच्या अलौकिक स्वार्थत्यागानें तो अत्यंत लोकप्रिय झाला आहे, व या लोकप्रियतेमुळें त्याला काबुलची गादी

मिळण्यापर्यंत लढाऊ अनुयायांनीं साहाय्य केलें हें उघड दिसतें.

अमीर अमानउल्ला हा अद्यापि तरुण आहे. तथापि अल्पवयांत त्याला अनेक अद्भुत प्रकारचे अनुभव आले. प्रथम त्याच्या बापाचा अकल्पित रीतीनें खून झाला, व हबीबउल्लाच्या औरस वंशाकडे गादी यावयाची त्याऐवजीं त्याचा चुलता नसरुल्लाखान यानें ती बळकाविली. पण एकाच आठवड्यांत अमानउल्ला यानें आपल्या पराक्रमानें पारडें फिरविलें, व चुलत्याला पदच्युत करून आणि वडील भावाला कैदेत ठेवून त्यानें गादी हस्तगत केली. इतर भाऊ असतां आपल्या बापाच्या वधाचा सूड घेण्याचें व राज्याची गादी खेचून आपल्या शाखेकडे परत आणण्याचें काम अमानउल्लावरच पडलें व तें त्यानें यशस्वी केलें. यावरून तो बुद्धिवान धाडसी व महत्त्वाकांक्षी दिसतो. हल्लीं देखील अमानउल्लाने नाइलाजाने सोडून दिलेली गादी त्याचा वडील भाऊ इनायतउल्ला याच्या हातीं आली असतां ती त्याला राखतां आली नाहीं. शिवाय अमानउल्ला यानें संकटें सोसून कंदहाराला जाऊन त्यानें आपलें निशाण तेथील किल्ल्यावर उभारलें व फेरयुद्धाची तयारी चालावली, आणि इनायतउल्ला हा स्वदेश सोडून पेशावरला पळून येऊन त्यानें इंग्रज सरकारचा आश्रय केला, यावरूनहि या दोन भावांच्या कर्तृत्वांतील अंतर उघड दिसून येतें.

अमानउल्लाची कारकीर्द सुरू झाल्यावर लवकरच संधि साधून त्यानें इंग्रजांच्या मुलुखावर म्हणजे पेशावर प्रांतावर स्वारी केली. हें एक प्रकारचें धाडसच होय. पण त्याचा हेतु मुलूख जिंकण्याचा नसून अफगाणिस्थानाला स्वातंत्र्य मिळविण्याचा होता, व तो त्यानें अल्पायासानें सिद्धीस नेला. पूर्वी इंग्रज सरकार अमीराला दरसाल सहा लक्ष रुपये, खंडणा म्हणा, नजराणा म्हणा, खर्च म्हणा, देत होतें. पण या सहा लक्षांच्या मोबदल्यानें अमीराच्या परराष्ट्रीय संबंधांवर एक प्रकारचें नियंत्रण घातलें होतें. अमानउल्लानें महायुद्धानंतर चौफेर दृष्टि फेंकली तेव्हां हें नियंत्रण त्याला लाजिरवाणें वाटलें. व तह झाला तेव्हां या सहा लक्षांच्या नजराण्याचा त्याग करून त्यानें आपलें स्वातंत्र्यच कबूल करण्याची अट इंग्रजांना घातली व ती त्यांना मान्य करावी लागली. नंतर या नवीन दोस्त सरकारला खूष करण्याकरितां अफगाणिस्थानांत उभारण्याच्या नव्या तारायंत्राचें सामान इंग्रजांनीं अमीराला फुकट देऊं केलें. पण ही देणगी स्वीकारल्यानें ओशाळगत होतें म्हणून त्यानें ती नाकारली. यावरून अमानउल्ला हा तेजस्वी आहे, इतकेंच नव्हे तर इंग्रजांचे डावपेंच ओळखणारा आहे असेंहि उघड दिसतें.

अमानउल्लाच्या कारकीर्दीतलें हें पहिलेंच बंड नव्हे. या पूर्वी असेंच आणखी एक बंड झालें होतें. पण तें विकोपाला जाण्यापूर्वीच त्यानें तें मोडलें एवढेंच नव्हे, तर त्यानें युरोप खंडाकडे दौरा काढून मागें राज्य आपल्या मंत्रिमंडळाच्या स्वाधीन केलें, यावरून त्याचा आत्मविश्वास प्रगट होतो. पण त्याच्या गैरहजेरीचा दुष्मानांनीं खचित फायदा घेतला असला पाहिजे. त्यानें युरोपच्या सफरीहून परत आल्यावर मग सुधारणा जाहीर केल्या व त्या अमलांत आणण्याचा प्रयत्न केला. पण तो लंडन येथें असतांच इंडिया ऑफिसनें सुधारणा संबंधानें त्याला सावधगिरीची सूचना दिली होती असें हल्लीं प्रसिद्ध झालें आहे. पण याचा अर्थ फारसा कळत नाहीं! या सुधारणा केवळ सामाजिक स्वरूपाच्याच असत्या तर असली सावधगिरीची सूचना इंडिया ऑफिसनें दिली नसती, किंवा देण्याचें त्याला कारण नव्हतें, असें आम्हाला वाटतें. अफगाणिस्थानच्या मुल्लांचें व मौलवींचे मनोगत अमीरापेक्षां इंडिया ऑफिसलाच अधिक चांगलें कळतें असें मानणें कठीण आहे. तात्पर्य, अमीरानें काढलेल्या युरोपांतील सफरीच्या हेतूविषयीं इंग्रज मुत्सद्यांचें मन प्रथमपासूनच साशंक असावें. हिंदुस्थानांत व इंग्लंडांत त्याचा खूप सत्कार करण्यांत आला हें खरें. पण उभय पक्षीं तें सर्व संभावितीचें प्रदर्शनच होतें.

कसेंहि असो. युरोपच्या सफरीहून काबूलला परत पोंचल्यावर केवढ्या थाटाचे दरबार भरले, अमीराला केवढीं मानपत्रें देण्यांत आलीं, व केवढे दिलखुषीचे जाहिरनामे निघाले! पण अमानउल्लाच्या गैरहजेरांत त्याच्या सिंहासनाला भोंक पडून त्यांतून जे फितुरी भोंगे आंत शिरले होते त्यानीं तें इतकें पोखरून ठेवलें कीं या सर्व धामधुमीनें तें कडाडून मोडलें. दरवडेखोर सिंहासनाधीशाहून प्रबळ ठरला! अमिराला राज्यपद सोडावें लागलें. त्याला बसावयाला विमान राहोच, पण मोटारीहि मिळेना. आणि एखाद्या चोराप्रमाणें लपतछपत हिंवाळ्यांतील बर्फांतून वाट तुडवीत घोड्यावरून त्याला कंदहार गांठावें लागलें. कंदाहार ही अमानउल्लाची सासुरवाडी आहे. खान महमद तरझी हा त्याचा सासरा असून तो दुराणी जमातीचा एक प्रमुख पुढारी आहे. या तरझी घराण्यांतून आजवर काबूलच्या गादीला बरेच वेळां अमीर पुरविण्यांत आले. चालू बंडांत दुराणी लोक राजनिष्ठ राहिल्यानें अफगाणिस्थानाची दक्षिणविभागांतील राजधानी कंदाहार हिचा आश्रय अमानउल्लाला तूर्त तरी घेतां

आला. पण बंडा ा मोड करून पुनः आपली गादी हस्तगत करण्याला लागल इतका फौजफाटा व युद्धसामुग्री कंदाहारच्या बाजू ा अमानउल्ला याला मिळेल कीं नाहीं हें अद्यापि पाहावयाचेंच अ हे. तूर्त तरी माजी अमीराचे राज्यांतील सुधारणांच मनोरथ स्वप्नवत् झाले यांत शंका नाही. स्वतंत्र तुर्कस्थानाचा जनक केमाल्पाशा याच्या स्फूर्तिदायक उदाहरणाची छाप अमानउल्लाच्या मनावर पडली होती हें उघड दिसतें. पण एकाला जे साधले तें दुसऱ्याला हटकून साधेलच असा कांहीं नियम नाहीं.

हिंदुस्थानसरकार व अमीर अमानउल्ला यांचा तह ता. २२ नोव्हेंबर १९२१ रोजीं झाला. या तहांतील मुख्य कलमें अशीं आहेत. एकमेकांनीं एकमेकांचे अंतर्बाह्य स्वातंत्र्य कबूल करावें उभयतांनीं संमतीने आंखलेल्या रेषेप्रमाणें दोन देशांच्या मधील सरहद्द मानावी व पाळावी. परस्पर दरबारीं परस्परांचे वकील राहावत. तसेच कांहीं ठराविक जागीं व्यापारासंबंधाने एजंट राहूं द्यावे. इंग्रजांच्या मुलखातून लोकोपयोगी सर्व प्रकारचें सामान अफगाणिस्थानांत जाण्याला इंग्रजांनीं प्रतिबंध करू नये. मात्र अफगाणिस्थानाची गरज भागून जो माल उरेल तो अफगाण सरकारानें परवानगी देऊन पाठविल्यास इंग्रजांनीं आपल्या मुलखात येण्याला त्याला प्रतिबंध करूं नये. अफगाणिस्थानाचे सरकार हे खरी दोस्ती राखील तोंपर्यंत, व ब्रिटिश मलखाला कांहीं धोका नाहीं अशी इंग्रजांना खात्री वाटेल तोंपर्यंत, हत्यारे दारूगोळा व युद्धोपयोगी सामान आपल्या मुलखांतून अफगाणिस्थानांत जाण्यास इंग्रज सरकार परवानगी देईल. या सामानावर बरी जकात इंग्रजानी घेऊं नये. मात्र हे सामान फक्त सरकारी उपयोगाकरतांच असले पाहिजे. ते व्यापाराकरता किंवा काबूल सरकारनें चालू केलेल्या आर्थिक उद्योग धंद्याकरता असेल तर त्यावर जकात घेतली जाईल. मात्र वरील प्रकारचे सामान इग्रजी मुलखातून जामरूड, खुर्रम व चमन या तीन ठिकाणापर्यंत आखबंद गेले पाहिजे. तें या स्थळाच्या अलीकडे कोठेंहि फोडून भरतां कामा नये. परस्परांच्या सरहद्दी लगत रानटी जमातीविरुद्ध विशेष मोठा युद्धप्रसंग करावयाची वेळ पडल्यास त्याची अगाऊ सूचना परस्परांना परस्परांस दिली पाहिजे.

सदरच्या तहांत राजकीय केदी किंवा परस्परांचे गुन्हेगार व राजद्रोही लोक यांच्यासंबंधानें, म्हणजे ते आपल्या मुलखात ठेऊन घेणें किंवा राहू देणें या संबंधाने, परस्परांवर बंधनकारक अशा शर्ती मुळींच आढळत नाहींत याचा अर्थ असा दिसतो कीं दोघानांहि हवे तसें वागावयाची मोकळीक असावी. मनांतून दोस्ती असेल तोंपर्यंत एकानें या कामीं दुसऱ्याचें सहाय करावें. पण दोस्ती बिघडल्यानंतर काय करावें हें सांगावयास नकोच! प्रस्तुतच्या बंडामुळें लोकांना अकल्पित रीतीने असें आढळून आले कीं काबूल सरकारचे अनेक शत्रु हिंदुस्थानांत येऊन राहिलेले असतात; व त्याच्यावर सैल किंवा कडक नजर ठेवणे हे काम इं. सरकार आपल्या मर्जीप्रमाणें करीत असतें. म्हणून व अमानउल्ला चा एक शत्रु बंड यशस्वी होण्याचें चिन्ह दिसतांच बच्चा सेख याला मदत करण्याकरितां अलाहाबाद येथून इंग्रजांच्या कैदेतून पळून गेला आणि वाटेत धरला न जातां खुशाल पांचचारशें कोसांची मजल मारून, काबूल येथे बच्चा सेखू याला मिळून, आज तो काबूलचा गव्हर्नर बनला आहे! उलट विशेष खिसगणतींत नसलेले अमीराचे किरकोळ शत्रु व जुन्या राजघराण्यातील राजपुत्र, केंसातून उवा विंचरून काढाव्या त्याप्रमाणें, कोठल्या कोठल्या जागांतून हुडकून काढून इंग्रज सरकारने ब्रह्मदेशात कैदेंत ठेवण्याकरितां पाठविले आहेत !

इंग्रज सरकार व अमीर अमानउल्ला यांचें मन परस्पर कितपत साफ होंत याची कल्पना हिंदुस्थानांतील लोकांना कधींहि खरी यावयाची नाहीं. कारण इकडील सर्व प्रसिद्धीचीं द्वारें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने इंग्रज सरकारच्याच हातीं आहेत. पण फ्रेंच व जर्मन वर्तमानपत्रांतून लेख येत आहेत त्यावरून अफगाणिस्थानातील राज्यक्रांति हे महायुद्धाचेंच कच्चे पिल्लू म्हणण्याला हरकत नाहीं. जर्मनी, तुर्कस्थान व अफगाणिस्थान यांचा संबंध महायुद्धाच्या पूर्वीपासून जडं पाहात होता. महायुद्धांत तुर्कस्थान जर्मनीला जाऊन उघडपणे मिळालें. अफगाणिस्थानाने त्या वेळी प्रत्यक्ष हालचाल कांहीं केली नाहीं. तथापि पुढे लवकरच युद्ध पुकारून अमीरानें स्वातंत्र्य मिळविलें. यापूर्वीहि काबूल-सरकारला अंतर्व्यवस्थेंत पूर्ण स्वातंत्र्य होतेंच. नव्हते काय तें परराष्ट्रीय संबंधांत. पण १९२१ च्या तहानें तेंहि मिळून चुकले. याचा अर्थ इराण तुर्कस्थान जर्मनी रशिया इत्यादि राष्ट्रांशीं आपल्या हिताचे वाटतील तसे तह करण्यास काबूल सरकार मोकळे झालें. या मोकळिकीचा पूर्ण फायदा घेण्याच्या हेतूनेंच अमानउल्लाने अलीकडचा हा दौरा काढला, व त्यांत त्याचा कल इंग्रज सरकारला अनुकूल नव्हता हें उघड दिसून आलें. अशी स्थिति असल्यामुळें प्रस्तुतचें बंड इंग्रज सरकारच्या पथ्यावर पडल्यास त्यांत काय आश्चर्य ? शेजारधर्म हा नेहमीं दुतर्फीच असतो, या दृष्टीनें इंग्रज सरकारनें अमीराच्या शत्रूकडे कानाडोळा केला असल्यास त्याना कोण दोष देणार? पण त्यांतल्या त्यांत वाईट इतकेच वाटते कीं अमानउल्ला पदभ्रष्ट झाल्यानें वेड्या मुल्ला-मौलवींचे व महंमदी सनातनी

लोकांचें बरेंच फावणार! आणि प्रथम तुर्कस्थान नंतर अफगाणिस्थान या क्रमानें धर्मवेडाच्या भुताला पंचाक्षरी भेटून तें परस्पर गति घेण्याचा जो संभव होता, व त्यामुळें हिंदुस्थानांतील राष्ट्रीय चळवळीला जी अप्रत्यक्षपणें मदत होणार होती, तिला विनाकारण या राज्यक्रांतीने आळा बसला. धर्मनिष्ठेचा मुखवटा तोंडावर घालून हिंदी राष्ट्राचे कोण कोण हितशत्रू दिखाऊ सोंगे नाचवीत असतात याच्याविषयीं मन मोकळे करून बोलणें आज कठीण आहे. पण अफगाणिस्थानांतल्या प्रस्तुत राज्यक्रांती-विषयीं सर्वांशीं आनंद मानणे हें नव्या मन्वंतील राष्ट्रीय बुद्धीच्या हिंदी मनुष्याला शक्य नाहीं.

# कलकत्त्यांतील प्रेक्षणीय स्थळें

( ले. **वासुदेव कृष्ण भावे** )

कलकत्त्याचें मुख्य स्टेशन हावरा. जें महत्त्व मुंबईस व्हिक्टोरिया टर्मिनस ऊर्फ बोरीबंदर या स्टेशनाचें तेंच महत्त्व कलकत्त्यास हावरा स्टेशनाचें. हावरा हें ईस्ट इंडियन रेलवे व बंगाल–नागपूर रेलवे या दोन कंपन्यांचें जोड–स्टेशन आहे. कलकत्ता शहराचें हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रांतांबरोबर या स्टेशनामार्फत दळणवळण व व्यापार चालत असल्याकारणानें हावरा स्टेशन हें कलकत्त्याचें मुख समजण्यास हरकत नाहीं. हावरा स्टेशनाच्या खालोखाल महत्त्वाचें सिल्डा म्हणून एक मोठें स्टेशन ईस्टर्न बेंगाल रेलवेवर आहे. त्याचा व्यवहार पूर्व-बंगाल व आसाम या दोनच प्रांतांशीं आहे. यामुळे त्यास स्वाभाविकच दुय्यम स्थान प्राप्त झालें आहे. कलकत्ता शहराच्या पश्चिमेस हावरा व पूर्वेस सिल्डा अशीं हीं दोन स्टेशनें असून याच्या मध्य-भागीं हुगळी नदीच्या काठाकाठानें कलकत्ता शहर पसरलें आहे. हावरा व सिल्डा या दोन स्टेशनां-मधील अंतर साडेतीन मैलांचे आहे. तें लक्षांत घेतल्यास साडेतीन मैल हीच कलकत्ता शहराची रुंदी आपोआपच ठरते.

## हावडा की हावरा?

हावरा या शब्दाचा दोन वर्ग दोन प्रकारांनीं उच्चार करतात. इंग्रज लोकांच्या तोंडास हावरा हा उच्चार सहज येतो तर बंगाली लोकांस हावडा हाच उच्चार बरा वाटतो. शब्दाच्या उच्चारापासून इंग्रज लोक व बंगाली लोक यात जर एवढे अंतर तर त्यांच्या परस्परांशीं व्हावयाच्या वागणुकींत हे अंतर वाढत गेल्यास त्यात आश्चर्य कसलें ! मुंबईचें बोरीबंदर स्टेशन ज्यांनीं पाहिलें असेल त्यांस हावरा स्टेशनाची कल्पना सहज येईल. बोरीबंदर स्टेशनाचीच ती प्रतिकृति आहे. फरक येवढाच कीं, बोरीबंदर स्टेशन इंग्लडास जवळ आहे म्हणून त्याजवर नवीन नवीन सुधारणांचा हात लवकर फिरल्याने तें घासून–पुसून काढल्याप्रमाणें कोरेंकरकरीत वाटते आणि हिंदुस्थानाच्या थेट पूर्व टोंकाला गेलेल्या हावरा स्टेशनापर्यंतच्या बाराशें मैलांच्या अंतरानें त्याजवर पाश्चात्य सुधारणेची मेहरनजर फिरण्यास विलंब लागत असल्यामुळें तें जुनाट व मलीन दिसतें.

हावरा स्टेशनांतून बाहेर पडतांच दोनतीन मिनिटाच्या अंतरावर हुगळी नदीचा पूल लागत असून पुलाच्या पलीकडील कांठीं कलकत्ता शहर आहे. या दृष्टीने हावरा स्टेशन कलकत्त्यापासून अगदींच तुटक असल्यामुळें स्टेशन व त्या-भोंवतालची वस्ती यांस हावरा हे स्वतंत्र नांव मिळालें आहे आणि या हावरा गांवाची वेगळी म्युनिसिपालिटीहि आहे. हुगळी नदीच्या पश्चिम तीरावरील बंगाल तो खास बंगाल व पूर्वतीरावरील बंगाल तो पूर्वबंगाल असे बंगाल प्रांताचे दोन विभाग पडल्यामुळे कलकत्ता शहराची गणना पूर्व–बंगाल्यांतच करावी लागेल. पण पूर्व–बंगालची राजधानी कलकत्ता नसून डाक्का आहे हे विसरतां कामा नये. जी तक्रार हावरा स्टेशनाची तीच तक्रार हुगळी नदीची. हावड्याचा हावरा इंग्रजांनीं केला.त्याचप्रमाणें नदीचें नाव मूळ गंगा असतां इंग्रजांनीं तिची हुगळी बनविली असें बंगाली लोक म्हणतात. तथापि बंगाली लोकांची या नदीवरील निष्ठा कायम असून ते तिला गंगाच समजून तिच्या पात्रोदकांत उन्हाळ्यांतल्याप्रमाणें हिंवाळ्यांतहि पहांटेपासून बुड्या मारतांना दृष्टीस पडतात.

## गंगा नदीच्या शाखा

पण गंगेच्या नांवासंबंधाचा तंटा कलकत्त्यासच का लागावा असा प्रश्न कोणीहि विचारील हा तंटा उद्भवण्याचें मुख्य कारण असें कीं गंगा अशी एकच नदी कलकत्त्यापाशीं राहिलेली नाहीं. कलकत्त्यापासून वर सुमारें तीनशें मैल अंतरावर मुर्शिदाबादेच्या पलीकडे गंगा दुभंग झाली. तिचा एक फांटा कलकत्त्याकडे वाहात

आला व दुसरा फांटा मूर्शिदाबादेवरून फरीदपूर-चांदपूर या मार्गानें बंगालच्या उपसागरास मिळाला. एवढ्यानेंच थांबलें नाहीं. या दोनहि ओघांस अनेक शाखा फुटून बंगाल प्रांत नद्यांनीं चितारल्या-प्रमाणें झाला आहे. अशा स्थितींत इतक्या लहान-मोठ्या ओघांतून गंगा नदी म्हणून ओळखावयाचें कोणास ? त्यामुळें बंगाल्यांनींहि तारांबळ उडाली असून त्यांनाहि गंगा हें विशेषनामाचें सामान्य-नाम करून त्या सामान्यनामावरून नवीन विशेष नामें साधावीं लागलीं आहेत. आदिगंगा हें अशांपैकीं एक नांव आहे. आदिगंगा हा साधारण ओघळ असून तो काली घाटावरून वाहात जातो. याच घाटापासून थोड्या अंतरावर कलकत्त्यांतील प्रसिद्ध कालीमातेचें मंदिर आहे. नद्यांच्या नावांत अशा कारणानें फरक पडला तरी त्या सर्व नद्यांची जननी जी गंगा तिचें पावित्र्य वंशपरंपरेनें वरील प्रत्येक नदीस प्राप्त झालें असल्यामुळें हुगळी नदींत बुडी मारणारास प्रत्यक्ष गंगेंत बुडी मारल्याचें समाधान लाभावें हें स्वाभाविक होय.

बंगाली लोकांना हुगळी नदी ही गंगा नदीप्रमाणें पवित्र वाटत असली तरी नवख्या माणसाच्या मनांत पवित्रपणाची भावना तिला पाहून खास उद्भवत नाहीं. हुगळी नदीचें पात्र गंगेसारखेंच विशाल आहे. पाणी खोल आहे व तें प्रशांतहि आहे. परंतु ती इंग्रजांनीं भ्रष्ट केल्यामुळें कीं काय कोण जाणे, मनांत पवित्र व उदात्त विचारांना जन्मूं देत नाहीं. सगळ्या जनास पावन करणारी गंगा इंग्रजांना पावन न करता त्यांच्या स्पर्शानें भ्रष्ट झाली कशी अशी शंका जर कोणी घेईल तर त्याचें समाधान त्यास हुगळी नदीच्या पुलावर उभें केल्यानेंच होणार आहे. हावरा स्टेशन व कलकत्ता शहर याजमधील हुगळी नदीचें पात्र आगबोटींनी व जहाजांनीं अगदीं गजबजून सोडलें आहे. नदीच्या दोनहि बाजूंनीं बोटीवर बसण्या-करितां घाट बांधलेले आहेत. बोटींचा व जहाजांचा लांकडी पृष्ठभाग व त्यांच्या आकाशांत शिरलेल्या धुराच्या चिमण्या व शिडें यांच्या गर्दींत नदीच्या पाण्याचा मागमूसहि फारच थोडा लागतो. आणि ही नदी लांकडाची आहे कीं पाण्याची आहे असा भ्रम उत्पन्न होतो ! नदीच्या उगमाच्या बाजूपेक्षा मुखाची बाजू बरीच रिकामी आहे व त्या बाजूस गंगेचें काळेंभोर पाणी नेत्रास संतोष देतें खरें. पण दुथडी उभारलेल्या तागाच्या गिरण्यांतील धुराड्यातून सुटणाऱ्या धुराच्या ढगांनीं गंगेवरील पवित्र वातावरण इतकें दूषित होतें कीं, त्याखालून मंद मंद वाहाणाऱ्या ओघास गंगौघ म्हणणे जिवावर येतें.

## पुलाची रोजची घडामोड

हुगळी नदीपेक्षां हुगळी नदीवरील पूलच फार प्रेक्षणीय आहे. पुलावरून ट्रामखेरीज सर्व वाहानें जातात. व्हिक्टोरिया, मोटारबस, बैल-गाड्या व रिक्शा या पुलावरील मधल्या रस्त्यानें जात—येत असतात आणि दोनहि कडांच्या फर्शी-वरून माणसांची रहदारी सुरू असते. निरनिराळ्या वाहानांत बसलेलीं व पायीं चालणारीं माणसें यांची मोजदाद केली तर ती एका क्षणाला दोन हजारां-पर्यंत सहज भरेल. एवढ्यावरून हुगळी नदीच्या पुलावरील रहदारीची वाचकांस कल्पना करतां येईल. पुलाचें बांधकामहि तसेंच प्रेक्षणीय आहे. तो बांधण्यास बावीस लक्ष रुपये खर्च आला व त्याचें काम १८७४ सालीं पुरें झालें. पुलाचा विशेष हा आहे कीं त्याचा मधला भाग सरक पुलासारखा केलेला आहे. हा मधला भाग रोज सरकविण्यांत येतो व तो केव्हां सरकावयाचा ती वेळ दररोज वर्तमान-पत्रांमधून आगाऊ प्रसिद्ध होते. त्या वेळीं सरक पूल मोडून ठेवल्याप्रमाणें बाजूस सरकला असल्याकारणानें त्यावरील रहदारी बंद पडते. या-करितां ही वेळ बहुधा रात्रीचीच नेमलेली असते. सदर वेळेस सरक पूल मोडून ठेवून आगबोटी व मोठमोठीं जहाजें यांच्या वाहातुकीसाठीं नदी खुली केली जाते व तेवढ्या ठराविक वेळांत जहाजांचा तुंबलेला व्यवहार उरकून घ्यावा लागतो. ही गोष्ट मोठ्या आगबोटी व जहाजें यांची झाली. पण लहान नावांस कसलीच अडचण नसल्यामुळें त्या पुलाच्या कमानींतून सुळकुंड्या मारून इकडचा माल तिकडे घेऊन अहोरात्र जातात. जसा माशाना पुलाचा प्रतिबंध नाहीं तसाच नावांनाहि नाहीं. पुलाची आडकाठी काढून घेतल्यावर युरोप व अमेरिका या खंडांतील मोठ-मोठ्या आगबोटीहि हुगळी नदींतून कलकत्त्याच्या बंदरांत येऊं शकतात इतकें हुगळी नदीचें पात्र खोल आहे. अशा प्रकारच्या एका अमेरिकन जहाजाची यात्रेकरूंनीं भरलेल्या दुसऱ्या हिंदी जहाजाशीं टक्कर होऊन हिंदी जहाजास हुगळी नदीचा तळ पाहावा लागल्याचें वर्तमान कित्येकांनीं नुकतेंच वाचलेंहि असेल.

## कलकत्ता शहर

ही झाली हुगळी नदीची स्थिति. पण खुद्द कलकत्ता शहराचाहि इतिहास फारसा स्फूर्तिदायक आहे असें नाहीं. याहि बाबतींत कलकत्ता हें मुंबई शहराचेंच भावंड शोभेल. मुंबईप्रमाणें कलकत्ताहि सन १६८६ च्या सुमारास हुगळी नदींत मासळी धरणाऱ्या कोळ्याचें एक भिकार खेडें होतें. आज हुगळी नदी व चौरंगी यांचे दरम्यान तीन मैल लांब व दोन मैल रुंद असें सुंदर पावू-

सारखें मैदान पसरलेलें असून त्यावर अनेक क्रीडांगणें व पुतळे उभारण्यांत आले आहेत. त्याच मैदानावर बऱ्याच वर्षांपूर्वी हिंस्र पशूंनीं भरलेलें निबिड अरण्य माजलें होतें. अशा भयप्रद स्थितींतून सांप्रतचें भव्य स्वरूप कलकत्त्यास प्राप्त करून देण्यास इंग्रज लोकांचा उद्योग व परिश्रमच कारण झाले असल्यामुळें कलकत्त्यापासून आत्मीय भावनेची स्फूर्ति मिळाली तर ती एकट्या इंग्रजांसच मिळेल, बंगाली लोकांस मिळणार नाहीं. कारण बंगाल्यांचा कलकत्त्याशीं कोणताहि उदात्त असा ऐतिहासिक प्रसग निगडित नाहीं. हुगळी नदीवरील फोर्ट विल्यम किल्ला ईस्ट इंडिया कंपनीनेंच बांधलेला आहे आणि त्याखेरीज ठिकठिकाणीं उभारलेलीं शिपायांचीं स्मारकें व योद्ध्यांचे पुतळे हे इंग्रजांचा जेतेपणाचा तोराच बंगाली लोकांवर मिरवीत असल्यानें त्यांच्या सौंदर्याकडे पाहून होणारा आनंद हा पायांतील बेड्या सुवर्णाच्या आहेत म्हणून वाटणाऱ्या आनंदाइतका दुःखदायक व अपमानास्पद होय.

ऐतिहासिक दृष्ट्या कलकत्ता शहर बंगाली लोकांस, मग ते हिंदू असोत कीं मुसलमान असोत, सारखेंच मानहानिकारक आहे. मुसलमानांचा अंमल कलकत्त्यावर १७५७ पर्यंत होता. परंतु तेव्हांहि कलकत्ता हें शहर या नात्यानें गाजलेलें नसल्यामुळें मुसमानांनाहि तें स्फूर्तिस्थान होऊं शकत नाहीं. तथापि ऐतिहासिक नसला तरी जुना धार्मिक जिव्हाळा बंगाली लोकांस कलकत्त्यापासून थोडाबहुत मिळतो, ही त्यातल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय. बंगाल्यांत शाक्त पंथ फार मोठा आहे. बहुतेक बंगाली शक्तीचे म्हणजे कालीचे उपासक आहेत. बंगाल्याचे जगविख्यात स्वामी विवेकानंद यांचे गुरु श्रीरामकृष्ण परमहंस हेहि कालीचेच निस्सीम भक्त होते. हा लौकिक ऐकून कलकत्त्यास आलेल्या महाराष्ट्रीयास काली घाट व त्यावरील कालीचें मंदिर पाहाण्याची इच्छा होणे वाभाविक होय. हें मंदिर कलकत्त्याच्या अगदीं कोपऱ्यांत काली घाटापाशीं आहे. एस्प्लेनेड ते काली घाट अशा ट्रामगाड्याहि मिळतात. ट्रामगाड्यांवरील त्या पाट्या पाहून काली घाट हा एक प्रशस्त व सुंदर घाट असेल व त्या शेजारचें कालीमंदिर रमणीय असेल अशी कल्पना होते. पण मंदिराजवळ गेल्यावर आपल्या कल्पनेस आपणच हंसू लागतों. काला घाटाजवळील वस्ती अगदीं गलिच्छ आहे व त्याहून घाट गलिच्छ आहे आणि जिला आदि-गंगा म्हणतात तिचें पाणीहि तसेंच गलिच्छ झालेलें पाहून अर्थाची टवाळी करण्याकरितां ही शब्दांची योजना आहे काय अशी शंका येते.

## कालीचा कराल नैवेद्य

कालीमंदिराची वाट चुकून आम्ही एका कोंवळ्या मेंढ्यांच्या कळपापाशीं गेलों. हा कळप शंभर—एक मेंढरांचा असून देवीस अर्पण करावयाचे ते नैवेद्य त्यांच्या मालकानें तयार करून ठेवले होते. देवापुढें फोडावयाचे जसे नारळ तशीं कालीपुढें माना चिरावयाचीं ही बकरीं! मेंढरांच्या कळपावरून देवळाचा माग आम्हास लागला आणि देवळांतील वधस्तंभाखालीं सांचलेल्या रक्ताच्या डबक्यावरून देवीस वाहिल्या जाणाऱ्या रुंड—मालांची आम्हास कल्पना आली. देवी अष्टभुजा असून तिची मूर्ती उग्र आहे तिच्यापाशीं भक्तांची गर्दी इतकी गोळा होते कीं त्यांचें मुंडके धरून ते देवीच्या उंबऱ्यावर टेकवून पूजारी गर्दी ताबडतोब मोडतो. कोणी भक्त आपलें बकरें घेऊन वधस्तंभापाशी जातो व गुऱ्हाळघरांत उंसाचें वाडें तोडून बाजूस टाकून देण्यास जितका वेळ लागतो त्यापेक्षां कमी वेळांत बकऱ्याचे मागील दोन पाय उचलून मुंडी उडविण्यांत येते व त्याच्या रक्ताचा टिळा भक्तांच्या कपाळीं लागतो! अशा या प्रत्यहींच्या होणाऱ्या संहारामुळें कालीचे पवित्र मंदिर भयाण वाटावें यात नवल काय? मंदिराच्या सभामंडपांत कांहीं भक्त पोथीचे पारायण करीत बसलेले आढळतात. पण भोंवतालीं रक्ताचे डाग इतके पडलेले असतात व दुर्गंधी इतकी सुटलेली असते कीं ह्या भक्तांना पोथी न वाचतां नुसता प्राणायामच कां करीत नाहीं, असा प्रश्न विचारण्याकरितां तोंडाशीं येतो!

# पुस्तकपरीक्षण

## शुद्धिसर्वस्व

### ( ले. सदाशिवशास्त्री भिडे )

#### उत्तरार्ध

शुद्धिसर्वस्व या पुस्तकाचा शुद्धीकरण हाच विषय असल्यामुळें शुद्धीच्या बाबतीत नेहमी जी एक मोठी अडचण दिसते तीवर श्री. लक्ष्मणशास्त्री यांनीं चांगलीच तोड सुचवली आहे व या विधानास धर्मशास्त्राचा आधारहि उत्कृष्ट दाखविला आहे. कोणाहि पतिताची अगर संसर्गी मनुष्याची शुद्धि करावयाची असल्यास शुद्धिकार्याला विरुद्ध असणाऱ्या जुन्या पक्षाकडून भले मोठे अगडबब प्रायश्चित्त सांगण्यांत येतें. हें प्रायश्चित्त ऐकल्या-बरोबर शुद्ध होऊन परत हिंदुधर्मात येऊं इच्छिणारा मनुष्य घाबरून जातो व ही हिंदुधर्माची भीक नको पण हे प्रायश्चित्ताचे कुत्रे आवर असें म्हणण्यास तयार होतो. पण श्री लक्ष्मणशास्त्री यांनीं असें ठरविलें आहे की, जेथें साम्यानें किंवा अतिदेशानें ( सादृश्यानें ) प्रायश्चित्त सांगितलें असेल तेथें अर्धें प्रायश्चित्त समजावें. हा निर्णय शुद्धिकार्याचे बाबतीत उपयोगात आणल्यास प्रायश्चित्ताचा भयंकरपणा कमी होऊन शुद्ध होणाऱ्याचा मार्ग बराच सुलभ होईल यांत शंका नाही. धर्मशास्त्रकर्त्या ऋषींनी प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत तीं लोकसंग्रहाच्या हेतूनेच सांगितलीं आहेत हे धर्मशास्त्राचा विचार करतांना प्रत्येकानें लक्षांत ठेवणें जरूर आहे. याप्रमाणें प्रायश्चित्ताच्या मार्गात कांटे पसरण्याचे काम न करतां तो मार्ग सुलभ व निष्कंटक करण्याचा लेखकानें चांगलाच प्रयत्न केला आहे हें या पुस्तकांतील पृष्ठ ३ पाहिलें असतां दिसून येईल.

पतित मनुष्याची सतति पतितच समजली जाणें स्वाभाविक होतें. परंतु पतितांच्या मुलाबाळांना आपल्या पूर्वजांच्या जातींत प्रवेश करण्याची इच्छा असल्यास त्यांना एखादें घनघोर प्रायश्चित्त सांगणें खरोखरच अगदी अन्यायाचे होय. कारण स्वतः पतित होणाऱ्याचा अपराध असला तथापि त्याची संतती अपराधी नाहीं खास. असें असतां त्या संततीला प्रायश्चित्त देण्याचा विचार करतांना तिचें निरपराधित्व मुख्यत्वेंकरून लक्षांत घेणें जरूर आहे व तशा दृष्टीनेंच, पण अनेक धर्मग्रंथांचे आधार देऊन श्री. लक्ष्मणशास्त्री यांनी असें ठरविलें आहे कीं, पतितप्रायश्चित्ताच्या तृतीयांशानें पतितांच्या मुलाबाळांना प्रायश्चित्त देऊन त्यांचा पूर्वजातींत संग्रह करण्यास मुळींच हरकत नाही. याप्रमाणें शक्य तितकें प्रायश्चित्ताचें स्वरूप सौम्य करण्याकरितां प्रस्तुत पुस्तकांत शिकस्तीचा प्रयत्न करण्यांत आला आहे. याचें कारण लेखकानें पुस्तकाच्या १-२ पृष्ठांवर स्पष्ट दिलें आहे. धर्माची विपन्नावस्था व हिंदु समाजाची हलाखी वगैरे गोष्टींनी श्रद्धावान पण धर्मशील अशा मनुष्यांचें अंतःकरण कसें व्याकुळ होतें आणि ज्या धर्मानें अखिल मानवजातीच्या उद्धाराची महत्त्वाकांक्षा बाळगावी त्याच धर्माच्या अनुयायी म्हणविणाऱ्या समाजाची इतकी हलाखी व्हावी याबद्दल कसा उद्वेग वाटतो तें नमूद करून लेखक म्हणतो कीं, राष्ट्राची ही विपन्नावस्था लक्षांत घेऊनच आपण या कार्यास प्रवृत्त झालो आहोत. ज्यांना राष्ट्र किंवा समाज याची कल्पना सुद्धां नाहीं अशा पंडितंमन्यांची प्रवृत्ति प्रायश्चित्ताचें स्वरूप सौम्य करण्याकडे झाली नाहीं तर त्यांत फारसें नवल नाहीं.

हिंदुस्थानांत शुद्धिकार्याची चळवळ चालू झाल्यापासून म्लेच्छ कोणास म्हणावें यावर भवति—न—भवति चालू आहे. या म्लेच्छ शब्दाची व्याख्या प्रस्तुत पुस्तकाच्या ५ व्या पानावर लेखकानें दिली आहे. ही व्याख्या शास्त्रशुद्ध असून नैय्यायिकी थाटाची आहे. तथापि उगीच शब्दा-वडंबर न माजवतां अवश्य त्याच गोष्टींचा समावेश करून व्याख्या चांगली परिपूर्ण केली आहे, ती-वरून हिंदु कोण व म्लेच्छ कोण याचा सहज निर्णय करतां येण्याजोगा आहे. असा आटपसर नीटनेटकेपणा सनातन धर्मप्रदीप या ग्रंथांत कोठेंच आढळावयाचा नाहीं हे लक्षात ठेवण्याजोगें आहे. त्याचप्रमाणें ७ व्या पानावर पतनाची व्याख्याहि अशीच समर्पक दिली आहे. यांत प्रदीपा-प्रमाणे अव्यवस्थित विस्तार नाही. तरी पण पहिल्या-व्याख्येसारखी याची भाषा सुगम नाहीं. मात्र व्याख्या पूर्ण आणि सुस्पष्ट आहे. १२ पानावर दिलेला निर्णय फारच महत्त्वाचा आहे. श्री. अनंत कृष्णशास्त्री यांनीं आपल्या ग्रंथांत शुद्धिकार्यास अनुमोदन दिलें आहे खरें. पण एका हातानें ते देऊन दुसऱ्या हातानें काढून घ्यावें त्यासारखी कृति केली

आहे. ज़बरदस्तीनें किंवा तसल्याच दुसऱ्या कांहीं रीतीनें बाटलेल्या मनुष्यास शुध्द करावयाचें असल्यास १ महिन्यापासून ३ वर्षांपर्यंत त्यांनीं मुदत घातली आहे. याप्रमाणें कोठें मुदतीची अट घालून तर कोठें प्रायश्चित्ताचा बाऊ दाखवून शुद्धिकार्य अशास्त्रीय व अप्रमाण ठरविण्याचा कसून प्रयत्न केल आहे. शास्त्रीमजकुरांच्या या खोडसाळ प्रयत्नास प्रस्तुत पुस्तकांत चांगलें झणझणीत उत्तर दिलें आहे. जबरदस्तीनें बाटविलेला मनुष्य वस्तुतः बाटतच नाही असा सडेतोड निर्णय देऊन त्याला शास्त्रवचनाचा आधार देखील तितकाच कणखर दिला आहे. काशीकर पंडितांना ( अनंत कृष्णशास्त्री हे काशीकर पंडितांपैकी एक आहेत ) बादशाही पंडित म्हणून शरणचिठी लिहून देणाऱ्या महाराष्ट्रीयांनीं आपल्या महाराष्ट्रांतीलच शास्त्र्यांची थोडी तरी पूसतपास केली असती तर बरें झालें असते असे म्हटल्यावाचून आमच्याने राहावत नाही. पान १७ वर अनत कृष्ण शास्त्र्यांचे विधान कसें निराधार आहे तें स्पष्ट दाखवून त्यांच्या प्रायश्चित्त सौम्य न करण्याच्या बाबतींतील कठोरपणा चागलाच उघडकीस आणला आहे.

याप्रमाणे शुद्धिकार्याला कसून विरोध करणाऱ्या पुराणमतवाद्यांचे पुढारी अनंत कृष्णशास्त्री यांची शास्त्रार्थातील हातचलाखी किंवा राष्ट्राविषयीची उदासीनता अनेक प्रकारानीं दाखवून प्रदीपांतील त्यांचा शुद्धिप्रकाश हा खरोखर प्रकाश नसून राष्ट्रांतील शुद्धिकार्याला अडचणींत घालणारा तो गाढ अंधःकार आहे असे स्पष्ट दाखविले आहे.

पृष्ठ २८ मध्यें तर व्रात्यत्वाचा विचार करून एकंदर मानवी समाजाचा शुद्धिकार्याच्या द्वारानें हिंदुधर्मात समावेश होणे कसे इष्ट व शक्य आहे तें सप्रमाण सिद्ध केलें आहे. याप्रमाणे अनंत कृष्ण शास्त्रीकृत सनातन धर्मप्रदीपांतील शुद्धिप्रकाशाचे सर्वस्वी खंडन केले असलें तरी अनंत कृष्णांचा जेथें जेथे उल्लेख करण्यांत आला आहे तेथे तेथे बहुमानदर्शक विशेषणांनी त्यांच्याविषयी पूज्यताबुद्धि परिपूर्ण दर्शविली आहे हें श्री. लक्ष्मणशास्त्री यांस खरोखर भूषणास्पद होय. अनन्त कृष्णशास्त्री यांनी मात्र आपल्या ग्रंथांत कुत्सितपणे दुसऱ्यांचा इतका उपहास केला आहे कीं तो पाहिल्यास मत्सराने ग्रस्त झालेल्या या पंडितमन्यास धर्मशास्त्राचा विचार करण्याचा सुद्धां अधिकार नाहीं असें मनुस्मृतीच्या आधारानें देखील कोणालाहि म्हणतां येईल. असें असतां लक्ष्मणशास्त्री यांनीं दाखविलेला नम्रपणा अधिक उठावदार वाटल्यास त्यांत फारसें आश्चर्य नाही.

प्रदीपकारांनीं लोकसंग्रहाची कल्पना देखील आपल्या मनास शिवूं द्यावयाची नाहीं असा जणूं निश्चयच केला आहे असे दिसतें. शुद्धिकार्याला विरोध करण्याच्या भरांत येऊन अस्पृश्यापेक्षां म्लेच्छ (म्हणजे मुसलमान युरोपियन वगैरे जाती) धर्मदृष्ट्या उच्च होत असे बेधडक विधान केले आहे! या विधानाचा कोणीहि तिरस्कारपूर्वक धिक्कारच करील पण तसें कांहीं न दर्शवितां श्री. जोशी यांनी शास्त्रीय शब्दांनींच त्यांच्या सर्व विधानाचें खंडन केले आहे. परंतु राष्ट्र, समाज अगर लोकस्थिति यांच्याकडे ढुंकूनहि पाहावयाचें नाही असा ज्यांचा हटवाद त्याना आपल्या या उपद्व्यापाबद्दल क्षिती वाटणें मुळींच सभवनीय नाही. हे जरी खरं असले तथापि लोकांचा बुद्धिभेद असल्या ग्रथांनीं व ग्रंथकारांच्या नांवास असलेल्या मोठेपणाने झाल्याशिवाय राहात नाहीं तो बुद्धिभेद नाहीसा करून सध्या देशांत चालू असलेली शुद्धिकार्याची चळवळ हिंदुधर्मशास्त्रास पूर्णपणे मान्य आहे, हें धार्मिक सत्य लोकांपुढे यावयास पाहिजेच होते. आणि म्हणूनच तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी लिहिलेल्या या ग्रथानें लोकाचा बुद्धिभेद नाहीसा होईल व समाजांतील शुद्धिकार्याविषयीं उत्साह द्विगुणित वाढेल असा आम्हास पूर्ण भरवसा वाटतो. याच दृष्टीनें आम्ही लेखकाचे पुनः एकवार अभिनंदन करून हे परीक्षण पुरें करतो.

# मुसलमानांच्या मागण्यांचा अर्थ

दिल्ली येथें जी मुसलमानांची सर्वपक्षीय परिषद भरली, तिने जवळ जवळ एकमताने निश्चयार्थक असे कांहीं ठराव केले. नहरू कमिटी ही जशी सर्वराष्ट्रीय दृष्टीने सर्वपक्षीय सभा होती तशीच दिल्लीची ही परिषद मुसलमान समाजाच्या दृष्टीने सर्वपक्षीय होती असे म्हणण्यास फारशी हरकत नाही. कारण एका टोंकाचे नामदार आगाखान तर दुसऱ्या टोंकाचे अलीबंधू व शफी दाऊदी हे या परिषदेंत हजर होते. आणि सर्वांनीं एकच एकमुखी मागणी केली. दुसरे पक्षी नेहरू कमिटीच्या सर्वपक्षीय परिषदेंत कांहीं पक्षाचे लोक आले नव्हते. आलेल्यांपैकीं कांही उठून गेले. कांहीं शेवटपर्यंत हजर राहिले नाहींत; व कांहीं ठराव सर्वानुमतें मंजूर न होता बहुमतानें मंजूर झाले. या दृष्टाने 'नेहरू परिषदेपेक्षां दिल्लीची मुसलमान समाजाची परिषद अधिक यशस्वी

झाली ' असें म्हणण्यांत येतें. पण आम्हाला त्यांत विशेष स्वारस्य वाटत नाहीं. कारण ही परिषद एक-जिनसी मुसलमानांची होती. आणि हिंदुस्थानांतील केवळ हिंदु समाजाची अशी एखादी परिषद भरविण्यांत आली असती तर तिला दिल्ली येथील परिषदेइतकेंच यश लाभलें असतें, यांत आम्हाला बिलकुल शंका वाटत नाहीं.

याचें एकच प्रत्यंतर असें कीं, गतवर्षी हिंवाळ्यांत दिल्ली येथें हिंदु—सभेनें मतदारसंघ, प्रांतरचना वगैरेसंबंधानें स्वराज्य-विषयक जे ठराव केले तेहि जवळ जवळ सर्वानुमतें मंजूर झालेले आहेत. आणि ते मंजूर करणारांमध्यें भिन्न मतांचे किंवा भिन्न पक्षाचे लोक नव्हते असें म्हणतां येणार नाहीं. दुर्दैवानें जाती-संबंधीं किंवा धर्मासंबंधीं प्रश्न उपस्थित झाले असतां, जितकी एकी घडून येते तितकी अखिल भारतीय स्वराज्यविषयक प्रश्न चर्चेला निघाले असता होत नाहीं. पण यांत मोठेसें आश्चर्य आहे असेंहि आम्हाला वाटत नाहीं आज इंग्लंडांत फक्त स्वराष्ट्रीय व सार्वराष्ट्रीय असे प्रश्न चर्चेला निघाले असतां हाच प्रकार तेथेंहि दृष्टीला पडेल अशी आमची खात्री आहे.

पण आमचा आज मुख्य मुद्दा तो नाहीं. दिल्ली परिषदेचें यश नेहरू परिषदेपेक्षां कमी असो वा अधिक असो; सर महंमद शफी यानीं दावा सागितल्याप्रमाणें दिल्ली परिषदेइतकी अधिकांत अधिक प्रातिनिधिक स्वरूपाची मुसलमानाची परिषद आजवर दुसरी भरलेली नाहीं, म्हणून एखादा डॉ. अन्सारी किंवा एखादा बॅ. जिना यांसारखे लोक सोडून दिले असता, सर्वसाधारण मुसलमान समाज कोणत्या मताचा आहे हें दिल्ली परिषदेवरून व्यक्त झालें, ही गोष्ट छपविण्यांत अर्थ नाहीं. फक्त या परिषदेनें ज्या मागण्या एकमुखी ठरावानें मागितल्या त्यांचा खरा अर्थ काय आहे याचा विचार आतां केला पाहिजे. या मागण्या अनुक्रमें खालील होतः—

(१) हिंदुस्थानामध्यें यापुढें राज्यघटना ही 'फेडरल' असावी ' युनिटरी ' असूं नये. म्हणजे सत्तेच्या दृष्टीनें मध्यवर्ती हिंदुस्थानसरकार हें सर्वश्रेष्ठ असें मानलें न जातां, स्वायत्त अशा निरनिराळ्या प्रांतांच्या एका 'संघा' च्या हातीं ही मुख्य सत्ता असावी.

( २ ) प्रत्येक प्रांत आपापल्या कारभारामध्यें सर्वसत्ताधीश असावा.

( ३ ) काहीं विशिष्ट मोजक्या नेमक्या शब्दांनीं उल्लेखिलेल्या अशा विषयासंबंधाची सत्ता मध्यवर्ती सरकारच्या हातीं राहावी.

( ४ ) अशा रीतीनें वांटून दिल्यावर उरतील ते शेषाधिकार, म्हणजे जे अधिकार घटनेंत अनुल्लेखित राहतील किंवा ज्यांच्या वांटणीसंबंधानें संशय उत्पन्न होईल, असे अधिकार प्रांतिक सरकारचे हातीं राहावेत.

( ५ ) वरिष्ठ किंवा प्रांतिक कायदेमंडळांत हिंदु व मुसलमान या दोनहि समाजांचा संबंध येईल तेथे, कोणत्याहि समाजाच्या प्रतिनिधींपैकीं ¾ प्रतिनिधी हरकत घेतील तेथें त्या विषयाची चर्चा होऊं नये.

( ६ ) जातवार वेगळे मुसलमान मतदारसंघ आज इतकीं वर्षे अमलांत राहिल्याकारणानें, तो या देशांतील एक सुप्रतिष्ठित असा कायदाच बनून गेला आहे. याकरितां ती स्थिति बदलण्याचा कोणासहि अधिकार नाहीं.

( ७ ) निरनिराळ्या कायदेमंडळांतून किंवा प्रातिनिधिक संस्थांतून, मुसलमानांच्या प्रतिनिधींची संख्या म्हणजे हिस्सा आहे तसाच तो अबाधित राहावा. म्हणजे ज्या प्रांतांत मुसलमान हे संख्येनें अधिक असतील तेथे त्यांच्या प्रतिनिधींची संख्या इतर कोणतेहि तत्त्व लावले तरी, हल्लींहून कमी होऊं नये. आणि ज्या प्रांतांत मुसलमान हे संख्येने थोडे आहेत तेथेंहि त्यांना लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर अशी प्रतिनिधी–संख्या दिली आहे ती तशीच कायम राहिली पाहिजे.

( ८ ) वरिष्ठ कायदेमंडळामध्यें मुसलमान प्रतिनिधींची संख्या कमींत कमी ⅓ असली पाहिजे.

( ९ ) सिंध प्रांताचा मुबई इलाख्याशीं वास्तविक कांहींच सबंध नसल्याकारणानें, सिंध हा एक स्वतंत्र प्रांत बनविण्यांत यावा. मात्र तेथेंहि हिंदू हे संख्येनें थोडे म्हणून, इतर प्रांतांत अल्पसंख्याक मुसलमानाना ज्या सवलती मिळतील त्या सिंध प्रांतांत हिंदूंना देण्यांत याव्या.

( १० ) बलुचिस्थान, वायव्य सरहद्दीचा प्रांत हे कारभाराच्या दृष्टीनें स्वतंत्र प्रांत बनविण्यांत यावेत, व तेथेंहि हिंदु लोक संख्येनें थोडे म्हणून त्यांना वरीलप्रमाणेच सवलती देण्यांत याव्या.

( ११ ) प्रत्येक प्रांतांत सरकारी नोकरी वगैरेंचे बाबतींत मुसलमानांना लोकसंख्येप्रमाणें योग्य हिस्सा असेल तो द्यावा.

( १२ ) अशा रीतीनें स्वराज्याची घटना एकदां ठरल्यावर त्या घटनेंत समाविष्ट असलेल्या सर्व घटकांची संमति असल्याशिवाय तिच्यांत कोणताहि फेरफार करण्यांत येऊं नये.

( १३ ) मुसलमान समाजानें ही मागणी निश्चित केलेली असल्यामुळें दुसऱ्या कोणीहि कोणतीहि घटना किंवा योजना निराळी सुचविली व तींत वरील तत्त्व ग्रथित केलें गेलें नाहीं, तर ती घटना किंवा योजना मुसलमान समाजाला केव्हांहि मान्य होणार नाहीं.

वरील मागण्यांची भाषा वाचणारांच्या लक्षांत हें तेव्हांच येईल की, मुसलमानांना खरा ' सवता सुभा ' म्हणून जो हिंदुस्थानांत पाहिजे तो यांत आहे. पण यांत याहूनहि थोडा खोल अर्थ आहे. तो विशद करून सांगितला पाहिजे. वरील १३ मागण्या एकत्र केल्या असतां त्यांतून पांच मुख्य मागण्या निष्पन्न होतात त्या अशा—

(१) मुसलमान लोकसंख्या ज्यांत हिंदूंहून अधिक आहे असे कांहीं नवे प्रांत बनविणें.

(२) लखनौ येथील सन १९१६ सालच्या तहानें मुसलमानांना लोकसंख्येपेक्षां पुष्कळ अधिक प्रमाणांत प्रतिनिधीसंख्या निरनिराळ्या कायदेमंडळांतून दिली गेली. ती देतांना कोणत्याहि एका तत्त्वाचा आंगिकार करण्यांत आलेला नव्हता. तथापि आतां कोणतेंहि एक तत्त्व लाविलें असतां ही संख्या हटेल. म्हणून ती हटूं न देतां ती कायमच ठेवणें. म्हणजे मोहबतीखातर म्हणून जें दिलें गेलें त्याला आतां हक्काचें स्वरूप देणें.

(३) हल्लीं ज्या प्रांतांत मुसलमान संख्या अधिक आहे ते तसेंच कायम ठेवणे व ते फोडण्यास हरकत घेणें.

(४) मुसलमान मतदारसंघ स्वतंत्र म्हणजे हिंदूंच्या उपसर्गापासून दूर ठेवणे.

(५) राज्यकारभाराची सत्ता मध्यवर्ती सरकारच्या हातीं एकत्र होऊन न राहतां ती फुटून तिचे तुकडे होऊन प्रांतानिहाय वांटली जाणे.

या पांच मागण्यांपैकीं, कोणतीहि एक मागणी, पण एकच मागणी, मुसलमानांनीं मागितली असती तर तिचा अर्थ आम्ही विपरीत समजलों नसतों. पण या पांच मागण्या एकत्र करून पाहिल्या म्हणजे त्या मागण्यांना विपरीत म्हणजे शिरजोरीचें स्वरूप येतें. तें कसें तें थोडक्यांत पाहूं.

प्रथम एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे ती ही की, हिंदुस्थानाबाहेर हिंदु लोकांचा ऋणानुबंध कोणाशींहि नाहीं. त्यांच्या जातीचे लोक किंवा धर्माचे लोक बाहेर कोठेहि नाहींत. यामुळें त्यांना बाहेरून कोठूनहि सहानुभूति, मदत किंवा बळ केव्हांहि मिळणार नाहीं. याच्या अगदीं उलट मुसलमानांची स्थिति आहे. आणि ही गोष्ट डोळ्यापुढें ठेवून मुसलमानांनीं आपलें धोरण आंखलें आहे. हिंदुस्थानांत मुसलमान संख्येनें थोडे, पण त्यांच्या भरतीला बाहेरचे जमेस धरले म्हणजे हिंदूंपेक्षा मुसलमानांची लोकसंख्या एकंदर अधिक आहे. जोंपर्यंत हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य आहे व तें सुरळीत चालू आहे, तोंपर्यंत गोष्ट वेगळी. पण उद्यां बंड झालें, युद्ध उभें राहिलें म्हणजे महंमद अल्लींना रोज स्वप्नात जो देखावा दिसतो त्याप्रमाणें 'अंगोरापासून सहारापर्यंत' एकजिनसी मुसलमानांचा मुलूख होईल. आणि एवढ्या मोठ्या क्षेत्रांतील एकजिनसी धर्मवाल्यांचें बळ संघटित झालें असतां त्यापुढें हिंदूंचा काय पाड?

'युनिटरी' म्हणजे एमुकखी स्वराज्यघटनेंत प्रांतांना सत्ता थोडी व मध्यवर्ती सरकारला अधिक व तीहि सर्वंकष. संघाच्या स्वरूपाची घटना झाली म्हणजे प्रत्येक प्रांत हा स्वतंत्र तर होतोच, परंतु प्रांत लहान असो किंवा मोठा असो, त्याला सरसकट एकेक मत म्हटलें म्हणजे काय होतें पहा. मुसलमानांना आज एका पंजाबाखेरीज किंवा कदाचित् पूर्वबंगाल-खेरीज इतर कोठेहि सत्ता नाहीं. ती दिल्ली येथील मागण्याप्रमाणें पेशावर प्रांत, बलुचिस्थान प्रांत, सिंध प्रांत, पंजाब प्रांत व पूर्वबंगाल प्रांत अशा पाच प्रांतांतून मिळेल व हिंदुस्थानाची एकंदर प्रांत-संख्या सुमारें ११ मानली व या ११ मतांनीं हिंदुस्थानाच्या भवितव्यतेचा निर्णय व्हावयाचा असे मानलें तर या अकरामध्यें पांच मतें मुसलमानांचीं असें आधीं ठरणार व ज्याअर्थी अकरांतील $\frac{3}{4}$ किंवा $\frac{4}{5}$ इतक्यांचें एकमत झाल्याशिवाय कोणतीहि गोष्ट करावयाची नाहीं, त्याअर्थी या पाच मुसलमान मतांनीं कोणत्याहि गोष्टीला विरोध केला म्हणजे ती गोष्ट घडून यावयाचीच नाहीं. त्यानंतर वरिष्ठ कायदेमंडळांतहि $\frac{1}{3}$ मुसलमान प्रतिनिधी–संख्या असली म्हणजे, आज त्यांना सरकारला किंवा लोकपक्षाला जसें झुलवितां येतें तसेंच पुढेंहि झुलवितां येईल.

लखनौच्या तहानें इतर प्रांतांतून मुसलमानांना प्रमाणाबाहेर प्रतिनिधी दिले आहेत त्याहून अधिक ते मागत नाहींत एवढीच मेहरबानी! आणि मतदारसंघ स्वतंत्र ठेवण्याचा उपयोग असा कीं, इरसाल कट्टर असा म्हणजे सगळ्यात कमी राष्ट्रीय बुद्धीचा व हिंदूंशीं सर्वांत कमी मोहबत राखणारा असाच मुसलमान कोठेहि निवडून यावा. व ही सर्व घटना अशीच्या अशी मिळाल्याशिवाय मुसलमानांची इतर कोणत्याहि स्वराज्ययोजनेला संमति मिळणार नाहीं. व एकदां या मागण्या कोणत्याहि घटनेंत समाविष्ट झाल्या म्हणजे ती घटना वज्रलेपच झाली!

दिल्ली येथील परिषदेच्या ठरावांची फलश्रुति वर सांगितल्या प्रकारची आहे. आम्ही मागील एका अंकीं दर्शविल्याप्रमाणें मुसलमानांनीं इतर सर्वांचें म्हणणें म्हणून झाल्यावर, आपलें म्हणणें जाहीर केलें, व देशांतील आज स्थिति अशी आहे कीं, हें म्हणणें मोडून काढणें किंवा यत्किंचितहि बदलणें या विषयींचें सामर्थ्य डॉक्टर अन्सारी किंवा अबदुल कलाम अझाद यांच्यामध्यें तर नाहींच; पण बॅ. जिना यांच्यामध्येंहि राहिलेलें नाहीं. आम्हांला वाईट इतकेंच वाटतें कीं, पंडित नेहरूप्रभृतींच्या

लक्षांत ही गोष्ट फार पूर्वी यावयास पाहिजे होती पण ती आली नाहीं ! राष्ट्रीय ऐक्याचा शोध करतां करतां त्यांनीं आपल्या जिवाचे रान मात्र व्यर्थ केले.

खजिन्याचा मोजणी करण्याची रीत अशी आहे कीं, तपासनिसाने मूठभर रुपये उचलून बाजूला ठेवावे व बाकीच्यांची बेरीज किती आहे म्हणून विचारावें. पण त्या भरलेल्या मुठींत किती रुपये आहेत हे नक्की न कळल्यानें हिशेब देणारानें बाकीचा सर्व खजिना पुनः पुनः मोजला तरी त्याचें मन संशयग्रस्त राहतें. तोच दाखला येथें लागू आहे. मुसलमानांना आपल्या मुठींत जोपर्यंत सरकारने ठेवलें आहे तोपर्यंत नेहरूसारखे हिंदी लोकमताचे खजिनदार सर्व पक्की मोजदाद करून हिशेब देण्याला म्हणून तयार झाले तरी हिशेब जुळला कीं नाहीं ही शंका राहाणारच, आणि त्याच गोष्टीचा अनुभव दिल्ली परिषदेनें आला नेहरू व त्यांचे सहकारी मित्र या सर्वांचे श्रम यापुरते जवळ जवळ फुकट गेले व धर्म करतां कर्म उभें राहावें त्याप्रमाणें राष्ट्रीय ऐक्य संघटित करून तें सरकारच्या, विशेषतः बर्केनहेडसाहेबाच्या, तोंडावर मारण्याचा प्रयत्न करावयाला जातांना इकडे मुसलमानांच्या सवत्या सुभ्याची मागणी जमिनींत मेख मारून पक्की करावी त्याप्रमाणें दिल्ली परिषदेंत ती मुकर झाली, आतां ती निघून जाण्याकरितां राष्ट्राला फिरून एखाद्या महापर्वणीची वाट पाहात बसावे लागतें कीं काय पाहावे.

# अमेरिकेंतील लजपतराय यांचा जीवनक्रम

( लेखक—**ना. सु. हर्डीकर हुबळी.** )

### लेखांक ६ वा

### लालाजींची शिकवण

लालाजींना आपल्या हाताखालच्या लोकांकडून शक्य तितकं अधिक पण गोडीगुलाबीने काम करवून घेण्याची उत्तम हातोटी साधली होती. प्रत्येक काम योग्य वेळीं टापटिपीने व लवकर व्हावें, असें त्यांचें नेहमीं म्हणणे असे. त्यांचे स्वतःचे वर्तनहि त्यास अनुसरूनच होतें आणि इतरांसहि ते तसेंच वागावयास लावीत. जानेवारी सन १९१७ चा 'यंग इंडिया' मासिकाचा पहिला अंक निघावयाचा होता. त्या अंकाकरितां हिंदुस्थानविषयक कांहीं माहिती आकडे वगैरेसह मिळवून, त्यांनीं मला एक लेख लिहावयास सांगितलें. त्या वेळीं मी नुकताच त्यांच्या सहवासांत आलों होतों. त्यांचा व माझा परिचय १-२ महिन्यांचाच असेल नसेल. शिवाय आपल्या सहकाऱ्यांना वागविण्याच्या त्यांच्या पद्धतीचाहि मला फारसा परिचय नव्हता. यापूर्वी मी सातआठ वर्षे, वैद्यकी व आरोग्य याच विषयांचा अभ्यास केलेला होता. अर्थात् मला परिचित अशा वैद्यक व आरोग्य विषयाखेरीज लालाजींनीं सांगितलेल्या विषयावर लेख लिहिण्याचा मला सराव नसल्यामुळे अवचितपणे लालाजींच्या आज्ञेप्रमाणें लेखनकार्य हातीं घेणें व तें चांगल्या रीतीनें पूर्ण करणं मला अवघड वाटलें. त्यापूर्वी मी कधींहि वृत्तपत्रांतून लेख लिहिले नव्हते. लेख लिहिण्याचा हाच माझा पहिला प्रसंग होता, त्यामुळे मी कसाबसा आपल्या बुद्ध्यनुसार तो लेख लिहून काढला! पण तो वाचून लालाजींचें मुळींच समाधान झाले नाही! त्यांनीं त्या विषयाचा अभ्यास करण्यायोग्य अशा पुस्तकांची यादी दिली, त्यावरून पूर्ण अभ्यास करून पुनः लेख लिहिण्यास सांगितलें. त्यांनीं सांगितलेल्या पुस्तकांच्या वाचनाकरितां मला वारंवार ग्रंथसंग्रहालयाकडे धांव घ्यावी लागे. अशा प्रकारें मिळविलेल्या माहितीच्या आधारानें माझ्या मतें नीट मांडणी करून लिहिलेला लेखहि अनेकदां दुरुस्त करून ते प्रसिद्ध करीत. असे प्रसंग वारंवार येत असत.

अशा प्रकारच्या त्रासदायक कामाची मला संवय नव्हती, पण लालाजींनीं याच पद्धतीनें तीन वर्षेपर्यंत माझ्याकडून काम करवून घेतलें. कधीं कधीं अशा कामाचा मला कंटाळा येई व क्वचित्प्रसंगीं त्यांचा रागहि येई! हे माझे मनोविकार जाणून लालाजी माझ्या पाठीवरून पुत्रवात्सल्यानें हात फिरवून म्हणत 'बेटा रागावूं नकोस. मी सांगतों ते तुझ्या हिताकरितांच आहे हें तूं विसरूं नकोस. तूं आपल्या देशाची उत्कृष्ट प्रकारें सेवा बजावावी अशी माझी इच्छा आहे. तुला आज जरी अशा प्रकारच्या कामाचा त्रास वाटत असला तरी, परिणामीं माझ्या शिकवणुकीच्या पद्धतीबद्दल तुला आनंदच वाटेल. आणि तूं मला शेवटीं धन्यवादच देशील; त्यांचे वात्सल्य-

प्रेम मजवर इतकें होतें कीं, त्यांच्या या बोलण्यानें माझा राग नाहींसा होऊन, त्रासहि दूर झालासें वाटे आणि त्यांच्या सांगण्याप्रमाणे हरएक बाबतींत वागण्यास मी झटत असे. आजकाल मला त्यांच्या त्या वेळच्या बोलण्याची सत्यता पटत असून तसा अनुभव येऊं लागला आहे. आणि लालाजींना त्यांच्या त्या शिकवणुकीबद्दल खरोखरच मी धन्यवाद देत आहे. अशा थोर राष्ट्रीय विभूतींच्या सन्निध राहून, अनुभवसिद्ध असें दिव्य शिक्षण मिळविण्याची सुसंधि मला लाभल्याबद्दल मी स्वतःस कां भाग्यवान समजूं नये ?

## लेखन–वाचनाची पद्धत

हिंदुस्थानाच्या अत्यंत प्राचीन काळापासून, आजतागायतचा इतिहासाचा लालाजींचा अभ्यास खरोखर आश्चर्यकारक होता. आपल्या नेतृत्वाखालीं काम करणारांनाहि,हिंदुस्थानाची खडान खडा माहिती असावी अशीच त्यांची इच्छा होती. ते आम्हाला शक्य तितक्या ग्रंथांचें मार्मिक अध्ययन करून, महत्त्वाच्या विषयांवर आपणाशीं चर्चा करावयास आग्रह करीत. तसेंच वाचलेल्या कोणत्याहि पुस्तकांतील व ग्रंथांतील महत्वाचा भाग आपल्या व आपल्या सहकाऱ्यांच्या उपयोगाकरितां टिपून किंवा खुणा करून ठेवीत.नेहमीं अशा प्रकारची टांचणं प्रचारकार्याच्या कामीं फारच उपयुक्त असतात असें सांगून मला ते अशीं टिपणें व टाचणें अगदीं लक्षपूर्वक वाचून ध्यानांत ठेवण्यास व प्रसंगीं मुखोद्गत करण्यासहि सांगत. या बाबतींत लालाजी कै. नामदार गोखल्यांचें नांव वारंवार घेत आणि त्या विषयापुरतें तरी, अर्थात् लेखनवाचनासंबंधीं तरी, त्यांचें उदाहरण सतत डोळ्यापुढे ठेवण्यायोग्य आहे असें ते म्हणत असत.

प्रचारकार्याकरितां किंवा अशाच कोणत्याहि कामगिरीवर जाण्याचा प्रसंग मजवर आला असतां त्या कामासंबंधींच्या माहितीचीं टांचणें करून बरोबर घेतल्याशिवाय मला ते त्या कामावर जाऊं देत नसत ! कधीं कधीं मोठ्या समाजापुढें व्याख्यानें देण्याचे मला प्रसंग येत, त्या वेळीं ते मोठ्या काळजीपूर्वक व स्वतः त्रास सोसूनहि, अशा व्याख्यानास जरूर ती माहिती मला मिळवून देत आणि मुख्य मुख्य अशा मुद्द्यांवर विस्तारानें लिहून घेण्यास सांगत किंवा स्वतः टिपणेंहि लिहून देत. अशा प्रकारें त्यांजकडून मला वक्तृत्व व लेखनशैलीचें ज्ञान लाभलें. आजच्या परिस्थितींत हे दोन गुण जर माझ्यांत थोड्याफार अंशांनीं दिसून येत असतील तर तें लालाजींच्या शिकवणुकीचेंच फळ होय असें म्हणण्यास कांहींहि हरकत दिसत नाहीं.

सन १९०५ सालीं उद्भवलेल्या स्वदेशी-बहिष्काराच्या चळवळींत मी आपल्या गांवीं असतांना माझ्या वयोमानाप्रमाणें, आपल्या गांवा व आसपासच्या भागांत, थोडें–थोडकें प्रचारकार्य करीत असे,आणि सन १९०९ ते १३ पर्यंत कलकत्त्यास वैद्यकीचा अभ्यास करीत असतांना सुद्धां, तेथील बऱ्याचशा चळवळींत भाग घेऊन, मी काम करीत असे तरीहि मला देशाची, देशाच्या स्थितिगतीची व देशाकरिता काम करण्याच्या पद्धतीची विशेष माहिती नव्हती. परंतु लालाजींच्या हाताखालीं राहून, काम करावयास सुरवात केली तेव्हां मला माझ्या अज्ञानाचें ज्ञान होऊं लागलें! आणि आपणास आपल्या शिक्षणसंस्थांमधून मिळणाऱ्या तुटपुंज्या व एकांगी शिक्षणापासून होणाऱ्या तोट्याचा अनुभव येऊं लागला. आणि तसेंच लालाजींच्या प्रेमळ शिकवणुकीमुळें आपल्या देशांतील पुढाऱ्यांनीं जर आपल्या हाताखालच्या कार्यकर्त्यांना असें शिक्षण देण्याचें मनावर घेतलें तर उत्साही व योग्य असे कर्ते पुरुष निर्माण होण्यास विलंब लागणार नाहीं असेंहि वाटूं लागलें !

## गृहशिक्षण

घरांतील कामासंबंधीं देखील लालाजी अत्यंत दक्ष असत आणि मजकडून वेळचे वेळीं कामे करवून घेत व स्वतःहि हातभार लावीत. घरच्या एकाहि खोलींत काडीइतकाहि केर राहूं नये व सर्व वस्तू–अर्थात् पुस्तकें, कागदपत्र, कपडेलत्ते, गाद्यागिरद्या, स्वयंपाकाची भांडी वगैरे–स्वच्छ व जागच्या जागीं असाव्या याबद्दल त्यांचा कटाक्ष असे. याविरुद्ध एखादी गोष्ट घडली तर त्यांना फार राग येई व त्या भरांत ते ' चालता हो, मूर्खा ! इतक्या वेळां तुला सांगूनहि तुझा पुनः निष्काळजीपणाच! हें काम अशींच करावयाचीं नाहीं काय? कोठें आहे तें पुस्तक?' त्यावर मी उत्तर देई "पण लालाजी, मीं तें मुद्दाम केलें नाहीं. मी अद्याप लहान व अज्ञान आहे हें तुम्ही जाणतांच, मला विस्मरण होतें.जेवावयाला उशीर होत आहे. तें पुस्तक राहूं दे, जेवणानंतर मी तें शोधून काढतों. आतां आपण त्रास करून घेऊं नका" अशा प्रकारच्या माझ्या नरमाईच्या भाषणानें त्यांचें समाधान होई. नंतर ते विनोदी स्वरानें मला म्हणत 'मी तुला पुरा ओळखतों, तूं पक्का महाराष्ट्रीय आहेस! असो. पुनः असें करूं नकोस. चल जेवावयास जाऊं.' लालाजींना जितक्या लवकर राग येत असे तितक्याच लवकर तो नाहींसाहि होत असे. त्यांना शत्रूविषयीं देखील कधींच द्वेष माहीत नव्हता, मग मित्रांविषयीं कसा द्वेष किंवा हेवा वाटेल? आणि मला स्वतःला असें वाटतें कीं, ह्या त्यांच्या निर्दोष स्वभावामुळेंच त्यांना इंग्लंड व अमेरिका येथें अनेक स्नेह्यांची जोड मिळाली असावी.

# सक्करच्या कमानदार धरणाचें प्रचंड बांधकाम

सक्कर येथील धरणाचें काम फार अजस्र आहे. एवढे मोठें काम हिंदुस्थानांत हें पाहिलेंच. फार काय पण जगांतहि या धर्तीचें काम दुसरें नाहीं अशी त्याविषयीं सरकारी अधिकारी प्रथमपासून बढाई मारीत आले आहेत. हिंदुस्थानांत इंग्रजी राज्यापूर्वी व इंग्रजी राज्यांतहि थोडेथोडके कालवे बांधून झाले आहेत असें नाहीं. आणि खुद्द महाराष्ट्रांत तर मुंबई इलाख्यांतील इतर कोणत्याहि भागापेक्षां कालव्यांची संख्या अधिक आहे. सिंधु नदी हिंदुस्थानांतील सर्व नद्यांत मोठी. हिंदुस्थान या नांवाची उत्पत्ति याच नदीपासून. सिंधवरूनच हिंदु व हिंदुस्थान हे शब्द बनले. आणि हिंदुस्थानास इंग्रज लोक इंडिया म्हणत असले तरी त्या इंडिया शब्दाचा उगमहि इंडस या शब्दांतच सांपडतो. सारांश, हिंदु लोक तिला सिंधु संबोधोत किंवा इंग्रज लोक तिला इंडस हा प्रतिशब्द लावोत, त्या दोनहि अभिधानांवरून हिंदुस्थान व इंडिया हे पर्यायवाचक शब्द जन्मास आले आहेत इतकें लक्षांत ठेवल्यास सिंधु नदीचें अद्वितीयत्व कोणासहि कबूल करावें लागणार आहे.

सिंधु नदी ही याचें काय पण सर्वच दृष्टींनीं हिंदुस्थानांत अद्वितीय आहे. साऱ्या नद्यांत मोठी म्हणून तिला नदाचा मान देण्यांत येतोच. पण त्याहिखेरीज हिंदुस्थानाची पश्चिमेकडील सरहद्द कित्येक शतकें होऊन राहण्याचा मानहि तिनें मिळविला आहे. बोलन व खैबर या दोन घाटांचीं कपाटें उघडून शत्रूंच्या टोळधाडी हिंदुस्थानावर आदळण्याकरितां निघाल्या तरी त्यांपैकीं कैक टोळधाडींस अडवून धरण्याचें महत्कार्य सिंधु नदानेंच साधलें आहे. या गोष्टीची साक्ष आजहि सक्कर येथें पटते. सक्करपाशीं सिंधु नदींत दोनतीन बेटें असून त्यांपैकीं बक्कर बेटावर शिकंदर बादशहानें किल्ला बांधलेला दाखविण्यांत येतो. या बेटांत येऊन शिकंदरानें स्वसंरक्षणार्थ किल्ला उभारला; परंतु त्यास नदी ओलांडून अलीकडे येणें दुर्घट झाल्यामुळें तो सदर किल्ल्यांत थोडे दिवस राहून परत ग्रीस देशास निघून गेला अशी दंतकथा सांगतात. सिंधूचा दुसरा अद्वितीयपणा हा की, तिचें पात्र बहुतेक ठिकाणीं एक मैलापेक्षां कमी रुंदीचें नाहीं. एक मैल रुंदीपर्यंत ही नदी एरवीं भरलेली असून ज्या दिवसांत तिला महापूर येतो त्या दिवसांत तिचें पाणी पात्राबाहेर उचंबळून बाहेर वाहूं लागतें व तिचे अनेक हात कित्येक मैलांपर्यंत आसपासच्या मुलखांतून पसरतात.

## सिंधूचा पूर

नदीचा पूर म्हटला की, तो पावसाळ्यांत यावयाचा अशी आपल्याकडे सर्वसाधारण समजूत आहे. पण ती समजूत सिंधूच्या बाबतींत बदलावी लागते. सिंधूला पूर किंवा महापूर पावसामुळें कधींच येत नाहीं. ज्या दिवसांत पाऊस नसतो त्या दिवसांत सिंधूला महापूर येतो व ज्या महिन्यांत महाराष्ट्रांतल्या नद्या कोरड्या पडूं लागतात त्या महिन्यांत सिंधु पाण्यानें तुडुंब भरते. मे व जून हे सिंधूच्या भरतीचे महिने. त्यांत हिमालय पर्वतावरील बर्फाचे पर्वत वितळून सिंधूंत उतरतात व सिंधूचें पाणी तिच्या पात्रांत मावेनासें होतें. सिंधूचा तिसरा विशेष असा कीं, सिंध प्रांतांत सिंधु ही नदी आहे, सिंधु हा समुद्र आहे व सिंधु हा पर्जन्यहि आहे. सिंध प्रांतांत पाऊस बहुतेक पडत नाहीं व पडला तरी कोठें दोन इंच तर कोठें चार इंचयापेक्षां त्याची पडण्याची अधिक लहर सहसा लागत नाहीं. याकारणानें सिंधी लोकांना सिंधु नदीवरच सर्वस्वी अवलंबून राहावें लागतें. ती नदीचें कार्य करते म्हणून महानदीप्रमाणें पूज्य वाटते, ती सागरासारखी विशाल असते म्हणून सागराचा भास उत्पन्न करते व ती फुगून कांठावरून भोंवतालच्या प्रदेशांत उतरली तरच त्या पाण्यानें पेरण्या होऊन पिकें येतात, म्हणून ती पर्जन्याप्रमाणें सर्व जीवसृष्टीस प्रिय व आल्हाददजनक होते. सिंधूंत अशा प्रकारचे अनन्यसाधारण गुण उद्भवल्यामुळें ती कित्येक दोषांची धनीणहि होऊन बसली आहे. तिच्याभोंवतालची जमीन सामान्य जमिनीसारखी नाहीं. त्या जमिनींत वाळू व रेती यांचें विलक्षण मिश्रण झालें आहे. वाळू अत्यंत बारीक असून ती सिंधूच्या पाण्याबरोबर वाहून आलेली नसावी. या रेतीमुळें व मातीमुळें सिंधी लोकांचें जीवित बरेंच कष्टमय झालें आहे.

मुंबईहून खुष्कीच्या मार्गानें सिंधांत जात असतां मेहसाणा स्टेशनाच्या सुमारास गुजराथ प्रांत संपतो. त्याच्यापलीकडे राजपुताना, मारवाड व सिंध हे प्रदेश अनुक्रमानें लागतात. राजपुताना व मारवाड हे प्रांत अगदीं रेताड आहेत. त्यांतील वाळूची रखरखीत मैदानें पाहिलीं कीं त्या ठिकाणीं एक वेळ समुद्र पसरला असावा हा भूस्तरशास्त्रवेत्त्यांचा तर्क खरा वाटतो. त्यांत माणूस, पशुपक्षी व झाडझुडूप क्वचित् दृष्टीस पडतें. कोसन् कोस प्रवास करावा व सपाट मैदानावर निदान टेकडी आढळली म्हणून समाधान मानावें तों ती टेकडी

नसून उंट आहे व त्यावर देऊळ बांधलेलें नसून माणूस बसलेला आहे असें दिसून प्रवासी विस्मित होतो. राजपुतान्यांत व मारवाडांत रेती आहे तशीच सिंधांतहि रेती आहे. पण सिंधच्या रेतींत मातीहि (सिल्ट) मिश्रित झाली असल्याने सिंध प्रांत मारवाड व राजपुताना यापेक्षां फारच सुपीक आहे. सिंध प्रांतांत माती असण्याचें कारण सिंधु नदीच होय. सिंधु नदी आपल्या पाण्यांतून खंडोगणती बारीक माती वाहून आणते व तिचे थर किनाऱ्यावरील मुलखांत सोडून देते. सिंधूचा ओघ आज ज्या जागेवरून वाहात आहे त्याच जागेवरून अनादि कालापासून तो वाहात आलेला आहे असें नाहीं. तिचा ओघ शतक दोन शतकांनीं वळतो. त्याखाली शहरेंच्या शहरें गडप होतात व मातीचे थर त्या त्या भागावर पसरून नवीन नवीन प्रदेश सुपीक होत होत सांप्रतचा सिंध प्रांत सुपीक बनला आहे. सिंधूच्या उदरात एक वेळ गडप झालेलें मोहनजोडेरो जवळील जुनें शहर अलीकडे उकरून निघालें असल्याच वाचकास माहीत आहेच. आजहि सिंधूची अशी प्रसिद्धी आहे की दरसालच्या पुरांत दहापांच गांवांचे बळी घेतल्यावांचून ती राहात नाही.

सिंधूनें सिंध प्रांतास अशा रीतीने सुपीकपणा मिळवून दिला असला तरी त्यांत पीक उगवणें हेंहि अखेर तिच्या कृपेवरच अवलंबून राहाते. कारण सिंधचा शेतकरी पाण्याकरितां आकाशाकडे डोळे न लावतां सिंधूच्या पात्राकडेच पाहात बसतो. त्यास पाऊस पडेलना अशी उत्कंठा न बाळगतां पाऊस पडेल कीं काय अशी धास्तीच बाळगणे भाग पडते त्यास पाऊस न पडलेलाच बरा. कारण तो नेहमीं दोनतीन इंचच पडतो, म्हणून पडून न पडून सारखाच. त्यापेक्षा जास्ती पडेल तर त्यापासून त्यास अधिक अन्न मिळण्याचा संभव नाहींच, पण त्यायोगानें त्याचे आहे हेंहि घर विरघळून जाऊन तो वस्त्रपात्राला मात्र महाग होऊन बसेल. सिंधूस मे—जून महिन्याच्या सुमारास हिमालयावरील बर्फ वितळल्याने पूर येऊन पुराचें पाणी पात्राबाहेर पडते व ते शेतांत शिरून पेरणीचा हंगाम साधून देते. हे पाणी शेतांना व्यवस्थितपणें मिळावे यासाठीं पुरातन कालापासून कालवे खणून ठेवण्यांत आले असून त्यांतून पाणी वाहात जाऊन त्याखालीं लाखों एकर जमीन भिजते. अशा प्रकारचे कालवे साऱ्या सिंध प्रांतभर आहेत. सक्करजवळचे बेगारी, पूर्वनारा, थर आणि पारकर भागांतील थर वाह किंवा हैद्राबादेजवळील फुलेली इत्यादि कालवे जुने होत. या कालव्यांतील पाणी शेंकडो मैलांपर्यंत पसरून त्याखालीं सुमारें वीस लक्ष एकर जमीन सांप्रत भिजत आहे.

## जुने कालवे

परंतु जुन्या कालव्यांत दोष असा आहे कीं त्यास पाणी हुकमी मिळेलच अशी खात्री नाहीं. सिंधूस जो पूर येतो तो किती प्रमाणांत येईल याचा भरंवसा कोणास देववत नाही. पूर कमी आला तर जमिनीस पाणी कमी मिळेल व त्यावर पीकहि यावें तसें येणार नाहीं. पूर चांगला आला तर पाण्याचा पुरवठा ठीक होईल खरा. तरी पण पिकाच्या पेरणीपासून तो तहत ते निघेपर्यंत पिकास जीं पाणी द्यावीं लागतात तितकीं मिळतील अशी खात्री कोणास नसते. कालव्यांत पाणी कमी पडल्यास ते कालव्याच्या कडेला बुडक्या खणून त्यांतून रहाटगाडग्यानें शेतांपर्यंत चढवावे लागतें. बरे, इतकेंहि करून सर्व ठिकाणच्या जमिनीला पाणी मिळतेंच असे नाही. ज्या जमिनी उंचावर आहेत त्यांजपर्यंत पाणी मुळींच न चढल्यामुळे त्या पिकाऊ असतांहि पडिक टाकणें जमीनदारांस भाग पडलें आहे. सध्याच्या पद्धतीनें जमीनदाराच्या पदरीं असलेल्या जमिनींपैकीं फक्त एक—तृतीयांश जमिनींसच पाणी मिळते व तेंहि जेमतेमच. पण यापेक्षां अधिक जमिनीसहि हुकमी पाणी मिळालें तर तें कोणास नको आहे?

## बंधाऱ्याची कल्पना

ब्रिटिश सरकारनें सिंधच्या अमीराजवळून सिंध प्रांत जिंकून घेतल्यापासून बड्या अधिकाऱ्यांचें लक्ष या प्रश्नाकडे सारखें वेधून राहिलें आहे. सिंध प्रांतांत जमीन विपुल असतां तिचा भरपूर फायदा शेतकऱ्यास होत नाहींच. पण जमीनमहसुलाच्या रूपाने सरकारास हवे तितकें उत्पन्न येत नाहीं याचा विषाद इंग्रज अधिकाऱ्यांस वाटत आहे. सिंधूचे पाणी, सिंधचा मुलूख, इंग्रजांचे सामर्थ्य व हिंदुस्थानाचा पैसा या चतुर्विध साधनांची भेट झाल्यानंतर त्यांचा उपयोग करून घेण्याची बुद्धि इंग्रजांस सुचल्यावांचून कशी राहील? या प्रश्नाचा विचार करण्याकरितां सरकारानें तज्ज्ञांची एक कमिटी नेमली व अखेर एक योजना तयार होऊन तिला १९२३ साली भारतमंत्र्यांची मंजुरीहि मिळाली. सिंधु नदीस पंजाबांत पांच नद्या मिळाल्या आहेत. त्यांपैकीं सतलज नदीस बंधारा घालण्यास भारतमंत्र्यांनीं १९२१ मध्येंच मंजुरी दिली असून ते काम आतां पुरे झाल्यासारखेंच आहे. त्या कामास ६ कोटि २० लक्ष रुपयांपर्यंत खर्च येईल. पण सतलजपेक्षां सिंधु नदी फारच मोठी, त्याअर्थी तिला घालावयाच्या बंधाऱ्याचा खर्चहि फार मोठा असणार हें उघड आहे.

सिंधूच्या या बंधाऱ्याकरितां १८ कोटि रुपयांपर्यंत खर्च करण्याचा सरकारचा संकल्प आहे.

सिंध प्रांताचे वरचा सिंध, मधला सिंध व खालचा सिंध असे स्वाभाविक विभाग पडतात. वरच्या सिंधांत सक्कर, रोहरी, लारखाना, शिकारपूर हा प्रदेश मोडतो, मधल्या सिंधांत मिरपूरखास व कोट्री हीं येतात व खालच्या सिंधांत हैद्राबाद व कराची हीं मोडतात. सिंधचे हे विभाग सिंधु नदीच्या उत्तरेकडून दक्षिणेकडे वाहणाऱ्या ओघास अनुलक्षून पडले आहेत ही गोष्ट कोणाच्याहि सहज लक्षांत येणार आहे. या तीन विभागांपैकीं ज्यांत बंधारा घातल्यानें जास्तीत जास्ती मुलुखाला पाणी मिळेल असा विभाग म्हटला म्हणजे वरचा सिंध हाच. कारण तेथें दाबून धरलेलें पाणीच वरपासून खालपर्यंत-च्या प्रदेशाला पोंचूं शकेल. याच दृष्टीनें सक्कर शहरापाशीं बंधारा घालण्याचें ठरविण्यांत आलें. सक्कर हें शहर आरबी समुद्रापासून म्हणजे सिंधु नदीच्या मुखापासून वर सुमारें अडीचशें–तीनशें मैलांवर आहे. सिंधूच्या एका काठावर सक्कर व दुसऱ्या कांठावर रोहरी असून मध्यभागीं सिंधूचें ५६०० फूट रुंदीचें पात्र पसरलें आहे. बंधाऱ्याची ही जागा निश्चित झाल्यानंतर बंधारा कोणत्या प्रकारचा घालावयाचा हा पुढचा प्रश्न. महाराष्ट्रांत निरा, गोदावरी, प्रवरा, कृष्णा, इत्यादि नद्यांना बंधारे आहेत. पण त्या बंधाऱ्याचें कार्य एक प्रकारचें व सक्करजवळील सिंधूच्या बंधाऱ्याचें कार्य दुसऱ्या प्रकारचें. महाराष्ट्रांतील नद्यांना पावसाळ्याखेरीज बाकीच्या ऋतूंत पाणी फारच थोडें असतें. या कारणानें धरणांत करावयाचा पुरवठा पावसाळ्यांत पुरानें वाहून येणाऱ्या पाण्याचाच करावा लागतो. म्हणजे पावसाळ्यांतील थोड्या दिवसांत नद्यांत भरणारें पाणीच काय तें आमच्या धरणांत सांचवावयाचें असून तें सांठवलेलें पाणी कालव्यांना व पाटांना वर्षभर पुरवावयाचें असतें. हें कार्य लांब, रुंद व उंच अशा भिंतीचा बंधारा करूं शकतो. पण सिंधु नदीपाशीं पाणी-पुरवठ्याचा प्रश्न या स्वरूपाचा नाहीं. महाराष्ट्रांतल्या नद्यांप्रमाणें सिंधु नदी अडवावयाची म्हटली तर तो एक मोठा समुद्र निर्माण होऊन त्यापुढें कसलाहि बंधारा वाळूच्या राशीप्रमाणें ढासळून पडेल व सिंध प्रांतावर जलप्रलय ओढवेल. अशा स्थितींत सिंधूच्या बंधाऱ्याचें कार्य एवढेंच कीं, जे नवीन कालवे नदीच्या दोनहि काठांवरून खणण्यांत येतील त्यांना जरूर तेवढें पाणी पुरवावयाचें. हीच गोष्ट अधिक सोपी करून सांगावयाची झाल्यास मे–जून महिन्यांतील पुरांत सिंधूच्या पाण्याची जी उंची किंवा खोली असते तितकी अंदाजी उंची किंवा खोली बारा महिने राखावयाची. याकरितां मामुली बंधारा न घालतां कमानदार बंधारा घालणेंच श्रेयस्कर. अशा प्रकारच्या सासष्ट कमानी सिंधूच्या पात्रांत बांधण्यांत यावयाच्या असून त्यांपैकीं उजव्या बाजूच्या पांच व डाव्या बाजूच्या अकरा कमानी आतांपर्यंत पुऱ्या होत आल्या आहेत.

## सासष्ट कमानी

बंधाऱ्याचें काम पुरें झालें म्हणजे त्यांत एकंदर सासष्ट कमानी बसतील व त्या सासष्ट कमानींत सासष्ट लोखंडी दरवाजे उभे करण्यांत येतील. या कामास सुरुवात पांच वर्षांपूर्वीं झाली आणि तें पूर्ण होण्यास आणखी चार वर्षें सहज लागतील. पांच वर्षांच्या मानानें उरकलेलें बांधकाम फारच थोडें दिसतें. परंतु प्रत्यक्ष बांधकामापेक्षां साहित्याची जुळवा-जुळव व तयारी करण्यांतच बराच काल व श्रम खर्ची पडतात. आचाऱ्याच्या पाठीशीं स्वयंपाकाचें साहित्य जमलें असलें व त्याच्यासमोर चुली पेटल्या असल्या म्हणजे चुलीवर चढलेलीं भांडीं कमी दिसलीं तरी सर्व जिन्नस शिजून तयार होण्या-पूर्वीच पानें मांडण्यास हरकत नाहीं म्हणून पंक्तीच्या व्यवस्थापकास तो आश्वासन देत असतो. सक्करच्या धरणाचाही प्रकार त्यांतलाच आहे. तेंहि आतां लवकरच पुरें होणार असा भरंवसा त्यावरील अधिकाऱ्यांस आला आहे. गेल्या पांच वर्षांत बंधकामाची तयारी पुष्कळच झाली. सक्कर शहराची वस्ती सुमारें वीस हजार भरेल. त्या शहरापासून बंधाऱ्याची जागा सिंधु नदीच्या खालच्या बाजूस दीड मैलावर आहे. या दीड मैलांत बराज टाऊन नांवाचा नवा कसबा वसविण्यांत आला आहे. याची वस्ती दहा हजारापर्यंत असून त्याजकरितां बांधलेलीं घरें व कचेऱ्या नव्याच आहेत. ही सर्व वस्ती बंधाऱ्यावरील कामाशीं ज्यांचा संबंध पोंचतो असे युरोपिअन व हिंदी अधिकारी, कारकून नोकरचाकर व मजूर यांची आहे. सक्कर हें नॉर्थ-वेस्टर्न रेलवेवरील एक स्टेशन आहे. त्या स्टेशना-वरूनच नॉर्थ-वेस्टर्न रेलवेचा एक फांटा क्वेटा व चमन या बलुचिस्थानांतील शहरांकडे जातो व दुसरा फांटा उत्तरेस लाहोर व पेशावर या पंजाबांतील शहरां-कडे वळतो. केवळ बराज टाऊनकडे येणारा असा एक तिसरा फाटा सक्कर स्टेशनापासून काढण्यांत आला असून त्याचें नांव लॉईड बराज रेलवे असें आहे. लॉईड या नांवावरून मुंबईचे माजी पराक्रमी गव्हर्नर सर जॉर्ज लॉईड यांचेंच कोणासहि स्मरण होईल व त्यांच्या खटपटीनें बराजची म्हणजे कमानदार बंधाऱ्याची

योजना मंजूर झाल्यामुळें त्यांच्या स्मरणार्थ बराज रेलवेस व बंधाऱ्यासहि त्यांचें नांव जोडलें गेलें आहे. ह्या आगगाडीचा मुख्य रस्ता दोनअडीच मैलच असला तरी त्याचे लहान लहान फांटे कामाच्या सर्व ठिकाणांपर्यंत खेळवण्यांत आले आहेत. त्यामुळें एके ठिकाणचा माल दुसऱ्या ठिकाणीं पोंचविणें व सगळा माल अखेर बराजवर आणणें हीं कामें रेलवेमार्फतच वाघिणींतून होत असतात.

## वेगवेगळे कारखाने

बंधाऱ्याच्या मुख्य कामास पूरक असे वेगवेगळे कारखाने बंधाऱ्यांच्या आसमंतात् ५०।६० मैलांपर्यंत पसरले आहेत. बंधाऱ्याच्या म्हणजे सिंधु नदीच्या उजव्या कांठावर सक्कर शहर आहे व डाव्या किनाऱ्यावर रोहरी गांव आहे. या दोनही गांवांच्या आजूबाजूस हे कारखाने उभारलेले आहेत. बरीचशीं कामें विद्युच्छक्तीवर चालावयाचीं असल्यानें वीज उत्पन्न करण्याचा कारखाना बराज टाऊन-पाशींच उभारण्यांत आला आहे. सदर शक्तिगृहांत (पॉवरहौस) सहा इंजिनें असून प्रत्येकांतून ६६०० व्होल्टसइतकी शक्ति निर्माण होते. याचा उपयोग वर्कशॉप चालविणे, उजेड देणे व चुना तयार करणे इत्यादि कार्यांकडे होतो. वर्कशॉपमध्यें कारखान्यास लागणाऱ्या लोखंडी जिनसा बनविण्यांत येतात. बंधाऱ्यास आवश्यक असें मुख्य साहित्य म्हटलें तर चुना, खडी, चिपा, तोडीं, कॉंक्रीटच्या प्रचंड विटा व मोठमोठ्या फरशा हें होय. माणसें व जनावरें यांच्या साह्या-वांचून शक्य तितकें काम उरकण्याचा सरकारचा उद्देश असल्यामुळे मनुष्याची मदत थोडीशी घेऊन यंत्रेंच चुना बनवितात. एका यंत्रांत कच्चा चुना व माती हीं एकत्र दळून त्यांचे मिश्रण होते. त्यानंतर हें मिश्रण भट्टींतून भाजून निघते. तें भाजल्यावर त्यांत वाळू मिसळून फिरून तें दळण्यात येते. अशा रीतीनें तें दळून झालें कीं त्याचा पक्का चुना बनतो. याच चुन्यांत खडी व वाळू मिसळल्यानें कांक्रीट अस्तित्वांत येतें व ते मोठमोठ्या विटाळ्यांत ओतून वाळू दिलें की त्याच्या हव्या त्या आकाराच्या विटा बनतात. यांत मुख्य लक्षांत ठेवण्याची गोष्ट अशी कीं, कच्च्या चुन्यापासून त्यास विटांचे रूप प्राप्त होईपर्यंत व त्या विटा बंधाऱ्यावर जाऊन आपल्या खोबणींत बसेपर्यंत ज्या क्रिया चालतात त्यांत मनुष्याचा हस्तस्पर्श त्यास केव्हांहि व कोठेहि होत नाहीं.

परमेश्वरानें जडसृष्टि व प्राणिसृष्टि निर्माण केली व त्या प्राणिसृष्टींतील मनुष्यानें स्वतःची जडसृष्टि व प्राणिसृष्टीहि जन्मास आणण्याची हिंमत बांधली आहे व त्याप्रमाणें त्यानें कृतीहि करून दाखविली आहे. तो वरीलप्रमाणें मातीच्या विटा ऊर्फ दगड बनवितो तसा दगडासहि लीलेनें मातीला मिळवितो. एके ठिकाणीं दगड दळण्याचें यंत्रच उभें केलें आहे. धान्य दळण्याच्या यंत्राला जसें धान्याचा घांस घालण्याकरितां एक नसराळें बसविलें असतें तसेंच नसराळें याहि यंत्रावर बसावलें असून त्यांत डोंगरावरचे दगड लोटण्यांत येतात व ते भरडून निघून त्याचें चूर्ण एका हौदांत व खडी दुसऱ्या हौदांत पडते आणि त्यांची रवानगी आगगाडीनें कामावर होते.

सिंधांत मोठे डोंगर मुळींच नाहींत. आहेत त्या टेकड्या आहेत व त्याहि फार थोड्या आहेत. टेकड्यातून दगडांच्या खाणी क्वचित् सांपडतात. पण हे दगड परमेश्वरानें आपल्या कारखान्यांत माती व रेती यांच्या एकत्र दाबांतूनच काढले असल्यामुळे ते पांढरे व फारच ढिसूळ असतात. अशा प्रकारची एक खाण बंधाऱ्यापासून कांहीं अंतरावर लागली आहे. त्या खाणींतून हवा तितका लांब व रुंद दगड निघतो ही सोय आहे. पण त्याला दोन-अडीच फुटांवर पदर असल्यामुळे दोन अडीच–फुटांहून त्याची जाडी अधिक नसते ही गैरसोय आहे. सोयीचा फायदा मात्र भरपूर घेतलेला आहे करवतीनें आरकसदारांनीं सागवानी सोटांच्या फळ्या पाडाव्या त्याप्रमाणें या दगडांच्या किंबहुना शिळांच्या फळ्या यंत्रसाहाय्यानें फिरणारे करवत व पहारा पाडतात. सर्वांत मोठी पहार जमिनीच्या पोटांत पांच फुटांपर्यंत शिरते व तीस फूट अंतरा-पर्यंत मागेपुढें सरकते. त्यामुळे पांच फूट रुंद व तीस फूट लांब इतकी शिळेची फळी प्रथम पडते. या मोठ्या फळीच्या लहान फळ्या व त्या लहान फळ्यांच्या त्याहून लहान फळ्या पाडण्याचें काम इतर यंत्रें करतात. लहान फळ्या पहारेने शेजारीं शेजारीं भोकें पाडून होतात. हीं भोकें पहारा हवेच्या दाबानें (न्यूमॅटिक प्रेशरनें) फिरून पाडतात. अशा रीतीनें तीनहि बाजूंनीं फळी तयार झाल्यावर तिची खालची बाजू मोकळी करावयाची उरते. ते काम मजूर भोक खालून पहारा मारून पार पाडतात.

शिळांच्या फळ्या या उपायानें निर्माण झाल्या खऱ्या, पण त्या जरूर त्या सांचाच्या व नीटनेटक्या बनविण्याचें कार्य शिल्लक राहतेंच. त्या साफसफाईसाठीं त्यांस यारीनें (क्रेन) उचलून वाघिणींत बसाविण्यांत येतें व पुनः यारीनेंच हलवून कांहीं अंतरावरील ड्रेसिंग शॉपमधील यंत्रापुढें हजर ठेवण्यांत येतें. तीं यंत्रें फरशांना पुनः करवततात, रंधतात, त्याचे कंगोरे साफ करतात व यारीच्या (क्रेनच्या) ताब्यात देऊन परस्पर वाघिणींत नेऊन बसवितात. ही सर्वे

क्रियाहि मनुष्याचा हस्तस्पर्श न होतां शेवटास जाते हें सांगून ठेवणें जरूर आहे.

## कमानींची रचना

चुना, खडी, चिपा, विटा व शिळा यांची सिद्धता अशी झाली. त्याखेरीज पुढची इतर कामें व्हावयाचीं राहिलीं. या कामांपैकीं पहिलें काम ज्या ठिकाणीं बंधाऱ्याच्या कमानी बांधल्या होत आहेत त्या ठिकाणचें सिंधूंतील पाणी आटवणें हें होय. सिंधूच्या पात्रांत कमानींच्या पायास कितीहि आंत खणलें तरी खालून खडकाचा आधार मिळण्याची आशा नाहीं. यासाठीं कमानींचा पाया वाळूंत पंचवीस-तीस फूट खोल घेतला तरी तो वाळूच्या आधारावरच उभा राहाणार हे उघड आहे. वाळूचा असला आधार निराधारच असल्यामुळें कमानींना बळकटी येण्याकरितां कमानींच्याभोंवतालीं दोन-अडीचशें फुटांच्या घेऱ्यांत फरशी बांधणें आवश्यक आहे. ही फरशी कमानीपासून दोनहि बाजूस उतरती ठेवल्यानें कमानींतून जावयाच्या सिंधूच्या प्रचंड पाण्याचा सगळा आघात कमानींवर अगर कमानींच्या मस्तकावर न होतां फरशीवर वांटला जाईल. पण फरशी काय किंवा कमानी काय, यांचें बांधकाम पाण्यातच सुरू व्हावयाचें असल्यामुळें तें पाणी प्रथम आटविणें ही प्रारंभाची क्रिया होय. ती घडवून आणण्यासाठीं कॉफर डॅम नावाचा कांहींसा दीर्घ-वर्तुळाकार असा लोखंडी उभ्या तुळयांचा कोट कमानींच्या जागेभोंवतीं घालण्यांत आला आहे.

## कॉफर डॅम ऊर्फ लोखंडी कोट

या तुळया वाळूंत तीस तीस फूट रोवल्या असून त्यामुळें नदीचें पृष्ठभागावरील पाणी आंत येण्यास प्रतिबंध झाला आहे. बाहेरचें पाणी अशा रीतीनें येण्याचें बंद पडल्यावर आंतलें पाणी उपसून बाहेर टाकण्याकरितां पंप लावले आहेत. सांप्रत या एका वर्तुळांत पांच पंप पाणी उपसण्याचें काम करीत आहेत. पात्रांतील वरचें पाणी उपसलें तरी तळांतून पाणी वर येतेंच. त्यास अडविण्याकरितां पुनः तीस तीस फुटांपर्यंत लोखंडी तुळया (गर्डर्स) वाळूंत वर्तुळाकार रोवण्यांत आल्या आहेत. कॉफर डॅममधील मोठ्या वर्तुळाच्या पोटांतलें हें दुसरें लहान वर्तुळ होय. त्या लहान वर्तुळाच्या आंत पाण्याच्या अधिक बंदोबस्तासाठीं वाळूनें भरलेलीं पोतीं रचलीं आहेत. त्या पोत्याभोंवतीं कमान बांधण्याचें काम एकीकडे सुरू होणार व दुसरीकडे हीं पोतीं काढून घेतलीं जाणार. व त्या पोकळींत दगडधोंडे भरण्यांत येणार. हीं पोतीं जसजशीं काढून घेतलीं जातील तसतसें बांधकाम जमिनीच्या पोटांत शिरत जाईल व तें एके ठिकाणीं स्थिर झाल्यावर कमानीस खंबिरी आली असें समजावयाचें. कमानीभोंवतालच्या जागेस इतक्या खंबिरीचें कारण नसल्यामुळें तेथें चिपाच बसविण्यांत येणार आहेत. पण त्याकरितांहि पात्राचा पृष्ठभाग थोडाबहुत समान पातळींत आलाच पाहिजे. तो समान पातळींत येण्यासाठीं दुसरीकडचा गाळ आणून टाकावयाचा उद्योग सिंधूंतच एके ठिकाणीं बसून ड्रेजर व त्यास जोडलेल्या गाळ नेणाऱ्या नळ्या करीत आहेत.

हें सर्व काम फार प्रेक्षणीय आहे. त्या सर्वांत तुळयांचा बांधलेला कोट म्हणजे भगीरथ प्रयत्नच होय. त्या कोटांत सिंधूनें कोठेहि भेग पाडली कीं त्या भेगेतून पाण्याचा प्रवेश होऊन आतील अचाट उद्योग तेव्हांच फसेल. तो न फसावा व पाण्यानें भेग पाडल्याचें ताबडतोब लक्षांत यावें यासाठीं कोटाच्या सभोंवती रात्रंदिवस पहारा करणाऱ्या बोटी फिरत असतात. हा अचाट उद्योग व ही विलक्षण दक्षता प्रत्येक कमानीकरितां ठेवावी लागत असून याच उद्योगानें व दक्षतेनें सबंध बंधाऱ्याचें काम शेवटास जावयाचें आहे, इकडे लक्ष पुरविणारा अशा प्रयत्नास भगीरथ प्रयत्न हीच उपमा देईल. बंधाऱ्याची एकंदर लांबी ५६०० फूट असून त्यांत असल्या सासष्ट कमानी बसावयाच्या आहेत हें वर सांगण्यांत आलेंच आहे. त्या सर्व कमानी ठराविक रेषेंत येत आहेत हें पाहाण्याकरितां सिंधु नदीच्या तीरांवर दुर्बिणी ठेवलेले मनोरे (अलाईनमेंट टॉवर्स) समोरासमोर बांधलेले आहेत.

येथवर कमानदार बंधाऱ्याचें वर्णन झालें. आतां कालव्यांचें वर्णन करावयाचें उरलें. बंधाऱ्याच्या वरच्या अंगास दोनहि किनाऱ्यांवर मिळून सात कालवे व्हावयाचे असून ते खणण्याचें काम सांप्रत सुरू आहे. त्यांपैकीं उजव्या म्हणजे सक्करच्या बाजूस तीन व डाव्या म्हणजे रोहरीच्या बाजूस चार कालवे होत आहेत. सक्करच्या बाजूकडील पहिला दादू कॅनाल, दुसरा सेंट्रल राईस कॅनाल व तिसरा नॉर्थ– वेस्टर्न कॅनाल. त्यांपैकीं दुसरा कालवा फार लांब असून त्यावर फक्त भात उत्पन्न करावयाचें ठरलें असल्यामुळें त्यास वर्षांतून सहाच महिने पाणी मिळणार आहे. या कालव्याची लांबी २५० मैल, रुंदी २४१ फूट व पाण्याची खोली १२-१३ फूट राहील. नॉर्थ– वेस्टर्न म्हणजे वायव्य कालवा हा सिंधांतून बलुचिस्थानांत जाऊन फिरून सिंधांत उतरावयाचा आहे. बलुचिस्थान नांवाला खिलात येथील खानाच्या ताब्यांत आहे. वास्तविक त्याजवरील मालकी इंग्रज सरकारचीच असल्यानें पठाणाप्रमाणेंच दरोडे घालून पोट भरणाऱ्या बलुची लोकांस शेतीचा धंदा मिळवून देऊन त्यांस स्वस्थ एके ठिकाणीं

बसविण्याकरितां कालव्याची ही युक्ति आहे. रोहरींच्या बाजूकडील चार कालव्यांपैकीं दोन कालवे खैरपूर संस्थानास दिले असून ते आंखूड आहेत. पण उरलेले दोन कालवे पुष्कळ लांब आहेत. त्यांपैकीं एकाचें नांव रोहरी कॅनाल व दुसऱ्याचें नांव ईस्टर्न नारा कॅनाल. रोहरी कॅनाल २५० मैल लांब, २४१ फूट रुंद व १२।१३ फूट खोल आहे. हे सात कालवे म्हणजे एका सिंधूपासून निर्माण केलेल्या सात नद्याच होत. पंजाबांत ईश्वरी करणीनें झेलम,चिनाब,रावी, बियास,सतलज या पांच नद्या मिळून सिंधूस महानदीचा मान मिळाला. त्याच महानदीचें सिंध प्रांतात मानवी कृतीनें पृथक्करण होऊन नव्या सात नद्या जन्मास येणार आहेत असे कां म्हणूं नये ?

## यंत्रांतील शिकंदर बादशहा

हे कालवे खणण्याचें काम ड्रॅगलाईन एक्सकॅव्हेटर नामक यंत्राकडे सोपविलें आहे. असलीं लहानमोठीं ४५ यंत्रें ठिकठिकाणी राबत आहेत. कालव्यांतील माती उकरणें, ती भरणें, वाहून नेणे व दूर टाकून देणे इतक्या क्रिया एकटें यंत्र करतें. अशा प्रकारचीं दोन यंत्रे सक्कर बाजूकडील सेंट्रल राईस कॅनालवर माती उकरीत असलेलीं आम्हास दाखविण्यांत आलीं. सर्व प्राण्यात हत्ती हा प्राणी आकाराने व सामर्थ्यानें मोठा मानला जातो. परंतु मनुष्याने घडविलेल्या या नवीन प्राण्यापुढे हत्ती अगदींच लहान पिल्लासारखा ठरेल. कारण याचें बळ तीनशे घोड्याच्या बळाइतकें असून आकारहि लहानशा टेकडीएवढा आहे. त्याला कंबर आहे व सोंडहि आहे. कंबरेंत शंभरदीडशे चाकांचे दोन जोड घातले असल्याने यंत्राचा हा साधा कंबर फिरावी तसा फिरतो. त्याची सोंड दीडशें फुटांपर्यंत जरूरीप्रमाणे लांबू शकते. या सोंडेंत धरावयाचा हौद ८ घनयार्ड आहे. माती उकरून व ती या हौदांत भरून यंत्राची सोंड दीडशे फूट अंतरापर्यंत नेऊन फेकते. हे हौद मातीनें भरले असतां त्यांचें वजन १७ टनापर्यंत असते. वरील दोन एक्सकॅव्हेटरांचीं नांवें त्यांच्या पराक्रमास शोभण्याजोगीं शिकंदर व ओरायन अशीं ठेवलीं आहेत. दोन पठाण एका दिवसांत जितकी माती हलवितील तितकी माती शिकंदर एका मिनिटांत हलवितो. किंवा निराळ्या शब्दांत बोलावयाचें तर चारशे पठाण व आठशे गाढवे यांच्या एका दिवसांतील कामाइतके काम हीं दोन यंत्रे प्रत्येकीं करूं शकतात. हीं इतकीं विशाल आहेत कीं, त्यांचें दर्शन चार मैलांवरून होत व त्यांचा पराक्रम एवढा मोठा आहे कीं, त्यांच्या सेवेकरितां दररोज २७० माणसें राबत असतात. इतरांच्या कामाशीं तुलना न करतां शिकंदर व ओरायन यांच्या कामाचा स्वतंत्र विचार केल्यास हें प्रत्येक यंत्र दरमहिन्यास २५ लक्ष घनफूट माती उकरते. त्याचे काम चोवीस तास अखंड चालू असल्यामुळें दर–आठ तासांनीं त्यांच्या दिमतीतील नोकरचाकरांना विश्रांतीकरितां तीन पाळ्या कराव्या लागतात. शिकंदर व ओरायन यांच्या तोडीचीं आणखी दोन यंत्रे असून त्यास जेकबबहादुर व विल्सनबहादुर अशीं नावे ठेवण्यात आलीं आहेत. या चौकडीस एकंदर किंमत २०॥ लक्ष रुपये पडली.

## पुढें काय ?

येथवर वर्णिलेल्या हकीकतीवरून सक्कर येथें चाललेल्या अवाढव्य कामाची कोणासहि अटकळ बांधतां येईल. सिंधूसारख्या हट्टी व गर्विष्ठ नदीस अडवून तिला आपल्या इच्छेप्रमाणे राबवून घेण्याचा तितक्याच हट्टी व महत्त्वाकांक्षी इंग्रज सरकारनें पक्का निश्चय केला असून तो निश्चय शेवटास जाईल यांत शंका नाही. या कामाकडे हा वेळपर्यंत आठ कोटी रुपये खर्च झाले आहेत व उरलेल्या दहा कोटींत बाकीचे काम न उरकल्यास मुंबईसरकार झालेल्या कामाकडे बोट दाखवून अधिक रकमेची मंजुरी कौन्सिलाकडून मिळविल्यावाचून राहाणार नाहीं किंबहुना तशी मंजुरी मिळण्यास कौन्सिलांत कोणाहि सभासदांनी हरकत घेऊं नये यासाठीं स्पेशल ट्रेनमधून त्यांस धरण पाहाण्यास नेण्याचा खटाटोप सरकारनें केला असेंहि म्हणण्यास हरकत नाही. स्पेशल ट्रेनच्या पायीं चौदा हजार रुपये भाडेंच सरकार रेलवे कंपन्यांस देणार असून इतर खर्चासुद्धा एकंदर रक्कम सहज वीस हजारांच्या घराला पोंचेल सक्करच्या प्रचंड कामामुळे दिपून जाऊन किंवा प्रस्तुतचें काम अर्धवट सोडणे श्रेयस्कर नव्हे असें वाटून मुंबई–कौन्सिलाने पुढील खर्चास मंजुरी दिली तरी सिंधु नदीच्या धरणापासून शेतकऱ्यास खरा फायदा किती होईल याविषयीं मन साशंक राहातेंच. सध्या वीस लक्ष एकर जमिनीस पाणी मिळतें त्याऐवजीं यापुढे पन्नास लक्ष एकर जमिनीस पाणी मिळेल. कदाचित् पाण्यामुळें जमिनीच्या किंमती वाढतील व सरकार आपल्या मालकीच्या जमिनी विकून पैसा उभा करूंहि म्हणेल. परंतु सांप्रतच्या सिंधी शेतकऱ्यास फायदा काय होतो हे पाहूनच परप्रांतांतील शेतकरी सिंधांतील जमिनी खरेदी करण्याची व लागवडीस घेण्याची हिंमत बाळगतील.

# दिल्लीचें बातमीपत्र

## ( १ )

दिल्लीची हवा यंदाहि नेहमींप्रमाणें हिमालय पर्वतावरून आलेली असली तरी, खुद्द असेंब्लीची हवा हिंदुकुश पर्वतावरून अफगाणिस्थानाच्या मार्गानें आलेली आहे! सभासद लोकांना त्या हवेचा स्पर्श दिल्लीला येऊन पोंचण्यापूर्वी आपापल्या घरींच झाला होता. म्हणून कांहींनीं घरांतून निघण्यापूर्वींच अफगाणिस्थानासंबंधींचे प्रश्न सरकारला विचारण्याकरितां पाठवून दिले होते. पण नाटक लांबल्यामुळें जसे तें कंटाळवाणें होतें तसे या अफगाणिस्थानाच्या प्रकरणाचे झालें आहे. दिल्लीस आल्यावर पाहातात तो या नव्या प्रकरणाची नवाई राहिली नाहीं व नवलाईहि राहिली नाहीं. अफगाणिस्थानच्या प्रकरणाशीं इंग्रजांच्या कारस्थानी धोरणाचा संबंध आहे हा संशय अजून कोणाच्याहि मनातून पुरा गेलेला नाहीं. पण आधींच लोकाना अफगाणिस्थानाची माहिती थोडी व ऐकीव. सरकारी मार्गानें येणाऱ्या बातमीवर कोणाचाहि विश्वास नाहीं स्वतंत्र रीतीनें येणारी बातमी फारच थोडी. व रोज अफगाणिस्थानाचे नवीन नवीन घोटाळे दृष्टोत्पत्तीस येऊं लागल्यामुळे, आपण प्रश्न विचारतो त्याचें निशाण सरकारला बरोबर लागेल कीं भलत्या दिशेला गोळी जाईल याची लोकाना खात्री वाटेनाशी झाली.

***

लोक कोणतें लक्ष्य डोळ्यापुढें ठेवून निशाणबाजी करीत आहेत हे सरकारला पुरें माहीत असल्यामुळें त्यानीं यांचा नेम चुकविण्याकरिता किंवा निष्फळ करण्याकरिता, मध्यें गेंड्याच्या कातड्याच्या जाड व भल्या मोठमोठ्या मिथ्या वादाच्या ढाली उभ्या करून ठेविल्या आहेत. यामुळे प्रश्न विचारले जातात, उत्तरें दिलीं जातात, पण गोळी कोठेंच लागत नाहीं व निशाण पडलेलें दिसत नाहीं. इतर शहराप्रमाणें दिल्ली येथेंहि हिंदू-मुसलमानाची मिळून मोठी सभा भरून,अमीर अमानउल्ला याला सहानुभूति प्रगट करण्यांत आली. पण चोर पकडणाऱ्या लोकांच्या घोळक्यांत स्वतः चोर शिरले म्हणजे जसा गोंधळ होतो, त्याप्रमाणें सरकार देखील अफगाणिस्थानाबद्दल सरळ सहानुभूति प्रगट करीत असल्यामुळे, प्रश्नोत्तरांचा व टीकेचा खेळ आंधळ्या कोशिंबिरीसारखा झाला आहे. व्हाइसरॉयसाहेबांनीं केलेल्या पहिल्या दिवसाच्या भाषणांत नाटकांतील भरतवाक्याप्रमाणे, उदार मतप्रदर्शनाचे उद्गार होते. त्यांनीं म्हटलें कीं, अफगाणिस्थानांत एकी व शांतता नांदावी, इतकेंच आमचें पाहाणें आहे व इच्छा आहे. अफगाणिस्थान आहे त्याप्रमाणेंच स्वतंत्रच राहावा असे उद्गार मात्र त्यांच्या तोंडांतून निघाले नाहींत. पण सरकार म्हणणार, आम्ही तह करून बसलेलों आहों. तेव्हां अफगाणिस्थानाचें स्वातंत्र्य आजहि आम्हाला कबूल आहे. त्या देशांतील यादवी व बंडाळी संपून शेवटीं जो धनी गादीवर कायमचा बसेल त्याला अमीर म्हणून आम्ही ओळखूंच!

***

सोमवार ता. २८ हा असेंब्लीच्या कामाचा पहिला दिवस. या दिवशीं व्हाइसरॉयसाहेबांचे प्रास्ताविक भाषण झालें पण यंदा नेहमींपेक्षांहि या आरंभाला साधें स्वरूप होतें. असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट या दोघांची मिळून बैठक नव्हती. या दोन सभांचे अध्यक्ष आपले केसाळ मुगुट घालून व्हाइसरॉयांच्या सिंहासनासमोर जय-विजयासारखे उलटी तोंडे फिरवून बसतात तसे यंदा नव्हतें. अध्यक्ष पटेल यांनीच प्रथम येऊन खुर्चीवर बसून सभासदांची खडी ताजीम घेतली. व मागाहून व्हाइसरॉयसाहेबांचा प्रवेश साध्या इतमामानें झाल्यावर ते उच्चासनावर पण आपली जागा सोडून उजव्या हाताला बसले. लॉर्ड आयर्विन आपलें भाषण इतकें सुबोध रीतीनें व सावकाश वाचतात कीं, तोंडी परीक्षेंत शुद्ध—लेखन घालण्याला परीक्षक म्हणून त्याची नेमणूक केल्यास विद्यार्थी आनंदित होतील. वहिवाटीप्रमाणें एस. आर. दास व लाला लजपतराय यांच्या मृत्यूबद्दल त्यांनीं दुःखोद्गार काढले. पण दुःखोद्गार काढतांना आपला व परका हा भेद दिसून आलाच! लजपतराय यांच्यासंबंधानें सरकारला कधीं चांगला शब्द बोलावयाचा तर तो हाच प्रसंग होता. पण स्वतः बोलतांना लॉर्ड आयर्विन इतकेच म्हणाले कीं, लाला लजपतराय ही एक माणसासारखी माणूस व्यक्ति होती. याचा अर्थ त्यांच्यामध्यें गुण असले तरी दोषहि होते पण माणसासारखा माणूस हे वर्णन कोणाहि माणसाला लागू पडतें. आणि ते लाविल्यापासून वर्णित व्यक्ति ही मनुष्य कोटींतील होती, जनावरांपैकीं नव्हती इतकाच अर्थ निघू शकतो. वैर आमरण राहिलें तरी मरणान्त असावें व मृत्यूचा उल्लेख करतांना तरी त्याबद्दल एखादा चांगला शब्द बोलावा ही सभ्यपणाची रीतहि व्हाइसरॉयसाहेबांनीं ध्यानांत ठेविली नाहीं; मग जेथें फुकाचा गोड शब्द खर्ची घालण्याला इतका

कृपणपणा, तेथें हिंदुस्थानाला स्वराज्य देण्याच्या बाबतींत त्यांनीं कशा प्रकारची भाषा वापरली असेल तें सांगावयास नको. त्यांनीं जास्तींत जास्ती म्हणून हें सांगितलें कीं, "१९१७ सालीं स्टेटसेक्रेटरी मँटेग्यु यांनीं जो जाहिरनामा प्रगट केला तो आजहि अमलांत आहे. आम्ही त्याच्या माग जाऊं इच्छित नाहीं म्हणजे तो रद्द करीत नाहीं !" राष्ट्रीय सभेच्या ठरावाला 'अल्टिमेटम्' म्हणजे 'निर्वाणीचा खलिता' असे शब्द लावतांना लॉर्ड आयर्विन यांनीं किंचित् प्रच्छन्न असा उपहासच केला.

***

मंगळवार तारीख २९ हा दिवस खासगी सभासदांच्या बिलांकरितां राखून ठेवण्यांत आला होता. या दिवसाचें मुख्य बिल म्हणजे रायसाहेब हरविलास शारदा याचे बालविवाहासंबंधाचें होय. शारदा यांनीं या बिलासंबंधाने आज तीन वर्षे खटपट चालविली आहे. पण त्याला चांगला मुहूर्त लाभलेला दिसत नाहीं. कारण लोकपक्षातील कांहीं लोक त्याला उघडपणे प्रतिकूल आहेत व सरकारने त्यासंबंधानें आपले मत अजून निश्चित बनाविलें नाहीं. साधारण लोकमत पाहतां प्रथम पक्ष अशा तऱ्हेचे बिल असेब्लीनें मंजूर करूं नये असा दिसतो. पण ते जर मंजूर व्हावयाचें तर लग्नाची किमान मर्यादा १४ वर्षांची राहावी असा दुसरा पक्ष आहे. संमति वय व लग्नाची वयोमर्यादा कायद्यानेंच ठरवावयाची तर ती दोहोंची एकच म्हणजे १४ पर्यंत असावी असे ओघानेंच प्राप्त होतें. याच्या पलीकडे जाऊन १६–१८ वर्षांची मर्यादा असावी असे म्हणणारे लोक कांहीं आढळतात. व कांहीं साक्षीदारांनीं तसें मत संमति वय कमिटीपुढे प्रदर्शितहि केलें आहे! पण या कमिटीपुढें कोणत्या वर्गातील लोक, विशेषतः कोणत्या व्यक्ती, साक्षीला गेल्या हे पाहिलें म्हणजे १४ हून अधिक वर्षे या वयोमर्यादेला खऱ्या लोकमताचा आधार नाहीं हे उघड दिसून येतें.

***

शारदा यांची मूळ योजना अशी आहे की, ठरीव मर्यादेच्या आंत झालेला विवाह रद्द ठरवितां यावा. पण तें कलम सिलेक्ट कमिटीने अजीबात काढून टाकलें. व बालविवाहाला गुन्ह्याचें स्वरूप दिल गेलें तर, खटले भरणे, न्यायइनसाफ होणे, शिक्षा देणें वगैरे बाबतींत अनेक प्रकारचीं बंधने सिलेक्ट कमिटीनें सुचविलीं आहेत. बालविवाह करणाऱ्या आईबापांना फटक्याची शिक्षा द्यावी असें मुंबईचे एक शहाणे साक्षीदार बोलल्याचे प्रसिद्धच आहे. त्यांच्या हातांतील चाबूक जाऊन सिलेक्ट कमिटीनें अप्रत्यक्ष रीतीनें तो या फाजील शहाण्यांच्या पाठीवरच उडविला म्हणावयाचा ! असो. या दिवशीं दुसरें बिल मौ. महंमद याकूब यांचें निघालें. त्यांची योजना अशी कीं, एका सरकारी लॉ रिपोर्टखेरीज बाकी कोणाहि लॉ रिपोर्टांचा उल्लेख किंवा वाचन न्याय कोर्टापुढें होऊं नये. याचा अर्थ खासगी लॉ रिपोर्टांचीं सगळी मासिक पुस्तके बंद पडावीं. व आळशी वकील व मिजासखोर न्यायाधीश यांचें काम हलकें व्हावे. पण ही गोष्ट कोणाहि समंजस मनुष्याला मान्य होण्यासारखी नसल्यामुळे, हें बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याच्या मौ. महंमद याकूब यांच्या सूचनेला स्वतः त्याच्या हाताखेरीज दुसरा एकहि हात वर झाला नाहीं.

***

बुधवार ता. ३० या दिवशीं खासगी सभासदांचे ठराव चर्चेला निघाले. पहिला ठराव कुमार रणंजयसिंग यांचा सिनेमा कमिटीसंबंधाचा होता. तो असा कीं, हिंदुस्थानातील सिनेमा कमिट्या व चित्रपट तयार करणार कारागीर यांच्या धंद्यांना उत्तेजन मिळावें म्हणून सिनेमा कमिटीनें केलेल्या शिफारशी सरकारनें अमलांत आणाव्या. पण या कमिटीवरील सहा सभासदांत तीन गोरे व तीन काळे होते. त्यांत बरोबर निमेंनिम दुमत झालें व सरकारनें या गोऱ्या लोकांच्या मताचा पाठपुरावा केला. त्यांचें म्हणणें असें कीं, सिनेमाचा धंदा हिंदुस्थानांत हल्लीच फायद्याचा असल्यामुळे त्याला वेगळें उत्तेजन नको. व हिंदुस्थानांत तयार होणारे चित्रपट कांहीं एका ठराविक प्रमाणाने सर्व सिनेमावाल्यांनी दाखविलेच पाहिजेत अशी सक्ती झाली तर चित्रपट अधिक वाईट निघूं लागतील व हिंदी सिनेमावाल्यांचें नुकसान होईल. अर्थात् ही शुद्ध बतावणी होय. मूळ कमिटी नेमली ती अमेरिकन चित्रपटांवर नियंत्रण पडून विलायती चित्रपटांचा फायदा करून देण्याच्या उद्देशानें. पण कमिटींतील हिंदी सभासदांनीं हा व्यूह ढांसळविला. तेव्हां आमचें साधले नाहीं, म्हणून तुमचेंहि साधूं देत नाहीं असा विचार सरकारने केला. ठरावावरचीं मतें मोजतांना दोनहि बाजूंना सारखीं मतें पडलीं. फिरून अध्यक्ष पटेल यांच्यावर बिकट प्रसंग आला. पण अध्यक्ष पटेल निःपक्षपाती ! त्यांनीं सेफ्टी बिलाच्या वेळीं सिमल्यास सारखीं मतें पडलीं असतां, लोकपक्षाला उचलून धरलें म्हणून आपला तोल संभाळण्याकरितां त्यांनीं या वेळीं सरकारला उचलून धरले.

***

या दिवशीं निघालेला दुसरा ठराव मात्र अत्यंत महत्त्वाचा होता. तो असा की, १६ ते २० वर्षांच्या आंतील शाळा व कॉलेजामधील तरुणांना

सक्तीचें शारीरिक शिक्षण, लष्करी कवाईत व रायफल प्रॅक्टिस शिकविण्याची व्यवस्था सरकारनें करावी. अनेक लोकांच्या नांवाखालीं तो ठराव निघाला होता तरी डॉ मुंजे यांनाच तो पुढे मांडण्यास परवानगी मिळाली व त्यांनीं तो मोजक्या शब्दांत पण खणखणीत रीतीनें पुढे मांडला. सरकारतर्फे वाजपाई व आर्मी सेक्रेटरी मि. यंग यांचीं भाषणें झाली. त्यांत नसत्या शेकडों अडचणी पुढे आणल्या होत्या. लोकपक्षातर्फे अणे, जयकर यांचीं भाषणें फार चांगलीं झालीं. जयकर यांनीं तर सरकारास असें स्पष्ट बजावलें कीं, देशातील तरुण पिढीनें जागृत होऊन पाऊल पुढें टाकलें आहे. तरुणांची ईर्षा, तरुणांचे तेज याचा फायदा राष्ट्रसेवेला व राष्ट्रसंरक्षणाला करून घेण्याची सरकारची इच्छा असेल तर ही एकच संधि आहे. ती त्यांनीं न साधली तर उद्यां त्यांचेच नुकसान होईल. या ठरावावर आणखी बरीच भाषणें होण्याचा संभव म्हणून त्याची चर्चा तारीख १८ फेब्रुवारीपर्यंत पुढे टाकण्यांत आली.

***

असेंब्लीचे पुष्कळ सभासद अजून यावयाचे आहेत. जिकडे तिकडे बाके अगदींच सुनीं नाही म्हटलीं तरी म्हातारपणाच्या मधून मधून पडलेल्या दांतांच्या कवळीसारखीं दिसतात. स्वराज्य पक्षानें तर फारच उदासीनपणा दाखविला आहे. खासगी सभासदांनीं पुढे आणलेलें काम हे जणुं काय कामच नव्हे असा त्यांचा विचार दिसतो. या पक्षाची हल्लीं फारच वाताहात झालेली आहे. आचार्य व रंगा अय्यर हे उठन दुसऱ्या बाकांवर जाऊन बसले. श्रीनिवास अय्यंगार, प्रकाशम हे लोक येण्याचे चिन्ह दिसत नाहीं. मोतिलाल नेहरू क्वचित् तास अर्धा तास दिसतात. व एकंदर स्वराज्य पक्षांत जवळजवळ अराजक निर्माण झालें असेच म्हणतात. राष्ट्रीय पक्षानें लाला लजपतराय यांच्या जागीं पंडित मदन मोहन मालवीय यांना आपले पुढारी नेमले असून बाकीच्या जागा पूर्वींसारख्याच भरल्या आहेत. स्वतन्त्र पक्षाचे पुढारी जीना अजून मुंबईसच आहेत. व सायमन कमिटीवर नेमलेले लोक ब्रम्हदेशात आहेत. या सर्व कारणानीं असेंब्लीचें काम झोपाळू माणसाच्या भाषणासारखें किंवा स्प्रिंग ढिल्या झालेल्या फोनोग्राफसारखें र-र करीत कसें तरी चाललें आहे. येत्या सोमवारीं सेफ्टी बिल पुनः प्रविष्ट होणार त्यामुळें अधिक सभासदांची दुतर्फा जमवाजमव झाल्यास असेंब्लींच्या कामाला कांहीं रंग येईल.

[२]

गेल्या आठ-दहा दिवसांत हवेचे पुष्कळ प्रकार दिल्लीस अनुभवाला आले. आम्ही प्रथम आलों तेव्हा हीच का दिल्लीची थंडी, असे म्हणून तिची थट्टा केली. पुढें दोन-तीन दिवस आभाळ इतके भरून जाई व सकाळीं धुके इतके दाट पडे कीं, चालताना वर पाहून ' घुंगुटके पट खोलोजी ' या चिजेचें पालुपद सहजच तोंडाला येई. नतर दोन दिवस नुसती पण फार कडक थंडी पडली, व पुढें दोन दिवस या थंडींत उत्तरेकडील झोंबणाऱ्या वाऱ्याची भर पडून मोठी दुःसह स्थिति झाली. रावळपिंडी व रोहटक येथपर्यंत बर्फाची वृष्टि झाली. खुद्द दिल्ली शहरांत उघड्या जागेवर ठेवलेल्या पाण्याचें कोठें कोठें बर्फ झालें. व गरीबगुरीब व टांगेवाले वगैरे कांहीं लोक प्राणाला मुकले. पण आतां चोहोंकडील वर्तमानपत्रांतून या थडीचें आलेलें वर्णन वाचलें म्हणजे दिल्लीस काहीं विशेष झालें नाहीं, असेंच म्हणणे अधिक बरें. दिल्लीची हवा हिमालयावरून येते असें मीं मागील पत्रीं म्हटलें. पण सरकारी हवाखात्याच्या एका रिपोर्टांत असा खुलासा आढळला कीं, ' ही हवा म्हणजे पुढे धांवणारी थंड हवा व तिची पाठ शिवणारी उष्ण हवा यांचा खेळ अटलांटिक महासागरावरून भूमध्य समुद्रांतून हिंदी महासागराकडून हिंदुस्थानाकडे वळला. हिमालयावरून बर्फाच्या वृष्टीमुळें दिल्लीस फार थंडी पडली असें आम्ही समजतों. पण हिमालयावरच्या थंडीला अटलांटिक महासागरावरील हवा हे कारण ठरलें. आतां या अटलांटिक महासागरावरील हवेला मूळ कारण काय एवढेच कोणीं सांगावयाचें उरलें आहे. कोणत्याहि गोष्टींत कारणपरंपरेचा शोध मागें मागें करीत गेलें असतां, शेवटीं अनवस्था किंवा शून्यसंशोधन हेंच हातीं लागणार!

***

या आठवड्यांतील असेंब्लीचें मुख्य काम म्हटलें म्हणजे चार दिवस होऊन संपलेली पब्लिक सेफ्टी बिलांवरील चर्चा. पहिल्या दिवसाच्या रंगावरून एकदोन दिवसांतच ही चर्चा संपेल असें वाटलें होतें. पण अदमासाबाहेर लांबून ती चार दिवस चालली. शेवटीं लोकपक्षाचा ११ मतांनी पराभव होऊन बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याचे ठरलें! या बिलावर स्वराज्य पक्षातर्फे पं. नेहरू, गयाप्रसादसिंग, नीळकंठदास, दिवाण चमनलाल, रंगास्वामी अय्यंगार यांचीं भाषणें झालीं. नॅशनॅलिस्ट पक्षातर्फे पं. मालवीय, केळकर, शे. घन-

श्यामदास बिरला, मुनशी ईश्वर शरण व अणे यांचीं भाषणें झालीं. स्वतंत्र पक्षातर्फे फक्त सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांचेंच भाषण झालें. मुसलमान पक्षातर्फे सर अबदुल कयूम व युरोपियन संघातर्फे सर डार्सी लिंडसे, सर व्हिक्टर ससून व गॅव्हिन जोन्स हे बोलले. सरकारतर्फे होम मेंबर केरर, डेनीस ब्रे, कीन्स व कॉसग्रेव्ह यांचीं भाषणें झालीं. रंगा अय्यर व आचार्य यांचींहि भाषणें झालीं. पण त्यांना आज जवळ जवळ कोणताच पक्ष नाहीं असें म्हणावें लागतें. इतक्या भाषणांना चार दिवस लागले, यावरून बहुतेक भाषणें लांबलचक झालीं हे दिसून येईल. त्यांत रंगा अय्यर यांचा नंबर सर्वांत पहिला लागला. त्यांनीं दोन तास दहा मिनिटें घेतलीं, पण या भाषणांत बिलावरील टीकेपेक्षां कोपरखळ्या व चिमटेच अधिक होते. त्यांनीं कॉंग्रेस, नेहरू कमिटीचा रिपोर्ट, असहकारिता, युवकसंघाची चळवळ वगैरे सर्व गोष्टींवर तोंडसुख घेतलें! व जिव्हेचा उपयोग किती वाईट रीतीनें करतां येतो याचा प्रत्यय असेंब्लीला आणून दिला. या गृहस्थांचें तारूं कोणीकडे कसें भटकत जाणार हें समजत नाहीं. सुकाणूं मोडलेल्या जहाजाची समुद्रांत जी स्थिति होते तीच कदाचित् याची पुढील निवडणुकींत होईल असें म्हणतात.

***

सरकारचे नवे फडणवीस सर जॉर्ज शुस्टर यांचा या आठवड्यांत असेंब्लीला प्रथम परिचय झाला. हे जातीनें जर्मन ज्यू असून, मोठे धनाढ्य आहेत. कीनियासंबंधानें नेमलेल्या हिल्टन यंग कमिशनाचे ते सभासद होते व तिकडूनच ते इकडे आले आहेत. हे स्वभावाने शांत व सभ्यपणानें वागणारे दिसतात. असेंब्लींत झालेल्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीं समर्पक व माहिती पुष्कळशी देण्याच्या उद्देशाने दिलीं. विशेषतः रिझर्व्ह बँक बिलासंबंधाने एका प्रश्नाला उत्तर देतांना त्यांनीं या बिलासंबंधानें आपलें धोरण प्रगट केले तें लोपक्षाला पसंत पडण्यासारखें होतें. रिझर्व्ह बँक बिल ते तूर्त पुढें आणीत नाहींत.

***

प्रथम हिंदुस्थानांतील बँका व पेढ्या यांच्यासंबंधानें ते विस्तृत चौकशी करणार आहेत, नंतर असेंब्लींतलि निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांशीं खासगी चर्चा करणार आहेत व त्यानंतर रिझर्व्ह बँकेसंबंधानें आपलें धोरण निश्चित करणार आहेत. याचा अर्थ सुमारें दोन वर्षे तरी हे बिल पुनः पुढें येत नाहीं. याखेरीज सरकारी रीतीनें शेतकरी व शेतकीचा व्यापार यासंबंधानें ते प्रांतानिहाय चौकशी करणार आहेत असें इतर मार्गानें समजलें. इन्कम टॅक्स बिलावरील सिलेक्ट कमिटींत त्यांनीं सामोपचाराचें धोरण स्वीकारलें असें त्यांतील लोक सांगतात. व त्यांच्या या धोरणामुळें हें बिल एकदम पुढें न येतां, फिरून लोकमत अजमावण्याकरितां बाहेर पाठविण्याचें कमिटीला ठरवितां आलें. तात्पर्य, सर बेसील ब्लॅकेट यांच्याइतके ते तडफदार किंवा वाक्पटु नसले तरी प्रथम कांहीं दिवस लोकांना माजी फडणविसाच्या धोरणाचा ते विसर पाडतील असा अंदाज वाटतो. परंतु प्रथम परिचयावरूनच कोणाविषयींहि निश्चित मत बनविणें हें अर्थातच शहाणपणाचें होणार नाहीं.

***

पहिल्या आठवड्यापेक्षां दुसऱ्या आठवड्यांत असेंब्लीच्या कामाला जी थोडी तेजी आली आहे ती सेफ्टी बिलासारख्या वादग्रस्त प्रश्नामुळें. तथापि अखेर सरकार पक्षाचाच जय होणार ही गोष्ट प्रथमपासून जवळ जवळ निश्चित झाल्यासारखी दिसत होती. यामुळे विशेष ईर्षा दिसून आली नाहीं. बिलाच्या चर्चेमध्यें प्रश्नोत्तरें व खटके पुष्कळ उडाले; तथापि सिमल्यास या चर्चेला हल्लीपेक्षांहि अधिक तेज आलें होतें. गैरहजर असलेल्या सभासदांना बोलावून आणण्याचा बराच खटाटोप उभय पक्षाकडून झाला. यामुळें शेवटच्या दिवशीं सुमारें ११२ सभासद असेंब्लींत हजर होते. एकट्या स्वराज्य पक्षाचे १२ सभासद गैरहजर होते. हे सगळेच हजर राहतील असे नव्हते; तथापि स्वतंत्र पक्षाचे व मुसलमान सभासद यांनीं बराच गोता दिला. म्हणूनच उभय पक्षांतील मतांमध्यें इतकें अंतर पडलें, एरवीं पडतेंना.

***

गेल्या आठवड्यांत दिल्ली येथील महाराष्ट्र स्नेहसंवर्धक समाजानें नव्या पचांगाप्रमाणे दासनवमीचा एक दिवस उत्सव केला. त्यांत श्री. माधवरावजी अणे यांचें व्याख्यान झालें. स्वामी विवेकानंद यांच्या निधनतिथीची गांवांत एक सभा झाली. 'यंग वुइमेन्स ख्रिश्चन असोसिशन' या संस्थेचा उद्घाटनसमारंभहि लेडी आयर्विन यांच्या हस्ते झाला. दिल्ली येथील चित्रकलेचें एक प्रदर्शनहि उघडण्यांत आलें. तसेंच रेल्वे बोर्डानें आपल्या खात्यामार्फत एक नमुनेदार प्रदर्शन भरविलें आहे, त्याचा समारंभ उद्यां होईल. या प्रदर्शनांत लोकोपयोगी व मनोरंजक असा बराच भाग असल्यामुळें तें प्रदर्शन प्रत्यक्ष पाहिल्यावर त्यासंबंधानें कांहीं महत्त्वाचें असल्यास लिहितां यईल.

# मुंबईतील भयंकर दंगा

## दंग्याचें मूळ कारण

ता. ३ फेब्रुवारी पूर्वी आठवडाभर मुंबई--नगरांत पटाण मुलें बडोदा येथे बांधकाम चालू असलेल्या पुलाकरितां पळवून नेत आहेत अशी सारखी, या नाहीं त्या भागांत, लोकात कुणकुण चालली होती. अर्थात शहरांतील लोक साशंक होऊन आपापलीं मुलें शाळेत पाठवीनासे झाले.

## रविवारची गडबड

लोअर परळ येथील सन मिलच्या बाजूला एक हिंदु जात असतां कांहीं संशयावरून सुमारें तीन हजार कामगारांनीं त्याला घेरून इतकें बेदम मारलें कीं, इस्पितळांत जाताच तो मरण पावला. त्याच दिवशीं दुपारीं एक ग्रीक इंजीनियर भेंडी बाजारामध्यें ट्राममध्ये बसत असतां त्याच्या खिशात एका पोरानें हात घातला. कोणी तरी उचल्या पोर असावा असें समजून त्याने त्या पोराचा हात धरलेला पाहाताच हा कोणी तरी पोरें पळविणारा असावा असे समजून शेकडो लोक त्याच्यावरच तुटून पडले ! पोलीस सार्जेट व डेप्युटी कमिशनर तेथें आले असतां लोकांची तुफान गर्दी त्याचें ऐकेना. उलट लोक पोलीस अधिकाऱ्याविरुद्धच उलटले. कामाठीपुऱ्यात एका पठाणाला कामाठ्यानी असाच बेदम मार दिला व ठाकुरद्वाराला एका गुरख्यास तो पठाण समजून असाच मार देण्यात आला. सायंकाळीं लालबागला पांच पठाणांवर लोक तुटून पडले व त्यांच्यापैकीं पांच अत्यवस्थ झाले.

## सोमवारचा दिवस.

ता. ४ रोजी गिरणीभागात श्री. आळवे यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरून त्यानीं शेकडो कामगारांस कामावर जाण्यास सागितले व तुमच्या बायकामुलांच्या रक्षणाची आम्ही व्यवस्था करूं असें बजावलें. परंतु सकाळीं अशी बातमी उठली कीं, एका कामगार स्त्रीला पठाणांनीं पळविलें व दोन मुलेंहि नाहींशी झाली. भराभर लगेच करीम भाई ग्रुपच्या गिरण्यांतील सुमारें तीस हजार कामगार हातांत दंडुके घेऊन बाहेर पडले. माटुंगा व परळ येथील जी. आय्. पी. व बी. बी. सी. आय्.चीं वर्कशॉप्स बंद पडलीं. सुमारें दोन तासांत एक लक्ष कामगार पठाणावर सूड उगविण्याच्या बुद्धीनें बाहेर पडला. काळा चौकीला तर कामगारांनी एका पठाणाच्या झोंपडीस आगच लावून दिली. त्या वेळीं कामगार इतके बेफाम झालेले होते कीं, पठाण दिसला कीं चोपीत. दुपारीं ३ वाजता किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलापाशीं सुमारें हजार कामगारांनीं पठाणांची वस्ती असलेल्या एका इमारतीवर दगडांचा पाऊस पाडला. त्यामुळें त्या इमारतींतील ५० पठाणांची व त्यांची जंगी झटापट होऊन तींत सात पठाण बेशुद्ध अत्यवस्थ पडले. आपणास कामगार मारतात हें पाहून त्यांनीं भोईवाड्यांतील अबू बिल्डिंगमध्यें एकजुटीनें सर्वांनीं राहाण्याचें ठरविलें. ५॥ वाजतां किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलसमोरील मैदानांत सभा भरावयाची असतां पांच हजार कामगार दामोदर ठाकरसी हॉलशी जमा झाले. अबू बिल्डिंगमध्ये जाणाऱ्या पठाणांची व त्यांची मारामारी जुंपण्याची थोडक्यांत वाचली. वरळी हिलच्या बाजूला दोन हजार कामगारांनीं दोघा पठाणाना जागच्या जागी ठार करून चारांना मरणप्राय घायाळ केलें.

## ब्रिटिश पोलीस ऑफिसर ठार झाला

मंगळवारीं गिरणी कामगारामध्ये शांतता राहावी म्हणून श्री. आळवे व श्री. डांगे यांच्या सह्यानिशीं एक हस्तपत्रक प्रसिद्ध करून ते वांटण्यांत आलें. व त्याचा इष्ट परिणाम घडून येऊन सर्व गिरण्या सुरू झाल्या. परंतु सुमारें ८॥ च्या बेतास डेव्हिड मिलमध्यें एका इसमानें जाऊन अशी बातमी दिली की, एका बाईला पठाणांनीं चिरली! आळवे ह्यांच्यावर हल्ला केला व यूनियनचें ऑफीस पाडलें अशा दुसऱ्या दोन अफवा उठल्या. त्यामुळें करीमभाई ग्रुपमधील सुमारें साठ हजार कामगार हातांत व खांद्यावर जे गिरणींत दिसेल ते घेऊन निघाले. एवढें प्रचंड सैन्य पाहावयास क्वचितच मिळतें. हे लोक जर तसेच जाऊं दिले तर नेमके गोळीबाराला बळी पडतील असे वाटून त्या सर्व कामगारपुढाऱ्यांनी त्यांचे येण्याचे मार्ग रोखून धरले व कामगारास विनवून विनवून त्यांस त्यांनीं कामावर लावले. यूनियनचें ऑफीस सध्या आहे तेथे न बसतां कामगारपुढारी नागू सयाजीच्या वाडींत बसूं लागले आहेत. त्याचें कारण इतकेंच कीं, पुढाऱ्यांमुळें कामगार हजारांनीं तेथे जमतात व त्यामुळे लष्करास गोळीबारास तेवढीच संधि सांपडावयाची. दुसरी गोष्ट अशी कीं, तेथेंच जवळ पठाणांची सुप्रसिद्ध अबू बिल्डिंग आहे हें होय. ह्याच दिवशीं पांचशें पठाण पोलीस कमिशनरकडे संरक्षण मागण्यास गेले होते. त्यांच्या मुख्याचें व पोलीस कमिशनरचें बोलणें चाललें असतां एका मशिदीवरून

हल्ल्याची हूल उठली. त्यामुळें पठाण शेख मेमन स्ट्रीटमध्ये घुसले. पोलीस कमिशनर व इन्स्पेक्टर साबाजी यांनीं पठाणांचा पाठलाग करून त्या पठाणांस जुम्मा मशिदींत कोंडलें. ह्या धांदलींत पोलीस कमिशनरलाहि काठ्यांचे तडाखे मिळाले! अखेरीस लष्कर आल्यावर त्यांस कारनाक रोडवरील मुसाफरखान्यांत नेण्यांत आलें. त्या रात्रीं भेंडीबाजारांतहि पठाणांनीं हिंदूंवर भयकर हल्ले केले. ह्या दिवसांपर्यंत १८ लोक मेले व १०० लोक जखमी झाले. येथील 'टाईम्स' पत्राने ह्या दंग्याचे कामीं इतकें निंद्य वर्तन आरंभिले आहे की, त्यामुळे दंगा वाढतच जात असून सरकारहि पक्षपातीपणानें वागत आहे असा लोकाचा पक्का ग्रह झाला आहे.

## शौकतअल्लींची मुलाखत

'टाईम्स' व शौकतअल्ली यांचे सख्य विळ्याभोपळ्याइतकें आहे हें सर्वांस ठाऊक आहेच. अल्लीबंधूंच्या मुलाखतीकरितां 'टाईम्स'च्या बातमीदारानें धांपा टाकाव्या व त्या छापण्याकरितां त्या पत्राचे संपादक उत्सुक व्हावेत ह्यावरून तर 'टाईम्स' कारांच्या खोडसाळपणाचा संशय अधिकच दुणावत चालला. ह्या पत्राच्या बातमीदारानें महंमदअल्लीची मुलाखत घेतली असतां महमदअल्लींनीं निमकर काय करताहेत, डागे काय करताहेत, हा काय करतो, तो काय करतो असले प्रलाप काढले ! त्या बातमीदारानें शौकतअल्लींस लगेच प्रश्न विचारला कीं, ह्या परिस्थितीचें रूपातर हिंदू–मुसलमानाच्या दग्यांत होईल काय? लगेच शौकतअल्ली म्हणाले, "अर्थात् होईल. स्वसंरक्षणाच्या हेतूनें मी मुसलमानांना संघटित करणार आहे." ह्या मुलाखतींनें हिंदू व पठाण ह्याच्यामधील भांडणाचे रूपांतर हिंदू मुसलमानांच्या दंग्यांत झालें आहे. शौकतअल्ली मुसलमानाना संघटित करण्यासाठीं दोन-तीन दिवस मुसलमान मोहल्यांतून हिंडत होते.

## पठाणांकरितां तळमळ

पठाणावर आलेल्या आपत्तीची दाद लावण्यासाठीं सुलेमान कासम मिठा, छगला, फाझलभाई ह्यांह मुसलमान पुढाऱ्यांचें शिष्टमंडळ कमिशनरसाहेबांकडे गेलें असतां कमिशनरसाहेबांनीं त्यांस आपण मुसाफरखान्यांत कसें सुरक्षित ठेवलें आहे ह्याची पूर्ण कल्पना दिली. शौकतअल्लीस पठाण तेथे ठवावयास नको होते. त्यांस पठाणांच्या घोळक्यांत नेऊन सोडण्याची उत्सुकता झाली होती. पोलिसांच्या तावडींतून पठाण काढून घेण्यांत शौकतअल्लींचा काय हेतु होता बरें ? पठाणाच्या सुरक्षिततेची जर ही तळमळ होती तर डांगे यांनीं लिहिलेल्या हस्तपत्रकावर आपण सही करतों असें सांगून त्यांनीं ती कां केली नाहीं? नेहरू रिपोर्टविरुद्ध हे दोघे बंधू गेल्यामुळे त्यांचे जें वजन सुशिक्षित व सभ्य गृहस्थात असे तें उडाले असून भेंडीबाजारांतील मुसलमानांचे ते सध्या पुढारी होऊं पाहात आहेत.

## भेंडीबाजारांत गोळीबार

बुधवारीं ह्या झगड्यास हिंदू-मुसलमानांच्या दंग्याचे स्पष्ट स्वरूप प्राप्त झालें. ह्या दिवशीं कांहीं गिरण्या चालू होत्याच. भेंडीबाजार, नळबाजार, नागदेवी, माझगांव हे भाग इतके असुरक्षित झाले होते की, केव्हां कोठून काठ्या पडतील अशी भीति मुसलमानांना व हिंदूंना वाटे. भेंडीबाजाराच्या कोपऱ्यावरून एक हातगाडी हिंदु नेत असतां मुसलमानांनीं त्यास भररस्त्यात ठार मारलें. त्यामुळे हिंदू-मुसलमानांचा मोठा जमाव जमला. लष्करानें गोळीबार केला, तेव्हा लोक हटले. भेंडीबाजाराच्या बाजूला गल्ल्यांतून जाणे म्हणजे प्राणाला मुकणे होय अशी परिस्थिति पठाणांच्या सुरे भोसकण्याने उत्पन्न झाली. एक घायाळ झालेला हिंदु गाडीतून इस्पितळांत नेला जात असतां मुसलमान गाडी जाऊं देईनात. त्यामुळे लष्करानें त्यांच्यावर गोळीबार करून बऱ्याचजणांस घायाळ केलें.

## नगराध्यक्षांनीं बोलाविलेली सभा

नगराध्यक्ष डॉ. देशमुख ह्यांनीं ह्या स्थितीचा विचार करण्याकरितां गुरुवारीं मुंबईतील सर्व ज्ञातींच्या प्रमुख लोकांची सभा बोलाविली होती. ह्या सभेस मुंबईतील बरेच लोक हजर होते. डॉ. देशमुख ह्यांनीं आपल्या भाषणांत स्पष्ट सांगितले कीं, दंगा कां झाला ह्या संबंधाच्या कारणाची चर्चा न करता आपण फक्त तो कसा शमेल ह्या संबंधाच्या सूचना करा. गिरिजाशंकर त्रिवेदी, डॉ. सावरकर, नरीमन, छगला, अवंतिकाबाई गोखले, सर सेठना इत्यादींची भाषणें झाल्यावर श्री. डागे ह्यांचें भाषण झाले. महंमदअल्लींनीं निलाजरेपणे मध्येच तोंड घालताच डॉ. देशमुखांनी स्पष्ट बजावलें कीं, हा कांहीं भेंडीबाजार नव्हे ! त्या वेळीं दोघां बंधूंचे चेहरे फोटो काढून घेण्यासारखे झाले होते. त्याच वेळीं कामाठीपुऱ्यांतून असा टेलिफोन आला कीं, कामाठीपुऱ्यावर मुसलमानांनीं हल्ला केला. लगेच पुप्पाला, सिलम, शौकतअल्ली, डॉ. सावरकर, डॉ. सुरतकर, नरीमन इत्यादि मंडळी कामाठीपुऱ्याकडे गेली. हॉर्निमन ह्यांनीं एक ठराव मांडून नगरसभेचे सध्या सभासद असलेल्यांची एक शांतताकमिटी नेमण्यांत आली व बोर्ड कमिट्या नेमण्याकरिता नगरसभेच्या सभासदांशिवाय इतर लोकांहि तीवर घ्यावयाचें ठरविण्यांत आले. दुपारीं ४ वाजतां ह्या शांतताकमिटीची सभा भरून सर्वांनीं दंग्याच्या भागांत जावयाचें ठरविलें.

## भयंकर देखावे

नॉर्थब्रुक गार्डन्स म्हणजे मुंबईतील मुसलमान उडाणटप्पूंचा मोठा अड्डा. तेथील पोरांनीं गरीब हिंदूंच्या घरांवर गोफणीनें दगडांचा मारा चालविला होता. हा मारा शांतता व सुव्यवस्था राखणाऱ्या पोलिसाला न दिसणें हें साहजिक आहे! या दगडफेकीनें कामाठीपुऱ्यांत प्रथम धामधूम उडविली. पठाण स्ट्रीटमध्यें हिंदूंवर दगड टाकून मुसलमान पळून गेले. गरीब बिचारे गल्लींतील हिंदू तळमजल्याला राहातात त्यामळें पाठीमागून आलेल्या सोजऱ्यांच्या गोळ्यांना तेच नेमके बळी पडले! श्री. तळपदे वकिलांनीं त्या गल्लींत जाऊन घायाळ हिंदूंना पोलीसांकरवी इस्पितळांत पोहोंचविलें. डोंगरी व चिंचबंदर येथें पठाणांनीं हिंदूंना एकएकटे गांठून मारण्याची शिकस्त केली. कुंभारवाड्यांत फार दंगल माजली म्हणून लष्करानें गोळीबार केला. श्री. नरीमन कामाठीपुऱ्याकडे गेले असतां एक पठाण धावत त्यांचे अंगावर आला व त्यांचे अंगावर व त्यांच्या डोक्यावर त्याच्या लाठीचा जो तडाखा बसावयाचा तो त्यांनीं हुकवल्यामुळें त्यांच्या डाव्या दंडास लागला. पुण्याहून लष्कराची एक तुकडी व देवळालीहून दोन लष्करी तुकड्या आल्या आहेत. इस्पितळें घायाळ लोकांनीं भरून गेलीं असून किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटलमध्यें तर बाहेरच्या रोग्यांना आतां घेण्यांत येत नाहीं.

## गोरे शिपाई व दंगा

पार्शी स्टॅच्यू, ट्रँक्स, जे. जे. हॉस्पिटल, भेंडीबाजार, जेकब सर्कल, चिंचपोकली, करी रोड पोयबावडी, डोंगरी येथें गोरें लष्कर ठेवण्यांत आलें आहे परंतु लष्करचे हे लोक मोठा जमाव झाला कीं उठतात व मॅजिस्ट्रेटचा हुकूम मिळाला कीं गोळीबार करतात. एरवीं खुर्च्यांवर पाय टाकून बसलेले असतात. गल्ल्यांतून सुऱ्यांनीं भोसकणें व लाठ्यांनीं मारणें अप्रतिहतपणें चालू असलें तरी लष्करी सुव्यवस्था उठून तिकडे तसाच जमाव झाल्याशिवाय लक्ष देत नाहीं. हिंदूजवळ काठी मिळण्याची पंचाईत असते. ती तेवढी त्यांच्या हातांत सापडली कीं काढून घेण्यांत येई. पठाण मात्र दंड्या घेऊन सलामत पोलिसांपुढून जाऊं शके. यामुळें नगरांतील सर्व हिंदू सरकारचें धोरण पठाण व मुसलमान ह्यांच्या बाजूला झुकत आहे असें उघड उघड बोलूं लागले.

## 'आज शुक्रवार आहे'

'आज शुक्रवार आहे' दुपारीं १२ च्या प्रार्थनेनंतर मुसलमान दंगा मातवणार या भीतीनें सर्व नगरांतील भाग भयग्रस्त होऊन गेला होता. दंगा झालाच तर गिरगांव हा यच्चयावत् भाग प्रतिकारास इतका तयार होता कीं, सर्वांना कौतुक वाटलें. दाक्षिणी ब्राह्मण, मराठे, पाठारे प्रभु, सारस्वत व आद्यगौड ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि सर्व दाक्षिणी समाज लाठीबंद बनून ग्रँट रोड ते फणसवाडीपर्यंत आपापल्या भागांचें रक्षण करूं लागला. सकाळीं १० वाजल्यापासून शांतता-कमिटीच्या गाड्या व लॉऱ्या हिंडूं लागल्या. दुपारीं ३ वाजेपर्यंत शहरांत किरकोळ सुरी–भोंसकीच्या प्रकारापलाकडे कांहीं नव्हते. कांहीं दंगेखोर दोनशे गुंडांनीं शांतता–कमिटींतील लोकांची ऐट आणून हिंदूंना हूल दाखविण्याकरितां 'हिंदु–मुसलमानकी जय' ओरडत गिरगांव व काळबादेवी ह्या भागांतून जाण्याचा प्रयत्न केला. मुसलमानांची ही युक्ति ओळखून सर्व हिंदू एकदम पुनः सावध झाले. काळबादेवीवरून हे मुसलमान जात असतां त्यांच्यावर दगड फेकले गेले. 'हिंदु–मुसलमानकी जय' ओरडणारीं अर्धवट भुतें 'दीन दीन'ची भाषा गर्जूं लागलीं. सर्व नगरांत मारामारीस एकदम संध्याकाळीं रंग चढला. मदनपुरा, कामाठीपुरा व भेंडीबाजार इकडे मुसलमानांची गुंडागिरी प्राण घेण्याचा व्यवहार करीत होती. कामाठीपुऱ्यांतील शूर कामाठ्यांनीं मुसलमानांना असा निकराचा प्रतिकार केला कीं, त्यांना आठवणच राहावी. शुक्रवारीं एका दिवसांत ३६ माणसें ठार होऊन १२९ जखमी झाली. फोरस रोड, कामाठीपुरा, मदनपुरा, भेंडीबाजार येथून ट्रामगाड्या जाणें अत्यंत धोक्याचें झाल्यामुळें रात्रीं दहानंतर ट्रामगाड्याहि बंद करण्यांत आल्या.

## डांगे–निमकरांस आणा !

श्री. हॉर्निमन व व्ही. व्ही. देसाई हे मदनपुऱ्यांत गेले असतां तेथील मुसलमानांनीं त्यांच्यादेखत एका हिंदूला त्याची मान चिरून टाकून दिलें! हे पाहून त्यांनी त्याच मुसलमानांस एखादा कापडाचा तुकडा त्या जखमेस बांधण्यास मागितला. परंतु ते निर्दय पशु तिकडे मुळींच लक्ष देईनात. अखेरीस त्यांनीं पोलीस स्टेशनवर जाऊन पोलिसांकरवीं त्यास मॉर्गकडे रवाना केलें. तुमचें गाऱ्हाणें काय आहे तें सांगा असें हॉर्निमनांनीं त्यांस विचारतां ते मुसलमान म्हणाले, "डांगे, निमकर, सिलम, पुप्पाला ह्यांना आमच्याकडे धाडा. त्याच्याशीं आम्ही बोलूं." ह्या बोलण्यावरून येथें कांहीं भयंकर कल्पना घोळत असाव्या असें त्यांस वाटलें.

## जाळपोळ व लुटालूट

शनिवारीं ता. ९ रोजीं दुपारीं १२ पासून नागदेवी स्ट्रीटमध्यें दंग्यास प्रारंभ झाला. त्यांत चोवीस तासांत २१ हिंदू ठार झाले. बारभाय मोहोल्यांत एका मुसलमानाच्या घरास आग लावण्यांत आली.

नागदेवी स्ट्रीट व बारभाय मोहोल्ला ह्या दोन भागांत तर मुसलमानांनीं नुसता धुमाकूळ घातला होता. हिंदूंचीं दुकानें लुटण्यापलीकडे ह्या दिवशा दुसरा धंदाच त्यांनीं केला नाहीं! सकाळीं कामाठीपुऱ्यांत सहा हिंदूंना सुरे भोंसकून ठार मारण्यांत आलें. फोरस रोडवर तर व्हिक्टोरिया हांकणारे लोकच हिंदूवर तुटून पडूं लागले. ह्या सर्व लोकांना पोलिसांनीं एकदम एका धर्मशाळेंत पकडलें आहे. सर्व शहरांतील ट्रामगाड्या बंद पडल्या असून पोस्ट देखील वाटणे धोक्याचें झालें आहे. इलेक्ट्रिक कंपनीचे नोकर भिऊं लागल्यामुळें लष्कराच्या रक्षणाखालीं दिवाबत्तीचें काम होत आहे. गेले आठ दिवस मुंबईतील व्यापार बंद पडला असून स्वसंरक्षण करण्याचा चंग प्रत्येकानें बांधला आहे. हिंदूंना साहाय्य करण्याकरितां बऱ्याच नामांकित हिंदु डॉक्टरांची एक कमिटी स्थापन झाली आहे. त्याशिवाय हिंदूंना साह्य करण्यासाठीं एक संस्था शेठ लालजी नारायणजी ह्यांच्या पेढीवर स्थापन झाली आहे.

**'कर्फ्यूऑर्डर ची' अम्मलबजावणी**

ता. ९ रोजीं दुपारीं डॉ. देशमुख यांच्या नेतृत्वाखालीं असलेल्या शांतता-मंडळाच्या मध्यवर्ती कार्यकारी कमिटीनें गव्हर्नरांची दुपारीं १२ वाजता भेट घेतली. त्या वेळीं गव्हर्नरसाहेबांच्या विचाराकरितां शिष्टमंडळानें पुढील सूचना ठेवल्याः— (१) सर्व दारूचीं दुकानें बंद करावीं. (२) उडाणटप्पू लोकांना एकदम पकडावें. (३) पांच किंवा पांचापेक्षां अधिक लोकांचा जमाव मोडण्यांत यावा. (४) अधिक सैन्य आणण्यांत यावें. याशिवाय देवळे व मशिदी ह्यांच्या रक्षणार्थ लष्कर ठेवण्यांत यावें असेंहि शिष्टमंडळानें सुचावले. ह्यातील सूचना आपण अमलांत आणूं असें गव्हर्नरांनीं आश्वासन दिलें. लगेच मुंबईच्या चीफ प्रेसिडन्सी मॅजिस्ट्रेटांनीं सर्व रहिवाशाना उद्देशून १४ दिवसांपुरता असा हुकूम काढला आहे कीं, पांचापेक्षां अधिक लोकांनी सायंकाळीं ७ ते सकाळीं ६ (स्टँ. टा.) पर्यंत पुढील भागात हिंडणें हे बेकायदेशीर मानलें जाईल. गिरगांव, काळबादेवी, डोंगरी, भेंडीबाजार, कामाठीपुरा, मांडवी, भुलेश्वर, खेतवाडी, नागपाडा, माटुंगा, दादर, नायगांव, माहीम, डिलाईल रोड व परेळ.

शनिवारीं दुपारीं जे. जे. हॉस्पिटलसमोरच्या नाक्यावर एका मुसलमानाने एका हिंदूचा खून केला. येथें लष्कर व पोलीस हजर होतें. त्यांना काहीं करतां आलें नाहीं! हा खून पाहून एक सोल्जर बेशुद्ध झाला! खून करणारा इसमहि पकडला गेला नाहीं! याच दिवशीं एका तबेल्यांत ५० मुसलमान पोलिसांनीं गिरफदार केले.

# मुंबईत गाजणारी मोपलेशाही

मुंबई शहर म्हणजे सदा पैशा-आडक्याच्या देवघेवींत व उद्योग–धंद्याच्या उलाढालींत गढलेलें असावयाचें. पण गेल्या आठवड्याच्या प्रारंभीं त्याचे जगांतील एका जंगी व्यापारी पेठेचे हें स्वरूप नाहींसें होऊन त्या ठिकाणीं रणांगणाचा देखावा दिसूं लागला आणि आठवड्याच्या अखेरीस तर तेथील व्यापारी मोहल्ल्यांतूनहि स्मशानाचा खिन्न शुकशुकाट पसरला. मुंबई शहर बकाली आहे. त्यांत दक्षिणेतील मराठा, गुजराथेंतील बनिया, कानपूरचा पुरभय्या व जलालाबादेकडील पठाण अशा भिन्न प्रांतांच्या, भिन्न भाषांच्या व भिन्न चालीरीतीच्या लोकांच्या गांठी पडून त्याचे परस्परांशीं व्यवहार चालत असल्यामुळें थोड्याशा गैरसमजुतीनें व अज्ञानानें त्यांजमध्ये बेबनाव केव्हां माजेल याचा नेम नसतो. या दृष्टीनें मुंबईची तब्बेत एखाद्या लहरी माणसाप्रमाणें बनली आहे. याचा अनुभव यापूर्वी अनेक वेळां आला असून गेल्या वर्षांत तर त्यास संपाचा शापच मिळाला आहे.

संपाच्या या दीर्घ काळात गिरणी कामगारांना पोटांत भुकेनें कल्लोळ माजवून दिला असतांहि पराकाष्ठेची शांतता राखली ही गोष्ट त्यास अत्यंत भूषणावह होय यांत शंका नाहीं. परंतु कामगारास या शांत वृत्तीचे बक्षीस शासनाच्या रूपानें मिळूं लागलें आहे! पठाणांविषयी आपलेपणा अगर प्रेम कोणास वाटावें असा पठाणात काय गुण आहे! त्यांची ती बुरुजी तुमान, उग्र कल्ले, फिरवून बांधलेला अस्मानी साफा आणि क्रूर मुद्रा हिंदी माणसास त्याजपासून दूर चार हातावर उभे राहाण्यास बजावते. त्यांतून त्याचा धंदा पडला उधारीचा व व्याज-बट्ट्याचा. गरजू माणसें त्यांच्याजवळचें कापड उधार घेतात किंवा कर्ज काढतात. ही उधारी व कर्ज वसूल करण्याचे त्यांचे मार्ग कोणते असतात याची माहिती ऐकून तरी बहुतेकास आहेच. संपाच्या दिवसांत पाव आण्यासहि महाग झालेले मजूर पठाणांच्या आयतेच जबड्यांत सांपडले व त्यांनीं आपल्या सावकारी दाढेखालीं त्यांस निष्ठुरपणानें भरडून काढलें. याशिवाय मजुरास पठाणांकडून दुसरा पेच बसला तो असा कीं, तेलासारख्या कित्येक कारखान्यांतून पठाण लोक संपात सांपडलेल्या मजुरांच्या कामावर जाऊन त्यांच्या संपाची

नांगी तोडूं लागले. पठाणांविषयीं मजुरांच्या मनांत अढी बसण्यास अशा प्रकारचीं बरींच कारणें प्रथमपासून घडून आलीं होतीं. व त्यांतच पठाण लोक लहान मुलांना बडोद्यापाशीं बांधल्या जाणाऱ्या पुलांत पुरण्याकरितां पळवून नेतात या कंडीची भर पडल्यामुळे आधींच खवळलेले मजूर पठाणांवर उसळले व दंग्यास सुरवात झाली.

शब्दानें शब्द वाढतां तसा दंग्यानेंहि दंगा वाढतो. हा दंगा पठाण व मजूर यांच्यामध्येच राहिला असता तर मजुरांची समजूत पटवून देतांच तो थंडावण्याचा संभवहि होता. परंतु दंगा सुरू झाल्यावर तो कधीं थांबेल अशी काळजी करणारीं माणसें जशीं असतात तशीच तो चवेल कसा याविषयींहि हिकमती लढविणारीं कित्येक धूर्त व विघ्नसंतोषी माणसें आढळतातच. दंग्याचें मूळ स्वरूप मुले पळवून नेण्याचेच असल्यानें एका बाजूस पठाण व दुसऱ्या बाजूस हिंदु-मुसलमानादि सर्व समाज असे तट पडावयाचे. कारण मुले पळवून नेण्याची जी हूल उठली तिच्यात एका मुसलमान बोहऱ्याच्या मुलासहि नेण्याचा प्रयत्न झाल्याची बातमी होती. परतु पठाण हे मुसलमान व त्यांजवर हत्यार उचलण्यांत हिंदु मजूर प्रमुख. याचा फायदा घेऊन हा तंटा हिंदु-मुसलमान तंट्याच्या वळणावर कोलवून देण्यांत आला. तंटा या वळणावर जाईल असे मौ. शौकतअल्ली टाईम्सच्या बातमीदारापाशीं बोलले व ती गोष्ट टाईम्सकाराच्या दृष्टीने स्वाभाविकच महत्त्वाची असल्यामुळे टाइम्सकारांनीं ती लगेच प्रमुखत्वाने प्रसिद्ध केली. आणि काकतालीय न्याय म्हणा वा कार्यकारणसंबंध म्हणा, त्या दिवसापासून पठाणांस कित्येक मुसलमान सामील झाले व एका पक्षास पठाण व मुसलमान आणि दुसऱ्या पक्षास एकटे हिंदू अशा चकमकी मुंबई शहरांत झडूं लागल्या!

पठाणांची जात आधींच अर्बुज. त्यांत त्यांना मजूरवर्गाचा हल्ला होत असलेला पाहून सरकाराकडून संरक्षणाचें आश्वासन मिळालें आणि तशांत त्यांस मुसलमान गुंडांचा व मवाली लोकांचा पाठिंबा मिळूं लागला! मग काय विचारतां? 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला' अशी स्थिति होऊन ते इतके पिसाळले कीं, पिसाळलेले कुत्रें देखील दंश करतांना कांहीं विचार करील, पण तेवढाहि विचार पठाणांनीं दाखविला नाहीं. गोफणीचे दगड, पाजळलेले सुरे व उगारलेले सोटे याखालीं त्यांनीं हिंदूंची कत्तलच मांडली आणि बुधवारपर्यंतच्या पहिल्या चार दिवसांत जितकी प्राणहानि झाली नव्हती तितकी गुरुवारपासून एकेक दिवसांत घडून येऊं लागली. आजतागायत या दंग्यांतील एकंदर मृत्यु-संख्या १४४ व जखमी झालेल्यांची संख्या ५००च्यावर जाऊन पोंचली असून ती अजून वाढत आहे.

पठाण हे जात्याच अत्यंत क्रूर व केवळ उपटसुंभ असल्यामुळें त्यांच्या हातून हिंदूंचा फारच मोठ्या प्रमाणावर संहार होत आहे. इतकेंच नव्हे तर पोलीस शिपाई, पोलीस इन्स्पेक्टर, पोलीस कमिशनर यांचीहि कदर न बाळगतां त्यांसहि पठाणांनीं लाठ्यांचा प्रसाद दिला व इन्स्पेक्टर प्रिस्टली यांचा दगडानें खून पाडला. मग त्यांनीं हिंदु देवतांच्या मूर्ती फोडल्या असतील, देवालयांना आगी लावून दिल्या असतील किंवा पोलिसांच्या देखत मारवा. ड्यास मरेपर्यंत मारून त्याचेजवळील चांदीच्या चिपा नेल्या असतील यांत आश्चर्य तें कसलें?

हिंदूंचें रक्षण सरकाराकडून व्हावें तसे होईना आणि पठाणांना पोलिसांचा व लष्कराचा अद्यापहि वचक बसेना. याचा अर्थ मुंबईत पठाणांनीं मोपलेशाही राजविण्यास सुरवात केली असाच होतो. ब्रिटिश नोकरशाही आम्ही हिंदुस्थानांत आहों म्हणूनच हिंदुस्थानांत शांतता व बंदोबस्त राहातो अशी वेळीं अवेळीं बढाई मारते आणि लष्करी खात्यावर होणाऱ्या पन्नास-साठ कोटि रुपयांच्या खर्चाचें समर्थन करते. पण आज मुंबई शहराकडे पाहावें तों नोकरशाहीची ही घमेंड जिरून तिनें आपलें तोंड लाजेनें लपवावें अशीच स्थिति आढळेल. पांच-सहा दिवस लष्करानें मुंबईत तळ दिला असून व नाक्या नाक्यांवर पलटणींचा व मशीनगन्सचा दिमाख दाखविण्यांत येत असून दंग्याचा जोर अणुमात्रहि न ओसरतां सारखा वाढत आहे ही काय इंग्रजी राज्याची कदर, का हा इंग्रजी राज्यांतला बंदोबस्त, कां ही इंग्रजी राज्यांतली शांतता! तुम्ही स्वतःस सुधारलेले राज्यकर्ते म्हणवीत असतां व एवढें मोठें सैन्य पदरीं बाळगीत असतां तुमच्या सशस्त्र फौजेला निःशस्त्र प्रजेतील दंगा शमवितां येत नाहीं या तुमच्या नालायकीस जगाच्या इतिहासांतहि तोड सांपडणें कठीण आहे असेंच नोकरशाहीस म्हणावें लागतें.

पठाणांचा दंगा थांबविण्यास गोळ्या घालणें व पलटणींचा छबिना गांवांतून मिरविणें हा खरा परिणामकारक उपाय नव्हे. मुंबईतील पठाणांची वस्ती चार-दोन हजारांहून जास्ती नसेल. अशा लोकांना शहरांत मोकाट राहूं देऊन त्यांच्या सुऱ्यांना तुम्हांला आवरून धरतां येत नसेल तर त्या सर्वांस पकडून मुंबईबाहेर एखाद्या ठिकाणीं कांहीं दिवस डांबून ठेवणें हेंच योग्य नव्हे काय? बरें, या प्रकारचा उपाय आपल्या बथ्थड डोक्यास सुचत नसल्यास त्या बाबतींत मुंबईतील प्रमुख नागरिकांची

सभा भरवून त्यांचा सल्ला घेणें मुंबईसरकारचें कर्तव्य होतें. नवीन गव्हर्नर सर फ्रेडरिक साइक्स यांनीं दंग्यामुळें दिल्लीस जाण्याचा आपला बेत रहित केला हें ठीक झालें. पण दिल्लीस जाण्याचा बेत रहित करून मुंबईंत राहिलेले गव्हर्नरसाहेब मुबईस वाळकेश्वरीं स्वस्थ बसल्यास त्याचा फायदा जनतेस काय मिळणार ? ते दंग्याच्या भागांतून हिंडले नाहींत किंवा दंगेखोरांच्या पुढाऱ्यांस बोलावून त्यांची त्यांनीं समजूत घातली नाहीं. ही काय प्रजेविषयीं कळकळ कीं राज्यकारभाराची दक्षता म्हणावयाची !

उलटपक्षीं जनतेचे पुढारी पाहा. मुंबई कॉर्पोरेशनचे अध्यक्ष डॉ. देशमुख यांनीं कॉर्पोरेशनचे सभासद व इतर नागरिक यांची उपायसंशोधनासाठीं व योजनेसाठीं ताबडतोब सभा बोलावली आणि लगेच कामास सुरवातहि केली. पण त्या सभेकरितां मुंबईसरकारने आपला एकहि जबाबदार अधिकारी पाठविला नाहीं, कीं नागरिकांच्या मनोवृत्तीची क्षिति बाळगली नाहीं. डॉ. देशमुख यांनी सभा भरवून मुख्य कमिटी व पोटकमिट्या नेमल्या आणि त्या कमिट्यांबरोबर दंग्याच्या कहरांत आपला जीव धोक्यांत घालून ते जागोजाग हिंडूं लागले. सौ. अवंतिकाबाई यासारख्या अबलांनींहि त्याच्याबरोबर जाण्याची तयारी दर्शविली. इतकेंच नव्हे तर कमिटींतील सभासद लोकांस शांत करण्याकरितां शहरांत हिंडत असतां तरुणांचें पुढारी नरीमन यांनी पठाणांच्या हातांतील लाठीचा तडाखाहि खाल्ला, पण आपलें काम सोडलें नाहीं. ही खरी कळकळ कोणीकडे आणि सरकारची कागदोपत्रांतली बेगडी कळकळ कोणीकडे!

सरकारास नालायक म्हणण्यानें राग येतोच. पण त्यास पठाणांचे पक्षपाती असे कोणीं म्हटले कीं नुसता रागच नव्हे तर चीडहि येते. तथापि जे प्रकार घडत आहेत त्यांवरून लोकांनीं तरी काय समजावें? वास्तविक पाहतां पठाणांचें वर्तन नेहमींच सामान्यतः चेंढलपणाचें व दंगेखोरीचें असत. अशा लोकांना शांतताप्रिय हिंदी समाजांत सरकार बिनहरकत कां वावरू देतें हेंच आम्हास समजत नाहीं. पठाण लोक कांहीं हिंदुस्थानाचे रहिवासी नव्हेत त्यांस अफगाणिस्थानांतून, बलुचिस्थानांतून अगर सरहद्दीवरून हिंदुस्थानात येऊं देण्यापूर्वीं सरकारानें त्यांची पात्रता पाहावयास पाहिजे व जे कायदा पाळणारे, उपजीविकेचें साधन असलेले व शांततेनें राहणारे आढळतील त्यांनाच हिंदुस्थानांत शिरण्याचा परवाना देण्यांत आला पाहिजे. हिंदी मनुष्य कितीहि सुशील व सुशिक्षित असला तरी त्यास ब्रिटिश साम्राज्यांतील द. आफ्रिका, कानडा, व आस्ट्रेलिया यासारख्या वसाहतींतून पाऊल ठेवण्यास देखील परवानगी मिळत नाहीं. आणि पठाणांस मात्र हिंदुस्थानांत यावयास व सावकारीच्या नांवाखाली प्रजेस लुटावयास व कुटावयास मुभा असावी हा अन्याय नव्हे काय ?

पण हा अन्याय ज्याअर्थी हिंदुस्थान–सरकार चालूं देतें त्याअर्थी त्याला तशींच कांहीं तरी कारणें असलीं पाहिजेत. पठाणास आगापिच्छा कसलाच नसतो. जो त्यास भाकरी घालील त्याची हवी ती चाकरी करण्यास तो एका पायावर तयार असतो. ज्या कामांत हिंदी नोकरांचा सरकारास उपयोग नसतो त्या कामावर पठाण नेमला जातो बार्डोलींतील सत्याग्रही शतकऱ्यांस वठणीवर आणण्याकरितां मुंबईसरकारनें हेच उपटसुंभ पठाण बार्डोलीवर सोडल्याचें वाचकांच्या लक्षांत असेलच. बार्डोलीपासून सरकार पठाणांचें एक प्रकारें मिंधें बनलें आहे, व ही मिंधेपणाची आठवण सरकारास देऊन अशा पठाणांचें रक्षण सरकार कां करीत नाहीं असा सवाल दंग्याच्या प्रारंभींच मुंबईच्या टाईम्स पत्रानें सरकारास विचारला होता हे लक्षांत ठेवण्यासारखे आहे. मुंबईसरकार व पठाण यांचा लागाबांधा टाईम्सकारांच्याच लेखावरून असा चव्हाट्यावर आल्यामुळें सरकार पठाणांचें बंड मोडण्याचा कसून प्रयत्न करीत नाहीं असा कित्येकांस संशय येऊं लागला आहे. सरकारानें आपले पोलीस व लष्कर काढून घ्यावे, आमचा बंदोबस्त आम्ही करूं असे उद्गार मुंबईच्या कॉर्पोरेशनच्या सभेत कित्येक वक्त्याच्या तोंडून वैतागानें निघाले त्याचें बीज तरी हेंच असावे. गेल्या असहकारितेच्या चळवळीच्या प्रारंभीं मलबारांत मोपल्यांचें बंड होऊन हिंदूंवर सरकारास शरण जाण्याची पाळी आली तशा प्रकारची ही पाळी येती असहकारिता क्षितिजावर उदय पावण्यापूर्वीच हिंदूंवर यावी असा तर यांत नोकरशाहीचा हेतु नसेलना ?

तथापि हिंदूंनाहि एका बाबतींत इषारा देणें जरूर आहे. मुसलमानांत जशी जूट व संघटना आहे तशी हिंदूंत नसल्यानें इतके हिंदू पठाणांच्या अत्याचारांना बळी पडत आहेत ही तर गोष्ट लाजिरवाणी आहेच. पण त्या पेक्षांहि दुसरी लाजिरवाणी गोष्ट अशी कीं, एरवींच्या दिवसांत या पठाणांना पोसण्यांत हिंदूंचाहि हात असतो. मुंबईंत असे कित्येक हिंदू कारखानदार, सावकार व दुकानदार आहेत कीं त्यांना आपल्या कारखान्याच्या व दुकानाच्या पहाऱ्याकरितां व उधारीच्या वसुलीकरितां पठाण कामावर ठेवण्याची दुर्बुद्धि होऊं लागली आहे. हिंदूंच्या या आत्मघातकी वर्तनामुळेंच पठाणांचें प्रस्थ दिवसेंदिवस मुंबईंत वाढत आहे. शांततेच्या दिवसांत दूध पाजल्याचे

उपकार हें अफगाणी लोक आतां गरळ ओकून अपकाराच्या रूपानें फेडीत आहेत. या उपटसुंभ उच्छृंखळांना सरकारनें या देशांत यावयासच बंदी केली पाहिजे हा उत्तम मार्ग व त्यांना येऊं दिले तरी त्यांच्यावर गुन्हेगार जातीचे सर्व निर्बंध लादून सतत कडक नजर राखावी हा मध्यम मार्ग. परंतु सरकारनें अशा रीतीनें त्यांचे निर्मूलन किंवा नियंत्रण केले नाहीं तरी मुंबईतील प्रतिष्ठित व शांतताप्रिय लोकांनीं पठाणरूपी सर्पांना कोणत्याहि प्रकारें आश्रय देऊन पोसूं नये हाच अखेरचा स्वावलंबनाचा मार्ग होय. अशी दूरदर्शी दक्षता मुंबईतील शांतताप्रिय कारखानदार, दुकानदार व सावकार न दाखवितील तर मुंबईत गेल्या आठवड्यांत जशी मोपलेशाही गाजली व अजून गाजत आहे तशी मोपलेशाही पुनः गाजण्याचें बीज आपल्याच हातानें पेरून ठेविल्याचा दोष त्यांच्या माथ्यावर आल्याशिवाय आणि त्याचा परिणाम सगळ्या समाजास भोगावा लागल्याशिवाय राहाणार नाहीं हें त्यांनीं लक्षांत ठेवावें.

# कलकत्त्यातील प्रेक्षणीय स्थळें

( ले.—वासुदेव कृष्ण भावे )

### लेखांक २ रा

सतराच वर्षें झालीं, त्यापूर्वी कलकत्ता ही हिंदुस्थानाची राजधानी होती. राजधानीचा हा मान कलकत्त्यास दीडशेंहून अधिक वर्षें लाभला. राजधानी म्हटल्यानंतर राजधानीचा मान राखण्याची जबाबदारी इंग्रज सरकारावर स्वाभाविकच पडली. पण ती इंग्रज सरकारनें मानली ही गोष्ट त्याहूनहि अधिक महत्त्वाची. कलकत्त्यास अनेक युक्त्यांनी नटविण्यांत इंग्रज अधिकाऱ्यांनी कसूर केली नाहीं हें कोणासहि कबूल करावें लागेल. मोठीं शहरें सजविण्याचीं लेणीं ठरलेलीं आहेत. एखादा अजबखाना, एखादा शिकारखाना, कोठें बगीचा, कोठें ग्रंथसंग्रहालय आणि मोठा टाऊन हॉल बांधला कीं मोठ्या शहराचा शृंगार संपला. लग्नांत मुलीच्या अंगावर घालावयाच्या दागिन्यांतलाच हा प्रकार. सरी वाकी व गोटपाटल्या मुलीच्या अंगावर दिसल्या म्हणजे मुलगी श्रीमंताच्या घरीं पडली असा लौकिक होतो. पण दागिने तेच असले तरी घालण्यांत फरक आहे. हौशी सासरा आपल्या लाडक्या सुनेच्या अंगावर चांगल्या घडणीचे, गुळासारख्या सोन्याचे व भरपूर भाराचे दागिने घालतो तर हुंड्याच्या पैशाकडे पाहून घालणारा सासरा केवळ डागाला डाग उभा करतो.

हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांताला किंवा इलाख्याला एक राजधानी आहे. व त्या राजधानींत वरील इमारतींपैकीं बहुतेक इमारती अधिक उण्या प्रमाणांत आहेत. मुंबईच घेतली तर तिच्यांतहि राणीची बाग आहे व त्या बागेत एक शिकारखानाहि आहे. पण ती बाग व तो शिकारखाना मुंबईच्या लौकिकांत भर न घालतां आहे हा लौकिक घालवितात मात्र. कारण मुंबईतील राणीच्या बागेइतकी चांगली बाग कोणत्याहि सामान्य म्युनिसिपालिटीची आढळेल आणि तेथील शिकारखान्याहून जनावरांचा अधिक संग्रह अलीकडे एखाद्या सर्कशीपाशीहि पाहावयास सांपडेल. पण अशा प्रकारची वेठ कलकत्त्यानें वळलेली नाहीं. तेथील या सर्व संस्था खरोखरच भव्य व पाहाण्याजोग्या आहेत.

### चिडियाखाना

कलकत्त्यास शिकारखाना व बगीचा यांची मुंबईप्रमाणें सांगड घातलेली नाहीं. शिकारखाना म्हटला कीं त्याकरितां एक बाग ठेवावी लागतेच. पण त्या बागेस स्वतंत्र असें महत्त्व नसतें. जीं जनावरें बाळगावयाचीं त्यांना जलसंचय, हिरवळ कुरण व झाडेंझुडपें यांची गरज असल्यामुळे त्यासाठीं राखलेला बगीचा शिकारखान्याची शोभा वाढविण्यास आयताच उपयोगी पडतो. तशा प्रकारची बाग कलकत्त्याच्या शिकारखान्यांत आहे, पण ती मुंबईसारखी वनस्पतिशास्त्रज्ञास आवश्यक अशी बॉटॅनिकल गार्डन नव्हे. कलकत्त्याची बॉटॅनिकल गार्डन कलकत्ता शहराच्या दुसऱ्या टोकाला सिदपूरपाशी आहे व तीहि समृद्ध व नमुनेदार आहे. इंग्रजींत शिकारखान्यास झू म्हणतात. पण बंगालींत त्यास चिडियाखाना या नांवानें ओळखण्यांत येतें. हा चिडियाखाना विस्तीर्ण व देशोदेशींच्या जनावरांनीं व पशुपक्ष्यांनी गजबजून गेला आहे खरा, पण त्यासाठीं स्थळ मात्र चांगल्या ठिकाणीं शोधून काढलेलें नाहीं. हा चिडियाखाना कलकत्त्यास किदरपूर भागांत असून त्याकडे जातांना कलकत्त्याचें

हिंसाव्रत ठसठशीतपणें दृष्टीस पडतें. त्याच वाटेवर मटन मार्केट आहे व तें नाकाला पदर लावल्या-वांचून दक्षिणी माणसाला तरी निदान पुढें पाऊल टाकूं देत नाहीं.

## हिपॉपॉटेनस

सर रिचर्ड टेंपल हे १८७४ ते ७७पर्यंत बंगालचे लेफ्टेनंट गव्हर्नर असतां चिडियाखाना बांधण्यांत आला. यांत एकंदर प्राणी एक हजारापर्यंत तरी असतील ते आशिया, युरोप, आफ्रिका व अमेरिका या चारहि खंडांतून आणिलेले आहेत, आणि त्यांत स्थलचर, जलचर व खेचर असे तीनहि प्रकार आहेत. त्यांच्या स्थूल जाती सामान्य मनुष्यास समजतील. पण एका जातींत पडलेल्या पोटजाती जातिभेदाची आवड असलेल्या हिंदूंसहि ओळखतां येणार नाहींत, मग इतरांची कथा काय ? हा भेदाभेद फक्त प्राणिशास्त्रज्ञच सांगूं शकतील. एरवींच्या माणसास फार मोठें, फार भयंकर व फार चमत्कारिक यांचेंच कौतुक अधिक हत्ती सर्वांच्या पाहाण्यांत असतोच. पण हिपॉपॉटेनस हा पाण्यांतला हत्ती पाहिला कीं, त्यास कांहीं विशेष पाहिल्याचें समाधान वाटतें. हिपॉपॉटेनस साधारण-पणें गेंड्याच्या आकाराचा असतो. त्याच सळसळीत व दुलदुलीत अंग पाहून त्याजविषयीं आवड उत्पन्न होण्याऐवजीं शिसारीच येते. तथापि त्यास येणारा-जाणारांनीं खावयाला घालून इतका माणसाळून टाकला आहे कीं त्याच्या आवाराजवळ आलेल्या-पुढें तोंड वेंगाडून तो खाण्यास मागतो. कासवें कोणत्याहि विहिरींत कवीच्या डोक्यांतील कल्पने-प्रमाणें विहरत असतात.पण त्यांचा आकार मोठ्यांत मोठा म्हटला तर लहानशा परातीएवढा, व लहानांत लहान पोळपाटाएवढा. असले पोळपट अयोध्येस शरयू नदीच्या कांठावर हवे तितके पसरलेले असतात. त्यांना धुण्याचे दगड समजून त्याजपाशीं जाऊन फसलेलीं माणसेहि कमी नाहींत. चिडिया खान्यांतील एका विभागाजवळ येतांच आम्हाला दोन तीन हांडे पालथे घातलेले दिसले. हांड्याना आपल्या इकडे तरी कोणी प्राणी समजत नसल्यामुळें त्यांजकरितां तारेचें वेगळें कुंपण उभारण्याचें प्रयोजन आमच्या लक्षांत येईना ! तोंच एका हांड्याखालून कासवानें आपल्या अंगाचा पाटा बाहेर काढतांच तें दगडी कासव असून त्याच्या अंगावर पडलेला हांडा नसून त्याचा भईकोट किल्ला आहे अशी आमची खात्री पटली.

घोड्यांत व झिब्र्यांत मोठासा फरक नाहीं. घोड्यावर पट्टेदार झूल चढविला किंवा त्याच्या अंगावर शिमग्यांतील वाघाच्या सोंगासारखे पट्टे ओढले कीं घोड्याचा झिब्रा बनतो. हे झिब्रे भिमथडी तट्टाहून किंचित् लहान असून शरीरानें मात्र अधिक बळकट दिसतात. आपल्याकडे सहसा दृष्टीस न पडणारे प्राणी म्हणजे पाण्यांतील मुंगुस, हंस व गरुड हे होत. सोनेरी पंखाचा मासाहि याच मासल्याचा. चिडियाखान्यांत हरीण, चिमण्या, पोपट व मैना यांचे थवेच्या थवे आहेत. पण त्यांचे कोणास आश्चर्य वाटणार नाहीं. आम्हास आश्चर्य वाटलें तें निराळ्याच गोष्टीचें. सर्पाला दूध पाजणें यासारखा मूर्खपणा दुसरा कोणता ? पण या चिडियाखान्यांत सापाला दूध पाजतातच व त्या-खेरीज सापांना गाद्या घालून त्याजवर निजवितातहि. अशा प्रकारच्या गाद्या व त्या ज्यात घातलेल्या आहेत अशा खोल्या येथें पांच-पंचवीस तरी आहेत.सापांची इतकी मिजास गारोडीहि ठेवीत नाही व नागपंचमीस नागोबा पाटींत घेऊन व नागोबाला दूध म्हणून ओरडणारे वैदूहि राखीत नाहींत. अशा प्रकारे वेगवेगळ्या खोल्यातून लोळत पडलेले कृष्ण-सर्प, धामण, मण्यार, अजगर, फुरसें इत्यादि जातींचे सर्प पाऊणशें भरतील.

## जादूघर

कलकत्त्यांतील अजबखाना ऊर्फ पदार्थसंग्रहा-लय चिडियाखान्याहूनहि दर्शनीय आहे. हे पदार्थ-संग्रहालय सन १८६६ सालीं बांधण्यात आलें. ते तीनशें फूट लांब व २७० फूट रुंद असून चारंगी हा कलकत्त्याचा जो भरवस्तीचा व उत्कृष्ट इमारतींचा भाग त्यांत आहे. त्यासाठीं बांधलेली इमारत भव्य, मजबूत व उंच आहे. त्यास बंगाली लोक जादूघर म्हणतात. त्याचीं अनेक दालनें आहेत व त्यांत पायांत घालावयाच्या जोड्यापासून तों थिबा राजानें बसावयाच्या सुवर्ण सिंहासनापर्यंत असंख्य वस्तूंचा संग्रह करण्यांत आला आहे. महाराष्ट्रीय लोक ज्या जातीचा जोडा पायात घालतात त्यास महाराष्ट्राबाहेर कोठेंहि तोड सांपडणार नाहीं. याकरितां त्याजकडे परप्रांतीय माणसें पाहून विलक्षण तोंडें करतात. महाराष्ट्रीय मनुष्याचा थांग लावण्यास तत्रस्थ पोलिसांसहि हा जोडा चेहरेपट्टीसारखा उपयोगी पडणार आहे. जगांतील पादत्राणांचे एका कपाटांत संमेलन भरविण्यांत आलेलें असून त्यांत आम्हा मंडळीच्या पायांतील जोड्यांचा भाऊबंद आढळतांच परदेशांत आपला एक मित्र भेटल्याचा आम्हास आनद वाटला.

वरील अजबखान्यात पुराणवस्तूंचे जितके अवशेष सांठविले आहेत तितके इतरत्र क्वचितच पाहाण्यास मिळतील. काशीपासून रामेश्वरापर्यंत व पेशावरपासून पुरीपर्यंत जेथें जेथें जुन्या वस्तू सांपडल्या त्या सर्वांचे नमुने अजबखान्यांत मांडून ठेवले आहेत. त्यांत बिहारमधील बुद्धगया, ओरिसा-

मधील भुवनेश्वर, सिंधमधील मोहनजोडेरो व अफगाणिस्थानामधील गांधार किंवा कंदाहार यांतील वस्तू महत्त्वाच्या होत. गांधारांतून बुद्धाचे ब्रॉंझ धातूचे पुतळे, मोहनजोडेरो येथील कुंभारकाम याचें विशेष कौतुक वाटतें. डाक्क्याचा मलमल, हस्तीदंती ताजमहाल, देवमाशाचा पंचवीस हात लांबीचा सांगाडा, सबंध भरगच्चा वस्त्र, एक एक हात रुंदीचे जरीचे कांठ यांतील कौशल्य व भव्यपणा पाहून मनुष्य थक्क होतो.

## ईजिप्तमधील ममी

पेंढा भरून ठेवलेल्या प्राण्यांचें दालन फारच गंभीर व उद्बोधक आहे. त्यांत पशु, पक्षी, जलचर, श्वापदें व सर्प शेकडो नव्हे हजारो आहेत. सिंह आपले जबडे पसरून व पंजे पिंजारून बसले आहेत, वानरें झाडांच्या फांद्याला बिलगली आहेत, सापानी वेटोळीं केलीं आहेत व माणसांचे सांगाडे ओणवे अगर उभे राहून बाहेरून सुंदर दिसणाऱ्या मनुष्याच्या शरीरातील हिडिस अवयव उघडून दाखवीत आहेत हें पाहून मनुष्य दचकतो, त्यास आपण यमपुरीतून वावरत आहोंत व आपल्या भावी स्थितीचे भेसूर चित्र आजच जिवंतपणीं पाहात आहोंत असा भास होऊन त्याच्या मनावर खिन्नतेचा ठसा इतका उमटतो कीं तो अजबखान्यांतून बाहेर पडल्यानंतरहि निघून जाण्यास बराच वेळ लागतो शिकारखान्यांत श्वापदाप्रमाणे मनुष्ये तरी दाखविण्यासाठीं ठेवलेलीं नाहींत. पण या अजबखान्यात तींहि आहेत. ईजिप्तमधील मनोऱ्याखाली पुरलेल्या ममी अनेकांच्या ऐकण्यांत असतील. तथापि त्यांचें दर्शन फारच थोडक्यांस घडलें असेल. अशा प्रकारची एक ममी अजबखान्यांत मुद्दाम आणून ठेवलेली आहे. ममी म्हणजे मनुष्याचें प्रेत. तें एका लांकडी पेटींत घालून व भोंवतालीं वस्त्र गुंडाळून मिसरी लोक जमिनींत पुरीत असत. त्या लांबट पेटीचे झांकण उघडून हे प्रेत टेबलावर ठेवून दिलें आहे. त्याचें मांस जाऊन फक्त कवट्या व सांगाडे शिल्लक राहिले आहेत.

अजबखान्यांत पेंढा भरून ठेवलेले सर्व प्राणी शिकारखान्यांत मरून पडल्यानंतर तेथून आणलेले दिसतात. प्राण्याची एकंदर स्थित्यंतरें तीन. सिंहासारखी हिंस्र श्वापदें अरण्यात आपल्या पायानें संचार करून व आपल्या गर्जनेने सर्व प्रदेश दणाणून सोडून आपल्या पंजानें आपले भक्ष्य मिळवीत. पण त्यांचें ते स्वातंत्र्य हरण झालें व त्यांस या शिकारखान्याच्या बंदिखान्यांत पडावे लागले. त्यांच्या शिकारखान्यांतील गर्जना दुर्बलांना भयभीत करण्याकरिता नसून स्वतःचें दौर्बल्य जगास कळविण्याकरितां असतात व त्यांचें भक्ष्य त्यांच्या पंजांनीं स्वपराक्रमानें संपादन केलेले नसून त्याच्या पराजयाने त्यांस मिळवून दिलेले असत. बंदिखान्यांत कोंडून मनुष्यप्राणी त्यास जिवंतपणीं ओरडावयास लावतोच. पण तो मेल्यानंतरहि त्याजकडून ओरडण्याचा सिनेमा करून घेतो. त्यांस जिवंतपणीं शिकारखान्यांतील बंदीखान्यांत कोंडण्यानें त्याचें समाधान होत नसून मेल्यावरहि त्यास अजबखान्याचा दुसरा बंदिखाना पाहावा लागतो. तेथेंहि सिंह ओरडतो, पण त्याची गर्जना त्याला स्वतःला ऐकूं येत नाहीं व दुसऱ्यालाहि ऐकूं जात नाहीं त्याने ओरडण्याकरितां एकदां उघडलेलें तोंड कधींहि मिटणार नाहीं, माकडानें झाडास मारलेली मिठी कधीहि सुटणार नाहीं व सर्पानें घातलेला विळखा कधींहि ढिला पडणार नाहीं. ते मृत असूनहि एक प्रकारें अमर आहेत किंवा मनुष्याची योजकता अशी आहे कीं त्यानें प्राणिसंग्रहाचा हा चित्रसंग्रहच बनविला आहे.

# अफगाणिस्थान व अमानउल्ला

## मनोरंजक व अंतस्थ माहिती

### ( पूर्वार्ध )

[ हल्लीं अफगाणिस्थानासंबंधानें पुष्कळ चर्चा सुरू आहे. अमीर अमानउल्ला यांचें नांव सर्वांच्या तोंडीं आहे. परंतु त्यांच्याविषयीं कोणी माहिती फारशी प्रसिद्ध केलेली नाहीं. आणि हल्लीं त्यांच्याविषयीं ज्या हकीकती प्रसिद्ध होतात त्या कांहीं विशेष हेतूनें कोणी बनवीत असेल असा संशय सहजच येतो. याकरितां सन १९२४–२५ सालाचे सुमारास मि. लोवेल थॉमस नामक एका अमेरिकन प्रवाशानें आपल्या पुस्तकांत अफगाणिस्थान व अमानउल्ला यांच्यासंबंधानें जी माहिती दिली आहे ती मनोरंजक वाटल्यावरून खालीं देत आहों. ही माहिती विश्वसनीय असावी असे म्हणण्याचे एक कारण, लेखक त्रयस्थ म्हणजे अमेरिकन आहे. व दुसरे कारण असें कीं, अफगाणिस्थानाला इंग्रजां-

पासून स्वातंत्र्य मिळाल्यावर व हल्लींची यादवी सुरू होण्यापूर्वी म्हणजे मधल्या शांततेच्या काळांत या अमेरिकन गृहस्थानें ती हकीकत लिहिलेली आहे. या हकीकतींत क्वचित् संभाषण असल्यामुळें मूळ लेखकाचें म्हणणें प्रथम पुरुषीं निर्देश करून दिलें आहे. —सं. केसरी.]

माझा मित्र मिरझा शहाबुद्दीनखान हा फ्रेंच चांगलें बोलतो. त्याच्याबरोबर 'बाबर' बागेंत बसून मी गोष्टी करीत होतो. सुप्रसिद्ध मोगल बादशहा बाबर याचें थडगें जवळच होतें. गोष्टीवरून गोष्टी निघाल्या शहाबुद्दीनखान म्हणाला "आमचे लोक बाबर शहाला अजून अत्यंत पूज्य मानतात. त्यानेंच प्रथम हिंदुस्थानाला काबूलच्या अमलाखालीं आणलें. जहांगीरच्या कारकीर्दींत काबुलातील अनेक बगीचे मूळ तयार केले गेले. नूरजहान अफगाण कुमारी होती. तिच्याच कारकीर्दींत इंग्रजांचा पाय हिंदुस्थानांत शिरला. एक दिवस तिच्या आवडत्या दासीच्या कपड्यांना आग लागून अंग भाजलें. तें इंग्रज डॉक्टराने बरें केलें व बक्षिसादाखल पैसा न घेतां, मोगलाच्या राज्यांत इंग्रजांकरिता व्यापाराची परवानगी मागून घेतली. अशा रीतीनें तुमचे पाढरे पाय काबूलला लागले!"

"पण मी तर अमेरिकन आहे, इंग्रज नव्हे!"

"इंग्रज काय व अमेरिकन काय, दोघेहि सारखेच. तुम्ही उद्यां आमच्या देशांत यंत्र आणून सोडाल; धूर माजवाल; धनी व गुलाम यांना एका पायरीवर आणून बसवाल, व आमच्या सद्धर्माचा नाश कराल. तुम्ही म्हणजे तुम्हीच नव्हे पण तुम्हाला मागून पुढें ढकलणारी भवितव्यता आहे. औरंगजेबानंतर अफगाण राजे पुष्कळ झाले. पण ते बहुतेक अपघातानें मेले. आम्ही या पहाडांत आपलें स्वातंत्र्य कायम ठेवण्याचा निश्चय केला आहे. इंग्रजांनीं आमच्या दरबारांत एकामागून एक अनेक वकील पाठविले. त्यांपैकीं कित्येकांचे येथें खून झाले. इंग्रजांनीं आमच्याशीं युद्धें केलीं. पण त्यांनीं या कामीं पैसा व शिपाई फुकट खर्ची घातले. शेवटीं अबदुल रहिमान (दोस्त महमदाचा नातु) यानें अमीरपद घेतल्यावर पुष्कळ स्थिरस्थावर झालें. त्यानें लहानपणीं पुष्कळ हाल-आपत्ती सोसल्या. पण तो मोठा कर्ता पुरुष होता. इंग्रज त्याला दरसाल सहा लक्ष रुपये खंडणी देत असत. रशिया, इराण व हिंदुस्थान या त्रिकूटाच्या दरम्यान अफगाणिस्थान सापडल्यामुळें अमीराला मोठ्या दक्षतेनें वागावें लागतें. पण अबदुल रहिमान या सर्वांना पुरून उरला.

## हबीबउल्लाखान

त्याच्यानंतर त्याचा मुलगा हबीबउल्लाखान (अमानउल्लाखानाचा बाप) गादीवर बसला तेव्हां राज्यांत शांतता होती. बापाच्यामागून मुलगा शांततेनें गादीवर बसल्याचें हें पहिलें उदाहरण! पण तें फार दिवस टिकलें नाहीं. लवकरच त्याचा खून झाला. २० वर्षांपूर्वी हबीबउल्लाखान राजपुत्र असतां, हिंदुस्थान पाहण्याला गेला होता. तेथें कर्झन व किचनेर यांनी त्याच्यावर चांगला छाप पाडली. त्याला 'फ्री मेसन' संस्थेंत नेऊन एका रात्रींत सगळी दीक्षा दिली! यामुळे तो इंग्रजांचा मोठा दोस्त बनला होता. महायुद्धामध्यें त्यानें इंग्रजांना फार साहाय्य केलें. जर्मनी व टर्की यांचे वकील त्याचेकडे येत. पण त्यांना बाहेरून गोडी दाखवून मोकळ्या हातानें तो रवाना करून देई पण इकडे दिल्लीला आपला खास वकील पाठवून त्यानें व्हाइसरॉयसाहेबांशीं गट्टी जमविली ही गोष्ट काबूलच्या लोकांना फारशी पसंत नव्हती. म्हणून १९१८ सालीं त्याच्यावर मारेकरी घालण्यांत आले, पण तो बेत फसला, तरी पुढल्या वर्षी (२० फेब्रुवारि १९१९) जलालाबाद येथें त्याच्या तंबूंत त्याचा खून झाला.

अमीराचा भाऊ नसरुल्लाखान याच्यावर खून केल्याचा संशय लोक घेतात. इतकेंच नव्हे तर त्याचे दोनहि मुलगे इनायतउल्ला व हयातउल्ला यांनीं नसरुल्लाखान याला राजा म्हणून कबूल केल्यामुळें, ते दोघेहि या खुनांत सामील असावेत असा लोकांना संशय आला. खुनानंतर जलालाबाद येथील कांहीं सैन्य नसरुल्लाखान याला जाऊन एकदम मिळालें पण त्याच वेळीं काबूल येथें असलेला अमानउल्लाखान यानें खजिना हस्तगत करून, शहर ताब्यांत घेतलें. त्याची आई उलिया हजरत बेगम ही मोठी कारस्थानी होती. तिनें थोरल्या दोघां मुलांना बाजूला सारून, अमानउल्लाचा पक्ष उचलला. लगेच काबुलामध्यें अमानउल्लाच्या नांवाची द्वाही फिरली. जलालाबादेला उरलेलें सैन्यही त्याला येऊन मिळालें. फेब्रुवारी ता. २७ स. १९१९ रोजीं अमानउल्लानें आपल्या नांवाचा जाहिरनामा काढला. नसरुल्लाखान नाइलाजानें पुतण्याला शरण जाऊन तूंच गादीचा मालक आहेस म्हणून त्यानें याला लिहून दिलें. अमानउल्लाच्या या पहिल्या जाहिरनाम्यांतच अफगाणिस्थान स्वतंत्र करण्याची त्यानें प्रतिज्ञा उच्चारली. किंबहुना "या अटीवर जर तुम्ही मला अमीर कबूल कराल तरच मी होईन" असेंहि त्यानें म्हटलें. त्याचबरोबर त्यानें राज्यांतील वेठ व बिगार बंद केली. व नवीन सुधारणा करण्याचा आपला निश्चय प्रगट केला इनायतउल्ला व हियातउल्ला यांनींहि त्याला पत्रें पाठवून त्याला राजा म्हणून कबूल केलें. नसरुल्लाखानाचें पुढें काय झालें हें

कोणालाहि माहीत नाहीं. बहुधा त्याचा खून झाला असावा ! अशा रीतीनें अमानउल्ला यानें बापाच्या खुनाचा सूड घेतला पण त्याचबरोबर अफगाणिस्थान स्वतंत्र करण्याचें ठरविलें. या सुधारणांचा उपक्रम अबदुल रहिमान यानेच केला होता. त्याला नवीन राज्यव्यवस्था करण्याला हवे ते ३० चागले कारकून मिळाले नाहींत. अवघे तीन मिळाले. पण हळूहळू त्यानें राज्याची घडी बसविली. तेंच काम अमानउल्ला यानें पुढें चालविलें व कदाचित् आपल्या आजाप्रमाणे ह्याहि अमीर नांवलौकिक मिळवील. पण त्यांतूनहि कोणी सांगावे ? अजूनहि अफगाणिस्थानावर उठलेले कारस्थानाचे व बंडाळीचे ढग दाट पसरलेले आहेत."

## अमानउल्लाची स्वदेशी चळवळ

हें संभाषण देऊन पुढे ग्रंथकार म्हणतो, "अमानउल्ला हा लोकप्रिय आहे. दक्ष आहे. उद्योगी आहे. पण त्याचे तरी कोणी सांगावे ? " शहाबुद्दीनखान पुढे म्हणाला, " अमीर अमानउल्ला याला स्वदेशी उद्योगधंद्याची फार आवड आहे. आपल्या दरबारच्या सगळ्या लोकांनीं स्वदेशांत झालेले कपडे घातले पाहिजेत, असा त्यानं हुकूम केला आहे. तो आपल्या खिशांत नेहमीं एक चाकू ठेवतो. आणि एखाद्या अंमलदारानें परदेशी कपडे अंगावर घातलेले दिसले कीं, हळूच त्याच्यामागून जाऊन गमतीने त्याच्या पाठीचे कापड कापून घेतो व असें एकदोन वेळां झालें म्हणजे त्या अधिकाऱ्याची खोड मोडते, त्यामुळें जुना पोषाक जुने कपडे गेले व मिळतील तसले पण देशी कपडे घेऊन लोक आतां पोषाक बनवूं लागले आहेत. अर्थात् तुम्हाला अनेक तऱ्हेचे पोषाक व येथें दिसतील. त्यांत कांहीं विदुषकी थाटाचे किंवा गोधडीवजाहि दिसतील. पण ते स्वदेशी म्हणून तस चालतात !"

थॉमस लिहितो—"यानंतर खुद्द अमीर अमानउल्ला याची माझी गांठ पडली. अमीराचे कपडेहि असे तसेच होते. पण ते सगळे स्वदेशी होते. मनगटावर रुपेरी घड्याळ दिसले. तो आपल्या मिशा फारशा वाढूं देत नाहीं. अंगाने बांधेसूद व चलाख दिसला. त्याची नजर एकसारखी सगळीकडे जात असते. त्याचे व माझें खालीलप्रमाणें संभाषण झालें.

अमानउल्ला—तुम्ही आलां, फार चांगले झालें. तुम्हाला काय फोटो वगैरे काढावयाचे असतील ते खुशाल काढा. तुम्हाला आणखी कांहीं पाहिजे आहे काय ?

मी—होय. वर्षभर अफगाणिस्थानांत राहावें अशी मला इच्छा झाली आहे.

अमानउल्ला—अबब ! इतके दिवस तुम्ही येथें काय करणार ?

मी—अफगाणिस्थानांतील सगळ्या नद्यांचे उगम मला शोधावयाचे आहेत !

अमानउल्ला—त्या भानगडींत तुम्ही पडूं नका. तुम्हाला तें करतां येणार नाहीं. उगाच मरून मात्र जाल. तुमचे लग्न झाले नाहीं एवढीच त्यांतल्या त्यात बरी गोष्ट, नद्यांचा उगम शोधावयाला गेलां कीं मग तिकडेच. आमच्या राज्यांत अजून पूर्ण स्वस्थता स्थापली गेली नाहीं.

मी—मला तुमच्या येथील विद्यापीठ पाहावयाचें आहे.

अमानउल्ला—तें मात्र जरूर पाहा. मी शिक्षणाला फार चहातो माझ्या आईने काबूलमध्ये मुलींची शाळा काढली आहे. तींत आज २००० विद्यार्थिनी शिकतात. पण आम्हाला ही सुधारणा हळुहळूच केली पाहिजे. इतर शिक्षणाबरोबर धर्मशिक्षणाचें काम सुरू झालें पाहिजे. नाही तर दोनहि खड्ड्यांत जावयाची. माझ्या देशांतील संपत्ति अजून पुष्कळ भूमिगत व निद्रावस्थेत आहे. ती जागृत करण्याकरितां मी सर्व देशांतील तज्ज्ञ लोक आणविणार आहे. पण लक्षांत धरा कीं, अफगाणिस्थान केव्हांहि अफगाण लोकांचेच राहिले पाहिजे. त्याच्या श्रमाचीं सर्व फळे त्याच्याच पदरांत पडलीं पाहिजेत. परदेशी भांडवलवाल्यांना मी येथें थाराच देणार नाहीं.

## परदेशांत विद्यार्थी

जवळच अमीराचा सासरा महंमदखान तरझी बसला होता. त्याने आपल्या जांवयाच्या उद्योगशीलतेची मोठी तारीफ मजजवळ केली. उलट अमीरानेहि आपल्या सासऱ्याची स्तुति करून असे म्हटलें कीं, "असे असे मातब्बर उमराव मला साहाय्य करतात म्हणूनच मला यशाची आशा वाटते." या देशांत राज्यकर्त्या राजाला आपल्या नातेवाइकांचा मोठा पेच असतो. म्हणून एक तर त्यांना तुरुंगांत डांबून ठेविलें पाहिजे, किंवा कामाच्या धारेवर धरलें पाहिजे. रिकामे बसूं दिलें कीं, त्यांनीं कारस्थान आरंभलेच. पण अमानउल्ला याचा स्वभाव पाहतां, त्याने आपल्या सर्व नातेवाइकांना प्रेमानें कह्यांत ठेवलेलें दिसतें. म्हणून इतरांप्रमाणें यांचेकडून त्याचा खून होईल अशी भीति वाटत नाहीं.

अमीर अमानउल्ला मला म्हणाला "आमचे मामासाहेब यांनीं अशी योजना केली आहे कीं, प्रतिवर्षी पॅरिस व बर्लीन येथें विद्या शिकण्याकरितां अनेक तरुण विद्यार्थी पाठवावयाचे. ते शिकून आले म्हणजे आमच्या देशांतील दगडी कोळसा, लोखंड, तेल, सोनें वगैरे खनिज संपत्ति काढून ती मी उपयोगांत आणणार आहे."

अमीराचा भाऊ इनायतउल्ला हा एखाद्या भिक्षुका-प्रमाणें पांढरा फेटा घालतो.तो चाणाक्ष आहे.हिकमती आहे. पण गादी मिळविण्याला जी दक्षता व चपळपणा लागतो तो त्याच्या अंगीं नाहीं. दुसरा भाऊ हयातउल्ला हा मात्र कांहीं न बोलतां नेहमीं गप्प असतो व त्याच्या तोंडावर एक प्रकारची नाखुषी दिसते

# बेलापूरचा साखरेचा कारखाना

महाराष्ट्रांत जे साखरेचे दोन कारखाने आहेत त्यांत बेलापूर कंपनीचा कारखाना बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालू आहे. हा कारखाना दौंड-मनमाड रेलवेवरील बेलापूर स्टेशनापासून ५ मैलांवर असलेल्या हरिगांव गांवीं आहे. बेलापूर स्टेशनापासून हरिगांवापर्यंत जाण्याला स्टेशनावर मोटारी मिळतात.

बेलापूर सिंडिकेट प्रथम १९१८ सालीं मि. फ्रँक हॅरिसन यांच्या प्रयत्नानें स्थापन झाली. पुढें तिला लिमिटेड कंपनीचें स्वरूप देण्यात आलें. या कंपनीच्या प्रत्येक भागाची किंमत पूर्वी ७५रुपये होती. पण कंपनीनें ता. ४-८-२७ च्या सभेंत प्रत्येक भागाची किंमत २५ रुपये उतरविली. त्यामुळे हल्लीं या कंपनीच्या भागाची किंमत प्रत्येकीं ५० रुपये आहे आणि असे ३७५९८ भाग मिळून भागीदारीचे भांडवल १८७९९०० रु. आहे. कंपनीचे डायरेक्टरांत सर जोसेफ के, मेसर्स सिमन्स, रोस व ब्राऊन असे चार युरोपियन डायरेक्टर असून सर लल्लुभाई सामळदास, लालजी नारायण, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास असे तीन हिंदी डायरेक्टर आहेत. कंपनीचे चीफ मॅनेजर मि. मिल्लर नावाचे स्कॉच गृहस्थ असून मेकॅनिकल इंजीनियरहि युरोपिअन गृहस्थ आहेत. बाकी सर्व अधिकारी हिंदी गृहस्थ असून त्यांत मुख्यतः श्रीयुत जी. आर. महाजन बी. एजी. यांच्याकडे शेतीची व उंसाच्या लागवडीची सर्व व्यवस्था आहे. प्रो. पाध्ये यांच्याकडे साखर करण्याच्या सर्व अंतर्गत व्यवस्थेची व लॅबोरेटरीची व्यवस्था सोंपविलेली आहे. प्रो. पाध्ये हे अमेरिकेंत जाऊन तेथील कारखान्यांतून साखरेची कृति शिकून आलेले तज्ज्ञ आहेत.

बेलापूर स्टेशनापासून निघून रेल्वेचा फांटा ओलांडून पूर्वेस वळलें म्हणजे तेथपासून हरिगांवाची हद्द लागते आणि कंपनीचा कारखाना दिसूं लागतो. या कंपनीनें सरकाराकडून सुमारे ७३०० एकर जमीन खंडानें घेतली आहे व तिच्याबद्दल दरसाल अंदाजें ४० हजार रुपये सारा द्यावा लागतो. ही ७३००एकर जमीन सरकारनें रयतांकडून लँड ॲक्विझिशन आक्टाच्या साहाय्यानें अवघा तीन लक्ष रुपये मोबदला देऊन संपादन केली व ती कंपनीला खंडानें दिली! ही जमीन संपादन करावयास खर्चावे लागलेले ३ लक्ष रुपये सरकारनें कोणत्या खात्यावर कशा स्वरूपानें खर्ची टाकले आहेत, ईश्वर जाणे! पण बेलापूर कंपनीला इतक्या सुलभतेनें एवढें मोठें पिकाचें क्षेत्र मिळाल्यानें स्वतः उंसाची लागवड करून कारखाना चालविणें सोईस्कर झालें. बारामतीच्या कारखान्यास जी मोठी अडचण भासली व मुख्यतः ज्या अडचणीमुळेंच तो कारखाना बुडाला ती अडचण सरकारच्या कृपेमुळे बेलापूर कंपनीच्या मार्गांतून दूर झाल्यामुळें कंपनीला आज मोठ्या प्रमाणांत कारखाना चालविणें परवडत आहे.

कंपनीला खंडाने मिळालेल्या सात हजार एकरांपैकीं आळीपाळीने सुमारें दोन-अडीच हजार एकरांत दरसाल उंसाचें पीक करण्यांत येतें. त्यांत बराचसा ऊंस नव्या लागवडीचा असून कांहीं थोडा खोडवा असतो. उंसांत मुख्यतः पुंड्या उंसाची लागवड होते कोइंबतुरी उसाचीहि कांहीं लागवड अलीकडे सुरू करण्यांत आली आहे. याखेरीज जावा बेटांतील ई. के. नं. २८ आणि पी. ओ. नं. २८७८ या जातीच्या उंसाचीहि लागवड करण्याचे प्रयोग चालू आहेत.

## उंसाची लागवड

उंसाची लागवड प्रवरा नदीच्या कालव्याच्या पाण्यावर चालू आहे. आणि त्याकरितां कंपनीला दरसाल सुमारे ७७५०० रुपये पाणीपट्टी भरावी लागते. उसाची लागवड करणाऱ्या इतर शेतकऱ्यांच्या मानानें पाहतां कंपनीला द्यावी लागणारी पट्टी कांहींशी सवलतीच्या दराचीच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. उंसाची लागवड करण्याकरितां जमीन नांगरण्याचें काम वाफेच्या इंजिनानें चालणाऱ्या लोखंडी नांगरांनीं केलें जातें. सुमारें दोन फर्लांगांच्या अंतरावर दोन इंजिनें उभीं केलीं जातात आणि मधले नांगर लोखंडी सांखळीने आळीपाळीनें दोहोंकडे ओढले जातात. या नांगरांनीं शेत १८ इंच खोल नांगरलें जातें. उंसाच्या लागवडीकरितां दरएकरीं ५६ शेर अमोनियम सल्फेट व २८ मण एरंडीची अगर भुइमुगाची पेंड इतकें खत दिलें जातें. उंसाची लागवड अशा बेतानें व क्रमानें केली जातें कीं, तयार झालेल्या उंसाची तोड

साधारणतः डिसेंबरपासून एप्रिलअखेरपर्यंत पांच महिने एकसारखी चालू राहावी. या मुदतींत दररोज ३०० ते ३२५ टन वजनाचा ऊंस तोडून कारखान्यांतल्या चरकाला पुरविला जातो. गतवर्षी ३७३२३ टन ऊंस गाळला गेला व त्यापासून सुमारें ३६०० टन म्हणजे अंदाजें १० लक्ष रुपयांची साखर तयार झाली. उंसाची लागवड वाढविल्यास साखर करण्याचें काम आठ महिने सतत चालू राहील. पावसाळ्याचे चार महिने मात्र ऊंस तोडणें व गाळणें शक्य नसतें व ते फायदेशीरहि नसतें.

## तीन इंजिनें व सव्वाशें लाडिसें

शेतांत ऊस तोडल्यानतर तो लाडिसांत भरण्यांत येतो व तीं लाडिसें पेट्रोलनें चालणाऱ्या इंजिनांकडून कारखान्यापर्यंत ओढून आणलीं जातात. या कामाकरितां तीन इंजिनें व शे-सवाशें लाडिसें उपयोगांत आणण्यांत येतात व त्याच्य साठीं दोन फुटी रेल्वेचे रूळ कारखान्यापासून उंसाच्या लागवडीच्या पांच निरनिराळ्या केंद्रांपर्यंत बसविले आहेत. लाडिसांतून उंसाचा भारा कारखान्यासमोर येताच तेथें तो वजन केला जातो व त्यानंतर चरकाच्या तोंडांत देण्याकरितां तो एका फिरत्या फलाटावर टाकण्यांत येतो. हा फलाट रहाटगाडग्याप्रमाणे एकसारखा फिरत असून जितका ऊंस त्यावर पडेल तितका ऊंस त्या फलाटाच्यायोगानें वर चढून चरकाच्या तोंडांत दिला जातो.

फलाटावरून कलाटणी मारून ऊंस एकदां त्या चक्रात सापडला म्हणजे त्याचीं रूपांतरें कसकशीं होत जातात व अखेर एका बाजूस कोंडे फोलपट, दुसऱ्या बाजूस राब, तिसऱ्या बाजस मळीची पेंड आणि चौथ्या बाजूस शुद्ध शर्करा अशा चतुर्विध स्वरूपान तो बाहेर कसा पडतो हे प्रत्यक्ष कारखान्यांत जाऊन पाहाण्यासारखें आहे. चरकांत सांपडलेला ऊस एकांतून दुसऱ्यांत, दुसऱ्यांतून तिसऱ्यांत अशा रीतीनें जातां जातां सात चरकांतून बाहेर पडला म्हणजे एका बाजूस अगदीं कोरडें चिपाड बाहेर निघतें व त्याची रवानगी इंजिनाच्या चुलाणांत करण्यांत येते. चरकाच्या दाबामुळें उंसांतून निघालेला रस नळांतून टाकींत पोचविण्यांत येतो. तेथून रस शुद्ध करण्याच्या क्रियेस प्रारंभ होतो. प्रथम त्यास गंधकाची वाफ देतात व त्यानंतर त्या रसात चुन्याची निवळी मिळून तो रस शुद्ध करतात आणि गाळतात. अशा रीतीने हा रस स्वच्छ करण्यांत येतो व त्यांतलें निघालेली मळी दुसरीकडे पडते व तिचा उपयोग उंसाच्या खताकडे करण्यांत येतो. रस स्वच्छ झाला म्हणजे तो बारीक नळ्यांतून टाकींत नेण्यांत येतो व तेथें त्याला वाफेची आंच देऊन त्यांतला पाण्याचा अंश काढून टाकण्यांत येतो. रसांतला पाण्याचा अंश नाहींसा होऊन त्यांत साखरेचे कण बनूं लागले म्हणजे हे साखरेचे कण अधिक स्वच्छ व मोठे व्हावे याकरितां निरनिराळ्या टाक्यांतून तो रस एकसारखा हालविण्यांत येतो. अशा रीतीनें साखरेचे कण व राब वेगवेगळे होण्याच्या स्थितींत येतांच तें मिश्रण एका केंद्रोत्सारी भ्रमण-यंत्रांत घालण्यांत येऊन तेथे खूप वेगानें तें फिरविलें जातें. या भ्रमणानें त्या मिश्रणांतील साखरेचे कण त्या यंत्राच्या परीघास चिकटून राहतात व त्यांतील राब मध्यभागांतील छिद्रांतून खालीं झिरपून जाते. याप्रमाणे राब व साखरेचे दाणे वेगवेगळे झाले म्हणजे ओलसर असलेले साखरेचे दाणे कोरडे करण्याकरितां एका वाफेच्या यत्रावर नेऊन तेथें ते सुकविले जातात. अशा रीतीनें पुरते सुके होऊन पडणारे जे शर्कराकण तोच साखऱ्या होय. तो साखऱ्या चक्कींत घालून दळला म्हणजे त्याचीच पिठी साखर बनते.

## साखर व साखऱ्या

वरील वर्णनावरून वाचकाच्या लक्षांत आलेंच असेल कीं, कारखान्यातून जी साखर तयार होते ती साखऱ्या किंवा पिठी (दळलेली) साखर अशा दोन प्रकारची असते साखऱ्याचे दाणे मोठे असल्यानें त्याच्या कृतीत जर कांहीं दोष राहिला तर त्याच्या शुभ्रपणांत कमीपणा दिसून येतो. दळलेल्या साखरेचे कण अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें तिच्यांत थोडीबहुत उणीव खपली जाते. यामुळेंच बाजारांत जो साखऱ्या येतो तो अधिक स्वच्छ असतो व त्याकरितांच पाक वगैरे करण्याला पिठी साखर वापरण्यापेक्षां साखऱ्याच वापरणे योग्य होय.

बेलापूर कंपनी नं. १ व नं. २ अशा दोन प्रकारचा साखऱ्या आणि नं. १ व नं. २ अशा प्रकारची पिठी साखर तयार करते. यांतील नं. १ चा साखऱ्या अधिकांत अधिक स्वच्छ असतो म्हणजे त्याची शुभ्रता रसायनशास्त्राच्या भाषेंत ९९'५ इतकी असते. रस स्वच्छ करण्याला केवळ गंधक व चुना एवढींच साधनें वापरली असतां याहून अधिक शुभ्रपणा येऊं शकत नाहीं. नं. १ ची पिठी साखर ही नं. २ च्या साखऱ्याइतकी स्वच्छ असते असं म्हणता येईल. साखऱ्या व साखर तयार होतांच तीं मजबूत अशा पोत्यांत भरण्यात यऊन तेथल्या तेथें पोतीं शिवन त्या गाठीवर बेलापूर कंपनी लिमिटेड अशी मोहर केली जाते. बाहेर पाठविले जाणारें पोतें असें पक्कें

मोहरबंद असल्यामुळें लबाडीला जागा राहात नाहीं. जें पोतें असें सीलबंद नसेल त्या पोत्यांतील साखरेच्या गुणाबद्दल कंपनी जबाबदार नाहीं.

## रोजची तीस टन साखर

साखर तयार होऊन जी राब खालीं राहते तिचें काय करावें असा कारखानदारांना नेहमीं प्रश्न पडतो. परंतु बेलापूर कंपनीला ती अडचण भासत नाहीं. कारण सरकारचा दारू गाळण्याचा जो मोठा कारखाना नाशिकला आहे त्या डिस्टिलरीकरितां सरकार ही राब दीड-पावणेदोन रुपये मण या भावानें खरेदी करतें. त्याकरितां नाशिकहून स्पेशल डबा बेलापूरच्या कारखान्यापर्यंत येतो व कारखान्यांतून जसजशी राब निघत जाईल तसतशी ती पंपानें त्या डब्यात भरून डबा भरतांच तो नाशिकला रवाना होतो. उंसाच्या चिपाडाचा सर्पणास उपयोग होतो, मळीचें खत करण्यांत येतें आणि राब सरकार खरेदी करतें. अशा रीतीनें उंसाचा कोणताच भाग फुकट जात नसल्यामुळें या कंपनीला हा कारखाना चालविणें परवडतें. या कारखान्यांत गुळापासून साखर न करतां थेट उंसाच्या रसापासून साखर तयार होते. ऊंस चरकांत पडल्यापासून त्याची साखर होऊन पोत्यांत सीलबंद होण्यास सुमारें अठरा तास लागतात. दररोज सुमारें ३०० टन ऊंस गाळला जातो व त्यापासून जवळ जवळ ३० टन साखर तयार होते. कारखाना आठवड्यांतून सहा दिवस रात्रंदिवस चालू असतो. रविवारी एक दिवस सुटी असते व त्या दिवशीं यंत्रांची साफसफाई करतात.

प्रत्यक्ष कारखान्यांत साखर तयार करण्याचें काम ५।६ महिनेच चालतें; पण शेतकीच्या लागवडीचें इतर काम १२ महिने चालू असतें. गतवर्षी या कारखान्यांतून साखर व राब मिळून १२ लक्ष रुपये किंमतीचा माल तयार झाला. परदेशी साखरेवर हल्लीं ३० टक्के जकात आहे म्हणूनच ही साखर जावा साखरेशीं सरासरी टक्कर देऊं शकते. या कंपनीला एक वर्षापूर्वी खेळत्या भांडवलाची जरूरी लागली त्या वेळीं सरकारनें कंपनीला ६ लक्ष रुपये कर्ज दिलें. जमीन संपादन करून देणें, जरूरीच्या वेळीं कर्ज देणें आण राब विकत घेणें इत्यादि प्रकारांनीं कंपनीला सरकार सहानुभूति दर्शवीत आहे म्हणून हा कारखाना स्थिरावला. अद्यापपर्यंत कंपनीनें भागीदारांना डिव्हिडंड दिलें नाहीं. तथापि मागील वर्षी कंपनीला १०२७७३ रुपये नफा झाला आणि गतसालीहि रु. ५००१५ नफा झाला. हा सर्व नफा रिझर्व्ह फंडांत ठेवण्यांत आला असून सरकारकडून घेतलेलें ६ लक्षांचें कर्ज फिटेपर्यंत डिव्हिडंड वाटावयाचा नाहीं असा कंपनीचा बेत आहे. आणखी दोन-तीन वर्षांत सरकारचें कर्ज फेडलें जाऊन कंपनी भागीदारांना नफा वांटूं लागेल असें वाटतें. साखरेला मागणी अधिक येऊन कारखाना भरपूर ८ महिने चालू लागल्यास वरील अंदाजाच्या आधीं देखील कंपनी नफा देऊं शकेल. सात हजार एकरांपैकीं उंसाच्या पिकाकडे गुंतलेल्या दोन-तीन हजार एकरांखेरीज बाकीच्या जमिनींत कंपनीनें जर इतर कांहीं पिकें केलीं किंवा फळझाडें लाविलीं तर कंपनीला हल्लींहून अधिक किफायत होईल. कंपनीच्या शेअर कॅपिटलपैकीं १६ लक्ष भांडवल कारखान्याचीं यंत्रें, इमारती, रेल्वे, रस्ते, वर्गांचे वगैरेत कायमचें गुंतलें आहे. यामुळे खेळतें भांडवल कमी पडलें म्हणून सरकाराकडून सहा लक्ष रुपये कर्जाऊ म्हणून घ्यावे लागले. तथापि कंपनीच्या स्थिर भांडवलाची किंमत लक्षांत घेतल्यास हा कर्जाचा बोजा विशेष नसून कंपनीची एकंदर स्थिति चांगली समाधानकारक आहे.

मुंबई इलाख्यांत एवढ्या मोठ्या प्रमाणांत साखरेचा कारखाना चालवून कंपनीनें स्वदेशी साखरेच्या पुरवठ्याच्या बाबतींत महाराष्ट्रांत मोठीच कामगिरी केली आहे. भांडवलाच्या दृष्टीनें कंपनी पूर्णपणें नसली तरी बऱ्याच अंशानें स्वदेशी आहे. कंपनीच्या प्रमुख कामगारांत श्रीयुत जी. आर. महाजन बी. एजी. हे शेतकी खात्याचें आणि प्रो. पाध्ये हे साखर तयार करण्याच्या कारखान्याचे व प्रयोगशाळेचें काम अत्यंत दक्षतेनें करीत असून कंपनीचे पाऊल दिवसेदिवस पुढे पडत जाण्यांत त्यांचे श्रम पुष्कळच कारणीभूत झाले आहेत. हल्लींचे जनरल मॅनेजर मि. मिल्लर हे स्कॉच गृहस्थ असून तेहि या कंपनीच्या उत्कर्षासाठीं झटून मेहनत करीत असतात.

---

# कलकत्त्यांतील प्रेक्षणीय स्थळें

( ले.—वासुदेव कृष्ण भावे )

लेखांक ३ रा

## व्हिक्टोरिया मंदिर

महाराणी व्हिक्टोरिया १९०१ साली मरण पावली. त्या वेळीं हिंदुस्थानाचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन हे होते. कर्झनसाहेबांत बादशाही दिमाख जातीचाच असला तरी हिंदुस्थानांत आल्यावर हिंदुस्थानांतील प्राचीन आर्य व अर्वाचीन मोगली ऐश्वर्य पाहून त्या ऐश्वर्याच्या शेजारीं इंग्रजी ऐश्वर्याची खूणहि ठेवावी अशी त्यांस साहजिकच ईर्षा उद्भवली. शहाजहान निवर्तला, मोगली साम्राज्य लयास गेलें तरी मरून गेलेल्या शहाजहानानें सत्तेच्या जोरावर बांधलेला ताजमहाल मात्र वेलीवरून न खुडलेल्या जाईच्या फुलाप्रमाणे टवटवीत आहे असे पाहून मोगली ताजमहालासारखा इंग्रजी ताजमहालहि उठवावा अशी इच्छा कर्झनसाहेबास झाली असल्यास आश्चर्य काय !

## राजा नंदकुमार

लॉर्ड कर्झन यांनीं व्हिक्टोरिया मंदिराकरिता स्थळहि आपल्या बादशाही अभिमानास साजेसेच निवडलें. राजा नंदकुमार याचें नांव इतिहासज्ञांस अवगत आहे. तो जातीचा बंगाली ब्राह्मण. त्याजवर वॉरन हेस्टिंग्जचा राग फार. पण वॉरन हेस्टिंग्जच्या कौन्सिलांतील एक मंत्री मि. फ्रान्सिस याचा आधार नंदकुमारास असून या आपल्या मित्राकडून फ्रान्सिसने आपला शत्रु जो वॉरन हेस्टिंग्ज याजवर फिर्याद करविली होती. पण या फिर्यादीचा परिणाम मात्र उलटा झाला. नंदकुमारानेंच खोटा कागद केल्याचा पुरावा होऊन असल्या सामान्य अपराधाबद्दल नंदकुमारास फांशीची भयंकर शिक्षा भोगावी लागली. रॉबर्ट क्लाइव्ह याच्या हातूनहि उमीचंदास फसविण्याचा हुबेहूब असलाच अपराध घडला असतां त्याला शिक्षा तर नाहींच, उलट लॉर्ड ही अत्यंत बहुमानाची पदवी मिळून तो ब्रिटिश साम्राज्याचा आधारस्तंभ समजला गेला. असल्या अन्यायावरून ब्रिटिश साम्राज्य न्यायी ठरलें की काय कोण जाणे! या अन्यायाची मजल येथेंच थांबली नाहीं. राजा नंदकुमार कलकत्त्यातील प्रेसिडेन्सी जेलमध्ये फांशी गेला त्याच जागेवर व्हिक्टोरिया मंदिर बांधण्यांत आलें आहे. बिचारा नंदकुमार हिंदी म्हणून ब्रिटिश साम्राज्याच्या पायांत अस्तास गेला आणि रॉबर्ट क्लाइव्ह इंग्रज म्हणून व्हिक्टोरिया मंदिरांत उदय पावला. स्वाधीनता व परवशता यांतील फरक असा असतो.

व्हिक्टोरिया मंदिर बांधण्याचें लॉर्ड कर्झन यांच्या मनांत आलें त्या वेळीं त्यांच्या डोक्यांत ताजमहाल होता. त्यामुळे मंदिर संगमरवरी दगडांचें बांधावयाचें ठरलें, यांत नवल नाहीं. पण मंदिराकरितां दगड मात्र जयपुराजवळील संगमरवरी खाणींतून काढला नाहीं. हा दगड इतालीदेशांतून आणिलेला आहे. त्यामुळें मंदिर ताजमहालाप्रमाणें पांढरें शुभ्र नाहीं. त्याच्या श्वेत वर्णावर अस्मानी छटा पसरली असल्याकारणानें दुरून पाहाणारास महाराणीच्या कीर्तिमंदिरावर हिंदुस्थानासारखे देश पारतंत्र्यांत ठेवल्याचा कलंक चढला आहे की काय असा भास होतो. कर्झनसाहेबांनीं अगर त्यानंतरच्या व्हाइसरॉयांनीं दगडाचा पैसाहि हिंदुस्थानाच्या भूमीत राहूं नये यासाठीं इतालीहून दगड आणविला असेल. तथापि हिंदी लोकांना तो सौंदर्यावरचाच काय पण साम्राज्यावरचाहि कलंकच वाटतो.

व्हिक्टोरिया मंदिराभोंवतीं ताजमहालाप्रमाणेंच विस्तीर्ण मैदान सोडलें असून ते हिरव्यागार तृणांकुरांनीं मुद्दाम झांकून घेतलें आहे. त्यांतच मधून मधून पसरलेल्या पुष्करणींनीं मंदिराची शोभा वाढविली आहे. मंदिराकरितां जोतेहि उंच घेतलें असल्यामुळें मंदिराचा भव्यपणा अधिकच भव्य दिसतो. या मंदिरास एकंदर साठ लक्ष रुपये खर्च आला व तो सार्वजनिक वर्गणीनेंच जमविला. मंदिराचा मुख्य भाग म्हणजे ज्यांत व्हिक्टोरियाचा भव्य संगमरवरी पुतळा उभा केला आहे तो. त्यास मंदिराचा गाभारा म्हटलें तरी चालेल, तो गाभारा मध्यभागीं आहे व त्यावर तीनमजली मेघडंबरी असून तिच्या शिरोभागीं घुमट बसविलेला आहे. सगळ संगमरवरी काम व तेंहि अतिशय उंच पाहून मनुष्य क्षणभर चकित होऊन उभा राहतो. मेघडंबरीच्या दर्शनानें मनुष्याची वृत्ति आश्चर्यपूर्ण व गंभीर बनते. ती वृत्ति ब्रिटिश साम्राज्याविषयींच्या आदरभावनेने तात्काल रंगविण्याकरितां भोंवतालच्या चारहि भिंतींवर चार भाषांत राणीच्या नांवावर विकणारा १८५८ सालाचा जाहिरनामा लिहिण्यांत आला आहे. हा भिंतीवरील

उदार जाहिरनामा प्रेक्षक एकीकडे वाचीत असतो तर दुसरीकडे जाहिरनाम्यांतील वचनें मोडली कशी याची नामावली तो जपीत असतो.

मंदिराचा पहिला मजला बराचसा पुतळ्यांनींच गजबजला आहे. या पुतळ्यांत ब्रिटिश मुत्सद्दी, सेनापति व गव्हर्नर–जनरल की ज्यांचा उपयोग ब्रिटिश साम्राज्य स्थापण्याच्या व चिरस्थायी करण्याच्या कामीं झाला, त्याचाच भरणा आहे. त्या सर्वांचे अग्रेसर लॉर्ड क्लाइव्ह व वॉरन हेस्टिंग्ज हे होत. सर्वांत अधिक सख्या त्यांचीच भरेल. हे सर्व पुतळे शुभ्र संगमरवरी असून ओळीनें दुतर्फा उभे केलेले आहेत. या दुतर्फा रांगांच्या मधून जातांना आपण जिंकलेले आहोंत, परतंत्र आहोंत, गुलाम आहोंत व आपल्या पायांतील शृंखलांचा एक एक दुवा घडविणारे हे बाहेरून श्वेत दिसत असले तरी आंतून काळपुरुष आहेत याची लाज प्रत्येक स्वाभिमानी हिंदी माणसास वाटून जेलरपुढें आणिलेल्या कैद्याप्रमाणें त्याच्या मनाची अवस्था होते.

## बंगाली दासी

पुतळ्यांखेरीज बहुतेक सर्व विजयचिन्हें इंग्रज सरकारनें मंदिरांत भरली आहेत. त्यांत मूर्शिदाबादेच्या नवाबाची मसनद आहे, थिबा राजापासून आणिलेला चांदीचा गालिचा आहे, हिंदी राजेरजवाड्यांबरोबर कंपनी सरकारनें केलेल्या तहांचे खर्डे आहेत, हिंदी राजांना जिंकणाऱ्या ब्रिटिश सैनिकांस मिळालेलीं पदकें आहेत, शीखांचे पराभव आहेत व मराठ्यांचे रक्तपात आहेत. हा प्रत्येक देखावा हिंदी माणसाच्या शरीराचा एक एक लचका तरी काढतो किंवा त्याच्या हृदयास एक एक चटका तरी देतो. वॉरन हेस्टिंग्जचा बेडजाव मोठा आहे. तो जिच्यावर कधीं कधीं बसत असे ती हस्तिदंती खुर्ची तेथें ठेवण्यात आली असून त्याचें इंग्लंडातील घर व त्याची मडम इंग्लंडास जातांना तिनें आपल्याबरोबर नेलेली बंगाली दासी यांचीहि चित्रे टांगलेलीं आहेत. मंदिर पाहून मनुष्य बाहेर पडतो व प्राकाराच्या शेवटीं महाद्वाराशीं उभ्या केलेल्या कर्झनसाहेबाच्या पुतळ्याशीं येतो त्या वेळीं इंग्रजांस हंसविण्याकरितां व हिंदुपुत्रांस रडविण्याकरितां यानें हें मंदिर मुद्दाम बांधलें असे विषण्ण उद्गार हिंदी मनुष्याच्या तोंडून सहज निघून मंदिराकडे परत वळून पाहण्याचें धैर्यहि त्यास होत नाहीं.

## दक्षिणेश्वर व बेलूर

व्हिक्टोरिया मंदिर पाहून हिंदी मनुष्याच्या मनाला झालेल्या वेदना निववण्याचीं कलकत्त्यास जर कोणतीं दोन स्थळें असतील तर तीं दक्षिणेश्वर व बेलूर हीं होत. दक्षिणेश्वर व बेलूर हीं स्थळें हुगळी नदीच्या दोन तीरांवर आहेत. दक्षिणेश्वर कलकत्त्याच्या बाजूस आहे व बेलूर हावऱ्याच्या बाजूस आहे. दक्षिणेश्वर कलकत्त्यापासून ८–९ मैलांवर आहे तर बेलूर हावऱ्यापासून सात मैल अंतरावर आहे. दक्षिणेश्वराचा प्राकार विस्तीर्ण असून त्याच्या बाहेरच्या अंगास दाट वन आहे. व समोर हुगळी नदीचें प्रशांत पात्र वाहात आहे. दक्षिणेश्वर हें महादेवाचें देवालय होय. त्यांत महादेवाची पिंडी आहे व तिच्याशेजारीं कालीची मूर्ति आहे. याच मूर्तीची पूजा श्रीरामकृष्ण परमहंस करीत व ती करीत असतांच कालीचे प्रत्यक्ष दर्शन त्यांस घडलें असें म्हणतात. परमेश्वराच्या भक्तींत गढून जाऊन चित्त एकाग्र व्हावें असेंच हें स्थळ आहे.

रामकृष्ण परमहंस हे स्वामी विवेकानंदांचे गुरु होत. विवेकानंदांनीं आपला ज्यांत देह ठेवला तो बेलूर मठ दक्षिणेश्वराच्यासमोर हुगळी नदीच्या परतीरीं दोनतीन मैलांवर आहे. स्वामी विवेकानंद यांचे मठ व शिष्य उत्तरहिंदुस्थानांत ठिकठिकाणीं पसरले असले तरी त्यांचा मुख्य मठ बेलूरचाच. त्यांत विवेकानंदांची राहाण्याची जागा, त्यांची, त्यांचे गुरुबंधु स्वामी ब्रह्मानंद व त्यांची गुरुपत्नी यांची समाधि या इमारती टुमदार, आरशाप्रमाणें निर्मळ आणि नीटनेटक्या राखण्यांत आल्या आहेत. कालीमंदिरांतील पुजारी व सेवक आणि बेलूर मठांतील पुजारी व शिष्य यांच्यांत केवढा तरी फरक आढळतो. एक स्वार्थी तर दुसरे निःस्वार्थी, एक अशिक्षित तर दुसरे सुशिक्षित, एक उद्धट तर दुसरे विनयसंपन्न. या मठांत स्वामी विवेकानंद यांनीं निर्माण केलेलें पवित्र वातावरण अद्यापि टिकून राहिलेलें अनुभवास येतें व केळीच्या जुन्या खुंटांतून जसा नवा कोंब बाहेर पडावा त्याप्रमाणें हिंदुधर्मांतून निघालेला स्वामीजींचा नवा संप्रदाय हा तरी धर्मोद्धाराचें कार्य शेवटास नेवो अशी आशा करावीशी वाटते.

# पब्लिक सेफ्टी बिल

## ( न. चिं. केळकर यांचे भाषणाचा सारांश )

या बिलावर मी सिमल्यास भाषण केलेंच आहे म्हणून आज फक्त वेगळे नवे मुद्दे तेवढेच मांडणार आहे. या बिलाचा विचार करतां, पहिलीच गोष्ट ही दिसते कीं, ज्यांना तो लागू करावयाचा अशा व्यक्ती अगणित किंवा गुप्त नाहींत. त्या डोळ्यापुढें दिसत आहेत. त्यांचीं नांवें उघड घेतलीं जात आहेत. हे लोक मुठीच्या भरतीइतके नाहींत, किंवा दोहो हातांच्या बोटांवर मोजण्याइतकेहि पुष्कळ नाहींत. येऊनजाऊन एकदां ब्रॅडलेचें नांव ऐकावयाचें व एकदां स्प्रॅट याचें नांव ऐकावयाचें! व या नांवांचा या क्रमानें कंटाळा आला तर नांवांची उलटापालट करून पुनः तींच नांवें घ्यावयाचीं! या दोन नांवांनीं सरकारला एवढी भीति वाटावी हें आश्चर्य नव्हे काय? फार थोड्या लोकांना हे बिल लागू होणार हें त्या बिलातील कलमांवरूनच दिसतें. तें हिंदी ब्रिटिश प्रजाजनांना लागत नाहीं. हिंदी संस्थानी प्रजेला लागत नाहीं. परराष्ट्रीय प्रजाजनांना लागत नाहीं तर येऊनजाऊन ब्रिटिश आगंतुकांना लागतें. या आगंतुकांपैकींहि जे इकडे पुष्कळ दिवस येऊन राहिले आहेत, किंवा उद्योगधंद्याकरितां ठराविक मुदतीनें येऊन कामधंदा करून परत जातात, त्यांना हें बिल लागत नाहीं. इतके सगळे लोक त्यांतून सुटल्यावर तें किती थोड्या लोकांकरितां आणण्यांत येत आहे हें उघड दिसतें. मग असल्या प्रचंड बिलाचा एवढा उपव्याप कां? इंग्रजींत एक म्हण अशी आहे कीं, "माशी चिरडण्याला इंद्राचें वज्र नको." या प्रसंगाला उचित म्हणून मी स्वतः एक नवी उपमा बनवून देतों. कैकाडणीच्या डोक्यांतून उवा विंचरून काढावयाच्या तर त्याला हॅरो ट्रॅक्टर म्हणजे वाफेनें चालणारा लोखंडी फाळाचा कुळव घालण्याचें कारण नाहीं. सरकारच्या उघड व लहानशा शिकारीकरितां म्हणावें, तर हें बिल प्रमाणाबाहेर मोठें आहे, व सरकारची शिकार याहून फार मोठी, पण मनांतून फार गुप्त असेल तर तिला हें बिल प्रमाणाबाहेर फार लहान आहे. म्हणून कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी तें निरुपयोगी ठरतें.

### भांडवलवालेहि विरुद्ध

रशियन हेरांकडून झालें तरी पहिलें नुकसान हिंदी भांडवलवाल्यांचेंच होणार आहे. असें असतां तेहि एकजात बिलाला विरोध करतात याचा अर्थ सरकारनें समजूं नये काय? दंगे मुंबई शहरांत आणि बिल लावणार तें सगळ्या हिंदुस्थानाला! शिवाय तत्त्वाचा मुद्दा असा कीं, चौकशी केल्याशिवाय, पुरावा दिल्याशिवाय तोंड बांधून, डोळे झांकून मनुष्याला गुन्हेगार ठरवावयाचा, आणि त्याला हद्दपारीची शिक्षा द्यावयाची. याला ही असेंब्ली संमति केव्हांहि देणार नाहीं. पूर्वी हायकोर्ट जज्ज ज्या कामाला लावावयाचे होते तेथें सेशन जज्जांची योजना करण्यांत येणार आहे! न जाणो कदाचित् हायकोर्टानें न्यायदानांत सरकारासाठीं असले घाणेरडें कृत्य करण्याचें साफ नाकारलें असेल. तसें असेल तर तें योग्यच झालें. कारण एरवीं या बिलानें हायकोर्टावर पडणारी जबाबदारी किती तरी थोडी आहे.

दुसरा मुद्दा असा कीं, या बिलानें जे गुन्हे म्हणून सांगितले आहेत त्यांतले कांहीं पिनल कोडाप्रमाणें गुन्हे ठरणारे आहेत, मग त्यांना नवा कायदा कां? तर येऊनजाऊन कोर्टातील चौकशी वांचविण्याकरितां! दुसरे पक्षीं ज्या कांहीं कृत्यांना गुन्ह्याचें स्वरूप देण्यांत येणार आहे त्यांना तें स्वरूप देणें योग्य नाहीं. कम्युनिस्ट तत्त्वांचा प्रसार करणें व मिळकतीसंबंधानें हल्लीं असलेल्या पद्धतींत फेरफार करावा असें म्हणणें हाच गुन्हा बिलानें ठरविला आहे. पण केवळ कोणताहि सिद्धान्त किंवा मत किंवा उपपत्ति किंवा तोंडी उपाययोजना ही कोणत्याही देशांत गुन्हा होऊं शकत नाहीं. परदेशाहून येणारा पैसा जप्त करण्याचें कलम बिलांत आहे. पण हिंदुस्थानांतील देशी किंवा परदेशी पेढीवाले आपल्या कारभारांत सरकारी हात अशा रीतीनें घालूं देण्याला कबूल होतील असें वाटत नाहीं. यांचेहि कांहीं हक्क आहेत व त्यांचे हक्कांवर हें बिल घाला घालूं पाहात आहे.

याहून अधिक व्यापक दृष्टीनें या बिलाकडे मी पाहात आहे. बोलशेव्हिझम हिंदुस्थानांतील लोकांना प्रिय नाहीं हें मी सांगितलें आहे. आणि त्याचें उदाहरण म्हणून हें सांगतों कीं, हिंदुस्थानांतील एकंदर सुजाण लोकांनीं ज्या नेहरू रिपोर्टाला संमति दिली आहे त्यांत खासगी मिळकतीच्या संस्थेला सरकारला कधींहि बाध आणतां येणार नाहीं अशी खातरजमा केली आहे व जामिनकी दिली आहे. हें जर खरें तर रशियन सोव्हिं-

एटांचीं तत्त्वें हिंदी लोकांना मान्य आहेत किंवा होतील हे तरी कसें म्हणावें ?

हिंदुस्थानांत बोल्शेव्हिझमचा प्रसार सरकार बंद करूं पाहतें. पण खुद्द आपल्या इंग्लंडांत तरी ती गोष्ट त्यांनीं केली आहे काय ? असलें वाङ्मय विलायतेंत खंडोगणतीनें वांटलें जातें. त्याचा एक लहानसा अंश फार तर हिंदुस्थानांत येत असेल. या बाबतींत खुद्द इंग्लंडांत काय कायदा आहे हें तरी होम मेंबर यांनीं सांगावें. विलायतेंतील मजूर पक्ष घेतला तरी त्यांतील एका उपपक्षांत बोल्शेव्हिझमचा मतप्रसार करणारे व त्याला मान्यता देणारे लोक आहेत. त्यांचें कोणी काय केलें ?

## मतप्रसारास मज्जाव नसावा

याचा खरा अर्थ हाच कीं, विलायतेंत कोणत्याहि मतप्रसाराला मज्जाव नाहीं. फक्त घातपाताच्या उपदेशाला आहे. कोणताहि विषय घेतला तरी त्यांत दोन बाजूंला व दोन्हि टोंकांना जाणारीं मतें असणारच व त्यांतील गुणदोष व ग्राह्याग्राह्यता सुजाण लोकांना आपोआपच कळते. म्हणून सर्व तऱ्हेच्या मतांना व सिद्धान्तांना विलायतेंतील कायदा समताबुद्धीनें वागवितो. ज्याला सोशॅलिस्ट हें नांव आहे अशा मताचा प्रसार विलायतेंत आज ५० वर्षें सुरू आहे. आणि थरावर थर रचले जाऊन या मतांची इमारत सुदृढ अशा पायावर तयार होत आहे. 'सोशल डेमोक्रॅटिक पार्टी' हें नांव जिला देतात तिची ही इमारत होय. आणि तीहि अजून पुरी झाली असें कोणी मानीत नाहीं. या इमारतीकरितां आज हिंदुस्थानांत नुसता पाया खोदला जात आहे. आणि तो भरण्याचें साहित्य हळूहळू जुळविलें जात आहे. भांडवलवाल्यांचा जर सर्वत्र अनिरुद्ध संचार आहे, तर मग समाजसत्तेच्या सिद्धान्तांना हिंदुस्थानांतच बहिष्कार कां ?

होम मेंबर यांनीं गुन्ह्यांची यादी वाचून दाखविली. तसली यादी एरवीं रोज आपण वाचतोंच. याचा अर्थ गुन्हेगारीचे कांहीं अंश मनुष्यस्वभावांतच असतात. पण ती गुन्हेगारी वेगळी व सुसंघटित राज्यक्रांति वेगळी. विलायतेंत संप हा व्यक्तिशः कायदेशीर मानला जातो. अर्थात् हें प्रमाण वाढवून सगळ्या उद्योगधंद्यांत जर संप एकदम झाला तर त्याचा परिणाम जवळ जवळ राज्यक्रांतीसारखाच होईल. पण त्यालाहि स्वाभाविक मर्यादा आहेत. १९१९ चा मोठा संप विलायतेंत कसा निष्फळ ठरला हें मी स्वतः डोळ्यांनीं पाहिलें आहे. त्यानंतर १९२६ सालीं त्याहून मोठा संप करण्याचा विचार मजूर पक्षानें केला व तो पूर्ण सिद्धीस जाता तर खचित राज्यक्रान्तीच होती. पण स्वतः मजूर पक्षांतील सुजाण लोकांना ती गोष्ट पटली नाहीं. शिवाय सर जॉन सायमन यांनीं या भांडणांत न्यायकोर्टाचा निकाल, एक नमुन्याचा खटला ( टेस्ट केस) करवून पाहाण्याचा सल्ला दिला. व कोर्टानें प्रतिकूल निकाल दिला त्याबरोबर या प्रचंड संपाची इमारत सगळीच्या सगळी ढासळली.

सामुदायिक संपामुळें होणारी राज्यक्रान्ति कल्पनेला दिसत असली तरी ती प्रत्यक्ष अनुभवाला येऊं शकणारी नसते ह्यूबर्ट ब्लॅंड, बरनार्ड शॉ यांसारख्या समाजशास्त्रवेत्त्यांनीं जीं मतें प्रगट केलीं आहेत व अनुभव दिले आहेत त्यावरून पाहातां, विलायतेंत असल्या मतामुळें राज्यक्रान्ति होईल असें कोणी म्हणत नाहीं. पुष्कळ वर्षांपूर्वी जॉन बर्न्ससारखे पुढारी नवीन मतें बोलूं लागले तेव्हां घातपाताच्या व राज्यक्रान्तीच्या भीतीनें विलायतेंतील पोलीस आपल्या सावलीलाहि भिऊं लागले होते ! पण त्याबरोबर ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, जॉन बर्न्स हा कांहीं फ्रेंच राज्यक्रान्तीसारखी राज्यक्रान्ति घडवून आणीत नव्हता ! व घातपाताच्या व दंडेलीच्या गोष्टी कोणी बोललेच तर एकट्या मजूर पक्षांतलेच जहाल लोक बोलत होते असें नाहीं तर जमीनदार अमीर उमराव असले लोकहि उघडपणें दंडेलीच्या गोष्टी बोलत होते. पण दंडेलीचें बोलणें म्हणजे कांहीं प्रत्यक्ष दंडेली नव्हे. जी गोष्ट विलायतेंत घडली व घडत आहे, तीच हिंदुस्थानासहि लागू आहे.

होम मेंबर यांनीं नव्या तरुण संघाच्या चळवळीवर हल्ला केला. पण ही तरुण संघाची चळवळ सर्व देशांत झालेली आहे. तरुण लोक हे किंचित् स्थूल विचार करणारे व बोलतांना किंचित् जहालपणानें बोलणारे असतात. पण तेवढ्यावरून ते घातपात करण्याला सिद्ध असतात असें कोणी म्हणत नाहीं बरनार्ड शॉ यानीं आपला म्हणून अनुभव देतांना म्हटलें आहे कीं, "मी तरुण होतों, तेव्हां आमच्या पिढीला वाटत होतें कीं, आम्ही राज्यक्रान्ति करूं. मला कोणी विचारलें कीं, तुमच्या मताप्रमाणें गोष्टी घडल्या तर ही क्रान्ति किती दिवसांत कराल ? मी उत्तर दिलें १५ दिवसांत ! १८८९ सालीं देशांत राज्यक्रांति होऊन १७८९ च्या फ्रेंच राज्यक्रांतीचा शतसांवत्सरिक उत्सव प्रत्यक्ष होणार अशी कल्पना कांहीं लोकांप्रमाणें मला होती, व मी तर त्यांतल्या त्यांत नेमस्त मताचा तरुण म्हणून प्रसिद्ध होतों." याचें तात्पर्य इतकेंच कीं राज्यक्रांति ही गोष्ट सोपी नाहीं. आणि बोलतांना हें तरुणांच्या लक्षांत नसलें तरी अनुभवानें त्यांना तें आपोआप समजतें. हा बोध आपण हिंदुस्थानासंबंधानेंहि लक्षांत ठेवून

तरुण संघाच्या चळवळीला सहानुभूतीनेंच वागविलें पाहिजे.

शेवटीं एकच मुद्दा सांगावयाचा. तो असा कीं, सरकारतर्फे मि. कांसग्रेव्ह आम्हाला म्हणाले कीं, 'या बिलाला विरोध करणारे तुम्ही लोक बेजबाबदार आहां. पण मी म्हणतों, वेळ्नचालून सर्व सत्ता जबाबदारीच्या नावाखालीं तुम्हीं लोकांना आपल्या हातीं राखून ठेवली आहे. तिचा अंशहि तुम्हीं आम्हाला देत नाहीं. हा तुमचा मक्ता नाहींसा होईल व राष्ट्राचा कारभार चालविण्याचें काम तुम्ही आमच्या हातीं प्रत्यक्ष द्याल तेव्हां तुमच्यासारखे आम्ही आपलें कार्यकारी प्रधानमंडळ बनवूं शकूं. तुम्हाला तुमच्या पदावरून ओढून आम्हाला त्या पदावर आरूढ होण्याची संधि मिळेल, तेव्हां आम्हीं आपली जबाबदारी ओळखूंच ओळखूं. आमच्या असेंब्लीला जोंपर्यंत तुम्ही अशा बेजबाबदार स्थितींत ठेवणार तोंपर्यंत आम्हीहि बेजबाबदार राहणारच ! आम्ही आज लोकांना जबाबदार आहों, तुम्हाला नाहीं.

# रामायणाच्या वादाचा समारोप

वि. वि. गतवर्षी 'महाराष्ट्रीय' यांनीं लिहिलेल्या 'रामायणाचा उपसंहार' या पुस्तकावर मी गुणदोषविवेचनात्मक टीका केसरींत लिहीत असतांना, त्याला अलीकडे महाराष्ट्रीय यांनीं दोनतीन लेख लिहून उत्तर दिलें आहे. 'महाराष्ट्रीय' यांच्या ग्रंथांचे गुण मी घेतलेच आहेत. पण ऐतिहासिक टीकापद्धतीच्या विशिष्ट दृष्टीनें त्यांनीं हा ग्रंथ कसा लिहावयास पाहिजे होता याविषयीं मी सविस्तर विवेचन केलें होतें. महाराष्ट्रीय यांनीं दिलेल्या उत्तरांत माझे कोणतेच मुद्दे समाधानकारक रीतीनें खोडून काढले नाहींत हें वाचकांना परस्पर दिसून येईलच. तथापि केवळ प्रत्युत्तरादाखल एकदोन शब्द लिहितों.

महाराष्ट्रीय यांचा माझ्यावर आक्षेप असा कीं, मी रामायणास पुराण या सदरांत घातलें! पण हें म्हणणें खरें नाहीं. "काव्य इतिहास व पुराण" अशा त्रिदळ विशेषणानें मी रामायण-ग्रंथाचें वर्णन केलें आहे, व तेंच सार्थ आहे असें इतिहासाची खरी दृष्टि असणारा कोणीहि मनुष्य कबूल करील. 'महाराष्ट्रीय' रामायणाचें वर्णन "काव्य व इतिहास" एवढेंच करतात. मी त्याला "काव्य इतिहास व पुराण" असें म्हणतों. या 'पुराण' शब्दाच्या अधिकाबद्दलच वाद आहे.

ऐतिहासिक टीकेचे जे सर्वमान्य नियम आहेत त्या विशिष्ट दृष्टीनेंच मी ही टीका लिहिली. "रामायणाला मी पुराण म्हटलें व पुराणाचीं प्रसिद्ध असलेलीं पांच लक्षणें त्याला लागू करतां येण्यासारखीं नाहींत" असें महाराष्ट्रीय यांनीं म्हटलें तरी, रामायणांत आलेल्या पुराणमय दंतकथा, कल्पित अमानुष वर्णनें, वैदिक कथासंग्रह व पुनरावृत्तीचे प्रक्षिप्त श्लोक यांनीं ग्रंथाच्या ऐतिहासिकत्वाला बाध येतो कीं नाहीं, हाच माझा मुख्य मुद्दा आहे. स्वतः ग्रंथकारच "मूळ रामायणाची श्लोक-संख्या अठरा हजारांहून कोणत्याहि प्रकारें कमी होणार नाहीं" असें धरून चोवीस हजारांतील सहा हजार श्लोक प्रक्षिप्त मानतात! तेव्हां रामायणास ऐतिहासिक टीकेच्या दृष्टीनें कांहींसें पुराणमय स्वरूप आलें आहे असें म्हणण्यास त्यांना भीति कसली? आणि या वादाची मौज अशी कीं "सध्याची रामायणाची प्रत पुराण होण्यास पात्र आहे याविषयीं वाद नाहीं" असें महाराष्ट्रीय यांनीच केसरींत पहिल्या लेखांत म्हटलें आहे हें वाचकांनीं काढून पहावें! "रामायणांतील पौराणिक कथा प्रक्षिप्त भागांत येत असल्यामुळें ऐतिहासिक अनुमानाचे प्रसंगीं त्या वगळल्या गेल्या आहेत" असें महाराष्ट्रीय म्हणतात. पण मीहि टीकालेख लिहितांना पौराणिक अगर प्रक्षिप्त भागाला मान्यता न देण्यांत मी तरी वेगळें काय केलें आहे?

ऐतिहासिक चर्चेच्या दृष्टीनें, इतिहास व पुराण यांत काय भेद आहे तें एका उदाहरणानें लक्षांत येईल. महाभारतांत द्रौपदीला पांच पती होते ही गोष्ट सांगितली हा इतिहास म्हणतां येईल. पण कुंतीनें पांच पांडवांना 'आणलेला भिक्षा सारखी वाटून घ्या' असें सांगितलें म्हणून द्रौपदी ही पांचांची बायको झाली ही दंतकथा पुराणाच्या सदरांतच घातली पाहिजे! ऐतिहासिक अनुमानाच्या दृष्टीनें या कल्पित गोष्टीला काडीचीहि किंमत नाहीं; मग ती प्रक्षिप्त असो वा नसो. अशाच दृष्टीनें रामायणाकडे पाहिलें पाहिजे.

: रावण ब्राह्मण होता असें ठरविण्यांत ग्रंथकर्त्याची हीच चूक झाली आहे. "राक्षसांच्या नीतिविषयक कल्पना इतर मनुष्यजातीशीं अभिन्न असल्यामुळें त्यांचा धर्महि (वैदिक धर्माहून) अभिन्न असावा" असें महाराष्ट्रीय यांनीं अनुमान केलें आहे. पण हें विधान चूक आहे. नीतिकल्पनाच पाहिल्या तर सर्व धर्मांत त्या सारख्याच आहेत. म्हणून सर्व धर्म एकच आहेत असें कोणी म्हणेल तर

तें हास्यास्पद होईल! " वेद प्रमाण मानीत असतां नरमांसभक्षणाकडे राक्षसांची प्रवृत्ति कां व्हावी हे एक गूढ आहे व तें उकलत नाहीं" अशी जर खुद्द ग्रंथांतच महाराष्ट्रीय यांनी शंका प्रदर्शित केली आहे तर "ब्राह्मण व ब्राह्मणेतर असे दोन 'वर्ण' त्या वेळीं राक्षसामध्ये होते" असलें विधान त्यांनीं रामायणाच्या उपसंहारासारख्या वाङ्मयविषयक ग्रंथांत कां करावें!

नरमांसभक्षणाच्या खुणेवरून राक्षस हे आर्य नसून अनार्य असावेत व त्यांचा धर्म भाषा रीतिरिवाज ही आर्यांपासून सर्वस्वी भिन्न असावीं एवढें साधें अनुमान महाराष्ट्रीय यांना कसें सुचलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. सध्याच्या रामायणांतील राक्षसांची नांवें संस्कृत आहेत. पण या अनार्य लोकांचीं मूळ नांवें काय असावीं, याचा एका शोधकानें अनार्य लोकांत जाऊन, त्यांच्या भाषा शिकून शोध लावला आहे असें मी टीकेंत मुद्दाम लिहिलें होतें पण त्या मुद्द्याला महाराष्ट्रीय यांनीं उत्तरच दिलें नाहीं! व रावण ब्राह्मण होता. कां? तर ग्रंथांतच तसें म्हटलें आहे, हा त्यांचा आग्रह अद्यापि कायमच आहे.

पण रावण ब्राह्मण होता याचा अर्थ काय होतो! -रावणाचा भाऊ कुंभकर्ण व मुलगा इंद्रजित हेहि ब्राह्मण होते. शूर्पणखा ही रावणाची बहीण (असें रामायणांतच सांगितलें आहे) म्हणून तीहि ब्राह्मण असली पाहिजे! ती रामावर अनुरक्त झाली व तिनें प्रथम रामाला आपणाशी लग्न करण्याविषयीं विनंति केली, पण रामानें तिला नकार दिला तो शूर्पणखा अनार्य होती म्हणून नव्हे! तर ब्राह्मण शूर्पणखेशीं क्षत्रिय रामानें विवाह करणें हा धर्मनिषिद्ध प्रतिलोम लग्नसंबंध होईल म्हणून!! व धर्मज्ञ राम असें वर्तन कसें करील?—अशा प्रकारचीं अनेक हास्यास्पद अनुमानें अगदीं तर्कशुद्ध रीतीनें 'रावण ब्राह्मण होता' या एका विधानावरून निघूं शकतील! हें ग्रंथकर्त्यास मान्य आहे काय?

पण अशा रीतीनें ग्रंथकर्त्याच्या लक्षांतहि न आलेलीं अनुमानें काढून दाखवून मी ग्रंथकर्त्यास हास्यास्पद करूं इच्छित नाहीं. 'रावण ब्राह्मण होता' असें महाराष्ट्रीयांनीं म्हटलें. मग राम हाहि ब्राह्मणेतर होता असें कोणी कां म्हणूं नये? म्हणून "आजच्या राजकारणांतील शब्द भलतीकडे न लावण्याचें तारतम्य ग्रंथकर्त्यास राहिलें नाहीं" असें मी पूर्वी म्हटलें व तेंच अजूनहि म्हणतों. "राक्षसांत जर चातुर्वर्ण्य होतें तर ब्राह्मणाखेरीज दुसऱ्या कोणत्याहि वर्णाचा उल्लेख त्यांच्यांत कां सांपडूं नये? किंबहुना सर्व प्राचीन वाङ्मयांत ब्राह्मणेतर हा एक वर्ण आहे असें असल्याचें वचन कोणास काढून दाखवितां येईल तर तें आम्हास हवें आहे" असें मी जाहीर आव्हान केलें होतें व तें माझें विधान अद्यापिहि कायम आहे! महाराष्ट्रीय यांना तें वाटेल तेव्हां खोडून काढावें. **का. न. केळकर.**

# अफगाणिस्थान व अमानउल्ला

## मनोरंजक व अंतस्थ माहिती

### (उत्तरार्ध)

### अमीराचा कांटेरी मुकुट

मी अमानउल्लाला विचारलें " तुम्ही स्वतंत्र होण्याकरितां इंग्रजांकडून मिळणाऱ्या ६ लक्ष रुपयांच्या खंडणीवर पाणी सोडलें; त्यानें तुमचा तोटा झाला नाहीं काय?" यावर स्वतः अमीर कांहीं बोलला नाहीं. पण जवळचा एक उमराव म्हणाला " त्या ६ लक्षांची आम्हाला फारशी पर्वा नाहीं. राज्यकारभाराला खर्च लागतो तो आमचा आम्हीच पुरवूं शकतों. आम्हाला परराज्यापासून उचापत करावी लागत नाहीं." आणि हें खरेंच असावें. कारण सर्व गोष्टींत बहुधा अमानउल्ला हा मोठा समजूतदार मनुष्य दिसतो. त्याला राज्याची माहिती चांगली आहे व त्याचा स्वभावहि चांगला आहे. म्हणून देशाची प्रगति करतांना अडथळे आले तरी त्यांतून तो निभावून जाईल असें वाटतें.

नंतर आम्हीं स्वतः अमीर त्याचीं मुलें व मुली वगैरेंचे फोटो घेतले. त्याच्या संग्रहीं सुमारें ५० मोटारगाड्या दिसल्या. स्वतः तो मोठा कुशल ड्रायव्हर आहे एकदां काबूल-पाघमनच्या रस्त्यावर मारेकऱ्यांनीं त्याच्यावर हल्ला केला. तेव्हां चटदिशीं त्यानें आपली रोल्स राईस गाडी वळवून घेऊन

७० मैलांच्या वेगानें ती हांकली व तो निसटून गेला. १९२०-२१ सालाच्या युद्धांत काबूलवर इंग्रजांनीं विमानांतून गोळे टाकले. तेव्हांपासून विमानांचें महत्त्व त्याला कळूं लागलें. व हल्लीं स्वतः विमान हांकण्याची विद्या तो शिकत आहे. एखाद्या दिवशीं काबूलच्या मैदानावर विमानांत बसून तो उलट्या-सुलट्या उड्या घेऊन, प्रजेला या नव्या विद्येचा पराक्रम दाखवील व त्याचे प्रजाजन तोबा तोबा म्हणून आश्चर्यानें कौतुक करतील असे मला खास वाटतें. त्यानें आपलीं विमानें इटालींतून आणलीं आहेत. पण कांहीं झालें तरी फिरून विचार मनांत येतो कीं, अमीराच्या गादीला इतका धोका असतो कीं, मला ती कोणी फुकट दिली तरी नको. कारण अमीर झाला म्हणजे त्याला नेहमीं आकस्मिक मृत्यु ठरलेलाच असणार!

लवकरच पुढें आमच्या मुक्कामांत रमझानचा सण आला. या दिवसांत रस्ते झाडणाऱ्यापासून अमीरापर्यंत सगळे लोक उपवास करतात. पण उपवासाचा दिवस संपला कीं,बिजेचा चंद्र पाहण्याची जी घाई होते ती कांहीं विचारूं नये. उपवास सोडण्याला ज्याचा त्याला प्रत्यक्ष चंद्र दिसावा लागत नाहीं. तर दूरदूरच्या देशांत कोठेंहि चंद्र दिसला कीं नाहीं याच्या बातम्या तारेनें आणवून लोक पारणें सोडतात.

## अमानउल्लाचें वक्तृत्व

रमझानईदच्या सणाच्या दिवशीं वीस हजार सैन्याची मोठी लष्करी मिरवणूक निघाली ती मी पाहिली. भर-उन्हाळ्यांत दोनप्रहरीं चार तास कवाईत सुरू होती. सैन्यांत शिस्त फार चांगली दिसली. शिपायाकडून बाजारांत कधीं कोणाला उपद्रव होत नाहीं. देशांतील सगळ्या लढाऊ वर्गांच्या पलटणी त्यानें ठेवल्या आहेत. पोषाक काबूलच्या गिरणींत तयार केलेल्या कपड्याचे पण देखणे आहेत. लष्कराबरोबर हत्तींचे ताफे होते. अमीराची एकंदर फौज एक लक्षापर्यंत आहे असें म्हणतात. सैन्यांत व बाहेर शिस्त राखली जाते. तरी पण आपल्या आजाइतका अमानउल्ला क्रूर नाहीं. त्याच्या बॅंडवाल्यांनीं राष्ट्रगीत वाजविलें तेव्हां त्यांत देशी विदेशी अनेक प्रकारचे मिश्र आलाप ऐकूं आले. मिरवणुकीनें व स्वतः अमीरानें खुदबा पढून प्रार्थना केली. वीस हजार सैनिक व इतर हजारों प्रेक्षक असे ३०-४० हजार लोक एकत्र नमाज पढतांना पाहून मौज वाटली. अमानउल्ला हा मोठा वक्ता आहे. तो जाहिरनामा तेवढा कागदावरून वाचतो. पण लोकांना उद्देशून करण्याचीं भाषणें तो टिपणाशिवाय तोंडानें स्फूर्तीनें बोलतो. त्या दिवशीं तिसरे प्रहरीं फिरून दरबार झाला. तेथेंहि त्यानें लहानसें पण आयत्या वेळीं भाषण केलें. अनेक युरोपियन राष्ट्रांचे वकील सरकारी पोषाक घालून त्याचें अभिनंदन करण्याला आले होते.

भाषणाच्या शेवटीं मोठ्या आवाजानें व हातवारे करून त्यानें अफगाण राष्ट्राचा जय शब्द उच्चारला. त्याबरोबर हजारों लोकांनीं ओरडून व जय शब्द म्हणून हवा दणाणून सोडली. शेवटीं सर्वांना खिसमिस व खडीसाखर यांची खिरापत वांटण्यांत आली. पण हें सर्व चालू असतां,राजद्रोह फितुरी कट हीं कानाकोपऱ्यांतून डोकावत नसतील कीं काय असा संशय मला वरचेवर येईच. या सर्व समारंभाचे फोटो सिनेमांत दाखविण्याकरितां आम्ही घेतले. फौज महंमदखान नांवाचा एक उमराव जवळच होता. तो म्हणाला "काय हो, तुमचा स्नेही या मोठ्या लांकडी पेटीचीं यंत्र चक्रे सारखीं फिरवतो आहे. पण त्यांतून कांहींच बाहेर पडत नाहीं हें काय ?" यावर मला वाटलें कीं, चलचित्रविद्येची अफगाणिस्थानांतील लोकांना अजून ओळख झालेली नसावी. पुढें समजून सांगितल्यावर तो उमराव म्हणाला— "मग आतां आमचीं चित्रें काढून, तीं स्वदेशांत नेऊन आम्हाला तुम्ही आपल्या बायकांच्या डोळ्यापुढें नाचवणार तर! अमीरसाहेबांची तुम्हाला परवानगीच आहे म्हणून, नाहीं तर"—

इकडून तिकडून असेच शंकेखोर व नाखुषीचे उद्गार ऐकूं येतात. यानंतर आणखी एक दरबार आम्ही पाहिला. खोस्त प्रांतांतील बंड मोडून एक वर्ष झालें, याकरितां तो दरबार भरला होता. काबूलच्या एका वर्तमानपत्रावरून अशी हकीकत समजली की, या बंडांत तोफखान्याच्या माऱ्यांनीं ३५०० घरें जमीनदोस्त झालीं व १५७५ बंडवाल्यांची कत्तल झाली. त्या वेळीं हिंवाळा मोठा कडक पडला होता. अजूनहि या बंडाचा प्रतिध्वनि लोकांच्या हृदयांत उमटत आहे. बाहेरून शिस्त अतिशय उत्तम दिसते. पण आंतून कारवाई चालू असतेच. माझें म्हणणें असें नाहीं कीं, काबूलचा इंग्रज वकील कर्नल हंफ्रीज, हा रशियन वकिलाच्या कॉफीच्या पेल्यांत विष कालवील ! पण कोणा अफगाणाच्या हातून कोणाचा खून कधीं होईल याचा नेम नाहीं. काबुलांत जर बंड किंवा क्रांति झाली, तर येथील वकिलांना या गोष्टींचीं वर्णनें लिहून लांबलचक खलितें सजविण्याच्या आधीं अफगाण लोकांपासून आपला जीव बचावून कसा तरी पळ काढावा लागेल. पूर्वी एक वेळ इंग्रज वकील सर लुई कॅव्हॅगनेरी याचा खून तेव्हांच्या अमीराच्याहि इच्छेविरुद्ध झाला. शिवाय

येथें जे परराष्ट्रीय वकील जमलेले आहेत ते तरी एकमेकांना पाण्यांत कोठें पाहात नाहींत ? कुत्रा, लांडगा, अस्वल अशांची जर अवचित एकत्र गांठ पडली तर तीं एकमेकांकडे पाहून जशीं तोंडें करतील तशीं या निरनिराळ्या वकीलांचीं तोंडे एकमेकाकडे पाहून होतात.

त्यांतल्या त्यांत इटालीचा वकीलच तेवढा निष्काळजी दिसला. कारण इटालीचा अफगाणिस्थानाशीं फारसा संबंध येत नाहीं. हल्लींचा इंग्रज वकील कर्नल हंफ्रीज याच्याविषयीं जो तो बरें बोलतो, पण तो व त्याच्या वकिलातींतील सगळी मंडळी यांच्याविषयीं, अफगाणाचा खरा स्नेहभाव असा दिसत नाहीं. या सर्व लोकांच्या मागें अमीरानें आपले गुप्त हेर ठेवलेले असतात. दिवसा रात्रीं हे लोक कोठेंहि बाहेर पडले म्हणजे, त्यांच्यामागें जाऊन त्यांची पाळत राखतात. सगळ्या इंग्रज रहिवाश्यांपैकीं डॉक्टराबद्दल मात्र त्यांना वैषम्य वाटत नाहीं. रशियन सोव्हिएटचा वकीलहि तेथें होता. त्याचा पोषाक व सरंजाम असातसाच दिसला. त्याच्या बायकोचा पोषाक मुक्तिफौजेंतील एखाद्या धर्मोपदेशिकेप्रमाणें गमतीचा वाटला. त्याच्या मोटारगाडीवर लेनिनचें तांबडें निशाण फडकत होतें. फ्रेंचांचा वकीलहि तेथें होता, व प्रख्यात प्रचंड संशोधक सर ऑरेंज स्टीन हाहि येथें आला होता. तो ब्रिटिश प्रजाजन. पण या दोघांपैकीं फ्रेंचांनाच अमीरानें अफगाणिस्थानांतील पुराणवस्तुसंशोधनाचा मक्ता देऊन टाकला म्हणतात. सर ऑरेंज स्टीन हा इंग्रज म्हणून त्याला ती परवानगी दिली नाहीं.

## वकिलावकिलांतील लाथाळी

या फ्रेंच संशोधकांशीं अमीरानें असा करार केला आहे कीं, ज्या जुन्या व प्राचीन वस्तू खणून काढल्या जातील त्यांपैकीं निम्या अफगाणिस्थानांतच राहिल्या पाहिजेत. या परराष्ट्रीय वकिला-वकिलांतील इतकी चुरस त्याच्या डोळ्याला दिसली कीं, काबुलांत वीज उत्पन्न करण्याचें इंजीन नसलें तरी या वकिलांच्या चुरशीनें हवी तेवढी वीज निर्माण करतां आली असती ! इंग्रज व रशियन वकील तर समोरासमोर एकमेकांकडे पाहातहि नसतात, प्रत्येकजण असा बहाणा करी कीं, जणुं काय दुसरा वकील अस्तित्वांतच नाहीं. चहा घेण्याला हे वकील बसले तेव्हां इंग्रज व चिनी, तुर्की व रशियन, इराणी व बुखारियन अशा जोड्यांनीं बसले. एकटा इटालियन वकील मात्र सर्वांशीं सारख्या स्नेहभावानें वागत होता. या वकिलाच्या रूपानें युरोपांतील निरनिराळ्या राष्ट्रांचीं वैमनस्यें, स्पर्धा व असूया हीं मूर्तिमंत वावरत होतीं. हे वकील मनांतून परस्परांचा द्वेष करीत होते. पण अमीराविषयींहि त्यांचें मन साफ दिसत नव्हतें. दरबारांत किंवा खासगी भेटींत हे वकील मोठे गोड बोलतात. पण या राष्ट्रांची लष्करी तयारी आंतून चालूच असते. इंग्रजांनीं इकडे क्वेटा, लुंडीखाना येथपर्यंत आपली आगगाडी नेऊन भिडविली आहे. अमीरानें परवानगी देण्याचा अवकाश कीं थेट कंदाहारपर्यंत मीटर गेज रेल्वे करतां येईल इतकें रेल्वेचें सामान त्यांनीं क्वेटाजवळ भरून ठेवलें आहे. खुद्द अफगाणिस्थान--तुर्कस्थानांत, रशिया देखील हळूहळू आक्रमण करीत आहे. पूर्वी झार हा बोलूनचालून बादशहा होता व साम्राज्यवादी होता. पण नव्या सोव्हिएट बोल्शेव्हिक राज्यांतहि हें आक्रमण व अतिक्रमण सुरूच आहे. आणि मौज ही कीं, रशियन व इंग्रज दोन हीं सरकारें मोठ्यांदा असें प्रतिपादितात कीं, "हें सर्व करण्यांत आमचा कांहींच स्वार्थ नाहीं. काबूलच्या अमीराला जेव्हां गरज पडेल व तो हाक मारील तेव्हां त्याच्या मदतीला धांवून जातां यावें म्हणून ही सगळी तयारी !"

इंग्रज वकील कर्नल हंफ्रीज मला हळूच म्हणाला "अफगाणिस्थानाचा संबंध जोडण्यांत हिंदुस्थानचा बचाव करण्याचा आमचा हेतु आहे; म्हणून अमीर हा प्रबळ राहावा व आमचा त्याचा स्नेह राहावा अशी आमची इच्छा आहे. कारण त्यामुळे पूर्वी अफगाणिस्थानांतून हिंदुस्थानावर स्वाऱ्या झाल्या तशा यापुढें तरी होणार नाहींत !"

## पुढील भाकीत

त्यावर मी म्हणालों, "मुसलमान लोक तर म्हणतात कीं, सगळ्या मुसलमान राष्ट्रांचा एक संघ बनणार आहे. मध्ययुगांत तुर्की लोकांनीं सगळ्या मुसलमान जमातीचा संघ केला तसा करून, त्यांचें पुढारीपण घेण्याचा काबूलच्या अमीराचा विचार आहे असें तुम्हाला वाटतें काय?" त्यावर इंग्रज वकिलानें गालांत हंसून व डोळ्यांत थोडीशी चमक आणून मला उत्तर दिलें कीं, "त्या गोष्टीला फार अवकाश आहे. तूर्त अमीरानें आपले आसन संभाळलें म्हणजे मिळविलें. त्यानें आपली प्रजा आपल्या ताब्यांत ठेवली म्हणजे तूर्त मोठाच पराक्रम केला असें मी म्हणेन." कदाचित् कर्नल हंफ्रीज याला भावी गोष्टी आधींच दिसत असाव्या! कारण इराणच्या सरहद्दीच्या बाजूला नुकताच दंगाधोपा झाला आहे. काबूलच्या आसपासच्या पठाणांच्या टोळ्या अस्वस्थ दिसतात. हिंदुस्थानाचें सैन्य हळूहळू पावला-पावलानें अफगाणिस्थानाच्या सरहद्दीकडे सरकत आहे. कारण अमीर अमानउल्लाविरुद्ध चोहोंकडे बंड उठणार अशी वदंता आहे. जर कदाचित् अमीर मारला गेला-न जाणो, कोणत्याहि बंडाळींत असें कांहीं घडतें--आणि जर अफगाणांस

असा संशय आला कीं, अमीराचा खून झाला तो परराष्ट्रीय राजकारणाच्या कारस्थानामुळे झाला, तर धर्मयुद्धाचें कुंड तेव्हांच पेटेल व मग हिंदुस्थानाला भीति उत्पन्न होणारच की नाहीं ?

कांहीं वेळानें मी रशियन वकिलाशीं बोललो. तो मला म्हणाला "आमची प्रतिज्ञा सगळ्या जगाला स्वातंत्र्य मिळवून देण्याची आहे. व अफगाणिस्थानाकडे मी पाहातों तोंहि स्वातंत्र्याच्या तत्वाचा विजय होण्याच्या दृष्टीनें." त्या रशियन वकिलाची बायको जवळच बसली होती. ती म्हणाली, "अहो, रशियाने हिंदुस्थान जिंकण्याची गोष्ट कशाला बोलता? खुद्द रशियांतील लोकाना भरपूर अन्न व अंगभर वस्त्र मिळवून देण्याचाच उद्योग आज आमच्या सरकारला काय थोडा आहे?" मी म्हटलें, "ठीक बोललां." पण मी मनांत म्हणालो, "दिसण्यांत जी गोष्ट हास्यास्पद व अकल्पित दिसते तीच केव्हां केव्हा घडून येते." परराष्ट्रीय वकील असे सावधगिरीनें बोलतात, पण कित्येक अफगाण मन मोकळें करून बोलतात.

## अफगाणाचा हिंदुस्थानावर डोळा

फरजबसी नांवाचा एक अफगाणिस्थानाचा उमराव मला म्हणाला, "ती पाहा बालासार किल्ल्यावर अर्धचंद्रकोर उमटली आहे. आमचे धर्माची धार ह्या चंद्रकोरीप्रमाणें तीक्ष्ण असते. तिच्यायोगानें आमच्या धर्मक्षेत्रांतलें पीक आम्ही केव्हा तरी कापून घेणार. सुदैवानें आज अफगाणिस्थान सुरक्षित आहे. रशियन व इंग्रज आमच्यावर हल्ले करू शकत नाहींत. इराण बोलनचालून कमकुवत आहे. कोणी सांगावें कीं, पुढील १० वर्षे अशीच स्थिति राहिली तर आम्ही काय करणार नाहीं? कदाचित् आम्ही हिंदुस्थानावर स्वारीहि करू. तिकडे ते हिंदु राजे खूप खाऊन खाऊन पुष्ट झालेले असतात! बायकांसारखे पोषाक करून नटतात! केसांत मोतीं गुंफतात! व चोळण्याच्या विजारीला घुंगुर बांधतात! या हिंदु राजांची संपत्ति कोठून आली? मुसलमान शेतकऱ्यांकडून त्यांनीं ती जुलुमानें मिळविली की नाहीं? मग आम्हालाहि त्यांतला भाग का मिळूं नये ? "

मी एकदम उत्तर दिलें "हो, हो, तुम्हाला कां मिळूं नये! पण काय हो, पेशावर प्रांत जिंकून सिंधु नदीला आपली सरहद्द नेऊन भिडविण्याचा अफगाणिस्थानचा जो संकल्प आहे त्याचें कसें काय चाललें आहे? माजी अमीर हबीबउल्ला याला याच कारस्थानामुळें मृत्यु आलाना?" फरजबसी म्हणाला, "होय, हबीबउल्लाचा खून करणारे लोक आज जमिनींत गाडून गेले आहेत व त्यांच्या डोक्यावर गवत उगवलें आहे हे खरें. पण इंग्रजाविरुद्ध असणारा असा पक्ष अफगाणिस्थानांतून नाहींसा झालेला नाही! तुम्ही इंग्रज लोकांनीं हबीबउल्लाशीं फारच स्नेह ठेवला म्हणून नसरुल्लाखानाच्या लोकांनीं त्यांचा खून केला. व नसरुल्लाखानच अमीर व्हावयाचा, पण त्या कारस्थानांत अमाउनल्लाची आई अधिक शहाणी ठरली व तिनें आपल्या आवडत्या मुलास गादी मिळवून दिली. अमानउल्ला गादीवर बसल्यानंतर इंग्रजांशीं त्यानें युद्ध केलें, तें इंग्रजांचा द्वेष करणाऱ्या पक्षाच्या चिथावणीमुळें केलें. अर्थात् इंग्रजांनीहि मोठ्या तोफा आणल्या व आपण आहों येथपर्यंत तोफाचे गोळे टाकले. पुढे अमीरानें सावध होऊन या इंग्रजद्वेषी पक्षाला बाजूला सारलें, तरी पण त्यानें अफगाणिस्थानाचें स्वातंत्र्य तरी मिळविलें की नाहीं! इंग्रजांचा वकील तह करण्याकरिता चार महिने येऊन काबुलला राहिला. पण अमीरानें त्याची भेट घेतली नाहीं! कारण युद्धांत तोच विजयी झाला होता."

मी म्हणालो "मग तुम्ही केव्हां तरी हिंदुस्थान जिंकणार की नाहीं?" फरजबसी म्हणाला, "इनशाल्ला. ईश्वराची इच्छा असेल तर तसें घडेल. हिंदुस्थानाला मालिक पाहिजे. तो कोठून तरी निघेल, मग तो आमच्या पर्वतांच्या दऱ्यांतून, किंवा बन्नू प्रांतांतील जंगलांच्या जाळ्यांतून किंवा पेशावर येथील गुलाबांच्या बगीचांतून निघो! कोठून तरी निघेल खरा." मी म्हणालो "हा सर्व तुम्हा अफगाणाचा बेत खरा, पण तुमच्या अमीरसाहेबाना हे पसंत आहे काय?" त्यावर तो हंसून म्हणाला, राजे लोक जर आपल्या मनांतल्या खऱ्या गोष्टी बोलून दाखवतील तर ते राजपदावर राहाणारच नाहींत. सालोमनप्रमाणें राजे लोकांना आपले तोंड मिटून धरावें लागतें. प्रत्येक गोष्ट करण्याला एकेक योग्य वेळ असते. तशी वेळ असेल तेव्हां आम्ही इंग्रजांना आलिंगन देऊं, पण उलट वेळ असेल तेव्हां—!

हें ऐकून मी मनांत म्हणालों, एकूण अफगाण मनाचा संकल्प करून बसला आहे खरा. तो प्रसंगाचीच वाट पाहात असावा. हिंदुस्थानात बंड झालें कीं, तो पेशावर शहरावर चालून येणार हे खास!

---

# अमेरिकेंतील लजपतराय यांचा जीवनक्रम

( लेखक—**ना. सु. हर्डीकर, हुबळी.**)

**लेखांक ८ वा**

## लालाजींचें हिंदभूमीवरील प्रेम

लालाजी आपल्या हाताखालच्या लोकांना किंवा सहकाऱ्यांना, सर्व प्रकारचें शिक्षण देऊन, त्यांची योग्य काळजी घेत असत, हे मागील लेखांत सांगितलेंच आहे. तसें करण्यांत आपल्या सहकाऱ्यांनीं उत्तम व कर्तृत्ववान राष्ट्रसेवक बनून, हिंदमातेची उत्कृष्ट सेवा करावी, व त्याकरितां जरूर तो स्वार्थत्याग करण्यास त्यांनीं तयार व्हावें, असाच त्यांचा हेतु असावा. लालाजींच्या साऱ्या आयुष्यांत त्यांच्या दृष्टीपुढून, भारतमातेच्या पतितावस्थेची दीन व करुण मूर्ति, आणि तिला परकीयांच्या जुलमी कचाट्यांतून मुक्त करण्यासंबंधींच्या उपायांचे विचार क्षणभरहि दूर होत नसत, हे त्यांच्या भाषणावरून व लेखनावरून सहज सिद्ध होण्याजोगें आहे. एखादे प्रसंगीं आपल्या मातृभूमीविषयींचे प्रेम त्यांच्या अंतःकरणांत इतकें उचंबळून येई कीं, त्या वेळीं त्यांनीं उच्चारलेले उद्गार ऐकून, किंवा लिहिलेले लेख पाहून ऐकणारांस किंवा वाचणारास लालाजी हे अत्यंत भावनाप्रधान आहेत असें वाटल्याखेरीज राहात नसे! त्यांच्या आजपर्यंतच्या लेखांपैकीं हिंदमातेविषयींच्या प्रेमोद्गारांनीं व तिच्या सांप्रतच्या हीनदीन दशेच्या करुणापूर्ण शब्दांनीं भरलेला एक लेख मला विशेष हृदयस्पर्शी वाटला.

हा लेख न्यूयॉर्कच्या 'यंग इंडिया' मासिकाच्या पहिल्याच (सन १९१७ च्या जानवारीच्या) अंकांत प्रसिद्ध झालेला आहे. या लेखाचा मथळा 'मातृपदीं'-'अॅट दि मदर्स फीट'-अशा अर्थाचा असून, लालाजींनी लेखक या नात्यानें त्यांत स्वतःचें नांव प्रसिद्ध न करतां "तुझा एक नम्र बालक" (दाय अंबल सन्) या टोपण नांवानें तो प्रसिद्ध करण्याविषयीं मला मुद्दाम सूचना केली! असें करण्याचा उद्देश त्यांना विचारतां तो लेख अत्यंत भावनाप्रधान असल्याकारणानें आपण तसें करीत आहों असें त्यांनीं मला सांगितलें! पुढें एखादे प्रसंगीं तो लेख तुम्हींच लिहिलेला आहे, असें मी प्रसिद्ध करीन असें मी त्यांचेजवळ त्या वेळीं बोललों होतों आणि त्यांनीं त्याबद्दल नकारहि दर्शविलेला नव्हता. प्रसिद्धीचें हें कार्य त्यांच्या हयातींत मजकडून झालें नाहीं याबद्दल मला हळहळ वाटते. तथापि आज तो लेख, व त्या लेखाच्या खऱ्या लेखकाचें नांव प्रसिद्ध करीत आहे. लेख बराच मोठा आहे हे मी जाणत असूनहि तो संपूर्ण प्रसिद्ध करण्याचें कारण, लालाजींच्या मनांत मातृभूमीबद्दलची कळकळ व प्रेम किती होतें हे दाखविणें हेंच होय.

### लालाजींचा लेख "मातृपदीं"

"माते, मी तुला अर्पण तरी काय करणार? तुला देण्यास योग्य असें मजजवळ कांहींच नाहीं. मी हीन—अत्यंत हीन आहे, तथापि तुला कोणत्याहि ठिकाणीं व कोणत्याहि प्रसंगीं अर्पण करण्याजोगी अशी एकच एक वस्तु मजजवळ आहे, आणि ती म्हणजे तुजवरचें माझें उत्कट प्रेम ही होय! हे माते, मी तुजवर प्रीति करतों, भक्ति करतों, तुझा मी भजक आहे असें म्हटल्याबद्दल तूं मला क्षमा करशील ना? तसें म्हणणें हें धाष्ट्र्याचें व उद्धटपणाचें होईल हे मी जाणत आहे. पण तूं माझ्या अंतःकरणांत अधिष्ठित झालेली देवता आहेस, हें तुला माहीतच असल्यानें, माझ्या प्रार्थनेचा तूं अव्हेर करणार नाहींस अशी माझी पूर्ण खात्री आहे. प्रेमळ माते, 'मी तुजवर प्रेम करतों' हें माझें म्हणणें मूर्खपणाचें तर नाहीं ना? कारण "प्रेम" हा शब्द अत्यंत सामान्य आहे, व त्या शब्दावरील भावनाहि पण तशीच आहे. ज्यांना ज्याची विशेष आवड आहे, त्यावर ते साहजिक 'प्रेम' करतातच! ते लोक ग्रंथ, चित्रें, फुलें, मिठाई व आईसक्रीम वगैरेसारख्या सर्वसाधारण पदार्थांवरहि 'प्रीति' दर्शवितात. कुमारावर कुमारिका, व कुमारिकेवर कुमार प्रीति करतो. स्त्री—पुरुषाला व पुरुष—स्त्रीला किंवा प्रियतम प्रियतमेला व प्रियतमा प्रियतमाला चाहतात. राजकारणी पुरुषांना सत्ता व अभिमान प्रिय असतात! तेव्हां माते, मी तुजवर 'प्रेम' करतों म्हणणें म्हणजे अगदीं सामान्य गोष्ट खरी, पण तसें म्हटल्याखेरीज माझ्यानें राहवत नाहीं! कारण मातृभूमे, तूं मला खरोखरीच प्रिय आहेस! मला केव्हां केव्हां तर असा उमाळा येतो कीं, परमेश्वरापेक्षांही तूंच मला जास्त प्रिय आहेस. फार काय एखाद्या योग्याचें, मौलवीचें किंवा

एखाद्या पाद्र्याचेंहि प्रेम आपल्या परमेश्वरावर जितकें असूं शकणार नाहीं तितकें प्रेम माझें तुजवर आहे! तूं देवता आहेस; आणि देवता ह्या देवांच्याहि माता असतात, मग तूंच देवांच्यापेक्षांहि अधिक पूज्य व श्रेष्ठ नव्हेस काय? अखिल सृष्टींत स्त्रीइतकें उदात्त, उत्तम व सुंदर कांहींच नाहीं. आणि त्यांतून मातृपदीं असलेल्या स्त्रीविषयीं तर बोलावयासच नको. 'माता' या दृष्टीनें स्त्री विश्वाची देवता आहे. हे मातृभू, तूं अशा मातांची माता असल्यानें, तुझें अधिष्ठान फारच उच्च व श्रेष्ठ आहे. आणि म्हणूनच तूं जगन्माता म्हणवून घेतेस.

हे हिंदभूमे, मी केवळ तुलाच वरच्या दर्जाची लेखून बोलतों व वागतों म्हणून, कधीं कधीं कांहीं निंदक मला दोष देतात. तुझ्यावरील निश्चल प्रीती-विषयींच्या माझ्या पक्षपाती मतामुळें मी राष्ट्राराष्ट्रांत वैषम्य उत्पन्न केल्याप्रमाणे होतें व विश्वबंधुत्वा-विषयींची माझी सहानुभूति मर्यादित होते असें मला सांगण्यांत येते व लोक मजवर टीकाहि करतात. पण ते मला मुळींच पटत नाहीं! मला तुझ्यातच सर्व जगत दिसतें. तुजवर प्रेम केल्यानेंच साऱ्या मानवसृष्टीवर प्रेम केल्या-सारखें आहे असेंच मला वाटतें. कारण तुझ्या-खेरीज मला वेगळें जगत् असे कोठेंच दिसत नाहीं. माते, तुझ्यावर प्रेम केल्यास माझी प्रेमळ सहानु-भूति मर्यादित होते असें मला बिलकुल वाटत नाहीं. उलटपक्षीं तुझ्या द्वारच मी साऱ्या विश्वाची सेवा करूं शकेन असा मला भरंवसा वाटतो. तूं विश्वामध्यें आणि विश्व तुझ्यामध्यें निगडित झालेलें असून तूं म्हणजेच विश्व या दृष्टीनेच मी आजवर प्रत्येक गोष्टीचा विचार केलेला आहे. वसुधैव कुटुंबकम् या न्यायास अनुसरून सृष्टीचीं सर्व अपत्यें तुझींच आहेत. बुद्धशंकराचार्यादि तुझे सुपुत्र मानव-जातीकरितांच जन्मले, झटले आणि मेलेना? त्यांनीं ज्ञाती किंवा पक्षभेद कधीं लक्षांत आणला होता का? माते! सृष्टींत जें कांहीं रम्य आणि उदात्त म्हणून आहे, त्याची जन्मदाती तूंच आहेस. अर्थात् विश्वबंधुत्व तुझ्या रोमरोमांतरीं भरलेलें असतां, तुजवर सर्वस्वी प्रेम केल्यानें, साऱ्या मानवजातीवरच नव्हे, तर साऱ्या निसर्ग-निर्मित चराचर वस्तूंवरहि तुझ्या द्वारेंच प्रीति करण्याची मी आकांक्षा बाळगणें चुकीचें होईल का!

मातृभूमे, तुझ्याशीं संबंध असलेल्या प्रत्येक वस्तूवर मी प्रेम करतों. तेथील पर्वत, दऱ्याखोरीं, नद्या, मैदानें, फुलें, फळें, फार काय ओसाड वाळवंटेंहि मला अत्यंत प्रिय आहेत. तुझ्या हृदयांतील तसेंच तुझ्या मांडीवर खेळणारें आणि तुझ्या बाहूंनीं कवटाळलेलें निसर्गसिद्ध सौंदर्य सृष्टींतील अन्य कोणत्या भागात आहे बरें? मी तुझ्या लेंकरांवरहि प्रेम करतों. हीं तुझीं मुलें काळीं, भोळीं ओंगळ, विदेशलंपट, भांडखोर अशीं अनेक विशेषणें त्यांना लावण्यांत येतात, आणि मलाहि माझ्या तमोवृत्तीच्या भरांत केव्हां केव्हां तीं तशीं दिसतात. पण याचें कारण केवळ तुजबद्दलची त्यांची विस्मरण-वृत्ति हेंच होय. असें मला वाटूं लागल्याबरोबर माझा त्यांजवरचा राग नाहींसा होतो प्रसंगी कोणी मला शिव्याही देतात, पण आपण काय बोलत आहों याचें त्यांनाच भान राहात नाहीं असें वाटत असल्यामुळें मी त्या गोष्टीबद्दल फिकीर करीत नाहीं. उलट तीं तुझींच लेंकरं आहेत आणि त्यांच्या व माझ्या नसानसांतून एकच रक्त वाहात आहे या आत्मीय भावनेनें मी त्यांच्यावर प्रेमच करतों. त्यांचा त्याग करणे मला शक्यच नाहीं. मी आणि माझें सर्वस्व हें त्यांचेंच आहे. नूतन वर्षीं तुला अर्पण करावयाचा नजराणा तो हाच. माते! उदार अंतःकरणाने तूं त्याचा स्वीकार करशीलना?"

लालाजींच्या या लेखांत भारतमाते-विषयींची त्यांची उज्ज्वल प्रीति, अनादिकाला-पासून आजपर्यंत भारतभूमींत जन्मलेल्या थोर महात्म्यांविषयींचा त्यांचा अभिमान, हिंदभूमीवरील उत्कट प्रेमानें प्रेरित होऊन तिच्या सेवेबरोबरच साऱ्या विश्वाचीहि सेवा करण्याचा त्यांचा संकल्प यांची पूर्ण जाणीव दिसून येत आहे. हा लेख त्यांच्या म्हणण्याप्रमाणें भावनाप्रधान आहे हें खरें असलें तरी भावनाप्रधानत्वाबरोबरच त्यांत यथार्थत्वहि तितक्याच प्रमाणानें सुंदर शब्दांत गोविलेलें आहे ही गोष्ट कोणास नाकबूल करतां येईल बरें?

---

# दिल्लीचें बातमीपत्र

[ ३ ] दिल्ली ता. १४।२।२९.

शुक्रवार ते रविवार तीन दिवसांची सुटी संपल्यावर, सोमवारीं तीन सरकारी बिलांचें काम झालें. पहिलें बिल मुदतीच्या कायद्यांत दुरुस्ती करण्यासंबधानें कौन्सिल ऑफ स्टेटकडून पास होऊन आलेलें होतें. यांत मुख्य तीन कलमें होतीं. एका कलमानें असें ठरविण्यांत आलें आहे कीं, धर्मसंस्था किंवा देवस्थानें यांचा 'मॅनेजरांह' 'ट्रस्टी' असेंच समजलें जाईल. याचा अर्थ त्याचे-विरुद्ध मुदतीचा कायदा लागणार नाहीं. तसेंच या बिलानें असें ठरविलें आहे कीं, अशा ट्रस्टीनें कोणतीहि ट्रस्ट मिळकत कोणाला देऊन टाकली असतां, दावा करण्याच्या मुदतीचा प्रारंभ वादीला हा व्यवहार झाल्याचें कळल्यापासून तीन वर्षे; व नव्या ट्रस्टीला जुन्या ट्रस्टींनीं केलेला व्यवहार रद्द करण्याची फिर्याद आणण्याकरितां नवीन ट्रस्टी कामावर रुजू झाल्यापासून १२ वर्षे असावी. या बिलाचा हेतु देवस्थान व धर्मसंस्था यांची मिळकत अयोग्य रीतीनें विकली जाऊं नये व या मिळकतींत ज्यांचा हितसंबंध असेल त्यांना दावा करून योग्य तर ती मिळकत परत घेतां यावी असा आहे.

***

दुसरें सरकारी बिल पेटंट ॲक्टांत दुरुस्ती करण्यासंबंधाचें होतें व तें सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलें. त्याचप्रमाणें मजुरांचे संप व तंटे कमी करणें, थांबविणें, तोडणें, यासंबंधीचें तिसरें एक बिल होतें व तेंहि सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्यांत आलें. मात्र या तिसऱ्या बिलावर विशेष चर्चा झाली. सरकारनें या बिलाच्या पहिल्या भागांत पंचायतपद्धतीनें मालक व मजूर यांच्यातील तंटे तोडण्यासंबधींची योजना केली आहे. परंतु पुढच्या कलमातून मजुरांचा संप करण्याचा हक्क पुष्कळसा कमी करून नोटीस दिल्याशिवाय कांहीं कांहीं धंद्यांत किंवा कामगिरींत एकदम संप पुकारणें हा गुन्हा ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. बिलाच्या या दुसऱ्या भागासंबंधानें असें म्हणतां येईल कीं, हें बिल पब्लिक सेफ्टी बिलाचेंच एक लहानसें, किंबहुना मोठेंहि भावंड शोभेल. पब्लिक सेफ्टी बिलानें फार तर चार आगंतुक कम्युनिस्ट लोकांना चौकशी न होतां हद्दपारी सोसावी लागेल. परंतु या दुसऱ्या भावंडाचा पराक्रम असा होणार कीं, सरकार ठरवील त्या धंद्यांत व कामगारींत कांहीं ठराविक मुदतीची नोटीस दिल्याशिवाय काम सोडतां येणार नाहीं, सोडल्यास शिक्षा होईल, व सहानुभूतीनें एका मजूर वर्गानें दुसऱ्या मजूर वर्गाकरितां संप करणें हाहि गुन्हा ठरेल! विलायतेंत १९२६ सालीं मोठा सार्वत्रिक संप झाला तो कायद्याच्या बळावर मोडला गेला. पण लगेच उरलासुरला पक्का बंदोबस्त करण्याकरितां पुढच्या वर्षी हल्लींच्या प्रधानमंडळानें वरील प्रकारच्या तजविजीचें बिल पार्लमेंटांत मंजूर करवून घेतलें तेव्हा मजूर पक्षानें त्याला कसून विरोध केला. व पुढील निवडणुकींत मजूर पक्ष अधिकारारूढ झाला तर हें बिल रद्द होण्याचा संभव आहे. दरम्यानच्या या संधिकालांत हिंदुस्थानसरकार आपला हात साधून घेत आहे. परंतु सिलेक्ट कमिटींत नीर-क्षीर न्यायानें चांगला तेवढा भाग उरून वाईट तेवढा भाग बहुतकरून काढून टाकण्यांत येईल. आणि तें न झालें तर असेंब्लीमध्यें या बिलाला फार कसून विरोध होईल. सदर बिलावर स्वराज्य पक्षापैकीं, चेट्टी व जमनादास मेथा आणि नॅशनलिस्ट पक्षातर्फे पं. कुंझरू यांची चांगलीं भाषणें झालीं.

***

मंगळवार हा खासगी सभासदांच्या बिलांचा दिवस होता. पैकीं पहिलें बिल हिंदुधर्मशास्त्रांतील वारसाईचा क्रम हल्लीं आहे त्याहून कांहीं गोष्टींत वेगळा करण्यासंबंधीचें होतें. हें बिल गतवर्षी असेंब्लींत डॉ. गौर यांच्या प्रयत्नानें धांदलींत पास होऊन गेलें व त्यानंतर तें कौन्सिल ऑफ स्टेटकडून एक दोन दुरुस्त्या करून पास होऊन यंदा परत असेंब्लीकडे आलें. मिताक्षरेच्या धर्मशास्त्राप्रमाणें कांहीं दूरच्या गोत्रज सपिंडांकडे वारसा जातो तो मेलेल्या मूळ मालकाच्या जवळच्या नात्याच्या स्त्रियांकडे ओढून आणण्याचा या बिलाचा हेतु आहे. वारसा मृताच्या आजापर्यंत ( बापाच्या बापापर्यंत ) वर गेल्यानंतर तो हल्लीं कांहीं प्रांतातून दूरच्या गोत्रज सपिंड पुरुषांकडे जातो. यामुळे घराण्यांत जन्मलेल्या स्त्रियांना वारसा मिळण्याचा संभव अगदींच उरत नाहीं ही गोष्ट या बिलानें बदलली आहे. या बिलावर पुराणमतवादी पक्ष व सुधारणावादी पक्ष या दृष्टीनें खूप दुमत होतें. युरोपियन मुसलमान वगैरे लोक प्रायः या चर्चेपासून अलिप्त राहिले. सरकारनेंहि तटस्थपणाचें धोरण स्वीकारलें. पण निरनिराळया पक्षांच्या काय पण एकाच पक्षाच्या हिंदु पुढाऱ्यांमध्येंहि मतभेद झाले. या वादांत मूळ बिलाच्या दृष्टीनें पं. नेहरू व जयकर हे एका बाजूला व पं. मालवीय, अणे, शेषा अय्यंगार हे दुसऱ्या बाजूला असे तट पटले होते! परंतु हें बिल तत्त्वतः

गतवर्षी असेंब्लीकडून मंजूर झालें होतें व कौन्सिल ऑफ स्टेटकडूनहि तें मंजूर होऊन आलें होतें. यामुळें किरकोळ एखादी उपसूचना करण्याखेरीज बिलाची सुधारणा करण्याला किंवा तें बुडविण्याला वावच नव्हता. अर्थात् या वेळीं सरकारच्या बाजूचे लोकहि लोकपक्षांतील यादवी गंमतीनें पाहात होते! मंगळवारीं पुढें आलेलें खासगी दुसरें बिल नियोगी यांचें. या बिलाविषयींचा त्यांचा प्रयत्न आज तीन वर्षें सुरू आहे व यंदा तें सिलेक्ट कमिटीपर्यंत जाण्याची मजल पोंचली. या बिलाचा हेतु असा आहे कीं, पूर्वबंगाल व आसाम या प्रांतांत आगगाडीचे रस्ते कमी असल्यामुळें, मुख्य दळणवळण लहानमोठ्या आगबोटींनीं चालू असत. पूर्वी सरकारनें स्वतःच्या आगबोटी ठेवून पाहिल्या. पण त्या पुढें युरोपियन कंपन्यांच्या हातीं दिल्या. त्यामुळें त्यांना या वाहतुकीचा मक्ता मिळाल्यासारखें होऊन, त्यांनीं वाहतुकीचे दर हवे तितके चढ ठेवले! एकाला एक दर, दुसऱ्याला दुसरा असा पक्षपात दाखवावा, उतारूंची गैरसोय दूर करूं नये असाहि प्रकार सुरू आहे. त्याविरुद्ध तिकडील लोकांनीं व सरकारी अधिकाऱ्यांनीं पुष्कळ गवागवा केला. पण या जोरजोर युरोपियन कंपन्या ऐकत नाहींत. म्हणून सरकारी कायदा करून, त्यांच्यावर दाब ठेवणार मंडळ्या लादाव्या अशी या बिलांत योजना सुचविली आहे. सरकारनें या बिलाला म्हणण्यासारखा विरोध केला नाहीं. तथापि बिल परत असेंब्लीकडे आल्यावर काय होतें तें पाहावयाचें आहे.

***

असेंब्लीच्या चालू बैठकींत आतांपर्यंत दोन महत्त्वाचीं खासगी बिलें सिलेक्ट कमिटीपर्यंत गेलीं आहेत. परंतु भीति अशी वाटते कीं, तारीख २० फेब्रुवारी हा खासगी बिलाच्या कामाकरितां यापुढें एकच दिवस असल्यामुळें, त्यांत आंत या सिलेक्ट कमिट्यांचें काम होऊन तीं बिलें असेंब्ली-पुढें येणार नाहींत आणि तसें न झालें म्हणजे सिमल्याच्या बैठकीपर्यंत तीं पुढें ढकलली जातील. पण ती बैठक आधींच तीन आठवड्यांची. त्यांत खासगी बिलांना एखाददुसरा दिवसच मिळावयाचा व तो देखील हरविलास शारदा यांच्या बालविवाहाच्या बिलाकरितां आजच जवळ जवळ राखून ठेवल्यासारखा झाला आहे यामुळें हीं दोनहि बिलें तेथें चर्चेला निघण्याचा संभव फारच कमी व चालू वर्षाअखेर कायदेमंडळाच्या निवडणुकी व्हावयाच्या म्हणजे खासगी सभासदांचीं बिलें काय किंवा ठराव काय, ते कोणत्याहि मजली-पर्यंत वर चढले असले तरी तेथूनच ढांसळून पडावयाचे असा नियम असल्यामुळें, या बिलांची इतिश्री झाली असेंच अनुभवास येईल. हीं दोन बिलें म्हणजे साराभाई नेमचंद हाजी यांनीं आणलेलें किनाऱ्यावरील व्यापारी जहाजांचें व दुसरें हें नियोगी यांचें. खासगी सभासदांचीं बिलें व ठराव यांचा अशा रीतीनें कोंडमारा होत असल्यामुळें, आणखी कांहीं दिवस मिळावे असे प्रयत्न असेंब्लींत आज तीन वर्षे सुरू आहेत. स्वराज्य पक्षानें पूर्वीपासूनच या संबंधाच्या सूचना असेंब्लीकडे पाठविल्या आहेत. पण त्यांना आजवर मुहूर्तच लाभला नाहीं. सिमल्याच्या बठकींत जवळ जवळ अखेरच्या दिवशीं मोठ्या प्रयत्नानें या सूचनांच्या चर्चेला "हरिः ॐ" इतकें म्हणून नुसता प्रारंभ तेवढा झाला! पण यावरील खरी चर्चा एकदांची परवां बुधवारीं झाली. यांपैकीं एक सूचना अशी होती कीं, " अध्यक्षांना खासगी सभासदांचें राहिलेलें काम पुरें करण्याकरितां, गव्हर्नर–जनरल यांनीं नेमून दिलेल्या दिवसांखेरीज इतर कोणत्याहि दिवशीं सरकारी कामानंतर राहिलें असलेलें खासगी सभासदांचें काम सुरू करण्यात यावें. किंबहुना सरकारी कामाकरितां नेमलेल्या दिवशीं चार वाजण्याचे आंतच सरकारी काम पुरें झालें तर खासगी काम अध्यक्षांच्या परवानगीनें सुरू व्हावें.

***

या सूचनेला सरकारनें कसून विरोध केला. यावर अणे, दिवाण चमनलाल, रंगास्वामी अय्यंगार यांचीं चांगलीं मुद्देसूद भाषणें झालीं. परंतु हा प्रश्न मतें मोजूनच निकालांत काढावा लागला. खासगी कामाचा प्रश्न सर्वांनाच सारखा प्रिय व महत्त्वाचा असल्यामुळें युरोपियन सभासदांखेरीज बाकीच्या बहुतेक सभासदांनीं अनुकूल मत दिलें. म्हणून ही सूचना ५० विरुद्ध ४६ मतें पडून मंजूर झाली. असेंब्लीच्या कामकाजाच्या नियमामध्यें दुसरीहि एक महत्त्वाची दुरुस्ती सुचविण्यांत आली होती. ती अशी कीं, गव्हर्नर–जनरल असेंब्लीचे सभासदांना उद्देशून भाषण करतात. तरी त्यांचें भाषणासंबंधीं असेंब्लीचें मत अध्यक्षांचे मार्फत त्यांना कळविण्यांत यावें. होम मेंबर केरर यांनीं या दुरुस्तीला हरकत घेतली. त्यांचें म्हणणें असें कीं, आपल्या भाषणावर अशी कायदेमंडळांत उघड टीका होऊं लागली तर गव्हर्नर-जनरल यांचें भाषण पूर्वीसारखें विचारपरिप्लुत व मननीय न होतां नीरस होऊं लागेल. शिवाय भाषणांतील त्यांचे विचार हे खासगी स्वरूपाचे असतात. तेव्हां त्यांचें भाषण म्हणजे कांहीं सरकारी धोरण असा अर्थ नाहीं! या त्यांच्या कोटिक्रमाला दिवाण चमनलाल, रंगास्वामी अय्यंगार, सर पुरुषोत्तमदास, अणे यांनीं समर्पक

उत्तरें दिलीं. तथापि कांहीं सभासद हजर न राहिल्यामुळे, युक्तिवाद निष्फळ ठरून, संख्याबलावर सरकारनें हा डाव जिंकला व दुरुस्तीची सूचना ४६ विरुद्ध ४२ मतें पडून नामंजूर झाली! तसेंच सरकारी अधिकारी अगर गव्हर्नर–जनरल यांच्या सरकारी कामावरील टीका ही गव्हर्नर व गव्हर्नर जनरल यांच्या वर्तनावरील टीका समजण्यांत येऊं नये हीहि सूचना नामंजूर झाली. बाकी कांहीं किरकोळ दुरुस्त्या करण्यांत आल्या. असेंब्लीनें केलेली दुरुस्ती सरकारी गॅझेटांत प्रसिद्ध झाल्यावर अमलांत येईल. पण गव्हर्नर–जनरल याना ही दुरुस्ती रद्द करण्याचा अधिकार असल्यामुळें गंडांतर पूर्णपणें टळलें असें म्हणतां येत नाहीं.

***

नरेंद्र–मंडळाची बैठक सोमवार तारीख ११ रोजीं सुरू झाली आहे. व उद्यांचा एक दिवस तिचें अधिवेशन आणखी चालेल. सुमारें ४० संस्थानांचे अधिपती बैठकीस हजर राहिले आहेत. महाराष्ट्रांतील भोर, सांगली व जमखंडी येथील संस्थानांचे अधिपतीहि आले आहेत. कांहीं ठरावांवर यांनीं भाषणें चांगली केलीं. पहिले दिवशीं नामदार व्हाइसरॉय यांचें सभासदांना उद्देशून भाषण झालें व त्यांनीं सर्वांना सुखानें व आनंदानें राहा व दीर्घायुषी व्हा असा आशीर्वाद दिला! पहिला ठराव वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना व इतर लोकांना नरेंद्र मंडळाची बैठक खुली ठेवण्यांत यावी असा पतियाळाच्या महाराजांनीं मांडला. व तो मंजूर झाला. दुसरे दिवसापासून, वर्तमानपत्राच्या बातमीदारांना परवानगी देण्यांत आली. दुसरे दिवशीं पालनपूरच्या महाराजांनीं लीग ऑफ नेशन्सच्या बैठकीकरितां शिष्टमंडळाचे एक सभासद या नात्यानें आपण केलेल्या कामगिरीचा रिपोर्ट सादर केला. त्यांच्या या कामगिरीबद्दल आभारप्रदर्शनाचा ठराव पतियाळाच्या महाराजांनीं मांडला व तोहि मंजूर करण्यांत आला. बुधवारीं एक महत्त्वाचा ठराव चर्चेला निघाला तो असा कीं, 'देशी संस्थानिक, ब्रिटिश प्रजाजनांच्या प्रगतीला आड येत नाहीत. उलट त्यांची सहानुभूतीच आहे. तथापि अलीकडे ब्रिटिश हिंदुस्थानात साम्राज्यापासून फुटू पाहणारा स्वातंत्र्यवादी पक्ष उत्पन्न झाला आहे याकरितां वेळींच सावध होऊन सनदा व तहनामे यांच्या आधारावर साम्राज्य–सरकाराशीं जडलेले आमचे हितसंबंध कोणत्याहि रीतीनें तोडण्यांत येतां कामा नयेत व अशा स्वातंत्र्यवादी लोकांना कोणत्याहि तऱ्हेनें सहानुभूति ही संगा दाखवीत नाहीं. व पुढील राज्यघटनेंत ज्या कांहीं सुधारणा होतील त्याहि ब्रिटिश साम्राज्याशीं केलेले तहनामे व सनदा यांच्या आधारावरच झाल्या पाहिजेत." हा ठरावहि पतियाळाच्या महाराजांनीं मांडला. त्याचें भाषण चांगलें झालें. भाषणांत साम्राज्यनिष्ठा व साम्राज्यसरकारचें वैभवाची ओतप्रोत स्तुति भरली होती. काश्मीरच्या महाराजांनीं अनुमोदन दिलें. त्यांचा एक मुद्दा असा होता कीं आमच्या संस्थानावरच सरहद्दीचें संरक्षण करण्याची जबाबदारी फार मोठी आहे. याकरितां साम्राज्याशीं असलेला संबंध तोडणें शक्य नाहीं. या ठरावावरहि सांगली, बिकानेर, अलवार व मंडी येथील संस्थानांच्या अधिपतींचीं भाषणें झालीं. या सर्वांच्या भाषणांतील एक मुद्दा मात्र विशेष महत्त्वाचा होता. व तो हा कीं ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजनांच्या राजकीय प्रगतीचे आड आम्ही येत नाहीं. व्हाइसरॉयसाहेबांनीं आपल्या वतीनें तहनामे व सनदा यांचे अधिकार राखण्याचें आश्वासन दिलें व ठराव मंजूर झाला.

# प्रासंगिक बोल

## १ सामाजिक सुधारक व सरकार

सरकारच आता कांहीं सामाजिक सुधारणांबद्दल उपेक्षावृत्ति दाखवूं लागल्यामुळें सामाजिक सुधारकहि असें म्हणूं लागले आहेत कीं, हिंदुस्थानाला स्वराज्य मिळाल्याशिवाय सामाजिक सुधारणा व्हावयाची नाहीं. 'इंडियन सोशल रिफॉर्मर" पत्राचे संपादक श्री. नटराजन यांनीं नुकतेच असे उद्गार काढले कीं, "हल्लींच्या राज्यपद्धतीच्या मदतानें खरी समाजसुधारणा होईल हा माझा विश्वास पूर्णपणें नाहींसा झाला आहे. मी राजकारणी नाहीं. माझी सर्व सहानुभूति सामाजिक सुधारणांकडे आहे, पण पुष्कळ वर्षांच्या अनुभवानें माझी अशी खात्री झाली कीं, आज सरकार पुराणवादी, संकुचित व प्रतिगामी लोकांशीं सहकारिता करून सामाजिक सुधारणेच्या कार्यास अडथळा करीत आहे. तेव्हां मला नाइलाजानें व माझ्या इच्छेविरुद्ध राजकारणांत भाग घ्यावा लागत आहे. आणि मी आज स्पष्ट सांगतों

कीं हिंदुस्थानाला पूर्ण स्वायत्तता मिळाल्याशिवाय कोणतीहि सामाजिक अगर आर्थिक सुधारणा 'कि जातमधुना येन ग्रयं ग्रयं वयं वयं' असा प्रश्न सहजच होणें शक्य नाहीं." सरकारासंबंधानें अशाच तऱ्हेचे विचार श्री. जयकर यांनीं असेब्लीमध्यें बोलून दाखविले होते व गेल्या सामाजिक परिषदेंत त्यांनीं त्यांचाच पुनरुच्चार केला. शारदा बिलासंबंधीं सरकारची उदासीन वृत्ति पाहूनच सुधारकांना हा वैराग उत्पन्न झाला असावा. जयकर व नटराजन यांच्या उद्गारांवरून इतर सामाजिक सुधारकांच्या मनांत हेच विचार घोळत असावेत असेंहि अनुमान करण्यास हरकत नाहीं. व्यापारी, धंदेवाले, मजूर, शेतकरी इत्यादि वर्ग आपापल्या हितसंबंधांत परकीय सरकार कसें नडतें याचा अनुभव येऊन राजकारणाच्या प्रवाहांत पडले तसेंच सुधारकांनाहि अनिच्छेनें पडावें लागणार असें दिसतें.

* * *

पण सरकार व सामाजिक सुधारक यांच्यांत आज जी विमनस्कता दिसत आहे तिजवरून असा प्रश्न उभा राहतो कीं, सरकारी मदतीनें सामाजिक सुधारणा करण्याची आशा बाळगणारे लोक असे एकाएकीं कसे उलटले? सरकारी धोरणाचें सूक्ष्म अवलोकन केलें तर या परिवर्तनाचा सहज खुलासा होण्यासारखा आहे. राजकीय दृष्ट्या पथ्यावर पडणाऱ्या अशा लोकहिताच्या गोष्टी ज्या असतील त्याच बहुधा सरकार करीत असतें. पूर्वी सुधारणेला मदत केली तर तितकेच चांगले सुशिक्षित लोक राजकारणांतील तीव्र मार्गापासून बाजूला राहण्याची सोय होत होती पण आतां सरकारला १९१९ च्या राजकीय सुधारणा लोकांना चालवितां येत नाहीत असें दाखवावयाचें आहे. आतां "आमचें कर्तव्य फक्त राज्य चालविण्याचें. लोकांचें हित पाहणें हें कौन्सिलांच्या-वर सोंपविलें आहे" असें म्हणून अधिकारी मोकळे होत आहेत! कौन्सिलांपासून हित होत नाहीं; त्यापेक्षां अनियंत्रित इंग्रज अधिकारी बरे असे म्हणण्याची लोकांवर पाळी यावी असा यांत हेतु दिसतो. शिवाय सामाजिक सुधारणेला मदत करून, राज-कारणाकडचा सुशिक्षितांचा कल कमी होण्याचा आतां संभव राहिला नाहीं. आतां कौन्सिलांतून सरकारी पक्षाच्या बाजूला बहुमत कसें मिळालें हीच सरकाराची दृष्टि आहे. १९१९ च्या सुधारणा कायद्यानें हा सरकारच्या भूमिकेंत पालट झाला, म्हणूनच जे समाजसुधारक सरकाराकडे आशेनें पाहात होते ते आतां डोळे वटारून पाहूं लागले आहेत! पण नटराजन् यांच्या म्हणण्या प्रमाणें केवळ स्वराज्यानेंच सामाजिक सुधारणा होईल काय? स्वराज्य होणार ते लोकसत्तेचें होणार. अर्थात् कोणत्याहि सामाजिक सुधारणेबद्दल बहुजन-समाजाचें मतपरिवर्तन करणें ही गोष्ट स्वराज्यांतहि करावी लागणारच. कोणत्याहि सुधारणेला बहुमत-परिवर्तनाचा प्रयत्न अवश्य आहे. यास्तव आधीं लोकजागृति करा, लोकांना सुधारणा इष्ट असल्याचें पटवून द्या. आणि मग त्याची बजावणी करा. असाच मार्ग लो. टिळक पूर्वीपासून सांगत असत. तो त्या वेळीं सुधारकांना पटला नाहीं, पण यापुढें तो पटेल असें वाटतें.

## २ अमेरिकेंतील वैवाहिक जीवन

अमेरिकेंत वैवाहिक जीवनाची इतिश्री होऊं लागल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत असून समाजहित-चिंतकांस मोठी विवंचना उत्पन्न झाली आहे. कुटुंबाचा पाश नको. स्वैरपणें ज्या रीतीनें जीवन सुखकर करतां येईल त्या रीतीनें करण्याकडे बहुजन-समाजाची प्रवृत्ति होत चालली आहे. यावरून अमेरिकन गृहसंस्थेंतच कांहीं बिघाड उत्पन्न झाला आहे कीं काय असा प्रश्न तेथील समाजशास्त्रज्ञांपुढें आहे. चिकागो युनिव्हर्सिटीचे प्रो. ऑकबर्न यांच्या मताप्रमाणें अमेरिकेंत गृहसुख जवळ जवळ उरलेंच नाहीं असें म्हणावें लागतें. ते म्हणतात, दरएक पांच विवाहांपैकीं एक लग्न कोर्टांत जाऊन मोडूं लागलें आहे. तेथील प्रेस नांवाच्या पत्रांत यासंबंधानें असें म्हटलें आहे:—दिवसानुदिवस विवाहसंबंध कमी कमी होत चालले आहेत. असें असतांहि देशांत रोगी लोकांची संख्या वाढतच आहे. याचा अर्थ उघडच असा आहे कीं, देशांत स्त्री-पुरुषांचे नीतिबाह्य संबंध वाढत चालले आहेत. अमेरिकेसारख्या सुप्रतिष्ठित समाजांत असे प्रकार होणें म्हणजे भयंकर नैतिक अधःपात होय." खुद्द अमेरिकेंत विवाहाच्या बाबतींत काय प्रकार चालले आहेत हें मिस मेयो व तिचे जातभाई यांनीं डोळे उघडून पाहावेत. हिंदुस्थानांत विवाह हा एक पवित्र संस्कार मानतात व समाजस्थैर्याला विवाहसंस्थेची किती अत्याव-श्यकता आहे हें समाजशास्त्री जाणतात. तेव्हां परोपदेश करण्यापूर्वी आपल्या पायाखालीं काय जळत आहे याचा विचार मेयोबाईनीं अगत्य करावा.

---

# वाढत्या कर्जाची वारसदारी

मुंबई इलाख्याचें वार्षिक अंदाजपत्रक गेल्या सोमवारीं कायदेमंडळाला सादर करण्यांत आलें आणि तीन दिवस त्या अंदाजपत्रकावर सपाटून चर्चा झाली. मुंबई इलाख्यांतील बजेटांत आठ-दहावर्षांपूर्वीच दिवाळखोरीचा प्रथम पायंडा पाडण्यांत आला. आणि त्यावेळेपासून 'बुडत्याचे पाय खोलांत' या म्हणीप्रमाणें हा इलाखा कर्जाच्या डोहांत अधिकाधिक बुडत आहे. नवे फडणीस ना. गोविंदराव प्रधान यांनीं जें नवें बजेट कौन्सिलापुढें मांडलें त्यांतली कर्जबाजारीपणाची रडकथा जुनीच आहे. त्यांतील कोणत्याहि स्कीमबद्दल ते स्वतः जबाबदार नाहींत हें खरें; पण ही वारसदारी आतां त्यांच्याकडे आली आहे, आणि नव्या वारसदारानें जुन्या उधळेपणाला आळा न घालतां जरी तो नुसता तसाच चालू ठेवला तरी त्या कर्जाच्या बोजाखालीं तो दिवसेंदिवस बेजार झाल्याखेरीज राहणार नाहीं.

नवे फडणीस ना. प्रधान हे आपल्यावरील नव्या जबाबरीचें काम कसें काय पार पडतात तें जाणण्याविषयींची सर्वांस उत्कंठा लागून राहिली होती;पण बजेटासंबंधाचे त्यांचें जें पहिलें भाषण झालें त्यानें ती उत्कंठा तृप्त न होतां अतृप्त अशीच राहिली. एखादा नवा प्रोफेसर आपल्या लेक्चराच्या नोट्स घरीं विसरून आला तर त्या दिवशीं त्याची वर्गांत जशी धांदल होते आणि मग नवा कोणताहि भाग वर्गांत न सांगतां 'आज आपण मागील धड्यांची उजळणीच करूं' असें म्हणून जशी तो वेळ मारून नेतो, त्याप्रमाणें ना. प्रधान यांनीं नवें कोणतेंहि धोरण व्यक्त न करतां जुन्या हकीकतीचा पाढा वाचून वेळ साजरी केली. पहिल्याच प्रसंगाच्या दृष्टीनें त्यांची ही कृति आज खपून गेली, पण अशी टोलवाटोलवी नेहमीच चालू शकणार नाहीं. आज जरी त्यांनीं नवा कर्जाचा बोजा उत्पन्न केला नाहीं, नवा कोणताहि कर बसविला नाहीं आणि जमाखर्चाची कशीबशी रमारमी केली, तरी खर्चाचीं तोंडें जोंपर्यंत कायमच आहेत तोंपर्यंत कर्जावरील व्याज वाढतच जाणार आणि त्यामुळें इतर आवश्यक खात्यांच्या सुधारणेची गळचेपी होणार, हें उघड आहे.

पण ना. प्रधान हे बजेटांतील आंकड्यांच्या कारवाईंत मुरलेले नसल्यानें त्यांच्या भाषणापासून एका दृष्टीनें फायदाच झाला. मुरब्बी फडणीस आंकड्यांचें गौडबंगाल करून वस्तुस्थितीचा थांग लागू देत नाहींत. परंतु ना. प्रधान यांनीं सीधेपणानें सगळ्या स्थितीचें यथातथ्य चित्र रेखाटल्यामुळें आपल्या डोक्यावरील कर्जाच्या बोजाची सर्वांस यथार्थ कल्पना आली. दहा वर्षांपूर्वी ज्या मुंबई इलाख्यावर एक दोन कोटींच्या जुजबी कर्जाहून अधिक बोजा नव्हता त्या इलाख्यावर हल्लीं ४३ कोटींचा बोजा चढला आहे आणि त्याच्या भरतीचा भर अद्यापि संपला नसून, इतर कोणतीहि नवीं कामें हातीं घेतलीं नाहींत तरी नुसत्या सक्करच्या प्रचंड धरणाच्या कामाच्या पूर्ततेच्या पायींच कर्जाचा बोजा आणखी १२-१३ कोटींनीं वाढेल असा सरकारी अंदाज आहे. आणि कामाच्या आरंभाचा सरकारी अंदाज व समाप्तीच्या वेळचा हिशेबाचा नक्की आंकडा यांत नेहमीं जशी तफावत पडते तशीच तफावत या कामींहि पडेल असें मानल्यास सक्कर बॅरेजरूपी बकासुर २० कोटींवर तृप्त न होतां ३० कोटींचा तो बळी घेईल असें समजून चालणेंच शहाणपणाचें होईल.

या वाढत्या बोजाचा विचार बाजूस ठेवला तरी सद्यःस्थितीच किती निराशाजनक आहे पहा. अलीकडे करांचें ओझें शक्य तितकें वाढविलें गेलें असून इलाख्याचें वार्षिक उत्पन्न अवघें १४–१५ कोटींचें आहे, आणि आजमितीला कर्जाची रक्कम ४३ कोटी असून त्यावरील व्याजाची आकारणी अडीच कोट रुपये होते! म्हणजे वार्षिक उत्पन्नांतला सहावा हिस्सा कर्जाच्या व्याजाच्या फेडींतच गडप होतो. वार्षिक व्याजाची ही २½ कोटींची रक्कम पाहून छाती दडपून जाईल म्हणून ती एकत्र एका आंकड्यानें बजेटांत न दाखवितां निरनिराळ्या नांवाखालीं ती दृष्टीआड केली जाते. पण बजेटांत ती कोणत्याहि नांवाखालीं दडपून दिली असली तरी व्याजाच्या पायींच दरसाल अडीच कोटींचा फडशा उडतो ही गोष्ट सरकारासहि नाकारतां येणार नाहीं. कर्जाची ही एवढी धोंड मुंबई इलाख्याच्या गळ्यांत हळूहळू कशी बांधण्यांत आली याचा विचार मनांत आला कीं उद्वेग वाटतो. कारण हा उधळेपणाचा कारभार नव्या कौन्सिलांतील लोकप्रतिनिधींच्या बहुमताची मंजुरी घेत घेत चालला आहे! जुन्या मनूंतला नोकरशाहीचा कारभार पडद्याआड चालत असल्यानें त्यांच्या भलेबुरेपणाची जबाबदारी तरी लोकप्रतिनिधींवर पडत नव्हती; पण आतां लोकनियुक्त सभासदांचें ज्यांत बहुमत आहे अशा कायदे कौन्सिलामार्फत हा कारभार चालला आहे. परंतु एकदां मनुष्य प्रवाहांत सांपडून धारेला लागला म्हणजे तो जसा आपल्या इच्छेविरुद्ध वाहवत जातो

तशीच या सगळ्या उधळ्या स्कीम्सना वार्षिक मंजुरी देणाऱ्या सभासदांची आज घटकेला स्थिति आहे.

या कर्जापैकीं ७½ कोटि रुपये बॅकबेच्या भरावाकरितां समुद्रांत ओतले आणि या योजनेनें नवीन तयार होणारी जमीन विकली गेली तरी अखेरीस या व्यापारांत किमानपक्ष ३ कोटींची खोट बसणार असें स्वतः फडणीसच सांगत आहेत. अर्थातच हा आंकडा याहून अधिक फुगण्याचाच संभव आहे. मजुरांच्या सोयीकरितां ज्या चाळी बांधण्यांत आल्या त्या कामाकडे कर्जाच्या रकमेंतून ३½ कोटी खर्च झाले आहेत. आणि या चाळींतील सगळ्या खोल्या भाडेकऱ्यांनीं भरल्या व त्यांनीं, ज्यास्तींत ज्यास्त भाडें दिलें, तरी खर्च झालेल्या रकमेवरील व्याजाइतकीहि रक्कम वसूल होत नसल्यानें इतर वसुलांतून दरसाल १०-२० लाखांची तूट भरून काढावी लागते. मुंबईच्या उपनगरांची वाढ करण्यासाठीं ज्या ज्या योजना हातीं घेण्यांत आल्या त्याहि अशाच आतबट्ट्याच्या ठरल्या. या सगळ्या सवर्धन स्कीम्सनीं मिळून आतांपर्यंत ३½ कोटी रुपये गट्ट केले; आणि त्यांतल्या बहुतेक सगळ्या योजना नफ्याच्या दृष्टीनें आंगलटच आल्या, अशी कबुली नवे फडणीसच देत आहेत. साष्टी बेटांत रेल्वेचा फांटा नेण्याच्या कामीं ८६ लक्ष रुपये खर्च झाले! त्या योजनेपासून एक पैचीहि आज प्राप्ति नाहीं. एवढेंच नव्हे तर चालू खर्चाचा बोजा तरी आपणावर पडूं नये म्हणून ती रेल्वे जी. आय. पी. कंपनीकडे वहिवाटीकरितां दिली आहे. तिच्यापासून प्राप्ति होईल तेवढी कंपनीनें घ्यावी आणि चालू खर्च कंपनीनेंच सोसावा असा करार आहे. भाकड म्हशीच्या पोटगीचा खर्च तरी परभारें चालावा म्हणून ती गवळ्याच्या गळ्यांत बांधण्यांतलाच हा प्रकार आहे. पण जें मुद्दल खर्च झालें त्याचें व्याज मालकासच कायमचें भरावें लागत आहे.

कर्जाच्या रकमेंतला बराचसा भाग कालव्यांची वाढ व नवीन धरणांचीं कामें यांनीं फस्त करून टाकला आहे. सक्कर बॅरेजकरितां आतांपर्यंत खर्च झालेल्या ७ कोटींखेरीज इतर धरणांच्या कामावरच गेल्या आठ वर्षांत एकंदर ९ कोटी रुपये खर्च झाले आहेत. यांतील सर्वच रक्कम भांडवलखातीं खर्च न पडतां कांहीं चालू उत्पन्नांतून खर्चण्यांत आली आहे खरी. पण रक्कम कोणीकडूनहि खर्च झाली असली तरी अखेरीस तिचा बोजा कर भरणाऱ्यांवरच बसणार हें उघड आहे. कालव्यांची ही वाढ केली खरी; पण त्या भांडवलावरील व्याजाची तरी भरपाई परभारें व्हावी इतकें उत्पन्न इरिगेशनपासून मिळालें पाहिजे. परंतु हीं कामें इतक्या बेअंदाजीपणानें हातीं घेण्यांत आलीं व त्यावर इतक्या बेतालपणानें खर्च करण्यांत आला कीं, ज्या कामाच्या खर्चाचें पहिलें बजेट ३ कोटींचें होतें तेथें ६ कोटींनींहि काम भागेना. अशा या उधळ्या घरखाऊ कामावर नफा होत असल्याचा देखावा कसा दाखवितां येईल अशी विवंचना सरकारास पडली असतां एका कल्पक अधिकाऱ्याच्या सुपीक मेंदूंतून अशी शक्कल निघाली कीं, प्रत्यक्ष पाणीपट्टीचा जेवढा आकार इरिगेशन खात्याकडे जमा होतो तेवढेंच कांहीं कालव्याचें उत्पन्न नसून कोणत्याहि एखाद्या भागांत कालवा सुरू झाल्यावेळेपासून जमीनमहसुलांत जेवढी जादा वाढ झाली असेल तें उत्पन्न आणि कालवा काढल्यामुळें दुष्काळ कामें काढावीं लागलीं नाहींत यामुळें झालेली बचत हें सगळें इरिगेशनचेंच फळ असल्यानें त्या सर्व बाबतींचा हिशेब करून कालवे किफायतशीर झाले आहेत का झाले नाहींत तें ठरवावें. आणि ही अनागोंदी हिशेबाची शक्कल अक्कलमद सरकारला पटली असून येथून पुढें असे अनागोंदी हिशेब ठेवण्यांत येतील असें आमचे नवे भोळे फडणीस आपल्या भाषणांत सांगतात!

पण हिशेबांत तुम्ही एखादी रक्कम या खात्याची त्या खात्याला मांडलीत अथवा कल्पित जमा व कल्पित खर्च लिहून आढावा वाढविलात तरी तुमच्या हातांत अधिक पैसा आला व त्यामुळें शिक्षणासारख्या एखाद्या उपयुक्त कार्याकडे अधिक खर्च करण्याला सवड मिळाली असें थोडेंच होणार आहे! मग हा पोकळ जमाखर्च करण्याचा खटाटोप कशाला? एका जमीनदारानें एक नवा वाडा घेऊन त्याच्या भोंवती फळबाग करण्याकरितां माळी ठेवला; पण माळ्याच्या पगाराइतक्या किंमतीचीहि फळें त्या बागेंतून निघेनात. तेव्हां जमीनदारानें त्या माळ्यास काढून टाकावयाचा विचार केला असतां तो माळी म्हणू लागला कीं, ही बाग करून तारेचें कुंपण घातलें नसतें तर कुत्र्यांनीं वाड्याजवळ येऊन भुंकून तुमची झोपमोड केली असती व तुम्ही आजारी पडला असता. तें आजारीपण टळलें आणि डॉक्टरचेंहि बिल वांचलें. तेव्हां तीं वाचलेली बिलाची रक्कम बागखात्याला जमा करा म्हणजे बागेचें उत्पन्न माझ्या पगाराहून किती तरी अधिक असल्याचें दिसून येईल व मला प्रमोशनहि द्यावेंसें तुम्हाला वाटेल! दुष्काळ पडला असता तर रिलीफ खात्यावर किती रक्कम खर्च झाली असती तिचा अंदाजी आंकडा ठरविणें व तो इरिगेशन खात्याकडे जमा धरून नफा दाखविणें हें, डॉक्टराचें बिल किती द्यावें लागलें असतें याचा अंदाज करून तें

बागेच्या हिशेबांत नफाखातीं धरण्या इतपतच सयुक्तिक आहे ! परंतु शहाण्या सरकाराकडून तसें हुकूम सुटून तालुका कचेऱ्यांतून जुनें रेकार्ड धुंडाळण्याचें काम देखील चालू झालें आहे याचें सखेदाश्चर्य वाटतें. हें रेकार्ड धुंडाळण्यांत कारकुनांचा जो वेळ जातो त्याचा खर्च कोणत्या खात्यावर लादला जाईल हें पाहाणें हें एक ऑडिटरांचें नवें काम होऊन बसेल ! असो.

ना. प्रधान यांच्या भाषणांत वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें नुसतें सिंहावलोकनच असून नवीन वर्षाच्या जमाखर्चाविषयीं कांहीं विचार प्रगट केलेले नाहीत. नवें अंदाजपत्रकहि जुन्या अंदाजपत्रकाहून फारसे वेगळें नाहीं, हें इतरत्र दिलेल्या दोन वर्षांच्या अंदाजी जमेच्या व अंदाजी खर्चाच्या आंकड्यांवरून दिसून येईल. कोर्ट फी आणि स्टांप यांच्या वाढीच्या कायद्याची मुदत संपली असली तरी ती पुनः वाढणार असें गृहीत धरूनच प्रधान साहेबानीं आपलें बजेट केलें आणि तो त्यांचा अंदाज खरा ठरत आहे. कारण त्या दोनहि कायद्यांची मुदत आणखी वाढविण्यास कौन्सिलानें बहुमतानें संमति दिल्या सारखीच आहे.

अशा रीतीनें नव्या अंदाजपत्रकांत नाविन्य असें कांहींच नसल्यामुळें त्यावर भाष्यहि करण्याचें कारण नाहीं. तथापि एकदोन मुद्द्याचा विचार करणे जरूर आहे. गतवर्षी फी-वाढीला संमति देण्याचें कौन्सिलानें नाकारलें व त्यामुळें विद्यार्थ्यांवरचें तें अरिष्ट टळलें. पण यंदा पुनः फीवाढीचे अरिष्ट येऊं पाहात आहे; त्याचा आमदारांनीं खरपूस समाचार घेऊन हें भूत पुनः वर डोकें काढणार नाहीं असा त्याचा कायमचा बंदोबस्त करावा. दुसरी मुद्द्याची गोष्ट ही कीं, मेस्टन कमिटीच्या ठरावास अनुसरून प्रांतिक सरकारास वरिष्ठ सरकाराकडे जी खंडणी भरणा करावी लागत असे तिची, म्हणजे ५६ लक्ष रुपयांची, सूट गतसालापासून प्रांतिक सरकारास मिळाली आहे. या रकमेचा उपयोग सरकारानें कोणीकडे केला? त्यांतील किती रक्कम सोपीव खात्याच्या वाटणीला आली तें कळणे जरूर आहे. तसेंच पूर्वीच्या नियमाप्रमाणें फॅमिन-रिलीफ फंडाकडे दरसाल ६३½ लक्ष रुपये ठेवावे लागत असत. तो नियम बदलून दरसालची रक्कम अवघी १२ लक्ष ठरविण्यांत आली आहे व या फंडांतील शिल्लक ७५ लक्षांवर असेल तर हे १२ लक्षहि शिल्लक टाकलेच पाहिजेत अशी सक्ती नाहीं. या नव्या नियमामुळें मुंबई सरकारास हे ६३ लक्ष रुपयेहि आतां इतरत्र खर्च करण्यास मिळाले आहेत. अशा रीतीनें या दोन खात्यांत मिळून एक कोटीची बचत झाली असतां पुनः बजेटाची तोंड-मिळवणी करण्याची मारामार आहे ती आहेच! आणि वाढती कोर्ट-फी व स्टांप-फी मिळून सवरून वरती बिचाऱ्या विद्यार्थ्यांची फी तोंडी लावण्याची अभिलाषबुद्धि कायमच आहे !

पांच वर्षांपूर्वीच्या बजेटांत प्रांतिक खंडणी ५६ लक्ष द्यावी लागली होती, फॅमिन फंड ६३ लक्ष वेगळा ठेवावा लागला होता, कोर्ट फी व स्टांप फी वाढविण्याचें बिल नामंजूर झालें होतें. असें असून त्या वेळीं जमेचा खर्चाशीं मेळ घालण्यांत आलाच होता. मग आतां ही एक कोट रुपयांची सूट मिळाली असूनहि अशी रड कां? याचा अर्थच हा कीं, ही जी सूट मिळाली ती डेव्हेलप-मेंट व सक्कर बॅरेज या दोन बकासुरांच्या पोटांत गडप्प झाली आणि इतकेंहि करून, 'हविषा कृष्ण वर्त्मेव भूय एवाभिवर्धते' या दृष्टांतातल्याप्रमाणे एक कोटीचा चट्टामट्टा करून भूक कमी होण्याच्या ऐवजीं त्या खात्यांची भूक उलट वाढलीच आहे. आणि येत्या सालच्या अंदाजपत्रकांत सक्कर बॅरेज साठीं साडेतीन कोटी आणि डेव्हेलपमेंटसाठीं एक कोटी असा साडेचार कोटीचा खुराक राखून ठेवलेला आहे. असल्या या उधळेपणानें निभाव कसा लागणार ! आणि या दिवाळखोरीला आळा कसा बसणार! १९२४ सालीं कौन्सिलानें थोडेसे उग्र स्वरूप दाखवितांच शेंकडा ५ टक्के प्रमाणें सगळ्या खात्यांतून काटकसर करण्याचें कबूल करून सरकारनें ५ मिनिटांत ६० लक्षांची बचत करून दाखविली ! पण अलीकडचीं कौन्सिलें पोकळ सापडल्यामुळें लोभाविष्ट सरकार कोपरानें खणूं लागलें आहे. त्या कोपराला झणझणीत कळ लागेल असा टणक विरोध करण्याचें सामर्थ्य मुंबई कौन्सिलांत पुनः केव्हां येणार? तसा विरोध झाल्यावर 'नाक दाबलें म्हणजे तोंड उघडावें' त्याप्रमाणे सरकारच्या तोंडून काटकसरीची भाषा पुनः निघूं लागेल. परंतु ही दिवाळखोरीची वतनदारी आपण अशीच बिन हरकत चालवूं लागल्यास त्याचा परिणाम एकंदर कारभारावर काय होईल याचा फडणिसांनींहि विचार करावयास नको काय? प्राथमिक शिक्षणाची वाढ बंद, आरोग्यखात्याची सोय तहकूब, शाळांना इमारती बांधण्याला ग्रँट नाहीं, पाण्याची सोय करण्याला सवड नाहीं, उद्योगधंद्यांचें शिक्षण वाढविणें परवडत नाहीं अशी जिकडे तिकडे नकार-घंटा वाजविण्याचा प्रसंग आणणारा हा दिवाळखोरी कारभाराचा गाडा किती दिवस तग धरील, याचा सरकारनेंच विचार करावा.

---

# दिल्लीचें बातमीपत्र

दिल्ली, ता. २२।२।२९.

[४]

ता. १५ शुक्रवार रोजीं डॉ. मुंजे यांचा विद्यार्थ्यांसंबंधाचा ठराव अर्धा चर्चा होऊन राहिला होता तो पुरा झाला. कर्नल क्रॉफर्ड यांनीं उपसूचना देऊन ठेवली होती ती चांगली होती. तीच मुंजे यांनीं स्वीकारली. यामुळे विशेष विरोध न होतां तिच्यासह मूळ ठराव पास झाला. कर्नल क्रॉफर्ड यांनीं या प्रसंगीं भाषण केलें तें अगदीं सरळ व उदार मतवादी होतें. आणि या भाषणांत त्यांनीं आपल्या शिपाईगिरीच्या प्रांजलपणाचा गुण दाखविला. शिक्षणमंत्री वाजपायी यांनीं पहिल्या दिवशीं तक्रार केली होती. परंतु या दुसऱ्या दिवशीं थोडें वळण घेऊन ते जाग्यावर आले, व "या ठरावाचा अम्मल स्वतः मध्यवर्ती शिक्षणखात्याच्या क्षेत्रांत आपण करूं व प्रांतिक शिक्षणमंत्र्यांनाहि याविषयीं शिफारस करून लिहूं" असें त्यांनीं सांगितलें. यामुळें या प्रश्नाला चांगलें चलन मिळेल अशी आशा वाटते. म्हणून याबद्दल सर्व तरुण पिढीनें डॉ. मुंजे यांचे आभार मानले पाहिजेत.

***

यानंतर लाला लजपतराय यांच्या निधनासंबंधींचा पं. द्वारकाप्रसाद मिश्र यांचा ठराव चर्चेला निघाला. मिश्र यांनीं आपलें म्हणणें सर्वस्वी साधार मांडून आवेशयुक्त असें भाषण केलें. सरकारातर्फे विरोध करताना होममेंबर केरर यांची फार त्रेधा झाली. हकीकत खोटी मानावी तर खोटी म्हणवत नाहीं, खरी मानावी तर कां घडली याचा खुलासा करावा लागेल. म्हणून "लजपतराय व त्यांचे स्नेही वगैरे लोकांनीं जीं विधानें केलीं तीं प्रत्यक्ष घडलेली हकीकत असें न मानतां त्यांचा तसा ग्रह झाला खरा इतकेंच आपण म्हणण्याला तयार आहों" असें त्यांनीं सांगितलें. याचा अर्थ संभावितपणा न सोडतां लोकाला खोटें म्हणावें! पण या युक्तिवादाला नेहरू, मालवीय, जयकर, जिना या सर्वांनीं इतक्या जोरानें व आवेशानें विरोध केला कीं, होममेंबर केरर यांचा आधींच लहान असलेला चेहरा आणखी लहान झाला! लाला हंसराज हे स्वतः हा प्रकार घडला त्या ठिकाणीं हजर होते. इतकेंच नव्हे, तर ज्या काठ्या लालाजींच्या छातीवर पडल्या त्यांनीं लाला हंसराजांच्या बोटांतून रक्त काढलें. भर असेंब्लींत उभें राहून सुसंगत लिहून आणलेलें भाषण त्यांनीं गंभीरपणानें वाचून दाखविलें. त्याचा परिणाम सभेवर विशेष झाला.

***

कांटेरी तार कोणी ओलांडली नाहीं, लोक उभे होते तेथें ते कायदेशीर हक्कानें उभे होते, व दंगा मुळींच होण्याचा संभव नव्हता. अशा स्थितींत पोलीस अधिकाऱ्यांनीं काठी कां चालविली याचें उत्तर होममेंबर यांना मुळींच देतां आलें नाहीं. पोलीसांना व्यवस्था ठेवण्याचे हुकूम असतील, पण वरील स्थितींत अशा प्रकारें काठ्या मारण्याचे हुकूम होते काय? या प्रश्नाला होममेंबर उत्तर काय देणार! या ठरावाला मुसलमान लोकांकडून किंवा इतर खाजगी सभासदांकडून विरोध झाला नाहीं यावरूनच सरकारच्या गुन्हेगारी संबधानें सर्वस्वीं कशी खात्री होऊन चुकली होती, हें नजरेस आलें. त्यांतूनहि मुनशी ईश्वरशरण यांनीं द्वारकाप्रसाद यांच्या शब्दांत योग्य दुरुस्ती करून, खाजगी चौकशी करण्याकरितां कमिटी नेमावी अशी उपसूचना मांडली, व ती कमिटी बहुमतानें मंजूर झाली. आतां सरकार या ठरावाचा अंमल करीत नाहीं हें तर दिसतच आहे, परंतु गुन्हेगार पोलीस अधिकाऱ्याला त्यांनीं शिक्षा केली तरी त्यांच्यामध्ये कांहीं माणुसकी उरली आहे असें म्हणतां येईल. या एकंदर प्रकारावरून सरकार किती जबाबदार आहे हें कळून येईल.

***

सोमवार तारीख १८ रोजीं फक्त फडणिशी काम झालें. मूळ मंजूर झालेल्या अंदाजपत्रकाचें अतिक्रमण करून जो खर्च करण्यांत आला होता तो बहुतेक विशेष हरकत न घेतां मंजूर करण्यांत आला. फक्त त्यापैकीं सायमन कमिशनच्या म्हणजे हर्टोग कमिटी व सेंट्रल कमिटी या सल्लागार व सहकारी कमिट्यांच्या खर्चासंबंधानें विरोध करण्यांत आला. पण त्यावरील वादविवाद विशेष रंगला नाहीं. आणि अखेर ती मागणी मंजूर झाली. लाला लजपतराय यांच्या ठरावाच्या वेळीं जितके खाजगी सभासद हजर होते तितके या वेळीं राहिले नव्हते! यावरूनच खाजगी कामासंबंधानें हेळसांड कशी होते हें सहजच दिसून आलें. हाहि असेंब्लीला खरी जबाबदारी न दिल्याचा परिणाम होय. कारण ही मागणी नामंजूर झाली असती

तर गव्हर्नर जनरल यांनीं आपला अधिकार चालवून तो खर्च केला असता. किंबहुना त्यांतील कांहीं होऊनहि गेला आहे. म्हणून ही बाब जलताडणासारखी व्यर्थ होती. हेंहि एक या हेळसांडीचें कारण असेल.

***

मंगळवार तारीख १९ रोजीं रेल्वेमेंबर सर जॉर्ज रेनी यांनीं रेल्वेखात्याचें अंदाजपत्रक पुढे मांडलें. त्यांत रेल्वे बोर्डावर 'हिंदी' या फक्त नांवाचा आणखी एक सभासद नेमून घ्यावयाचा या प्रश्नाखेरीज, इतर कोणत्याहि बाबीला रेल्वे फडणविसांनीं कांहींहि महत्त्व दिलें नव्हतें! परंतु हा दिवस चर्चेचा नसल्या कारणानें, तो नुसता अभिश्रवणाचा समारंभ झाला. पण या बाबीला चालू आठवड्यांत पहिल्या दिवशीं जो विरोध व्हावयाचा तो होईल. रेल्वेवरील खर्चाच्या मागण्या बहुधा मामुलीच आहेत. नमूद करण्यासारखी एकच गोष्ट म्हणजे, कोळशाच्या वाहतुकीचे दर कमी करण्यांत आल्याचें सांगण्यांत आलें. आणि ती बाब असावी तशीच आहे. वादग्रस्त नाहीं.

***

बुधवार तारीख २० रोजीं खाजगी बिलें चर्चेला निघालीं. पैकीं साराभाई नेमचंद हाजी यांनीं युरोपियन जहाजी कंपन्यांना आळा घालण्यासंबंधानें एक बिल आणलें होतें. किनाऱ्यावरील व्यापारासंबंधानें हिंदी जहाजी कंपन्यांना अधिक वाव मिळावा अशाविषयीं त्यांनीं पूर्वीच एक बिल पुढें आणून तें सिलेक्ट कमिटीकडे पाठविलें आहे. त्या बिलाचीच ही पुरवणी किंवा त्याचेंच हें एक भावंड होय. अर्थात् पूर्वीच्या बिलाप्रमाणें याहि बिलाला सरकार व युरोपियन सभासद यांनीं कसून विरोध केला. या चर्चेत ब्रिटिशइंडिया व एशियाटिक स्टीम नॅव्हिगेशन कंपन्या उतारू लोक आपल्याकडे ओढण्याकरितां जीं हस्तपत्रकें व जाहिराती काढतात त्यांत आक्षेपार्ह मजकूर असतो हें दोराय स्वामी अय्यंगार यांनीं कांहीं जाहिराती वाचून दाखवून सिद्ध केलें. अखेर सिलेक्ट कमिटीकडे पाठविण्याची सूचना बहुमतानें मंजूर झाली. या बिलाला कांहीं प्रमुख मुसलमान सभासदांनींहि संमति दिली. ती कशी मिळाली याविषयीं लोकांना आश्चर्य वाटलें. हाजी यांचे हे बिल सिलेक्ट कमिटीकडे गेलें व तिचा रिपोर्ट येईल हेंहि खरें.परंतु हीं त्यांचीं दोन्ही बिलें यापुढें चालू बैठकींत निघण्याचा संभव नाहीं. यामुळें हीं दोन्हीं बिलें सिलेक्ट कमिटीकडे जाऊन न जाऊन सारखींच होणार अशी भीति वाटते.

***

हिंदुस्थानांत बँका व पेढ्या यांची स्थिति कशी आहे व त्या वाढविण्याचे प्रयत्न कोणत्या दिशेनें करावेत हें ठरविण्याकरितां पूर्व चौकशीसाठीं एक कमिटी नेमण्याचा उपक्रम सुरू आहे. या कामीं सर जॉर्ज शुस्टर यांनीं खाजगी व्यापारी मंडळाच्या प्रतिनिधींशीं येथे दोनतीन दिवस चर्चा केली. त्याकरितां लाहोरचे लाला हरकिसनलाल, मुंबईचे माइन वगैरे गृहस्थ मुद्दाम येथे आले होते. नवीन स्थापन झालेल्या देशी व्यापारी मंडळाचे प्रतिनिधी सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास व घनश्यामदास बिरला हेहि या चर्चेत सामील होते. या चर्चेनंतर कांहीं तरी प्रत्यक्ष काम करण्यात येईल अशी खात्री वाटते.व मध्यवर्ती कमिटीची नावे लवकरच प्रसिद्ध होतील.पण या कमिटीपेक्षांहि महत्त्वाचा भाग म्हणजे प्रांतानिहाय चौकशी करण्याकरितां कमिटया नेमणे हा होय. त्यासंबंधानें प्रांतिक सरकारांचीं मतें मागविण्यांत येत आहेत. आणि या चौकशीकमिटीतून लोकमताचे प्रतिनिधी म्हणून बिनसरकारी व तज्ज्ञ गृहस्थ नेमले जावे व चौकशीला सर्वस्वी सरकारी स्वरूप राहूं नये असे प्रयत्न होणार आहेत. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या कॉलेजांत अर्थशास्त्राचें अध्ययन व अध्यापन करणारे जे प्रोफेसर लोक आहेत त्यांना पुढें येऊन लोकोपयोगी काम करण्याची ही संधि फार चांगली आली आहे असे वाटतें. तरी या प्रोफेसर मंडळींनीं कांहीं संघटित कार्य केल्यास,त्यांच्यांतील वाकबगार लोकांना या महत्त्वाच्या चौकशींत भाग घेण्याला वाव आहे. "प्रोफेसर मंडळींना केवळ पुस्तकीज्ञानाची माहिती असते, त्यांना व्यावहारिक ज्ञान नसतें;" असा एक ठराविक आक्षेप सरकारी फडणवीशी खात्याचा नेहमीं असतो. परंतु तो आक्षेप खोटा असून, या प्रोफेसर मंडळींना व्यावहारिक ज्ञानहि असतें ही गोष्ट ते या चौकशीच्या प्रसंगीं सभासद म्हणून किंवा इतर रीतीनें पुढें येतील तर आपोआप सिद्ध होणारी आहे.

***

अशा रीतीनें दिल्ली येथे सरकारी कामकाज चालू असतां, त्याबरोबर इतरहि महत्त्वाचें काम सुरू आहे. कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या सभा या दोन आठवड्यांत दिल्लीस झाल्या, व तिचे ठराव आतां प्रसिद्धहि झाले आहेत. शिवाय असेंब्लीचे अध्यक्ष ना. पटेल यांनीं आपल्या घरीं चहापार्टी देऊन लॉर्ड आयर्विन व महात्मा गांधी यांची गाठ खाजगी रीतीनें घालून दिली! या चहापार्टीला एक दोन राजे, गव्हर्नर–जनरल,महात्मा गांधी व त्यांच्या बरोबर असेंब्लींतील पक्षांचे मुख्य पुढारीहि बोलाविले होते. त्यांत पं. नेहरू, पं. मदन मोहन मालवीय, सर डार्सी लिंडसे,

बॅ. जिना व सर अबदुल कयूम यांच्या जागीं महंमद शहानवाज इतके पाहुणे होते. राजकारणांत स्पष्ट व निरनिराळीं किंवा विरुद्ध अशीं मतें असणारी ही पुढारी मंडळी एकत्र बोलावली यावरूनच, या चहा-पार्टीच्या वेळीं महत्त्वाची अशी राजकारणी चर्चा कोणतीच होणें शक्य नव्हतें, ही गोष्ट चाणाक्ष माणसाला तेव्हांच कळून येण्यासारखी आहे. परंतु गव्हर्नर जनरल व म. गांधी या दोघांचा स्वाभिमान सभाळून, त्याना एका प्रतिष्ठित तिऱ्हाइताच्या घरीं एका टेबलाशीं बसून भेटतां बोलतां आलें, इतकेंच या चहापार्टीचें महत्त्व मानतां येईल!

***

पण एवढ्यावरून किती तर्कवितर्क सुरू झाले हे सांगतां पुरवत नाहीं. पटेल यांच्या घरचा नऊ चमचे चहा खर्ची पडला! परंतु तो खर्च पडण्यापूर्वीच, नुसत्या बातमीनें शेंकडो लोकांचे ओठ हलले व चहापार्टी-नंतर आतां हजारो लोकांचे ओठ या विषयाच्या चर्चेनें हलूं लागले आहेत. नवग्रहींचा परिणाम जगावर फार मोठा होतो अशी ज्योतिषशास्त्र-वेत्त्यांची समजूत असते. पण पटेल साहेबांच्या घरीं निमंत्रणानें आलेली ही नवग्रही कांहीं एक परिणाम न करितां फुकट गेली असली पाहिजे, असेंच अनुमान सभंजस लोक काढतील व तेंच बरोबर आहे. कित्येकांच्या मतें यापुढें जें मोठें राऊंड टेबल होणार, त्याचीच ही छोटी आवृत्ति व रंगीत तालीम असावी ! या समजुतीला खरा असा एकच आधार आहे कीं, चहा घेण्याकरितां राऊंड टेबल मांडलें होतें! पण तेंहि सगळ्यांचें मिळून एक राऊंड टेबल नव्हतें. एकेका निर-निराळ्या टेबलाभोंवतीं दोन दोन तीन तीन लोक बसले होते, आणि ते आपापल्यांत बोलण्या-मध्यें चूर होते. व्हाइसरॉय, म. गांधी व जिना हे तिघेच टेबलापाशीं बसावे, अशी चतुरपणाची योजना करण्यांत आली होती. परंतु इंग्रजांचा स्वभाव ज्याला माहीत आहे, त्याला या प्रसंगीं हवापाण्याचा किंवा आवांतर कित्येक गोष्टी. शिवाय इतर महत्त्वाच्या विषयांवर संभाषणें झाली असतील, हे खरें वाटणार नाहीं.

***

या चहापार्टीला हजर नसतां वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना मात्र कल्पनातरंगांना खूप वाव दिला होता; पण ज्योतिषाच्या भविष्याप्रमाणें त्यांचीं विधानें इतकीं पोचट होतीं कीं, कोणी त्यातून कांहींहि अर्थ काढू शकणार नाहीं. व्हाइसरॉय साहेब कांहीं गोष्टी किंचित् हलक्या आवाजानें बोलले ! त्या बोलतांना ते आजुबाजूला पाहात होते ! महात्मा गांधींच्या तोंडावर सडेतोड व निःस्पृहपणें उत्तरें देण्याची छटा-झाक चमकत होती ! हळू बोललेल्या शब्दांचा थपा काढण्या-करितां मधून मधून हंसण्याचाहि आवाज ऐकूं येत होता; परतु सर्वांच्या चेहऱ्यावर गंभीरपणाची छाया दिसत होती. संभाषणें महत्त्वाचीं झालीं, पण कोणीहि आपला स्वभाव सोडला नाहीं ! शिष्टाचार व राजकारण यांचा सुंदर मिलाफ घडला ! सर्व पाहुणे आस्थेनें जमले व खुषींत आनंदानें परत गेले ! अशा तऱ्हेचीं वर्णनें करून वर्तमानपत्रांच्या कांहीं बातमीदारांनीं असा आव आणला कीं, चहाच्या टेबलावरील गोड पदार्थांवर ज्या माशा बसल्या होत्या, त्या माशा नसून आम्ही बातमी-दारच त्यांचें रूप घेऊन तेथें वावरत होतों ! एक पैशाची भांग घेतली असतां हवे तसे कल्पनातरंग उठविता येतात, असें लो. टिळकांनीं एकदां म्हटल्याचें प्रसिद्ध आहे. पण तेथें एक पैशाचीहि भांग खर्च पडली नाहीं, किंवा चहाचा एक चमचाहि बातमीदाराना मिळाला नाहीं. पण चहाच्या कल्पनेनें आपण जिभल्या चाटीत कांहीं असें कोणी म्हणतील म्हणून, ओठ हलवितांना आपण गुप्त बातम्यांचा स्फोट करीत आहोत असा आव या बातमीदारांनीं घातला !

***

या चहापार्टीला महत्त्व येण्याचें कारण इतकेंच कीं, दोन तीन महत्त्वाचे प्रश्न लोकांच्या डोक्यांत घोळत आहेत. लॉर्ड आयर्विन हे येत्या जूनमध्यें विलायतेला जाणार म्हणतात. अर्थात् ते नव्या प्रधानमंडळाशीं चर्चा करण्याला जाणार असतील. इकडे राष्ट्रीय सभेनें स्वातंत्र्यसिद्धि व स्वराज्याचा ठराव करून ठेविलेला असून, म. गांधींना निर्वा-णीचा खलिता आगाऊच जाहीर करून ठेविलेला आहे त्याचें काय होणार? हा दुसरा प्रश्न! व तिसरा प्रश्न असा कीं, सायमन कमिशन नेमण्यासंबंधीं प्रधानमंडळानें जी चूक केली ती जॉइंट पार्लमेंटरी कमिटी नेमण्याच्या वेळीं सरकार दुरुस्त करणार कीं काय? या तीन प्रश्नांचा एकमेकांशीं संबंध जोडून लोकांचे तर्कवितर्क सुरू आहेत; परंतु निश्चित असें कांहींच नाहीं. म्हणून तूर्त पटेल यांच्या चहा-पार्टीचा अर्थ इतकाच कीं, लोकपक्षाची कांहीं मोठी माणसें सरकार पक्षाच्या कांहीं मोठ्या माणसांशीं पटेल साहेबांसारख्या मोठ्या माणसा-च्या घरीं जमली व त्यांनी एकत्र बसून चहा घेतला. या चहाच्या पेल्यांत कल्पनातरंगांनीं वादळ उठविलें आहे !

***

गेल्या रविवारीं दिल्ली शहरांत मॉक पार्लमेंटची एक बैठक झाली. मॉक पार्लमेंट म्हणजे

पार्लमेंटची थट्टा. हा प्रसंग गांवांतील एका नाटकगृहांत झाला. तिकीटें लागलीं असतांहि सभागृह भरून गेलें होतें. पार्लमेंटचे सभासद म्हणून गांवांत स्थानिक कामे करणारी चार मंडळी मुद्दाम एकत्र केली होती. त्यांच्याबरोबर असेंब्लीचे कांहीं सभासदहि या पार्लमेंटाचे सभासद म्हणून बसविले होते. नाटकांतील सीन ब्रिटिश पार्लमेंटचा होता. अध्यक्ष दिवाण चमणलाल हे होते. खेळांत गडी वाटून घ्यावे त्याप्रमाणें एका बाजूस प्रधान मंडळी व दुसऱ्या बाजूस विरोधी लोक अशी रचना केली होती. पोषाख बदलून सोंगे घेतलीं नव्हतीं. साध्या पोषाखानेंच बतावणी सुरू होती. बॅ. असफअली यांनीं बाल्डविन साहेबाचा पार्ट केला. एक संन्यासी स्टेट सेक्रेटरी बनले होते. खान निझामी यांनीं ओडवायर यांची भूमिका केली व ती फार चांगली वठली. नेहरू-रिपोर्टाला विरोध करण्याचें काम त्यांच्याकडे होतें. आणि या कामांत ते खऱ्या मनानें जें बोलले तेंच बतावणीला उपयोगी पडलें! प्रो. इंद्र हे रॅम्से मॅकडोनल्ड बनले होते. पं. नीलकंठदास हे सोशॅलिस्ट पक्षाचे स्वतंत्र पुढारी व स्वतंत्रतावादी म्हणून बसले होते.

* * *

पण बतावणी करतांना आपण लंडन येथील पार्लमेंट-मध्यें बसलों आहों, हा भ्रम कोणालाहि मनाशीं पक्का धरून ठेवतां आला नाहीं. स्वप्नामध्यें कांहीं खऱ्या व कांहीं खोट्या गोष्टींची भेसळ होते तशी यांच्या बतावणींत झाली. विलायतेंतील इंग्रज म्हणून बोलतां बोलतां हळूंच असेंब्लींतील हिंदी सभासद असल्याची ओळख बोलणारे नकळत पटवीत! गोष्टींतील चोरीचा तपास करणारांमध्यें स्वतः चोरच सामील झाला व चोराचा मार्ग काढीत काढीत लोक चालले असतां 'हा चोर येथपर्यंत आला असेल' असें म्हणून पुढे 'या भिंतीवरून अशी उडी त्यानें मारली असेल' असें म्हणण्या ऐवजीं, "मी अशी उडी मारली' असें बोलून गेला. असाच प्रकार या सभेंत झाला. सर्वांत मौज ही कीं, नेहरू-रिपोर्ट मंजूर करण्याला लोकपक्षाचे सभासद पुरे पडेनात तेव्हा प्रेक्षकांचीहि मतें सामील करण्यांत आलीं. सभेच्या प्रारंभीं राजे साहेबांचें भाषण व्हावयाचें होतें पण दिवाण चमणलाल हे क्रान्तिकारक असल्यामुळे 'साखरेचें खाणार त्याला देव देणार' या न्यायानें त्यांनी प्रथमच उठून सांगितलें कीं, राजेसाहेबांचें भाषण हा कार्यक्रम ठरला होता खरा, पण आज सकाळींच त्यांनीं राजपद सोडून राजीनामा दिल्यामुळे त्यांचें भाषण रहीत करण्यांत आलें आहे! अशा रीतीनें तोंडच्या एका शब्दानें राज्यक्रान्ति सुखानें पार पडली!

---

# अमेरिकेंतील लजपतराय यांचा जीवनक्रम

( लेखक—**ना. सु. हर्डीकर, हुबळी.**)

**लेखांक ८ वा**

लालाजींना जिच्याखातर अविश्रांत श्रम केले व अत्यंत कष्ट सोसले त्या हिंदमातेवर त्यांचें जितकें निःसीम प्रेम होतें तितकेंच आपल्या हाताखालच्या कार्यकर्त्यांवर किंवा राष्ट्रकार्यी सहकार करणाऱ्यावरही होतें. मी त्यांच्या अत्यंत निकट सहवासांत राहात असल्यामुळे, त्यांच्या खुद्द घराण्यापैकींच एक आहे, असें मला वाटू लागले होतें. आपला धाकटा मुलगा 'अमृत' याच्याप्रमाणेच माझ्याही हिताकडे ते अत्यंत लक्ष पुरवीत असत. माझ्या एकंदर हालचालीवर त्यांची पितृवत् नजर असे. माझ्याकडून ते रोजच्या कामाचा तपशील घेत. आणि कधीं कधीं मी करणें अवश्य अशा दुसऱ्या दिवसाच्या कामाचें टांचणहि करून देत. मी सकाळचा उपाहार घेतला कीं नाहीं? दुपारीं कचेरींत गेल्यावेळीं जेवून आलो की नाही? या गोष्टीचीहि ते चौकशी करीत आणि मी उपाहार घेतला नाहीं किंवा जेवणाशिवाय राहिलों, असें आढळून आल्यास ते मला रागे भरत व असें वागल्यानें माझें आरोग्य बिघडेल म्हणून मला उपदेशही करीत! त्या वेळीं मी शरीरानें फारसा सदृढ नव्हतों व आजही नाहीं! माझीं फुप्फुसें निरोगी नाहींत व मला कदाचित् क्षयरोग होण्याचाही संभव आहे असें त्यांच्या कानीं अगोदरच गेलें असल्याकारणानें

ज्या वेळीं मला जास्त श्रम झाल्याचें त्यांस दिसून येई त्या वेळीं तें यंग इंडिया मासिकाचें किंवा लीगचेंहि काम स्वतःकडे घेऊन मला कांहीं काळ विश्रांति घेण्यास सांगत. प्रचारकार्याकरितां मी बाहेरगांवीं जात असे तेव्हां निदान तीनचार दिवसांतून तरी एक वेळ मला पत्र पाठवून, ते माझा समाचार घेत व मला आपलाहि समाचार कळवीत. तद्वतच त्यांच्या खुशालीबद्दलचें व लीगच्या कार्याबद्दलचें पत्र येण्यास त्यांजकडून थोडासा विलंब झाल्यास मलाहि चैन पडत नसे.

सन १९१९ मध्यें युनायटेड स्टेटस्च्या माझ्या दुसऱ्या दौऱ्यांत मी कांहीं दूरच्या संस्थानांत प्रवास करीत असतां व कधीं कधीं आगगाडी नसलेल्या अशा ठिकाणींहि मी कार्यांत गुंतलो असतां लालाजींना माझीं पत्रें पोंचणें अशक्य होई, तेव्हां त्यांस काळजी वाटे. अशाच एका प्रसंगीं त्यांनीं मला लिहिलें "बरेच दिवस तुमच्याकडून पत्र नसल्यामुळें मला तुमच्याबद्दल फारच काळजी वाटून मी कालच श्री. वाजपेयी यांना 'तुम्ही कोठें आहां' हें कळविण्याविषयीं तार केली. पण आजच सकाळीं तुमचें पत्र हातीं आल्यानें, माझी काळजी दूर झाली." नंतर लवकरच त्यांजकडून मला सविस्तर हकीकतीचें दुसरें पत्र आलें. त्यांत ते लिहितात, "तुमचें ता. ९ चें पत्र पोंचलें, आणि तुम्हास तुमच्या कार्यांत कल्पनेबाहेर यश मिळत असल्याचें ऐकून, मला आनंद होत आहे. मला तुमचा मोठा अभिमान वाटतो! तुम्हास कामाचे फारच श्रम पडत असावेत असें साहजिकच दिसून येतें! आणि म्हणूनच एक महिनाभर तरी तुम्ही विश्रांती घ्यावी असें मला वाटतें. जरूर तर आपण करीत असलेलें प्रचारकार्य आपण उभयता विभागून घेऊं. तुम्ही मे महिन्यांत न्यूयॉर्कला आलेंच पाहिजे. कारण प्रथमतः तुमच्या आरोग्याच्या दृष्टीनें ही गोष्ट अत्यंत अवश्य आहे व दुसरें असें कीं, कांहीं महत्त्वाच्या विषयांवर परस्परांमध्यें विचारविनिमय होणें जरूर आहे."

सन १९२० सालीं अमेरिकेंतून लालाजी हिंदुस्थानांत परत आल्यावरहि मला माझ्या प्रकृतीसंबंधीं लिहिण्यास ते विसरत नसत! मोकळ्या व उघड्या हवेंत शक्य तितका अधिक वेळ घालविणें आणि आपल्या प्रकृतीसंबंधीं योग्य काळजी घेणें अत्यंत अवश्य आहे ही गोष्ट तूं विसरूं नको, अशा अर्थाचीं वाक्यें ते मला वरचेवर लिहीत असत! लालाजींची माझ्यावर व्यक्तिशः व त्याचप्रमाणें इतर कार्यकर्त्यांवरहि किती ममता असे हें दर्शविण्याकरितांच मी त्यांच्या पत्रांमधील वरील उतारे उद्धृत केले आहेत. लालाजींच्याबरोबर आम्ही केव्हां केव्हां कांहीं अमेरिकनांच्या घरीं जात असूं. त्या वेळीं लालाजी त्या घरांतील लहान मुलांशीं मिळूनमिसळून संवगड्यांप्रमाणें वागत व बोलत असत आणि ज्या घरांतील बालकांशीं त्यांचा संबंध येई अशा बालकांना ते प्रेमानें उचलून घेऊन त्यांचे पटापट मुके घेत! त्यांच्याशीं खेळतहि. लोकमान्यांच्या निमंत्रणाप्रमाणें ते पुण्यास गेले असतांना माझ्या बंधूंच्या विनंतीवरून त्यांच्या घरींहि ते गेले होते. व त्या वेळीं त्यांनीं माझ्या लहान पुतण्यांना पाहून आनंद व्यक्त केला, व मला अमेरिकेस लिहिलेल्या पत्रांत त्यासंबंधीं त्यांनीं 'तुझे लहान पुतणे व पुतण्या पाहून मला मोठा आनंद झाला. आणि तूं हिंदुस्थानांत परत आल्यावर त्यांच्या भेटीपासून तुला देखील आनंद झाल्याखेरीज राहणार नाहीं' असे उद्गार काढल्याचें मला अद्यापहि स्मरतें! त्यांचें स्वतःचें आरोग्य चांगलें नसतांही आम्हा सर्वांची ते पित्याप्रमाणें काळजी घेत असत. माझ्या सर्व आवडीनिवडीची त्यांना पूर्ण माहिती झाली होती. आरोग्य व राष्ट्रकार्य या विषयांवर नेहमीं आम्हीं उभयतां चर्चा करीत असूं. राष्ट्रसेवा बजावीत असतां राष्ट्रसेवकांनीं स्वतःच्या प्रकृतीकडे विशेष लक्ष देणें जरूर नाहीं असें माझें म्हणणें असे. पण स्वामी विवेकानंद, प्रो. गोखले वगैरेसारख्यांचीं उदाहरणें देऊन आरोग्याकडे दुर्लक्ष केल्याचे दुष्परिणाम ते माझ्या दृष्टोत्पत्तीस आणीत, व म्हणत 'तुझ्या मताप्रमाणें वागल्यानें राष्ट्राचें किती नुकसान होईल तें पाहा—' आणि अशा प्रकारें ते मला आरोग्यासंबंधीं दक्षता बाळगण्याची आवश्यकता पटवून देण्याची प्रत्येक संधि वांया दवडीत नसत.

लालाजींचें हें किती प्रेम व केवढी ही मोठी पितृवत्सलता! ज्यांनीं त्यांच्या सहवासाचा लाभ घेतला त्यांनाच तें कळणें शक्य आहे. मी केवळ सात वर्षांचा असतां माझ्या जन्मदात्या पित्याला मुकलों. पितृप्रेम म्हणजे काय याची मला जाणीवहि नव्हती. सुदैवानें माझ्या मोठेपणीं तरी लालाजींसारखा प्रेमळ व उदात्त अंतःकरणाचा पिताच जणुं मला लाभला, असें माझ्या मनाला वाटल्याखेरीज राहिलें नाहीं.

---

# सक्तीचें लष्करी शिक्षण

## डॉ. मुंजे यांचें भाषण

१६ ते २० वयापर्यंतच्या शाळा—कॉलेजांतील सर्व विद्यार्थ्यांस शारीरिक व्यायाम, लष्करी कवाईत व नेम मारणे यांचें शिक्षण सक्तीनें देण्याची व्यवस्था करावी अशा अर्थाचा ठराव डॉ. मुंजे यांनीं मांडला त्या वेळीं त्यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें—

"हा ठराव मी कां पुढें मांडला याचें कारण प्रथम मी सांगतों. लष्करी दृष्टीनें हिंदी मुलांच्या मनःप्रवृत्तीचें पृथःकरण स्कीन कमिटीनें कशा प्रकारें केलें तें सर्वांस विदित आहे. लष्करी दृष्टीनें हिंदी मुलांमध्यें बऱ्याच उणीवा आहेत असा स्कीन कमिटीच्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे. या उणीवा पुढीलप्रमाणे आहेत. (१) माणसांवर हुकमत चालवून त्यांना वागविण्याची सामान्य हातोटी नसणे (२) नेतृत्वशक्तीचा अभाव (३) धाडस, खेळाडू वृत्ति, शिस्तीची आवड यांचा अभाव व (४) विशेषतः सैन्यावर हुकमत चालविण्यास लागणाऱ्या खऱ्या जोरदार लष्करी बाण्याचा अभाव. याप्रमाणे स्कीन कमिटीनें हिंदी मुलांमध्यें दोष दाखविले आहेत. लोकांच्या दृष्टीनें हे दोष दाखविल्याबद्दल स्कीन कमिटीला धन्यवादच दिले पाहिजेत. कारण त्यायोगें मुलां-मधील या दोषांकडे लोकांचें लक्ष वेधलें. या असेंब्लीमध्यें आज हिंदुस्थानांतील अशा अनेक जातींचे प्रतिनिधी आहेत की ज्यांनीं शें-दीडशें वर्षांपूर्वीं युद्धें केलीं, साम्राज्यें स्थापन केलीं व तीं चालविलीं. हा इतिहास असला तरी आज हिंदी तरुणांत वरील दोष उत्पन्न झाले आहेत यांत शंका नाहीं.

क्रूर पठाणांच्या प्रदेशांत आजहि हरिसिंग नवला याची भीतिप्रद आठवण लोकांचे तोंडीं आहे. अकबरासारख्या बलिष्ठ मोंगल सम्राटाला सारखा उपद्रव देणाऱ्या राणा प्रतापाच्या व मराठ्यांतील शिवाजीच्या जातीचे प्रतिनिधी या असेंब्लींत हजर आहेत. माझे मित्र जयकर यांच्या जातीच्या लोकांनीं लेखणी व तलवार हीं दोनहि सारख्याच कुशलतेनें गाजविलीं आहेत. रेलवे मोटारी वगैरे आधुनिक वाहनांची सोय नसतांना पुण्यांतील भात खाणारे ब्राम्हण पेशवे हे अहमदशहा अबदालीशीं झुंज देण्यासाठीं पानिपतापर्यंत दूरवर चालून आले. असा इतिहास असूनहि हल्लींच्या हिंदी तरुणांच्या वृत्तींत स्कीन कमिटीनें निर्दिष्ट केलेले दोष आहेत हें खरें आहे. पण स्कीन कमिटी केवळ या दोषांचा निर्देश करून थांबली नाहीं. तर तिनें याच मुद्द्याचा अधिक खोल विचार केला आहे. कमिटीचें यासं-बंधांत असें म्हणणें आहे कीं, गेल्या दीडशे वर्षांच्या ब्रिटिश अमलांत हिंदी तरुणांना राष्ट्ररक्षणाच्या कार्यांत भाग घेण्याची संधीच देण्यांत आलेली नाहीं. आनुवंशिक लढाऊ वृत्ति सुप्त स्थितींत राहून तिला जागृत होण्यास अवकाश मिळाला नाहीं. यामुळे तिचा जवळ जवळ नष्टांश झाला असल्याचा संभव आहे असें कमिटीस वाटत आहे.

कमिटीच्या मतें इंग्लंडामधील शिक्षणपद्धति अंशतः तरी कार्यक्षम नेतृत्वगुण उत्पन्न करण्याच्या हेतूनें योजलेली आहे. हिंदुस्थानांत मात्र उद्दाम ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हाताखालीं सहनशीलतेनें व आज्ञाधारकपणें काम करणारे हस्तक निवडण्यासाठीं क्षेत्र निर्माण व्हावें असें शिक्षणाचें धोरण आहे. हिंदुस्थान व इंग्लंड यांच्या शैक्षणिक धोरणांतच असा फरक असल्यामुळें परिणामीं ब्रिटिश व हिंदी तरुण हे भिन्न शीलाचे निपजावेत हें साहजिकच आहे. हा फरक नाहींसा करण्याचे उद्देशानें मी हा ठराव आणला आहे. साम्राज्याचें संरक्षण करण्यास हिंदी तरुणांस लायक बनवावें अशी सरकारी सभासदांची खरी इच्छा असेल तर या ठरावास मान्यता देण्यास त्यांना हरकत वाटूं नये. शारीरिक व्यायाम, लष्करी कवाईत व नेम मारणें या गोष्टींचें सक्तीनें शिक्षण द्यावें असें ठरावांत म्हटलें आहे. शारीरिक शिक्षणाबद्दल कोणीहि हरकत घेणार नाहीं. कारण सशक्त व निरोगी शरीर असल्याशिवाय मनुष्याच्या बुद्धिमत्तेचा व शिक्षणाचा कांहीं उपयोग नाहीं ही गोष्ट सर्वमान्य आहे. लष्करी कवाइतीसंबंधानें कॅप्टन लेडले बार्ट या 'डेली टेलिग्राफ' पत्राच्या लष्करविषयक तज्ज्ञानें असें म्हटलें आहे कीं, 'लष्करी कवाइतीचे उद्देश दोन प्रकारचे असतात. शिस्त, आत्मसंयमन, संघटना, चपळाई व हुषारी हे गुण उत्पन्न करणें हा पहिला उद्देश होय. हे सर्व गुण मिळूनच शिस्तशीर हालचाल होते. लष्करी कवाइतीचा दुसरा उद्देश लढाईतील सैन्यघटकांची सुलभतेनें व त्वरित हालचाल करतां येणें.' नेतृत्वशक्तीचा व समुदायावर हुकमत चालविण्याचा अभाव हा जो दोष स्कीन कमिटीनें दाखविला आहे तो लष्करी कवाईत सक्तीची केल्यानें नाहींसा होणार आहे. म्हणून जर

सरकार प्रामाणिक असेल तर माझ्या ठरावांतील हा भाग मान्य करण्यास सरकारला मुळींच अडचण वाटूं नये.

बंदुकीच्या निशाणबाजीच्या शिक्षणाचा प्रश्न मला जितका साधा वाटतो तितका तो कदाचित् इतरांना साधा वाटणार नाहीं. मी पंडित मोतिलाल नेहरू यांच्या स्वराज्ययोजनेस उत्साहानें पाठिंबा देणाऱ्यांपैकीं आहे. हिंदुस्थानाच्या इतिहासांत प्रथमच हिंदी लोकांनीं स्वमुखानें इंग्लंडाच्या राजाला आपला बादशहा म्हणून मान्यता दिली आहे. सर्व पक्षांनी साम्राज्यांतर्गत स्वराज्य मान्य केलें आहे. आमच्या दृष्टीनें सलोख्याच्या वृत्तीचा निदर्शक असा हा पुरावा आहे. हा पुरावा मान्य केल्यास बंदुकीचें शिक्षण देण्याचा प्रश्न अगदीं सोपा आहे. डोमीनियन स्टेटस दिलें तर परराष्ट्रानें स्वारी केली असतां निकडीच्या वेळीं त्याचें रक्षण कोण करणार? गेल्या महायुद्धाचे वेळीं केवळ दहा हजार सैन्याच्या बळावर हिंदुस्थानाचें रक्षण व्हाइसरॉयांना करतां आलें. पण तशी वेळ आतां राहिली नाहीं हे ब्रिटिश लोकांनीं लक्षांत ठेवावें. आमच्या मदतीशिवाय ब्रिटिश लोकांना आतां हिंदुस्थानाचें रक्षण करतां येणार नाहीं हें त्यांनी ध्यानांत ठेवावें. या गोष्टीची दूरदर्शीपणानें आजपासूनच सिद्धता केली पाहिजे. ज्यांना डोमीनियन स्टेटस द्यावयाचें त्यांनीच त्याचें रक्षण केलें पाहिजे व यासाठींच हिंदी तरुणांना स्वसंरक्षण–क्षम करण्याची पहिली पायरी म्हणून हा ठराव मी मांडीत आहे.

आतां सक्ती करण्याला कोणी हरकत घेण्याचा संभव आहे. ब्रिटिश लोक म्हणतील कीं कोणत्याहि कामीं सक्ती करण्याच्या विरुद्ध आम्ही स्वभावतः आहोंत. पण हें खरें आहे काय? लॉर्ड रॉबर्ट्स यांनीं आपल्या आयुष्याचे अखेरीस सक्तीच्या लष्करी शिक्षणाचें धोरण इंग्लंडाला पटवून देण्याचा प्रयत्न केला. सक्तीच्या लष्करी शिक्षणाशिवाय इंग्लंड स्वतःचें संरक्षण करूं शकणार नाहीं असें त्याचें मत होतें. मग ज्या देशांत गेल्या दीडशें वर्षांत लष्करी परंपरा खंडित झालेली आहे अशा देशानें स्वसंरक्षणाची तयारी करणें कितीतरी पटीनें अधिक जरूरीचें आहे. आज जगाची स्थिति अशी आहे कीं, प्रत्येक राष्ट्रानें स्वसंरक्षणार्थ सज्ज असलें पाहिजे. ब्रिटिश लोकांना कदाचित् इंग्लंडांत सक्ती नको असेल. पण हेच लोक वसाहतींमध्यें गेले कीं, त्यांना सक्ती आवश्यक वाटते. ब्रिटिश ग्वायनामध्यें प्रत्येक ब्रिटिशाने लष्करी काम करण्यास सिद्ध असलें पाहिजे असा कायदा आहे. कीनिया, फिजी व गिलबर्ट आणि एलिस बेटांमध्यें असाच कायदा आहे. न्यू ब्रन्सविक व ओन्टोरियो या वसाहतींत सक्तीचें लष्करी शिक्षण दिलें जातें. न्यूझीलंड व दक्षिण–आफ्रिका यांतहि लष्करी शिक्षण आवश्यक ठेवलें आहे. असें असतां ब्रिटिशांना सक्तीचा स्वाभाविक तिटकारा आहे असें कोण म्हणू शकेल? सर माल्कम हेले यांनीहि असें म्हटलें आहे कीं, "हिंदी लोकांना लष्करांत अधिकाराच्या जागा देण्याचें धोरण सरकारनें स्पष्ट ठरविलें असतां यासाठीं लायक उमेदवार मिळण्याच्या कामीं योग्य तो खर्च केलाच पाहिजे." सरकारला या कामीं खर्चाची अडचण वाटत असेल तर त्यांनीं मध्यप्रांतासारख्या एका प्रांतांत हा प्रयोग दोनतीन वर्षें करून पाहावा. याचा उत्तेजक अनुभव येऊन हीच पद्धत इतर प्रांतांतहि चालू करावी असें सरकारला वाटल्याशिवाय राहाणार नाहीं.

माझ्या युरोपियन मित्रांनींहि या ठरावास पाठिंबा देणें जरूर आहे. हिंदुस्थानांत ते समुद्रांतील एका बिंदूप्रमाणें आहेत. त्यांच्या हिंदुस्थानांतील हितसंबंधाचें विशेषतः व्यापाराचें रक्षण कोणाकडून होणार? अर्थात् ब्रिटिश सरकाराकडून. आणि हिंदी तरुणांना लष्करी शिक्षण दिल्याशिवाय हें संरक्षण करण्याचें सामर्थ्य सरकारला प्राप्त होणार नाहीं. युरोपियनांनींहि या ठरावास पाठिंबा दिला पाहिजे. अर्थात् माझे हिंदी मित्र तर माझ्याशीं पूर्णपणें सहमत असल्यामुळें ते या ठरावास पाठिंबा देतील यांत शंकाच नाहीं."

---

# दिल्लीचें बातमीपत्र

दिल्ली, ता. १।३।२९.

[ ५ ]

गेल्या आठवड्यांत शुक्रवार व रविवार हे सुटीचे दोन दिवस सोडून, काल गुरुवार तारीख २८ पर्यंत असेंब्लीमध्यें एकच विषय म्हणजे रेलवे खात्याच्या जमाखर्चाचा वादविवाद चालू होता. खर्चाच्या एकंदर १४ खात्यांत मिळून १०७½ कोटी रुपयांच्या खर्चाच्या मंजुरीचा सवाल असेंब्लीपुढें टाकण्यांत आला होता. आणि या सर्व बाबींत मिळून निरनिराळ्या सभासदांनीं १०० कांट सुचविले होते. त्यांत अर्थात् कांहींची पुनरुक्ति होतीच. तथापि पहिल्या मागणीवर दिलेल्या ५९ कांटांपैकीं, चार दिवसांत मिळून जेमतेम २५ किंवा त्याहूनहि कमी मुद्द्यांची चर्चा झाली. पण खरा वाद व विरोध असा पहिल्याच बाबींत म्हणजे रेलवे बोर्डाच्या खर्चमंजुरीवर झाला. या चर्चेनें एक सबंध दिवस खाल्ला. पण अखेर सरकारनें बहुमतानें ती मागणी जिंकली. किंबहुना यापुढें ज्या ज्या बाबीवर प्रत्यक्ष मतें मोजण्याची वेळ आली त्या सर्वांत लोकपक्षाचाच पराभव झाला.

***

यांपैकीं मतें मोजण्याचे कित्येक प्रसंग अध्यक्षांनीं मुद्दाम प्राप्त केले. त्यांत त्यांचा हेतु कदाचित् असा असावा कीं, लोकपक्षाचे सभासद या चर्चेत आपल्या जागीं हजर राहात नाहींत म्हणून त्यांना लाजवावें. पण कोणी लाज आणली तरी मानावयाची नाहीं असाच जवळ जवळ बेत केल्याप्रमाणें लोकपक्षाचे पुष्कळसे सभासद गैरहजर राहात. स्वराज्य पक्षाचे, किंबहुना असेंब्लींत एकंदर लोकपक्षाचे, पुढारी पं. मोतिलाल नेहरू हे या सगळ्या दिवसांत फार तर १०–२० मिनिटें सभागृहांत हजर असतील. खुद्द पुढाऱ्यानेंच असें वर्तन केलें म्हणजे इतरांना नांव कोणी कसें ठेवावें ? उलट सरकारची शिस्त अशी कीं, या सगळ्या चर्चेत स्वतःला एक शब्दहि बोलण्याचें कारण नसतां, होम मेंबर क्रेरर हे चार दिवस आपल्या जागीं पहारेकऱ्याप्रमाणें बसून होते. कदाचित् पहारेकरीहि एखादे वेळीं थोडीशी डुलकी घेतो, नाहीं असें नाहीं. पण क्रेरर यांनीं डुलकी घेतली तरी ती बसल्या जागेवरूनच ! कित्येक वेळां असाहि प्रसंग आलेला दिसे कीं, सरकार पक्षाच्या लोकांनीं संगनमत करून दडी दिली असती तर योग्य गणभरती ( कोरम) नाहीं म्हणून अध्यक्षांना सभा बरखास्त करावी लागली असती. एक दोनदां गमतीनें कोणी तसा प्रश्न काढलाहि. परंतु अध्यक्ष सभासदांची मोजदाद करण्यांत वेळ घालवितात ती संधि घेऊन लॉबीमधील कांहीं लोक तेवढ्या पुरते येऊन बसून गणभरती करून पुनः बाहेर जात! अशा रीतीनें ही चर्चा अगदीं रेंगाळत चालली होती.

***

मुख्य भर व सर्वांचा एकोपा पहिल्या मागणीवर होता. ही मागणी रेलवेबोर्डाच्या पगाराची होती. आणि तींतहि नवीन नेमण्याच्या एका सभासदाचा जो पगार घालण्यांत आला होता त्यावर सर्वांची झोड पडली. रेलवे बोर्डावर पूर्वी ठरल्याप्रमाणे शब्दमात्रानें हिंदी सभासद दिला. पण त्यालाहि रेलवेबोर्डाच्या बालेकिल्ल्यांत जागा दिली नाहीं. जुन्या जागा युरोपियन लोकांकरितां शिल्लक ठेवून, नवीन जागा निर्माण केली व लोकांना फसविण्याकरितां व भलेपणा दाखविण्याकरितां रेलवे खात्यांतील मजुरांची स्थिति सुधारण्याचें काम त्यांच्या गळ्यांत घातलें. म्हणजे या एका आश्रिताची वर्णी लावण्यापलीकडे खरें कांहीं झालें नाहीं. आज हिंदी सभासद नेमला पण उद्यां त्याच्या जागेवर युरोपियन नेमणार नाहींत अशी खात्री कोठे आहे? कारण याला कायदा नाहीं. ज्या त्या वेळेपुरती कांहींएक सबब सांगून, मनचें तें करावें अशी सरकारची पद्धतच आहे! ही व अशीं इतर कारणें विरोधकांनीं सांगितलीं. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं संख्याबलावांचून सयुक्तिकता लंगडी पडते.

***

ही एक चुरशीची बाब संपल्यानंतर बाकीच्या चर्चेत विशेष कोणीच लक्ष घातलें नाहीं. पुढील तीन दिवसांत आणखी १०-५ मुद्द्यांची चर्चा झाली. पण मुद्दा मांडणारानें तयार करून आणलेली तक्रार मांडावी, एखाददुसऱ्यानें तिचें समर्थन करावें; शेवटीं सर जॉर्ज रेनी किंवा पार्सन्स यांनीं उठून, तोंडाला येईल तसें उत्तर देऊन मोकळें व्हावें, असा प्रकार चालला होता ! आतां ही गोष्ट खरी कीं, खासगी सभासदानें विशेष प्रसंगानें पुस्तकें वाचून माहिती मिळवावयाची व सरकारी सभासदांचें तर तें रोजचेंच काम; यामुळें त्यांना विषयाला सोडून फारसें बोलावें लागत नव्हतें. पण ते हातचलाखी करीत हें मात्र उघड दिसे. खासगी सभासदांच्याजवळ माहिती असावयाची ती

रेलवेबोर्डानें प्रसिद्ध केलेल्या कागदपत्रांतील असावयाची. पण या कागदपत्रांत छापलेली नाहीं अशी माहिती अवचित सरकारला पुढें आणता येई. कारण वादाच्या मुद्दयाची सूचना त्यांना आगाऊ असल्याने त्यांना कोठल्या तरी अधिकाऱ्याचा, कोठल्या तरी एजंटाचा, तेवढ्यापुरता रिपोर्ट आणावितां येई. आणि या कागदांतील माहिती प्रथमच डोकें वर करून यावयाची; तथापि ती अनधिकृत म्हणण्याची सोय नाहीं व खोटी म्हणावी तर उलटा आधार जवळ नाहीं. यामुळे सर जॉर्ज रेनी किंवा पार्सन्स हे बोलतील ते प्रमाण अशी स्थिति होऊन बसली होती. पण तज्ज्ञ व अतज्ज्ञ यांच्या भांडणांत कोणत्याहि देशाच्या राज्यकारभारांत अशाच गोष्टी होत असतात. त्यांत व हिंदुस्थानांत फरक इतकाच कीं, खासगी पुढाऱ्यांना सरकारी खुर्चीवर बसून जबाबदारीनें बोलण्याचा प्रसंग केव्हांच येत नाहीं. व सरकारी सभासदांनाहि विरोधकांची भूमिका घेऊन केव्हांहि वाक्पांडित्य करावें लागत नाहीं. अशी उलटापालट कधींहि होण्याचा संभवच नसल्याने सर्व सरकारी काम एकतंत्री, एका दिशेनें, एका पद्धतीनें चालतें.

***

असो. यानंतर झालेल्या चर्चेत कोण बोलले, काय बोलले, हें सांगणें जवळ जवळ कठीण आहे. कारण पाऊलांत पाऊल घोटाळावें त्याप्रमाणें एका विषयांत दुसरा, दुसऱ्यांत तिसरा असे विषय निघत व तसें होणें स्वाभाविक होतें. कारण टीकास्पद असा जो सगळा कारभार त्याच्या मुळाशीं कारण एकच म्हणजे स्वायत्त, बिनमुर्वतखोर व लोकांच्या दृष्टीनें कधींहि न पाहणारें कारभारी मंडळ! म्हणून पुढें आलेल्या मुद्दयांची सभासदवार वांटणी न करतां टीकेचे बहुतेक मुद्दे एकत्र जमा धरून ते वाचकांच्या नजरेला यावेत अशा रीतीनें देण्यासारखे आहेत. पण ते पुनः केव्हां तरी देऊं.

***

अशा रीतीनें गेल्या चार दिवसांत सगळें वाग्युद्ध एकाच मुद्दयाच्याभोंवतीं भोंवतीं सुरू होतें. पण पूर्वीच सांगितल्याप्रमाणे पहिल्या एका मागणीपलीकडे मजल गेली नाहीं. वॉशिंग्टन आयर्विनच्या एका गोष्टींत असें सांगितलें आहे कीं, एक मनुष्य टेकडीवरून उडी मारून जाण्याकरितां मागे अर्ध्या मैलाचा पल्ला घेऊन धांवत सुटला. व या धांवण्याच्या जोरानें मिळणाऱ्या गतीने, टेकडीपार उडी मारून जाण्याचें त्याने ठरविलें! पण ही अर्ध्या मैलाची मजल धांवून जाण्यांतच त्याची सगळी शक्ति खर्च झाली व तो घामाघूम होऊन पाय टाकून शेवटीं टेकडीच्या पायथ्याशीं टेकडीकडे पाहात हुश्श करीत बसला. रेलवेबोर्डावरील चर्चेत खासगी सभासदांची कांहींशी अशीच गत झाली. आधींची तयारी सगळ्या १४ मागण्यांतील विषयांची चर्चा करण्याची व कांहीं कांट यशस्वी करून सरकारला लाज आणण्याची. पण पहिली एक मागणीहि पुरी न झाल्यामुळे ठराविक मुदतीनंतर जेव्हां अध्यक्ष उभे राहून मागण्या व त्यांतील लाखांचे व कोटींचे खर्चाचे आंकडे मंजुरीला घालूं लागले तेव्हां आपण कोठें व सरकार कोठें याची जाणीव सभासदांना होऊन त्यांचे डोळे चक्क झाले! तात्पर्य, सत्ता नाहीं तोपर्यंत चर्चा, टीका व वादविवाद याला जवळ जवळ खेळाचें किंवा विडंबनाचें स्वरूप येतें. पण आज अशी स्थिति आहे खरी.

***

गेल्या आठवड्यांत नामदार शास्त्री यांना एक गार्डन पार्टी देण्यांत आली. तिच्या आमंत्रणपत्रिकेवर १०-५ प्रतिष्ठित लोकांच्या सह्या घालण्यांत आल्या होत्या. पार्टीला व्हाइसरॉयसाहेबांना निमंत्रण करण्यांत आले होतें व त्याप्रमाणें ते आलेहि. पण हा सगळा प्रकार पटेलसाहेबांच्या घरीं जी चहापार्टी झाली तिचें उट्टं काढावयाचें अशा अर्थाचा नसला तरी तिची बरोबरी करून दाखविण्याच्या दृष्टीचा झाला. पण यांत खर्च एकानें केला, मेहनत दुसऱ्याने केली, मान तिसऱ्याला मिळाला व इतकें होऊनहि बतावणीला गालबोट लागलें तें लागलेंच. निमंत्रणपत्रिकेवर सह्या घालणारामध्यें प्रथम डॉ. अनसारी व पं. मोतिलाल नेहरू यांचीं नांवें होतीं. पण कांहीं तरी गैरसमज होऊन नेहरू व अनसारी यांचीं नांवें चुकून घातलीं गेलीं असें जाहीर करण्यापर्यंत पाळी आली! या पार्टीला स्वराज्य पक्षाचे कांहीं लोक आले. कांहीं आले नाहींत, पण स्वतः नेहरू यांनीं पार्टीला येण्याचेहि टाळलें! कारण त्यामुळें कॉंग्रेसची अप्रतिष्ठा होते असें त्यांना वाटलें. वास्तविक पटेल यांच्या घरीं पार्टी झाली ती परिस्थिति व दुसऱ्या गार्डनपार्टीची ही परिस्थिति कांहीं वेगळी नव्हती. पण पटेलसाहेबांच्या घरीं व्हाइसरॉयांच्याबरोबर चहा घेण्याला नेहरूंची हरकत नव्हती. पण दहा निरनिराळ्या प्रमुख गृहस्थांनीं, कोणत्याहि एका पक्षाच्या नांवाने निमंत्रण न देतां, ५०० लोकांना बोलावून जी पार्टी दिली तींत व्हाइसरॉयसाहेब येणार एवढ्यानें पं. नेहरू यांचें सगळें गाठोडें बुडालें! या विधिनिषेधाच्या बाबतींत पं नेहरू यांनीं आजवर इतका विसंगतपणा दाखविला आहे कीं स्वतः स्वराज्य पक्षांतील लोकहि त्यांच्यावर नाराज झाले आहेत. व त्यांच्या संबंधाने 'दिवा काकरवाद् भीता तरति नर्मदां' असें म्हणून त्यांचा अधिक्षेप

करण्याची वेळ आली आहे. पटेलसाहेबांच्या पार्टी-पक्षीहि खरोखर ही पार्टी राजकीय देखाव्याच्या दृष्टीनें अधिक अलिप्त होती. तथापि औचित्याची मर्यादा मी तोंडानें ठरवीन तीच खरी. तिच्यापलीकडे पाऊल पडलें कीं सगळी शिवाशिवीची कालवाकालव झाली. असें आपलें मत जगावर लादण्याचें पंडितजींचे प्रयत्न हल्लीं चालू आहेत. ते म्हणतील व आचरणांत आणतील तो बहिष्कार तेवढा खरा! बाकी कोणी कसाहि बहिष्कार पाळला तरी तो फुकट. पण यासंबंधानें अधिक चर्चा न करावी हेंच बरें.

***

हल्लीं जुन्या पंचांगाप्रमाणें दिल्ली शहरांतील मराठी मोहल्यामध्यें महाराष्ट्र स्नेहसंवर्धक समाजातर्फे दासनवमीचा उत्सव सुरू आहे व कथा कीर्तनें, व्याख्यानें चालू आहेत. या प्रसंगीं नागपूरचे हरिदास दादाशास्त्री कायरकर हे येथें आलेले असून त्यांचीं कीर्तनें लोकप्रिय झालीं आहेत. हिंदी भाषेच्या सरावामुळें त्यांना दक्षिणेतील कथेची पद्धत इकडील हिंदी लोकांना पटवून दाखवितां आली. त्यांतल्या त्यांत त्यांनीं झाशीची राणी लक्ष्मीबाई यांचें आख्यान बसविलें आहे तें ऐकून तर इकडील हिंदी मंडळींना विशेष आश्चर्य व कौतुक वाटलें.

# पब्लिक सेफ्टी बिल

## श्री. माधवराव अणे यांचें भाषण

श्री. अणे यांनीं असेंब्लींतील पब्लिक सेफ्टी बिलावरील वादविवादांत पुढील आशयाचें भाषण केलें:—

असेंब्लीच्या गेल्या व या बैठकींत या विषया-संबंधीं आतां इतकीं भाषणें झालीं आहेत कीं, त्यात आणखी एका नवीन भाषणाची भर मी घालूं इच्छित नाहीं. पण थोडक्यांत एकदोन मुद्दे सांगणार आहे. सरकारतर्फे मि. कॉसग्रेव्ह यांनीं असें सांगितलें कीं कानडा, ऑस्ट्रेलिया, अमेरिका इत्यादि देशांत या बिलासारखे कायदे आहेतच. हद्दपारीचा स्वयंभू विशिष्ट हक्क हिंदुस्थानसरकारास केव्हाहि व कोणत्याहि प्रसंगीं असूंच नये असें लोकपक्षाचें म्हणणें नाहीं. पण या बिलामुळें ज्या विशिष्ट रीतीनें सरकार या सत्तेचा दुरुपयोग करूं पाहात आहे त्याला आमची हरकत आहे.

कॉसग्रेव्ह यांनीं या मुद्द्याला उत्तर देण्याकरितां असेंब्लीची सर्व लायब्ररी उलथीपालथी घातली आहे. पण कोणत्याहि सुधारलेल्या देशाच्या कायदे-बुकांत असला कायदा आढळणार नाहीं. सर्व क्रिमिनल प्रोसीजर एकीकडे धुळींत टाकून सरकार एक विशिष्ट सत्ता आपल्या हातांत घेऊं पाहात आहे. सरकार एक स्पेशल ट्रायब्यूनल नेमणार. आरोपीला आपला पुरावा पुढें मांडण्याची संधीहि देण्यात येणार नाहीं. फौजदारी काम चालविण्याची ही कोठली रीत? अशी संधि कानडा व ऑस्ट्रेलिया या देशांत आरोपीला मिळत नसल्यास ग्रॅहॅम अगर कॉसग्रेव्ह यांनीं तसें उघडपणें सांगण्यास सिद्ध व्हावें.

"कानडा ऑस्ट्रेलिया वगैरे देशांच्या दंड-शास्त्रांतूनच हा कायदा इकडे उद्धृत केला आहे" असें सरकारतर्फे सांगण्यांत येतें. पण त्या देशांतील कायदा जशाचा तसा नुसता उद्धृत करूनच सरकारचें काम भागलें नाहीं! "जो कोणी दुसऱ्याच्या मालमत्तेविषयीं कोणताहि बेकायदेशीर-पणाचा प्रयत्न करील" अशा स्थूल व अनिश्चित शब्दांची त्यांनीं या बिलास पुस्ती जोडली आहे. जशाचा तसा दुसरीकडचा कायदा इकडे उचलून घेण्यात आमच्या सरकारच्या बुद्धिमत्तेला भूषण तें कसलें? म्हणूनच त्यांनीं हा उपव्याप केला असावा. एरवीं त्यांची नादिरशाही जुलमाची हौस भागली नसती. पैसे व इतर मालमत्ता जप्त करण्याचें जें चौथें कलम आहे तेंहि असेंच विचित्र आहे. याबद्दल कालच पंडित मोतिलाल नेहरू यांनीं या बिलाचें जे मार्मिक पृथःकरण केलें तें सरकारी लोकांनीं नीट लक्षात घेतलें असतें तर बरें झालें असतें! असें बिल जर पास झालें तर परराष्ट्रीय व्यापार व दळण-वळणें यांना केवढा धोका आहे? पैसे अगर माल मधल्यामध्यें जप्त होऊं लागला तर कोणता देश या देशाशीं व्यापार करील?

सर्वसाधारण किंवा नित्य चालणारे फौजदारी कायदे व नैमित्तिक स्वरूपाचे दडपशाहीचे कायदे यांमध्यें असलेला भेद दर्शवून प्रस्तुतचें बिल हे दडपशाहीचें नाहीं, असें कीन यांनीं काल सांगितलें. पण कीन यांनीं रौलेट कमिटीचा रिपोर्ट वाचावा म्हणजे त्यांना आपलें म्हणणें चूक आहे हे कळून येईल. फौजदारी कामाची चालचलाऊ

पद्धती जेथें क्षणभर गुंडाळून ठेवावी लागते तो कायदा दडपशाहीचाच होय, असें या रिपोर्टांत स्पष्ट म्हटलें आहे.

दुसऱ्या देशांत असा कायदा नाहीं असे म्हटल्यानें बाजू अंगावर येऊं लागली म्हणजे सरकारतर्फे उलट असे सांगण्यांत येतें कीं या देशाची परिस्थिति कांहीं विशिष्ट व वेगळी आहे म्हणून आम्हाला हा कायदा करावा लागतो. कीन यांनीं जमीन-महसुलाच्या कायद्याचा उल्लेख करून म्हटलें कीं, असा कायदा हिंदुस्थानांत आहे पण इंग्लंडांत तो सापडणार नाहीं. पण बंगालमधील शेतकऱ्यांच्या हिताकरितां सरकारनें हे कायदे केले असे मानण्यास मी साफ तयार नाहीं. एक गोष्ट सरकारी सभासद विसरतात ती ही कीं, या देशांतील शेतकरी हे एके काळीं जमिनीचे पूर्ण मालक होते. पण केवळ संपत्तीच्या लोभानें सरकारनें त्यांचा मालकी हक्क लुबाडून त्यांना केवळ उपरीं रयतकुळें बनविलीं. १८४५ सालाचा रेट ॲक्ट पास झाला तो तरी ही चूक अंशतः दुरुस्त करण्या-करितां होय. सरकार विनाकारण कम्युनिस्ट लोकांना शिव्या मात्र देते. पण अनादि कालापासून वंश-परंपरा चालत आलेले लोकांचे हक्क हिरावून घेऊन सरकारनें ते आपल्या अधिकारात सामील केले तो कम्युनिस्टपणाच नव्हे काय ! सरकार हे कोणत्या तोंडानें नाकबूल करील ? जमीनदारांच्या बाबत हिंदुस्थानाच्या प्राचीन राज्यकर्त्यांनीं असली अरेरावीची चूक कधीहि केली नाहीं. राज्यकर्ता कोणीहि असो, पण जमीनदार हा जमिनीचा मालक नव्हे असे त्यांनीं कधीहि म्हटले नाहीं. पण अलीकडच्या राजवटींत ज्या वेळीं कायदेमंडळे अस्तित्वांत नव्हतीं आणि सरकारच्या सत्तेवर लोकाचा यत्किंचितहि दाब नव्हता, त्या वेळीं सरकारनें ते कायदे केले व जमीनदारांच्या हक्कावर आयत्या बिळावर नागोबा या न्यायानें सरकार मालक म्हणून प्रतिष्ठित झालें. खुद्द सरकारनेंच या तत्त्वांचा अंगिकार केल्यावर इतरहि कांहीं लोक या तत्त्वाचा अंगिकार करूं लागले तर त्यांचें मात्र डोकें सरकारने मारावें असें त्यांत काय आहे ?

सरकारतर्फेच या मुद्दयाचा उल्लेख झाला म्हणून जमीनबाबतच्या प्रश्नाला मीहि उत्तर दिले व अजून कोणाची शंका असल्यास शेतकऱ्यांना आपला मालकी हक्क परत मिळवून देण्यासंबंधानें या देशांत जे जे प्रयत्न झाले ते सरकारनें कसे धुडकावून लावले हे आपल्यापुढे मांडून मी त्यांची खात्री करून देईन. खुद्द वऱ्हाडांतील कायदे कमिटीनें लँड रेव्हेन्यू कोडाची दुरुस्ती होण्या-करितां दोन वेळ रिपोर्ट केला पण सरकारनें तो धिक्कारून फेटाळून लावला. आणि वटहुकूम काढून पुनः हट्टानें असें जाहीर केलें कीं, शेतकरी हे जमिनीचे मालक नाहींत तर उपरीं रयतकुळेंच होत. पण तो प्रस्तुत मुद्दा नाहीं. केवळ कीन यांनीं या मुद्दयाचा उल्लेख केला म्हणूनच हा प्रश्न मीं काढला.

यानंतर सर डेनिस ब्रे यांच्या भाषणाकडे आम्ही वळूं. डेनिस ब्रे यांना वक्तृत्वाची कला चांगली अवगत आहे व वाक्जाल पसरून धुकें कसें उत्पन्न करावें ही कला ते चांगली जाणतात. पण दुर्दैवानें त्यांत मुद्दयाची गोष्ट एकहि सांपडत नाहीं. सरहद्दी-वर कांहीं कम्युनिस्ट लोकांची टोळी होती व सैबेरियांत असलेल्या कम्युनिस्ट पक्षाशीं तिचा संबंध होता. पण सध्या ती नष्ट झाली आहे, अशा माहितीचा उल्लेख नुकताच करण्यांत आला व याला तरी मि. ब्रे उत्तर देतील असें वाटले होतें, पण तीहि आशा सफळ झाली नाहीं. ज्याअर्थी या लोकांचा सरहद्दीच्या प्रांतांतून आतां नायनाट झाला त्याअर्थी कम्युनिझमचें बीज हिंदुस्थानाच्या मरु-भूमींत एक रुजत तरी नसावें, किंवा सरकारच्या हातीं आतांपर्यंत अस-लेले कायदे सरकारला या कामीं पुरे असावेत. यापैकीं कोणती तरी एक गोष्ट पत्करल्यावांचून सुटकाच नाहीं. मि. डेनिस ब्रे यांनीं या मुद्दयाची थोडी चर्चा केली असती तर बरें झालें असतें.

लोकांचा या बिलाबद्दल सरकाराशीं तंटा आहे तो एवढ्याचकरितां कीं सरकारला या बिलामुळें खरोखर कम्युनिझमचा पाडाव करावयाचा आहे हें लोकांना खरें वाटत नाहीं. कारण तसे असतें तर सरकारनें या रोगाची शांत मानानें निदान चिकित्सा केली असती. पण सरकारनें सर्व सत्ता, मिळकत व मालकी हक्क हीं एकत्र व एका मुठींत संग्रहीत केली म्हणून प्रतिक्रियेच्या न्यायानें कम्युनिझमचें तत्त्व उदयाला आलें. कम्युनिझम हा साम्राज्यवादी लोकांचा शत्रु आहे. साम्राज्यवादित्वाशीं टक्कर देण्याची हिंदुस्थान-सरकारची तयारी असेल तर कम्युनिझमचा आपोआप नायनाट होईल. पण तें होणार कसें ? अरेरावी साम्राज्याच्या धुंदींत सरकार तोऱ्यानें पुढें चाललें आहे, म्हणून कम्युनिस्ट व हिंदी राष्ट्रीय पक्षाचे लोक यांच्या मनोवृत्तींत काय श्लेष आहे हें सरकार जाणत नाहीं. पण स्वतः कम्युनिस्ट लोकांना हा भेद माहीत आहे. म्हणून कम्युनिस्ट मताचा सरकारला पाडाव करावयाचा असेल तर कॉंग्रेसवाले लोक काय म्हणतात व हिंदी राष्ट्राच्या काय मागण्या आहेत याकडे सरकारनें लक्ष पुरविलें पाहिजे. ही गोष्ट करण्यास सरकार तयार होईल व साम्राज्य-वादाची हाव थोडी कमी करील तर कम्युनिझमचा

नायनाट होण्यास वेळ लागणार नाहीं. कोण कोठले दोन ब्रिटिश लोक हिंदुस्थानांत चळवळ करतात व त्यांना दडपून टाकण्याकरितां असलें हत्तीएवढें अजस्त्र बिल सरकार आणतें. हा सर्वच मूर्ख-पणाचा प्रकार नव्हे काय? केळकर यांनीं काल विनोदानें म्हटलें की कैकाडणीच्या डोक्यांतील उवा विचरून काढण्याकरितां हें एक ट्रॅक्टर मशीन सरकारनें आणविलें आहे. पण मलाहि दुसरी एक उपमा सुचते. तोंडावरील माशांचें निवारण करण्या-करितां एका शिलेदारानें त्यांच्यावर पट्याचे हात फिरविले व त्यांत स्वतःचें नाक कापून घेऊन स्वतःस हास्यास्पद मात्र करून घेतलें. अशी स्थिति अखेर सरकारची होणार हें मी सरकारला निश्चयानें बजावतों. त्यांनीं हें बिल गाळून टाकून असल्या भानगडींत न पडावें हें उत्तम.

# इंग्लंड-हिंदुस्थानाची विमानांतून भेट

हिंदुस्थान व इंग्लंड यांजमधील अंतर पांच हजार मैलांचे आहे. हे अंतर चालून जाण्याचा सांप्रतचा एकच मार्ग म्हणजे जलमार्ग. जलमार्गानें इंग्लंडांतून हिंदुस्थानात येण्यास सांप्रत चौदा दिवस लागतात. पूर्वी सहा महिनेंहि या प्रवासास पुरत नसत. त्या मानानें चौदा दिवस कांहींच नव्हत. तथापि संवयीमुळें हीहि मुदत अलीकडे फार वाटत असून समुद्रांतून दोन दोन आठवडे रखडत येण्यापेक्षां आकाशांतून उडून येणें फार बरें अशी विमानविद्येचा शोध लागल्यापासून मनुष्यास इच्छा होत आहे. विमानविद्या नवीन असल्यामुळें तिला हा गगनमार्गी प्रवास बिनधोकपणानें झेपेल कीं नाही याविषयीं शंका होती. व त्या दृष्टीने गेलीं चार-पांच वर्षे प्रयोगहि सुरू आहेत. सदर प्रयोगामुळे धोक्याची भीति पुष्कळच कमी झाली असून अशा प्रकारचा दीर्घ प्रवास विमानांतून करण्यास हरकत नाहीं असें तज्ज्ञांचे मत बनलें आहे. इंग्लंडचे विमानमंत्री सर सॅम्युअल होअर हे कांहीं महिन्यांपूर्वी विमानांत बसून इंग्लंडांतून हिंदुस्थानांत आले व ते कराचीस उतरले त्या वेळीं ते आपल्या विमानांतून निजावयाच्या खोलींतून झोंप झाल्यावर बाहेर यावें त्याप्रमाणें ताजेतवाने दिसले आणि हातांत रॅकेट घेऊन ते सरळ टेनिस खेळावयास गेले असें त्यांचें वर्णन इंग्रज वर्तमानपत्रकारांनीं केले. या वर्णनास अति-शयोक्तीनें थोडाबहुत चुरचुरीतपणा आणिला असला तरी होअरसारखा मंत्रिमंडळांतील एक गृहस्थ हवेंतून साडेचार हजार मैल उडून हिंदुस्थानांत उतरला याचा बहुजनसमाजाच्या मनावर फारच अनुकूळ परिणाम घडल्यावांचून राहिला नाहीं. त्यामुळें एक फायदा हा झाला कीं असला प्रवास करण्यास हरकत नाहीं अशी सर्वांची खात्री पटली.

फक्त हिंदुस्थान व इंग्लंड यांचे दरम्यान हवेचा हा पूल बांधण्यानें इंग्रजांच समाधान नाहीं. त्यांना इंग्लंडा-तील बड्या व्यापारी लोकांचे दळणवळण व पत्रव्यवहार हवेंतून झाला तर अगोदर हवा आहे हें खरें. पण त्याबरोबर किंवा पाठोपाठ ब्रिटिश साम्राज्याचे जाळें भिंतीवरील कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें विणलें गेलें तर जरूर हवें आहे. म्हणजे इंग्लंडाचा कोळी जाळ्याच्या मध्यभागीं बसेल व तेथून ब्रिटिश साम्राज्यांत शत्रूची बारीकशी माशी फिरकली तरी तिजवर त्वरेनें झडप घालील. हा लांबचा हेतु मनांत बाळगून कोभॅम या दुसऱ्या इंग्रज वैमानिकानें इंग्लंडांतून ऑस्ट्रेलियाचा प्रवास थोड्या वर्षांपूर्वी हवेंतून केल्याचें वृत्त पुष्कळांस माहीत आहेच. सांप्रत इंग्लंड ते इजिप्त व इजिप्त ते हिंदुस्थान असा प्रवास येत्या एप्रिल महिन्यापासून सुरू करण्याचें खास ठरलें असून हिंदुस्थानापर्यंतच्या प्रवासास स्थिर-पणा आल्यावर सिंगापुरावरून ऑस्ट्रेलियाकडे या प्रवासाचा रोंख वळावयाचा आहे. इंग्लंड ते हिंदुस्थान या प्रवासास विमानांतून एकंदर दिवस सात लागतील. म्हणजे जलमार्गापेक्षां हा वायुमार्ग निम्म्यावर आला. वास्तविक विमानाची गति दरतासास किमान शंभर मैल असते. या दृष्टीनें इंग्लडांतून हिंदुस्था-नास येण्याला दोन दिवस सहज पुरावेत. परंतु हा हिशेब आगबोटी व आगगाड्या रात्रंदिवस चालतात त्यावरून बसविण्यांत येतो. विमानेंहि दिवसाप्रमाणे रात्रींहि उडतात. तथापि रात्रीचा प्रवास सध्या तरी धोक्याचा असल्या-मुळें इंग्लंड व हिंदुस्थान यांमधील विमानें फक्त दिवसाच उडणार असून त्यासाठीं व प्रवासांतील विश्रांतीसाठीं सात दिवसांची मुदत मुद्दाम ठेवली आहे.

विमान दरशनिवारीं लंडनहून निघेल व दर-शुक्रवारीं कराचीस पोंचेल. ब्रिटिशांचे साम्राज्य पृथ्वीच्या एक-चतुर्थांश पाठीवर पसरलें आहे-याचाच अर्थ असा कां, पृथ्वीच्या तीन-चतुर्थांश पाठीस ब्रिटिश साम्राज्यछत्राची छाया मिळत नसून ती इतर राष्ट्रांच्या सत्तेखालील उन्हांत तापत आहे! अशीं संपूर्ण स्वतंत्र राष्ट्रे व अपूर्ण

स्वतंत्र राष्ट्रें इंग्लंडाच्या हिंदुस्थानावरील वाटेंत आठ आहेत. त्यांपैकीं फ्रान्स, स्वित्झर्लंड, इताली व ग्रीस हीं पूर्ण स्वतंत्र राष्ट्रें आणि इजिप्त,जॉर्डन नदीवरील प्रदेश, इराण हीं अपूर्ण स्वतंत्र राष्ट्रें होत. विमानें हवेंतूनच उडावयाचीं असल्यानें त्यांना त्यांच्याखालची जमीन कोणाचीहि असली तरी सारखी असे कदाचित् म्हणण्यांत येईल. त्यावर उत्तर असें कीं जसें पाखरांचें तसेंच विमानाचेंहि. पाखरांना आकाशांत उडून विसाव्यासाठीं झाडावर बसण्याकरितां यावेंच लागते. त्याचप्रमाणे विमानांनाहि जमिनीचा आधार दिवसांतून एकदां किंवा दोनदां घ्यावाच लागतो. यासाठीं मधल्या मुलुखांत उतरण्याची परवानगी मिळण्याकरितां त्या त्या राष्ट्रांबरोबर इंग्लंडानें तह केले. मध्यंतरी वाटेत इताली व इराण या दोन देशांनीं तहाचे बाबतात थोडेंसे ओढून धरलें होतें. पण त्यांचीहि समजूत घालून व त्यांस त्यांचा फायदा दाखवून ब्रिटिश मुत्सद्यांनीं आपल्या काबूंत आणलें.

या साडेचार हजार मैल प्रवासाचे तीन विभाग पडतात, एक युरोपियन विभाग, दुसरा भूमध्य समुद्रविभाग व तिसरा पूर्वविभाग. युरोपियन विभाग लंडन ते इतालींतील जिनोवापर्यंतचा, भूमध्यविभाग जिनोवा ते अलेक्झांड्रापर्यंतचा व पूर्वविभाग अलेक्झांड्रा ते कराचीपर्यंतचा. पहिला विभाग ६३५ मैल लांबीचा, दुसरा दीड हजार मैलांचा व तिसरा अडीच हजारांचा. पहिल्या विभागांत आल्प्स पर्वत उल्लंघावा लागतो. दुसऱ्या विभागांत भूमध्य समुद्रावरून झाप जाते व तिसऱ्या विभागाखालीं रेताड मैदानें सांपडतात. एकंदर सात दिवसांच्या प्रवासांत पहिल्या दिवशीं ४८५ मैलांचें अंतर विमानांतून तुटणार व रात्रीं आल्प्स पर्वतांतून आगगाडींत बसून १५० मलांवरील जिनोवास प्रवासी उतरणार.दुसऱ्या दिवशीं जिनोवाहून विमानांत बसून प्रवासी निघणार तो थोडा रोम शहरीं आराम घेऊन सिराकूस येथें येणार. तिसऱ्या दिवशीं सिराकूस येथून तोब्रकास व चौथ्या दिवशीं तोब्रकहून अलेक्झांड्रास. दुसऱ्या दिवशीं ७०० मैल, तिसऱ्या दिवशीं ७५० मैल व चौथ्या दिवशीं ६३० मैल अंतर तुटेल. पांचव्या दिवसाचा प्रवास गाडींतून बसऱ्याचा असून तो ९१२ मैलांचा आहे. यांतच बगदाद सांपडतें. सहाव्या दिवशीं बसऱ्याहून जस्क व सातव्या दिवशीं जस्कहून कराची हीं दोनहि अंतरें अनुक्रमें आठशें व सहाशें मैलांची आहेत.

रात्रौ उड्डाण करण्याची गोष्ट वेगळी. पण ती जरी वगळली तरी आहे हा सात दिवसांचा काळहि मोठा असून त्यांत अनुभवानें काटकसर होण्यासारखी आहे प्रत्येक दिवशीं प्रवास संपल्यावर रात्रीच्या झोपेंसाठीं भरपूर वेळ ठेवून आणखीहि बराच वेळ मोडतो. त्यांतील कांहीं वेळ वांचवितां येईल. या विमानांचा उपयोग सध्या टपाल व उतारू यांजकरितांच आहे. उतारूप्रमाणेंच टपालाचेंहि उत्पन्नहि वाढण्याचा संभव आहे. अर्ध्या औंसास ४॥ पेन्स इतकें टपालहंशील ठेवल्यास बराच पत्रव्यवहार विमानमार्गानेंच होणार आहे. विमानाची ही वाहातूक नॅशनल फ्लाइंग सर्व्हिसेस कंपनीकडे सोंपविण्यांत आली असून तिला तीन वर्षांच्या करारानें दरसाल ब्रिटिश सरकार पंधरा हजार पौंड देणार आहे. या खर्चाचा कांहीं वांटा हिंदुस्थानाच्या हिताचा सबब सांगून हिंदुस्थानाच्या माथ्यावर बसविला जाणार यांत शंका नाहीं. वरील कंपनी पुढील तीन वर्षांत निरनिराळ्या देशांत २० एअरोड्रोम्स बांधणार आहे व उतरण्याचीं वीस ठिकाणें करणार आहे. आगबोटी, आगगाड्या व मोटारी या तीन घुशी हिंदुस्थानाच्या संपत्तीस लागल्या आहेतच. विमानाची ही चौथी घूस तिघांच्या जोडीस उरलासुरला पैसा लांबविण्याकरितां जोरानें लागणार अशीं चिन्हें दिसत आहेत.

---

# हिंदुस्थानाचें अंदाजपत्रक

## जमेचा तपशील

( आकडे लक्ष रुपयांचे )

| खात्याचें नांव | १९२८-२९ | १९२९-३० |
|---|---|---|
| जकात | ५००४ | ५१२२ |
| प्राप्तीवरील कर | १६५० | १६६० |
| मीठ | ७६५ | ६३५ |
| अफू | ३४८ | ३०६ |
| विविध | २२० | २२३ |
| रेल्वे | ३८९१ | ४०५५ |
| कालवे | ११ | १३ |
| पोस्ट व तार | ३२ | ५८ |
| व्याज | ३५८ | ३४५ |
| मुलकी खातीं | १०१ | ११२ |
| नाणें व टांकसाळ | २६८ | ३०५ |
| सिव्हिल वर्क्स | १६ | १८ |
| प्रांतिक खंडणी | ५ | ०० |
| विशेष बाबी | २७ | १२० |
| संकीर्ण | ३३६ | ३४९ |
| एकूण जमा | १३१२० | १३४०६ |

## खर्चाचा तपशील

| खात्याचें नांव | १९२८-२९ | १९२९-३० |
|---|---|---|
| करवसुली | ४०९ | ४३९ |
| जंगल | ६ | ८ |
| रेल्वे व्याज इ. | ३३४५ | ३४३० |
| कालवे | २२ | २३ |
| पोस्ट व तार | ८४ | ८१ |
| कर्ज खातें | १५६४ | १५६० |
| मुलकी कारभार | ११४९ | १२६७ |
| लष्करी कारभार | ५८४६ | ५८५९ |
| सिव्हिल वर्क्स | १७१ | २५९ |
| नाणें व टांकसाळ | ७४ | ७१ |
| संकीर्ण | ४४९ | ४०९ |
| एकूण खर्च | १३११९ | १३४०६ |

## हिंदुस्थानाच्या कर्जाचा बोजा

गेल्या सहा वर्षांत कर्जाचा बोजा किती वाढला याची कल्पना येण्याकरितां १९२३ मार्चअखेरचे व १९२९ मार्चअखेरचे असे आंकडे पुढील कोष्टकांत दिले आहेत—

(आंकडे लक्ष रुपयांचे)

| कर्जाचा प्रकार | १९२३ मार्च | १९२९ मार्च |
|---|---|---|
| लोन्स | ३३९८३ | ३९०६१ |
| ट्रेझरी बिल्स | ७१२४ | ४६१० |
| पोस्टल सेव्हिंग बँक | २३२० | ३४७४ |
| ,, कॅशसर्टिफिकेटस | ३१३ | ३२३० |
| प्रॉव्हिडंट फंड | ३६१७ | ६०४२ |
| रिझर्व्ह फंड | ०००० | ३१८५ |
| प्रांतिक शिल्लक | २८६ | ८०९ |
| इतर देणें | ६५३६ | १६७४० |
| बेरीज | ४७६४३ | ६०४११ |
| विलायतेंतलें कर्ज | ४०५३१ | ४७००५ |
| एकूण कर्ज | ८८१७४ | १०७४१६ |

## कर्जफेडीची तजवीज

| | १९२३ मार्च | १९२९मार्च |
|---|---|---|
| रेल्वकडील जिनगी | ५१७२२ | ६९८६० |
| कालवे इ. इ. | १९४३ | २१७५ |
| प्रांतिक सरकारास कर्ज | ८७४९ | १३६९५ |
| हिंदी संस्थानांस कर्ज | ८९० | १५४३ |
| शिल्लक रोकड | ४४८० | ३०५७ |
| एकूण | ६७७८४ | ९०३२० |
| कर्जाचा शिल्लक बोजा | २०३९० | १७०८६ |

# पत्रकर्त्यांच्या स्फुट सूचना

१ बरेच दिवसांपूर्वी अहमदाबाद म्यु.नें लो. टिळकांचा पुतळा उभारण्याचा ठराव केला होता. त्याप्रमाणें गेल्या गुरुवारीं तेथील व्हिक्टोरिया गार्डन्समध्यें म. गांधी यांच्या हस्तें पुतळा उघडण्याचा समारंभ थाटानें झाला. हा पुतळा ब्रॉंझ धातूचा असून तो अहमदाबाद म्यु.व अहमदाबादचे नागरिक यांच्या सहकार्यानें झाला ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आतांपर्यंत पुणें शहर, कराची, नागपूर व अहमदाबाद या विविध महत्त्वाच्या शहरीं प्रमुख ठिकाणीं लोकमान्यांचे पुतळे उभारले गेले यावरून जनतेचें त्यांजवरील प्रेम चांगलें व्यक्त होतें. वरील चारहि ठिकाणचे पुतळे हिंदुस्थानांतील सर्वमान्य अशा पुढाऱ्यांच्या हातून उघडले गेले, ही गोष्टहि लक्षांत घेण्यासारखी आहे. पुण्याचा

पुतळा पं. नेहरूंनीं उघडला. कराचीचा श्री. सौ. सरोजिनी नायडू यांनीं, नागपूरचा डॉ. अन्सारी यांनीं व अहमदाबाद येथें म. गांधी यांच्या हस्तें तो उघडला गेला. अहमदाबाद येथील पुतळा बडोद्याचे प्रसिद्ध शिल्पकार श्री. कोल्हटकर यांनी तयार केला असून तो त्याच्या लौकिकांत भर टाकण्यासारखाच झाला आहे. पुतळा पूर्ण आकाराचा असून त्यांत लोकमान्य खुर्चीवर बसले आहेत असें दाखविलें आहे व त्याखाली 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळविणारच' हें लोकमान्यांचे ब्रीदवाक्य कोरलें आहे. अहमदाबाद येथे लो. टिळकांचा पुतळा उघडण्यांत अनेक दृष्टींनी महत्त्व आहे. व पुतळा उघडतांना म. गांधी यांनीं सांगितल्याप्रमाणें लोकमान्यांच्या तत्त्वास अनुसरून स्वावलबनाच्या बळावर स्वराज्याची चळवळ करण्यास जनतेस त्या योगानें प्रोत्साहन येईल अशी अपेक्षा आहे. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें वरील चारी ठिकाणीं लोकमान्यांचे पुतळे उभारण्यांत आले. परंतु ज्या ठिकाणी त्यांनीं चिरविश्रान्ति घेतली त्या मुंबई नगरांत सागर-तीरावर पुतळा उभारण्याचा ठराव झाला, त्यासाठीं कमिटी नेमली, सरकारची मंजुरीहि मिळाली, सर्व कांहीं झाले असतां तेथील काम रेंगाळत कां पडावे हेच समजत नाहीं. श्री. सीलम-प्रभृति पुढाऱ्यांनीं हें काम एकदां हातावेगळें करून मुंबई शहराचा लौकिक कायम राखवा. पुणें, नागपूर, कराची व अहमदाबाद या शहरांत पुतळे उभारण्याचा संकल्प पार पाडण्यात आला असतां मुंबईसारख्या शहरीं तो संकल्प अद्यापि सिद्धीस जाऊं नये ही गोष्ट मुंबापुरीला शल्यासारखी टोंचणारी नाहीं काय?

---

२ मिरच्यांची धुरी दिली कीं अंगांतला समंध जसा खवळतो व वेडेवेडेचार करूं लागतो म्हणतात त्याप्रमाणें विदेशी मालाच्या होळीचा धूर निघू लागला कीं, नोकरशाहीच्या पोलिसांचें पित्त भडकून ते वेडेवेडे—चार करूं लागतात. राष्ट्रीय सभेनें इतर खंडोगणती ठराव केले तरी बेमुर्वतखोर सरकारला त्यांची पर्वा नसते. परंतु विलायती मालावर बहिष्कार पुकारून त्या बहिष्काराची सक्रिय बजावणी म्हणून कोठें एखादी लहानशी होळी पेटली कीं सरकारच्या अंगाला चटका बसतो. आणि मग त्या चटक्याच्या वेदनेनें बेभान होऊन सरकारचे दूत अद्वातद्वा वर्तन करूं लागतात. यावरूनच बहिष्काराची मात्रा किती गुणकारी व जलद लागू पडणारी आहे याची खात्री पटते. राष्ट्रीय सभेनें विदेशी कपड्यावर बहिष्कार घाल-ण्याचा ठराव केला, आणि वर्किंग कमिटानें त्याची बजावणी करण्याचा कार्यक्रमहि ठरवून दिला. त्या कार्यक्रमास अनुसरून गेल्या आठवड्यांत कलकत्ता शहरीं विदेशी कपड्यांची जाहीर होळी करण्याचें ठरलें. हें जें विदेशी वस्त्र-हवनाचें सत्र होणार होतें त्याचें अध्वर्युत्व स्वतः म. गांधी यांनीं पत्करलें होतें आणि कलकत्याच्या श्रद्धानंद पार्कमध्यें तो यज्ञ व्हावयाचा होता. परंतु प्राचीन काळीं यज्ञ कोठेंहि होऊं घातला कीं, तो बंद पाडण्याकरितां ज्याप्रमाणे निशाचरांच्या टाळ्या धांवून येत व प्रथमतः नुसत्याच भेडसावणीनें व तेवढ्यानें न साधल्यास यज्ञकुंडांतला अग्नि विझवून जसा यज्ञ बंद पाडीत त्याचप्रमाणे आधुनिक 'निशाचरांनीं' बं. प्रां. कॉं. कमिटीचे अध्यक्ष किरणशंकर राय यांस नोटीस देऊन दबकावणीनें हें सत्र बंद पाडण्याचा प्रयत्न केला. आणि तो जेव्हां साधेना तेव्हां प्रत्यक्ष होळीवर हल्ला करून ती होळी विझवून टाकली!

---

३ पोलिसांनीं होळीवर हल्ला केल्यामुळें पोलीस व स्वयंसेवक यांच्यांत बाचाबाची होऊन तें प्रकरण हातघाईवर गेलें व उभय पक्षांतील कित्येक इसमांस बराच मार बसला. पण इकडे अशी दंगल उडवून देऊन होळी विझवूनच पोलि-सांचें समाधान न होतां, महात्माजी व किरण शंकर रॉय यांच्यावर पोलीस आक्टांतील ६६ व्या कलमा विरुद्ध वर्तन करून सार्वजनिक रस्त्यांत होळी पेटविल्याबद्दल पोलिसांनीं खटला भरला व महात्माजींच्या ब्रह्मदेशाच्या सफरीस अडथळा कर-ण्याचा डाव टाकण्यांत आला. पण महात्माजींनीं चक्क सांगितलें कीं प्रत्यक्ष अटक केली तरच मी दौरा रहित करीन. तेव्हां स्वतः पोलीस कमिशनर टेगार्ट यांनीं महात्माजींची भेट घेऊन असें ठरविलें कीं गांधिजींनीं ब्रह्मदेशाहून परत आल्यावर ता. २६ मार्चला हा खटला चालावा; मात्र तोंपर्यंत सार्वजनिक रस्त्यावर होळी होऊं नये आणि ता. २५ रोजीं कोर्टांत हजर होण्याबद्दल महात्माजींनीं ५० रुपयांची जामिनकी द्यावी. या अटी मान्य करून गांधीजी ब्रह्मदेशास निघून गेले.

---

४ या खटल्यांत पुराव्याचा किंवा सत्याग्रहाचा प्रश्नच नसून मुख्य मुद्दा 'रहदारीचा रस्ता' याचा अर्थ काय हा आहे. 'श्रद्धानंद पार्क' रहदारीचा रस्ता होऊं शकत नाहीं, सबब आम्ही कायद्याचें उल्लंघन केलें नाहीं असें गांधींचें म्हणणें आहे आणि त्या शब्दाच्या अर्थाची फोड करण्याकरितां दोहों बाजूंकडून वकिलांची मल्लिनाथी पुढे येणार आहे. त्या मल्लिनाथीवरून 'पार्क' म्हणजे 'रहदारीचा रस्ता' ठरो

वा न ठरो, सरकारचा हेतु यांत काय आहे हें उघड आहे. विदेशी कापडाची होळी होणार असे जाहीर होतांच विलायतेंत पार्लमेंटांतहि प्रश्नोत्तरें झालीं, आणि अर्ल विंटरटन यांच्या उत्तरावरून येथें दडपशाहीचें सत्र सुरू होणार असें दुश्चिन्ह दिसू लागलें. याबाबतींत असेंब्लींतहि प्रश्नोत्तरें झाली, आणि बंगालसरकारच्या किंवा कलकत्त्याच्या पोलिसांच्या कारवाईत स्टेटसेक्रेटरीचा किंवा गव्हर्नर–जनरलांचा कांहींहि संबंध नाहीं असे सांगण्यात आलें! परंतु ब्रिटिश सरकारचा कारभार खालपासून वरपर्यंत अगदीं एकसूत्री असल्याने, अर्ल विंटरटन किंवा लॉर्ड आयर्विन यांनीं प्रत्यक्ष हुकूम न दतां देखील खालच्या अधिकाऱ्याचीं सर्व कारस्थानें वरिष्ठांच्या मनोदयानुरूपच घडत असतात. कारण खालच्या अधिकाऱ्यांत तेवढा मनकवडेपणा आलेला असतो. यावरूनच कलकत्त्यास जी विदेशी कापडाच्या होळीला हरकत घेण्यांत आली तीवरून पुनः दडपशाहीचें सत्र सुरू होणार असेंच अनुमान निघतें. आणि त्या सत्रांत प्रथमच गांधीजीवर झडप घालण्यांत सरकार असेंच दर्शवीत आहे कीं, हिंदी लोकांनीं आपल्या पुढाऱ्याचा कितीहि गौरव केला तरी सरकारच्या काळ्या डगलेवाल्यांपुढें तो पुढारी कस्पटासमान असून पोलिसांनी दिलेला कसलाहि अरेरावीचा हुकूम जर तो न मानील तर त्यास पोलिसांकडून अट्टल बदमाषाप्रमाणेंच वागविण्यांत येईल! सरकारचें हें उपमर्दकारक आव्हान स्वीकारून त्याला तसेंच झणझणीत उत्तर हिंदी राष्ट्राकडून मिळालें तरच आपल्या चळवळींत कांही राम आहे असें सिद्ध होईल. सरकारच्या या उर्मट आव्हानास हिंदी राष्ट्र काय जबाब देणार ?

# दिल्लीचें बातमीपत्र

नवी दिल्ली, ता. ८ मार्च १९२९.

## [ ६ ]

सोमवार व मंगळवार तारीख ५-६ रोजीं बजेटावर सर्वसाधारण चर्चा झाली. स्वराज्य पक्षातर्फे जमनादास मेथा, षण्मुखं चेट्टी, शेषा अय्यंगार; जोगय्या, गयाप्रसादसिंग, दोरायस्वामी अय्यंगार, राष्ट्रीय पक्षातर्फे केळकर, बिरला, मुनशी ईश्वरशरण, पं. मालवीय, चौधरी मुख्तारसिग; स्वतंत्र पक्षातर्फे सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास; युरोपियन पक्षातर्फे कर्नल क्रॉफर्ड; स्वतंत्र मुसलमान पक्षातर्फे शहा नवाज, महमद राजन बक्ष यांचीं भाषणें झालीं. याशिवाय रे. चतर्जी, के. सी. रॉय, कर्नल गिडने वगैरेचींहि भाषणें झालीं. बहुतेक सर्वांच्या भाषणात सामोपचारच होता. व "हें तुमचें पहिलें बजेट असल्यामुळें तुम्हाला कोणत्याच बाबतींत विशेष जबाबदार धरतां येत नाहीं. पण अजून चार वर्षें जावयाचीं आहेत. त्यांत तुमचा आमचा मतभेद होण्याचा प्रसंग न आला तर बरा. पण आलाच तर त्याला अनुसरून आम्हालाहि वागावें लागेल व जेवढ्या चांगल्या गोष्टी म्हणजे देशहिताच्या गोष्टी तुम्ही कराल तेवढ्यांत तुम्हाला आमची सहकारिता लाभेल" असेंच जवळ जवळ सर्वांनी सांगितलें.

***

या नव्या फडणविसाच्या या पहिल्या बजेटांत, नवीन अठरा कोटींचे कर्ज काढावयाचें तें हिंदुस्थानातच काढावयाचें असें आश्वासन असल्यामुळें त्यापुरता मतभेद नाही. परतु विलायतेंत यंदाहि कांही कर्ज काढावे लागेल असें त्यांनीं सांगितलें. त्याला अर्थात् कोणालाच संमति देतां आली नाहीं. प्रांतिक खंडण्यांच्या बोजापासून प्रांतिक सरकाराना कायमचें मुक्त केलें ही गोष्ट सर्वसंमतच आहे. परंतु या खंडण्यांची गुंतागुंत नाहींशी झाल्यावर काय करावयाचें हा प्रश्न सर्वांच्या उत्कंठतेचा होता; व त्या बाबतींत म्हणजे नवीन कर बसविणार कीं जुन्यापैकीं कांहीं कमी करणार या संबंधाने नवीन फडणविसांनीं जें धोरण दिग्दर्शित केलें ते मात्र सर्वांना संशयास्पद वाटलें. सर बेसिल ब्लॅकेट यांनी एक मधाचें बोट जातां जाता लावून ठेवलें होतें. तें असें कीं, "प्रांतिक खंडण्यांच्या भानगडींतून आपण मोकळे होतांच कदाचित् कोणते कर कमी करतां येतील याचा आपण विचार करूं." पण नवीन फडणविसांनीं कर कमी करण्याची गोष्ट न बोलतां, "पुढील वर्षांत नवीन कर बसवावा लागला तर तो कोणता बसवावा याचा विचार आपण करूं" असें जे सांगितलें ते सहजच भीतिप्रद वाटण्यासारखें होतें. पुष्कळांचा समज असा आहे कीं, 'कर कमिटी' नावाची जी कमिटी सर टॉड हंटर यांच्या अध्यक्षतेखालीं नेमली होती व ज्या कमिटीवर डॉ.

परांजपे हे एक सभासद होते त्या कमिटीनें करवाढीसंबंधानें ज्या सूचना करून ठेविल्या आहेत त्या उगवून कशा घेतां येतील याचा विचार आतां सरकार हळूहळू करूं लागणार!

***

कारण खर्च कमी न होतां कदाचित् थोडासा वाढणारच. अफगाणिस्थानाशी युद्धाचा प्रसंग आला तर बोलावयासच नको. व खर्चात बचत करण्याची गोष्ट निश्चित अशी नवीन फडणवीस कांहीच बोलले नाहींत. यावरून असें वाटतें कीं, कदाचित् नवीन कर बसविण्याच्या बाबतींत नवे फडणवीस व असेंब्ली यांचें युद्ध पुढचे वर्षी जुंपेल. एरवीं पुढील बारा महिन्यांत भानगडीचा असा प्रश्न दिसत नाहीं. कारण हुंडणावळीचें बिल पूर्वीच पास होऊन गेलें व रिझर्व्ह बँकेचा प्रश्न एकदोन वर्षे तरी पुढे येत नाहीं. दरम्यान हिंदुस्थानांत बँका व पेढ्या यांची स्थिति कशी काय आहे याची चौकशी होणार आहे व ती सर्वांना हवीच आहे. या संबंधानें मध्यवर्ती कमिटी लवकरच नेमण्यांत येईल व त्या कमिटीवर मुंबईचे सादन व सर ह्यु कोक व कलकत्त्याचे खेतान या तीन गृहस्थांचीं नांवें हल्लीं पुढें आलीं आहेत बाकीचीं नांवें सुचविलीं जाऊन लवकरच ती कमिटी पुरी होईल. परंतु प्रांतानिहाय कमिट्या नेमल्या जाऊन त्यांचे रिपोर्ट हातीं आल्यानंतर या मध्यवर्ती कमिटीचें काम सुरू होणार. म्हणून त्या बाबतींत तूर्त कांहींच वाद नाहीं. एकंदरीनें 'मी नवीनच आलों आहे' असें फडणविसांनीं विनयपूर्वक म्हटल्यानें टीकेचा ताण ढिला झालाच होता. व "पुढें येणाऱ्या अमुक अमुक प्रश्नांचा विचार करावयाचा तो असेंब्लींत निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांचा विचार घेऊन आपण करूं" असें सर जॉर्ज शुस्टर यांनीं दर्शविल्यामुळें तूर्त वाद असा कांहींच उरला नाहीं. असो. समारोपादाखल सर जॉर्ज शुस्टर यांनीं मंगळवारीं संध्याकाळीं अखेरचें भाषण केलें. त्यांत नमूद करण्यासारखी गोष्ट कांहींच नव्हती. तथापि "कित्येक सभासदांनीं ज्या निरनिराळ्या सूचना केल्या त्यांचा मी अवश्य विचार करीन व हा विचार केला ही गोष्ट पुढील बजेट मांडतांना निदर्शनास येईल" असें त्यांनीं भासविलें.

***

बुधवार तारीख ६ रोजीं सरकारी बिलाचें काम निघालें त्यांत टॅरिफ बोर्डाकडून आलेल्या सूचनांना कायद्याचें स्वरूप देण्याचें एक बिल होतें पैकीं समुद्रांतील तारायंत्राची तार व हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या छापखान्याचा टाईप याचा परदेशी मालापासून बचाव होण्याकरितां कांहीं मदत करावी असा बिलाचा आशय होता; व हें बिल वादग्रस्त नसल्यामुळे थोड्याच वेळांत मंजूर झालें हिंदुस्थानांत टाईप फाउंडरीचा धंदा नवीनच आहे. शिवाय हिंदुस्थानाची गरज भागण्यासारखा बहुतेक सर्व प्रकारचा टाईप इकडे चांगला पाडतां येतो. असें असतां परदेशाहून येणारा टाईप, व इकडे टाईप तयार होण्याकरितां आणलेलें शिसें व अँटिमनी, यांच्यावर जी सापेक्ष बंदरी जकात होती ती अन्यायाची आहे अशी मागणी इकडील टाईप फाउंडरीच्या मालकांनीं पूर्वीपासूनच केली होती. तिचा अशा रीतीनें निकाल लागला ही गोष्ट बरी झाली. संरक्षणाकरितां म्हणून जबर जकात बसविली नाहीं. परंतु वर दर्शविल्याप्रमाणें जो अन्यायमूलक फरक होता तो टाइपावरील जकात वाढवून काढून टाकला.

***

दुसरें व तिसरें सजोड बिल ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपर्टी ॲक्टाच्या दुरुस्तीसंबधाचें होतें. पैकीं एका बिलांत हल्लीं अमलांत असलेल्या ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपर्टी ॲक्टांत केलेल्या सर्वसाधारण सुधारणा नमूद केल्या असून, दुसरें बिल पुरवणीदाखल आहे. त्यांत पहिल्या बिलाच्या योगानें निरनिराळ्या अनेक कायद्यांत ज्या दुरुस्त्या करणें प्राप्त झाले त्यांचा समावेश करण्यांत आला आहे. ही बिलें तयार करण्याकरितां गतवर्षी एस. आर. दास यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली होती. तींत मुंबईचे अ. मुल्ला, दिल्लीचे लॉ मेंबर सर बी. एल. मितर, व अलाहाबादचे बॅ. सेन वगैरे मंडळी होती त्यांनीं दुरुस्तीचें बहुतेक काम करून ठेवलेंच आहे. परतु त्याला कायद्यांचें स्वरूप देण्याकरितां सिलेक्ट कमिटी नेमण्यांत आली आहे. या कमिटीवर मौ. महंमद याकूब, जिना, शहा नवाज, निर्मळ चंदर, अमरनाथ दत्त, जोगिया, अणे व सर बी. एल मितर हे सभासद आहेत. या कमिटीकडून बिलाची तपासणी मे-जून महिन्यांत होऊन सप्टेंबरच्या बैठकींत हीं बिलें पुढें येतील असा अंदाज आहे. तिसरें बिल त्यावरील सिलेक्ट कमिटीनें मंजूर केलेलें व मजुरांच्या नुकसान भरपाईसंबंधाचें होतें. परंतु सर भूपेंद्रनाथ मितर हे आयत्या वेळीं गैरहजर असल्यामुळें वाट न पाहातां अध्यक्षांनीं सभा बरखास्त केली. अशा रीतीनें तास दीड तासांत बुधवारचें काम संपलें.

***

गुरुवार तारीख ७ रोजीं बजेटांतील मागण्यांवर मतें घेऊन त्या निकालांत काढण्याचें काम सुरू झालें. हें काम मधील सुट्या जाऊन तारीख १५ पर्यंत

चालवयाचें आहे. सामान्य क्रमाप्रमाणें काम चालू झालें असतें तर प्रथम कस्टम खातें, नंतर इन्कमटॅक्स, मीठ या अनुक्रमानें मागण्या पुढें आल्या असत्या. परंतु गेला दोन तीन वर्षे असा प्रघात पडलेला आहे कीं, सर्व पक्षांनीं मिळून कांहीं ठराविक विषय—म्हणजे राजकीय दृष्ट्या त्यांतल्या त्यांत अधिक वादग्रस्त असतील ते—आपल्या इच्छेनुरूप काय ते निवडून घ्याव व त्यांवर चर्चा करून मतें मोजण्यापर्यंत मजल नेऊन जयापजय ठरवावा. कुस्त्यांच्या दंगलींत निरनिराळ्या आखाड्यांचे अनेक पैलवान जमा झालेले असतात. पण त्या सर्वांच्या जोड्या लावून कुस्त्या करण्याला अर्थात् वेळ नसतो. म्हणून आपापल्या इच्छेप्रमाणें गडी पसंत करून फक्त दोनतीन कुस्त्या लढवाव्या व त्यावरून सामान्यतः कोणत्या आखाड्याचें बल किती हें ठरवावें अशी रीत आहे. तिचेच अनुकरण असेंब्लीमध्यें करण्यांत येत असते. हा क्रम न अनुसरला तर दोनचार मागण्यांपलीकडे पांच दिवसांत मजलच जावयाची नाहीं इतके भरपूर कांट निरनिराळ्या सभासदांना दिलेले असतात. व यंदाची शेवटची म्हणून आलेली यादी पाहिली असतां या कांटाची संख्या ३२० वर गेली आहे. यांपैकीं २५–३० उपसूचनांचा चर्चा झाली तरीहि पुष्कळ झाले अशी स्थिति असते, म्हणून ही दुसरी पद्धति कांहीं तरी बरी असें म्हणावे लागतें. कारण जयापजय पाहावयाचा तर त्याला उभय पक्षांचे लोक जाग्यावर हजर राहिले पाहिजेत. आणि या नव्या पद्धतीप्रमाणें आपापले कांट ठरवून घेतले तरच तात्पुरत्या चुरशीळे पुष्कळसे सभासद हजर राहण्याचा संभव. आणि कोणाला काय कोणती हौस भागवून घ्यावयाची ती भागवून घेण्याला वाव मिळतो. म्हणून ही पद्धति सर्वसंमत झाली आहे. त्याप्रमाणें यंदा चर्चेत राष्ट्रीय पक्षानें हिंदुस्थानांतील मिठाची पैदास व मिठावरील कर हा विषय उचलला होता. स्वराज्य पक्षानें स्टेटसेक्रेटरी किंवा एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल ही बाब घेतला आहे. युरोपियन सभासदानीं परदेशी भांडवलाचा प्रश्न घेतला आहे. बॅ. जिना यांनीं लष्करासंबंधीचा वाद उचलला आहे. व मुसलमान पक्षानें पेशावर प्रांतांतील सुधारणाचा प्रश्न निवडला आहे. अशा रीतीनें या पांच विषयांच्या चर्चेत जवळ जवळ चार दिवस जाण्याचा संभव असल्यामुळें तारीख १५ रोजी उरलेल्या इतर विषयाना कांहीं थोडा वाव मिळाला तर कदाचित मिळं शकेल.

***

या ठरीव क्रमाप्रमाणें राष्ट्रीय पक्षाला आपला कांट सुचविण्याची संधि प्रथम ता. ७ रोजी देण्यांत आली. या संबंधानें केळकर यांनीं पूर्वीच सूचना पाठविली असल्यामुळें त्यांनीच ती आपल्या पक्षातर्फे मांडावी, असें ठरलें व त्यांनीं ती मांडली. सूचनेंतील विषय असा होता कीं, " हिंदुस्थानाला मिठाच्या पुरवठ्यासंबंधानें स्वाधीनता प्राप्त व्हावी. व ही स्वाधीनता मिळवून देण्यासंबंधानें सरकारनें योग्य तो इलाज व खर्च करावा." केळकरांच्या भाषणानंतर नियोगी, दोरायस्वामी अय्यंगार, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, नीलकंठ दास, ग्र. टोकजी, गया प्रसादसिंग इतक्यांची भाषणे झालीं, व अखेर सर जॉर्ज रेनी व सर जॉर्ज शुस्टर यांचीं उत्तरादाखल भाषणं झाल्यावर मते मोजण्यात आलीं. तेव्हां केळकरांच्या या सूचनेला अनुकूल ६१ व प्रतिकूल ४३ इतकीं मतें पडून ती मंजूर झाली व सरकारचा पराभव झाला, ही मतें देण्यांत लोकपक्षातर्फे कांहीं मुसलमान सभासदहि सामील झाले होते. याचा अर्थ हिंदुस्थानांतील मिठाची बाब ही तरी जातवारीच्या तडाख्यांतून अजून वांचलेली आहे असें म्हणतां येईल ! आतां शुक्रवारपासून लागोपाठ सुटी असल्यामुळें असेंब्लीचें पुढील काम सोमवारपर्यंत बंद आहे.

# किनाऱ्यालगतच्या वाहतुकीचें बिल

( लि. आ. म. )

बॅ. हाजी यांचीं दोन महत्त्वाचीं बिलें असेंब्लीपुढें आहेत. त्यांतील किनाऱ्यालगतच्या वाहतुकीच्या बिलावर युरोपियनांचा मुख्य आक्षेप असा आहे कीं, बॅ. हाजी यांचा उद्देश युरोपियन लोकांच्या हातांतील किनाऱ्यावरील वाहतुकीच्या व्यापाराची सत्ता काढून घेण्याचा आहे. आणि यावर त्यांचें म्हणणें असे कीं, ज्यांनीं आपल्या कर्तबगारीनें गेलीं कित्येक वर्षे जहाजाच्या वाहतुकीचा धंदा चालविला त्यांचा व्यापार बुडविणें हे न्याय्य नव्हे. पण याला उत्तर असें कीं, हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर मालकी हक्क कोणाचा असणार व राहणार हा प्रश्न आपल्या मनालाच एकदां विचारून मग काय उत्तर येते तें त्यांनीं पाहावें. किनाऱ्यावरील मालकी हक्क त्या देशांतील

राहणाऱ्या लोकांचा असतो. किनाऱ्यावरील वाहतूक ही खासगी घरगुती स्वरूपाची समजली जाते या मार्गाने चालणाऱ्या व्यापाराचे बाबतींत आंतरराष्ट्रीय खुल्या तत्त्वांचा अगर तद्नाम्याचा प्रश्नच येत नाहीं.

१९२३ मध्यें जिनीव्हा येथें भरलेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेनें व्यापारी बंदराचे संबंधानें जे करार केले त्यांशी कोणत्याहि देशाच्या किनाऱ्यावरील वाहतुकीचा संबंध राहात नाहीं असें त्याच परिषदेंत पसार झालेल्या नव्या कलमानें नमूद केलें आहे. अर्थात् किनाऱ्यावरील वाहतूक राखून ठेवणें अगर न ठेवणें हा प्रश्न खासगी स्वरूपाचा असून, किनाऱ्यावरील वाहतुकीचा मालकी हक्क त्या देशांतील लोकांचा असतो हे स्पष्टच आहे. यामुळे युरोपियन कंपन्यांची मालकी काढून घेण्याचा प्रश्नच राहात नाहीं.

दुसरा एक प्रश्न युरोपिअन व्यापारी उत्पन्न करतात तो असा कीं, आमचा किनाऱ्यावरील व्यापार तुमच्या स्वाधीन करावयाचा तर आम्हाला त्याच्या मोबदला (Good-will) कांहीं द्याल कीं नाहीं ? त्याला उत्तर असें कीं, गेलीं १०० वर्षे देशी व परदेशी वाहतूक तुमचे स्वाधीन ठेवली, त्याबद्दल तुम्ही आम्हाला काय दिलें ? उलट वाहतुकीचा धंदा करणाऱ्या देशी कंपन्या गेल्या ७० वर्षांत ३२ निघाल्या व त्यांनी १½ कोटि रुपये या धंद्यांत भांडवलहि घातलें या कंपन्यांशीं दावा मांडून व वाहतुकीच्या दरांत चढाओढ करून, त्यांना बुडविण्याला मात्र तुम्हीं कारण झालां ! याबद्दल तुमचीं किनाऱ्यावरील जहाजें जप्त करावीं असें कोणी म्हणेल तरीहि अन्याय होणार नाहीं. बरें, याहि उपर तुमच्या ताब्यात परदेशी वाहतूक राहाणारच कीं नाहीं ? व या वाहतुकीचें उत्पन्न प्रतिवर्षी ५० कोटि रुपये येतें तें तुम्हीच घेणार याहून अधिक मोबदला तो काय द्यावयाचा ? इतका फायदा तुम्ही प्रतिवर्षी घेत असतां १९२२ पर्यंत हिंदुस्थान-सरकारला प्राप्तीवरील करहि दिला नाहीं ! व हिंदुस्थानसरकार हें तुमचेच भाईबंद असल्यामुळें तेंहि नजरचुकीनें का होईना पण गप्प राहिलें ! बरें; तुम्ही अगदीं सचोटीनें वागणारे तर गेल्या ४० वर्षांत किती हिंदी तरुणांना व्यापारी नाविकशास्त्रांत तुम्ही विशारद बनविले व आपलीं जहाजें हांकण्य करितां त्यांचे स्वाधीन केलीं ? आजपर्यंत एकाहि हिंदी तरुणाला नाविकशास्त्राची माहिती होऊं दिली नाहींन हेच तुमचें गुड-वुईल कीं नाहीं !

## सरकारची अनास्था

नाविकशास्त्रांत हिंदी साहसी तरुण तयार झाले नाहींत याची जबाबदारी सर्वस्वी सरकारावरच आहे. ब्रिटिश राज्याचा अम्मल हिंदी राष्ट्रावर सुरू होऊन आज १४० वर्षे होऊन गेलीं तरी लढाऊ आरमार तर राहोच पण दुय्यम प्रतीचें व्यापारी आरमारहि तयार झालें नाहीं. याचें कारण सरकारनें डफरीन जहाजासारखीं जहाजें शिक्षण देण्याकरितां यापूर्वी राखून ठेवलीं नाहींत. पण आतां पुढील पांच वर्षांत या डफरीन जहाजावरच शंभर एक हिंदी तरुण तयार होतीलच. दुसरें असें कीं, बॅ. हाजी यानी आपल्या बिलांत एक योजना केली आहे. बॅ. हाजी यांच्या बिलानें किनाऱ्यावरील वाहतूक देशी कंपन्यांना ताबडतोब राखून ठेवण्यांत येणार नसून, पुढील पांच वर्षांचे आंत सर्व किनाऱ्यावरील वाहतूक देशी कंपन्यांचे हातीं यावी अशी ती योजना आहे. याचा अर्थ असा कीं, नवीन देशी कंपन्या निघून त्यांनीं पांच वर्षांचे आंत स्थिरस्थावर होऊन आपल्या हातीं हा कारभार घ्यावा. किनाऱ्यालगतच्या वाहतुकीला परवाना देण्याचा अधिकार गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल यांजकडे देण्यांत आला आहे. व त्यानीं ज्या कंपन्यांचें भांडवल हिंदी चलनांत म्हणजे रुपयांत उभारलें असेल व जी कंपनी हिंदुस्थानांत रजिस्टर्ड झाली असेल अशा कंपन्यांपैकीं फक्त पहिल्या वर्षी २० टक्के, दुसऱ्या वर्षी ४०, तिसऱ्या वर्षी ६०, चौथ्या वर्षी ८० व पांचव्या वर्षी १०० टक्के अशा प्रमाणांतच, परवाने कंपन्यांना देण्यांत यावे अशी सौम्य मागणी बॅ. हाजी यांनीं केली आहे यांत वावगें तें काय झालें? देशी कंपनीवाले म्हणत आहेत कीं, "आजतागायत परदेशी व्यापारी वाहतूक व किनाऱ्यावरील वाहतूक आपल्या हातांत ठेवून प्रतिवर्षी ५० कोटि व १० कोटि मिळून ६० कोटि रुपये हिंदी जनतेकडून तुम्ही उकळले; आतां फक्त किनाऱ्यावरील वाहतूक आम्हाला राखून ठेवा, तेथे मात्र विनाकारण दावा सांगून आणि दरांतील चढाओढ व डिफर्ड रिबेटची पद्धति सुरू करून आमचा व्यापार बुडवू नका " देशी जहाजाचे व्यापारी असे सांगू लागले तर त्यांत गैर तें काय?

याशिवाय युरोपियन व्यापारी असे आक्षेप घेतात कीं, " देशी कंपन्यांचा कारभार ढिलाईचा होईल, हिंदी कंपन्या निघू लागल्या तरी भांडवल उभारलें जाणार नाहीं, व दर्यावरील जीवनक्रमाचा तुम्हा हिंदी लोकांना कांहींच कल्पना नाहीं. यामुळे वाहतुकीचे दर भयंकर वाढतील व बिचाऱ्या गरीब हिंदी लोकांना उपजीविकेचे जिन्नस महाग मिळं लागतील." तथापि हा युक्तिवाद पटण्यासारखा नाहीं. कारण सर चार्लस यांच्या अंदाजाप्रमाणे किनाऱ्यालगतच्या व्यापाराला ७५०० टनांची सुमारे ६५ जहाजें

लागतील. हीं ६५ जहाजें खरेदी करण्याला फार तर ८ कोटि रुपये खर्च येईल व बाकीचा एकंदर खर्च सुमारें २ कोटि धरला तर १० कोटि रुपये भांडवल उभारणें मुळींच कठीण नाहीं. सरकारनें रेल्वेकरितां अद्यापर्यंत सुमार ८०० कोटि रुपयांचें भांडवल खर्च केलें. असें असतां कांहीं कालापर्यंत उद्योग-धंद्यांना मदत या दृष्टीनें आपल्या जबाबदारीवर कर्ज काढून १० कोटि रुपये देशी कंपन्यांना देणें मुळींच अशक्य नाहीं. शिवाय गेल्या ऑगस्टमध्यें सरकारला ३३ कोटींचें नवें कर्ज लागलें व लोकांनीं अवघ्या १८ दिवसांत तें उभें करून दिलें. यावरून या देशी जहाजांच्या उद्योग--धंद्याला किनाऱ्यावरील वाहतुकीचें दार खुलें केलें तर १० कोटि रुपयांचें कर्ज अवघ्या ८ दिवसांत उभारतां येईल अशी आम्हास खात्री वाटते. बरें, एकदम १० कोटि रु. कर्ज देशी कंपन्यांना द्या असाहि आग्रह कोणी धरीत नाहीं. कारण बॅ. हाजी यांचे बिलानें ठरविलेला कार्यक्रम ५ वर्षांचा आहे. खासगी भांडवल न मिळालें तरच सरकारी मदत द्या असें कोणीहि म्हणेल. आणि सरकारनें मदत म्हणून कांहीं कर्ज दिलें तर अशा कंपन्यांवर कायद्यानें नियंत्रणहि घालतां येईल.

## पूर्वेतिहास

१८४० चे पूर्वी हिंदुस्थानांत जहाजें उत्तम प्रकारचीं बांधीत असत व त्याबद्दल नौरोजी जमशेटजी या पारशी शिल्पकाराला त्याच्या कौशल्याबद्दल फ्रान्सच्या राजाकडून सुवर्णपदक मिळाल्याचा दाखला फ्रेंच प्रवासी एफ. बोल्टझार सोलोयन्स याचे डायरींत सांपडतो. १८०१ मध्यें वाफेचीं जहाजें हिंदुस्थानांत होत नसत तरी देखील हिंदुस्थानात बांधलेलीं मोठमोठीं जहाजें इंग्लंडच्या किनाऱ्यावर गेलीं असतांना इंग्लंडानें त्याला अटकाव केल्याचा दाखला खुद्द ईस्ट इं. कंपनीचे दप्तरांत आढळतो. फार कशाला, हल्लीं देखील ब्रिटिश कंपन्यांशीं शक्य तितकी टक्कर देऊन सिंद्या स्टीम नॅव्हिगेशन, बंगाल स्टीम नॅव्हिगेशन यासारख्या कंपन्या जीव धरून आहेतच कीं नाहीं ? या कंपन्यांचें भांडवलहि सुमारें ४॥ कोटींचें आहे. या कंपन्यांचीं कांहीं जहाजें परदेशांशींहि व्यापार करणारीं आहेत. यावरून एवढा मोठ्या किनाऱ्यावरील वाहतुकीचा व्यापार करणें हिंदी जहाजाना झेपणार नाहीं हे म्हणणें चुकीचें आहे.

वाहतुकीचे दर भरमसाट वाढतील व त्याचा बोजा निष्कारण हिंदी जनतेवर पडेल असें तज्ज्ञांचे मत पडलें तर कायद्याचें बंधन घालता येण्यासारखें आहे व परवाना देण्याचा अधिकार गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल यांचेकडे देण्यांत आला असल्याकारणानें, परवान्याचे नियमांत योग्य ते फेरफार करण्याची मुखत्यारी त्यांचेकडे राहतेच. याकरितां या आक्षेपांतहि विशेष अर्थ नाहीं.

## इतर देशांचें उदाहरण

हिंदी व्यापाऱ्यांच्या वार्षिक पारषदेला जमलेल्या प्रतिनिधींना उद्देशून भाषण करतांना व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन म्हणाले कीं, "जगांतील कोणत्याहि राष्ट्रानें किनाऱ्यावरील वाहतूक अशी राखून ठेवली नाहीं." या बाबतींत 'एनसायक्लोपीडिआ ब्रिटानिका' या ग्रंथांत वाहतुकीचे कायदे या विषयाखालीं, विद्वान ग्रंथकारानें असें म्हटलें आहे कीं, हे कायदे दोन प्रकारचे असतात. देशांतील व्यापारी सत्ता त्या देशांतील लोकांचेच हातीं राहील हा एक प्रकार. ग्रेट ब्रिटननें अशा प्रकारचे कायदे १३८१ व १३९० मध्ये केले. तो कायदा असा कीं, ग्रेट ब्रिटनमधून बाहेर जाणारा माल ब्रिटिश जहाजांव्यतिरिक्त इतर जहाजांतून जातां कामा नये. वाहतुकीचा महत्त्वाचा कायदा १६६० सालीं झाला आणि १८५४ पर्यंत इंग्लंडाच्या किनाऱ्यालगतची वाहतूक फक्त ब्रिटिश जहाजांचेच ताब्यांत होती. इतकेंच नव्हे तर जहाजावरील मुख्य तांडेल ब्रिटिश असला पाहिजे व इतर खलाशी व कामगार कांहीं प्रमाणांत ब्रिटिश लोक असले पाहिजेत असा नियम होता. याशिवाय हिंदुस्थानसरकारचे माजी व्यापारमंत्री सर चार्लस इन्नस यानीं १९२६ सालीं सर शिवस्वामी अय्यर यांचे ठरावावर भाषण करतांना फ्रान्स, चिली, आल्जेरिया वगैरे राष्ट्रांनीं किनाऱ्यावरील वाहतूक राखून ठेवल्याची कबुली दिली आहे. ऑस्ट्रेलियाने फक्त ऑस्ट्रेलियन कामगारांना मजुरी कशी जास्त मिळेल या दृष्टीनेंच नॅव्हिगेशन ॲक्टांत दुरुस्ती केली व असें करूनच आपला वाहतुकीचा धंदा वाढविला. हिंदुस्थानसरकारनें नेमलल्या व्यापारी आरमारी कमिटीनें असें स्पष्टपणें नमूद केलें आहे कीं, "ऑस्ट्रेलियानें १८९४ च्या मर्चंट शिपिंग ॲक्टाचा फायदा घेऊन, किनाऱ्यावरील वाहतुकीची सत्ता आस्ट्रेलियन कंपनीच्या हातींच राखून ठेवली. परवाना देण्याचे बाबतींतील अटी ब्रिटिश शिप कंपन्यानाहि लागू आहेत. तथापि त्या अटीच अशा आहेत का, किनाऱ्यालगतची सगळी वाहतूक ऑस्ट्रेलियन कंपन्यांचे हातींच असावी." हा रिपोर्ट पुनः एकदा निर्विकार मनानें वाचण्याची शिफारस आम्ही सरकारी अधिकाऱ्यांना करतों.

ज्या देशाचीं जहाजें परदेशालाहि जात असत त्या हिंदुस्थानाचा जहाजांचा धंदा इंग्रज सरकारच्या अमदानींत इतका बुडाला कीं, किनाऱ्यावरील व्यापारांत ८७ टक्के व परदेशी व्यापारांत ९८ टक्के परदेशी कंपन्यांच्या हात चालू लागला. इंग्रज लोकांचे राज्य गेलीं १०० वर्षें चालू असताना, हिंदुस्थानाला परकी लोकांवर व्यापारी आरामाराच बाबतींतहि अवलंबून राहावें लागावें हे इंग्रज सरकारला भूषण नसून दूषण आहे यांत शंका नाहीं. आणि अशी परिस्थिति चालू असल्यामुळें हिंदी लोकांनीं स्वातंत्र्याचें ध्येय पुढे ठेवून, साम्राज्यांतून फुटून निघू पाहावें यांत आश्चर्य काय ! बॅ. हाजी यांच्या बिलाला खरा विरोध होत आहे तो या हेतूनें कीं, किनाऱ्यावरील वाहतूक हिंदी लोकांचे हातीं गेल्यास जहाजांचा व्यापार करणाऱ्या हिंदी कंपन्या निघतील, वाफेचीं जहाजें बांधण्याचे कारखाने येथें निघतील व परदेशी व्यापार देखील हे हिंदी व्यापारी आपल्या बरोबरीने करूं लागतील! या भीतीनें प्रेरित होऊन मुळावर जन्मास येऊं पाहणाऱ्या या बालकाचे गर्भावस्थेंतच प्राण हरण करावे असा घाट ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं घातला आहे व या ब्रिटिश व्यापाऱ्यांचे पाठीशीं लॉर्ड इंचकेपसारखे वीर बॅ. हाजी यांच्या बिलाचा बळी घेण्याचा विडा उचलून सज्ज झाले आहेत! याकरितां वेळींच सावध होऊन या बिलाचा पुरस्कार करण्याची जबाबदारी हिंदी जनतेनें पार पाडली पाहिजे.

## पाटीलबुवांच्या पुतळ्याचें अनावरण

ग्वाल्हेर दरबारानें जाहीर केल्याप्रमाणें कै. महादजी शिंदे पाटील, ग्वाल्हेर संस्थानाचे आद्य संस्थापक' यांच्या पुतळ्याचा अनावरण-समारंभ ने. ना व्हाइसरॉयसाहेब यांचे हस्ते ता. ६-३-२९ रोजीं सकाळीं आठ वाजतां ग्वाल्हेर येथील साऊथ पार्कमध्यें मोठ्या थाटानें व ग्वाल्हेरच्या ऐश्वर्यास शोभेल अशा रीतीनें साजरा करण्यांत आला. सदरहू समारंभाकरितां लॉर्ड व लेडी आयर्विन यांच्या स्वाऱ्या दिल्लीहून ता. ४ मार्च रोजीं सकाळीं आठ वाजतां पोलिटिकल सेक्रेटरी, मिलिटरी सेक्रेटरी व इतर कांहीं बडी मंडळी यांसह स्पेशल ट्रेननें स्टेशनावर दाखल झाल्या. लाटसाहेबांचे स्वागताकरितां खुद्द महाराज दरबाराचे सर्व कौन्सिलर्स व इतर बरेच सरदार, जहागीरदार वगैरे बडा बडी मंडळी हजर होती. सर्व मंडळींची उतरण्याची सोय खुद्द सरकारी राजवाड्यात केली होती. ते दिवशीं दुपारीं व्हायसरॉयसाहेब हे शिकारीकरितां गेले होते. चार वाघांची शिकार करण्यांत आली. दुसरे दिवशीं म्हणजे ता. ५ रोजींहि पुनः एका वाघाची शिकार करण्यांत आली. ता. ६ रोजी सकाळीं बरोबर आठ वाजतां श्रीमंत महाराजांसुद्धां सर्व बडी पाहुणेमंडळी मुद्दाम तयार केलेल्या शामियान्यांत आल्यावर येथील म्यु. नें लाटसाहेबांस मानपत्र देण्याचा समारंभ म्यु.चे नॉमिनेटेड प्रेसिडेंटसाहेब यांनीं मानपत्र वाचन दाखविल्यानंतर व्हाइसरॉयसाहेब यांनीं पुतळा उघडावा अशी प्रेसिडेंटसाहेबांनीं त्यांस विनति केली व व्हाइसरॉयसाहेब यांचे हस्तें पुतळा उघडण्यांत आला. त्या वेळीं किल्ल्यावरून तोफांची सरबत्ती सारखी सुरू होती. उत्तरादाखल केलेल्या भाषणात व्हाइसरॉयसाहेब यांनीं पाटीलबुवांच्या अंगीं असलेल्या युद्धकलेचें व मुत्सद्देगिरीचें वर्णन केले व ते पेशव्यांशीं व कंपनीसरकाराशीं नेकीनें व इमान राखून वागल्याचेंहि त्यांनीं सांगितलें. माजी महाराज कै. माधवराव महाराज यांचे निधनामुळें त्यांचे भेटीचा योग आपणास न आल्याबद्दल खेद प्रदर्शित करून गेल्या महायुद्धांत त्यांनीं ब्रिटिश सरकारला केलेल्या मदतीचाहि उल्लेख केला. बाळ महाराज यांचेवर सर्व कारभाराची मोठीच जबाबदारी आज येऊन पडत आहे व ती ते आपले पूर्वजांचे लौकिकास व इभ्रतीस साजे अशा रीतीनें पार पाडतील व पूर्वजांचे अंगीं असलेल्या गुणांचें अनुकरण करतील अशी आशा प्रदर्शित करून आपलें भाषण संपविलें.

दुसरे दिवशीं म्हणजे ता ७ रोजीं सकाळीं साडेसात वाजतां येथून चार मैलांवर असलेल्या मोतीझील नांवाचे ठिकाणीं नवीन पॉवर हाऊस बांधण्यांत येणार आहे त्याची कोनशिला व्हाइसरॉय यांचे हस्तें

# रेल्वेचें अंदाजपत्रक

हिंदुस्थानसरकारच्या अंदाजपत्रकांतून अलीकडे रेल्वेचें अंदाजपत्रक वेगळें काढलेलें असतें. हें रेल्वेचें अंदाजपत्रक असेंब्लीपुढें ता. १९ फेब्रुवारी रोजीं मांडण्यांत आलें. त्यांतून पुढील महत्त्वाचे आंकडे दिले आहेत.

## जमेचा तपशील

( आंकडे लक्ष रुपयांचे )

| जमेची बाब | १९२८-२९ | १९२९-३० |
|---|---|---|
| उतारूंचें भाडें | | |
| १ वरिष्ठ वर्ग | ४५० | ४६२ |
| २ कनिष्ठ वर्ग | ३११६ | ३१४७ |
| ३ लगेज इ. | ६०० | ५९३ |
| मालाचें भाडें | ६७३१ | ६७६२ |
| इतर किरकोळ जमा | २६० | २६३ |
| कंपन्यांच्या नफ्यांतील वांटा | ४१ | ६० |
| रिझर्व्ह फंड व डिप्रीसिएशन फंड यावरील व्याज | ११९ | १४० |
| एकूण जमा | ११३१७ | ११४२७ |
| आरंभींची शिल्लक | १५८५ | १९३० |

## खर्चाचा तपशील

| खर्चाची बाब | १९२८–२९ | १९२९–३० |
|---|---|---|
| रेल्वे बोर्ड व इतर देखरेख | १३७५ | १३७५ |
| लाईनदुरुस्ती व सफाई | १७५० | १७१० |
| रेल्वे चालविण्याचा प्रत्यक्ष खर्च | २५५० | २५६३ |
| भांडवलावरील व्याज | २९४९ | ३०४५ |
| घसरा खातें खर्च | ११६० | १२१९ |
| वर्कड लाइन्सवरील नफा कंपन्यांना देणें | ५३६ | ४५२ |
| लष्करी लाइनीवर येणारी तूट | ३९ | ३८ |
| रीफंड | १५ | १५ |
| संकीर्ण खर्च | ५२ | ६० |
| एकूण खर्च | १०४२६ | १०४७७ |
| बाकी शिल्लक रोख | ८९१ | ९५० |

| | १९२८-२९ | १९२९-३० |
|---|---|---|
| शिलकेपैकीं मध्यवर्ती सरकारास | ५४६ | ६२५ |
| रिझर्व्ह फंडांत | ३४५ | ३२५ |
| एकूण | ८९१ | ९५० |
| अखेरची शिल्लक | १९३० | २२५५ |

## भांडवली खर्च

| खर्चाचा तपशील | १९२८–२९ | १९२९–३० |
|---|---|---|
| डबेखरेदी | ३४८ | ५८२ |
| चालू कामे | १३१२ | १२८२ |
| नवीं कामें | ८८६ | ८६२ |
| लष्करी लाइनीवर खर्च | ७७ | ४८ |
| ब्रँच लाईन शेअर्सखरेदी | ३१ | ७०२ |
| कर्जफेड | ४८३ | २६५ |
| एकूण भांडवली खर्च | ३१३७ | ३७४१ |
| सालअखेर खर्च न होतां राहणारी अंदाजी शिल्लक बाकी खर्च | ५४ | १२४ |
| | ३०८३ | ३६१७ |

## शिलकेची वहिवाट

| तपशील | १९२८–२९ | १९२९–३० |
|---|---|---|
| मध्यवर्ती सरकारास | ५४५.७६ | ६२४७२ |
| रिझर्व्ह फंड | ३४५.१४ | ३२५७३ |
| | ८९०.९० | ९५०.४५ |

# कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची पुण्यतिथि



कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर

यांचें तैलचित्र रविवार ता. १० मार्च रोजीं पुणें येथील नगर वाचनमंदिरांत मुंबईचे डॉ. गो. वि देशमुख यांच्या हस्तें उघडण्यांत आलें. त्याचें हें छायाचित्र आहे. मूळ तैलचित्र श्री. श्री. कोरेगावकर पुणे यांनी तयार केलें.



कै. लोकमान्य टिळक.

यांचा पुतळा अहमदाबाद येथें म. गांधी यांच्या हस्तें गुरुवार ता. २८ फेब्रुवारी रोजीं उघडण्यात आला. मूळ पुतळा बडोद्याचे श्री. एम्. के. कोल्हटकर यांनी तयार केला. त्याचे हे छायाचित्र आहे.

गेल्याच्या मागील आठवड्यांत कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या पुण्यस्मरणार्थ पुणे येथें दोन समारंभ घडून आले. एक समारंभ त्यांच्या पुण्यतिथीस शुक्रवार ता. ८ रोजीं सायंकाळीं ६॥ वाजतां श्रीशिवाजीमंदिरांत होऊन **श्री. दा. वि. गोखले** यांच्या अध्यक्षतेखालीं **श्री. वासुदेव कृष्ण भावे** यांचे व्याख्यान झालें व रविवार ता. १० रोजीं सायंकाळीं पुणे नगर वाचनमंदिराचा ८१ वा वाढदिवस मुंबई कॉर्पोरेशनचे अध्यक्ष डॉ. गोपाळराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत येऊन त्यांच्याच हस्तें कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या तैलचित्राचें अनावरण झालें. हें तैलचित्र श्री. कोरेगांवकर यांनीं बनविलें असून तें किती चांगलें साधलें आहे याची कल्पना त्याच्या वरील प्रतिकृतीवरून कोणासहि करतां येण्यासारखी आहे. सदर अनावरणसमारंभाचे वेळीं डॉ. देशमुख यांनीं केलेल्या भाषणाचा गोषवारा गेल्या अंकीं केसरीच्या वाचकांकरितां दिलाच आहे. परंतु पुण्यतिथीच्या दिवशीं श्री. भावे यांनीं जें भाषण केलें तें स्थलसंकोचास्तव गेल्या अंकीं प्रसिद्ध व्हावयाचें राहिल्यामुळें या खेपेस देत आहों.

प्रारंभीं श्री. नारायणराव परांजपे यांनीं प्रास्ताविक भाषणांत शास्त्रीबुवांच्या पुण्यतिथीचें महत्त्व समजून सांगितल्यावर अध्यक्षस्थानीं श्री. दा. वि. गोखले यांची निवड करण्यांत आली. त्यानंतर श्री. भावे म्हणाले—कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे नांव मी लहानपणीं ऐकलें व त्यांची सुप्रसिद्ध निबंधमालाहि त्याच वेळीं वाचली. परंतु त्यावरून त्यांच्या नावामागें शास्त्री हें उपपद कां लावण्यांत आलें याचा उलगडा मला होईना. शास्त्रीबुवांचा लांब अंगरखा, मोठें पागोटें इत्यादि बाह्य चिन्हांवरून त्यांस हें नांव मिळालें म्हणावें तर त्या काळांत शास्त्र्यांचाच काय पण गृहस्थांचाहि पोषाक याच मासल्याचा असे. तथापि त्यास मिळालेलें हें टोपण नाव ते कृष्णशास्त्री यांचे चिरंजीव म्हणून मिळालेलें असो किंवा अन्य कारणानें असो, त्याचें विषय-

प्रतिपादन शास्त्रीय पद्धतीचे, संस्कृत अवतरणांनी अलंकृत व संस्कृतशब्दप्रचुर असल्यामुळें त्यांचे शास्त्री हें नांव सार्थ झालें असेंच कोणीहि मानील. स्वराज्य जाऊन परकी इंग्रजी अंमल महाराष्ट्रावर बसल्यामुळें महाराष्ट्र भाग्यहीन झाला असला तरी कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे एका अर्थी भाग्यशालीच होते. त्यांच्या काळीं अस्तगत झालेल्या स्वराज्याची ऊब निवाली नव्हती. त्यांचे आजे हरिपंत हे एक वेळ किल्लेदार व नंतर चिमाजी आप्पापाशीं शागीर्द असल्यामुळें त्यांच्या तोंडून पेशवाईंतील पुरुषांविषयीं अनेक गोष्टी शास्त्रीबुवांस बालपणींच ऐकावयास मिळाल्या होत्या. ती पेशवाई शास्त्रीबुवांच्या कल्पनाचक्षूस दिसत होती. १८५७ सालाचें बंड त्यांच्या डोळ्यादेखतच मोडलें असून त्यांतील नानासाहेब, तात्या टोपी, राणी लक्ष्मीबाई यांच्या शौर्याचीं व धाडसाचीं वर्णनें शास्त्रीबुवांच्या सभोंवतीं गाइलीं जात होतीं.

एकीकडे स्वदेशाविषयीं अभिमान वाटण्याजोग्या कथांत शास्त्रीबुवांचे मन अशा रीतीनें तरंगत होतें तर दुसरीकडे इंग्रजी राज्यानें दिपलेलीं व व मिशनऱ्यांच्या उपदेशानें फसलेलीं माणसें हिंदुधर्म, हिंदु समाज व हिंदु संस्कृति यांविषयीं तिरस्कार दर्शवीत होतीं. कै. गोपाळ हरि देशमुख हे त्या काळांत पुण्यांतील पुढाऱ्यांत मोडत असत. त्यांनीं केलेल्या निंदेची मजल येथपर्यंत गेलेली होती कीं 'आतां जर नाना फडणवास असता तर त्याला लोक वेडा म्हणूं लागते आणि तो पळूनहि जाता यांत शंका नाहीं,' असे उद्गार काढण्यास त्यांच्या मनास किंतु वाटला नाहीं. रा. ब. गोपाळराव देशमुख हे अविचारी गृहस्थ होते असें नाहीं. तथापि त्यांच्यासारख्याच्या तोंडून नाना फडणविसासंबंधानें अशा प्रकारचे उद्गार निघावे यावरून समाजधुरीणांची सारासार विचारशक्ति लोपून आत्मनिंदेचाच किती त्यांना अभिमान वाटत होता याविषयीं कल्पना होते. कै. विष्णुशास्त्री यांच्यासमोर या दोनहि बाजू आल्या होत्या व त्यांतील सत्याचा ठाव काढण्यास लागणारी कुशाग्रबुद्धि, विद्वत्ता, व सहृदयता त्यांच्या अंगीं परिपूर्ण होती. त्यांच्या पूर्वीचा माणसें एकेरी असत. शास्त्री मंडळी संस्कृत विद्येत निपुण होती पण त्यांना इंग्रजी विद्येचा गंध नव्हता. जीं कांहीं माणसें इंग्रजी शिकलेलीं होतीं त्यांचें पाश्चात्य संस्कृतीचें ज्ञान अर्धवट असून संस्कृत विद्येचें ज्ञान त्यांस अगदींच नव्हतें म्हटलें तरी चालेल. उलटपक्षीं विष्णुशास्त्री हे पाश्चात्य व पौर्वात्य या दोनहि विद्येंत निपुण असल्यामुळें त्यांना इंग्रज लोकांविषयीं व हिंदी लोकांविषयीं यथार्थ कल्पना होती. जुन्या बाळबोध घराण्यांत वाढल्यामुळें जुने संस्कारहि मनावर दृढ होऊन त्यांची उपयुक्तता व योग्यता त्यांस पटली होती.

थोर माणसें जगांत करावयाच्या गोष्टी ठरवून जन्मास आलेलीं असतात असेंच शास्त्रीबुवांच्या चरित्रावरून दिसून येतें. त्यांना द्रव्याची, कीर्तीची किंवा दरबारी मानमरातबाची हाव बिलकुल नव्हती. ते इंग्रजी विद्या शिकले, पण परीक्षेकरितां किंवा नोकरीकरितां शिकले नाहींत; देशाचें कोडें सोडविण्याकरितां शिकले. म्हणून वडील कृष्णशास्त्री यांच्या आग्रहावरून त्यांनीं शाळाखात्यांत शिक्षकाची नोकरी पत्करली असली तरी त्या नोकरींत त्यांचें लक्ष नव्हतें व ती नोकरी टिकावी याबद्दल त्यांनीं कधीं पर्वा केली नव्हती. नोकरींत असतां निबंधमालेंत त्यांनीं लिहिलेल्या लेखाविरुद्ध गलिफास हें टोपण नांव धारण करून त्या वेळच्या इंग्रजी वर्तमानपत्रांत कोणी एकानें पत्र छापलें व शास्त्रीबुवांवर मोठेंच काहूर उसळलें तरी ते डगमगले नाहींत किंवा त्यांनीं निबंधमालेचें धोरण बदललें नाहीं याचें इंगित वरीलच होय.

विष्णुशास्त्री यांची भाषासरणी झणझणीत, प्रसंगोचित व प्रतिभासंपन्न असून त्यांच्या लेखणींत विविध रस मूर्तिमंत उभे करण्याचें सामर्थ्य असल्यामुळें त्यांनीं निबंधमालेच्या सात वर्षांच्या अल्प काळांत महाराष्ट्र देशास मोहनिद्रेंतून खडबडून जागें केलें. म्हणूनच त्यांची निबंधमाला पन्नास वर्षांच्या काळानंतरहि आपणास आज टवटवीत व सुवासिक दिसत आहे. त्यांच्यामागून महाराष्ट्रांत उत्कृष्ट लेखक पुष्कळ निर्माण झाले. तथापि त्यांपैकीं फारच थोड्यांस शास्त्रीबुवांची बरोबरी करवेल. नोकरीच्या व निबंधमालेच्या सात वर्षांत शास्त्रीबुवांस परिस्थितीचें व पुढील वाटा पाडण्याचें चिंतन करावयास फुरसत मिळाली. आणि वडील कृष्णशास्त्री यांचे निधन होतांच ते नोकरी सोडून पुण्यास आपण महाराष्ट्रापुढें मांडलेल्या विचाराचें स्वतः आचरण करण्याकरितां येऊन बसले. पुण्यांत व पुण्याबाहेर महाराष्ट्रांत ज्या अनेक संस्था आहेत त्यांपैकीं बहुतेक शास्त्रीबुवांनीं घालून दिलेलें वळणच घटवीत आहेत.

विष्णुशास्त्री यांच्या निबंधांतील प्रत्येक निबंध हें एक अमोलिक रत्नच आहे. पण त्या सर्वांत 'आमच्या देशाची स्थिति' हा त्यांनीं निबंधमाला संपवितांना लिहिलेला लेख केवळ कोहिनूर हिराच होय. तो १९१० सालीं मुंबईसरकारनें जप्त करून महाराष्ट्र वाङ्मयाची फार मोठी हानि केली आहे. तो लेख सत्राजिताच्या स्यमंतक मण्याप्रमाणें महाराष्ट्राचा महाराष्ट्रास मिळणें अत्यंत जरूर असून त्या बाबतींत प्रयत्न करण्यास

सांप्रतचा काल बराच अनुकूल आहे. हा लेख वाचला असतां राजकारणासंबंधानें शास्त्रीबुवांचें बिनचूक निदान प्रत्ययास येतें. तो लेख सुमारें ५० वर्षांपूर्वी लिहिला गेला. पण त्यांत शास्त्रीबुवांनीं इंग्रजी राज्यासंबंधानें जे विचार प्रदर्शित केले आहेत त्याहून कडक विचार अगर भाषा कालच्या कलकत्त्यांतील कॉंग्रेसलाहि सुचली नाहीं. त्यांच्या विचारांचा आशय पुढीलप्रमाणें आहे. ‘ इंग्रजांनीं आमच्या स्वातंत्र्याचा नाश केला असल्यामुळें आम्ही जगांत असून नसल्यासारखे झालो आहोत. आमचे कारागीर नष्ट होत आहेत. आम्ही इंग्रजी विद्येनें काडीचाहि वकूब नाहीं असे नादान होऊन जातों कीं काय कोण जाणे ? इंग्रजांच्या दृष्टीने आम्ही सर्व बैल आहोंत. इंग्रज नसते तर आम्ही निर्बल झालों नसतों. एक पारतंत्र्य म्हटलें कीं तें हरएक ठिकाणीं नडतें. आम्ही स्वदेशी कापडास उत्तेजन देऊन तें घेऊं म्हटलें कीं मँचेस्टरच्या गिरणीवाल्यांच्या डोळ्यापुढें काजवे चमकूं लागतात. व ते हिंदुस्थानसरकारावर दाब आणून स्वदेशी कापड महाग करवितात इंग्रजी शिक्षण एका अर्थानें वाघिणीचें दूध खरें पण तें तऱ्हेवाईक पद्धतीनें देण्यांत येत असल्यामुळें आमच्या अंगीं लागत नाहीं. हिंदुस्थानाचें राज्य एकाच्या हातां असें मुळींच नाहीं. आंग्लभौमराष्ट्ररूप महोदधीवर जी लाट उसळेल ती आमची राज्यव्यवस्था. इंग्रज मुत्सद्दी उदार मतें बोलून दाखवितात,पण त्यांच्या त्या नाटकी भाषेवर कोणाचाहि विश्वास बसत नाहीं. पूर्वीची पेंढारशाही पुरवली पण हा इंग्रजी चरक फार भयंकर. निघेल तितका पैसा काढणे हें इंग्रजांचें धोरण आहे. पण आम्ही इतके पंगू झालों असलों तरी प्रजा संतुष्ट आहे तोंपर्यंतच राज्य सुरळीत चालतें हें राज्यकर्त्यांनीं लक्षांत ठेवावें. आम्हाला चूल पेटवावयाच्या काडीकरितांहि परकीयांच्या तोंडाकडे पाहावें लागतें. इंग्रजी राज्यांतल्या सोयी बाह्यतः रमणीय आहेत. आमचें ज्ञान म्हणजे इंग्रजांचे उष्टे विचार. आमची सुधारणा म्हणजे त्यांचें बालिश अनुकरण ! ’

शास्त्रीबुवांच्या वरील उद्गारांत स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण यांचीं बीजें सहज सापडतात. आतां फक्त स्वराज्याविषयीं त्यांचें मत सांगावयाचें राहिलें. ते स्वातंत्र्यवादीच होते. आमच्या राज्यकर्त्यांशीं लढाईस उभे राहून त्यांचा पराजय करणें हाच रामबाण उपाय. पण तो अशक्य असल्यास राज्यकर्त्यांशी बिघडून आपणास उपयोग नाहीं असें शास्त्रीबुवांनीं स्पष्ट सांगितलें आहे. मिळालें तर पूर्ण स्वातंत्र्य; नाहींपेक्षां वसाहतीचें स्वराज्य हाच शास्त्रीबुवांच्या विचारसरणीचा निष्कर्ष आहे. आपले पुढारी जनतेचे दोष दाखवून तिची हिंमत खचवीत आहेत ही गोष्ट विष्णुशास्त्री यांस बिलकुल पसंत नव्हती. दोष सर्व राष्ट्रांत असतात. तसें आमच्यांतहि असतील. पण इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानावर येण्यास आमचे दोष कारण नाहींत. आमचें दैव फिरल्यामुळें इंग्रजांना आम्हास जिंकतां आलें. नेपोलियन इंग्रजांपेक्षां कमी पराक्रमी नव्हता, तरी त्यास इंग्रजांनीं जिंकलेंच कीं नाहीं ! परकीय अंमल हे आमच्या दैन्याचें कारण असून त्यांतून हिंदुस्थान सुटला कीं त्याची प्रकृति निकोप आहे असा शास्त्रीबुवांचा सिद्धान्त होता. याच दृष्टीनें सामाजिक चळवळीपेक्षां राजकीय चळवळीवर शास्त्रीबुवांनीं आपली भिस्त ठेवली. जर्मनीचा पराभव, बौद्ध राष्ट्रांचें दौर्बल्य व महंमदी राष्ट्रांची परवशता यांचें बारकाईनें निरीक्षण केल्यास शास्त्रीबुवांचा वरील सिद्धान्त खरा वाटतो. अशा स्थितींत समाजास सज्ञान करणे व लोकमताचा लगाम सरकारास घालणें हाच उपाय शिल्लक राहातो. व त्याच हेतूनें शास्त्रीबुवांनीं मुलांकरितां शाळा व थोरांकरितां वर्तमानपत्रें काढलीं. किताबखाना व चित्रशाळा या संस्था लोकांस उपजीविकेचीं स्वतंत्र साधनें निर्माण करण्याकरितां व कलाकौशल्याच्या अभिवृद्धीकरितां होत. न्यू इं. स्कूलमध्यें राष्ट्रीय शिक्षणाचा वेगळा शिक्षणक्रम त्यांनीं सुरू केला नव्हता. परंतु खुद्द कै. विष्णुशास्त्री, लो. टिळक, गोपाळराव आगरकर यांसारख्या तेजस्वी पुरुषांच्या शाळेतील संचारानें व सहवासानें ‘संचारपूतानि दिगंतराणि’ या न्यायानें जे शिक्षण मिळत होतें तें सोळा आणे राष्ट्रीय होतें हें सांगावयास नकोच. केसरी व मराठा या पत्रांमार्फत प्रौढांस जागें करून व न्यू इं. स्कूलमध्यें बंदुकीच्या गोळयाप्रमाणें प्रभावशाली तरुणांची पिढी निर्माण करून बेगुमान इंग्रज अधिकारी जेथें पाऊल ठेवतील तेथें त्यांच्या पावलास चटका बसविण्याचा उद्योग शास्त्रीबुवांनीं चालविला. शास्त्रीबुवांचें धोरण हेंच महाराष्ट्राचें खरें राजकीय धोरण असून तेंच शास्त्रीबुवांचे शिष्य लो. टिळक यांनीं उचललें आणि त्याच धोरणाप्रमाणें वागण्यांत राष्ट्राचें खरें हित आहे.

# दिल्लीचें बातमीपत्र

नवी दिल्ली, ता. १५।३।१९२९.

[ ७ ]

गेल्या आठवड्यांत शुक्रवार ते रविवार हे तीन दिवस सुटीचे गेले व सोमवारीं युरोपियन पक्षातर्फे सर व्हिक्टर ससून यांनी सरकारच्या कर्जउभारणीच्या धोरणाची चर्चा करण्याचा ठराव कांटाच्या रूपानें मांडला. ससून यांच्या टीकेचा रोख असा कीं, सरकारनें हिंदुस्थानांत कर्ज उभारण्यापूर्वी विलायतेंत अगर इतर देशांत कर्ज उभारावें. त्या पैशाचा विनियोग खासगी रेलवे कंपन्या विकत घेण्याकडे न करतां रेलवे वाढविण्याकडे करावा, व हिंदुस्थानांत कर्जरूपानें उभारलेलें भांडवल देशी कारखान्यांच्या व उद्योगधंद्यांच्या वाढीला लावावें. देशी उद्योगधंद्याची वाढ हिंदुस्थानात कर्ज उभारून करावी या मुद्द्यावर असेंब्लींत दुमत असण्याचें कारणच नाहीं. तथापि सर व्हिक्टर ससून यांच्या मनातील हेतु असा कीं, बंगाल—नागपूर रेलवेसारखी खासगी रेलवे १९३२ सालीं विकत घेण्याकरितां सरकारला भलें मोठें कर्ज काढावें लागेल. व तें सगळेंच्या सगळें कर्ज सरकारनें विलायतेंत उभारण्याचें ठरविलें तरी तें उभारलें जाणार नाहीं. म्हणून सरकारनें बंगाल—नागपूर रेलवे विकत घेण्याचे भानगडींत पडूं नये ! व विलायतेंत कर्ज उभारून शेतकरी वर्गाच्या हिताच्या दृष्टीनें नवीन रेलवे वाढविण्याकडे त्या पैशाचा विनियोग सरकारनें करावा ! सर पुरुषोत्तमदास ठाकरदास, रंगास्वामी अय्यंगार, बेळवी, बी. दास वगैरे सभासदांनीं या सूचनेस विरोध केला. सर पुरुषोत्तमदास यांचें म्हणणें असें कीं, किफायतशीर कर्ज केव्हां व कोठें उभारावें हें फडणविसांनीं ठरवावें. परंतु बंगाल-नागपूर रेलवे कंपनी सरकारनें आपल्या हातीं घेणें जरूरीचें आहे. व ती सरकारनें आपल्या हातीं घेतली तरच उतारूंच्या सुखसोयींकडे सरकारचें लक्ष जाण्याचा संभव. आहे.

***

रंगास्वामी अय्यंगार म्हणाले "गेल्या आठ वर्षांत १०८ कोटी रुपये कर्ज हिंदुस्थानांत उभारलें गेलें व यापुढेंहि सरकारला कर्ज लागलें तरी तें मिळण्यास अडचण पडणार नाहीं. हिंदुस्थानांत कर्ज मिळत असतांना परदेशांत तें उभारणें ही केवळ गुन्हेगारी होय,ना. बेळवी यांच्या भाषणाचा माथितार्थ असा कीं, सरकारनें परदेशांतहि कर्ज उभारावें. आमची हरकत नाहीं; पण त्याचा विनियोग देशी उद्योगधंद्याच्या वाढीकडेच करावा. आणि जर परदेशी भांडवलवाल्याचा हात आमच्या देशी कारखान्यांच्या व रेलवे कंपन्यांच्या व्यवस्थेंत कायमचा शिरणार असेल तर अशा स्थितींत रेलवे कंपन्यांची वाढ न झाली तरी चालेल. सर जॉर्ज शुस्टर यांनीं आपल्या गोड स्वभावाप्रमाणें मनांतील हेतु न सोडतां, हिंदुस्थानाचें हित साधणें हाच खरा श्रेयस्कर मार्ग असून शक्य तोंवर शेतकरी वर्गाला नव्या कर्जाचा फायदा कसा मिळेल याकडे सरकार लक्ष देईल असा आग्रह केला तथापि परदेशी भांडवलानें रेलवेची वाढ होऊं नये असें म्हणणें मात्र विघातक आहे. विशेषतः देशांतील बाजार व चलन स्थिर ठेवण्याची जबाबदारी सरकारावर असल्याकारणानें कर्ज कोठें उभारावें हें सरकारला परिस्थित्यनुरूप ठरवावें लागतें असा युक्तिवाद त्यांनीं केला! सर व्हिक्टर ससून यांनीं आपल्या सूचनेवर मत मागण्याचा हट्ट न धरतां ती परत घेतली. पण तिजवर मत घेण्यात आलें असतें तरी त्यांना त्यांच्या पक्षाशिवाय इतर कोणाचा पाठिंबा मिळाला नसता हे उघड दिसत होतें.

***

यानंतर दुसरा निंदाव्यंजक ठराव पं. मोतीलाल नेहरू यांनीं मांडला. तो अशा स्वरूपाचा कीं, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलाच्या सभासदांना खर्चासाठीं फक्त एक रुपयाच देण्यात यावा ! दरवर्षी राष्ट्रीय मागणीचा पुनरुच्चार अशाच प्रकारें एखाद्या निंदाव्यंजक ठरावाच्या रूपानें केला जातो व या मुद्द्यावर साधारणपणें जिना यांचा स्वतंत्र पक्ष, स्वराज्य पक्ष व राष्ट्रीय पक्ष या तिघांची एकजूट असते. परंतु यंदा वारा विरुद्ध दिशेनें वाहतो कीं काय अशी भीति वाटूं लागली होती. राष्ट्रीय मागणीचा १९२४ सालापासूनचा इतिहास सांगतांना जातां जातां सर्व—पक्षीय परिषदेनें तयार केलेल्या नेहरू रिपोर्टाचा उल्लेख पं.नेहरू यांना करावा लागला, परंतु याचा परिणाम मात्र चांगला झाला नाहीं. पं. मोतीलाल नेहरू यांचें भाषण झाल्यानंतर होम मेंबर क्रेरर यांनीं उत्तरादाखल भाषण केलें, व सायमन कमिशनाचा रिपोर्ट बाहेर पडेपर्यंत हिंदुस्थानसरकारास कांहीं करतां येत नाहीं असें सांगितलें. महमंद शहा नवाज यांनीं दिल्लीस भरलेल्या मुसलमान परि-

षदेच्या ठरावाकडे बोट दाखविलें व नेहरू रिपोर्टास विरोध केला. मंगळवारीं प्रश्नोत्तरानंतर पुनः याच विषयाला सुरवात झाली. मौलवी महंमद याकूब यांनीं पं. नेहरू यांच्या सूचनेला विरोध केला. जिना हे केवळ त्यांच्या नेहमींच्या थाटांत " तुमचा हा नेहरू रिपोर्ट आम्हाला मान्य नाहीं " एवढंच बोलून राहिले नाहात तर त्यांनीं पं. नेहरू यांना असा इषारा दिला कीं, "तुमचें आमचें जमावयास पाहिजे असेल तर आमच्या मागण्यांकडे दुर्लक्ष करूं नका." परंतु त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट इतकीच कीं, जिना यांनी १९२४ सालाच्या राष्ट्रीय मागणीकडे सरकार दुर्लक्ष करीत आहे असें स्पष्ट सांगितलें व याकरितांच असेंब्लीनें फक्त एक रुपया एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलकरितां मंजूर करावा असें त्यांनीं आपले मत व्यक्त केले.

***

कर्नल क्रॉफर्ड म्हणाले " तुम्ही डोमीनिअन स्टेटसचें सोंग पुढे करून साम्राज्यांतून फुटून निघून, पूर्ण स्वतंत्र होऊं पाहात आहां म्हणून तुमच्या या सूचनेला आम्ही विरोध करतों. " या वाग्युद्धांत बॅ. मुकुंदराव जयकर यांचे भाषण मुद्देसूद झालें त्यांनीं सैरावैरा उधळत चाललेल्या वादाचा लगाम खेंचून त्याला ताळ्यावर आणलें व असें बजावलें कीं, आजच्या वादविवादाचा मुख्य प्रश्न ' डोमीनियन स्टेटस कीं इंडिपेंडन्स ' अगर ' नेहरू रिपोर्ट कीं दिल्लीचा ठराव ' हा नसून जी राष्ट्रीय मागणी १९२४ पासून प्रतिवर्षी असेंब्ली मांडीत आहे त्या मागणीचा विचार सरकारनें कितपत केला हा आहे. श्री. माधवराव अणे म्हणाले, " लीग ऑफ नेशन्सच्या बैठकीला हिंदुस्थानाचे प्रतिनिधि म्हणून तुम्ही कांहीं लोकें पाठवितां. ते त्या बैठकींत हिंदुस्थानाच्या वतीनें भाग घेतात, मत देतात, सर्व कांहीं होतें. इतकी हिंदुस्थानसरकारास जर मुखत्यारी आहे तर राष्ट्रीय मागणीच्या बाबतींत सरकारनें पार्लमेंटाकडे बोट दाखवावें याचा अर्थ काय ? " शेवटीं पं. मोतीलाल नेहरू यांची उपसूचना ६३ विरुद्ध ५२ मत पडून मंजूर झाली. व सर जॉर्ज शुस्टर यांना एक रुपया एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलाला पाहिजे काय ? असें अध्यक्ष पटेल यांनीं विचारलें तेव्हां त्यांना १ रुपया मंजूर करा असें म्हणण्याची जराशी लाज वाटली. परंतु मूळ मागणी ६६ हजारांची त्यांनीं केली होती व असेंब्लीनें एक रुपया द्यावा असें बहुमतानें ठरविलें. अर्थात् ती त्याना परत घेतां येणें शक्य नव्हतें व त्यांनीं पुनः धीर करून १ रुपयाची मागणी केली व लोकपक्षानें ती टाळ्यांच्या गजरांत मंजूरहि केली !

बुधवारीं ईदच्या सणानिमित्त असेंब्लीला सुटी होती. गुरुवारीं जिना पक्ष आपला लष्करी कांट सुचवील व लष्करी खात्यावर चर्चा सुरू होईल असा सर्वांचा अंदाज होता. जिना यांच्या स्वतंत्र पक्षापैकीं महंमद इस्माइलखान याना आपल्या नांवानें कांटाची सूचना दिली होती. कांटाच्या सूचनेला निंदाव्यंजक ठरावाचें स्वरूप असल्याकारणानें अर्थातच लष्करी खात्याला एक रुपया देण्यात यावा अशा अर्थाचा कांट सुचविण्यांत आला होता तथापि दिवाण चमनलाल, रंगा अय्यर यांनी देखील एक रुपया देण्यांत यावा अशा वेगळ्या सूचना केल्या होत्या. तथापि खात्याच्या धोरणासंबधानें निंदाव्यंजक ठराव आणण्याचा मान जिना यांच्या पक्षाने घ्यावा असें आपापसांत ठरविण्यांत आलें असल्यामुळे दिवाण चमनलाल यांनीं आपला कांट सुचविला नाहीं. परंतु रंगा अय्यर हे पडले स्वतंत्र ! त्यांना कोणत्याच पक्षाचें बंधन नाहीं. व त्यांचें अलीकडे कोणत्याच पक्षाशीं सरळ नाहीं. अर्थात रंगा अय्यर यांनीं आपली सूचना मांडली व लष्करी धोरणावर टीकात्मक भाषण केलें. नेहमीप्रमाणें आर्मी सेक्रेटरी मि. यंग यांनी उत्तरहि दिलें. परंतु जिना यांचा शब्द राखण्याकरितां या सूचनेला पाठिंबा देण्याकरितां लोकपक्षांपैकीं कोणी उभेंहि राहिलें नाहीं. अर्थात रंगा अय्यर यांची सूचना नामंजूर झाली !

***

यानंतर महंमद इस्माईलखान यांनीं आपली सूचना मांडावी तर लष्करी खात्याच्या सामान्य धोरणावर चर्चा होऊन गेली व एवढा मोठा कांट मंजूर होऊं नये असा निकाल असेंब्लीनें दिला; म्हणून इस्माईलखान यांनीं आपली सूचना मांडली नाहीं. पण त्यामुळे लष्करी धोरणावर सर्व लोकपक्षाची चर्चा होणार नाहीं असें दिसूं लागलें. कारण कांटांच्या सूचना १०० रुपयांच्या व कांहीं विवक्षित तक्रारीपुरत्या असतात. व त्यांपैकीं एखादीच घेऊन तिला निंदाव्यंजक ठरावाचें स्वरूप द्यावें तर तें परान्न व तें देखील मधुकरीच्या स्वरूपाचें. अर्थात ते जिना यांच्या मानी व एकांडे शिलेदार वृत्तीला पटण्यासारखें नव्हतें. म्हणून वैयक्तिक कांट कोणीच सुचवू नयेत व सर्व मागणीच फेटाळून लावावी, व फेटाळून लावण्याचें श्रेय जिना यांच्या पदरांत घालण्याकरितां जिना यांनीं मुख्य भाषण करावें असें ठरविण्यात आलें ! परंतु इतकी जमवाजमव झाली तरी युरोपियन पक्षांत समाविष्ट झालेले कर्नल गिडने यांनीं आपल्या जातभाईच्या तक्रारीची दाद लावण्याकरितां सहा-सात कांट सुचविले होते. कर्नल गिडने यांनीं आय. एम. एस., आय. डी. एस.

वगैरे लोकांच्या तक्रारी मांडल्या व आर्मी सेक्रेटरींनीं त्याला उत्तरेंहि दिलीं. शेवटीं त्यांच्या एका सूचनेवर मते घेण्यांत आलीं व ती प्रचंड बहुमतानें मजूरहि झाली. या खेपेस युरोपियन सभासदांनीं सरकाराविरुद्ध लॉबींत जाऊन आपलें मत टाकलें! गिडने याना इतर पक्षांच्या शांतता-वृत्तीचा अर्थ कळला व लोकाग्रहाला बळी पडून त्यांनीं आपल्या इतर सूचना परतहि घेतल्या. ब्रह्मी लोकांचे प्रतिनिधि म्हणून मि. जहांगिर मुन्शा या नांवाचे एक पार्शी गृहस्थ असेंब्लींत नवीन आले आहेत. त्यांनीं ब्रह्मी लोकांना पलटणींत घ्यावें व त्यांची पलटण उभारावी या हेतूनें आपली सूचना मांडली. आर्मी सेक्रेटरी यंग यांनीं ब्रह्मी लोक लढवय्ये जातींत मोडत नाहींत असा खुलासा केल्यावर तीहि ५२ विरुद्ध ४६ मतें पडून मंजूर झाली.

* * *

गुरुवारी लष्करी कांटावर अनेक वक्त्यांची भाषणे व्हावयाचीं उरलीं असल्यामुळें शुक्रवारीं तोच वाद पुढें चालू झाला व त्याला रंगहि चांगला आला. सदर वादविवादांत कर्नल क्रॉफर्ड, के. सी. रॉय, मुनशी ईश्वरसरण, मियान अब्दुल अझीझ, कर्नल गिडने यांनी भाषणे केल्यावर सरकारतर्फे लष्करी सेक्रेटरी मॅकवर्थ यंग यांनीं उत्तर दिलें. बहुतेक वक्त्यांनीं लष्करभरतीसंबंधानें विशिष्ट जातींच्या हक्कांचा, व सरकारच्या संशयी वृत्तीचा उल्लेख केला होता. कर्नल क्रॉफर्ड यांनीं हिंदुस्थानास विमानापेक्षां पायदळ पलटणीची गरज अधिक असल्यामुळें विमानांच्या थोड्या उपयोगाच्या मानानें त्यांजकरितां २२ लक्ष रुपयांचा नवा खर्च करण्यापेक्षां विमानास बहुतेक अर्धचंद्र देऊन त्या रकमेची बचत केलेलीच बरी असे प्रतिपादलें. हिंदुस्थानांतील बुद्धिमान वर्गाला लष्करांत कमिशनें मिळत नाहींत अशी रॉय यांनी तक्रार केली. यंग यांनीं उत्तर देतांना सांगितलें कीं, सक्तीचें लष्करी शिक्षण युनिव्हर्सिट्यांतून सुरू करण्याचा ठराव सरकारनें स्वीकारला त्यावरून सरकार हिंदी लोकांस लष्करी सवलती देण्यास तयार असल्याचें सिद्ध झालें आहे. टेरिटोरियल फोर्ससारख्या सवलती पूर्वीच दिल्या असता सुशिक्षित वर्ग त्याचा उपयोग करीत नाहीं यांत सरकारचा काय दोष? युनिव्हर्सिट्यांतील विद्यार्थी लष्करांत यावेत याविषयीं सरकार खटपट करीत असून सँढर्स्ट कॉलेजास पुरेसे तरुण मिळतील असे दिसून आलें कीं सँढर्स्ट कॉलेज सरकारास हिंदुस्थानांत काढावेंच लागेल असा त्यांनीं अभिप्राय दिला. शेवटीं बॅ. जिना याच्या सूचनेस ६१ अनुकूल व ४४ विरुद्ध मतें पडून ती पास झाली. त्यामागून सरहद्द प्रांतास सुधारणा कायदा लागू करण्याची सूचना मियान शहा नवाज यांनीं आणिली व तीहि ६७ अनुकूल व ३४ प्रतिकूल मतें पडून मंजूर करण्यांत आली!

## वार्षिक रावणवध व लंकादहन

उत्तर-हिंदुस्थानांत दरवर्षी चैत्र महिन्याचे सुमारास रामलीलेचा उत्सव होत असतो. त्यांत राक्षसाधिपति रावण हा मारला जाऊन साऱ्या लंकेची होळी होते पण पुढचे वर्षी पाहावें तों रावण फिरून जिवंत असलेला आढळतो म्हणून फिरून तो मारावा लागतो. आणि लंकेचीहि तीच गोष्ट. अशाच रीतीनें दिल्ली येथील कायदे-मंडळांत अलीकडे बहुधा दरवर्षी गव्हर्नर-जनरल यांच्या कार्यकारी मंडळाचा खर्च एक रुपया शिल्लक ठेवून बाकी सर्व कापला जातो. निषेध व्यक्त करण्याच्या अनेक प्रकारांपैकीं हा एक सर्वमान्य असाच प्रकार आहे. कारण इंग्रजीमध्यें 'कटिंग ऑफ ए सन वुइथ ए पेनी' अशी एक म्हण आहे. तिचाहि अर्थ असाच कीं मुलाचें वर्तन बापाला नापसंत असलें व त्याच्या वर्तनाचा निषेध बापाला व्यक्त करावयाचा असला, तर तो आपल्या मृत्युपत्रांत या नावडत्या मुलाला फक्त एक पेनी मिळकत द्यावी म्हणून लिहून ठेवतो, व बाकीची सर्व मिळकत आवडत्या मुलांना देऊन किंवा इतर कार्याकडे लावून ती निकालांत काढतो. गव्हर्नर-जनरलाच्या कार्यकारी मंडळाला एक रुपयाहून अधिक रक्कम खर्चाला देऊं नये असा ठराव कायदे-मंडळानें करणें याचा अर्थहि तसाच आहे. परंतु या ठरावापासून प्रत्यक्ष कांहींच निष्पन्न होत नाहीं. स्वतः गव्हर्नर-जनरल आपल्या अंगावर जबाबदारी घेऊन नामंजूर झालेली रक्कम पुनः बजेटांत समाविष्ट करतो. म्हणजे मृत्युपत्राची उपमाच द्यावयाची तर तापट बापाचें मृत्युपत्र रद्द ठरून मुलगा बापाच्या पैशावर नेहमींप्रमाणें उनाडक्या करण्याला समर्थ होतो. किंवा रामलीलेची उपमा द्यावयाची तर मारलेला रावण पुनः जिवंत होऊन उपद्रव देऊं लागतो, आणि जाळलेली लंका फिरून जशीच्या तशी प्रगट होऊन आपल्या राक्षसी वैभवाचा दिमाख मिरवूं लागते!

येदाच्या बजेटमंजुरीच्या प्रसंगी निषेधदर्शक पांचचार ठरावांच्या सूचना कायदे-मंडळांतील निरनिराळ्या पक्षांनीं वांटून घेतल्या होत्या. यांत गव्हर्नर-जनरलच्या कार्यकारी मंडळाचा खर्च एक रु. ठेवून बाकी सर्व कापून टाकण्याची सूचना स्वराज्यपक्षातर्फे पं. मोतीलाल नेहरू यांनी मांडावी असे ठरलें त्याप्रमाणें त्यांनी ती मांडली व बहुमतानें ती मंजूरहि झाली. पण वर दर्शविल्याप्रमाणें या ठरावांतील निषेध व निंदा ठरावांतल्या ठरावांतच राहणार. कारण कापलेला खर्च गव्हर्नर-जनरल हे फिरून बजेटांत घालणार व फिरून पुढील वर्षी हा प्रश्न उत्पन्न होईपर्यंत हे कार्यकारी मंडळ आपला बेजबाबदार कारभार असाच करीत राहणार! स्वप्नां मारलेली लाथ जशी भुताला लागत नाहीं, पण कल्पनामय युद्धांत झाडलेला झोपल्या मनुष्याचा पाय मात्र कदाचित् खाबावर आपटून त्याला स्वतःलाच धक्का बसतो, त्याप्रमाणें नेहरू यांच्या ठरावानें कार्यकारी मंडळाची कांहीं हानि न होतां त्या ठरावाच्या चर्चेमध्यें हिंदू-मुसलमानांच्या मतभेदानें आपलें विकृत स्वरूप प्रगट केलें. सरकारचा निषेध होणें व तो फुकट जाणें हें असेंच दरवर्षी घडत आहे. ही गोष्ट लक्षांत येऊन पंडित नेहरू यांनींहि एक उपमा सुचविली व होम मेंबर मि. केरर यांनीं उत्तर देतांना तिचाच उपयोग केला. नेहरू यांचें म्हणणें असें कीं हिंदुस्थानांतील जनतेची स्वराज्याकांक्षा हा एक आम्र वृक्ष असून प्रतिवर्षी त्याला मोहोर येतो, पण आभाळ किंवा जोराचा पाऊस, किंवा गाराचा मारा यांनीं तो झडला जाऊन फळें धरण्यापर्यंत मजलच पोंचत नाही. अर्थात् नोकरशाही हीच या बाबतींतली दुष्ट उपाधि!

यावर मि. केरर हे म्हणाले कीं मोहोराचें रूपांतर किंवा परिणति फळें धरण्यांत होवो वा न होवो, पण पंडित नेहरू यांच्याच कबुलीप्रमाणे राज्यघटनेचा वृक्ष तरी जिवंत व खंबीर असा आहे कीं नाहीं? त्याची मजल दरवर्षी मोहोर धरण्यापर्यंत जाते, याचा अर्थ वृक्षामध्यें फलप्रदतेची शक्ति खास आहे असाच करावयास नको काय? यावर मग नेहरू यांनी अशी कोटी केली कीं, हा वृक्ष फोफावतो त्याचें कारण हिंदुस्थानाची भूमीच तशी सुपीक व मऊ आहे. पण फिरून केरर यांनीं असें उत्तर दिलें कीं, या राज्यघटनेंत पार्लमेंटरी पद्धतीचा वादविवाद होऊं शकतो, मग याहून प्रगति ती आणखी कोणती व राज्यपद्धतीचा वृक्ष असा आहे म्हणूनच त्यावर स्वराज्याच्या आकांक्षेचा मोहोर तरी येऊं शकतो! पण या अलंकारिक उत्तर-प्रत्युत्तरांत कोणाची धांव कोठपर्यंत जाऊं शकते हें सहजच कळून आलें. मि. केरर यांच्या मताप्रमाणे हिंदुस्थानांतील राज्यघटनेत स्वराज्याची मागणी करतां येते व आकांक्षा धरण्याला कोणी हरकत करीत नाहीं हाच आंब्याचा मोहोर पण त्याच्या सुवासावरच हिंदी जनतेनें तृप्त रहावें, किंबहुना कोकिळेप्रमाणे मोहोराच्या आस्वादानें आनंदभरित होऊन इंग्रजी राज्याच्या गुणवर्णनाचीं गाणीं तिनें कृतज्ञताबुद्धीनें गावीं! उघडच आहे कीं, आंब्याच्या झाडावर कैऱ्या धरू लागून मोहोर झडून गेला म्हणजे कोकिळा आम्र वृक्षावर बसून गात नाहीं. कारण तिला मोहोराचा आस्वाद हाच गोड व आम्रफळ हें आंबट वाटतें. दुसरे पक्षीं, पंडित नेहरू यांनी स्वराज्याच्या आकांक्षेला मोहोर म्हटलें. अर्थात् त्यांचें फळ म्हणजे त्यांनीं आपल्या रिपोर्टांत मागितलेलें जबाबदारीचें स्वराज्य. म्हणजे प्रत्यक्ष स्वातंत्र्य हें त्या आकांक्षेचें फळ असें त्यांना अजून म्हणवत नाही! सुमारें वीस वर्षांपूर्वी आम्र वृक्ष, मोहोर व आम्रफळ या पदार्थांच्या उपमांनींच स्वराज्याचा वाद कसा रंगला जात असे हें पाहिलें म्हणजे इतिहासाची पुनरावृत्ति होते ही म्हण मनाला पटून कौतुक वाटतें.

असो. नेहरू रिपोर्ट सर्वांना सारखा मान्य नाहीं असें असेंब्लीच्या वादांत मुसलमानांनीं सांगितलें खरें, पण अखेर त्यांनी नेहरूंच्या ठरावावर अनुकूल मत दिलें याचा बोध सरकारनें अवश्य घ्यावा. आणि मुसलमानचसें काय पण युरोपियन पक्षातर्फे कर्नल क्रॉफर्ड यांनीं जरी नेहरूंच्या ठरावाला अनुकूल मत दिलें नाहीं तरी वादाच्या भरांत उघड सवाल टाकला असतां, त्यांनींहि असें कबूल केलें कीं हिंदुस्थानाला जबाबदारीचें स्वराज्य मिळालें पाहिजे असें आमचेंहि मत आहे! मुसलमान व युरोपियन लोक यांचें म्हणणें इतकेंच कीं, हिंदुस्थानांत आमची संख्या कमी, म्हणून स्वराज्य देतांना सरकारनें आमच्या हितसंबंधाच्या रक्षणाचा पक्का बंदोबस्त केला पाहिजे. पण ही गोष्ट कोणीच नाकबूल करीत नाही. पूर्वी सन १९२४ व १९२५ या दोन सालीं स्वराज्याच्या मागणीचा ठराव असेंब्लीपुढें आला व तो मंजूर झाला तेव्हां त्या ठरावांत स्वतः नेहरूंनीं आपण होऊनच असे शब्द घातले होते की, 'स्वराज्यघटनेंत अल्पसंख्य लोकांच्या हितसंरक्षणाची योग्य व्यवस्था केली जाईल.' ही व्यवस्था करण्याचा प्रयत्नहि राष्ट्रीय सभेनें सर्वपक्षीय परिषद भरवून केला व नेहरू रिपोर्ट हा त्या प्रयत्नाचेंच प्रत्यक्ष फळ होय. या रिपोर्टांतील कायदेमंडळाच्या निवडणुकीसंबंधाच्या सूचना मुसलमानांस मान्य नाहींत ही गोष्ट

निराळी. तसेंच युरोपियन लोकहि आपणाकरितां कांहीं ठराविक हक्क व सवता सुभा मागत आहेत, म्हणून नेहरू रिपोर्ट त्यांना त्यापुरता मान्य नाहीं हें खरें. तथापि आज अमलांत असलेली बेजबाबदार राज्यपद्धति अशीच पुढेंहि चालू राहावी असेंहि कोणीहि म्हणत नाहीं ही गोष्ट तरी असेंब्लींतील या वादानें प्रत्ययाला आली हा तरी फायदाच झाला असें आम्ही समजतो.

या दृष्टीनें पाहतां आमच्या मतें बॅरिस्टर जयकर यांनींच पंडित नेहरू यांच्यापेक्षां वादकौशल्य या प्रसंगीं अधिक दाखविलें. तें असें कीं त्यांनीं नेहरू रिपोर्टाला गौण स्थान देऊन जबाबदार स्वराज्याच्या मागणीला प्राधान्य दिलें. किंबहुना त्यांनीं असेंहि सांगितलें कीं "हिंदुमुसलमानांत आपआपल्या हक्कासंबंधानें आज वाद दिसत असला तरी तुम्ही स्वराज्य देण्याला सिद्ध व्हा, व हें स्वराज्य तुमचें तुम्ही हवें तसें वांटून घ्या असें म्हणा की हिंदुमुसलमानांतला वाद मिटलाच असें समजा." आणि हेंच सर्वस्वी खरें आहे. कारण कानडाच्या वसाहतींत फ्रेंच व इंग्रज यांचे आणि दक्षिण-आफ्रिकेंत इंग्रज व बोअर यांचें हक्काच्या वांटणीसंबंधानें असेंच भांडण असतां जबाबदारीचें स्वराज्य खास मिळतें अशी खात्री पटतांच त्यांनीं तें भांडण मिटविलें व एकी केली. तुमचा रिपोर्ट देशाला मान्य नाहीं असें बॅ. जिनासारखे पुढारी पं. नेहरू यांच्या तोंडावर भरअसेंब्लींत सांगत असतां स्वराज्य द्या, नाहीं तर देशांत क्रांति करूं असा धाक घालणारे व पोकळ दमदाटी करणारे नेहरू, आणि नेहरू रिपोर्ट सर्वमान्य नसण्याला किंवा अशीच दुसरी एखादी पण एकमुखी योजना पुढें न येण्याला खरें कारणीभूत तुम्हीच आहां असें बजावून दोषाचें खापर सरकारच्या माथ्यावर फोडणारे जयकर यांच्यापैकीं अधिक सरस व मार्मिक युक्तिवाद कोणाचा हें सहजच वाचकांच्या लक्षांत येईल. आणि सरकारचें कपट किंवा मर्मस्थान लोकांच्या निदर्शनाला यावयाचें तर तें जयकर यांच्या युक्तिवादानेंच अधिक प्रगट होईल असें आम्हास वाटतें.

स्वराज्याची कायमची योजना व्हावयाची तर आम्हाला आमचें म्हणून अमुकच दिलें पाहिजे असा आग्रह देशांतला प्रत्येक वर्ग धरूं लागेल तर चालणार नाहीं हें उघड आहे, व त्याप्रमाणें मन मोठें करून खरी राष्ट्रीय भावना मनांत धरून हिंदु समाजानें स्वतःकरितां अमुकच खास पाहिजे असें कांहींच मागितलें नाहीं हें सर्वपक्षीय परिषदेंत दिसून आलें. मुसलमान लोक स्वतःकरितां सवता सुभा आणि प्रमाणाबाहेर हक्क मागतात हें खरें. तथापि त्यांनीं आपल्या मागणीला निश्चित स्वरूप दिलें आहे हें कबूल केलें पाहिजे. आणि समजा कीं, त्यांनीं आपली मागणी किंचित् कमी केली किंवा हिंदु लोकांनीं त्यांना आणखी थोडें झुकतें माप देण्याचें कबूल केलें तर हा वाद मिटणें सोपें आहे. युरोपियन लोकांची मागणी याहून अधिक चढी व जाचक आहे. कारण त्यांनाहि सवता सुभा व अधिकाराच्या ठराविक जागा पाहिजेतच, परंतु याशिवाय त्यांच्या मागणीचा विशेष असा एक आहे कीं, अमुक एक अधिकार हिंदी लोकांच्या हातीं कधीं जाऊंच नये असा त्यांचा कटाक्ष आहे. तथापि इतकें आहे तरी त्यांनीं आपलें मागणें निश्चितार्थक शब्दांनीं आतां तरी मांडलें हा त्यांचा गुण घेतलाच पाहिजे. कारण समजा, त्यांची मागणी आम्हास मान्य करतां आली तर वादाचें तेंहि तोंड मिटेल!

पण अशा रीतीनें विरोधी का होईना, पण जो तो पक्ष आपलें म्हणणें स्पष्टपणें मांडीत असतां, स्पष्ट न बोलणारा, अंगीं कांहीं लावून न घेणारा, कोणतीहि कबूली न देणारा, कोणतीहि विधायक सूचना न करणारा, कोणतीहि योजना पुढें न मांडणारा, असा जर कोणता एक पक्ष असेल तर तो मात्र सरकारचा होय. व त्याप्रमाणें असेंब्लींत झालेल्या वादांत सरकारतर्फे होम मेंबर क्रेरर यांनीं १९१७ सालच्या जाहिरनाम्याकडे अंगुलिनिर्देश करण्यापलीकडे कांहींएक केलें नाहीं. तुम्ही कसेंहि मुद्देसूद प्रश्न विचारा, सरकारचें एकच उत्तर कीं "१९१७ च्या जाहिरनाम्याप्रमाणें आम्ही वागणार. मागें जाणार नाहीं व पुढेंहि जाणार नाहीं." पण त्या जाहिरनाम्यांत काय आहे असें पाहूं गेल्यास कोणासच कांहीं निश्चित बोध होत नाहीं. सगळें क्षितिज मृगजळानें भरून गेलें तरी तहान भागविणार एक चुळकाभरहि पाणी त्यांतून मिळत नाहीं, मांडा परातीएवढा फुगविला तरी त्यांत भूक भागविणारें चिमूटभरहि खरें सत्त्व नसतें, एक हजार कँडलपॉवरच्या विजेचा अल्लाउद्दीन पाजळला तरी गवताची काडी पेटण्याइतकीहि त्या प्रकाशांत उष्णता नसते, त्याप्रमाणें १९१७ च्या या अघळपघळ भपकेदार दिखाऊ दिमाखदार जाहिरनाम्यांत स्वराज्याच्या नांवापलीकडे कांहीं मिळणार नाहीं. १९१७ पर्यंत सरकार १८५७ च्या जाहिरनाम्याचा हवाला देत असे. १८५७ पर्यंत १८३३ च्या आक्टाचा हवाला दिला जात असे. तात्पर्य कोठल्या तरी एका जाहिरनाम्याचें नांव घेऊन त्यांतील कल्पनांवर हिंदी जनतेनें झुलत बसावें असा सरकारचा इरादा आहे. यापेक्षां जबाबदारीचें स्वराज्य देत नाहीं असें सरकारनें एकदमच स्पष्ट कां सांगूं नये ? मग आपण काय करावें याचाच तेवढा विचार लोक करूं लागतील.

# मुंबई विमानोड्डाण संघ

## ( सामान्य माहिती )

कराची, दिल्ली या ठिकाणांप्रमाणें मुंबई येथेंहि विमानोड्डाणाचा संघ ( धी बॉम्बे फ्लाइंग क्लब लिमिटेड ) स्थापन झाला आहे. १९१३ च्या इंडियन कंपनीज ॲक्टान्वयें तो संघ ता. १९ एप्रिल १९२८ रोजीं रजिस्टर्ड करण्यांत आला आहे. संघाचे सेक्रटरी रोल्स रॉइस लि. चे मॅनेजर मि. एम्. एच्.फेन हे आहेत व त्यांचा पत्ता दुबाश हाऊस ह्यूजेस रोड मुंबई असा आहे. संघ स्थापन करण्याचे बाबतींत महायुद्धामध्यें लष्करी विमानांतून गोलंदाजीचें काम केलेले ले. डी.एल. पटवर्धन यांनी बराच प्रयत्न केला व हल्लीं संघाच्या जुहू येथील जागेजवळ ते राहात असून बिनलष्करी वाहतुकीच्या विमानोड्डाणासंबंधीं माहिती घेत आहेत. पुढे साम्राज्यांत विमानांच्या दळणवळणाची व्यवस्था झाल्यास त्या व्यवस्थेंतहि काम करावयाचा त्यांचा विचार आहे.

कंपनीच्या कायद्याप्रमाणें प्रत्येक सभासदाची जबाबदारी २० रु. धरण्यांत आलेली आहे व सध्या एक हजारापर्यंत सभासद असावेत असें ठरविण्यांत आलें असले तरी पुढें ही संख्या आणखी वाढविण्याचा क्लबाच्या कमिटीला अधिकार आहे.

क्लबाच्या सभासदांचे ४ वर्ग आहेत—(१) संस्थापक सभासद (२) आश्रयदाते ( पेट्रन ) सभासद ( ३ ) उड्डाण करणारे ( फ्लाइंग ) सभासद व ( ४ ) सामान्य सभासद. क्लब स्थापन करणारे सुमारें ७५ सभासद असून त्यांत ना. न्यू, इब्राहिम रहिमतुल्ला, फाजलभाई करीमभाई, ससून, सेठना, लल्लुभाई सामळदास, जे. बी. प्रधान, बॅ. जयकर, कावसजी जहांगिर, डॉ. मुंजे, लक्ष्मीदास हरिदास, ले. पटवर्धन, राजा धनराज गिरजी इ. लोक आहेत. यात चाळीसच्या वर सभासद युरोपियन आहेत. क्लबाला ठराविक रकमेची देणगी देणारे हे आश्रयदाते सभासद समजले जातात. या सभासदासंबंधाचे नियम करणें हें कमिटीच्या हातीं आहे.

उड्डाण करणारे सभासद ७०० असावेत अशी मर्यादा घातली आहे. संस्थापक सभासदांना उड्डाण करणाऱ्या सभासदांचे अधिकार आहेतच. मुंबईचे गव्हर्नर सरन्यायाधीश, ईस्ट इंडया स्क्वाड्रन व रॉयल इंडियन नेव्ही याचे ॲडमिरल इ. अधिकारी हे स्वयंसिद्ध ( निवडणुकीवांचून ) उड्डाण करणारे सभासद होतात. व बाकीचे सभसद उड्डाण करणाऱ्या सभासदांच्या कमिटीने निवडावयाचे असतात. सामान्य सभासदाला व उड्डाण करणाऱ्या सभासदाला वार्षिक २० रु. वर्गणी द्यावी लागते. उड्डाण करणाऱ्या सभासदाला शिवाय ८ रु. मासिक वर्गणी द्यावी लागते. प्रवेशफी सर्वांना सारखीच म्हणजे ५० रु. द्यावी लागते ती निराळीच.

आश्रयदाते व सामान्य सभासद यांना मतें देण्याचा अधिकार नाही. दरवर्षी सर्व सभासदाची सभा होऊन ७ ते २० उड्डाण करणाऱ्या सभासदांची कमिटी नेमण्यांत येते. सामान्य सभासद व उड्डाण करणारे सभासद यांची निवडणूक पुढीलप्रमाणें होते. नव्या होणाऱ्या सभासदाचें नांव एका विद्यमान उड्डाण करणाऱ्या सभासदानें सुचविलें पाहिजे व दुसऱ्या एका उड्डाण करणाऱ्या सभासदानें अनुमोदन दिलें पाहिजे. ही लेखी सूचना व अनुमोदन सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आल्यावर जी कमिटीची सभा भरेल तींत मतें घेण्यात येऊन तीन–चतुर्थांशापेक्षां कमी मतें पडलीं नाहींत तरच तो निवडून येतो. त्यानंतर त्यास क्लबाच्या नियमांचें पुस्तक देण्यांत येतें. व त्याचेकडून प्रवेशफी वर्गणी वगैरेची मागणी करण्यांत येते.

या क्लबाला सरकारी २० हजार रु. ची वार्षिक ग्रँट आहे व जुहू येथील सरकारी जागा सध्या या क्लबाकडे देण्यांत आलेली आहे. सरकारनें क्लबाला दोन जिप्सी मॉथ विमानें दिलीं असून एक युरोपियन शिक्षक क्लबानें नेमला आहे. तो उड्डाण करणाऱ्या सभासदांना शिकवितो. प्रत्येक वेळीं अर्धा तास शिक्षण देण्यांत येतें व असें १०० तासाचें शिक्षण झालें म्हणजे उतारूंचें विमान चालविण्याचा अधिकार प्राप्त होतो.

उड्डाणशिक्षणाच्या प्रत्येक तासाला २५ रु. फी द्यावी लागते. शिक्षण देणाऱ्या लहान विमानांशिवाय, मजेनें सहल करणाऱ्या लोकांसाठींहि एक मोठें विमान जुहू येथें ठेवण्यांत आलें आहे व रोज सकाळीं व शनिवारीं व रविवारीं सकाळ–संध्याकाळ दरमिनिटास १ रु. याप्रमाणें पैसे घेऊन हौशी लोकांना विमानांतून सहल करण्याची सोय करण्यांत आली आहे. २५ मिनिटांत सबंध मुंबई शहरावरून प्रदक्षिणा घालतां येते. वर गेल्यावर मुंबईच रस्ते व घराचीं छपरें तेवढीं दिसतात. रेल्वेचा रस्ता दिसतो पण रूळ दिसत नाहींत. रस्त्यावरील माणसेहि दिसत नाहींत. आगगाडी

चालली असतांना लहानशा गोगलगाईप्रमाणें दिसते! विमानाचा वेग कमींत कमी ताशीं ६० मैल असतो व तो १८० मैलांपर्यंत वाढवितां येतो.

शिकाऊ जिप्सी मॉथ विमानांत २ जागा असतात. एक शिक्षकाला व त्याचे पाठीमागें शिकणाऱ्याला. शिक्षकाचें व शिष्याचें भाषण टेलिफोनद्वारा होतें. मोटारीप्रमाणें आंत वेग व उंची दाखविणारीं घड्याळें असतात. ताशीं ६० पासून १०० मैलांचा वेग ठेवण्यांत येतो. या शिकाऊ विमानाला मोटारीसारखीं दोन चाकें असतात. पुढें एक पंखा असतो. तो मोटारच्या स्टार्टरप्रमाणें दुसऱ्या माणसाला पुढून फिरवून सुरू करावा लागतो. पंखा सुरू झाला म्हणजे विमान जमिनीवरून वर उडूं लागतें. जमिनीवर दोन चाके व शेंपूट टेकलेले असतें. ते शेंपूट प्रथम वर उचलले जातें. शेंपटालाच दिशा बदलणारें सुकाणूं लावलेलें असतें व आंत बसणाऱ्या पायलटाला ते इच्छित दिशेनें फिरवितां येते. शेंपूट उचलल्यावर घारीप्रमाणें चक्राकार गति घेऊन विमान वर चढतें व तशीच गति घेऊन खालीं उतरतें. शिक्षक व शिष्य या दोघांच्याहि पुढें विमान चालविण्याची व्यवस्था असते. शिष्य तयार झाला म्हणजे हळूहळू शिक्षक त्याच्याकडून विमानाच्या हाकचाली करवितो.

अलीकडे सिनेमामधून विमानें दाखविण्यांत येतात. सिनेमा कंपन्यांना आपल्या चित्रपटांतील पात्रें विमानांतून जात आहेत असा देखावा दाखवावयाचा असल्यास क्लबाच्या सेक्रेटरीच्या परवानगीनें तो देखावा घेतां येतो. नुकताच मुंबईच्या इंपीरियल सिनेमा कंपनीने असा एक देखावा जुहू येथें येऊन घेतला.

उड्डाण करणारा सभासद स्वतःचें एक विमान विकत घेऊन क्लबाच्या जागीं तें ठेवून त्याचा उपयोग करूं शकतो. सर व्हिक्टर ससून यांच्या मालकीचें एक लहान विमान जुहू येथें आहे. लहान 'जिप्सी मॉथ'ला सुमारें १२ हजार रु. किंमत पडते.

संघाची नियमावली पाहिल्यास त्यास सामान्य लोकांकडून फी घेऊन त्यांस विमानोड्डाणाचें शिक्षण देण्याची सोय करण्याचा अधिकार संघास आहे. पण संघानें अजून अशी सोय केली नाहीं. अर्थात् आज विमानोड्डाणाचें हिंदुस्थानांत शिक्षण घ्यावयाचें तर या क्लबाचे सभासद बनले पाहिजे. त्यासाठीं विद्यमान सभासदांपैकीं एक सूचक व अनुमोदक मिळाला पाहिजे. पण इतके प्रयास करूनहि जर सधन हिंदी तरुणांनीं ही विद्या हस्तगत केली तर ती हवी आहे पुढे लष्करी दृष्टीनें व शांततेच्या काळांतील वाहतुकीच्या दृष्टीनेंहि विमानविद्येचें महत्त्व वाढणार आहे. अर्थात् भावी आर्थिक फायद्याच्या दृष्टीनें पाहिलें तरी या शिक्षणाचे कामीं खर्च केलेला पैसा फुकट जाणार नाहीं. कारण टपालाचें अगर उतारूंचें विमान नेणाऱ्या माणसाला हजार दीड हजार इतका दरमहा पगार सहज मिळूं शकतो. अजून या गोष्टीकडे हिंदी लोकांचें जावें तसें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. युरोपांत व अमेरिकेंत अनेक स्त्रिया विमानविद्येंत तरबेज होतात इतकेंच नव्हे तर मध्यें न थांबतां लांब अंतरावरून जाण्याचीं धाडसेंहि त्या करतात. मुंबई-च्या संघाच्या हल्लीं दोनच स्त्री सभासद आहेत. ले. पटवर्धन यांच्या पत्नी सौ. मनोरमाबाई पटवर्धन या त्यांपैकीं एक असून विमानोड्डाणाचें शिक्षण घेण्यास त्या लवकरच सुरुवात करणार आहेत.

# इराकांतील मुसलमान व हिंदुस्थानांतील मुसलमान

बगदाद २२-२-२९

खलिफांच्या या प्राचीन नगरींत मुसलमानी धर्माचें प्राबल्य विशेष आहे हें सांगण्याची आवश्यकता नसली तरी बड्या आणि छोट्या भाईंना इकडे किती मान मिळतो हे पाहणें हिंदी प्रजेच्या दृष्टीनें महत्त्वाचें ठरेल. बगदादमधील सरकारी व स्वतंत्र अशा बहुतेक विचारवंतांना भेटावयास गेल्यावर हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या वेडेपणाबद्दल त्यांनीं आठवण होऊनच कुतूहलपूर्वक पृच्छा केली. कित्येकांनीं तर अलीबंधूंची आमच्या दृष्टीने काय योग्यता आहे हें वर्तमानपत्रांतून स्पष्टपणें जनतेपुढें मांडण्यास आग्रहपूर्वक बजावलें. मौलाना ह्यांची इस्लामी धर्मप्रीति पाहून हिंदी लोकांना काय वाटत असेल तें असो. पण इकडील अग्रेसर मंडळी अलीबंधूंना " नसता चोंबडेपणा करणारे आगंतुक " ही पदवी देतात !

आपल्याकडे लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे अध्यक्ष श्री. पटेल आहेत तसेंच इराकी प्रतिनिधी-मंडळाचे माजी अध्यक्ष श्री. रशीद बेग गिलानी म्हणून एक राष्ट्रीय गृहस्थ आहेत. त्यांनीं दोन खात्यांची दिवाणगिरीहि केली आहे. त्याच्या मुलाखतीस गेलों असता त्यांनीं प्रथमतःच बजावून सांगितलें कीं " तुमच्या देशातील वर्तमानपत्रांतून शौकतअली आणि त्यांचे बंधु (मौलाना ही पदवी चुकून देखील त्यांच्या तोंडीं आली नाहीं)

यांच्या लुडबुडीची माहिती लोकांना करून द्या. आमच्या देशांतील धार्मिक व्यवस्थेची त्याना इतकी आस्था कां वाटते हें कळत नाहीं. पण हिंदुस्थानात बसून "असं करा" "तसे नको" इत्यादि हुकूम आम्हास सोडण्याची उठाठेव याना सांगितली कोणी ! अशा अनाहूत ढवळाढवळीनें ब्रिटिश सरकारच्या भेदनीतीस ते बळी पडतात; इतकेंच नव्हे तर इंग्रजी मुत्सद्याना चंचुप्रवेश करण्यास नवीं नवीं साधनें ते उपलब्ध करून देतात."

हा आरोप ऐकून कोणीहि थक्कच होईल! कारण बंधुद्वयाच्या इंग्रज राज्यकर्त्यांवरील गालीप्रदानाची प्रखरता सर्वश्रुत आहे. अर्थात् मी ही जास्त चौकशी करून खुलासा देण्याची विनंति केल्यावर श्री. गिलानी म्हणाले.

## अलीबंधूंची लुडबूड

"नकीबांचीच गोष्ट घ्याना. दोन वर्षांपूर्वी नकीब वारले, तेव्हां नवीन वारसासंबंधीं प्रश्न निघाला. (नकीब म्हणजे बगदादमधील मुख्य धर्मगुरु. आपल्याकडील श्रीशंकराचार्यासारखाच मान या नकीबाना मिळतो. हिंदी मुसलमान नकीबांना मानतात.) नकीबांची इस्टेट फार मोठी असून उत्पन्नहि एखाद्या संस्थानाप्रमाणें असतें. एवढी मोठी संपत्ति धार्मिक नांवाखालीं वंशपरंपरेनें एकाच व्यक्तीच्या हातीं राहणें प्रचलित परिस्थितीत योग्य नसल्यानें व त्या द्रव्याचा सदुपयोग व्हावा म्हणून येथील आम्ही सर्व मडळींनीं पंच नेमून व्यवस्था करण्याचें ठरविले. मात्र नकीबांच्या वडील मुलास या पंचायतीचा अध्यक्ष करण्याची अट होती. नकीबाची सर्व मंडळी या योजनेस अनुकूल होती आणि हा धार्मिक प्रश्न असल्याने ब्रिटिश सरकारला यांत ढवळाढवळ करतां येत नव्हती. पण शौकत-अली आहेतना! त्यांनीं तारांचा गोंधळ माजविला. ब्रिटिश सरकारापुढे तोंड वेंगाडून त्यांना या धार्मिक बाबतीत पडावयास लावलें. आणि अशा ठिकाणीं लुडबुडण्यास सोकावलेल्या इंग्रजांना फावलें! राजे फैझल यांना अलीबंधूंनी तारा पाठविल्या, पुढाऱ्यांना हुकूम सोडले आणि ब्रिटिशांची मनधरणी केली! कशासाठीं ? तर लक्षावधि रुपयाच्या मालमत्तेची व्यवस्था पंचामार्फत होऊन लोकोपयोगी कार्यास साहाय्य झालें असते ते होऊं नये म्हणून ! स्थानिक अडचणी ठाऊक नसतांना यासंबंधीं ढवळाढवळ करण्याविना त्यांचें काय अडलें होतें ?"

## इंग्रजी राजनीतीचें विवरण

अलीबंधूंना हा माहेरचा अहेर मिळाल्यामुळें विषयांतर करण्यासाठीं, 'इराकांतील जनतेचें अंतिम साध्य काय आहे' हा प्रश्न मी विचारला. "निर्भेळ स्वातंत्र्य" हें उत्तर तत्काळ मिळालें आणि नंतर येथील निवडणूक, लोकमतनिर्देशन, मॅंडेटरी सत्तेचे विरोधी प्रयत्न इत्यादिकांची माहिती सांगून इराकी "विठ्ठलभाई" हिंदी मुसलमानांकडे वळले. "ब्रिटिश राजनीतीचें 'भेद' हे तत्त्व आहे. तुमच्या हिंदुस्थानात हिंदु व मुसलमान असा भेद पाडून तुम्ही स्वराज्याला योग्य नाहीं असे ते सिद्ध करीत आहेत. आणि वेडे अविचारी मुसलमान त्या भेदनीतीला बळी पडतात ! हिंदु—मुसलमान हा भेद विसरून एकाच राष्ट्रांतील घटक म्हणून सर्वजणानीं एकी केली तरच तुमचा तरणोपाय आहे. तुमच्याकडे प्रकार आहे तसाच आमच्याकडेहि प्रयोग झाला ! येथे शिया व सुनी असे पथ आहेत. त्यांचा फायदा घेऊन एकमेकांत वैमनस्य वाढविण्याचे प्रयत्न चालू आहेत. असें भांडण सुरू झाल्यावर मग स्वातंत्र्याला आम्ही नालायक ठरावयाचेच. या सर्व प्रकाराना कोणीहि बळी पडूं नये.

हिंदुस्थान स्वतंत्र व्हावें अशी आमची इच्छा फार आहे. कारण ब्रिटिशांचा साम्राज्यवादाचा मुख्य आधार तोच देश आहे. तुम्ही स्वतंत्र झालां म्हणजे आमच्या लढ्यांत आम्हाला जोर येईल. तुमच्याकडे आमचे डोळे लागले आहेत ते यासाठींच. पण तुम्ही आपसांतील तंटे मिटविल्याविना तुम्हाला स्वराज्य मिळणार नाही ही खात्री ठेवा."

इराकचें सरकार हिंदुस्थानापेक्षां अधिक प्राति-निधिक स्वरूपाचें आहे. त्यांचें एक मंत्रिमंडळ असून मुख्य मंत्रीहि असतो. प्रचलित परिस्थितींत सर्व मंत्रिमंडळाने राजीनामा दिला असून नवीन मंडळ बनण्याची आशा दिसत नाहीं. तरी नवे हायकमिशनर लवकरच येतील तेव्हां बरेंच महत्त्वाचें राजकारण बाहेर पडेल असें म्हणतात. इंग्लंडाशी बरोबरीच्या नात्याचा तह केला तरच मंत्रिमंडळ होऊं शकेल अशी भाषा राष्ट्रीय वृत्तीच्या लोकात ऐकूं येते. मंत्रिमंडळानें राजीनामे दिले असले आणि राजेसाहेबांनीं ते स्वीकारले असले तरी नवे प्रधान कामावर येई-पर्यंत जुन्या दिवाणांनीं अधिकारन्यास करूं नये असें ठरले आहे. तेव्हां मुख्य मंत्र्यांची भेट घडणें मला जरा दुरापास्त होतें. एक तर अधिकारदंड खालीं ठेवलेला आणि केवळ 'लोकाग्रहास्तव' कार्यालयांत नांवापुरतें यावयाचे ही आजकालची रीत; आणि दुसरें म्हणजे इस्लामी धर्माप्रमाणें सर्वांचा दिवसभर उपवास असतो. तेव्हां पूर्व-संकेत केल्यानें 'केसरी'च्या प्रतिनिधीस मुलाखत देण्याचें मुख्य मंत्र्यांनी ठरविलें. श्री. अबदुल म्हासीन बेग सादून हे त्यांचे नांव. त्यांना इंग्रजी बोलण्याचा सराव नाहीं आणि नेहमीची प्रचारांतील आरबी भाषा

केसरीच्या प्रवासी प्रतिनिधीस कशी अवग- असणार? ही नवी अडचण तत्काळ दूर झा। ।. मुख्य मंत्र्याचा कारभारी इंग्रजी बोलण्या पटाईत होता व त्याला "इटरबटर" (इंटरप्रीटर= भाषी. या इंग्रजी शब्दाचा हिंदुस्थानी अपभ्रं ) नेमून मुलाखतीस प्रारंभ झाला!

## मंत्रिमंडळ व हिंदी नोव

दरबारी आदबीचे शिष्टाचार झाल्या प्रधान-मंत्र्यांनीं पौर्वात्य राष्ट्रांतील वर्तमानपत्र ा प्रतिनिधीस भेटण्यांत आपणास किती आन वाटतो तें बोलून दाखविलें. आणि हिंदी गृहस्थ परिचय घडून येण्याचा हा सुयोग आहे म्हटलें. "इंग्रजी पंखाखालीं इराक प्रगतीकडे ार्गक्रमण करीत असतां हिंदी राष्ट्रानें आमच्या ीं बरेच अधिकारी दिले आणि त्या सर्वांनीं लें काम इमानेंइतबारें केलें हें कळविण्यास आम्हास मोठा संतोष वाटतो. आमच्या शा नखात्यात आजूबाजूच्या इतर बऱ्याच देशांती परकीय अधिकारी आहेत, परंतु कर्तव्यतत्परतेंत, ामाणिकपणांत व मेहनतींत हिंदी लोकांच्या तोडीचे कोणीच अधिकारी आम्हाला आढळले नाहींत सें माझे आणि सर्व खात्यांतील वरिष्ठांचें मत . सध्यां सर्वत्र इराकी प्रजाजन आम्ही नेमी आहोत. म्हणून पूर्वीच्या हिंदी अधिकाऱ्यांना र देणें भाग पडत आहे. पण या वा अर्थ आम्ही हि लोकांचा द्वेष करतों असा मुळीं करून घेऊं नक असें माझें आपणास पुनःपुनः सांगणें आहे. इराव सरकारांत हिंदी मंडळींनीं फारच अमोलिक कामगि केली आहे आणि आम्हाला जेव्हां जेव्हा तज्ज्ञांची ावश्यकता लागेल तेव्हां तेव्हां इतर परकीय लोका ा प्रथमतः आम्ही हिंदी लोकच पसंत करू हे ात ठेवा. युद्धोत्तरकाळांत इराकी शिक्षित प्रज ा बेकार हिंडूं लागले तेव्हां सरकारी जागा इर ा लोकांसाठींच आम्ही ठेवल्या तर त्यांत ोणत्याहि प्रकारचा असद्धेतु आमचेवर आपण ला े. केवळ राष्ट्रीय वृत्तीन प्रेरित होऊनच हें काम आम्हाला करावें लागत आहे."

## निर्भेळ स्वातंत्र्य का साम्र ्यांतर्गत स्वराज्य?

"हिंदी राष्ट्राचा आणि इराकाचा संबंध जकालचा नव्हे. शेंकडो वर्षांपूर्वीपासून हीं दोन रा एकमेकांस परिचित आहेत. हिंदी राष्ट्रांत सर्वांगीण गति होत आहे आणि त्यांतील लोकशाहीच्या विजयाकडे आमचें लक्ष लागलें आहे."

प्रश्न—इराकी प्रजेचें अंतिम ध्येय ाम्राज्यांतर्गत स्वराज्य असें आहे का अगदीं स ंत्र व्हावें असें त्याना वाटतें?

उत्तर—कोणत्याहि मनुष्याच्या अंतःकरणांत निर्भेळ स्वातंत्र्याच्याच भावना असणार आणि इराकी लोकानाहि तसेंच वाटतें. परंतु तूर्त ब्रिटिशासारख्या बलिष्ठ राष्ट्राशीं संगनमत केल्यानें इराकाचा फायदा होणार असल्यानें कांहीं कालापर्यंत त्यांचा संबंध तोडतां येत नाहीं.

प्रश्न—इजिप्त, हिंदुस्थान व चीन या पौर्वात्य देशांच्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं चाललेल्या प्रयत्नाबद्दल आपलें मत काय आहे?

उत्तर—बल्गेरिया, स्वित्झर्लंड, युगोस्लाव्हिया, बेल्जम, डेन्मार्क इत्यादि लहान राष्ट्रं जर युरोपांत स्वातंत्र्य भोगूं शकतात तर या मोठ्या देशांना ते कां नसावे? प्रत्येक मनुष्यानें स्वतंत्र व्हावें हें राष्ट्रीयत्वाचें लक्षण आहे. सर्व राष्ट्रें स्वतंत्र झालीं पाहिजेत म्हणजेच कोणी कोणावर स्वामित्व गाजविणार नाहीं असें मला वाटतें.

हें संभाषण चालू असतांना लहानसा कप पुढें करण्यांत आला. अशा वेळीं नकार न देण्याविषयीं आगाऊ सूचना मिळाली असल्यानें त्याचा स्वीकार केला. आणि तोंड वेंगाडत तो कॉफीचा कडू काढा पिऊन टाकला! त्यांत दूध घालण्याची पद्धत नाहीं. भातुकली खेळतांना मुली लहानसे कप घेतात त्याच आकाराचे कप कां वापरतात ते या वेळीं कळलें.

प्रश्न—मुस्ताफा केमाल, अमानउल्ला आणि इराणाधिपति यांच्या देशांत पाश्चात्य सुधारणांचा प्रसार करण्याचे प्रयत्न चालू आहेत. त्या दृष्टीनें इराकांतील सरकार काय करणार आहे?

उत्तर—या तीनहि थोर पुरुषांचे प्रयत्न स्तुत्य आहेत यांत शंका नाहीं. परंतु प्रथमतः लोकांची मनोभूमिका तयार करून मग सक्तीनें सुधारणा लादाव्या असें आम्हास वाटतें.

प्रश्न—स्वराज्य मिळविण्यासाठीं हिंदी प्रजेनें कोणत्या उपायांचा अवलंब करावा असें आपलें मत आहे?

उत्तर—हिंदुस्थानाच्या प्रश्नांची सांगोपांग माहिती नसली तरी वर्तमानपत्रांतील बातम्यांवरून हिंदू-मुसलमानांची फूट फार विकोपास गेली असें दिसतें. या दोनहि पक्षांची एकी झाल्याशिवाय आणि एक पुढारी नेमून त्याच्याच तंत्रानें सर्वांनीं चालल्यावांचून इष्ट फलसिद्धि होणार नाहीं असें माझें मत आहे तुर्कस्थानांतील प्रजाजन मुस्ताफा केमालच्या आज्ञेनुसार वागतात, इराणी लोक रेझाशाहाच्या शिकवणीस मान तुकवतात; म्हणूनच त्या त्या देशाची प्रगति झाली. हिंदुस्थानांतहि तसेंच केलें पाहिजे.

इतकें बोलणें झाल्यावर मुख्य मंत्र्यांनीं हिंदुस्थानाकडून सर्व जगाला मार्गदर्शक ज्ञान मिळालें

असल्याचें सांगितलें. आणि हिंदुस्थानानें लवकर स्वतंत्र होऊन इराकाला स्वातंत्र्य मिळविण्यांत मदत करावी अशी इच्छा प्रकट केली. तेव्हां खाल्डिया, बाबिलोन इत्यादि ठिकाणच्या प्राचीन काळच्या राजांनीं जशी जगतांत संस्कृति पसरविली तशीच हल्लीं इराकानें स्वतंत्र वृत्ति पौर्वात्य राष्ट्रांत स्वकृतीनें पसरवावी अशी मी मनीषा दर्शविली. आभारप्रदर्शन, भेटीमुळें परस्परांना झालेला आनद, आदबीचे हस्तांदोलन इत्यादि शिष्टाचार झाल्यावर ही मुलाखत संपली.

## आरबी पत्रकारांचें मत

पण अलीबंधू व त्यांचे मूठभर अनुयायी यांना मिळणारी शेलापागोट्यांची परंपरा कोठें थांबते? "स्वतंत्र" नांवाच्या वर्तमानपत्राच्या संपादकांना भेटताच त्यांनीं "तुम्ही हिंदुस्थानाहून आलां काय?" असा प्रश्न केला. होकारार्थी उत्तर देतांच, "तुमच्या देशांतले मुसलमान असे वेड्यासारखें कां करतात ते सागाल का" म्हणून उत्कंठेनें विचारलें! हिंदूंशीं त्यांचा तंटा होतो, त्याचें कारण माशिदींपुढें वाद्यें वाजतात असें सांगतांच संपादक म्हणाले कीं, "वाद्यें वाजलीं म्हणजे तंटा कां व्हावा हें मला कळत नाहीं. बगदादमध्यें कितीतरी प्राचीन माशिदी आहेत. पण त्यांच्यापुढें वाद्यें वाजविण्याची मुळींच बंदी नाहीं. सर्व मिरवणुकींच्या वेळीं भररस्त्यावर असणाऱ्या मशिदीवरून देखील सर्व प्रकारचीं वाद्यें वाजवीत जातात. आमच्या प्रार्थनेंत व्यत्यय येत नाहीं किंवा मुसलमानांचे पित्तहि खवळत नाहीं! असें असतां हिंदी मुसलमानाना या खोड्या कां जडाव्या, ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे."

माशिदीपुढें वाद्यें वाजल्यामुळें मुसलमान चिडतात हें सांगितल्यावर संपादकमहाशयांना हसू आवरेना व ते म्हणाले, "खरोखर हिंदी मुसलमानांसारखे हटवादी तेच!"

अलीबंधूंच्या फाजील धर्माभिमानाबद्दलहि निर्देश ओघाओघानेंच आला! त्यांच्यासंबंधीं येथील पुढाऱ्यांनीं दिलेले मत स्पष्टपणें न लिहिलेलेंच बरें! येथल्यावर तरी त्यांचे प्रलाप आणि चेष्टा थांबतात कीं नाहीं ते पाहणें आहे. उपर्युक्त मुलाखतींत वस्तुस्थितीचें वर्णन केलें असून अलीबंधूंना मिळालेली शेलकीं विशेषणें प्रकट केलीं नाहींत. हिंदुस्थानांतील त्यांच्या पराक्रमाचें वर्णन इकडे वर्तमानपत्रांतूनहि येणें दुर्घट असल्यानें त्यांची खरी चहा होत नसावी!

# पुस्तक–परीक्षण

**श्रीमद्दयानंद**( नव–वैदिक धर्म अथवा आर्यसमाजाचा विवेचक इतिहास भाग १ ला )—(लेखक व प्रकाशक–सदाशिव कृष्ण फडके वकील, पनवेल जि. कुलाबा. कि दीड रुपया ) श्री. फडके यांनीं हिंदुस्थानांतील गेल्या शंभर वर्षांच्या धार्मिक खळबळींचा इतिहास लिहिण्याचें ठरवून त्याचा पहिला हप्ता सुमारें हजार पानाच्या 'नव–युग–धर्म' या ग्रंथाचे रूपानें मराठी वाचकांपुढें ठेवला त्याला वर्ष होऊन गेलें. या ग्रंथाचें मागें आम्ही सविस्तर परीक्षण केलेंच आहे. ब्राह्मसमाज हा इंग्रजी अमलाबरोबर येऊन ख्रिस्ती धर्मानें जी विचारक्रांति केली तिची पहिली दृश्य परिणति होती. ब्राह्मसमाजाची संस्थापना १८२८ सालीं झाली व त्याला १९२८ मध्यें बरोबर १०० वर्षें पूर्ण झालीं. धर्मविचारांतील खळबळ अजून चालूच आहे. पण या खळबळीचें पर्यवसान पूर्वीं नवीन पंथ अगर संप्रदाय काढण्यांत होत असे तसें आतां होत नाहीं. कारण हिंदु समाजाच्या व धर्माच्या परिस्थित्यनुसार संक्रमणशीलतेचा प्रत्यय या शंभर वर्षांत झालेल्या स्वाभाविक विचारपरिवर्तनामुळे आला. हिंदुधर्मच इतका व्यापक व परिवर्तनक्षम आहे कीं त्यांत नव्या कल्पनांचा प्रसार कालानुसार करतां येणें शक्य आहे असें अनुभवास आल्यावर नवा पंथ कोण काढील? सारांश, ज्या वेळीं नवे पंथ निघाले त्या वेळच्याप्रमाणें निराशाजनक व विन्मुख करणारी परिस्थिति आज हिंदुधर्माची व समाजाची नाहीं. म्हणून आज विघटक प्रवृत्तीऐवजीं संघटक प्रवृत्ति वाढून आजपर्यंत झालेला विभक्तपणाहि बुजवून टाकावा अशी योजना चालू आहे.

"हे अनुदार दुष्ट हिंदुधर्मा!" असें आज कोणी विचारी मनुष्य म्हणत नाहीं. "हे उदार हिंदुधर्माचा अनुदार अर्थ करणाऱ्या दुष्ट माणसा" असे त्याऐवजीं उद्गार ऐकूं येतात. अर्थात् उदार व खऱ्या अर्थानें आपला पुरातन धर्म टाकाऊ नाहीं. त्याचा समाजाच्या कांहीं भागानें विपरीत अर्थ केला. ही आजच्या वादाची भूमिका आहे. निराळी चूल मांडण्याऐवजी घरातच सत्ता गाजविण्याची ही आजची प्रवृत्ति आहे. कारण तशी आशा करण्याइतकें घरांतील व्यवस्थेत परिवर्तन झालेले आहे. आणि ही सत्ता मिळून आपल्या मनासारखी व्यवस्था

झाल्यावर पूर्वी रुसून बाहेर गेलेल्यांनाहि आंत घेण्याची आज तयारी आहे. किंवा त्यांनीं चालत येण्याऐवजीं घराचा क्षेत्रविस्तारच वाढून त्यांना जागच्या जागीं राहूनच परत आल्याचें श्रेय मिळेल अशी आशा आज करण्यासारखी परिस्थिति आहे. पूर्वी विघटन कां व कसें झालें, ज्यांनीं तें केलें त्यांचे हेतू, विचार व कल्पना काय होत्या, याची चिकित्सा करण्यास हीच योग्य व अनुकूल वेळ आहे. पूर्वी बाहेर जाण्याच्या वेळीं त्यांनीं रागारागानें फणफणत शिव्या देत पाय काढला. मग आज त्यांना जवळ बोलावतांना "वेडे आहां, आपली समजूत चुकीची झाली, असें नाहीं असें आहे" असें म्हणणें स्वाभाविकच आहे. तेंच फडके यांनीं निष्कारण भावनावश न होतां व विचाराची भूमिका न सोडतां नवयुगधर्मामध्यें ब्राम्हसमाज व देवसमाज यांना उद्देशून म्हटलें. "नवीन घर केलें तें तरी कोठे चांगले मनाजोगते झाले ? मग जुन्या घरांत येऊन इष्ट सुधारणा करण्यास काय हरकत?" असें म्हणतांना आवश्यक दोषदर्शन करणे प्राप्तच होतें. पण बोलूनचालून ते रुसलेल्याच्या परंपरेतले. त्यांच्यापैकीं कित्येकांस फडके यांचें लिखाण रुचले नाहीं. उदार विश्वधर्माचे अनुयायी इतक्याशा टीकेनें गरम झाले. फडक्यांवर दुष्ट हेतूंचा आरोप करूं लागले. वर्तमानपत्रांच्या नेहमींच्या धकाधकींत पडलेल्या मनुष्याला असल्या टीकांचें अतिपरिचया-मुळें कांहीं वाटत नाहीं. पण फडके हे सात्विक मनाचे व या धकाधकींत न पडलेले असल्यामुळें त्यांच्या मनाला या टीका बऱ्याच लागल्या असे त्यांच्या श्रीमद्दयानंद या पुस्तकांतील प्रस्तावने-वरून दिसतें. पण त्यांनींहि 'प्रतिपक्षाची टीका सहन करण्याइतका धिम्मेपणा' ठेवून आपलें कार्य अविचल मनानें पुरें करावें हेंच युक्त.

पुस्तकाला मिळालेल्या लोकाश्रयाचे बाबतींत लेखकाला काढावे लागलेले निराशेचे उद्गारहि हल्लींची अशा प्रकारच्या वाङ्मयाची स्थिति माहीत असलेल्यास आश्चर्यकारक वाटणार नाहींत. दरिद्री महाराष्ट्रांत वाङ्मय ही एक अगदीं शेवटीं अंगिकारण्यासारखी चैनीची वस्तू आहे. त्यांतल्या त्यांत धार्मिक इतिहासाकडे व एक हजार पानांच्या अवजड पुस्तकाकडे लोकांचा ओढा नाहींच. म्हणूनच असलीं पुस्तकें केवळ ग्राहक-वाचकांच्या आधारावर महाराष्ट्रांत कोणी प्रकाशित करूं म्हणेल तर तें होणार नाहीं. सरकार, संस्थानिक, ग्रंथोत्तेजक मंडळे इ. इकडून तिकडून मदत जमवूनच असल्या बहुतेक पुस्तकांचे प्रकाशन महाराष्ट्रांत चालू आहे. फडके यांना तो अनुभव नव्हता इतकेंच. नवयुग-धर्मांतच त्यांनीं १ राममोहन राय २ देवेंद्रनाथ व रवींद्रनाथ ३ केशवचंद्र सेन व ४ शिवनाथ आणि सीतानाथ असे सुटसुटित विभाग स्वतंत्र बांधून विकावयास काढले आहेत व आर्यसमाजाच्या बाबतींत तर प्रारंभींच १ दयानंद २ आर्यसमाज व ३ आर्यमतसमीक्षा असे तीन भाग स्वतंत्र काढण्याचें ठरवून दयानंदचरित्राचा हा पहिला खंड प्रसिद्ध केला आहे. वस्तुतः पूर्वी त्यांनीं योजलेल्या क्रमानुसार प्रार्थनासमाजाकडे त्यांनीं वळावयास पाहिजे होते. पण प्रार्थनासमाजाचा इतिहास नुकताच मराठींत श्री. वैद्य यांनीं प्रसिद्ध केला असल्यामुळे ते आर्यसमाजाकडे वळले.

ब्राह्मसमाजाप्रमाणेंच आर्यसमाजाचाहि त्यांनीं जिज्ञासाबुद्धीनें व कसोशीनें अभ्यास केला. खुद्द दयानंदांचे ग्रंथ, त्यावरील आर्यसमाजी पंडितांचीं भाष्ये, आर्यसमाजिस्टांनींच लिहिलेले त्यांच्या समाजाचे इतिहास व चरित्रग्रंथ यांचें त्यांनीं बारकाईनें परीक्षण केलें व पूर्वी ब्राह्मसमाजाच्या बाबतींत त्यांनीं विद्यमान प्रमुख ब्राह्मसमा-जिस्टांना आपल्या शंका विचारून उत्तरें मागविलीं, त्याप्रमाणेंच त्यांनीं आर्यसमाजाच्या बाबतींतहि केलें व शक्य तितकी माहिती मिळविली. पुस्तकाच्या खपाच्या दृष्टीनें त्यांनीं तीन भाग करण्याची युक्ति काढली हें तर ठीकच. पण त्या-शिवाय त्यांनीं आणखीहि लहान लहान भाग करण्याची युक्ति अमलांत आणावी. या कामीं प्रत्येक प्रकरणाला निराळी पृष्ठसंख्या देण्यानें चांगली सोय होते. 'आर्यसमाज' या पुढील भागांत दयानंदानंतर झालेल्या थोर आर्यसमाजिस्ट पुरुषांचीं चरित्रे लिहावी लागतील. त्यांची पृष्ठसंख्या निर-निराळी ठेवल्यास तीं लहान लहान स्वतंत्र चरित्रें म्हणून बाजूला काढतां येतील. श्री. केशव सदाशिव केळकर यांनीं नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या तुकाराम-बुवांच्या आत्मचरित्राचे असेच विभाग करून निरनिराळीं पुस्तकें छापलीं आहेत. मराठी वाचक-वर्गाची सध्याची अभिरुचि व एकंदर जाणत्या महाराष्ट्राचें दारिद्र्य हीं लक्षांत घेतां चांगल्या पुस्तकांच्या प्रकाशकांनीं अशा कांहीं युक्त्या केल्या-खेरीज सोय नाहीं.

असो. आर्यसमाजाचें विवेचन करावयाचें तर मूळ त्याचे संस्थापक महर्षि स्वामी दयानंद यांची समग्र माहिती दिली पाहिजे. ती या पुस्तकांत फार चांगल्या रीतीनें संकलित केली आहे. दयानंदांचें चरित्र उद्बोधक तर खरेंच. पण ते अद्भुतहि आहे. दयानंदांनीं आपल्या पंथाची जी रचना केली त्या रचनेंत परिस्थित्यनुरूप भाग म्हणून केलेली रचना कोणता व किती, त्यांच्या विशिष्ट स्वभावामुळें बनलेली किती व शिक्षणादि बाह्य

संस्कारानें परिणत झालेली कोणती याचे धागे उलगडणें कठाण आहे. या तीनहि गोष्टींचा त्यांच्या मंतव्यावर परिणाम झाला असला पाहिजे हें निश्चित असलें तरी वरील धागे उलगडण्याचें काम अत्यंत बारकाईचें व कुशलतेचें आहे. आणि त्या बाबतींत दुमत होण्याचा संभव फार. ब्राह्मसमाजसंस्थापकांच्या प्रचंड बुद्धिमत्तेचा व महत्त्वाकांक्षेचा आचंबा वाटतो. पण त्याहूनहि दयानंदाची धडाडी, दुर्दमनीय लढाऊ वृत्ति आणि त्यांच्या आयुष्यातील वैचित्र्य हे अधिक आश्चर्यजनक होय. ग्रंथकारानें आपल्या भूमिकेंत म्हटल्याप्रमाणें " स्वामी दयानंद याचा जन्म काठेवाडांत मोरवी संस्थानांत टंकारा येथें, त्यांचा दयानंद-सरस्वती ह्या आश्रमांत अवतार नर्मदेच्या कांठीं चलोदर येथे, त्यांची अखेरची गुरुदीक्षा मथुरेत, त्यांच्या पहिल्या समाजाची स्थापना मुंबईस, त्यांची अखेरची आशा उदेपुरांत तर निर्याण अजमीरांत व त्यांचा जास्त संचार पंजाबापेक्षांहि संयुक्त प्रांतांत, तर त्यांच्या सांप्रदायिकांचा मुख्य जोर पंजाबांत असा विलक्षण योगायोग दिसतो. " " बरे, ग्रंथनिष्ठेचा प्रकार पाहिला तर तोच आहे. दयानंद मूळ सामवेदी, पण त्यांचा बालाभ्यास यजुर्वेदाचा, प्रौढपणीं परीक्षण ऋग्वेदावर, आस्था अथर्ववेदाची आणि गुरुपरंपरा वैय्याकरणी ! "

प्रस्तुत पुस्तकांत दयानंदांचें चरित्र व मंतव्य हेंच मुख्यतः सांगावयाचें असल्यामुळे दयानंदांच्या पंथाच्या रचनेतील कार्यकारण भावाचा सूक्ष्म विचार त्यांत केला नाहीं. तो शेवटच्या शेवटच्या ' समीक्षे ' च्या भागांत लेखक करणार आहेत. पण हें जे काम पुढे लेखक करणार आहेत त्याची दिशा त्यांनीं आगाऊ सूचित केली आहे ती अशी—" आर्ष ग्रंथ आणि प्राचीन ऋषि याशिवाय तूं कोणासच प्रमाण मानूं नकोस ही गुरुजींची शिकवण, आणि पाश्चिमात्य संस्कृति आणि भौतिक

विज्ञान या छाप टाकण्याची दयानंदांची महत्त्वा-
कांक्षा, गां मिलाफ दयानंदांच्या लोकसंग्राहक
बुद्धींत है न त्या त्रिवेणीसंगमांत आर्यसमाज
मूर्तरूपास ाला " याचें विवेचन ग्रंथकार शेवटच्या
भागांत क ील तेव्हां अधिक खुलासा होईलच.
पण आ या मतें ग्रंथकार हे परिस्थितीपेक्षां
व्यक्तिगत रणांना अधिक महत्त्व देत आहेत कारण
दयानंदांचे दप्रामाण्य हे केवळ गुरुजीच्या शिकवणी-
वरून आले असेल असें वाटत नाहीं. वेदविरोधी गोष्टी
ज्यांत अस ाल ते ग्रंथ ' विदयुक्त अन्ना ' प्रमाणें
त्याज्य ठ वणे. वेदात अंकगणित, बीजगणित,
भूमिति, हत्वाकर्षण, इंजिनें, विमानें इ. सर्व
शास्त्रांची ाजें आहेत हे प्रतिपादन, व अग्नि,
वरुण, इंद्र म, विष्णु, वायु इ. वेदांतील नांवें
एकाच प श्वराचीं वाचक आहेत हें दाखविण्याचा
यौगिक प ीच्या जोरावर खटाटोप व यज्ञानें हवा
शुद्ध होते प्रतिपादन हें सर्व गुरूपदिष्ट अगर
गुरूपदेश- वत असें म्हणण्यापेक्षां परिस्थितिप्रेरित
असेंच म्ह ग अधिक सयुक्तिक दिसतें. वेद निर्भ्रांत
स्वतःप्रमा सत्य आहेत हें म्हणणें गुरूपदिष्ट
असेल. प या वेदप्रामाण्याचें बाकीचें समर्थन
हें परिस्थि प्रेरित दिसतें. ख्रिस्ती व मुसलमान
यांचा एके ्री मतावर जोर व त्यांनीं हिंदुधर्मांत
एकेश्वरत्व ाहीं असा उत्पन्न केलेला गैरसमज
याला ता ूणून यौगिक पद्धतीचा खटाटोप दिसतो.
वदप्रामा ा दयानदांनीं दिलेलं आत्यंतिक स्वरूप
ख्रिस्ती वशेषतः मुसलमान यांच्या अनुक्रमें
बायबल कुराण-प्रामाण्याला तोडीस तोड म्हणून
उभारलें दिसतें. आणि दयानंदांची भौतिक
विज्ञानाव छाप टाकण्याची महत्त्वाकांक्षा होती
असें म्ह यापेक्षां भौतिक विज्ञानाने आकर्षित
केलेल्या ाक्षितांवर छाप टाकण्याची होती असें
म्हणणेंच धिक युक्त होईल. त्याचप्रमाणें प्रार्थना-
समाज व ब्राह्मसमाज यांनीं ज्या हेतूनें अद्वैत बाजूला
सारलें प हेतूनें दयानंदांनींहि अद्वैत बाजूला
सारलेले ोते. ( अपूर्ण )

# कै. दे. भ. लाला लजपतराय यांचा अमेरिकेंतील जीवनक्रम

( लेखक-**ना. सु. हर्डीकर, हुबळी.** )

**लेखांक ९ वा**

## खेडेगांवांत

न्यूयॉर्कसारख्या गजबजलेल्या शहरांत आठनऊ महिने सतत काम करून दमल्याभागलेल्या जीवास थोडी तरी विश्रांति मिळावी म्हणून आम्ही उन्हाळ्यांत एखाद्या टुमदार खेड्यांत लहानसा बंगला भाड्यानें घेऊन तेथें जाऊन राहत असूं. त्या ठिकाणी शांत चित्तान राहून मनास आल्हाद देत असतांनाच पुढील कार्यक्रमाचा विचार करावयास आम्हास बरीचशी फुरसत मिळे. विश्रांति घेण्याच्या उद्देशानें जरी आम्ही न्यूयॉर्क सोडून एकीकडच्या निवांत स्थळीं येऊन राहात होतों, तरी 'विश्रांति' याचा अर्थ 'निरुद्योगीपणा' असा मात्र नव्हे. विश्रांति म्हणजे कामाचें स्वरूप बदलणें असे लालाजी मला वारंवार सांगत, व त्याप्रमाणें ते स्वतः वागतहि. पहांटे उठून नित्याचें वाचन व पठन करणें, स्वयंपाकाची सर्व तऱ्हेची तरतूद करणें, घराच्या आजूबाजूची व घरांतील स्वच्छता राखणें, भांडी घासणें, कपडे धुणें, वगैरेसारखीं नित्याचीं कामें नियमानें करण्यास लालाजी विश्रांतीच्या ठिकाणींहि कधीं विसरत नसत. घरीं असतांना अमेरिकन पोषाकाऐवजीं हिंदुस्थानी पोषाक ते करीत व ढुंगणाभोंवतीं एखादें पचा--वजा लहानसें धोतर गुंडाळून घेऊन उन्हाच्या प्रखर तापानें तापलेल्या आपल्या देहास विजेच्या पंख्यानें उत्पन्न झालेल्या वाऱ्याच्या झुळुकांचा आराम देत देत स्वतःचें काम पार पाडीत असत. निर्मळ व सरळ मनाच्या त्या थोर पुढाऱ्यास आपल्याचप्रमाणें निर्मळ व मोकळ्या अंतःकरणाचे सहकारी मित्र मिळविण्याची फार हौस असल्यामुळे ते न्यूयॉर्कमधील आपल्या हिंदी व अमेरिकन मित्रांस आठवड्यांतून एकदां तरी येण्यास आग्रहानें सांगत व त्यांचे आगमनापासून त्यांस अत्यंत आनंदहि होत असे.

### शिकविण्याची पध्दत

लालाजी रोज सकाळ---सायंकाळ दूर अशा निर्जन प्रदेशीं सहल करण्यास जात असत. बहुतेक सर्व खेपेस ते मला घेतल्याशिवाय बाहेर गेले नाहींत. अशा प्रकारें फिरावयास गेलों असतां हिंदी लोकांच्या स्थितिगती-विषयीं बोलणें होई. त्या वेळीं ते अत्यंत मोकळेपणानें माझ्या प्रश्नांचीं उत्तरें देत व मला हिंदी राजकारणाविषयीं व ते चालविणाऱ्या पुढाऱ्यांच्या जीवनक्रमाविषयीं माहिती करून देत. मला लालाजींचा सहवास लाभण्यापूर्वी माझ्या मातृभूमीविषयीं विशेषशी माहिती नव्हती. माझ्या अज्ञानाची मला स्वतःला जाणीव झाली होती व माझी मलाच कीव येत असे. आणि म्हणूनच लालाजींच्या ज्ञानाचा त्यांच्या सहवासांत राहून पूर्ण फायदा घ्यावयाचा असें मी ठरविलें होतें. सहल करावयाच्या प्रसंगीं आमच्या संभाषणास व्यत्यय आणण्याजोगी मंडळी आम्ही सहसा बरोबर घेऊन जात नसल्यामुळे लालाजींस हिंदी पुढाऱ्यांचे गुणदोष नीट समजावून सांगण्यास अवसर मिळे. हिंदुस्थानाच्या निरनिराळ्या प्रांतांचें वर्णन करून त्या त्या प्रांतांतील लोकांची तुलना करून ते सांगत असत. "बंगाली लोक भावनाप्रधान असून प्रांताभिमानी आहेत, मद्रासी शहाणे जरी असले तरी ते अनुकरणप्रिय होत; महाराष्ट्रीय चारित्र्यवान असून कावेबाज आहेत; पंजाबी जनता फाजील मोकळ्या मनाची (Brutally frank) पण चंचल वृत्तीची आहे." अशा तऱ्हेनें निरनिराळ्या लोकांचें ते वर्णन करीत आणि सहज हंसून विचारीत "पंजाबी लोकांच्या माझ्या वर्णनाप्रमाणेंच मी स्वतः नाहीं काय?"

### पुढाऱ्यासंबंधीं मतें

राजकारणी पुढाऱ्याविषयीं बोलत असतांना "टिळक हे अत्यद्भुत धोरणी मुत्सद्दी व असामान्य बुद्धिमत्तेचे एक पुढारी आहेत. इंग्लंड---अमेरिकेसारख्या एखाद्या स्वतंत्र देशांत ते जन्मले असते तर एव्हांना कैक वेळां ते त्या देशांतील उच्च पदावर आरूढ झाले असते. पण दुर्दैव त्यांचें! पारतंत्र्यात खितपत पडलेल्या अशा एका देशांत त्यांचा जन्म झाला की ज्या ठिकाणी त्यांच्या गुणाचे चीजहि होत नाहीं" असे ते म्हणत. यंग इंडिया या नावाच्या आपल्या पुस्तकांतील Typical Nationalist या प्रकरणांत वर्णन केलेल्या तीन व्यक्तींची, अरविंद घोष, हरदयाळ, व बॅरिस्टर सावरकर यांची, त्यांस वारंवार आठवण होऊन ते म्हणत "पाहा, हरदयाळाच्या मनोवृत्तीचें माझे

वर्णन किती खरें ठरलें ! अत्यंत चंचल वृत्तीचा मनुष्य केव्हां काय करील हें सांगणें कठीण. अशा तऱ्हेच्या पुढाऱ्यांकरवीं आपण सुसंघटित कार्याची अपेक्षा केली तर ती सफळ होईल काय ?" प्रांताभिमानहि पाहिजे व भाषाभिमानहि पाहिजे. पण राष्ट्रकार्यांत एककल्लीपणा मात्र असतां कामा नये. हिंदुस्थान हें एक राष्ट्र असून त्या राष्ट्राचे आपण एक घटक आहोत ही गोष्ट ध्यानांत ठेवून त्यांस साजेल इतका प्रांताभिमान व भाषाभिमान असला म्हणजे पुरें असे ते वारंवार म्हणत. पुढाऱ्यामधील दोष अथवा उणीवा स्पष्टपणे समजावून सांगितल्यानंतर ते उपदेश करीत कीं, "पुढाऱ्यांच्या उणीवाकडे किंवा दोषाकडे तुम्हीं बिलकुल पाहूं नका. प्रत्येक मनुष्यांत कांहीं तरी दोष हे असतातच. जसे त्याच्यांत तसेंच आमच्यात. कर्त्यांच्या चांगल्या गुणाकडे लक्ष द्यावें व तेवढेच घेण्याकरितां प्रयत्न करावा. अमुक एक पुढारी दारूबाज आहे म्हणून, अथवा दुसरा एखादा अन्य तऱ्हेच्या व्यसनांनीं किंवा स्वार्थानें पछाडला आहे म्हणून, तो सर्वथा त्याज्य असे समजूं नये. व्यसनी असूनहि राष्ट्रकार्यांत थोडा तरी आपला देह झिजविण्यास जो कार्यकर्ता तयार असतो त्याचा तेवढाच गुण घ्यावा आणि राष्ट्राचें कार्य घडवून आणावें. त्याच्या राष्ट्रीय वृत्तीकडे पाहावें. हिंदी जनतेनें आपली पारतंत्र्यशृंखला तोडून टाकावी म्हणून ते जो प्रयत्न करतात त्या प्रयत्नाकडे लक्ष द्यावें आणि इतर सर्व दोषांकडे दुर्लक्ष करावें. पुढाऱ्यांत अशीं व्यंगें असणें साहजिकच आहे. त्यामुळे पुढाऱ्यांविषयीं लोकांची मनें दूषित होतातहि परंतु तुमच्यासारख्या कार्यकर्त्यांच्या मनात या गोष्टींना बिलकुल थारा मिळतां कामा नये." असे लालाजी आम्हास बजाविल्याशिवाय राहत नसत.

## करारी स्वभाव

सहल करतांना देखील लालाजींचा करारी स्वभाव केव्हां केव्हां प्रकट होई. एकदां पुढे घातलेलें पाऊल ते मागे घेत नसत. "लालाजी, आपण चाललेली वाट अवघड आहे, समोर उंच टेकडी, व अवघड वाट असल्याकारणानें आपण इकडून न जातां पलीकडच्या वाटेनें जाऊं" अशा आमच्या म्हणण्यास त्यांनीं, 'एकदां ही वाट धरली आहे. ती कठीण असो अथवा नसो, तीच धरावयाची. या रस्त्यानेंच पुढे जावयाचें. मी म्हातारा झालो म्हणून काय झालें ? माझ्यांत तुझ्यापेक्षांहि जास्त ताकद आहे' असें उत्तर द्यावें व धिमेपणानें वाट चालू लागावें, असें अनेकदां झालें आहे. निमूटपणें आम्ही त्यास पुढे जाऊं द्यावे व त्यांचेमागून त्यांस संभाळून घेत घेत आम्हीहि जावें. एकदां त्यांचा स्वभाव समजल्यानंतर आम्हीच प्रथम सोपा मार्ग शोधण्यास सुरुवात करीत असूं आणि त्या मार्गानें येण्यास त्यांस विनंति करीत असूं.

# इराणांतील रॉकेलचा कारखाना

" किंसुखमप्रवासगमनम् " असें भर्तृहरीनें कां म्हटलें असावें हें बसऱ्याहून इकडे येतांना उत्तम प्रकारें मनावर बिंबलें ! बसरा व आबादान यांमधील अंतर फार तर पन्नास मैल असेल नेहमीं मोटारींची जा-ये चालू असते; तरीहि त्रास व अडचणींनींच मनुष्य बेजार होतो. याचें कारण म्हणजे ही दोनहि गांवें भिन्न भिन्न राज्यसत्तेखालीं आहेत हें होय. इराकी राज्यांत बसरा शहर मोडतें व आबादान इराणी अमलांतलें आहे. इराणामध्यें कोणाहि प्रवाशास इराकांतील शहराहून जाणें झाल्यास देवी काढल्याचा व प्लेगची लस टोंचून घेतल्याचा असे दोन दाखले मिळवावे लागतात. थोडक्यात सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, देवी काढवून घेऊन इनॉक्युलेशनहि करून घ्यावें लागतें ! हें विकतचें दुहेरी श्राद्ध फुकटांत पदरांत पडत हीं त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे. पण लस टोंचतांना आप याकडे जितक्या काळजीपूर्वक रीतीनें स्वच्छतेची खबरदारी ठेवला जाते तितकी इकडील प्रांतीं घेत नाहींत असें दिसतें. उदाहरणार्थ, प्लेगची लस टोंचण्यापूर्वीं पिचकारी व सुई उकळत्या पाण्यांत किंवा स्पिरीटमध्यें धुवून घेण्याऐवजीं ती डेटॉल किंवा फेनाईलनें इतरत्र धुतात. परंतु ही दक्षता बसऱ्यास मुळींच बाळगली गेली नाहीं. उलट गंजलेल्या सुया उपयोगांत आणाव्या लागल्या ! महाराष्ट्रांत व कर्नाटकांत पूर्वीं प्लेगचे वेळीं उडालेल्या कहरासहि कारण अशा प्रकारचा निष्काळजीपणाच होता हें ठाऊक असल्यानें आपणावरहि काय प्रसंग येईल कोण जाणे अशा भीतानेंच दोनतीन दिवस मी ग्रस्त होतों. सुदैवेंकरून कांहींहि झालें नाहीं.

दोनहि दाखले मिळवून इराकी अधिकाऱ्यांकडे गेल्यावर त्यांनीं इराणांत जाण्यासाठीं इराक सोडण्याची परवानगी दिली. पण इराण-सरकारची संमति असल्याविना त्या परवान्यास किंमत नाहीं. म्हणून इराणी वकिलाचा त्यावर शिक्कामोर्तब मिळविला. दोनहि वेळेस अर्थातच सरकारला 'दक्षिणा' ही द्यावी लागलीच. इतकें होऊनहि भागलें नाहीं. मोटारींतून प्रवास करीत

असतां प्रथमतः इराकी सरकारचे व नंतर इराणी सरकारचे अधिकारी येऊन त्यांनीं सामानसुमान उघडून पाहून पासपोर्टवर आपापल्या सह्या केल्या.

## बसरा ते आबादान

बसऱ्याहून आबादानाला जाण्याचे रस्ते दोन. एक शट-अल-अरब नदींतून होड्यांतून जाण्याचा आणि दुसरा भूमार्गानें मोटारींतून जाण्याचा. दुसरा मार्ग सोयीचा आहे. कारण तो प्रवास त्वरेनें आटपतो. परंतु त्रास इतकाच कीं दोनदां नदी ओलांडावी लागते. आबादान हें बेट आहे. बसऱ्याहून नदीपार होऊन दुसऱ्या तीरीं आल्यावर मोटारींत बसून मोहोमेऱ्यास जावयाचें. हा सुमारे २५ मैलांचा प्रवास अत्यंत रुक्ष अशा वाळवटांतून करावा लागतो. मृगजळानें हरिणांची तर फसवणूक होईलच, पण अगदीं ज्ञानी मनुष्येंहि त्या आभासाला भुलतात हें आश्चर्य! इतकें हुबेहूब जलसंचय दृष्टीस पडतात. नदीकडे न पाहतां इतर कोणत्याहि दिशेला पाहिलें तर अगदीं सपाट मैदान आढळेल. एक हिरवी गवताची काडी देखील दृष्टिपथांत यावयाची नाहीं. मग वृक्षराजींची गोष्ट कशाला? हे रण उन्हाळ्यांत रखरखीत वाटतें आणि पावसाळ्यांत नेहमीचा चोखाळलेला रस्ता सोडून दुसरीकडे गेल्यास 'महापंके निमग्न' झालेल्या कर्पूरतिलकाप्रमाणें अवस्था होते. या चिखलांत उंटाच्या उंट गडप होतात असें सांगतात! मोहोमेरास आल्यावर पुनः शट-अल-अरब ओलांडून आबादान बेटांत प्रवेश करावयाचा व मोटारमधून मुक्कामीं यावयाचें असा हा चढ–उताराचा प्रवास आहे. नदीवर पूल कोठेहि नसला तरी लहानमोठ्या होड्या इकडून तिकडे सारख्या येरझारा घालीत असल्यानें कालक्षेप न होतां पैलतीरीं जातां येतें.

## निळ्या आकाशांत काळा धूर

इराणांत घासलेट तेलाचा सांठा विपुल आहे आणि तें खणून काढून शुद्ध करण्याचें काम एका विलायती कंपनीस मिळालें आहे. त्या सर्व प्रचंड कारखान्याचेंच गांव म्हणजे आबादान होय. अँग्लो–पर्शियन ऑईल कंपनीच्या कारखान्यामुळेंच आबादान हें गांव वसलें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. कारण आबादानाची वस्ती सुमारें ७०,००० असून ती बहुतेक सर्व त्या कंपनीच्याच कामगारांची व त्यांच्या कुटुंबांतील मंडळींची आहे.

आगबोटींतून आबादानाकडे पाहिलें म्हणजे एका मोठ्या औद्योगिक शहराजवळ आपण आहोंत असें वाटतें. काळा धूर निळ्या आकाशांत सदैव सोडणाऱ्या काळ्या उंच चिमण्या आणि तेलाच्या मोठमोठ्या गोल टांक्या इतकेंच काय तें दुरून दिसतें. भूमातेच्या गळ्यांत हा लोखंडी शृंगार-साज बिडाच्या मोठ्या नळांत ओवून घातला आहे अशी कल्पना एखाद्या कवीची त्या प्रचंड टांक्या व त्यांना जोडणारे नळ पाहून होईल. मुंबईला वाडी बंदराच्या बाजूस जसे रॉकेल तेलाचे विस्तृत हौद आहेत तसे तीनशेंहून अधिक हौद एकट्या आबादानाच्या कारखान्यांत आढळतील! सुमारें ३६ चिमण्या आपल्या तोंडांतून काळा धूर फुंकत असलेल्या पाहून कोणासहि हा कारखाना पाहाण्याची उत्कट इच्छा होते.

## कारखान्यांत प्रवेश

या अवाढव्य विस्ताराच्या औद्योगिक शहरांत सुमारें दीड हजार हिंदी लोक आहेत. मुख्यतः "बाबू" लोक म्हणजे कारकून यांचा भरणा जास्त. कांहीं मजूरहि आहेत. हिंदी वस्तींत निमगोरेच अधिक असले तरी हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांताचा व प्रत्येक भाषेचा नमुना आबादानामध्यें पाहावयास मिळतो. महाराष्ट्राच्या वांट्यास आलेली मंडळी हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीच आहेत. याचें कारण आमची घरकोंबडेपणाची वृत्ति असावी.

कारखान्याची सर्व व्यवस्था इंग्रज अधिकाऱ्यांच्या हातांत असल्यानें आणि सध्या रशियाच्या लाल निशाणास जॉन बुल बुजत असल्यानें प्रेक्षकांना प्रवेश मिळणें जवळजवळ दुरापास्तच होतें! कांहीं दिवसांपूर्वी रशियन बोल्शेव्हिकांचा उपद्रव येथेंहि सुरू झाल्याचें दृष्टोत्पत्तीस आल्यापासून कामगारांनाहि कामावर जाण्यासाठीं परवाने दाखवून आंत जावें लागतें. अशा कडक निर्बंधामुळें हा अफाट कारखाना पाहण्यास मिळेल कीं नाहीं याची शंकाच होती. पण श्री. न. चिं. केळकरांचे एक निस्सीम चहाते आणि वाङ्मयप्रेमी महाराष्ट्रीय सद्गृहस्थ त्या कारखान्यांत मोठ्या हुद्द्याचे जागीं असल्यानें त्यांच्या खटपटी-मुळें कारखाना पाहण्यास परवानगी मिळाली; इतकेंच नव्हे तर दोन अधिकारी बरोबर देऊन फोटो घेण्याचीहि खास अनुज्ञा 'केसरी'च्या प्रतिनिधीस मिळाली. ही गोष्ट अगदीं अपूर्व अशी असल्याचें तेथील कित्येक अधिकाऱ्यांनीं बोलूनहि दाखविलें!

## रॉकेल कोठून येतें?

आपलें नित्योपयोगाचें घासलेट तेल खाणींतून निघतें हें आतां बहुतेकांस ठाऊक झालें आहे. आबादानापासून १५० मैलांवर मसजिद-इ-सुलेमान या ठिकाणीं व आसपास तेलाच्या पुष्कळ विहिरी आहेत. पाण्याच्या मोकळ्या व उघड्या विहिरी-प्रमाणें या तेलाच्या खाणी खणणें इष्ट नसतें. एक तर आंतील तेल जोरानें उसळी मारून वर आल्यानें आजूबाजूस उडून फुकट जातें आणि दुसरें महत्त्वाचें कारण असें कीं, आगीची फार भीति असते. तेल ज्वालाग्राही असावयाचेंच, पण तेलाबरोबरच

अनेक प्रकारचे वायु भूगर्भांतून बाहेर पडतात. ते विशेष ज्वालाग्राह्य असतात. म्हणून घासलेट तेल हें बंद केलेल्या ( टयूबवेल्स ) नलिकाकूपामधून पंपानें उपसून काढतात. उत्तम वाकबगार पानाडे विहिरीस पाणी कोठें लागेल हें सांगण्यांत पटाईत असतात तसेंच इकडे 'तेलाडे'हि असतात आणि त्यांच्या मागण्यावरून विहीर खणण्यास प्रारंभ होतो.

इराणाच्या भागांत विपुल तेल सापडेल असें भूगर्भवेत्ते म्हणत. इ. स. १८७२ पासून एका साहेबानें या तेल–खाणी शोधून काढण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न करून पाहिले. परंतु विहिरींत तेलाचे झरे न आढळतां पाण्याचेच झरे लागले. त्याचा प्रयत्न निष्फळ झाल्यावर इ. स. १९०१ मध्यें दुसरा भांडवलवाला आपलें नशीब बलवत्तर आहे कीं नाहीं ते पाहण्यास आला. त्यानें ६० वर्षांचा करार करून पृथ्वीच्या पोटाला भोकें पाडून पाहाण्यास सुरवात केली. सात वर्षांच्या प्रयत्नानंतर मसजिद–इ–सुलेमान येथें एक मोठें भोंक जोरानें कारंजें उडून आंत पुष्कळ तेलाचा सांठा असल्याचें कळलें.

इराणी राज्यांत नैसर्गिक रीत्या सांपडणाऱ्या या तेलाचा योग्य तो उपयोग इराणी राज्यास व्हावा आणि इराणी प्रजेचेंहि हित व्हावें या उदात्त हेतूनें प्रेरित होऊन 'जगाच्या कल्याणाचा' मक्ता घेणाऱ्या इंग्रजांनीं एक कंपनी स्थापन केली! तिचें नांव 'अँग्लो-पर्शियन ऑइल कंपनी लिमिटेड' असें आहे. कोट्यावधि रुपयांचे भांडवल गोळा करून खाणींवर पप बसविण्यांत आले, नवीन विहिरी खोदल्या गेल्या आणि खाणींतून निघणाऱ्या तेलाची फायदेशीर विल्हेवाट लावण्याची योजना आंखली गेली.

## रॉकेल तेल कसें होतें ?

खाणींतून आलेलें तेल हिरवट काळसर असून दाट असतें. तें प्रथमतः तापवून मग त्याचे निरनिराळे प्रकार करतां येतात. मसजिद-इ-सुलेमानपासून तेल कोठें न्यावें हा प्रश्नच होता. कारण तेलाच्या शुद्धी-करणासाठीं पाणी विपुल लागतें आणि विलायतेस तें तेल रवाना करण्यासाठीं कांहीं तरी सोय करावी लागे. तेव्हा शट-अल-अरब या नदीच्या काठीं आबादान हें शहर पसंत करण्यांत येऊन या ठिकाणीं अत्यंत विस्तृत असा कारखाना बांधण्यांत आला. खाणींतून आलेलें दाट तेल तापविलें कीं त्यांतील गाळ खालीं बसतो. पातळ काळसर राहिलेलें तेल म्हणजे आपणाकडे मिळणारें क्रूड ऑईल. आगबोटींत किंवा आगगाड्यांत हेंच जाळून उष्णता उत्पन्न करतात. तसेंच ऑईल इंजिनांतील क्रूड ऑईल वापरण्याचा प्रघात बहुतेकजणांस विदित असेल. (ॲडमिरल्टी फ्युएल) नाविक ज्वलन म्हणून हें इंग्रजी बाजारपेठेत ओळखलें जातें.

या तेलाच्या वरची पायरी म्हणजे नेहमींचें घासलेट तेल; आणि त्याच्याहि वरचें पेट्रोल. या मुख्य भांवडांमध्यें आणखी किती तरी प्रकार आहेत. पण मुख्य मुख्य तेवढेच आपणास पाहावयाचे आहेत. खाणींतून आलेलें घट्ट तेल उष्ण केलें म्हणजे त्यांतून कांहीं वायू बाहेर निघतात. त्याचा उपयोग पेट्रोल करण्याकडे विशेष होतो. ते वायु थंड केले कीं बेंझीम म्हणून एक महत्त्वाचें द्रव्य तयार होतें.

नुसतें उष्ण केल्यानें शुद्ध घासलेट मिळणें कठीण असतें. त्यासाठीं त्या घासलेटावर पुष्कळ संस्कार करावे लागतात. एक प्रकारच्या विशिष्ट वाळूंतून तें गाळून काढलें म्हणजे अगदीं स्वच्छ होऊन त्यांतील सांचलेली घाण निघून जाते. पेट्रोल, हि अनेक औषधींच्या साहाय्यानें धुवावें लागतें व नंतरच तें विक्रीस योग्य होतें.

ही क्रिया थोडक्यांत लिहून झाली खरी. पण ती घडवून आणणें अतिशय दगदगीचें काम आहे तेल तापवितांना त्याचें उष्णतामान सारखें ठेवावें लागतें व विनाकारण उष्णता फुकट न जाईल अशी व्यवस्था करणें फायदेशीर असतें. शिवाय थंड पदार्थास प्रथम तापवून नंतर पुनः वायु सोडून थंड करणें या क्रिया आवश्यक असल्यानें 'आंचळाचें दूध आंचळांस लाव-ण्याची' कमी खर्चाची युक्ति अमलांत आणणें हितावह होतें म्हणून अगदीं आधुनिक शास्त्रीय उपाय अमलांत आणण्यासाठीं शास्त्रज्ञांचा तांडा सारखा पोसावा लागतो. इतकेंहि करून आगीची भयंकर भीति असते. त्यासाठीं दक्षता बाळगावी लागते ती निराळीच!

विदेही जनक राजाची अशी गोष्ट सांगतात कीं त्याचा एक पाय अग्नींत असून दुसऱ्या पायास तूप चोळीत असत. अशाच प्रकारचें पण जनकावरहि ताण करणारें एक यंत्र रॉकेल तेल धुण्यासाठीं उपयोगांत आणलें जातें. जर्मन शास्त्रज्ञांनीं ह्या साधनाचा शोध नुकताच लावला असून तसल्या तऱ्हेचें यंत्र पृथ्वीवर एकच आहे व तें जर्मनींत. तेव्हां येथेंहि असें अद्वितीय यंत्र आणून बसविणारे व चालविणार जर्मन आहेत. आपल्याकडे मद्रासी लोकांनीं जमा-खर्चाच्या कामाचा जसा कांहीं मक्ता मिळविलेला दिसतो तसाच सर्व जगतांत शास्त्रीय प्रगतीचें अग्रेसरत्व शार्मण्य देशीयांना परमेश्वरानें दिलेलें आहे. या यंत्राच्या एका भागावर बर्फाचा जाडा थर असतो तर दुसरे बाजूस जळजळीत व उष्ण वारा सोडणारें पातळ द्रव्य असतें. घासलेट तेल या पद्धतीनें अत्यंत थोड्या खर्चानें धुवून निघतें. या

यंत्राचा विस्तार मोठा असून गंधकाचा उपयोग यांत केला जातो म्हणून तें पाहण्यास गेल्यावर घशाला त्रास होऊन ठसके लागतात. तेथील धूर विषारी असल्यानें नवशिक्यास फार वेळ राहूं देत नाहीं. जर्मनीनें "विषारी धूर" म्हणून जो वायु गेल्या महायुद्धांत उपयोगांत आणला होता त्यासारखाच हा धूर आहे असें म्हणतात.

## तेल भरण्याचे डबे

यांत्रिक कलेची पूर्णता झालेली पाहावयाची असल्यास रॉकेल भरण्यासाठीं पांढरे चौकोनी डबे करतात ते खातें पाहावें. चापट पत्रा घेऊन त्याचे पाहिजे त्या आकाराचे तुकडे कापून त्यावर शिक्का मारून त्याचा डबा बनविण्याचें काम यंत्रें अगदी अचूक आणि त्वरेनें करतात. माणसांनीं फक्त तुकडे पुढं सरकवावे किंवा कळ दाबावी यापलीकडे कांहीं काम करावें लागत नाहीं. डबे तयार झाल्यावर ते झाळून त्यांना पॉलिश करण्याचें, वरील कडी लावण्याचें व नंतर त्यांत तेल भरण्याचें काम इतक्या तांतडीनें आपोआप होत असतें कीं सर्व यंत्रापुढून नुसतें चालत जाईपर्यंत प्रथमच्या यंत्रांत कापण्यासाठीं घातलेल्या पत्र्याचे डबे तयार होऊन त्यांत तेलहि भरलें जातें. डबे इकडून तिकडे नेण्यासाठीं "चालता पट्टा" आहे. त्यावरून डबे पुढे जातात आणि काटकोनांतहि वळतात. या ठिकाणची क्रिया फारच कुतूहलोत्पादक आहे. मागला डबा येऊन पुढल्या डब्यास अशा वेतानें धक्का देतो कीं त्यायोगें तो बरोबर काटकोनांत वळून पुढे जात राहील. रहदारीच्या वेळीं माणसांना मुद्धां इतक्या व्यवस्थेनें जातां येत नाहीं. अशा रीतीनें निर्जीव रॉकेलचे भरलेले डबे जात असतात.

तेल भरण्याचेंहि काम असेंच आपोआप होतें. १-१॥ मिनिटाच्या आंत १० डबे एकदम एक थेंबहि न सांडतां बरोबर भरले जातात. त्यांचें तोंड बंद करून त्यांना थोडें आदळआपट करतात. तें अशाकरितां कीं या वेळींच गळती वगैरे दोष दृष्टोत्पत्तीस यावेत. लांकडी चौकटींत दोन दोन डबे भरून ते चालत्या पट्ट्यानें थेट बोटीच्या धक्क्यावर नेले जातात आणि तेथून ते कोठें पाठवावयाचे असतात तिकडे रवाना होतात.

## कारखान्याचा अफाट विस्तार

अशा या घासलेट तेलाच्या कारखान्यानें सुमारें पांच चौरस मैल जागा व्यापली असून १५००० लोकांना काम दिलें आहे. कारकुनांव्यतिरिक्त बहुतेक मजूर रात्रंदिवस राबत असतात आणि आठ आठ तासाच्या तीन पाळ्या ठरलेल्या आहेत. रोजीं अदमासानें तीस लाख गॅलन तेल गाळून निघतें! नेहमींच्या प्रचारांतला टिनचा चौकोनी डबा चार गॅलनांचा असतो. असे साडेसात लाख डबे भरून रोज तेल गाळण्याची व्यवस्था आहे! तेल गाळण्याच्या भट्ट्या लहानमोठ्या २५-३० आहेत. त्यांतील अगदीं आधुनिक अशी जी आहे तींतच रोजी आठ लक्ष गॅलन तेल तयार होतें! निरनिराळ्या टाक्या तेलानें भरलेल्या असतात. त्यांना जोडणाऱ्या सर्व नळांची लांबी एकत्र केल्यास ती सहज १०० मैलांहून अधिक भरेल! कारखान्यांतील मजुरांना जळणासाठीं म्हणून तेलच दिलें जातें. कारण सर्पणाची अडचण फार आहे. दरवर्षी सुमारें ३६ लाख गॅलन तेल कामगार वर्गांतच फुकट वाटलें जातें! इराणी सरकारला स्वामित्वासाठीं प्रतिवर्षी सुमारें दहा लाख पौंड म्हणजे दीड कोटि रुपये द्यावे लागतात यावरून कंपनीला फायदा काय होत असेल याची कल्पना करावी.

## कंपनीनें केलेल्या सोयी

आबादान शहर केवळ अँग्लो-पर्शियन ऑईल कंपनीसाठींच वसविलें असल्याचें वर सांगितलेंच आहे. अर्थातच सर्व सुखसोयी कंपनीस कराव्या लागल्या. कोणत्या सुखसोयी येथें आहेत असें विचारण्यापेक्षां कोणत्या नाहींत असेंच विचारणें बरें. पोस्ट, तार, बँक या तर अगदीं महत्त्वाच्याच बाबी झाल्या. त्या येथील सरकारनें केल्या तर त्यांत आश्चर्य कसलें? पण कामगारांना राहण्याचीं घरें, पाण्याचे नळ, विद्युद्दीप इत्यादि घरगुती गोष्टी देऊन खेळण्यासाठीं क्रीडांगण, वाचनालय, रुग्णालय, औषधालय याहि सोयी केल्या आहेत. रक्षणासाठीं खास व्यवस्था असून गुप्त पोलीस खातेंहि या कंपनीनें राखलें आहे हे विशेष आश्चर्य होय. आणि त्यांतहि मौज म्हणजे ही कीं, प्रस्तुत प्रतिनिधीस कारखाना दाखविण्यासाठीं ज्या दोन अधिकाऱ्यांची योजना करण्यांत आली होती ते गुप्त पोलीस खात्यांतील वरिष्ठच होते! रशियन विळ्याची भीत आज-काल फार वाटत असल्यानें त्या खात्यास विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. असो.

कंपनीच्या नोकरांना सर्व प्रकारचा माल योग्य भावानें मिळावा म्हणून किंवा अस्सल ब्रिटिश मालच खपावा व पानस्वातंत्र्याची हौस पुरविली जावी यासाठीं एक दुकान उघडलेलें आहे. इतर कोण-त्याही मालापेक्षां मदिरेचा खप किती तरी पटींनीं अधिक असतो हे येथील आंकड्यावरूनच सिद्ध होतें! कामगारांचीं राहण्याचीं घरें मुंबईच्या सर-कारी चाळींपेक्षां किती तरी चांगलीं आहेत. आरोग्य खात्याकडून होत असलेली साफसुफीची व स्वच्छ-तेची व्यवस्था पुणें शहर म्युनिसिपालटीनें तर शिकण्यासारखी आहेच. पण मुंबईलाहि कांहीं

धडे या व्यवस्थेपासन घेतां येतील. कामगारांच्या नुकसानभरपाईचेंही वेगळे खातें असून अपघातामुळें ज्या मजुरांच्या पोटावर गदा येते त्यांस भरपूर मोबदला देण्यांत येतो. "फॅक्टरी ॲक्ट" इराणी सरकारच्या कायद्यांत अद्यापि आला नसला तरीहि अगदीं चोख व्यवस्था ठेवली असल्यानें गैरसोयीला जागा राहात नाहीं.

इराण हें स्वतंत्र राष्ट्र आहे आणि इतर जगाच्या मानानें मागें असले तरी स्वातंत्र्याची राष्ट्रीय वृत्ति आणि स्वहिततत्परता यास ते अद्याप पारखे झालें नाहीं. विश्वबंधुत्वाची मोहक शिकवण अजूनहि त्यांच्या कर्णपथावर गेलेली दिसत नाहीं. कारण या प्रचंड कारखान्यात इराणी कामगारांचें प्रमाण सालोसालानें वाढलेंच पाहिजे अशी मोठी अट कंत्राट देतांना घातली गेली आहे. म्हणून शेकडा ८५ कामगार इराणी प्रजाजनांपैकींच आहेत. वरची मलई खाण्याचीं कामें गोऱ्या बाळांना देऊन हमाली कामें करण्याकडे आज त्यांचा उपयोग होत आहे खरा. पण एवढ्यानेंच सरकारला आपलें कर्तव्य केलें असें वाटलें नाहीं. खुद्द आबादानाच्या कारखान्यांत दीडशें मुलांना पगार देऊन यांत्रिक कौशल्य शिकविण्यास इराणी सरकारनें कंपनीस भाग पाडलें आहे. दरवर्षी नवीन मुलें तयार होऊन बाहेर पोट भरण्यास जातात आणि अनुकूल परिस्थिति असणारीं कारखान्यांतच टिकून राहातात. प्रतिवर्षी दोन इराणी विद्यार्थी कंपनीच्या खर्चानें इंग्लंडामध्यें तैलशास्त्राचा उच्च अभ्यासक्रम पुरा करण्यासाठी पाठविले जातात.

आमच्या हिंदुस्थानांत अनेक धंदे आहेत. सरकारनें परकीय भांडवलवाल्यांस पुष्कळ सवलती देऊन त्यांचें ठाणें मजबूत करून दिलें आहे. पण अशा प्रकारची प्रजाहितदक्षतेची कळकळ कोणत्या एका तरी करारांत दिसत असल्यास अधिकाऱ्यांनी अवश्य जगापुढें मांडावी. साधें लष्करी खातें घ्या. तेथें सुद्धां हिंदी अधिकारी ठेवण्याकरितां किती अट्टाहास करावा लागतो ! हे सारे पारतंत्र्याचे प्रताप ! !

## पक्षपाताचें भूत

युरोपियन मनुष्य म्हटला कीं त्याला जशी कांहीं देवानें अधिक कोमल गात्रें देऊन आकाशांतून एकदम पृथ्वीवर पोंचतें केलें आहे अशी कित्येकांची भावना असते. विशेषतः इंग्लिशांना ती विशेष आहे असें घडोघडीं दिसून येतें. येथील कारखान्यांत इंग्रज अधिकारी व कामगारहि आहेत. पण एशियाटिक कामगारांपेक्षां युरोपियनास अधिक पगार, अधिक सवलती व अधिक सुखसोयी केलेल्या आढळन येतात अगदींच प्रामुख्यानें डोळ्यांत भरणारी गोष्ट म्हणजे अगदीं हवाशीर जागेत त्यांच्यासाठीं वसविलेलें वेगळे, गांव त्यांचे बंगले निराळे, त्यांची व्यवस्था वेगळी, त्यांची वस्तीहि पण अगदींच भिन्न. त्यांना एखादा डोळा अधिक असल्याचें किंवा अधिक काम करण्यासाठीं तिसरा हात असल्याचें दिसत नाहीं गौरवर्ण हाच एक गुण असेल तर इराणी प्रजाही तितकीच गौरकाय सांपडते. पण कांहीं का कारणानें असेना, युरोपियनांना मेहरनजरेखालीं राहावयास मिळत. हजेरीपत्रकांतही हिंदी व युरोपियन असा भेद केलेला कारकुनाचे बाबतीत दृष्टोत्पत्तीस आला.

## महाराष्ट्रीयांना कार्यक्षेत्र

इतका जरी पक्षपात होत असला किंवा इराणी सरकारचा ओढा इराणी लोकांकडे असला तरी अद्यापि महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांस येथें क्षेत्र आहे. बुद्धीच्या जोरावर त्यांना कोठेंही नांव कमावतां येतें. पण प्रथमतः त्यांनी बाहेर पडलें पाहिजे मद्रासी, पंजाबी, बंगाली इत्यादि प्रांतांचे किती तरी लोक परदेशीं जात असतां महाराष्ट्रीयानीं स्वस्थ राहावें हें इष्ट नाहीं. आर्थिक दृष्ट्या परदेशाची कामगिरी लाभदायक असते. कारण साध्या कारकुनासही येथें दीडशें रुपये मिळतात ! स्वतःच्या कर्तबगारीस पूर्ण वाव पाहिजे असल्यास परदेशीं गेलें पाहिजे. एकाच ठिकाणीं सर्वांनीं गर्दी करून भागणार नाहीं हें आतां स्पष्ट दिसत आहे. "पोटासाठीं भटकत जरी दूरदेशीं" जावें लागलें तरी आपलें स्वत्व राखून बदललेल्या परिस्थितीशी तन्मय होतां येते हे दर्शविण्यासाठींच कीं काय येथें एक महाराष्ट्रीय कुटुंबांत राहण्यास मला मिळालें. आबादानामध्यें मुलंमंडळीसह राहणारे एकच महाराष्ट्रीय गृहस्थ आहेत आणि त्यांच्या पाहुणचारांत अगदीं आपल्या घरीं असल्याप्रमाणें वाटलें. केवळ मातृभाषा एक म्हणून आपलेपणा आणि अगत्य किती वाटतें हें परदेशीं गेल्यावरच कळतें. स्वभाषेचा अभिमानहि जागृत करण्यास लांब परदेशचा प्रवास फार उपयोगी पडेल ! सध्या मराठीविषयीं उदासीन असणारांना जादूच्या कांडीनें अन्य देशांत नेऊन ठेवतां आलें तर किती तरी इष्ट बदल घडून येईल असें वाटल्यावांचून राहत नाहीं.

# पुस्तक-परीक्षण

परधर्मांच्या ग्रंथप्रामाण्याला तोडीस तोड म्हणून दयानंदांनीं कडक वेदप्रामाण्याचा जोरानें पुरस्कार केला. तें प्रामाण्य यौगिक अर्थपद्धतीच्या व विद्वत्तेच्या जोरावर शक्य तितकें परिस्थितीला जुळवून घेण्याचा यांनीं प्रयत्न केला. पण अखेर तें परिस्थितीला जुळलें नाहीं ते नाहींच. परिस्थिति ही वायुप्रमाणें चंचल आहे. ती कोणत्याहि प्रामाण्यांत अडून राहूं शकत नाहीं. श्रुतिस्मृति-पुराणोक्त हें हिंदूंचें अजडल लांबलचक प्रामाण्य खच्ची करून दयानंदांनीं तें श्रुतीपुरतेंच मर्यादित केलें तरीहि त्यांच्या चौकटीमध्यें परिस्थिति नांदूं शकली नाहीं हें दयानंदाच्या मंतव्यावर मागाहून जीं आर्यसमाजिस्ट पंडितांनीं भाष्यें केलीं त्यावरून दिसून येतें. आणि अखेरीस आर्यांच्या मर्यादित पण कर्मठ प्रामाण्यापेक्षां विस्तृत पण लवचीक असें हिंदूंचें प्रामाण्य बरें म्हणण्याची वेळ येते. दयानंदांनीं फक्त अक्षतयोनि व अक्षतवीर्य पुरुषांना पुनर्विवाहाची परवानगी दिली व त्यापुढे त्यांना नियोगाची सोय सांगितली. याबद्दल आतां आर्यांमध्यें कसा मतभेद झाला आहे तो पाहा. नियोगाबद्दल श्री. नरदेवशास्त्री म्हणतात, "नियोग हा वेदानुकूल असला तरी वेदविहित नाहीं. तो केवळ आपत्कालिक धर्म आहे. ज्या वेळीं लोक विशेष शुद्ध व धार्मिक होते त्या वेळींच हा आचार शुद्ध मानला जात असे. परंतु आजचा समय तसा नाहीं. राजनियम, परिस्थिति व लोकस्थिति हीं पण अनुकूल नाहींत. तेव्हां कलियुग संपून पुनः सत्ययुग सुरू होईपर्यंत हा आचार पाळणें अनर्थावह आहे." उलटपक्षीं कोणी आर्य लेखक नियोगपद्धति ख्रिस्ती धर्मांतहि आहे वगैरे कारणें दाखवून त्याचें समर्थन करतात !

प्रार्थनेच्या बाबतींत दयानंदांचा दंडक असा कीं वैयक्तिक प्रार्थना निर्गुण असावी व सामुदायिक प्रार्थना सगुण असावी, पण साकार नसावी. आतां यावर प्रो. चमूपतींचें भाष्य पाहा. "व्यक्तीच्या उपासनेंत देहबुद्धि सुटणें जितकें जरूर तितकेंच सामाजिक धर्मविधींत आपल्या व इतरांच्या देहबुद्धीबद्दल आणि सगुण व साकार उपकरणांबद्दल आस्था ठेवणें जरूर असतें" असें दयानंदाचें मत प्रो. चमूपति सांगतात. वर्ण हे गुणकर्मानुसार दयानंदांनी मानले. आणि शिक्षण झाल्यावर आचार्यांकडून हे गुणकर्मानुसार वर्ण ठरविण्याची व्यवस्था करावी असें म्हटलें. पण सद्यःपरिस्थितींत अशी व्यवस्था करणें कठीण. शिवाय शिक्षण पुरे होईपर्यंत व आचार्यांकडून निर्णय होईपर्यंत काय करावयाचें हा प्रश्न आला. तेव्हां तोंपर्यंत जन्मावरून वर्ण मानावयाचे असें आर्यांनीं ठरविलें. आतां वर्ण ठरविण्याइतकें शिक्षण ज्यांना मिळालें नाहीं त्यांचा आमरणान्त जन्मसिद्धच वर्ण राहणार ही आपत्ति आलीच. दयानंदांचे अनेक संस्कारविधी, त्यांनीं केलेला प्रीतिविवाहाचा तीव्र निषेध, त्यांनी विषयुक्त अन्ना-प्रमाणें त्याज्य ठरवलेली ग्रंथांची यादी इ. गोष्टी आधुनिक काळांत आर्य कितपत पाळीत असतील याची शंका आहे.

अमरकोश, कुवलयानंद, तर्कसंग्रह, रघुवंश व सर्व पुराणग्रंथ हे विषयुक्त अन्नाप्रमाणे त्याज्य ठरविल्यावर त्याच न्यायानें इंग्रजी डिक्शनरी, इंग्रजी काव्य-चर्चेचे ग्रंथ, इंग्रजी तर्कशास्त्र, शेक्स-पियर मिल्टन यांचीं काव्यें, अरेबियन नाइट्स, इसापनीति हे ग्रंथहि आर्यांना विषयुक्तच मानावे लागतील! प्रामाण्य संकुचित असलें म्हणजे विकल्पास जागाच नसते. उलट श्रुतिस्मृतिपुराण इ. लांब-लचक प्रामाण्य मानलें तर त्यांत पळवाटा काढ-ण्यास बरीच जागा असते. सत्यार्थप्रकाश वाचला म्हणजे आपलें विस्तृत प्रामाण्य पुरविलें, पण आर्यांची ही संकुचित प्रामाण्य-कोंडी नको असेंच सनातनीयांना वाटल्यावांचून राहणार नाही. कारण सनातनीयांना स्मृतिग्रंथांतून सद्यःस्थितीची नड भागविण्यासाठीं पळवाट काढण्यास जितकी अडचण पडते, त्यापेक्षां दयानंदांच्या अनुयायांना कर्मठ वेदप्रामाण्याच्या कोंडींतून परिस्थितिप्राप्त वाट फोडण्यास अधिक अडचण पडते.

दयानंदांनीं शब्दप्रामाण्याच्या आधारें केलेल्या क्रांतीवरून आर्यसमाजिस्टांना उलट परिस्थितीकडे यावें लागलें तर सनातनी हे आपल्या व्यापक शब्दप्रामाण्याला उत्क्रांतीनें परिस्थितीच्या जवळ आणीत होते. यामुळें आज दोघे जवळ आले आहेत व दोघांची शुद्धि-संघटनेच्या कार्यांत सहकारिता होत आहे. शंभर वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या ब्राह्म-समाजाची व सनातनीयांची आजहि जशी सहकारिता होऊं शकत नाहीं तशी सहकारिता चोपन वर्षांपूर्वी (१८७५) स्थापन झालेल्या आर्य-समाजाशीं सनातनीयाची प्रत्यक्ष होत आहे. याचें कारण दयानंदांचा उद्देश नवें मत स्थापन करण्याचा नव्हता. त्यांचे वादविवाद, पंथप्रसारपद्धति हीं सर्व जुन्या प्रकारचीं. प्रामाण्याचा अर्थ वेगळा असला तरी वेदप्रामाण्य हे सनातनी व आर्य यांना समाना-धिष्ठान. संस्कार, वर्णाश्रमधर्म, हे दयानंदांनीं हिंदु-

प्रमाणेंच कायम ठेवलेले. अशा अनेक सामान्य गोष्टींच्या योगानें व परिस्थितीच्या प्रवाहाच्या उलट-सुलट ओढीनें आर्य व सनातनी जवळ जवळ येऊन शुद्धि—संघटनेच्या व अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यांत एकमेकांचे प्रिय सहकारी होऊं शकले.

सनातनी हे शुद्धि करावयास लागण्यापूर्वी कांहीं दिवस आर्यसमाजी लोकांनीं शुद्धीला सुरुवात केली होती. यावरून पूर्वेतिहासाच्या अज्ञानानें पुष्कळांची अशी समजूत कीं हे शुद्धीचे कार्य आर्यसमाजांत मुळापासून आहे. पण तसें मुळींच नाहीं. सत्यार्थप्रकाशात "शुद्धि-संघटनेचे" नांवहि नाहीं. श्री. फडके म्हणतात शुद्धि चळवळीचे तत्त्वहि त्याच्या ( दयानंदांच्या ) मतव्यात दिसून येत नाही. असें म्हणतात कीं, त्यांनीं एका मुसलमाना वा अलधारी नामक आर्य केला आणि एका मलकान्याला यज्ञोपवीत दिलें. या दोन गोष्टी-पलीकडे त्यांनीं शुद्धि चळवळीचा पुरस्कार केल्याचे आढळत नाहीं. ता. १६ एप्रिल १८८१ चे पत्रांत चोबे कन्हय्यालालजी यांस त्यांच्या प्रश्नास उत्तरादाखल ते असें लिहितात कीं, "मुसलमानादि अन्य मतवाले वैदिक मतानुयायी झाल्यास ते ज्या वर्णाच्या गुणकर्मानें युक्त असतील त्या वर्णांत त्यांस राहतां येईल. रोटीबेटी व्यवहारहि आपल्या समान वर्णांशीं त्यांनीं करावा. आजकालचे आर्य लोक त्यांच्याशीं असा व्यवहार करणार नाहींत. यास्तव त्यांनीं आपल्याच अर्थात् पूर्वधर्मांतील लोकांत ( रोटीबेटी ) व्यवहार करावा आणि (धर्म) मत मात्र वैदिक राखावें. यात कोणत्याहि प्रकारची हानि होणार नाहीं" यावरून दयानंद हे शुद्धीविषयी किती साशंक होते हें दिसून येईल पण ज्या परिस्थितीनें सनातनीयांना शुद्धि-संघटनेकडे खेचलें त्याच परिस्थितीनें त्यांच्यापेक्षां थोडेसे अगोदर आर्यसमाजीयांना खेंचलें इतकेंच. स्वामी श्रद्धानंदजी हे देखील शुद्धि-संघटनेच्या कार्यांत धडाक्यानें पडले ते खिलाफतीच्या चळवळीचा कटु अनुभव आल्यानंतरच. अ. भा. शुद्धिसभा १९२३ मध्यें स्थापन झाली व त्यापुढेंच मलकान्यांचे धडाक्यानें शुद्धीकरण झालें. परिस्थिति ही सर्वांनाच खेचात आहे. आणि कांहीं दिवसांनीं तर आर्यसमाजी व सनातनी या दोघांनाहि ती इतकी पुढे नेईल कीं एकाचें मर्यादित शब्दप्रामाण्य व दुसऱ्याचें विस्तृत शब्दप्रामाण्य हीं दोनहि मार्गें पडतील व दोघेहि पुढच्या जागेवरून एकामागे एक असलेल्या व दोघांनीहि मागे टाकलेल्या या प्रामाण्यांच्या मैलाच्या दगडांकडे सारख्याच ऐतिहासिक दृष्टीनें पाहतील ! पण भावी कालाच्या उदरांत काय आहे याची फारशा चिकित्सा आतांच करून उपयोग नाहीं. कारण काल हा मनुष्याचीं अनुमानें लीलेनें उलटींपालटीं करीत असतो. मग तीं अनुमाने कितीहि सूक्ष्मपणानें केलेलीं असोत.

असो. ग्रंथकारांनी दयानंदांच्या मताच्या परीक्षणाच्या शेवटच्या भागाला "आर्यमतसमीक्षा" हे नांव देण्यांत मोठाच मार्मिकपणा दाखविला. ब्राह्मसमाजी हे तर्कवादाची तीक्ष्ण सुरी हिंदुधर्मावर निर्दयपणे चालवितात. पण श्री. फडके यांनीं 'नवयुगधर्म' पुस्तकांत तीच दृष्टि ब्राह्मांच्या मतावर व प्रवर्तकांच्या चरित्रांवर चालविल्याबद्दल कित्येक ब्राह्म, आणि ब्राह्मांना जातिभेद नको यवढ्या अनुकूल गोष्टीमुळेच केवळ ब्राह्मांचा पुरस्कार दुरून करणारे दुसरे कित्येक लोक, गरम झाले व त्यांच्या हल्ल्यानें सात्विक मनाचे लेखक गांगरले व आर्यसमाजाच्या बाबतींत तसेंच होईल कीं काय याबद्दल साशंक होऊन त्यांनीं नरदेवशास्त्री व सातवळेकर या तज्ज्ञाकडून अभिप्राय मागवून ते 'श्रीमद्दयानंद' या पुस्तकांत प्रारंभींच छापून टाकले. पण आर्यसमाजापैकीं कोणी, अगर कांहीं मतलबाकरितां दुरून आर्यसमाजाला उचलून धरणारे असे कोणी, या अगर पुढील भागांतील विवेचनाबद्दल रागावले तर "आर्यमत समीक्षा" हा एकच शब्द त्यांच्या तोंडावर टाकण्यासारखा आहे. कारण फडके हे मुद्दाम कितीहि फटकळ व कठोर बनले तरी खुद्द सत्यार्थप्रकाशांत जी परमताची "समीक्षा" दयानंदांनी केली आहे तितके कडक बनणें त्यांना स्वभावतः अशक्य आहे.

फडक्यांच्या 'नवयुगधर्मा'वर संतापणाऱ्या ब्राह्मांनीं सत्यार्थप्रकाशांतील ब्राह्ममतखंडन एकदा वाचून पाहावें. दयानंद पुण्यांत आले असतां त्याच्या पुण्यांत झालेल्या संभावनेचीं वर्णन वाचून पूर्वी कित्येकांना मनात किंचित् वाईट वाटत असे. पण परवां कोल्हापूरच्या आर्यसमाजानें प्रसिद्ध केलेल्या मराठी सत्यार्थ-प्रकाशांतील इस्लाममतसमीक्षा, खिस्ती मतसमीक्षा, बौद्ध मतसमीक्षा इ. प्रकरणें अवलोकन केल्यावर ही त्यांची खेदाची भावना पार मावळली असेल. श्री. फडके यांनीं टीकाकारांच्या टीकेकडे लक्ष न देतां आपलें विवेचनाचें काम अविचलपणानें पुरें करावें. प्रस्तुत २५० पानाच्या दयानंदचरित्र ग्रंथांत त्यांनीं भावी विवेचनाचें जें सूत-उवाच केलं आहे त्यावरून या विषयाचा जिज्ञासेनें अभ्यास करणाऱ्याच्या मनांत पुढील भागाविषयीं उत्कंठा उत्पन्न झाल्यासिवाय राहात नाहीं. नवयुगधर्माप्रमाणें याहि पुस्तकांत दयानंद, त्यांचे गुरु विरजानंद, लाला लजपतराय,

गुरुकुल, पं. गुरुदत्त विद्यार्थी इत्यादिकांचीं चित्रे दिलीं आहेत. शेवटीं आधार ग्रंथांची यादी व कालानुक्रमणिका देऊन ग्रंथ परिपूर्ण केला आहे. धार्मिक इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें फडके यांच्या या ग्रंथाचा अवश्य संग्रह करावा अशी आमची शिफारस आहे.

# दिल्लीचें बातमीपत्र

नवी दिल्ली, ता. २१।३।१९२९.

[ ८ ]

शुक्रवार ता. १५ रोजीं बजेटावरील मागण्या मंजूर—नामंजूर होण्याची मुदत संपावयाची होती व ती संपलीहि. पण अशा रीतीने कीं, खऱ्या मागण्यांपैकीं एकीवरहि तपशीलवार चर्चा न होतां ! निरनिराळ्या पक्षांनीं मिळून पुढं आणलेल्या काटांच्या सूचनांपैकीं शेवटली मुसलमान पक्षाची शिल्लक उरली होती. ती अशी कीं, सरहद्दीच्या प्रांतांत सरकारने इतर प्रांताप्रमाणें सुधारणांची योजना करावी. या अर्थाच्या ठरावावर पूर्वी एक-दोन वेळां असेंब्लीमध्यें मोठा अनिष्ट वादविवाद झाला होता. पण सुदैवानें यदा तसा प्रकार घडला नाहीं. भांडणाचें तोंड लागलें तें फक्त सूचना मांडणारे मियान महंमद शहानवाझ व सरकार-तर्फे उत्तर देणारे सर डेनीस ब्रे यांच्यामध्यें लागले. शहानवाझ यांनीं सरहद्दीच्या प्रांतांत सुधारणा चालू करण्याविषयीं नेहमींचींच कारणें सांगितलीं. पण हिंदु सभासदाकडून सूचनेला विरोध होईल ही सर डेनीस ब्रे यांची अपेक्षा फुकट गेल्यामुळें ते फार तळमळले! कारण मुसलमानांना नाखूष करण्याची जबाबदारी सरकारावर पडली! कसेंहि असो. खासगी सभासदांपैकीं कोणीहि या सूचनेला विरोध न केल्यामुळें ती प्रचंड बहुमताने मंजूर झाली. लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही कीं, हिंदुमहासभेनें पेशावर प्रांताची ही मागणी आपल्या ठरावानें नाकबूल केली असताहि असेंब्लींतील हिंदु-महासभेच्या पुढाऱ्यांनीं मुसलमानांच्या या मागणीला विरोध केला नाहीं. याचा उघड अर्थ असा कीं, असेंब्ली ही जातीजातींतील भांडणें उकरून काढण्याची जागा नसून सर्व जातींनीं मिळून सरकारशीं भांडण्याची जागा आहे. पण दुर्दैवानें मुसलमान सभासद मात्र ही गोष्ट विसरतात. अशा रीतीनें बजेटावरील कुस्त्यांच्या फडांत पांच प्रधान मल्लांच्या कुस्त्या झाल्या. पण त्यामुळें इतर गोष्टींना वेळ न उरल्यामुळें नियमाप्रमाणें दंगल बंद करण्यांत आली. आणि कोट्यवधि रुपयांच्या मागण्या एकेक मिनिटांत मंजूर होऊन गेल्या !

ता. १८ सोमवार रोजीं फायनॅन्स बिलावरील चर्चा सुरू झाली व आज गुरुवार तारीख २१ पर्यंत ती चालूच आहे. तीन दिवस चर्चा झाली तरी खरोखरच बोलण्यासारखे विषय पुष्कळ राहिले होते. कित्येक सभासद पांच पांच दहा दहा वेळ जागेवरून उठले तरी त्यांना बोलण्याला मिळालें नव्हतें. तीन दिवसांच्या चर्चेनें लोक कंटाळले होते. तेव्हां तारीख २८ मार्च रोजीं असेंब्लीचें काम खलास व्हावें असा सर्वांचा संकेत असल्यामुळें व पब्लिक सेफ्टी बिल व ट्रेड डिस्प्यूट्स बिलहि याच बैठकींत संपवून घेण्याचा आग्रह असल्यामुळें, फायनॅन्स बिलावरील चर्चा केव्हां संपेल असें सरकारास झालें होतें. तथापि या उतावीळपणाचें चिन्ह त्यांनीं बाहेर काहींच दाखविलें नाहीं. सर जॉर्ज शुस्टर हे तीनहि दिवस एकसारखे सभागृहांत बसून होते. त्यांनीं कोणाला हटकलें नाहीं, कोणाला अडविलें नाहीं. अशा रीतीनें साळसूदपणाच्या सोंगाची पूर्ण बतावणी त्यांनीं केली. तिसऱ्या दिवशीं अध्यक्ष पटेल व इतर कांहीं सभासद यांचें असे ठरलें असावें कीं, ही प्राथमिक चर्चा आज कांहीं झालें तरी संपवावयाची. मग त्याकरितां रात्रीं १२ वाजेपर्यंत बसावें लागलें तरी हरकत नाहीं. प्रथम ही गोष्ट कोणास फारशी खरी वाटली नव्हती. परंतु चाराचे पांच झाले, पांचाचे सहा झाले व अध्यक्षांनीं या गोष्टीचा उच्चार कांहीं प्रसंगीं स्वतःच केला तेव्हां आज कांहीं तरी विशेष होणार असें वाटूं लागलें. सुमारें ८। वाजतां राष्ट्रीय पक्षाचे सभासद चौधरी मुक्तारसिंग यांचें भाषण संपलें, तेव्हां वास्तविक कोणी तरी चर्चा थांबविण्याची सूचना पुढे आणावयास पाहिजे होती. किंवा अध्यक्षांनीं तरी खासगी रीतीनें कोणास तसें सुचवावयाचें होतें. परंतु तसें घडलें नाहीं. फिरून राष्ट्रीय पक्षाचे सभासद पं. ठाकूरदास भार्गव हे बोलावयास उभे राहिले व त्यांना बोलण्यास अध्यक्षांनीं परवानगीहि दिली. परंतु या वेळीं सभागृहांतील एका कंपूच्या मनांतील

उतावळेपणाचा पूर अनावर होऊन त्यांनीं टेबलावर हात आपटून ठाकुरदास भार्गव यांना ' तुमचे भाषण आम्हाला ऐकवत नाहीं आतां पुरे करा ' असा इषारा देण्यास सुरवात केली ! अध्यक्षांनी त्यांना बोलण्याची परवानगी दिल्यावर हे शिष्ट त्यांना थांबविणार कोण ?

***

पण अध्यक्षांनीं या लोकांना इषारा देऊन टाळ्या वाजविण्याचें थांबवावयाचें होतें,तें न थांबवितां उलट पं. ठाकूरदास भार्गव यांनाच अध्यक्षांनीं असा उपदेश केला कीं, 'या टाळ्यांचा अर्थ तुमच्या लक्षांत आला असावा !' पण इतकेंच बोलून ते थांबले नाहींत. कारण ते आणखीहि असें म्हणाले कीं, 'तुम्हाला जसा बोलण्याचा अधिकार आहे तसाच तुमचें बोलणें ऐकून न घेण्याचा अधिकार या सभेला आहे !' पण ऐकून न घेण्याचा अधिकार सरकारजमा पक्षाचे हे शिष्ट,नियमानें तो त्यांना दिलेला नसतांनाहि हातीं घेऊन चालवीत होते. ही गोष्ट अध्यक्षांच्या लक्षांत राहिली नाहीं ! स्वराज्य पक्षानें अध्यक्षांच्या या चुकीचा फायदा घेतला. आपणाला आतां कोणाचें बोलणे अधिक ऐकून घ्यावयाचे नाहीं असें म्हणणाऱ्या शिष्टांना जर टाळ्या वाजवून तें बंद पाडण्याचा अधिकार येतो तर सरकारी फडणवीस बोलावयाला उभे राहिले असता, त्यांचेंहि बोलणें ऐकून न घ्यावेंसें वाटलें तर आपणालाहि तोच अधिकार अध्यक्षांच्या विचारसरणीनें प्राप्त होतो असें त्यांनीं आपल्या मनाशी ठरविलें व ते त्या प्रसंगाची वाट पाहात होते.

***

ठाकूरदास भार्गव यांचें बोलणें चालूच होतें, संपलें नव्हतें. इतक्यांत सरकारजमा पक्षानें टाळ्या वाजविण्यास सुरवात केली होती. यामुळें गोंधळ झाला तो थांबवून वास्तविक त्यांना आपले भाषण पुरे करण्याला संधि द्यावयाला पाहिजे होती ती न देतां अध्यक्षांनीं असेंब्लीला असा सवाल टाकला कीं, 'आतां झाली ती चर्चा पुरी झाली असें मानावें कीं नाहीं ?' वास्तविक अशी सूचना या वेळीं कोणीं पुढें आणली नव्हती. अध्यक्ष पटेल यांनीं ती आपल्याच मनानें उपस्थित केली ! ही त्यांची दुसरी चूक होय. राष्ट्रीय पक्षाचे पुढारी पं. मालवीय यांनी असा प्रश्न विचारला कीं, "कोणत्याहि सभासदाचें बोलणें सुरू असतां, मध्येंच चर्चा थांबविण्याची सूचना देतां घेतां येते कीं काय ?" त्यावर अध्यक्षांनी उत्तर दिलें कीं, 'मला तसें करण्याचा अधिकार आहे !' यानंतर या सूचनेवर मतें घेण्यांत आलीं. तेव्हां ती बहुमतानें मंजूरहि झाली. कारण मनांतून सर्वच लोक या चर्चेला निदान या दिवसापुरते तरी कंटाळले होते.अशा रीतीनें ही चर्चा थांबल्यावर रीतीप्रमाणें सर जॉर्ज शुस्टर यांना आपलें समारोपाचें म्हणजे उत्तराचें भाषण करण्याला अध्यक्षांनीं सांगितलें. पण ते सुरू होतांच स्वराज्य पक्षानें टेबलावर हात आपटून व टाळ्या वाजवून सर जॉर्ज शुस्टर यांचें भाषण थांबविण्यास सुरवात केली. वड्याचें तेल वांग्यावर निघावें त्याप्रमाणें सरकारजमा पक्षाच्या वर्तनाचें व अध्यक्षांच्या चुकीचें उट्टें सरकारी फडणविसांवर निघालें ! त्यांनीं बोलण्याला प्रारंभ करावा व इकडे लोकांनीं टाळ्या वाजवून व टेबलावर हात मारून त्यांचें भाषण बंद पाडावें असा प्रकार सुरू झाला. निदान कमीत कमी सातआठ वेळा तरी पटेल यांना उभे राहून शांतता प्रस्थापित करून सर जॉर्ज शुस्टर यांना सुरुवात करा असें सांगणें भाग पडलें. परंतु या त्यांच्या दबकावणीचा कांहींच उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांच्या नेहमींच्या उग्र पद्धतीनें ओरडून दरडावून 'असें करू नका' म्हणून त्यांनीं जोरानें सांगितलें तरी त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. ' तुम्ही हा माझ्यावर सूड उगवतां काय ? ' असें त्यांनीं विचारलें तेव्हां एकानें उत्तर दिलें ' होय.'

***

प्रांजलपणाचा आव आणून अध्यक्ष पटेल म्हणाले कीं, ' यंदा निवडणुकीचें शेवटचें वर्ष समजून, म्हणजे लोकप्रतिनिधींना आपण आपलें म्हणणें असेंब्लीपुढे मांडलें असें दाखविण्याची पूर्ण संधि मिळावी हें लक्षांत ठेवून, मीं तीन दिवस वादविवाद चालू दिला. तरी आतां तो बंद व्हावा '! पण पटेल यांचें म्हणणें कोणास आवडण्यासारखें नव्हतें. सभासदांनीं वादविवाद चालविला तो निवडणुकीकडे पाहून लोभी व स्वार्थी दृष्टीनें चालविला असें म्हणावयाचें तर त्याच दृष्टीनें स्वतः पटेल यांचेंहि धरसोडीचें वर्तन, म्हणजे एक वेळ सरकारला व एक वेळ लोकपक्षाला खूष करण्याचें वर्तन, त्यांनीं चालविलें असें कोणी म्हटलें, तरी तें बरोबर होईल काय ? दुसरें असें कीं, त्यांनीं तीन दिवस वाद चालू दिला खरा.पण ज्यांना महत्त्वाचें पुष्कळसें बोलावयाचें होतें अशा लोकांकडे त्यांची दृष्टि फारशी गेली नाहीं ! व जे लोक उठले असतां, कांहींतरी बोलणार असें त्यांच्यासकट सर्वांना माहीत अशा लोकांकडे त्यांची दृष्टि जात असे ! तसेंच भाषण चालू असतां मुख्य मुद्दे असतील तेवढ्यावरच बोलूं द्यावें विषयांतर करूं देऊं नये असें धोरण त्यांनीं ठेविलें नाहीं. जणुं काय असें दिसत होतें कीं, वाद

उगीच लांबणें ही गोष्ट त्यांना स्वतःला पसंत असावी. पण वाद लांबला म्हणावें तर तो उपयुक्त झाला नाहीं व न लांबला म्हणावे तर शेवटच्या दिवशीं स्वतःचा उतावीळपणाच त्यांनीं प्रगट केला. आणि इतके करून वरती अनेक चुका केल्या! त्या अशा कीं, पुष्कळ आधीं वाद थांबावण्याची सूचना पुढें आली होती ती त्यांनीं घेतली नाहीं. व जेव्हां वाद थांबविण्याची सूचना घेऊन ती मताला माडली तेव्हां ती कोणी केली नव्हती!

***

उशीर झाला होता तर प. ठाकूरदास भार्गव यांना उभे करावयाचे नव्हते व उभे केलें तर पुरतें बोलू द्यावयाचे होतें. बोलणें ऐकून न घेण्याच्या उद्देशानें सरकारजमा पक्षानें गडबड केली तेव्हां त्यांनी ती थांबवावयाची होती. पण त्याना उलट चिथावणी मिळेल असे भाषण त्यांनी केले व स्वराज्य पक्ष गडबड करू लागला तेव्हां त्याला मात्र ते विनाकारण गप्प बसवूं लागलें. तात्पर्य, अध्यक्षाच्या हातून एका चुकी मागून दुसरी, दुसरीमागून तिसरी अशी परंपरा घडल्याने शेवटीं असा प्रसंग आला कीं, सभेचें काम सुरळीत चालणे शक्य नाहीं असे वाटूं लागले. तेव्हां त्यांना पावणेनऊ वाजतां सभा बरखास्त करावी लागली! सभा थांबविल्याने मार्ग कसा निघणार हें कोणासच सांगतां येण्यासारखें नव्हते. परंतु कालगतीनें सर्व गोष्टी थंड पडतात असा अध्यक्षांचा समज असावा व तो मात्र दुसरे दिवशीं खरा ठरला. रात्रीं व सकाळी अध्यक्ष व स्वराज्य पक्षाचे पुढारी पं. नेहरू यांची खासगी दिलसफाई बहुधा झाली असावी. म्हणून गुरुवारचें काम सुरू होतांना फिरून कांहीं तरी आदल्या दिवसाप्रमाणें प्रकार होईल असे जे लोकांस वाटत होतें तसे कांहींएक न घडतां सर जॉर्ज शुस्टर यांना भाषण करण्याविषयीं अनुज्ञा मिळाली व त्यांनी आपले भाषण कडेपर्यंत बिनहरकत केले. तात्पर्य, अखेर निष्पन्न कांहींच झाले नाहीं! परंतु जी गोष्ट चारपांच वर्षांत पूर्वी झाली नव्हती ती यंदा होऊन मनोरंजक दाखले जुन्या कागदपत्रांतून हुडकून काढणाराला मदत होण्यासारखा कांहीं इतिहास घडला खरा!

# कम्युनिस्टांवरील सरकारी मोहीम

## दोनशें झडत्या झाल्या व ३१ माणसांना पकडलें!

ता. २० रोजीं सकाळीं हिंदुस्थानात मिरतच्या डि. मॅजिस्ट्रेटाच्या हुकमान्वयें इं.पि.को.कलम १२१ अ-अन्वयें धरपकडी होऊन पुढील गृहस्थांस अटक करण्यांत आली व त्यांना मिरत येथे नेण्यांत आलेः—

**१ धुंडिराजपंत ठेंगडी पुणें, २ श्रीपाद अमृत डांगे मुंबई, ३ सच्चिदानंद विष्णु घाटे मुंबई, ४ एस्. एच्. झाबवाला मुंबई, ५ शौकत उस्मानी मुंबई, ६ शांताराम सावळाराम मिरजकर मुंबई, ७ रघुनाथ शिवराम निंबकर मुंबई, ८ गंगाधर मोरेश्वर अधिकारी मुंबई, ९ मोतीराम गजानन देसाई मुंबई, १० अर्जुन आत्माराम आळवे मुंबई, ११ गोविंद रामचंद्र कासले मुंबई, १२ फिलिप स्प्रॅट कलकत्ता, १३ अयोध्याप्रसाद कलकत्ता, १४ पूर्णचंद्र जोशी प्रयाग, १५ गौरीशंकर मीरत, १६ एल आर. कदम झांशी, १७ व्ही. एन्. मुकर्जी गोरखपूर, १८ धर्मवीरसिंग मिरत, १९ गोस्वामी मैमनसिंग, २० शिवनाथ बानर्जी खुलना, २१ मुझफर अहमद कलकत्ता, २२ गोपाळ बसक डाक्का, २३ शमसुल हूदा कलकत्ता, २४ किशोरीलाल घोष कलकत्ता, २५ गोपेंद्र चक्रवर्ती डाक्का, २६ राधारामन मित्र बरद्वान, २७ सोहनसिंग जोशी अमृतसर, २८ एम्. ए. मजीद लाहोर, २९ केदारनाथ सहगल लाहोर, ३० बी. एफ्. ब्राडले मुंबई व ३१ केशव नीलकंठ जोगळेकर मुंबई.**

---

# दडपशाहीरूपी वेताळाचा धिंगाणा

कलकत्त्याच्या श्रद्धानंद पार्कमध्यें म. गांधी यांनी परदेशी कापडाची होळी पेटवितांच पोलिसांनी झडप घालून ती होळी विझविण्याचा प्रयत्न केला व गांधीजींच्या गळ्यांत खटल्याची घोरपड अडकविली, त्याच वेळीं आम्ही भाकीत केलें होतें कीं बहिष्काररूपी मिरच्यांची धुरी देतांच दडपशाहीचा समंध नाचूं लागणार. तें भाकीत खरें ठरलें. पण हा समंध असा तसा किरकोळ नसून प्रत्यक्ष वेताळच चवताळला आहे आणि त्याच्या बेताल लीला सर्व भरतखंडभर सुरू झाल्या आहेत असें दिसतें. गेल्या बुधवारीं हिंदुस्थानांतील दहाबारा शहरांतून एकसमयावच्छेदेंकरून झडत्या व धरपकड सुरू झाली. आतांपर्यंत शेंकडो ठिकाणीं झडत्या झाल्या असून ३०-३१ इसमांस अटक करण्यांत आली आहे आणि अद्यापि हें झडत्यांचें व अटकबंदीचें सत्र समाप्त झालें असेल असें म्हणवत नाहीं. कदाचित् आणखीहि कांहीं मासे या जाळ्यांत पकडण्यांत येतील व कोर्टांतील चौकशीरूपी तापलेल्या तव्यावर कदाचित् त्यांनाहि भाजून काढण्यांत येईल. पण हा कांहीं विशिष्ट व्यक्तींचा किंवा विशिष्ट संख्येचा प्रश्न नसून सरकारानें कम्युनिस्ट मंडळींवर ही जी मोहीम सुरू केली आहे तिच्या बुडाशीं असलेल्या तत्त्वाचा हा प्रश्न आहे. अर्थातच सरकारने एकंदर किती इसम पकडले आणि त्यांतली एखादी विशिष्ट व्यक्ति कम्युनिस्ट मताची आहे कीं नाहीं आणि केवळ कम्यूनिस्ट पक्षाचीं मतें मान्य असणें हा गुन्हा होतो कीं काय इत्यादि प्रश्नांचा विचार प्रस्तुतच्या खटल्यांत कोर्टापुढें होणारच असल्यानें त्यासंबंधीं व्यक्तिशः आम्हास आजच कांहीं सांगतां येत नाहीं. परंतु सरकारनें ही जी दडपशाहीची मोहीम सुरू केली आहे ती मोहीम काय दर्शविते व तिच्या बुडाशीं सरकारचें धोरण काय असावें व या वेळीं हिंदी लोकांचें कर्तव्य काय एवढ्याच तात्विक प्रश्नांचा विचार आम्हास तूर्त कर्तव्य आहे.

हिंदुस्थानसरकारने धरपकडीचें हें सत्र सुरू केल्याचें वृत्त कानीं पडतांच असेंब्लींतील लोकपक्षीय पुढाऱ्यांनीं सरकारी धोरणाचा छडा लावण्याकरितां सभातहकुबीची सूचना पुढें आणून हा तात्विक वादविवाद करण्याची इच्छा प्रगट केली. परंतु कोर्टापुढें आतां हा खटला चालू होणार असल्याची सबब सांगून सरकारनें असेंब्लीची मुस्कटदाबी केली व वादविवादाला परवानगी देण्याचेंच नाकारिलें! वास्तविक पाहतां पकडलेल्या आरोपींच्या वैयक्तिक गुन्हेगारीबद्दल किंवा त्यांच्या निरपराधीपणाबद्दल कोणासहि अवाक्षर देखील बोलावयाचें नव्हतें व बोलतांना तसा उल्लेख कोणी चुकून केला असता तर अध्यक्षांनीं त्यास ताबडतोब हरकत घेतली असती. पण ही मोहीम याच वेळीं सुरू करण्यांत सरकारचें धोरण काय आहे याची शहानिशा होणें जरूर होतें व तेवढ्याच उद्देशानें सभातहकुबीची सूचना पुढें मांडून वादविवादास तोंड पाडण्याचा लोकपक्षीय सभासदांचा विचार होता. पण अधिकाराच्या जोरावर सरकारनें दडपशाही करून असेंब्लींतील वादविवादाचीहि गळचेपी केली आणि सरकारच्या हेतूविषयीं शंका घेणाऱ्यांच्या मताला अधिकच पुष्टि दिली. असेंब्लींतच वादविवाद झाला असता तर प्रतिपक्षाचे आक्षेप खोडून काढण्याला व स्वतःच्या धोरणाचा खुलासा करण्याला सरकारला आयती संधि सांपडली असती. तशी संधि आपण होऊन सरकारनें गमावल्यामुळें तर्कवितर्कास अधिकाधिक फांटे फुटण्यास आयतीच संधि मिळाली आणि हे तर्कवितर्क खोडून काढणें आतां सरकारला अशक्य होईल.

कम्युनिस्ट पक्षावर सरकारनें ही जी आतां मोहीम सुरू केली आहे ती कांहीं विशिष्ट धोरण आखूनच सुरू केली असली पाहिजे हे निर्विवाद आहे. विलायतेंतील पार्लमेंटांत जीं प्रश्नोत्तरें झालीं त्यावरून एवढें सिद्ध झालें आहे कीं, ही धरपकड सुरू करण्यापूर्वीं हिंदुस्थान—सरकारनें भारतमंत्र्यांचा सल्ला विचारला होता व लॉर्ड पील यांनीं त्यास आपला पाठिंबा असल्याचें आगाऊच आश्वासन दिलें होतें! केवळ पिनल कोडांतील व्याख्येनुसार एखादा गुन्हा कांहीं व्यक्तींच्या हातून घडला असा संशय आल्यास त्या व्यक्तींविरुद्ध खटला भरण्याला भारतमंत्र्यांचा सल्ला कशाला विचारावयाला पाहिजे? हिंदुस्थानसरकारासच काय पण प्रांतिक सरकारासहि कोणत्याहि आरोपीला पकडून त्याजवर पिनल कोडांतील कोणत्याहि कलमाखालील गुन्ह्याबद्दल जाब विचारतां येतो. आणि तसले शेंकडो खटले हरहमेश कोर्टापुढें चालू असतात. गुन्हा घडला अशी वर्दी कळताच व गुन्हेगार हातीं लागतांच त्यावर खटला होणें ही गोष्ट स्वाभाविक क्रमप्राप्त असल्यानें त्या ठिकाणीं सरकारच्या हेतूचा किंवा विशिष्ट धोरणाचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. पण समजा कीं, एखाद्यानें दहा वेळां राजद्रोहाचा संशय येईल असा गुन्हा केला असतां सरकार मूग गिळून स्तब्ध बसतें आणि अकरावे वेळीं

तसलाच प्रकार घडला असतां एकदम चवताळून नारसिंहावतार धारण करून त्या इसमावर झडप घालतें व त्यास हिरवा खाऊं का भाजून खाऊं असला आविर्भाव आणतें! अशा वेळी सरकारचें पूर्वीचें धोरण बदललें असून कांहीं तरी नवा डाव टाकण्याचा सरकारचा विचार आहे असें अनुमान काढणें चुकीचें ठरेल काय? ज्या ३०–३१ इसमांवर कम्युनिस्ट असल्याचा आरोप लादून आज सरकारनें हत्यार उपसलें आहे त्या व्यक्तींचीं तीं मतें आतांच सरकारास कळलीं का यापूर्वीच सरकारास त्यांची दखलगिरी होती? ना. क्रेरार हे तर असेंब्लींत असें बोलून गेले कीं, १९२१ सालापासून कम्युनिस्टांचा हा बनाव बनत चालला आहे. हे जर खरें तर आजपर्यंत सरकारनें त्यांची गय का केली, किंवा आतांच सरकारला त्या मतांत निराळा कांहीं भयंकरपणा आढळून आला कीं काय? तेहि असो. पण या आरोपींपैकीं 'क्ष' नें किंवा 'य' ने जर कलकत्त्यास किंवा मुंबईस वर्ष-सहा महिन्यांच्या अवधींत एखादें आक्षेपार्ह कृत्य केलें असेल तर त्याची चौकशी त्याच वेळीं त्या ठिकाणीं कां करण्यांत आली नाहीं? अखिल भरतखंडभर एकाच दिवशीं एवढी धामधूम उडवून देऊन ३१ कोटी प्रजाजनांतून नेमके ३१ इसम निवडून काढून याच वेळीं त्या सर्वांना मीरतसारख्या एका बाजूच्या किरकोळ शहरापर्यंत मिरवत नेण्यांत सरकारचा कांहींच विशिष्ट हेतु नसेल काय? 'क्षेत्रांत गेल्याशिवाय मुंडण होत नाहीं असें म्हणतात, त्याप्रमाणें मिरत शहराविना इतरत्र या कम्युनिस्टांची चौकशी होऊंच शकत नाहीं काय? पकडलेल्या ३१ इसमांत १०-१२ इसम बंगाल इलाख्यांतले व ८-१० इसम जर मुंबई इलाख्यांतले आहेत तर बहुसंख्य आरोपींच्या सोयीच्या दृष्टीनें त्यांची चौकशी मुबईस किंवा कलकत्त्यास न करतां मिरतलाच कां करण्यांत येत आहे असा सवाल विचारल्यास त्यास सरकार काय जबाब देऊं शकेल? व्यक्तिशः कोणीहि आरोपी कायद्याप्रमाणें गुन्हेगार ठरो वा न ठरो, परंतु चौकशीच्या पूर्वी बहुसंख्य आरोपींची अशा प्रकारें कुचंबणा कां करण्यांत यावी?

सायमन कमिशन आपला दौरा आटोपून पुढील विचारास प्रारंभ करणार आणि इकडे असेंब्लींत पब्लिक सेफ्टी बिल मंजुरीकरितां पुढें येणार; अशा ऐनपर्वणीच्या वेळींच हा धरपकडीचा धिंगाणा सुरू व्हावा हा काकतालीय न्यायच समजावयाचा कीं काय हा हि एक प्रश्नच आहे. या धामधुमीचें सरकारनें एवढें मोठें प्रदर्शन केलें कीं, संशयी वृत्तीच्या माणसास त्या प्रदर्शनांत देखील सरकारचा कांहीं गूढ हेतु असावा असा संशय घेतां येईल. जेथें पांचदहा पोलीस नेऊन काम भागलें असतें तेथें खंडोगणती पोलिसांची परेड उभी करून लढाईचा आभास उत्पन्न करण्यांत हे कम्युनिस्ट म्हणजे भयकर प्राणी आहेत असेंच सरकारला भासवावयाचें होतें का आपल्या अचाट शक्तीचें प्रदर्शन माडावयाचें होतें? पण या प्रदर्शनानें सरकारला जो हेतु साधावयाचा होता तो बिलकुल साधला नाहीं असें आम्ही सरकारास स्पष्ट सांगतों. पोलिसांच्या संख्येचें हें निष्कारण प्रदर्शन पाहून जनतेला सरकारच्या अचाट शक्तिमत्तेविषयीं धाक तर वाटला नाहींच, परंतु उलट असे मात्र विचार मनात उद्भवले कीं नुसत्या वॉरंटाचा कागद दाखवितांच जो आरोपी हूं का चूं केल्याशिवाय पोलिसाच्या स्वाधीन झाला असता हें सरकारला पक्कें माहीत आहे त्याची धरपकड करण्याच्या वेळीं जे सरकार एवढी जय्यत तयारी करतें तेच सरकार पठाणानीं धुमाकूळ माजविला असतां त्याचा ताबडतोब बंदोबस्त करावयाच्या वेळींच कसें विसराळू बनतें!

असो. सरकारनें हें जें अवडंबर माजविलें आहे त्याच्या बुडाशीं काय धोरण आहे याची परिस्फुटता न व्हावी म्हणून सरकारनें असेंब्लीच्या तोंडास जरी कुलूप ठोकलें असलें तरी सरकारच्या चिरपरिचयामुळें जनतेला याचा तर्क करतां येतो. सायमन कमिशनाची येथील कामगिरी संपून आता लवकरच झांकली मूठ उघडी होणार. ती मूठ उघडी होतांच निराशेची जी वावटळ पसरेल तिला आळा घालण्याची ही पूर्वतयारी चालली असावी. जनतेची मागणी नेहरू रिपोर्टाच्या रूपानें राष्ट्रापुढे आली आहे आणि राष्ट्रीय सभेनें त्या मागणीची पूर्तता करण्याकरितां ठराविक मुदतहि दिलेली आहे. ती मुंदत सपून गेली व सरकाराकडून काहींच उत्तर मिळालें नाहीं, अगर मिळालेल्या उत्तरानें तीव्र निराशा झाली तर जी खळबळ उडेल तिचा प्रतिकार करण्याकरितां सेफ्टी बिलासारखीं साधनें निर्माण करणें आणि चळवळ्ये पुढारी आगाऊच अटकबंद करणें असा दुहेरी डाव यांत सरकार साधणार आहेसें दिसतें. पिनल कोडांतल्या हल्लींच्या कलमाचें हत्यार लागू पडलें तर चळवळ्ये पुढारी आयतेच सांपळ्यांत अडकून पडतील. बरें, तें हत्यार अपुरें पडतें असें या खटल्यांत दिसून आल्यास रौलेट ॲक्टासारखा नवीन कायदा करण्यास सरकारास जो अवधि पाहिजे असेल तो आतांपासून मिळेल असा दूरवर विचार होऊन ही मोहीम याच वेळीं सुरू झाली असावी. त्यासंबंधानें येथील अधिकारी कितीहि मुग्ध राहिले तरी विलायतेंतील वृत्तपत्रांना तितका पोंच नसल्यानें तीं

पत्रें सरकारचें अंतरंग उघडकीस आणीत आहेत.

विलायतेच्या 'डेली मेल' पत्रानें आडपडदा न ठेवतां असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, "स्वदेशी चळवळ चालू करून, ब्रिटिश मालावर बहिष्कार घालून व बॅ. हार्जींच्या बिलासारखें बिल पसार करून हिंदी लोक आमचा व्यापार व वाहतुकीचा धंदा ठार मारूं पाहात आहेत. तेव्हां सरकारनें त्या चळवळीवर करडी नजर ठेवावी." या साळसूद पत्रकाराच्या या सोज्वळ सूचनेवरून सरकारचा रोख कशावर आहे ते व्यक्त होतेंच. परंतु दडपशाहीची सध्या जी मोहीम चालू झाली आहे तिचा पहिला हल्ला मजूरसंघाच्या पुढाऱ्यांवरच चढविला जात आहे. यावरून केवळ राष्ट्रीय सभेची स्वराज्याची मागणी धुडकावून लावण्यापुरतीच या दडपशाहीची व्याप्ति असेल असें वाटत नाहीं. सध्या मुख्यतः मजूरसंघाच्याच पुढाऱ्यावर सरकारची वक्र दृष्टि दिसते. यावरून मजुरांचे संप बंद पाडावे, विशेषतः रेल्वेसारख्या दळणवळणाच्या साधनांच्या उपयोगास हरकत येऊं देऊं नये असा तूर्तचा रोख दिसतो. आणि दळणवळणाच्या साधनांची विशेष जरूरी लढाईच्या वेळींच भासणार असल्यामुळें कदाचित् कोठल्या तरी भावी युद्धाची ही पूर्वतयारी असावी असाहि संशय उत्पन्न होतो; मग ही सावधगिरी रशियन बोल्शेव्हिकांसंबंधानें असो अथवा सरहद्दीवरच्या कांहीं भानगडीसंबंधानें असो. सरकार जर कोठेंहि युद्धात पडणार असेल तर त्या वेळींच मजूरसंघाची चळवळ सरकारास बाधक होण्याचा संभव अधिक असणार. आणि अशा आणीबाणीच्या वेळीं नाक दाबल्यास सरकारला आपलें तोंड उघडणें भाग पडेल. तसा प्रसंग आपल्यावर येऊं नये म्हणून आपलें नाक दाबलें जाण्याच्या आधींच प्रतिपक्षाचा हात पकडण्याची ही कारवाई असावी. सरकारला असें निश्चित वाटत असावें कीं, यापुढे मजूरसंघाची चळवळ युद्धाच्या वेळीं आपणास खास खिंडींत गांठल्यावांचून राहणार नाहीं. अशी आपत्ति आपणावर ओढवूं नये म्हणून मजूरसंघाच्या चळवळी लुल्या पाडण्यासाठीं हा खटाटोप सुरू झाला असावा.

परंतु सरकारचे दडपशाहीचे बेत आजपर्यंत जसे फिसकटले तसाच हाहि प्रयत्न फिसकटणार हें सरकारनें लक्षांत ठेवावें. कम्युनिस्टांची धरपकड करण्याचा केवढाहि बागुलबोवा उभा केला तरी मजूरवर्ग आतां पूर्वीसारखा घाबरून जात नाहीं किंवा किंकर्तव्यमूढ होत नाही. एक पुढारी जातांच त्याच्या जागीं दुसरा पुढारी नेमून त्याचें काम पूर्ववत् चालू राहतें. दडपशाहीच्या या वेताळाला अबला देखील भीतनाशा झाल्या आहेत. श्रीयुत डांगे यांना पकडून नेलें असता त्यांच्या पत्नीनें मजूरवर्गाच्या सभेंत भाषण करून कामकऱ्यांना धीर दिला हें उदाहरण हेंच दर्शवितें. मुंबईच्या पांचसात पुढाऱ्यास अटक होतांच त्यांच्या जागीं कामगारसंघांनीं निराळ्या पुढाऱ्यांच्या नेमणुकी केल्या आणि युवकसंघांनींहि आपले सभासद वाढविण्याची चळवळ सुरू केली आहे. यावरून दडपशाहीरूपी वेताळानें केवढेंहि अकाळविक्राळ स्वरूप धारण केलें आणि कितीहि धिंगाणा घातला तरी हिंदी जनता यापुढें आपल्या ध्येयापासून पराङ्मुख होणार नाहीं. एवढेंच नव्हे तर

रत्नैर्महार्हैस्तुतुषुर्न देवा न भेजिरे भीमविषेण भीतिं।
सुधां विना न प्रययुर्विरामं न निश्चितार्थाद्विरमन्ति धीराः ॥

अशीच निश्चयाची वागणूक हिंदी जनतेची आतां दिसून येईल. आणि चालू झालेली चळवळ स्वराज्यप्राप्तीचे अमृत हातीं येईपर्यंत थांबणार नाहीं हें सरकारनें समजून चालावें.

# महंमद अल्ली व कॉंग्रेस

कांहीं ज्ञातिनिष्ठ मुसलमानांनीं कॉंग्रेसच्या कार्यक्रमामध्यें मुसलमानांनीं भाग घेऊं नये अशा अर्थाचें जाहीर पत्रक कांही दिवसांपूर्वी काढले होतें. अलीबंधू हे अलीकडे आपले राष्ट्रीयत्वाचें पांघरूण फेकून देऊन उघडपणें ज्ञातिनिष्ठेचा पुरस्कार करूं लागल्यामुळें त्यांच्याहि या पत्रकावर सह्या होत्या. या पत्रकास डॉ. अन्सारीप्रभृति राष्ट्रीय वृत्तीच्या मुसलमानांनीं उत्तर दिलेंच आहे. पण या पत्रकावरून महंमद अल्ली व पं. जवाहरलाल नेहरू यांचा एक निराळाच वाद उपस्थित झाला आहे. महंमद अल्ली हे एके काळीं कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. कॉंग्रेसच्या या माजी अध्यक्षांनीं कांग्रेसच्या कार्यक्रमाच्या विरोध—पत्रकावर सह्या कराव्या ही अनुचित गोष्ट होय, असे पं. जवाहरलाल यांनी एका व्याख्यानांत उद्गार काढले. महंमद अल्ली हे ब्रह्मदेशात विश्रांतीसाठीं गेले आहेत. पण ही विश्रांति मोडून त्यांना या पं. जवाहरलाल यांच्या विधानाला तांतडीनें विस्तृत उत्तर देणें जरूरीचें वाटलें. या उत्तरांत त्यांनीं आपल्यासारखे कॉंग्रेसचे आजपर्यंतचे इतर अध्यक्षहि वागत आले आहेत या मुद्द्यावर आपल्या वर्तनाचें समर्थन केलें आहे! आपलें वर्तन विसंगत हे त्यांना मान्य करणें प्राप्तच होतें, पण आपली ही विसंगति अपूर्व नसून कॉंग्रेसचे सर्वच माजी अध्यक्ष या बाबतींत एकाच माळेचे मणी ठरतात असे दाखविण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. कॉंग्रेसचे अध्यक्षांची ही चमत्कारिक जात आहे व तिनें अनेक विक्षिप्त प्रकार केले आहेत असें दाखवितांना महंमद अल्लींनी स्वतःचा विक्षिप्तपणा मात्र जगाच्या निदर्शनास आणला आहे.

कांहीं विशिष्ट बाबतींत कॉंग्रेसशीं मतभेद झाला असतांना आपल्या स्वतंत्र मताचा पुरस्कार करून कॉंग्रेसचा निर्णय बदलून घेण्याचा मला हक्क आहे असें महंमद अल्ली म्हणतात. पण महंमद अल्लींनीं ज्या पत्रकावर सही केली आहे तें पत्रक एका विशिष्ट कार्यक्रमांत मुसलमानांनीं सामील होऊं नये येवढ्यापुरतें नाहीं. तर वर्षभर कॉंग्रेसच्या कोणत्याहि कार्यक्रमांत सामील होऊं नये असे त्यांत म्हटलें आहे. आणि याला कारण काय? तर तो कार्यक्रम केल्यास नेहरू रिपोर्टाला पाठिंबा दिल्यासारखा होतो. पिशाचबाधेनें पछाडलेल्या मनुष्याप्रमाणें महंमद अल्लीप्रभृतींना जिकडे तिकडे नेहरू रिपोर्ट दिसूं लागला आहे असे दिसतें. परदेशी कापडाच्या होळीच्या धुरांत त्यांना नेहरू रिपोर्टाचा संमंध दिसतो, मद्यपानबंदीच्या चळवळीनेंही नेहरू रिपोर्टाला पाठिंबा दिल्यासारखें होईल अशी भीति त्यांना वाटते. सारांश, नेहरू रिपोर्टामध्यें मुसलमानांच्या चढेल मागणीप्रमाणें हक्क न मिळाल्यामुळे कॉंग्रेसच्या सर्वच कार्यक्रमांत सर्वच मुसलमानांनीं कोणताच भाग घेऊं नये अशी घोषणा करण्यांत मौ. महंमद अल्लींनी जी विस्मयजनक विपरीत बुद्धि दाखविली तशी आजपर्यंत कोणाहि कॉंग्रेसच्या अध्यक्षानें दाखविली नाहीं.

मद्रासला ठरलेली हिंदू—मुसलमानांच्या राजकीय ऐक्याची योजना महात्मा गांधी व डॉ. अन्सारी यांनी मोडली याबद्दल महंमद अल्लींनीं दोघांसहि दोष दिला आहे. पण ज्या मद्रास कॉंग्रेसनें ही योजना केली तिच्यांतच सर्वपक्षीय परिषद भरवून सर्वमान्य अशी स्वराज्ययोजना करण्याबद्दलचा ठराव झाला. अर्थातच मद्रासच्या कॉंग्रेसमधील ठराव तात्पुरता होता. तेथें ठरलेली हिंदू—मुसलमानांच्या संबंधाची व्यवस्था अखेरची व वज्रलेप असती तर कॉंग्रेसनें सर्वपक्षीय परिषदेकडे हें काम सोंपविण्याचें कारणच नव्हतें. म्हणूनच कॉंग्रेसच्या योजनेबरहुकूम सर्वपक्षीय परिषद होऊन जो निर्णय झाला त्याचा पुरस्कार करण्यांत अन्सारी व गांधी यांनीं कॉंग्रेसद्रोह केला असें मानणें साफ चुकीचें आहे. पण आपल्यावर आलेला दोष सरसकट सर्वच अध्यक्षांच्या गळ्यांत बांधण्याच्या खटाटोपांत महंमद अल्लींना कसलेंच तारतम्य राहिलेलें नाहीं. पंडित मोतीलाल नेहरू हे कॉंग्रेसला ठार करून तिचें हिंदुमहासभेंत रूपांतर करीत आहेत, असा त्यांच्यावर महंमद अल्लींनीं आरोप केला आहे. पंडित नेहरू हे कोणत्याहि हिंदु—महासभेस हजर राहिले नाहींत व हिंदु—महासभेचा कोणताहि निर्णय कॉंग्रेसवर लादण्याचा त्यांनी प्रयत्न केला नाहीं, एवढेंच नव्हे तर हिंदु-महासभेच्या ठरावाविरुद्धच त्यांचीं भाषणें असतात. उलट महंमद अल्ली मात्र मुस्लीम लीगशीं सहकारिता करून मुस्लीम लीगचा निर्णय कॉंग्रेसवर लादूं पाहात आहेत व केवळ कॉंग्रेसलाच नव्हे तर सर्व—पक्षीय परिषदेलाहि मुस्लीम लीगच्या तालावर नाचावयास लावावें असाच त्यांच्या सध्याच्या धोरणाचा स्पष्ट अर्थ आहे. स्वतः ही आक्षेपार्ह गोष्ट करीत असतां ज्ञातिनिष्ठ संस्थेपासून सर्वथैव अलिप्त असलेल्या नेहरूंवर असला आरोप करण्यास उद्युक्त होणारे

महंमद अल्ली हे ज्ञातिनिष्ठेनें किती धुंद झाले आहेत याचा विचार वाचक करतीलच.

पंडित मदन मोहन मालवीय हे काँग्रेसचे तीनदां अध्यक्ष झालेले व हिंदुसभेचे कट्टे पुरस्कर्ते. अर्थात् त्यांच्यावर महंमद अल्लींनीं प्रथमच कडकडून हल्ला केला आहे. हिंदु स्त्रियांना स्वसंरक्षणार्थ पिस्तुलें वापरण्यास पंडित मालवीय यांनी सांगितलें. ही गोष्ट कॉंग्रेसच्या अनत्याचारी धोरणाच्या विरुद्ध झाली अशी महंमद अल्लींनीं तक्रार केली आहे! पण कॉंग्रेसनें अनत्याचार हा स्वराज्यप्राप्तीच्या मार्गापुरता सांगितलेला आहे. स्त्रियांनीं स्वतःच्या अब्रूच्या रक्षणार्थ हत्यार वापरूं नये किंवा प्रतिकार करूं नये असा कांहीं कॉंग्रेसचा ठराव झालेला नाहीं. स्त्रिया निःशस्त्र व असहाय राहिल्याने ज्यांना त्यांच्यावर बळजबरी करण्यास धाक वाटेनासा होतो अशा अत्याचारी माणसाकडूनच असला आक्षेप पुढें येऊं शकेल. असे असतां महंमद अल्लीसारख्यांनीं, स्त्रियांनीं स्वतःजवळ स्वसंरक्षणाचे कांहीं तरी साधन बाळगावें अशा अर्थाच्या सूचनेविरुद्ध नाकें मुरडावीं हे त्यांच्याच कुत्सित कल्पनेचें द्योतक मानलें जाईल. नव्हे असा उपदेश करण्यांत मालवीयजींकडे अनत्याचारीपणाविरुद्ध उपदेश केल्याचा दोष येऊं शकत नाहीं. अनत्याचारीपणा याचा अर्थ स्त्रियांनीं आत्मसंरक्षणहि न करणे असा स्वतः म. गांधीहि करीत नाहीत. परंतु मालवीयजींच्या या उपदेशाबद्दल मुसलमानी समाजाला राग येणे हा सावकारानीं आपल्या घरांभोवतीं पाहरा ठेवला म्हणून दरवडेखोरांना राग येण्यांतलाच प्रकार आहे!

हिंदू-मुसलमानांच्या एकीविषयीं प्रयत्न करावा असा कॉंग्रेसचा ठराव असून पं. मालवीयजी हे कोणत्याहि दंग्याच्या वेळीं हिंदूंना दोष देत नाहींत असाहि एक मोठा आक्षेप महंमद अल्लींनीं त्यांच्याविरुद्ध पुढे केला आहे! त्यांची ही कृति कांचेच्या घरांत राहणाऱ्यांनीं दुसऱ्याच्या दगडी भिंतीवर दगड फेकण्याच्या कृतीइतपतच शहाणपणाची ठरेल. स्वतः महंमद अल्लींनीं तरी कोणत्या दंग्यांत मुसलमानी गुंडांचा निषेध केला आहे? गोध्रा येथे श्रीयुत शाह यांचा भररस्त्यांत खून झाला व आमदार मुकादम यांच्यावरहि प्राणघातक हल्ला झाला. अशा वेळीं या अल्लींनीं कॉंग्रेसचा ठराव कितपत पाळला? आणि परवांच्या मुंबईच्या दंग्यांत तर ऋणको मजूर विरुद्ध धनको पठाण असें मूळ दंग्याचें स्वरूप असतां त्याचें हिंदू विरुद्ध मुसलमान अशा प्रकारचें रूपांतर कसें झालें, तें सर्वश्रुतच आहे. साराश, महंमद अल्लींची कॉंग्रेसनिष्ठा म्हणजे शुद्ध ढोंग आहे. मुसलमानी हितसंबंधाशीं सुसंगत असेल तेवढीच कॉंग्रेसनिष्ठा त्यांना हवी. जोंपर्यंत कांग्रेसच्या धोरणाने मुसलमानांचें हित साधत होतें तोंपर्यंत ते कॉंग्रेसला उचलून धरीत होते. पण आतां कॉंग्रेसच्या ठरावानें त्यांच्या मताप्रमाणें मुसलमानी हितसंबंधास बाध येतोसा वाटल्याबरोबर ते त्या ठरावाची परदेशी कापडाच्या बरोबरीनें होळी करण्यास सिद्ध झाले!

पंडित मालवीय हे इतर जातीच्या व धर्माच्या इसमाबरोबर अन्नोदक-ग्रहण करीत नाहीत यावरून मालवीयांनीं कॉंग्रेसचा अस्पृश्यतानिवारणाचा ठराव मोडला असाहि एक आरोप महंमद अल्लींनीं त्यांच्यावर केला आहे! मालवीयांचा हा कर्मठपणा अलीकडच्या हिंदु सुशिक्षितांनाहि पसंत पडणार नाहीं हें खरें. पण कॉंग्रेसच्या ठरावांत अन्नोदकग्रहण येतें असा अर्थ महंमद अल्लींनीं कोठून काढला? उलट मालवीयांनीं अस्पृश्यतानिवारणाला आजपर्यंत उक्तीनें व कृतीनें अनेक प्रकारें प्रोत्साहन दिलें आहे तें मात्र महंमद अल्लींना स्मरलें नाहीं! कोकोनाड्याच्या कॉंग्रेसमध्ये महंमद अल्ली यांनीं निम्म्या अस्पृश्य समाजाला मुसलमान करून अस्पृश्यतानिवारणाचा रामबाण उपाय कॉंग्रेसला सुचविला होता! पण त्या दिवसापासून महात्मा गांधीहि सावध झाले व त्यांनीं अस्पृश्यतानिवारण करावयाचें तें फक्त हिंदूंनींच करावयाचें असें प्रत्येक वेळीं हडसूनखडसून सांगण्यास सुरवात केली. अर्थातच या ठरावाचा विचार हिंदूंनींच एकमेकांत करावयाचा आहे. मुसलमानांनीं त्यांत नाक खुपसण्याचें कारण नाहीं. पण कॉंग्रेसचा अनत्याचार व अस्पृश्यतानिवारण या दोहोंचा मुसलमानांना अनुकूल असाच अर्थ आजपर्यंत महंमद अल्ली करीत आले. अर्थातच कॉंग्रेसच्या राष्ट्रीय कार्यक्रमास त्यांनीं जो आजपर्यंत पाठिंबा दिला तो मुसलमानांचें हित साधण्याच्या स्वार्थी दृष्टीनेच दिला हेच सिद्ध होत आहे.

# दिल्लीचें बातमीपत्र

नवी दिल्ली ता. २८-३-२९

[ ९ ]

चालू आठवड्यांत सोमवार व मंगळवार असे दोन दिवस असेंब्लीनें शिमग्याची सुटी घेतली. शनिवार ता. २३ रोजींहि असेंब्लीची बैठक झाली नाहीं. याशिवाय शुक्रवार ता. २९रोजीं 'गुड फ्रायडे' म्हणून त्या दिवशींहि असेंब्ली बंदच राहणार व पुढें ईस्टरची सुटी लागली. मिळून या आठवड्यांत ता. २७ व २८ असे दोनच दिवस बैठक होणार व तेवढ्यांत फॉयनॅन्स बिलाचे तिसरें वाचन मंजूर झालें तरी कौन्सिल ऑफ स्टेटची मंजुरी मिळण्यास अवधि राहात नाही. ३१ तारखेच्या आंत बिल पास झाले तरच सरकारला त्याप्रमाणें ता. १एप्रिल-पासून कर वसूल करण्याचा अधिकार प्राप्त होईल. तसे न झाल्यास सरकारला कांहीं दिवसांपुरता वटहुकूम काढून हे कर वसूल करावे लागणार. असेंब्लीन मिठावरील करामध्ये ४ आणे कमी केले. पण त्यामुळे सरकारच्या जमेत ६५ लाखांची तूट येणार. यासंबंधाने सरकार काय करणार, इत्यादि प्रश्नासंबंधी चार दिवसांच्या सुटींत तर्कवितर्क व चर्चा हीं चालू होती. पब्लिक सेफ्टी बिल व ट्रेड डिस्प्यूटस बिल हीं याच बैठकींत पास करून घेण्याचा सरकारचा निश्चय आहे. त्यासाठीं बैठक एक आठवडा लांबवली आहे. व हिं. सरकारचे सिमल्याचें गिर्यारोहण एक आठवड्याने पुढे ढकलले आहे. उन्हाळ्याचा प्रारंभ झाल्याबरोबर सरकारी अधिकारी सिमल्यास जाण्यास उत्सुक झालेले असतात, पण त्यांची व इतर सभासदांची गैरसोय करूनहि हीं बिलें पास करून घेण्याचा सरकारचा इरादा आहे.

***

असो. ता. २७ रोजीं चार दिवसांच्या सुटीनंतर असेंब्लीच्या बैठकीस सुरुवात झाली. फायनॅन्स बिल ता. ३१ च्या आंत मंजूर झालें नाहीं तर कसे काय होणार हें कोडें तसेंच टाकून, सुटीमध्ये कित्येक बिनसरकारी सभासद दिल्ली सोडून गेल्यामुळे सभासदांची संख्या बेताचीच होती. मिठावरील करासंबंधानें काय होणार याबद्दल आपसांत चर्चा सुरू होतीच.त्यांतल्या त्यांत सायमन कमिशन दिल्लींत असतांनाच ही फायनॅन्स बिलाची अडचण उत्पन्न झाली हा योगायोगहि कित्येकांना विचार-णीय वाटला. त्या दिवशीं जरूर तर रात्रभर बैठक भरवून फायनॅन्स बिलावरील चर्चा संपवावयाची असें अध्यक्ष पटेल यांनीं ठरविल्याची गुणगुण लागल्यामुळें त्याचीहि या चर्चेत भर पडली. फायनॅन्स बिलाची चर्चा सुरू होऊन प्रथम पोस्टाच्या दरासंबंधाच्या सूचना पुढें आल्या. अमरनाथ दत्त यांनी पाकिटांचा दर अर्धा आणा करण्याबद्दल सूचना मांडली. सर भूपेंद्रनाथ मित्र यांनीं दर कमी केल्यास सुमारें दीड कोटीचे नुकसान होईल असें सागितलें. अमरनाथ यांची सूचना मतमोजणी न करतांच नामंजूर झाली. यानतर आचार्य यांनीं १ पैशाचें पोस्टकार्ड करण्याची सूचना मांडली व फाजल रहिमतुल्ला यांनी सॅंपल पॅकेट १ पैशांत पाठवितां यावें अशी सूचना केली. पण लोकपक्षाचे बहुमत सभासदांच्या गैरहजेरीमुळें शिल्लक राहिलें नव्हतें. यामुळें वादांत कोणाचें लक्ष नव्हतें व दोन्ही सूचना नामंजूर झाल्या. आचार्य यांची सूचना ३४ वि. ४७ मतानीं नापास झाली. याप्रमाणे सरकारच्या बाजूचें बहुमत स्पष्ट दिसत असल्यामुळे पुढें प्रांतीवरील करासंबंधाच्या लोकपक्षीय सूचनाहि मते न मोज-तांच भराभर नापास होत गेल्या.

***

याप्रमाणें फायनॅन्स बिलांतील सर्व कलमें संपल्यावर अध्यक्षांनीं बिल कलमवार मंजुरीसाठीं असेंब्लीपुढें मांडलें व सर्व कलमें मंजूर होऊन दुसरें वाचन पूर्ण झालें. लगेच रीतीप्रमाणे शुस्टर यांना बिलाचे तिसरें वाचन करण्याबद्दल अध्यक्षांनीं सांगितलें. पण त्यांनीं तिसऱ्या वाच-नाची सूचना करण्याचे अगोदर अध्यक्षांच्या खुर्ची-जवळ जाऊन त्यांना व्हाइसरॉयांचा खलिता सादर केला. त्यांत मिठावरील कर पूर्वीप्रमाणें सवा रुपयाच ठेवून फायनॅन्स बिल पास करावें असा व्हाइसराय यांनीं असेंब्लीला पाठविलेला संदेश होता व तो अध्यक्षांनीं वाचून दाखविला. व्हाइसरॉयांचा संदेश वाचण्याचे वेळीं सर्व सभासदांनीं उभे राहावयाचे असा असेंब्लीमध्ये फाजील दरबारी आदबीचा संप्र-दाय पडलेला आहे. पण रयतेचें मीठ महाग करणारा व असेंब्लीस अपमानकारक असा हा संदेश असल्यामुळे श्री. केळकर व स्वराजिस्ट सभासद हे या वेळीं उभेच राहिले नाहींत. असो. यानंतर व्हाइसरॉयांनीं शिफारस केल्याप्रमाणें दुरुस्त केलेलें बिल, म्हणजे मिठावरील कर पूर्वीप्रमाणें सवा रुपया करून, शुस्टर यांनीं मांडावयाचें. पण ते होण्याच्या

आधींच श्रीनिवास अय्यंगार यांनीं अशी हरकत घेतली कीं नियमाप्रमाणें ही दुरुस्ती शुस्टर यांना असेंब्लीपुढें आतां मांडतांच येत नाहीं. अय्यंगारांचें म्हणणें असें कीं, असेंब्लीमध्यें मिठावरील कराचे चार आणे कमी करण्याची सूचना मंजूर होण्यापूर्वी व्हाइसरॉयांची ही शिफारस यावयास पाहिजे होती. दुसऱ्या एखाद्या सामान्य बिलाचे बाबतींत अशी शिफारस चालली असती. पण फायनॅन्स बिलाचे बाबतींत ती चालणार नाहीं. रंगास्वामी अय्यंगार व पं.नेहरू यांनीं श्रीनिवास अय्यंगारांच्या हरकतीस दुजोरा दिला व क्रेरर आणि शुस्टर यांनी व्हाइसरॉयांच्या शिफारसीप्रमाणें दुरुस्त बिल आणणें हे पूर्णपणें नियमांना धरून आहे असें प्रतिपादन केलें. नियमासंबंधींच्या प्रश्नाचें हें गडांतर उत्पन्न झाल्यामुळें त्याच दिवशीं फायनॅन्स बिल संपवावयाचें हा संकेत ढांसळला व नियमासंबंधीं उत्पन्न झालेल्या प्रश्नाचा विचार करून निर्णय देण्यासाठीं अध्यक्ष पटेल यांनीं त्या दिवसाची बैठक तहकूब ठेवली.

***

अय्यंगारांच्या कायदेशीर प्रश्नामुळें पटेल यांना मोठाच पेंच पडला असावा. कायद्याचा शब्दशः अर्थ घेतला तर अय्यंगारांचें म्हणणेंच बरोबर दिसत होतें, पण नियम ज्या हेतूनें करण्यांत आला त्याचा विचार केला असतां शुस्टर यांना व्हाइसरॉयाच्या शिफारसीप्रमाणें तिसऱ्या वाचनाच्या वेळीं दुरुस्ती करतां येते असें अध्यक्षांनीं ठरविलें. गुरुवारीं बैठकीचे आरंभीं हा निर्णय त्यांनीं जाहीर केला. त्याप्रमाणें मिठावरील कर पूर्वीप्रमाणे दरमणीं सवा रुपया करण्याची सूचना शुस्टर यांनीं केली. या सूचनेस मुनशी, केळकर, जयकर व अय्यंगार यांनीं विरोध केला. व्हाइसरॉयांचा संदेश हा लोकप्रतिनिधींना अपमानकारक असल्यामुळेच तो वाचला गेला त्या वेळीं आपण उभे राहण्याचें जाणून—बुजून नाकारलें असें केळकर यांनी सांगितलें. मुनशी यांनीं असेंब्लीला एका अधिकाऱ्यानें "माकडाची सभा" असें संबोधल्याचें सांगितल्यामुळे बरीच खळबळ उडाली. कांहीं सरकारी अधिकाऱ्यांनीं "नाहीं नाहीं" म्हणून ओरड केली व असे उद्गार कोणत्याहि अधिकाऱ्यानें काढले नाहींत असें क्रेरर यांनीं सांगितलें.पटेल यांनीं मुनशी यांना या अधिकाऱ्याचें नांवच विचारलें. तेव्हां तें असेंब्लींत प्रगट न करतां खासगी रीतीनें पटेल यांना कळविण्याचें मुनशी यांनीं आश्वासन दिलें.

***

असो. व्हाइसरॉयांच्या संदेशामुळे झालेल्या अपमानाचा खरा प्रतिवाद करावयाचा तर असेंब्लीनें ही दुरुस्ती फेटाळून लावावयाची होती. पण लोकपक्षीय सभासदांच्या गैरहजेरीमुळें शुस्टर यांची सूचना ८६ वि. ४१ मतांनीं मंजूर झाली! म्हणजे आपलाच निर्णय फिरवून व व्हाइसरॉयांचा अपमानास्पद हुकूम स्वीकारून असेंब्लीनें आपलीच नाचक्की करून घेतली, दुसरें काय ? निदान ज्यांनीं पूर्वी मिठावरील कर चार आण्यांनीं कमी करण्याच्या लोकपक्षीय सूचनेस पाठिंबा दिला होता त्यांनीं तरी शुस्टर यांच्या सूचनेस पाठिंबा द्यावयाचा नव्हता.पण अशा चार सभासदांनीं या सूचनेस या वेळीं पाठिंबा दिला. हे सभासद म्हणजे गझनवी, अनवर उल अझीम, सय्यद हुसेन शहा व राजन बक्ष हे होत. असेंब्लीला 'माकडांची सभा' असें विशेषण लावण्याची बुद्धि एका अधिकाऱ्याला झाली ती वरील चौकडीसारख्या सभासदांकडे पाहूनच झाली असली पाहिजे ! याप्रमाणें एका महत्त्वाच्या प्रश्नावर सरकारचा जय झाला व ५० विरुद्ध ३९ मतांनीं सर्व फायनॅन्स बिलाचें तिसरें वाचनहि मंजूर झालें. ३१ तारखेच्या आंत असेंब्लींत बिल मंजूर झालें तरी तें कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें मंजूर व्हावयास पाहिजे. यासाठीं परवा शनिवारीं कौन्सिल ऑफ स्टेटच्या बैठकींत हें बिल चर्चा न करतां चुटकीसरशी पास करून घेण्याचा सरकारचा विचार आहे व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें सरकारचें हें काम सहजासहजीं होऊन जाईल हें निश्चित होय.

***

फायनॅन्स बिल मंजूर झाल्यानंतर ज्या पब्लिक सेफ्टी बिलाकरितां मुख्यतः बैठक लांबवण्यांत आली आहे तें बिल सर बी. एल्. मित्र यांनीं असेंब्लीपुढें विचारार्थ मांडलें. सरकारचे गृहमंत्री मि. क्रेरर यांनींच तें पुढें मांडावयाचें.पण ते आजारी असल्यामुळें हें काम लॉ मेंबरकडे आलें. मित्र यांनीं सिलेक्ट कमिटींत झालेल्या दुरुस्त्या समजावून सांगितल्या. फक्त प्रचलित राज्यपद्धति नष्ट करण्याची चळवळ करण्यासाठीं इकडे येणाऱ्या ब्रिटिश कम्युनिस्टांविरुद्ध हें बिल असून त्याचेयोगानें कॉंग्रेससारख्या न्याय्य राजकीय चळवळीस कोणताहि धोका नाहीं असें त्यांनीं आश्वासन दिलें. यावर अनत्याचारी कम्युनिस्टांविरुद्ध या बिलाची बजावणी होईल कीं काय अशी अय्यंगार यांनीं शंका प्रदर्शित केली. तेव्हां 'ते अनत्याचारी राहतील तोंपर्यंत हिंदुस्थानांत सुरक्षित नांदूं शकतील' असें मित्र यांनीं उत्तर दिलें. पण अत्याचार किंवा अत्याचारप्रवर्तक प्रयत्न केल्यावर त्याबद्दल नेहमींच्या कायद्यानें सरकारास बंदोबस्त करतां येण्याजोगा आहे. यामुळें या उत्तरानें बिलाची अनवश्यकताच सिद्ध होते हें

मित्रांसारख्या सरकारी कायदेपंडिताच्या लक्षांत येऊं नये हें आश्चर्य होय.

यानंतर बॅ. जयकर यांनी मीरतचा खटला दोन तऱ्हेनें सरकारच्या अंगावर उलटविला. ते म्हणाले, कम्युनिस्टांचा बंदोबस्त करण्यास सामान्य कायदा पुरेसा आहे हें मिरतच्या खटल्यावरून दिसून येतें; शिवाय बिलावर साधक–बाधक चर्चा करावयाची म्हटली तर कोर्टापुढे असलेल्या मीरतच्या खटल्यांतील गोष्टींची चर्चा करावी लागणार. अशी चर्चा होणें इष्ट नाहीं या सबबीवर सरकारनें धरपकडीसंबंधाची तहकुबीची सूचना तहकूब केली होती. मग याच मुद्दयावर प. सेफ्टी बिलहि तहकूब करणें हेंहि तितकेंच इष्ट ठरतें. यासाठीं हें बिल तहकूब ठेवावें अशी जयकरांनी मित्र यांना सूचना केली, पण त्यांनीं अर्थातच ती मानली नाहीं. पण बिल तहकूब करण्यासंबंधानें रीतसर सूचनाच मि. जोगिया यांनीं अध्यक्षांकडे पाठविली आहे. ती विचारार्थ निघेल त्या वेळीं या गोष्टींचा विचार होईल असें सांगून अध्यक्षांनीं बैठक मगळवारपर्यंत तहकूब ठेवली. अर्थात् ईस्टरमध्यें ठिकठिकाणच्या परिषदांसाठीं जाणाऱ्या मंडळींना पुनः सुटीनंतर पब्लिक सेफ्टी बिलासाठीं परत दिल्लीस यावें लागणार.

# दृष्टि जरा तरी अंतर्मुख करा

अखिल भरतखंडांत कोणत्याना कोणत्या तरी कारणानें दडपशाहीचा झंझावात पुनश्च वाहूं लागला आहे. त्या झंझावातानें प्रज्वलित केलेल्या राजद्रोहाच्या खटल्याच्या खाईंत 'नवा काळ' पत्राचे संपादक श्रीयुत कृष्णाजीपंत खाडिलकर हेहि सांपडून राजद्रोहाच्या आरोपावरून त्यांना एक वर्षाची साधी कैद, दोन हजार रुपये दंड आणि दंड न दिल्यास आणखी तीन महिने साधी कैद अशी शिक्षा भोगण्याची पाळी आली. अलीकडे नवीन रूढ होऊं लागलेल्या औपचारिक पद्धतीनें सरकारच्या रोषाला बळी पडलेल्या वीरांचे अभिनंदन करण्यांत येत असते आणि राष्ट्राचा दृष्टिकोन बदलल्याचें तें एक व्यक्त लक्षण आहे यांत शंका नाहीं. तथापि श्रीयुत खाडिलकर यांचें ५७ वर्षांचे वयोमान, त्यांना जडलेला मधुमेहाचा विकार आणि या खटल्याच्या पायीं त्यांना भरावा लागलेला भूर्दंड लक्षांत घेतां त्यांच्यावर ओढवलेल्या आपत्तीबद्दल अखिल महाराष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीस त्यांच्याविषयीं हळहळच वाटल्यावांचून राहाणार नाहीं.

फेब्रुवारी महिन्याच्या १४ व्या तारखेस श्रीयुत खाडिलकर यांस ज्या परिस्थितींत व ज्या लेखाकरितां म्हणून पकडलें त्यांचा विचार करता मुंबईतील परिस्थिति निवळल्यानंतर तरी त्यांना या खटल्याची फारशी तोशीस लागणार नाहीं असें वाटत होतें. परंतु क्षुल्लक कामांत देखील सरकारचें 'प्रेस्टिज' आडवें येत असल्यामुळें, दंगा बंद होऊन सर्वत्र शांतता नांदू लागली तरी, एकदां उभारलेला खटला काढून घेण्याइतका दिलदारपणा सरकारला दाखवावासे वाटलें नाहीं आणि खटल्याचें काम अखेरपर्यंत चालून वर दर्शविल्याप्रमाणे कडक शिक्षा ठोठावण्यांत आली. पिनल कोडांतलें १२४ अ हें कलम इतकें लवचीक व व्यापक आहे कीं, सरकारनें तसें मनांतच आणल्यास सरकारावर निर्भीडपणें केलेल्या टीकेचा कोणताहि लेख त्या कलमाच्या जाळ्यांतून क्वचितच निसटूं शकेल. ज्यूरीला खटला समजावून देतांना न्या. ब्लॅकवेल हे म्हणाले कीं, 'वर्तमानपत्रांचें स्वातंत्र्य हिरावून घ्यावें असा या कलमाचा उद्देश मुळींच नाहीं. सरकारावर टीका करण्याला या कलमानेंहि लेखकांना मोकळीक ठेवली आहे; मात्र त्या टीकेची रास्त मर्यादा ओलांडली गेली तर तो गुन्हा होतो'! पण आरोपीनें मर्यादेचें उल्लंघन खरोखर केलें कीं नाहीं हे ठरविण्याला त्या कलमांत निश्चित असे गमक काय आहे? प्रचलित राज्यपद्धति बदलून तिच्यांत सुधारणा घडवून आणण्याकरितां केलेली टीका राजद्रोहाच्या गुन्ह्यांत येऊं शकत नाहीं असा एक खुलासा त्यास जोडलेला आहे. पण तो खुलासा तरी लागू पडतो कीं नाहीं हे तरी कोणीं ठरवावयाचें? त्याला कायदेशीर मोजमाप कोणतेंच सांगितले नसल्यानें जोंपर्यंत सरकार आक्षेप घेत नाहीं तोंपर्यंत ती टीका मर्यादेच्या आंत आहे असें समजावें; आणि सरकारनें आक्षेप घेऊन खटला भरला व ज्यूरीनें किंवा मॅजिस्ट्रेटानें गुन्हा शाबीत धरला कीं मर्यादेचें उल्लंघन केलें गेलें असें मानावें असला अंधळ्या कोशिंबिरीचा प्रकार किंवा नियतिवाद या बाबतींत आजवर चालू आहे आणि तो प्रकार स्वराज्यप्राप्ति होईपर्यंत बदलला जाईल असें वाटत नाहीं.

राजद्रोहाच्या व्याख्येच्या असल्या अनिश्चित स्वरूपामुळें सरकारावरील टीका, किंबहुना सगळीच

राजकीय चळवळ, ही एक प्रकारें तारेवरील नाचाप्रमाणें धोक्याची झाली आहे. त्यांतिल्या त्यांत तुलनाच करावयाची झाल्यास तारेवरच्या नाचाला देखील कांहीं नैसर्गिक नियम असतात आणि आपला तोल आपण लक्षपूर्वक संभाळला तर आपणाला भीति नाहीं अशी नाच करणाऱ्यांची खात्री असते. पण राजकीय चळवळींत पडणाऱ्या इसमाला तेवढाहि निर्धास्तपणा नसतो. कारण या ठिकाणीं आपला तोल आपण संभाळला तरी कोणा तरी तारवटलेल्या व्यक्तीच्या मनाचा तोल बिघडून त्यानें तारेच्या खांबाला धक्का दिला कीं आपला तोल आपण संभाळून देखील त्याचा उपयोग न होतां दुसऱ्याच्या मनाचा समतोलपणा बिघडल्याचा परिणाम आपणाला भोगावा लागणार! याकरितां राजद्रोहाचें कलम ही एक विस्तवाची खाई आहे असें म्हटलें असतां तें अधिक सयुक्तिक दिसेल. अग्निहोत्री ज्याप्रमाणें आपल्या कुंडातला अग्नि कधींच विझूं नये अशी दक्षता बाळगतो त्याप्रमाणें सरकारहि आपला हा १२४ अ रूपी अग्नि कधींच विझूं देत नाहीं; मात्र आपल्या लहरीप्रमाणें तें कधीं कधीं त्याच्यावर भरपूर राख सांचूं देतें. अशा रीतीनें कालांतरानें राखेचा ढिगारा बराच सांचल्यास विस्तव दृष्टीआड झाल्यामुळें चुकूनमाकून कोणाचा तरी पाय त्याजवर पडतो व त्याला चटका बसतो. परंतु ज्या वेळीं दडपशाहीचा झंझावात सुटतो त्या वेळीं त्या विस्तवावरील राख पार उडून जाऊन तो धगधगीत होऊन पेटूं लागतो. या वेळीं कोणीहि त्याजवर चुकून पाऊल ठेवलें असें होणें संभवनीयच नसते. मात्र अशाच वेळीं स्वकर्तव्य म्हणून त्या अग्नींत आपल्या प्राणाची आहुति देण्याला कित्येक देशभक्त तयार होतात व त्यांना त्या अग्नीचें प्रज्वलित स्वरूप पाहून भीति न वाटतां उलट आनंदच होतो. कारण जिनें सतीचें वाण घेतलें तिला जशी चिता जितकी अधिक भडकली असेल तितकी चांगलीच वाटणार, कारण त्यायोगानें तिचा उद्दिष्ट हेतु तितका लवकर सिद्धीस पावणार, त्याप्रमाणेच ज्याच्या अंतःकरणांत राष्ट्रप्रेमाची ज्योत पेटली असेल त्यालाहि असल्या बाह्य संकटाची भीति न वाटता उलट त्यायोगानें स्वकर्तव्य करण्याची स्फूर्ति अधिकच वाटूं लागते.

याकरितांच आम्हास सरकारास असें विचारावेसें वाटतें कीं, असलें दडपशाहीचें सत्र सुरू करून तुम्ही काय साधूं पाहतां? आपल्या छावणीवर शत्रु चालून येऊं नये म्हणून छावणीच्या सभोंवतीं जशी एखादी खाई पेटवून ठेवावी तशी नोकरशाहीच्या संरक्षणार्थ हीं १२१, १२१ अ. १२४ अ इत्यादि कलमें आहेत. पण हीं कलमें नोकरशाहीचें चिरकाल संरक्षण करूं शकतील काय? सरकाराविरुद्ध कट केल्याबद्दल कम्युनिस्टांना किंवा असंतोष पसरविल्याबद्दल लेखकांना व वक्त्यांना शिक्षा देऊन कटांचा व असंतोषाचा फैलाव कायमचा थांबेल असें सरकारास वाटतें काय? गेल्या पन्नास वर्षांतला अनुभव काय सांगतो? १८९७ सालापूर्वी १२४ अ कलमाखालीं अवघा एकच खटला झाला होता. १८९७ सालापासून सरकारनें हें सत्र जारीनें चालू केलें; तरी पण लेखक व वक्ते यांच्या अभावीं हें सत्र बंद पडलें असें म्हणण्यापेक्षां सरकारच थकून गेलें व हें सत्र तहकूब करण्यात आलें असेंच म्हणतां येईल. १९०८ सालीं सरकारनें पुनः सत्र सुरू केलें. आणि एकेक वृत्तपत्राची आहुति टाकण्यास प्रारंभ झाला. तथापि असंतोषाचा फैलाव कमी न होतां उलट वाढतच गेला व तो नुसत्याच भाषणानें व लेखानें प्रकट न होतां उलट गुप्त वा उघड अत्याचाराच्या रूपानें प्रकट होऊं लागला. १९२०-२१ सालातला अनुभव तर विचारावयासच नको! या वेळेपासून असंतोषाची पाळेमुळें नुसत्या मध्यम वर्गांत व शहरांतच रुजून न राहतां तीं कनिष्ठ वर्गांत व खेड्यापाड्यांत जाऊन पोंचलीं. त्या वेळच्या दडपशाहीच्या मोहिमेंतहि सरकारचा हेतु सफल न होतां उलट सरकारची पूर्वीची इज्जत मात्र नष्ट झाली आणि असंतोषाचा सर्वत्र प्रसार होऊन कोठल्याहि वर्गाच्या मनोभूमिकेंत हें असंतोषाचें बीं सारखेंच रुजतें व मूळ धरतें असा अनुभव आला. आणि आतां तर मजूरसंघाच्या पुढाऱ्यांवर घाव घालून सरकारनें कामगारवर्गास विशेष चिडविलें आहे. अशा परिस्थितींत आज 'नव्या काळा'च्या संपादकांस एक वर्षाची शिक्षा दिली आणि उद्यां यदाकदाचित् मीरतला नेलेल्या व कम्युनिस्ट मानल्या गेलेल्या ३१ मंडळीं वरहि सरकारचा पाहुणचार घेण्याची पाळी येईल असें गृहीत धरलें तरी असंतोषाचा पारा खालीं कसा उतरणार? अंगांत ताप फणफणूं लागला असतां औषध घेऊन व पथ्य संभाळून शरीराची अंतस्थ स्थिति सुधारण्याचा प्रयत्न न करतां वरून गार पाण्याच्या पट्ट्या ठेवून ताप उतरविण्याचा हट्ट धरण्यासारखेंच हें शहाणपण नव्हे काय?

सरकारचा मुख्य दोष हाच कीं, सरकारला आपली दृष्टि अंतर्मुख वळविण्याची संवयच नाहीं. त्यांची दृष्टि नेहमीं बहिर्मुखच असते. लोक बोलतात काय व लिहितात काय याची तेवढी सूक्ष्म चिकित्सा करण्याची धडपड चालू असते. पण आपला स्वतःचा विचार, उच्चार व आचार कसा आहे व कसा असावा याची जणुं सरकारास फिकीरच वाटत नाहीं. असली केवळ बहिर्मुखी दृष्टि बदलून सरकार जर आत्मनिरीक्षण करूं

लागेल तर त्याच्या मनावर किती तरी नवा प्रकाश पडेल आणि श्रीयुत खाडिलकर यांनीं ता. ९ फेब्रुवारीच्या नव्या काळांतला अग्रलेख लिहून असंतोष पसरविला का त्या लेखाबद्दल त्यांस शिक्षा देऊन सरकारनें आपण होऊन अधिक असंतोष पसरविला यांचें यथार्थ ज्ञान सरकारास होईल. ता. ९ फेब्रुवारीच्या नव्या काळांतला अग्रलेख वाचून कोणाहि वाचकाच्या तोंडून सरकाराबद्दल 'शेम शेम' असे उद्‌गार खचित बाहेर पडले नसतील. परंतु सरकारनें त्या पत्रावर खटला भरला व न्यायमूर्तींनीं संपादकास शिक्षा फर्माविली त्याबरोबर हायकोर्टाच्या इमारतीतच सरकारला 'शेम शेम' चा अहेर मिळाला! हा प्रत्यक्ष पुरावा काय दर्शवितो? असंतोषाचें बीज पत्रकर्त्याच्या लेखांत असते का सरकारच्या दडपशाहीत असतें?

उपलक्षणादाखल म्हणून हें एक उदाहरण सांगितले. परकीय सरकारचे अस्तित्व हेच एक असंतोषाचें कायमचें उगमस्थान आहे; कारण स्वराज्याची तहान सुराज्यानें भागत नाहीं. तथापि इतका सूक्ष्म विचार सोडून दिला तरी, ब्रिटिश सरकारचे येथल राज्य सुराज्य या संज्ञेस तरी कितपत पात्र आहे हाहि एक विचाराचाच प्रश्न आहे. या राजवटींत शेतकरी, मजूर, सुशिक्षित, अशिक्षित इत्यादि बहुतेक सगळेच वर्ग कोणत्याना कोणत्या प्रकाराने गांजलेले आहेत, आणि म्हणूनच त्यांना त्यांच्याविषयीं सहानुभूति दाखविणारा लेखक किंवा वक्ता भेटतांच तो आपला परम आप्त वाटतो. आणि निर्जीव यंत्राप्रमाणे सर्वांस सारखेंच भरडणाऱ्या व सहानुभूतिशून्य अशा सरकाराविषयीं त्यांस मुळींच सहानुभूति वाटत नाहीं. सरकारच्या हातून कोणत्या तरी कारणांमुळें राज्यकारभारांत अनेक दोष घडून येतात व त्यांची परिणति प्रजेत असंतोषाचें बीज पेरण्यांत होत असते. प्रजेत असंतोष उत्पन्न होण्याला कोणकोणतीं कृत्यें कारणीभूत होतात याचें मार्मिक वर्णन कौटिल्यानें आपल्या ग्रंथांत दिलें आहे. तो म्हणतो—

अकार्याणां च करणैः कार्याणां च प्रणाशनैः ।
अप्रदानैश्च देयानामदेयानां च साधनैः ।
अदण्डनैश्च दण्डयानां दण्ड्यानां चंडदण्डनैः ।
अरक्षणैश्च चोरेभ्यः स्वयं च परिमोषणैः ।
राज्ञः प्रमादालस्याभ्यां योगक्षेमवधेन च ।
प्रकृतीनां क्षयो लोभो वैराग्यं चोपजायते ॥

राज्यकारभाराविषयीं असंतोष उत्पन्न होण्याचीं जीं अनेक कारणे कौटिल्याने दिलीं आहेत त्यांतलीं कांहीं निवडक कारणें नमुन्यादाखल वर नमूद केलीं आहेत. सरकार जर अंतर्मुख होऊन आत्मनिरीक्षण करूं लागेल तर वरील यादीपैकीं एकहि दोष आपल्या हातून चुकूनमाकून देखील घडला नाहीं असें तें छातीवर हात ठेवून म्हणूं शकेल काय? आणि असंतोषाचे जर कोणतेच कारण घडलें नसेल तर केवळ वृत्तपत्रकारांनी खोटीच चिथावणी दिली म्हणून प्रजेंत बेदिली उत्पन्न झाली असे तरी कधी तरी घडलें आहे काय? अर्थातच प्रजेत जर असंतोष आहे तर त्याचा उगमहि सरकारच्याच दोषांत असला पाहिजे हे उघड आहे. पण सरकारची प्रकृति दिवसेंदिवस अत्यंत नाजूक अतएव चिडखोर बनत चालली आहे. आणि खेदाची गोष्ट ही कीं, आत्मसुधारणा करण्याच्या ऐवजी आपल्या नाजूक प्रकृतीला न सोसणारे असे एखादे क्षुल्लक कृत्य कोणाच्या हातून घडलें कीं त्याच्यावर हत्यार उपसण्यास मात्र ते तयार होतें! यापासून उपाय होण्याच्या ऐवजी प्रकृतीला दुप्पट अपाय घडतो. आपल्याला कोणता रोग जडला आहे व त्यावर कोणती औषधयोजना करावी याविषयीं कोणीहि एक चकार शब्द सुद्धां बोलू नये असला आत्मघातकी हुकूम फर्मावणाऱ्या लहरी लक्ष्मीपुत्राचेंच अनुकरण सरकारला करावयाचे असल्यास त्याने १२४ अ कलमाचें कुलूप ठोकून वृत्तपत्रांची मुस्कटदाबी खुशाल करावी; पण त्यापासून वृत्तपत्रांची जेवढी हानि होणार असेल त्याहून सरकारचीच हानि अधिक होणार आहे. जोंपर्यंत असंतोष उत्पन्न करणारीं कारणें विद्यमान आहेत तोंपर्यंत असंतोष हा शब्द कोणीहि उच्चारूं नये किंवा लिहूं नये असें म्हणणें अप्रयोजकपणाचेंच ठरेल. कारण ओंठांतून बाहेर पडण्यास बंदी झाल्यामुळे पोटांत मावेनासा झालेला असंतोष केव्हां कोणत्या रूपानें बाहेर पडून सरकारास बाधक होईल याचा नेम कोणीं सांगावा?

न्यायमूर्ति ब्लॅकवेल हे ज्यूरीला उद्देशून केलेल्या आपल्या भाषणांत म्हणाले कीं, १२४ अ कलमामुळें वर्तमानपत्रांच्या टीकेला वाव मुळींच राहात नाहीं, असें नसून वाजवी मर्यादेचें उल्लंघन करणाऱ्यास मात्र तें कलम बाधक होतें. परंतु 'नव्या काळां'तील ज्या लेखावरून हा खटला उभारण्यांत आला, त्यांतल्या टीकेचा सौम्यपणा लक्षांत घेतल्यास वाचकांस असें कोडेंच पडेल कीं, असली सौम्य टीका देखील जर वाजवी मर्यादेच्या पलीकडे गेली असें ठरूं शकतें तर टीकेचें क्षेत्र शिल्लक तरी कोठें राहिलें? दीडदोन फुटाच्या घेराच्या पिंजऱ्यांत कोंडलेल्या पोपटास किंवा दीड दोन हात लांबीचे दावें गळ्यास बांधलेल्या जनावरास तुला इकडे तिकडे फिरण्याला वाव मुळींच दिलीं नाहीं असें समजूं नको

असें सांगण्यासारखाच हा प्रकार हास्यास्पद व खेदास्पद नाहीं काय?

असो. सत्य पण अप्रिय उपदेश करणाऱ्या डॉक्टरावर कातावणाऱ्या रोग्याची इतरांनीं कींव करून किंवा न करून सारखीच. सृष्टीचे नियम अनुल्लंघनीय असल्यानें रोगी जर आत्मनिरीक्षण न करील तर रोग्याच्या असल्या कृतीचा जो कांहीं नैसर्गिक परिणाम घडावयाचा असेल तो त्यावर घडेलच.म्हणून त्याविषयीं आम्ही कांहीं अधिक लिहूं इच्छित नाहीं. पण व्यक्तिशः दे. भ. कृष्णाजीपंत खाडिलकर यांजवर व पर्यायानें 'नवा काळ' पत्रावर ओढवलेल्या या संकटाबद्दल आम्हास अत्यंत खेद वाटतो. श्रीयुत खाडिलकरांचा व केसरीचा संबंध १८९७ सालापासून अत्यंत जिव्हाळ्याचा असा आहे. १८९७ सालापासून १९२० सालापर्यंत त्यांचें वास्तव्य बहुतांशी पुण्यासच असून त्या दरम्यानच्या काळांत दोन वेळां केसरीच्या मुख्य संपादकाचें काम त्यांच्याकडे होतें. त्या वेळच्या त्यांच्या जोमदार लेखांनीं महाराष्ट्रांत घडवून आणलेल्या विचारक्रांतीचें चीज करावें तेवढें थोडेंच आहे. १९२० सालीं मुंबईंत लोकमान्य कंपनी स्थापन होऊन 'लोकमान्य' पत्राचे संपादक म्हणून ते मुंबईस राहावयास गेले आणि तेथें चार वर्षे लोकमान्य पत्राचें व तदनंतर आजतागायत 'नवा काळ' पत्राचें धुरीणत्व स्वीकारून त्यांनीं अखंड राष्ट्रसेवा केली. असल्या मुरब्बी व अष्टपैलू लेखकावर ता.९ फेब्रुवारीच्या 'नवा काळ' पत्रांतील एका साध्या लेखावरून एवढें अरिष्ट कोसळावें ही अघटित विधिघटनाच होय. तुफान खवळलेल्या महासागरांतून निभावून घरीं आलेल्या माणसावर घरच्या पुष्करणींत बुडण्याची पाळी यावी अशासारखाच हा प्रकार आम्हास तरी वाटतो. श्रीयुत खाडिलकर यांजवर आजवर जे कित्येक बरेवाईट प्रसंग आले व ज्यांतून ते शीरसलामत बाहेर पडले, त्यांच्याशीं या प्रस्तुतच्या प्रसंगाची तुलना केली असता मोरोपंतांनीं म्हटल्याप्रमाणें 'गज गोष्पदीं बुडाला हा दैवा सिंधु शोषिला मशकें' असेंच खेदोद्गार बाहेर पडतात. परंतु श्रीयुत खाडिलकर हे आपल्या आजपर्यंतच्या बाणेदार स्वभावास अनुसरून याहि आपत्तींतून धैर्य खचूं न देतां बाहेर पडतील आणि त्यांच्या एक वर्षाच्या अपरिहार्य अशा गैरहजेरींत त्यांचे तरुण चिरंजीव नवा काळ पत्राचें सुकाणू आपल्या वडिलांच्या नांवालौकिकास साजेल अशा रीतीनें चालवितील असा आम्हास भरंवसा वाटतो.

# बेळगांवचें म. साहित्यसंमेलन

बेळगांव येथें येत्या मे महिन्यांत मराठी साहित्यसंमेलन भरण्याचें ठरलें आहे. त्यासंबंधानें गेल्याचे मागील अंकांत श्रीयुत दत्तोपंत बेळवी यांचा अभिप्राय आणि संमेलनाच्या चिटणिसांचें जाहीर विनंतिपत्र हीं दोन्हीं छापलीं आहेत. त्यांवरून या संमेलनासंबंधीं उपस्थित झालेल्या वादाचें स्वरूप व बेळगांव स्वागतमंडळानें मनाशीं केलेला निर्णय, हे वाचकांस कळून आलेलेच आहेत. आम्ही स्वतः या वादासंबंधानें आपला अभिप्राय आजवर प्रगट केला नाहीं याचें कारण इतकेंच कीं, या वादांतील साधकबाधक गोष्टी कांहीं असल्या तरी ग्वाल्हेर येथें ठरल्याप्रमाणें बेळगांवास संमेलन भरविणें न भरविणें याची सर्वस्वी जबाबदारी बेळगाव येथील स्वागतमंडळावरच आहे. त्याप्रमाणें त्यानें संमेलन भरविलें तर महाराष्ट्रांतून साहित्यप्रेमी लोक तेथें जातील. उलट तें भरवूं नये, रहित करावें, असें त्यानें ठरविल्यास त्याला बाहेरून कोणीहि आग्रह करूं नये किंवा नाविलाज ठेवूं नयेत, असें आमचें मत होतें. शिवाय केसरीनें या बाबतींत कांहीं लिहिलें तर त्यांतील भलत्याच एखाद्या शब्दाचें निमित्त करून बेळगांव येथील स्वागतमंडळाच्या अडचणींत भर घालणारी कांहीं मंडळी कर्नाटकांत आहेत हेंहि आम्हाला माहीत होतें. परंतु आतां बेळवी, गंगाधरराव देशपांडे व संमेलनाचें स्वागतमंडळ यांनीं आपला स्वतंत्र अभिप्राय प्रकट केल्यामुळें या विषयावर दोन शब्द लिहावेत असें आम्ही योजलें आहे.

बेळगांव येथें संमेलन भरविण्याला मुख्य आक्षेप असा कीं, कर्नाटक प्रांताच्या एकीकरणाच्या प्रयत्नाचा विघात करून बेळगांव जिल्ह्याला आपणाकडे घेण्याचा प्रयत्न महाराष्ट्र करील, व त्या दाव्यांत बेळगांवास भरणारें मराठी साहित्यसंमेलन हें पुरावा म्हणून पुढें आणतील. हा आक्षेप सजवितांना महाराष्ट्रीय पुढारी, केसरी पत्र व एकंदरीनें महाराष्ट्रीय समाज यांच्यासंबंधानें कर्नाटकांतील कित्येक वर्तमानपत्रकारांनीं व इतर लोकांनीं कशीं दुरुत्तरें केलीं आहेत व अपशब्द वापरले आहेत याची संपूर्ण माहिती व अपमानास्पद जाणीव आम्हाला आहे. व जरूर तर जशास तसें या न्यायानें योग्य तीं प्रत्युत्तरें देण्याला आम्ही समर्थ आहों हें वरील गृहस्थ जाणतहि असतील.

परंतु आज संमेलनाच्या प्रत्यक्ष कार्याकडे, व त्याहीपेक्षां कर्नाटकासंबंधानें महाराष्ट्राच्या मनांत वसत असलेल्या बंधुभावाकडे लक्ष देऊन, आम्ही या उपांगभूत वादांत पडत नाही.

मुख्य मुद्दयासंबंधानें आम्ही इतकेंच सांगतों की, अखिल कर्नाटक जनतेचें राष्ट्ररूपानें एकीकरण व्हावें अशीच आमचीहि इच्छा आहे व नेहमीच होती. या भावनेविरुद्ध केसरीनें केव्हांहि लिहिलेलें नाहीं, उलट समर्थनच केलेलें आहे. बल्लारी जिल्ह्यांतील कांही तालुक्यांसंबंधानें कर्नाटक प्रां. कॉं. कमिटीनें मागणी केली तेव्हां केसरीचे संपादक केळकर हे एक या वादांत कॉंग्रेसनें नेमलेले पंच होते, व त्या प्रसंगीं केळकरांनी कोणतें धोरण ठेवलें व न्यायबुद्धीनें निर्णय कसा दिला हें आजहि श्री.कौजलगी हे सांगू शकतील.१९२० सालीं राष्ट्रीय सभेची नवी घटना झाली तेव्हां भाषावार प्रांतरचनेची कल्पना प्रथम अमलांत आली. महाराष्ट्राला जर अगदी कांटेकोरपणानें भांडन भाऊबदकी साधावयाची असती तर बल्लारी जिल्ह्यांतील कांही भागासंबंधानें जसा कर्नाटकानें हक्क सांगितला व पंचायत नेमून घेतली तशी गोष्ट महाराष्ट्रासहि कांही भागासंबंधानें करतां आली असती. परंतु त्यानें ती तेव्हां केली नाहीं; किंवा गेल्या नऊ वर्षांत असल्या आक्रमणाची कल्पना अस्पष्ट रीतीनेंहि मनांत आल्याचें कधीं दर्शविलें नाहीं. वास्तविक महाराष्ट्राला बेळगांव जिल्ह्याच्या पश्चिम-तालुक्यांपैकीं कांहीं भागासंबंधानें असा हक्क सांगतां येईल. पण तसा हक्क सांगण्याचा विचार महाराष्ट्रानें कधींहि केला नाही. पुरावाच पाहावयाचा तर हा वरील पुरावा कांही थोडा नाही. उलटपक्षीं आज बेळगांव साहित्य संमेलनांत असा एखादा ठराव पास झाला कीं, "महाराष्ट्रानें बेळगांव जिल्ह्यांतील या भागासंबंधानें हक्क सांगू नये," तरी उद्यां भाषावार राजकीय प्रांतरचना सर्वत्र खरोखरच उपस्थित झाली तर वरील ठराव भावी पिढीवर कितपत बंधनकारक होईल ? तसेंच यासंबंधानें दूरच्या भविष्य काळांतील जामिनकी जशी कोणी मागूं किंवा देऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें 'गतकाळीं' कर्नाटकाची किंवा महाराष्ट्राची हद्द इकडे तिकडे कोठवर पसरली होती या ऐतिहासिक चर्चेलाहि आज कांही महत्त्व नाहीं. कारण राजकीय अमलाची हद्द आणि भाषेची हद्द यांची नेहमीं समव्याप्ति असतेच असे नाही. म्हणून वादाच्या वेळीं चालू वर्तमान काळाची देशस्थिति अथवा समाजस्थिति हीच मुख्यत्वें लक्षांत घ्यावयाची असते. त्या दृष्टीनें आम्ही दर्शविलेला पुरावा कर्नाटकबंधूंना समाधानकारक वाटला पाहिजे; तथापि केवळ त्याच दृष्टीनें बेळगांव-संमेलनांत असा एखादा ठराव केला गेला व "बेळगांव जिल्हा किंवा त्याचा कोणताहि भाग महाराष्ट्राच्या राजकीय प्रांतांत ओढण्याची आमची इच्छा नाही" असें महाराष्ट्रातर्फे जाहीर करण्यांत आलें तरी त्याला कोणी हरकत करणार नाहीं. श्रीयुत चिंतामणराव वैद्य यांनीं केळकर यांना लिहिलेल्या पत्रांत असें स्पष्ट सुचविलेंहि आहे, व गेल्या केसरींत छापलेल्या बेळवी यांच्या पत्रांत चिंतामणराव वैद्य यांच्या पत्राचा जो उल्लेख आहे तो या संबंधाचाच होय.

तात्पर्य,केसरीला महाराष्ट्रापुरतें बोलण्याचा जितका अधिकार असल किंवा आहे असें कोणी मानील तितक्यापुरता आमचा हा खुलासा समजावा. इतर कोण काय बोलतो, किंवा कोणा अमुक महाराष्ट्रीयाचें मत काय असेल यासंबंधानें आम्ही सांगूं इच्छित नाही किंवा तें मत बदलण्याची जबाबदारीहि आमच्यावर नाहीं. चालू वादांत केसरीचें नाव कित्येकांनीं पुढें आणलें म्हणूनच हाहि खुलासा आम्ही केला आहे.

मुख्य मुद्दयासंबंधानें इतकें सांगितल्यावर इतर गौण मुद्दयांत शिरण्याचें आम्हाला कारण नाहीं. उदाहरणार्थ, ग्वाल्हेर येथें कर्नाटक प्रतिनिधींचा अपमान झाला कीं काय याविषयीं खुलासा करण्याला ग्वाल्हेर येथील स्वागतमंडळाचे अध्यक्ष चिंतामणराव वैद्य हेच समर्थ आहेत व अपमान खरोखरच झाला असें ठरल्यास त्याबद्दल स्वागतमंडळातर्फे माफी मागण्याचीहि तयारी त्यांनीं प्रांजलपणें दर्शविली आहे. परंतु बेळगावास संमेलन भरवावें कीं नाहीं, या मुद्दयाशीं त्याचा संबंध येत नाही किंवा तें भरल्यास त्याच्यापुढेंहि तो मुद्दा येण्याचें कारण नाही. तसेंच पुण्यास भरलेल्या वकील परिषदेकरितां बेळगांव येथील वकील मंडळींना कोणी आमंत्रण कां दिलें अशा गोष्टींचा संबंध संमेलनाशीं पोंचत नाहीं. फार तर अमुक एखाद्या मनुष्याला पुण्याच्या इतर लोकांपेक्षां बेळगांव शहर हें निम्मेंशिम्मे महाराष्ट्रांत मोडतें असें कदाचित् वाटत असावें इतकेंच त्यापासून सिद्ध होईल. याच्या उलट प्रां. पोतदार यांनीं गेल्या 'रत्नाकरा'च्या अंकांत दर्शविल्याप्रमाणें कर्नाटक प्रांताचा म्हणून जो एक नकाशा कोणी तयार केला आहे त्यांत कर्नाटकाची हद्द गोदावरीपर्यंत नेऊन भिडविली आहे! पण असलें अतिक्रमणाचें व्यक्तिशः बुद्धिपुरस्सर संकल्प किंवा चुकीच्या भावना कोणी लक्षांत घेण्याचें कारण नाही. मनानें वाटेल त्यानें वाटेल तितकें आक्रमण खुशाल करावें. आज महा. प्रां. कॉं. कमिटीनें किंवा महाराष्ट्रांतील कोणाहि पुढाऱ्यानें

बेळगांव शहर किंवा जिल्ह्याचा कोणताहि भाग कॉंग्रेसच्या राज्यांत खालसा करून महाराष्ट्राला जोडण्याची अभिलाषबुद्धि दर्शविलेली नाहीं एवढा पुरावा इतर कोणाच्याहि संकल्प-विकल्पाविरुद्ध पुरून उरण्यासारखा आहे. बेळगांवास संमेलन भरविण्यांत येत आहे तें आमच्या समजुतीप्रमाणें बेळगाव येथें कांहीं महाराष्ट्र साहित्यप्रेमी लोक आहेत त्यांच्या निमंत्रणामुळेंच. पण बडोद्याचे संमेलनाने गुजराथ महाराष्ट्राला जोडण्याचा किंवा ग्वाल्हेर इंदूर येथील संमेलनामुळे ते हिंदी प्रांत महाराष्ट्राला जोडण्याचा कोणाचा हेतु होता हें म्हणणें जितकें असंबद्ध ठरेल तितकेंच बेळगांव येथें संमेलन झाल्याने बेळगांव महाराष्ट्रांत ओढण्याचा हेतु आहे हें म्हणणंहि असंबद्ध ठरेल. म्हणून कर्नाटकबंधूंना आमची अशी विनंति आहे की, त्यांनीं या संमेलनाला विरोध दाखविण्याचें धोरण टाकून द्यावे. त्यांनीं या संमेलनाची उपेक्षा केली, सहानुभूति दाखविली नाही, किंवा या संमेलनामुळे कर्नाटकाच्या एकीकरणाला कोणताहि बाध आम्ही आणूं देणार नाहीं असा हक्क वेळींच प्रस्थापित करण्यासारखा ठराव कर्नाटकाच्या प्रॉ. कॉं. कमिटीनें किंवा कर्नाटक-संमेलनानें केला, तरीहि आम्ही त्याबद्दल कांहींच तक्रार करूं शकत नाहीं व करणार नाहीं. पण इतक्या स्पष्ट खुलाशानंतरहि जर त्यांनीं आपला विरोध चालू ठेवला तर त्यामुळें महाराष्ट्र व कर्नाटक यांच्यामध्यें असलेल्या बंधुप्रेमांत व दोघांना समान प्रिय असलेल्या स्वराज्याच्या चळवळींत नसता बिघाड व नसतें शल्य उत्पन्न होईल इतकेंच आम्ही सुचवितों. बेळगांव येथील संमेलनाविरुद्ध प्रतिकार म्हणून कित्येक कर्नाटकबंधूंनीं अशी युक्ति सुचविली आहे कीं सोलापूरसारख्या सरहद्दीच्या गांवीं कानडी साहित्यसंमेलन भरवावे! ही युक्ति आम्हालाहि पसंत आहे. कारण महाराष्ट्राच्या सरहद्दीच्या या किंवा इतर कोणत्याहि भागांत कर्नाटकबंधूंनीं कानडी साहित्यसंमेलन भरविल्यास त्या ठिकाणचे महाराष्ट्रीय त्या संमेलनाचे मनोभावानें स्वागत करतील व साहाय्य देतील अशी आमची खात्री आहे. म्हणून हा प्रयोग होऊनच जावा. म्हणजे कोणाची मनोभावना कशी व कोणाची कशी हें स्पष्ट कळून येईल.

---

# बगदादहून तेहरानास

(आमच्या प्रवासी प्रतिनिधीकडून)

बसरा–बगदाद रेल्वे अगदीं सपाट मैदानांतून आहे. ती इतकी कीं, सुमारें ३२५ मैलांनंतर बगदादची उंची समुद्रसपाटीपासून केवळ ११३ फूट भरते! खजुरीशिवाय दुसरें झाड दृष्टीस पडत नाहीं, आणि कितीहि डोळे ताणले तरी एखाद्या टेकडीचा मागमूसहि सांपडत नाहीं. अशा प्रदेशांत प्रवास कंटाळवाणा होतो. मधून मधून कालवे मात्र सपाटून आढळतात. असा प्रवास केल्यानंतर तेहरानला जावयाचें. तेव्हां बगदादपुढेंहि वाळवंट आहे की काय अशी भीति वाटूं लागली. तेहरानचा रस्ता आक्रमण्याचीं साधनें प्रचलित काळीं तीन उपलब्ध आहेत. 'हवाई जहाजांची फेरी' दरआठवड्यास सर्व इराणभर होते. त्या मार्गे आकाशोड्डाण करणें हें फार सोयीचें असलें तरी आर्थिक दृष्ट्या आणि देशपरिस्थित्यवलोकन करण्याच्या दृष्टीनं अत्यंत गैरसोईचें होतें. दुसरा मार्ग मोटारगाड्यांचा आणि तिसरा म्हणजे खेचर, उंट किंवा घोडा यांच्या तांड्यासमवेत जावयाचा. पैकीं मध्यम पंथ स्वीकारून बगदादहून निघालों. प्रथमतः खानाकीनपर्यंत रेल्वेनें प्रवास केला. बगदादहून हें गांव सुमारें १२० मैलांवर आहे. इराणी आखातांतील आबादान येथें असलेल्या घासलेट तेलाच्या कारखान्याविषयीं मागें लिहिलें आहेच. तसाच पण अगदीं छोटा असा कारखाना खानाकीन येथें असल्यामुळे या गांवास थोडें महत्त्व प्राप्त झालें आहे.

## आणखी एक रॉकेलचा कारखाना

खानाकीन ऑईल कंपनी म्हणजे अँग्लो–पर्शियन ऑईल कंपनीचें लहानसें पिलूंच म्हणतां येईल. सर्व व्यवस्था 'मोठ्या' कंपनीचीच असून रेल्वेचा फांटा तेलासाठींच आणला आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. इराकी रेल्वेची सांपत्तिक परिस्थिति इतकी समाधानकारक आहे कीं या फांट्यासाठीं खानाकीन कंपनीकडून (म्हणजे पर्यायानें अँ. प. ऑईल कंपनीमार्फत) रेल्वे कंपनीला हजारों रुपयांचें कर्ज घ्यावें लागलें!

खानाकीन हें इराकी सरहद्दीवरील गांव असल्यानें तेथें व्यापार आहे तो शेजारच्या इराणाशींच. बहुतेक माल इराणांत पाठविण्यासाठीं किंवा इराणांतून अन्यत्र रवाना करण्यासाठीं येतो. इराकच्या मुख्य मंत्र्यांस भेटावयास गेलों असतां त्यांनीं आपण होऊनच 'मी आपणासाठीं काय करूं?' असा प्रश्न केला. त्या वेळीं 'मी इराणांत जात आहें; कांहीं परिचयपत्रें द्याल तर बरें' असें मीं उत्तर दिलें होतें. त्यांनीं ती व्यवस्था कशी केली हें खानाकीनला आल्यावर समजलें. आपल्याकडे कलेक्टर असतात त्याच अधिकाऱ्यास आरबींत 'काईमखाम' म्हणजे 'गव्हर्नर' अशी संज्ञा दिली जाते. खानाकीनच्या गव्हर्नरांनीं माझी पुढें जाण्याची व्यवस्था इतकी उत्तम केली कीं, मार्गाल खेपेस इराणी हद्दींत शिरतांना झालेला त्रास अजीबात विसरलों. पोलीसखात्यांतील एक बडा ऑफिसर माझ्याबरोबर इराणी सरहद्दींत पोंचाविण्यास आला असल्यानें पासपोर्टाची किंवा कस्टमखात्याची कसलीच अडचण झाली नाहीं.

इराणी हद्द लागण्यापूर्वींच लहानमोठ्या टेकड्या क्षितिजावर दिसूं लागल्या आणि श्रावणांत आपल्याकडे जशी पृथ्वी हिरव्यागार गवती गालिचानें आच्छादिलेली दिसते तशीच नयनाल्हाददायक दृश्यें दृष्टिपथांत आलीं. उन्हांतून प्रवास केलेल्यासच सावलीची खरी किंमत कळते; तद्वत् रुक्ष व सपाट मैदानांतून मार्गक्रमण झाल्यानंतर अशा प्रकारचा प्रवास विशेष चित्ताकर्षक व आनंददायी वाटल्यास नवल कोणतें!

## लैला आणि मज्नून

खानाकीनपासून सुमारें २५ मैलांवर दुसरा मुक्काम 'कसर–इ–शिरिन' येथें झाला. लैला आणि मज्नून या इराणी प्रणयी जोडप्याचें नांव फार्सी मराठी कोशकारांनीं मराठी वाचकांस परिचित केलेंच आहे. फरहद व शिरीन याहि परस्परासक्त युगुलाची रम्य कहाणी त्यांनींच सांगणें इष्ट आहे. एक तर ती फार मोठी आहे, आणि दुसरें असें कीं, फार्सी भाषेच्या अभ्यासकालाच तिचें स्वारस्य दुसऱ्यांस समजावून सांगतां येईल. इतकेंच आतां सांगून ठेवावेसें वाटतें कीं, रोमिओ आणि ज्यूलिएटप्रमाणेंच हें आषुकमाषुकांचें जोडपें इराणी जनतेंत सर्वतोमुखीं आहे. शिरीन ही राजकन्या होती आणि तिच्याच नांवानें कसर–इ–शिरिन हें गांव ओळखलें जातें. या प्रणयी जोडप्याचें स्मारक चिरकालीन राहील असे कांहीं अद्भुत प्रकार इराणी लोकांच्या दंतकथेंत आहेत आणि कांहीं ठिकाणीं तर दगडी कोरीव व खोदकाम फरहदच्या हातचें म्हणून दाखवितात.

## कसरपासून कर्मान १०५ मैल आहे

'कसर' पासून पुढील मार्ग कर्मानशहा नगरीचा.हा रस्ता कांहीं अंतरापर्यंत बर्फमय प्रदेशांतून आहे. रस्ते साधारणपैकीं असून मोटारींची वाहतूक सपाटून आहे. कारण इराणांत दळणवळणाचें मुख्य साधन तेंच ! शिवाय आयात जकात यंत्रसामुग्रीवर इराणी सरकारनें मुळींच ठेवली नाहीं. म्हणून आधुनिक वाहनांचा प्रसार जारीनें वाढत आहे. डोंगराळ प्रदेशांत लहानसान ओढे नाले असावयाचेच, पण थडीनें सर्व पाणी गोठून जागच्या जागीं राहिलेले दिसे. जलसंचय दिसण्याऐवजीं शुभ्र कापड पसरलेलें सभास्थान आहे कीं काय असा भास होई. जागजागीं बर्फाचे ढीग पडलेले दिसत आणि डोंगराचा भाग तर पांढऱ्या संगमरवरी दगडाचा आहे असें वाटे ! या प्रदेशांत अर्थातच थंडी विशेष होती आणि वायुगतीनें जाणाऱ्या मोटारीमुळें ती अधिक भासली.

'कर्मानशहा' हें गांव ऐतिहासिक असून युरोपांतील जर्मन लोकांशीं या नगराचा दूरान्वय जोडतां येतो. बलुचिस्थानाच्या बाजूस इराणांत 'कर्मान' म्हणून एक शहर आहे, तेथील शहानें पुरातन काळीं वसविलेलें हें 'कर्मानशहा' गांव आज इराणांतील प्रमुख नगरांत गणलें जातें. कर्मान नांवाचा जर्मनाशीं नामसादृश्यानेंच संबंध जडतो असें नव्हे तर वर्ण व रूपसादृश्यानेंहि त्या भागाचे लोक हे जर्मनांचे पूर्वज असावेत असें कित्येकांचें म्हणणें आहे. तेथील हवापाणी उत्तम असून व्यापारहि बराच आहे. राजकीय विभागाचें कर्मानशहा हें राजधानीचें शहर आहे. चोहों बाजूंस डोंगराच्या रांगा असून सुमारें ५००० फूट उंचीवर तें वसलें आहे. आजूबाजूच्या टेकड्यांवर बर्फ पडलेलें दिसत.इतकेंच नव्हे तर कधीं कधीं हिमवृष्टीचा अनुभवहि तेथील नागरिकांस मिळतो. रस्त्यावर जेथें पाणी दिसावयाचें तेथें पांढऱ्या कांचा लावल्या आहेत कीं काय अशी भूल पडते. १-२ तासांच्या आंत सर्व पाणी थिजून घट्ट बनतें ! कचऱ्याचे ढीग रस्त्याच्या बाजूस असावयाचे त्या ठिकाणीं हिमराशी दिसतात.

## बर्फाच्छादित टेकड्या

डोंगरावर बर्फ कसें दिसतें याचें वर्णन करण्यास जन्मसिद्ध कवीच पाहिजे.हिमालयाच्या उत्तुंग शिखरांवरील अक्षय राहणारे बर्फ शोभादायक असतें तर थोड्या प्रमाणांत हिंवाळ्यांतच पडणाऱ्या स्वर्गीय गोठलेल्या पाण्यानें कर्मानशहाच्या टेकड्यांस विशेष नयनमनोहरता प्राप्त होते हेंहि तितकेंच सत्य आहे! लालसर छटा असणाऱ्या वनस्पतिविहीन गिरिपृष्ठभागावर आकाशांतून शुभ्र साखर पडली म्हणजे तें दृश्य किती आल्हाददायक दिसेल याची कल्पना करावी. पांढरें बर्फ अगदीं बारीक कीस करूनच कोणी जलदेवता आकाशांतून पृथ्वीवरील डोंगरावर विखरीत आहे असें वाटतें. सर्वत्र पसरलेल्या बर्फाच्या भुग्यामुळे टेकड्यांचा रंग कोणता हें कळेनासें होतें.

## बर्फाचा मनोहर देखावा

कर्मानशहापासून ९० मैलांवर हमदान लागतें.या दोन नगरांमधील प्रवास अविस्मरणीय असा झाला. प्रथमतः कर्मानशहा सोडतांक्षणींच अलेक्झांडर (शिकंदर) बादशहानें केलेले पूल, त्याच्या कारागिरांनीं डोंगरावर कोरलेलीं चित्रें पाहावयास मिळालीं! उपर्युक्त वर्णनांत आलेल्या फरहदच्या कौशल्याचा व त्याच्या शिरिनवरील अलोट प्रेमाचा नमुना दृष्टीस पडला. नंतर हिमाच्छादित अशा पर्वतावलींची अनुपम शोभा चोहों बाजूंस दिसूं लागली! समीपस्थ असलेल्या डोंगरावर पांढऱ्या रंगाचे मोठमोठे पट्टे ओढले आहेत असें वाटे आणि दूरवर दिसणारीं शिखरें रुप्याचे पत्र्यानें मढविलीं असल्यासारखीं दिसत.इराणी डोंगरावर वृक्षराजी मुळींच नसून आसमंतातहि झाडें क्वचित् आढळतात. कविकुलगुरूला हिमालयाचें वर्णन करतांना बर्फामुळे पर्वतश्रेणीची शोभा कमी होते कीं काय अशी भीति वाटली आणि म्हणूनच

अनंत। रत्नप्रभवस्य तस्य हिमं न सौभाग्यविलोपि जातम्। एकोहि दोषो गुणसंनिपाते निमज्जतीदोः किरणेष्विवाङ्कः॥

असें म्हणावें लागलें. परंतु इराणी डोंगरांसंबंधीं लिहितांना अगदीं वेगळ्या भाषेत त्यांचें चित्र रेखाटणें प्राप्त आहे. इराणी पर्वतांना शोभा प्राप्त होते ती एका बर्फामुळेच ! हिमगिरि, सह्याद्रि, विंध्याचल, निलगिरि इत्यादि पर्वतांचीं नांवें घेतांक्षणीच त्यांच्याशीं संलग्न अशा किती तरी पौराणिक कथांचे चित्रपट मनश्चक्षूंपुढून जातात आणि त्या त्या स्थानाविषयीं एक प्रकारचा आदरभाव मनांत उद्भवतो. त्या बाबतींत परकीय देशातले डोंगर अगदी मागें पडतात. मनांत कसलीच भावना जागृत होत नाहीं. नीलांबराला सफेत रंग लावण्यासाठीं विश्वकर्त्यानें नियोजिलेल्या निष्काळजी कारागिरानें पातळ चुना भरलेलें भांडें सांडून टाकल्यामुळें सर्वत्र पांढरेंच झालें असेल, जलवृष्टि करण्याकरितां सहस्राक्षी इंद्रानें आज्ञा दिली असतां चुकून क्षीरसागराची तोटी उघडली गेल्यामुळें आकाशांतून दुग्ध गळून तर पडलें नसेलना ? अथवा आकाशाला गवसणी घालण्यासाठीं लागणारें वस्त्र तयार करण्याच्या प्रचंड कारखान्यांतील हा पिंजलेल्या कापसाचा ढीग तर नव्हे ? अशा नाना कल्पना मनांत येतात. मेघगर्जना होऊं लागली म्हणजे लहान मुलांची

जिज्ञासा तृप्त करण्यासाठीं "म्हातारी हरभरे भरडत आहे" असे सांगण्यांत येते. तीच बालसमजूत दृढ झाली असल्यास म्हातारीनें हरभरे दळले, त्याचें पीठ खालीं पडलें असें समजावें. असो.

## बर्फाच्या भिंती

घाटांतून वर जसजसे जाऊं लागावें तसतसें क्षितिज दूर जातें आणि नवीन नवीन पर्वत-शिखरें दृष्टिपथांत येतात. जिकडे पाहावें तिकडे बर्फाशिवाय दुसरें कांहींच दृष्टीस पडत नाहीं. रस्त्यावर तर बर्फ असतेंच; पण दोनहि बाजूनीं ८।१० फुटांच्या बर्फाच्या भिंती दिसतात. रस्ता साफ करण्यासाठीं कामगार सारखे धडपडत असतात आणि ते नसते तर मोटारीचा मार्ग बर्फमयच झाला असता. या ठिकाणीं थंडी किती असेल याची कल्पनाच करावी! घाटमाथा समुद्रसपाटीपासून निदान १४-१५ हजार फूट उंच असावा. कारण तेथून किती तरी खालीं उतरून हमदानला यावें लागतें आणि हमदानची उंची ६२०० फुटांपेक्षां थोडी जास्त आहे. पुत्रकामेच्छु स्त्रियांच्या नवसाला पावणारा सिमल्यांतील बालब्रह्मचारी मारुति ज्या टेकडी-वर आहे ती सुमारें ७००० फूट उंचीवर आहे. यावरून हमदानच्या हवापाण्याची कल्पना करावी. ग्रीककालीन इतिहासाशीं या शहराचा संबंध जोडतात; पण पुराणवस्तुखात्याला खात्रीलायक पुरावा मिळालेला नाहीं.

हमदान हें इराणांतील नंदनवन म्हणतां येईल. पण ती सर्व शोभा केवळ वसत ऋतूंतच. प्रस्तुत कालीं बर्फाचे ढीग आणि घाणेरडा चिखल सर्वत्र असल्यानें येथील वास्तव्य कंटाळवाणें होतें. उन्हाळ्यांत सर्व प्रकारचीं फळें येथें विपुल आणि स्वस्त मिळतात. द्राक्षे तर 'पैशाला पासरी' असें म्हटल्यासच वस्तुस्थितीचें यथार्थ वर्णन होईल. द्राक्षांच्या अनेक जाती असून त्यापैकीं उत्कृष्ट येवढ्याच मानवी उपयोगास ठेवतात आणि बाकीच्या खेचर-अश्वादिकांना चारतात!

हमदानहून तेहरानला जावयाचें म्हणजे मध्यंतरीं काझवीन या गांवावरून जाणें क्रमप्राप्त होतें. काझवीनला महत्त्व आहे तें यासाठीं कीं हें कास्पियन समुद्राकडील व्यापाराचें ठिकाण आहे. इराणांतील प्रमुख बंदर पेहेलवी (पूर्वीचें नांव एंझेली) आणि रेश्त हें व्यापारी शहर. या दोनहि समीपस्थ गांवांशीं दळणवळण काझवीनमधूनच होतें. रेश्त हें समुद्रकिनाऱ्याजवळचें शहर. कास्पियन समुद्रांतील मासे उत्तर-इराणांत आणि इतर सर्वत्र पाठविण्याचें काम एक रशियन कंपनी येथून करते. त्यामुळें रेश्तचें महत्त्व विशेष आहे. जगांतील उत्तम-पैकीं मच्छीमाऱ्यांचा धंदा रेश्तचा असून तो फार दिवसांपासून रशियाच्या ताब्यांत आहे. अगदीं सुधारलेल्या शास्त्रीय पद्धतीनें म्हणजे बर्फांत मासे गोठवून ते सर्वत्र पाठविले जातात. शाकाहारी हिंदूंना या शहराचें आणि या व्यापाराचें महत्त्व कळणें शक्य नाहीं.

काझवीन येथे येण्यापूर्वींहि एक मोठा घाट लागतो आणि तोहि सुमारें १५००० फूट उंचीचा आहे. हमदान ते काझवीन हा रस्ता केवळ बर्फमय प्रदेशांतूनच आहे. मोटार बर्फ तुडवीत जाते. रस्त्याच्या बाजूला कोठेहि पाहा, बर्फाविना दुसरें कांहीं दृष्टीस पडणार नाहीं. या वेळीं बाहेर हिंडणें म्हणजे किती कठीण काम, पण बर्फ दूर सारणारे कामगार आपलें काम करीत असतातच! रस्त्यावर चुकून कोठें पाणी सांडलें तर अर्ध्या तासाचे आंत तें थिजतें आणि एखाद्या कांचेच्या तुकड्याप्रमाणें दिसूं लागतें! टेकड्या, घरें, जमिनी, रस्ते यांच्यावर बर्फाशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. क्षितिजापर्यंत पांढरेंच पांढरें दृश्य पाहून संस्कृत कवींनीं ठरविलेल्या संकेताची सयुक्तता पुरेपूर पटते!

सत्कीर्तीचा रंग पांढरा शुभ्र आहे असें समजलें जातें. चराचर सृष्टीच्या चालकाची चतुरता स्पष्ट-पणें दर्शविणारी आणि प्रेमळ पित्याची कीर्ति दिगंत पसरविणारी ही हिमशोभा किती अपूर्व दिसते हे शब्दचित्रांत रेखाटतां येणें शक्य नाहीं. इंद्रधनुष्याचे रंग रविवर्म्याला दिले असते तरीहि यशोध्वजाचा धवल वर्ण यथातथ्य त्याच्या हातून उठताना! कारण इंद्रधनुष्यांत पांढरा रंग मुळीं नाहींच! कविसंकेतानुसार हास्याचाहि रंग पांढराच आहे. सर्वत्र पसरलेलें हे बर्फ म्हणजे परमेशाचें हास्य तर नव्हेना? आपण केलेल्या साऱ्या लीलांपैकीं एकाहि सृष्टीच्या अल्प भागाचेंहि कोडें मानवांच्या पिढ्यानु-पिढ्या गेल्या तरी उलगडत नाहीं हे पाहून जग-न्नियंत्यानें कां हंसूं नये? आणि तसें न मानलें तरी अखिल ब्रह्मानंदाचें हे प्रतिबिंब होऊं शकेल. आनंदाचें पर्यवसान हास्यांत आणि हास्याचा हा शुभ्र प्रकाश चोहोंकडे पसरलेला असावा. अस्तु.

## रशियनांचें प्राबल्य

काझवीन येथें येतांच रशियन वस्तीचें वाढतें स्वरूप दिसून येतें. व्यापारी पेठेंतल्या बहुतेक पाट्यांवर रशियन अक्षरें आढळतात. इराणांतील उत्तरभागांत सर्वत्र रशियन पसरलेले आहेत. प्रस्तुत प्रतिनिधीचा मोटारहांक्याहि रशियन होता हें फार उशिरा कळलें. पण त्यानंतर मनः-स्थिति एकदम बदलली. रशियन म्हणजे कांहीं तरी निराळ्या प्रकारचीं माणसें असावींत! वाघोबाला भिऊन जशीं लहान मुलें दूर पळतात किंवा अस्वलाला

पाहून कुतूहलमिश्रित भीति त्यांना वाटते तशाच प्रकारचे मन इंग्रजी वर्तमानपत्रांतील बातम्या वाचून बनते! पण प्रत्यक्ष अनुभवानें ते सर्व ग्रह दूर झाले! अगदी माणसासारखा माणूस. फार काय हिंदी बंधु जशी आपलेपणाची भाषा बोलतात तशा प्रकारचेंच वर्तन 'लाल' रशियनाचें पाहण्यास मिळालें. खुद्द तेहरानमध्यें तर सर्व परकीय प्रजेंत रशियनांचेच अधिक प्राबल्य आहे!

काझवीन ते तेहरान हा प्रवास पुनः अगदी वेगळा झाला. रस्ता सपाट मैदानांतूनच होता तरी एका बाजूस हिमाच्छादित गिरिशिखरे तर दुसरीकडे प्रखर उष्णतेमुळे दिसणारें मृगजळ असे परस्परविरोधी देखावे प्रथमपासून शेवटपर्यंत दिसत. तेहरान जवळ येतांक्षणींच थोडीशीं झाडें दृष्टिपथांत आलीं. पण थंडीमुळें तीं सर्व पर्णविहीन झालेलीं असल्यानें कविमनाला बोचणाऱ्या सात शल्यांत हें आठवें शल्य होईल असें वाटलें.

तेहरानचा विस्तार फार मोठा असून बर्फाच्छादित शिखराच्या पायथ्याशीं हें शहर वसलें आहे. मध्य-आशियातील राष्ट्रांचे हें केंद्र आहे व इराणची राजनगरी म्हणून तर विशेष श्रेष्ठता. इतिहास, राजकारण आणि व्यापार या दृष्टीनेहि तेहरानचें मोठेंपण कमी नाहीं. उलटपक्षीं युरोपांतील सर्व राष्ट्रांचा झगडा आशियांत कोठें चालू असेल तर तो येथेंच!

# श्रीशंकराचार्यांचें भाषण

शुक्रवार ता. २९-३-२९ रोजीं सुरत येथें भरलेल्या अखिल भारतीय शुद्धिसंमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें करवीर पीठाचे श्रीशंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी) यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें:—

गेल्या १०।१२ वर्षांत या शुद्धिविषयानें देशाच्या इतिहासाचा किती भाग व्यापला आहे याला आपण सर्व साक्षीभूत आहांत. शुद्धिपरिषदेचीं स्वतंत्र रीत्या वार्षिक अधिवेशनें यशस्वी रीतीनें होऊं लागलीं,यावरूनच देशाला या विषयाचें महत्त्व बरोबर पटलें आहे हें उघड होतें. हिंदुमहासभेच्या कार्यांपैकींच हें एक प्रमुख कार्य असल्यामुळें महासभेच्या अधिवेशनाबरोबरच हें अधिवेशनहि घडवून आणलें जावें हें उचित होय.

गेल्या बारा वर्षांत या चळवळीचीं निरनिराळीं स्थित्यंतरें व रूपांतरें झालीं. या मुदतींत संख्येच्या दृष्टीनें केलेली प्रगति समाधानकारक आहे कीं नाहीं हा प्रश्न विशेष महत्त्वाचा आहे असें वाटत नाहीं. संख्येला विशिष्ट परिस्थितींत अत्यंत महत्त्व आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु मानवजातीच्या उत्कर्षासाठीं म्हणून केल्या जाणाऱ्या धर्मप्रसाराच्या चळवळीला असें बाजारी स्वरूप येणें इष्ट नाहीं. अन्यमतप्रचारक अशी दृष्टि ठेवितात; परंतु आपण या बाबतींत त्यांचें अनुकरण करतां कामा नये.

बंगाल्यांत रामकृष्ण मिशन, मुंबईस गजानन भास्कर वैद्य, गोमांतकांत तरुण गोमांतकीय मंडळी व धर्मभास्कर मसूरकरबुवा, वऱ्हाड-मोंगलाईंत पाचलेकरबुवा व ठिकठिकाणच्या शुद्धिसभेच्या व महासभेच्या शाखा यांनीं व आर्यसमाजानें केलेलें मलकाना रजपुतांचें शुद्धीकरण इत्यादि निरनिराळ्या व्यक्ती व समाज यांनीं केलेल्या कार्याचें भरतखंड केव्हांहि कृतज्ञतेनेंच स्मरण करील.

काशीस झालेल्या ब्राह्मण महासंमेलनानें अ-हिंदूंच्या हिंदूकरणाला-भागवत धर्मदीक्षेला—मान्यता देईपर्यंत काळानें फरक घडवीत आणला आहे. यांत जुना वर्ग किंवा नवा वर्ग म्हणून कोणी कोणाचा उपहास किंवा कुचेष्टा करूं नये.उभयतांहि सारखेच धर्मनिष्ठ आहेत. दोनहि वर्ग धर्मरक्षणासाठींच झगडत आहेत. बुद्धिभेदानुरूप त्यांचे मार्ग परस्परविरुद्ध इतकेंच नव्हे तर परस्परांना मारक होत आहेत असें सध्या वाटतें. परंतु त्यांतून चांगलेंच निष्पन्न होईल.फक्त एकमेकांच्या अंतःकरणांत शल्यासारख्या लागतील अशा गोष्टी उभयतांनीं करण्याचे टाळावें. काशीच्या संमेलनानें धर्मभ्रष्टांच्या शुद्धीकरणाला जरी वीस वर्षांचीच मुदत घातली असली तरी त्यांच्याच विचाराचा महाराष्ट्रांतील म. म. वासुदेवशास्त्रीप्रभृति पंडितांचा एक प्रमुख पक्ष, जोंपर्यंत रक्तशुद्धि व जातिनिर्बंध पाळलेले आहेत तोंपर्यंत ३।४ पिढ्यांतील धर्मभ्रष्टांना देखील शुद्ध करून परत स्वजातींत घेण्यास हरकत नाहीं, असें म्हणण्यास सिद्ध झाला आहे ही गोष्ट आशादायक नाही काय? अत्याचाराला बळी पडून धर्माला मुकलेल्या लोकांना तत्काल प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून स्वजातींत घेण्यास परवानगी देतांना देखील ज्यांचें मन कचरत होतें त्यांच्या मनांत ही क्रांति घडून आली हें आपल्या चळवळीचें यश होय. किती धर्मभ्रष्टांना परत हिंदु केलें यापेक्षां किती पुराणमताभिमानी विरोधकांना हें तत्त्व पटविलें व किती शुद्धीकृतांना पूर्ववत् ज्ञातिप्रवेश मिळून त्यांना किती सामाजिक अधिकार

प्राप्त झाले यावर या चळवळीचें खरे यश अवलंबून आहे. सारा प्रचलित हिंदु समाजच जर आपणास या मताचा केवळ अनुयायीच नव्हे तर चालता-बोलता प्रचारक बनवितां आला तर साऱ्या जगाला त्या शक्तीपुढे स्वतःचें मतपरिवर्तन करून घेतल्यावांचून टिकाव धरणेंच अशक्य होईल. आपलें यश संख्येपेक्षां स्वकीयांच्या विचारपरिवर्तनांत विशेष आहे व या दृष्टीनेंहि आपण केलेली प्रगति पुष्कळ समाधानकारक आहे.

## शुद्धीकरणाचें महत्त्व काय ?

शुद्धीच्या तत्त्वाला सर्वांची संमति आज मिळालेली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रत्यक्ष शुद्धीकरणाच्या विधीमध्येंहि एके काळीं या कार्यास विरुद्ध असलेला शास्त्रीपंडित वर्ग देखील शक्य तेथें भाग घेऊं लागला आहे. खेड्यापाड्यापर्यंत शुद्धि हा शब्द पोंचला असून सर्वत्र हें कार्य प्रत्यक्ष चालू झालेले आहे. पण ही चळवळ येथेंच थांबती तर त्यांत आमच्या स्वभावाचा स्वार्थीपणा व्यक्त झाला असता. धर्मभ्रष्टाला शुद्ध कशासाठीं करावयाचें किंवा अ-हिंदूंना तरी हिंदुत्वाची दीक्षा कशासाठीं द्यावयाची ! शांतिसुखासाठीं तळमळणाऱ्या जीवांना मार्गदर्शक होऊन समाधान देण्यासारखे तत्त्वज्ञान वैदिक धर्माव्यतिरिक्त जगांत कोठेंच नाही. धर्मासाठी अशा रीतीनें असंतुष्ट स्थितीत तळमळणाऱ्या जीवांना शांति देण्यासाठीं शुद्धीची किंवा हिंदूकरणाची चळवळ आहे. तिचें पावित्र्य या तिच्या हेतूमध्यें आहे. धर्मभ्रष्ट झाल्यानंतर हिंदूच्या जीवाला जशा प्रकारची तळमळ लागते, तशीच ती जन्मानें हिंदु नसलेल्या पण धर्माकडे चित्त गुंतून गेलेल्या लोकांना लागणें स्वाभाविक आहे. त्यांची ही तळमळ निवारण करण्यासाठीं आपल्या सौख्यांत—मानसिक सौख्यांत—तळमळणाऱ्या मानवजातीस भागीदार होऊं देण्यासाठी हें शुद्धीचें तत्त्व जन्मानें हिंदु नसलेल्या लोकांना वेदानुयायी बनविण्यापर्यंत नेऊन पोंचविणे क्रमप्राप्त होतें. बारा वर्षांपूर्वी सनातन पद्धत्यनुसार नुकत्याच बाटलेल्या मनुष्याचें शुद्धीकरण देखील गंगागोदा नद्यांच्या कांठच्या प्रदेशांत कठीण होतें, तेथें आज टेम्स व सेन नद्यांच्या काठी—लंडन पारिस येथेंहि—हिंदूकरण सनातन पद्धत्यनुसार आचार्यपीठाच्या अनुज्ञेने होऊं लागलें, हा या चळवळीचा विजय नव्हे काय ? भागवत धर्मदीक्षेपुरता तरी कोणाचाच मतभेद नाहीं.

वैदिक धर्माच्या कल्पवृक्षाच्या छायेखालीं कोणीहि येऊन संतोष पावावें. त्याच्यासाठीं तयार करून ठेवलेल्या जागेंत राहून सुखानें नांदावें, येवढें म्हणण्यांत कोणाचाहि मतभेद आज उरलेला नाहीं ही गोष्ट अत्यंत समाधानाची आहे. तत्त्वप्रस्थापनेच्या दृष्टीने महत्त्वाचें कार्य झालें आहे. गेल्या वर्षी मिस मिल्लर यांच्या हिंदूकरणाच्या निमित्ताने हा प्रश्न आपलेपुढें प्रामुख्यानें आला, व त्या संस्मरणीय हिंदूकरणानंतर गेल्या वर्षांत परदेशांतील विद्वान, विचारी व धर्मासाठीं तळमळणाऱ्या अनेक व्यक्तींचे आपणास हिंदु करून घेण्याबद्दल पीठाकडे अर्ज आले. यामध्यें अत्यंत मोठमोठ्या हुद्द्यावरचेहि कांहीं लोक आहेत. कित्येकांनी आपल्याइतकीच वैदिक धर्मावर निष्ठा ठेवून आजन्म वैदिक तत्त्वज्ञानाचा व्यासंग केला आहे. फक्त त्यांचा जन्म व आमच्या सभ्याच्या समजुती त्यांना हिंदु म्हणवून घेण्यास मज्जाव करीत आहेत. पण ती परिस्थिति लवकरच पालटणार हेंहि निश्चित! ज्यांनीं हिंदु होण्याबद्दल अर्ज केले आहेत त्यांचीं नांवें आजच व्यक्त करणें इष्ट नाहीं. कित्येकांनीं फ्रान्समध्यें मंदिरें बांधून देण्याची विनंति केली आहे. कित्येकांनीं मी स्वतः तेथे येऊन आपले शुद्धीकरण करावें अशी इच्छा व्यक्त केली आहे; कोणी वैदिक धर्माच्या सिद्धांताची पृच्छा केली.तर कोणी सभ्येचीं उपकरणें मागविली. अशा निरनिराळ्या प्रकारचीं जी पत्रें आली आहेत त्या पत्रांमध्ये लेखकांची वैदिक धर्माबद्दलची निष्ठा स्पष्ट होते, एवढें मी निश्चितपणें सांगूं शकतों.

## धर्मनिष्ठेची जरूरी

आपणास तरी त्यांच्या धर्मनिष्ठेशिवाय इतर कशाची जरूर आहे ? कदाचित् आपणा सहस्रावधि धर्मानुयायांच्या हातून जी सेवा आज होऊं शकत नाहीं, ती सेवा वेदभगवानाच्या मनांत अशा एखाद्या परस्थाचे हातून घ्यावयाची असेल तर अशा परस्थानीं आमच्याजवळ येण्याची इच्छा व्यक्त केल्यानंतरहि त्यांना दुराग्रहानें दूर ठेविल्यास आपण धर्माचा द्रोह केल्यासारखें होणार नाहीं काय ? हे जाणूनच वैदिक धर्म, त्याचें तत्त्वज्ञान, त्याचें वाङ्मय जगांतील मानवजातीच्या कल्याणासाठी खुले आहे असें पीठानें गेल्या वर्षी व्यक्त केलें, व त्यानंतर परदेशांतून आलेल्या कांही अर्जांचा त्यांचे इच्छेप्रमाणें लवकर निकाल करावा म्हणून लंडनमध्यें इंडियन नांवाचे मासिकाचे संपादक असलेले श्री. विष्णु रघुनाथ करंदीकर या साताऱ्याच्या गृहस्थांना सध्या अधिकृत करून अर्जदारांना हिंदु करून घेण्यांत आलें आहे. कोणत्या पुराणांतील कोणत्या गोष्टी कितीं प्रमाणांत पुराव्यास घ्यावयाच्या हा प्रश्न ज्याच्या त्याच्या भावनेचा व चिकित्सकबुद्धीचा आहे; तथापि भविष्य पुराणांत कश्यप मुनींनीं मिश्र देशांत जाऊन सहस्रावधि लोकांना वैदिक धर्माचे अनुयायी बनविल्याचा एक उल्लेख आहे.

त्यानंतर सप्तसमुद्रापलीकडे जाऊन प्रत्यक्ष शुद्धीचा प्रसंग हाच असावा. व त्या दृष्टीनें इतिहास त्याची योग्य ती नोंद ठेविल्यावांचून राहाणार नाहीं. हिंदुस्थानासारख्या परवश देशांत धनाढ्य देशांच्या पाठपुराव्यानें ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं गेल्या शंभर वर्षांत केलेल्या कार्याला जितकें महत्त्व आहे त्याहून अधिक महत्त्व स्वकीयांची सहानुभूति दूरच राहिली, पण शक्य तर विरोध असतां, निर्धन स्थितींत इंग्लंडसारख्या स्वतंत्र व त्याजबरोबर हिंदुस्थानावर सत्ता गाजविणाऱ्या देशांत सनातन पद्धतीनें झालेल्या एका हिंदूकरणाला आहे.

## पाश्चात्य व पौर्वात्य दोघेहि तळमळतात

जे नसल्यामुळे विचारी पाश्चात्य लोक तळमळत आहेत तें आमच्याजवळ असूनहि बरोबर न ओळखल्यामुळें त्याच्याचइतके आम्हीहि अभागी होऊन पडलो आहोत. एकाला सुदृढ व स्वतंत्र शरीर आहे, परंतु त्या शरीरांतील आत्म्याचे त्याला विस्मरण झाल्यामुळे बाह्य मोहाखालीं गुदमरून गेले तरी त्याला शांति नाहीं. दुसऱ्यास आत्म्याची अंधुक कल्पना राहिली असली तरी त्याला स्वतःचे शरीर परवशतेत सडत पचत राहिल्याने होणाऱ्या हानीची बरोबर कल्पना नसल्यामुळें त्यालाहि शांति नाहीं. एक केवळ आधिभौतिक ज्ञानाच्या मागे लागल्यामुळे व दुसरा आधिभौतिक ज्ञानाला अजीबात पारखा झाल्यामुळे दोघेहि सारखेच कष्टी आहेत. दोघांच्या तत्त्वज्ञानाचा जेथे संयोग होईल तेथें खरी शांतता मिळेल ही गोष्ट बऱ्याच पाश्चात्य विचारवंतांनाहि आज पटली आहे व ते याच दृष्टीने आपल्याकडे पाहात आहेत. या वेळी आपण घर स्वच्छ करण्याकडे विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. भगिनी निवेदितेसारखी बाई वैदिक धर्मावर लुब्ध होऊन आली, पण तिची काय दुर्दशा आपण केली ! हिंदूच्या सेवेसाठीं उपोषणे काढण्याच्या किंवा रस्ते झाडण्याच्यापर्यंत मनाची तयारी सर्वांची असेल अशी अपेक्षा करणे व्यर्थ होय.

सामान्य माणसें आमच्या आजच्या असहानुभूतिपूर्ण वर्तनाने दुःखी होतात. याचमुळे शुद्धीची काय किंवा हिंदूकरणाची काय दोनहि चळवळी अपेशी ठरतील. परदेशीयांची निराशा होण्याचे कारण आमचा धर्म नसून ज्यांच्या हातीं तो धर्म आहे त्या आमचें वर्तन होय, ही गोष्ट आपण ओळखली पाहिजे, व आपल्या प्राचीन महर्षि-मुनींच्या परंपरेस साजेल अशी उदार वृत्ति धारण केली पाहिजे. आमच्यापाशीं आपलेपणाने येणारांना कोणत्या प्रकारचा परकेपणा वाटणार नाहीं अशी खबरदारी घेतली पाहिजे. हिंदूकरणाला विरोध करणाऱ्यांच्या अंतःकरणांत हिंदु झालेल्यांच्या प्रचलित समाजांत संकर होईल कीं काय अशी भीति आहे, व ती अयुक्त आहे असें वाटण्याचें कारण नाहीं. यासाठीं नवहिंदूंची नवीन वर्णव्यवस्था करण्याची कल्पना यशस्वी करून दाखविणें अत्यंत जरूर आहे. आर्यसमाज—पद्धत्यनुसार हिंदु होणाऱ्यांच्यापुढें प्रस्तुत ही अडचण नाहींच. हिंदु होणें याचा अर्थ लहान तत्त्वज्ञानाऐवजीं मोठ्या तत्त्वज्ञानाचा स्वीकार करणे व संकुचितताऐवजीं व्यापकाला आपलें म्हणणे आहे हें बरोबर जाणून हिंदु होऊ इच्छिणाऱ्यांनीं व त्यांना हिदु करून घेऊं इच्छिणाऱ्यांनीं या प्रश्नाकडे पाहाणे जरूर आहे. केवळ अन्य मताचे लोक अशा प्रकारच्या चळवळी चालवितात, म्हणूनच आपणहि असल्या उद्योगाला लागलो तर आपणास खरें यश लाभणार नाहीं. स्वदेशाप्रमाणें परदेशांतहि वैदिक धर्माच्या प्रसाराचे कार्य आरंभिणे अवश्य आहे असें अमेरिकेत कार्य करणाऱ्या कांहीं सद्गृहस्थांनीं सुचविल्यावरून तशा प्रकारचें कार्य करणारी एखादी मध्यवर्ती संस्था स्थापन करण्याच्या दिशेने प्रयत्न सुरू केले आहेत हें आपल्या वाचनांत बहुधा आलें असावें. हे प्रयत्न आपल्या सर्वांच्या साहाय्यानें व खऱ्या धर्मनिष्ठेनें कार्यप्रेरित होण्यानेच यशस्वी व्हावयाचे आहेत.

## वैदिक धर्म व अन्य पंथ यांतील फरक

शुद्धीच्या चळवळीचे बरोबर रहस्य लक्षांत येण्यासाठीं धर्माचीहि बरोबर कल्पना होणें अवश्य आहे. वैदिक धर्म व अन्य पथ यांमध्ये कोठें फरक पडतो हें कळल्यावांचून आपल्या कार्याबद्दलचा विश्वास वाटणार नाहीं. परमेश्वराच्या कल्पनेपुरता जरी विचार केला तरी इतरांचे तत्त्वज्ञान व आपलें तत्त्वज्ञान यांमध्यें फार फरक आहे. वस्तुतः स्थलकालादि परिस्थितीच्या पलीकडे असणाऱ्या परमेश्वराला नाम व स्थळ यांनीं आम्ही मर्यादित करता असा कित्येकांचा समज आहे, परंतु ती चूक होय. अन्य मतानुयायांच्याप्रमाणें आम्ही तो केवळ ( Impersonal ) आहे असें न मानतां, 'यस्मात् क्षरमतीतोऽहं अक्षरादपि चोत्तमः' य भगवद्गीतोक्तीप्रमाणे साकारनिराकाराहून कांहीं तरी वेगळा जो इच्छामात्रेंकरून आकार घेऊं शकेल, पण वस्तुतः ज्याच्यामध्यें सर्व आकारविकार लय पावतात अशी त्याची कल्पना (Superpersonal ) करतों. तत्त्वज्ञानाचे दृष्टीने तो असा असला तरी आम्ही आमच्या सोयीसाठीं आमच्या मर्यादित शक्त्यनुसार त्याच्याकडे लक्ष लागण्यासाठीं

चिन्मयस्याद्वितीयस्य निष्क्रियस्य शरीरिणः
उपासकानां कार्यार्थे ब्रह्मणो रूपकल्पना॥ ।

या रामतापनीय उपनिषद्वाक्याप्रमाणें आम्ही त्यास साकार बनविलें आहे. अवैदिक मताचे लोक सर्व जग ईश्वरानें निर्मिले असें मानून देवाला जगापासून भिन्न ठेवतात. तर वस्तुमात्रात परमेश्वर भरलेला आहे ही शिकवण आमच्या रोमरोमांत भिनलेली असल्यामुळें दगडाच्या एखाद्या मूर्तीत ईश्वराची कल्पना करण्यांत आम्हाला अडचण पडत नाहीं. प्रत्येक चांगल्या तत्त्वाचा व गोष्टीचा दुरुपयोग होतो, त्याप्रमाणे याहि बाबतीत झालें आहे; परंतु त्यामुळें तत्त्वांची श्रेष्ठता किंवा उपयुक्तता कमी होऊं शकत नाहीं. परमेश्वर आकारविकाराचे पलीकडे आहे हे जाणून आम्हां त्याला सोयीसाठीं साकार बनवितों यामुळें कांहीं हानि होण्याची भीति नाही.

परमेश्वर केवळ निराकार नाहीं. तो साकारनिराकार या सर्वांत आहे. तो काय नाहीं हें सांगणें सुलभ नाहीं. तो सर्व आहे हें सांगणें शक्य आहे. ही गोष्ट आमच्यापासून इतरांना शिकणें जरूर आहे. परमेश्वराचे कल्पनेवांचून केवळ नीतितत्त्वें अपुरी पडतात. केवळ नीतीच्या आधारावर मानवसमाज टिकून राहाणार नाहीं. परपीडा देऊं नये एवढी गोष्ट नीतीला देखील धरूनच आहे. परंतु परपीडक झाल्यास त्याचेकडून उलट आपल्यास पीडा दिली जाईल याच हेतूनें निरुपद्रवी राहाणाऱ्यांना दुसऱ्याला न कळत जर पीडा देतां आली तर ती देण्यास काय हरकत, अशी बुद्धि उत्पन्न झाल्यास तिचे निरसन करणें सुलभ नाहीं. ज्याला पीडा द्यावयाची त्याला कदाचित् न कळण्याइतकी हातचलाखी करतां येईल व दुर्दैवानें सध्या अशी प्रवृत्ति वाढती आहे; परंतु जो सर्वज्ञ व सर्वसाक्षी असा आहे त्याला चुकवून कांहीं वाईट करतां येणेंच शक्य नाहीं ही जाणीव समाजाला झालेली असेल तरच तो समाज ऐहिक व अध्यात्मिक उत्कर्षाला पोंचल्यावांचून राहाणार नाहीं. हे तत्त्वज्ञान केवळ अधिभौतिक नीतीच्या तत्त्वांपेक्षां अधिक श्रेष्ठ आहे हे उपयुक्ततावादाच्या दृष्टीनें तरी कोणासहि कबूल करावे लागेल. समाजाची नीति अचल राहाण्यासाठीं परमेश्वराच्या कल्पनेप्रमाणेंच पुनर्जन्माच्या सिद्धांतावरील विश्वासाची जरूरी आहे. पुनर्जन्माच्या विश्वासामुळे समाज संतुष्ट राहूं शकतो.

## अद्वैती तत्त्वज्ञान

जें तत्त्वज्ञान असावयाचे ते अद्वैती पाहिजे. सध्याच्या अवैदिक जगाला व्यवहारांत समत्व पाहिजे आहे, पण तें त्यांच्या तत्त्वज्ञानांतच नाहीं! मुळांत नसलेली गोष्ट व्यवहारांत आणण्याची त्यांची खटपट चालल्यामुळे त्यांना यश येणे शक्य नाहीं. प्रत्येय व्यक्ति ही भिन्न व त्याचे अधिकार भिन्न अशा प्रकारें एकमेकांना दूर करणारें तत्त्वज्ञान त्यांच्या मुळांत आहे. याच्या उलट बाहेरून भिन्न भिन्न दिसणाऱ्या व्यक्ति आंतून एकच आहेत. माझ्या 'आंतील' व शेजाऱ्याच्या 'आंतील' आत्मा एकच आहे. सर्व जीव एकच; या जीवामुळें जगाला सजीवपण आलें आहे व हें सारें जग परमेश्वरस्वरूप आहे. अशा प्रकारचें तत्त्वज्ञान समाजाला शिकवलें गेलें असतें तर विश्वबंधुत्वाचीं किंवा समतेचीं प्रवचनें झोडूनहि अंतःकरणांत वैषम्याची ज्वाला तेवत राहिल्याचीं दृश्ये पाहावीं लागलीं नसतीं. ब्रिटिश लोक हे तर केव्हांहि समतेचे भोक्तेच आहेत, पण तसें म्हणवून घेत असतां आपण जगांतील एक-पंचमांश मनुष्य जातीला सामान्य मानवी अधिकाराला देखील पारखे करून ठेवले आहे याबद्दल त्यांची सदसद्विवेकबुद्धि त्यांना कधींहि त्रास देऊं शकत नाहीं! आमच्याजवळ कितीहि चांगले तत्त्वज्ञान असले व तें जर जगाला बौद्धिक दृष्टीनें आम्हाला पटवून देतां आलें नाहीं, किंवा तत्त्वज्ञानाच्या जोरावर आम्हाला आमचा ऐहिक अभ्युदय गांठतां आला नाहीं तर त्याकडे जगाचें लक्ष वेधणें शक्य नाहीं. यास्तव आमच्या धर्माचे मुख्य सिद्धांत आचरून आमचा समाज आदर्श स्थितीस आपण नेऊन पोंचविला पाहिजे. शुद्धीमध्यें या सर्व गोष्टींचा समावेश झाला पाहिजे. अभ्युदय व निःश्रेयस या दोनहि दृष्टींनीं आपण संपन्न झालों पाहिजे व तशा संपन्न दशेला जगाला नेऊन पोंचविण्यासाठीं त्यांस हिंदु बनाविणें अवश्य आहे. शुद्धीच्या चळवळीचा अंतिम हेतु अशा प्रकारचा असला पाहिजे.

---

# श्रीसमर्थ वाङ्मय परिषद्

या परिषदेचें पांचवें अधिवेशन श्रीसमर्थोपासक श्रीसमर्थदास केशवबुवा यांचे अध्यक्षतेखालीं तळेगांव-दाभाडे येथें नवीन समर्थ विद्यालयांत भरलें होतें. परिषदेकरितां तीसचाळीस मंडळी परगांवांहून आली होती. त्यांत पुण्याचे श्रीमंत तात्यासाहेब मेहेंदळे, गीतावाचस्पति भिडेशास्त्री, श्रीयुत वि. अ. पटवर्धन, ज. स. करंदीकर, प्रो. पोतदार, स. वि. आपटे, बाबूराव गोखले, वा. कृ. भावे, कऱ्हाडचे श्री. स. खं. आळतेकर, पनवेलचे श्री. फडके, अनंतदास रामदासी वगैरे प्रमुखपणें दिसत होते. आरंभीं एका विद्यार्थ्यानें 'आनंदवनभुवन' हें प्रकरण म्हणून दाखविलें. चिटणीस दि. वि. काळे यांनीं परिषदेच्या पंचवार्षिक कार्याचें सविस्तर समालोचन केलें व महाजन यांनी गेल्या अधिवेशनाचा अहवाल वाचून दाखविला.

ह्या सभेत 'श्रीसमर्थ व राजकारण' या विषयावर विचार व्हावयाचा होता असें जाहीर केलेलेंच होतें जानेवारी १९२९ च्या विविधज्ञानविस्ताराच्या अंकांत न. र. फाटक यांनीं 'रामदासस्वामींचें राजकारण' हा विषय चर्चेला घेऊन श्रीसमर्थांचे बाबतींत (१) समर्थांना देशाभिमानाची कल्पना नव्हती (२) त्यांचे दासबोधांत राजकारण हा शब्द केवळ चातुर्य अशा अर्थीं वापरला आहे आणि (३) समर्थांचा व राजकारणाचा संबंध जोडण्यांत येतो ती चूक आहे असें प्रतिपादन केलें होतें! तेव्हां त्या कोटिक्रमास समर्पक उत्तर देणें हीच कामगिरी या परिषदेतील सर्व वक्त्यांनीं केली. अध्यक्षांनीं आपलें लिहून आणलेलें भाषण थोडक्यांत वाचलें. त्यांत समर्थांबद्दल संशयपरंपरा जागृत करणाऱ्यांचा थोडक्यांत इतिहास सांगून फाटक हे सर्व ग्रंथ नीट वाचल्याशिवाय विधानें करण्यास प्रवृत्त झाले आहेत; धर्माकरितां मरावें। मरूनी अवघ्यांसी मारावें। मारतां मारतां घ्यावें। राज्य आपुलें॥ अशासारखी कोणतीहि ओंवी धर्म व राजकारण यांचा परस्पर संबंध समर्थांचे बाबतींत स्पष्ट करील असें सांगितलें. समर्थांचे ग्रंथांत राजकारण नाहीं हे सिद्ध करण्याकरितां फाटक यांनीं उद्धृत केलेल्या बहुतेक उताऱ्यांचा त्यांनीं सरळ अर्थ लावून दाखवून फाटक यांनीं केलेल्या चुका दाखविल्या.

प्रो. पोतदार म्हणाले, 'फाटक व त्यांच्या मताचे लोक यांना समर्थांचे ग्रंथ लावतांच आले नाहींत असें म्हणावें लागतें. पूर्वकालचे लेखांत परमेश्वर, धर्म व अध्यात्म याबद्दल उद्गार सर्वत्र येतात. त्यांचा योग्य समन्वय करतां न आल्यामुळे फाटक यांचा घोटाळा झालेला आहे. इतर संतांप्रमाणेंच समर्थांची अध्यात्म-दृष्टि प्रधान असली तथापि संसार व अध्यात्म यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. यांत मतभेद होण्याला खरोखर जागाच नाहीं. उलट संसार 'शर्कोनि सार करावा' अशी त्यांची भूमिका दिसते. समर्थांनीं 'येथें बोलिला विशद। भक्तिमार्ग' असें दासबोधाचें ग्रंथलक्षण सांगितलें असलें तथापि तो स्पष्ट करून सांगतांना त्यांनीं ऐहिक प्रगतीवर जोर दिला आहे. भक्तिमार्गाचा खुलासा करतांना अभिप्रेत अर्थ पुढच्या अनेक ओंव्यांत सांगितला आहे. आपला ग्रंथ श्रवण केल्याचें फळ ते 'क्रिया पालटते तत्काळ' असें सांगतात. समर्थांना भाग्य, वैराग्य आणि चातुर्यहि पाहिजे. यावरून समर्थांचा भक्तिमार्ग मळमळीत आणि प्रवृत्तिविरोधी नाहींच नाहीं.

'समर्थांच्या लेखांत देशाभिमान नाहीं' असें फाटकांचें म्हणणें टिकणारें नाहीं. करुणाष्टकांत कोदंडपाणी रामाचीं विशेषणें 'धर्माभिमानी, सत्याभिमानी' न्यायाभिमानी, विद्याभिमानी, विप्राभिमानी अशीं लिहिलीं आहेत. या एकाच अवतरणावरून समर्थांचें वैशिष्ट्य सिद्ध होण्यासारखें आहे. इतक्या सर्व कल्पनांत 'देशाभिमानी' एवढाच शब्द नाहीं म्हणून उणेपणा वाटण्याचें कारण नाहीं. देशाभिमान हा शब्दच अलीकडचा असल्यानें तो जुन्या ग्रंथांत कसा येणार? समर्थांचे भक्तिमार्गांत प्रवृत्तीला फारच वाव होता. 'भाग्यश्री' व 'मोक्षश्री' अशा दोन स्वतंत्र व समान महत्त्वाच्या कल्पना त्यांनीं मांडल्या आहेत. मारुती-उपासनेच्याबद्दल फाटकांनीं उपस्थित केलेल्या शंका भीमरूपी स्तोत्रें वाचल्यावर राहूं नयेत. 'रामदासें भक्तियोगें। अरत्रीं परत्रीं पहा॥ घमंड साधलें मोठें। वैभवें धाड घेतली।' हे व अशासारखे उद्गार समर्थांचे इतर संतांपासून वैशिष्ट्यत्वच दर्शवितात. उपदेशपर ग्रंथ हृद्य पद्धतीनेंच उलगडले पाहिजेत. परमार्थाबरोबर ऐहिक गोष्टींकडे लक्ष वेधणें ही गोष्ट व्यापक अर्थानें राजकारणाला पोषकच आहे.

ज. स. करंदीकर म्हणाले, समर्थ इतरांप्रमाणें केवळ भक्तिमार्गी नव्हते. त्यांनीं आयुष्यांतील एक तप निर्भेळ भक्तिमार्गांत घालविलें. पण पुढें समाजस्थितीची जाणीव होऊन रामोपासनेला अत्यंत योग्य असें पंचवटी येथील गोदातट सोडून त्यांनीं राजकारणाचें क्षेत्र म्हणून मसूर, चाफळ येथें कृष्णा खोऱ्याचा आश्रय पत्करला. त्यांचे ग्रंथांतून देशस्थितीबद्दल जिज्ञासा, तळमळ,

निरीक्षण व उपाययोजना अशा सर्व धोरणी राज-कारणाला शोभतील अशा पायऱ्या दिसून येतात. केवळ मोक्षसाधनाची फिकीर करणाऱ्याला समुदायाचा हव्यास पाहिजे कशाला ? ' सकळां राखणे राजी । हे मुख्य भक्ति जाणिजे ' ' एकची जीव सर्वांचा। कट्टबंध ढळेचिना ' इतकी दणदणीत एकीची चाळणा करणाऱ्याला राजकारण समजलें नाहीं तर कोणाला समजलें असें म्हणावें? त्यांची रामोपासना हि अशीच सूचक आहे. भक्तिमार्गी लोक 'विपदः संतु नः शश्वत्' असें मागणें मागतात, तर समर्थ 'आपदा नको रे बहु भाग्य हो रे' असें मागणें मागतात. त्यांचे परचक्रनिरूपण हें प्रकरण वाचल्यावर देखील देशावरील संकटाची जाणीव त्यांना नव्हती व देशाभिमान त्यांना नव्हता, हें म्हणणें हास्यास्पद आहे. स्वराज्य मिळून शत्रूचा निःपात झाल्यावर ' उदंड जाहले पाणी स्नानसंध्या करावया ' असे जे उद्गार त्यांनी काढले त्यांचा फाटक यांनीं अगदीं विपर्यास केला आहे. मुद्राराक्षसांतील चाणक्याचे परमोच्च ध्येय 'स्वतःची शेंडी बांधणें' हे होतें असें म्हणण्यासारखेंच हें आहे !

आप्पासाहेब आळतेकर यांनी याच मुद्द्यावर पोषक असें भाषण केले. चातुर्य व राजकारण असे निरनिराळे शब्द अनेक ठिकाणीं आले आहेत, यावरून समर्थांचे मनांत तरी त्याचे निरनिराळे अर्थ होते. फाटकांचे राजकारणचातुर्य हें म्हणणें रास्त नाहीं असे त्यांनीं प्रतिपादन केलें.

विद्यावाचस्पति भिडेशास्त्री यांनीं समर्थांचें राजकारण प्रवृत्तीचे मूळ बीजच, म्हणजे त्यांची प्रवृत्ति व निवृत्तिविषयक समदृष्टि, ही आजच्या चर्चेवरून निष्पन्न झाल्याचें सांगितलें. ' यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः' ही धर्माची व्याख्या समर्थांनीं पुनः प्रवर्तित केली. प्रवृत्ति व निवृत्ति हीं परस्परांना विघातक आहेत असें इतर संतांनीं सांगितलें. परंतु समर्थांत निराळी वृत्ति दिसून आली. तात्पर्य, उपनिषदांतील ब्रह्मविद्या, गीतेचा कर्मयोग आणि समर्थांचा भक्तिमार्ग हीं एकच आहेत. समर्थांनी लोकसेवेचे द्वारें राष्ट्र जागृत केलें. अभ्युदय म्हणजे समाजोन्नति हीच त्यांची सर्व आयुष्याची कामगिरी होय.

नंतर श्री. बाबूराव गोखले, अनंतदास रामदासी यांचीं भाषणे झालीं. प्रो. पोतदार यांनीं फिरून उतारे वाचून दाखविले, व समर्थांनीं राजकारण केलें हा प्रवाद जुनाच असून नवीन उपस्थित केलेला नाही असें सांगितले. पुढील वर्षाचे चर्चेचा विषय ' श्रीसमर्थप्रताप ग्रंथ' हा घ्यावा असें ठरून परिषद समाप्त झाली.

# दिल्लीची खास तार

## असेंब्लींत बाँबचा स्फोट

ट्रेड डिस्प्यूटस बिल सुमारें १२ वाजतां १७ मताधिक्यानें पास झाल्यावर अध्यक्ष पटेल बहुतकरून रूलिंग देण्याकरितां किंवा पब्लिक सेफ्टी बिलावरील वादविवादावर स्वतःचें म्हणणें पुढे मांडण्याकरितां उठतात तोंच सभागृहांत सरकारी सभासद बसण्याच्या जागेंत दोन बाँबसारखे कांहीं तरी पदार्थ फेकण्यांत आलेले दिसले. त्याच वेळीं एक मनुष्य पिस्तुलासारखें एक हत्यार हातांत घेऊन हिंडतांना दिसला. सदरहू पिस्तुलांत गोळ्या नसून नुसता आवाज होत होता. पडलेले बाँबसुद्धां दिखाऊच असावेत. कदाचित् ते खरे किंवा सौम्य मारक स्वरूपाचेहि असतील, कारण त्यायोगानें लांकडी बाकांत भोकें पडलीं. यावरून त्यांत फारसा ज्वालाग्रही पदार्थ नसावा. परंतु तो बाँब डोक्यावर पडला असतां मनुष्य मेला असता. बाँबमधून धूर पुष्कळ निघाला.सर बमनजी दलाल यांस जबर दुखापत झाली आहे असें म्हणतात. फडणीस खात्याचे मिस्टर शंकरराव यांच्या पायास जखम झाली आहे. सर जॉर्ज शुस्टर यांसहि दोन ठिकाणीं किरकोळ जखमा झाल्या, त्यांपैकीं एकींतून थोडें रक्त आलें. प्रेक्षकांचे गॅलरींतल्या दोन मनुष्यांना पकडलें व अजूनहि धरपकड कदाचित् होईल सभा अर्थातच गोंधळांत आपोआप बरखास्त झाली. पण १५ मिनिटांनीं अध्यक्ष यांनीं सभागृहांत येऊन ' हा एक शोचनीय प्रकार झाला ' असें बोलून गुरुवारपर्यंत सभा तहकूब केल्याचें जाहीर केलें. व्हाइसरॉय व अध्यक्ष यांचेमधील तडजोड फलद्रुप झाली नासवी.या बाबतींत पब्लिक सेफ्टी बिलावर काय परिणाम होईल याचा निवळ तर्क करीत बसणें भाग आहे. सर्व पक्षांनीं बाँब प्रकरणाविषयीं तीव्र नापसंती व खेद प्रदर्शित केला. मागाहूनची माहिती कळली ती अशी कीं, बाँबमध्यें जड लोखंडाचे तुकडे होते व खालील मजल्यावरील दोनहि बाजूंच्या गॅलरींतलि पुष्कळ लोकांस थोड्याबहुत जखमा झाल्या. संशयित मनुष्यांनीं रक्त—वाङ्मयाचीं हस्तपत्रकें फेंकल्यावर हा प्रकार संपला.

पिस्तुलें हातांत घेऊन बेदरकारपणानें उभे असलेल्या त्या दोन मनुष्यांस पोलिसांनीं थोडा वेळ थांबून मग पकडलें. बाहेर जारीनें झडती चालू आहे. असेंब्लीचे दरवाजे बंद आहेत. पायांत लोखंडाचा एक तुकडा शिरल्यामुळें बमनजी दलाल यांस इस्पितळांत नेण्यांत आलें.

# दिल्लीचें बातमीपत्र

नवी दिल्ली ता. ६-४-२९

[ १० ]

कमिट्यांच्या निवडणुकीच्या सूचना निकालांत निघाल्यानंतर पब्लिक सेफ्टी बिलाच्या चर्चेला फिरून सुरवात व्हावयाची. परंतु ती होण्यापूर्वी अकस्मात् कोठून तरी बॉबगोळा पडावा त्याप्रमाणे अध्यक्ष पटेल यांनीं एक नवीनच अडचण सरकारच्या मार्गांत उभी केली ती अशी पब्लिक सेफ्टी बिलाचा उद्देश हिंदुस्थानांत रशियन कम्युनिस्ट लोकांच्या चळवळीला प्रतिबंध करावा हा आहे. आणि त्यांतील कलमें या उद्देशानेंच घडविलेलीं आहेत. हें बिल सिलेक्ट कमिटीकडे जाऊन एक महिन्यापूर्वींच परत आलें. परंतु त्यानंतर एक अकल्पित गोष्ट घडली ती ही कीं, सरकारनें ' कम्युनिझम ' वर हल्ला चढविण्याकरितां ३१ लोकांना पकडून त्यांच्यावर खटला भरला. या ३१ आरोपींत निदान दोन म्हणजे स्प्रॅट व ब्रॅडले हे तरी असे आहेत कीं, ज्यांच्या उच्चाटनाकरितांच काहीं अंशीं प्रस्तुत बिलाचा अवतार झालेला आहे असें म्हणतां येईल.होम मेंबर क्रेरर यांनी बिलाच्या पहिल्या वाचनाचे वेळींच या दोन गृहस्थांचा उल्लेख केला होता व बाकीच्यांचा जरी तेव्हां नामनिर्देश झाला नव्हता, आणि हल्लींचा खटलाहि मामुली पद्धतीचा म्हणजे पिनल कोडान्वयेंच झाला असला तरी खटल्यांतील मुख्य विषय कम्युनिझम हाच आहे ही गोष्ट दृष्टीआड होत नाहीं.

***

अशा रीतीनें न्यायकोर्टापुढें चालणारा खटला व असेंब्लीपुढें चर्चेला निघणारें बिल हीं दोनहि परस्परानुबंधीच ठरतात. व असेंब्लीच्या कामाच्या नियमांपैकीं एक नियम असा आहे कीं जो विषय न्यायकोर्टापुढें अनिर्णीत अशा स्थितींत असेल त्याची चर्चा कायदे–कौन्सिलांत होऊं नये. किंबहुना याच मुद्द्यावर पं.नेहरू यांना तहकुबीची सूचना मांडण्याला व्हाइसरॉयसाहेबांनीं आपल्या अधिकारांत हरकत घेतली होती.अर्थात् अध्यक्ष पटेल यांना तीच अडचण उपस्थित झाली, म्हणून त्यांनीं प्रथमच उठून असें सांगितलें कीं, "अशा अशा कारणांकरितां या बिलाची चर्चा तूर्त होणें अनिष्ट आहे. या वादविवादांत या खटल्याचा संबंध, असा नाहीं तसा, पदोपदीं येणार व सभासदांना पदोपदीं प्रतिबंध करावा लागणार. याकरितां सरकारनें आपण होऊन एक खटला तरी परत घ्यावा किंवा बिल तरी परत घ्यावें. पण सरकार खटला परत घेत नाहीं हें त्यांतल्या त्यांत नक्की ठरल्यासारखें असल्यामुळें त्यांनीं आपण होऊन बिलच परत घ्यावें किंवा निदान तहकूब ठेवावें म्हणजे सर्व विरोधाचाच परिहार आपोआप होईल." अशा रीतीनें सरकारनें तरी आपलें बिल परत घ्यावें किंवा अध्यक्षांनीं तरी आपला हुकूम चालवून बिलाचा वादविवाद बंद पाडावा असा दुस्तर विरोध उत्पन्न झाला व पहिल्या झटक्याला अध्यक्षांनीं या बिलाची चर्चा थांबवून पुढचें बिल म्हणजे ट्रेड डिस्प्यूटस बिल चालू करण्यासंबंधानें सर बी. एन. मित्र यांना आवाहन केलें अध्यक्ष पटेल यांची ही सूचना व निश्चय पाहून सरकार पक्ष सर्वस्वी चकित झाला. व सर बी. एन. मित्र हे आपलें बिल मांडण्याला उभे राहिले तेव्हां होम मेंबर व दुसरे कित्येक एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे सभासद लॉर्ड आयर्विन यांच्याशीं संगनमत करण्याला निघून गेले. आणि या प्रश्नाचा निकाल करण्याकरितां दररोज एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या सभा होऊं लागल्या.

***

ट्रेड डिस्प्यूटस बिलाची चर्चा मंगळवारीं तीन वाजतां सुरू झाली. परंतु त्यालाहि प्रथमच हरताळ फासण्याच्या दृष्टीनें दिवाण चमनलाल यांनीं अशी सूचना मांडली कीं, सिलेक्ट कमिटीकडून आलेल्या बिलाचा मसुदा फिरून लोकमत अजमावण्याकरितां बाहेर पाठविण्यांत यावा. याचा सरळ अर्थ इतकाच कीं, आज तें चर्चेला घेऊं नये. दिवाण चमनलाल यांनीं मुख्यतः तीन कारणें सांगितलीं. एक असें कीं सिलेक्ट कमिटींत मतभेद पुष्कळ झाला आहे. दुसरें कारण कीं,पूर्वीं मतें आणविलीं त्यांत कामकरी संघाकडून जितकीं मतें मागवावीं तितकीं मागविण्यांत आलीं नाहींत. व तिसरें कारण असें कीं, बिलाच्या स्वरूपांत पुष्कळ फरक झाल्यानें फिरून त्याबद्दल लोकमत समजणें जरूर आहे. या सूचनेवरील वादविवाद बुधवारीं ४ वाजेपर्यंत सुरू होता. त्यांत जोगिया, केळकर, अणे, जम्नादास मेथा, ठाकुरदास भार्गव, अमरनाथ दत्त, श्रीनिवास अय्यंगार, नीलकंठदास वगैरेंचीं चमनलालांना अनुकूल भाषणें झालीं. व फाझल इब्राहीम, कोक, कॉसग्रेव्ह, सर डार्सी लिंडसे, रंगा अय्यर यांचीं प्रतिकूल भाषणें झालीं. पण अखेर ६१ विरुद्ध ४१ इतकीं मतें पडून दिवाण चमनलाल यांची सूचना नामंजूर झाली व जवळ जवळ तींच मतें पुनः पडून बिल कलम-

वारीनें विचारांत घ्यावें असें ठरलें. कोणत्याच पक्षानें आपल्या सभासदांना हुकूम असा फर्माविला नसल्यामुळें व हुकूम नसल्यास गैरहजर राहाण्याची कित्येकांची प्रवृत्तीच असल्यामुळें अशा रीतीनें निर्णय झाला.

***

गुरुवारीं सकाळीं प्रारंभीं होम मेंबर क्रेरार यांनीं सरकारतर्फेचा खुलासा वाचून दाखविला. त्यांत सरकार काय वाटेल तें झालें तरी आपण होऊन पब्लिक सेफ्टी बिलाची चर्चा थांबविणार नाहीं, ती पुढें चालू ठेवणारच असा आपला निश्चय असल्याचें त्यांनी सांगितलें. इतकेंच नव्हे तर "अध्यक्ष जो अधिकार आपणाला आहे असें म्हणतात तो त्यांना मुळींच नाहीं" असें आपलें निश्चयात्मक म्हणणें आहे असेंहि होम मेंबर यांनी बजावलें! "खटला व बिल यांचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. दोनहि आम्ही बरोबर चालू ठेवणार. वादविवादांत दोघांचा परस्पर संबंध कोणी भाषणांत आणलाच तर तसें करण्याला अध्यक्षांना हरकत घेतां येईल आणि ती त्यांनीं खुशाल घ्यावी व बिलांतील वादभूमि निर्लेप ठेवावी, त्याला आमची हरकत नाहीं व त्याला आम्ही मदतच करूं" असेंहि सांगण्यांत आलें. तात्पर्य, "बिलाची चर्चा तुम्हाला थांबवितां येत नाहीं. ती थांबविली तर चूक कराल व त्या चुकीचे परिणाम तुम्हाला भोगावे लागतील!" असेंच जवळ जवळ मि. क्रेरार यांनीं अध्यक्षांना बजाविलें! क्रेरार यांच्या भाषणानतर पं. नेहरू, सर डार्सी लिंडसे व मालवीयजी यांनीं सरकारच्या खुलाशाचा विचार करण्यास वेळ मिळावा असें सांगितलें. तेव्हां ती गोष्ट अध्यक्षांनीं मान्य केली व दरम्यान आपल्या कैफियतीच्या लेखी प्रती सर्व पक्षांना देण्याचे क्रेरार यांनीं कबूल केलें दुसरें दिवशीं म्हणजे शुक्रवारीं निरनिराळया पक्षांच्या पुढाऱ्यांनीं सरकारच्या खुलाशासंबंधानें आपलें मत प्रगट केलें. फक्त अध्यक्ष पटेल यांनीं आपला निकाल सांगण्याचें तहकूब ठेवलें आहे.

***

ईस्टरच्या सुटींत ठिकठिकाणीं प्रांतिक परिषदा भरल्या. परंतु देशाचें लक्ष मुख्यतः दोन परिषदांवरच विशेष होतें. पैकीं सुरत येथें भरलेली हिंदुमहासभा व दिल्ली येथें भरलेल्या दोन मुसलमानांच्या परिषदा. या मुसलमान परिषदेंत फिरून पूर्वीचीच चर्चा झाली. किंबहुना ती विकोपालाहि गेली व दोनहि परिषदा एकाच वेळीं दिल्लीस भरवून कांहीं एकवाक्यता होईल तर पाहावें असा जो कित्येकांचा प्रयत्न होता तो सिद्धीस गेला नाहीं. जिना पक्षाच्या मुसलमान लोकांच्या परिषदेंत जवळ जवळ मारामारीच झाली व पोलिसांची मदत मागण्यापर्यंत मजल गेली. मुसलमान लोकांच्या दुसऱ्या परिषदेंत तंटाबखेडा नव्हता. कारण त्यांत सगळे एक जात कट्टर मुसलमानच जमले होते! देखावा असा आहे कीं मुसलमानांना हवे तें दिलें तर नेहरू रिपोर्टाला आपण संमति द्यावी असा मुद्दा घेऊन, बॅ. जिना हे आपल्या लोकांशी भांडत आहेत. पण हें त्यांचें म्हणणें शफीप्रभृति मुसलमान मानीत नाहींत, व दुसरीकडे अबुल कलाम अझाद वगैरे कॉंग्रेस पक्षीय मुसलमानहि मानीत नाहींत. यामुळें "पाहा हो मी कसा दोन धार्मिक वरवंट्यामध्यें केवळ राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेकरितां चिरडला जात आहे" सा केविलवाणेपणानें करुणा भाकण्याचा भास बॅ. जिना हे उत्पन्न करीत होते! पण आपल्यांत म्हण आहे त्याप्रमाणें, आपापसांत भांडणें करून प्रवाशाच्या दशम्या धर्मशाळेंत विटाळणारे कांहीं प्राणी असतात हे लोकांना माहीतच आहे.

***

किंवा अमानुष प्राणी सोडून मनुष्याची उपमा द्यावयाची तर असें म्हणतां येईल कीं, गवळ्याच्या घरांत बापलेकांनी भांडण करून गिऱ्हाइकाच्या दुधांत पाणी घालावें, त्याप्रमाणें मुसलमान जमातींतील हें भांडण आहे! म्हणून या भांडणानें कोणीहि चाणाक्ष हिंदु फसला जाणार नाहीं. "माझ्याकडे या" म्हणजे मी तुमचें भांडण तोडतो असें म्हणून उभय पक्षांना नादीं लावून, भांडण तोडण्याचा आव घालून, त्यातल्या त्यांत आवडत्या पक्षाचें कार्य करावयाचें व आपली तुंबडी भरावयाची असे कांहीं चतुर मध्यस्थ प्रत्येक समाजांत असतात, त्यांतलेच बॅ. जिना हे आहेत, ही गोष्ट अलीकडे दोन वर्षे लोकांना चांगलीच कळून चुकली आहे. म्हणून या हक्कदारींच्या भांडणांत केवळ राष्ट्रीय सभेला अनुसरणारे अबुल कलाम अझाद यासारखे मुसलमान तरी एक पुरवले किंवा महंमद शफीसारखे कट्टर मुसलमान पुरवले असें म्हणण्याची पाळी आली आहे. बॅ. जिना यांचा हा कावा ओळखून गतवर्षी जबलपूर येथील हिंदु महासभेच्या अध्यक्षपदावरून केळकर यांनीं आपल्या भाषणांत तो उघड केला होता व त्याच धोरणानें यंदा सुरत येथें भरलेल्या हिंदुमहासभेनें, मध्यस्थांचा हा कावा ओळखून, क्रियेला प्रतिक्रिया म्हणून, "नेहरू रिपोर्टाला मुसलमानांनीं मान्यता न दिली तर आम्ही दोन पावलें मागें जाऊं" असा ठराव केला. शफीप्रभृति मुसलमानांशीं आमचें न जुळलें तर तें पुरवलें, पण मित्रत्वाचा आव घालून, हिंदु समाजाला स्थानच्युत करण्याचा जिना यांचा

मतलबी प्रयत्न हिंदु समाजाला पुरवणार नाहीं. जिना यांना मुसलमानांनीं व हिंदूंनीं आपापल्या परीनें ओळखल्यामुळे ते यापुढे आजपर्यंतच्या मूर्धाभिषिक्त मध्यस्थाच्या मानाला मुकणारच. पण कदाचित् असेंब्लीलाहि मुकण्याचा संभव दिसतो. कारण पुढील निवडणुकींत मुंबई शहरांतील मुसलमानांच्या तर्फे सर इब्राहीम रहिमतुल्ला यांना असेंब्लींत निवडून आणावें आणि त्यानाच पटेल याच्या जागीं अध्यक्ष करावें असा कट चालू असल्याचें समजतें !

# हिंदुमहासभेची राष्ट्रीय भूमिका

न्यायनिष्ठुरतेनें कोणत्याहि गोष्टीची छाननी करण्याचा त्रास न घेतां मोघमपणे "रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति," असें म्हणणें हा निःपक्षपातीपणा, स्वाभिमानाला कोठेंच अधिष्ठान नसणें ही उदारबुद्धि, सर्वांनाच सरसकट चूक म्हणणें हा स्वतंत्र विचार, आणि कोणत्याच गोष्टींबद्दल मनाला तळमळ नसणें ही सहिष्णुता असे अलीकडे कित्येक लोकांचे अर्थ बनत चालले आहेत. अशा अधांत्री व सर्वतंत्रस्वतंत्र लोकांनीं सुरत येथील हिंदुमहासभेच्या निर्णयाकडे पाहून नाकें मुरडावीं यांत आश्चर्य नाहीं. रामानंद चतर्जी यांच्यासारख्या विद्वान व विश्वधर्मी म्हणवणाऱ्या ब्राह्मांतील पुढाऱ्यानें हिंदुमहासभेचें अध्यक्षस्थान स्वीकारलें हेंच यांपैकीं कित्येकांना कसेसेंच वाटलें. मग रामानंदानीं अध्यक्षस्थानावरून हिंदुमहासभेचा एकूणएक कार्यक्रम न्याय्य व आवश्यक आहे असा तपशीलवार, साधार, व स्पष्ट निर्णय दिला, इतकेंच नव्हे तर मुसलमानांनीं नेहरू रिपोर्ट स्वीकारला तरच तो तुम्ही माना, नाहीं तर 'आम्हास कोणत्याहि गोष्टींत जातवारी बिलकुल नको' या पूर्वीच्या आपल्या अस्सल राष्ट्रीय भूमिकेला चिकटून राहा असा आपल्या भाषणांत त्यांनीं इषारा दिला हें पाहून तर त्यांस फारच आचंबा वाटला असेल.

रामानंद चतर्जी हे ज्या ब्राम्ह समाजांत आहेत, त्यांतील कित्येक व्यक्ती हिंदूंना परके समजून दुरून दूषण देणाऱ्या आहेत, तर कित्येक "मी ब्राह्मो म्हणजे तुम्हापासून अगदीं वेगळा असल्यामुळें मी अमुक गोष्ट केली ही हिंदु समाजाच्या दृष्टीनें अनिष्ट झाली असें म्हणणारे नाकखुपसे तिऱ्हाईत तुम्ही कोण!"असे तुच्छतेनें म्हणणाऱ्या फाटिंग व्यक्तीहि त्या समाजांत आढळतात. आणि या उदाहरणांवरून एकंदर ब्राह्मोंच्या विचारसरणीबद्दल स्वतःशीं कांहीं तरी अनुमान आगाऊच मनाशीं बनवून ठेवणाऱ्या सामान्य जनतेस रामानंदांना अध्यक्षस्थान दिल्यापासून धोका वाटत होता.ज्या वेळीं हिंदुमहासभेचीं सर्व सूत्रें हातांत धरून, सर्व शक्ति एकवटून खचावयास पाहिजेत अशा वेळीं हा बिनआगापिच्छाचा व बिलबिलीत दिसणारा अध्यक्ष अवसानघात तर करणार नाहींना, अशी कित्येकांना शंका वाटत होती. डॉ. मुंजे यांनीं हिंदुसभेचें जाळें ताणून तें ब्रम्होनाहि व्यापून टाकील इतकें पसरविण्यासाठीं ही अध्यक्षांची योजना मान्य केली असली तरी या ताणण्यांत हें जाळें खिळखिळें होऊन तुटून त्यांत भोकसे पडतील कीं काय अशी धास्ती वाटून, "छेः डॉक्टर मुंजे चुकत आहेत" असेहि उद्गार आपलेपणाच्या काळजीनें कित्येक काढीत होते.

पण अखेर रामानंदांना अध्यक्षस्थानी निवडणाऱ्यांची योजकताच यशस्वी ठरली. सुदैवानें म्हणा अगर दुर्दैवानें म्हणा, बंगाल्यातील मुसलमानांची चढाई, आक्रमण, अराष्ट्रीयपणा व अत्याचार या गोष्टी इतक्या विकोपाला गेलेल्या आहेत कीं त्यामुळें उदारपणाहि संकुचित होईल व अगदीं बेपर्वा खुशालचेंडूच्या अंतःकरणालाहि पीळ पडेल. मग रामानंदांसारख्या वृद्ध, अनुभवी, विचारी व चौरस विद्वान गृहस्थाला या परिस्थितीची जाणीव होऊन हिंदुसभेच्या कार्यक्रमाची उपयुक्तता पटली असल्यास नवल काय ! यासंबंधीं हिंदुमहासभेच्या योजकांनीं जी अटकळ केली तीच अखेर खरी ठरली. "उदंडचि शिकला । प्रसंगमान चुकत गेला । मग तया विद्येला कोण पुसे ॥" अशासारखे रामानंद हे अवसानघातकी विद्वान नसून ते पूर्ण समयज्ञ विद्वान आहेत हेंच त्याच्या विचारपरिप्लुत भाषणावरून सिद्ध झालें. ब्राह्म पंथ सुधारक आहे. पण "तुम्ही जाती एकदम मोडीत नाहींना, मग तुमचें संघटन व्यर्थ. आणि शुद्धीकृत इसम पुनः आपल्या जातींत प्रविष्ट करण्याचे कामीं तुमचे प्रयत्न यशस्वी होत नाहींतना, मग तुमचें शुद्धीकरण व्यर्थ" अशा प्रकारें शुद्धिसंघटनेच्या चळवळीची सहानुभूतिरहित हेटाळणी कित्येक सुधारक म्हणविणारे करीत असतात. पण रामानंदांनीं असें केलें नाहीं.फाजील उदारपणाचा आव आणून हिंदुसभेला संकुचित ठरविणाऱ्या लोकांना त्यांनीं साधार व सप्रमाण उत्तर दिलें मुसलमान लोक चिडतात, तर मग वाद्यंच बंद केलीं अगर मिरवणुकी काढल्याच नाहींत तर काय बिघडेल, असें विचारणाऱ्या लोकांनीं उत्सव मिरवणुकी यांचे

राष्ट्रीय जीवनांत किती महत्त्व आहे याचें रामानंदांनीं केलेलें सप्रमाण समर्थन अवश्य वाचावें.

राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें आम्ही तूर्त हिंदु स्त्रियांना पळवून नेण्याच्या मुसलमानी सत्राकडे दुर्लक्ष करतों, असें म्हणणाऱ्या कांहीं बंगाली पुढाऱ्यांच्या डोळ्यांत स्त्रियांच्या अब्रूच्या प्रश्नासंबंधीं रामानंदांनीं प्रदर्शित केलेले विचार चांगलेच अंजन घालतील. 'मी ब्राह्म आहे म्हणजे हिंदू नव्हे' असें तर त्यांनीं म्हटलें नाहींच. पण आर्य ब्राह्म, जैन, बौद्ध, शीख, यांचाहि हिंदु या व्यापक शब्दांत अंतर्भाव करून ते सर्व हिंदुसभेच्या कक्षेत आणावयाचे या धोरणासच त्यांनीं पाठिंबा दिला. रामानंद हे यापूर्वी हिंदुमहासभेच्या चळवळीमध्यें विशेष पडलेले नाहींत. म्हणूनच स्वतंत्र दृष्टीनें विचार करणाऱ्या एका अनुभवी विद्वानाच्या हिंदुमहासभेच्या कार्यास मिळालेल्या या पाठिंब्यामुळें महासभेविषयीं साशंक व तुटक वृत्ति बाळगणाऱ्या कित्येक हिंदूंचे संशय दूर होऊन सभेच्या कार्यास चांगलाच चालना मिळाल्याशिवाय राहणार नाहीं.

राष्ट्रीयत्वाच्या भावनेमध्यें योग्य व अयोग्य असे प्रकार असतात. दुसऱ्यावर स्वाऱ्या करून लूट करणारें व त्यांचें स्वातंत्र्य हरण करणारें युरोपियन लोकांचें राष्ट्रीयत्व त्याज्य असून आपल्याप्रमाणेंच इतर राष्ट्रेंहि स्वतंत्र असावींत असें म्हणणारें हिंदुस्थानाचें राष्ट्रीयत्व योग्य व रास्त होय. त्याचप्रमाणें ज्ञातिविषयक चळवळींचेहि चांगले व वाईट असे दोन प्रकार आहेत. आंतरराष्ट्रीय सुस्थितीच्या आड येणारें जें राष्ट्रीयत्व तें चुकीचें व ही मर्यादा पाळणारें राष्ट्रीयत्व तें बरोबर. त्याचप्रमाणें राष्ट्रीय सुस्थितीच्या आड येणारी ज्ञातभावना वाईट. पण राष्ट्रीयत्व सांभाळूनहि ज्ञातिविषयक चळवळ करतां येते व तशीच हिंदुमहासभेची चळवळ आहे. भिन्नधर्मीय लोकांच्या राष्ट्रांतच अशा स्वतंत्र संस्था असतात असें नसून एक धर्म असलेल्या राष्ट्रांतहि निरनिराळ्या पंथांचे लोक राष्ट्रीयत्व संभाळून त्या त्या पंथाच्या हितरक्षणासाठीं निरनिराळ्या संस्था काढून अनेक उद्योग करीत असतात. हे उद्योग राष्ट्रघातक आहेत अशी तेथें कोणी शंकाहि घेत नाहीं. हा दाखला देऊन रामानंदांनी हिंदुसभेची आवश्यकता सिद्ध केली. शिवाय कित्येक लोक हिंदुसभेचें केवळ प्रतिक्रियारूपानें समर्थन करीत असतात. ते म्हणतात कीं, मुसलमानांनी आपल्यापुरती संकुचित दृष्टि ठेवून मागण्या केल्या तर हिंदुसभेनें तशाच मागण्यांनीं त्याचा प्रतिवाद करणें हें रास्त होय.

पण हे समर्थनहि सदोष आहे. हिंदुसभा व मुस्लीम लीग या दोनहि संस्था संकुचित वृत्तीच्या म्हणून त्याज्य ठरवणारा धोपट निःपक्षपात व प्रतिक्रियारूपानें हिंदुसभेच्या कार्यक्रमाचें समर्थन ही उभयतां एका दृष्टीनें हिंदुसभेला सारखेंच दोषी ठरवितात. पण रामानंदांनी असलें समर्थन न करतां हिंदुसभेचा सर्व कार्यक्रम मूलतः अस्सल राष्ट्रीय आहे, असेंच त्याचें समर्थन केलें हें विशेष होय. मुसलमान अराष्ट्रीय बनत असल्यामुळें हिंदुसभा प्रतिकारार्थ अराष्ट्रीय बनत आहे असें म्हणणें खरें नाहीं. मुसलमान अराष्ट्रीय बनत असल्यामुळें हिंदुमहासभेनें खऱ्या राष्ट्रीयत्वाचा आग्रह धरला आहे हेंच खरें. उदाहरणार्थ, संयुक्त मतदारसंघाचा प्रश्न घ्या. संयुक्त मतदारसंघांनीं हिंदूंचें हित होण्याच्या ऐवजी त्यांचें नुकसानच होण्याचा संभव आहे. पण राष्ट्रीयत्वाच्या धोरणासाठीं हिंदु संयुक्त मतदारसंघाची मागणी करीत आहेत, हे लक्षांत ठेवलें पाहिजे. हिंदुमहासभेला मुसलमानाच्या चढाईपुढें हिंदु समाजाचें रक्षण करावयाचें आहे ही आजची खरी भूमिका नसून मुसलमानी चढाईपुढें खऱ्या राष्ट्रीयत्वाचें रक्षण हिंदु सभेला करावयाचें आहे हीच भूमिका खरी व तीच रामानंद यांनीं विशद करून सांगितली आहे. मुसलमानांच्या ज्ञातिनिष्ठ फाजील हट्टानें वातावरण इतकें दूषित झालें आहे कीं या ज्ञातिनिष्ठेला विरोध करणारी हिंदुमहासभाहि हिंदूंच्या बाजूनें उलट तार खेंचीत आहे असा भास कित्येक उथळ लोकांना होतो. तशी उलट तार हिंदूंनीं खेंचली तरीहि ते न्याय्यच ठरेल हे खरें. पण हिंदुमहासभा आज तितकेंहि करीत नाहीं. ती फक्त मुसलमानांना राष्ट्रीयत्वाच्या सरळ मार्गावर आणण्याचा प्रयत्न करीत आहे.

हिंदुमहासभेच्या खऱ्या भूमिकेविषयीं वरवर विचार करणाऱ्यांची विपर्यस्त समजूत झाल्यामुळें सुरतेला नेहरू रिपोर्टासंबंधानें झालेल्या ठरावाचाहि खरा अर्थ त्यांच्या लक्षांत येत नाहीं. याचें गमक पाहावयाचें तर हेंच कीं, "मुसलमानांप्रमाणें हिंदूंनाहि नेहरू रिपोर्ट फेटाळला" "राज्यघटनेच्या अवघड प्रश्नाचा इतका खोल व मार्मिक विचार ज्यांत केला आहे त्या नेहरू रिपोर्टाला हिंदुमहासभेनें चुटकीसरसें बाजूला सारलें" इ. टीका हिंदुमहासभेच्या ठरावावर होत आहेत! पण या दोनहि प्रकारच्या टीका खऱ्या नाहींत. हिंदुमहासभा ही मुख्यतः राजकीय संस्था नाहीं. हिंदूंच्या दृष्टीनें राजकारणांत एखादी कांहीं विशेष गोष्ट सुचविणें आवश्यक ठरेल तरच हिंदुमहासभा ती गोष्ट करील. उदाहरणार्थ, सायमन कमिशन, पब्लिक सेफ्टी बिल, सरकारचें दडपशाहीचें धोरण, हाजी

यांचें बिल, जमीनमहसुलाचा प्रश्न इ. राजकारणांत महत्त्वाच्या ठरलेल्या अनेक प्रश्नांबद्दल हिंदुमहासभा विचार करीत नाहीं. कारण हिंदुमहासभेंतलेच हिंदू राष्ट्रीय संस्थांतून या विषयासंबंधीं मतप्रदर्शन व चळवळ करीत असतात. या दृष्टीनें विचार केला असतां हिंदुमुसलमानी संबंधाव्यतिरिक्त ज्या अनेक गोष्टी नेहरू रिपोर्टांत आहेत त्यांचा विचार करणें हिंदुसभेला प्राप्त नव्हतें.

हिंदी संस्थानांचा ब्रिटिश हिंदुस्थानाशीं संबंध काय असावा, प्रांतिक कायदे-मंडळांतहि कौन्सिल ऑफ स्टेटसारखी दुसरी सभा निर्माण करावी कीं नाहीं, मध्यवर्ती कारभारांत कोणतीं खातीं राखीव व कोणतीं सोंपीव असावीं, व्हाइसरॉयांचे अधिकार काय असावेत, मंत्रिमंडळाची जबाबदारी संयुक्त का वैयक्तिक, घटना बदलण्यास किती बहुमत अवश्यक ठेवावें, प्रांतिक व वरिष्ठ सरकारांच्या खजिन्याचें वर्गीकरण कसें असावें इ. अनेक राज्यघटनेच्या प्रश्नासंबंधीं विचार करणें हिंदुसभेला आवश्यक नाहीं. सामान्य राष्ट्रीय प्रश्नाचे बाबतींत इतर राष्ट्रीय लोकांबरोबर हिंदूंहि हा विचार राष्ट्रीय संस्थांमधून करीत आहेतच. या सर्व बाबतींत हिंदु या दृष्टीनें कांहीं विशेष म्हणण्याचा प्रसंग नाहीं. अर्थात् हिंदुमहासभेनें नेहरू रिपोर्टासंबंधीं कांहीं बोलावयाचें तर तें फक्त हिंदू-मुसलमानांच्या संबंधापुरतेंच. हिंदुस्थानाची राज्यघटना ठरविण्याचा प्रश्न पुढें आल्यावर जबलपुरास हिंदु महासभेनें राज्यघटनेंतील जातिविषयक विभागासंबंधानें आपलें म्हणणें ठरावरूपानें पुढें मांडलें. या ठरावांत हिंदूंना कांहीं विशेष सवलती अगर हक्क असावेत असेंहि हिंदूंनीं म्हटलेलें नाहीं. जातवारीचें तत्त्व हें राष्ट्रीयत्वास घातक आहे, मग ती जातवारी कौन्सिलांत असो, नोकऱ्यांत असो, शिक्षणसंस्थांत असो, स्थानिक स्वराज्य-संस्थांत असो, मंत्रिमंडळांत असो वा प्रांतविभागणींत असो. या सर्व बाबतींत सर्व व्यवहार सामान्य न्यायानें, सरळ चढाओढीनें व्हावेत व कशांतहि जातवारी नसावी असें हिंदुसभेनें म्हटलें. हिंदुमहासभेच्या सर्वपक्षीय परिषदेमधील प्रतिनिधींना ही हिंदुमहासभेची आज्ञा होती. आणि तींत ज्ञातिनिष्ठ हट्ट असा कोणताच नव्हता व हिंदूंसाठीं म्हणून कोणताहि विशिष्ट राखीव अगर सवता हक्क मागितला नव्हता. राष्ट्रीयत्वाला कोणत्याहि ज्ञातिनिष्ठ विभागणीनें बाध येऊं देऊं नका इतकाच या आज्ञेचा अर्थ होता. उलट मुस्लीम लीगच्या प्रतिनिधींना त्या लीगनें जी आज्ञा केली तीत मुसलमानांकरितां केवळ मुसलमान म्हणून अनेक विशिष्ट व सवत्या हक्कांची मागणी होती. आणि मुस्लीम लीगच्या प्रतिनिधींनीं आपला हट्ट सोडला नाहीं तरीहि हिंदुसभेच्या प्रतिनिधींनीं आपला राष्ट्रीयत्वाचा आग्रह सोडला; याचा हेतु असा कीं, एकदां हिंदू-मुसलमानांच्या तडजोडीनें हा प्रश्न कायमचा सुटत असेल तर राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीने त्यास थोडेंसें वैगुण्य आलें तरी चालेल. पण तडजोडीसाठीं हिंदुसभेच्या प्रतिनिधींनीं दाखविलेल्या या समेटबुद्धीचा मुसलमानांनीं गैरफायदा घेतला.

एखाद्या चुकार ऋणकोने हिशेबाची भानगड दाखवून बरीचशी सूट घेऊन वचनचिठी लिहून द्यावी व पुनः त्या वचनचिठीची रक्कम देण्याची वेळ आली कीं, सूट देऊन कमी झालेली रक्कम ही ऐन रक्कम असें समजून पुनः सूट मागावी. यासारखी कारवाई मुसलमानांनीं चालविली. हिंदुमहासभेंत नसलेल्या अशा पंडित नेहरूंसारख्या हिंदूंवरहि ज्ञातिनिष्ठेचा आरोप मुसलमान करूं लागले! मुसलमानांना सवलती देऊन केलेला नेहरू रिपोर्ट म्हणजे हिंदूंची मूळ भूमिका असे बॅ. जिनासारखे लोक म्हणू लागले. अर्थात् ज्या एकीच्या आशेने हिंदुमहासभेच्या प्रतिनिधींनी हिंदुमहासभेच्या ठरावाविरुद्ध एक प्रकारें वर्तन करून, सर्वपक्षीय परिषदेंतील तडजोडीस मान्यता दिली ती आशा व्यर्थ ठरली ती सफल ठरली असती तर आपल्या प्रतिनिधींनीं एकीच्या दृष्टीनें केलेली तडजोड हिंदुसभेनें मान्य केली असती पण एकीसाठी चार पावलें पुढे गेल्यावर, तीच तुमची भूमिका असे म्हणून आतां पुनः एकीकरितां आणखी किती पुढें येतां तें बोला असा मुसलमान पुढाऱ्यांनीं सवाल करण्यास सुरवात केली! हा कावा हिंदूंनीं आतां पूर्णपणे ओळखला असल्यामुळें जबलपूरच्या ठरावांत निर्दिष्ट केलेल्या राष्ट्रीय भूमिकेवरून ढळण्यास हिंदुमहासभेला आतां कांहींच कारण राहिलें नाहीं.

अर्थात् जबलपूरच्या ठरावाचा पुनरुच्चार सुरतेस करण्यांत आला. पण अजूनहि नेहरू रिपोर्टांतील तडजोडीला मुसलमान समाजाची मान्यता मिळेल तर ती तडजोड स्वीकारण्याला हिंदुसभा मागेंपुढें पाहणार नाहीं असेंहि सुरतेच्या ठरावांत सूचित केलें आहे. तडजोडीची आशा खुंटल्यानें आतां आपली पूर्वीची राष्ट्रीय भूमिकाच कायम आहे असें हिंदुमहासभेनें सुरतेस जाहीर केलें नसतें तर "नेहरू रिपोर्ट म्हणजेच हिंदूंची भूमिका" असें ठरवूं पाहाणारे अली बंधू व जिना यांना चांगलेंच फावलें असतें. पण सुरतेच्या निर्णयानें तर "नेहरू रिपोर्टवाले म्हणजे हिंदुसभावाले व नेहरू रिपोर्टाचा पुरस्कार करणारी

कॉंग्रेस म्हणजे हिंदुसभा" इ. महंमद अल्लीप्रभृतींची ओरड व्यर्थ ठरेल. आजच्या परिस्थितींत मुसलमान अगर इतर हटवादी पक्ष जें मागतील तें योग्य का अयोग्य किंवा राष्ट्रास हितकारक का अहितकारक याचा विचार न करतां तें जशाच तसें मान्य करणें हेंच खरें राष्ट्रीयत्व अशीच कित्येकांची उफराटी व्याख्या होऊन बसली आहे. म्हणून या प्रसंगीं हिंदुमहासभेला आपल्या खऱ्या राष्ट्रीयत्वाच्या भूमिकेचा खणखणीतपणें पुनरुच्चार करणें प्राप्त होतें व तेंच प्रसंगप्राप्त कार्य रामानंद चतर्जी, डॉ. मुंजे, वामनराव मुकादम, इ. समयज्ञ हिंदु पुढाऱ्यांनीं सुरतेस केलें.

# सुरतची हिंदुमहासभा

सुरत येथें शनिवार ता. ३० मार्च रोजीं दुपारीं अश्विनीकुमार रस्त्यावर उभारलेल्या भव्य मंडपांत हिंदुमहासभेच्या अधिवेशनास सुरुवात झाली. मंडपांत श्रीशिवाजी, लाला लजपतराय, स्वामी श्रद्धानंद, लो. टिळक, रवींद्रनाथ टागोर इ. थोर पुरुषांच्या प्रतिमा लावण्यांत आल्या होत्या. सर्व भागांतून आलेले प्रतिनिधी व प्रेक्षक यांनीं मंडप गच्च भरून गेला होता. डॉ. मुंजे, डॉ. चोवितराम, स्वामी चिदानंद, पं. राधाकांत मालवीय, सुनीतिकुमार चतर्जी, पद्मराज जैन, डॉ. सावरकर, प्रो. कालिदास नाग, स्वामी सत्यानंद, आशुतोष लाहिरी, भाई परमानंद, निहालचंद, नारायणलाल बन्सीलाल इ. निरनिराळ्या प्रांतांतील हिंदु पुढारी व कार्यकर्ते प्रमुख स्थानीं दिसत होते. गुजराथमधील डॉ. दीक्षित, रा. ब. भीमभाई नाईक, रा. सा. दादूभाई देसाई, वामनराव मुकादम इ. कौन्सिलचे सभासदहि हजर होते. प्रथम गुजराथी मुलींचें पद्यगायन झाल्यावर स्वागताध्यक्ष डॉ. एम. एम. रायजी यांनीं आपलें भाषण वाचून दाखविलें. भाषण झाल्यानंतर भाई परमानंद यांना श्री. रामानंद चतर्जी यांना अध्यक्षस्थान देण्याबद्दल विनंति केली. तिला निरनिराळ्या प्रांतांतील प्रतिनिधींनीं अनुमोदन दिल्यावर अध्यक्षांनीं भाषण केलें. (तें यानंतर विषयनियामक मंडळाची निवडणूक होऊन त्या दिवसाचें काम संपलें.

### दिवस दुसरा

रविवार ता. ३१ मार्च रोजीं सकाळीं सभेच्या अधिवेशनास सुरुवात झाली. लाला लजपतराय यांच्या मृत्यूबद्दल दुःखप्रदर्शनाचा **पहिला ठराव** अध्यक्षांनीं मांडला. या ठरावांत लजपतराय यांच्यावर पोलिसांनीं केलेल्या हल्ल्याबद्दल निषेध केलेला असून, लालाजींच्या मृत्यूबद्दल नोकरशाहीच जबाबदार आहे असें म्हटलें आहे. पोलिसांच्या वर्तनाबद्दल स्वतंत्र चौकशी कमिटी सरकारनें नेमली नाहीं याबद्दलहि सरकाराचा निषेध करून हिंदुमहासभेच्या मार्फत होणाऱ्या लजपतरायांच्या अखिल भारतीय स्मारकास सर्वांनीं मदत करावी अशी विनंति केली आहे. हा ठराव मंजूर झाल्यावर गोध्रा येथें मुसलमान गुंडांनीं श्री. पुरुषोत्तमदास शाहा यांचा खून केला याबद्दल तिरस्कारदर्शक असा **दुसरा ठराव** अध्यक्षांनींच मांडला व तो सर्वानुमतें मंजूर झाला.

संघटनेसंबंधाचा तिसरा ठराव पुढील आशयाचा होता. "हिंदूंतील सर्व पंथांच्या लोकांनीं संघटनकार्यास चालना द्यावी. प्रत्येक शहरांत व खेड्यांत हिंदुसभा स्थापन करावी व हिंदुमहासभेच्या ठरावांची अंमलबजावणी करावी". या ठरावावर एका जैन मुनींनीं भाषण केलें. बंगालमधील स्वामी सत्यानंद यांनीं ठरावास पाठिंबा देतांना सांगितलें कीं, बंगालमधील दरदहा वर्षांत शेकडा ३ इतकी मुसलमानांची संख्या वाढत आहे व तेथें शुद्धिकार्याचा प्रसार न केल्यास बंगाल लवकरच दुसरें अफगाणिस्थान बनेल. यानंतर अस्पृश्यता-निवारणासंबंधाचा **चौथा ठराव** रा. ब. भीमभाई नाईक यांनीं मांडला. "अस्पृश्यांना सार्वजनिक शाळा व विहिरी यांचा उपयोग करण्याचा हक्क आहे, अस्पृश्यांना देवदर्शनास ज्या आडकाठ्या असतील त्या काढून टाकाव्यात, धोबी, न्हावी व पुरोहित यांनीं अस्पृश्यांमध्येहि आपापल्या धंद्याचीं कामें करावीं. अस्पृश्यांचे प्रतिनिधी कायदेमंडळांत व इतरत्र सरकारनें नेमण्याची पद्धत घातक असून ही पद्धत सरकारला बंद करण्यास भाग पाडावें व निवडणुकींत योग्य अस्पृश्य उमेदवार निवडून आणण्याची खटपट करावी" इ. गोष्टी ठरावांत नमूद केल्या होत्या. हा ठराव मंजूर झाल्यावर प्रत्येक गांवांत व शहरांत आखाडे व तालमी काढून लष्करी कवाईत व बंदुकीच्या निशाणबाजीचा अभ्यास यांची व्यवस्था करावी, असा **पांचवा ठराव** मंजूर झाल्यावर सकाळची बैठक तहकूब झाली.

### नेहरू रिपोर्टासंबंधाचा ठराव

सायंकाळीं ६ वाजतां पुनः अधिवेशनास सुरुवात

झाल्यावर डॉ. मुंजे यांनीं नेहरू रिपोर्टसंबंधाचा पुढील मसुद्याचा ठराव मांडला.

"नोकऱ्या, प्रातिनिधिक संस्था व कायदेकौन्सिलें यांच्यांत प्रतिनिधित्व इ. राज्यकारभाराच्या बाबतींत कोणत्याहि प्रकारे जातवारीचा शिरकाव करूं नये असें हिंदुमहासभेनें पूर्वीपासून सतत आपलें मत प्रदर्शित केलें आहे. तरीहि हिंदू व मुसलमान यांच्यांत सलोखा उत्पन्न करण्याच्या हेतूनें, नेहरू कमिटीच्या सर्वपक्षीय परिषदेनें दुरुस्त केलेल्या रिपोर्टांमधील मुसलमानांच्या मागण्यासंबंधांच्या सूचनांचा हिंदुसभेनें अनुकूलतेनें विचार केला असता; परंतु गेल्या मासाळांत दिल्लीस भरलेल्या मुसलमानी सर्वपक्षीय परिषदेनें नेहरू रिपोर्ट अमान्य केला म्हणून व जातवारी व राष्ट्रीयत्व यांचा मूलतःच विरोध आहे असें हिंदुसभा मानीत असल्यामुळें ती आपल्या पूर्वींच्या अस्सल राष्ट्रीय भूमिकेचाच पुनरुच्चार करीत आहे आणि जबलपूरच्या गेल्या अधिवेशनांतील ठरावामध्यें प्रथित केलेल्या तत्त्वाप्रमाणें राज्यघटना प्राप्त करून घेण्याची खटपट सर्व हिंदूंनी करावी अशी त्यांस महासभेची विनंति आहे. सद्यःपरिस्थिति लक्षांत घेऊन कांहीं थोडा फरक करून जबलपूरच्या ठरावांतील तत्त्वेंच पुनः या ठरावांत नमूद करण्यांत येत आहेत. तीं अशीं—(अ) प्रत्येक प्रांतांत सर्व जातींना मताधिकाराची कसोटी एकसारखीच असावी (आ) सर्व प्रातिनिधिक संस्थांच्या निवडणुकी मिश्र मतदार-संघांतूनच व्हाव्या (इ) कोणत्याहि प्रातिनिधिक संस्थेत अगर शैक्षणिक संस्थेत जातवारीच्या तत्त्वावर राखीव जागा नसाव्यात (ई) सर्व जातींच्या प्रतिनिधित्वाची कसोटी एकसारखीच असावी (उ) सरकारी नोकऱ्यांत जातवार विभागणी नसावी. सरकारी नोकऱ्या सर्व जातींना उघड चढाओढीच्या परीक्षेत गुण व लायकी सिद्ध करून मिळवितां याव्यात (ऊ) जरूर असेल तर व जेव्हां हिंदुस्थानांतील प्रांतांची पुनर्रचना करण्यांत येईल त्या वेळीं राज्यकारभार, आर्थिक व लष्करी सोयी यासारख्या सर्वत्र सारख्या लागू पडणाऱ्या दृष्टीनें विचार व्हावा. पण एखाद्या जातीला बहुमत मिळवून देण्याच्या हेतूनें कोणताहि नवा प्रांत बनवूं नये. सरहद्दप्रांत, बलुचिस्थान इ. भागांत शक्य तितक्या लवकर मुलकी, न्याय व अम्मलबजावणी इ. खात्यांची सुयंत्रित राज्यव्यवस्था सुरू करण्यांत यावी.

सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून वेगळा करण्याच्या बाबतींत हिंदुमहासभेचें असें म्हणणें आहे कीं, केवळ एका विशिष्ट जातीचें बहुमत असलेल्या प्रांतांची संख्या वाढविण्याच्या हेतूनें प्रांतिक पुनर्घटना करण्यानें हिंदुस्थानांत खऱ्या राष्ट्रीयत्वाची वाढ होण्यास प्रतिबंध होईल आणि हिंदु हिंदुस्थान व मुसलमानी हिंदुस्थान असे दोन विभाग पडतील. म्हणून ह्या प्रांतांतील दोनहि मुख्य जातींच्या संमतीखेरीज तो प्रांत वेगळा केल्यास ज्ञातिवैमनस्य वाढेल व त्या प्रांतांतच नव्हे तर इतर प्रांतांतहि हिंदू-मुसलमानांचें वितुष्ट वाढेल. सिंध प्रांत वेगळा केल्यानें त्या प्रांताचा खर्च वाढेल, प्रांताची आर्थिक व शैक्षणिक उन्नति होण्याचें थांबेल आणि मुंबई इलाख्यातील अधिक सुधारलेल्या भागाशीं जोडून असल्यानें सिंधी लोकांचे होणारे फायदे नष्ट होतील. यासाठीं सिंध प्रांत मुंबई इलाख्यांतून वेगळा काढूं नये. राज्यकारभारांतून जातवारीचें भूत शक्य तितक्या त्वरेनें काढून टाकणें हा हिंदुमहासभेचा मुख्य उद्देश असल्यामुळें मध्यवर्ती कायदेमंडळांत एक-तृतीयांश जागा मुसलमानांसाठीं राखून ठेवण्याची योजनाहि हिंदुमहासभेला मान्य होणें शक्य नाहीं."

याप्रमाणें डॉ. मुंजे यांनीं ठराव मांडल्यावर त्यांस भाई परमानंद यांनीं अनुमोदन दिलें.

यानंतर डेराइस्माइलखानाचे दासराम बागई यांनीं पुढीलप्रमाणें उपसूचना मांडली. "सरहद्द प्रांताच्या विशिष्ट भौगोलिक, आर्थिक व राजकीय परिस्थितीमुळें त्या प्रांतांत कोणत्याहि प्रकारच्या सुधारणा प्रचलित करणें व्यवहार्य व हितावह नाहीं, त्यायोगे सुयंत्रित राज्यकारभारांत व्यत्यय येईल व अखिल हिंदुस्थानाच्या हितसंबंधाचे दृष्टीनेंहि तसें करणें घातक ठरेल."

मुंबईचे डॉ. सुरतकर यांनीं या सूचनेस अनुमोदन दिलें डॉ मुंजे यांनीं सांगितलें कीं सरहद्द प्रांतांतील हिंदूंच्या अडचणी मला मान्य आहेत. पण मला ही उपसूचना मान्य करतां येत नाहीं. अखेर ही उपसूचना मतास घालतां मंजूर झाली व त्याप्रमाणें ठराव दुरुस्त करण्यांत आला. हिंदुसभेनें सर्वपक्षीय परिषदेत भाग घेतल्यावर नेहरू रिपोर्ट अमान्य करणें योग्य नाहीं, या मुद्द्यावर डॉ. चोवितराम व पं. हरिश्चंद्र वाजपेयी यांनीं ठरावास विरोध केला. श्री. वामनराव मुकादम यांनीं ठरावाचें जोरदार समर्थन केलें. डॉ. मुंजे यांनीं उत्तर देतांना सांगितलें कीं, जिनानीं नेहरू रिपोर्ट मान्य केला तर आपणहि तो ताबडतोब मान्य करूं.

यानंतर ठराव मतास घालण्यांत येऊन तो बहुमतानें मंजूर झाल्याचें अध्यक्षांनीं जाहीर केलें. मिरवणुकींतील वाद्यासंबंधानें, सार्वजनिक रस्त्यांवरून वाद्यासह मिरवणुकी नेणें हा सामान्यतः

प्रत्येक नागरिकाचा व विशेषतः धार्मिक दृष्ट्या हिंदूंचा हक्क आहे, अशा अर्थाचा **सातवा ठरावहि** मंजूर झाल्यावर रात्रीं ९॥ वाजतां त्या दिवसाची बैठक तहकूब झाली.

## दिवस तिसरा

सोमवार ता. १ रोजीं महासभेची बैठक होऊन पुढीलप्रमाणे ठराव मंजूर झाले. (८) हिंदुस्थानाबाहेरच्या सनातनी अगर बौद्ध अशा सर्व हिंदूंबद्दल व हिंदुस्थानांतील प्राचीन संस्कृतीपासून ज्यांच्या संस्कृती निर्माण झाल्या अशा सर्व लोकांबद्दल बंधुत्वाची भावना ही सभा व्यक्त करते. त्याचप्रमाणें सयाम कँबोडिया, जावा, बालीद्वीप, चीन, जपान यांच्याशी बंधुत्वाची सहकारिता होण्याचे उद्देशाने पूर्वीच्या संबंधाचें पुनरुज्जीवन करण्यात यावे. (९) येत्या कौन्सिलनिवडणुकीचे वेळी महासभेच्या वर्किंग कमिटीने हिंदुसभेच्या वतीनें जरूर त्या गोष्टी कराव्या. (१०) अफगाणिस्थानांतील बंडाळींमुळे जे हिंदू संकटांत सांपडले आहेत, त्यांच्याबद्दल सहानुभूति प्रदर्शित करून त्याना हिंदुस्थानांत आणण्याची सोय करण्याबद्दल सरकारास महासभा विनंति करीत आहे. (११) सरकारी नोकऱ्यांत मुसलमानांचा भरणा करण्याचा मुसलमान लोक सतत प्रयत्न करीत आहेत. विशेषतः ज्या प्रांतात मुसलमान अल्पसंख्य आहेत तेथेहि पोलीसखात्यांत प्रमाणाबाहेर त्यांच्या नेमणुका होत आहेत! त्याचप्रमाणें लष्करांतहि मुसलमानांना प्रमाणाबाहेर जागा मिळत आहेत! या गोष्टी लक्षांत घेऊन या खात्यांत हिंदूंचे प्रमाण वाढविण्याचा प्रयत्न करावा अशी महासभेची सरकारास विनंति आहे. (१२) महासभेच्या वर्किंग कमिटीची सध्याची घटना बदलून एक अध्यक्ष, एक कार्याध्यक्ष, दोन उपाध्यक्ष, दोन मंत्री, एक कोशाध्यक्ष व अकरा सभासद अशी वर्किंग कमिटी नेमणे. याप्रमाणें ठराव झाल्यावर रा. सा. दादूभाई देसाई यांनीं अध्यक्षाचे आभार मानले व डॉ. रायजी यांनीं त्यांस पुष्पहार समर्पण केल्यावर अध्यक्ष रामानंद चतर्जी यांनीं स्वागतमंडळाचे आभार मानले व अधिवेशन बरखास्त केलें.

## डॉ. मुंजे यांची मुलाखत

ता. ३१ रोजीं मंजूर झालेल्या नेहरू रिपोर्टासंबंधाच्या ठरावाबद्दल ता. १ रोजी डॉ. मुंजे यांनीं वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधीला मुलाखत दिली. त्यांत ते म्हणाले "मुसलमानांनी अगोदरच नेहरू रिपोर्ट चुटकीसरशी अमान्य केला. याच कारणासाठीं हिंदुमहासभेने संपूर्ण नेहरू रिपोर्टाचा अजून विचार केलेला नाही. फक्त हिंदूमुसलमानांसंबंधाच्या ज्या सूचना नेहरू रिपोर्टामध्यें केलेल्या आहेत तेवढ्यापुरताच हिंदुमहासभेनें विचार केला. पण लखनौच्या सर्व-पक्षीय परिषदेंत ठरलेली योजना मुसलमान समाजाने अमान्य केल्यामुळे आपल्या पूर्वीच्या शुद्ध राष्ट्रीय भूमिकेवर येऊन पुनः उभे राहणे हिंदुसभेस अपरिहार्य झाले. नेहरू रिपोर्टांत नमूद झालेले मत हे हिंदूंचे मत नसून त्यांनी ते केवळ तडजोडीकरितां मान्य केले आहे. मुसलमानांनी ही तडजोड मान्य केली असती तर हिंदुमहासभेने नेहरू रिपोर्टास खात्रीने पाठिंबा दिला असता. ही गोष्ट मी कालच्या ठरावावर बोलतांना स्पष्ट केली आहे. सारांश, नेहरू रिपोर्टापुरते बोलावयाचें झाल्यास या प्रश्नाचा निर्णय करणे आतां सर्वस्वी आमच्या मुसलमान बंधूंवर अवलंबून आहे. मुसलमानांनी आपली संकुचित ज्ञातिपरायणता सोडून दिली व नेहरू रिपोर्ट मान्य केला तर हिंदुसभाहि नेहरू रिपोर्ट स्वीकारील."

१९२९–३० सालाकरितां हिंदुमहासभेच्या वर्किंग कमिटीची रचना पुढीलप्रमाणे करण्यांत आली आहे. श्री. रामानंद चतर्जी अध्यक्ष, डॉ. मुंजे कार्याध्यक्ष, पं. मदन मोहन मालवीय व श्री. न. चिं. केळकर उपाध्यक्ष, पं. देवरत्न शर्मा मुख्य मंत्री, पद्मराज जैन मंत्री, श्री. जुगलकिशोरजी व श्री. बिरला कोशाध्यक्ष. याशिवाय भाई परमानंद, श्री. जयकर, डॉ. चोइतराम, श्रीयुत गणेश दामोदर सावरकर इ. अकरा सभासद.

# दिल्लीचें बातमीपत्र

नवी दिल्ली ता. १२-४-२९

[ ११ ]

गेल्या आठवड्यांत असेब्लीच्या कामाला अवघीं दोन शेंडेफळें राहिलीं होतीं. एक ट्रेड डिस्प्यूटस बिल व दुसरें पब्लिक सेफ्टी बिल. पैकीं एक बिल, गेल्या सोमवारपर्यंत चर्चेची लांबण लागून, कसेंबसें पार पडलें. या बिलाची चर्चा एकंदर ५ दिवस सुरू होती. वास्तविक इतकी लांबण लागण्याचें कारण नव्हतें. व शेवटीं एकहि उपसूचना मंजूर न होतां तें सिलेक्ट कमिटीकडून जसें आलें तसेंच असेंब्लींतून शीरसलामत बाहेर पडलें ! मुख्य वाद १५, १६ व १७ या तीन कलमांवरच झाला. मजुरांनीं नोटीस दिल्याशिवाय संप करावा कीं नाहीं? एका धंद्यांतील मजुरांनीं दुसऱ्या धंद्यांतील लोकांना मदत म्हणून संप करावा की नाहीं ! हेच मुद्दे विशेष वादग्रस्त होते व सरकारनें ते जिंकले. सिलेक्ट कमिटींत एक प्रकारचा तह किंवा करार ठरला होता. म्हणून मजुरांतर्फे दिवाण चमनलाल यांनीं आणलेल्या उपसूचना जशा फुकट गेल्या तशा मालकांतर्फे फाझल इब्राहीम व कर्नल क्राफर्ड यांनीं आणलेल्या सूचनाहि फेटाळल्या गेल्या. गेल्या मंगळवारीं हें बिल स्टेट कौन्सिलाकडे पाठविण्यांत आलें व तिकडून तें जसेंच्या तसें मंजूर झालें हें सांगावयास नकोच.

***

उरतां उरलें पब्लिक सेफ्टी बिल. याच्या जन्माला कोणती वेळ लागली होती कळत नाहीं ! कारण त्याच्या पायगुणानें सर्वच पक्षांची खराबी झाली. आग्रही स्वभावाबद्दल सरकारची बेअब्रू वाढली. बिल महत्त्वाचें असतां त्यालाहि तोंड देण्याला खासगी सभासदांची भरपूर संख्या हजर राहत नाहीं असा त्यांचा दुर्लौकिक प्रकट झाला. आणि आधणाच्या पाण्यांत नसता हात घालून भाजल्यामुळें तो तोंडांत घालून बोट चोखीत बसण्याची पाळी अध्यक्ष पटेल यांजवर आली. शिवाय या बिलाच्या निमित्तानें, असेंब्लींत बॉंब पडून एक नसतें नवंच विघ्न उत्पन्न झालें ही गोष्ट निराळीच. सिमला येथे गेल्या सप्टेंबरांत हें बिल पुढें आलें तेव्हां त्यावर अखेरच्या मजलेवरील मतमोजणींत सारखीं मतें पडल्यानें व अध्यक्ष पटेल यांनीं आपलें मत विरुद्ध दिल्यानें बिल नामंजूर झालें. पण पुनः दिल्ली येथील चालू बैठकींत तें लवकरच सरकारनें पुढें आणलें व सिलेक्ट कमिटीकडूनहि ताबडतोब परत आलें. पण त्याचा विचार करण्याचें काम सरकारनें दिरंगाईवर टाकलें. हेतु हा कीं, लोकपक्षाचे सभासद कमी होतील, सायमन कमिटीवरील सभासद येऊन आपलें बळ वाढेल, आणि मग स्पष्ट बहुमत करून अध्यक्ष पटेल व लोकपक्ष यावर एकदम मात करूं. याप्रमाणें बिल तारीख २८ मार्च रोजीं पुढें आलें. पण दरम्यान बिलाला मीरत येथील कटाच्या खटल्याचें गंडांतर उत्पन्न झालें व त्यांतूनच पुढील सर्व गोंधळ निर्माण झाला.

***

तारीख २ एप्रिल रोजीं जयकर यांच्या भाषणामुळें या खटल्याच्या आधारावर या बिलाची चर्चा करतां येणार नाहीं अशी शंका अध्यक्षांनीं प्रदर्शित केली. तारीख ३ रोजीं होम मेंबर यांनीं सांगितलें कीं, "सरकार बिल परत घेण्याला तयार नाहीं." व चर्चा तहकूब करण्याचा अध्यक्षांना अधिकार नाहीं." त्यावर पटेल यांनीं पुढाऱ्यांचीं मतें विचारलीं. त्यांत ठरल्याप्रमाणें मतभेद झाला. तेव्हां आपला निर्णय सांगण्याकरितां वेळ मागून घेऊन हें बिल त्यांनीं बाजूला सारलें व ट्रेड डिस्प्यूटस बिल पुढें ओढलें. त्याची चर्चा संपेपर्यंत जो वेळ मिळाला त्यांत उभय पक्षांनीं युद्धाकरितां कंबर कसली. अध्यक्ष पटेल हे प्रतिकूल निकाल देऊन बिलाची चर्चा हाणून पाडणार असा सरकारचा कयास असल्यामुळें ते घडून येतांच अध्यक्षावर निंदाव्यंजक ठराव सरकार मांडणार अशी बोलवा सुरू झाली. उलट बाजूचे लोक म्हणूं लागले की " आपला निर्णय देतांच पटेल यांनीं

असेंब्ली दिल्लीपुरती एकदम बरखास्त केली तर सरकार काय करणार ! " पण अध्यक्षांना असा अधिकार आहे कां नाहीं याविषयीं शंका येई. शिवाय ट्रेड डिस्प्यूटस बिल एखादें कलम किंचित बदलून परत असेंब्लीकडे आलें तर त्याचा निकाल करण्यापुरती बैठक लांबविलीच पाहिजे हें उघड होते.

***

अशा स्थितींत ट्रेड डिस्प्यूटस बिला-वरील चर्चेने निवळ कालहरण सुरू झालें. व कोणास कांहींच करतां येईना. पटेल म्हणत " मी प्रतिकूल निकाल दिला तर सरकार कोणतें काम पुढें आणणार हें त्यांनी आधीं सांगावें. " त्यावर सरकार म्हणे कीं " आधीं निर्णय द्या, मग काय असेल तें पाहूं. " दरम्यान पटेल व व्हाइसरॉय यांची गांठ एकदां पडली. पण तींत तडजोड कांहींच न निघतां, उलट प्रकरण विकोपालाच गेलें म्हणतात ! अशा रीतीनें या अटीतटीच्या सामन्याचा मुहूर्त म्हणून, ट्रेड डिस्प्यूटस बिलाच्या निकालाची घटका पाण्यांत पडली होती. अखेर सोमवारीं दोनप्रहरीं बिलाचा निकाल होणार हें निश्चित असल्यामुळें हा सामना पाहाण्याला प्रेक्ष-कांच्या व इतर गॅलरींतून बेसुमार गर्दी जमली होती. आणि १२-३० वाजतां पहिल्या बिलाचा निकाल जाहीर करून, लिहून आणलेल्या निर्णयाचे कागद हातांत घेऊन अध्यक्ष पटेल उभे राहिले, व 'आता पब्लिक सेफ्टी बिलाचा निर्णय' इतकेच शब्द त्यांनीं उच्चारले. पण ते तेथेच संपले! त्याचा प्रकार असा.

***

सभागृहांत या दिवशीं सुमारें ५०० माणसें होतीं. त्यांपैकीं ४९९ चे मिळन ९९८ डोळे या क्षणीं पटेल यांचेकडे लागले होते, व त्या क्षणापुरते हे सर्व लोक आपलें अस्तित्वहि विसरून गेले असें म्हणण्याइतकी एकाग्रता झाली होती. पण ती एकदम अशा अकल्पित रीतीनें भंग पावली कीं, त्यामुळें नाटकांतील ट्रॅन्सफर सीनप्रमाणें जागच्या जागीं सभागृहाच्या ऐवजीं रणक्षेत्र निर्माण झालें ! व सर्वांच्या मनाला एक जबर धक्का बसला. याचें कारण असें कीं, ध्यानीं मनीं नसतां ' सेफ्टी बिल ' या शब्दांच्या उच्चाराबरोबर तोफेचा गोळा सुटल्यासारखा एक मोठा आवाज झाला. पुरुषभर उंचीची एक ज्वाळा निघाली व लोकांचे डोळे क्षणभर मिटले गेले. रात्रीच्या वेळेस फोटो काढावयाचा असतां फोटो-ग्राफर एका उच्च काठीवर स्फोटक द्रव्य पेटवून विजेची चमक निर्माण करतो तेव्हां हा सर्व प्रकार आधीं पूर्ण माहीत असून लोक त्याकडे पाहात असतात, तरीदेखील तो प्रकाश एकदम चमकून गेला म्हणजे डोळयाला अंधेरीच येते. मग आधीं कांहींच वार्ता किंवा अदमास नसतां, एकाग्र व शांततामय अशा सभागृहांत अध्यक्षांच्या तोंडून गंभीर शब्द बाहेर पडत असतां, एकदम तोफे-सारखा आवाज झाला तर डोळे कसे मिटले असतील व मन कसें आश्चर्यचकित झालें असेल याची कल्पना कोणीहि करावी. आवाज होतांच एकदम धुराचा लोळ उठला. त्यानें सभागृह भरून गेलें. शेजाऱ्याला शेजारी दिसेना. पण आवाज व धूर यांच्यामुळें बॉम्बगोळा फेकला असावा अशीच कल्पना सर्वांना आली. पण तो कोणी कोठून फेकला किंवा जमिनींतूनच वर उडाला याची मात्र कल्पना होईना !

***

खाली सभागृहांत व वर गॅलऱ्यांतून गलबल व धांवपळ सुरू झाली. प्रेक्षकांच्या गॅलरींतील स्त्रिया ओरडूं लागल्या. ज्याला जी वाट सांपडेल त्या वाटेने तो बाहेर पडूं लागला. इतक्यांत धूर किंचित् बसला, यामुळे सभागृहांतील व गॅलरींतीलहि माणसें एकमेकांना दिसूं लागलीं. तेव्हां बॉंब फेकला तो कोणी तरी वरूनच फेकला या कल्पनेनें सभासदांची दृष्टि वर गेली तो अध्यक्षांच्या बरोबर समोर असलेल्या दक्षिणेकडील गॅलरींत दोन माणसें उभीं आहेत व त्यांतील एक मनुष्य दुसरा एक बॉंब हातांत घेऊन तो उंच करून जोरानें फेकीत आहे असें दिसलें. व तोहि एक निमिषांत खालीं येऊन पडून फुटला. पण त्याचा धूर पहिल्याइतका झाला नाहीं. या मनुष्याला प्रतिबंध करण्याला कोणी पुढें सरसावला तर नाहींच, पण खालून कोणी हां हां म्हणण्याला देखील वेळ नव्हता. खालचे लोक वर हात करून, " तो पाहा, तो पाहा, त्याला पकडा " असें म्हणत असतां त्यानें हातांतील तांबड्या रंगाचीं छापील हस्तपत्रकें खाली सभागृहांत फेकलीं व हातांत पिस्तूल घेऊन तें सरकारी सभासदांवर रोखून त्यानें दोनतीन आवाजहि काढले. त्यांतून गोळ्या बाहेर पडल्या असतील, पण त्या भलतीकडे लागल्या एवढें मात्र खचित; कारण हे गोळी भरलेले बार नीट उडाले असते तर दोनचार मनुष्यें तरी सहज जखमी झालीं असतीं किंवा मेलीं असतीं. इतकें होत आहे तों गॅलरीतील पोलीस शिपाई पुढें झाला; पण भीतभीतच सरसावला. तथापि त्याला भीतीचें कांहींच कारण उरलें नव्हतें. या गृहस्थानें पिस्तूल खिशांत घातलें, दुसऱ्या हातांतली साहेबी टोपी डोक्यावर घातली व पोलिसाच्या स्वाधीन होण्याकरितां तो स्वस्थ जागच्या जागीं उभा राहिला! त्यानें पाऊल किंवा मानहि हलविली नाहीं. यामुळें त्याला

पकडण्याला कांहींच त्रास पडला नाहीं. व स्नेह्याने स्नेह्याच्या कंबरेभोंवतीं हात घालून चालावें त्याप्रमाणें शिपाई व तो दोघेहि गॅलरीतून जिन्याकडे वळले. सर्व प्रकारापैकीं खालून प्रेक्षकांना प्रत्यक्ष दिसला तो वर वर्णिलेला हा इतकाच.पण तोंच इतका अद्भुत होता कीं, माझ्याच इतरत्र लिहिलेल्या शब्दांनीं त्याविषयी मला असे म्हणावेसें वाटतें की "भविष्यानें जर वर्तमानावरच आसन मांडले, उपमान हेच जर उपमेय होऊन बसले, किंवा स्वतः यजमानच जर बारानिशी लिहूं लागले तर मग अद्भुत कल्पनेला थारा कोठे मिळणार !" मागील बातमीपत्रांत मी कल्पनेची म्हणून बॉंबची उपमा दिली तीच प्रत्यक्ष अनुभवाला यावी हें आश्चर्य नव्हे काय?

***

अशा रीतीनें सुमारें चारदोन मिनिटांत हा सगळा प्रकार ओसरल्यावर सभागृहांत उरलेले सभासद भानावर येऊन, आपण कोठे आहो व कोठें काय घडले हे चोहोंकडे दृष्टि फिरवून पाहूं लागले. गॅलरींतील प्रेक्षक आर्धाच वाट फुटली तसे बहुतेक पळून गेले होते. झालेल्या प्रकारानें ते तर बिचारे घाबरलेच. पण वरती पोलीस कोणाला पकडील काय सांगावे ही भीति ! यामुळे पळाले त्यांपैकीं पुष्कळांना आपल्या टोप्या, छत्र्या, काठ्या यांचीहि शुद्ध राहिली नाहीं ! खालच्या सभासदाचा घोळका आतां सरकारी बांकांकडे वळला. व प्रथम कोठे काय झालें व नंतर कोणाला काय लागले याची चौकशी सुरू झाली. पहिला व दुसरा बॉंब दोनाहि एकाच रोखानें फेकण्यांत आले होते. ते सरकारी बांकांच्या दुसऱ्या व तिसऱ्या ओळीच्या दरम्यान जवळ जवळ पडले. पैकीं एक लांकडी पायवाटेवर पडला. तेथें सुमारें फूट दोन फूट खोलीचा चौरस खड्डा पडला होता. व दुसरा बॉंब प्रथम एका बाकाच्या टोकावर व तेथून सभासदाने पाय ठेवण्याच्या फळीवर पडून त्याचीं शकलें उडालीं. दोनही आघातामुळें लांकडाचे लहानमोठे तुकडे चोहोंकडे जोरानें उडाले. तसेच बैठकीच्या गाद्यांवरील मेणकापडाचे व कापसाचे पुंजके चोहोंकडे पसरले होते. बॉंबमध्यें बहुधा कसलेंहि ॲसिड नव्हते असें वाटतें. त्यांत फक्त उखळीबाराची दारूच असावी. कारण चोहोंकडे पांढऱ्या राखेसारखा पदार्थ बाकांवरून पसरला होतो. बॉंबगोळ्यांत खिळे किंवा बारीक लोखंडी छरे वगैरे नव्हते. ते असते तर सहज १०–२० माणसे जखमी झाली असतीं. सकृद्दर्शनीं कोणीच मनुष्य जखमी झालेला दिसला नाहीं. यावरून वाटले कीं, इजा करण्यापेक्षां भीति दाखविण्याचाच बॉंब फेकणाराचा उद्देश असावा. पण ही अटकळ मागाहून खोटी ठरली. कारण बॉंबमध्ये लोखंडाचे जाड तुकडे होते. पण आघाताच्या नियमाप्रमाणें ते जवळ न पडतां दूरवर उडाले ते मागाहून हळुहळू उमगूं लागले.

***

एकंदर सुमारें पांचसहा मनुष्यांना जखमा झाल्या. परंतु त्यांतील सर्वांत मोठी जखम पार्शी सरकारी सभासद सर बमनजी दलाल यांना माडीवर झाली. पहिल्या झटक्यासरसे ते बेशुद्ध झाले. पण त्यांना धरून बाहेर नेल्यावर व उपचार केल्यावर ते शुद्धीवर आले. व लगेच त्यांना इस्पितळाकडे पाठविण्यात आलें. रेलवे खात्याचे फायनॅन्स कमिशनर राव यांच्या नाकाला एका लांकडी तुकड्याने ओझरती जखम झाली. बजेट ऑफिसर शंकरराव यांच्या पायांत एक लहानशी ढलपी घुसली.तसेंच सरकारी गॅलरीतील एका अधिकाऱ्याला व प्रेक्षकांपैकीं एका स्त्रीला लहानशी जखम झाली.आणखीहि एकदोघांना अशाच जखमा झाल्या असाव्या. कारण मोठ्या जिन्यावरून खालीं उतरल्यावर नोटीस रूमकडे जातांना रक्ताचे थेंब सांडत गेले होते असे आढळलें. खुद्द बॉंब फेकणाराच्या हातातून रक्त निघाले होते असे म्हणतात. पण ते खरे असल्यास कशाने हे समजत नाहीं. सर जॉर्ज शुस्टर यांच्या बाहींतून एखादा तुकडा दंडांत गेला असावा असे दिसले. पण त्यांची ती लहानशी जखम दुसऱ्यांनीं दाखवून देईपर्यंत उमगली नव्हती. हा गोंधळ संपण्याचे सुमारास अध्यक्ष पटेल उठून आपल्या खोलीत गेले. व अशा रीतीने अध्यक्षांनीं तहकुबी जाहीर न करता ही सभा बरखास्त झाली! फिरून सुमारें १५ मिनिटांनीं ते बाहेर आले. आणि सभासद जागेवर बसतात न बसतात तोंच "गुरुवारपर्यंत सभा तहकूब ठेविली आहे" इतकेंच जाहीर करून ते फिरून आपल्या खोलींत गेले. या सुमाराला सगळ्या सभागृहाला पोलिसांचा वेढा पडला. सभागृहाची आंतून बारकाईनें तपासणी सुरू झाली व बाहेरचे दरवाजे बंद करून घेऊन फक्त एका दरवाजानें नीट पाहून तपासून माणसे बाहेर सोडावी असा हुकूम झाला.

***

हे काम होईपर्यंत सुमारें एक तास लागला. तोंपर्यंत ठिकठिकाणीं सभासदांचे घोळके जमून, झाल्या प्रकाराची चर्चा होत होती.पण एका ठिकाणी मात्र विशेष गर्दी होत होती. ती म्हटली म्हणजे असेंब्लींतील तार ऑफिसांत. सुमारें अर्ध्या तासांत दोनतीनशें तारा लिहून त्या पाठविण्याकरितां देण्यांत आल्या. त्यांतल्या पुष्कळशा सभासदांनीं आपाप-

त्या गांवीं खुशाली कळविण्याकरितां पाठविल्या होत्या. खुद्द सरकारची सुमारे १००० रुपयांची तार विलायतेस ताबडतोब रवाना झाला व बाकीच्या पैकीं कांहीं तारा सेन्सॉर यांनीं पाहून पाठविण्याकरितां अटकावून धरण्यांत आल्या. रूटरच्या बातमीदाराने विलायतेस पाठविलेली तार तीन वाजण्यापूर्वींच तिकडे पोंचून, तेथील वर्तमान पत्रांतून ती प्रसिद्धहि झाली असावी. कारण ५ वाजण्याचे सुमारासच 'लंडन ईव्हिनिंग स्टँडर्ड' पत्राला सविस्तर बातमी पाठविण्याविषयींची तार लंडनहून विष्णुपंत करंदाकर यांनी केलेली केळकर यांना त्यांच्या बगल्यावर सवापाच वाजण्याचे सुमारास पोंचली ! [ केसरीच्या बातमीदाराने केसरीकडे पाठविलेली तार रात्रीं ८ ला पोंचली म्हणून छापण्याचें सुरू झालेले काम थांबवून व नवा स्टीरिओ करून ही बातमी स्टॉप प्रेसमधून छापावी लागली ! —सं. के. ]

***

बॉंब फेकणाऱ्या दोघां इसमांना पोलिसांनीं धरून निरनिराळया दोन ठिकाणीं नेलें तेथें त्यांच्या जबान्या घेण्यांत आल्या. त्यांत स्वतः त्यांनींच सांगितल्यावरून एकाचे नांव भगतसिंग व दुसऱ्याचे नांव बटुकेश्वर दत्त असल्याचें समजले. पहिले गृहस्थ लाहोरकडील असून, २२ वर्षांपूर्वी लाला लजपतराय यांच्या-बरोबर हद्दपार केलेले जे अजितसिंग यांचे ते पुतणे आहेत. दुसरे गृहस्थ बंगाली असून ते कानपुराहून येथें आले होते असे कळते. दोघांनीहि कबुली जबाब दिला. पण "सविस्तर कैफीयत न्याय-कोर्टापुढे देऊं" असें सांगितले. भगतसिंग हे कोठल्या तरी एका नॅशनल युनिव्हर्सिटीचे पदवीधर आहेत असें म्हणतात. यांच्या कबुली जबाबांतून आणखी किती कोणत्या गुन्ह्यांची उग्राणी होणार आहे ते न कळे. पण लजपतराय यांच्यावर हल्ला करण्यावरून सॉंडर्स यांचा जो खून झाला त्यांतील गुन्हेगार अद्यापि न सांपडल्यामुळे, न शोध लागलेल्या या गुन्ह्याचें कलमहि प्रस्तुतच्या गुन्ह्यांतूनच उगवून घेतलें गेल्यास त्यांत आश्चर्य नाही. सुतकात सुतक फेडून घ्यावें त्याप्रमाणे या दोघांवर त्या खुनाचाहि आरोपहि कदाचित् ठेवला जाईल. असेंब्लींत मात्र प्रत्यक्ष खून पडले नाहींत इतकीच ईश्वराची खैर झाली कारण शोधांती असें कळलें की भगतसिंग याचे जवळ एकच नव्हे तर दोन पिस्तुले होतीं. पहिल्या पिस्तुलांतील दोन गोळ्या उडल्या. पैकीं एक छताला व दुसरी सरकारी चष्म्यांतील खांबाला लागली. पण या दोन गोळ्या उडतांच पिस्तुलाचा घोडा घट्ट बसला त्यामुळें आणखी बार होईनात तेव्हां ते त्याने टाकून दिलें व दुसरें काढून घेणार तोंच त्याला पकडण्यांत आलें. एकंदर सोळा काडतुसे त्याजवळ होती. यावरून केवढा अनर्थ होण्याचा संभव होता याची कल्पना करतां येईल.

***

असो. ठरल्याप्रमाणें गुरुवारी असेंब्लीची सभा झाली. पुष्कळ सभासद गांवीं गेल्यामुळें स्वराज्य पक्षाच्या बाकांवर शुकशुकाट दिसत होता. प्रथम अध्यक्ष पटेल यांनीं सोमवारीं घडलेल्या प्रकारा-संबधानें खेद व निषेधदर्शक ठराव मांडला व तो बिन-बोलतां मंजूर झाला. त्यावर भाषणे अशीं कोणाचींच झाली नाहींत. नंतर त्यांनी पब्लिक सेफ्टी बिला-संबंधानें आपला लेखी निकाल वाचून दाखविला. त्यांत आपलें पूर्वींचेंच म्हणणे प्रस्थापित करून उलट बाजूचे सर्व मुद्दे खोडून काढले होते. अशा रीतीनें या बिलाला या बैठकीपुरती तरी मूठमाती दिली. नंतर व्हाइसरॉयसाहेबांकडून आलेला संदेश वाचून दाखवून त्यांनी सभा शुक्रवारपर्यंत तहकूब केली. या सर्व कामाला सुमारे अर्धा तासच लागला. या संदेशांत व्हाइसरॉयसाहेबांनीं असें लिहिले होते कीं "मी स्वतः उद्यां येऊन असेंब्लीच्या सभासदांना उद्देशून भाषण करणार आहे. तरी सर्वांनी यावें." या संदेशामुळे पुनः कल्पनेला अवसर मिळाला व अनेक तर्कवितर्क सुरू झाले.

***

शुक्रवारीं लॉर्ड आयर्विन यांनीं येऊन उभय कायदेमंडळांच्या सभासदांना उद्देशून भाषण केले, त्यांत प्रथम सोमवारच्या अत्याचारावर धर्मो-पदेशकाप्रमाणे ठराविक प्रवचन केलें. नंतर प. से. बिलासंबंधीं अध्यक्षांच्या निकालाविषयीं आपला मतभेद प्रगट करून लॉर्डसाहेबानी दोन गोष्टी जाहीर केल्या. पहिली अशी कीं, ज्या नियमाच्या अभावामुळे अध्यक्षाना असा निकाल देतां आला तो आम्ही बदलून घेणार व प. से. बिलाऐवजी ऑर्डिनन्स काढणार. असे घडणार ही बोलवा होतीच. असो. शेवटीं अध्यक्षांनी लॉर्ड आयर्विन यांना पोंचवून परत आल्यावर असेंब्ली बिन-मुदतीने तहकूब केली असें जाहीर केले.

***

अशा रीतीने यंदाची दिल्लीची बैठक संपली. इतकी असमाधानकारक, लांबलेली, कंटाळवाणी बैठक पूर्वी झाली नव्हती. करावयाचे काम कमी, लोकनियुक्त सभासदांचा तुटवडा, व यशाची निराशा इत्यादि कारणांनीं बैठक केव्हां संपेल असें झालें होतें. पण ता. २८ मार्चपासून पटेल यांनीं प. से. बिलाच्या पायांत खोडा घातल्यापासून एक

प्रकारची नवी ईर्षा उत्पन्न झाली होती. अध्यक्ष व सरकार याचे पेंचावर पेंच सुरू होते. 'आधीं बोलेल तो दोन खाईल, मग बोलेल तो तीन खाईल' अशी पैज पडल्यासारखी झाली होती. त्यामुळे ट्रेड डिस्प्यूट बिलाची चर्चा उभय पक्षांनी लांबविली. व ती संपल्यावर तरी काय होणार याविषयीं मनाला चिंतेचा फार ताण पडला. मुख्य चिंता पटेल यांच्यावर सरकार पक्ष निंदा-व्यंजक ठराव आणणार कीं काय याविषयीं होती. म्हणून बरेच लोक गांवीं जाण्याचे थांबले. पण शेवटीं सोमवारपासून लोक जाऊं लागले. रोज नवें प्रस्थान ठेवावें व तें उचलून परत घ्यावें, सामान बांधावें व सोडावें, रेलवेकडे जागा राखून ठेवण्याला सांगावें व लगेच उलट निरोप पाठवावा लागल्यानें फजीत होऊन मूर्ख ठरावें, आपल्या गांवीं कार्यक्रम ठरवावे व लगेच मोडावे आणि एकेका दिवसात उलटसुलट तीन तीन तारा कराव्या असें होऊं लागलें. अखेर गुरुवारीं पटेल यांच्या निकालानें बिल आणि शुक्रवारीं व्हाइसरॉयसाहेबांच्या भाषणानें असेंब्लीची बैठक निकालांत निघून सभासदांना एकदाची मोकळीक मिळाली. दिल्लीस उन्हाळा मार्चअखेरपासूनच होऊं लागला होता. पण सुदैवानें गेले दहा दिवस आभाळ येऊन मधून मधून थोडा पाऊसहि पडला, यामुळे उष्मा थोडा कमी होता. वर आभाळ कुंद तसेंच सभासदांचे मन कुंद, वर ढगाचा कडकडाट तसाच असेंब्लीच्या कामांत खटके, आणि वर विजेची चमक तर असेंब्लींत बॉंबची ज्वाळा, अशा रीतीनें भौतिक व मानसिक वातावरणाची स्पर्धा सुरू होती!

# क्रांतिकारकांचें विश्वरूप-दर्शन

## ( ले० असेंब्लींत पडलेला बॉंब ! )

ता. २० मार्च रोजीं पहाटे सर्व देशभर एकदम धरपकडी करून, झडत्या घेऊन, व एका नवीन राष्ट्रीय संकटाची दुःखद पण अद्भुत कल्पना रंगवून सरकारनें जगाला आश्चर्यचकित केलें. त्याच्याच तोडीचा, किंवा त्याहून थोडा अधिक अद्भुत असा पण दुःखदच, प्रकार ता.८ एप्रिल रोजीं दुपारीं साडे-बारा वाजता दिल्ली येथील वरिष्ठ कायदेमंडळाच्या सभागृहात दोघां क्रांतिकारक हिंदी तरुणांनीं केला. या प्रकाराचें सविस्तर वर्णन बाजूस दिलेल्या दिल्लीच्या नेहमीच्या बातमीपत्रात आलेलेंच आहे. पण या दुसऱ्या प्रकाराचा अद्भुतपणा शब्दांनीं कोणी कितीहि वर्णिला तरी शिल्लकच उरतो. अर्थात त्याची कल्पना फक्त मनानेंच करावी लागते. वरील दोन प्रकारांची तुलना करून एकापेक्षां दुसरा अधिक अद्भुत असें आम्हीं म्हटलें याचें कारण असें. राजद्रोहाचे खटले, कटाचे खटले, त्यांच्या अनुषंगानें होणारी धरपकड व झडत्या या गोष्टी तीसपंचतीस वर्षांपूर्वीं आपणाला अपरिचित होत्या. परंतु त्याच अलीकडे इतक्या अतिपरिचयाच्या झाल्या आहेत कीं, भारत राजकीय रणक्षेत्राकडची ताजी बातमी रोज सांगणाऱ्या संजयाला त्याची कथा सांगून समाजरूपी आंधळ्या धृतराष्ट्राची झोपहि मोडतां येत नाहींशी झाली आहे मग त्याच्या शरीरावर रोमहर्षण होणें हें तर दूरच! राजद्रोहाच्या खटल्यास सरकारनें व लोकांनींहि जणुं काय परसांतील भाजी बनविलें आहे. अलीकडे असा एकहि दिवस बहुधा जात नाहीं, कीं वर्तमानपत्रांत कोठल्या तरी एखाद्या राजद्रोहाच्या खटल्याची वार्ता कानावर येत नाहीं पण भारत हें जसें 'प्रतिपर्व-रसोदय' झालें तसेंच हिंदुस्थानांतील राजकारणहि होऊं पाहत आहे. तें असें कीं, केवळ राजकीय असंतोषाच्या पुढें मजल मारून असंतोषाचें भावनात्मक स्वरूप जाऊन, त्याला क्रांतिकारक कृतीचें स्वरूप येऊं लागलें आहे. आणि ही गोष्ट जशी मीरत येथें उपस्थित झालेल्या क्रांतिकारक कटाच्या खटल्यानें सरकारनें सिद्ध केली, तशीच ती असेंब्लीच्या सभागृहांत पडलेल्या बॉंबगोळ्यानेंहि सिद्ध केली.

तथापि या दोहोंच्या अद्भुतपणांत फरक आहे तो असा. राजद्रोहाच्या किंवा तद्विषयक कटांच्याहि खटल्यात, सरकार आणि त्यांचे प्रतिपक्षीय हेच अनुयोगी प्रतियोगी स्वरूपाचे असले तरी, खटला परस्पर एखाद्या न्यायासनापुढें चाललेला असतो. आणि खुद्द सरकार, खुद्द जनता, आणि राजकीय असंतोष प्रगट करणारे कृती हे तिथे तीन ठिकाणीं विखुरलेले असतात. पण असेंब्लींत घडलेल्या प्रकारांत हे तिघे एकत्र आलेले होते! एकाच इमारतींत तळमजल्यावर एका अंगच्या आसनांवर बसलेले मुख्य सरकारी प्रधानमंडळ, त्यांच्यासमोर डोळ्याला डोळा भिडवून बसलेले स्वराज्यवादी राष्ट्रीय प्रतिनिधी, या दोहोंच्या दरम्यान व त्यांचा सांधा जोडून बसलेले तटस्थ किंवा स्वराज्यविरोधी असे युरोपियन व मुसलमान सभासद, या सर्वांची

मनोवृत्ति एकीकृत करून त्यांचें नियमन करण्याला उच्चासनावर बसलेले अध्यक्ष, आणि दुसऱ्या मजल्यावर त्यांच्याच थेट समोर उभे राहून सभागृहांत सरकारी आसनावर प्रथम बॉंबगोळे व त्यांच्या मागोमाग हस्तपत्रकें फेकणारे आणि पिस्तूल परजणारे क्रांतिकारक असा योग असेंब्लीमधील अत्याचारांत घडून आला! बॉंबगोळ्यांचीं वर्णनें वाचणें वेगळें आणि बॉंबगोळे प्रत्यक्ष फेकलेले पाहणें वेगळें. सरकारी होम मेंबर आणि क्रांतिकारक व्यक्ति या कल्पनेने एकमेकांना ओळखीत असतात. परंतु त्यांचे परस्पर प्रत्यक्ष दर्शन घडत नाहीं. युरोप-अमेरिका खंडांत, जेथ स्वातंत्र्य आधींच नांदत असतां ते पुरेसें न होऊन क्रांति किंवा परिणति यांची पुढची मजल गांठण्याकरितां मुक्तकंठानें व मुक्तहस्तानें राजकीय चळवळ चालू शकते, अशा ठिकाणीं असले अद्भुत देखावे पुष्कळदां पाहावयाला सांपडतात. अशा राष्ट्रांतील पार्लमेंटामधून प्रेक्षकांच्या गॅलरींतले लोकच काय, पण स्वतः नामदार सभासदहि क्वचित् प्रसंगीं परस्परांशीं गुद्दागुद्दी करतात, एकमेकांवर पुस्तकें फेकतात, व पिस्तुलें झाडतात अशा गोष्टी ऐकिवांत आहेत. ती वेळ आपल्या निःशस्त्र व परतंत्र देशांत सुदैवानें अद्यापि आलेली नाहीं, व ईश्वरकृपेने ती पुढेहि कधीं न येवो. परंतु त्याच्या अलीकडचा प्रकार, म्हणजे सरकार पक्ष व लोकपक्ष परस्परांशी निदान व्यक्तिशः सौजन्यानें वागत असतां, त्याहून अधिक तीक्ष्ण भावना असलेले तापट डोक्याचे लोक प्रेक्षकांच्या आसनावरून प्रधान मंडळाशीं सशस्त्र सामना करीत आहेत, इतका प्रकार पाहण्यापर्यंत दुर्दैवानें आतांच मजल आली आहे खरी!

हिंदी कायदेमंडळे हीच काही लोकमताचीं एकटी व अनन्य केंद्रस्थानें आहेत असें नाहीं. कायदेमंडळांत जितके राष्ट्रभक्त असतील त्यांच्याहिपेक्षां संख्येनें व गुणानें अधिक भरणारे राष्ट्रभक्त कायदेमंडळाबाहेरहि असतील. कारण कायदे मंडळांत बसून तेथील कामकाज करून सरकारावर नियंत्रण ठेवणे हा जसा राष्ट्रसेवेचा एक प्रकार आहे, तसेंच तो खऱ्या मनानें करूं इच्छिणाराला (नुसत्या शाब्दिक बहिष्कारवाद्याला किंवा असहकारितेची उद्घोषणा हें निष्क्रियतेला निमित्त किंवा सोईस्कर आच्छादन असें मानणाराला नव्हे) कायदेमंडळाबाहेर देशसेवेचे अनेक मार्ग मोकळे आहेत. किंबहुना त्यांतले कांहीं कांहीं मार्ग खरोखरच अधिक खडतर आहेत. कायदेमंडळांत बसून वाटेल तें बोलले तरी तो गुन्हा होत नाहीं, यामुळेंच तेथील पुष्कळशा भाषणांत तीव्रता पाहावयाला सापडते. परंतु अशा भाषणांतील तीव्रता सरकारला फारशी जाणवत नाही. वैष्णव धर्मगुरूंनें श्रीमंत शिष्याला दिलेल्या तप्तमुद्रा स्वतः तप्त असल्या तरी, त्या ओल्या छाटीच्या दुपदरीवरून दिल्यामुळे जशा अंग भाजीत नाहींत, त्याप्रमाणे कायदेमंडळातील भाषणें, नामदार सभासदांच्या या हक्काच्या आडपडद्यामुळें, सरकारच्या मनाला खरा चरका देऊं शकत नाहीत. पण आपले प्राण तळहातावर घेऊन बाहेर पडणाऱ्या लोकांच्या उद्गारांची स्थिति तशी नाहीं. यामुळे क्रांतिकारकांचीं भाषणे व हस्तपत्रकें यांचाच झाला तर सरकाराच्या मनावर कळकळीच्या दृष्टीनें अधिक परिणाम होत असेल. कसेंहि असो; दोघां क्रांतिकारकांनी परवां असेंब्लीत येऊन हीं पत्रके सरकार पक्षाच्या अगावर फेकलीं याचे कारण बहुधा हेंच असावे कीं, त्यांच्याहि मतें कायदेमंडळें हेच 'प्रत्यक्ष राज्यकारभारा'चें मुख्य केंद्रस्थान होय. आणि तेथे झालेल्या मतप्रदर्शनाने जें कार्य होईल तें अवांतर ठिकाणी केलेल्या मतप्रदर्शनानें होणारें नाही. सरकाराशीं प्रत्यक्ष सामना करून दाखविण्याची इच्छा हाच परवांच्या प्रकाराचा हेतु बहुधा असावा!

असो हेतु कांहींहि असला तरी झालेला प्रकार सर्वस्वी अनिष्ट व गर्हणीय होय यांत शंका नाहीं. या प्रकारापर्यंत मजल येण्याची, व स्वतः त्या प्रकारची जबाबदारी कोणावर आहे हा यानंतर विचार करण्यासारखा प्रश्न आहे. पैकीं या क्रांतिकारकांच्या जबाबदारीविषयीं प्रश्नच नाही. कारण त्या प्रकाराची व त्याच्या परिणामाची जबाबदारी सर्वस्वी आपणावर आहे हे त्यांनी असेंब्लीमध्ये फेकलेल्या हस्तपत्रकांमध्येच नमूद केलेलं आहे. पत्रकांतील एक वाक्य असें आहे कीं "हल्लींची परिस्थिति चीड आणणारी आहे. म्हणून सर्व गोष्टींचा गंभीरपणें विचार करून व आमच्या कृत्याची जबाबदारी सर्वस्वी आमच्यावर आहे हे पूर्णपणे ओळखून व ते मनाला पटून, हिंदुस्थानातील समाजसत्तावादी संघानें हे कृत्य करण्याला आपल्या सैन्यांतील आम्हा लोकांना धाडले आहे." ही जबाबदारीची जाणीव या दोघां तरुणांना पूर्णपणें होती याचे आणखी प्रत्यंतर हेंच कीं असेंब्लीमध्यें बॉंब फेकल्यावर ते जागच्या जागीं स्वस्थ उभे राहिले, मुकाट्यानें पोलीस अंमलदाराच्या स्वाधीन झाले आणि योग्य अधिकाऱ्यांपुढे नेल्यावर आपला गुन्हा कबूल करून आमची कैफीयत योग्य वेळीं सांगूं असें त्यांनीं सांगितलें. ही जबाबदारी म्हणजे अनेक वर्षेपर्यंत खडतर कारागृहवास सोसण्याची तयारी हे त्यांना माहीत असून, तो भोगण्याची त्यांची तयारी आहे हें सांगावयास नकोच. पण कोणी आपली

जबाबदारी आपण ओळखली व पत्करली येवढ्यानें त्याचें कोणतेंहि कृत्य योग्य किंवा इष्ट ठरतेंच असें मात्र नाहीं. म्हणून लोकमतप्रदर्शक इतर लोकांनाहि आपली जबाबदारी ओळखून आपलें मत प्रगट करण्याचा अधिकार असतो. आणि त्याच दृष्टीनें आम्ही खालील दोन शब्द लिहीत आहों.

असेंब्लींत फेकलेल्या हस्तपत्रकांतील देश-स्थितीचें वस्तुवर्णन बहुतांशीं खरेंच आहे. आणि बौद्धिक चिकित्सेच्या दृष्टीनें असेंब्लींत त्या दिवशीं हजर असलेल्या पुष्कळ लोकांचें मतहि त्या मताशीं जुळेल. गेल्या दहा वर्षांत राजकीय सुधारणांच्या नावानें सरकारनें घातलेला गोंधळ हिंदी लोकांच्या स्वाभिमानाला लाज आणणारा असाच आहे. कायदेमंडळांना सरकारनें 'हिंदी पार्लमेंट' असें गोंडस नाव दिलें तरी तें खोटें आहे. सरकारानें या कायदेमंडळांतून प्रगट झालेल्या लोकमताचा एकसारखा अपमान चालविला आहे. सायमन कमिशन हें हिंदी राष्ट्राच्या अंगावर सुधारणांचे आणखी चार तुकडे फेकण्याची फार तर शिफारस करील, पण ती शिफारस होण्याच्या आधींच ते आपापसांत कसे वाटून घ्यावे याविषयीं कांहीं स्वार्थसाधु लोक वाद माजवीत बसले आहेत! सरकारनें दडपशाही सुरू केली आहे. अनिष्ट स्वरूपाचीं बिलें कायदेमंडळापुढें मांडून मंजूर करून घेण्यांत येत आहेत. लाला लजपतराय यांच्या-सारख्यावर झालेल्या हल्ल्याचेंहि समर्थन सरकारा-कडून होत आहे. तथापि, ही परिस्थिति सुधारण्याचा मार्ग, किंवा हल्लींची राज्यपद्धति बदलून तिच्या जागीं आणण्याची दुसरी पद्धति, या विषयीं या हस्तपत्रकांत जें मत प्रगट केलें आहे तें देशाला मान्य नाहीं. एका बाजूला आजची अनि-यंत्रित बादशाही व दुसऱ्या बाजूला केवळ रशिया-मध्यें नुकतेंच प्रस्थापित झालेलें बोल्शेविक रिप-ब्लिक (कम्युनिस्ट सोव्हिएट) यांच्या दरम्यान दुसरी कोणती योजना बसूं शकत नाहींच कीं काय याचा विचार, हें रक्तवर्णात्मक हस्तपत्रक लिहिणारांनीं किंवा त्यांच्याशीं सहविचार व सहकारिता करणारांनीं नीट केला असें आम्हास वाटत नाहीं. मनुष्य जीवा-वर उदार होऊन देशाच्या नांवानें झगडण्याला तयार झाल्यास त्याच्या धैर्याचें व स्वार्थत्यागाचें कौतुक होईलच. पण त्यामुळें त्याचे विधायक स्वरूपाचे, साध्य-साधनाचे, कसलेहि अर्धे-कच्चे विचार जनतेला मान्य होतीलच असें त्यानें समजूं नये. फार काय पण, मीरत येथील खटल्यांत आरोपी म्हणून पुढें आणलेल्या सर्वच गृहस्थांना या हस्त-पत्रकातील विचार मान्य आहेत किंवा होतील असेंहि आम्हाला तरी वाटत नाहीं. हे लोक आज एका संकटांत सांपडले आहेत व त्यांतून ते आपला बचाव करूं इच्छित आहेत, या दृष्टीनें तरी, असेंब्लींतील हा प्रकार करणारांनीं हात आवरून धरावयास पाहिजे होता. कारण परवांच्या या कृत्याचा परिणाम, या नाहीं स्वरूपानें या खटल्यांतील न्यायदानावर होण्याचा संभव नाहीं असें कोण म्हणूं शकेल? असो. 'कम्यूनिझम'च्याविषयीं पुष्कळ लिहितां येण्या-सारखें असून, त्याचा उपदेश करणाराच्या विचार-सरणींतील अनेक प्रकारचे हेत्वाभास सहज स्पष्ट करून सांगतां येण्यासारखे आहेत. पण आज आमचा तो मुख्य मुद्दा नाहीं.

मुख्य मुद्दा असा कीं, परवांच्या प्रकाराची प्रत्यक्ष जबाबदारी तेथ स्वतः स्वाधीन झालेल्या क्रांतिकारक तरुणावर असली तरी, त्यांची विचारसरणी झाली अशी होण्याची जबाबदारी अंशतः सरकारावर नाहीं काय, असा आमचा सरकारासहि सवाल आहे. त्यांच्या हस्तपत्रकांत लिहिलेल्या गोष्टी खऱ्या असल्या तरी त्यांनीं अनुसरलेला मार्ग हा खरा मार्ग नव्हे हें आम्हीं वर म्हटलेंच आहे. पण त्या गोष्टीच खऱ्या नाहींत असें सरकारला प्रामाणिक-पणानें म्हणतां येईल काय? जे क्रांतिकारक लोक त्यांच्या व आमच्या मिळून देशाकरितां झगडत आहेत त्यांना, 'तुमचा मार्ग चुकीचा आहे' असें सांगण्याचा अधिकार आम्हाला आहे. आणि त्यांनीं आमचा उपदेश ऐकला नाहीं तरी, राष्ट्रममत्वाच्या समान अधिष्ठानामुळें, "तुम्ही असा उपदेश करणार कोण" असें ते आम्हाला म्हणणार नाहींत. पण दडप-शाहीला पाय नेहमी पुढें व स्वराज्यदानाला मागें अशी कृपण व खुनशी वृत्ति असणारें सरकार त्यांच्या जाहिरनाम्याला काय उत्तर देईल? पिनल कोडाच्या कायद्यानें काय उत्तर देईल हें जगाला माहीत आहेच; पण युक्तिवादाला किंवा भावनेला पटण्यासारखें काय उत्तर देईल? कायद्याचें उत्तर ते खाऊन जातील व पचनीं पाडतील असलें लोकोत्तर धैर्य क्रांतिकारकांनीं प्रगट केलेलेंच आहे. पण राष्ट्रीय स्वराज्याकरितां भुकेलेल्या त्यांच्या आत्म्याची भूक या आत्माहुतीनें प्रकट झाली तरी कशी भागणार!

---

# धर्मवीर श्रीसंभाजीमहाराज

## तुळापूर येथील पुण्यतिथीचा समारंभ

धर्मवीर श्रीसंभाजीमहाराजांच्या पुण्यतिथीचा समारंभ अलीकडे तीन वर्षे तुळापुरास होत असतो. त्याप्रमाणें यंदाहि तो जुन्या पंचांगाप्रमाणे फाल्गुन कृ. ३० ता. ९ एप्रिल रोजी झाला. संभाजीमहाराजांची समाधि कोणती याचा पक्का शोध लावून त्या समाधीच्या जीर्णोद्धाराचें काम सुरू झालें आहे. जुन्या समाधींतून निघालेल्या अस्थी या नव्या बांधणीच्या समाधींत ठेवण्याचा समारंभ यंदा होणारा असल्यामुळे या समारंभास ग्वाल्हेरचे **श्रीमंत सरदार चंद्रोजीराव आंग्रे** यांची अध्यक्ष म्हणून योजना करण्यांत आली होती.

समारंभाकरितां श्रीमंत सरदार गणपतराव राजे भोसले कुर्लेकर, श्रीमंत सरदार जगन्नाथ महाराज, बाळासाहेब पुरंदरे, बापूसाहेब विंचूरकर, ग्वाल्हेरचे सरदार फाळके, बाबासाहेब वाघोलीकर, नानासाहेब वैद्य, बाबासाहेब देशपांडेप्रभृति बरीच इतिहासप्रेमी आणि हिंदुधर्माभिमानी मंडळी आली होती. तुळापूरच्या आसपासच्या पंचक्रोशींतून शेंकडो भाविक लोक या समारंभाकरितां मुद्दाम आले होते. समारंभाकरितां समाधीसमोर लतापल्लवांनी सुशोभित असा मंडप घालण्यांत आला होता.

कार्यक्रमास सुरवात मंगळवार ता. ९ रोजी तिसरे प्रहरीं तीन वाजता व्हावयाची होती. परतु सकाळपासून नियोजित अध्यक्ष सरदार आंग्रे यांची प्रकृति थोडीशी नादुरुस्त झाल्यामुळे ते वेळेवर येऊं शकले नाहीत. अध्यक्षाना येण्यास उशीर होणार व पावसाच्या आगमनाचीं चिन्हें तर दिसूं लागलीं, त्यामुळें मुख्य समारंभाखेरीजचा अवांतर कार्यक्रम आधीं आटोपून घ्यावा असा विचार ठरून साडेतीन वाजता इतर कार्यक्रमास सुरवात झाली.

प्रारंभीं गोपाळ गायन समाजांतील विद्यार्थी पिंपळखरे, लिमये व हरोलीकर यांनीं शिवाजीमहाराज, संभाजीमहाराज व चिमाजी आप्पा यांचे पोवाडे म्हटले. त्यानंतर **प्रो. पोतदार** यांनीं संभाजीमहाराजांच्या चरित्राचें रहस्य आणि अवरंगजेबासारख्या बलाढ्य बादशहास खंड चारणाऱ्या मराठ्यांच्या अंगचे सद्‌गुण यांचें अगदीं सोप्या भाषेत विवेचन केलें.

समारंभाचे चालक व व्यवस्थापक **नारायणरावजी गुंजाळ** हे अध्यक्ष **श्रीमंत आंग्रे** यांच्यासह पांच वाजतां समारंभाच्या ठिकाणीं येऊन पोंचले. अध्यक्षांचें मोठ्या थाटानें स्वागत करण्यांत आलें. पण त्याच वेळीं पावसाची जोराची सर सुरू झाली आणि अध्यक्षांची प्रकृति तर तापानें नादुरुस्त होती. यामुळे उघड्या जागेतला समारंभ लांबविणें श्रेयस्कर नव्हे असे ठरून कार्यक्रम आंखडता घेण्यांत आला. प्रारंभीं श्रीयुत गुंजाळ यांनीं योग्य शब्दांत अध्यक्षांच्या निवडणुकीविषयीं सूचना केली त्या वेळीं ते म्हणाले—

"आज आपण एका धैर्यशाली व निरुपम अशा धर्मवीराच्या स्मरणासाठीं जमलों आहोंत. या धर्मवीराने २४० वर्षांपूर्वी महाराष्ट्रांतील लोकांच्या अंगी शत्रूकडील लक्षावधि सैन्याशीं निधड्या छातीनें झगडण्याची वीरश्री निर्माण केली व मराठ्यांचें नांव इतिहासांत अजरामर केलें. परंतु आपल्या हलगर्जीपणामुळे या धर्मवीराचा आपणास विसर पडला होता. एवढेंच नव्हे तर संभाजीमहाराजांविषयीं भलभलत्या गोष्टी आम्हास लहानपणीं इतिहासांतून शिकविण्यांत येत असत. पुढे याविषयीं जास्त माहिती मिळविल्यानंतर संभाजीमहाराजांनी मराठ्यांच्या इतिहासांत बजावलेली कामगिरी केवढी मोठी आहे याविषयीं खात्री पटली. अर्थात् ही खात्री पटल्यानंतर त्यांच्याविषयीं फैलावलेला गैरसमज दूर करणें व त्यांच्या सद्‌गुणी वृत्तीची आठवण समाजांत कायम करणे हें आपलें कर्तव्य आहे असें वाटूं लागलें आणि आम्ही त्यांच्या समाधीच्या शोधास लागलों. चारपांच वर्षांच्या खटपटीनें समाधीचा शोध लागून तिचा आतां जीर्णोद्धार करण्यांत येत आहे व लवकरच तुळापूर हें हिंदुधर्माची वृद्धि करणारें असें शुद्धीसंघटनेचें एक धर्मक्षेत्र बनेल अशी आशा आहे. या ऐतिहासिक प्रसंगाची इत्थंभूत हकीकत मिळवावी अशी तीव्र जिज्ञासा पुष्कळ लोकांत उत्पन्न झाली आहे; व तिचें पर्यवसान छत्रपति संभाजीमहाराजांचें विस्तृत व विश्वसनीय चरित्र लिहिण्यांत होईल याविषयीं मला यत्किंचित संशय वाटत नाहीं" यानंतर वक्त्यांनीं संभाजीच्या चरित्रांतील ठळक ठळक प्रसंगांचा त्रोटक उल्लेख केला व शेवटीं ते म्हणाले—

"संभाजीचा असा क्रूरपणानें वध केल्यानें मराठे लोक घाबरतील असा अवरंगजेबाचा अंदाज होता.

पण त्याऐवजीं या क्रूरपणाच्या प्रदर्शनानें अवरंगजेबा-विषयी महाराष्ट्रीयांत संतापाची लाट उसळून आली. या संतापानें महाराष्ट्राचे स्वराज्य नष्ट होण्याचे ऐवजीं लाखों सैन्यानिशीं अवरंगजेबाचीच आहुती मराठ्यांनीं घेतली. शिवाजीमहाराजांच्या अलौकिक कर्तबगारीनें व अढळ धर्मश्रद्धेनें ज्या स्वराज्याची उभारणी केली गेली त्या स्वराज्यास अवरंगजेबानें पेटविलेल्या प्रखर संकटज्वाळांतून तावूनसुलाखून बाहेर निघण्यास जर कोणत्या प्रसंगानें मुख्यत्वेंकरून मदत झाली असेल तर ती धर्मवीर संभाजीमहाराज यांनीं प्राणांतींही धर्मभ्रष्ट न होण्याचें जे उदाहरण घालून दिलें त्यानें झाली आहे. शिवाजीमहाराजांनीं लावलेला राज्य-वृक्ष संभाजीमहाराजांनीं आपल्या प्राणाचें पाणी घालून वाढवला. त्यावरून खऱ्या धर्मनिष्ठ पुरुषाच्या आत्मयज्ञानें समाजास जागृत करण्याच्या कामीं फार मोठी मदत होऊं शकते हा धडा घेतां येण्याजोगा आहे.”

याप्रमाणें भाषण करून त्यांनीं नियोजित अध्यक्ष सरदार आंग्रे यांच्या गुणांचें थोडक्यात वर्णन केलें आणि धर्मवीराच्या समाधीच्या जीर्णोद्धाराचें काम धर्मवीराच्याच हातून होणें उचित होय असें म्हणून त्यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारण्या-विषयी सूचना केली.

या सूचनेस काशिनाथ ठकूजी जाधव यांनीं अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष श्री स. आंग्रे हे स्थानापन्न झाले. त्या वेळीं श्रीमंत ओधकर, श्रीमंत इचलकरजीकर, श्रीमंत फलटणकर, श्रीयुत न. चिं. केळकर, धर्मभास्कर विनायकबुवा, डॉ. पवार (महाड) प्रभृतीकडून आलेल्या तारा वाचून दाखविण्यांत आल्या. नंतर अध्यक्षांनीं समाधीच्या ठिकाणीं जाऊन जुन्या समाधींतून काढलेल्या अस्थी व रक्षा आणि संभाजीच्या चारित्र्यांतील ठळक गोष्टी कोरलेला ताम्रपट आंत ठेवलेली नवी ताब्याची पेटी नवीन बांधलेल्या समाधीच्या मध्यभागीं ठेवून दिली व तिजवर हार घातला. त्या वेळीं इतर अनेक संस्थांच्या विद्यमानें समाधीवर हार घालण्यांत आले. नंतर परत स्वस्थानीं येऊन अध्यक्षांनीं पुढील आशयाचें भाषण केलें.

## अध्यक्ष आंग्रेसाहेब यांचें भाषण

बंधुभगिनींनो, श्रीछत्रपति गोब्राम्हणप्रतिपालक धर्मसूर्य श्रीसंभाजीमहाराज यांच्या पुण्यतिथ्युत्सव-प्रसंगीं मला अध्यक्षपद देऊन आपण सर्वांनी माझा अपूर्व सन्मान केला असें मी समजतो; व त्या-बद्दल मी आपणा सर्वांचे मनःपूर्वक आभार मानतों. हिंदुधर्माच्या आजच्या अवनत स्थितीकडे पाहिलें असतां आजच्या उत्सवासारखे उत्सव जितके होतील तितके थोडेच होत असें म्हटलें पाहिजे. उत्सवाचा प्रधान हेतु चार दिवस गंमत करणें हा नसून ज्या पुण्यपुरुषाचा आपण उत्सव करतों त्याच्या गुणांचें स्मरण जनतेच्या हृदयांत जागृत होऊन त्या गुणांचा अंश प्रत्येकाच्या कृतींत उतरावा असा उदात्त आहे. समाज हा थोरांच्या पावलावर पाऊल टाकीत असतो. परंतु अशा थोर पुरुषांबद्दलची मुळीं स्मृतिच नष्ट झाली तर ते ज्या मार्गानें गेले तो मार्ग आणि त्यावरील त्यांचीं पावलें हीं दोनहि दिसेनाशीं झाल्यास त्यांत नवल कोणतें ? हिंदुधर्माच्या आजच्या दुर्दशेकडे पाहिलें तर माझ्या विधानाची सत्यता पटेल. हिंदुधर्म ओहटीस लागला आहे. हिंदुधर्मावर चोहोंकडून आणि बऱ्यावाईट अशा सर्व साधनांनीं हल्ला चालू आहे. याचें कारण शोधूं लागलों तर असें दिसून येईल कीं आम्ही धर्माची हेळसांड चालविली आहे. धर्माचा उद्धार आणि धर्माची स्वपदीं दृढ स्थापना करण्यासाठीं ज्यांनीं आजन्म श्रम केले, इतकेंच नव्हे तर आपल्या पंचप्राणांचें बलिदान करण्यासहि ज्यांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं अशा धर्मसूर्याचें आम्हाला विस्मरण झालें, आम्हास त्यांचा मार्ग दिसेनासा झाला, परतु आमच्या या कृतघ्न वर्तनाचें प्रायश्चित्त आम्हाला लवकरच मिळालें. आमचें आजचें दुःखद पारतंत्र्य, धर्माची ओहोटी, सामाजिक ऱ्हास हीं त्याच शिक्षेचीं स्वरूपें होत. तथापि वाइटांतून चांगलें निघतें या सिद्धांतानुसार सुदैवानें आमच्यामध्यें अलीकडे जागृति होत चालली आहे हें उघड दिसत आहे. आजचा संभाजीमहाराजांचा उत्सव त्याच जागृतीची साक्ष देत आहे.

राजकारणांतून धर्माची हकालपट्टी करावी अशी हाकाटी करणारे पुढारी आज कांहीं थोडेथोडके नाहींत. परतु त्यांना माझा असा प्रश्न आहे कीं तुम्ही धर्म आणि राजकारण या दोन परस्पर भिन्न गोष्टी कां मानतां ? राजकारण ऊर्फ नीति ही जर धर्माचेंच अंग आहे तर ती निराळी कां मानण्यांत येते, समजत नाहीं ! जगाचा इतिहास जर आपण बारकाईनें निरीक्षण केला तर त्यांत कोणत्याहि काळीं समाजाचें धारण धर्मच करीत आला आहे असें दिसून येईल. धर्मविरहित राजकारणानें परराज्य जिंकतां येईल व परकी समाज नष्ट करता येईल. पण अशा धर्मविरहित राजकारणानें स्वतःचा समाज धारण झाल्याचें एकहि उदाहरण इतिहासांत नाहीं. धर्म

आणि राजकारण यांचा सुंदर मेळ म्हणजेच भगवान श्रीकृष्णाच्या चरित्राचें रहस्य होय व त्यांच्या भक्तांनीहि लोकमान्यांनीं गीतारहस्यांत सांगितल्याप्रमाणें त्याच धोरणानें वागावयाला हवें आहे. म्हणूनच श्रीसमर्थांनीं सर्व चळवळींच्या मुळाशीं 'भगवंताचें अधिष्ठान' म्हणजे भागवत-धर्माचें अधिष्ठान असावें अशी दासबोधांत आज्ञा केली आहे. कारण चळवळीरूप तरवारीची धर्म ही मूठ असून राजकारणादि गोष्टी त्या तरवारीचें पातें होत. बिनमुठीची तरवार तीं धरणाऱ्याचाच हात कापील हे उघड आहे. म्हणून धर्माची राजकारणातून हाकलपट्टी करूं नका. तसें केल्यास आपण वावरत असलेल्या इमारतीचा पायाच खणून टाकल्यासारखें होऊन इमारतीसह आपण सर्व नष्ट होऊं हें खास समजा.

संभाजीमहाराजांचें पुण्यस्मरण आजवर कां झालें नाहीं याचें एक कारण धर्माविषयीं उदासीन वृत्ति हें जसें आहे तसेंच संभाजीमहाराजांच्या राजकीय स्वरूपाबद्दलचा समाजाच्या अंतःकरणांतील तिरस्कारा हे दुसरें कारण आहे. राजा या दृष्टीनें जरी संभाजीमहाराज उच्च कोटींतील ठरत नसले तरी त्याचें दुसरें एक स्वरूप इतकें उज्ज्वल आणि प्रखर होतें कीं त्याला महाराष्ट्राच्या इतिहासांतच काय पण भरतखंडाच्या इतिहासांतहि दुसरी तोड क्वचितच सापडेल. महाराजाचें हे दुसरें स्वरूप म्हणजे त्यांची प्रखरतर स्वधर्मनिष्ठा हे होय.

ज्या अवरंगजेबानें संभाजीमहाराजांचा प्राण घेतला त्याच अवरंगजेबानें पंजाबांतील शीखधर्म-गुरूंचा केवळ धर्मवेडानें पराकाष्ठेचा छळ केला हें इतिहासप्रसिद्ध आहे. पण संभाजीमहाराजांच्या बलिदानात आणि शीखधर्मगुरु गोविंदसिंग आणि बंदासिंग यांच्या बलिदानांत एक महत्त्वाचा भेद आहे. शीखधर्मगुरूंचा जरी संभाजीमहाराजांप्रमाणेच पराकाष्ठेचे हाल करूनच वध करण्यांत आला, तरी त्यांत वैयक्तिक द्वेष व धर्मद्वेष प्रधान होता. संभाजीमहाराजानीं मुसलमानी धर्म स्वीकारला असता तर त्याना अधिक मुलख व अधिक पदव्या देऊन अवरंगजेबानें त्यांचा किती बडेजाव केला असता हें त्या वेळच्या ऐतिहासिक पुराव्यांनीं आणि प्रत्यक्ष अवरंगजेबाच्या संभाषणावरून स्पष्ट होतें. अर्थात्, महाराजांनीं या सर्व प्रकारच्या बलिष्ठ मोहजालांचे पाश तडातड तोडून अखेर स्वधर्मासाठी निरपेक्ष बलिदान केलें ही एकच गोष्ट इतिहासात बिनतोड असून संभाजीमहाराजाना धर्मवीरांत श्रेष्ठ पदवी देण्यास पुरे आहे. याप्रमाणे एरवीं चंगीभंगी म्हणून प्रसिद्ध असलेल्या संभाजीमहाराजांनीं धर्माचा प्रश्न उभा राहिल्याबरोबर तेच कनककामिनीचे मोहपाश तडातड तोडून आपली धर्मभक्ति अजरामर करून ठेवली आहे व हाच त्यांच्या चरित्राचा विशेष होय.

श्रीशिवाजीमहाराजांच्या या धर्मप्राण छाव्याचें विस्मरण महाराष्ट्रास " यावच्चंद्रदिवाकरौ "होणें शक्य नाहीं. महाराजांच्या असल्या अमानुष वधाच्या वर्णनानें तिरस्काराच्या व क्रोधाच्या लाटा आपल्या हृदयसमुद्रांत उसळतात. पण त्या निर्बल असतात. परंतु त्या लाटाबरोबर जेव्हां का धर्मभक्तीच्या नवचैतन्याची लाट उसळी मारूं लागते तेव्हा धर्मोद्धारणाची सिद्धता होत असते. बंधुभगिनींनों, धर्ममूर्ति संभाजीमहाराजाची वधकथा ऐकून तुमच्या धर्मभावना तुमचा धर्माभिमान जर जागृत झाला तरच महाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव केल्याचें श्रेय पदरात पडेल आणि तेवढ्यासाठीं संभाजीवधवर्णनाचीं हजारों पारायणें आम्ही करावयाला हवींत. तसें केल्यानें आमचें चैतन्य व अभिमान सदैव जागृत राहील.

हिंदुधर्म हा जगांतील अखिल धर्मांचा आणि सात्विक संप्रदायांचा पिता आहे. जे इतर धर्मांत आहे ते हिंदुधर्मांत आहेच. पण अशाहि कांहीं उदात्त गोष्टी हिंदुधर्मांत आहेत कीं, त्या इतर ठिकाणीं सांपडत नाहीत. याचा अनुभव परद्वीपांतील निःपक्षपाती मुमुक्षु विद्वानांना येऊं लागला असल्यामुळें त्यांनीं स्वामी विवेकानंद व डॉ. रवींद्रनाथ टागोर यांचा वेळोवेळीं बहुमान केला. इतकेंच करून ते थांबले नाहींत तर त्यांच्यापैकीं अनेक मुमुक्षु आपल्या हिंदुधर्मांत येऊं इच्छित आहेत. काहींनीं हिंदुधर्माचा स्वीकार केला आहे. हिंदुधर्मांत येणें म्हणजे संकुचित तत्त्व सोडून व्यापक तत्त्व स्वीकारणें होय, डबक्यांतून निघून महासागरांत यथेच्छ पोहावयास सांपडणें होय असें त्यांना वाटतें व तें अर्थात खरें आहे.

सारांश, आपला हिंदुधर्म अत्यंत उज्ज्वल व व्यापक आहे ही गोष्ट हिंदुधर्मीयांनींच केवळ नव्हे तर सर्व परधर्मीयांनीं निःस्पृहपणे मान्य केली आहे. श्रीमच्छंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांजकडे परद्वीपस्थानीं आम्हाला देवळें बांधून द्या व हिंदुधर्म शिकविण्याची व्यवस्था करून द्या अशी मागणी केली आहे हें त्या मान्यतेचेंच द्योतक आहे. अर्थात त्यांच्या या योग्य मागणीचा पुरस्कार करणें केव्हाहि योग्यच होईल.

असो. संभाजीच्या धर्मतेजानें मराठी राज्य बुडतांना तरलें व बळकट झालें हेंच खरें. कारण अवरंगजेब अशी दृढतर प्रतिज्ञा करून आला होता कीं सर्व दख्खन मुसलमान करून टाकीन. त्यासाठीं लक्षावधि सैन्य व खजिना बरोबर घेऊन तो जातीनें दक्षिणेत येऊन राहिला होता. कांहींच्या मतें संभाजी-

महाराजांचें राजकीय बळ तितकें योग्य नसल्यामुळें सर्व प्रजा मोहवश झाली असून स्वार्थापुढें धर्माभिमान लटका पडत चालला होता, कारण अवरंगजेबाची जबर महत्त्वाकांक्षा व प्रचंड शक्ति त्यांचा स्वार्थ वाढविण्यास समर्थ अशी होती. अशा वेळीं धर्मग्लानी व राज्यहानी अशा दुहेरी संकटांत महाराष्ट्र सांपडला होता.संभाजीमहाराजांच्या बलिदानानें प्रजेच्या अंतःकरणांत देशाभिमान व धर्माभिमान एकसमयाव च्छेदेंकरून खडबडून जागा झाला.म्हणजे संभाजींच्या राजतेजानें जिवंतपणीं जें साधलें नाहीं तें त्यांच्या धर्मतेजानें व आत्मार्पणानें पूर्णपणें साधलें याची साक्ष इतिहास देत आहे. म्हणूनच आम्ही म्हणतों कीं महाराजांच्या धर्मतेजानें हिंदुपदपातशाही तरली व बळकट झाली.

बंधुभगिनींनो, संभाजीमहाराजांचें सत्यस्वरूप हें असें आहे. त्यांच्या हातून इतर चुका झाल्या असतील पण त्यांनीं हें जें धर्मरक्षणाचें महत्कार्य केलें त्याच्यापुढें त्या सर्व क्षम्य आहेत. त्यांना परमेश्वरानें ज्या कर्तव्यासाठीं भूमितलावर पाठविलें तें त्यांनीं यथायोग्य बजावलें आणि म्हणूनच त्यांचें स्मरण आज आपणास यथायोग्य सन्मानानें व आदरभावानें करावयाला पाहिजे.

श्रीसंभाजीमहाराजांच्या पुण्यतिथीचा उत्सव सुरू करण्याची कल्पना, तिला मूर्त स्वरूप देणें, महाराजांच्या अस्थी शोधून काढून त्या त्यांच्याच आहेत अशाबद्दलचा विश्वसनीय पुरावा गोळा करणें व महाराजांच्या समाधीचा जीर्णोद्धार करणें, त्याचप्रमाणें त्यांच्या चारित्र्यावर प्रकाश पडून अनेक गैरसमज दूर होतील असे ऐतिहासिक कागदपत्र मिळवून ठेवणें इत्यादि कामांत ज्यांनीं पुढाकार घेऊन अविश्रांत परिश्रम केले त्या नारायणराव गुंजाळांचें आपण सर्वांनीं गुणग्राहकतेनें अभिनंदन करणें अवश्य आहे. म्हणून मी आपणा सर्वांतर्फे त्यांना धन्यवाद देतों.

हा सार्वजनिक उत्सव अशा प्रकारें चालू झाल्यावर यापुढची क्रमप्राप्त कामगिरी म्हटली म्हणजे श्रीशिवाजीमहाराजांप्रमाणेच त्यांचा--धर्मसूर्य पुत्राचाहि--पुतळा उभारण्याची खटपट झाली पाहिजे. महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र येथील सर्व सरदार आणि इनामदार हे संभाजीमहाराजांच्याच मिठावर आज जगत आहेत. तेव्हां त्यांनींच हें कार्य आपल्या हातीं घेतलें पाहिजे. श्रीशिवाजीमहाराजांचा पुतळा उभारण्यांत श्रीमन्महाराज माधवराव शिंदे आणि श्रीमन्महाराज छत्रपति कोल्हापूर यांनीं पुढाकार घेतला होता. तेव्हां आतां संभाजीमहाराजांचा पुतळा उभारण्यास या उभयतां महाराजांच्या विद्यमान वंशजांनीं कंबर कसली पाहिजे. या कामांत सर्व सरदार--इनामदारांनीं कायावाचामनें--करून त्यांना साहाय्य करून त्यांच्या हातून हें कार्य शेवटास नेलें पाहिजे. यासाठीं त्यांनीं या कार्यास लागावें अशी मी नम्रपणें त्यांस विनंति करतों.

पुतळ्याबद्दलच्या खटपटीबरोबर संभाजीमहाराजांचें एक उज्ज्वल चरित्र लिहिलें गेलें पाहिजे. आमची संस्कृति व महाराजांचें वैशिष्ट्य ज्यांत उत्तम प्रकारें संभाळलें जाईल असेंच तें लिहिण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. उदाहरण घ्यावयाचें झाल्यास नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या "हिंदुपदपातशाही' या पुस्तकाचें देतां येईल. असें हें चरित्र अस्तित्वांत आणण्याचा प्रयत्न खालहेर येथें गेल्या वर्षी सुरू केलेल्या 'महाराष्ट्र शारदामंडळ' या संस्थेनें करणें योग्य होईल असें मला वाटतें."

याप्रमाणें अध्यक्षांचें भाषण झाल्यावर श्रीयुत चित्रावशास्त्री यांनीं अध्यक्षांचे आभार मानले आणि अध्यक्षांना उत्सवमंडळातर्फे आणि इतर अनेक संस्थांतर्फे हार अर्पण करण्यांत आल्यावर त्या दिवशींचा कार्यक्रम समाप्त झाला. दुसरे दिवशीं सकाळीं मरकळ येथील शाळेंतील मुलांचे खेळ झाले. १० ते १२ पर्यंत **राजाराम-बुवा रामदासी** यांचें संभाजींच्या चरित्रावर कीर्तन झालें. मरहूम सर विठ्ठलदास ठाकरसी यांच्या पत्नी यांनीं तुळापुरास येऊन समाधी पाहून समाधान व्यक्त केलें. सायंकाळीं संभाजी आखाड्यांत सुमारें ८० कुस्त्या होऊन पेहेलवानास पदकें, पागोटीं, नारळ वगैरे प्रसाद देण्यांत आला आणि हे पेहेलवान तयार करणाऱ्या वस्तादांस चांदीचीं पदकें देण्यांत आलीं. नंतर या समाधीच्या जीर्णोद्धारास व उत्सवसमारंभास साहाय्य करणाऱ्या सर्व संस्थांचे व व्यक्तींचे आभार मानण्यांत येऊन हा समारंभ समाप्त करण्यांत आला.

---

# इराकाचें अंतरंग

सर ससून हे ब्रिटिश वैमानिक खात्याचे दुय्यम अधिकारी नुकतेच हिंदुस्थानांत येऊन 'पाहाणी' करून गेले हे तर सर्वश्रुतच आहे. त्यांची पाहणी असावयाची कशाली? हिंदुस्थान ते इंग्लंड वैमानिक दळणवळण चालू करण्यासाठीं सर ससून आले असे भासविण्यांत आलें. आणि ती नवीन टपालाची सोयही एप्रिलच्या आरंभापासून अमलात येईल. पण त्यांचा अंतस्थ हेतु अगदी निराळा होता. हत्तीचे दाखवावयाचे दांत वेगळे आणि खाण्याचे दांत निराळे असतात, तशांतलाच हा प्रकार. सरसाहेब बगदाद्–बसरामार्गे कराचीस आले होते. बसऱ्याला वैमानिक—नौकेचें मोठें ठाणें करण्याची योजना निश्चित करणें हे त्यांचें मुख्य कार्य होतें व त्यांनीं तें पार पाडलेंहि. "सीप्लेन बेस" असें बसऱ्याचें नवें लष्करी महत्त्व आहे. सिंगापूरला आरमारी ठाणें, बगदाद येथें वैमानिकदलाचें मुख्य केंद्र आणि बसऱ्यास वैमानिकनौकांचा पुरवठा अशी ही कडेकोट तयारी कोणत्या आगामी संकटासाठीं चालली आहे कोण जाणे!

## बसऱ्यास वैमानिकनौकांचा तळ

बसऱ्याला वैमानिकनौकांचा तळ ठेवला म्हणून कांहीं बिघडलें असें नव्हे; पण मुख्य गंमत आहे ती बातमी गुप्तपणे पसरविण्यांत. वैमानिकनौका इंग्लंडाहून निघाल्या तेव्हां साहजिकच रूटरनें तार दिली कीं साम्राज्यांतील वैमानिकनौकांच्या तांड्यांपैकीं कांहीं भाग बसऱ्यास जाण्यासाठीं निघाला यांत विशेषसें कांहींच नसलें आणि हिंदुस्थानांत किंवा अन्यत्र ही तार जशीच्या तशीच प्रसिद्ध झाली असली तरी बसरा व बगदाद येथें लगेच वर्तमानपत्रांना कानमंत्र गुप्तपणें देण्यात आला. "साम्राज्यांतील" हा शब्द गाळून टाकण्याविषयींची ती गुप्त सूचना होती. "इराक" हा साम्राज्याचा एक घटक असल्याचें सर्वत्र मोठ्या डौलानें सांगितलें जातें. साम्राज्यांत लागू असणाऱ्या पोस्टाच्या सवलती इराकाच्या बाबतींत खऱ्या ठरतात, पण इराकी जनतेस मात्र 'आम्ही केवळ मँडेटरी सत्ताधारी आहोंत" असा सोवळेपणाचा आव आणून बजावलें जातें. तेव्हां ही समजूत कोणत्याहि प्रकारें धुतली जाऊं नये म्हणून वरचेवर इंग्रजी वर्तमानपत्रांवर खासगी रीत्या नियंत्रण घालावें लागतें. इराकी प्रजेला कसें भुलविलें आहे याचें हें अगदीं क्षुल्लक उदाहरण आहे. हिंदुस्थानांतून इराकाला टपाल पाठविणें झाल्यास पाकिटाला दोन आणे द्यावे लागतात. कारण इराक हा ब्रिटिश साम्राज्यातील एक भाग आहे. पण इराकामधून हिंदुस्थानाला तेवढ्याच पाकिटाकरितां तीन आणे टपालखर्च पडतो. इराकी लोकांशीं बोलतांना "छेः कुठलें साम्राज्य अन् कुठलें काय? तुमचा आमचा संबंध फक्त राष्ट्रसंघानें आमच्यावर जबाबदारी लादली म्हणून आला तुम्ही स्वराज्यास पात्र झालां, राष्ट्रसंघांत तुमचा प्रवेश झाला कीं आम्ही आपले निघून जाऊं" अशी भाषा वापरली जाते. नृपनीतीचें खरें स्वरूप असेंच नाहीं का?

आणखीहि थोडें खोलांत शिरल्यास फारच मनोरंजक माहिती मिळेल. हिंदी लोकांस दोनच जाहिरनामे ठाऊक आहेत. एक १८५७ सालाचा आणि दुसरा कापलाषष्ठीप्रमाणे ६० वर्षांनीं १९१७ सालीं दिलेला. या दोन्हि जाहिरनाम्यांची किंमत किती आहे हें गुलदस्तांतच राहूं द्या. इराकाला असे किती तरी जाहिरनामे मिळाले आहेत आणि इराकावर ब्रिटिश अंमल सुरू होऊन, नव्हे इराकाचें पालनपोषणाचें कार्य इंग्रजी राज्यकर्त्यांवर येऊन अगदीं थोडा काल झाला असला तरी जाहिरनामे खिरापतीप्रमाणें वांटले गेले आहेत असें दिसतें.

## मोहक वचनें

"ग्रेट ब्रिटनची उच्च आकांक्षा (ऑटोमन एम्पायर) तुर्कांचें साम्राज्य अबाधित ठेवण्याचीच आहे. पण आमच्याविरुद्ध जर्मनीच्या बाजूनें लढण्यास प्रवृत्त झाल्यानें तें साम्राज्य सुरक्षित राखणें अशक्य आहे. आरबांना तुर्कांचा जुलूम जाणवत आहेच. तुमचा धर्म आणि तुमचें स्वातंत्र्य तुम्हासाठींच राखण्याचा आम्ही आटोकाट प्रयत्न करूं."

"ब्रिटिश सत्तेखालीं पुरातन कालापासून (?) लक्षावधि मुसलमान प्रजाजन आहेत. जगांतील कोणत्याहि राज्यकर्त्यांच्या अमलांत इतकी इस्लामी प्रजा नाहीं" (?)(प्रश्नचिन्हें लेखकाचीं आहेत.)

"तुम्हाला धार्मिक आणि घरगुती बाबतींत स्वातंत्र्याचा आणि न्यायाचा आस्वाद चाखावयास मिळेल." (भाषा बदलली.)

"आमचें राज्य हे सन्मान्य (?) ईस्ट इंडिया कंपनीच्या परंपरेनुसारच चालविलें जाईल." (बिचारे आरब! ईस्ट इंडया कंपनीच्या परंपरेचा पुरावा एडमंड बर्क त्यांना देतां तर फार बरें झालं असतें!)

"आम्ही बगदादला जेते म्हणून येत नसून

तुमची मुक्तता करण्यासाठीं येत आहोंत " ( आगींतून सोडवून फुफाट्यांत पाडण्यासाठीं ! )

" तुमचे राजवाडे जमीनदोस्त झाले आहेत. तुमचीं उपवनें उध्वस्त झालीं आहेत. तुमचे वाडवडील दास्यांत कुचंबत होते. युद्धें उकरून काढण्यांत तुमचें आंग नसतांहि तुमच्या मुलाबाळांना रणांगणावर नण्यात आलें आहे. तुमची धनदौलत सारी लुटली गेली आहे. "

" अहो बगदादचे पौरजनहो! तुमच्या २६ पिढ्या परकीय अरेरावी राजांच्या दास्यांत बद्ध होत्या व त्यानीं तुमच्या जातीजातींत कलागती लावून देऊन आपला फायदा करून घेतला हें नीट लक्षात घ्या !"

( कर्नल लॉरेन्सन काय केलं आहे ! इब्न सौदला आणि मक्केच्या हुसेनला मलिदा कोण चारीत होते! आणि कशासाठीं ? हल्लींची पिढी काय स्वातंत्र्यसौख्यांत आहे ? )

## तीन विलायती

युफ्रातीस व तैग्रीस या दोन नद्यांमधील हा प्रदेश तीन विलायतींत विभागला गेला आहे. विलायत म्हणजे इंग्लंड किंवा परदेश असा अर्थ आपल्याकडे केवळ चुकीनें झाला आहे. मूळ अर्थ स्वदेश असा असून राज्यव्यवहारकोशांत विलायत म्हणजे स्वदेश असें स्पष्ट म्हटलें आहे. बसरा विलायत, बगदाद विलायत आणि मोसल विलायत अशा तीन विलायती मिळून इराकाचें राज्य होतें. मेसापोटेमिया यालाच म्हणतात. खाल्डिया नामक प्राचीन देशहि याच भागांतला. बाबिलोन व निनेव्ह ही इतिहासप्रसिद्ध राजपुरें इराकातच आहेत जगत्संस्कृतीचा पाळणा प्रथम याच प्रदेशांत बांधला गेला असें रूपक नेहमीं योजिलें जातें. या तीन विलायतींत किती तरी फरक आढळतो. बगदादला राजकारणाशिवाय दुसऱ्या गोष्टी ऐके येणार नाहींत तर बसऱ्याला व्यापाराविना अन्य बाबींकडे लक्ष देण्यास तेथील लोकांना अवसर मिळत नाहीं. बगदादला व्यापार मुळींच नाहीं असें नव्हे पण तेथील लोकांचें मुख्य अवधान राजकारणाकडे असत. मोसल येथें आपसातले झगडे विशेष आढळतील. धर्माचा व जातीचा विचार बसऱ्याचे लोक करीत नाहींत, पण बगदादला मात्र अमका हिंदी, तमका यहुदी, तिसरा आर्मीनियन असे भेद मनात आणणारे विचक्षणी जन आहेत. या तीनहि विलायतींपैकीं बसरा आणि बगदाद या दोन विशेष महत्त्वाच्या असल्यानें प्रस्तुत प्रतिनिधीनें तिसऱ्या विलायतेची यात्रा केली नाहीं.

## बसऱ्यांतील हिंदी असोसिएशन

बसऱ्यात 'हिंदी असोसिएशन' म्हणून एक संघ आहे. युद्धकालीं तेथें बरीच हिंदी मंडळी होती. तेव्हां त्या संघाचें कामहि जोरांत चालत असे. पण युद्धोत्तरकालांत हिंदी लोक जसजसे स्वदेशीं परतले तसतसें त्या संघाच्या चळवळीचें स्वरूप आखडूं लागलें. शेवटीं तर कांहीं काल संघ जवळजवळ बंद झाल्यासारखाच होता. पण तेथील जनतेंत थोडीशी जागृति केल्यावर पुनः ताज्या दमानें कामास प्रारंभ झाला आहे. हिंदुस्थानांतील सर्व संघांना उदाहरण घालून देण्यासारखाच प्रघात बसऱ्याच्या हिंदी संघानें पाडला आहे असें म्हणता येईल. ' व्यक्ती तितक्या प्रकृती ' ही म्हण अक्षरशः खरी असल्यानें संघांत मतभेदाचें वारें शिरून कार्य थंडावतें. संघाची धुरा आंग्लविद्याविभूषित पदवीधर अशा स्त्रीनेंच स्वीकारली आहे आणि मिसेस सॅम्युएल या अध्यक्ष होतांच संघाच्या कार्यांत पुढें कोण जातो अशी अहमहमिका कार्यकारी मंडळांत उत्पन्न झाली. इतकेंच नव्हे तर बसऱ्यांतील इतर हिंदी भगिनींनीं आपापल्या परीनें कार्यभाग उचलण्याची सिद्धता दर्शविली.

## इराकाचे बॅ. सावरकर

हिंदुस्थानाच्याच वांट्याला बॅ. सावरकरासारखें नररत्न आलें असावें असा ग्रह होता. त्याच्यासारखी कडक तपश्चर्या करणारे राष्ट्रसेवक आणि नाहक त्यांचा छळ करणारें खुनशी सरकार अशी जोडी बसऱ्यासहि पाहावयास मिळाली. अर्थातच त्यांतील एक गडी कोण हे न सांगताच समजण्यासारखें आहे. दुसऱ्या गड्याचें नाव कदाचित् हिंदुस्थानापर्यंत पोहोचलें असावें. सय्यद तालीब पाशा यांनीं पहिल्या इराक मंत्रिमंडळांत अंतस्थ मंत्र्याचें काम केलें होतें. पण त्यानीं इराकाच्या स्वयंनिर्णयाची चर्चा केल्यामुळें १९२१ सालीं त्यांना "लंकापुरीचा" तीन वर्षें वास घडला ! केवढा घोर अपराध ! तत्पूर्वीही हिंदुस्थान इजिप्त या देशांचें हवापाणी त्यांस पाहावयास मिळालें होतें ! यांच्या राष्ट्रप्रेमाच्या गोष्टी इतक्या स्फूर्तिदायक आहेत की त्या लिहितांच येत नाहींत. सध्या उपर्युक्त इराकपुत्राला बसऱ्यापासून ४-५ मैलांवर ठेवलें आहे आणि अशा राष्ट्रभक्ताचें दर्शन घेण्यासाठींच—कारण राजकारणाची चर्चा त्यांनीं करूं नये अशी आज्ञा आहे—प्रस्तुत प्रतिनिधीनें खटपट केली. परंतु कांहीं कार्यासाठीं ते हिंदुस्थानाला गेले असल्याचें कळलें !

## अर्थपूर्ण योगायोग

बसरा येथें एक महत्त्वाची शाळा आहे एक अमेरिकन मिशनरी गृहस्थ आरबी भाषेचे अधिकारी समजले जातात आणि त्यांच्याच नेतृत्वाखालीं ती शाळा चालू आहे. इराकामध्यें त्या तोडीची शाळा

नाहीं तरी विस्तार फार लहानच आहे. तेथील विद्यार्थी हिंदुस्थानाविषयीं चौकस दिसले. त्यांच्याकडे जातांक्षणींच त्यांनीं "आमच्या शाळेतहि एक हिंदी गृहस्थ आहेत चला दाखवितो" असें म्हणून मुख्य दिवाणखान्यांतील महात्मा गांधींच्या चित्राकडे बोट केलें! शाळेतल्या विद्यार्थ्यांपैकीं एकानें महात्माजींचें नेहमींच्या आसनस्थ स्थितींत चित्र पेन्सिलीनें काढलें होतें 'सत्कीर्तीचा डंका' सर्वत्र गाजत असल्यानें महात्माजींना बसऱ्याच्या शाळेंत मान मिळाला. त्यांच्या जोडीला तशींच आणखी दोन चित्रे होतीं. एक अमेरिकन प्रेसिडेंट वुड्रो वुइल्सन याचें आणि दुसरें राजे फैजुल याचें. शाळेत तीनच चित्रे आणि तीन देशांतील परस्परांशीं संबंध नसलेल्या थोर पुरुषांचीं. विलक्षण योगायोग म्हणतात तो असा. वुइल्सनसाहेबाना खडे चारून भुलथापांनीं भुलवल्याबद्दल त्यांनीं प्राण सोडतांना हि मुत्सद्देगिरीत मुरलेल्याना शिव्याशाप दिले राजे फैजुल तर बोलूनचालून बनावट राजे. नसती पीडा गळ्यात बांधून घेतल्याबद्दल त्यांना आतां पश्चात्ताप होण्याइतकी विचारशक्ति आली असली तरी ती मोकळेपणानें (महात्माजींप्रमाणें) कबूल करून उपरणं झटकून टाकण्याची त्यांची तयारी नाहीं. महात्माजींना वरचेवर ब्रिटिश राजसत्तेवर विश्वास टाकून राहिल्याचा पश्चात्ताप होतच आहे आणि आपला विश्वास अजीबात उडाल्याचें ते पुनः पुनः जाहीर करीत आहेतच. एकूण काय तर तीनाहि व्यक्ती या एकाच 'अग्नीनें' भाजून काढलेल्या आहेत.

### बगदादमधील मॉडचा पुतळा

मद्रासचें 'नील' पुतळ्याचें प्रकरण वाचकांच्या मनांत ताजें असावें असा समज आहे. उद्योन्मुख राष्ट्राची विचारसरणा सर्वत्र सारखी असते हें दर्शावणारा बगदादमधील प्रसंग पाहा. महायुद्धकाळीं जनरल मॉड या सेनानायकानें बगदादमध्यें प्रवेश केला. बगदाद जिंकलें असें म्हणतां येत नाहीं. कारण तुर्की फौजेनें रक्तपात टाळण्यासाठीं अगोदरच माघार घेतली होती. त्याचें स्मारक म्हणून एक मोठा अश्वारूढ पुतळा मॉडसाहेबांच्या नांवें उभारला आहे. इराकी प्रजेनें अर्थातच त्याला आणि त्यावरील आलेखाला हरकत घेतली. पण जेथून नगरप्रवेश झाला तेथें तो पुतळा न ठेवतां हायकमिशनराच्या वास्तव्याच्या दारासमोर तो उभारला गेला आहे. त्याला मजबूत असें तारांचें कुंपण असून संरक्षणार्थ शिपाईही नेहमीं ठेवले आहेत. सत्याग्रहाची लाट अद्याप इराणी आखातात आली नाहीं म्हणून बरें. पण तीहि दिवसमानानें पोहोचेल हें खास!

याच मॉडसाहेबांच्या नांवानें तैग्रीस नदीवर झुलता पूल बांधण्यात आला आहे. तो तरत्या ताफ्यावर असून जहाजाच्या वा तुर्कीच्या वेळीं दाजूस सारतां यावा अशी व्यवस्था आहे. पूर्वी येथे बोटींवर रचलेला पूल असे तसा दुसराहि एक आहेच. पण मॉडसाहेबांचें नाव मोठ्या पुलाला दिलें आहे आणि नदीच्या पूर्वबाजूस किनाऱ्यावरून पश्चिमतीरीं जाण्यास त्याचा फार उपयोग आहे. जुनें शहर पश्चिमतीरावर असून पूर्वेकडील भागात बसरा रेल्वेचें स्टेशन व हायकमिशनराची कचेरी हीं महत्त्वाचीं ठिकाणें आहेत.

### खलिफांच्या नगरींत आर्यसमाज

इराणात श्रीकृष्णमंदिर असल्याचें मागे कळविलेंच आहे. बगदादमध्यें आर्यसमाजाचें एक स्थान असून प्रतिआठवड्यास हवनादि कर्में होत असतात. नैमित्तिक उत्सवांह मोठ्या समारंभानें पार पाडले जातात. आणि विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, कित्येक बगदादनिवासी इस्लामधर्मानुयायी अशा विशिष्ट प्रसंगीं हजर राहतात! आर्यसमाजाचें ठिकाण अगदीं जुन्या भागात शहराच्या मध्यावर आहे. पण गेल्या आठ वर्षांच्या अवधींत त्यांच्या वाद्यामुळें अथवा संगीतध्वनीमुळें कोणाहि मुसलमानाच्या प्रार्थनेंत व्यत्यय आल्याचें किंवा अन्य कारणानें डोकें फिरल्याचें उदाहरण घडून आलें नाहीं. अगदीं धर्मलंड होत चालले हे बगदादचे लोक! त्याना धार्मिक शिक्षण देण्यासाठीं हिंदुस्थानातील मौलाना-मौलवींचें एक पार्सल पाठविण्याची व्यवस्था ताबडतोब झाली पाहिजे!

आर्यसमाजानें केलेली महत्त्वाची कामगिरी म्हणजे हिंदूसाठीं वेगळी स्मशानभूमि मिळविली ही होय. बाराकसारीक सामाजिक अडचणींत आर्यसमाजाचें कार्य प्रशंसनीय होतें. हिंदुस्थानातील धनिकांनी या संस्थेस हातभार लावणें इष्ट आहे.

### टपालाचीं निरनिराळीं वाहनें

एका बाबींत इराकानें फार पुढें मजल मारली आहे आणि ती म्हणजे दळणवळणाचे बाबतींत. बसरा-बगदाद या शहरांमध्यें वैमानिक टपाल आजमितीं तरी दिवस चालू आहे. कैरोहून विलायती टपाल आणणें व कैरोला विलायती डांक पोंचविणें हीं कामें हीं विमानें दरआठवड्यास करतात. कांहीं उतारूंची सोयही या बसरा-कैरो आकाशमार्गानें होते. पण बसरा ते बगदादपर्यंतचेंच भाडे दरउतारूस ९ पौंड म्हणजे सुमारें १३० रुपये होतें. विमानांत अद्याप पहिला वर्ग, दुसरा वर्ग, साहेबी डबा असे भेदभाव निघाले नाहींत असें खात्रीलायक माहितीवरून कळतें.

या सवलतीनें बगदादला टपालाच्या पेट्या चार आहेत. एक इराकामधील रेल्वेनें जाण्याची;

दुसरी समुद्रमार्गे हिंदुस्थान, इंग्लंड इकडे टपाल पाठविण्याची; वैमानिक टपालाची तिसरी पेटी आणि दमास्कस बेरूट हैफा या बाजूस मोटारींतून जाणाऱ्या टपालाची चौथी. भूमध्य समुद्रावरून इराकांत येणे या मोटारींमुळे फार सोयीचें झालें आहे ही १० चाकी मोटार म्हणजे एक आगगाडीचा पहिल्या वर्गाचा डबाच आहे. दरआठवड्यास तिची फेरी होते.

कैरोहून विमानानें विलायती डाक आणण्यानें दोन आठवड्यांची बचत होते. नेहमीचा मार्ग म्हणजे हिंदुस्थानांतून इराणी आखातांत येणाऱ्या आठवड्यांच्या बोटींचा. पण वैमानिकव्यवस्था झाल्यानें जातांना दोन आठवडे व येतांना दोन आठवडे अशी चार आठवड्याची काटकसर केल्यामुळें व्यापाऱ्यांना फायदा झाला आहे. वैमानिक टपालाचे दर वेगळे आहेत तेव्हां पोस्टालाहि जादा उत्पन्न होतें.

## इराकाला राष्ट्रीय बँक

इराकमध्यें हिंदी नाणेंच चालू आहे. फडणिसी दिवाणांना नोटा, नाणीं वगैरेमिळून सुमारें तीन कोटी रुपये इराकामध्यें खेळत असावेत असा अंदाज केला होता. परंतु इराकाचें ' पुरुषोत्तमदास ' सर ससून अफदी म्हणून एक वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध गृहस्थ आहेत. त्यांच्या अदमासानें ही रक्कम पांच कोटी रुपयांची असावी. हिंदुस्थानाच्या आर्थिक परिस्थितीवर याचा काय बरावाईट परिणाम होतो हे आर्थिक तज्ज्ञांनींच सांगावें. प्रस्तुत लेखकाचा तो अधिकार नव्हे. इराकी मंत्रिमंडळाची एक योजना अद्याप मूर्तस्वरूपांत आली नाहीं. त्यायोगें एक राष्ट्रीय पेढी निर्माण करून सुवर्ण नाणें पाडण्याचा फडणिसांचा विचार आहे. नोटा काढण्याचाही अधिकार त्याच पेढीला देण्यांत येईल. पण घोडें पेंड खातें तें भांडवलासंबंधीं. राष्ट्रीय कर्जाविना हें कार्य होणार नाहीं आणि मॅंडेटरी सत्तेच्या सावलींत वाढणारे धनिक कर्ज देण्यास सहसा राजी नसतात. तरीहि कांहीं स्वतंत्र व्यवस्था करून लवकरच बँक स्थापन करण्याचा आपला निश्चय फडणिसांनीं 'केसरी'च्या प्रतिनिधीस सांगितला आहे.

## अतिस्नेहः पापशङ्की

खानाकीन येथील हिंदी बंधूंनी प्रस्तुत लेखकास इराणांत एकटें न जाण्याची मनापासून विनंति केली. तिकडील लोक अशिक्षित, खेडवळ, अतएव "हिंदु" गृहस्थास त्यापासून साहजिकच भीति असावयाची. शिवाय वाटेंतील रस्ते बर्फमय झाल्यानें मोटारी अडकून पडण्याचा संभव. मग अशा ठिकाणीं तुमचें कसें होईल? बर्फमय प्रदेशांत राहण्याची तुम्हास कधींच संवय नाहीं. मुंबई-पुण्याकडील लोकांना ही हवा सोसवेल कशी? तेहरानला तर हिंदी गृहस्थ कोणीच नाहीं. फार्सीचें ज्ञानहि तुम्हास पुरेसें नाहीं. तेव्हां तुम्ही या वेळीं जाऊंच नका, आम्हाला फार काळजी वाटते, अशा अगदीं आपलेपणाच्या प्रेमळ विचारजन्य भीतिप्रद शंका हिंदी बंधुंस वाटल्या. लोक कितपत शिक्षित आहेत हें पाहाण्यासाठीं तर आपण जावयाचें. बर्फाची संवय नाहीं म्हणूनच बर्फमय प्रदेशात प्रवास करावयाचा, फार्सी भाषा अवगत नाहीं हे खरें, पण याच विचारानें जर चालावयाचें असेल तर प्रथमतः त्या देशाची भाषा शिकून मग हिंडावें असा कार्यक्रम आंखल्यास हिंदुस्थानांतील अर्धा भाग पाहण्यास जन्म पुरणार नाहीं! जेथें माणसे राहतात तेथें दुसऱ्या कोणत्याहि माणसाला जातां येतें, राहतां येतें. याच विचारानें मी प्रवास करीत असल्याचें सांगून त्यांची चिंता दूर करण्यासाठीं त्यांना दरआठवड्यास पत्र लिहिण्याचें आश्वासन देऊन निघालों.

बर्फामुळें मोटारगाड्या दोन ठिकाणीं अडल्या. रस्त्याच्या आजूबाजूस वस्ती फारच कमी असल्यानें एक रात्रभर इराणी कामकऱ्यांच्या झोपडींत राहावें लागलें. त्यांचें आदरातिथ्य पाहावयास मिळालें सहभोजनाचा काय पण एका ताटांत भोजन करण्याचा प्रसंग आला इत्यादि अनुभव कमी महत्त्वाचे आहेत कीं काय ? कोणत्याही कार्यांत विघ्नें आलीं नाहींत, संकटाचें मीठ नसलें तर त्यांत मौज ती काय राहिली?

# वऱ्हाड प्रांतिक परिषद् यवतमाळ

## अध्यक्ष न. चिं. केळकर यांचें भाषण

आपल्या परतंत्रतेचे हजारों प्रकार बनले आहेत. यांतून सुटका कशी होणार ? कोणत्याहि बाजूनें गेलों तरी याच मुद्दयाशीं येऊन गांठ पडते. म्हणून या प्रांतिक परिषदेच्या प्रसंगीं याच विषयाचा थोडासा विचार करूं. या अनेकविध परदास्यातून आज प्रत्यक्ष सुटका नाहीं. फक्त मनानें सुटकेची कल्पना करतां येईल. आजचें हें दास्य फांशीच्या शिक्षेसारखें असतें तर प्रश्नच नव्हता. पण ते जन्मठेप काळ्या पाण्यासारखें आहे. जन्मठेपेचीहि मुदत २० वर्षे मानितात. पण हिंदुस्थानाच्या दास्याची मुदत कोण ठरविणार? मुदतीची शिक्षा झाली असली तर बंदिवानाला निदान दिवस तरी मोजीत बसतां येतें व मुदत भरली म्हणजे सोडा म्हणून हक्कानें भांडतां येते. पण हिंदुस्थानाला परतंत्रतेची शिक्षा झाली तेव्हां तिची मुदत म्हणून ठरविलेलीच नव्हती ! अर्थात् ही मुदत आपणच वाढवूं तितकी वाढणारी व आंखडूं तितकी आंखडणारी आहे. पण आज केवळ कल्पनेवर निर्वाह करणें प्राप्त आहे.

हिंदुस्थानाची बंधमुक्तता होण्याच्या कल्पना तीन प्रकारें करतां येतात. (१) आधिदैविक (२) अध्यात्मिक व (३) आधिभौतिक. या तीनहि प्रकारच्या कल्पना करणारे लोक आढळतात. पण त्यांची संख्या सारखी नसते. आधिदैविक कल्पनेत रंगणारे लोक थोडे असतात. अगदीं नाहींत असे नाहीं. त्याना विचारले असतां तेहि कांहीं मुदत सांगत नाहींत. फक्त ईश्वराच्या मनात असेल तेव्हां सुटका होईल असें सागतात. व ईश्वरी कृपा होण्याला जें साधन करावें लागतें तें तुम्ही करीत नाहीं, भलत्याच दिशेनें जातां असे बोलूं लागतात. राजकीय चळवळीला ईश्वराचें अधिष्ठान नाहीं, हा त्यांचा मुख्य आक्षेप. कदाचित् त्यांची कल्पना अशी असेल कीं, पुराणांतल्या कथेप्रमाणें हिंदुस्थानांत झालेल्या प्रत्येक अवताराच्या पूर्वी, पृथ्वी गाईचें रूप घेऊन ब्रह्मदेवाला शरण गेली. तेव्हां त्यानें तिची दाद विष्णूपाशीं लावली. विष्णूनें अवतार घेण्याचें वचन दिलें. दुष्टांचें निर्दालन केलें व पृथ्वीची मुक्तता केली. हिंदुस्थानाची सुटका अशीच एखाद्या अवतारानें व्हावयाची नसेल कशावरून ?

### आधिदैविक उपाय

किंवा या आधिदैविक कल्पनेचें दुसरें एक उदाहरण घेऊं. असें समजा कीं, एक दिवस सकाळीं भूकंप होऊन सबंध इंग्लंडच्या इंग्लंड समुद्राच्या तळीं बुडालें. असें झालें म्हणजे हिंदुस्थान आपोआपच स्वतंत्र होईल. द्वेष किंवा निराशा किंवा तळमळ किंवा तळतळाट अगदीं टोकाला जाऊन पोंचला म्हणजे असले इच्छाजन्य चमत्कार सहजच कल्पनेला सुचतात. पण असल्या आधिदैविक कल्पना व्यवहार्य वाटत नाहींत व म्हणून मनाला पटत नाहींत. अशा कल्पना न पटण्याचें कारण नास्तिकपणा हे नव्हे पण आस्तिकबुद्धीच्या मनुष्यालाहि त्या पटत नाहींत. कारण ईश्वर आहे. तो सगळें कांहीं करतो, घडवून आणतो, अशी भावना असली तरी त्याचें कर्तृत्व जगांत कसें घडतें, प्रत्ययाला येते, याच्या रीती पुष्कळशा ठराविक आहेत. त्याच्या कर्तृत्वाला सृष्टिनियमाच्या परिस्थितीचें बंधन घालूनच त्याच्या कर्तव्याची कल्पना आपणाला करता येईल. मी असें म्हणत नाहीं कीं, हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळावयाचें तर तें ईश्वराच्या इच्छेविरुद्ध किंवा त्याच्या कृपेशिवाय मिळेल. पण ही गोष्ट गृहीत धरली तरी वरील प्रकाराच्या आधिदैविक कल्पना मनाला करवत नाहींत व पटत नाहींत.

राजकारणाच्या चळवळीला भगवंताचें अधिष्ठान पाहिजे हे खरें. म्हणून तोहि मार्ग अनुसरावा हेंहि कबूल. पण कोणा एकाला सगळयाच गोष्टी करतां येत नाहींत. किंवा श्रमविभागाच्या तत्त्वानुसार सगळयाच गोष्टी एकटयानें करणें इष्ट नसते. म्हणून स्वातंत्र्य मिळविण्याचीं कामें ज्यानें त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें व शक्तीप्रमाणें वांटून घेतलीं पाहिजेत. हिंदुस्थानांत साधुसंत, पूज्य पुरुष, योगी नाहींत असें नाहीं, पुष्कळ आहेत. त्यांपैकीं पुष्कळांना राष्ट्रीय दृष्टीहि आहे व ते आपल्या पुण्याईचा अंश राष्ट्राला मोक्ष मिळण्याकडे खर्च करण्यास तयारीह असतात. दरबारांत ज्याप्रमाणें धर्मगुरूला पहिली खुर्ची देण्यांत येते त्याप्रमाणें राष्ट्रीय दृष्टीच्या धार्मिक सत्पुरुषांना आपण अग्रस्थान देऊं व त्यांचा आशीर्वाद घेत जाऊं. हिंदुस्थान स्वतंत्र होण्याची कल्पना करावयाची तर वर सांगितलेल्या दैविक प्रकारांनीं मात्र करवत नाहीं. म्हणजे उद्यां हिंदुस्थानापुरता ईश्वरी अवतार होऊन तो इंग्रजांना घालवून देईल किंवा भूकंप होऊन इंग्लंड रसातळाला जाईल, अशा कल्पना आस्तिक मनुष्याला तो जर सुजाण असेल तर करतां येणार नाहींत.

याच्या खालोखाल कल्पना म्हटली तर ती अशी–पूर्वीच्या महायुद्धासारखें लवकरच एखादें नवें महायुद्ध निर्माण होईल. त्यांत इंग्लंडाचा पूर्ण पराभव होईल, व मग गेल्या महायुद्धामुळें इंग्रजांनी जाहिरनामा काढून हिंदुस्थानाला स्वराज्याची सत्ता देण्याचें आश्वासन दिलें. त्यापुढें या नव्या महायुद्धांत मजल जाईल व पूर्ण स्वराज्य देण्याची इच्छा इंग्रजांना होईल किंवा होणें भाग पडेल. मग यावर शंका अशी कीं, ही कल्पना तरी अघटितच कां नाहीं ? येवढें महायुद्ध देशांत होणें व इंग्रजांचा पूर्ण पराभव होणें या गोष्टी घडतील काय ? ह्यावर माझें उत्तर असें कीं, असल्या गोष्टी ईश्वर केव्हां केव्हां मनानें मुद्दाम घडवून आणो किंवा त्या त्याच्या लीलेनें घडोत. त्या घडतात खऱ्या व मनुष्यबुद्धीच्या साच्यांत त्याचें हें कर्तृत्व बसवितां येत. इतिहासाकडे पहा. कारण नेपालियन बोनापार्टासारखा यशस्वी वीर शेवटीं पराभव पावून सेंट हेलिना बेटांत कैदी होऊन पडला व मेला. तसेंच जर्मन कायसर हा सर्व जगाला भारी असें वाटत असतां आज त्याची कोण स्थिति ! त्याला आपल्या देशांत पाऊल घालतां येत नाहीं व परदेशांत एका कोपऱ्यांत बसून, नवी बायको करून व जुनी नातवंडें खेळवून, उरलेलें आयुष्य त्याला काढावें लागत आहे !

रशियाचा झार म्हणजे अनियंत्रित राज्यसत्तेचें केवळ उपमान ! असें असतां, सार्जंट कुत्र्यांना गोळ्या घालतो त्याप्रमाणें त्याच्याच सैनिकांनीं त्याला गोळ्या घालून, सहकुटुंब सहपरिवार ठार केलें हें जगानें पाहिलें. तात्पर्य, इतिहासांत या प्रकारची ईश्वरी लीला दिसून येते व तिजवर मनुष्याचा विश्वासहि बसतो. म्हणून अवतार होणें व भूकंपानें इंग्लंड बुडणें अशासारखाहि हा दुसरा चमत्कार आधिदैविक मानतां येत नाहीं. वर दिलेल्या ऐतिहासिक उदाहरणांप्रमाणें खुद्द इंग्लंडाचेंहि एक उदाहरण देतां येण्यासारखें आहे. तें असें. आज हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य आहे तसें इंग्लंडांत एक वेळ रोमन बादशहांचें राज्य होतें. इंग्रजांच्या आजच्या उत्कर्षामुळें व वैभवामुळें स्वतः त्यांना कधीं काळीं दास्य भोगावें लागलें असेल अशी कल्पना करणें कोणाला कठीण जाईल. पण ती गोष्ट खरीच आहे. आम्हीं आज इंग्रजाशीं ज्या भावनेनें वागतों व इंग्रज आम्हाशीं ज्या भावनेनें वागतात त्याच भावनेनें सुमारें १५-१६ शें वर्षांपूर्वी इंग्लंडांतील लोक व रोमन राज्यकर्ते परस्पराशीं वागत होते. पण पुढें एक काळ असा आला कीं, रोमन बादशाहीवरच घाला पडला, रानटी लोकांचा उत्पात झाला आणि 'जगांतील रोमन साम्राज्य गेलें तरी जावो पण रोमनपुरतें घरचें स्वराज्य कसें तरी राहो' असें म्हणून इंग्लंडांतील सर्व रोमन सैन्य व त्याजबरोबर तेथील रोमन गव्हर्नर परत बोलावण्यांत आलें व ब्रिटिश लोक अकल्पित रीतीनें स्वतंत्र झाले.

## दास्यांतून सुटका कशी होईल ?

वाटेल तर या प्रकाराला कोणी आधिदैविक म्हणावें· पण तो इतिहासांत प्रत्यक्ष घडला म्हणून मनाला पटूं शकतो. इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानांतील इंग्रजांच्या राज्यासंबंधानें कधीं काळीं अशी गोष्ट घडेल काय असें कोणी विचारील तर 'कदाचित् घडलाह' असें उत्तर देतां येईल. नेपालियन बोनापार्ट, जर्मन कायसर, व रशियन झार यांचीं उदाहरणें व्यक्तींचीं होत. पण रोमन बादशाहीचें उदाहरण राष्ट्राचें आहे. व तीच कल्पना इंग्रजी राज्यासंबंधानें केली तर अगदींच वावगी होणार नाहीं. आज इंग्रजांनीं जगभर शत्रु निर्माण केले आहेत. म्हणून न जाणों जी गोष्ट गल्या महायुद्धांत फसली ती पुढील एखाद्या महायुद्धांत न साधेल कशावरून ! इंग्लंडाचें व अमेरिकेचें भांडण जुंपलें असून दोन राष्ट्रांची मनें घासत आहेत. न जाणों त्यांतून महायुद्धच निर्माण झालें व अमेरिकन आरमारानें इंग्लंडाच्या आरमाराचा फडशा पाडला तर ? हिंदुस्थानाला स्वातंत्र्य निदान स्वराज्य मिळण्याची ही कल्पना अचाट दिसते, परंतु ती एखाद्या इतिहासज्ञाला मनानें सहज करतां येईल. आणि खरोखरच असें कांहीं तरी अकल्पित घडल्याखेरीज म्हणजे इंग्लंड या मोठ्या संकटांत सांपडल्याशिवाय हिंदुस्थानावरचा त्याचा पाश ढिला होणार नाहींत. कारण आजची स्थिति जमेस धरून सरळ युक्तिवाद करीत गेलें तर शेवटीं निराशेशींच गांठ पडते ! कसें तें पाहा. १५० वर्षांपूर्वी इंग्रज व हिंदी लोक यांच्यांत जें अंतर होतें तें आज कोणत्या दृष्टीनें खरोखर कमी झालें असें म्हणतां येईल ? विद्या, संपत्ति, शास्त्रज्ञान, योजना, यंत्रकला, संघटना, अनुभव, द्रव्यसाधन, सैन्य कोणतीहि बाब घेतली तरी, तींत हेंच दिसून येईल कीं, १५० वर्षांपूर्वी त्यांच्या आमच्यांत जें अंतर होतें तें आज वाढलेलेंच आहे, कमी झालेलें नाहीं. आणि याच्या पुढील काल घेतला तरी हें अंतर कधीं न तुटतां उलट वाढणारेंच आहे. म्हणून १५० वर्षांपूर्वी ज्या गोष्टी नव्हत्या असल्या कांहीं नवीन गोष्टी यापुढें निघाल्याशिवाय या दास्यांतून सुटका होण्याची आशा कशी करावी ? वरच्यांपैकीं कोणतीहि एक गोष्ट घेऊन प्रश्न विचारावा व त्याचें उत्तर आपणच देऊन पाहावें म्हणजे कळेल.

## अंतर वाढत आहे

लहान मुलांना सहज फसविण्याकरितां गणितांतलें एक उदाहरण गमतीनें घालीत असतात. अ व ब या दोन मुलांच्या वयांत गेल्या १० वर्षांत ५ वर्षांचें अंतर पडलें. तर पुढील २० वर्षांत किती अंतर पडेल ? या उदाहरणांतील मर्म समजून सांगण्याचें कारण नाहीं. त्यांतील फसवणूक उघडच आहे. अशाच रीतीनें म्हणजे अगदीं सरळ गणिताने विचार केला असतां, इंग्रज व हिंदुस्थानांतील लोक यांच्यांतील अतर पुढें कितीहि काल गेला तरी कसें तुटणार? उलट तें गणितश्रेढीनें किंवा भूमिती-श्रेढीनें वाढत जाणार. १५० वर्षांपूर्वी इंग्रजांनीं साम्राज्य स्थापण्यास प्रारंभ केला होता तरी ते आमच्या फार तर चार पावलें पुढें होते. आज तें अंतर दसपट वाढलें आहे. पूर्वी त्यांच्या आमच्या शस्त्रास्त्रांत इतकाच फरक होता कीं, त्यांच्या बंदुका आमच्या बंदुकांपेक्षां पांच-पन्नास यार्डांनीं अधिक पल्लेदार होत्या. पण तेव्हां आमच्या हातीं कसल्या का होईना बंदुका तरी होत्या, पण आज त्याहि नाहींत ! उलट इंग्रज ४,००० फुटांवरून विमानांतून बॉम्बगोळे टाकूं लागले आहेत. त्याला उत्तर देण्याला आमच्या-जवळ काय आहे ? १५० वर्षांपूर्वी हिंदुस्थानांतील इंग्रजाजवळ तारायंत्र नव्हते. व आज आम्ही त्यांचें तारायंत्र तोडलें तरी बिनतारेनें ते आपले संदेश पाठवूं शकतात. १५० वर्षांपूर्वी इंग्रजांना इंग्लंडाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि देशांतून साधन-सामुग्री मिळत नव्हती. आज त्यांना सर्व जगाच्या पाठीवरून हरतऱ्हेची साधनसामुग्री मिळं शकेल. आरमाराच्या दृष्टीनें इंग्लंड हे फ्रान्स, अमेरिका, जपान यांना वरचढ आहेच. पण व्यापारी जहाजांच्या दृष्टीनें पाहिलें तर त्याचा हात कोणनेच राष्ट्र धरूं शकणार नाहीं. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, जुन्या पद्धतीनें खडे उभे राहून समोरासमोर इंग्रजांशीं लढूं म्हटलें तरी तें १५० वर्षांपूर्वीपेक्षां दसपट अधिक अशक्य झाले आहे. अशा स्थितींत जवळ जवळ स्वातंत्र्याच्या व सुटकेच्या कल्पना प्रायः आधिदैविक अशाच सुचाव्या यांत आश्चर्य नाहीं. पण त्या पटत नाहींत म्हणूनच दिस-ण्यांत आधिदैविक पण पुष्कळशी आधिभौतिक व इतिहास सिद्ध अशी कल्पना मी वर सुचविली आहे. "England's difficulty is our opportunity" या तत्त्वावर माझा पूर्ण विश्वास आहे. कारण आम्ही सरळ लढून स्वतंत्र होणें हे जसें आज अशक्य तसेंच सरळ न्यायबुद्धि सुचून आम्हाला इंग्रजानीं स्वराज्य देणें हेंहि अशक्य होय.

## अध्यात्मिक कल्पना

आधिदैविक कल्पना सोडून आतां अध्यात्मिक कल्पनांकडे वळूं. या कल्पना मनाला अधिक पटणाऱ्या असतात. कारण त्यामध्ये ईश्वरी कृपेचें किंवा दैवाचें पारतंत्र्य नाहीं, तर जीवात्म्याच्या स्वतंत्र वृत्तीचें लक्षण आहे. अध्यात्मिक स्वतंत्र कल्पना प्रायः आत्मिक बलावरच असणार व हें आत्मिक बल वाढविण्याचा उपदेश देशांतील पुढाऱ्यांनीं केलेला आहे व तो तितक्यापुरता योग्यहि आहे. स्वातंत्र्यप्राप्तीकरितां कोणी आत्म-संयमन सुचवितो; कोणी तितिक्षा सुचवितो, कोणी मनन सुचवितो, कोणी अभ्यास सुचवितो, कोणी त्यागबुद्धि सुचवितो, कोणी चित्तशुद्धि सुचवितो, कोणी समाजसेवा सुचवितो, कोणी सात्विक भाव-नांचा उत्कर्ष सुचवितो अशा रीतीनें आत्मा समर्थ व प्रबल करण्याला जे जे गुण उपयोगी पडण्यासारखे असतील ते ते निरनिराळ्या रीतींनें सुचविले जातात. पण हे सर्व सद्‌गुण सर्व जनतेनें एकाच वेळीं संपादन करणें ही गोष्ट अशक्य कोटींतील असल्यामुळें शेवटीं एखाद्या व्यक्तीनें आपलें अध्यात्मिक स्वातंत्र्य हेंच राष्ट्राचें स्वातंत्र्य असें म्हणून घ्यावें लागते. 'आपण मेलों जग बुडालें' ही जुनी म्हण प्रचलित आहेच. तेव्हां तिचा उत्तरार्ध म्हणून 'मी मनानें मुक्त झालों तेव्हां राष्ट्रहि मुक्त झालें' अशी म्हण सद्‌बुद्धीनें पाडण्याला कोणती हरकत? अर्थात् या म्हणीला हरकत नाहीं. पण प्रत्यक्षपणें पाहावयाचें म्हणजे पूर्वार्ध जितका खरा तितकाच उत्तरार्धहि खरा ठरणार. एका व्यक्तीला आत्म-हत्येनें जसें सर्व जग बुडवितां येत नाहीं तसेंच एक व्यक्ति पूर्ण सद्‌गुणसंपन्न झाल्यानें किंवा आपला आत्मा शक्य तितका अधिक प्रबल केल्यानें सगळ्या राष्ट्राला तारण्याचें काम तिच्या हातून होत नाहीं.

येशू ख्रिस्ताला ख्रिस्ती-बंधु "लोकतारक" मानतात परंतु तारक याचा अर्थ जामीन असा नसून वकील असा आहे. तो ईश्वरापाशीं मनुष्याची रदबदली करील पण या रदबदलीला योग्य असें सद्वर्तन किंवा पुण्य स्वतः मनुष्याच्या हातून घडावें लागतें. थोडासा पुरावा असला तरी तो वकिलाला खुलवून दाखवितां येईल. परंतु मुळांत पुरावा नसला किंवा गुन्हेगारानें अपराधाची तोंडानें कबुली दिली तर वकील त्याला बचावूं शकत नाहीं. स्वतः ख्रिस्तानें छळ सोसल्यानें त्याला ईश्वरापाशीं मनुष्याची रदबदली करण्याचा अधि-कार मिळाला पण मुक्ति मिळण्याकरितां जें दंडन सोसावें लागतें तें दंडन सर्व जगानें सोसल्याची पावती येशू ख्रिस्ताला ईश्वराकडून मिळाली नाहीं. तात्पर्य,

स्वातंत्र्याची अध्यात्मिक कल्पना स्वावंलबनावर रचलेली म्हणून ती आधिदैविक कल्पनेपेक्षां अधिक ग्राह्य. परंतु तिची योग्य मर्यादा ओळखली पाहिजे. म्हणजे देशांतील एखाद्या पुढाऱ्यानें सद्गुण-संपन्न होऊन राष्ट्रस्वातंत्र्याचा अनुभव मला मिळाला म्हटले तर ते त्याचे उद्गार जनतेनें शब्दशः घेतां कामा नये.

## आधिभौतिक कल्पना

अध्यात्मिक कल्पनेनंतर ओघानेंच आधिभौतिक कल्पना येते. आणि आधिभौतिक कल्पनेंने राष्ट्राला जे स्वातंत्र्य मिळेल तेंच माझ्या मते खरें स्वातंत्र्य ठरेल. राष्ट्रीय स्वातंत्र्यही कांहीं केवळ कल्पनेची गोष्ट नाहीं, तर ती अनुभवाची आहे. व अनुभव जसा आधिभौतिक म्हणजे इंद्रियगम्य पाहिजे तसा प्रयत्नहि समग्र जनतेकडून आत्मिक व मानसिक शक्तीची मदत घेऊन पण प्रत्यक्ष शरीरानें झाला पाहिजे. हल्लींच्या पारतंत्र्याची कल्पना अनुभवानें सोडवूं लागलों असतां संसारांत व व्यवहारात त्या पारतंत्र्याची पदोपदीं गाठ पडते. कोठें त्यावर पाय ठेचाळतो तर कोठें त्यावर डोकें आपटते कोठें त्याकडून आपले कान उपटले जातात तर कोठें त्याची लाथ आपल्या पाठीत बसते. म्हणून पारतंत्र्य गेलें व स्वातंत्र्य मिळालें याचा अनुभव यावयाचा तर तोहि आपल्या राष्ट्रीय शरीराच्या हालचालीत, चळवळींत व सचारांत मिळणारा आहे. आणि तें मिळवावयाचें तर राष्ट्रीय शरीराच्या सर्व अवयवांनी व इंद्रियांनी सारखेंच झटले पाहिजे.

यावर शंका अशी की, एका जीवात्म्याला पूर्णता प्राप्त झाल्यानें जसें सर्व राष्ट्र स्वतंत्र होणें अशक्य तसेंच उलट राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्ति हवी तितकी ज्ञानी, उद्योगी, कार्यक्षम, स्वार्थत्यागी किंवा पराक्रमी होणें ही अपेक्षाहि व्यर्थ होय. म्हणून ती एक कल्पना जशी व्यर्थ तशी दुसरीहि व्यर्थ होय. पण खरें सत्य ह्या दोन टोकांच्या दरम्यान आढळेल. म्हणजे कोणी एकच पुढारी हवा तसा निर्माण झाल्यानें राष्ट्राला स्वातंत्र्य मिळत नाहीं, तर कांहीं एका प्रमाणापर्यंत पुष्कळशी जनता ज्ञानी व कार्यक्षम बनावी लागते. आजची स्वराज्याची चळवळ ही वरील स्वरूपाचीच आहे. म्हणजे कोणाहि एका व्यक्तीवर न विसंबतां किंवा यच्चयावत् सगळी जनता एकाच मार्गानें जाईल अशी वाट न पाहतां, अनेक व्यक्तींच्या प्रयत्नांना हें प्रमाण भरून काढणे ही राजकीय चळवळच होत आहे. म्हणून ध्येय एकच असलें तरी मार्ग अनेक व भिन्नभिन्न आहेत व असणार ही गोष्ट मनाला पटते व म्हणूनच कोणाहि एकाच मार्गाची फाजील स्तुति किंवा गुण-वर्णन केले असतां ते सुजाण मनुष्याच्या मनाला पटत नाही. जुन्या शिक्षणक्रमांत एकच शिक्षक वर्गातील विद्यार्थ्यांना सगळे विषय शिकवीत असे. पण नव्या शिक्षणक्रमांत वर्गाची जबाबदारी एकावर असली तरी निरनिराळे विषय शिकविण्याला निरनिराळे तज्ज्ञ शिक्षक नेमले जातात. आम्हीं गुरु-माहात्म्याच्या कल्पनेत वाढलेल्या देशांतील लोक असल्यानें गुरुसंप्रदायांत अनन्यबुद्धि हीच श्रेष्ठ कशी मानली जाते हे जाणतो. तथापि श्रीमद्भागवतांतील अवधूतानें २४ गुरू करून जे उदाहरण घालून दिलें तेंच हिंदी जनतेनें आज अनुसरले पाहिजे. स्वराज्याची किंवा स्वातंत्र्याची आधिभौतिक कल्पना साधनमार्ग व गुरुपरंपरा वेगवेगळ्या मानल्या-शिवाय सिद्ध करतां येणार नाहीं किंवा अनुभवितां येणार नाहीं.

## स्वराज्य आधिभौतिक पाहिजे

इतक्या वेळच्या विवेचनावरून हें दिसून येईल कीं, माझा दैववाद देखील इतिहासाला धरूनच आहे. आधिदैविक किंवा अध्यात्मिक यांपैकीं स्वराज्याचा कोणताहि प्रकार किंवा स्वराज्य मिळविण्याचा मार्ग डोळ्यापुढे ठेवून चालणार नाहीं. तो मार्ग मुख्यतः आधिभौतिक असला पाहिजे. मनुष्याचा प्रयत्न शेकडा ८० टक्के झाला म्हणजे मग 'दैवमेवात्र पंचमम्' या न्यायानें उरलेल्या २० टक्क्यांकरिता दैव किंवा ईश्वरी कृपा यांची अपेक्षा करण्याचा अधिकार त्याला पोंचतो, तोंपर्यंत पोंचत नाही. आधिभौतिक स्वराज्य म्हणजे जें स्वराज्य सांगो-पांग व अंतर्बाह्य पंचकर्मेंद्रियांनीं अनुभवितां येते व पंचज्ञानेंद्रियांना परामर्षितां येते. तें स्वप्नांतलें किंवा मायेतलें सत्य का होईना पण त्यालाहि आधिभौतिकच स्वरूप असतें व असलें पाहिजे या आधिभौतिक स्वराज्याला प्रथमतः मनुष्य ज्या जागेवर दोन पायांनीं उभा राहतो ती जागा स्वतःचीच आहे व ती माझ्या देशाची आहे असें निश्चित म्हणता येण्यासारखी स्थिति असावी लागते ही गरज ऐहिक दृष्टीनें स्वार्थी असणाऱ्या माणसालाच आहे असें नाहीं तर रामदासासारख्या साधु-ब्रम्हचाऱ्यालाहि असते. शिवाजी-महाराजांनीं स्वराज्य मिळविलें त्यांत व्यक्तिशः रामदासांचा इतर ऐहिक फायदा कांहींच नव्हता. पण पूर्वी यवनांच्या त्रासामुळें देव पावले ठेवण्यापुरत्या भूमीवरहि स्वस्थपणें बसून त्यांना स्नानसंध्या कोठें करतां येत होती ? आणि हिंदवी स्वराज्य स्थापन झाल्यावर "उदंड जाहलें पाणी स्नानसंध्या करावया" असें हर्षभरित उद्गार काढून त्यांनीं शिवरायाच्या स्वराज्यप्राप्तीचें अभिनंदन केलें आहे. रामदासांचे आधिदैविक व अध्यात्मिक स्वराज्य सिद्धच होतें.

पण त्यांना व त्यांच्या देशाला आधिभौतिक स्वराज्य नव्हते. या एकाच उदाहरणावरून मी म्हणतो त्या आधिभौतिक स्वराज्याची कल्पना खालपासून वरपर्यंत व समाजाच्या सर्व अंगासंबंधाने करता येईल. कोणत्याहि राष्ट्राच्या सामान्य क्रमाप्रमाणें स्वराज्य चालविणाऱ्या लोकांचे भौतिक तोंडानें व भौतिक कागदावर लिहिलेले हुकूम राष्ट्रांतील सर्व भौतिक सजीव शरीरापर्यंत जाऊन पोंचले पाहिजेत. त्यांचा तेथे भौतिक क्रियेनें अंमल झाला पाहिजे व त्यांनीं दिलेले भौतिक करभार वटहुकूम काढणाऱ्या अधिकाऱ्यापर्यंत पोचून दरम्यानच्या सर्व खात्यावरचीं भौतिक कामें लोकमताला मान्य असलेल्या एका किंवा अनेक अधिकाऱ्याच्या आज्ञेनें चालली पाहिजेत व देशांत राज्य सुरळीत सुव्यवस्थित व सुखाचे झालें पाहिजे. इतकेंच नव्हे तर परकीयाना दहशत बसून देशाचें भौतिक संरक्षण सर्व शस्त्रांपासून झालें पाहिजे. असलें आधिभौतिक स्वराज्य मिळविणें हें व स्वराज्याच्या चळवळीचें ध्येय आहे शिवाय हें मिळविण्याच्या चळवळींत इतरहि कांहीं गोष्टी लक्षात ठेविल्या पाहिजेत. त्या अशा, जग हें त्रिगुणात्मक आहे म्हणून राष्ट्रोपयोगी व राष्ट्रहितानें प्रेरित झालेल्या सर्व शक्तींचे व स्वभावगुणाचे फायदे आपले म्हणून राष्ट्रीय चळवळीस घेण्यास तयार झालें पाहिजे. कवींनें म्हटलें आहे कीं:---

"त्रिगुणात्मक जग एकया मानें मोजुं पाहसी तूं कसा! अक्षक्रीडा एकयादानें सार्थ सफळ कैसी होई" सोंग्या फाशाच्या खेळांतहि जर सतत एकच दान पडून व एकच डाव देऊन खेळ रंगत नाहीं व सिद्धीला जात नाहीं, तर त्रिगुणात्मक जगात कोणत्याहि एकाच कल्पनेचे नियम घालून व तिचा जुलूम सर्वांवर करून चळवळ यशस्वी होणें शक्य नाहीं. अर्थात् आधिभौतिक स्वराज्यसाधन त्रिगुणात्मक आहे असे मानले पाहिजे. तसेंच मुलांचे उष्टावण करताना जसें त्याला त्याच्या आवडीचा पदार्थ घेऊं देऊनच हा संस्कार करावयाचा, त्याप्रमाणें कोणत्याहि राष्ट्रभक्तानें आपल्याला प्रिय अशा मार्गानें स्वराज्य साध्य केलें तर तो मार्ग ग्राह्यच मानला पाहिजे राष्ट्रीय चळवळ ही मधुकऱ्यांच्या झोळीप्रमाणें असावी. तींत कोणाच्या हातून मधुकरी म्हणून कोणता पदार्थ वाढला जाईल तो जावो. पण तो एकत्र मिसळून व पवित्र प्रेमोदकाचें त्यावर सिंचन करून तो राष्ट्रानें सेवन केला पाहिजे तरच मधुकरीचें पुण्य व मधुकरीची सिद्धि लाभेल. आज मी अमुकच पदार्थ खाणार अशी इच्छा करून मधुकरी बाहेर पडला तर त्याला कित्येक वेळां रिकाम्या झोळीनेंच परत यावें लागेल.

## क्रम, आक्रम व पराक्रम

राष्ट्रसेवा ही जशी मानसिक दृष्ट्या त्रिगुणात्मक असणार तसाच तिचा शारीरिक प्रकारहि त्रिगुणात्मक आहे व तो क्रम, आक्रम व पराक्रम या तीन सदरांखालीं पडतो. क्रम चालू ठेवल्यानें कांहीं कालानें आक्रम होऊं शकतो. म्हणजे विद्यार्थी जसा एकेक इयत्ता अभ्यासक्रम करीत राहिल्यानें एकेक इयत्ता वर चढत जातो व त्याला चढत्या मार्गातलें यश मिळत जातें, तसेंच राजकारणांतहि क्रमाच्यायोगानें आक्रमण करता येतें. अशा रीतानें क्रम अनुसरून आक्रमण करणाऱ्या व्यक्तींनींच पुष्कळसा समाज भरलेला असतो. तथापि पराक्रमाला केव्हांहि जागा आहेच आहे (देअर इज आल्वेज रूम ॲट दी टॉप). कित्येक विद्वान लोक युनिव्हर्सिटीकडे गेलेलेच नसतात. ते नैसर्गिक बुद्धि व स्फूर्ति यांच्यायोगानें पदवीधरांपेक्षांहि श्रेष्ठ ठरतात. त्या रीतीनें राजकारणांतहि पराक्रमी होण्याला क्रम व आक्रम हे लागत नाहींत. शिवाजीमहाराज हे कोणत्याहि लष्करी कॉलेजांत शिकले नव्हते किंवा अलेक्झांडरहि शिकला नव्हता. समरभूमि हीच त्यांना प्रत्यक्ष शाळेसारखी उपयोगी पडली पण अशा रीतीनें क्रम आक्रम व पराक्रम हे मार्ग आणि सात्विक, राजस व तामस हे तीनहि गुण राष्ट्रकार्याला उपयोगी पडतात. म्हणून वर सांगितलें यावरून सर्वांची योग्यता सारखीच आहे असें मात्र मी म्हणत नाहीं. समाजहि इतका गुणग्राही व न्यायी असतो कीं, तो या तीनहि प्रकारच्या लोकांना योग्यतेनुरूप चढती कीर्ति व मान्यता देतो. पण सांगण्याचा माझा मुद्दा इतकाच कीं पराक्रम आपल्या शक्तीबाहेर म्हणून करतां येत नाहीं व क्रम व आक्रम तुच्छ मानून अनुसरावयाची नाहींत अशा वृत्तीचीं माणसें लोकांची नेहमीं दिशाभूल करतात व स्वतःहि कांहीं करू शकत नाहींत. या दिशाभुलीतून वाट काढून प्रत्येकानें आपआपल्या शक्त्यनुरूप व स्वभावानुरूप कार्य करीत राहिलें पाहिजे तरच स्वरूपप्राप्तीची आशा धरतां येईल."

शेवटीं अध्यक्षानीं हल्लीं चाललेली दडपशाही विशेषतः कम्युनिझमच्या नांवानें ३१ लोकांवर खटला करण्याचा सरकारचा हेतु स्पष्ट करून सांगितला आणि 'कम्युनिझम' म्हणजे काय हेहि विशद करून सांगितलें. तसेंच कृ. प्र. खाडिलकर यांच्या खटल्याचा उल्लेख करून ते म्हणाले कीं, "अशा दडपशाहीनें चळवळ मागे

हटूं शकणार नाहीं व खाडिलकर हे तुरुंगात गेले तर लगेच स्वतः त्यांच्या मुलानें पुढें येऊन नवा काळ पत्राचें संपादकत्व जबाबदार रीतीनें आपल्याकडे घेतलें. यावरून या दडपशाहीला तोंड देण्याचाच तरुण पिढीचा पूर्ण निश्चय आहे हें सिद्ध होईल."

# पुस्तक–परीक्षण

## कौटिलीय अर्थशास्त्र

### लेखांक १ ला

'कौटिलीय अर्थशास्त्र' या संस्कृत ग्रंथाच्या भाषांतराचा पहिला भाग १९२७ सालीं प्रसिद्ध झाला त्या वेळीं त्याचा परिचय वाचकांना आम्हीं करून दिलाच होता. हल्लीं या ग्रंथाचा उरलेला दुसरा भाग प्रसिद्ध होऊन तें काम पुरें झालें, याबद्दल भाषांतरकार व प्रकाशक या दोघांचेंहि आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो. पण त्याबरोबर मराठी वाचकवर्गाचेंहि अभिनंदन केल्याशिवाय राहावत नाहीं. कारण भरत खंडांतील प्राचीन विद्या विद्वत्ता व सुधारणा यांच्याविषयीं ज्या ग्रंथाच्या जोरावर आपणाला साधार व सकारण असा अभिमान बाळगता येतो त्यांतील श्रेष्ठ ग्रंथांमध्यें या ग्रंथाची गणना अवश्य करावी लागते. परंतु मूळ ग्रंथ संस्कृतांत, व त्यांतूनहि सूत्ररूपानें म्हणजे होतील तितके शब्द वाचवून म्हणजे कापडाचे धागे ठासून विणतात त्याप्रमाणें, लिहिलेला असल्यामुळें, सामान्य वाचकांस तो उपलब्ध झाला तरी त्यांतील सर्व मर्म कळणें अशक्यप्राय होतें. परंतु तोच ग्रंथ आता प्रस्तुत भाषांतराच्या रूपानें प्रकाशित झाल्यामुळें खासगी व सार्वजनिक मराठी ग्रंथसंग्रहांतून त्याला कायमचें स्थान मिळेल. आणि अभ्यास करण्याची उमेद किंवा निदान कुतूहलबुद्धि यांपैकीं कोणत्याहि हेतूनें तो वाचण्याची इच्छा धरणारास तो आतां सहज वाचतां येईल. म्हणून आर्यविद्याभिमानी असे हजारों मराठी वाचक तो ग्रंथ वाचून, भाषांतरकारांच्या व प्रकाशकाच्या श्रमांचे चीज करून त्याबरोबर आपली आकांक्षाहि तृप्त करतील याविषयीं आम्हास शंका वाटत नाहीं.

या ग्रंथाचे प्रकाशक, मुळे यांनीं या दुसऱ्या खंडाच्या प्रारंभीं जें स्वतःचें हृद्गत सांगितलें आहे तें बोधप्रद आहे. मुळे यांचें शिक्षण जुन्या समर्थ विद्यालयांत श्री. तात्यासाहेब करंदीकर यांचे हाताखालीं झालें. व त्यानंतर सुप्रसिद्ध महाराष्ट्र पत्राचे संपादक श्री. ओगले यांचजवळ मुळे यांनीं दोन वर्षें खासगी शिक्षण घेतलें. या दोन सन्मार्गदर्शक शिक्षकांनीं मुळे यांच्या मनांत जें सत्प्रवृत्तीचें बीज निर्माण केलें तें फलप्रद झालें यांत शंका नाहीं. कारण विद्यार्जन संपल्यानंतर वडिलोपार्जित पुस्तकविक्रीचा व प्रकाशनाचा धंदा त्यांनीं पुढें चालविला; आणि रोजनिशा पचांगें व किरकोळ धार्मिक पुस्तकें छापून विकून उदरनिर्वाह होत असताहि, त्याहून विशेष प्रतीचें व राष्ट्रोपयोगी असें आपल्याच धंद्यांतलें एखादें कार्य करावें असें त्यांना वाटलें. आणि चित्रमय जगताच्या एका अंकांत कौटिलीय अर्थशास्त्राचे कांहीं उतारे प्रसिद्ध झाले होते ते वाचून या महत्त्वाच्या ग्रंथाकडे त्यांचें लक्ष वेधलें, व कितीहि खर्च आला तरी हा समग्र ग्रंथ भाषांतरासह प्रसिद्ध करून मराठी वाचकांच्या हातीं द्यावा असा निश्चय त्यांनीं केला. यावरून चांगल्या शिक्षकांशीं सहवास घडल्यानें व मुळे यांच्या मनात सत्प्रवृत्तीचें बीज रुजलें व तें दृढ निश्चयानें फळाला आलें असें जें आम्ही वर म्हटलें तें खरेंच आहे हें कोणीहि मान्य करील.

मुळे यांनीं गेलीं १० वर्षे हा निश्चय मनांत कायम ठेवला हें त्यांना भूषणावह आहे. परंतु त्यांचा हा निश्चय कायम सिद्धीस जाण्याला फिरून त्यांचे शिक्षक करंदीकर हेच उपयोगी पडले. कारण या ग्रंथाचें सर्व भाषांतर करून देण्याच्या कामाला स्वतः करंदीकर यांना जरी भरपूर वेळ नव्हता तरी, हस्त नाहीं तर परहस्तें या न्यायानें त्यांनीं नगरचे विद्याभिलाषी गृहस्थ बळवंतराव हिवरगांवकर यांना विनंति करून हें भाषांतर करविलें व नंतर तें स्वतः पाहून तपासून प्रकाशनाचें काम हल्लीं पुरें केलें. या अत्यंत परिश्रमाच्या कार्यांत मुख्य भाग हिवरगांवकर यांनीच उचलला खरा. कारण सर्व भाषांतर त्यांनीं करून शिवाय दुसऱ्या खंडाला जोडलेली मोठी विवेचनात्मक प्रस्तावनाहि लिहिली. तथापि भाषांतर रुजू पाहणें व वेगळी आणखी एक विवेचनात्मक प्रस्तावना लिहिणें हीं कामेंहि परिश्रमाचींच होतीं, व तीं करंदीकर यांच्या उद्योगप्रियतेमुळें व निष्ठेमुळें पार पडलीं. परंतु हिवरगांवकर हे भाषांतर पूर्ण करून निमी-

अधिक प्रस्तावना झाल्यावर दुर्दैवानें निवर्तले, व हा ग्रंथ वाचकांच्या हातीं संपूर्ण व सांगोपांग पडलेला पाहाण्याचा आनंद अनुभविण्यास ते राहिले नाहींत, याबद्दल मुळे व करंदीकर यांच्याप्रमाणें आम्हालाहि मोठी हळहळ वाटते. या ग्रंथाला कारणीभूत झालेल्या या त्रिवर्गांचा उल्लेख अशा आदरबुद्धीने व विस्तृत करण्याचें कारण हेंच कीं, असले ग्रंथ तयार करण्याचें काम किचकट, तें छापण्याला खर्च फार, व मराठी वाचकाची स्थिति पाहावी तर त्यांनीं उदार आश्रय देऊनहि प्रकाशनाचा खर्च भरून निघण्याचीहि मारामार. म्हणून असे ग्रंथ प्रसिद्ध होण्याला विशेष प्रकारची राष्ट्रीय अभिमानाचीच दृष्टि लागते. असो. आतां राष्ट्रीय अभिमान जागृत करणाऱ्या अशा या ग्रंथाकडे वळूं.

या ग्रंथाच्या पहिल्या भागाचें समालोचन आम्ही केलें तेव्हां या ग्रंथाच्या योग्यतेविषयीं दोन शब्द लिहिलेच होते त्याविषयीं द्विरुक्ति न होतां परीक्षण लिहिण्यासारखा विषय या दुसऱ्या भागांत कांहीं अधिक आलेला आहे. पण कांही बाबतींत थोडीशी द्विरुक्ति झाली तरी ती हवीच आहे. कारण असे महत्त्वाचे ग्रंथ वरचेवर प्रसिद्ध होत नाहींत. म्हणूनच त्यांच्याविषयीं कांहीं निमित्तानें पुनरुक्ति करण्याचा योग आल्यास तो आनंददायकच वाटतो. कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथ २२ शें वर्षांपूर्वी लिहिला गेला असें मानण्यास हरकत नाहीं पण युरोपियन चिकित्सक पंडितांना अशी एक सवय आहे कीं, कोणताहि संस्कृत ग्रंथ घेतला असता तो होतां होईतों आधुनिक ठरविण्याचा प्रयत्न करावयाचा ग्राम्य शब्दांनीं बोलावयाचें तर त्यांना ही 'वर्षे चोरण्याचा किंवा हरण करण्याची' संवय किंवा खोड आहे असें म्हणता येईल. लो. टिळकांनीं लिहिलेला वेदकालनिर्णायक ग्रंथ पुष्कळांनीं वाचला असेल. म्हणून त्याचा निर्देश येथ करून आम्ही वाचकांना असें सांगतो कीं, युरोपियन पंडितांना ही खोड कशी लागून गेलेली आहे, व तो केवळ सत्यान्वेषी चिकित्सक बुद्धीचा परिणाम नसून यांत खरोखर मानसिक दोष आहे, हें टिळकांनीं खोडून काढलेल्या युरोपियन पंडितांच्या अनुमानावरून कोणासहि सहज दिसून येईल. टिळकांप्रमाणें भांडारकर तेलंग वगैरे विद्वानांनाहि हाच अनुभव आल्याचें त्यांच्या ग्रंथांतून दिसतें. मग चिकित्सक बुद्धीचे म्हणविणाऱ्या युरोपियन पंडितांना, दुसऱ्याच्या संस्कृतीचीं वर्षे चोरून ती आधुनिक ठरविण्याची खोड असावी याचें कारण काय? याचें कारण हेंच कीं "विद्या व संस्कृति यांचा जगांतील उगम ख्रिस्त युगानंतरचा आहे, निदान ग्रीस व रोम खेरीजकरून जगांतील इतर भागांत ख्रिस्तापूर्वी संस्कृतीचा उगम नव्हता" अशी समजूत त्यांच्या मनानें करून घेतलेली आहे. अर्थात् स्वाभिमानाच्या अतिशयोक्तीचाच हा परिणाम होय.

प्रो. मॅक्समुल्लरसारख्यांनीं वेदवेदांगांचा कसून अभ्यास केल्यामुळें, हिंदुस्थान युरोपियन राष्ट्रांना काय शिकवूं शकेल याची योग्य कल्पना त्यांना आली; व ती त्यांनीं कृतज्ञतेनें व प्रांजलपणानें कबूलहि केली आहे. शिवाय त्यांना हेंहि कबूल करावेंच लागलें कीं, ख्रिस्त युगापूर्वी व त्यानंतरच्या कांहीं शतकांत इंग्लंड हिंदुस्थान संस्कृतिमय असतां इंग्लंड जर्मनी यासारख्या देशांतील तत्समकालीन समाज रानटी स्थितींत होते. अर्थात् भारतीय संस्कृत ग्रंथांचीं वर्षे होतील तितकीं कमी करण्यांत त्यांना इंग्लंड जर्मनी या देशाची संस्कृति आधीची असें ठरवावयाचें नव्हतें व ठरवितां आलेंहि नसतें. पण मॅक्समुल्लरादि पंडितांच्या या खोडीचें कारण घरच्यापेक्षां आजाळच्या विद्यासंपत्तीच्या अभिमाना मुळें उत्पन्न झालेलें होतें. ख्रिस्तयुगापूर्वीहि लॅटिन व त्यापूर्वी ग्रीक संस्कृति हीच काय ती सगळ्या जगांतील संस्कृति! आणि त्याव्यतिरिक्त जगांत इतर कोठें खरी संस्कृति अशी नव्हती असा त्यांचा समज! पण सुदैवानें अलीकडे पुराणवस्तुसंशोधन खात्यानें जो उद्योग चालविला आहे त्यामुळें ख्रिस्ती शकामागील दोन हजार वर्षांपूर्वीहून दोन हजार किंवा अधिक वर्षांच्या आर्य संस्कृतीचा पुरावा हिंदुस्थानांत किंवा बाहेर त्यालगत उपलब्ध होऊं लागला असल्यामुळे, या युरोपियन पंडितांचीं भ्रममूलक अनुमानें भराभर ढासळून पडूं लागलीं आहेत.

वरील इतकें विवेचन करण्याचें कारण हेंच कीं 'कौटिलीय अर्थशास्त्रा'संबंधानेंहि युरोपियन पंडितांनीं ही खोड प्रगट केली आहे. तथापि सुदैवाची गोष्ट ही की या ग्रंथासंबंधानें त्यांना ६०० वर्षांपेक्षां अधिक वर्षांची चोरी करतां आली नाहीं! त्यांच्या मतें या ग्रंथाचा काळ ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकाचा नसून ख्रिस्तोत्तर चौथ्या शतकाचा आहे. या अनुमानाचें खंडन हिवरगांवकर यांनीं आपल्या प्रस्तावनेंत समर्पक रीतीनें केलें आहे तें मुळांत कोणीहि वाचावें. केवळ मराठी वाचकांना या ग्रंथाचा सामान्यपणें परिचय करून देणें हाच या लेखाचा मुख्य उद्देश असल्यामुळें याहून अधिक विवेचन आम्ही येथें करीत नाहीं. आम्ही इतकेंच म्हणतों कीं, या युरोपियन पंडितांच्या मताप्रमाणें हा ग्रंथ २२ शें वर्षांपूर्वीचा नसून १६ शें वर्षांपूर्वीचाच आहे असें जरी घेऊन चाललों तरी ग्रंथाच्या महत्त्वाची हानि कांहीं होत नाहीं. कारण ग्रीस व रोम सोडून दिले असतां, या ग्रंथाच्या तोडीचा त्या कालाचा ग्रंथ सगळ्या युरोप खंडांतील वाङ्मयामध्यें कोणालाहि

काढून दाखवितां येणार नाहीं हा मुद्दा सर्वस्वीं अबाधित राहातो; व युरोपियन पंडितांच्या पदरांत त्यांच्या मत्सरबुद्धीचें पाप मात्र पुरें पडतें. या ग्रंथाचा कर्ता आर्य चाणक्य हा चंद्रगुप्त मौर्याचा शिक्षक व मुख्य राजमंत्री होता, आणि स्वतः चंद्रगुप्त हा सुप्रसिद्ध अलेक्झांडर याशीं समकालीन होता, अशी जी अनुमानसिद्ध व ऐतिहासिक पुराव्यावरून बनणारी समजूत आहे तीच वाचकांनीं घेऊन चालावें.

आता या ग्रंथांतील विषयासंबंधानें पाहतां, त्याविषयींचा अभिमान आपणाला वाटतो तो केवळ त्याच्या प्राचीनत्वामुळें नसून त्यांत प्रगट झालेलें बुद्धिचातुर्य, परिणत संस्कृति, व उत्कर्षपूर्ण देशस्थिति यावरूनहि तो अभिमान बाळगण्यास भरपूर जागा आहे ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. हीं तीनहि वर्णनें कितीं खरीं आहेत हें मूळ ग्रंथ वाचून पाहाणाराला तेव्हांच दिसून येईल. कारण या ग्रंथाला 'अर्थशास्त्र' असें जरी थोडेसें एकांगी नांव आहे तरी त्यांत अनेक प्रकारचें मानसिक तत्त्वज्ञान व अनुभवसिद्ध विद्या असल्याचें स्पष्ट आहे. स्वतः कौटिल्याच्यामतें अर्थशास्त्र म्हणजे पृथ्वी किंवा भूमि जिंकणें व तिचें यशस्वी रीतीनें परिपालन करणें याविषयींचें शास्त्र होय. अर्थशास्त्र या शब्दाला समानार्थक इंग्रजी शब्द 'पोलिटिकल इकॉनमी' असा आधुनिक विद्वानांना सहजच सुचतो. परंतु त्या दोन शब्दांची व्याप्ति एकच नाहीं. आधीं कोणतेहि शब्द हे कोणत्याहि विषयाचा अर्थ तंतोतंत प्रगट करण्याला समर्थ नसतात त्यांत अतिव्याप्ति किंवा अव्याप्ति हा दोष नेहमीं घडतो. शिवाय, पोलिटिकल इकॉनमी हा शब्द घेतला तरी त्यांतहि हा दोष आहेच. कारण मूळ ज्या ग्रीक शब्दावरून तो शब्द निघाला त्यानें दर्शवलेला अर्थ आज २० व्या शतकांत 'पोलिटिकल इकॉनमी' या शब्दाचा नाहीं. इतर सर्व गोष्टींबरोबर अर्थशास्त्राचा विषय एका बाजूला वाढत जाऊन, मूळच्या समाजशास्त्र विषयापैकीं फक्त एका भागाला तो हल्लीं चिकटून राहिला आहे हें अर्थशास्त्राचा इतिहास वाचणारांना कळून येईल. आणि दिवसेंदिवस तो अर्थ अधिकाधिक संकुचित होत चालला आहे. म्हणून या ग्रंथाच्या उसन्या परभाषांतरित नांवावरून त्याची कल्पना करणें बरोबर होणार नाहीं.

मूळ ॲरिस्टाटल याचा अर्थशास्त्र नामक ग्रंथ घेतला तरी त्यांत असे किती तरी विषय गोवलेले आढळतात कीं ते त्याच नांवाच्या आजच्या युरोपियन किंवा अमेरिकन ग्रंथांत आढळत नाहींत. याचें कारण हेंच कीं, ॲरिस्टाटलच्या ग्रंथाप्रमाणेंच हा ग्रंथहि व्यापक पद्धतीनें लिहिलेला आहे ज्ञानविषयांची तर्कशास्त्रानुसार विभागणी हल्लीं करतात तशी ती पूर्वीं करीत नसत जुनी पद्धति वेगळी होती जुनी ग्रंथकर्तृत्वाची पद्धतीहि अशी होती कीं, कोणी एखादा ग्रंथ लिहिला तर त्यांत ग्रंथकाराला असलेलें बहुतेक सर्व ज्ञान संगृहीत करावयाचें. या पद्धतीला एनसायक्लोपिडिक (Encyclopedic) पद्धति म्हणतां येईल. निदान 'कौटिलीय अर्थशास्त्र' हा ग्रंथ तत्कालीन समग्र समाजस्थितीला उद्देशून लिहिलेला असल्यामुळें, आजच्या दृष्टीनें एकत्र न यावे असे अनेक विषय त्यामध्यें आलेले आहेत. हें सांगण्याचें कारण असें कीं मूळ ग्रंथ बाजूला राहून, व अर्थशास्त्र हा शब्दहि बाजूला राहून ग्रंथाचा जो कर्ता चाणक्य त्याच्याविषयीं कपटी मुत्सद्दी अशी जी कल्पना परंपरेनें व रूढीनें लोकांच्या मनांत उतरली आहे तितक्यापुरतीच या ग्रंथाविषयीं लोकांची कल्पना सामान्यतः असते. कारण कोठेंहि दोन गोष्टात कांहीं साम्य दिसलें म्हणजे त्यांचा दाखला एकमेकाना देण्याची रीतच आहे. आणि आधुनिक विद्वानांना इटालियन ग्रंथकार मॅकॅव्हिली यांचें नांव व त्याच्या कुप्रसिद्ध कपटनीतीइतकीच ग्रंथाची स्थूल माहिती असल्यामुळें, मॅकॅव्हिलीच्या 'प्रिन्स' या ग्रंथाप्रमाणें चाणक्याचें अर्थशास्त्र हा केवळ कपटी राजनीतीचा एक ग्रंथ असेल अशी पुष्कळांची सहजच समजूत असते. पण ही समजूत किती खोटी आहे व या पुस्तकांत तत्कालीन समाजस्थितिदर्शक व संशोधनाला योग्य अशी इतर किती माहिती आहे हें मूळ ग्रंथ जो वाचील त्याला तेव्हांच दिसून येईल. तात्पर्य, केवळ रूढ कल्पनेनें या ग्रंथाविषयीं कोणीहि अनुमान बांधण्याचें धाडस करूं नये. तर संशोधक व अभ्यासक बुद्धीनेंच त्याचा परामर्ष घ्यावा. असो. अशा रीतीनें प्रस्तावना रूपानें या ग्रंथाचा परिचय करून दिल्यावर त्याचें खरें महत्त्व कळून येण्याकरितां त्यांतील विषयांचें जे परीक्षण करावयाचें तें पुढील लेखांत करूं.

# खुंटा हलवून बळकट केला !

बरेच दिवसांपासून हिंदी संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकाराच्या मागें भुणभूण लाविली होती कीं "तुमच्या आमच्या राजकीय संबंधाची एकदा तपासणी व उजळणी होऊं द्या हो". सरकारहि कंटाळून जाऊन म्हणाले "ठीक आहे. तपासणी-उजळणी पाहिजेना? मग होऊनच जाऊं द्या. आम्ही त्याला तयार आहों". ही कबुली ऐकून संस्थानिकांना वाटलें कीं आपण जिंकले. पण ही तपासणी-उजळणी करण्याकरितां सरकारने काय केलें? स्वतःच्या मानसपुत्रांचीच एक कमिटी नेमली. कमिटीचे अध्यक्ष कोण तर सर हारकोर्ट बटलर ! म्हणजे इरसालांतले इरसाल धूर्त मुत्सद्दी. त्यांच्या जोडीला दोन कायदे-पंडित म्हणून दिले. पण तेहि इंग्रजच. जणुं काय हिंदुस्थानांत कायदेपंडित नव्हते. पण स्वतः संस्थानिकहि असे भले कीं त्यांचा हिंदी कायदेपंडितां-पेक्षां विलायती कायदेपंडितांवरच अधिक विश्वास ! पण या सर्व विश्वास-निधीनीं अखेर संस्थानिकांना गोता दिला व सूर्याची पिल्ले दाखविली. संस्थानिकांना आपल्या चुकीचा सुगावा लागला. पण दुर्दैवानें तो फार उशीरा लागला. ऊंस चरकांत निम्म्याहून अधिक पिळाला गेल्यावर पश्चात्ताप होऊन काय उपयोग ?

वास्तविक संस्थानिकांना आपण बादशाही सरकारच्या बरोबरीचे अशी जाणीव किंवा भावना होती तर असली कमिटी त्यानीं मान्य कां केली? तिच्यापुढे पुरावा देण्याला हे कां तयार झाले ? बरोबरीच्या लोकांचा वाद तोडणे किंवा इनसाफ करणें हें काम बरोबरीच्या लोकांनींच केलें पाहिजे. म्हणजे कमिटीवर जसे सरकारचे प्रतिनिधी तसेच संस्थानिकांचेहि प्रतिनिधी नेमावयास पाहिजे होते. किंवा "आमची संस्थानें म्हणजे स्वतंत्र राष्ट्रें" अशीच भावना जर संस्थानिकांची होती, आणि तद्‌नाम्यासारखे मातबर कागदपत्र अर्थ लावण्याकरितां पुढे यावयाचे होते, तर "हा सर्व वाद राष्ट्रसंघाच्या एखाद्या कमिटी-कडे सोंपवा" असा आग्रह संस्थानिकांनीं धरावयास पाहिजे होता. जगांतल्या कोणत्याहि फाटक्या-तुटक्या राष्ट्रांचीं भांडणें जर राष्ट्रसंघापुढें येतात, तर ब्रिटिश सरकारचे बरोबरचे दोस्त म्हणविणाऱ्या या संस्थानिकांचें भांडणहि राष्ट्रसंघाकडे जाण्यास कोणती हरकत होती? किंवा आणखी तिसराहि एक मार्ग होता. तो असा कीं, ब्रि. सरकार व संस्थानिक यांनीं लेखी राजीनामे देऊन, उभयतांच्या संमतीनें पंच नेमून, त्यांच्याकडून निकाल करून घ्यावयास पाहिजे होता. पण यांपैकीं कांहींच घडलें नाहीं.

आम्हा लहानसान लोकांचें उदाहरण या मोठ्या मातबर संस्थानिकांनीं गिरवावें असें आम्ही म्हणणार कोण म्हणा! पण बटलर कमिटीची ही दोषास्पद घटना पाहतांच त्यांनी तिजवर बहिष्कार टाकावयास पाहिजे होता. कमिटीपुढें जाण्याचेंच नाकारावयास पाहिजे होतें. पण एवढा जोर कोठें आहे? बोलूनचालून संस्थानिक हे आजवर ताबेदारींत दिवस काढलेले. पोलिटिकल एजंट व रेसिडेंट यांना देवासारखे वागवून स्वतः त्यांच्या पायाशी यांनी लोटांगणे घेतलेलीं. पोलिटिकल खात्यांतील चित्रगुप्ताने यांच्या वहीखात्यांतील पाप कर्मांचा उतारा काढून पुढें ठेवण्याची धमकी घालतांच क्षमस्व म्हणून हे मोकळे झालेले. तोफांची सलामी वाढविण्याकरितां हे हपापलेले. कोणत्या एखाद्या फाटक्या साहेबाचीहि सरबराई करून त्याची मिजास संभाळण्यांत खर्ची पडलेले. अशांच्या हातून कमिटीवर बहिष्कार कसा पडणार ? बहिष्काराला जें भांड-खोरीचें स्वरूप येतें तें उघडपणें स्वीकारण्या इतका धीटपणा यांच्या अंगी कोठून येणार ? तात्पर्य, "कमिटी नेमतां, पण ती अशी काय म्हणून?" असा प्रश्न एकाहि संस्थानिकानें केला नाहीं. फिर्यादीला निघावें, आणि प्रतिवादी नेमील त्या व प्रतिवादीचा पगार खाणाऱ्या न्यायाधीशाचा अधिकार निर्णयार्थी मान्य करावा हा कोण शहाणपणा ?

वास्तविक चौकशी कमिटी नेमण्याचाच अधिकार जर स्वतंत्रपणे ब्रिटिश सरकारचा म्हणून संस्थानिकांनीं मुळांत मान्य केला, तर त्या सरकाराला संस्थानांच्या अंतर्व्यवस्थेंत हात घालण्याचा अधिकार आहे कीं नाहीं हा मुद्दाच उपस्थित होऊं शकत नाहीं. कमिटीची घटना सरकारनें केली तीच जर मान्य करावयाची होती तर, "तुमच्या अंतर्व्यवस्थेत हात घालण्याचा अधिकार आम्हाला आहे," हा जो हक्क प्रथमपासून ब्रि. सरकार सांगत आले आहे तोच संस्थानिकांनी मान्य केला असता म्हणजे येवढी कमिटी व येवढी चौकशीच नको होती. पण असले कागदी घोडे व्यर्थ नाचविल्याशिवाय सर लेस्ली स्कॉटसारख्या गोऱ्या बॅरिस्टराच्या घरांत गरीब संस्थानी प्रजेचे लक्षावधि रुपये जाणार कसे? व उत्तर-हिंदुस्थानांतले उपद्व्यापी महत्त्वाकांक्षी लब्ध-प्रतिष्ठित शिष्ट संस्थानिक, कर्नल हस्करासारखे त्यांचे हस्तक, व प्रो. रशब्रुक वुल्यम्ससारखे उभयान्वयी

स्वार्थसाधक यांचे स्तोम माजणार कसें ? व चंदी चालणार कशी ? कुत्रें पीठ खातें पण तें गरिबांच्या घरीं अंधळा दळीत असतां. तथापि श्रीमंतांच्या घरीं डोळस दळीत असतांहि कुत्र्यानें खुशाल पीठ खावें!

बरें, आम्ही हें असें न म्हणावे तर काय करावें? मध्यवर्ती ब्रि. सरकारला संस्थानिकांच्या कारभारांत विशेष प्रसंगीं हात घालण्याचा अधिकार आहे व असला पाहिजे, यांत खरोखर शंका येण्याला कांहीं तरी जागा होती का? पण दिल्या कोणी तरी थापा! चढविलें कोणी तरी घोड्यावर! म्हणून सारासार न पाहतां "आम्ही स्वतंत्र व तहानें तुमच्या बरोबरीचे म्हणून अधिकारानेंहि बरोबरीचे" असें म्हणून संस्थानिक हुरळून जाऊन बरळूं लागले. तोंडांतला कांटेलगाम चघळीत असतां, व तोंडाला आंतून रक्त येत असतां, घोड्यानें म्हणावें कीं "लगाम इकडे एका टोंकाला मी तोंडांत धरला व तिकडे दुसऱ्या टोंकाला स्वारानें हातांत धरला. मिळून कांटेलगामाच्यासंबधानें आम्ही दोघे सारख्या अधिकाराचेच ठरतों." तशाच प्रकारें संस्थानिक हे इंग्रज सरकारची बरोबरी सांगं लागले. एका तहावर दोघांच्या सह्या म्हणून दोघे बरोबरीचे! 'तुम्ही आम्ही दोस्त' असें तहांत म्हटलें म्हणून बरोबरीचे! 'तुमचा आमचा स्नेह राहावा' असें तहांत म्हटलें म्हणून बरोबरीचे! पण हे तह कोणत्या प्रसंगीं कोणत्या परिस्थितींत झाले ? त्या वेळीं वरिष्ठ व बलिष्ठ कोण होता? इत्यादि गोष्टी ऐतिहासिक दृष्टया पाहूं जाणाराला संस्थानिकांच्या धाडसाचें आश्चर्यच वाटेल.

आज मोठ्यांतले मोठे संस्थानिक घेतले तरी त्यांचा पूर्वीचा इतिहास काय सांगतो ? निजाम सर्वांत मोठे. पण यांच्या सरक्षणाकरितां इंग्रजांनीं सैन्य ठेवावें म्हणून यांनीं इंग्रजांना या सैन्याच्या खर्चाकरितां आपला मुलूख तोडून दिला. आणि हे म्हणे इंग्रजांच्या बरोबरीचे. कारण तह झाला ! म्हैसूरचें संस्थान मोठें. पण हैदरानें वाडियार राजापासून जिंकून घेतलेलें राज्य, इंग्रजांनीं हैदराच्या मुलापासून परत जिंकून घेऊन, तें वाडियारांना बक्षीस दिलें. आणि म्हणे म्हैसूरचे राजे इंग्रजांच्या बरोबरीचे. कारण तह झाला ! शिंदे व होळकर यांचा इंग्रजांनीं युद्धांत पराभव केला. यांचे इतके तरी राज्य राहिलें ही कृपा. आणि म्हणे शिंदे होळकर इंग्रजांच्या बरोबरीचे. कारण तह झाला ! बडोदेकर कांहीं इंग्रजांशीं कधीं लढले नाहीत. पण एक वेळचे इंग्रजांच्या बरोबरीचे जे पेशवे त्यांच्या मांडलिकांचे मांडलिक हे गायकवाड. आणि म्हणे बडोदेकर इंग्रजांच्या बरोबरीचे. कारण तह झाला ! उत्तर–हिंदुस्थानाच्या रजपूत राजांनीं मराठ्यांपासून बचाव व्हावा म्हणून इंग्रजांचा आश्रय केला व आपल्या रियासती संभाळल्या. आणि म्हणे रजपूत राजे इंग्रजांच्या बरोबरीचे. कारण तह झाला! मग बाजीराव पेशवे यांना पळतां भुई थोडी झाली असतां, स्वराज्याचें उदक माल्कमसाहेबाच्या हातावर घालून ब्रम्हावर्तास जाऊन ते जहागीर घेऊन राहिले, त्यांनांहि म्हणावें कीं आम्ही इंग्रजांच्या बरोबरीचे. कारण तह झाला !

तात्पर्य, तहाचा आधार सांगून आपणाला इंग्रजांच्या बरोबरीचे म्हणवून घेण्यांत या प्रकरणांत संस्थानिकांनी स्वतःला हास्यास्पद मात्र करून घेतलें. आणि " आम्ही आमच्या राज्यांत वाटेल तसा नंगा नाच घालूं, पण आमच्या कारभारांत इंग्रज सरकारनें हात घालतां कामा नये, कारण आम्ही बरोबरीचे दोस्त, कारण तह झाला !" असें म्हणून संस्थानिकांनीं जेव्हां अप्रयोजकपणाला फाजील अधिकारप्रियतेची भर घातली तेव्हां तर ती हास्यास्पदता सहजच वाढली. शिवाय हा बरोबरीचा हक्क सांगणारांत जेव्हां मोठ्याबरोबर छोटे संस्थानिकहि सामील झाले तेव्हां तर विचारूंच नका. लोकांना हंसूं आवरेचना. एका मोराबरोबर किती तरी लांडोऱ्या नाचल्या. खाकी युनिफॉर्म घातले कीं सगळे योद्धे वीरच. मग तो सबाल्टर्न असो, सार्जंट असो, कीं सेनापति असो. त्याचप्रमाणे संस्थानिक म्हटले कीं सगळे स्वतंत्र राजे! इंग्रजांच्या अगदीं बरोबरीचे. कारण तह या नांवाच्या कसल्या तरी कागदावर यांची सही आहे ! मग तो दहावीस गांवांचा धनी असो किंवा दहावीस जिल्ह्यांवर राज्य करो. देव्हाऱ्यांत बसला तो देव. मग तो विष्णु असो, नाहीं तर शंख असो ! कांहीं तरी तारतम्य पाहावयाचें होतें. पण पुढारी संस्थानिकांनी वर्गणीचे लाखों रुपये जमविण्याकरितां सर्वांना एका नांवाखालीं ओढलें व एका माळेंत गोवलें.

संस्थानिकांनी प्रथम इंग्रजांशीं तह केले तेव्हां ते युद्धांत पराभव पावून, किंवा इंग्रजांचा आश्रय मिळविण्याकरितां, किंवा इतरांच्या संकटांत आपला हात धुवून घेऊन आपला मुलूख वाढविण्याकरिता तह केले. बरोबरीच्या नात्यानें लढून, चार लढाया हरून पण चार जिंकून, दोघेहि दमले म्हणून समान–मानास्पद रीतीनें तह केला असा कोणता संस्थानिक तो कोणी दाखवून द्यावा. शिवाय यानंतर इंग्रजांची सत्ता किती वाढत गेली, व त्या मानानें संस्थानिकांची किती संपुष्टांत येत चालली हेंहि दिसतच आहे. बरें, बरोबरीचें नातें यांच्या तरी मनांत खरोखर वागत

होतें म्हणावें, तर इंग्रजांच्या पहिल्याच अतिक्रमणाबरोबर झणकारा येऊन व राज्याची आशा सोडून, कोणत्या संस्थानिकबहादुरानें इंग्रज सरकाराचा हात धरून त्यांना हटकून जाब विचारला? तहाच्या आधारावर बरोबरी सांगतात, पण त्या तहाच्या कागदांतील शब्दांवर अतिक्रमणाच्या पिवडीचे थरावर थर बसले तेव्हां हे गप्प बसले. आणि खालसांतील प्रजेनें व संस्थानी प्रजेनें स्वराज्याची चळवळ सुरू करून ती थोडी रंगाला आलेली दिसतांच, संस्थानिकांना आपल्या स्वातंत्र्याची व बरोबरीच्या हक्काची जाणीव झाली! ही चळवळ किंवा या स्वराज्याच्या गोष्टी उत्पन्न झाल्या नसत्या तर, हे संस्थानिक इंग्रज सरकाराची पायमल्ली अशीच सोशीत राहिले असते यांत बिलकुल शंका नाहीं.

बरें, या चळवळीचा फायदा घ्यावासा वाटला तर तो शहाणपणानें तरी घ्यावयाचा होता. म्हणजे उदाहरणार्थ, संस्थानिकांनी इंग्रजांना असें म्हणावयाचें होतें कीं "पाहा हो बाबा, आतां हें स्वातंत्र्याचें नवे युग अवतरत आहे. सर्वांनाच स्वातंत्र्य हवेसें वाटतें व देणे योग्यहि आहे. आमची काय तुमची काय! प्रजा ही येथून तेथून सारखीच. तुम्ही सुधारणांना सुरवात केली तशी आम्हीहि पण आमच्या राज्यांत करूं लागलों आहों. कालांतरानें दोनहि प्रजा स्वराज्यनिष्ठ सुराज्य भोगोत. तुम्ही काय आम्ही काय ट्रस्ट्री! मालकच सज्ञान व कर्ता झाला तर आमचें कामच झालें. मुलगे संसार सुरळीत करूं लागलेले पाहून कोणत्याहि बापाला बरेंच वाटावें. अशा रीतीनें ध्येयच पदरांत पडले, म्हणजे आम्ही होऊनच अधिकारसंन्यास केला, तर आमच्या हातून गैरव्यवस्था कसली होणार? आणि तुम्ही तरी आमच्या अंतर्व्यवस्थेंत हात कशाकरितां घालणार? अशा रीतीनें अधिकारसंन्यासानें तुमची आमची बरोबरी होईल." व तीच खरी बरोबरी!

पण असें न म्हणतां संस्थानिक इंग्रज सरकाराला काय म्हणूं लागले माहीत आहे? ते म्हणूं लागले "स्वराज्याची ही चळवळ तुमच्या व आमच्याहि मुळावर आली आहे. तुम्हाला आपल्या प्रजेला स्वराज्यदान करावयाचें असेल तर खुशाल करा. आधीं, करूं नका हेंच उत्तम. कारण आमच्या मनांत हें स्वराज्यदान करावयाचें येत नाहीं. आणि तुम्ही आम्ही दोस्त! तुमचा आमचा तह! तुमची आमची बरोबरी! तेव्हां तुम्ही आम्ही एकविचारानें वागावें हेंच योग्य. पण तुम्ही पडलां पाश्चात्य राष्ट्राचे लोक. तुमच्या देशांत लोकसत्ता वावरते म्हणून इकडेहि, होय नाहीं म्हणतां म्हणतां लोकांना राज्यसत्ता देण्याचा मोह तुम्हाला कदाचित् आवरणार नाहीं. कदाचित् खोटा बाहाणा करतां करतांच घसरूनहि जाल. पण आमचें तसें नाहीं. इंग्लंड तें इंग्लंड, हिंदुस्थान तें हिंदुस्थान! आमची खानदानी आमची परंपरा जुलमी एकतंत्री सत्तेची आहे. तुमच्यापासून इतर वाईट गोष्टी कितीहि शिकलों तरी स्वराज्यदानाची चांगली गोष्ट आम्ही शिकणार नाहीं. आमची प्रजा व आम्ही पाहून घेऊं. पण कृपा करा, आणि आम्ही आमच्या राज्यांत काय करतों कसें वागतों इकडे पाहूं नका. आणि आमच्या कारभारांत हात घालूं नका. आणि या आमच्या मागणीला आधारच दाखवावयाचा तर तह आहेतच."

पण सुदैवानें संस्थानिकांच्या या म्हणण्याला इंग्रज सरकारनें म्हणजे बटलर कमिटीनें थारा दिला नाहीं. आणि संस्थानांत अंतर्व्यवस्थेंत हात घालण्याचा इंग्रज सरकाराचा हक्क तर तिनें स्पष्टपणे प्रस्थापित केलाच, पण संस्थानिकांनीं आपापल्या राज्यांत राजकीय सुधारणा करण्याच्या मार्गाला लागावे असा नाजूक उपदेशहि केला आहे. आतां कमिटीनें आजच हिंदुस्थानांतील कायदेमंडळांच्या स्वाधीन संस्थानिकांना कां केलें नाहीं याचें कारण उघड आहे. या आमच्या कायदेमंडळांत खरें स्वराज्यच अजून उतरलें नाहीं. हा आंबा अजून आंबट आहे. व्हाइसरॉय हेच अजून शिरजोर व सर्वसत्ताधीश व बेजबाबदार आहेत. तेव्हां संस्थानांवरचा ताबाहि तूर्त त्यांच्याच हातीं राहणें योग्य आहे. व्हाइसरॉय यांचे हक्क कमी होतील, ते गव्हर्नर—जनरल—इन—कौन्सिल यांच्या हातीं जातील, आणि हें कौन्सिल लोकांना सर्वस्वी जबाबदार होईल, तेव्हां पाहातां येईल. आजच उगीच कशाला नसत्या गोष्टींची चिंता! मरणाच्या आधीं उगीच कोण कोणाला सरणांत घालतो? कसेंहि असो; संस्थानांवर ब्रिटिश कायदेमंडळाचा ताबा चालावा कीं नाहीं हा पुढचा प्रश्न आहे; व हिंदी प्रजा तो प्रश्न यथाकाल सुचेल तसा सोडवीलच. पण आज संस्थानी प्रजेचा जीव थोडासा तरी भांड्यांत पडेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण त्यांना वाली कोणीच नव्हता. यामुळें इंग्रज सरकारला संस्थानांच्या अंतर्व्यवस्थेंत विशेष प्रसंगीं हात घालण्याचा अधिकार आहे असें बटलर कमिटीनें ठरविलें हा उपकारच झाला. संस्थानिकांनीं सर लेस्ली स्कॉटप्रभृतींना मलिदा चारण्यांत व बटलर कमिटीसंबंधाची कारवाई करण्यांत वस्तुतः संस्थानी प्रजेचाच पैसा खर्च केला. पण त्याचा उपयोग प्रजेला अशा अप्रत्यक्ष रीतीनें झाला म्हणावयाचा!

यावर कोणी अशी शंका घेईल कीं "आपल्या देशी राजांच्या कारभारांत परक्या इंग्रज सरकारनें हात घालावा असें म्हणणें हें संस्थानी प्रजेच्या राजभक्तीला शोभन नाहीं." खरें आहे. पण संस्थानिक जेव्हां राजभक्ति निर्दोष टिकविण्यासारखें वागतील तेव्हां हा दोष पदरी येईल! संस्थानिक हे इंग्रज सरकाराशीं संस्थानी प्रजेच्या हिताकरितां जेव्हां झगडण्याला कंबर कसून सिद्ध होतील, तेव्हां संस्थानी प्रजाहि हांक न मारतांहि आपल्या राजाच्या पाठीशीं उभी आहे असें त्यांनी खुशाल समजावें व वाटेल तर प्रसंगविशेषी अनुभवहि घेऊन पाहावा. पण आधीं संस्थानी कारभारांत फारच मोठा अन्याय किंवा गोंधळ झाल्याशिवाय सरकार हात घालीत नाहीं हें एक. आणि संस्थानिक इंग्रज सरकारच्या हक्काला विरोध करतात तो, असला अन्याय किवा गोंधळ झाला तरी तोहि करण्याचा हक्क स्वतःला असला पाहिजे या सबबीवर व तहाच्या जोरावर करतात. मिळून हेतु दुष्ट व तर्कपद्धतीहि दुष्ट. याच्या उलट केवळ स्वदशप्रेमानें स्वदेशभक्तीनें एखादा मातबर संस्थानिक इंग्रजांशीं हक्कासाठीं झगडण्याला सिद्ध होऊं द्या, आणि त्यांतल्या त्यांत तें प्रेम व ती भक्ति प्रजेला स्वराज्याधिकार देण्याच्या मार्गानें व्यक्त करूं द्या, म्हणजे मग पाहा सगळें टीकाकार जग त्याला वश होईल, आणि प्रजाहि आपलें तनमनधन त्याला अर्पण करील. इटालीच्या इतिहासांत पीडमॉंटचा संस्थानिक स्वदेशप्रेमानें आस्ट्रियन राजसत्तेशीं झगडण्याला उभा राहिला, तेव्हां त्याच्या प्रजेंत गॅरिबाल्डीसारखे राजभक्त लोक कसे निर्माण झाले याचा इतिहास तरी आमच्या संस्थानिकांनीं एकवार नीट वाचून पाहावा. तसलें कांहीं न करतां हे स्वतःपुरतें स्वातंत्र्य मागणार! आणि तेंहि आपल्या प्रजेवर अम्मल गाजविण्याला! घरीं नवरा आपल्या बायकोला मारूं लागला तरी शेजाऱ्याला मध्यें पडण्याचा अधिकार आहे. पिनल कोडानेंहि तो दिला आहे. असे असतां "आम्ही प्रजेवर काय वाटेल तसा जुलम करूं, पण तुम्ही हात घालण्याचें कारण नाहीं" असें संस्थानिक लोक, त्यांचे अधिराजे जे इंग्रज सरकार त्याला, कोणत्या तोंडानें सांगणार!

# हिंदुस्थान व अफगाणिस्थान

अफगाणिस्थानात इंग्रजांचे खरे धोरण काय आहे हे अजून स्पष्ट व्हावयाचे आहे. हल्ली वर्तमानपत्रातून बातम्या येतात. परंतु त्या सर्व इंग्रजांनीं लिहून पाठविलेल्या नसल्या तरी, त्या त्यानी तपासून व दुरुस्त करून पाठविलेल्या असतात. प्रकाशाचा किरण मूळ निघतो तेथून तो स्वच्छ निघाला असला तरी, त्याच्या वाटेत जर कोणी एखादी रंगीत काच उभी केली तर त्या प्रकाशाचा रंग तेथून पुढे बदलतो हे सर्वाना माहीतच आहे. आणि अफगाणिस्थानातल्याच काय, पण जगातल्या एकंदर धोरणासंबंधानेहि, हिंदुस्थानामध्ये जी बातमी मिळत असते ती आंग्ल पक्षपाताने दूषित अशीच असते. म्हणून इंग्रजांच्या धोरणाविषयी खरी माहिती पाहिजे असेल तर इतर भाषांतील पुस्तके व वर्तमानपत्रे वाचली पाहिजेत. निदान इंग्रजी भाषेत लिहिलेली परंतु इंग्रजांनी न लिहिलेली, अशी पुस्तके मिळवून वाचली तरच जिज्ञासु माणसाला इंग्रजांच्या खऱ्या धोरणाविषयी काही यथार्थ कल्पना आली तर येईल. प्रयत्न केल्यास अशी पुस्तके मिळू शकतात. त्यामध्ये लिहिलेले हेहि कदाचित् उलट्या दिशेच्या पक्षपाताने कोणी लिहिलेले असावे अशी शंका घेता येते. परंतु अशा माहितीचा उपयोग निदान उलटतपासणीसारखा तरी मानला पाहिजे.

अफगाणिस्थानासंबंधाने इंग्रजांचे खरे धोरण अजून प्रगट व्हावयाचेच आहे असे आम्ही वर सांगितले. परंतु आज अदमासच करावयाचा तर तो असा करता येतो कीं, अफगाणिस्थानामध्ये इंग्रजांना एक संघटित राज्य व एकछत्री राजा नको आहे. एका अफगाणिस्थानाचे अनेक विभाग झाले व त्याच्यावर अनेकांची राजकीय सत्ता बसली तर ती इंग्रजाना हवी आहे. अशी गोष्ट घडली तर ती हिंदुस्थानातील लोकांच्या दृष्टीने इष्ट की अनिष्ट? कारण इंग्रजांचे मनातील अखेरचे धोरण काहीहि असलें तरी, सरहद्दीपलीकडे असणारे राष्ट्र कसे असावे असा प्रश्न हिंदी प्रजेला केला असता, तीहि म्हणणारच कीं, ते मित्र–राष्ट्र असावे, शत्रु–राष्ट्र नसावे. अफगाणिस्थान व हिंदुस्थान यांचा जुना संबंध लक्षात घेतला असता, हिंदुस्थानावर आजपर्यंत ज्या स्वाऱ्या झाल्या त्यातल्या बहुतेक अफगाणिस्थानाच्या द्वारेच झाल्या. खुद्द अफगाणिस्थान सोडले तर इराणी, दुराणी व तुराणी लोकांच्या फौजा अफगाणिस्थानातून हिंदुस्थानात उतरत आणि इंग्रजांची सत्ता नष्ट किंवा कमकुवत झाली तर १२ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत ज्या गोष्टी घडल्या त्यांची पुनरावृत्ति हिंदुस्थानाच्या वायव्यभागात होणे अशक्य नाही.

जुन्या काळी स्वाऱ्या करून व जरूर तर कत्तली करून, संपत्ति लुटून नेणे एवढेच ध्येय फार तर स्वारी करणाराचे असे. पण नव्या काळात नवी दृष्टि व नवे हेतू उत्पन्न होतात. त्याप्रमाणे सरहद्दीपलीकडील राज्यकर्त्यांना, मग ते मुसलमान असोत रशियन असोत, त्याना एक नवीन इच्छा अशी होऊ लागली आहे की, आपले राज्य बलुचिस्थान व अफगाणिस्थान यांच्या सांधीतून दक्षिणेस खाली सरकवीत जावे, आणि सिंध प्रांतातली निदान एक निरुंद अशी पट्टी जिंकून घेऊन कराची हे बंदर हस्तगत करावे. युद्धसाधनाच्या दृष्टीनें नाविक फौजेचे व बंदराचे महत्त्व थोडेसे कमी होऊन विमाने व त्यांस उडवण्यास लागणारी मैदाने यांचे महत्त्व वाढू लागले असले तरी, व्यापाराच्या दृष्टीने बंदराचे महत्त्व कमी झालेले नाही. यामुळे जे जे म्हणून उदयोन्मुख राष्ट्र आहे त्याला आपल्या ताब्यात एखादे चांगले बंदर नसणे ही गोष्ट मोठी कमीपणाची वाटते.

हिंदुस्थानातील साध्या दुर्बल संस्थानिकांची गोष्ट घेतली तरी हेच दिसून येते. म्हैसूरने भतकल बंदरासंबंधाने धरलेला हव्यास, आणि जामनगरच्या जामसाहेबानी ओखा बंदरात व्यापार वाढवून मुंबई व कराची याना उत्पन्न केलेली चिंता लक्षात घेतली म्हणजे, बंदर मिळविण्याच्या इच्छेने स्वतंत्र राष्ट्रात किती चढाओढ होत असेल हे कळून येईल. दक्षिण–आफ्रिकेतील लोकसत्तात्मक राज्यातहि हल्ली मोठे युद्ध माजून राहिले आहे. इंग्रजाचा त्यात प्रत्यक्ष संबंध नसल्यामुळे या युद्धाच्या बातम्या इकडे फारशा येत नाहीत. परंतु या युद्धाचे कारण एखाद्या बंदराला सरळ सत्तेचा रस्ता मिळविणे हेच असल्याचे तज्ज्ञाना ठाऊक आहे. जर्मनी व रशिया याना युरोपात एखाददुसरे बंदर आहे. परंतु त्यातून दक्षिणेकडे येणे व अटलांटिक व हिंदी महासागर यामध्ये प्रवेश होणे हे मुष्किलीचे व खर्चाचे काम असून, शिवाय इंग्लंड व फ्रान्स यांच्या आरमाराच्या टापूतूनच मिळेल तो मार्ग काढणे जरूर असते. म्हणून जर्मनी व रशिया दोघांचाहि आज पुष्कळ दिवसापासून असा प्रयत्न सुरू आहे की, इराणाच्या आखातावर आपल्याला एखाददुसरे बंदर मिळावे. जर्मनीने दक्षिण दिशेने बांधलेला आगगाडीचा रस्ता आणि रशियाने इराणांत चालविलेले अतिक्रमण यांचा हेतु हा एकच होय. आणि अरबस्थान, इराण, मेसापोटेमिया, पॅलेस्टाईन या भागांतून इंग्रजांच्या कारस्थानाने गेल्या ४० वर्षांत जो धुमाकूळ घातला तो जर्मनी व रशिया यांचा हा डाव परतविण्याच्या हेतूनेच !

सांगण्याचा मुद्दा हाच कीं, उदयोन्मुख अफगाणिस्थानाची एक इच्छा अशी की, आपल्याला एखादे बंदर व्यापाराकरिता असावे. कारण समुद्रमार्गाने होण्यासारखा खुद्द अफगाणिस्थानाचा असा व्यापार आज फारसा नसला तरी, इंग्रज व रशिया यांच्या कचाट्यात सापडलेल्या अफगाणिस्थानाला इतर राष्ट्राशी दळणवळण ठेवण्याचा सरळ व स्वतंत्र मार्ग हवा. तो केव्हाहि बंदराच्या द्वारानेंच मिळणार. आगगाडीच्या रस्त्यावर कोठेहि पाऊल ठेवले की, सगळ्या देशाचे आक्रमण आपण केले असे आगगाडी नसलेल्या प्रांतातील लोकाना वाटू लागते. त्याप्रमाणे एखाद्या बंदरावर पाऊल ठेवले की, समुद्रमार्गाने सगळ्या जगाचे आपण आक्रमण केले असे उत्तरेकडील डोंगराळ मुलखातील राष्ट्राना वाटत असल्यास नवल नाही. अफगाणिस्थानाला सर्वात अधिक जवळचे बंदर म्हटले म्हणजे कराची हे होय. आज हिंदुस्थानात इंग्रजांची सत्ता प्रबळ व अबाधित असल्यामुळे, कराचीपर्यंत आपला मुलख व सत्ता आपण फैलावू 'असे काबूलच्या अमीराच्या नुसते मनात येणेहि आपणासारख्याला धारिष्ट्याची कमाल असेच वाटेल. पण त्याबरोबर हेहि लक्षांत ठेवले पाहिजे की, अफगाणिस्थानाच्या राजाची दृष्टि आमच्याइतकी संकुचित असणार नाही व असण्याचे कारणहि नाही.

थोड्या दिवसापूर्वी आम्ही केसरीत अफगाणिस्थान व हिंदुस्थान यांच्यासंबंधाची जी पिढीजात माहिती दिली होती ती वाचणाराचे लक्षात हे आलेच असेल. हिंदुस्थानातील निःशस्त्र व असहाय प्रजेला इंग्रजांच्या सत्तेची जी कल्पना आहे तिजपेक्षा काबूलच्या अमीराची कल्पना वेगळी असणार आणि जुन्या काळी काबूलच्या राजाने हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या हे सोडून दिले तरी, अगदी गेल्या १० वर्षात काबूलच्या अमीराने पेशावर प्रांतावर स्वाऱ्या केल्या त्या सर्वसत्ताधीश अशा इंग्रजाच्या साम्राज्यावरच नव्हत्या काय? सुमारे तीन महिन्यापूर्वी एका इंग्रज प्रवाशाच्या पुस्तकातील काही मनोरंजक उतारे आम्ही दिले होते. त्यांत हिंदुस्थानाची वायव्य सरहद्द फोडून आत शिरणे व सिंधु नदीपर्यंत आपले राज्य नेऊन भिडविणे, किंबहुना त्याच्याहि अलीकडील मिजासखोर व दुर्बल हिंदु संस्थानिकावर स्वारी करून, त्याना आपल्या अमलाखाली आणणे, ही कल्पना अफगाण जनतेतील साध्या मनुष्याच्याहि डोक्यांत आज कशी वावरते आहे हे दिसून आलेच असेल. पुण्यामुंबईच्या दरम्यान जाणाऱ्या एक्सप्रेस गाडीत अगदी पुढच्या डब्यापासून मागच्या डब्यापर्यंत चालत

जाण्याला जसा एखादा निरुंद पण सरळ खुला मार्ग असतो, तशा प्रकारचा सरळ मार्ग अफगाणिस्थानाच्या वायव्य भागातून निघून सिंधमधून कराचीपर्यंत आपणाला अबाधित मिळावा, अशी अफगाणिस्थानाच्या राजाची व जनतेची आकांक्षा निरंतरची आहे.

ही गोष्ट सामान्य हिंदी मनुष्याला समजणे कठीण असले तरी अगदी सोळा आणे खरी आहे याविषयी शंका नाही. ही गोष्ट साम्राज्यवादी इंग्रज सरकारालाहि पुरी माहीत आहे. म्हणूनच हिंदुस्थानातील इंग्रजाच्या सैन्याचा मुख्य भर व तळहि पंजाबच्या उत्तर दिशेला इंग्रजानी पाडलेला आहे. आणि हिंदुस्थानाचे रक्षण करावयाचे तर या भागाचे संरक्षण करणे हे इंग्रज सरकार आपले लष्करी दृष्ट्या मुख्य कर्तव्य मानीत असल्यास त्यात काय आश्चर्य ? अफगाण राजाचे व जनतेचे हे ध्येय इंग्रजाना व स्वतः काबूलच्या अमीराला जितके माहीत आहे, तितकेच किंवा त्याच्या खालोखाल हिंदुस्थानातील मुसलमानानाहि माहीत आहे. अफगाणिस्थानाकडील कारस्थान हिंदु लोकापेक्षा मुसलमान लोकाना अधिक चांगले समजते. याचे कारण हेच की, सरहद्दीपलीकडील मुसलमान हे उत्तरेकडील हिंदी मुसलमानाना धर्मदृष्ट्या व जातिदृष्ट्या आपलेसे वाटतात. हिंदुस्थानातील इंग्रजाचे राज्य नष्ट व्हावे व जमल्यास इकडे एकट्या मुसलमानाचे राज्य व्हावे ही कल्पना मुसलमान लोक नेहमीच बोलून दाखवीत नाहीत हे खरे. पण ती कल्पना त्याच्या मनातहि केव्हाच डोकें वर काढीत नाही ही गोष्ट मात्र खरी नाही.

सकृद्दर्शनी आज हिंदु व मुसलमान दोघेहि इंग्रजाच्या अमलाखाली असल्यामुळे, त्याच अमलाखाली जबाबदारीचे स्वराज्य मिळावे अशी दोघाचीहि मागणी आहे. पण निराशेने वैतागून गेले असता, स्वातंत्र्य मागण्याचा व मिळविण्याचा धाक हिंदु लोक इंग्रजाना तोंडाने घालतात त्याप्रमाणे हिंदी मुसलमान पुढारीहि घालतात. पण मुसलमानाच्या स्वातंत्र्याच्या कल्पनेच्या उदरांत दुसरी एक कल्पना असते ती अशा अर्थाची की, "तुम्ही आम्हाला जबाबदारीचे स्वराज्य न दिले तर आम्हीहि पाहून घेऊ ! आम्हाला जगात कोणी वाली नाही असे समजू नका. धर्म व वंश याच्या बाजूने आमचा लागाबाधा अंगोरा येथील मर्द व सत्ताधीश तुर्क लोकापर्यंत पोचतो. महायुद्धात तुम्ही तुर्कस्थानाचा पराभव केला व त्याच्या उरावर आपले ऋणानुबंधी ग्रीक लोक आणून घातले. तथापि बहाद्दर गाझी केमालपाशाने ग्रीक लोकाना पराभूत करून पळवून लावले. आणि कॉन्स्टॅन्टीनोपल येथील राजधानी उठवून अंगोरा येथे ती स्थापन करून, हजार मैल लांब व ५०० मैल रुंद एवढ्या मुलखात स्वतंत्र असे तुर्की राष्ट्र पुनः प्रस्थापित केले. बलाढ्य अशा इंग्रज-फ्रेंच राष्ट्राकडूनहि या तुर्की राष्ट्राने स्वातंत्र्य कबूल करून घेतले. त्यानाच लागून अलीकडे असलेली मुसलमान राष्ट्रे ही देखील आमच्याच जातभाईची होत. तीहि अनंत कालपर्यंत अगदीच स्वस्थ बसतील असे नाही. हिंदुस्थानातील आम्हा मुसलमान लोकाचा त्याना अगदीच कळवळा नसावा की काय ? आणि साम्राज्यवादी उपद्रवापी इंग्लंडचा सूड उगविण्याला हिंदुस्थानाच्या सरहद्दीवर व त्याहिपलीकडे प्रवेश करून जर आम्हाला उपद्रव करता आला, आणि त्यातल्या त्यात आमच्या धर्मबांधवाना परदास्यातून मुक्त करता आले तर ते दुधात साखर पडल्यासारखेच नव्हे काय? सहजच एका कार्यात दोन कार्ये झाली !"

१९१९ पासून १९२४ पर्यंत पेशावर प्रांताच्या पलीकडे व अलीकडे जी युद्धे, ज्या बंडाळ्या, व जी कारस्थाने झाली त्या सर्वांच्या मुळांत हीच कल्पना होती. व हिंदुस्थानातील राजकारणी मुसलमानाना ही जाणीव असल्याचे प्रत्यंतर असे की, अलीबंधूसारख्या हिंदी देशभक्तांच्या मनात काबूलचा अमीर पेशावर प्रांतावर स्वारी करतो या गोष्टीने काहीएक नवाच अकल्पित प्रकाश पडला. म्हणूनच ते आपल्या हिंदु बांधवाना म्हणत की, "काबूलचा राजा हिंदी लोकाना स्वराज्य मिळवून देण्याला येत आहे ! त्याचे स्वागत करण्याला कंबरा बाधा. निदान मनाने तरी गुढ्या व तोरणे उभारा." आता हिंदु लोकाना जुना इतिहास माहीत होता, व इसापच्या नीतिकथा त्यानी वाचल्या होत्या. म्हणून ते जाणून होते की, रानडुकरापासून घोड्याचे संरक्षण करण्याकरिता म्हणून मनुष्य घोड्याच्या पाठीवर एकदा स्वार झाला, म्हणजे मग तो कधी खाली उतरतच नाही. त्याप्रमाणे इंग्रजाना उपद्रव देण्याकरिता पंजाबावर स्वारी करणारा काबूलचा अमीर हिंदू-मुसलमानाच्या हाती स्वराज्य देऊन परत जाईल ही गोष्ट खोटी. म्हणून हिंदु लोकानी काबूलच्या अमीराचे स्वागत शरीराने किंवा मनानेहि केले नाही. निदान 'डोमीनिअन स्टेटस' म्हणजे साम्राज्यान्तर्गत जबाबदारीचे स्वराज्य मिळविणे हे ध्येय जोपर्यंत हिंदु लोकानी आपल्या डोळयापुढे ठेवले आहे, तोपर्यंत इंग्रज हे परके असले तरी आजच्यापुरते आपले, आणि काबूलचा अमीर हा आधी परकाच पण त्याच्या महत्त्वाकांक्षेच्या दृष्टीने हिंदुस्थानाचा शत्रु असे त्यानी मानल्यास त्यात आश्चर्य कोणते ?

हिंदु लोकांची ही भावना चुकीची नव्हती ही गोष्ट खिलाफतीच्या चळवळीपासून नेहरू रिपोर्टाच्या विरोधापर्यंत हिंदी मुसलमान पुढाऱ्यानी आपल्या शिरजोरीच्या वर्तनाने सिद्ध केली आहे. आणि हिंदु-महासभेला भोळे हिंदी देशभक्त व राष्ट्रीय सभावाले कितीहि नावे ठेवोत, पण या एकंदर परिस्थितीचे वरील मर्म फक्त हिंदु महासभेनेच आपल्या उपजत बुद्धीने जाणले असे म्हणता येईल. कसे ते पाहा. कायदेमंडळात मुसलमान चार जागा अधिक मागतात ही गोष्ट हवी तर किरकोळ म्हणून सोडून देऊ. परंतु या नुसत्या चार जागा अधिक मागितल्या त्या दिल्याने त्यांचे पूर्ण समाधान होत आहे अशी खात्री पटेल तर त्या त्याना देण्याला हिंदु लोक केव्हाहि माघार घेणार नाहीत. किंबहुना 'लखनौ पॅक्ट' म्हणून जो हिंदु-मुसलमानांचा राजकीय तह प्रसिद्ध आहे त्यांत मुसलमानांना या जागा प्रांतवार लोकसंख्येच्या प्रमाणाबाहेर किती तरी अधिक दिल्या गेल्या आहेत. पण त्या तहाला मूठमाती देऊन मुसलमान पुढाऱ्यानी ज्या नवीन मागण्या उपस्थित केल्या, त्यांचे मर्म काही वेगळेच आहे. ते असे की, हिंदुस्थानाच्या उत्तर सरहद्दीवर पूर्वेस बंगालपासून पश्चिमेस कराचीपर्यंत स्वायत्त असे मुसलमान प्रांत बनावे! यापैकी बऱ्याच प्रांतातून मुसलमान लोकांची संख्या अधिक आहे, पण राजकीय सत्ता असल्याशिवाय नुसत्या लोकसंख्येला काय महत्त्व? पेशावर प्रांतांत कायदेमंडळ स्थापून प्रधानमंडळ बनवावे, व सिंध प्रांत मुंबई इलाख्या पासून तोडून वेगळा करावा व त्यातहि स्वतंत्र प्रधानमंडळ बनवावे म्हणजे पंजाब प्रांताच्या उजव्या डाव्या हाताला मुसलमानी राज्ये होऊन आधीच प्रबळ असलेला पंजाब प्रांत आणखी प्रबळ होईल.

या योजनेचा दुहेरी फायदा असून त्याची जाणीव दूरदर्शी मुसलमान पुढाऱ्याना झालेली आहे. पैकी पहिला फायदा असा की, इंग्रज सरकारने हिंदुस्थानात जबाबदारीचे स्वराज्य निर्माण केलेच तर त्याला प्रांतसंघाचे स्वरूप राहील. म्हणजे एका संघात अनेक प्रांताचा समावेश होऊन त्या सगळ्यानी मिळून स्वराज्य करावे असे होईल. संघामध्ये प्रांत लहानमोठे असले तरी बहुधा त्या प्रत्येकाला एकेक मत मिळणार. अर्थात् या संघात खास मुसलमानी प्राबल्य असणारे प्रांत जितके अधिक तितकी अधिक सत्ता मुसलमानाना मिळणार. पेशावर प्रांत लॉर्ड कर्झन यानी सरकारच्या हिताच्या दृष्टीने वेगळा बनविला तोच मुसलमानी हिताच्या दृष्टीनेहि सोयीचा ठरतो. म्हणून मुसलमानांची मागणी अशी की, तो प्रांत तसाच वेगळा व स्वतंत्र ठेवावा. पंजाबात पुनः समाविष्ट करू नये. समाविष्ट केला तर दोनहि मिळून एकच प्रांत व संघात एकच मत. ह्याऐवजी पंजाबाला एक मत व पेशावर प्रांताला एक मत, असे झाल्यास मुसलमानाना संघात दोन मते मिळतील. आणि त्याच्या जोडीला सिंध हा प्रांत वेगळा झाला म्हणजे या दोन मतांची तीन मते झाली! बलुचिस्थान प्रांत आज वेगळाच आहे. पण त्यालाहि पेशावर प्रांताप्रमाणेच स्वतंत्र कायदेमंडळ द्यावे अशी आणखी एक मागणी मुसलमानांची आहे. याचा सरळ अर्थ असा की, या तीन मतांत आणखी एक मिळाले म्हणजे चार मतें मुसलमानांची झाली. आणि पूर्वबंगाल प्रांत हा मुसलमानांचा आधीच आहे. अर्थात् चार मतांची पाच मते झाली. म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानात मुसलमान हे संख्येने $\frac{1}{3}$ किंवा त्याहून कमी असले तरी स्वराज्याच्या योजनेतील प्रांतिक संघात मुसलमानांना जवळ जवळ निम्म्याइतकी मते मिळणार! पण अशा रीतीने प्रांतवारीने मतसंख्या प्रमाणाबाहेर मिळाली पण सर्व हिंदुस्थानात मध्यवर्ती सरकारच जर प्रबळ राहिले तर काय उपयोग? म्हणून ते न व्हावे याकरिता, जिनाप्रभृति पुढाऱ्याचे म्हणणे असे की, 'उर्वरित सत्ता म्हणजे मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार याच्यामध्ये वाटून उरलेली म्हणजे अवशिष्ट सत्ता ही प्रांताच्याच हाती राहिली पाहिजे! म्हणजे उत्तरेकडील या पाच मुसलमानी प्रांतात मुसलमान हेच सत्ताधीश झाले पाहिजेत. पैकी पूर्व-बंगाल विचारातून क्षणभर सोडून दिला तर हे उघड दिसतें कीं, उत्तरेकडील महत्त्वाच्या सरहद्दीला लागून असलेल्या एकंदर माऱ्याच्या मुलुखात कराचीपासून काश्मीरपर्यंत संघटित मुसलमानी राज्य व्हावे!

पण असे राज्य निर्माण झाल्यास त्याचा संघात्मक हिंदी स्वराज्यावर काय परिणाम होणार हे जसें हिंदूंना पाहावे लागते तसेच साम्राज्याच्या व परराष्ट्रीय संबंधाच्या दृष्टीने इंग्रज सरकारलाहि पाहावे लागल्यास त्यात आश्चर्य कसले? म्हणून सिंध प्रांत वेगळा करू नये, आणि पेशावर प्रांतात स्वतंत्र कायदेमंडळ स्थापू नये, या बाबतीत हिंदु महासभा व इंग्रज सरकार याचे दिसण्यात एक मत होत असले तरी तें त्यांच्या संगनमतामुळे घडत नाही, तर ज्याच्या त्याच्या स्वतंत्र विचाराचा व धोरणाचाच तो परिणाम आहे ही महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. काही बाबतीत हिंदूंना खाली दडपण्यात इंग्रज व मुसलमान यांचे जसे यदृच्छेनें एकमत होण्याचा योग येतो, तसाच सरहद्दीचे हे प्रांत सर्वस्वी मुसलमानांच्या सत्तेत जाऊ नयेत या बाबतीत हिंदु व इंग्रज सरकार याचे एक-

मत होण्याचा योगहि यदृच्छेनेच येतो. त्याला काय इलाज? हिंदुस्थानात जमल्यास इंग्रजाच्या अमलाखाली व म. गांधी म्हणतात त्याप्रमाणे ते नच जमल्यास इतर रीतीने, स्वराज्य भोगावयाला मिळावे याविषयी हिंदी हिंदू व हिंदी मुसलमान यांची आकांक्षा एकच आहे. पण दुसऱ्या पर्यायात काबूलच्या अमीराला हिंदुस्थानावर स्वारी करणे शक्य व्हावे की नाही याविषयी हिंदू व मुसलमान यांचे ऐकमत्य नसून हिंदू व इंग्रज सरकार यांचे ऐकमत्य आहे.

स्वराज्य न मिळाले तर काबूलच्या अमीराची स्वारी हिंदुस्थानावर व्हावी हे मुसलमान इष्ट मानतील. पण आज स्वराज्य न मिळाले तरी चालेल पण काबूलच्या अमीराची स्वारी व्हावी हे हिंदु लोक इष्ट मानीत नाहीत, ही गोष्ट स्पष्टपणे सांगण्याला काहीच हरकत नाही. अशी स्थिति असता, अमीर अमानुल्ला याजवर आलेल्या संकटात हिंदु लोकानाहि त्याच्याविषयी सहानुभूति वाटत आहे त्याचे कारण काय? व या प्रश्नाचे उत्तरहि आम्ही सरळ मनाने स्पष्ट देऊं इच्छितो. अफगाण लोकांनी आपल्या देशांत स्वराज्य भोगावे अशीच आमची इच्छा आहे. अमानुल्ला हा दूरदृष्टि असून त्याचे धोरण प्रागतिक आहे, व आपल्या राज्यात सर्व तऱ्हेच्या सुधारणा करून राष्ट्र भरभराटीला आणावे अशी त्याची इच्छा आहे. पण ही प्रगति करताना तो इंग्रज साम्राज्याच्या शत्रूना म्हणजे जर्मनी रशिया वगैरेना जवळ करून, खुद्द इंग्रजाना हातभर दूर ठेवतो. एका अर्थाने हे त्याच धोरण स्वराज्यवादी हिंदी जनतेच्या हिताचेच आहे. याचे कारण असे की, साम्राज्यवादी इंग्रज बाहेर जितका निर्भय होईल तितका तो हिंदुस्थानात जुलमी राहील यात शंका नाही. अर्थात् आमचा स्वतःचा धाक सरकारला बसविण्याबरोबरच कोणा परक्याचाहि धाक जर इंग्रजाना राहील तरच ते हिंदुस्थानातील प्रजा असंतुष्ट न ठेवण्याचा व क्रमाक्रमाने का होईना पण तिला स्वराज्याचे अधिकार देण्याचा काही विचार जागृत ठेवतील. उलट साम्राज्यलोभी इंग्रज निर्भय झाला म्हणजे हिंदुस्थानाच्या स्वराज्याची आशा संपली असेच समजावे. नावाला साम्राज्य म्हणून राहिले तर त्या बाबतींत हिंदी जनता इंग्रज जनतेचा हेवा किंवा द्वेष करीत नाही. तसेच हिंदी जनता साम्राज्याला विरोधी आहे याचा अर्थ इंग्रज बादशहाची सत्ता कायदेशीर रीतीने नष्ट व्हावी किवा बादशहाच्या डोक्यावरचा मुगुट जाऊन त्याच्यावर नुसती बोलर हॅट यावी असे कोणी म्हणत नाही. हिंदी जनतेचे म्हणणे इतकेच की, बादशहाच्या डोक्यावरील मुगुट ब्रिटिश राष्ट्राच्या खजिन्यात परत जमा न होताहि जर वसाहती जबाबदारीचे स्वराज्य भोगू शकतात, तर ते स्वराज्य हिंदुस्थानालाहि का मिळू नये? व ही आकांक्षा सिद्धीस जावयाची तर ब्रिटिश साम्राज्य निर्भय व प्रबळ झाल्यापेक्षा ते निर्बळ व संकटग्रस्त व चिंताग्रस्त राहिले तरच त्या काचणीमुळे व हिंदी जनतेच्या साहाय्याच्या अपेक्षेमुळे आमच्या स्वराज्याचा मार्ग अधिक मोकळा होईल.

# पावसाचें अनुमान

( ले.—ज. सं. करंदीकर )

गतवर्षी १९२८ सालच्या पावसाळ्याचें भविष्य दोन हप्त्यांनीं दिलें होतें. त्यांत जे पावसाचे योग दिले होते त्यांतले बरेचसे पावसाचे योग जुळले. तारखामध्ये मात्र कोठें एक दिवसाचा, कोठें दोन दिवसांचा आणि क्वचित् ठिकाणी तीन दिवसांचा फरक पडला. ता. १० एप्रिल, ता. १३ मे, ता. ११-१२ आक्टोबर आणि ता. ३ नोव्हेंबर एवढ्या तारखांना मात्र पावसाचा योग दिला असून पाऊस मुळीच पडला नाही. उलटपक्षी जुलै महिन्यांत ता. १८ ते २० आणि २३–२७, आगस्ट महिन्यांत ता. २७–३० आणि सप्टेंबर महिन्यांत ता. १५–१९ हे योग माझ्या भविष्यांत दिले नसून त्या तारखांस पाऊस पडला. एकंदरीत गतवर्षी अंदाजाहून पाऊस अधिक पडला.

गतवर्षीच्या भविष्यांत जी तफावत पडली तिची कारणें शोधून पाहून यंदाच्या वर्षीचे भविष्य वस्तुस्थितीशीं शक्य तितकें जुळेल असा प्रयत्न केला आहे. याचा अनुभव काय येतो पाहावें. इंग्रजी तारखा व पंचांगांतील तिथी यांचा प्रारंभ सारखाच नसल्यामुळे, आणि पावसाची गर्भधारणा २४ तासांतून नक्की कोणत्या वेळीं झाली हें समजण्यास मार्ग नसल्यामुळ, आणि धारवाड ते धुळें येथपर्यंतच्या टापूंत लागू होईल अशा मध्यम मानानें पावसाचा अंदाज व तारखा तयार केल्या असल्यामुळें दिलेल्या तारखांत विशिष्ट स्थानीं एक-दोन दिवसांचा फरक पडणें स्वाभाविक आहे. त्याहून अधिक दिवसांचा फरक पडला तर मात्र

तें भविष्य चुकलें असें म्हणणें प्राप्त आहे. असो. आतां येत्या पावसाळ्याचा विचार करूं.

**१९२९ चें पावसाचें भविष्य**

एप्रिल ता. १६ रोजीं रविबुधाची मोठी युति होऊन गेली. तिचा पाऊस तत्पूर्वी एक आठवडा म्हणजे ता. ९ पासून सुरू झाला आणि युतीनंतरहि एक आठवडा कांहीं ठिकाणीं थोडथोडा पाऊस पडला. त्यानंतर ता २० रोजीं रविशुक्र-युति झाली. तिचा परिणाम गेल्या आठवड्याच्या पावसांत दिसून आला आणि तो परिणाम एप्रिल ता. २८ पर्यंत दिसून कांहीं ठिकाणीं वळवाचा पाऊस पडेल. मे महिन्यांत पावसाचा जोर कमी आहे. कारण रवि-गुरुयुतिशिवाय दुसरी युति नाहीं. तथापि मे महिन्यांत कांहीं दिवस वळवाचे पाऊस पडतील व त्या तारखा पुढें दिल्या आहेत. त्यांत विशेषतः ता. २४ मेपासून पावसाचा संभव अधिक आहे. जून महिन्यांत ता. ९ रोजीं रविबुधाची युति आहे. पण ही युति छोटी असून तिला पोषक अशी दुसरी युति नसल्यानें पावसाळ्याची सुरवात ता. २ जूनपासून होईल, पण ती जोराची होणार नाहीं. जुलै महिन्यांत ता. ३१ रोजीं रविबुधाची मोठी युति आहे. तिचा परिणाम ता. २३ जुलै-पासून तो ता. ७ आगस्टपर्यंत दिसून येईलच. पण त्याशिवाय जुलैच्या प्रारंभीं मंगळ व नेपच्यून यांची युति जलनाडींत असल्यामुळें ता. ५ ते ११ पर्यंतहि बराच पाऊस पडेल. आगस्ट व सप्टेंबर या महिन्यांत बुधाची युति नाहीं. ता. ८ आक्टोबरला बुधाची छोटी युति आहे. तिचा परिणाम ता. १ ते ६ आणि ता. ११ ते १६ पर्यंत दिसून येईल. नोव्हेंबरमध्यें ता. २७ रोजीं बुधाची या वर्षांतली शेवटची मोठी युति आहे. तिचा परिणाम ता. २० ते २५ पर्यंत दिसून येईल.

वरील बुधाच्या योगाखेरीज इतर सर्व योग लक्षांत घेऊन एकंदर पावसाचें अनुमान पाहातां साधारणतः महाराष्ट्रांत, म्हणजे धुळें ते धारवाड या टापूंत, पुढील तारखास पाऊस पडण्याचा संभव आहे.

**एप्रिल**—ता. २३, २६, २८.

**मे**—ता. ३, ७, १३, १७, २४, २६, २८.

**जून**—ता. ३,४,९,१२,२०,२२,२४.

**जुलै**—ता. ५,७,१०,१३,१९,२३,२४,२५, २७.

**आगस्ट**—ता. ४,५,९,१०,१२,१८,२२,२४, ३१.

**सप्टेंबर**—ता. १,२,१२, १३, १५, २०, २४, २६,२८.

**आक्टोबर**—ता. २,३,५,७,१४,१६,२४.

नोव्हेंबर व डिसेंबर या महिन्यांतील तारखा मागाहून प्रसिद्ध करण्यांत येतील.

# संगमनेर येथील मिरवणूक

## बायकांनीं मिरवणूक पार पाडली

संगमनेर येथें लहानमोठ्या प्रमाणावर दरसाल श्रीहनुमानजयंतीचा उत्सव होत असून मूर्तीची मिरवणूकहि निघत असते. मिरवणूक जातांना येथील भडंगबुवाचे मशिदीवरून जाते. असें असतां २।३ वर्षांपासून येथील मुसलमानांनीं कुरापती काढून मिरवणुकीस हरकत करण्यास सुरवात केली, व सरकारनेंहि हिंदूंचे हक्काचा विचार न करतां गेल्या दोन सालांत मिरवणुकीचे बाबतींत अनेक विघ्नें उपस्थित केलीं. परंतु त्या सालापुरती तडजोड म्हणून कांहीं अपमानास्पद अटींवर मिरवणूक पार पडली.

या वर्षीची श्रीहनुमानजयंती चैत्र शु. १५ ता. २३-४-२९ इ. रोजीं होती. गेले दोन सालांचे अनुभवावरून याहि वर्षी मिरवणुकीचे आधीं सुमारें ४ दिवस सर्वच जिल्हाधिकारी संगमनेरीं जमले. मात्र नेहमींपेक्षां ह्या वर्षी त्यांनीं एक नवीनच शक्कल काढली. कोणताहि सन्मान्य व स्वाभिमानी हिंदु नेहमींचा रस्ता सोडून दुसऱ्या रस्त्यानें मिरवणूक नेण्यास संमति देईल ही गोष्ट अधिकाऱ्यांसहि अशक्य वाटली. अधिकाऱ्यांचा सुशिक्षित हिंदूंवर व उच्च वर्णीयांवर फार कटाक्ष. तेव्हां त्यांना बोलावण्यापेक्षां आपल्या वजनानें दबणारी कांहीं माणसें व कांहीं अगदी गरीब अशीं आशिक्षित माणसें अधिकाऱ्यांनीं बोलावून 'ही ब्राम्हणांनीं काढलेली चळवळ आहे, तुम्ही त्यांत पडूं नका, तुमचें निष्कारण नुकसान होईल, अमुकच रस्त्यांत कांहीं विशेष आहे असें नाहीं' वगैरे अनेक प्रकारांनीं बुद्धिभेद करण्यास प्रारंभ केला. इतकें करूनहि अखेर पहिले दिवशीं इतरांचा विचार घेऊन सांगतों असें सांगून ही मंडळी निसटली आणि दुसरे दिवशीं लोक रस्ता बदलण्यास अगर जयघोष बंद करण्यास कबूल नाहींत असें त्यांनी सांगितलें.

तेव्हां अधिकाऱ्यांनीं निराळ्या दिशेनें कारवाई करण्यास सुरवात केली.

इकडे लोकहि स्वस्थ नव्हतेच. कायदेशीर अनत्याचारी मार्गानें पण नेटानें चळवळ चालू ठेवण्याचा त्यांचा निश्चय होता. त्यांनीं पोलिसांकडे वाद्यासंबंधीं रीतसर अर्ज केला व उत्सवाची तयारी चालविली. आणि चैत्र शुद्ध १४ चे दिवशीं मिरवणुकीचा रथहि देवळाजवळ नेऊन ठेवला. अधिकाऱ्यांकडून कांहीं तरी भलताच जाहिरनामा येणार, लोकक्षोभ होणार याबद्दल मात्र पुढाऱ्यांतून व इतर लोकांतून चर्चा चालू होती. सोमवारीं सायंकाळीं सुमारें ६ चे सुमारास एकदांचा येथील सबडिव्हिजनल मॅजिस्ट्रेट रा. सा. तांबे यांचे सहीचा मिरवणुकबंदीचा जाहिरनामा लागला ! हा प्रकार होईल ही धास्ती लोकांस नव्हती असें कांहीं नाहीं. परंतु भलतीसलती विधानें करून व हिंदुमध्यें जातिद्वेष उत्पन्न होईल अशी भाषा वापरून जाहिरनामा निघेल अशी मात्र कोणाचीच कल्पना नव्हती.

जाहिरनामा वाचून मात्र लोकक्षोभ अनावर झाला. सरकारनें आपलेकडून खबरदारी घेतली होतीच. त्यांनीं सुमारें १०० सशस्त्र पोलीस आगाऊच आणून ठेवले होते. तेव्हां सोमवारीं रात्रीं रस्तोरस्तीं एकीकडे लोकांच्या झुंडी व दुसरीकडे पोलिसांच्या टोळ्या असा देखावा दिसूं लागला. सुदैवानें दंगाधोपा अगर मारामारी मात्र कोठेंच झाली नाही. अधिकाऱ्यांनी जाहिरनाम्याबरोबरच हिंदूंपैकीं १४ इसमांवर क्रि. प्रो. को. कलम १०७ प्रमाणें नोटिसा काढून त्याचें काम रात्रीं म्हणजे ९ वाजण्याचे पुढें चालवलें ! त्यामुळेहि सारी रात्र एकसारखी चळवळीत गेली. गांवांत मात्र सर्वांचे तोंडावर एक प्रकारची खिन्नता आली होती.

अशा स्थितीत एकदांची पौर्णिमा उजाडली. मारुतीचे देवळाचे दारांशीं पोलिसांचा गराडा पडला. जन्माचा उत्सव थाटानें पार पडला. उत्सवास गर्दी अतोनात होती. स्वतःस हिंदु म्हणणारी एकहि महिला दर्शनास आल्याशिवाय राहिली नसेल. ज्याचे त्याचे तोंडून मिरवणूक नेण्याचा आग्रह ऐकूं येत होता. परंतु पुढें कोणी होत नव्हतें. सुमारें ९॥ वाजतां सात वर्षांच्या दोन मुलांनीं श्रीहनुमानाची मिरवणुकीची मूर्ति आणून रथांत ठेवण्याची खटपट केली, परंतु ताबडतोब पोलिसांनी धांवत येऊन मूर्ति खालीं ठेवण्यास लाविलें. वरिष्ठाकडे गाऱ्हाणें गेलें व ताबडतोब डी. एस. पी. व डी. वाय. एस. पी. धांवत आले व त्यांनी त्या पोरांकरवीं मूर्ति देवळांत नेवविली ! त्यावर आणखी अर्धा तास गेला. पुढारी घरोघर खिन्न होऊन बसले, तरी लोक मात्र चटचटीत लागणारें ऊन सोसूनहि जागचे हलेनात इतक्यांत रथ सुमारें २०० बायकांनीं ताब्यांत घेतल्याची बातमी सर्व गांवभर पसरली. आम्ही आमचा मारुति आमचे जबाबदारीवर नेतों, तुम्ही अडथळा करूं नका अशाबद्दल त्यांनी पोलिसांची विनवणी करण्यास सुरुवात केली. बायकांचा जमाव वाढूं लागला. सुमारें ५०० बायका जमल्या व त्यांनीं श्रीहनुमानाची मूर्ति रथांत ठेवण्याची खटपट केली, परंतु त्यांत यश आलें नाहीं. अधिकाऱ्यांनीं मूर्ति त्यांचे ताब्यांतून घेतली. डी. वाय. एस. पी. व डी. एस. पी. वगैरेंनी बायकांबरोबर अनेक प्रकारांनीं युक्तिवाद करून पाहिला. खटले करण्याच्या धमक्या दिल्या, नांवें टिपून घेतली. सब.–डि. मॅजिस्ट्रेट रावसाहेब तांबे तेथें आले, त्यांनींहि आपली शिकस्त केली. शेवटीं 'ब्राह्मणांच्या बायका व मारवाड्यांच्या बायका घरीं बसल्या आहेत. मग तुम्ही गरीब माणसें आपला जीव कां धोक्यांत घालतां' वगैरे सांगून भेदनीतीचा वळसाहि देऊन पाहिला ! त्यावर त्या बायांनी सरळ उत्तरें दिलीं कीं, 'मारुतिराय एकट्या ब्राह्मणांचा नाही किंवा एकट्या मारवाड्यांचाहि नाहीं, तो हिंदुमात्राचा आहे. तेव्हां त्याची मिरवणूक आम्ही काढणार.' शिवाय वस्तुस्थिति अशी होती कीं, पुरुषांच्या गर्दीत कधींहि न येणाऱ्या हिंदूंच्या सर्व जातींच्या बायका हा वेळपर्यंत जमल्या होत्या. मारवाडी, ब्राह्मण, साळी, माळी, कोष्टी, मराठे, एकूणएक जातीच्या बायका अहमहमिकेनें पुढें येतां येतां बायकांची संख्या हजारावर गेली. बायका हट्टास पेटलेल्या व पोलीस आग्रह सोडींना. तेव्हां या प्रकरणाचा अखेर शेवट काय होतो या विचारानें सर्वजण चिंताग्रस्त झाले होते.

इतक्यांत गर्दीतील एका विणकराचे मुलास पोलीस हातकड्या घालूं लागले, तेव्हां त्याची आई व बहीण तिकडे धांवल्या व बाचाबाची होऊं लागली. पोलीस तिकडे गुंतलेले पाहून कांहीं शूर महिलांनीं श्रीमारुतीची तसबीरच रथांत ठेवून पांचसातजणी रथावर चढल्या व बाकीच्यांनीं रथ लोटण्यास सुरुवात करून तो ५० हात पुढे लोटलाहि. हा प्रकार इतका अचानक रीतीनें झाला कीं, तो रथ भाऊसाहेब संत वकील यांचे घराजवळ येईपर्यंत पोलिसांना तो थांबवतां आला नाहीं. अशा रीतीनें रथ रंगार–गल्लीचे कोपऱ्यावर तर आला. आतां भडंगबुवाची मशीद फक्त १०० हातांवर राहिली होती व ती तर तंट्याची जागा.

तेथून रथ जाऊं नये म्हणून कांहीं अधिकाऱ्यांनीं अशी क्लृप्ति काढली कीं एका गाडीचे बैल सोडून ती गाडी रथाचे मार्गांत आडवी ठेविली. इतक्यांत कलेक्टरसाहेब व रावसाहेब प्रांत हे मोटारींतून आले. त्या मोटारीहि रथाचे मार्गांत आडव्या उभ्या करण्यांत आल्या. शिवाय त्यांस जोडून अग्नियंत्र-धारक पोलीसबहादुरांचीहि एक भिंत रथाचे मार्गांत आडवी घालण्यांत आली. अधिकाऱ्यांनीं आपला किल्ला अभेद्य करून टाकला. पण अधिकाऱ्यांच्या ह्या कडेकोट तयारीनेहि ह्या स्त्रिया घाबरल्या नाहींत. उलट गाडीवरून रथ नेण्याचा त्यांचा प्रयत्न चालला. गाडी मोडण्याचा रंग दिसूं लागला. अखेर गाडी बाजूस झाली. रथ रंगार-गल्लीचा चौक ओलांडून पुढें सरकला व महिला-वीरांची व पोलीस वीरांची लढाई हातघाईवर आली. यःकश्चित् अबला पण आडदांड अशा पोलीसबहाद्दरांना त्यांनीं अगदीं जेरीस आणिलें. अबलांचीं हत्यारें म्हणजे तोंडाची मुलूखमैदान तोफ; गुलालाचा विषारी गॅस, बत्ताशांचा गोळीबार ! या हत्यारांनीं युक्त अशा महिलांचा जेव्हां मारा सुरू झाला त्या वेळेस डि. मॅजिस्ट्रेट व स. डि. मॅजिस्ट्रेट यांची सुद्धां त्रेधा उडाली. अधिकाऱ्यांचे डोळ्यांना गुलालाचे अंजन मिळालें. त्या वेळीं इतका गोंधळ उडाला कीं, त्या वावटळींत काय चाललें तें नीट दिसेना. पण पोलिसांची भिंत फोडून रथ पुढें सरकला. त्याच्यापुढें मोटारी उभ्या होत्या. त्या तटबंदीस रथाची अशी जोराची टक्कर दिली गेली कीं, मोटारी लटपटल्या. पहिल्या मोटारीची दुर्दशा होऊन ती बाजूस झाली तेव्हां दुसरीवर प्रसंग आला. तिचीहि तीच स्थिति होणार असें दिसतांच तिनें शहाणपणानें पळ काढिला. रथानेंहि अर्थात् पाठलागास सुरवात केली ! आतां मात्र आपणास यश मिळत नाहीं याबद्दल अधिकाऱ्यांची खात्री झाली. ते आपलें अस्ताव्यस्त झालेलें सैन्य सावरत आहेत तोंच रथ मोठ्यानें जयघोष करीत भडंगबुवाचे मशिदीवरून पार निघूनहि गेला !

अशा रीतीनें श्रीहनुमानाचे साहाय्यानें व त्याचेच प्रेरणेनें "हें बायकांचें बंड" कल्पनातीत रीतीनें यशस्वी होऊन मी मी म्हणणाऱ्या जवान मर्दांस जी गोष्ट अशक्य होऊन बसली होती ती केवळ अबलांनीं शक्य करून दाखविली. रथ एकदां मशिदीवरून पुढें गेल्यावर मात्र सर्व मिरवणूक यथास्थित व कोणत्याहि तऱ्हेचा अडथळा न येतां, पण मुख्यत्वेंकरून आर्य स्त्री मंडळाच्या पुढारीपणाखालीं पार पडली. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकू व नारळ यांचा प्रसाद स्त्री-वर्गानेंच दिल्यावर मंडळी घरोघर गेली. अशा रीतीनें फार दिवस गाजलेली मिरवणूक अखेर निर्विघ्नपणें पार पडली.

मिरवणुकीचे बाबतींतलि वरिष्ठ युरोपियन अधिकाऱ्यांचे स्त्रीदाक्षिण्ययुक्त व संभावित वर्तन पाहून त्यांचे कौतुक करावेसें वाटतें. डोळ्यांत तोंडांत गुलाल गेला, कांहांना प्रत्यक्ष धक्काबुक्कीहि सोसावी लागली, परतु त्यांनीं एकंदर प्रकार हंसण्यावर नेऊन आणि संभावितपणानें वागून, कांहीं हडेलहप्पी प्रकार करण्यापेक्षां, रथ जाऊं दिलेला बरा या विचारानें स्वतःचा हट्ट सोडला. युरोपियन अधिकाऱ्यांचें हे स्त्रीदाक्षिण्य प्रशंसनीय आहे. असो. या घडलेल्या प्रकारावरून बोध काय घ्यावयाचा याचा ज्या त्या वर्गानें मनाशींच विचार करावा.

# पुस्तक-परीक्षण

## कौटिलीय अर्थशास्त्र

### लेखांक २ रा

कौटिलीय अर्थशास्त्राला व्यापक म्हणजे Encyclopaedic म्हणजे एखाद्या ज्ञानकोशासारखें स्वरूप आहे हें आम्ही गेल्या अंकांत दर्शविलेंच आहे. याविषयींचीं पहिल्या भागांतील उदाहरणें दोन वर्षांपूर्वीं पुस्तकाचें परीक्षण केलें तेव्हां दिलींच आहेत. म्हणून आतां दुसऱ्या भागांतील कांहीं उदाहरणें देऊं. यांतील मुख्य विषय राजा, राजमंडळ, राजपरिवार, राज्यकारभार, राजाचे मित्र व राजाचे शत्रू आणि या सर्वांचे परस्पर संबंध हा असल्यामुळे त्यांचें सविस्तर विवेचन तर ग्रंथांत आहेच. पण अवांतरहि अनेक विषय यांत आहेत. व 'राज्यकारभार' या व्यापक सदराखालीं ते येतात असें मानूनच त्यांची सुसंबद्धता स्वीकारतां येते. पहिल्या प्रकरणांत मनुष्यांना असणाऱ्या सामान्य व्यसनांचा विचार आहे व काम क्रोधादि षड्रिपूंची चिकित्साहि आहे. उदाहरणार्थ, " वाइटाचा स्वीकार म्हणजे काय आणि चांगल्याचा छळ म्हणजे काय? काम व क्रोध या दोनहि विकारांपासून

अनेक अनर्थ उद्भवतात, म्हणून हे वाईट समजले जातात, म्हणून मनुष्यानें आध्यात्मिक बल संपादन करावें, पोक्त व अनुभवी माणसांचा सहवास ठेवावा, इंद्रियांचें दमन करावें आणि सर्वस्व हरण करण्यास व अनेक अनर्थ उत्पन्न करण्यास कारणीभूत होणाऱ्या कामाचा व क्रोधाचा त्याग करावा." हा उपदेश सर्वसामान्य आहे व राजाला तो उपदेश केला याचें कारण राजाला मनुष्यस्वभावाचा म्हणजे निरनिराळ्या वृत्तीच्या मनुष्यव्यक्तींचा जितका संबंध येतो तितका इतर कोणालाहि येत नाहीं, अशी उपदेशकाची समजूत आहे असें धरून चालावें लागते. पण असले अवांतर विषय दुसऱ्या भागापेक्षां पहिल्या भागांतच अधिक आहेत.

### मंत्र तंत्र प्रयोग

मंत्र, तंत्र, प्रयोग, हें प्रकरण असेंच आहे. या प्रकरणांत या दोन साधनांनी धर्मबाह्य लोकांना कसें मारावें किंवा त्रास द्यावा हे सांगितलें आहे. ही गोष्ट चातुर्वर्ण्यव्यवस्थेच्या रक्षणाकरितां आहे असें म्हटल्यानें राजाच्या कर्तव्याशीं त्याचा संबंध येऊन पोंचतो. पण हा बराचसा द्राविडी प्राणायाम आहे. निदान मंत्र–तंत्र–प्रयोगाचा जो बेसुमार तपशील दिला आहे तो पाहिला म्हणजे या प्रकरणांत राजाला उपदेश करण्यापेक्षां ग्रंथकर्त्याला या विषयाचें जे ज्ञान होतें, किंवा तत्कालीन ग्रंथांतून मिळण्यासारखें होतें, तें सर्व एकत्र मांडण्याचाच त्याचा हेतु अधिक दिसतो. शत्रुनाश हा राजाला इष्ट असला तरी या प्रकरणांत सांगितलेले उपाय स्वतः राजा तर राहोच, पण राजाच्या नोकरांनाहि करावे लागतील असें मानण्याला कल्पना फारच ताणावी लागते. प्राणी मारण्याला किंवा त्यांची इंद्रियें विकल करण्याला उपयोगी पडणाऱ्या ज्या औषधांच्या यादी किंवा Prescriptions या अध्यायांत दिली आहेत ती वाचून मौज वाटते. आणि त्यांतील पुष्कळशी अनुभवसिद्ध नसून परंपरागत आलेल्या भोळ्या समजुती व निवळ कल्पना यांवर त्यांची रचना थोडीबहुत झाली असावी असें वाटतें. यांत ताप आणण्यापासून, पिण्याचें पाणी दूषित करण्यापासून, तों मनुष्य मारण्यापर्यंत सर्व प्रकारचे उपाय सांगितले आहेत. उदाहरणार्थ, "विजेनें पेटलेला अग्नि किंवा वीज पडून जळलेल्या झाडाच्या लांकडापासून केलेले निखारे घेऊन त्यांत कृत्तिका किंवा भरणी नक्षत्रीं रौद्र विधीनें होम केला असतां तो अग्नि कधींहि विझतच नाहीं." "लोहाराच्या घरचा अग्नि आणून त्यांत मधाचा होम करावा. कलालाच्या घरच्या अग्नींत मद्याचा होम करावा. एकपत्नीव्रतस्थ पुरुषाच्या घरच्या अग्नींत फुलांच्या माळांचा होम करावा. वेश्यांच्या घरच्या अग्नींत मोहऱ्यांचा, बाळंतिणीच्या घरच्या अग्नींत दह्याचा, अग्निहोत्र्याच्या घरच्या अग्नींत तांदुळांचा, चांडाळाच्या घरच्या अग्नींत मांसांचा, चितेच्या अग्नींत माणसांचा, याप्रमाणें अग्नींत पृथक् पृथक् होम करून नंतर ते अग्नि एकत्र करून त्यांत बोकडाच्या चरबीचा, माणसाच्या आणि वडाच्या व राजवृक्षाच्या समिधांचा होम अग्निमंत्रानें करावा म्हणजे हा अग्नि विझविला जात नाहीं व जो कोणी त्याजकडे पाहील त्याच्या डोळ्यांना भूल पडते"!!

### विलक्षण उपाय

शत्रूच्या डोळ्यांना भूल पाडण्याकरितां सांगितलेला हा उपद्व्याप पाहून, सोपीं साधनें अवघड करून सांगण्याची विद्या या ग्रंथकाराला किंवा तत्कालीन वैद्य मांत्रिक तांत्रिक यांना माहीत होती असेंच म्हणावें लागतें. राजकारणांतील शत्रूला कसें फसवावें किंवा आपल्या लोकांत अद्भुत शक्ति कशी उत्पन्न करावी याविषयींचा अध्यायहि असाच अद्भुत आहे. १५ दिवस भूक न लागावी तर औषध कोणतें? महिनेच्या महिने उपवास सोसण्याला औषध कोणतें? मनुष्य व जनावर यांना विद्रूप करण्याला औषध कोणतें? केस पांढरे होण्याला औषध कोणतें? कुष्ठरोग उत्पन्न होण्याला औषध कोणतें? शरीर ज्वालाग्राही करण्याला औषध कोणतें? पाण्यांत पदार्थ जळावा, वाऱ्यांत विस्तव न विझावा, शंभर योजनें न थकतां चालतां यावें, उल्कापाताचे देखावे कसे उत्पन्न करावे या सर्वांचे उपाय यांत दिलेले असून, त्यांतील कांहीं वाचून हंसूच येते. या विषयासंबंधाचे अनेक अध्याय वाचून करमणूक होते यापेक्षां त्याविषयीं अधिक कांहीं लिहितां येत नाहीं. पण प्रश्न असा कीं चाणक्यासारख्या कुशाग्रबुद्धीच्या विद्वानाला हे सर्व उपाय खरे वाटून ते उपयोगांत आणले जातात किंवा उपयोगांत आणतां येण्यासारखे आहेत असें खरोखरच त्याला वाटत असावें काय? पण न जाणो जारण-मरण, मंत्र-तंत्र, विषप्रयोग इत्यादि विषयीं जुन्या काळच्या सर्वच लोकांच्या कल्पना अशा प्रकारच्या असतील. आणि तार्किक बुद्धि व भलत्या गोष्टीवरील भोळा विश्वास हीं एकाच ठिकाणीं नांदूं शकत होतीं असें अनेक समाजांच्या जुन्या इतिहासावरूनहि दिसून येतें. युरोपियन राष्ट्रांतील मध्ययुगांतल्या भोळ्या समजुती कशा होत्या, किंवा खुद्द इंग्लंडांत परवां परवांपर्यंत चेटकिणीचें अस्तित्व कसें मानीत असत हें लक्षांत घेतलें म्हणजे अर्थशास्त्रांतील या अध्यायाचें आश्चर्य वाटत नाहीं. पण ग्रंथस्वरूपाच्या दृष्टीनें आमचा सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, त्यांतील सर्व सिद्धान्त,

प्रमेयें, वचनें, विधानें व उपदेश हें अनुभवसिद्धच लिहिलें गेलें असें म्हणणें अशक्य आहे. तर एखाद्या विषयावरील जी काय माहिती मग ती लिहिणारा ज्ञानी असो वा अज्ञानी असो, धूर्त असो वा भोळा असो, संशोधक असो किंवा तारवटलेल्या स्थितींत असो, कोणीहि लिहिलेली सांगितलेली म्हणून प्रचलित असेल ती सर्व एकत्र देण्याची पद्धत या पुस्तकांत अनुसरली आहे.

आणि खुद्द राज्यव्यवहारासंबंधानें जो विषय या भागांत किंवा पूर्वींच्याहि भागांत आलेला आहे त्याबद्दलहि वरील प्रकारचेंच विधान थोडेसें करावें लागतें. सामान्यतः असें म्हणावेसें वाटतें कीं, कांहीं प्रकरणांतील माहिती निवळ ऐकीव किंवा निवळ काल्पनिक अशीहि असली पाहिजे. राजानें मित्र कसे संभाळावे, शत्रू कसे निर्दाळावे व राज्यरक्षण यशस्वी कसें करावें किंवा राज्य कसें वाढवावें हा प्रश्न सोडविण्याकरितां म्हणून घेऊन, तर्कपद्धतीनें त्या विषयाचे जितके विभाग करतां येतील तितके करून, त्याचें वर्णन, विवेचन किंवा उपाययोजना हीं निवळ डोळे मिटून कल्पनेच्या तंद्रींत लिहिलीं असण्याचा संभव आहे. एखादा नाटककार किंवा कादंबरीकार एखाद्या कथेचें संविधानक मनानें तयार करतो आणि मग त्यांतील प्रवेश, देखावे, संभाषणें यांचें वर्णन कल्पनेनें रंगवतो त्याप्रमाणें या ग्रंथकारानें पुष्कळ अंशीं केलें असावें असें वाटतें.

## कपटविद्येचे डावपेंच

चाणक्य हा स्वतः चंद्रगुप्ताचा गुरु व त्याच्या राजकारणाच्या स्फूर्तीचा उगम होता असें मानलें तरी राजाचे मित्र व शत्रु यांच्याशीं वागण्याचे जे शेंकडो प्रकार, प्रसंग, उपाय, साधनें वगैरेंचें वर्णन ग्रंथांत केलें आहे त्या सर्वांचा अनुभव किंवा प्रत्यक्ष ज्ञान त्याला किंवा कोणाहि एका माणसाला असणें शक्य नाहीं. किंवा अनेकांनीं तें केवळ अनुभवानें लिहून ठेवलेलें होतें असेंहि म्हणवत नाहीं. बुद्धिबळाच्या खेळांतील प्रोफेसर स्वतः पुष्कळ प्रकारचे डाव खेळलेला असतो परंतु खेळलेल्या डावापेक्षां तो आपल्या कल्पनेनेंच किती तरी अधिक डाव नवीन बनवीत असतो तशीच ही चाणक्याची गोष्ट समजण्यास हरकत नाहीं. दूत, हेर, कपटी, कारस्थानी हस्तक, गुप्तपणें नाश करण्याची विद्या, फशी पाडण्याचे कपटप्रयोग, मित्रांचे मित्र व शत्रूंचे शत्रू यांच्याशीं वागण्याच्या रीति किंवा आडाखे यांचा तपशील या ग्रंथांत इतका दिला आहे कीं, त्यांतल्या शतांशाचाहि अनुभव स्वतः या बुद्धिबलसंपन्न गुरूला किंवा त्याच्या पराक्रमी शिष्याला आला नसेल. तात्पर्य, यशस्वी राजकारण हा विषय बुद्धिबळांतील खेळांप्रमाणें किंवा सुभाषितांतील कूटप्रश्नाप्रमाणें किंवा चित्रकाव्यांतील प्रबंधाप्रमाणें किंवा Cross word puzzle प्रमाणे, किंवा पत्त्यांच्या ब्रिजच्या डावाप्रमाणें, किंवा वर सांगितल्याप्रमाणें एखाद्या कादंबरींतील प्रवेशाप्रमाणें, तो उद्देशच घेऊन लिहिण्यास बसलेल्या बुद्धिवान पुरुषाला लिहितां येण्यासारखा आहे. व तशाच प्रकारचा या ग्रंथांतील पुष्कळसा भाग आहे.

## तत्कालीन राज्यव्यवस्था

पण आज राष्ट्रीय दृष्ट्या या ग्रंथाचें जें महत्त्व आहे असें आम्हीं समजतो तें वर लिहिलेले मंत्र तंत्र प्रयोग किंवा राजकारणांतील कपटनीतीची ही कादंबरी यांच्या दृष्टीनें नव्हे, तर त्यांतील जीं वर्णनें किंवा विधानें तत्कालीन राज्यव्यवस्था, देशस्थिति, समाजस्थिति यांच्यावर प्रकाश पाडणारीं आहेत असें निःसंशय वाटतें त्यांच्यामुळेंच. राजकीय व सामाजिक व्यवहार यांच्या अनेक अंगांसंबंधानें पहिल्या व दुसऱ्या भागांत पुष्कळच माहिती आलेली आहे, व त्यांतील बरीचशी माहिती अनुभवसिद्ध किंवा प्रचलित किंवा शास्त्रसंमत पद्धतीनें जितक्या प्रमाणानें अनुमान बांधणें युक्त तितक्या प्रमाणांत अनुमानात्मक अशीच आहे असें आम्हाला वाटतें. व या दृष्टीनें हिवरगांवकर व करंदीकर या दोघांनीं लिहिलेल्या प्रस्तावना व समालोचनें हीं वाचकांनीं लक्षपूर्वक वाचलीं असतां फार बोधप्रद होतील. उदाहरणार्थ, साम्राज्याची कल्पना त्या वेळीं काय होती? राज्यव्यवस्था कशी होती? राज्यांतील कर वसूल कसा व किती केला जात असे? न्याय व मुलकी राज्यव्यवस्था कशी होती? शेतकी खातें कसें चालविलें जात असे? न्यायपद्धति कोणती होती ? लष्करी व्यवस्था कशी असे? परराष्ट्रीय संबंधांची कल्पना कशी असे? इत्यादि गोष्टी तत्कालीन स्थितीविषयीं प्रमाणभूत मानून चालण्याला हरकत नाहीं.

करंदीकर यांनीं दिलेल्या परिशिष्टांपैकीं, अर्थशास्त्रांतलि कांहीं तुलना हें प्रकरण घेतलें असतां, कौटिल्यानें उपस्थित केलेले तुलनाविषयक प्रश्न व त्यांचीं त्यानेंच दिलेलीं उत्तरें याला केवळ मानसिक व्यापाराचा खेळ म्हणतां येईल. परंतु त्याच परिशिष्ट-संग्रहांत सरकारी वसुलाच्या बाबी, करांच्या आकारणीचें प्रमाण, नाण्यांचीं कोष्टकें व चढती उतरती भांजणी, अश्वविद्येचा विषय, दागिन्यांचे प्रकार, किल्ले कोट बांधण्याच्या सूचना, सेनेचा व्यूह रचण्याचे प्रकार, तहनाम्यांचे प्रकार, गुन्ह्यांचे प्रकार व त्यांना सांगितलेल्या शिक्षा या गोष्टींना बरेचसें वस्तुस्थितीचें अधिष्ठान व तत्कालीन

प्रामाण्य होतें. यामुळें हिंदुस्थानांतील आजची समाजस्थिति व त्या वेळची समाजस्थिति यांची तुलना करणें हे संशोधकांना उद्योग करण्याला आणि शास्त्रीय कल्पना व बुद्धिचातुर्य खर्चण्याला फार मोठें क्षेत्र आहे. या संशोधनाने किंवा तुळनेनें काय सिद्धांत निघतील किंवा काढावयाचे हा येथें मुख्य प्रश्न नाहीं. शास्त्रीय पद्धतीनें जें त्यांतून निघेल तेच खरें. मग त्यांतील कांहीं त्या कालाला अनुकूल किंवा हल्लीच्या काळाला अनुकूल किंवा प्रतिकूल जें निघेल तें निघेल. कारण सत्याचा विधिनिषेध कोणी मानीत नाहीं.

या तुलनेसंबंधाने दुसरीहि एक गोष्ट सांगावयाची ती अशी कीं, कोणत्याहि काळांतील समाजस्थिति गुणदोषमिश्रितच असते व असावयाचीच. त्याला कोणत्याहि एका ठराविक प्रमाणानें मोजून चालावयाचें नाहीं.

कौटिलीय अर्थशास्त्रामध्ये गुन्ह्यांचे प्रकार व शिक्षा यांची माहिती दिली आहे. परंतु चाणक्यकालीन पिनल कोड व मेकॉलेचें पिनल कोड हातांत घेऊन—हे दुसरें आज हिंदुस्थानांत प्रचारांत असल्यानें आमच्या परिचयाचें आहे तेवढ्यावरून चाणक्याचे पिनल कोडावर मत प्रगट करणें बरोबर होणार नाहीं. याचें कारण कोणत्याहि दोन देशांचें पिनल कोड एकाच काळचे घेतलें तरी त्यांतील गुन्ह्याच्या व्याख्या व शिक्षांच्या मर्यादा या सारख्या आढळणार नाहीत. चोरांच्या गुन्ह्याला कांहीं वर्षांपूर्वी विलायतेत फांशीची शिक्षा असे. आज चोरांच्या गुन्ह्यालाच काय पण एकंदर फौजदारी कायद्यांतूनच फांशीची व फटक्यांची शिक्षा रद्द करावी असे मत जोराने प्रचलित होत आहे. पण २२०० वर्षांपूर्वी फौजदारी कायदे बजावतांना गुन्ह्याच्या प्रकारांत तरतमभाव किती सूक्ष्म चालविला जात होता व गुन्ह्यांना शिक्षा सांगितल्या त्या किती सकारण आहेत हें पाहिलें म्हणजे कौतुक वाटतें. जी गोष्ट पिनल कोडाची तीच किंवा त्याहून अधिक प्रमाणानें दिवाणी कायदा व राज्यघटना यांचीहि असली पाहिजे. तथापि येथें त्या काळच्या व आजच्या स्थितीतील फरक हा मुख्य मुद्दा नसून त्या काली भरतखंडांतील मुलकी राज्यव्यवस्था सुधारलेली होती हा आहे, व राज्ययंत्राचा कारभार लोकांच्या सुखसोयी लक्षांत घेऊन केला जात असे हीच मुद्द्याची मुख्य गोष्ट होय.

## तत्कालीन सुधारणा

या कालचीं राज्यें लहान लहानच असत. हल्लींएवढीं मोठीं राज्यें तेव्हां नव्हतीं. युरोपांतहि सिटी स्टेटस होतींच. म्हणजे एका शहराचें एकेक राज्य असाहि प्रकार होता. ज्यूरी, मतदारसंघ व कायदेमंडळ, हीं जवळ जवळ समव्याप्त असून तीं इतकीं लहान असत कीं, आरोपी म्हणून अगर उमेदवार म्हणून कोणाला भाषण करावयाचें झालें तर तें या वर्गातील सर्वांना ऐकूं जाईल इतकीं तीं लहान असत. भरतखंडांतील राज्यें यापेक्षां अधिक मोठी होतीं. म्हणून राज्यव्यवस्थाहि अनेक खात्यांवर विस्तारलेली व खोल विचारानें बनविलेली अशीच होती. इतकेच नव्हे तर ज्या सुधारलेल्या गोष्टी या नव्या काळांत प्रथम उत्पन्न झाल्या असें वाटतें, अशाहि कांहीं गोष्टी या जुन्या काळांत अमलांत होत्या. उदाहरणार्थ, जुन्या काळीं ग्रामाधिकारी असत व तेथून वरपर्यंत एकावर एक असे निरनिराळे अधिकारी असून राज्याचा वसूल हिशेबानें घेतला जाई व हिशेबीपणानें खर्चला जाई यांत आश्चर्य नाहीं. पण त्या काळीं जन्ममृत्यूची नोद, गांवाची खानेसुमारी, जनावरांच्या संख्येची नोद, प्रॉपर्टी रजिस्टर, कोर्ट ऑफ वॉर्डस, पाटबंधाऱ्याची व्यवस्था, सार्वजनिक इमारतींची व्यवस्था, ड्रेनेज, टाऊन प्लॅनिंग, काढते घालते पूल, वजनें मापें बिनचूक ठेवण्याची व्यवस्था, शहरांतील सुधराई सफाई, स्मशानांची व्यवस्था, आग विझविण्याची व्यवस्था, आरोग्यबाधक पिकांना प्रतिबंध, धान्य फळें फुलें यांच्या निवडक बीजांचे सरक्षण वगैरे गोष्टी आपल्याला केवळ आधुनिक अशा वाटतात. पण त्याहि चाणक्याच्या ग्रंथांत आढळतात.

वास्तविक अशा गोष्टी जुन्या काळीं आढळतात म्हणून आश्चर्य प्रगट करणें म्हणजे जुन्या काळच्या लोकांचा उपमर्द करणें असेंच होय. कारण आश्चर्य करणारा प्रथम अशी गोष्ट गृहीतच धरतो कीं, जुन्या काळीं मनुष्यामध्यें आजच्याइतकी बुद्धि, कल्पकता, योजना वगैरे गोष्टी नव्हत्या. पण ही गृहीत गोष्ट मुळांत खरी कोठें आहे ? म्हणून हें आश्चर्य सकारण न ठरतां वेडेपणाचें व ग्राम्य ठरतें. कांहीं लोक इतके भोळे असतात कीं जुन्या काळीं माणसांचा देह हल्लींच्या माणसासारखा होता असें म्हटलें तरी त्याचेंहि त्यांना नवल वाटतें. पण हल्लीं शोधकांना १०-१० हजार वर्षांपूर्वीचे मुडद्यांचे सांगाडे सांपडतात. त्यांतील देहरचना हल्लींच्या मनुष्याच्या देहरचनेसारखीच असते हें पाहून त्यांचा नाइलाज होतो इतकेंच.

असो. याहून अधिक तपशिलांत जातां येत नाहीं. पण आम्ही इतकेंच सांगतों कीं, कौटिल्याच्या ग्रंथाचें हें मराठी भाषांतर जो समग्र वाचील त्याला प्रत्येक अध्यायातच काय पण प्रत्येक ओळींतहि जुन्या काळच्या लोकांची बुद्धि, प्रगल्भता, त्यांची विद्वत्ता, त्यांची कल्पना

व अनुभवाचें वर्गीकरण करून त्यांतून संघटित शास्त्र बनविण्याची पात्रता वगैरे गोष्टी दिसून येतील. हा ग्रंथ Encyclopædic म्हणजे सर्वसंग्रहाच्या रूपाचा आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे. कारण कौटिल्याला प्रत्यक्ष राजकारणाचा व राज्यव्यवस्थेचा परिचय असला तरी, एका बाजूस लष्करी फौजेचा व्यूह बनावणें व दुसऱ्या बाजूस रत्नादिकांची परीक्षा करणें या गोष्टी स्वतः चाणक्याला प्रत्यक्ष परिचयाच्या होत्या किंवा त्यांत तो वाकबगार होता असा अर्थ नाहीं. तर अर्थशास्त्रांत जितके विषय पडतात तितक्यांची माहिती देण्याचा त्याचा निश्चय दिसतो; मग ती माहिती त्याची स्वतःची असो किंवा इतर साधनांनीं मिळविलेली असो.

# केसरी ट्रस्टच्या दाव्याचा निकाल

## ट्रस्टींचें म्हणणें खरें ठरलें

कै. लो. बाळ गंगाधर टिळक यांचे चिरंजीव, व केसरी-मराठा संस्थेचे ट्रस्टी, यांचे दरम्यान आज सुमारे पावणेदोन वर्षे वाद चालू होता, ही गोष्ट केसरीच्या वाचकांस विदितच आहे. टिळकांच्या चिरंजिवांनी ट्रस्टींचे अधिकार व हक्क यांना न जुमानतां, व लो. टिळकांनीं आपल्या मृत्युपत्रांत नेमलेल्या पंचांच्या विद्यमानें वादाचा निकाल करून न घेतां आगळिकीस सुरवात केली, तेव्हां ट्रस्टींना त्यांचेविरुद्ध न्यायकोर्टाकडे फिर्याद करून दाद मागणें प्राप्त झालें. त्याप्रमाणें वादी नरसिंह चिंतामण केळकर व धोंडो वासुदेव विद्वांस यांनी प्रतिवादी रामचंद्र बळवंत टिळक व श्रीधर बळवंत टिळक यांजवर ता. १६।८।२७ रोजीं पुणें येथील फर्स्ट क्लास कोर्टांत दिवाणी दावा लावून, तातडतोबीच्या व निरंतरच्या ताकिदी प्रतिवादीविरुद्ध मागितल्या त्याप्रमाणें तात्पुरत्या तावडतोबीच्या ताकिदी मिळाल्याहि होत्या. आणि आतां ता.७ मार्च १९२९ रोजी कोर्टानें या दाव्याचा कायमचा निकाल करून वादींनीं मागितलेल्या ताकिदी कायमच्या दिल्या आहेत. सदर दाव्यांतील कोर्टाच्या निवाड्याचा सारांश आम्ही खालीं देत आहों.

प्रथम वादीची फिर्याद, प्रतिवादीची कैफीयत व त्यावरून निघणारे मुद्दे यांचा रीतसर निर्देश करून कोर्ट म्हणतें:—चालू दावा खूप जोरानें लढविण्याचा प्रयत्न रामभाऊ व श्रीधरपंत यांनीं केला. पुढें श्रीधरपंत यांनीं ता. २५ मे १९२८ रोजीं आत्महत्या केली. त्यामुळें त्यांच्या अज्ञान मुलाचें नांव त्यांचे जागीं प्रतिवादी पक्षकार म्हणून दाखल करण्यांत आलें व रामभाऊ यास सदर दाव्यापुरता मुलाचा पालनकर्ता म्हणून नेमण्यांत आलें. रामभाऊ यांनीं श्रीधरपंत यांच्या मृत्यूनंतरहि उभय प्रतिवादीतर्फे अतिशय चुरशीनें दावा लढविला. गणपत्युत्सवासंबंधानें वादींचा वहिवाटीचा हक्क शाबीत धरून त्यांना प्रतिवादींनीं हरकत करूं नये अशी कोर्टानें प्रतिवादींना ताकीद दिली. त्याविरुद्ध रामभाऊ यांनीं हायकोर्टाकडे अपीलहि केलें पण ते फुकट गेलें. नंतर समेटाचीं बोलणीं सुरू झालीं, परंतु अखेर समेट झालाच नाहीं. शेवटीं रामभाऊ यांनीं अकस्मात् कोर्टाला अर्ज देऊन कळविले कीं, आपणाला प्रतिवादी म्हणून हा दावा चालवावयाचा नाहीं. वाटल्यास त्याचा एकतर्फी निकाल व्हावा. आपल्या बंधूंच्या मृत्यूमुळें आपल्या मनःस्थितीत फरक पडला असें कारण रामभाऊ यांनीं आपल्या अर्जांत लिहिलें खरें, पण तें कारण कितपत खरें आहे याविषयीं मला जबरदस्त शंका आहे. कसेंहि असो. प्रतिवादींनीं पुरावा दिला नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय. कारण यांत अज्ञानाचा हितसंबंध येत होता. परंतु आहे त्या पुराव्यावरूनच निकाल देणें मला भाग आहे. दाव्याची आकारणी बरोबर केलेली नाहीं या प्रतिवादीच्या प्राथमिक तक्रारींत अर्थ नाहीं. किंबहुना दाव्यांतील मूळ मिळकतीच्या किमतीला अनुसरून वकीलफीकरितां तरी वादींना चढी आकारणी करतां आली असती; व ज्याअर्थी फिर्यादीचा निकाल त्यांना आपल्यासारखा होईल असें वाटत होतें—व तसा तो झालाहि—त्याअर्थी ही आकारणी कमी लावण्यांत त्यांना आपलें नुकसान आहे असें दिसत असतांहि, त्यांनी ती उलट कमीच लावली हें खरोखर लक्षांत घेण्यासारखें आहे. दाव्याचीं कारणें वेगवेगळ्या स्वरूपाचीं असतां तीं फिर्यादींत एकत्र मांडलीं या प्रतिवादीच्या तक्रारीतहि अर्थ नाहीं. ट्रस्टडीड, भाडेचिठी व कै. टिळकांचें मृत्युपत्र या दस्तऐवजांवरच वादींचे विवादित हक्क व त्यांनीं मागितलेल्या ताकिदी अवलंबून होत्या, व हे कागद शाबीत झाले आहेत.

प्रतिवादीची मुख्य तक्रार अशी कीं, ट्रस्टडीड भाडेचिठी वगैरे कागद वादींनीं प्रतिवादींपासून, त्यांची भलती समजूत करून देऊन व त्यांच्यावर

गैरशिस्त वजन पाडून, करून घेतले. परंतु स्वतः टिळकांचेच जांवई नाशिकाचे वकील विश्वनाथपंत केतकर यांच्यासमक्ष हे सर्व कागदपत्र झाले; व त्यांत गैरसमजुतीचा किंवा गैरशिस्त वजनाचा कांहींहि भाग नव्हता असें त्यांच्या साक्षीवरून व वादी नं. २ विद्वांस यांच्या साक्षीवरून दिसून येतें. टिळकांच्या मृत्यूनंतर सोळाव्या दिवशीं कांहीं कागद झाले ही गोष्ट खरी. परंतु ट्रस्टडीड व भाडेचिठी हे दोनीहि कागद प्रतिवादींनीं स्वतः रजिस्ट्रारपुढें जाऊन कबूल करून नोंदवून दिले! भाडेचिठी तर टिळकांच्या मृत्यूनंतर पुष्कळ महिन्यांनीं झाली व रामभाऊ टिळक यांनींच स्वतः ती रजिस्ट्रारपुढें नोंदण्याकरितां दाखल केली. शिवाय अनेक वर्षेपर्यंत वादी हे भाडेकरी या नात्यानें त्यांजकडे असलेल्या वाड्याचें भाडें रीतसर देत असून, प्रतिवादी ते भाडें आजवर बिनतक्रार घेत आले आहेत. तसेंच प्रतिवादींना करून दिलेल्या ट्रस्टडीडनंतर, बऱ्याच काळापर्यंत व बऱ्याच काळानंतरहि, ट्रस्टडीड अन्वयें प्रतिवादींना मिळणाऱ्या रकमा प्रतिवादी खुशाल घेत आले आहेत. म्हणून या मुद्द्याचा निकाल प्रतिवादींविरुद्धच केला पाहिजे. ही भाडेचिठी अनियमित मुदतीची आहे. आजचे वादी व त्यांचे जागीं पुढें येणारे इतर ट्रस्टी यांना भाडेचिठींत नमूद केलेला वाड्याचा भाग सर्वस्वी आपल्या ताब्यांत ठेवण्याचा हक्क आहे. त्यांनीं फक्त प्रतिवादींना महिना शंभर रु. भाडें दिलें म्हणजे संपलें. ट्रस्टींनीं आपल्या ताब्यांतील इमारतींत नवें जुनें केलें किंवा त्यांचें स्वरूप बदललें किंवा त्या वाढविल्या तरी भाड्याची रक्कम वाढावयाची नाहीं. घरपट्टी वगैरे सर्व देणें, दुरुस्ती ठेवणें, ही सर्व कामें ट्रस्टींच्या जबाबदारीचींच आहेत. वादी यांनीं गायकवाडवाड्याच्या मुख्य दरवाजांतून आपल्या घरांत सरळ वाटेनें जावें, ट्रॅन्स्फर ऑफ प्रॉपर्टी ॲक्टाच्या १०८ व्या कलमाप्रमाणें ट्रस्टींकडे भाड्यानें असलेल्या जागेंत मालक या नात्यानें प्रतिवादींना कांहीं ठराविक पद्धतीनें व योग्य वेळींच जातां येईल. परंतु वादी ट्रस्टी यांच्या ताब्याला वहिवाटीला, भोगवट्याला प्रतिवादींना हरकत करतां येणार नाहीं, अडथळा करतां येणार नाहीं, किंवा ट्रस्टी आपल्या जागेंत करीत असलेल्या कामाला किंवा त्यांच्या नोकरांना कोणत्याहि प्रकारें व्यत्यय करण्याचा अधिकार प्रतिवादींना नाहीं. या जागेंत काम करणारे नोकर हे वादी ट्रस्टी यांचे नोकर आहेत, प्रतिवादींचे नाहींत. प्रतिवादींना वादींकडून भाडें घेण्यापलीकडे यासंबंधानें दुसरा कोणताहि हक्क नाहीं.

वादी ट्रस्टी यांच्या वहिवाटीला प्रतिवादी टिळकबंधु यांनीं ज्या हरकती व आगळिकी केल्या असें फिर्यादअर्जींत लिहिलें आहे त्या सर्व पुराव्यानें रीतसर शाबीत झाल्या आहेत. "नवीन इमारत बांधण्याचें काम ट्रस्टींनीं काढलें त्याला आपण हरकत केली त्याचें कारण वादी यांना इमारत बांधण्याचा हक्क नव्हता" अशी तक्रार प्रतिवादींनीं सांगितली आहे. परंतु तींत कांहीं अर्थ नाहीं. कारण विद्यमान इमारतींना जोडून नव्या इमारती बांधण्याचा अधिकार भाडेचिठीनें वादी ट्रस्टी यांना दिलेला आहे. आतां वाड्यांतील मोकळी जागा नवीन इमारतीनें किती अडवावी, हा काय तो प्रश्न असूं शकेल. म्हणजे सगळी मोकळी जागा इमारतींनीं अडवितां येणार नाहीं, तर कांहीं वाजवी मोकळी जागा वादींनीं सोडली पाहिजे, इतकेंच फार तर प्रतिवादींना म्हणतां येईल, याहून अधिक म्हणतां येणार नाहीं. मोकळ्या जागेंत वादी यांनीं पूर्वीं कागद ठेवण्याकरितां एक पत्र्याची इमारत बांधली, ती काढून टाकण्याविषयीं प्रतिवादींनीं वादीवर उलट फिर्याद केली होती. पण ती फिर्याद त्यांची त्यांनींच पुढें काढून घेतली.

वादी ट्रस्टी यांच्या आवारांतील पायखान्यासंबंधानें प्रतिवादी यांस कोणत्याहि प्रकारचे हक्क नाहींत. ट्रस्टीकडील मोकळ्या जागेंत आपलें कोणतेंहि सामान टाकण्याचा किंवा ठेवण्याचा अधिकार प्रतिवादींना नाहीं. म्हणून हल्लीं त्यांनीं सदर जागेंत जें आपलें सामान ठेवलें असेल तें त्यांचें त्यांनीं काढून न्यावें. किंवा तसें न झाल्यास वादी यांनीं कोर्टामार्फत तें काढवून त्याचा खर्च प्रतिवादींकडून घ्यावा. वादी-ट्रस्टींच्या भय्याच्या हातून रामभाऊ टिळक यांनीं किल्ल्या काढून घेतल्या, वाटेंतील फरशी काढली, वगैरे गोष्टी त्यांनीं स्वतःच कबूल केल्या आहेत. पण तसें करण्याचा त्यांना अधिकार नव्हता. वाड्याचा मुख्य दरवाजा ट्रस्टींकडे असलेल्या भागांत आहे. यामुळे तो दरवाजा लावणें, कुलप घालणें वगैरे गोष्टी ट्रस्टींना करणें अवश्य आहे. दारावरील भय्या हाहि त्यांचाच नोकर आहे. म्हणून प्रतिवादींना या दरवाजांतून स्वतःच्या हक्कानें असें सकाळीं ६ वाजल्यापासून रात्रीं ९ वाजेपर्यंत वावरतां येईल. त्यानंतर जरूर पडल्यास क्वचित् प्रसंगीं भय्याला हांक मारून त्यानें दरवाजा उघडल्यास प्रतिवादींनीं आंत जावें. तात्पर्य, ट्रस्टींचे हक्क व अधिकार वर दर्शविल्याप्रमाणें असल्यामुळें, त्यांना कोणत्याहि तऱ्हेनें बाध करूं नये अशी निरंतरची ताकीद कोर्ट प्रतिवादींना देत आहे. प्रतिवादी रामभाऊ टिळक यांना तर ही ताकीद सहजच देतां येते. परंतु हल्लीं प्रतिवादी नं. २ श्रीधरपंत यांचे

जागीं त्यांचा अज्ञान मुलगा असला तरी अज्ञाना-विरुद्धहि अशी ताकीद देतां येते. शिवाय अशी ताकीद देऊन हें प्रकरण निकालांत न काढलें, तर अज्ञानाचे पालनकर्ते म्हणून उद्यां स्वतः रामभाऊ टिळक हेच किंवा दुसरे कोणी पुढें येऊन वादींना हरकत करूं लागतील; व मग ट्रस्टींना फिरून पहिल्या-पासून हें भांडण कोर्टांत भांडावें लागेल. परंतु तसें होऊं देणें योग्य नाहीं. यांतल्या यांतच हे कायमचें ठरवून घेतलें पाहिजे. म्हणून रामभाऊ टिळक व श्रीधरपंतांचा अज्ञान मुलगा या दोघांच्या विरुद्ध ही ताकीद समजावी. गणपत्युत्सवासंबंधानें या कोर्टानें रामभाऊ टिळक यांना गतवर्षी ताकीद दिली होती. ती हायकोर्टापर्यंत जाऊनहि कायम झाली आहे. शिवाय हा उत्सवप्रसंग दरवर्षी येणारा आहे म्हणून आतां ताकीद कायम स्वरूपांत देण्यांत येत आहे. तसेंच वाड्याच्या दरवाजाला लावलेला कडी-कोयंडा काढणें, दिंडी उघडणें वगैरे कोणत्याहि गोष्टी प्रतिवादींनीं करूं नयेत.

प्रतिवादींनीं स्वतःचा खर्च स्वतःच सोसला पाहिजे. पण शिवाय दाव्यांतील वादी ट्रस्टी यांचा खर्चहि प्रतिवादींनींच दिला पाहिजे.

# पुनः संप, पुनः दंगा, पुनः गोळ्या

मुंबईच्या अंगांत संपाचा रोग गेलीं कांहीं वर्षे मुरल्यासारखा झाला आहे. दुखण्याने मनुष्य एकदां अशक्त बनला असतां त्यास वेलदोड्याच्या एखाद्या दाण्यानें थंडी किंवा लवंगेच्या एखाद्या कणानें उष्ण होण्यास विलंब लागत नाहीं. संपाच्या बाबतींत मुंबईची प्रकृति अशीच तोळा-मासा होऊन राहिली आहे. संप कसे बंद पडतील याची चिकित्सा करून निदान ठरविण्याकरितां फॉसेट कमिटी मुंबईसरकारनें नेमली. ती गिरण्याची नाडी हातांत धरून नाडीचे ठोके मोजीत असतां संपाच्या सत्तर पाळ्या वेगवेगळ्या गिरण्यांतून येऊन गेल्या आणि हाताची नाडी सोडून व निदान ठरवून फॉसेट कमिटींतील तज्ज्ञ डॉक्टर आपापल्या घरीं निघून गेले नाहींत तोंच गिरणीकामगारांस सार्वत्रिक संपाचें हिव पुनः थडथडून भरलें. दुखणें उलटणें ही गोष्ट कोणत्याहि आजारांत वाईटच. त्यांतून ज्या आजारानें लाखों बायकापोरें व म्हातारेकोतारे अन्नास मोताद होणार तो आजार उलटणें ही राष्ट्रीय आपत्तीच नव्हे काय?

अलीकडे थोडे दिवस मुंबईच्या कांहीं गिरण्यां-तील कामगारांत चलबिचल उडाली होती. वाडिया बंधूंच्या मोरबाग, टांकसाळ व सेंचरी या गिरण्यां-तील कित्येक कामगारास वाडिया बंधूंनीं कामावरून कमी केल्यामुळें बाकीच्या कामगारांनीं संप पुकारला. अशांची संख्या सहा हजारांपर्यंत गेली; तरी वाडिया बंधूंनीं इतर मजूर नेमून त्यांची जागा सहज भरून काढली. संपाचा प्रयत्न या उपायानें निष्फळ ठरल्याकारणाने कामगारांच्या पुढाऱ्यांस तो पराजय वाटून आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याकरितां त्यांस नवा प्रयत्न करावा लागला. मुंबईस गिरणी-कामगारांचा एक संघ आहे, तसाच गिरणीच्या मालकांनींहि आपला एक संघ स्थापन केला आहे. गिरणीकामगार-संघानें आपली तक्रार मिल-ओनर्स असोसिएशनकडे नेली व तिजपाशीं दाद मागितली. त्यांनीं आपली तक्रार अशी मांडली कीं, वाडिया बंधूंच्या गिरणीमधून एकंदर सहा हजार मजुरांस कामावरून काढून टाकण्यांत आलें आहे त्यांस वाडिया बंधूंनीं कामावर घ्यावें. कामगारांची ही मुख्य तक्रार; त्या तक्रारीबरोबरच आणखीहि कांहीं तक्रारी त्यांनीं सादर केल्या, पण त्या किरकोळ स्वरूपाच्या होत्या. कामगार-संघाकरितां जी वर्गणी गोळा करावयाची ती गिरण्यांमध्येंच वसूल करण्याचा कामगार-संघास हक्क असावा या व इतर एक-दोन मागण्या असून त्यांस गिरणीवाल्यांकडून समाधानकारक उत्तरहि मिळालें असतें पण सलोख्याचें घोडें अडलें व बुजलें तें पहिल्या मागणीपाशींच.

गिरणीवाल्यांच्या मतें नवीन सहा हजार मजु-रांस काढून त्या जागीं जुने सहा हजार मजूर ठेवणें ही गोष्ट सकृद्दर्शनीं वाटते तितकी सोपी नाहीं. मजुरांनी अचानक काम बंद पाडल्यानें धंद्याचें नुकसान होतें. जे मजूर एकाएकीं संप करून गिरणीवाल्यांच्या धंद्यावर उठतात त्यांस शासन करण्याचा अधिकार आपणास नसेल तर धंदा सुरळीत चालणार नाही व मजूरवर्ग शेफारून गिरण्यांचा पाया डळमळेल अशी गिरणीवाल्यांस भीति वाटत आहे. तथापि कमी केलेल्या मजुरांच्या बाबतींत अन्याय झाला कीं काय याची चौकशी गिरणीवाले व गिरणीकामगार यांनीं नेमलेल्या सबकमिटीमार्फत होऊं देण्यास मिलओ-नर्स असोसिएशननें हरकत घेतली नाहीं. पण असो-सिएशनच्या या तडजोडीने गिरणीकामगार-संघाचें समाधान होईना. संघाचें म्हणणें असें कीं, ज्या सहा हजार मजुरांस कामावरून कमी करण्यांत आले त्या मजुरांस व त्यांच्या वतीच्या साक्षीदारांस बोलावून घेऊन त्यांचा पुरावा कमिटीनें नोंदावा; पण

गिरणीकामगार-संघाचा हा हेका गिरणीवाल्यांस न रुचून तडजोडीचा प्रयत्न फसला आणि त्याबरोबर कामगारवर्गाच्या पुढाऱ्यांनीं सार्वत्रिक संपाचें चौदावें रत्न बाहेर काढलें.

गिरणीकामगारांवर गेल्या वर्षांत संपाच्या पाळ्या वारंवार आल्यामुळें पुढाऱ्यांच्या शिस्तींत वागण्याची व ते सांगतील त्या क्षणीं हत्यार खालीं ठेवण्याची शिकवण त्यांच्या पक्की अंगवळणीं पडलेली दिसते. त्यांच्या पुढाऱ्यांनीं केलेला स्वार्थत्याग त्यांच्या डोळ्यापुढे आहे व मीरत येथील तुरुंगांत पुढाऱ्यांस सोसाव्या लागणाऱ्या हालअपेष्टांनी त्यांच्या काळजाला पीळ पडला आहे. गिरणी-कामगार अडाणी असले तरी त्यांच्या पुढाऱ्यांनी त्यांस केलेल्या उपदेशानें त्यांस जगातील मजुरांच्या प्रचंड चळवळीचे व सामर्थ्याचे आपण अंशभागी आहों असा आत्मविश्वास उत्पन्न झाला आहे. सार्वत्रिक संपांत मजूर व त्यांचीं मुलें-माणसें अन्नवस्त्रांस कशीं महाग होतात, त्यांस घांसभर अन्न व बोटभर वस्त्र मिळवून देण्याकरितां मजूरपुढाऱ्यांस मुंबईंतील सामान्य लोकांच्या घराचे उंबरठे कसे झिजवावे लागतात व त्यांच्या अर्भकांस लागणारें दूध पैदा करण्याकरितां मुंबईच्या मेयरसारखीं बडीं माणसें पुढें होऊन कशीं फंड उभारतात याचा ताजा अनुभव संपवाले अद्यापि तरी विसरले नसतील. संकटांचे हेच ढग पुनः उठणार व अन्नवस्त्राची हीच भ्रांति पुनः पडणार. फार काय पण गेल्या खेपेस पाहिली. नाहींत अशीं संकटें संपवाल्या मजुरांपुढें या खेपेस उभीं राहण्याचा संभव आहे. मागील संपांत रशियांतून बरीच मोठी रक्कम संपाच्या साहाय्यार्थ मजूरपुढाऱ्यांकडे आली होती. तेवढ्यानें न भागल्यामुळें जे कांहीं ॠण भासलें ते मुंबईतल्या मुंबईत भरून काढणें किती कठीण गेलें हें मजूरपुढाऱ्यांस माहीत आहेच.

पण आतां रशियांतून पैसा मिळण्याच्या वाटा व्हाइसरॉयांनीं वटहुकूम काढून बंद केल्या आहेत. आणि संपाचा परिपाठ मुंबईंतील जनतेस एकसारखा पडल्यामुळे तिजकडूनहि मागील प्रसंगाइतकी तरी मदत होईल कीं नाहीं याविषयीं शंकाच आहे. सर्व दिशांनीं संकटें अशीं जबडा पसरून उभीं असतां सार्वत्रिक संपाचें रणशिंग फुंकून दीड लाख मजूर गिरण्यांतून बाहेर निघाले ही त्यांची केवढी हिंमत. तथापि या प्रसंगीं संपवाल्यांचें कमनशीब असें कीं, त्यांच्या पुढाऱ्यांतहि दोन फळ्या स्पष्ट पडल्या आहेत. त्या दोन फळ्यांपैकीं जहाल पक्षाने त्यांना संपाचें समरांगण दाखविलें आहे तर नेमस्त पक्ष जहालांच्या हालचालींतील चुका चव्हाट्यावर मांडीत आहे! वाडिया बंधूंच्या गिरण्यांमधून ज्या मजुरांस काढून टाकलें त्यांची चौकशी सब-कमिटीमार्फत करण्यास नेमस्त पक्षाची मुळींच हरकत नाहीं. उलटपक्षीं वाडिया बंधूंच्या गिरण्यांतील सहा हजार मजुरांचा संप घडवून आणण्यांत जहाल पक्षानें वचनभंग केला असें नेमस्त पुढाऱ्यांचें मत आहे. कारण गिरणीकामगार-संघानें तक्रारीची दाद लावून घेण्यांत सर्व योग्य उपाय हरल्यावांचून संपाची शेवटची वाट आपण धरणार नाहीं असा वाडिया बंधूंशीं करारनामा केला होता असें म्हणतात.

अशा रीतीनें मूळ चुकीचें माप जहाल पुढाऱ्यांच्याच पदरांत पडत असेल तर सहा हजार मजुरांस हक्कानें परत घेण्याचा आग्रह धरण्यास जहाल पुढाऱ्यांस सबळ सबब राहात नाहीं. त्यांनी गिरणीवाले व गिरणीकामगार यांच्या सब-कमिटीकडेच चौकशीचें काम सोंपविणें समंजसपणाचें ठरलें असतें. पण तसें न करतां सार्वत्रिक संपाचें चौदावें रत्न बाहेर काढण्यांत त्यांनीं फारच घाई केली असाच कोणाहि तिऱ्हाइताचा एकंदर परिस्थितीवरून ग्रह झाल्यावांचून राहाणार नाहीं. मजूर व मालक यांजमधील लढ्यांत जनतेची सहानुभूति केव्हांहि मजूर पक्षाकडेच वळावी हें स्वाभाविक होय. तथापि मजूर पक्षाचे जहाल पुढारी सुईनें काम व्हावयाचें तेथें सार्वत्रिक संपाचा मुरा लावून बसतील तर मजुरांविषयीं सामान्यतः सर्वांस वाटणाऱ्या सहानुभूतीला उगाच गैरवाजवी ताण बसेल अशी आम्हांस धास्ती वाटते. व मजुरांच्या हिताची चिंता जशी जहाल पक्षास तशी नेमस्त पक्षासहि असल्यानें ज्याअर्थी जहाल पक्षाचें वर्तन त्यांच्या खांद्यास खांदा लावून काम करणाऱ्या नेमस्त पक्षास पसंत नाहीं त्याअर्थी मजुरांच्या जहाल पुढाऱ्यांनी प्रस्तुत विषयाचा पुनः एकवार काळजीपूर्वक विचार करावा असा त्यांस इषारा देण्याची वेळ आतां आली आहे. जहाल पक्षांतील बरेच अनुभविक पुढारी मीरतच्या खटल्यांत गिरफदार झाले असल्यामुळें मजुरांच्या हितसंबंधाची उरलेल्या पुढाऱ्यांवरील जबाबदारी अधिकच वाढली आहे हे त्यांनीं विसरतां कामा नये.

पुढाऱ्यांच्या आज्ञेवरून गेल्याच्या मागील शुक्रवारीं मुंबईंतील दीड लाख मजुरांनीं संप केला. मुंबईत एकंदर गिरण्या चौऱ्यायशी असून त्यांपैकीं फक्त ७५ च गिरण्या अलीकडे सुरू होत्या. त्यांतील बहुतेक सर्व गिरण्या संपामुळें आतांपर्यंत बंद पडत आल्या आहेत. दीड लाख मजुरांच्या संपाचे दुष्परिणाम मुंबईंतील आणखी किती लाख लोकवस्तीस जाणवतील याची कल्पनाच केलेली बरी. कारण सुमारें दोन महिन्यांपूर्वीं मुंबईंत घडलेल्या हिंदू-मुसलमानांतील भयंकर

दंग्याचा पीळ अद्यापि मोडलेला नाहीं. हिंदु मुसलमानांची नजरानजर होतांच त्यांचे डोळे अद्यापि गुंजेप्रमाणें लाल होतात. त्यांत संपाची एकच ठिणगी उडण्याचा अवकाश कीं, संपास हिंदू-मुसलमानांच्या दंग्याचें स्वरूप आलेंच म्हणून समजावें. कारण संप पुकारला असतां हिंदूंनीं गिरण्यांतील काम बंद पाडावें पण मुसलमानांनीं तें काम तसेंच चालू ठेवावें; किंबहुना हिंदूंच्या जागीं येऊन उभें राहावें असा अलीकडचा अनुभव आहे आणि वाडियांच्या गिरण्यांतील वादाचें बीजहि कांहीं अंशीं हेंच आहे.

दंग्याच्या अनेक निमित्तांत याहि निमित्ताचा समावेश होत असल्यामुळे या खेपेस मुंबई-सरकारने प्रारंभापासूनच विशेष दक्षता बाळगली. मुंबई-सरकारचे मंत्री ना. हिदायतुल्ला यांनीं महाबळेश्वराहून मुंबईस येऊन गिरणीवाले व गिरणीकामगार यांच्या समेटाचा प्रयत्न करून पाहिला पण तो साधला नाहीं. ना. हॉटसन हेहि त्यांची सांथ करण्यास आले पण त्यांच्याहि सांथीस यश लाभलें नाहीं. इतक्यांत संपाच्या दुखण्यास दंग्याची भावना जडून दुखणें अधिकच कष्टसाध्य झालें. मुसलमानांनी सुरे उपसले, हिंदूंनीं लाठ्या चालविल्या व सरकारनें फौजा आणवून बंदुका रोखल्या! भेंडीबाजार, डोंगरी, काळा चौकी व पायधुणी यांतील व्यापाराची घडामोड मावळून चकमकी झडूं लागल्या. ना. हॉटसन यांनीं प्रतिष्ठित नागरिकांस बोलावून त्यांजबरोबर दंगा शमविण्याच्या उपायांची वाटाघाट केली. आणि शेवटीं दंगेखोर गुंडांस पकडून ठेवणें हाच उपाय रामबाण ठरून त्याच उपायाचा अंमल सांप्रत मुंबईत जारीनें सुरू आहे. सोमवारपर्यंतच्या दंग्यांत २१ इसम ठार व २०० जखमी झाले असून ४५० गुंडांना पकडून ठेवण्यांत आलें आहे. या खेपेस ना. गव्हर्नर-साहेबांची स्वारी ताबडतोब मुंबईस आली आहे व त्यांच्याच धोरणानें दंगा शमविण्याची तजवीज होत आहे. सरकारतर्फे प्रसिद्ध झालेल्या पत्रकांत दंग्याच्या मुळाशीं सार्वत्रिक संप असल्याचा उल्लेख आहे. संप करणारे हिंदू व संप न करणारे मुसलमान अशी दुफळी कामगारवर्गांत माजून हिंदूंकडून मुसलमान कामगारांस पीडा होऊं लागल्यामुळें तिचा शेवट दंग्यांत झाला, असा सरकारचा अभिप्राय आहे! दंगा शमविण्याचा प्रयत्न सरकारनें शिकस्तीनें व निःपक्षपातीपणानें चालविण्याचें आश्वासन दिलं असल्यामुळें या खेपेची मुंबईतील दंग्याची धामधूम लवकर थांबेल असें वाटत आहे. तथापि दंगा थांबला तरी संप कायमच राहातो व संप मोडल्यावांचून दंग्याची दूषित हवा कायमची निवळत नाहीं.

गिरण्या बंद पडल्यामुळें मालकांचें जितकें नुकसान होईल त्याहून गिरणीकामगारांचें नुकसान अधिक होणार असून त्यांच्या कुटुंबांचे व विशेषतः लहान मुलांचे हाल तर कल्पनातीत होतील. त्यांतून संपाचा लढा शांततेनेंच लढण्यांत येत असता तर उभय पक्षांतून ज्याची बाजू लंगडी किंवा कमजोर असेल तो टेकीस येईल व संपाची समाप्ति होईल असें म्हणून स्वस्थ बसतां आलें असतें. परंतु दुष्काळाच्या पाठोपाठ जशी रोगाची सांथ येते त्याप्रमाणें संपाच्या पाठोपाठ दंग्याची सांथ उद्भवत असल्यानें, मूळ चूक कोणाचीहि असो, समाजाच्या सुस्थितीच्या मुळावर आलेला हा रोग कोणत्या तरी उपायानें शमविणें प्राप्त आहे. असा अधिकार आपल्या हातीं असावा याच हेतूनें 'ट्रेड डिस्प्यूट्स आक्ट' पास करून घेण्यांत आला आहे. त्या आक्टास अनुसरून सरकारला कन्सिलिएशन बोर्ड नेमतां येतें. त्या बोर्डांच्या कामासंबंधीं जे पोटनियम करावयाचे ते सरकारनें अद्यापि जाहीर केले नसले तरी या संपाच्या संकटाच्या परिस्थितींत सरकारनें ते ताबडतोब जाहीर करावे. कारण असल्या प्रसंगीं जर या आक्टाचा उपयोग न होईल तर तो आक्ट केला तरी कशाला? कन्सिलिएशन बोर्ड नेमल्यानें उभय पक्षांचे प्रतिनिधी एकत्र येऊन त्यांच्या विचारें या अडचणींतून कांहीं तरी मार्ग निघेल. यदाकदाचित् तडजोड घडून नच आली तरी कोणाची बाजू हेकेखोरपणाची आहे त्याविषयीं तरी सामान्य जनतेची साधार खात्री पटेल व ज्याची बाजू खरी ठरेल त्याजकडे जनतेची सहानुभूति सहजच वळेल व तिचा परिणाम संपावर झाल्यावांचून राहणार नाहीं. यास्तव केवळ लष्कराच्या जोरावर दंगेखोरांना आवरून धरून खडा पाहरा करीत बसण्यापेक्षां सरकारनें तडजोडीच्या या उपायाचा अवलंब करावा आणि संप, दंगा व गोळीबार या त्रिदोषाच्या तापांतून मुंबईच्या जनतेची रीतसर मार्गानें सोडवणूक करावी.

# इराणच्या शहाचा सलामसमारंभ

( आमच्या प्रवासी प्रतिनिधीकडून )

" सलाम " या तीन अक्षरी शब्दांत कांहीं विशेष अर्थ असेल असें कोणास वाटणार नाहीं. परंतु आज येथें पाहिलेल्या ' सलाम ' समारंभावरून त्या शब्दाची यथार्थ व्याप्ति कळून आली. रस्त्यांतून जातांनाहि सलाम करणारे लोक पुष्कळ भेटतात. पण अतःपर " सलाम " हा शब्द नुसता उच्चारला तरी, जगांतील परस्पर विरोधी राष्ट्रांचे एकत्र जमलेले प्रतिनिधी, चित्रविचित्र वेष-भूषित सैनिक, त्यांचे नायक, इराणांतील निवडक पुढारी, राजसभेचें मंत्रिमंडळ, स्वबलावर राज्यपद प्राप्त करून घेणारा रेझा शाहा पेहेलवी, तो गुलिस्तान राजवाडा, तें विस्तृत उद्यान, तेथील कर्णमधुर आणि वीरवृत्तिपरिपोषक वाद्यवादन......इत्यादि सर्व गोष्टींचा चित्रपट डोळ्यापुढे उभा राहील. केसरी-च्या प्रवासी प्रतिनिधीला हा समारंभ पाहण्याची संधि मिळाली त्याचे शाब्दिक चित्र खाली देत आहे.

## इराणांतील नूतन वर्षारंभ

आपल्याकडे ध्वजारोपणदिनाला म्हणजे चैत्र शु. प्रतिपदेला नूतन वर्षारंभ होतो; व्यापाऱ्यांचा कार्तिक शु. १ ला नवीन वर्षाचा आरंभ असतो. तसाच इराणी प्रजेचा २१ मार्च रोजीं चालू सालाचा नव्या वर्षाचा प्रथम दिवस होता. याला 'नव-रोज' 'नवा दिवस ' असें म्हणतात. पार्शी लोकांचा हाच वर्षारंभ असल्यानें हिंदुस्थानांतील पार्शी वस्तीच्या शहरीं या दिवशीं सुटी असते. ख्रिस्तानुयायी देशांत नाताळा-निमित्त आठवडाभर सुटी असून नूतन वर्षाचा समारंभ मोठ्या थाटानें सर्वत्र साजरा केला जातो, तसाच प्रकार इराणांत आहे. नौ–रोजापूर्वी ४ दिवस व नंतर ४ दिवस अशी विद्यार्थ्यांची ९, १० दिवस अनध्यायाची चंगळ चालते. मनुष्य-स्वभाव जगाच्या पाठीवर चोहोंकडे एकच असावयाचा. त्यांची उत्सवप्रियता ही सदा सर्वदा कायम राहणारी आहे. त्याप्रमाणें सर्व प्रकारचे आनंदनिदर्शक उपाय योजून हा नूतन वर्षाचा प्रथम दिवस पाळला जातो.

"नौ–रोज" हा नव्या वर्षातला पहिला दिवस, तेव्हां राजसभेंत सर्वांनीं जमून राजदर्शन घ्यावें ही इच्छा साहाजिकच होणार. आणि या मानवी इच्छेस धरूनच मोठमोठ्या सणावारांचे दिवशीं दरबार भरविण्याची चाल पडली आहे. तेहेरान नगरींत ३ राजवाडे आहेत. त्यांपैकीं 'गुलिस्तान'-मध्यें ह्या नौ–रोज दिनानिमित्त जमाव जमतो. तथील समारंभ पाहण्यासाठीं दूरदूरचे लोक येतात. अशा दिवशीं राजदर्शनाचा लाभ घडणें किती महत्त्वाचें असतें आणि जनतेला त्यासंबंधीं काय वाटत असतें याची कल्पना रस्त्याच्या दुतर्फा जमलेल्या लोकसमुदायावरून करतां येईल. गुलिस्तान राजप्रासादांत उपस्थित होण्याचा मान फारच थोडक्या अशा महत्त्वाच्या व्यक्तींस मिळत असल्यानें बहुजनसमाजास राजमार्गाच्या कडेस तिष्ठत राहून मिळेल तेवढेच दृष्टिसुख अनुभवावें लागतें. राजसभेच्या मंत्र्यांनीं प्रस्तुत प्रतिनिधीस निमंत्रणपत्रिका पाठविली तेव्हां अशा समारंभाला हजर राहणें हें कर्तव्य झालें ! कारण त्याच अधि-काऱ्यांच्या वतीनें पुढें स्वतः शाहाशीं मुलाखत व्हावयाची आहे.

## शेंडीपासून तयारी !

राजसभा म्हटली की, तेथे नाना निर्बंध हे ठरलेलेच. वेष अमुक प्रसंगीं तमक्या रंगाचा असावा, त्याला गुंड्या विशिष्ट प्रकारें लावलेल्या असल्या पाहिजेत, शिरोवेष्टन राष्ट्रीय पद्धतीचे असणें आवश्यक आहे, वंदन करण्याचा प्रघात जसा असेल तसाच पाळला पाहिजे. अशा किती तरी बंधनांत बद्ध व्हावें लागतें. बरें, देशोदेशींचे आचार निराळे. तेव्हां प्रथमतः राजसभाचारांची ओळख करून घेतल्यावर 'वेषभूषा' रचण्याचा उद्योग आरंभिला. नूतन वर्षापासूनच "पेहेलवी" टोपी न वापरणारास शिक्षा करण्यांत येणार आहे. नव्या टोपीसह नव्या पद्ध-तीचे आंगरखे, विलायती फॅशनचे आंखुड कोट आणि विजारी याहि प्रचारांत यावयाच्या असल्यानें प्रस्तुत प्रतिनिधीजवळ असलेले उत्तम कपडेहि रद्द ठरले. मोजे, बूट, गळबंद इत्यादिकांसंबंधींहि विशिष्ट पद्धत ठरली असल्यानें अल्पावधींतच सर्व खरेदी आटोपावी लागली.

## गुलिस्तान राजवाड्यांतील देखावा

साडेदहा वाजतांची वेळ निमंत्रणपत्रिकेंत दिली असली तरी साधारणपणें दोन तास आधीं जाणें श्रेयस्कर असा सल्ला मला एका इराणी सद्गृह-स्थानें दिला होता. आदले दिवशीं पाऊस सारखा पडत असल्यानें रस्त्यांत चिखल मनस्वी झाला होता. कदाचित् गतवर्षाची सांठलेली घाण धुवून काढण्या-साठींच ही इराणाची साफसफाई चालली असावी असें मानण्यापलीकडे दुसरें कारण सांगतां येईना. नव्या



मयूर सिंहासन (पृ. २१२)

वर्षास आरंभ मात्र अगदीं निरभ्र आकाशांत प्रकाशणाऱ्या सूर्यकिरणांनीं सर्वत्र सुवर्णच्छटा पसरून केला. त्याच्या स्वागतानिमित्त तोफांची सरबत्ती झाली.

नियोजित अवधीपेक्षां २ तास आधीं जाऊनहि तेथील अलोट जनसंमर्दीकडे पाहून निराशा होते कीं काय अशी भीति वाटली. प्रवेशद्वारीं गुलाली रंगाचे तंग पोषाक केलेले वेत्रधर होते. आंतील विस्तृत चौकांत सेना-समुदाय जमला होता. त्यांचा वेष इतका नयनमनोहर होता कीं इंद्र-धनुष्यांतील सर्व रंग एकत्र आणून त्यांचा उपयोग केला आहे असें वाटे. शिस्तवार रांगांनीं सशस्त्र सैनिक उभे राहून आपल्या नायकांच्या आज्ञेकडे तीक्ष्ण कान देऊन उभे होते. कोणाचा वेष अस्मानी रंगाचा तर कोणाचा लालभडक रंगाचा. कांहींचा पोषाक पिंवळा तर कित्येकांचा हिरवा. नुसत्या रंगानें ते गणवेष इतके खुलून दिसले नसते. पण योग्यतेच्या मानानें कोणाच्या वेषावर सुवर्णतंतूची वेलबुट्टी काढलेली होती आणि कित्येकांच्या पोषाकावर रेशमी धाग्याची निरनिराळ्या रंगांची नक्षी होती. शिवाय यांच्या शिरोवेष्टनांतहि तितकेच प्रकार होते! बहुतेकांना विविध रंगांच्या केसाळ पेहेलवी टोप्या देण्यांत आल्या असून वेगवेगळ्या पलटणी ओळखतां याव्या म्हणून निरनिराळ्या रंगांचे रेशमी तुरे त्यावर लावलेले होते! एका पलटणीला वक्षःस्थलावरील सांखळीचें चिलखत असून शिरस्त्राणासाठीं इंग्रजी पद्धतीची टोपी होती. तिजवरील पितळी कळस नूतन वर्षाच्या आरंभीं उगवलेल्या नव्या सूर्यप्रकाशांत तळपत आणि त्यांच्या जोडीला सैनिकांच्या हातांतील बंदुकांच्या संगिनीचीं टोंकेंहि चकाकत.

या सैनिक-गणांची मौज वाटली ती त्या चौकामध्यें असलेल्या प्रशस्त जलसंचयामुळें. त्या चौकांतील हौदांत बाजूंस उभे असलेल्या योद्धयांचें प्रतिबिंब चित्रित झालेलें दिसे आणि पाण्याच्या पृष्ठभागावर थोडेसें आंदोलन झालें कीं सर्व चित्रपटच कोणी तरी हलविल्याचा भास होई. सेनानायकांचा वेष अधिक नयनमनोहर होता. सुवर्णतंतूचें साम्राज्य त्यांच्या वक्षस्स्थलावर दिसे आणि तुमानीच्या दोनहि बाजूंस रुंद पट्टे असत. विजारीचा रंग निळा तर उर्वरित शरीराच्छादन हिरव्या रंगाचें आणि टोपीवरील तुरा केशरी—असे वेगवेगळे रंग तेथें एकसमयावच्छेदेंकरून डोळ्यांत भरत असत.

### उद्यानाची रमणीयता

त्या चौकांतून आंत गेल्यावर उद्यानांत प्रवेश होतो. तेहेरानमधील उपवनें सर्व आशिया खंडांत विख्यात आहेत. आणि तेहेरानमधील राजाधिराजांचा हा बगीचा. तेथील व्यवस्था व शोभा काय वर्णावी! सदैव हरित रंगाचा वेष धारण करणारे वृक्ष व लहान झुडपें तेथें होतीं. हिरव्यागार गवताचीं विविध आकारांचीं आवारें मधून मधून असत. विटांनी भरलेल्या पायवाटांचा चौक जेथें होई तेथें पाण्याचे हौद असून त्यांत कारंजीं जलतुषारांना आकाशांत भिरकावून देत. स्वच्छ पाण्याचे पाट संथपणें अखंडित रीत्या वाहत तेव्हां त्यांकडे पाहूनच समाधान होई. जलप्रवाहाची शोभा वाढविण्यासाठीं त्यांच्या खालीं निरनिराळ्या रंगांचे दगड घातलेले होते. निळ्या चकाकित दगडावरून पाट वाहत होता तेव्हां आकाशाचें इतकें स्पष्ट प्रतिबिंब कसें उमटलें याचें आश्चर्य वाटून तत्काल दृष्टि वर जाई.

अशा नैसर्गिक शोभेत जिवंत मानवांच्या चालत्या-बोलत्या बाहुल्यांनीं भर घातली होती. नटण्या-मुरडण्याचा आणि सजण्याचा मक्ता एकट्या स्त्रीजातीसच आहे अशी ज्या पुरुषांची समजूत असेल त्यांचें मत बदलण्याइतका स्पष्ट पुरावा एका दिवसांत गुलिस्तानामध्यें मिळाला असता. इतर प्रेक्षकांचे पोषाक एकाच काळ्या रंगाचे असले तर लष्करी व मुलकी खात्यांतील अधिकाऱ्यांच्या वेषांत सर्व शक्य त्या रंगांचें मीलन झालेलें दृष्टोत्पत्तीस येई.

### युरोपियनांचे विचित्र वेष

राजदर्शनाला केवळ प्रजाजनांनींच यावयाचें नसतें; तर इतर स्वतंत्र राष्ट्रांचे प्रतिनिधीहि आपल्या सर्व सरंजामानिशीं सजून येतात. हिंदी पोषाकाच्या विचित्रतेस हंसणाऱ्या युरोपियनांनी इतके हास्यास्पद प्रकार राष्ट्रीय वेषांत करून त्यांचें बंधन कडक रीतीनें पाळावें हें पाहून साश्चर्य कुतूहल वाटलें. विशेषतः इंग्रज व इटालियन प्रतिनिधींचे पोषाक प्रेक्षणीय होते. त्यांच्या होडीच्या आकाराच्या लांबट टोप्या, त्यांवर असलेलीं पिसें, त्यांचे पुढें आंखुड पण मागें गुडघ्यापर्यंत लोंबणारे कोट, त्यांवरील सुवर्णतंतूंची नक्षी, खांद्यावर, मानेभोंवतीं आणि वक्षःस्थलावर काढलेली वेलबुट्टी, विजारीच्या बाहेरच्या बाजूस रुंद सोनेरी पट्टी, बुटाखालून नेलेला तिचा भाग इत्यादि सर्वच प्रकार आम्हा हिंदवासीयांनाच नव्हे तर अखिल पौर्वात्यांना हंसूं आणणारा होता. हृदयस्थानावर लटकणारे बिल्ले सोन्यारुप्याचे असते तर त्यांना भूषणें म्हणतां आलीं असतीं. पण दागिने घालणारांस हंसणारांनीं मिश्रधातूंचे तुकडे रंगीबेरंगी कापडाच्या चिंध्यांनीं आपल्या छातीवर मोठ्या फुशारकीनें लावून मिरवावें यापेक्षां विचित्र प्रकार दुसरा असेल काय! त्या मानानें अमेरिकन आणि रशियन प्रतिनिधी अगदीं साधे होते. त्यांच्या उंच पण काळ्या चकाकणाऱ्या टोप्याच चटकन

डोळ्यांत भरत. पण साम्राज्यवाद्यांचा पोषाक गमतीचा होता हे मात्र खरें.

**परराष्ट्रीय वकिलांचे संबंध**

यापेक्षांहि दुसरी मौज वाटत असेल तर ती परराष्ट्रीय मंत्री एकत्र कसे येतात ते पाहण्याचीच.तेहेरानमध्ये आशियांतील देशांचे, युरोपियन राष्ट्रांचे व अमेरिकेचेहि वकील आहेत. जणुं काय प्रत्येक देशांतील लोकांच्या नमुन्याचे इराणाच्या राजनगरीत प्रदर्शनच मांडलें आहे असें वाटतें. या वकिलातींचीं आवारें त्या त्या वकिलातींच्या मानानें विस्तृत आहेत. त्यांच्या रचनेवरूनहि त्यांचे आपसांतील स्नेहसंबंध सहज लक्षांत येतील. विश्वगोलावर आपले पंख पसरणाऱ्या जर्मन गरुडाच्या संनिध तुर्कांचें निवासस्थान आहे. महायुद्धाचे प्रसंगीं तुर्क शिपायी जर्मन योद्धयांच्या खांद्याला खांदा लावून लढत होते तसेंच तेहेरानमधील या दोस्त राष्ट्रांच्या वकिलातींच्या आवाराच्या भिंती एकमेकांस लागून आहेत. यांच्या 'सिफारती' (फार्सी शब्द) इतक्या जवळ जवळ आहेत कीं, मधून फक्त एकच रस्ता जातो. मात्र छत्तिसाच्या आंकड्याप्रमाणें—किंवा फार्सी ७८ च्या आंकड्याप्रमाणें—त्यांची प्रवेशद्वारें विरुद्ध दिशेला आहेत! पण इंग्रजी वकिलातींत उभे राहिले असतां मागील बाजूच्या रशियन वकिलातीवर फडकणारें तांबडें निशाण व त्यावरील कोयता आणि हातोडा दृष्टीसहि दिसतात. साम्राज्याच्या पिकाची समूळ कापणी करण्यास रशियन विळा पुढे सरसावतो अशी भीति ज्यांच्या मनांत असेल किंवा साम्राज्याच्या प्रचंड इमारतीचा नाश करणारा रशियन हातोडा टाळला पाहिजे असें ज्यांना वाटत असेल त्यांना रशियाचें हें निशाण वाईटच दिसणार.

**पेहेलवी शाहाचें आगमन**

असो. ठरलेल्या वेळीं राजेसाहेबांची स्वारी आली. वेत्रधर ललकारीत पुढे चालूं लागले. पहारेकऱ्यांची सलामी झडली. आजूबाजूस उभे असलेल्या अधिकाऱ्यांचीं डोकीं खालीं लवलीं. क्लिक् क्लिक् असे आवाज झाले. तोफांची सरबत्ती कर्णपथावर आली. बागेंत रमत-गमत हिंडणाऱ्या निवडक प्रजाजनांचे पाय थांबले व वाद्यें वाजेनाशीं झालीं.

रेझा शाहा पेहेलवी ही चाळिशी उलटलेली व्यक्ति आहे. ती अगदीं साध्या वेषांत होती. शीर्षभागावर इतर प्रजाजनांची असे तशाच प्रकारची पेहेलवी टोपी होती. डोळ्यांत एक विलक्षण तेज असून चर्येवरील रेखांवर

**'मदायत्तं तु पौरुषम्'**

हें कर्णाचें वाक्य अगदीं स्पष्ट अक्षरांनीं लिहिलेलें दिसे. रेझा शाहा हे इतर नामधारी राजाप्रमाणें वंशपरंपरेनें राजपुत्र नसून साध्या सैनिकापासून चढत चढत ते इराणचे शाहा झाले आहेत. आशियांत अशा प्रकारची स्वतःच्या हिंमतीवर राज्यपद प्राप्त करून घेणारी माणसें पुष्कळच झालीं आहेत. पण पेहेलवी शाहाचें श्रेष्ठत्व विशेष आहे. त्यांच्या मुद्रेवरील चिंतेची छाया आणि पिकलेले केंस यावरून

**स्वास्थ्यं कुतो मुकुटभारभृतां नराणाम्**

या कविवचनाची साक्ष पटे. गजगतीनें पडणारें त्यांचें पाऊल राज्यकर्त्यांवरील, विशेषतः तेहेरानच्या राज्यकर्त्यांवरील जबाबदारीच्या भाराची कल्पना आणून देई. उत्तरेकडून येणारें अस्वल, किंवा दक्षिण दिशेला टपून बसलेला सिंह या दोघांनाच ताब्यांत ठेवणें हें किती कठीण काम आहे. मग देशांतील बखत्यारी, कुर्दी,तुर्कोमान इत्यादि नाठाळ जातींमुळें त्या राज्यकारभाराचें ओझें कां वाढणार नाहीं? या सर्वांना पूर्णपणें कह्यांत बाळगून आपल्या देशाची प्रगति करण्यासाठीं झटणारा शाहा चिंताक्रांत कां दिसूं नये?

इराणच्या या बादशहाबरोबरच राजसभेचे मंत्री असून त्यांच्यामागें खाकी लष्करी पोषाक घातलेला युवराज होता. रेझा शाहा हा योद्धा असल्यानें राजपुत्रास लष्करी वेष कां घातला हे कळण्यासारखें आहे. अद्याप दहा वर्षांचाहि युवराज नसावा हे इराणी प्रजेचे दुर्दैव होय! मदगतीनें राजाधिराज युवराज आणि इतर मंडळी चालूं लागलीं. ३०० पावलें चालून गेल्यावर एका महालांत ती मिरवणूक शिरली आणि इकडे लष्करी रणवाद्यें मोठ्या आवेशानें झडूं लागलीं. बाहेर चौकांत उभ्या असलेल्या पलटणी शिस्तीनें तालांत पाऊल टाकीत, संगिना चमकावीत व तुरे उडवीत येऊन एका गवती गालिचाच्या मैदानावर उभ्या राहूं लागल्या. आणि कांहीं कालानंतर सर्व पलटणींचें ठाणें उद्यानांत बसलें.

त्या सर्वांचीं तोंडें ज्या महालांत शाहा शिरले त्या बाजूस होतीं. त्या महालापुढील दालनांत मध्यभागीं उच्च ठिकाणीं एक रत्नजडित खुर्ची ठेवली होती. आसनाच्या डाव्या अंगास मंत्रिमंडळ उभें होतें. सैनिकांची शिस्तवार मांडणी होतांच तोफांची सलामी झाली. शिपायांनीं खडी ताजीम दिली आणि वाद्यें वाजूं लागलीं. शाहा आसनस्थ होऊन सर्व प्रजाजनांनीं दिलेल्या मानाचा स्वीकार करण्यासाठीं उजवा हात भुवईपाशीं नेऊन सलाम करीत होता.

पुनः सरबत्ती, सैनिकांचें वंदन, वाद्यवादन आणि पुनः शाहाचा सलाम. असा तीनदां प्रकार घडला! शाहा स्वस्थानावरून उठून परत आल्या मार्गें हळूहळू पावलें टाकीत जाऊं लागला. इतका वेळ जमलेले सैनिकगण आल्यामार्गें परत त्याच शिस्तीनें जाऊं लागले आणि हा अपूर्व समारंभ संपला!

या प्रसंगीं इराणी स्त्रिया मुळींच नव्हत्या! पण परराष्ट्रीय वकिलांच्या स्त्रिया चित्रयंत्रें घेऊन उत्सुकतेनें आणि कुतूहलानें चोहोंकडे हिंडत होत्या. या समारंभांत स्थानिक स्त्रियांचा भाग अजीबात नसावा हें प्रचलित कालाच्या समान हक्काच्या लढ्यांत कसेसेंच दिसतें. पण हा इराणी मुलूख आहे. येथें पडद्याची चाल कडक रीतीनें पाळली जात आहे हें लक्षांत घेतले पाहिजे.

चार तासपर्यंत सलामसमारंभ पाहात होतो. तेव्हां त्याची व्याप्ति आणि मनोहारिता किती असेल! आतां सलाम शब्दाला नवीन अर्थ व नवें स्वरूप प्राप्त झालें कीं नाहीं!

# हिर्डोशीचें नवीन शिवाजीमंदिर

समर्थांनीं महाराष्ट्राला आनंदवनभुवन असें गौरवपूर्ण नामाभिधान दिलें. त्या आनंदवन—भुवनाचें महाराष्ट्र हें शरीर कल्पिले तर महाराष्ट्रांतील बारा मावळें हें त्याचें हृदय असें यथार्थतेनें म्हणावें लागेल. कारण याच मावळभागांत शिवरायांनीं प्रथम स्वराज्याचे मनसुबे केले. रोहिडा किल्ल्यावरील रायरेश्वराचे मंदिरांत येसाजी कंक, दादजी नरसूप्रभृति संवगड्यां-सह 'स्वराज्यासाठीं यापुढें फकिरी घेतली' अशा आणाभाका याच मावळखोऱ्यांत त्यांनीं घेतल्या. स्वराज्याचें पहिलें तोरण याच भागांत बांधण्यांत आलें. या व अशा अनेक कारणांनीं सर्व मावळ-भाग इतिहासभक्तांना परम पावन वाटतो. भोरच्या हद्दींतच बराच भाग असल्यानें स्वराज्याचें थोडेसें तरी वारें आज तेथें वाहतांना आढळतें. येसाजी कंक, बाजी फासलकर, तानाजी मालुसरे, देशमुख, बांदल, जेधे या स्वराज्यांतील कर्त्या घराण्यांचे अवशेष अद्यापिहि या भागांत आहेत व श्रीशिवछत्रपतीबद्दल या सर्वच भागांत अत्यादर आजतागायत दृष्टीस पडतो.

अशा या भागांत तेथील उत्साही कार्यकर्ते श्री. शेटे, श्री. गोपिनाथपंत पोतनवीस, श्री. दामु-आण्णा पोतनवीस यांनीं गेलीं ५।६ वर्षे हिर्डस येथें छत्रपतींचा जन्मोत्सव सुरू केला त्या ठिकाणीं छत्रपतींचें एखादें स्मारक उभारावें अशी कल्पना निघून एक मंदिर बांधण्याचें ठरलें. परंतु द्रव्य कोठून आणावयाचें हा प्रश्न पुढें येतांच तोहि मावळ्यांच्या एकजुटीनें सोडविला. मावळ्यांनीं प्रत्येकीं अर्धा आणा याप्रमाणें वर्गणी दिली व त्याप्रमाणें थोड्याच काळांत अकराशें रुपयांवर रक्कम जमाहि झाली. एवढ्या रकमेनें मंदिराची उभारणी होत नव्हती. तथापि चालकांनीं प्रथम जी रक्कम हातीं आली तिच्यांतून जागा घेऊन ५५ फूट लांब व ३७ फूट रुंद एवढा विस्तीर्ण चौथरा बांधून घेतला. आणि त्यावरच पुढें मंदिर बांधण्याचा विचार ठरविला. हिर्डोशी गांवांतील बाजारपेठेंतून एक रस्ता सरळ जातो व पेठ संपतांच त्याचे दोन फांटे दोन बाजूंला जातात. बरोबर मुख्य रस्ता संपतो त्या समोरच पूर्वाभिमुखी या मंदिराचा चौथरा बांधण्यांत आला आहे. त्याच्या खालच्या बाजूनें निरा नदी वाहात आहे.

या मंदिराची कोनशिला बसविण्याचा समारंभ ता. २८ रविवार रोजीं सायंकाळीं ५ वाजतां भोर संस्थानाचे कर्तव्यदक्ष अधिपति **श्रीमंत बाबा-साहेब पंतसचीव** यांचे हस्तें थाटानें झाला. या समारंभासाठीं बाराहि मावळांतील दरएक गांवाचे प्रतिनिधींखेरीज इनामदार वतनदार हजर असून त्या सर्वांची संख्या ४ हजारांवर असावी. याखेरीज भोर संस्थानाचे दिवाण रा. ब. अंजनगांवकर व इतर अधिकारीहि हजर होते. पुण्याहून श्री. चिंतामणराव वैद्य, प्रो. पोतदार, दि. वा. दिवेकर, रा. गो. भिडे, द. रा. गुप्ते, शं. न. जोशी, वामनराव पटवर्धन इत्यादि गृहस्थ या समारंभासाठीं मुद्दाम गेले होते.

समारंभ सायंकाळीं ५ वाजतां सुरू झाला श्रीमंत येतांच सर्वांनी त्यांस उत्थापन दिलें व छत्रपतींचा प्रचंड जयजयकार करण्यांत आला. नंतर श्रीमंतांचें स्वागत करणारें पद्य म्हटलें गेल्यावर स्वागत-मंडळातर्फे श्री. **दामोदर बाळकृष्ण पोतनवीस** यांचें स्फूर्तिदायक असें भाषण झालें. त्यांनीं आपल्या भाषणांत शिवकालीन महाराष्ट्राचें मोठें मनोवेधक शब्दचित्र रेखाटलें. व नंतर हिर्डस मावळांतील प्रस्तुतची स्थिति सांगतांना ते म्हणाले, 'या मावळांत एकंदर २८ खेडीं व सुमारें ३ हजार लोक-संख्या आहे. या भागांतून भात, हिर्डा, गवत, जळाऊ लांकडें इत्यादि माल उत्पन्न होऊन त्याचे सुमारें ८० हजार रुपये येतात व त्यांतून खर्चवेंच जाऊन दरमाणशीं बारा-तेरा रुपये वार्षिक उत्पन्न राहतें. येथील लोकांनीं मंदिर उभारण्याचा संकल्प करून सुमारें अकराशें रुपये जमविले त्याची कोनशिला आज श्रीमंतांनीं बसवावी.' या विनंतीस दुजोरा देतांना तेथील एक कार्यकर्ते श्री. **बाबूराव देशपांडे** यांनीं सांगितलें कीं मावळे बंधूंनीं प्रत्येकीं अर्धा आणा देऊन अकराशें रुपये जमा

केले. स्मारकाची जागा खरेदी करण्यास रु. साठ व जोतें बांधण्यास ८७० रु. लागले. यापुढें मंदिर उभारण्यासहि बराच निधी लागेल व तो जमविण्याचा प्रयत्न करूं. सूचनेस पुष्टि देतांना **श्री. शेटे** म्हणाले, छत्रपतींनीं स्वराज्याची कोनशिला याच ठिकाणीं बसविली व संभाजीमहाराजांच्या वधानंतर स्वराज्याची इमारत कोसळण्याचा प्रसंग आला असतांहि आपल्या अधिपतींच्या पूर्वजांनींच त्या वेळीं मावळ्यांच्या मदतीनें तिचें रक्षण केलें व खुद्द श्री. बाबासाहेब पंतसचीव यांनीं लोकमतानुवर्ती राज्यकारभाराचा उपक्रम करून एक प्रकारें स्वराज्याची कोनशिलाच बसविली आहे.अशा प्रकारें 'आधी केलें मग सांगितलें' असें ते असल्यानें आजचा प्रसंग त्यांच्या हातूनच साजरा होणें सर्वथैव योग्य आहे. याप्रमाणे भाषणें झाल्यावर श्रीमंतांनीं टाळ्यांच्या कडकडटांत व शिवछत्रपतींच्या जयजयकारांत कोनशिला स्थापन केली. त्यानंतर त्यांचें पुढील आशयाचें भाषण झालें.

## अध्यक्षांचें भाषण

प्रथम आपणास मंदिराची कोनशिला बसविण्याचा मान दिल्याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांनीं चालकांचे आभार मानले.व ते म्हणाले, "ज्या ज्या देशांत थोर राष्ट्रीय विभूति होऊन गेल्या त्यांच्या गुणावगुणांची तुलना केल्यास शिवाजीमहाराजांसच अग्रपूजेचा मान द्यावा लागेल, ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे. धर्मरक्षणासाठीं त्यांचा अवतार होता अशी सर्वांचीच भावना आहे.ते जरी कट्टे हिंदुधर्माभिमानी होते. तथापि त्यांनीं इतर कोणत्याहि धर्माचा छळ केला नाहीं, इतकेंच नव्हे तर परधर्मीयांना त्यांनीं आदरानेंच वागविलें. ते गुणाचे चाहते होते व सर्वांना समदृष्टीनें वागवीत. जातिभेदाची कल्पना त्यांना कधींहि शिवली नाहीं. किंबहुना जातिभेद राष्ट्रकार्याच्या आड येऊं शकत नाहीं ही गोष्ट त्या वेळच्या देशसेवकांनीं आपल्या आचरणानें सिद्ध केली आहे. म्हणूनच सर्व ठिकाणीं ऐक्यभावना उत्पन्न करून हिंदवी स्वराज्य त्यांस निर्माण करतां आलें.

महाराजांबद्दल त्यांच्या मावळे वीरांत किती आदर वसत आहे ही गोष्ट आजच्या समारंभावरून स्पष्टच दिसून आली आहे. संभाजीचे वधानंतर हा मावळ प्रांत मोंगलांचे ताब्यांत गेला असतां या संस्थानाचे आद्य संस्थापक श्री.शंकराजी नारायण यांनींच मावळ्यांच्या साहाय्यानें तो परत घेतला. महाराजांचें मंदिर बांधण्यास हें ठिकाणच ऐतिहासिक दृष्ट्या फार महत्त्वाचें आहे. या ठिकाणच्या सभोंवारच्या प्रदेशांतच छत्रपतींनीं महाराष्ट्र साम्राज्यसंस्थापनेची पूर्वतयारी केली व भवानीच्या कृपेनें ती कल्पना साध्यहि झाली.या भूभागासंबंधानें मि. डग्लस यांचे उद्गार असे आहेत कीं, 'मराठी साम्राज्याची जन्मभूमि होण्यास ही जागा सर्वतोपरी योग्यच होती.' पुणें येथें छत्रपतींच्या पुतळ्याचें अनावरण करतांना माजी गव्हर्नर ना० सर लेस्ली विल्सन यांनीं आपल्या भाषणांत "शिवाजी हा भारतीय वीर मानला जात आहे. हिंदी ऐक्यभावाचे द्योतक असा तो समजला जाईल व एका मराठी महात्म्याचेंच नव्हे तर एका हिंदु विभूतीचें हें स्मारक मानण्यांत येईल" असे त्यांनीं यथार्थ उद्गार काढले होते. आपण सर्वांनीं याच भावनेनें महाराजांकडे पाहिलें पाहिजे. तुम्ही मावळे शूर आहां याचा प्रत्यय गेल्या महायुद्धांत आलाच आहे. तुमचा पराक्रम, प्रामाणिकपणा व स्वामिनिष्ठा याबद्दल मला फार अभिमान वाटत असून तुमचेबद्दल अत्यंत प्रेम वाटत आहे. महाराजांचे वेळेप्रमाणेच जातिभेदभावनांचें समूळ उच्चाटन करून आपल्या संस्थानाचें हित व उत्कर्ष घडवून आणण्याचा सर्व जातींकडून एकजुटीनें प्रयत्न करण्यांत येईल अशी मला दृढ आशा वाटते."

याप्रमाणें श्रीमंतांचें भाषण झाल्यानंतर आभारपर भाषण करतांना **प्रो. पोतदार** म्हणाले, छत्रपतींचीं स्मारकें करणें व त्यांचे उत्सव करणें ही गोष्ट आतां राजमान्य झाली आहे. महाराष्ट्रांत व इतरत्रहि त्यांचीं अनेक स्मारकें होतील. परंतु या स्मारकाचें महत्त्व विशेष आहे व त्यांतील मुख्य कारण म्हणजे मावळे बंधूंनीं इतरांच्या मदतीची वाट न पाहतां स्वतःच्या हिंमतीवर कार्यास सुरवात केली. छत्रपतींचें नुसतें स्मारक केल्यानें जबाबदारी संपत नाहीं. छत्रपतींचें स्वराज्यविषयक व संग्राहक दृष्टीचें जें धोरण होतें त्याची जोपासना आपण केली पाहिजे. महाराजांच्या अष्टप्रधानांतील आतां फारच थोडीं घराणीं विद्यमान आहेत. पंतप्रतिनिधी प्रतिवर्षी शिवजन्मोत्सव करीत असतात.महाराजांच्या मंत्रिमंडळांतील श्रीमंतांचें घराणें असल्यानें श्रीमंतांनींहि प्रतिवर्षी शिवजन्मोत्सव करावा. यानंतर श्री. चिं. वि. वैद्य, श्री. दादासाहेब साने, श्री. वामनराव पटवर्धन यांचीं आभारप्रदर्शन भाषणें झालीं व शेवटीं श्री. गोपिनाथपंत पोतनवीस यांनीं आभार मानले. त्यांत मावळ्यांनीं दररुपयाला एक आणा देण्याचें मान्य केलें असून मंदिराची उभारणीहि लवकरच होईल अशी आशा व्यक्त केली आणि शिवरायाच्या जयजयकारांत समारंभ समाप्त झाला.

# महाराष्ट्र प्रांतिक परिषद्

राष्ट्रीय सभेनें आपल्या कामापुरती सरकारी प्रांतिक विभागणी बाजूस सारून भाषावार अशी नवी प्रांतरचना केल्यानें ज्या कांहीं मिश्र विभागामध्यें, ते या भाषेच्या प्रांतांत घालावेत का त्या भाषेच्या प्रांतांत घालावेत असा विकल्प उत्पन्न होतो, अशांपैकींच मुंबई उपनगर जिल्हा हा होय. यांतील बहुतेक वस्ती म्हणजे रेलवेच्या सोयीमुळे पसरलेली मुंबई शहराची वस्ती. अर्थात् त्यांत मुंबईसारखीच धर्मांची, जातींची व भाषांची पंचभेळ खिचडी असणार हे उघड होय. मुंबईतील व्यापारांत गुजराथी मंडळींचे वर्चस्व तर कारकुनींत व नोकरींत महाराष्ट्रीयांचें प्राबल्य. अशा स्थितींत या जिल्ह्यांत गुजराथी मराठीचें समसमान मिश्रण असणार हें उघड होय; किंबहुना परिषदेच्या स्वागतमंडळांत गुजराथी जाणणाऱ्या व मराठी न जाणणाऱ्या मंडळींचेंच मताधिक्य होतें. पण असें असतांहि येथील गुजराथी मंडळी कॉंग्रेसच्या प्रांतविभागणीची मर्यादा स्वीकारून यथाशक्ति कार्य करीत आहेत व महाराष्ट्रानेहि त्यांचें कार्य हें आपलें म्हणून मानलें आहे ही आनंदाची गोष्ट होय. याच उभय पक्षीं दिसून येणाऱ्या मिळाऊ वृत्तीमुळें उपनगर जिल्ह्यानें प्रां. परिषद बोलावण्याची इच्छा बरेच दिवसांपासून धरली व महाराष्ट्र प्रां. कॉं. कमिटीनें ती मान्य केली.

## अनुकूल वातावरण

गतवर्षीची पुण्याची प्रांतिक परिषद ही कॉंग्रेसवाल्यांमधील दोनतीन वर्षांच्या आपसांतील वादानंतर एकी होऊन भरलेली होती. यामुळें तींत एकी न बिघडतां ती दृढ कशी होईल याबद्दल उभय पक्ष खबरदारी घेत. होते सायमन कमिशनाच्या बहिष्काराच्या चळवळींत जुन्या वादांना थारा नसल्यामुळे हा ऐक्याचा उपक्रम यशस्वी झाला खरा. पण ही सर्व परिषद ऐक्य न बिघडविण्याच्या काळजींत गेली. तशी काळजी वांद्रें येथील परिषदेंत वाटली नाहीं. कारण गेल्या प्रां. परिषदेनंतर त्या परिषदेंत ठरल्याप्रमाणें बहिष्काराचा व नेहरू रिपोर्टाच्या प्रचाराचा कार्यक्रम कॉंग्रेसमधील व कांहीं कॉंग्रेसच्या बाहेरच्याहि पक्षांच्या सहकारितेनें पार पाडण्यांत आला. कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रमहि कोणत्याहि प्रकारचा अंतस्थ विरोध उत्पन्न न होतां चालू राहिला. सारावाढीच्या प्रश्नासारखा सर्व प्रकारच्या पक्षांच्या लोकांना सारखाच मान्य असणारा प्रश्न सरकारच्या अनेक तालुक्यांतील सारावाढीच्या धडाक्यानें निकरावर आल्यासारखा झाला. सरकारची दडपशाही, व्हाइसरॉयांचा वटहुकूम, मिरतचा खटला व त्यांतील धरपकड इ. ठळक गोष्टींबद्दलहि एकमतानें सरकारचा निषेध करण्यासारखी परिस्थिति प्राप्त झाली. कौन्सिलप्रवेश, आढेवेढे घेत घेत का होईना, सर्वमान्य झाल्यामुळें नेहरू रिपोर्ट व कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम या प्रश्नांवर जवळच आलेल्या निवडणुकी लढवून कौन्सिलांत लोकमताचा ताबा अधिक परिणामकारक करण्याची जरूरी सर्वांस सारखीच भासूं लागली. ना. विठ्ठलभाई पटेल यांच्या बाणेदार वर्तनानें कौन्सिलांत खंबीर राष्ट्रीय माणसांना पाठविण्याच्या धोरणाची उपयुक्तता सहजच कौन्सिलप्रवेशास तात्विक हरकत असणाऱ्यांनाहि मान्य झाली. अशा अनेक दृष्टींनीं अनुकूल वातावरणांत कौन्सिलप्रवेशवादी महाराष्ट्र व असहकारवादी गुजराथ यांच्या संयोगभूमीवर गेली महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरली. यामुळें ती व्यापक राष्ट्रकार्यास चांगलेच चालन देणारी झाली यांत नवल नाहीं.

## अध्यक्ष व स्वागताध्यक्ष

या जिल्ह्यांतलि गुजराथी लोकांच्या ओढ्यामुळें असें म्हणण्यापेक्षां सारावाढीच्या विरुद्ध महाराष्ट्रांत बोलूं चालूं लागलेल्या चळवळीस चालना देण्यसाठींच बार्डोलीचे अनुभवी कर्मवीर श्री. वल्लभभाई पटेल यांची अध्यक्षस्थानीं योजना करण्यांत आली. अध्यक्ष वल्लभभाई व स्वागताध्यक्ष जयसुखलाल हे दोघेहि गुजराथीच. पण एक खेडेगांवांतील शेतकऱ्यांत काम करणारे एकांगी व श्रद्धाळू तर दुसरे शहरांतलि व्यापारांत असलेले अनेकांगी व विचक्षण. वल्लभभाईंना 'कॉंग्रेसचा कार्यक्रम पार पाडा' या एका गोष्टीशिवाय दुसरें कांहींच सांगण्याची जरूरी नाहीं असे वाटले. इतकेंच नव्हे तर, 'आतां फक्त अम्मलबजावणीचा प्रश्न कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांपुढें असावा, विचाराची किंवा वाटाघाटीची कांहीं जरूरी नाहीं' असें त्यांचें मत त्यांनीं आपल्या भाषणानें दर्शविलें. प्रासंगिक म्हणून त्यांनीं हिंदू—मुसलमानांचा प्रश्न, जमीन महसुलाचा प्रश्न, युवकसंघ, कौन्सिल निवडणुकी इ. गोष्टींचें विवेचन केलें. पण यांतहि अनुयोगी म्हणून म्हणा अगर प्रतियोगी म्हणून म्हणा, त्यांचें कॉंग्रेसच्या विधायक कार्यक्रमाचें पालुपदच त्यांनीं घोळलें कौन्सिलप्रवेशाचा ओघ आता सार्वत्रिक व सर्वव्यापक झाला असला तरीहि 'कौन्सिलाकडे लक्ष गेल्यानें विधायक कार्यक्रम बिघडतो' ही आपली समजूत वल्लभभाईंनी

बोलून दाखविलीच. पण मौज ही कीं, जे असे कट्टे श्रद्धाळू असहकारी वा विचक्षण कौन्सिलप्रवेशवादी पूर्वी भांडून कॉंग्रेस दुभंग करण्याच्या बेतांत होते तेच आतां कालाच्या प्रवाहानें व व्यवहाराच्या अपरिहार्यतेनें कौन्सिलनिवडणुकीचा कार्यक्रम, विधायक कार्यक्रम व इतर प्रासंगिक पण आवश्यक असें अनुकूल वा प्रतिकूल सामुदायिक मतप्रदर्शन एकोप्यानें करीत आहेत. एकाचा एका बाबतींत विशेष उत्साह, श्रद्धा, आग्रह असेल तर दुसऱ्याचा दुसऱ्या बाबतींत असेल. पण या दोनही गोष्टी कांहीं सहकारितेनें,तर कांहीं श्रमविभागाच्या स्वतंत्रतेनें पण एकाच व्यापक अशा कॉंग्रेससंस्थेच्या छत्राखालीं सर्व कॉंग्रेसभक्त करूं शकतात ही गोष्ट कांहीं दिवसांपूर्वी जीव तोडून सांगितली तरी कोणास पटत नव्हती तर कोणास मानवत नव्हती. तीच आतां कालानें, परिस्थितीनें व कांहीं अंशी दोनही बाजूंनीं आपापल्या कार्यांत थोडें का होईना पण कबूल करण्यासारखें यश मिळविल्यानें अखेर व्यवहारांत उतरून रूढ झाली! पूर्वीच्या भांडणांत उभय पक्षीं झालेला कार्यनाश व त्यायोगें उभय पक्षीं उत्पन्न झालेला मनःसंताप ज्यांनीं पाहिला व अनुभवला त्यांना तर ही एकी विशेषच समाधानाची वाटल्यावांचून राहणार नाहीं.

स्वागताध्यक्षांनीं फक्त स्वागताचें काम करावें हेंच युक्त. या दृष्टीनें जयसुखलाल यांचें भाषण हें केवळ स्वागताध्यक्षांच्या भाषणासारखें झालें नाहीं. तर जवळ जवळ अध्यक्षांच्या भाषणासारखें झालें. किंबहुना अध्यक्ष हे श्रद्धाळू व एकमार्गी असल्यामुळें अनेकांगीं राष्ट्रीय विचार करण्याच्या दृष्टीनें जयसुखलाल यांचें भाषणच अध्यक्षांच्या भाषणापेक्षांहि अधिक अध्यक्षीय ठरेल. स्वागताध्यक्षांनीं आपल्या कर्तव्याचें असे अतिक्रमण केलें असलें तरी अध्यक्षांच्या एकमार्गी मर्यादितपणामुळे हें अतिक्रमण या प्रसंगीं तरी उपयुक्तच ठरलें. वल्लभभाईचा एकमार्गीपणा हा प्रत्यक्ष विशिष्ट कार्य चालविण्याच्या कामांत उपयुक्त ठरतो. पण परिषदेचें विचारात्मक स्वरूप या एकमार्गीपणानें नाहींसें झालें असतें. किंबहुना "परिषदा कशाला भरवतां ? परिषदा भरवून नवीन विचार करण्यासारखें आपल्यापुढें कांहीं आलें नाहीं. आतां फक्त ठरल्याप्रमाणें कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम करा" असाच जवळ जवळ वल्लभभाईचा परिषदेला संदेश होता. पण वल्लभभाईसारख्या कट्टया असहकाऱ्याला तसें वाटलें तरी गेल्या कांहीं महिन्यांत झालेली दडपशाही,कौन्सिलांतील व असेंब्लींतील वाद, मजूर–चळवळ, सारावाढीची चळवळ, नेहरू रिपोर्टसंबंधाचे वाद, जातीजातींतील भांडणें, सरकारचें जाचणारें आर्थिक धोरण, इ. गोष्टींचा विचार करण्यासाठीं व त्यावर सामुदायिक मतप्रदर्शन करण्यासाठीं परिषदेची जरूरी होती. निरनिराळ्या प्रश्नांचा विचार व मतप्रदर्शन हें असहकारी गुजराथला नकोसें किंवा अप्रिय असलें तरी महाराष्ट्राला तें पूर्वीप्रमाणेच जरूर वाटत आहे. विधायक कार्यक्रमाच्या कांहीं बाबतींत व सत्याग्रहांत गुजराथेचा अनुभवी सल्ला महाराष्ट्रानें ऐकला. पण त्यासाठीं इतर विचार व मतप्रदर्शन हीं मात्र अगदींच सोडून दिलीं नाहींत, दोहोंचेंहि महत्त्व आहे असें महाराष्ट्राला वाटतें. व जयसुखलाल हे गुजराथी असले तरी परिषदेच्या विचारी व मतप्रदर्शक स्वरूपास आवश्यक असेंच त्यांचें भाषण झालें.

## परिषदेंतील व्यापक मतप्रदर्शन

भांडवलवाले व्यापारी या दृष्टीनें त्यांनीं केलेला स्वातंत्र्यध्येयाचा व मजुरांच्या जहाल चळवळीचा निषेध, यासारख्या कांहीं गोष्टी कोणाला मान्य होणार नाहींत. पण 'आतां विचार संपला व कार्यच फक्त राहिलें' असें देशापुढील अनेक प्रश्नांच्या दृष्टीनें म्हणतां येणार नाहीं हे त्यांच्या भाषणावरून दिसून आलें. आणि विधायक कार्यक्रमाचे बाबतींत वल्लभभाईचा सल्ला जसा परिषदेनें ऐकला त्याचप्रमाणें जयसुखलाल यांच्या भाषणांत दिग्दर्शित झालेली विचाराची व मतप्रदर्शनाची आवश्यक बाजूहि परिषदेनें सोडली नाहीं. वल्लभभाईचा कार्यसंदेश महाराष्ट्रानें घेतला त्याचप्रमाणें जयसुखलाल यांची विचाराची बाजूहि घेतली; नेहरू रिपोर्टाला पाठिंबा देऊन त्याच्या प्रचाराचें कार्य करावें असें परिषदेनें म्हटलें, मजुरांच्या पुढाऱ्यांवरील खटल्यांत त्यांचा बचाव करण्याच्या कामास पाठिंबा दिला, ज्ञातिविषयक अत्याचारांचा निषेध केला. व्हाइसरॉयांच्या वटहुकमाचा धिःकार केला, पटेलांच्या निर्णयाचे पाठीमागें लोकमत आहे ही गोष्ट व्यक्त करून त्यांचा गौरव केला, शेतजमिनींचा उपयोग इमारती बांधण्यासाठीं केल्याबरोबर जबर सारा बसविण्याच्या शहरांच्या वाढीस घातक होणाऱ्या, सरकारी धोरणाचा निषेध केला, आणि साताऱ्याच्या ग्रामसेवामंडळाच्या कार्याचें अभिनंदन करून तसेंच कार्य इतरत्र सुरू करण्याबद्दल इतर तालुक्यांना सूचना केली. अशा रीतीनें अनेक प्राप्त गोष्टींबद्दल आवश्यक मतप्रदर्शन करून विचारी निर्णय परिषदेनें दिले.

## वल्लभभाईचा कार्यसंदेश

मत–प्रदर्शनाची जरूरी किती असते हें एका गोष्टीवरून तर चांगलेंच दिसून आलें. गेल्या परिषदेंत एकीसाठीं आवश्यक असलेल्या विषयमर्यादेचें अतिक्रमण केल्याचें निमित्त कोणास सांपडूं नये, येवढ्याच

हेतूनें अस्पृश्यतानिवारणाचा ठराव वगळण्यांत आला होता. पण याबद्दल कित्येकांनीं गैरसमजमूलक गवगवा केला व यामुळें कित्येक गृहस्थांचे विपरीत ग्रह बनले. पण या एकीसाठीं आतां एका वर्षानंतर असली कांहीं विषयमर्यादा पाळण्याइतकी ही एकी नाज़ूक राहिलेली नसल्यामुळें अस्पश्यतानिवारणाचा व्यापक व तपशीलवार ठराव विषयनियामक मंडळांत व परिषदेंतही एकमतानें मंजूर झाला. यामुळें ज्यांची या बाबतींत गैरसमजूत प्रामाणिक होती त्यांची तरी ती दूर होईल. जमीन–महसुलाचा ठराव प्रसंगानें व वल्लभभाईंच्या अध्यक्षस्थानामुळें अधिकच महत्त्वाचा ठरला यांत नवल नाहीं. पण या बाबतींत तरी नुस्त्या ठरावांपेक्षां व भाषणांपेक्षां वल्लभभाईंचा कार्यसंदेशच अधिक उपयुक्त ठरेल. या ठरावान्वयें एक कमिटी नेमण्यांत आली आहे. पण या कमिटीनें बार्डोलीच्या धर्तीवर, महाराष्ट्रांतील सारावाढीनें ग्रस्त झालेल्या एखाद्या नमुनेदार तालुक्यांत संघटना करून सारावाढीच्या सत्याग्रही प्रतिकाराची तयारी केली तर वल्लभभाईंना बोलावून त्यांचा सन्मान केल्याचें सार्थक होईल; नाही तर तो सन्मान पोकळ व निरर्थकच ठरेल. त्याचप्रमाणें परदेशी कापडावर बहिष्कार, खादीप्रचार, ग्रामसंघटना इ. गोष्टींतहि वल्लभभाईंचा कार्यसंदेशच महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांनीं घेतला पाहिजे. नुस्तें मतप्रदर्शन या कार्याशिवाय पोकळच ठरेल. कौन्सिल–प्रवेशाच्या कार्यक्रमालाहि विधायक कार्यक्रमाचा पाठिंबा पाहिजेच. सारांश, वैयक्तिक आग्रह असूनहि ज्या व्यापक बुद्धीनें वांग्याच्या परिषदेंत निर्णय झाले त्याच बुद्धीने सर्व कार्ये आवश्यक श्रमविभागानें व श्रमसंयोगाने यापुढें चाललीं तरच या परिषदेचें यश कृतींत उतरल्यासारखें होईल.

# बार्डोलीच्या चौकशीचा निर्णय

## सारावाढ २० टक्क्यांची ६ टक्के केली

बार्डोलीच्या प्रश्नाचा निर्णय करण्याकरितां गतवर्षी ता. १८ आक्टोबर रोजीं सरकारनें मे. ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांची कमिटी नेमली. त्या कमिटीचा रिपोर्ट आतां प्रसिद्ध झाला आहे. त्याचा सारांश पुढें दिल्याप्रमाणें आहे.

बार्डोली व चौराशी तालुक्यांतील लोकांच्या तक्रारीचा मुख्य भर पुढील मुद्द्यांवर होता. (१) सेटलमेंट कामगारानें जी सारावाढ केली आहे ती लँ. रे. कोड कलम १०७ या कलमान्वयें रास्त ठरत नाहीं. आणि (२) सारावाढीबद्दलचा जो रिपोर्ट रयतांना मिळाला त्यांतील माहिती सारावाढ करण्याला पुरेशी नाहीं व त्यांतील कांहीं माहिती तर चुकलेलीच आहे. (३) वरील दोन मुद्दे शाबीत झाल्यास रिव्हिजन सेटलमेंटमध्यें सारावाढ किती कमजास्त करणें योग्य ठरेल?

यांतील पहिल्या मुद्द्याचा प्रथम विचार करूं. लँ. रे. कलम १०७ असें आहे कीं, 'तरमबंदीच्या फेरतपासणीच्या वेळीं जमिनीच्या किंमतीकडे लक्ष देण्यांत यावें. शेतकामाकडे उपयोगांत येणाऱ्या जमिनीच्या तरमबंदीच्या वेळीं शेतकामांत नफा किती होतो त्याचा विचार करण्यांत यावा.' या कलमाचा अर्थ असा नव्हे कीं, तरमबंदीच्या हिशेबांत खंडाच्या रकमेचा किंवा वार्षिक उत्पन्नाचा विचारच करूं नये! खंडाची रक्कम वास्तविक किती आहे याची यथार्थ चौकशी केल्यावर त्या खंडावरून साऱ्याची आकारणी ठरविण्याला १०७व्या कलमाची हरकत येऊं नये इतकें तें कलम व्यापक व लवचीक आहे. मात्र खंड वास्तविक किती आहे हें आधीं ठरविलें पाहिजे. तो एकदां बरोबर कळला म्हणजे शेतसाऱ्याची रक्कम शेतीच्या नफ्यावरूनच ठरविल्याप्रमाणें होतें. सेटलमेंट करतांना घेतलेले खंडाचे आंकडे चूक असतील, अपुरे असतील, अविश्वसनीय असतील, परंतु खंडाचे आंकडे चुकीचे आहेत म्हणणें वेगळें आणि खंडाच्या आंकड्यावरून केलेला शेतसाऱ्याचा अंदाज लँ. रे. कोडाला धरून नाही म्हणणें वेगळें. या तालुक्यांतील खंडाचे आंकडे अपुरे असल्यानें येथील विशिष्ट परिस्थितींत शेतीचा नफा ठरविण्याला त्यांचा उपयोग होत नाहीं व त्यामुळें १०७कलमांतील तत्त्वाच्या विरुद्ध ही आकारणी झाली आहे असें जर विरुद्ध बाजूनें म्हटलें असतें तर त्यांच्या म्हणण्याला कांहीं जोर आला असता.

आतां दुसऱ्या मुद्द्याचा विचार करूं. शेतसाऱ्याची वाढ करण्याला जीं कारणें सेटलमेंट कामगाराने नमूद केलीं आहेत त्यांत रेल्वे, गाडीचे रस्ते, बाजाराची सोय, तालुक्यांत होणारीं पिकें, निर्गत माल, लोकसंख्या, नवीं घरें, शेतीचीं साधनें, कापसाची तेजी वगैरेंचा तपशील दिला आहे. पण

या तपशिलावरून सेटलमेंट ऑफिसरानें काढलेल्या अनुमानांत आशावादित्वच अधिक दिसते.

**अधिकाऱ्यांचे चुकीचे रिपोर्ट**

खंडचिठ्यांची चौकशा तर ज्या त्या गांवांत जाऊन समक्ष माहिती घेऊनच केली पाहिजे. या बाबतींत **टेनन्सी रजिस्टर** हे अगदी विश्वासार्ह नसतें व आम्हास त्यांत कितीं तरी चुका आढळल्या. बार्डोली तालुक्याच्या खंडचिठ्यांची व इतर कोष्टकांची आम्ही छाननी केली, तींत असे आढळून आलें कीं, सेटलमेंट ऑफिसरांच्या रिपोर्टांतले पुष्कळसे आंकडे निरुपयोगी आहेत. हे आंकडे वगळून बाकी राहिलेल्या पुराव्यावरून पाहतां आम्हास असें आढळून आलें कीं, जमीन खंडानें देण्याची वहिवाट या तालुक्यांत अत्यल्प प्रमाणांत दिसून येते व कित्येक खेड्यांत तर खंडानें देण्याचा प्रकार क्वचितच आढळून येतो. अर्थातच खंडाची रक्कम व तरमबंदीची रक्कम यांचें प्रमाण ठरविण्याला हा पुरावा पुरेसा नाहीं एवढेंच नव्हे तर ते आंकडे विश्वासार्ह मानतां येत नाहींत.

शेतसाऱ्याची आकारणी ठरविण्यासाठीं खेड्यांचे जे चार गट केले आहेत ते गट कोणत्या तत्त्वावर केले याचा आम्हास तर उमजच पडत नाहीं. सेटलमेंट ऑफिसरानें या बाबतींत केलेल्या कित्येक चुका सरकारनें आपल्या शेवटच्या हुकमांत दुरुस्त केल्या तरी पण आम्हास असेंच म्हणावें लागतें कीं हे गट करण्यांत घोड्याएवढ्या चुका झाल्या आहेत! त्या चुका दुरुस्त करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे सेटलमेंट ऑफिसराचा रिपोर्ट अगदीं बाजूस सारून जुने गट लक्षांत घेऊन सगळें वर्गीकरण नवीन करणें हाच होय.

या तालुक्यांतील जमिनीच्या विक्रीची किंमत बेसुमार वाढली आहे या गोष्टीला सेटलमेंट कामगारानें अवास्तव महत्त्व दिलें आहे. दक्षिण–आफ्रिकेत जाऊन पैसे कमावून आलेले इसम येथें स्थाईक होण्याकरितां बेसुमार किंमत देऊन जमिनी खरेदी करतात हें खरें. पण त्यावरून त्या इसमांना आपण किंमत किती देतों व त्या भांडवलावर व्याज किती सुटेल याची पर्वाच नसते एवढेंच फार तर म्हणतां येईल; पण त्यावरून तालुक्यांतील शेतीचा नफा अजमावतां येणार नाहीं.

**मूळ पद्धतीच सदोष आहे**

सारांश, या रयतांची दुसरी तक्रार बहुतांशीं खरी आहे. खंडाचे व जमिनीच्या विक्रीच्या किमतींचे आंकडे याखेरीज सारावाढ करण्याला जी इतर कारणें लागतात त्यांचा सेटलमेंट रिपोर्टांत तपशील दिलेला नाहीं आणि जेवढा तपशील दिला आहे तेवढ्यावरून ही सारावाढ न्याय्य ठरत नाहीं. खंडाचे व विक्रीचे जे आंकडे दिले आहेत त्यांतले बहुतेक आंकडे चुकीचे व अविश्वसनीय आहेत. आणि इतर ठिकाणची स्थिति कशीहि असो पण या तालुक्यांत तर खंडाच्या व जमीनविक्रीच्या दरांवरून शेतसाऱ्याची आकारणी करणे बरोबर नाहीं आणि तत्त्वतः ही पद्धतीच सदोष होय. याकरितां हल्लींची जाहीर झालेली आकारणी बाजूस सारून, सरकारी हुकमाप्रमाणे, नवी आकारणी आम्ही ठरवीत आहों.

नवी सेटलमेंट ठरविण्याकरितां आम्ही बार्डोली तालुक्यांतलीं ४९ गांवें व चौराशी तालुक्यांतलीं २१ गांवें तपासलीं. या सर्व गांवांतून शेतीची स्थिति समजून येण्याकरितां जी जी माहिती लागते ती ती सर्व माहिती आम्ही मिळविली. तीवरून आमचें असें मत झालें कीं, खंडचिठ्या व खरेदीविक्रीचे दस्तऐवज यांचा जर योग्य रीतीनें उपयोग केला तर तरमबंदीचे दर ठरविण्याला त्यांचा फार आधार मिळतो. एवढेंच नव्हे तर एकंदर पुराव्यांत हाच विधायक पुरावा सेटलमेंट कामगारांना मिळण्यासारखा असतो आणि आम्ही आमचीं बरीचशीं अनुमानें याच आधारावर रचलीं आहेत. रयतांच्या प्रतिनिधींनीं आम्हाला कळविलें कीं शेतजमिनीचा निवळ नफा किती येतो हे ठरविण्याकरितां शेतीच्या एकंदर उत्पन्नाची बाजारभावानें किंमत करावी आणि त्या किंमतींतून शेतीचा एकंदर खर्च वजा करावा म्हणजे बाकी राहील तो निवळ नफा. वजा करावयाच्या खर्चाच्या यादींत मजुरांचा पगार, कुटुंबांतील माणसांच्या मेहनतान्याचा मोबदला, गुरांचा खर्च, डेडस्टॉक सामानाचा खर्च, खताचा खर्च इत्यादि बाबी येतात. निवळ नफा काढण्याची ही पद्धति कांहीं नवी नाहीं. परंतु टॅक्सेशन कमिटीचें असें मत आहे कीं, शेतकामाचा खर्च नक्की ठरविणें कठिण आहे आणि त्यांतल्या कित्येक बाबी निश्चित करण्याला वर्षानुवर्षें हिशेब करावे लागतील.

**आंतबट्ट्याची शेती**

बार्डोलीच्या रयतांच्या वतीनें जमाखर्चाचे जे हिशेब आमच्यापुढें आले ते खरे मानल्यास १५ एकरांच्या एकेका शेतावर सुमारें २०० रुपये बूड येते असें म्हणावें लागेल. या हिशेबानें पाहतां नमुन्याकरितां 'पार्डीक रोड'सारखें एखादें छोटें गांव घेतल्यास त्या गांवाचे रयतांना दरसाल ८ हजार रुपये आणि वालोदसारख्या मोठ्या गांवाला ४५ हजार रुपये बूड येतें असें मानावें लागेल!! हें खरोखर कोडेंच नव्हे काय? दरएकरीं वर्षाचे बारा-तेरा रुपये नुकसान करून घेऊन सगळे रयत शेती करीत असतात हें खरें तरी कसें मानावें? असा तोटा

सोसून हे लोक शेती तरी कां करतात असा प्रश्न आम्ही विचारला. त्यास उत्तरें देतांना असें सांगण्यांत आलें कीं, (१) कुटुंबांतल्या माणसांच्या मेहनतीबद्दल आम्ही कांहींच मोबदला धरीत नाहीं, (२) खताचा जो खर्च आकारला आहे त्यांतलें जेवढें खत घरच्या गुरांच्या शेणामुतापासून मिळतें त्याचा हिशेब आम्ही धरीत नाहीं आणि (३) आम्ही म्हशी गाई वगैरे जीं दुभतीं जनावरें बाळगतों त्यांच्या दुधातुपाचें उत्पन्न शेतीच्याच उत्पन्नांत धरून तोंडमिळवणी करण्यांत येते. एकंदरींत या हिशेबाच्या बाबतींत आम्हास असें आढळून आलें कीं, खर्चाची प्रत्येक बाब फुगवून सांगावी व जमेची प्रत्येक बाब संकुचित करावी असा खटाटोप चालू होता. त्यावरून आम्ही निष्कर्ष असा काढला कीं, शेतकी हा कांहीं मोठें घबाड मिळविण्यासारखा धंदा नसला तरी गुजराथसारख्या सुपीक प्रांतांत तरी खाऊन-पिऊन सुखी राहण्याइतकें उत्पन्न शेतीपासून मिळूं शकतें.

आतां नवीन तरमबंदीसंबंधीं आमचा अभिप्राय असा आहे कीं, तीस वर्षांपूर्वीची जी आकारणी होती तींत शेंकडा ६ टक्के म्हणजे एकंदर तालुक्यांत ३०८०६ रुपयांची वाढ करावी म्हणजे बार्डोली तालुक्याची आकारणी ५४१२७१ रुपये करावी. रिव्हिजन सेटलमेंटपेक्षां हा आंकडा ८९३७९ रुपयांनीं आम्ही उतरविला आहे. चौराशी तालुक्याची आकारणी ३५८००० रुपये ठरविण्यांत येत आहे. रिव्हिजन सेटलमेंटहून ही आकारणी ४९४६५ रुपये कमी आहे, पण जुन्या तीस वर्षांपूर्वीच्या आकारणीहून ही रक्कम शेंकडा ५·२४ नें म्हणजे नक्की १७८४२ रुपयांनीं अधिक आहे.

# एक बार्डोली मिटली पण इतरांची वाट काय ?

सुरत जिल्ह्यांतील बार्डोली व चौराशी तालुक्यांतून रिव्हिजन सेटलमेंट जाहीर झाल्यापासून तेथें असंतोषाच्या तीव्र ज्वाळा पसरूं लागल्या होत्या आणि त्यांचें पर्यवसान सत्याग्रहांत होऊन अखेरीस मुंबई-सरकारला फेरचौकशी करण्याकरितां कमिटी नेमावी लागली. त्या कमिटीचा रिपोर्ट नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्याचें नुसतें वरवर अवलोकन केलें तरी देखील बार्डोली व चौराशी तालुक्यांतील रयतांनीं जी एवढी प्रचंड चळवळ केली ती किती सकारण होती याविषयीं खात्री पटते. या रिव्हिजन सेटलमेंटच्या बाबतींत अथपासून इतिपर्यंत घोडचुकांची पुनरावृत्ति होत आली आणि सरकारला पावलागणिक माघार घ्यावी लागली. सेटलमेंट ऑफिसर मि. जयकर यांनीं शेंकडा २५ टक्के सारावाढ करावी असें सुचविलें. सरकारला भावी चळवळीचें आगाऊच स्वप्न पडल्यामुळें सरकारनें भीतभीत २२ टक्केच वाढ मुक्रर करून ती जाहीर केली आणि फेरचौकशीची विनंति अमान्य केली. पण त्यानंतर जसजसें सत्याग्रहाचे चटके बसूं लागले तसतसें सरकार एकेक बाबतींत माघार घेऊं लागलें. सत्याग्रहाच्या चळवळीस न जुमानतां वाढता सारा सरसकट चोपून वसूल करावयाचा असा सरकारचा पहिला बेत; पण बार्डोलीच्या रयतांच्या अभेद्य जुटीमुळें तो फिसकटला. त्यानंतर पठाणांच्या टोळ्या बार्डोलीवर सोडून, म्हशीरेडे जप्त करून आणि जमिनींचा लिलाव पुकारून रयतांना घाबरवून सोडण्याचा उपद्व्याप करण्यांत आला. त्यांत यश तर आलें नाहींच. पण उलट सरकारच्या पाषाणहृदयीपणाचा बोभाटा मात्र सर्वत्र झाल्यानें सरकारला थोडेसें नमतें घेऊन तडजोड घडवून आणण्याची जरूरी वाटूं लागली.

तरी पण चौकशीच्या पूर्वी नवीन वाढीसुद्धां सगळा सारा रयतांनीं भरावा, रेव्हेन्यू खात्यांतीलच अधिकाऱ्यामार्फत चौकशी केली जाईल, तडजोडीच्या पूर्वीच ज्यांची जमीन लिलावांत विकली गेली ती जमीन परत मिळणार नाहीं आणि ज्या तलाठ्यांना व पाटलांना कामावरून दूर केलें त्यांना परत कामावर घेतलें जाणार नाहीं असल्या मुलतानशाही थाटाच्या अटी सरकारनें पुढें मांडल्या. परंतु सरदार वल्लभभाई, त्यांच्या शिस्तींत वागणारे स्वयंसेवक आणि कमालीचा स्वार्थत्याग करण्यास तयार झालेली रयत तिच्या अभेद्य तटास कोठेंच खिंडार पडण्याचें जेव्हां लक्षण दिसेना तेव्हां यांतली एकेक अट गळण्यास प्रारंभ झाला. वाढाव्यासुद्धां सगळा सारा भरावयाचा खरा, पण तो डिपॉझिट म्हणून भरावा आणि ती रक्कम रयतांच्या नांवानें कोणीहि भरली तरी चालेल, रेव्हेन्यू खात्यांतील चौकशी कामगाराच्या जोडीला न्यायखात्यांतील ऑफिसर नेमूं व त्या उभयतांचा मतभेद झाल्यास न्यायखात्यांतील अधिकाऱ्यांचेंच मत मानलें जाईल, राजीनामा दिलेले तलाठी व पाटील कामावर घेऊं आणि आगाऊ लिलाव झालेली जमीन लिलावबोलणारानें तुम्हास परत दिली तर ती तुम्ही त्याचे

कडून घ्या, त्यांत आमचा कांहीं संबंध नाहीं, असें जेव्हां सांगण्यांत आलें आणि मेणाहून मऊ झालेल्या या अटी देखील जाचक होऊं नयेत म्हणून जेव्हां लिलाव घेणाऱ्यानें आपली लिलावाची रक्कम घेऊन सदर जमिनी सोडून द्याव्या याविषयी सरकारी ऑफिसरच आपले वजन खर्च करूं लागले त्या वेळीं सरदार वल्लभभाई यांनीं त्या अटी कबूल करून चौकशी कमिटीला मान्यता दिली आणि मि. ब्रूमफील्ड व मि. मॅक्सवेल यांची कमिटी नेमून फेरचौकशीस प्रारंभ झाला.

या दोघां कामगारांनीं जो सविस्तर रिपोर्ट सादर केला आहे त्यावरून बार्डोलीच्या रयतांच्या तक्रारी बव्हंशीं खऱ्या होत्या आणि रिव्हिजन सेटलमेंटमध्यें झालेली सारावाढ चुकीची व अन्यायाची होती हें सिद्ध झालें आहे. सत्याग्रहाच्या पूर्वीच्या सेटलमेंटमध्यें बार्डोली तालुक्याचा सारा १२०१८५ रुपयांनीं वाढविण्यांत आला होता. त्यांतली अवघी ६ टक्के म्हणजे ३०८०६ रुपये वाढ कायम ठेवून बाकीची ८९३७९ रुपयांची वाढ रद्द करण्यांत आली आहे. चौराशी तालुक्याचा सारा ६७३०७ रुपये वाढविण्यांत आला होता. त्यांतली अवघी १७८४२ रुपयांची वाढ कायम ठेवून बाकीची ४९४६५ रुपयांची वाढ रद्द करण्यांत आली आहे. एवंच या चौकशी कमिटीमुळें दोनहि तालुके मिळून १३८८४४ रुपयांची वार्षिक सूट मिळाल्याप्रमाणें झाली. पूर्वीचा आकार कायम राहिला असता तर पुढील तीस वर्षांत एकंदर ४० लक्ष रुपयांचा भरणा हल्लींच्यापेक्षां अधिक करावा लागला असता तो वांचला. अर्थातच बार्डोलीच्या सत्याग्रहानें बार्डोली व चौराशी या दोन तालुक्यांतील रयतांचे ४० लक्ष रुपये वांचविले हा प्रत्यक्ष नगदी फायदा झाला.

परंतु सत्याग्रहाची किंमत रुपयांच्या मापानें मोजतां येण्याजोगी नाहीं व ती तशी मोजणें म्हणजे आपलें अज्ञान प्रकट करण्यासारखें आहे. झारशाहीलाहि खालीं पाहावयास लावणारी येथील नोकरशाही जर कशानें नमणार असेल तर ती संघटित सत्याग्रहानेंच नमेल हें तत्त्व या बार्डोलीच्या विजयानें अखिल हिंदी प्रजेस जाहीर केलें आहे. वज्राहून कठोर असें नोकरशाहीचें हृदय जहालांच्या टीकेच्या भडिमारानें भंग पावत नाहीं, मवाळांच्या अर्जविनंत्यांनीं तें द्रवत नाहीं, आंकडेपंडितांनीं आपलें कितीहि पांडित्य प्रगट करून सरकारच्या चुकीचें पाप त्याच्या पदरांत घातलें तरी तें तिकडे ढुंकून देखील पाहात नाहीं, पण सत्याग्रहाची प्रखर आंच चोहोंकडून लागली तर मात्र तें मेणाहून मऊ होतें. हा अनुभव यापूर्वी इतर कित्येक प्रसंगीं थोड्याफार प्रमाणांत आलाच आहे. तथापि बार्डोलीच्या चळवळीनें सत्याग्रहाच्या बलाची कसोटी पुरतेपणीं पाहण्यांत आली आणि भावी चळवळीचें तत्त्व म्हणून तें बिनदिक्कत स्वीकारण्याइतकें महत्त्व त्या सत्याग्रहाला प्राप्त झालें.

चळवळीच्या मार्गाच्या दृष्टीनें बार्डोलीच्या लढ्यापासून जो हा निष्कर्ष निघाला तो स्वराज्याच्या भावी लढ्यांत उपयोगी पडेलच. पण इतकी व्यापक दृष्टि सोडून केवळ रिव्हिजन सेटलमेंटच्या पद्धतींतील दोषाचें व अन्यायाचें आविष्करण करण्याच्या मर्यादित क्षेत्रापुरतें पाहिलें तरी या सत्याग्रहानें मोठीच कामगिरी केली आहे. मेसर्स ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांनी आपला हा रिपोर्ट जरी बार्डोली व चौराशी या दोन तालुक्यांपुरताच लिहिला असला तरी त्यांत त्यांनीं सेटलमेंट ऑफिसराच्या कामाच्या पद्धतीचें आणि सारावाढीच्या तत्त्वांचें जें आविष्करण व विवेचन केलें आहे तें सरकारच्या आजपर्यंतच्या सर्वच रिव्हिजन सेटलमेंटला लागू होण्याजोगें असल्यानें आजपर्यंत या सेटलमेंट खात्यानें केवढा घोर अन्याय व झारशाही जुलम चालविला होता याची स्पष्ट कल्पना प्रत्येक वाचकास येते. चौकशी कमिटीनें सेटलमेंट कामगार व कमिशनर यांच्या लीलांचें जें वर्णन या रिपोर्टांत केलें आहे ते वर्णन व्यक्तिशः मि. जयकर व मि. अंडरसन यांनाच व केवळ बार्डोली तालुक्यापुरतेंच लागू होण्याजोगें आहे असें मानण्याचें कारण नाहीं. शितावरून भाताची परीक्षा होते त्याप्रमाणें बार्डोलीच्या या एका प्रकरणावरून सगळ्या सेटलमेंट पद्धतीचेंच अंतरंग उघडकीस आलें आहे.

रिव्हिजन सेटलमेटचा आंधळा कारभार या रिपोर्टानें जगासमोर मांडला आहे. त्यांत मि. जयकर यांच्या हातून घडलेल्या ज्या डझनवारी चुका चवाठ्यावर आल्या आहेत त्या अपवादात्मक आहेत असें मानण्याचें कारण नाही. बार्डोलीच्या हवेंतच कांहीं असा वेगळा गुण नाही कीं, तेथील सेटलमेंट करतांना सेटलमेंट ऑफिसराचें डोकें ठिकाणावर नसावें. ज्या चुका बार्डोलीच्या तरमबंदीच्या कामांत जयकरांच्या हातून घडल्या तसल्याच चुका दुसऱ्या कामगारांकडून दुसऱ्या तालुक्यांतून घडत आल्या आहेत, हें आम्ही केवळ अनुमानावरून म्हणतों असें नसून त्याला याच रिपोर्टांत भक्कम पुरावा आहे. तो पुरावा असा कीं, मि. जयकर यांनीं जीं कित्येक चुकीचीं विधानें केलीं आहेत त्यांतलीं बरीचशीं विधाने त्यांनीं पूर्वीच्या सेटलमेंट रिपोर्टांतून जशाचीं तशीं उतरून घेतलीं आहेत. याचा अर्थ असाच होतो कीं, रिव्हिजन

सेटलमेंटच्या कामावर नेमणूक होतांच आपण काय काय करावयाचें याचें चित्र त्या ऑफिसराच्या डोळ्यासमोर तयारच असतें. साऱ्याची वाढ करावयाची हें ध्येय आगाऊच ठरलेलें आणि त्याच्या समर्थनार्थ जी कारणपरंपरा जोडून द्यावयाची तीहि ठरलेलीच ! धार्मिक विधींत ज्याप्रमाणें मंत्र–तंत्र सगळें कांहीं ठरलेलें असतें, फक्त 'मम ' म्हणणारा तेवढा बदलत असतो त्याचप्रमाणें सेटलमेंटच्या रिपोर्टांतील मंत्र व तंत्र सगळें ठरून गेलें असून फक्त तालुक्याचें नांव आणि खेड्यांची यादी तेवढी त्या सांच्यांत बसेलशी केली कीं झाला सेटलमेंट रिपोर्ट तयार ! रयतांनीं तक्रार केली तर त्यांस उत्तर काय द्यावयाचें तेंहि सरकारच्या दप्तरीं छापून तयार असावयाचें. असला हा आंधळा कारभार साठ वर्षे चालला आहे, पण आजवर कोठे दाद लागेल तर शपथ !

परंतु अखेरीस सेटलमेंट खात्याच्या पापाचे शंभर घडे भरले आणि त्याच्या डोळ्यांत चरचरीत अंजन घालणारा प्रतिस्पर्धी त्यास भेटला. सरदार वल्लभभाईच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रहाची मोहीम चालू होतांच सरकारच्या डोळ्यावरची धुंदी पार उतरली आणि सरकारनें डोळे उघडून पाहण्यास प्रथमच सुरुवात केली. अशी सुरवात करतांच मेसर्स ब्रूमफील्ड व मॅक्सवेल या दोघां सरकारी डोळ्यांना काय दिसलें ? मि. अंडरसन व मि. जयकर यांचे रिपोर्ट हातांत घेऊन हे दोन सरकारी डोळे जेव्हां बार्डोलीकडे पाहूं लागले तेव्हां बार्डोलींतील वस्तुस्थितीचा व त्या रिपोर्टाचा ताळ ना मेळ ! बार्डोली व चौराशी या तालुक्यांतलि अर्धी जमीन खंडानें दिली जाते असें अंडरसन लिहितात. उलट ब्रूमफील्ड व मॅक्सवेल म्हणतात कीं या तालुक्यांतल्या बहुतेक खेड्यांतून खंडानें लागवड करण्याचा व्यवहार क्वचितच होतो. आणि ज्या खंडचिठ्या म्हणून टेनन्सी रजिस्टरांत नोंदविलेल्या आहेत त्या बिनामी खंडचिठ्या असून खरे व्यवहार निराळेच आहेत. एका खंडकऱ्यानें एक भिकार जमीन ५० रु. खंडानें घेतल्याची खंडचिठी अंडरसन यांस आढळली. तेवढ्यावरून साहेबांनीं सिद्धान्त ठोकून दिला कीं या तालुक्यांत जमीनदारांना सरकारी साऱ्याच्या १४ पट खंड कुळाकडून मिळतो! पण जेव्हां ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांनीं या खंडचिठीचा छडा लावला तेव्हां त्यांस आढळून आलें कीं त्या जमिनींत एक विहीर आहे व त्या विहिरीचें पाणी आपल्या कारखान्यांतल्या कामकऱ्यांना मिळावें म्हणून एका पार्शी गृहस्थानें ती खंडचिठी लिहून दिली आहे.

बार्डोली व चौराशी या तालुक्यांतून रस्त्यांची दुरुस्ती झाली आहे, येथून तांदूळ व गवत यांची निर्गत फार होते व त्यामुळें शेतकरी गब्बर झाले आहेत, शेतकऱ्यांच्याजवळ शेतीचीं व दुभतीं जनावरें वाढलीं आहेत, तालुक्यांतली लोकसंख्या वाढत आहे इत्यादि जीं कारणें सारावाढीला अनुकूल म्हणून मि. जयकर यांनीं नमूद केलीं होतीं तीं सगळीं वस्तुस्थितीस सोडून असल्याचें कमिटीला आढळून आलें. रस्त्यांची दुरुस्ती न होतां उलट रस्ते अधिक खराब झाले आहेत, मोटारींचा सुळसुळाट झाल्यानें गवताला भाव येईनासा झाला आहे, लोकसंख्येची वाढ जननसंख्येच्या मानानें कमीच झालेली आहे, कापसाचा भाव १९१६ ते १९२४ पर्यंत तेजीचा होता खरा पण अलीकडे तो मंदीचा झाल्यानें रयतांचें उलट नुकसानच होत आहे. तांदुळाचा भाव वाढला आहे खरा, पण तांदुळाची निर्गत अगदींच अल्प प्रमाणांत होत असल्याने भाव वाढून न वाढून सारखाच. उलटपक्षीं धान्याचे भाव चढल्यामुळें मजुरी वाढली आणि शेतीचें प्रत्येक काम पूर्वीपेक्षां महाग पडूं लागलें. अशा रीतीनें मेसर्स जयकर व अंडरसन यांची नेहमींची ठराविक कारणपरंपरा येथें कशी गैरलागू आहे तें खुलासेवार उघडकीस आणून मेसर्स ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांनीं बहुतेक ठिकाणांची सारावाढ रद्द करून अगदीं थोडी म्हणजे ६ टक्के वाढ शिल्लक ठेवली आहे. खेड्यांची वर्गवारी ठरविण्यांत या सेटलमेंटबहादुरांनीं आंधळेपणानें कसा धुडगूस घातला आहे त्याचेहि असेंच चित्र या रिपोर्टांत रेखाटलें आहे.

सारांश, आजपर्यंतच्या आंधळ्या कारभाराला हरकत घेऊन बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर, असें हात धरून खडसावून बजावणारा जेव्हां भेटला तेव्हां सरकारचे डोळे उघडले. आणि या रिपोर्टावर सरकारनें अशी मखलाशी केली कीं, सारावाढीच्या सर्वसामान्य तत्त्वासंबंधानें कोणतेंहि मत प्रदर्शित न करतां आम्ही एवढेंच जाहीर करतों कीं ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांनीं शिफारस केल्याप्रमाणें अनुक्रमें ६ टक्के व ५·२४ टक्के वाढ बार्डोली व चौराशी या तालुक्यांत कायम ठेवून त्याहून अधिक केलेली वाढ आम्ही रद्द करतों. त्याचप्रमाणें खेड्यांची जुनी प्रतवारी राहित करून या रिपोर्टांतली प्रतवारी अमलांत आणण्याची तजवीज करतों.

पण यावर आमचा सरकारास असा सवाल आहे कीं, ज्या पद्धतीनें बार्डोली व चौराशी येथील रिव्हिजन सेटलमेंट झाली त्याच पद्धतीनें आजवर शेंकडो ठिकाणीं सेटलमेंट होऊन सारावाढ करण्यांत आली आहे व तेथल्या रयतांनीं अर्ज करून व अन्य

मार्गांनीं त्या सारावाढीला हरकतहि प्रकट केली आहे, किंबहुना बार्डोलीच्या पूर्वीच जुन्नर तालुक्यांत आंबेगांव पेटयांत व कुलाबा जिल्ह्यांत सत्याग्रह पुकारला गेला होता. परंतु त्या ठिकाणची परिस्थिति वेगळी असल्यानें सत्याग्रह इतका यशस्वी झाला नाहीं. पण तेवढ्यावरून तेथील सारावाढ न्याय्य व यथायोग्य ठरते काय? ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांनीं बार्डोलीच्या जामिनीचे व हवापाण्याचे जें वर्णन केले आहे तें वाचून पाहिल्यास महाराष्ट्रांतल्या कोणत्याहि तालुक्यास तें वर्णन लागू होणार नाहीं. असें असतां बार्डोलीची २२ टक्के सारावाढ देखील जर चुकीची ठरते आणि केवळ ६ टक्के वाढ कायम केली जाते तर सांगोल्यासारख्या किंवा आंबेगांवासारख्या भिकार व दुष्काळपीडित तालुक्यांतून किवा पेट्यांतून झालेली ५०-६० टक्के वाढ किती चुकीची व जुलमाची असली पाहिजे ! जेथें हिशेब विचारणारा ऑडिटर भेटला तेथे जशा इतक्या घोडचुका आढळल्या तशाच चुका इतर ठिकाणीं झाल्या नसतील असें मानणें स्वाभाविक आहे काय ! त्यांतून जो दोष व्यक्तीचा नसून पद्धतीचा आहे तो दोष जसा एके ठिकाणीं उमटला तसाच तो अन्य ठिकाणींहि उमटलाच असला पाहिजे.

अशा परिस्थितींत "जेवढी उघडकीस आली तेवढी चोरी आणि जेवढी पचली तेवढी सावकारी" असला आडमुठा न्यायच सरकार पाळणार काय? सत्याग्रहाच्या जोरावर जो आपली दाद लावून घेईल त्याचा तेवढा न्याय करूं असें म्हटल्यानें बळी तो कानपिळी,या तत्त्वाला उत्तेजन दिल्यासारखें होत नाही काय ?आणि जेथला सत्याग्रह अर्धवट स्थितीत बंद पडला आहे किंवा अद्यापि सुरू न झाल्यानें आंतल्या आंत धुमसत राहिला आहे तेथल्या सत्याग्रहास हे एक प्रकारचें आव्हानच नव्हे काय ! अशा रीतीनें प्रत्येक ठिकाणी सत्याग्रहाचा कडेलोट होईपर्यंत ताणून धरल्यानें सर्वत्र बजबजपुरी माजणार नाहीं काय? याकरितां सरकारनें या बाबतींतली धरसोड आतां पुरे करावी आणि लँड रेव्हेन्यु कोडाची लोकमतानुसार दुरुस्ती करून बार्डोलीपर्यंतच्या जुन्या अन्यायाची परंपरा जेणेंकरून बंद पडेल आणि नवीन अन्याय घडण्याला वावच राहणार नाहीं अशी सक्त तजवीज करावी. तसे न घडेल तर ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांच्या या रिपोर्टामुळें एका बार्डोलीचा लढा मिटविला असला तरी दुसऱ्या अनेक बार्डोल्या निर्माण करणारे असंतोषाचें बीं पेरलें गेले आहे हे सरकारने ध्यानांत ठेवावें.

# खेडेगांवविषयक व्याख्यानमाला

## पहिला आठवडा

पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणें येथील टिळक महाविद्यालयामार्फत ता. २२ एप्रिलपासून खेडेगांवविषयक व्याख्यानमाला सुरू झाली असून गेले तीन आठवडे ती रोज चालू आहे. खेडेगांवांत काम करूं इच्छिणाऱ्या लोकांना या व्याख्यानांत बरीच उपयुक्त माहिती असल्यामुळें वाचकांच्या सोयीसाठीं या मालेंतील व्याख्यानांचा त्रोटक सारांश आम्ही खालीं देत आहों.

### प्रो. भागवत यांचीं व्याख्यानें

ता. २२, २३ व २४ एप्रिल रोजीं पुणें शहर म्युनिसिपालिटीचे चीफ ऑफिसर **प्रो. शं. रा. भागवत** यांचीं "ग्रामसंघटनेचें ध्येय व कार्यक्रम" या विषयावर व्याख्यानें झालीं. ते म्हणाले--ग्रामसंघटनेच्या चळवळीचें ध्येय निश्चितपणें ठरविलें पाहिजे. कित्येक ठिकाणीं स्थापन झालेल्या ग्रामसेवासंघाच्या नियमावलींत 'राजकीय चळवळींत हा संघ भाग घेणार नाहीं' असा उल्लेख असतो. परंतु ग्रामसंघटनेच्या कार्यक्षेत्राचा असा कृत्रिम संकोच करण्यांत अर्थ नाहीं. खेडेगांवांत असणाऱ्या कुटुंबांतील सर्व मंडळी सुखी असावीत हें या चळवळीचें ध्येय असून तें सिद्धीस नेण्यासाठीं जरूर त्या सर्व गोष्टी आपणास केल्या पाहिजेत. या प्रश्नाचा बारकाईनें विचार केल्यास त्यांत उत्तम राजकारण, उत्तम धर्मकारण व उत्तम समाजकारण यांचा समावेश होतो असे दिसेल. संस्कृति, आरोग्य आणि संपत्ति हीं सुखोत्पत्तीचीं तीन साधनें असून तीं योग्य प्रमाणांत वास करीत असल्याशिवाय समाज सुखी होणार नाहीं. संस्कृतीमध्यें मानसिक गुणांचा अंतर्भाव होतो. व्यक्तीच्या सुखाकरितां समाजाच्या सुखाचीहोळी करण्यास तयार होणें हें अधम संस्कृतीचें द्योतक आहे. वैयक्तिक सुखाहून कौटुंबिक सुख श्रेष्ठ, जातीचें सुख त्याहून वरच्या पायरीचें आणि सर्व समाजाचें सुख हें सर्वांत वरच्या दर्जाचें समजणें हें उच्च संस्कृतीचें लक्षण आहे. व्यक्तीहून समाज श्रेष्ठ असल्यामुळें स्वतःच्या स्वार्थ विसरून सामाजिक कल्याणाकडे लक्ष देणें जरूर आहे. समाजाची संस्कृति कोणत्या दर्जाची

आहे हें लोकांत कर्जेदलाली किती आहे, कायद्याचें उल्लंघन कितपत होतें, समाजांतील गरीब लोकांची त्याचप्रमाणें स्त्रियांची स्थिति कशी आहे, सार्व जनिक उत्सव कसे व किती होतात वगैरे गोष्टी पाहिल्या असतां कळून येतें.

संस्कृतीनंतरची महत्त्वाची बाब आरोग्याची. रोगप्रतिबंध हें आरोग्याचें अंग रोग-चिकित्सेपेक्षां अधिक महत्त्वाचें असून त्यासाठीं लोकांचें 'जीवनसामर्थ्य (व्हायटॅलिटी)' वाढविलें पाहिजे. शुद्ध हवा व भरपूर पाणी मिळून लोकांना व्यायामाची सोय कशी प्राप्त होईल हें पाहिलें पाहिजे. मानसिक स्वस्थता असल्याशिवाय आरोग्यप्राप्ति पूर्णपणें होणार नाहीं. ज्याला आपण एकटे असहाय आहों असें वाटतें त्याच्यापेक्षां एखाद्या संघाचा ज्यास पाठिंबा आहे अशा व्यक्तीस आरोग्याचा लाभ खास अधिक होईल. संपत्ति ही व्यसनांत उडविण्यासाठीं नको असून समाजाच्या योग्य गरजा भागविण्यासाठीं हवी आहे. पैसा खर्च करतांना त्याचा आपल्या देशबांधवांच्या स्थिती-वर काय परिणाम होईल हें पाहिलें पाहिजे. माझ्या खिशांतले पैसे माझ्या शेजाऱ्याच्या खिशांत गेले तर समाजाचें कांहीं नुकसान नाहीं, परंतु तो पैसा देशाबाहेर गेल्यास समाजाचे त्यांत खास नुकसान आहे. मोटारीवर ५० रु. खर्च करण्यापेक्षां तेच टांग्यावर केल्यास समाजाच्या दृष्टीनें अधिक चांगलें. सिनेमा पाहाण्यापेक्षां तितकाच पैसा नाटक पाहाण्यांत खर्चे-ल्यास त्याचा पुष्कळ अंश देशांत राहील. याच दृष्टीनें कचरा वाहण्यासाठीं मोटारीपेक्षां बैल-गाड्यांची योजना करणें हितावह आहे. यास कोणी पहिल्या शतकांतल्या कल्पना म्हणून त्यांचा उपहास करतील, परंतु पहिल्या शतकांत राहून समाज-बांधवांना पोटभर अन्न मिळालें तर १ ल्या शतकांतहि आम्हास सुखानें राहण्यांत कमीपणा वाटणार नाहीं. खेड्यांत कोणता माल तयार होतो, त्यास किती खर्च लागतो, तो विकला कोठें जातो याचा तपास करून खर्च कमी कसा होईल व प्राप्ति अधिक कशी होईल इकडे लक्ष दिलें पाहिजे. आपणाजवळ असणारें सर्व मनुष्यबल, पशुबल व निसर्गबल याचा अधिकांत अधिक उपयोग करून घेतला पाहिजे. असलेलें मनुष्यबल किंवा पशुबल निकामी ( आणि अर्थातच उपाशी ) ठेवून यांत्रिक बलाच्या मागें लागणें हें श्रेयस्कर नाहीं.

ग्रामसंघटनेचीं हीं तीन अंगें झालीं. आतां हीं कोणी घडवून आणावयाचीं हें पाहूं. गांवा-ची सुधारणा करण्यास गांवांतीलच पुढारी तयार झाले पाहिजेत. सध्या ग्रामसंघटनेची चळवळ वरून खालीं चाललेली आहे, परंतु ती यशस्वी व्हावयाची असल्यास तिची खालून वर वाढ झाली पाहिजे. ग्रामपंचायतीवर तालुका लोकल बोर्ड व जिल्हा लोकल बोर्ड यांची अवास्तव हुकमत चालतां कामा नये. गांवाचें हित कशांत आहे हें तालुका किंवा जिल्हा-बोर्डापक्षां ग्रामपंचायतीतील लोकांस अधिक कळेल म्हणून त्यांना खरी सत्ता दिली पाहिजे. ठिकठिकाणीं ग्रामपंचायती अस्तित्वांत आल्या म्हणजे मग सर्वसामान्य गोष्टींचा विचार व निर्णय करण्यासाठीं तालुका व जिल्हाबोर्डें स्थापन करावयास पाहिजेत. आजच्या ग्रामपंचायती कायद्यामुळें अस्तित्वांत आल्या आहेत. लोकांकडून खरी मागणी येत नाहीं. ही स्थिति पालटून बीं खालून रुजून वर आलें पाहिजे. यासाठीं खेडेगांवांत सुशिक्षित लोकांनीं संघशक्तीने व निरलसपणें काम करून लोकांचा विश्वास संपादन केला पाहिजे व हळूहळू त्यांस या गोष्टी पटवून दिल्या पाहिजेत. ५-४ वर्षें तरी हें काम अव्याहत केले पाहिजे. नंतर प्रचारकांनीं कोण-कोणत्या बाबतींत सावधगिरी बाळगिली पाहिजे याबद्दल मार्मिक सूचना व्याख्यात्यांनीं केल्या. शेवटीं ग्रामसंघटना हा राष्ट्रसंघटनेचा पाया असून स्वराज्यस्थापनेनंतरहि सुराज्य अगर रामराज्य हवें असेल तर ग्रामसंघटनेकडेच कसें लक्ष दिलें पाहिजे याचें पुनः एकवार विवेचन करून व्याख्यात्यांनीं या विषयाचा समारोप केला.

### प्रो. सहस्रबुद्धे यांचीं व्याख्यानें

ता. २५ व २६ एप्रिल रोजी पुण्याच्या शेतकी कॉलेजाचे प्रो. सहस्रबुद्धे यांचीं ग्रामसुधारणेचे अनुभव व पुढील दिशा, या विषयावर व्याख्यानें झालीं. पुणे जिल्ह्यांतील पिंपळे-सौदागर या खेडेगां-वाची पाहणी शेतकी कॉलेजांतील ३।४ प्रोफेसरां-च्या साहाय्यानें आपण कशी केली याची सविस्तर हकीकत त्यांनीं प्रथम सांगितली. गांवांत सुमारें १००० एकर जमीन असून त्यांपैकीं ८०० एकर लागवडीला आणलेली होती. गांवांतील एकंदर वस्ती ५५६ व कुटुंबांची संख्या १११ होती. १३१ लोकांना दुसरा जोडधंदा असे. शेतीचे उत्पन्न ११ हजार रु. येईल. परंतु त्यांपैकीं ३००० रु. शहरांतून राहणाऱ्या मालकांना जात व ८००० रु. खेड्यांत राहात. इतर धंद्यामुळें गांवांत १३००० रु. येत व गोवऱ्या वगैरे विकून आणखी १००० रु. येत. मिळून गांवाचें उत्पन्न २२००० रु. धरण्यास हरकत नाहीं. वार्षिक अन्नखर्चाचा हिशेब करून पाहतां प्रत्येक पुरुषास ३७॥ रु., बाईला ३० रु. व मुलाला २२॥ रु. अन्नखर्च येई. कपड्याचा खर्च दरपुरुषास व बाईस प्रत्येकीं १२ रु. व मुलाला ६ रु. येई. माणशीं २ रु. इतर खर्च धरल्यास साधारणपणे प्रत्येक कुटुंबास (नवराबायको, २ मुलें व १ वृद्ध इसम) २०८॥

रु. वार्षिक खर्च येत असे. गांवाचा एकूण खर्च २२५०० रु. झाला. याशिवाय गांवास १३-१३॥ हजार रु. कर्ज होतें व त्यावर शें. २॥रु. व्याज द्यावें लागे. अर्थात् २२ हजार रु. एकूण उत्पन्न व २५००० रु. एकूण खर्च. याचा मेळ बसावयाचा तर वर सांगितलेल्या खर्चांत काटकसर करणें किंवा सावकाराचें व्याज थकाविणें हे दोन मार्ग गांवकऱ्यांपुढें मोकळे असत.

गांवांतील ८ कुटुंबांचें शेतीवर व्यवस्थित चाले, २८ ना शेतीशिवाय इतर धंदा पाहावा लागे व ६७ कुटुंबांचें शेती व मजुरी यांवरहि भागत नसे. इ. स. १७०० च्या सुमारास गांवांतील जमीन १९ मालकांकडे होती, १८०० च्या सुमारास हे मालक ३४ झाले व १९१५सालीं त्यांची संख्या १५६ झाली. खर्चाइतकें उत्पन्न होत नसल्यामुळे शेतकऱ्यांना आणखी जोड–धंदे काढून दिले पाहिजेत. हे जोडधंदे शेतकऱ्यांना आपल्या सवडीनें व फुरसतीनें करतां आले पाहिजेत व ते सर्व जातींना मोकळे असले पाहिजेत. कलाबतूचा धंदा, गवतापासून कागदाचा रांधा करणें, काथ्यांचे निरनिराळे पदार्थ बनविणें, लाख तयार करणें, लहान मुलांची लांकडी खेळणीं किंवा पत्र्यांचीं चित्रें डबे वगैरे करणें, गुरें पाळणें, मेंढरें पाळणें, कांबळीं विणणें इत्यादि धंदे स्थानिक परिस्थितीच्या मानानें ठिकठिकाणीं करण्यासारखे आहेत. जोड–धंद्यांमुळें दिवसाकाठीं १-२ आणे मिळाले तरी आळसांत वेळ घालवून कांहींच न मिळविण्यापेक्षां ते फार चांगले. व शिवाय खेडेगांवांतील लोकांची राहणी लक्षांत घेतल्यास त्यांना त्याहि रकमेचा उपयोग आहे असें दिसून येईल. पिंपळे गांवांतील लोकांची स्थिति सुधारण्यासाठीं आम्ही बरेच प्रयत्न केले. भाड्याच्या नांगरासाठी येणारा खर्च वांचावा म्हणून त्यांस लोखंडी नांगर घेऊन दिले. चांगलें बियाणें पुरविणें, पिकांना लागणारी कीड नाहींशी करण्याचे मार्ग सांगणें, दिवसाच्या व रात्रीच्या शाळा काढणे, औषधोपचाराची व्यवस्था करणें, पतपेढीसाठीं भांडवल गोळा करून देणें इत्यादि मार्गांचा आम्ही अवलंब केला.

**गाळापासून कौलें**

१९१८ च्या दुष्काळांत तेथील तळ्याच्या गाळापासून कौलें व विटा तयार करविल्या व लोकांना तेथेंच उत्पन्नाचें साधन मिळवून दिलें. अशा रीतीनें एकदां गाडा सुरळीत लावून दिल्यानंतर तुमचें तुम्ही पाहा असे गांवकऱ्यांस सांगून कामाची जबाबदारी त्यांचेवर टाकली. परंतु आमची पाठ फिरण्याचा अवकाश कीं बसलेली घडी विघडू लागली. पतपेढीचे हप्ते थकूं लागले व शेवटीं तिचें दिवाळें निघालें. शाळेंतील मुलें कमी झालीं, गांवचे नांगर ज्यांनीं न्यावे त्यांनीं परतच करूं नयेत,अशी स्थिति होऊन झालेली संघटना सर्व मोडली. अर्थात् खेडेगांवांत सतत ४।५ वर्षें कायम राहणारी माणसें पाहिजेत. हीं माणसें उत्तम दर्जाचीं म्हणजे प्रोफेसराच्या लायकीचीं पाहिजेत. त्यांची शिस्त करडी पाहिजे. ते एखाद्या खासगी संस्थेचे आजन्म सेवक असावेत म्हणजे पगारासाठीं त्यांना सरकाराकडे पाहावे लागणार नाहीं व त्यांचें स्वातंत्र्य कायम राहील. या लोकांना आपलीं कामें करतांना येणारा खर्च ( उ. शाळा ) मात्र सरकारनें दिला पाहिजे. हें काम एकट्या–दुकट्याचें नसून एखाद्या बिनसरकारी संस्थेनें हातांत घेतलें व लायक लोक योग्य पगारावर ( दरमहा १००रु. तरी ) नेमून त्यांचेकडून करून घेतलें तरच होण्यासारखें आहे. अशा आशयाचें प्रो. सहस्रबुद्धे यांचें व्याख्यान झालें.

**श्री. तात्यासाहेब केळकर** हेहि ता. २६ रोजीं ‘ खेडेगांवांतील प्रचार ’ या विषयावर बोलले. वर्तमानपत्रकार, खेडेगांवांतून व्याख्यानें देत हिंडणारे प्रचारक, शेतकी खात्यांतील तज्ज्ञ यांचा खेडेगावाशीं कसा संबंध येतो याचें विवरण करून आतां त्याच्यापुढची पायरी गांठण्याची वेळ आली आहे असें त्यांनीं सांगितलें. वर्तमानपत्रकारांचा खेडेगांवांशीं संबंध पुष्कळ येतो. पण खेडेगांवांतील लोकांना समजेल इतकी सोपी भाषा फार थोड्यांना साधते. त्यांना समजेल अशा भाषेंत वर्तमानपत्रांतील लेख लिहिले पाहिजेत अशी माझी ३० वर्षांच्या अनुभवावरून पक्की खात्री झाली आहे. सदाशिवराव बापट, परचुरेशास्त्री वगैरे मंडळी खेड्यांत दोन दिवस राहून व्याख्यानें देतात, लोकांशीं चर्चा करतात याचा अधिक उपयोग होतो. आम्ही लोक खेड्यांत गेलों तरी फार वेळ तेथें थांबूं शकत नाहीं व बऱ्या राजकारणाच्या विषयावरच आम्हास नेहमीं बोलावें लागतें. खेडेगांवांतील लोकांना व्याख्यानें द्यावयाचीं तर मुख्यतः त्यांच्याशीं संबंध येणाऱ्या विषयावर दिलीं पाहिजेत. ‘नेहरू रिपोर्ट’ हा विषय खेड्यांतील लोकांना जड वाटतो म्हणूनच त्याचें ‘नारू रंगरूटांत’ रूपांतर झालें असा बापटांचा अनुभव आहे. खेडेगांवांसाठीं काम करणारा तिसरा वर्ग पाहिजे. तिसरा वर्ग म्हणजे प्रो. सहस्रबुद्धे यांसारख्या कळकळीच्या लोकांचा. सरकारी नोकरींतील ही मंडळी कसें देशहित करूं शकतात याचा हा उत्तम दाखला आहे. याच्या पुढचा वर्ग म्हणजे खेड्यांत कायम राहून त्यांची

सुधारणा करण्यासाठीं झटणाऱ्या प्रचारकांचा. असा प्रचारक करारी व स्वावलंबी असेल तरच तो निस्पृह राहूं शकेल. स्वतः काम करून त्यावर उदर-निर्वाह करणाऱ्या प्रचारकाच्या उपदेशास जितका मान मिळेल तितका केवळ पगारावर काम करणाऱ्या प्रचारकांस मिळणार नाहीं. आपण नेहमीं सत्याग्रहाची व करबंदीच्या चळवळीची भाषा बोलतों; या सर्व चळवळी खेडेगांवांतील लोकांच्या जिवावरच आहेत हे ओळखून खेड्यांची सर्व तऱ्हेनें सेवा करण्यास आपण पुढें झालें पाहिजे. खेडेगांवांतील लोकांना निरनिराळ्या कारणामुळें शहरांत यावें लागत आहे व त्यामुळें खेडेगांवें विस्कळित झाली आहेत व आतां शहरांतील लोकांनी खेडी जाऊन तेथें काम करण्याचा काळ आला आहे असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

### प्रि. कानिटकर यांचीं व्याख्यानें

ता. २७ व २८ रोजीं येथील फर्ग्युसन कॉलेजाचे प्रिन्सिपाल श्री. केशवराव कानिटकर यांचीं "प्राथमिक शिक्षण व तदनुषंगिक कामें" या विषयावर व्याख्यानें झालीं. ते म्हणाले–खेडेगांवाच्या लोकांना कांहीं समजत नसून त्यांना आपण कांहीं शिकविणार आहों अशा तोऱ्यानें जाणाऱ्या लोकांचें बस्तान खेडेगांवांत बसणार नाहीं. तेथील परिस्थितीचा प्रथम अभ्यास करून शक्य तर त्यांच्या अडचणी दूर करूं अशा समजुतीनें जाणाऱ्या लोकांच्या हातून तेथें काम होऊं शकेल. खेडेगांवांतील परिस्थिति गुंतागुंतीची असते म्हणून तेथें काम करणें हे बिकट आहे. शाळेच्या शिक्षकांना खेडेगांवाची सुधारणा पुष्कळ रीतीनें करणें शक्य आहे. खेडेगांवांत स्त्री-पुरुषांची समता शहरापेक्षांहि अधिक असते व आयांना शिक्षणाचें महत्त्व पटविल्यास शाळेंत मुलें खात्रीनें अधिक येतील. शाळा हें गांवांतील लोकांचें केंद्र झालें पाहिजे. शिक्षकास औषधपाण्यासाठीं लागणाऱ्या वनस्पतींची माहिती पाहिजे. कोर्टाच्या कामकाजाची माहिती पाहिजे. पाटबंधारे कसे घालावेत याचेंहि ज्ञान पाहिजे. शिक्षक हा गांवाचा पुढारी झाला पाहिजे. परंतु गांवकऱ्यांना न दुखवितां त्याला काम करतां आलें पाहिजे. शाळेंत भोंवतालच्या व्यवहाराचें प्रतिबिंब दिसलें पाहिजे. शाळेला जोडून लहानशी बाग करावी; नांगरणे वगैरे कामें मुलांकडूनच करवून घ्यावींत. अशा बागा पाहण्यास मुलांचे आई-बाप मोठ्या हौसेनें शाळेत येतील. विटा पाडणें, छोटीं घरें बांधणें वगैरे कामे मुलांकडून करवून घ्यावींत. त्यांत मुलांना उत्साह वाटून आपणास हवें असलेलें ज्ञानहि देतां येईल. खेडेगांवाची सुधारणा करण्यासाठीं "सर्व्हंटस ऑफ रूरल इंडिया सोसायटी"-सारखी संस्था असावी. हिचे सभासद पदवीधराइतके सुबुद्ध असावेत. त्यांनीं गांवांतील तटांत पडूं नये. उलट्यासुलट्या राजकारणांत पडण्याचा मोह त्यांनीं आवरला पाहिजे. डिस्ट्रिक्ट लोकल बोर्डे वगैरे संस्थांची या कार्यास मान्यता मिळविली पाहिजे. लोकल बोर्डांना 'सुपरव्हायझर्स' नेमावयाचे असतात. त्या जागांवर त्यांनीं वर सुचविल्याप्रमाणें काम करणाऱ्या सोसायट्यांच्या सभासदांची नेमणूक केल्यास ग्रामसुधारणेचें काम फार सोपें होईल. अशा कार्यकर्त्यांना ५ मैलांच्या त्रिज्येंत असणाऱ्या २५ खेडेगांवांवर नेमण्यास हरकत नाहीं. या योजनेचा खर्च डिस्ट्रिक्ट बोर्डाकडून म्हणजे पर्यायानें सरकाराकडून मिळाला पाहिजे. प्रि. कानिटकरांच्या भाषणानंतर त्यांच्या व्याख्यानावर १-१ तास चर्चा होऊन तिच्यांत श्री. रं. वि. रबडे, श्री. तारकुंडे वकील, प्रो. शं. रा. भागवत, श्री. काशीबाई देवधर, श्री. कुंजविहारी, श्री. कुलकर्णी, श्री. देशपांडे इत्यादि मंडळींनीं भाग घेतला. वेळ जास्त झाल्यामुळे चर्चा थांबवावी लागली तरी अशीच चर्चा पुनः एकदां करावी व जमल्यास आठवड्यांतून एखादा दिवस चर्चेसाठीं मुद्दाम यावा अशी सर्वांची इच्छा दिसून आली.

## दुसरा आठवडा

### श्री. एन. व्ही. कानिटकर यांचीं व्याख्यानें

ता. २९ व ३० एप्रिल रोजीं मांजरी फार्म शेतकी खात्यांतील सॉईल फिजिसिस्ट श्री. एन्. व्ही. कानिटकर यांचीं 'कोरडवाहू शेती' या विषयावर सप्रयोग व माहितीपूर्ण अशीं व्याख्यानें झालीं. त्यांनीं सांगितले, "कोरडवाहू शेती म्हणजे अगदीं थोड्या पाण्यावर जी शेती होते ती. यालाच दुर्जल शेती असें नांव आहे. ज्या ठिकाणीं वर्षाला १५ इंचांपासून ३०-३५ इंचांपर्यंत पाऊस पडतो त्या ठिकाणीं वरील प्रकारची शेती कशी फायदेशीर करावी याबाबत सुधारलेल्या राष्ट्रांनी बरेच शोध केले आहेत. आपणाकडेहि सदर प्रयोग चालू आहेत व ते यशस्वी ठरत आहेत. पाश्चिमात्य देशांत केलेले प्रयोग व त्यावरून निघालेले निर्णय आपलेकडे लागू पडणार नाहींत. तिकडील जमीन चांगली, पाऊस अधिक सारखा व वेळेवर पडणारा, उष्णतामान कमी व साधनसामुग्री अधिक चांगली, अशा कारणांमुळें आपल्या इकडील व तिकडील शेतींत बराच फरक पडतो. तेव्हां इकडे प्रयोगानें मिळालेली माहिती अधिक विश्वसनीय

समजली पाहिजे. महाराष्ट्रांतील जे ४।५ जिल्हे पूर्वेकडे आहेत त्यांतील पूर्वेकडील भागांत ही शेतीची पद्धति उपयोगी पडणारी आहे. या भागांतील शेंकडा ३३ भाग सोडून देऊन बाकीच्या भागांत या पद्धतीचा उपयोग केल्यानें दुष्काळाची भीति उरणार नाहीं.या कोरडवाहू शेतीचें मुख्य तत्त्व म्हणजे पावसाचें पाणी जे पडते तें वाहून जाऊं न देतां निरनिराळया उपायांनीं जमिनींतच मुरेल अशी व्यवस्था करणें.

जमिनीखालीं निदान १॥ फुटाचा तरी मातीचा थर असेल तर त्यावर कांहीं तरी उत्पन्न काढतां येईल. याला मार्ग म्हणजे जमिनीची चांगली मशागत करणे हा होय; शेताचे लहान तुकडे करणें, जमीन सारखी करणें,दरवर्षी नांगरणें, शेताला बांध घालणें, पाऊस पडला कीं लगेच पाळी टाकून जमिनीवरील थर सारखा हलवून ठेवणें, अशा प्रकारानें जमिनीची पूर्वतयारी करावयाची. नंतर बीं लावतांना ते लांब लांब पेरणें, पेरल्यावर सुद्धां जवळ झालें असें वाटल्यास मधील रोपटीं कांहीं उपटून टाकणें, पीक उभें असतांना सुद्धां पावसाचें पाणी जमिनींतून वाफ होऊन उडून जाऊं नये म्हणून व पिकांत निष्कारण वाढलेली हरळी वगैरे निघावी म्हणून वरचेवर कुळव फिरविणें अशा मार्गांनी कोरडवाहू शेतीची मशागत केली असतां उत्पन्न नक्की येतें व आज येत आहे त्यापेक्षां बऱ्याच पटीनें जास्तहि येऊं शकतें असें अनुभवानें सिद्ध झालें आहे." जमीनींत मातीमध्यें, पाण्यामध्यें, हवेमध्ये कसकशा क्रिया होत असतात यांचीहि माहिती व्याख्यात्यांनी स्पष्टपणे करून दिली व शेतकी खात्यानें गेल्या ५ वर्षांत प्रयोग करून जे अनुभव मिळाले त्याचे चार्टहि दाखविले व शेवटीं कोरडवाहू शेतीबद्दल कोणास अडचण आल्यास अगर मदत मागितल्यास शेतकीखात्याकडून ताबडतोब मिळूं शकेल असेंहि व्याख्यात्यांनीं सांगितलें.

### तारकुंडे वकील यांचीं भाषणें

ता. १ व २ मे रोजीं, येथील तारकुंडे वकील यांचीं 'सहकारी पतपेढ्या' यावर व्याख्यानें झालीं. त्यांनी आपल्या व्याख्यानांत सांगितलें कीं, "सहकारी पतपेढ्या, यांतील सहकारी हा शब्द सामान्य अर्थी न घेतां, आर्थिक अडचणीसाठीं करावयाचें सहकार्य असा घेतला पाहिजे. सहकारी चळवळीचें तत्त्व परदेशांतून आपलेकडे आलें आहे. या चळवळीचा उगम प्रथमतः जर्मनीमध्यें झाला.त्याची उपयुक्तता पटल्यामुळें इंग्लंडने या तत्त्वाचा अवलंब करून प्रथमतः फ्रेंडली सोसायटीज म्हणून संस्था काढल्या, व पुढें राकडेल यानें या कार्याचा अधिक प्रसार केला. इतर पाश्चात्य राष्ट्रांनींहि या पद्धतीचा पुरस्कार केल्यामुळें हिंदुस्थानांतहि ही पद्धती सुरू करावी असें ब्रिटिश सरकारास वाटूं लागलें. हिंदुस्थानाच्या शेतकऱ्यांची स्थिति बिघडत चालली ती सुधारली तरच सरकारसारा व्यवस्थित येऊं शकेल हा एक विचार व पुढारलेल्या राष्ट्रांत आपणास छाती काढून चालतां यावें हा दुसरा विचार. या विचारांनीं प्रेरित होऊन हिंदुस्थानांत १९०१ सालीं ही सहकारी चळवळ सुरू करण्यांत आली. याचे अगोदर सरकारनें शेतकऱ्यांची स्थिति सुधारावी म्हणून ग्रँझरी लॉ, तगाई वगैरेसारखे प्रयत्न करून पाहिले, परंतु त्यांचा इष्ट तो उपयोग झाला नाहीं. म्हणून शेवटीं सहकारी पतपेढ्या काढून शेतकऱ्यांचा प्रश्न सुटतो का पाहावें यासाठीं हा प्रयत्न आरंभिला आहे.

परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं,गेल्या २५।३० वर्षांत या चळवळीपासून शेतकऱ्यांची स्थिति बिलकुल सुधारली नाहीं. मात्र याला कारण फक्त सरकार आहे असें म्हणतां येणार नाहीं. सरकारनें आपलेकडून बरेच प्रयत्न केले, परंतु लोकांनीं त्याचा बिलकुल विचार केला नाहीं. व्यवस्थितपणें काम केलें नाहीं म्हणून ही अयशस्विता आली आहे. तत्त्वतः ही पद्धति चांगली आहे. कायद्यांत मांडणीहि चांगली केली आहे. या चळवळीचा मुख्य हेतु शेतकऱ्यांची राहणी अधिक चांगली व्हावी, व्यवहार अधिक सचोटीचे व्हावेत व धनोत्पादनाचें सामर्थ्य अधिक यावें अशा प्रकारचा उदात्त आहे. शेतकऱ्यानें काटकसर, स्वावलंबन व एकमेकांस साहाय्य करण्याची बुद्धि या उपायांचा अवलंब करावा असाहि कायद्यांत निर्देश आहे. परंतु या सर्व कामांत जी मोठी चूक झाली ती अशी की, या चळवळीचें तत्त्व शेतकऱ्यांना चांगलें समजावून दिले नाहीं. १० रुपये घातले असतां १०० रुपये कर्ज मिळते या एकाच भावनेनें शेतकरीवर्ग यांत सामील झाला. बरें, पुढें कामकाजांत जितकी नियमबद्धता व कायदेशीरपणा दाखवावयास पाहिजे होता तो दाखविला गेला नाहीं. त्यामुळे पैसे वेळेवर परत मिळेनासे झाले, सोसायटींतील प्रमुख लोकांनी पैशाचा अपव्यय सुरू केला. पुढें पैसे परत मिळविण्याचे बाबतींत शेतकऱ्यांच्या जमिनी गेल्या व त्यामुळें सोसायटी ही शेतकऱ्यांचे अनादरास कारणीभूत झाली. अशा रीतीनें सर्व माहिती सांगितल्यावर या कायद्याचा जाणतेपणानें शेतकऱ्यांनी उपयोग करावा, मूळ कायदा व त्यांतील तत्त्वें चांगलीं समजून घ्यावींत, त्याप्रमाणें वागण्याची खबरदारी घ्यावी तर हा मार्ग फायदेशीर झाल्याशिवाय राहणार

नाहीं" असें सांगून व्याख्यात्यांनीं आपलें भाषण संपविलें.

## श्री. माटे यांचें व्याख्यान

यानंतर ता. ३।५।२९रोजीं श्री.माटे यांचें काळींचा धंदा सोडूं नको, या विषयावर १॥ तास व्याख्यान झालें. "वासुदेव नांवाचे भिक्षेकरी असतात. त्यांच्या म्हणण्यांत 'काळिचा धंदा सोडुं नको' अशा प्रकारचा उपदेश असतो. अशा प्रकारचे लोक चांगल्या तत्त्वांचा उपदेश करणारे मिशनरीच होते. परंतु आज आपण त्यांच्याकडे धिःकारानें पाहातों. खेडेगांवाकडे पाहावें अशी बुद्धि आज सार्वत्रिक उत्पन्न झाली आहे. सामुदायिक विचार सहसा चुकीचा नसतो. तथापि खेडेगांवाकडे आपण कां पाहावें याचीं कांहीं कारणें पाहूं. इंग्लंडांत शेंकडा ७८ लोक शहरांत राहतात, अमेरिकेंत शेंकडा ५०, फ्रान्समध्ये शेकडा ३२, जर्मनींत शेंकडा ४५, असे शहरांत राहणारे लोक आहेत. परंतु हिंदुस्थानांत फक्त शेंकडा ९ लोक शहरांत राहतात. बाकीचे शेंकडा ९१ लोक खेडेगांवांत राहतात. म्हणून खेडेगांवाकडे पाहिलें पाहिजे. सुमारें ३२कोटी लोकसंख्येपैकीं तीन-सवातीन कोटी लोक शहरांत राहतात व बाकीचे २८।२२ कोटी लोक खेडेगांवांत राहतात. म्हणून खेडेगांवाकडे गेलें पाहिजे असें सिद्ध होतें. दुसरें असें की, हिंदुस्थानांत शेतकीव्यतिरिक्त धंदे करणारे लोक फक्त शेंकडा १८ आहेत व शेतीवर उपजीविका करणारे शेंकडा ७२ आहेत व हे सर्व लोक खेडेगांवांत पसरले आहेत म्हणून खेडेगांवाकडेच अधिक लक्ष दिलें पाहिजे हें ओघानेंच प्राप्त होतें.

पूर्वीचे खेडेगांवांतील लहानसान धंदे सोडून लोक शहराकडे धांव घेऊं लागले आहेत ही वाईट गोष्ट आहे. कुंभारानें पिढ्यानुपिढ्या कुंभाराचा धंदा करूं नये हें रास्त आहे. पण कुंभाराचा धंदा बुडतां कामा नये, तो दुसऱ्या कोणी तरी केला पाहिजे. पूर्वी महार लोक ' महार खादी ' या नांवाची खादी तयार करीत असत व त्यावर त्यांचा निर्वाह चालत असे. आतां ते शेतीवर गेले आहेत. मालाकडे पाहिलें तरी परदेशांत जाणाऱ्या मालाचा ९/१० माल खेड्यांतून जात आहे; व त्यांतहि दुसरी अशी गोष्ट आहे की, हा बाहेर जाणारा माल शेतकऱ्याच्या उत्पन्नाच्या फक्त १/१० इतकाच आहे. उत्पन्न केल्यापैकीं ९/१० त्याला आपल्या पेटाकरितां लागतो. माल बाहेर अधिक पाठवितां आला तर फायदा तरी होईल. तरी याहि कारणास्तव खेडेगांवाकडेच दृष्टि दिली पाहिजे. माणशी उत्पन्नाचा विचार केला तरी दरमहा ३०० ते ६०० रु. माणशी उत्पन्न असणारे पाश्चिमात्य देश कोणीकडे व हिंदुस्थानाचा दरमहा सर्वसाधारण ५।६ रुपये उत्पन्न असणारा मनुष्य कोणीकडे? या आकड्यांवरून आपल्या गरीबीची बरोबर कल्पना येईल.

शेतीचें उत्पन्न वाढत नाहीं व तें शेतकऱ्याचे पदरांत पडत नाहीं, याला दुसरींहि कांहीं कारणें आहेत. त्यांचाहि विचार केला पाहिजे. जमिनीचा मालक एक, शेती करणारा दुसरा, त्यामुळें त्या कामांत आपलेपणा उत्पन्न होत नाहीं व म्हणून जमिनीकडून जितकें उत्पन्न मिळावयास पाहिजे तितकें मिळत नाहीं. खेडेगांवांत रोगाचा प्रसार फार. त्यामुळें शेतकऱ्याचे वर्षांतून बरेच दिवस आजारीपणांत फुकट जातात व सुमारें २० टक्के नुकसान होत आहे. जमिनीचे अत्यंत लहान लहान तुकडे झाल्यामुळें विनाकारण जास्त माणसें गुंतून राहतात, व त्या प्रमाणांत उत्पन्न काढतां येत नाही. लग्न, मृत्यु वगैरे बाबतींत कर्ज काढूनसुद्धां अवास्तव खर्च करण्याची खेडेगांवांतील लोकांना दांडगी संवय आहे. त्यामुळे तो एकदां कर्जांत पडला कीं वर डोकें काढूं शकत नाहीं. खेडेगांवांत भिकारी बरेच वाढले आहेत तेही शेतकऱ्याच्या उत्पन्नावरच चरत असतात. निरुपयोगी जनावरांवर हिंदुस्थानांत १९६ कोटी रुपये खर्च होतो म्हणजे जमीनमहसुलापेक्षां ४ पटीनें जास्त होतो. तरी ह्या जनावरांचें काय करावें याचाहि विचार झाला पाहिजे. हाडाचें खत करीत नाहीं, शेणखताची काळजी घेत नाहीं, व शिवाय शेतकऱ्यास वर्षांतून ४।५ महिने काम नसतें. यामुळेंहि त्याच्या सामर्थ्याचा उपयोग करून घेतां येत नाहीं. व एवढ्याचकरितां शेतकऱ्याला कोणता तरी जोडधंदा अवश्य पाहिजे. या दृष्टीनें खादीचा धंदा उत्तम आहे.

यानंतर यावर उपाय या दृष्टीनें शेतकऱ्यांच्याकरितां सुशिक्षित लोकांनी खटपट केली पाहिजे, ज्ञानप्रसारासाठीं शाळा काढल्या पाहिजेत, सतत उद्योग करण्यास शिकविलें पाहिजे. स्वच्छ राहाणी शिकविली पाहिजे. सामुदायिक पद्धतीनें काम करण्याची गोडी उत्पन्न केली पाहिजे. परंतु या सर्व गोष्टी करतांना आपली कुटुंबव्यवस्था उध्वस्त होणार नाहीं अशी खबरदारी घेतली पाहिजे." अशा प्रकारचा इशारा देऊन व्याख्यात्यांनीं आपल्या भाषणाचा समारोप केला.

---

# इराणांतील समाजस्थिति

( आमच्या प्रवासी प्रतिनिधीकडून )

## हिंदी लोकांचा वर्ण

परदेशांत गेल्यावर तेथील लोक कसे दिसतात? हा प्रथमचा प्रश्न कोणीहि विचारील. इराणांत हिंदी मनुष्य चटकन ओळखूं येतो. याचें कारण त्याचा वर्ण. थंड प्रदेशांत राहिल्यामुळें किंवा पडद्याच्या चालीमुळें इराणी प्रजा ही गौरवर्णीय आहे. ती इतकी कीं वेष चढविला तर "साहेब" कोणता हें निश्चितपणें सांगतां यावयाचें नाहीं. तीच गोष्ट स्त्रियांची आहे. त्यामुळें हिंदी मंडळी कोणती हे ओळख नसतांहि शोधून काढण्यास त्रास मुळींचपडत नाहीं! आम्हा हिंदी प्रजाजनांना अशी ही देवाची देणगीच आहे! कोठेंही जावे, कपाळावर चिठी मारल्याप्रमाणें हिंदी मनुष्य निवडून काढणें सोपें होतें! श्यामवर्णी हिंदी लोकांस हे लागू आहे असें नव्हे तर आपल्यापैकीं कितीहि गोरा मनुष्य असला तरी तो येथें फिक्काच पडावयाचा. इराकामधील आरब देखील इराण्यांच्या मागे पडतात.

## पेहेलवी टोपी

पोषाकासंबंधीं कोणी विचारपूस केलीच तर आपण इराणी लोकांच्या मानानें फार मागसलेले आहोंत असें म्हणावें लागेल. कारण आज-काल सुधारणा म्हणून जी कांहीं म्हणतात ती सर्व कोट, विजार आणि बूट यांतच येऊन बसल्याप्रमाणें झाली आहे. साधारणपणें उच्च अधिकारी अथवा बडे पदवीधरच काय ते आपल्याकडे विलायती–साहेबी वेषांत दिसतात. ते सुध्दां आपल्या कार्यक्षेत्राबाहेर स्वतःच्या राष्ट्रीय पोषाकांतच आढळतील. पण तसें इकडे नाहीं. प्रत्येकाला "सूट" हा हवाच! थंडी कडाक्याची असल्यानें बूट व मोजे हे पायांतून बाहेर निघतच नाहींत. गेल्या २१ तारखेपासून नवीन कायदा अमलांत आल्याने परकीय प्रजाजन आणि धर्माधिकारी मुल्ला यांना वगळून सर्वांना पेहेलवी टोपी व विलायती तऱ्हेचे ओंखड कोट आणि विजारी सक्तीनें घालाव्या लागतात. पेहेलवी टोपी म्हणजे साधी गोल टोपीच आहे, पण तिला एक पुस्ती जोडलेली असते. डोळ्यांवर थोडीशी छाया पडावी म्हणून त्या टोपीला "अर्धचंद्र" लावलेला असतो. सदैव डोकें टोपींत खुपसलेलें असतें हा एक मुख्य दोष या शिरोभूषणाचा आहे. दुसरें असें कीं साधारणपणें २।३ महिन्यांत एक टोपी निकामी होते. तींत साध्या कागदावर कापड चढविलेलें असल्यानें टोपीवाल्यांच्या धंद्याल कायमची तेजी आहे. याचा परिणाम सर्वत्र दिसून येतो तो असा कीं, टोपीवाल्यांचीं दुकाने जेथें तेथें वाढत आहेत. अशा वेळीं येथे एखादे "अनंत शिवाजी" असते तर त्यांनीं छानच कामगिरी बजा-वली असती! कायद्यानें प्रजेला "टोपी घालणें" रास्त असो वा नसो, या नवीन नियमाचा एक फायदा झाला आहे. कापडवाले, शिंपीदादा आणि टोपीवाले यांच्या व्यापाराला चांगलीच बरकत होत आहे. हल्लीं आपणाकडे गिरण्यांची हलाखी आहे. बेकारीहि माजलेलीच आहे. तेव्हां असा एखादा नवा कायदा अमलांत आला तर गिरणीमालक सरकारास दुवा देतील!

## इराणी स्त्री व युरोपियन स्त्री

स्त्रीवर्गावर कायद्याचें हत्यार अजून चाललें नसलें तरी पाश्चात्य सुधारणेचा अंमल पडद्यांतहि शिरला आहे हे सहज लक्षांत येतें. रस्त्यांत वावरत असलेलीं काळ्या कापडात गुरफटलेलीं "भुतें" हीं पुरुषवर्गापेक्षां अधिक भरतात असें सांगि-तलें तर कोणाला आश्चर्य वाटावयास नको. इराणांतील महिलावर्ग हिंदुस्थानांतील कोण-त्याहि सुधारलेल्या आणि सुशिक्षित अशा स्त्री समाजाला 'फॅशन'चे धडे देण्यास समर्थ आहे! तलम तनुवर्णीय मोजे, उंच टांचांचीं पादत्राणें आणि मुद्रारंगसाहित्य इत्यादिकांचा प्रसार आमच्या समजुतीप्रमाणें आणि अनुभवानें केवळ युरोप अमेरिका या खंडांतील देशांतच असावा असें होतें. परंतु इराणांत त्यांचा जारीनें प्रवेश झालेला दिसला. फक्त काळा बुरखा निघण्याचाच अवकाश, मग इराणी स्त्री कोणती आणि युरोपियन स्त्री कोणती असा संदेह पडेल!

इतकें सांगितल्यावर मग रस्त्यांमधून त्यांचेंच प्राबल्य कां असतें हें समजेल. केशभूषा, मौलिभूषा, वि शभूषा इत्यादि पुष्पबाण सज्ज करण्यासाठीं बाजारांत स्वतःच जाणें स्त्रियांना इष्ट असतें. पुरुषांना एक तर हा असला बाजार करणें प्रथमतः जिवावर यावयाचें. कारण खिसा रिकामा होतो आणि दुसरें असें कीं त्यांनीं कितीहि धडपड केली तरी "घरांत" ती निवड पसंत होईलच असा नियम

नाहीं. तेव्हां "जेनो काम तेनो थाय" हेंच खरें. म्हणून इराणी ललना नेहमीं बाजारांत हिंडतांना आढळतात. "ललना स्टोअर्स" "वनितावस्त्र-भांडार," 'महिला-साहित्यसंग्रह' "झनाना स्टोअर्स" या दुकानांचाच भरणा तेहेरानमधील बाजारांत अधिक आहे हें सहज एकच फेरी केली तरी दृष्टोत्पत्तीस येतें.

एकदां बाजारांत बायका जाऊं लागल्या कीं मग इतर खरेदी पुरुषवर्ग कशाला करील ? भाजी, धान्य इत्यादि घरगुती जिनसाहि घरधनिणीनेंच विकत घेण्याचा परिपाठ इकडे पडला आहे. हा प्रघात अनुकरणीय आहे कीं नाहीं हें ज्याचें त्यानेंच ठरवावें. मात्र इतकें खरें कीं भाजी, धान्य हा बाजार बायका चांगल्या कसोशीनें करतील आणि भोजनांतील पदार्थ चांगले रुचकर व स्वादिष्ट लागतील. सर्व जिन्नस अगदी पारखून, हवे तितकेच येतील ही गोष्ट खरी. पण त्याचें उट्टें निघेल इतर बाजारांत. जवाहिरे "बाईसाहेबांना" नवीन नवीन दागिने दाखवून ते घेण्याचा मोह पाडतील आणि या बाबतींत मात्र किंमतीकडे स्त्रियांचें लक्ष जाणार नाहीं. घासाघीस जी होईल ती भाजीवाल्या माळणीशींच. लुगडीं आणि दागिने ह्यांना नेहमीं किमत जास्त पडावयाचीच आणि ती पडेल तितकी देऊन ते जिन्नस घेतलेच पाहिजेत ! खिशांत पैसे शिल्लक नसले किंवा एकादे भारीपैकी सणंग "पाहिजे" अशी 'घरची' आज्ञा झाली म्हणजे 'रावसाहेब' "दुकानांत माल शिल्लक नाहीं" अशी सबब सांगून कालहरण करतात तो प्रकार नवीन चालीमुळे अगदींच बंद पडेल. इतकेंच नव्हे तर "अलीकडे पगार फार कमी पडूं लागला" अशी हाकाटी वरचेवर ऐकूं येईल. तेव्हां आपली पूर्वीचीच पद्धत उत्तम हेंच खरें! आपल्या पूर्वजांनीं घालून दिलेला हा धडा दूरदर्शीपणाचा नाहीं असें कोणता पुरुष म्हणेल बरे ?

## पडदा आणि बुरखा

बुरख्याच्या चालीसंबंधींहि थोडें सांगितलें पाहिजे. ही वाईट चाल प्रचारांत येण्याला सर्वत्र कारण एकच आणि तें म्हणजे वरिष्ठ अधिकाऱ्यांचा आणि बादशहांचा "जनानखाना". पण आतां ती पद्धती नष्ट होत असल्याने तज्जन्य चालहि आपोआपच दूर झाली पाहिजे. हिंदुस्थानांत "पडदा" आणि 'बुरखा' अशा दोन चाली वेगळ्या आहेत. 'पडदा'असणाऱ्या स्त्रिया 'बुरखा' घेत नसून त्या येथें जातील त्या स्थानाभोंवतीं पडदा असेल किंवा त्या भागांत पुरुषांना बंदी असेल.आंत वावरणाऱ्या स्त्रिया बुरखा न घेतां हिंडतील. बुरख्याचें तसें नाहीं. बुरखा घेतला कीं मग पुरुषांना धक्के देऊनहि जातां येतें असा इकडील रिवाज आहे. पुरुषांनींहि रस्त्यावरून जातांना बुरख्याचें काळें निशाण पाहून थोडें स्त्रीदाक्षिण्य दाखवावें अशी अपेक्षा कोणी करीत नाहीं किंवा

## स्त्रीणां भूषा किंतु सौजन्यमेव

या न्यायानें स्त्रियाहि जपून चाललेल्या दिसत नाहींत. अगदीं पुरुषांच्या खांद्याला खांदा लावून 'काळा बुरखा' जाऊं लागला तर त्यांत आश्चर्य केवळ नवीन रहिवाशालाच वाटेल! हिंदुस्थानांत रेल्वेच्या तिसऱ्या वर्गाच्या तिकिट-ऑफिसापाशीं तिकीट घेतांना जशी रेटारेटी चालते तसाच प्रकार इराणी बाजाराचे भागांत स्त्रीपुरुष हा भेद न बाळगतां नेहमीं चालतो! बुरख्याचा मोठा फायदा एक आहे. त्यापासून इतरेजनांना मुळींच त्रास नाहीं. "पडदेवाल्यांची" सरबराई राखणें फार कठीण काम होतें आणि नेहमीं निदान ३।४ नोकर-चाकर बाळगावे लागतात. पडदा घेण्याची चाल असेल तर सायंकाळीं फिरावयास जातांना दांपत्याला मिळून पडद्यांत जावें लागेल. पण बुरखेवाली मंडळी कांहीं त्रास न होतां जोडीजोडीनें तें सुख अनुभवूं शकतील. इराणांत बुरखा हा सर्व वयाच्या स्त्रियांना लागू आहे.म्हणजे मुलगी हिंडूं फिरूं लागली कीं काळा बुरखा हा तिच्या पोषाकाचें एक मुख्य अंग नव्हे अंग झांकण्याचें वस्त्र होतें.

## तेहेरानचें हवापाणी

तेहेरानची हवा फारच उत्तम आहे.हवापाणी हा जोड-शब्द मुद्दाम टाळला आहे.कारण पाण्यासंबंधी समाधानास जागा मुळींच नाहीं. गिरण्या, कारखाने किंवा आगगाड्या यांचा संपर्क तेहेरानलाच काय पण सर्व इराणाला आबादान सोडून जवळ जवळ नाहींच म्हटलें तर हरकत नाहीं. हिंदुस्थानाच्या एक-तृतीयांशाएवढा अदमासानें विस्तार असतां केवळ शंभर मैलच रेल्वे या देशांत आहे! त्यामुळें हवा गलिच्छ करण्याचीं कृत्रिम साधनें अद्यापि प्रचलित झालीं नाहींत.शिवाय तेहेरानची वस्ती अत्यंत विरल आहे असें म्हणतां येतें आणि मौज ही कीं गेल्या चाळीस वर्षांच्या अनुभवांत हें नगर वाढते आहे असें म्हणणारे लोक आढळत नाहींत. या सर्व कारणांनीं तेथील हवा शुद्ध आहे.

इराणांत सर्वच ठिकाणीं पाणी भूम्यंतर्गत पाटांनीं खेळविलेलें आहे. कित्येक ठिकाणीं हे वाहातें जल उघडेंहि दिसतें आणि पाण्याचा सांठा एके जागी नसून समीपस्थ डोंगरांतलि प्रवाहांचा लाभ घेऊन ही व्यवस्था केली जाते.त्यामुळें सोय अत्यंत झाली असली तरी आरोग्याला फार हानि पोहोचण्यासारखी ही व्यवस्था आहे असें साधा "कुणबी" ही सांगेल. प्रत्येक घराच्या मध्यभागीं हौद असतो. त्यांत पाणी

अदृश्य मार्गानेंच येतें. हें वापरण्याचें पाणी व पिण्याचें पाणीहि एकाच मार्गानें यावयाचें. ठिकठिकाणीं हौद बांधलेले असतात. हे सर्व बाजूंनी बंद असून त्यांना एक तोटी ठेवलेली असते. तींतून पिण्याचें पाणी घ्यावयाचें. अशा हौदांना 'अंबार' किंवा अंबार-खाना म्हणतात. पिण्यास येतें तें पाणी निवळ-ण्याचा संभव असतो आणि तें सदैव झांकलेलें असतें इतकाच काय तो फरक. कित्येक ठिकाणीं मात्र हें "पानीय' 'पेय' असतेंच असें म्हणतां येत नसलें तरी लोक त्याचा उपयोग करतांना दिसतील. पाण्याच्या प्रवाहांतच रस्त्यांचीं गटारें सोडलीं आहेत. किंवा गटारें व पाणी नेण्याचे पाट हे प्रवाह निरनिराळे नाहींत असें पाहिजे तर म्हणावें! अशा गटारांचीं द्वारें रस्त्यांत हिंडतांना नेहमीं लागतात आणि लक्ष दुसरीकडे असणारा त्यांत पडावयाचा देखील! कारण ज्याला 'पाणी' पाहिजे असेल त्याला तें द्वार उघडतां येतें. पण काम झाल्यावर तें पुनः पूर्ववत् झांकावें याविषयीं विचार तो मुळींच करणार नाहीं. रस्त्यावर शिंपडण्यास, जनावरांना पाजण्यास किंवा पिण्याखेरीज सर्व उपयोगा-साठीं अगदीं बिनदिक्कतपणें तें पाणी घेतांना पाहून हिंदुस्थानांतील कोठल्याहि मनुष्यास साहजिकच किळस वाटेल. पण येथें

**तीर्थोदकं च वन्हिश्च नान्यतः शुद्धिमर्हतः**

हें वचन अगदीं आबालवृद्धांच्या रोमरोमीं भिनल्याप्रमाणें दिसतें. पाणी कधीं अस्वच्छ होऊं शकतच नाहीं असा इराणी प्रजेचा सिद्धांत आहे का स्वच्छता हा शब्द त्यांना ज्ञात नाहीं असा प्रश्न पडतो. पण हा रिवाज आहे. रूढीविरुद्ध एक चकार शब्द काढतां कामा नये. पाण्याचा उघडा पाट असेल, एके ठिकाणीं बायका धुणें करतांना दिसतील व चार पावलांवर कोणी भांडीं घांसत असतील. पुढें थोड्याशा अंतरावर 'ग्रामसिंह' आपली तृषा शमन करीत असताना दिसेल आणि लगेच एखादा चालता बोलता मनुष्य प्रार्थनेसाठीं त्याच पाण्यानें मुखप्रक्षालन करतांना दिसेल आणि हें सर्व एका मोटेच्या पाण्याइतक्या मोठ्या पाटांत अक्षरशः चार चार पावलांवर एखादीच वेळ अशा काकतालीय न्यायाची असते असें नव्हे तर हीं दृश्यें नेहमींचीं—रोजचींच आहेत. आणि त्याबद्दल त्रयस्थांविना इतरांस कांहींच वाटणार नाहीं.

### एकच प्याला

सहभोजनें केल्यानें जाती मोडतील असा कित्येकांचा ग्रह आहे. आणि त्या दिशेनें प्रयत्न करणारे आपल्याकडे कांहीं लोक आहेत खरे. त्यांना इतकेंच दर्शवावयाचें आहे कीं ज्ञातीच्या ज्ञाती एका ताटांत जेवण्याची पद्धत मुसलमानांची असून त्यांच्यांतहि भेदाभेद तीव्र आहेच. इराणांत पाऊल ठेवल्यापासून आजपर्यंत मोठ्या प्रश्नाचा विचार करीत आहे कीं फार्सी भाषेंत उष्टें, खरकटें आणि कि-ळस या तीन शब्दांना प्रतिशब्द आहेत किंवा नाहींत! एक महिन्यापेक्षां अधिक दिवस इराणांत राहूनही उष्टें, खरकटें किंवा किळस यांपैकीं एकाहि शब्दाचा उपयोग केल्याचें ऐकलें नाहीं. उपयोग करावा लागेल असले प्रसंग मात्र क्षणोक्षणीं येत. हिंदुस्थानांतील कित्येक भागांत आपल्या भांड्यास दुसऱ्यानें नुसता हात लावला एवढ्याच दोषासाठीं तें भांडें चांगलें घासावें लागतें. स्वच्छतेचें तें एक टोंक मानलें तर इराणांत दुसरें टोंक आहे असें म्हणावें लागेल. युरोपियन देखरेखीखालचीं अगदीं थोडी आहारगृहें सोडलीं तर माणसागणिक पाणी पिण्याचा पेला देण्याची चाल कोठेंच नाहीं. १०-१२ माणसें असलीं तरीहि 'एकच प्याला' पुरतो आणि एकाचें पाणी पिऊन झाल्या-नंतर तो तसाच पुढे करावयाचा. पहिलें पाणी ओतून टाकणें किंवा विसळणें ह्या क्रिया कधींहि व्हावयाच्या नाहींत. पाण्याचें उदाहरण म्हणून सांगितलें. मदिरा तर पावकाचीच भगिनी! ती सर्वांनाच पुनीत करते, मग पेल्याचें काय?

खरकट्याचा प्रश्न अगदीं सोडूनच द्या. उत्तर-हिंदुस्थानांतहि खरकटें कित्येक प्रांतांत मानलें जात नाहीं. पण किळस मात्र येतो तो इकडील लोकांच्या रिवाजाचा. समजा, दूध घेण्यासाठीं तुम्ही गेला आणि दुकानदारापुढें दुधाचें भांडें भरलेलें आहे. ज्या मापानें दूध तुम्हास मोजून मिळणार तेंच माप तोंडाला लावून तो पीत असेल तर लगेच तसेंच्या तसेंच भांड्यांत घालून तुमचें काम तो प्रथम करील आणि पुनः तें माप तोंडाला लावील! किंवा दूध तापललें असेल तर वर आलेली साय एका बोटानें चाखत पुनः पुनः बोट दुधाच्या भांड्यांत घालून (कोणाचा हात तें विचारूं नका) तो तुमच्याशी बोलेल, तुम्हाला दूधहि मोजून देईल. सर्वच कार्य अगदीं निर्विकारपणें चालेल! समतेचा कितीहि भोक्ता असलेला मनुष्य हें पाहून काय म्हणेल? दुसरी एक गोष्ट घ्या. "रोगान" म्हणून तुपासारखा पदार्थ इराणांत चोहोंकडे मिळतो. त्याचा उपयोग भाताघर, तळणीसाठीं किंवा रोटी-बरोबर खाण्याकडेहि करतात. त्याच्या वासावरून ती निवळ चरबी असावी असें वाटतें. "रोगान" याचा अर्थहि चरबी असा आहे. पण ती चरबी ज्या जनावराच्या मांसापासून काढलेली असते त्याचेंच कातडें केंस न काढलेलें जसेंच्या तसेंच घेऊन त्याची पिशवी करून त्यांत तें रोगान भरतात. पिशवी करावयाची म्हणजे काय? भराभर टाके घालून किंवा झोळी बांधतात तशा गांठी

देऊन तें कातडें भरावयाचें! घाणेरडे केस बाहेरच्या बाजूस तसेच दिसत असतात. पण त्यांतील 'तूप' अगदीं बिनदिक्कतपणें सर्वत्र वापरलें जातें. इतकेंच नव्हे तर आणखीहि तसलेच पदार्थ अशा कातड्यांत भरून किती तरी विकावयास येतात. पाणीवाला भिस्ती 'पेय' ज्यांतून आणतो तीं पिशवीहि अशीच असते ते कातडें कधीं जन्मांतरीं धुतात कीं नाहीं; देव जाणे! पण त्यांतील पाणी सर्वत्र पितात. निर्ढावलेल्या इराण्यांना त्याचें कांहींच वाटत नाहीं! दृष्टिआड सृष्टि असली तर एक वेळ चालेल. पण सर्वच प्रकार राजरोसपणें समोर होत असल्यानें कोठेंहि जाऊन आहार करावा किंवा तहान भागविण्यासाठीं पाणी प्यावें अशी इच्छा बिलकुल होत नाहीं. नाहीं म्हणावयास साहेबी उपाहारगृहें २।३ आहेत. त्यांच्यावरच सर्वस्वी अवलंबून येथें वास्तव्य करावें लागलें!

## आहारांतील प्रकार

खाद्य पदार्थांत गव्हाची रोटी ही जास्त असून अंडींहि विपुल प्रमाणांत वापरतात. तांदूळ, मांस, मासे हे तर असावयाचेच. पण दही आणि ताक इकडे इतकें प्रचारांत आहे कीं, वातोदकाप्रमाणें (वातोदकें=सोडावॉटर वगैरे पेयें) ताक किंवा दही कोठेंही मिळूं शकतें. दूधहि उपयोगांत आणतात; पण तें शेळीचें, गाईचें, उंटिणीचें का गाढवीचें हें कळण्यास मार्ग नाहीं. निर्भेळ गोक्षीर क्वचितच मिळतें (इराणी भाषेंत शीर-इ-गाव म्हणजे गाईचें दूध. 'इ' हा षष्ठीचा प्रत्यय. शीर=क्षीर; गाव=गौ; हें संस्कृतीचें साम्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे.) कांहीं प्रसंगीं मानवी दुधाचेंहि त्यांत मिश्रण असतें असें सांगण्यांत येतें आणि तें खरें मानण्यास बरींच कारणें आहेत. फळफळावळींत द्राक्षें, नारिंगें आणि डाळिंबें इकडे विशेष आहेत. आणि तीं वर्षभर मिळूं शकतात. निसर्गानें तीं राखण्यासाठीं हिमवृष्टीचा लाभ या देशांत आपोआपच करून दिला असल्यानें "मधांत" फळें घालण्याची आवश्यकता वाटत नाहीं. मधहि विपुल असून खाण्यासाठीं त्याचा उपयोग मनस्वी केला जातो. लोणीहि चांगलें मिळतें, पण तें महाग असतें. पालेभाजी, गाजरें, विलायती मुळे, कांदे, बटाटे, भोपळे इत्यादिकांची लागवड होणें सुलभ आहे. कारण पाणी सदैव खेळतें असतें. आम्रफलाची मात्र कल्पनाच इराणी प्रजेस आहे! औषधाला तर नाहींच, पण शाळेंत वस्तुपाठ देण्यासाठीं आंब्याचें झाड चित्ररूपानें पाहूं म्हटलें तरीहि मिळावयाचें नाहीं! पालेभाज्या कच्च्याच खाण्याचा प्रघात आहे. भोजनांत सर्वच वीर 'सव्यसाची' असावयाचे हें ठरलेलेंच.

## हमामखान्यांतील स्नान

इकडे आल्यानंतर एक मोठा फरक दैनिक कार्यक्रमांत झाला असेल तर तो स्नानाचें नांव आन्हिकांतून काढून साप्ताहिकांत अथवा पाक्षिक व्यवसायांत घालावयाचें हा होय! थंडी अतिशय हें तर कारण खरेंच; पण दुसरें म्हणजे योग्य सोय नाहीं. येथील स्नानगृहें अगदीं वेगळीं असून कोणत्याहि अभ्यागतालयांत म्हणजे हॉटेलांत स्नानाची व्यवस्था नसते. त्यासाठीं 'हमाम' म्हणून स्वतंत्र स्नानगृहेंच असतात. या हमामांत जावयाचें म्हणजे एक शिक्षाच म्हणावी लागेल. पण २-४ वेळां गेल्यावर तेथें जाणें ही एक चैनीची आवश्यकता होते. चोहों बाजूंनीं अगदीं बंद केलेल्या खोलीस खालून उष्णता लावलेली असून तिच्यांत मधूनमधून वाफ सोडतात. अशा ठिकाणीं जाऊन प्रथमतः तेथील सेवकांकडून सर्वांग घासून, धुवून, पुसून, रगडून घ्यावयाचें आणि मग उष्णोदकानें स्नान करावयाचें अशी रीत आहे. अशा हमामांत एकदां स्नान केलें कीं, साधारणपणें शेर अर्धा शेर वजन कमी होतें आणि नेहमीचे कपडे अगदीं सैल वाटावयास लागतात. घासून घासून शरीराचें वरचें कातडें निघून जातें, सर्व रक्तवाहिन्यांना चेतना प्राप्त होते. निदान १ तासभर हें 'रासन्हाणें' चालतें. दोनदोन तीनतीन तासहि सेवा करून घेणारे 'हमामबहादूर' असतात. पण नवीन आलेला मनुष्य कोंडलेल्या हवेमुळें गुदमरून जातो आणि घेरी आल्याप्रमाणें त्याला वाटूं लागतें! आठवड्यांतून किंवा महिन्यांतून एकदां स्नान व्हावयाचें तें असेंच असलें पाहिजे! मुंबईंतील चौपाटीवरील 'चंपी'च्या जोडीला उष्णोदकस्नान दिलें म्हणजे हमामाची कल्पना येईल. इराक, इराण, तुर्कस्थान इकडे सर्वत्र अशा हमामांचीच रीत आहे. पूर्वीच्या काळीं त्या ठिकाणीं नैसर्गिक उष्णोदकाचे झरे असत. तेव्हां त्यांना औषधी गुणामुळें महत्त्व असे. पण हल्लीं अशीं उन्हाळीं इराणांत कांहीं ठिकाणीं असलीं तरी शहरांतील हमामांत साधेंच पाणी येतें.

## पांढरे कावळे!

कावळ्याची एक कल्पित गोष्ट आपल्याकडे मुलांना सांगतात कीं बगळ्याचें पांढरें स्वरूप पाहून त्यालाहि आपण गोरें व्हावें अशी इच्छा झाल्यानें काकराज नदींत स्नान करून दगडावर आंग घासून घेऊं लागले. त्यामुळें अर्थातच कावळ्याला इहलोकाचें वास्तव्य संपवून काळ्या

शरीरयष्टीचा त्याग करावा लागला. आपल्याकडील गोष्ट अशी आहे खरी; आणि कावळ्याचा रंग काळा हा सिद्धांत वज्रलेप मानण्याचा जरी प्रघात असला तरी इराणांतील कावळे देखील गौरवर्णीय दिसतात. धुतलेल्या तांदुळाप्रमाणें त्यांचें स्वरूप नसलें तरी राखीरंगाची प्राप्ति त्यांना कोणत्या देवानें करून दिली आहे हें कळत नाहीं. उडण्याचे पंख व मानेभोंवतालचा भाग अगदीं काळा असून बाकीचा धूसरवर्णीय असतो, हें पाहून हा पक्षी नवीन असावा असा तर्क चालतो. परंतु 'का का' अशाच हांकांनीं जेव्हां आकाश भरून जातें तेव्हां संशयनिवृत्ति होऊन हिमराशीच्या सान्निध्यानें अथवा कडक तपश्चर्या करून कावळ्यानें वर्णांतर करून घेतलें असावें असें वाटतें. कित्येकांची नुसती चोंचच पांढुरकी असते. कावळ्यांचाहि वर्ण बदलणाऱ्या या देशांत आम्ही उठून दिसलों तर काय आश्चर्य ! असो.

### थंडीचा कडाका

इकडील थंडीची कल्पना कशी यावी हा प्रश्न पडतो. शास्त्रीय पद्धतीनें उष्णतामानयंत्रांतील पारा कोणत्या अंशावर असतो हें सांगितलें तर तें सर्वांनाच कळेल असें नव्हे. तेव्हां इतर कांहीं मार्गांनीं त्यासंबंधीं कळविणें इष्ट आहे. 'लोणी कापण्या चाकू' हा आपणाकडील वाक्प्रचार येथें उलट अर्थानें योजावा लागेल. कारण लोणी इतकें घट्ट होतें कीं, तें कापण्यास चांगलाच चाकू लागतो. प्रातःकाळीं उठून बाहेर पाहिलें असतां बर्फाचे थर दिसले तर तें मुळींच आश्चर्य नव्हे. रस्त्यांवरील पाण्याचें किंवा आंगणांतील हौदाच्या पाण्याचें बर्फ होणें हा नेहमींचा प्रकार आहे. शरीराच्छदनासाठीं ३।४ आवरणें असूनहि कधीं घर्मबिंदू येत नाहींत. उलट 'वरकोट' (ओव्हरकोट) आणि हातमोजे हा नेहमींचाच पोषाक होऊन बसलेला आहे. थंडींत सांचलेलें बर्फ उन्हाळाभर वापरण्यांत येतें. आईसक्रीम करण्यास फारसे श्रम पडत नाहींत. आणि तें बनविण्याची पद्धतीहि अगदीं साधी आहे. हलवाई खवा घोटतो त्याप्रमाणें एका लांकडी फळीनें दुग्धमिश्रण ५-१० मिनिटें घोटलें कीं आईसक्रीम तयार होतें. मात्र हलवायाच्या कढईखालीं विस्तव असतो तर आईसक्रीमवाला आपल्या रुंद तोंडाच्या भांड्याभोंवतीं बर्फाचे खडे ठेवतो इतकाच काय तो फरक. थंडींतहि प्रातःकाळीं उठल्यापासून तों रात्रीं १०-११ वाजेपर्यंत आईसक्रीम खाण्याची रीत आहे. बर्फाला किंमतच पडत नाहीं. तें आणून ठेवलें तर भुशांत किंवा पेटींत ठेवण्याची आवश्यकता नसते. बर्फानें तुकडे घरांतील दारापुढें उघडेच पडलेले असतात. लागतील तसतसे घ्यावे! ते वितळण्यास अवधि फार लागतो. यावरून इकडील थंडीची कल्पना येईल.

नेहमीं कपड्यांचा भार खांद्यावर असतो, म्हणूनच कीं काय इराणी लोक धिप्पाड आरबांच्या मानानें खुजे, ठेंगू आणि अशक्त दिसतात! त्यांची शरीरसंपत्ति कितपत आहे हें इतक्या अल्पावधींत कळणें शक्य नाहीं. पण इतकें मात्र खरें कीं इराण्यांना हिंदी जनतेच्या शुभ्र दंतपंक्तींचा हेवा वाटतो! तुमचे दांत बर्फाप्रमाणें कां आणि आमचे भाजलेल्या रोटीप्रमाणें पिंवळसर कां, असा प्रश्न प्रस्तुत प्रतिनिधीस किती तरी वेळां विचारण्यांत आला! 'दंतधावन' ही क्रियाच मुळीं इराण्यांना ठाऊक नाहीं असें म्हणावें लागतें. मांसाहारानें दांत बिघडतात तें तर आतां तज्ज्ञांचेंच मत आहे. निद्रोत्तर वा भोजनोत्तर मुखप्रक्षालन करण्याची रीतच कोठें नसल्यानें मधून मधून सोनेरी दांत बसविलेला मनुष्य दिसतो. आणि दंतवैद्यांच्या पाट्या वांचतां येत नसल्या तरी दंतपंक्तीच्या चित्रावरून त्यांचें प्राबल्य कळतें! पाण्याचा गलिच्छपणा, उष्टें खाण्याची पद्धत, थंडीमुळें चोहोंकडून बंद असलेल्या खोलींत पुष्कळजणांनीं शेकत बसण्याची रीत, बुरखा, दंतधावनास फांटा, अशा अनेक अहितकर चालींमुळें प्रजेचें आरोग्य राहावें कसें असा प्रश्न कोणाहि खोल दृष्टीच्या समाजसेवकास पडेल. परंतु त्यासंबंधीं माहिती कोठून व कशी मिळणार ?

### इराणाची लोकसंख्या

आंकडेशास्त्र हे राजकारणी पुरुषांचें आणि व्यापारी तज्ज्ञांचें होकायंत्र आहे यांत तिलप्राय संदेह नाहीं. इतरांना किचकट आणि डोकें उठविणारे असे वाटणारे तेच तेच आंकडे आर्थिक तज्ज्ञांना व मुत्सद्यांना किती तरी महत्त्वाच्या मनोरंजक गुजगोष्टी सांगतात. पण इराणांत कोठेंहि आंकडा मिळावयाचा नाहीं. आपल्याकडे लोकसंख्या तर आतां साधारणपणें र--ट--फ करणारा मनुष्य देखील सांगूं शकतो इतका या शिरोगणतीच्या आंकड्यांचा प्रसार झाला आहे. पण इराणांत अद्याप एकहि प्रसंग खानेसुमारीचा आला नाहीं आणि तो १०-१२ वर्षांत येईल असें वाटत नाहीं! जेथें एकंदर लोक आहेत किती याचाच मुळीं अंदाज नाहीं तेथें मृत्युसंख्या, बालमृत्यूचें प्रमाण, जन्मांची होणारी वाढ, रोगांचा प्रसार, इत्यादि आंकड्यांची अपेक्षा करणें कितपत योग्य होईल? इतकें मात्र सत्य आहे कीं, तेहेरान, हमादान, काझ्वीन, हें किंवा कोणतेंहि शहर घ्या, तेथील लोकवस्ती वाढते आहे असें मानण्यास एकहि कारण दिसत नाहीं.

हिंदुस्थानाच्या विस्ताराने इराण एक-तृतीयांश असतां लोकसंख्या अदमासें सहा कोटीच आहे असें म्हणतात! तेव्हां आणखी किती तरी जनता या प्रदेशांत कोंबतां येईल. आणि तोच प्रकार मोठमोठ्या शहरांतून दिसतो. खुद्द तेहेरानमध्ये तर जगांतील सर्व देशाच्या लोकांचें प्रदर्शनच भरले आहे असें वाटतें! जपानी, चिनी, तुर्कोमान, अफगाण, पंजाबी, फ्रेंच, इटालियन, तुर्की, इंग्रजी, जर्मन, स्वीडिश, अमेरिकन इत्यादिकांचे नमुने अगदीं सहजगत्या पाहावयास मिळतात. व्यापारांत आणि इतर ठिकाणींहि रशियनांचें—लाल बोल्शेव्हिकांचें—प्राबल्य विशेष आहे. कारकून मंडळीत खिस्तानुयायी आर्मीनियनांचा भरणा चटकन् डोळ्यांत भरतो. हिंदी 'मोटार-हाके' इराणांत इतके नामांकित आहेत कीं, कोणी नवा हिंदी मनुष्य दिसला म्हणजे "तुमची स्वतःची मोटार आहे का तुम्ही नोकर आहां" असा प्रश्न हटकून विचारला जातो! कारण मोटरहाक्याशिवाय दुसरी हिंदी मंडळी क्वचितच इकडे येतात. आपणाकडे पाहण्याची इतर राष्ट्रांची दृष्टि लक्षांत घेऊन तरी परराष्ट्रांत हिंदुस्थानासंबंधीं चळवळ करण्याचे काम जारीनें स्वीकारलें जावो!

## बाजारांचे बोगदे

इराकांत आणि इराणांत बाजारांतील दुकानांची रचना एकसारखी असून एकदम डोळ्यांत भरणारी आहे. 'एकाला लागून दुसरें अशी समोरासमोरील पडव्यांतून दुकानें मांडलेलीं असून तीं वरून आच्छादिलेलीं असतात. म्हणजे स्त्रिया जशा बुरख्यांत झांकून ठेवलेल्या असतात तशीच हीं दुकानेंही वरून बंद असावयाची. सूर्यप्रकाशाचें वावडें स्त्रियांना तसेंच दुकानांना व दुकानदारांना मुद्दां! हवा जाण्यासाठीं मधून मधून गवाक्षें ठेवलेलीं असलीं तरी एकंदरींत अत्यंत हानिकारक अशीच ही पद्धति आहे असेंच कोणीहि म्हणेल! मुंबईस मंगळदास मार्केटमध्ये अशा प्रकारचा थोडा अनुभव येईल. पण त्या मानानें मुंबईचीं दुकानें व मार्केटहि लहान पडतें! एकदां बाजारांच्या बोगद्यांत शिरल्यावर १-२ मैल आकाशाचें दर्शन न होतां गर्दीतूनच जावें लागतें! सर्व प्रकारचीं दुकानें व्यवस्थित रीतीनें मांडलेलीं येथें आढळतात. वेगवेगळ्या धंद्यांची विभागणी केलेली दिसते. दिवसा दिवे लावण्याची पाळी येत असली तरी व्यापार अगदीं जोरानें चाललेला असतो. जगांतील सर्व प्रदेशांचा माल इराणांत भरलेला आहे हे पाहून आश्चर्य वाटतें. कारण एवढ्या मोठ्या देशांत केवळ १०० मैलहि रेल्वेचा प्रसार अद्याप झाला नाहीं! सर्व दळणवळण मोटारी, घोडे, खेचरें आणि उंट यांवरून चालतें! या बंद बाजारी पद्धतीमुळें लोकांत क्षयरोगाचा प्रसार आहे असें म्हणतात!

धूम्रपानाचें व्यसन हिंदुस्थानांतील लोकांना जितकें आहे त्यापेक्षां किंचित् कमी प्रमाणांत तें इराणांत आहे. मुख्यतः समाधानाची गोष्ट अशी कीं, इराणी जनता बहुतेक सिगारेटस् इराणांतच तयार करते. परकीय "धूम्रसमिधां"चा प्रसार इराणांत मुळींच नाहीं असें म्हणतां येईल. ठिकठिकाणीं सिगारेट तयार करण्याचीं हातयंत्रें दिसतात आणि कित्येकांना स्वहस्ते सिगारेट करून पिण्याची संवय असल्यानें सुटे कागद व तंबाखू हीं खेडोखेडींहि मिळतात. गुडगुडीहि क्वचित् प्रसंगीं दृष्टोत्पत्तीस येते अफू ओढण्याचें घातुक व्यसन २।३ वर्षांपूर्वीं फारच पसरलेलें होतें. तें राष्ट्रसंघाच्या विनंतीवरून बंद होण्याच्या मार्गाला लागलें आहे. रोट्यांना 'खसखस' लावण्याच्या नेहमींच्या चालीवरून अफूचें पीक येथें पुष्कळ असावें असा तर्क निघतो व तो खराही आहे. स्त्रियाही बुरख्यांतून धूर सोडीत रस्त्यांतून जातात, त्याचे प्रथमदर्शनीं आश्चर्य वाटतें! (अपूर्ण)

---

# बार्डोली जिंकली पण पुढें काय ?

बार्डोलीच्या लढ्यांत सेटलमेंट ऑफिसरांची बाजू चुकीची ठरून रयतांच्या शिरावर निष्कारण लादलेला बराचसा बोजा कमी करण्यांत आला व त्या दृष्टीनें सत्याग्रही रयतांनीं ही लढाई जिंकली; पण आतां पुढे काय हा महत्त्वाचा प्रश्न शिल्लक राहतो व त्याचा विचार करणें प्राप्त आहे. किंबहुना बार्डोलीच्या विजयाचें खरें महत्त्व व्यक्तिशः बार्डोली तालुक्यांतल्या कोणत्या रयतावरचा बोजा किती कमी झाला या तपशिलांत नसून त्या तपशिलाच्या बुडाशीं असलेल्या तात्विक निष्कर्षांतच आहे. बार्डोली कमिटीच्या रिपोर्टांतून जर कोणतें एखादें तत्त्व प्रस्थापित होत असेल तरच त्या रिपोर्टाचा खरा उपयोग इतरांना होईल व त्या रिपोर्टालाहि जमीन-महसुलाच्या तात्विक वादांत शाश्वत स्थान मिळेल. यास्तव या रिपोर्टानें कांहीं तरी शाश्वत तत्त्वें प्रस्थापित होतात कीं नाहीं तें पाहूं. अशा तात्त्विक व व्यापक दृष्टीनें पाहूं गेल्यास या रिपोर्टांतून कोणकोणते सिद्धान्त प्रस्थापित होतात याविषयीं पूर्ण मतैक्य दिसून येणें दुरापास्त दिसतें. 'मँचेस्टर गार्डियन' सारख्या साम्राज्यवादी विलायती पत्राला हा रिपोर्ट म्हणजे सिव्हिल सर्व्हिसच्या इभ्रतीवर वज्राघातच होय असें वाटत आहे. पण हा 'वज्राघात' करणारें कामगारहि सिव्हिल सर्व्हेटच असल्यानें अँडरसनसारख्या मुरब्बी सिव्हिल सर्व्हेटाच्या हातून एवढी घोडचूक घडल्यामुळे नोकरशाहीची नालायकी उघडकीस आली तरी ती उघडकीस आणणारे व दुरुस्त करणारे ब्रूमफील्ड व मॅक्सवेल हेहि सिव्हिल सर्व्हेटच आहेत असें म्हणून सिव्हिल सर्व्हेटांच्या लायकीचें व निस्स्पृहतेचें समर्थन करण्यासहि प्रतिपक्षास अवसर सांपडतो. अर्थातच बार्डोलीच्या सेटलमेंटच्या कामीं जयकर व अंडरसन यांच्या हातून अक्षम्य अन्याय घडला म्हणून त्यांच्याविरुद्ध कमिटीनें केवढाहि गहजब केला तरी केवळ तेवढ्यावरून भावी अन्यायाची शक्यता व संभवनीयता नाहींशी होत नाहीं. ही शक्यता व संभवनीयता नाहींशी करण्याकरितां सेटलमेंटच्या पद्धतींतच आमूलाग्र फेरबदल घडवून आणला पाहिजे व त्या प्रयत्नास आतां लागलें पाहिजे.

जमीनमहसुलाची आकारणी व फेरतपासणी करण्याची पद्धति कायदेमंडळाच्या नियंत्रणाखालीं आणली जावी या दृष्टीनें नवा कायदा करण्याची शिफारस जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें केली आहे. परंतु तिची बजावणी अद्यापि पंजाब प्रांताखेरीज इतरत्र झाली नाहीं. या बाबतींत जी दिरंगाई चालली आहे तिला बार्डोलीच्या चळवळीनें चांगलाच धक्का दिल्यामुळे नुसतें मुंबई-सरकारच नव्हे तर दिल्ली-सरकारहि खडबडून जागें झालें असून गेल्या आठवड्यांत रेव्हिन्यू खात्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची एक परिषद सिमल्यास खुद्द व्हाइसरॉयांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली. त्या परिषदेंत कोणत्या नव्या कारस्थानाची उभारणी झाली हें कळण्यास मार्ग नाहीं. परंतु सरकारतर्फेच जो जाहीर खुलासा प्रसिद्ध झाला आहे त्यावरून या बाबतींत 'अशुभस्य कालहरणं' या कुटिल नीतीचाच अवलंब सरकाराकडून केला जाणार असें दिसतें. सिमल्याच्या या परिषदेसंबंधीं प्रसिद्ध झालेल्या जाहीर पत्रकांत असें म्हटलें आहे कीं, सरकारचें कांहीं विशिष्ट धोरण ठरलें आहे; पण त्याबरोबरच असेंहि सांगण्यांत येत आहे कीं, जमीनमहसूल ही बाब प्रांतिक सरकारच्या हुकमतीखालची असल्यामुळें तिचें जें धोरण ठरवावयाचें तें प्रांतिक सरकारांच्या विचारानें व अनुमतीनेंच ठरविलें पाहिजे. अर्थातच प्रांतिक सरकारांचे विचार समजून घेण्यांत आल्यानंतरच दिल्ली-सरकार आपला अभिप्राय जाहीर करील. मध्यवर्ती सरकारचा हा जाहीर खुलासा वाचला असता त्यावरून बार्डोलीच्या निकालानें सरकारची कशी धांदल उडून गेली आहे तें व्यक्त होतें. सिमल्याच्या परिषदेंत जर कांहीं विशिष्ट धोरण ठरवावयाचें होतें तर प्रांतिक सरकारांची मतें आगाऊच मागवून मागाहून ही परिषद भरविणें युक्त ठरलें नसतें काय ? जमीन महसूल ही बाब प्रांतिक सरकारच्या अधिकारांतली आहे याची जाणीव सिमल्यास सगळे रेव्हेन्यू मेंबर्स जमविण्यापूर्वी दिल्ली-सरकारास नव्हती काय ? मग हे रेव्हेन्यू मेंबर्स आपापल्या सरकारचा सल्ला न घेतांच सिमल्यास आधीं येऊन दाखल झाले याचा अर्थ काय ? प्रांतिक सरकारांनीं आपापलीं मतें आम्हास कळवावीं एवढा निरोप घेऊन जाण्याकरितांच या रेव्हेन्यू मेंबरांना हा हेलपाटा देण्यांत आला काय ? बरें, धांदरट दिल्ली-सरकारच्या हातून असला आचरटपणा घडला असें मानलें तरी मध्यवर्ती सरकारचा कांहींएक निश्चित निर्णय ठरला आहे असें जें जाहीर पत्रकांत म्हटलें आहे त्याचें मर्म काय ? 'आधीं फांशी आणि मग चौकशी' अशा सारखा हा सगळा नाटकी कारभार चालू झाला

नसेलना? प्रांतिक सरकारांचे अभिप्राय काय पडतात ते ऐकून घेण्याऐवजीं या परिषदेंत मध्यवर्ती सरकारनें आपला अभिप्राय या रेव्हेन्यू मेंबरांना कळविला असावा आणि आपापल्या प्रांतिक सरकाराकडून त्या धोरणास संमति मिळवून देण्याविषयीं त्यांस फर्माविलें असावें असेंच अनुमान या सरकारी जाहीर पत्रकावरून आम्हास तरी स्वाभाविक व सयुक्तिक वाटतें. बार्डोलीचा लढा चालू असतां मुंबईच्या माजी गव्हर्नरांवर अशीच सिमल्याची महायात्रा करण्याचा प्रसंग ओढवला होता व त्यानंतर त्यांनीं परत येतांच रावणशाही थाटाचें एक भाषणहि केलें. त्यावरूनहि सिमल्याच्या लाटसाहेबांच्या धोरणाविषयीं अनुमान बांधतां येतें. किंबहुना या सगळ्या कारवाईचा उगम सिमल्यास नसून लंडन शहरांतील भारतमंत्र्यांच्या कौन्सिलांत असेल आणि तिकडून आलेला निरोप प्रांतिक सरकारांना पोंचविण्याचें कटु कर्तव्य व्हाइसरॉयांनी बजाविलें असेल. तें कसेंहि असो. जमीनमहसुलाच्या बाबतींत कांहीं तरी अखेरचें निश्चित धोरण ठरविण्याचें किंवा आगाऊ ठरविलेलें धोरण जाहीर करण्याचें खलबत सिमल्यास चालू आहे आणि तें धोरण एकदां जाहीर झालें म्हणजे मग तें वज्रलेपाप्रमाणें मानण्यांत येईल. याकरितां ज्या ज्या प्रांतांत रयतवारी पद्धति चालू असेल त्या त्या प्रांतांतल्या रयतांनी व त्यांच्या पुढाऱ्यांनीं आपलें निश्चित मत बनवून तें जाहीर करण्याची हीच योग्य संधि आहे व ती संधि न दवडतां तिचा फायदा सर्वांनी शक्य तितका अधिक पदरांत पाडून घेतला पाहिजे.

जमीनमहसुलाच्या बाबतींत या वेळीं रयतांनीं आपला जो अभिप्राय जाहीर करावयाचा त्यांतलें आद्यतत्त्व असें कीं, शेतकरी हा शेताचा मालक आहे, सरकार मालक नव्हे. सरकारचा अधिकार कर वसूल करण्यापुरताच मर्यादित आहे. अर्थातच शेतसारा हा खंड नसून कर आहे व त्यास करआकारणीचीं सर्व तत्त्वें लागू केलीं पाहिजेत. दुसरें तत्त्व असें कीं, शेतावर जी करआकारणी व्हावयाची ती निवळ नफ्यावर ठरविली जावी, आणि अशी आकारणी योग्य रीतीनें करण्याला साधन म्हणून सरकारने प्रत्येक गांवच्या एकेक नमुनेदार शेतांतून प्रयोग करून दरएकरीं उत्पन्न काय येतें व खर्च काय येतो हे गांवच्या पंचांच्या सहकारितेनें ठरवून प्रसिद्ध करावें आणि त्या आंकड्यांवरून सेटलमेंट कामगारानें कोणत्याहि जातीच्या जमिनींत किती निवळ नफा पडतो तें समजून घेऊन आपली प्रतवार आकारणी करावी. तिसरें महत्त्वाचें तत्त्व हें कीं, सरकारचा हक्क करवसुलीपुरताच असल्यामुळे शेतसारा थकल्यास तेवढ्याकरितां रयताची सगळी जमीन जप्त करण्याचा अधिकार सरकारास पोंचत नसून सारावसुलीपुरताच जप्तीचा हक्क सरकारास पोंचतो, आणि इतर इस्टेटीच्या जप्तीनें ही वसुली न होईल तरच जमिनीची जप्ती करावी व जप्तींत जमीन घेणारा इसम सरकारचें कूळ मानलें न जातां त्यास त्या जमिनीचा पूर्ण मालकी हक्क मिळावा.

इतकीं मुख्य तत्त्वें प्रस्थापित झाल्यावर इतर तपशिलाच्या बाबतींत मतभेद असला तरी चालेल व तसा तो राहणारच. परंतु भावी लँड रेव्हेन्यु बिलांत या आद्यतत्त्वांचा स्पष्ट निर्देश होईल अशी खबरदारी घेतली पाहिजे. असो. या तत्त्वांच्या दृष्टीनें बार्डोलीचा रिपोर्ट आपणास कितपत उपयोगी पडतो तें पाहूं. शेतसारा हा खंड आहे का कर आहे याचा विचार बार्डोली कमिटीच्या क्षेत्रमर्यादेंत येऊं शकत नव्हता म्हणून त्याजवर त्या कमिटीनें अभिप्राय दिला नाहीं. परंतु टॅक्सेशन कमिटीच्या रिपोर्टांत यासंबंधीं निर्णय देण्यांत आला असून शेतसारा हा खंड नसून तो कर आहे असें त्या कमिटीनें स्पष्ट म्हटलें आहे. पण कमिटीचें तें मत भावी लँड रेव्हेन्यू बिलांत दाखल झाल्याखेरीज त्या मताला कायदेशीरपणा व शाश्वती येणार नसल्यानें टॅक्सेशन कमिटीचें तें मत बिलांत समाविष्ट केलें पाहिजे. शेतसाऱ्याची आकारणी शेतींत होणाऱ्या नफ्यावरूनच करावी, हें दुसरें महत्त्वाचें तत्त्व बार्डोली कमिटीनें मान्य केलें आहे. हल्लींच्या लँड रेव्हेन्यू कोडाच्या १०७ व्या कलमांत हेंच तत्व नमूद आहे. परंतु त्याच्या अर्थासंबंधीं वाद असल्यामुळें भावी लँड रे. बिलांत हें तत्त्व अधिक स्पष्टपणें नमूद केलें जावें एवढ्यापुरता हा बार्डोलीचा रिपोर्ट आपणास अनुकूल आहे. तथापि हा निवळ नफा कसा ठरवावयाचा याविषयीं मतभेद असून बार्डोली कमिटीनें असें मत प्रगट केलें आहे कीं, जमाखर्चाच्या भानगडींत न पडतां कुळाकडून मालकास जो खंड मिळतो त्याची योग्य रीतीनें व कसोशीनें छाननी केल्यास त्यावरून निवळ नफा ठरवितां येतो आणि तीच पद्धति शक्य व उपयुक्त ठरेल. जमिनीच्या खंडचिठ्यांवरून अगर खरेदीविक्रीच्या करारनाम्यावरून शेतीचा नफा अंदाजणें जवळ जवळ अशक्यच आहे! बार्डोलीची सेटलमेंट ठरवितांना जयकर व अंडरसन यांनीं केवळ खंडचिठ्यांवर भिस्त ठेवली ही चूक केली असें कमिटीनें स्पष्टपणें नमूद केलें आहे. पण उलटपक्षीं खंडाच्या आकारणीचा विचार करणेंच नियमबाह्य आहे असा जेव्हां सत्याग्रह्यांनीं आग्रह धरिला तेव्हां खंडाचा विचार करणें हें लँ. रे. कोडाच्या १०७ व्या कलमाच्या विरुद्ध

नाहीं असा निर्णय कमिटीनें दिला. सरकारला एवढी 'पडत्या फळाची आज्ञा' पुरेशी वाटत नसल्यामुळे नव्या बिलांत खंडाचे करारनामे हा सारा—आकारणीचा मुख्य आधार म्हणून नमूद करून घेण्याची सरकारची इच्छा असणार. पण बार्डोली कमिटीनें खंडचिठ्यांचा उपयोग किती जपून करावा लागतो याविषयीं जें विवेचन केलें आहे त्यावरून खंडाचा विचार उपकारक होण्यापेक्षां अपकारकच होण्याचा संभव अधिक आहे असें कोणाहि विचारी माणसाचें मत होईल. म्हणून नव्या बिलांत सारा—आकारणी निवळ नफ्यावरूनच ठरवावी आणि नफा किती होतो ते ठरविण्याचे साधन नमुनेदार शेताच्या उत्पन्नाचा व खर्चाचा विश्वसनीय हिशेब हेंच मान्य केलें जावें असा निर्देश बिलांत असणें जरूर आहे.

शिवाय लागवडीच्या जमिनीची प्रतवारी ठरवितांना ती जमीन जिराईत आहे का बागाईत आहे हे ठरविण्याविषयीं निश्चित नियम असावेत आणि बागाईत जमिनीला जो पाण्याचा पुरवठा होत असेल तो मालकाच्या खर्चानें होतो का नैसर्गिक साधनानें होतो आणि तो पाण्याचा पुरवठा कायमचा आहे का बंद पडलेला अगर बंद पडण्याजोगा आहे याचाहि विचार अगत्य झाला पाहिजे. कारण कधीं काळीं एखाद्या शेतांत एखादी विहीर होती किंवा शेजारून एखादा ओढा वहात होता एवढ्यावरूनच त्या शेतावर जादा आकार बसविला जातो व पुढे त्या पाण्याचा पत्ताहि नाहीसा झाला तरी तो जादा आकार चालूच असतो! हे वर्णन काल्पनिक नसून बार्डोलीच्या रिपोर्टांत ब्रुमफील्ड व मॅक्सवेल यांनी तें नमूद करून ठेवलें आहे. त्याचप्रमाणे ज्या जमिनींत भाताची पेरणी कधींच झाली नाहीं त्या जमिनींवर भातजमिनीची आकारणी चालू आहे! कित्येक ठिकाणी जमिनीची नोंद 'जिराईत' या सदराखालीं झाली असून त्या जमिनीबद्दल 'बागाईत' जमिनीहून अधिक सारा घेण्यांत येत आहे !! आणि नोकरशाहीच्या आंधळेपणाचा व जुलमाचा कळस हा कीं, चित्रा नांवाच्या एका खेड्यांत तर ज्या माळ जमिनींत गवताखेरीज दुसरें कांहींच पीक येऊं शकत नाही आणि ज्या माळाचा कांही भाग स्मशानभूमि म्हणून उपयोजिला जातो त्या माळ जमिनीची नोंद 'बागाईत' या सदराखाली असून तिच्यावर बागाइतीचा भर आकार आकारला गेला आहे !!

हे व असेच आणखी कित्येक मासलेवाईक अन्याय ही बार्डोली कमिटी नेमली गेली म्हणून चवाट्यावर आणले गेले. परंतु जेथें असली कमिटी नेमली गेली नाही त्या हजारो खेड्यांची वाट काय ! आणि ज्या जमीनमहसूलपद्धतींत असले धडधडीत अन्याय खपून जातात त्या पद्धतीचा शक्य तितक्या तांतडीनें नायनाट करून नवा लँ. रे. आक्ट पास करणें अवश्य नाही काय ? अर्थातच आजवरचा 'अंधेर नगरी व झोटिंगपाच्छाही' च्या पद्धतीचा कारभार यापुढें मुळींच चालू देतां कामा नये. यास्तव सरकारनें आपलें नवें धोरण जाहीर करण्यापूर्वीच किंवा नवीन बिल तयार होण्यापूर्वींच 'अस्वला आधीं आरोळी' या न्यायानें जनतेनें आपल्या गाऱ्हाण्यांची दाद जाहीर रीतीनें व संघटित स्वरूपानें सरकारापुढे मांडली पाहिजे.

या बाबतींत शेतकी संघासारख्या संस्थांनीं जमिनीच्या तुकड्याच्या बिलाविरुद्ध जशी संघटित व नेटाची चळवळ केली तशी चळवळ या वेळीं पुनः अवश्य झाली पाहिजे. लँड रेव्हेन्यू कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होईपर्यंत नवी सेटलमेंट होऊं नये असा ठराव प्रांतिक कायदेमंडळांत पास झाल्यानंतर तो झुगारून देऊन जेथें जेथें रिव्हिजन सेटलमेंट करण्यांत आली ती ती रद्द करून तूर्त जुनी सेटलमेंट चालू करावी. जेथें रिव्हिजन सेटलमेंटचे काम सध्या चालू असेल तेथले काम तूर्त तहकूब ठेवावे, बार्डोलीच्या रिपोर्टांत नमूद केलेल्या स्वरूपाचे म्हणजे पाण्याच्या अभावीं बागाईतीची आकारणी केल्याचे उघड उघड अन्याय जेथें चालू असतील तेथले अन्याय दूर केले जावे आणि भावी सेटलमेंट करण्याची तत्त्वें व तपशील नव्या बिलांत दाखल करून तें बिल कौन्सिलपुढें मांडावें आणि तें बिल पास झाल्यानंतर होणाऱ्या रिव्हिजन सेटलमेंटमध्यें त्या तत्त्वांच्याविरुद्ध वर्तन झाल्यास न्यायकोर्टाकडे फिर्याद करण्याचा हक्क रयतेस असावा. या व अशाच स्वरूपाच्या मागण्या जनतेनें ठिकठिकाणीं जाहीर सभा किंवा परिषदा भरवून ठरावरूपानें कराव्या आणि हजारों शेतकऱ्यांच्या सह्या घेऊन ते ठराव अर्जरूपानें सरकाराकडे पाठवून द्यावेत. बागलाण, देवगड, वसई वगैरे तालुक्यांतून जेथें जेथें सारावाढीविरुद्ध तक्रार चालू आहे तेथून तर या आशयाचे अर्ज सर्वांच्या आधीं सरकारापुढें जाऊन धडकतीलच. पण इतर तालुक्यांतील व जिल्ह्यांतील रयतांनींहि पुढे मागे तोच प्रसंग आपणावरहि येणार आहे हे जाणून आतांपासूनच या मागण्यांना अर्जद्वारें पाठिंबा द्यावा. सध्या ग्रामसंघटनेची चळवळ बरेच ठिकाणीं चालू आहे व त्याकरितां कित्येक प्रचारक खेडोपाडीं व्याख्यानें देऊन जागृति करण्यासाठीं हिंडत आहेत. त्या

प्रचारकांनीं ' नारू–रंगरूटा ' सारख्या खेळ्यांतील सामान्य लोकांच्या आवांक्याबाहेरच्या विषयापेक्षां बार्डोली कमिटीचा रिपोर्ट हातांत घेऊन नोकरशाहीच्या अंधेर नगरींतला झोटिंगपाच्छाहीचा कारभार शेतकऱ्यांना समजून दिल्यास तो त्यांना लवकर समजेल, पटेल व त्यांच्यांत जागृति होऊन आपल्या स्वतःवर तशीच आपत्ति ओढवूं नये म्हणून शेतकऱ्यांच्या नैसर्गिक हक्कांची ( fundamental rights ) मागणी अर्जद्वारें करण्यास ते ताबडतोब तयार होतील. अशी ही मुक्या शेतकऱ्यांच्या कल्याणाची सनदशीर चळवळ महाराष्ट्रांत प्रचंड स्वरूपांत चालू होईल तर भावी स्वराज्याचा पाया भरण्याचे महत्त्वाचें कार्यहि त्यांतच साधेल हें निराळें सांगावयास नकोच.

# स्फुट विचार

राष्ट्रीय देश हा उद्योग–धंद्यांच्या बाबतींत अद्यापि नवशिकाच आहे. आणि त्याचा व्यापारहि म्हणण्यासारखा नाहीं. तथापि गेल्या दोन वर्षांत महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स नांवाची संस्था अस्तित्वांत आल्यापासून महाराष्ट्रांतील या दिशेच्या प्रयत्नास संघटित स्वरूप प्राप्त होत आहे ही अनंदाची गोष्ट होय. चेंबरचें अध्यक्षस्थान श्री. वालचंद हिराचंदशेटजीसारख्या तडफदार व सुशिक्षित व्यापारी गृहस्थांकडे असल्यामुळे महाराष्ट्राचें मत सरकारापुढे निर्भीडपणानें वक्तशीर मांडण्यांत येत असते. मुंबई इलाख्याचे शिक्षणमंत्री मि. रफिउद्दीन अहमद हे आहेत. उद्योग–धंद्याचें खातेंहि त्यांच्याच नजरेखालीं देण्यांत आलें आहे. या खात्यापासून मुंबई इलाख्यांतील उद्योग–धंद्याच्या अभिवृद्धीस विशेषसा उपयोग झाल्याचे ऐकण्यांत नाहीं. ही स्थिति डॉ. परांजपे व ना. देसाई यांच्याहि कारकिर्दीतली. मग रफिउद्दीन अहमद यांच्या अमदानींत अधिक सुधारणा राहोच. पण अधिक बिघाड न झाला तर तेवढ्यावरहि समाधान मानण्यास लोक राजी होतील.

***

तथापि महाराष्ट्र चेंबरचे अध्यक्ष शे. वालचंद यांनीं एक यादी त्यांजकडे पाठविलीच आहे. त्या यादींत दिवाणांस अनेक उपयुक्त सूचना त्यांनीं केल्या असून त्या अमलांत आल्यास रफिउद्दीन अहमद यांचें दीर्घकाल नांव निघेल यांत शंका नाहीं. सांप्रतचे डायरेक्टर ऑफ इंडस्ट्रीज हे स्वतः इलेक्ट्रिकल इंजीनिअर आहेत. त्यांच्या हाताखालीं इंडस्ट्रियल इंजीनियर देण्याचा सरकारचा विचार आहे. ही योजना शेट वालचंद यांच्या मतें निरर्थक होय. अशा प्रकारचीं दोन माणसें नेमून खर्च वाढविण्यापेक्षां त्याऐवजीं एकाच मेकॅनिकल इंजीनियराची नेमणूक करून खर्च वांचविणेंच चेंबरच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे. रसायनशास्त्राच्या आधारावर जे धंदे चालावयाचे त्यांचीच गरज देशांत अधिक आहे. तेलें, स्टार्च, साखर, कमावण्याच्या जिनसा, औषधें, हाडें, शिंगें, खूर, लाख इत्यादि पदार्थांपासून रसायनशास्त्राच्या जोरावर अनेक वस्तू बनवितां येतात. ही शाखा इतक्या योग्यतेची असतां तिला उद्योगधंद्याच्या खात्यानें गौण स्थान दिल्याबद्दल शेटजींनीं खेद प्रदर्शित केला आहे.

***

याखेरीज इतरहि नवीन नवीन शोध लागत असल्यामुळे जे धंदे एक वेळ हिंदी होते व आहेत तेहि मृत्युपंथास जात आहेत. पूर्वी हिंदुस्थानांत नीळ शेतांत उत्पन्न होत होती. पण कृत्रिम उपायांनीं नीळ तयार होतांच हिंदुस्थानांतील निळीस अर्धचंद्र मिळाला. अलीकडे कृत्रिम रेशीम पैदा झालें. त्यानें कापसाच्या धंद्याच्या मानेवर नख रोवलें आहे. लोंकरहि अशीच निर्माण होत आहे. लाखेचा धंदा हिंदुस्थानाच्या मालकीचा पण तोहि शास्त्रीय शोधांनीं बुडवून टाकण्याचें ठरविलें आहे. न फुटणाऱ्या कांचेचें पेटंट कोणी घेत आहेत. अशा स्थितींत शास्त्रीय शोधांचा आश्रय हिंदी उद्योगधंदे न करतील तर आहेत याहि धंद्यांचे मरण लिहून ठेवलेलें आहे. यासाठी इंडस्ट्रियल केमिस्ट व केमिकल इंजीनियर नेमून त्यांजमार्फत मुंबई इलाख्यांतील रसायनशास्त्रज्ञांची संघटना करावी व देशी उद्योगधंद्यांच्या वाढीस हातभार लावावा अशी मौ. रफिउद्दीन अहमद यांस शेटजींची सूचना आहे. शेटजींची ही सूचना रफिउद्दीन यांस अमलांत आणतां आली तर उत्तमच. नाहींपेक्षां ती त्यांनीं नीट समजून घेतली तरी पुष्कळच कामगिरी केली असें लोक समजतील.

---

# श्री. वल्लभभाई पटेल यांची मुलाखत

बार्डोली चौकशीच्या निर्णयासंबंधाने मुंबई क्रॉनिकलच्या बातमीदारानें श्री. वल्लभभाई पटेल यांची मुलाखत घेतली तिचा सारांश पुढे दिला आहे:-

" सरकारनें स्वतःच निवडलेल्या अधिकाऱ्यांच्या सरकारी कमिटीनेच असा निर्णय दिला की, शेतकऱ्यांच्या तक्रारी खऱ्या होत्या, जयकर व अंडरसन यांनीं गोळा केलेला पुरावा धडधडीत चुकीचा होता आणि साऱ्याची फेरआकारणी करण्याची कांहीं जरूरी नव्हती. ही आकारणी कायम राहूं नये असें सांगणें या अधिकाऱ्यांना आपलें कर्तव्य वाटलें. या सर्व घटनेनें मला आनंद होतो. पण आपल्या हट्टीपणामुळें एका तालुक्यांतील लोकांना अतिशय नुकसान व हाल सहन करावे लागले याबद्दल सरकारनें यत्किंचितहि दिलगिरी प्रदर्शित करूं नये ही आश्चर्याची गोष्ट होय. निदान ज्या अधिकाऱ्यांनीं बार्डोलीची सारा-आकारणी ही न्याय्यच नव्हे तर उदारपणाची आहे अशी सरकारची दिशाभूल केली त्या अधिकाऱ्यांविरुद्ध तरी सरकार काय करणार आहे हें लोकांना सांगणें सरकारचें कर्तव्य होतें.

मी हा रिपोर्ट वरवर अवलोकन केला आहे. पण त्या रिपोर्टाच्या विध्वंसक भागावरून हे अगदीं स्पष्ट दिसून येतें कीं, सध्याची फेरपाहणीची पद्धत ही अगदीं चुकीची असून तींत आमूलाग्र फरक झाला पाहिजे. मी जो लढा चालविला त्यांतील मुख्य प्रश्न अगदीं मर्यादित असला तरी त्यायोगें आपोआपच सरकारच्या जमीन-महसुलाच्या धोरणासंबंधाचा व्यापक प्रश्न उपस्थित झालेला आहे. सरकार जर शहाणें असेल तर त्यानें अलीकडे झालेल्या सर्व फेर-पाहण्यांचें पुनः परीक्षण केलें पाहिजे. नाहीं तर सर्व इलाखाभर या चळवळीचा भडका उडेल.

माझ्यापुरतें बोलावयाचें तर बार्डोलीची सारावाढ वाजूस सारली गेली येवढयानें माझ्यावरची जबाबदारी संपली, याबद्दल मला समाधान वाटत आहे. अधिकाऱ्यांनीं बार्डोलीत ६ टक्के व चौराशीमध्यें ५। टक्के वाढ सुचविली आहे. ती कितपत बरोबर आहे हें मी सांगूं शकत नाहीं.

# खेडेगांवविषयक व्याख्यानमाला

## वैद्य नानल यांचें व्याख्यान

दुसऱ्या आठवड्यांत झालेल्या व्याख्यानांपैकीं शेवटचें व्याख्यान वैद्य नानलशास्त्री यांचें. तें व्याख्यान आरोग्य या विषयावर ता. ८-५ मे रोजीं झालें. त्याचा सारांश असा.

खेडेगांवांतील मोकळी हवा, मुबलक जागा, भरपूर व्यायाम, निवांतपणें होणारें जेवण, त्यानंतर भरपूर मिळणारी विश्रांति यामुळें खेडेगांवांतील आरोग्य चांगलें राहण्यास हरकत नाहीं. वरवर पाहणाऱ्यास हें खरें दिसेल, परंतु वस्तुस्थिति अगदीं उलट आहे. दरवर्षी मृत्युमुखी पडणाऱ्या हिंदुस्थानांतील लोकांत शेंकडा २५ लोक शहरांतील व शेंकडा ७५ लोक खेडेगांवांतील असतात. याला मुख्य कारणें आरोग्य राखण्यांत लागणाऱ्या ज्ञानाचा व स्वच्छतेचा पूर्ण अभाव व रोगाचा प्रतिकार करण्याचे साधनांचाही अभाव हीं होत. आतां आरोग्य राखण्याचें काम सरकारचें आहे. परंतु आजची सरकारी योजना अगदीं अपुरी आहे. येथील लोक तर आरोग्याबद्दल पूर्ण बेफिकीर आहेत. रोगावर औषधोपचार करण्यापेक्षां तो रोग होऊं न देणेंच अधिक महत्त्वाचें आहे. रोग उत्पन्न न होण्यास निर्मळ हवा पाणी व अन्न हीं अत्यंत जरूर आहेत. लोकांत दारिद्र्य फार आहे, त्यामुळें पुरेसें अन्न मिळत नाहीं. त्याचे जोडीला अज्ञान व व्यसनें आहेत. खेडेगांवांत पाणी विपुल नसतें. तें चांगलें ठेविलें जात नाहीं व त्यामुळें पुष्कळ रोग उद्भवतात. नदी-ओढ्यांत जनावरें बसतात व पाणी घाण करतात. पावसाचे पाण्यानें महामारी हटकून होते. अशा वेळीं पाणी उकळून पिणें हें योग्य होय. पाणी शुद्ध करण्यास सार्वजनिक उपाय तुरटी टाकणें हा होय. बाहेरील घाण आत जाणार नाहीं असा बंदोबस्त केला पाहिजे. चहा, दारू, तंबाखू या व्यसनांनीं आपलें कायमचें ठाणें दिलें आहे. जोडीला निःसत्त्व अन्न. मग काय विचारावें! अशा लोकांना एवढेंच सांगावयाचें कीं, मिळतें तें व साधेंच अन्न खा. परंतु ताजें खात जा. खेडेगांवीं भरणाऱ्या जत्रांमध्यें मेवामिठाई मिळते ती भिकार असते. त्यापासून खात्रीनें रोग होतात. ती घेऊं नये. सांसर्गिक रोगासंबंधीं अधिक काळजी घेतली पाहिजे. महारोगी लोकांना दूर ठेविलें पाहिजे. नाहीं तर तो रोग वाढत जाईल. याकडे सरकारनें लक्ष दिलें पाहिजे. सरकार देत नाहीं तर लोकल बोर्डांनी

याकडे दुर्लक्ष करतां कामा नये. अशा प्रकारची विनंति करून व्याख्यात्यांनीं आपला विषय संपाविला.

### श्री. ना. गो. चापेकर यांचें व्याख्यान

ता. ६-५-१९२९सोमवार रोजीं बदलापूरचे श्री. ना. गो. चापेकर यांचें "खेडेगांवांतील समाजाची सुधारणा" या विषयावर व्याख्यान झाले. त्यांनी सांगितलें—ग्राम सुधारण्याच्या कोणत्याही योजनेंत खेड्याचें स्वरूप बदलणार नाहीं अशी खबरदारी घेतली पाहिजे. शहरावांचून राष्ट्र असूं शकेल, जगूं शकेल, परंतु खेड्यावांचून चालणार नाहीं. शहरांतील लोक मुख्यतः व्यापारावर उदरनिर्वाह करतात व खेडेगांवांतील शेतीवर करतात, व शेतीनेंच राष्ट्राच्या संपत्तींत खरी भर पडते. सार्वजनिक काम करणारानें एका तरी खेड्याचा बारकाईनें अभ्यास करणे फार जरूर आहे.

खेड्याची सुधारणा म्हणजे खेड्याचें शहर बनविणें नव्हे. पुरेसें अन्न—वस्त्र मिळून इतर चांगल्या सुखसोयी वाढविणें हा सुधारणेचा उद्देश पाहिजे. शेतकऱ्यांची भरभराट असेल तर इतर धंदेवाल्यांची भरभराट होईल. जमीन, पाणी, झाडें, गुरें ही साधनें जेथें विपुल असतात तें खेडेगांव उत्तम होय. अशीं खेडीं निराळीं काढावींत. आज लोक आळशी झाले आहेत. त्यांचे शील व दानत बिघडेलली आहे. म्हणून येथें कडक उपाय पाहिजेत. शेती सुधारण्याचे विचारांत भात जमिनीस दुप्पट रानजमिनीची आवश्यकता असते. पण तिकडे कोणी लक्ष देत नाहीं. आज जमिनीवर धारा बसविल्यावर वरकस जमिनीवर धारा बसविणे अन्यायाचें व जुलमाचें आहे. धाऱ्याचे प्रमाण उत्पन्नाच्या शेंकडा २५ पडतें. परंतु याबद्दल कोणी तक्रार करीत नाहीं हें मूर्खपणाचें द्योतक आहे. पावसाचें पडलेले पाणी सांठवून ठेवण्याची सोय झाली पाहिजे. नवीन झाडें लावण्याची बुद्धि लोकांत उत्पन्न केली पाहिजे. चराईचे रानाकरितां फारशी किफायतशीर नसलेलीं रानें सरकारपासून अनेक तक्रारी करून मिळविलीं पाहिजेत. धनोत्पादनाचीं साधनें वाढावेण्याबरोबर पैशाचा अपव्यय करणाऱ्या गोष्टीहि थांबविल्या पाहिजेत. दारूचीं दुकानें, कोर्टकचेऱ्या व लग्नसमारंभ हीं हल्लीं शेतकऱ्याला फार नागावितात. शहरेंहि खेडेगांवाला नागवीत असतात. म्हणून खेडेगांवाला लागणाऱ्या बहुतेक सर्व जिनसा खेडेगांवांतच उत्पन्न झाल्या पाहिजेत. मंगलोरी कौलें खेडेगांवांत गेलीं कीं खेडेगांवांतील कुंभाराचा धंदा बसलाच. ग्राम-सुधारणा होण्यास आणखी उपाय म्हणजे, गांवांत ग्रामपंचायत कार्यक्षम अशी झाली पाहिजे. तिला दिवाणी फौजदारी अधिकार दिले पाहिजेत. आजच्या परिस्थितींत सहकारी पतपेढ्या चालणार नाहींत. त्यांस थोड्या व्याजानें कर्ज मिळेल अशी सोय झाली पाहिजे. स्थानिक सावकारीस उत्तेजन द्यावें व सावकाराचे पैसे कोर्टाकडे न जातां वसूल होण्याची जबाबदारी सरकारनें घ्यावी. गरीब लोकांना कायद्याचा सल्ला व थोडीफार पैशाची मदत जरूर मिळावी. पोस्टाचे गांवी पोस्टांत चालू खातें ठेवल्यास पतपेढ्यांची रक्कम सुरक्षितपणें ठेवतां येईल. लोकांना सुख व सोय व्हावी इकडे जिल्हाधिकाऱ्याचें लक्ष नसतें. शेतसारा वसूल करणें हेंच मुख्य काम समजण्यांत येतें. लांचलुचपत वाढत आहे. कोर्टें झाल्यापासून दाव्याचा नंबर वाढला आहे.

सध्या खेडेगांवांत विस्कळितपणा फार वाढला आहे. पाश्चात्यांच्या सहवासामुळें व्यक्तित्व वाढले आहे. पण त्याबरोबर देशाभिमान मात्र वाढला नाहीं. वर्तमानपत्राचे प्रसारामुळे बड्या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं स्थानिक पुढारीपण नाहींसे केलें आहे. अशा रीतीनें लोकांत अज्ञान, स्थानिक पुढारीपणा गेलेला व सरकारी अधिकाऱ्यास प्रांतिक अभिमान नाहीं. सरकारी कारभार-मॉटेग्यू म्हणतात त्याप्रमाणें दगडी व लांकडी असा झालेला आहे. अशा वेळीं कॉंग्रेससारख्या संस्थांना यापुढें ग्रामसंघटनेचे काम केले पाहिजे. असे शेवटीं सांगून व्याख्यात्यांनी आपले भाषण संपविलें.

### या. शं. वावीकर यांचें व्याख्यान

ता. ७।५।२९ रोजीं वावीकर यांचें 'खेडेगांवांतील उद्योगधंदे' या विषयावर व्याख्यान झालें. त्यांनी सांगितलें कीं, खेडेगांवांतील मुख्य धंदा शेती आहे. परंतु तो आज पुरेसा नाहीं, म्हणून त्याचे जोडीला किंवा स्वतंत्रहि कांहीं उद्योग करणें शेतकऱ्यास प्राप्त आहे. पण ते कोणते करावेत हें तेथील लोकांना माहीत नसतें. करितां खेडेगांवांत काम करणाऱ्यांनी त्याची माहिती करून घेऊन परिस्थिती प्रमाणें कांहीं कांहीं धंदे सुरू केले पाहिजेत. विजेची शक्ति मिळाल्यास विणकाम किंवा इतर चक्क्या ह्या चांगल्या चालून फार फायदेशीर होतील. जेथें वारा अनुकूल आहे तेथें लहानशी पवनचक्की ठेवल्यास उपयोग होईल. मुंबईतील मोठमोठ्या गिरण्यांत रद्दी कापूस व लोंकर बरीच पडून राहते. पुढें ती केरांत जात असते. ती अगदीं थोड्या किंमतींत मिळणें शक्य आहे. ती घेऊन तिचीं जाजमें, सुताडे वगैरे केल्यास उपयोग होईल. लोंकरीचे चांगले व जाडेंभरडे असें सर्व प्रकारचें काम करण्यास हरकत नाहीं. याकरितां शक्य तर मेंढ्यांचे कळप पाळणे हेंहि फायदेशीर होईल. वाख व घायपात हे गांवाभोवती लावून त्याचे दोर वगैरे केल्यास तोहि एक किफायतशीर धंदा होईल. कुसुंबा,

नीळ, यासारखे रंग घेऊन साध्या साहित्यानें रंगकाम केल्यास रंगीत कापडाबरोबर जाणारा पैसा वांचविता येईल. रहाटावर अगर चार्तावर सूतकाम केल्यास जाडेंभरडें कापड निघेल, पण तेंहि छापकाम व रंगकाम यांचे जोडीनें आकर्षक करतां येईल. बैल, म्हशी, कोंबड्या, घोडी वगैरे जनावरें तयार करून विकल्यास हाहि फायदेशीर धंदा होऊं शकेल. शक्य तर डेअरी काढून शेजारच्या शहरी दूध वगैरे पुरविणे हाही धंदा सचोटीनें केला तर किफायतशीर करतां येईल. आसपास दगड, मुरुम, चुनखडी, शाडू, वगैरे असल्यास त्याचा पुरवठा शहरांत केल्यास तोहि एक धंदा होईल. याशिवाय निरनिराळी झाडें लावून त्यापासून उत्पन्न करतां येईल. उ. शिकेकाई, अमसूल, आंबा, मोहरी, पळस, करंजी, लाख, खैर, बाभळ, काजू, वेत, बांबू, वगैरे झाडें फायदा देणारीं आहेत. डाळिंबाची साल टॅनिन काढण्याचे कामी उपयोगांत आणल्यास तोही एक लहानसा उत्पादक असा धंदा होईल. अशा रीतीनें पुष्कळ प्रकारचे शक्य असलेले धंदे सांगून व्याख्यात्यांना आपले भाषण संपविले.

# इराणांतील समाजस्थिति

( आमच्या प्रवासी प्रतिनिधीकडून )

शिराझ शहरांतील 'मदिरा' उमरखय्यामनें नामांकित करून ठेवली आहे. द्राक्षांचे पीक विपुल असल्यानें 'सुरासुरांचा चुरा करणाऱ्या' सुरेचें प्राबल्य इराणांत साहजिकच अधिक आहे. वस्तुतः मद्यसेवन हें व्यसन न मानतां नेहमीच्या पेयांतील एक उच्च दर्जाचें द्रव्य असेंच मानलें जातें! साधा 'द्राक्षारस' कोणीहि घरीं करावा, त्याला कायद्याची बंदी नाहीं. दारू न घेणारा मनुष्य क्वचितच आढळेल. विद्यार्थी देखील तिचें सेवन सर्वांदेखत करूं शकतात. परदेशी मद्याचा प्रसार नाहीं असे नाहीं. फक्त तो श्रीमंतांत आहे एवढेंच !

### हंगामी लग्नें

बालविवाह रूढ असलेला दिसत नाहीं हें खरें; पण एक विचित्र विवाहपद्धति इकडील लोकांत प्रचलित आहे. तिचें स्वरूप पाहून तिला 'विवाह' असें कां म्हणावें हा प्रश्न पडतो. हें सर्व कृत्य अगदीं धार्मिक, न्याय्य व नैतिक मानलें जातें ही विशेष मौज ! 'जुजबी' लग्न म्हणून इस्लामानुयायी जनांची इराणांत जी रीत आहे, तिच्या साहाय्यानें ३ महिने, ४ महिने किंवा आवश्यक व इष्ट असेल तितकाच वेळपर्यंत एखाद्या स्त्रीशीं विवाहबद्ध राहातां येतें ! लग्न लावणारा मुल्ला ठराविक दक्षिणा घेतो, आणि त्याच वेळीं हा विवाह किती कालपर्यंत टिकणारा आहे याचा निर्णय विवाहेच्छु दंपत्यांच्या संमतीनें ठरवितो. त्या मुदतीनंतर या जोडप्याचें नातें तुटतें. त्यांना पुनः धर्माधिकाऱ्यापुढें किंवा न्यायासनापुढें काडी मोडण्यास जावें लागत नाहीं. यामुळें एका वर्षांत चार चार पांच पांच वेळां विवाहबद्ध होतां येतें. एकाच वेळीं पुष्कळ पत्नींचा सांभाळ करण्याची जबाबदारी पडते. भावी अडचण टाळण्यासाठीं दूरदर्शीनें ती तरतूद विवाहप्रसंगानें करून ठेवली जाते. परंतु ही पद्धति सर्वत्र प्रचलित असून तिजबद्दल कोणाला कांहीं वाटतें असें दिसत नाहीं. बलात्कारी टोपीची आणि कोटाची सक्तीनें सुधारणा करण्यापूर्वी काळ्या पडद्यांतील ही घाण प्रथम काढली असती तर राष्ट्राचें अधिक हित झालें असतें! या घातुक पद्धतीनें काय आपत्ति कोसळते यासंबंधी चर्चा करणें इष्ट नव्हे. साध्या कल्पनाशक्तीसहि तिचें आकलन होण्यासारखें आहे.

मनुष्यास भेटण्याची आपलेकडील प्राचीन पद्धति म्हणजे आलिंगन देऊन बाहूंत कवळण्याची आहे. आतां त्यांच्याकडेच हस्तांदोलन रूढ होत असल्यानें जुनी रीत क्वचित् पाळतात. परंतु इकडे एकच पद्धति पूर्वीपासून चालू आहे. दोनही गालांचें व नंतर कपाळांचें चुंबन घेण्याची चाल इराणांत आहे. ती फक्त जुन्या मताच्या लोकांतच आढळते आणि कोणी परगांवीं चालला अथवा जाऊन आला म्हणजे सर्वांनीं त्याचें चुंबन घ्यावयाचें असा इकडील रिवाज आहे. हा प्रकार फक्त पुरुषांचाच चाललेला नेहमीं दिसतो.

### इराणांतील पंचांगवाद

पंचांगवाद आपलेकडेच आला आहे असें नसून या बाबतींत इराणी लोक आपले भाईबंद आहेत ही समाधानाची गोष्ट होय. नेहमीच तीन पंचांगें (?) जवळ बाळगावीं लागावीं अशी इराणी परिस्थिति आहे. इराणी वर्ष हें सौरमानाचें असून पैगंबराच्या पलायनदिनापासून त्याची गणना होते. इतर मुसलमान देशांत वर्षगणनेचा आरंभ पैगंबर-पलायनाचा दिवस असला तरी त्यांची वर्षें चांद्रमासाचीं असल्यानें फरक पडतो. शिवाय आरबी महिन्यांचीं नांवें आणि इराणी महिन्यांचीं नांवें एक नाहींत. आपल्याकडे भाषाशुद्धीचा प्रयत्न कसोशीनें

चालू आहे तसाच इराणांतहि ४।५ वर्षापासून सुरू असून परकी शब्दांवर त्यांचा कटाक्ष आहे. विशेषतः आरबी भाषेचें वर्चस्व त्यांना नको असल्यानें आरबी शब्दांना गचांडी देण्याचें कार्य सरकारी साहाय्यानेंच चालू आहे. महिन्याचीं नांवें तर बदललींच; पण लष्करी खात्यांतील आरबी शब्दांना इराणी प्रतिशब्द योजून त्यांचा प्रचार करणे हसन, महंमद इत्यादि आरबी नांवांवर बहिष्कार घालून, रुस्तुम, जमशीर वगैरे इराणी नांवांचा प्रसार जनतेत सक्तीनें करणें या बाबी महत्त्वाच्या असून त्यापासून पुष्कळच घेण्यासारखें आहे. 'नांवांत काय आहे?' असा कोणी प्रश्न केल्यास नांवांतच सर्व आहे असें स्पष्टपणें सांगावें लागेल. इराणी तारीख, महिने आणि वर्ष निराळें, आरबी कालमान अगदीं वेगळें आणि ख्रिस्ती शकाचा तृतीय पंथ आंतरराष्ट्रीय व्यवहारासाठीं आवश्यक असल्याने नेहमीं त्रिवेणीसंगमाचें कॅलेंडर जवळ बाळगावें लागते. नांवाच्या व भाषेच्या शुद्धीकरणाच्या आणि नवीन वर्षमानाच्या सुधारणा केवळ राजाश्रयाच्या जोरावरच इतक्या त्वरेनें लोकमान्य झाल्या हे लक्षांत ठेवणे इष्ट आहे. इंग्रजी महिन्यांच्या तारखाहि कांहीं तरी अनुमानधबक्यानेंच ठरविल्या आहेत. आणि अमुक महिना किती दिवसांचा, हें ठरविण्यासाठीं हातावरील उंचवट्याचें साहाय्य घ्यावें लागतें. त्याचे दिवस कसे तरी हे ठरविलेले आहेत. पण इराणी वर्षमानांत पहिले सहा महिने ३१ दिवसांचे, पुढील ५ महिन्यांत तीस दिवस आणि शेवटचा महिना २९ दिवसांचा अशी सोयीची विभागणी आहे. दर चार वर्षांनीं अखेरचाहि महिना ३० दिवसांचा असतो. ही सोय नाहीं असे कोण म्हणेल? पण ती केवळ इराणांतच मान्य आहे.

दैनिक कार्यक्रम जसा आपला तसाच इराण्यांचाहि. फरक केवळ घड्याळ लावण्याचा. सूर्योदयाला साधारणपणें सहा वाजतात असें आपण मानले तर इकडे त्या वेळीं घड्याळांत बाराचे ठोके पडतील. म्हणजे सूर्योदयच १२ वाजतां होतो! इराकांतहि तीच पद्धति असल्यानें 'इंग्रजी घड्याळ' का 'इराणी घड्याळ?' असा प्रश्न केव्हांहि विचारावा लागतो. इराकांत आरबी वेळ पुष्कळ ठिकाणीं मानतात तसे इराणाचे नाहीं. मुंबईचा जसा घड्याळाचा वाद आहे, तसाच हा समजावा. मुंबईस फरक सुमारें ४० मिनिटांचा असतो तर हा सहा तासांचा आहे इतकेंच! आपण घटिकामापन सूर्योदयापासून करतों, तशापैकींच घड्याळाचे तास सूर्योदयापासून मोजण्याची ही रीत आहे. विशेष आश्चर्य करण्यासारखी गोष्ट नव्हे!

## फ्रेंच कट

मुसलमान म्हटला कीं त्याला दाढी हवी. ही समजूत इराणांत पार बदलली आहे. धर्मोपदेशक आणि क्वचित् एखादा इसम दाढीवाला आढळतो. बाकी सर्वांना 'नित्यश्मश्रू' अभिमत असलेली दिसते! मिशी कर्तनांत 'फ्रेंच कट' म्हणून एक प्रकार फॅशनचे जनक मानतात. त्याचा प्रसार इराणांत पुष्कळ झालेला आहे असें स्पष्ट दिसून येतें. अधरोष्ठाच्या सीमेतच मिशांना ठेवणें हा मुख्य नियम 'फ्रेंच कटा'चा आहे. बहुधा मिशांचे माप या मताचे लोक नाकाच्या रुंदीवरून ठरवितात. नाकाच्या रुंदीइतक्या मिशा असल्यास प्रत्यवाय नाहीं. त्यांची किमान मर्यादाहि नाकांतील मधल्या पडद्याच्या जाडीइतकी आहे. अशा पद्धतीचा अवलंब इराण्यांनीं केला, यावरून फ्रेंचाचा वरचष्मा येथें किती आहे तें कळून येईल. सुगंधी द्रव्यांतहि फ्रान्समधील दुकानदारांनाच प्राधान्य असल्यानें फ्रेंच अत्तरें, लव्हेंडरें वगैरे केशभूषेचें साहित्य पुष्कळच खपतें. सर्वच बाबतींत फ्रेंचांचें अनुकरण इराण्यांनीं केलें आहे असें म्हणतां येतें.

इराणांत फ्रेंच संस्कृतीचा, चालरीतीचा, आणि भाषेचा पगडा अत्यंत आहे. याचें कारण नेपोलियनच्या कालापर्यंत जाऊन भिडतें. नेपोलियनच्या अनेक महत्त्वाकांक्षांपैकीं हिंदुस्थानाला येणें--नव्हे जिंकणें--ही एक महत्त्वाकांक्षा होती. आणि ती पुरी करण्यासाठीं त्यानें इराणी शहाशीं संबंध लावण्याकरितां वकील पाठविले होते. त्यामुळे किंवा फ्रेंच मिशनऱ्यांच्या प्रयत्नामुळे बोनापार्टचें नांव सर्वतोमुखीं आहे. इतकेंच नव्हे तर नेपोलियनच्या आयुष्यक्रमांतील महत्त्वाचे प्रसंग दाखविणारीं चित्रें सर्वत्र पसरलेलीं आहेत. देवादिकांचीं चित्रें विकतात तशीं इकडे इराणांत नेपोलियनचीच चित्रें फार आढळतात! इराणांतील तरुण पिढी बहुधा फ्रान्समध्येंच शिकलेली असून इंग्रजीपेक्षां फ्रेंच भाषेशींच निकट संबंध असतो.

फार्सी भाषा संस्कृताशीं बरीच जुळते! आरबीपेक्षां ती बोलण्यास आणि समजण्यास सोपी आहे. कानडी प्रांतांत हेल काढून बोलण्याची रीत आहे, तशीच इराणांत सर्वत्र आढळेल. तेहेरानमध्येंच नव्हे, तर इराणांत सर्वत्र फार्सी, तुर्की, रूसी किंवा फ्रेंच यांपैकीं तीन भाषा जाणणारे लोक दिसून येतात. आरबीहि कित्येक बोलूं शकतात. पण निदान तीन भाषा बोलतां येणारे लोक आपल्याकडे किती आहेत? साधा अशिक्षित म्हणजे लिहितां वाचतां न येणारा मनुष्य असला तरी तो तीन भाषा बोलूं शकतो हें पाहून आश्चर्य वाटतें.

घोड्याच्या ट्रॅमगाड्या, मोटार बस आणि घोड्याच्या बग्या हीं मुख्य वाहतुकीचीं साधनें तेहेरानमध्ये आहेत. शहरांतील रस्ते रुंद असून जागोजाग शहरसुधराईसाठीं चाललेली खटपट दृष्टीस पडते. डोंगराच्या पायथ्याला ही राजनगरी वसली असून रस्त्यांतून बर्फाच्छादित गिरिभाग दिसतो. इतकेंच नव्हे तर इराणांतील एल्बुर्झ पर्वतांतील अत्युच्च शिखर 'देमावांद' हें १९००० फूट उंचीचें असल्यानें ते तेहेरानमधून दिसतें. आकाशांतील मेघमाला वरचेवर निरनिराळें स्वरूप धारण करीत असल्याकारणानें कधीं अत्यंत थंड वारे सुटून हिमवृष्टि होते, केव्हां स्वच्छ सूर्यप्रकाश असतो, केव्हां केव्हां पावसाळ्याची आठवण करून देणारी झिमझिमहि चालू असते. असे सर्व प्रकार १।२ तासांच्या अवधींत घडून येतात त्यामुळें निसर्गाच्या ऋतूंचा कार्यक्रम या प्रांतीं अत्यंत अनिश्चित असावा असें वाटते !

# चौदावें मराठी साहित्यसंमेलन

## बेळगांव येथील अधिवेशन

### अध्यक्षांचें भाषण

अध्यक्ष प्रो. शिवराम महादेव परांजपे यांनीं आपल्या भाषणांत प्रथम संमेलनाचा पूर्वेतिहास सांगितला. १८८५ साली पुण्यास न्या. रानडेप्रभृति मंडळींनीं पहिले संमेलन भरविलें. न्या. रानडे यांनीं अनेक राष्ट्रसंवर्धक गोष्टींचा उपक्रम केला. त्यांपैकींच संमेलन ही एक गोष्ट होय. दुसरें संमेलन १९०६ मध्ये सातार्‍यास व तिसरें पुनः पुण्यास भरलें. या वेळीं संमेलनाला एकसूत्रबद्धतेचें नियंत्रण असावें म्हणून साहित्यपरिषद् ही मध्यवर्ती स्वरूपाची कायमची संस्था स्थापण्यांत आली. १९१२ साली अकोला येथील संमेलनांत साहित्यपरिषदेची पुनर्घटना करण्यांत आली. १९१७ साली इंदूर मुक्कामीं भरलेल्या संमेलनप्रसंगीं श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर यांजकडून दहा हजार रु.ची मदत परिषदेस मिळाली. तेव्हांपासून ती सुप्रतिष्ठित झाली. हल्लीं संस्थेमार्फत महाराष्ट्र साहित्यपत्रिका हें त्रैमासिक मुखपत्र श्री. ना. गो. चापेकर यांच्या संपादकत्वाखालीं निघते. याप्रमाणें त्रोटक वृत्तांत सांगून अध्यक्षांनीं त्याचें पुढीलप्रमाणें समालोचन केलें.

"आजपर्यंत भरलेल्या संमेलनांपैकीं पहिलें आणि दुसरें यांच्या दरम्यानचें वीस वर्षांचें अंतर सोडून दिलें तर १९०६ पासून १९०९ पर्यंतचीं संमेलनें नियमितपणें भरत गेलीं. पण याच्या पुढील सतरा वर्षांच्या अवधिमध्यें हीं संमेलनें भरविण्याच्या बाबतींत अतिशय अनिश्चितपणा उत्पन्न झाल्याचें आढळून येतें. कदाचित् १९०९ सालापासून महाराष्ट्रांत जी एक विलक्षण राजकीय परिस्थिति उत्पन्न झालेली होती त्याचाही असा हा परिणाम झाला असेल. १९२६ पासून आतां फिरून हीं संमेलनें सालोसाल नियमितपणें भरूं लागलीं आहेत.

संमेलनांच्या एकंदर तेरा स्थळांपैकीं पुण्यानें पांच वेळां, मुंबईने दोन वेळां आणि बडोद्यानें दोन वेळां हीं संमेलनें भरविलीं आहेत. मराठी भाषा बोलणार्‍या संस्थानांच्या दृष्टीनें पाहिलें, तर बडोदे, इंदूर आणि ग्वाल्हेर या संस्थानांनीं हीं संमेलनें बोलावण्यांत भाग घेतला, आणि पूर्वीच्या पेशवाईच्या वेळच्या राजकारणांतील मराठा कॉन्फिडरसीप्रमाणें हल्लींच्याहि या वाङ्मयविषयक मराठी कॉन्फिडरसीमधील आपापलीं कर्तव्ये करण्याला हीं प्रमुख संस्थानें आज पुढें येत आहेत, ही गोष्ट अभिनंदनीय आहे आणि अकोल्यानें या संमेलनाला एकदां आपल्या घरीं प्रेमाचें आमंत्रण देऊन वर्‍हाडचें महाराष्ट्राशीं असलेलें आपलें जुनें जिव्हाळ्याचें नातें प्रस्थापित केलें आहे. या बंधुभावाबद्दल वर्‍हाडच्यासंबंधानें कोणाला अभिमान वाटणार नाहीं ?

या तेरा संमेलनांचा मुख्य हेतु मराठी भाषेची अभिवृद्धि करणें हाच होय. आपल्या भाषाभिवृद्धीचे निरनिराळ्या लोकांकडून वैयक्तिक प्रयत्न चाललेलेच असतात, परंतु त्या भिन्नभिन्न प्रयत्नांचें एकीकरण व्हावें, त्यांच्यांत एकसूत्रीपणा उत्पन्न व्हावा आणि त्यांना हल्लींच्या आपल्या राष्ट्रीय आकांक्षांच्या दृष्टीनें सुसंघटित स्वरूप यावें, हाच मुख्यत्वेंकरून असलीं सामुदायिक संमेलनें भरविण्यांतील मुख्य हेतु असतो. आतां भाषाभिवृद्धि हाच जर मुख्य हेतु असेल, तर ती भाषेची अभिवृद्धि दोन प्रकारांनीं होत असते हें उघड आहे. ते दोन प्रकार म्हणजे एक नैसर्गिक व दुसरा कृत्रिम. यांत नैसर्गिक प्रकार हाच खरा महत्त्वाचा होय; आणि कृत्रिम प्रकार हे फक्त त्या 'निसर्गाला केवळ मदत करण्याकरितां म्हणूनच उपयोजावयाचे असतात.

## भाषाभिवृद्धीचीं साधनें

व्यवहार आणि विचारविनिमय हे हेतू सिद्धीस नेण्याकरितां पृथ्वीच्या पाठीवर आतांपर्यंत किती भाषा निर्माण झाल्या असतील आणि किती लयाला गेल्या असतील, याचा कोणत्याहि इतिहासाला आणि कोणत्याहि प्राचीन आंकडेशास्त्राला अद्यापि पत्ता लागलेला नाहीं. तरी माझी भाषा तेवढी देवभाषा आहे अशी लोक आपल्या भाषेबद्दल प्रौढी मिरवूं लागतात. ते आपल्या भाषेला मातृभाषा असें नांव देऊन तिला मातृवत् पूज्य मानूं लागतात. अशा स्वतःच्या भाषेबद्दल स्वाभिमानमूलक कल्पना त्याच्या डोक्यांत प्रसव पावूं लागतात. त्या भाषेची अभिवृद्धि कशी होईल, याच्याबद्दल त्याच्या मनांत सहजच पुढे विचार उत्पन्न होऊं लागतात. पण कोणत्याहि भाषेची अभिवृद्धि कशी होईल, या प्रश्नाबद्दलचें अगदीं पहिलें आणि अगदीं साधें उत्तर असें आहे कीं, जितके त्या भाषेचे बोलणारे जास्त, तितकी त्या भाषेची अभिवृद्धि जास्त. म्हणजे थोडक्यांत सांगावयाचें झालें, तर भाषेची अभिवृद्धि ही त्या भाषेंतील लोकसंख्येवरून अजमावली जाते. पण अशा लोकांची संख्या वाढणे हें देखील फिरून थोड्याबहुत अंशाने निसर्गावरच अवलंबून रहातें. राज्याभिवृद्धीनेंहि पुष्कळ वेळां भाषाभिवृद्धि होत असते. रोमन लोकांच्या प्रजासत्तात्मक राज्यांतील आणि साम्राज्यांतील योद्धे जिकडे जिकडे प्रांत काबीज करीत गेले, तिकडे तिकडे त्यांची लॅटिन भाषा त्यांच्या पाठीमागून गेली, आणि युरोप खंडांतील बहुतेक देशांतील सुप्रबुद्ध लोकांमध्यें थोड्या शतकांपूर्वी त्याच लॅटिन भाषेचा जिकडे तिकडे अत्यंत प्रसार झालेला होता. हल्लींच्या इंग्लिश भाषेचीहि तशीच गोष्ट झालेली आहे. आपल्या मराठी भाषेचीच गोष्ट आपण घेतली तर तेथेंहि आपल्याला वरील सिद्धांताचें प्रत्यंतर दृष्टोत्पतीस येतें. आज मद्रासेतील तंजावरांत, गुजराथेंतील बडोद्यांत, गोंडवनांतील नागपुरांत आणि उत्तर–हिंदुस्थानांतील धार, देवास, इंदूर, ग्वाल्हेर, सागर, झांशी इत्यादि ठिकाणी जी मराठी भाषा बोलली जात आहे, त्याचें कारण काय? एक वेळ अशी होती कीं, ज्या वेळीं खुद्द मद्रास–सरकारचे आणि दक्षिण–हिंदुस्थानांतील इतरहि कित्येक संस्थानांचे जमाखर्ची हिशेब मराठीमध्यें ठेवले जात असत. या सर्व ठिकाणी पूर्वीच्या शूर मराठे शिपायांनी आणि सरदारांनीं आपली मराठी राज्यें स्थापन केलीं, म्हणूनच तेथें मराठी भाषा बोलली जात आहे.

आपल्या मराठी भाषेनें वर सांगितल्याप्रमाणें जसे कांहीं नवीन प्रांत काबीज केले आहेत, त्याचप्रमाणें तिनें आपल्या ताब्यांतील कांहीं जुने प्रांत आपल्या हातून घालविल्याचींहि कांहीं उदाहरणें आहेत. इंग्रजी भाषेने आपल्या मराठी भाषेच्या हद्दीमध्ये केलेलें अतिक्रमण तर महशूरच आहे. पण त्याशिवाय हल्ली दक्षिण-हैद्राबाद येथे मुसलमानी अमदानी चालू आहे, तो मूळचा बहुतेक प्रांत आपल्या मराठी भाषेच्या अमलाखालील होय. वेरूळचीं लेणी, दौलताबादचा किल्ला, देवगिरीच्या राजांचें राज्य, प्रतिष्ठान शहर आणि त्या बाजूचा गोदावरी नदीच्या किनाऱ्यावरील बराच मोठा भाग, या सर्व प्रदेशांतून पूर्वी एकदां आपली मराठी भाषाच बोलली जात होती. महानुभाव पंथाचे पूर्वीचें वाङ्मय, ज्ञानेश्वरमहाराजांची ज्ञानेश्वरी, श्रीएकनाथमहाराजांचें एकनाथी भागवत व इतर अनेक ग्रंथ या गोष्टींची खूण म्हणून अद्यापिहि तेथील अवशेष कायम आहेत. तसेच गोव्याचा प्रांत हेंहि अशाच प्रकारचें दुसरें एक उदाहरण होय. गोवे हा मराठ्यांचा मुलूख, आणि गोव्यांतील भाषा ही मराठी भाषा. पण तेथे आज पोर्तुगीज भाषेनें आपले डोकें खुपसले आहे. तरी पण या दोनहि प्रांतांमध्यें परकीय भाषेला न जुमानतां आपली मराठी भाषा बराच टिकाव धरून राहिली आहे, ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे.

## शिक्षणाचा प्रसार

राज्यप्रसाराचा हा मार्ग सध्या तरी निदान आपल्या मराठी भाषेच्या प्रसाराला मोकळा नाहीं. अशा स्थितींत शिक्षणाचा प्रसार हा एक निरुपद्रवी उपाय होय. मुंबई इलाख्यांतील एकंदर सुमारे अडीच–पावणेतीन कोटी लोकसंख्येपैकीं मराठी भाषा बोलणारे लोक जवळजवळ एक कोटि निघतील. तरी यांतील सर्वच लोक मराठी भाषेच्या अभिवृद्धीला किंवा मराठी वाङ्मयाच्या वाढीला मदत करण्याला लायक आहेत असे नाहीं. एक कोटि ही संख्यादेखील कांहीं थोडकी नाहीं. पण यापैकीं सुशिक्षित किंवा निदान साक्षर तरी किती आहेत? यांचें प्रमाण शेकडा आठदहाच्या आंतच पडतें. हें प्रमाण आपण वाढविलें पाहिजे.

हल्लींच्या आपल्या मराठी भाषेच्या उत्क्रांतीकडे आपण पाहिलें, तर आपल्याला असें आढळून येतें कीं, इतर भाषांतील चांगले वाङ्मय आपल्या मराठी भाषेमध्यें आणण्याचेच अजून आपले प्रयत्न चाललेले आहेत. पण आपलें मराठी वाङ्मय लोकांनीं आपल्या भाषांतून भाषांतरित करून घ्यावें, अशी लालसा इतरांच्या मनांत उत्पन्न होईल, इतक्या दर्जाचें वाङ्मय अजून आपण आपल्यामध्यें उत्पन्न करण्याला समर्थ झालेलें नाहीं. संस्कृत भाषेंतील ग्रंथ

पाहिले, तर ते आपल्या पूर्वजांनीं दुसऱ्या कोणत्या भाषांतून भाषांतरित करून घेतले असतील, असे दिसत नाहीं. ज्योतिष, गणित वगैरेसारखे कदाचित् कांहीं विषय कांहीं विशिष्ट ब्राबतींपुरते वगळले असतां बाकींची आपल्या आर्यांची ग्रंथरचना स्वयंस्फूर्तिमूलकच असली पाहिजे असें दिसते. पण बाकीच्या अर्वाचीन भाषांची तशी गोष्ट मुळींच नाहीं. हल्लींच्या ज्या इंग्रजी भाषेवर सूर्य कधींच मावळत नाहीं त्या इंग्रजी भाषेतीलहि पुष्कळ पुस्तकें ग्रीक, लॅटिन, फ्रेंच, जर्मन, रशियन, संस्कृत, पाली, इजिप्शन, पर्शियन वगैरे भाषांतून भाषांतरित करून घेतलेलीं आहेत व फ्रेंच, जर्मन वगैरे इतर अर्वाचीन भाषांचीहि अशीच स्थिति आहे. आणि याच सार्वत्रिक क्रमाचें आपण मराठीमध्येंहि अनुकरण चालविलेले असून संस्कृत, पर्शियन, इंग्लिश, फ्रेंच वगैरे भाषांतील चांगले ग्रंथ आपण मराठी वाचकांपुढें सादर करीत आहों. हा क्रम कांहीं दूषणार्ह आहे असें नाहीं. जें चांगलें असेल, ते दुसऱ्यापासूनहि अवश्य घ्यावें. पण आपली मराठीच्या अभिवृद्धीची महत्त्वाकांक्षा एवढ्यानेंच परितृप्त होतां कामा नये. आपल्या भाषेमध्यें आपण असें उत्कृष्ट वाङ्मय निर्माण केलें पाहिजे कीं, त्या वाङ्मयांतील सुंदर आणि प्रतिभासंपन्न पुस्तकांचें आपल्या भाषेंत आपण भाषांतर केव्हां करून घेऊं, अशी इतर भाषा बोलणारांच्या मनांत पिपासा उत्पन्न होऊन त्यांनीं त्याकरितां आपापल्या भाषांतून ट्रॅन्स्लेशन सोसायट्या स्थापन केल्या पाहिजेत. बंगाल्यांतील बंकिमचंद्र, रवींद्रनाथ टागोर वगैरेंसारख्या लेखकांनीं आपल्या बंगाली भाषेला अशा उच्च दर्जावर आणून ठेविलें आहे, व त्यामुळें त्यांचीं इतर भाषांतून भाषांतरें झालेलीं आहेत. त्याचप्रमाणे तुळशीदास, कबीर, मिराबाई इत्यादि हिंदी कवींनीहि आपलीं हिंदीमधील काव्यें हिंदुस्थानांतील सर्व भाषांतील लोकांना प्रिय होतील, इतक्या उत्कृष्टतेला नेऊन पोचविलेलीं आहेत. तितक्या स्पृहणीय स्थानाप्रत मी आपल्यांतील ग्रंथांना केव्हां नेऊन ठेवीन, अशी मराठी प्रतिभेला रात्रंदिवस तळमळ लागून राहिली पाहिजे."

यानंतर हिंदी, बंगाली, गुजराथी, सिंधी इ. संस्कृतोत्पन्न भाषा देवनागरी लिपीमध्यें लिहिण्याचा प्रचार झाल्यास सर्वांचाच फायदा होईल या दृष्टीनें नागरी प्रचारणी सभेच्या प्रयत्नांना या भाषांपैकीं प्रत्येक भाषेच्या अभिमान्यांनीं उत्तेजन देणें अवश्य आहे असें अध्यक्षांनीं सांगितलें. उर्दूहि हल्लीं रोमन लिपीमध्यें प्रचलित करण्याचा सरकारचा प्रयत्न चालू आहे. त्याऐवजीं उर्दू देवनागरी लिपींतच लिहावी असें अध्यक्षांनीं आपलें मत प्रदर्शित केलें. "आपल्या देशांतील अनेक भाषा निरनिराळ्या लोकांना समजूं लागणें या गोष्टींत राष्ट्रीय हितदृष्टि आहे. यांत एक भाषा दुसरीवर आक्रमण करीत आहे अशा तऱ्हेचा गैरसमज करून घेणें चुकीचें आहे" असें अध्यक्षांनीं बजावलें.

# आतां ही चळवळ नेटानें करा

बार्डोलीची सारावाढ सरकारनें जितके आढेवेढे घेत व कुढ्या मनानें कमी केली तितके सत्याग्रहाचें सामर्थ्य लोकांपुढें अधिक स्पष्ट झालें. कारण सरकारनें मनांतून नको असतांना, अपरिहार्य म्हणून एखादी गोष्ट केली म्हणजे ती करण्यांत स्वतःच्या प्रवृत्तीपेक्षां दुसऱ्यानें उत्पन्न केलेली अडचण हीच अधिक प्रेरक आहे असें स्पष्ट दिसून येतें. सरकारचें मन खुलें असतें तर, दे. वल्लभभाई यांनीं आपल्या मुलाखतींत म्हटल्याप्रमाणें, आपल्या अधिकाऱ्यांच्या चुकीनें बार्डोलीच्या शेतकऱ्यांस त्रास सोसावा लागला याबद्दल सरकारनें दिलगिरी प्रदर्शित केली असती. पण जेथें नुसती दिलगिरी प्रदर्शित करण्याचा खुलेपणा नाहीं तेथें चुकलेल्या अधिकाऱ्यांना शासन अगर समज देण्याची गोष्ट दूरच राहिली. चूक करणें हें एकपटीनें गर्हणीय असलें तर त्या चुकीचें बेगुमानपणें समर्थन करणें हें शतपटीनें गर्हणीय होय. आणि असेंच समर्थन सरकारी रेव्हेन्यू अधिकाऱ्यांपासून गव्हर्नरांपर्यंत सर्वांनीं केलें. बार्डोलीची आकारणी बरोबर आहे इतकेंच नव्हे तर उदारपणाची आहे असें हे अधिकारी दडपून सांगत होते व त्यांचीच री डोळे मिटून रेव्हेन्यू मेंबर व गव्हर्नर ओढीत होते. ही चुकीची आकारणी जबरदस्तीनें वसूल करण्याचा प्रयत्न करून व पुढें चौकशी कमिटी नेमतांनाहि ही चुकीची वाढ अगोदर सरकारच्या खजिन्यांत भरली गेली पाहिजे असा आग्रह धरून सरकारनें एका मूळ चुकीवर अनेक चुक्यांचा हटवादीपणानें डोलारा रचला. बार्डोली चौकशी कमिटींतील सरकारच्याच अधिकाऱ्यांनीं या डोलाऱ्याचा पाया काढून घेतला असला तरी हा डळमळीत डोलारा आपल्या अधिकाराच्या जोरावर कायम ठेवण्याचा सरकारचा इरादा आहे.

आकारणी करतांना माहिती गोळा करण्यांत चुका कशा होतात हें चौकशी कमिटीनें स्पष्ट दाखविलें असलें तरी लँड रेव्हेन्यू कोडाला धक्का न लावण्याची खबरदारी घेतली आहे. लॅ. रे. कोडाच्या १०७ कलमान्वये साराआकारणी करण्याचे कामांत खंडाचा आधार घेणें कायदेशीर आहे; मात्र हा आधार घेतांना खरा खंड शोधून काढणे हें काम सावधगिरीनें व बारकाईनें केले पाहिजे, तसें जयकर व अंडरसन या अधिकाऱ्यांनीं बिलकुल केलें नाहीं येवढेंच कमिटीचें म्हणणें. म्हणजे बार्डोलींत वल्लभभाईंनीं उत्पन्न केलेल्या अडवणुकीचा तात्पुरता निर्वाह करावा पण लँड रेव्हेन्यू कोडाच्या पुनर्घटनेबद्दल चाललेल्या चळवळीस यत्किंचितहि आधार सांपडूं नये अशी चौकशी कमिटीनें खबरदारी घेतली. त्यांतहि पुनः कमिटीचा हा अर्धा निकाल सरकारनें सर्वस्वी मान्य केला असता तर बार्डोलीचा फायदा इतरांना थोडाबहुत मिळाला असता. खंडाचे आंकडे अविश्वसनीय असतात, त्यांतून खरा खंड किती हें शोधून काढणें कठीण असतें येवढी गोष्ट सरकारनें मान्य केली असती तरी इतर ठिकाणीं याच रेव्हेन्यू खात्यांतील अधिकाऱ्यांकडून झालेल्या अशाच तऱ्हेच्या चुका सरकारच्या पदरांत बार्डोली रिपोर्टाच्या आधारें घालण्यास लोकांना मार्ग राहिला असता. पण सरकारनें फक्त सारा कमी करण्याची कमिटीची सूचना तेवढी स्वीकारली. चौकशी कमिटीने या निर्णयाला जोडलेली कारणपरंपरा मात्र स्वीकारली नाहीं. सारांश, कमिटीनें अर्धा निकाल दिला व सरकारनें त्यांतला चतकोर स्वीकारला! कारणपरंपरा न स्वीकारतां निकाल तेवढा स्वीकारणें असली शक्कल इरसाल इभ्रतनिष्ठांशिवाय दुसऱ्या कोणास सुचवायाची नाही व सुचली तरी निर्ढावलेल्या निर्लज्जपणाशिवाय ती कोणाला पुढें करावीशी वाटणार नाहीं. सरकारच्या चुक्या सप्रमाण पदरांत घातल्या तरीहि त्या मान्य करावयास सरकार तयार नाहीं. फक्त बार्डोलींतील सत्याग्रहाचा ससेमिरा आपल्या मागचा सुटावा येवढ्यासाठीं सारावसुलीचे कांहीं रुपये कमी करून तेवढ्या हिरण्य-प्रायश्चित्तावर सरकार या प्रकरणांतून मोकळें होऊं पाहात आहे.

पण सरकारला असें निसटूं देणें अगर न देणें हें लोकांच्या यापुढील चळवळीवर अवलंबून आहे. बार्डोलीची सारावाढ बाजूला सारली गेली येवढ्यावर वल्लभभाईंची वैयक्तिक जबाबदारी संपली याबद्दल त्यांनीं समाधान व्यक्त केलें आहे. पण सर्व मुंबई इलाख्यांतील शेतकरी बार्डोलीच्या लढ्याकडे आत्मीय भावनेच्या उत्सुकतेने पाहात होते व सर्व ठिकाणचे शेतकऱ्यांचे हितचिंतक बार्डोलीच्या लढ्याला पाठिंबा देत होते ते या दृष्टीनें कीं बार्डोलीच्या प्रश्नाबरोबर आपलाहि प्रश्न सुटेल. वल्लभभाईंनीं हा लढा मर्यादित प्रश्नावर चालविला असेल. पण लोक त्या लढ्याकडे सरकारी सारावाढीच्या धोरणाची परीक्षा करणारा लढा या व्यापक दृष्टीनेंच पाहात होते. वल्लभभाई हे मर्यादित स्वरूपाच्या लढ्यामध्यें पूर्ण गढून गेले असल्यामुळें त्यांना हा व्यापक प्रश्न चौकशीच्या निर्णयानंतर आपोआप उत्पन्न झाला असें वाटत आहे. पण वस्तुतः तो पूर्वीच उत्पन्न झाला होता व तो बार्डोलीच्या उदाहरणानें सुटेल अशी लोकांची अपेक्षा होती. आणि तशा तऱ्हेचा अंशतः कमिटीचा निर्णय झाला असतांहि सरकारनें तो मान्य केला नाहीं. अर्थात् जमीनमहसुलाच्या धोरणांत आमूलाग्र बदल घडवून आणावयाचा असेल तर लोकांनीं बार्डोलीवर अवलंबून न राहतां आणखी चळवळ व आणखी असेच सत्याग्रह केले पाहिजेत असेंच सरकार पर्यायानें लोकांना एका प्रकारचें आव्हानच करीत आहे. वल्लभभाईंची मर्यादित जबाबदारी संपली. पण त्याबरोबरच साराआकारणीच्या व्यापक प्रश्नावर पूर्वीपासून प्रयत्न करणारांची जबाबदारी मात्र द्विगुणित झाली आहे. नुसत्या एका सत्याग्रहानें भागावयाचें नाहीं, असे सत्याग्रह अनेक ठिकाणीं किंवा प्रत्येक ठिकाणी झाले तरच सरकारच्या रेव्हेन्यू खात्याची अधिकारमदानें कणखर बनलेली व इभ्रतनिष्ठेनें आवळलेली गांठ सुटेल, एरवीं सुटावयाची नाहीं असाच सरकारच्या बार्डोलीसंबंधाच्या ठरावाचा अर्थ आहे. आणि म्हणूनच यापुढे बार्डोलीच्या धर्तीवर इतर ठिकाणीं सत्याग्रहाची चळवळ करावी लागली तर त्याची जबाबदारी महात्मा गांधींच्या सत्याग्रहतत्त्वप्रसारकांवर न राहतां ती सर्वस्वी सरकारावर राहील असें नेमस्त मताचीं वृत्तपत्रेंहि स्पष्टपणें सांगत आहेत.

गेल्या वर्षी मुंबई कौन्सिलांत सरकारनें लॅंड रेव्हेन्यू बिल आणलें होते व त्यांत साराआकारणीचा खंड हा पाया असावा हें निश्चित करून खंडाच्या रकमेच्या निम्म्या रकमेइतका सारा आकारण्याचा सरकारचा हक्क पक्का कायदेशीर करून टाकण्याचा घाट घातला होता. त्या वेळीं शेतकऱ्यांनीं जोराची चळवळ करून सरकारला हें बिल तहकूब ठेवावयास लावले. त्याबरोबरच जमिनीच्या तुकड्यांच्या बिलासंबंधानें चळवळ झाली व तेंहि बिल सरकारला तहकूब ठेवावें लागले. या चळवळीची उचल मुख्यतः महाराष्ट्रांतच झाली व शेतकऱ्यांच्या भाकरीचा प्रश्न जातिभेदातीत असल्यामुळें महाराष्ट्रांतील

ज्ञातिनिष्ठ पक्षहि या चळवळींत प्रामुख्याने सामील झाले होते. याचा परिणाम पुण्यांतील शेतकरी परिषदेंत व कौन्सिल हॉलपर्यंत गेलेल्या शेतकऱ्यांच्या मिरवणुकींत दिसून आला. लँड रेव्हेन्यू बिल सरकारने तहकूब ठेवले तरी जुन्या सारावाढीच्या पद्धतीनें सर्वत्र सारावाढ करून ठेवून, लँड रेव्हेन्यू बिलांत लोकपक्षानें कांहीं दुरुस्त्या केल्या तरी त्या तीस वर्षेपर्यंत, म्हणजे पुढील पाहणी होईपर्यंत, निरुपयोगी व्हाव्या असें सरकारनें धोरण बांधलें व कायदे-कौन्सिलांतील दोनदां पास झालेल्या ठरावांस न जुमानतां एकंदर छत्तीस तालुक्यांत फेरपाहाणी करून साऱ्याची वाढ केली. आणि अशीच सर्व इलाख्यांत क्रमाक्रमाने फेरपाहणी करून रेव्हेन्यू खात्याचे दरवाजे कायदेमंडळाला हात घालतां येऊं नये अशा रीतीनें तीस वर्षे बंद करून ठेवण्याचे सरकारचे धोरण उघड दिसत आहे. लँड रेव्हेन्यू बिल मागें घेण्यास लावल्यावर शेतकऱ्यांच्या चळवळीचा रोख सारावाढीच्या धोरणाला पायबंद कसा बसेल या प्रश्नाकडे वळला व बार्डोलीचा लढा याच सुमारास सुरू झाल्यानें या चळवळीतील लोकांचे लक्ष बार्डोलीच्या लढ्यानें वेधून घेतले. बार्डोलीचे सत्याग्रही हा सार्वत्रिक प्रश्न सोडवीत आहेत अशा भावनेनेंच या चळवळींतील सर्व पक्षाच्या मंडळींनी बार्डोलीच्या चळवळीची लोकांना माहिती देणे, त्या चळवळीचें अभिनंदन करणे व तिला एकमुखी पाठिंबा देऊन मदत करणे अशा प्रकारचा उद्योग केला.

पण बार्डोलीनें हा सार्वत्रिक प्रश्न सुटला नाही इतकेच नव्हे, तर असे सत्याग्रह व तदनुषंगिक चळवळ पुढें चालविल्याशिवाय शेतकऱ्यांच्या मानेभोवतीं आवळलेला रेव्हेन्यू खात्याचा फांस सुटणार नाही असेंच सरकारी ठराव स्पष्ट सांगत आहे. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या सुचनेनुसार लॅंड रेव्हेन्यू कोडाची पुनर्घटना करावी यासंबंधी कौन्सिलांतून ठराव आणण्याचा उपक्रम महाराष्ट्रांतूनच झाला. यासाठी लॅंड रेव्हेन्यू कमिटी नाशिकचे श्री. रामभाऊ प्रधान यांच्या ठरावामुळें नेमली गेली. कमिटींतहि महाराष्ट्रांतील सर्व जातींच्या कौन्सिल-सभासदांनी लोकपक्षाची बाजू मांडली. कमिटीचा निकाल धुडकावून लावून सरकारनें आपले जुनेंच धोरण कायम करण्याच्या इराद्यानें आणलेले लॅंड रेव्हेन्यू बिल परत घेण्यास लावण्याच्या यशस्वी चळवळीची उठावणीहि मुख्यतः महाराष्ट्रांतच झाली. सरकारने बिल तहकूब ठेवल्यामुळें व बार्डोलीच्या प्रयोगानें लक्ष वेधलेलें असल्यामुळे जमीनमहसुलाच्या सरकारी धोरणांतच आमूलाग्र फरक घडवून आणण्याची चळवळ थोडीशी मागे पडली होती. बार्डोलीच्या निकालानें व त्यावरील सरकारी ठरावानें हा प्रश्न पुनः उपस्थित केला आहे. यासाठीं यापुढें यासंबंधांत शेतकरी व त्यांचे कैवारी अगर हितचिंतक यांना कराव्या लागणाऱ्या चळवळीचें थोडेसे दिग्दर्शन आम्ही गेल्या अंकीं केले होते. बार्डोलीची नुसती सारावाढ कमी करणें म्हणजे केवळ तात्पुरता व वरवरचा उपाय होय. त्यायोगे सर्व इलाख्यांतील शेतकऱ्यांतील असंतोष नाहींसा होणार नसून उलट वाढणार आहे. जमिनीवर जो निवळ नफा उरतो त्याचा हिशेब करून त्यावर सारा-आकारणी करावी अशी लोकांची पहिल्यापासून मागणी आहे. त्यावर सरकारी अधिकारी असा आक्षेप घेत असत कीं निवळ नफ्याचा हिशेब करणे हें फार किचकट व अवघड काम आहे व असा स्वतंत्र हिशेब करण्यापेक्षां खंडाच्या रकमेवरून नफ्याचा अंदाज करणे सुलभ आहे. पण बार्डोली-चौकशीच्या रिपोर्टानंतर ही सबब सरकारला पुढे करतां यावयाची नाहीं. कारण खरे व विश्वसनीय खंडाचे आंकडे मिळविणे किती दुर्घट आहे हें या रिपोर्टाने दाखविलें आहे. अर्थात् जो मार्ग सोपा म्हणून सरकार म्हणत होतें तो तसा सोपा नाहीं हें सिद्ध झाल्यावर, 'निवळ नफ्यावरून साऱ्याची आकारणी करा' या लोकांच्या मागणीला दुजोराच मिळत आहे.

अविश्वसनीय अशा खंडाच्या आधाराला सरकारी अधिकारी इतकें कां महत्त्व देतात याचें मूळ कारण निराळे आहे. शेतीच्या निवळ नफ्यावर कर-आकारणी केली तर खातेदार हा शेतजमिनीचा मालक मानावा लागतो. जमिनीवरील रयतेची मालकी दर्शविणाऱ्या सर्व शब्दयोजना व पद्धति बाजूस सारून सरकारची मालकी दर्शविणाऱ्या योजना सरकारला रूढ करावयाच्या आहेत. यासाठीच खंडाला अविश्वसनीय ठरविणारा बार्डोलीचा रिपोर्ट सरकार सर्वस्वी स्वीकारण्यास तयार नाही. बार्डोलीने सत्याग्रह करून आपल्यापुरती सारावाढ वांचविली. पण शेतकरी हा जमिनीचा मालक, सारा आकारावयाचा तो निवळ नफ्यावर, आणि त्यांतहि सरकारने पंचवीस टक्क्यांपेक्षां अधिक आकारणी करावयाची नाहीं हीं तत्त्वे सरकारच्या गळीं उतरवावयाचीं असतील तर मोठ्या प्रमाणावर चळवळ व्हावयास पाहिजे. या बाबतीतील लोकक्षोभाचें विराट स्वरूप सरकारपुढें उभे करण्याची पहिली पायरी म्हणजे सभा, परिषदा, ठराव व हजारो सह्यांचे अर्ज यांचें द्वारा मतप्रदर्शन हीं होय. हल्लीं ज्या ज्या तालुक्यांत सारावाढ झाली आहे तेथे तेथें बार्डोलीप्रमाणें ज्या चुक्या झाल्या असतील त्या दुरुस्त करण्याकरितां चौकशी करणें, नव्या पाहणीचें काम तहकूब ठेवणे व वर निर्दिष्ट केलेल्या तत्त्वानु-

सार लँड रेव्हेन्यू कोडाची पुनर्घटना होईपर्यंत कोठेंहि फेरपाहणी व वाढ न करणें या तीन मागण्या या ठरावांतून व अर्जांतून असाव्या. आणि या मागण्या सरकार मान्य करणार नाहीं तर त्याचा अर्थ सरकार लोकांना सत्याग्रहास प्रवृत्त करीत आहे असाच होईल हेंहि या सभांतून, ठरावांतून व अर्जांतून सरकारला बजावावें.

पण ही केवळ पहिली पायरी आहे. या सभा, ठराव व अर्ज करण्याच्या चळवळींत सर्व ग्रामसेवा-मंडळें, खातेदारसंघ, शेतकरी संरक्षक मंडळें यांनीं सामील होऊन प्रत्येक सभेंत व प्रत्येक शेतकऱ्याची सही घेतांना हें बजावावें कीं, या सौम्य मार्गाला सरकारनें भीक घातली नाहीं तर बार्डोलीचा मार्ग तुम्हास अनुसरावा लागेल. अर्थात् बार्डोलींत काय झालें, कसें झालें, संघटना कशा प्रकारची करावी लागली हें लोकांना याच वेळी समजावून द्यावें लागेल. आणि त्या संघटनेची पूर्व-तयारीहि करावी लागेल. बार्डोलीचा पहिला बार हुकला तेव्हांपासून बार्डोलीची संघटना सतत चालू होती, म्हणूनच इतक्या यशस्वीपणानें बार्डोली आज सरकारी जबरदस्तीला तोंड देऊं शकली. अर्थात सत्याग्रह करूं असें नुसतें म्हटल्यानें भागणार नाही. सरकार शहाणें आहे. तें कोणाचा दम किती हें ओळखतें. अर्थात् तुमची तयारी असल्याशिवाय तुमच्या नुस्त्या ठरावांनीं व अर्जांनीं सरकार नमणार नाहीं हीं गोष्ट शेतकऱ्यांच्या व कार्यकर्त्यांच्या मनावर या प्राथमिक चळवळीच्या वेळीच ठसविली पाहिजे व त्याच वेळीं कांहीं भागांत प्रत्यक्ष सत्याग्रहाची सिद्धताहि केली पाहिजे.

अशा प्रकारच्या चळवळींत शेतकऱ्यांचा कैवारी म्हणून पुढें आलेला ब्राह्मणेतर पक्ष व प्रागतिक पक्षहि मनोभावें सामील झाल्याशिवाय राहणार नाहीत. जमिनीच्या तुकड्यांच्या बिला-विरुद्ध चळवळ केल्यानें कसा फायदा झाला हें ब्राह्मणेतर पक्षांतील कार्यकर्त्यांच्या अनुभवास येऊन चुकलें आहे व या पक्षाच्या कमिटीनें जी बागलाणाची व्यवस्थित पाहाणी केली तिच्यावरून सारावाढीच्या जुलमाचें भयंकर स्वरूपहि या पक्षानें उघडकीस आणलें आहे. आणि सत्याग्रहाचा मार्ग सनदशीर आहे असे सनदशीर तत्त्वाचे पुरस्कर्तेहि मुक्तकंठानें म्हणूं लागले आहेत. बार्डोलीचा मर्यादित प्रश्न सोडविण्याचे कामीं वल्लभभाईंच्या नेतृत्वानें काम करणाऱ्या कार्यकर्त्यांस सर्वांनीं यथाशक्ति साह्य केलें त्याचप्रमाणें सर्वांनाच सारख्या जिव्हाळ्याचा असलेला, सारावाढीचें धोरण बदलण्याचा व्यापक प्रश्न सोडविण्याचे कामीं वल्लभभाई व त्यांचे साहाय्यक हेहि मनःपूर्वक मदत करतील यांत शंका नाहीं. सारांश, या व्यापक चळवळीची उठावणी सर्वांकडून एकसमयीं होण्यास हीच वेळ अनुकूल आहे व तिचा पुरेपूर फायदा सर्व ठिकाणचे सर्व पक्षांचे पुढारी व कार्यकर्ते घेतील अशी आम्हास आशा आहे.

# बेळगांव येथील साहित्य संमेलन

## ( वारा सुटला पण आग विझली ! )

बेळगांव येथील मराठी साहित्य-संमेलन निर्विघ्नपणें पार पडलें ही आम्हाला मोठ्या संतोषाची गोष्ट वाटते. विघ्न आले असतें तरी त्याला म्हणजे एखाद्या घातपाताचेंच स्वरूप आले असतें असा अर्थ नाहीं. पण एखाद्या सभेमध्यें किंवा सभेबाहेर-हि संभावित मनुष्याचा कोणी कोणत्याहि रीतीनें अपमान करणें हें एक प्रकारचें विघ्नच होय. आणि असा कोणताहि प्रकार या साहित्य-संमेलनाच्या प्रसंगीं बेळगांवास घडला असता तर बेळगांव-करांनीं तो आपल्या अब्रूला कमीपणाच मानिला असता. पण स्वतः बेळगांवकरांनीं तर असा प्रकार घडूं देणार नाहीं असा मनाशीं निर्धार केला होताच, पण सुदैवानें धारवाड बागलकोटकडील कट्टर कर्नाटकी लोकहि वेळींच मनाशीं उमजले होते कीं, भलतेंसलतें कांहीं करावयास बेळगांवीं गेल्यास उलट आपलीच शोभा किंवा अप्रतिष्ठा नगराभिमानी बेळगांवकरांकडून झाल्याशिवाय राहणार नाहीं. कसेंहि असो. प्रारंभापासून अखेरपर्यंत साहित्यसंमेलन निर्विघ्नपणें पार पडलें. आणि तें अशा रीतीनें पार पडणें हाच बाहेरगांवच्या लोकांच्या दृष्टीनें संमेलनाचा यशस्वीपणा ठरत आहे. कारण बेळगांवास संमेलनप्रसंगीं काय काय अनिष्ट गोष्टी घडणार या-विषयीं केवळ भविष्य नव्हे पण निदान कल्पनाचित्र त्यांनीं रंगवून मनाशी ठेवावें इतका बोभाटा, कट्टर कर्नाटकी लोकांच्या तामस गुणाचा, वर्तमानपत्रांवरून व लोकवार्तेवरून झाला होता. संमेलनाच्या या यशाबद्दल आम्ही बेळगांव येथील महाराष्ट्रीय व विशेषतः कानडी पुढाऱ्यांचें अभिनंदन करितों.

पण अशा रीतीनें संमेलन निर्विघ्नपणें पार पडलें तरी संमेलनाचे परिणाम मागे कोणते राहणार हा

एक प्रश्न होताच. कारण संमेलनाचे पाहुणे घरोघर परत गेले, आणि नंतर मागे बेळगांवांतील किंवा कर्नाटकांतील महाराष्ट्रीय व कानडी जनता आणि पुढारी यांच्यांतील भेदभाव किंवा तेढ पूर्वींहून अधिक वाढली, तर हें संमेलन बेळगांवास मुळींच न भरतें तरी बरें होतें असें शांततावादी सामोपचारवादी लोकांना वाटणें स्वाभाविक होतें. पण सुदैवानें ही तेढ वाढण्याऐवजीं उलट, पूर्वी असलेली तेढच थोडीशी कमी होण्याचा परिणाम या संमेलनानें घडवून आणला असें आतां म्हणतां येईल. केवळ हक्काच्या दृष्टीनें पाहतां, कांहींहि परिणाम झाला तरी, बेळगांव शहरांतील महाराष्ट्रीयांना हे संमेलन तेथें बोलावण्याचा आणि बाहेरच्या महाराष्ट्रीयांना बेळगांवास जाऊन तें भरविण्याचा हक्क होता. आणि एकदां हक्कबजावणीच्या दृष्टीनेंच पाहावयाचें ठरल्यावर मग संभावितांच्या अपमानाचें विघ्नच काय पण घातपाताचा संभव पत्करूनहि हे संमेलन भरविणें जरूर आहे असें म्हणतां आलें असतें. हिंदु-मुसलमानांचा द्वेष इतक्या परमावधीला गेला असतांहि जर ताबुताचा किंवा बकरईदचा सण पाळूं नका असें मुसलमानांना कोणी म्हणूं शकत नाहीं, किंवा गणपत्युत्सवाच्या मिरवणुकी अथवा पालख्यांचे इतर समारंभ पार पाडण्याला हिंदू कंबर बांधतात, तर बेळगांवास मराठी साहित्यसंमेलन भरवूं नका असें कोण म्हणूं शकतो ! किंवा कोणी तसें म्हटलें असतें तरी त्याचें कोण ऐकतो ?

पण एक तर कर्नाटकी व महाराष्ट्रीय लोकांत तेढ उत्पन्न झाली असली तरी तिला हिंदू-मुसलमानांतील द्वेषाची उपमा देण्याइतक्या पराकाष्ठेला ती केव्हांहि पोचली नव्हती. म्हणून अनिष्ट टाळणें शक्यच नाहीं अशी खात्री वाटली असती तर, बेळगांव येथील महाराष्ट्रीयांनीं कदाचित् हें संमेलनच नको असें म्हणून माघार घेऊनहि समंजसपणा दाखविला असता. त्याचप्रमाणें संमेलन भरून कर्नाटकाचीच काय हानि व्हावयाची असेल ती होऊं द्या, पण आपण संमेलनाला विरोध केला असला दुर्लौकिक नको, असें धोरण कर्नाटकांतील कट्टरांनींहि अखेर स्वीकारून आपला समंजसपणा व्यक्त केला असता, इतका या उभय जनतेच्या पुढाऱ्यांच्या राष्ट्रीय भावनेवर आमचा दृढविश्वास आहे. पण श्री. गंगाधरराव देशपांडे व श्री. दत्तोपंत बेळवी अशांकडून वेळींच झालेल्या प्रयत्नामुळें, यापैकीं कोणाच्याच राष्ट्रीय बुद्धीचें सत्त्व पाहण्याची वेळ आली नाहीं. आणि बेळगावच्या महाराष्ट्रीयांना "आपण आपला हक्क यथान्याय तितकाच बजावीत आहों" आणि कर्नाटकीय पुढाऱ्यांनाहि "आपल्या न्याय्य हक्कांना कोणत्याहि प्रकारें बाध येण्याची भीति नाहीं" अशा खात्रीनें उत्पन्न झालेल्या शांत मनोभावनेच्या स्थितींतच हें संमेलन भरविण्याचा संकेत व तयारी झाली. शिवाय प्रत्यक्ष संमेलनांतहि ही भावना स्थिर व दृढ होण्यासारख्याच गोष्टी घडून आल्या.

मराठी साहित्यसंमेलन बेळगांवास भरण्याचा विचार बेळगांव येथील कांहीं मराठी वाङ्मयप्रेमी लोकांनीं केला असें कळतांच, त्याला विरोध करण्याकरितां कर्नाटकांतून कांहीं लोक ग्वाल्हेरीस गेले. तेथें त्यांनी बेळगांवकरांच्या निमंत्रणास प्रतिकूलता दर्शविली. कर्नाटक प्रां. कॉं. कमिटीच्या वतींनेहि ग्वाल्हेरीस विरोधी तार पाठविण्यांत आली. अखेर संमेलन बेळगांव येथें भरण्याचें निश्चित झाल्यापासून कर्नाटकांतील सर्व वर्तमानपत्रांनीं व व्यक्तिशः कांहीं पुढाऱ्यांनीं संमेलनावर व महाराष्ट्रावर बेसुमार टीकांचे हल्ले सुरू केले. आणि संमेलनाच्या प्रसंगीं विघ्नें येणार अशी कांहीं लोकांना धास्ती वाटूं लागली. या सर्वाला कारण एकच. तें असें कीं या संमेलनाच्या निमित्तानें महाराष्ट्र हा कर्नाटकावरील अतिक्रमणाचा आणखी एक वेढा वळणार. पण ही भीति सर्वस्वी निराधार आहे अशी बेळगांवच्या देशपांडे बेळवी प्रभृति कर्नाटकाभिमानी पुढाऱ्यांना पुरी माहिती व खात्री असल्यानें, तसेंच संमेलन बोलावणाऱ्या बेळगांवकर महाराष्ट्रीयांचाहि असला हेतु नसल्यानें, उभयतांची सहजच एकवाक्यता झाली. आणि संमेलनासाठीं स्वागतमंडळ बनविण्याकरितां बेळगांवास जी पहिलीच जाहीर सभा ना. बेळवी यांच्या अध्यक्षतेखालीं ता. ३ जून १९२८ रोजीं भरली तींत जो ठराव करण्यांत आला तो असाः—

"सन १९२९ सालामध्यें म. सा. समेलनाची जी बैठक बेळगांवीं बोलावण्यांत आली आहे ती बोलावणारांचा उद्देश मराठी साहित्यसंवर्धन हाच असून त्यांना भाषावर प्रांतरचनेच्या प्रश्नाशीं कांहीं कर्तव्य नाहीं, व हें निमंत्रण सर्व बेळगांव जिल्ह्यातर्फे नसून मराठी भाषेविषयीं प्रेम असणाऱ्या बेळगांव जिल्ह्यांतील लोकांतर्फेच आहे, असें आजची सभा स्पष्ट जाहीर करीत आहे." हा ठराव ना. बेळवींच्या सूचनेवरून श्री. दळवींनीं मांडला व त्यास डॉ. साठे यांनीं अनुमोदन दिलें. गंगाधरराव देशपांडे यांनींहि त्या ठरावास पुष्टि दिली व तो बहुमतानें पास झाला. या ठरावांत 'कर्नाटकीयांच्या समजुतीकरितां हा ठराव करण्यांत येत आहे' अशा आशयाचे शब्द जोडावे असें श्री. मोरोपंत मराठे यांनीं सुचविलें होतें. पण त्यांची ती सूचना नापास झाली. वरील ठरावानें पुष्कळसा गैरसमज आपोआप दूर झाला. व त्यामुळें किंबहुना त्याच्या आधींपासूनच, वस्तुस्थिति माहीत असल्यानें, बेळगांव शहराच्या

कांहीं समंजस कर्नाटकी पुढाऱ्यांनीं स्वागतमंडळाचे सभासद होऊन वर्गण्या दिल्या.

तथापि बेळगांवाबाहेरील धारवाड बागलकोट इत्यादि तीव्र कर्नाटकीय लोकमताच्या प्रमुख केंद्रांचे ठिकाणी संमेलनाविरूद्ध चळवळ चालू राहिली तिला आळा बसण्याचें कांहीं काम बेळगांव येथें अखिल कर्नाटक परिषदप्रसंगीं झालें. तो प्रकार प्रसिद्ध आहे व तो असा. महाराष्ट्राच्या अतिक्रमण-बुद्धीचा इनकार करून, कर्नाटकाच्या भीतीचा परिहार करून, उभय समाजांतील संबंधाचे स्पष्टीकरण करण्याकरितां श्री. गंगाधरराव देशपांडे यांनी अशा आशयाचा ठराव विषय नियामक मंडळापुढें मांडला कीं 'बेळगांव हा कर्नाटकाचा एक भाग आहे व तेथील सार्वजनिक स्वरूपाचें सर्व काम कानडींतून चालण्यास हरकत नाहीं. असा ठराव बेळगांव येथे भरणाऱ्या येत्या मराठी साहित्यसंमेलनांत पास करून घ्यावा.'

हा ठराव विषयनियामक मंडळानें एकमतानें मंजूर केला. परंतु दुसरे दिवशीं मुख्य परिषदेपुढें तो मांडण्याला देशपांडे उभे राहिले,तेव्हां कांहीं फाजील कर्नाटकी पोरासोरांनी गोंधळ करून त्यांना बोलूंच दिलें नाहीं. यामुळें तो ठराव तसाच दप्तरीं राहिला! या अत्याचाराचा निषेध सर्व जबाबदार कर्नाटकीय पुढाऱ्यांनी एकमुखानें केला व दुसरे दिवशीं देशपांडे यांचें भाषणहि मुद्दाम करविलें. तथापि स्वतः महाराष्ट्र साहित्यसंमेलन काय धोरण स्वीकारणार हे पाहावयाचें राहिलेंच होतें. म्हणून त्या धोरणांतहि कर्नाटकाला भीतिप्रद असें कांहीएक नाही हे सिद्ध करण्याकरितां संमेलनाच्या विषयनियामक मंडळापुढें श्री. केळकर यांनीं देशपांडे व बेळवी यांच्या संमतीनें खालील ठरावाचा मसुदा मांडिला.

"हल्लीं कर्नाटकामध्यें कानडी—मराठीचा जो वाद उत्पन्न झाला आहे, तो सर्व दृष्टींनीं अत्यंत अनिष्ट असून, तो शक्य तितका लवकर मिटविला जाणें हे उभय पक्षींहि अतिशय जरूरीचें आहे असें या संमेलनाचें मत आहे. म्हणून त्या हेतूनें असें ठरविण्यांत येत आहे कीः—

१ बेळगांव जिल्हा हा कर्नाटकाचा एक भाग आहे व या जिल्ह्यांत कानडी ही प्रमुख म्हणजे बहुसंख्याकांची भाषा आहे.

२ म्हणून या जिल्ह्यांतील महाराष्ट्रीयांनीं या भाषेस या जिल्ह्यांतील प्रमुख भाषा या नात्यानें योग्य तो मान द्यावा.

३ त्याबरोबरच या जिल्ह्यांतील कर्नाटकीय लोकांनीं मराठी ही भ्रातृभाषा या नात्यानें तिलाहि योग्य तो मान व या जिल्ह्यांतील अल्पसंख्याकांची ती भाषा म्हणून योग्य व अवश्य तें तिला संरक्षण द्यावें.

वर कलम २ व ३ यांत नमूद केलेल्या तत्त्वांचें प्रतिपादन कर्नाटक साहित्यसंमेलनानेंहि आपल्या ठरावांच्या द्वारानें करून कर्नाटक व महाराष्ट्र यांच्या-मधील सलोखा कायम टिकविण्याला मदत करावी अशी या संमेलनाची इच्छा आहे."

या ठरावावर आणि त्यांतल्या त्यांत कलम(१) वर दोन दिवस एकसारखा वाद चालू होता. आणि अखेर अध्यक्षांनीं कांहीं लोकांच्या मागणी-वरून, कलम (१) हे संमेलनाच्या प्रत्यक्ष कार्य-क्षेत्रांत पडण्यासारखें नाहीं म्हणून नियमबाह्य आहे असे ठरविलें. अशा रीतीनें कलम (१) हें निघून गेल्यावर, उरलेलीं कलमें २ व ३ हीं, आपल्यापुरतीं जरी ती योग्यच होतीं तरी, मूळ ठराव मांडणारांच्या दृष्टीनें त्यांच्या हेतूला तीं अपुरी पडणारीं होतीं म्हणून,अशा अर्धवट व अपूर्ण ठरावाला आम्ही संमति देऊं शकत नाहीं असें केळकर बेळवी देशपांडे व खापर्डे यांनीं सांगितलें. तथापि तीं दोन कलमे, कांहीं शाब्दिक फेरफार करून, संमेलनानें मंजूर केलीं. त्या दोन कलमांत म्हटल्या-प्रमाणें उभय पक्षीं वर्तन झालें तरीहि हा अप्रिय वाद मिटण्याला हरकत नाहीं. कलम (१) हें अध्यक्षांनीं नियमबाह्य ठरविलें याचें कारण मराठी साहित्यसंमेलनाला काँग्रेसच्या प्रांतरचनेशीं प्रत्यक्ष कांहीं कर्तव्य नाहीं; ते आज आहे तसें राहो किंवा बदलो. परंतु हे कलम आपल्या ठरावांत समाविष्ट करण्याला वरील त्रिवर्गाला कारण इतकेंच कीं, कर्नाटकीय लोकांनीं जी नसती भीति उराशीं बाळगून ठेविली आहे ती नाहीशी होण्याला त्या कलमांतल्या सारखे स्पष्ट उद्गार महाराष्ट्रीयांकडून निघणें अवश्य होते. प्रांतरचना हा विषय जरी भाषा संमेलनाच्या कार्यक्षेत्रांत पडत नसला तरी इतकें सूक्ष्म व कांटेकोर पाहून चालत नाहीं,आणि ज्या अर्थीं या संमेलनामुळेच हा वाद पुनः उपस्थित झाला त्या-अर्थी या संमेलनांतच त्या वादाचें निराकरण होणे श्रेयस्कर होतें. तथापि अशा गोष्टींत प्रत्येकाची पाहण्याची दृष्टि वेगळी असते. नियोजित संमेलन भरविलें जावे व तें निर्विघ्नपणें पार पडावें अशा-विषयीं उभय पक्षांशीं बोलूनचालून ज्यांनीं एक प्रकारें विशिष्ट जबाबदारी पत्करली होती त्यांच्या दृष्टीने कलम (१) हें अवश्यच होतें. पण ज्यांच्यावर अशा प्रकारची कोणतीहि जबाबदारी नव्हती, व उभय प्रांतांत सलोखा राहावा अशी मनां-तून इच्छा असली तरी संमेलनांत ठराव कोणता व्हावा कोणता न व्हावा याविषयींच्या आपल्या कांटेकोर मताला मुरड घालण्याचें ज्यांना कारण नव्हतें अशांनीं कलम (१)ला हरकत घ्यावी हें स्वाभाविकच आहे. आणि उभय पक्षांची ही मनःस्थिति पर-

स्परांना चांगली ठाऊक होती म्हणूनच कलम (१) वगळून व बाकीचीं ठेवून संमेलनानें बहुमतानें ठराव मंजूर केला तरी त्याबद्दल कोणी कोणावर रागावले रुसले नाहीं. सर्व गोष्टी प्रामाणिक मतानुसारच घडल्या. तसेंच संमेलनानंतर जे दोन तीन खुलासे म्हणून ताबडतोब प्रसिद्ध झाले त्यावरून देखील, ठराव कोणत्याहि स्वरूपांत मंजूर झाले तरी, बेबनाव असा मुळींच उरला नाहीं. अपेक्षेप्रमाणें कर्नाटक व महाराष्ट्र यांतील जनतेच्या दिलजमाईचें कार्य यशस्वी झालें असेंच दिसून आलें.

तारीख २९ मे रोजीं केळकर बेळवी देशपांडे व गुंजाळ यांनीं प्रसिद्ध केलेल्या खुलाशांत वरील गृहस्थांनीं कलम (१) हें आपणास कां पाहिजे होतें याचें स्पष्टीकरण केलें आहे. परंतु शेवटीं असेंहि म्हटलें आहे कीं, "अध्यक्ष व इतर सभासद यांनाहि मतस्वातंत्र्याचा अधिकार आहेच व त्यांनीं आम्हांप्रमाणेंच जें केलें तें प्रामाणिकपणानें व खऱ्या बुद्धीनें केलें असेंच आमचें मत आहे." पण याहून महत्त्वाची गोष्ट ही कीं, संमेलनाचे अध्यक्ष श्रीयुत परांजपे यांनीं वरील ठरावांतील कलम (१) हें संमेलनापुरतें अग्राह्य मानलें तरी त्यांतील आशय व्यक्तिशः त्यांना अमान्य नव्हता, आणि ही गोष्ट त्यांनीं व इतर पांचपंचवीस महाराष्ट्रीय गृहस्थांनीं स्वतःचा वेगळा खुलासा प्रसिद्ध करून स्पष्ट केली. त्यांत असें म्हटलें आहे कीं, "कॉंग्रेसनें ठरविलेल्या हल्लींच्या विभागणीप्रमाणें कर्नाटक प्रांतांत बेळगांव जिल्हा समाविष्ट होत असल्याचें आम्हास केव्हांहि अमान्य नव्हतें व नाहीं." आणि शेवटीं या दोन्ही खुलाशांना उद्देशून, व ते जमेस धरून, बेळगांव येथील कर्नाटकाभिमानी अशा १७ प्रमुख लोकांनीं आपलाहि एक खुलासा ताबडतोब प्रसिद्ध केला. त्याचा आशय असा कीं, "वरील दोनहि खुलाशांत उभय प्रांतांतील प्रेम वृद्धिंगत करण्याची भावना उघड आहे व तिला आम्हीहि उलट मान्यता देतो. आणि मराठी साहित्यसंमेलनांतून झालेले ठराव व त्यानंतर प्रसिद्ध झालेले खुलासे हे सर्व लक्षांत घेऊन, हा कानडी-मराठीचा अप्रिय वाद आम्हापुरता तरी संपला आहे, व इतर कानडी मराठी जनतेनेंहि तो संपवावा अशी आमची आग्रहाची विनंति आहे."

असो. अशा रीतीनें या संमेलनाचा शेवट गोड झाला. किंबहुना या संमेलनाविषयीं साशंक असणाऱ्या लोकांना आतां 'अपकृतापि उपकृतमनेन' असेंहि म्हणतां येण्यासारखें आहे कारण संमेलनापूर्वी कांहीं गुप्त व कांहीं प्रगट रूपानें धुमसत असलेला हा वाद संमेलनाच्या प्रसंगानें तीव्र स्वरूपांत प्रगट झाला, आणि त्या संमेलनप्रसंगानेंच तो अखेर पूर्णपणे शमविण्यास मदत केली, ही गोष्ट उभय प्रांतांतील पुढाऱ्यांना भूषणास्पद आहे. पण त्याचें खरें श्रेय, त्यांतल्या त्यांत बेळगांव शहरांतील ज्या मराठी वाङ्मयाभिमानी व वाङ्मयप्रेमी महाराष्ट्रीय तरुणांनीं हें संमेलन भरविण्याची मूळ कल्पना काढली व ती चिकाटीनें व धैर्यानें तडीस नेली, त्यांनाच आम्ही देऊं इच्छितों. आम्हाला आशा वाटते कीं बेळगांव येथील कर्नाटकाभिमानी पुढाऱ्यांनीं प्रसिद्ध केलेल्या हस्तपत्रकाचा प्रसार सर्व कर्नाटकभर होऊन, त्यांत विनंति केल्याप्रमाणें बेळगांव शहराबाहेरचे म्हणजे अखिल कर्नाटकांतील पुढारी 'हा वाद संपला' असें आपल्या जनतेला सांगतील, व महाराष्ट्रासंबंधीं आलेली नसती शंका मनांतून दूर करून, आपण योजलेल्या कर्नाटक प्रांताच्या एकीकरणाच्या व कानडी भाषेच्या अभिवृद्धीच्या उद्योगाला ते विश्रब्ध मनानें झटून लागतील.

# बेळगांवचें महाराष्ट्र साहित्यसंमेलन

## अध्यक्षांचें भाषण

भाषेच्या शब्दसंपत्तीसंबंधानें विवेचन करतांना अध्यक्ष श्री. **शि. म. परांजपे** म्हणाले, "अनेक भाषा बोलणारे लोक आपापल्या निरनिराळ्या व्यवहारासाठीं एकत्र येणें अपरिहार्य असल्यामुळें एकाच्या भाषेतील शब्द दुसऱ्याच्या भाषेंत प्रविष्ट होणें हेंहि तितकेंच अपरिहार्य होतें. इतकेंच नव्हे तर इतर अनेक भाषांचें ज्ञान संपादिलेलें असणें हें चतुरस्रपणाचें एक लक्षण होय. आपल्या स्वतःच्या भाषेंतील शब्दसंपत्ति नाना तऱ्हेच्या कारणांनीं आणि कल्पनांनीं विस्तृत करून तींत परकीय भाषेंतील शब्दांची आपण भर घातली, तर त्यांत कांहीं गैर आहे असें नाहीं. कांहीं विशिष्ट अन्नाप्रमाणें परकीय शब्द पचविण्याचें आपल्यामध्यें सामर्थ्य असलें, तर तो कांहीं दोष नव्हे. आणि असे कांहीं तरी परकीय शब्द प्रत्येक भाषेंत संमिश्रित झालेले आहेतच

## भाषेचें शुद्धीकरण

इतर अनेक भाषांतील शब्दांप्रमाणें आरबी, फारशी, उर्दू, इंग्रजी या भाषांतीलहि अनेक शब्द आपल्या मराठी भाषेमध्यें हल्ली घुसत आहेत. ही स्थिति चांगली की वाईट, असा एक वादाचा प्रश्न हल्लीं आपल्यामध्यें उत्पन्न झाला आहे. आपल्या भाषेंतील खंडोगणती शब्दांच्या समुद्रामध्यें कांहीं थोड्याशा पाव रतीभर परकीय शब्दांची खसखस मिसळली, म्हणून त्यांत कांहीं बिघडतें असें नाहीं. परंतु आपल्या भाषेंत मिसळणारे मुसलमानी आणि इंग्रजी शब्द हे आपल्या भाषेवरहि आपल्या प्रस्तुतच्या राजकीय पारतंत्र्याचा छाप कायमचा मारून ठेवितात. यामुळें हे शब्द आपल्याला दुःस्सह होतात, हेंहि कांहीं खोटें नाहीं. आपण व्याख्यानांतून, खासगी भाषणांतून, पत्रव्यवहारांतून, किंबहुना आपल्या घरांतल्या बोलण्यांतूनसुद्धां इंग्रजी शब्द अतिशय वापरतों. या उद्वेगजनक स्थितीनें अत्यंत उद्विग्न होऊन कै० राजवाडे यांनीं एके प्रसंगीं या इंग्रजीच्या जोखडाखालीं आणि जुलमाखालीं आपली मराठी भाषा कदाचित् मरेल देखील कीं काय, अशी 'अतिस्नेहः पापशंकी' या दृष्टीनें एक भीति प्रदर्शित केली होती. त्याचप्रमाणे जे मुसलमान दोघांनाहि सारख्याच रीतीनें भरडून काढणाऱ्या बिकट राजकीय परिस्थितीमध्येंही हिंदूशीं सहकारिता करीत नाहींत त्यांचे मुसलमानी शब्दहि आपल्या मराठी भाषेंत कशाला पाहिजेत ? अशा दृष्टीनें दे. भ. सावरकर व इतर कांहीं लोक इंग्रजीबरोबर मुसलमानी शब्दांचेहि आपल्या भाषेतून उच्चाटण करून टाकण्याचा उद्योग करीत आहेत. युरोप खंडांतील स्वित्सर्लंड आणि इटली यांच्यावर एके काळीं ऑस्ट्रियाचें राज्य चालू होतें. त्या परकीय राज्याचें जोखड झुगारून देऊन स्वतः-ची स्वतंत्रता प्रस्थापित करण्याचा जेव्हां या वरील दोन देशांतील कांहीं संस्थानांनीं प्रयत्न आरंभिला, तेव्हां त्यांनींहि आपल्यावरील जुलमी राजांच्या भाषेंतील शब्द आपल्या कोशांतून काढून टाकण्याला अशाच रीतीनें सुरुवात केली होती.

## परकीय शब्दांची उपयुक्तता

पारतंत्र्याच्या तिटकाऱ्याच्या दृष्टीने विश्वनाथपंत राजवाडे यांची काळजी आणि विनायकराव सावरकर यांची उद्योगशीलता लक्षांत घेण्यासारखी नाहीं, असें कोण म्हणेल? तरी पण एवढें खास आहे कीं, आपली मराठी भाषा मरणोन्मुख झालेली नसून ती उत्तरोत्तर उदयोन्मुखच होत चाललेली आहे. तिच्यांत हल्लीं जर कांहीं थोडासा तेजस्वितेचा कमतरपणा दिसत असेल, तर तो संध्याकाळच्या नंतरचा नसून प्रातःकाळच्या पूर्वीच आहे. आणि आपल्या मराठी भाषेबद्दल आपल्याला इतका सकारण आत्मविश्वास असतांना तिच्यामध्यें परकीय भाषांतील कांहीं शब्द असले, म्हणून ते आपल्या भाषेचें कांहीं नुकसान करीत नसून उलट आपल्या भाषेंतील शब्दसंपत्ति वाढविण्यालाच कारणीभूत होत असतात. मराठींत मूळ आणि प्रकृतिभूत अशा सिद्ध शब्दांची संख्या मोल्सवर्थच्या अंदाजाप्रमाणें २०,००० हून जास्त आहे. इतक्या मोठ्या शब्दसमुदायापैकीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें मूळचे संस्कृत असलेले नऊदशांश शब्द वगळले, तर बाकी राहिलेल्या एकदशांश टयुरेनियन वगैरे शब्दांत कांहीं मुसलमानी किंवा इंग्रजी शब्द असले, तरी रोमन नागरिकांमधील परकीय लोकांप्रमाणे ते आपल्या भाषेचें वैभव आणि विस्तृतत्व सिद्ध करण्यालाच साधनीभूत होणार नाहींत काय ? या सगळ्या गोष्टी लक्षांत आणून आपण आपले हल्लींचे प्रयत्न जास्त उपयुक्त कार्याकडे वळविणें जरूर आहे. सारांश, एखादे परकी शब्द असूनहि जर ते आज आपल्या भाषेंतील शब्दसंपत्ति वाढविण्याला साधनीभूत होत असतील, तर त्यांना धक्के मारून आपल्यांतून घालविण्यांत आपण आपल्या भाषेचा कांहीं फायदा करीत आहों, असा मुळींच अर्थ होत नाहीं.

परकीय भाषेंतील शब्दांनीं आपली शब्दसंपत्ति जशी वाढलेली आहे, त्याचप्रमाणें ती आपल्या भाषेंतल्या भाषेंतच नवीन शब्द निर्माण करूनहि आपण वाढविली पाहिजे. हल्लीं नवीन शास्त्रें, नवीन शोध आणि नवीन कल्पना, यांच्याशीं प्रत्यही फार झपाट्याने आपला संबंध येत चाललेला आहे. व त्या सगळ्यांचें प्रतिबिंब आपल्या मराठी भाषेमध्ये आपल्याला प्रदर्शित करावयाचे असल्यामुळें अर्थातच आपल्याला नवीन मराठी शब्द बनविण्यावांचून गत्यंतरच नाहीं. व याच हेतूनें शास्त्रीय परिभाषामंडळ या नांवाचें एक नवीन मंडळ मराठींत शास्त्रीय विषयांकरितां नवीन पारिभाषिक शब्द बनविण्याच्या उद्देशानें प्रस्थापित करण्यांत आलेलें आहे. हे पारिभाषिक शब्द बनवितांना संस्कृत भाषेचा आपल्याला फार उपयोग होतो. संस्कृत भाषा ही आपल्या मराठी भाषेच्या साम्राज्याच्या ताब्यांतील एक सोन्याची खाण आहे. या खाणींतील सोन्याने आपण आपल्या भाषासुंदरीच्या अंगावर किती तरी सुवर्णालंकार घातलेले आहेत. व अजूनहि लागेल तितकें सोनें या खाणींतून आपल्याला काढतां येण्यासारखे आहे. परंतु लॅटिन भाषेपासून उत्पन्न झालेले शब्द न घेतां ॲंग्लोसॅक्सन भाषेमधीलच साधे आणि लहान शब्द वापरले जावे, ही जशी इंग्रजी भाषेमध्यें एक प्रवृत्ति निघालेली आहे,

त्याचप्रमाणें मराठी भाषेमध्येंहि फारसे संस्कृत शब्द न वापरतां साधे व सोपे असे लहान लहान मराठी शब्दच वापरावे, असें कांहीं लोक प्रतिपादन करतात. व त्याप्रमाणें क्वचित कोणी हें तत्त्व आचरणांतहि आणतात. परंतु असें प्रत्येक भाषेवर आपण बहिष्कार घालूं लागलों, तर आपली शब्दसंपत्ति अगदींच दारिद्र्यावस्थेला जाऊन पोंचेल, हें आपण लक्षांत बाळगलें पाहिजे. "

यानंतर मराठीची ग्रंथसंपत्ति, वाङ्मयाला वळण लावण्याचें साहित्यसंमेलनाचे कर्तव्य, बंगाली, गुजराथी इ. भाषांतील वाङ्मयाची वाढ व मराठी वाङ्मयाची वाढ यांची तुलना, चांगल्या वाङ्मयाची वाढ करण्याचीं साधनें, वाङ्मयांतील कांहीं चांगले ग्रंथ सरकारजमा केल्याबद्दल सरकारचा निषेध, लेखकांनीं व कवींनीं परिश्रम करण्याची आवश्यकता, सयमक व निर्यमक कविता, रसवर्गीकरणाचा विचार, गूढ काव्यें, शुद्धलेखन अनुस्वार, मोडी लिपी इ. विषयांचे विवेचन करून अध्यक्षांनीं संमेलनास पुढीलप्रमाणें सूचना केल्या—

**कांहीं सूचना**

"पूर्वीच्या संमेलनांत झालेल्या ठरावांची अंमलबजावणी काय काय झाली, याबद्दलचा रिपोर्ट प्रत्येक पुढील संमेलनामध्ये सादर करण्यांत यावा.

संमेलनाच्या वर्षामध्ये जे नवीन ग्रंथ झाले असतील, ते संमेलनाच्या प्रसंगीं एकत्र जमविण्यांत येऊन ते सर्वांच्या नजरेस पडतील, अशा रीतीनें त्यांचें एक प्रकारचें प्रदर्शन भरविलें गेलें, तर त्यांत प्रत्यक्ष पुस्तक पाहावयाला मिळाल्यानें ग्रंथकर्त्यांची प्रसिद्धि आणि वाचकवर्गाची सोय होण्यासारखी आहे.

प्रत्येक सालांत जानेवारीच्या सुरुवातीपासून डिसेंबरच्या अखेरीपर्यंत जे नवीन ग्रंथ निर्माण होतात, त्यांचे त्रैमासिक रिपोर्ट गव्हर्मेंट गॅझेटमध्यें ओरिएंटल ट्रॅन्स्लेटरच्या मार्फत प्रसिद्ध होत असतात, हे सर्वांना माहीतच आहे. त्रैमासिक अशा प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांसंबंधानें 'रिपोर्टर ऑन धी नेटिव्ह प्रेस' या अधिकाऱ्याच्या मार्फत कांहीं विवेचनात्मक टीकाहि सरकारी रीतीनें पूर्वी प्रसिद्ध होत असे; पण हल्लीं ती जाहीर करण्यांत येत नाहीं. परंतु ती पद्धत चांगली असल्यामुळें तिच्या पुनरुज्जीवनाच्या हेतूनें पुणें येथील डे. व्ह. ट्रा. सोसायटीचे चिटणीस श्री. कारखानीस यांनी '१९२५ सालाचें मराठी वाङ्मय' या नांवाचें एक पुस्तक तयार करून त्यांत त्यांनीं त्या एका सालांत प्रसिद्ध झालेल्या निरनिराळ्या विषयांवरील सर्व मराठी पुस्तकांचें विहंगमदृष्ट्या पर्यालोचन केले आहे, व हाच क्रम त्यांनीं कदाचित् पुढेहि चालू ठेविला असता; पण द्रव्याच्या अभावीं सदर सोसायटीला ती गोष्ट करणें अशक्य झालें आहे. आपल्या साहित्यसंमेलनांना दरसाल असें एखादें पुस्तक तयार करतां आलें, तर आपल्या संमेलनाची ती एक मोठी प्रशंसनीय कामगिरी होईल; व पुढील वाङ्मयाच्या इतिहासलेखकांना त्यापासून फार मदत होईल. मात्र त्यांत वऱ्हाड मध्यप्रांत आणि मराठी संस्थानें यांत प्रसिद्ध झालेल्या नवीन पुस्तकांचीं नांवेंहि संगृहीत केलीं जाणें जरूर आहे.

मराठींतील ग्रंथांना उत्तेजन देण्यासाठीं हल्लीं निरनिनिराळ्या ठिकाणीं खालसा मुलुखांत व नेटिव्ह संस्थानांतून कित्येक संस्था निघालेल्या आहेत. व सीनियर देवास या संस्थानाच्यामार्फत 'भोजराज प्राइझ' संबंधाची एक नवीन प्रशंसनीय योजना नुकतीच प्रसिध्द करण्यांत आली आहे. या सगळ्या संस्थांमधून एकसूत्रीपणा उत्पन्न करण्यांत आल्यास कोणत्या ग्रंथांना उत्तेजन द्यावें, कोणत्या विषयांवर पुस्तकें मागवावीं वगैरे धोरण एकमेकांच्या विचारविनिमयानें ठरविलें जाऊन मराठी वाङ्मयाचा फायदा होईल.

हिंदी, बंगाली, गुजराथी, कानडी वगैरे निरनिराळ्या भाषांचीं हल्लीं जीं संमेलनें आहेत, त्या सगळ्यांचे रिपोर्ट आपल्या दप्तरीं असावे, त्यांच्याशी स्नेहभाव संवर्धित करावा, आणि तुलनेनें त्यांच्या कामाच्या पद्धतींतील ज्या गोष्टी घेण्यासारख्या असतील त्या घ्याव्या. या सर्व साहित्यसंमेलनांनीं मिळून करतां येण्यासारखे एकलिपीप्रचाराचे वगैरे काम करण्यांत यावें.

दक्षिणहैद्राबाद संस्थानानें 'उस्मानिया युनिव्हर्सिटी' काढून उर्दू भाषेला उत्तेजन देण्याचे जसे प्रयत्न सुरू केले आहेत, त्याप्रमाणें बडोदे, इंदूर, ग्वाल्हेर, धार, देवास, कोल्हापूर, वगैरे मराठी संस्थानांनीं मिळून मराठी भाषेच्या उन्नतीकरितां कांहीं तरी मोठ्या प्रमाणावरील प्रयत्न सुरू करण्याविषयीं महाराष्ट्र साहित्यसंमेलनानें त्यांना विनंति करणें अवश्य आहे.

महाराष्ट्रीयांची वाङ्मयनिर्मिती आणि व्यासंग व सार्वत्रिक ज्ञानप्रसार हे हेतू शीघ्र सिद्धीस जाण्याकरितां एक सुव्यवस्थित व सर्वमान्य योजना करून ती कृतींत आणणारी एक मध्यवर्ती संस्था (अखिल महाराष्ट्र शारदामंडळ म्ह. ॲकॅडमी) स्थापण्यांत यावी, अशा प्रकारचा एक ठराव ग्वाल्हेरच्या साहित्यसंमेलनानें पास केला आहे. त्याला व्यवस्थित स्वरूप प्राप्त होऊन त्याची अंमलबजावणी झाली, तर उस्मानिया युनिव्हर्सिटी उर्दू भाषेकरितां जसें कार्य करीत आहे, त्याचप्रमाणें ही महाराष्ट्र

शारदामंडळाची ॲकॅडमी मराठी भाषेचें कार्य करूं शकेल. याकरितां त्या मंडळाच्या योजनेकडे योग्य लक्ष पोंचविलें जावें. आपल्या देशीं विद्यापीठांतून हिंदी, बंगाली, कानडी, वगैरे भाषांचें साधारण तरी ज्ञान वरिष्ठ शिक्षणांतील विद्यार्थ्यांना देण्याची तजवीज अवश्य व्हावी. या विषयाकडे महाराष्ट्र साहित्यसम्मेलनानें लोकांचें लक्ष वेधणें जरूर आहे.

साहित्यसम्मेलनांच्या प्रसंगीं जे ठराव आणि जीं भाषणें होतात, त्यांच्यापेक्षां पूर्वी विचारपूर्वक रीतीनें लिहून पाठविले गेलेले निबंध जे तेथें वाचण्याकरितां येतात, त्यांचें महत्त्व खरोखर जास्त असल्यामुळें असल्या निबंधाची संख्या सालोसाल वाढत जावी, इकडे संमेलनानें लक्ष पुरविणें अवश्य आहे. व ज्या कोणत्या तरी विषयावर निबंध येतील ते तर वाचले जावेतच; पण व्युत्पत्तिशास्त्र, तत्त्वज्ञान, प्राचीनवस्तुसंशोधनशास्त्र, मानवोत्क्रांतिशास्त्र वगैरे मराठी भाषेशीं संलग्न असलेल्या विषयांवरीलहि निबंध मागविण्यांत यावेत. आणि शास्त्रीय विषयांच्या चर्चेकडे सामान्यतः जास्त लक्ष देण्यांत यावें."

याप्रमाणें गेल्या वर्षांत प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचें व वाङ्मयप्रयत्नाचें समालोचन करून अध्यक्षांनीं आपलें भाषण संपविलें.

# अफगाणिस्थानांतील परिस्थिति

अफगाणिस्थानाचे माजी अमीर अमानुल्ला यांच्या खुलाशाचें पत्रक 'रूटर' ने अनधिकारांत हिंदुस्थानांत प्रसिद्ध केल्यामुळें वर्तमानपत्रकर्त्यांचे बाबतींत त्यांची थोडीशी साशंक वृत्ति झाली आहे. त्यांतच मुंबईच्या खोडसाळ 'टाईम्स' ने वात्रटपणाची एक बातमी वस्तुस्थितीचा विपर्यास करून लिहिली असल्यानें बातमीदारांना त्या भागांत प्रवेश मिळणें मुष्किलीचें झालें आहे. परंतु "**केसरी**-"च्या प्रतिनिधीस अफगाणिस्थानाच्या माजी लंडनमधील वकिलास भेटून प्रश्न विचारण्याची परवानगी मिळाली. स्वतः अमानुल्लांनी अद्याप कोणाहि प्रतिनिधीस मुलाखत दिली नाहीं.

**प्रश्न**—बच्चा-इ-साका ( भिस्त्याचा 'बच्चा' ) याची परिस्थिति आज कशी आहे ?

**उत्तर**—त्याजजवळ सैन्यबळ नाहीं; काबूल त्याचे हातीं असल्यानें थोडेंफार द्रव्य आहे; पण मनुष्यबलाच्या अभावीं त्याची बाजू फार लंगडी आहे.

**प्रश्न**—मग इतके दिवस त्याचें वर्चस्व कसें राहूं शकलें ?

**उत्तर**-बच्चाच्या विरोधकांपैकीं कोणीहि एक काबूल तत्काळ हस्तगत करूं शकेल. परंतु आतांपर्यंत अशा अडचणी येत गेल्या कीं बच्चावर चाल करून जाणाऱ्या फौजा वाटेंतच आपसांत भांडतात. त्यामुळें अमानुल्लांना देखील पुढें जातां आलें नाहीं. काबूलच्या अगदीं समीप जाऊन तेथें दुराणी व गिलझाई या दोन टोळ्यांमध्यें वितुष्ट उद्भवल्यामुळें देशहिताच्या दृष्टीनें विचार करून आपलें आंग काढून घेणेंच अमानुल्लांना इष्ट वाटलें.

**प्रश्न**—देशहिताचीच बाब घेतली, तर देशाला अंतस्थ यादवींत न ढकलतां थोडेसे कठोर मन करून इष्ट तें वळण लावण्याचा प्रयत्न करणेंच योग्य नसतें का झालें ? अमानुल्लांनीं अफगाणिणिस्थानाला खात्रीनें उच्च दर्जा प्राप्त करून दिला असता. मग हा अधिकारन्यास कां केला ?

**उत्तर**—अमानुल्लाचें सैन्य आपसांतच भांडूं लागल्यामुळें परिस्थिति फार बिकट आली. आपणास अफगाण मनःस्थिति ठाऊक असावी. एकदां का आपआपसांत कलह माजले कीं, मग ते पिढ्यानपिढ्या चालू राहतात. आणि ते कलह म्हणजे लढाईच म्हणावयाची ! अमानुल्लांचे राजनिष्ठ 'दुराणी' आणि विरोधी 'गिलझाई' या टोळ्यांनीं जर एकमेकांवर हल्ला केला तर मग सुमारें शंभर वर्षे त्यांचें 'जिवंत' वैर चालू राहील. दुसरातिसरा कसलाहि विचार त्यांचे मनांत येणार नाहीं. भांडण कां सुरू झालें किंवा हल्ला कां आला याचा विचार न करितां केवळ प्रतिपक्षीयाचा प्राण घ्यावा याच हेतूनें मारामारी माजेल. आणि ही दुःखद परिस्थिति अफगाणिस्थानाला हानिप्रद असल्यानें ती टाळण्यासाठीं म्हणून अमानुल्लांनीं माघार घेतली.

**प्रश्न**—इराक आणि इराण येथील राजकीय वातावरणांत अफगाणिस्थानाच्या प्रस्तुत बंडासंबंधानें अशी वदंता आहे कीं हें सर्व परकीयांच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष चळवळीनें घडवून आणलें आहे. परकीराष्ट्र कोणतें याविषयीं मात्र सर्वत्र मुग्धता स्वीकारली जाते. आपणास काय वाटतें ?

**उत्तर**—आजच्या परिस्थितीकडे पाहतां आणि आम्ही कंदाहारकडे होतों तेथून आम्हास इतर कांहीं बातम्या कळत नसल्यानें आम्हालातरी कोणी परकीय या बंडाच्या बुडाशीं असावा असें वाटत नाहीं.

**प्रश्न**—नादिरखानाचा बेत काय आहे असें आपणास वाटतें?

**उत्तर**—एक लोकप्रिय पुढारी, कसलेला मुत्सद्दी आणि पहिल्या प्रतीचा योद्धा व सेनानायक इत्यादि त्याचे गुण आणि अफगाणिस्थान स्वतंत्र रहावें अशी त्याची उत्कट इच्छा यांनींच प्रेरित होऊन तो बच्चाला हुसकून लावण्याची खटपट करीत आहे. बहुधा तो यशस्वी होईल. मग पुढें काय होतें ते पाहूं.

**प्रश्न**—हिरात बच्चानें घेतलें असें म्हणतात तें खरें का?

**उत्तर**—मला तरी तें खरे वाटत नाहीं.

**प्रश्न**—अफगाणिस्थानासंबधी माहिती वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होते ती विश्वसनीय आहे कां! आपणांस जर तिकडे कांहीं कळत नव्हतें तर इकडे अगदीं बारीकसारीक तपशिलाच्या बातम्या येतात कशा?

**उत्तर**—बातम्या कोठून आणि कशा येतात हें जर तुम्हाला सांगितलें तर त्यावर कोणाचा विश्वास बसणार नांही!

**प्रश्न**—मग खरी बातमी आपण किंवा आपले हिंदुस्थानांतील प्रतिनिधी कां बरें वर्तमानपत्रांना पुरवीत नाहीं?

**उत्तर**—खरी हकीकत प्रसिद्ध करून खोट्या बातम्या पसरविणारांची खोड मोडणें हें अर्थातच तुमचें वर्तमानपत्रकारांचे काम आहे; तें आम्ही करूं शकत नाहीं.

तिकडील खरी बातमी काढण्यासाठींच मी आफगाणिस्थानांत जाणार होतों आणि जमल्यास अद्यापिहि जाण्याची इच्छा आहे असें सांगतांच 'दाढी राखून मुसलमानी नांव धारण करा बरें, तें बच्चाचें राज्य आहे,' असा थोडासा विनोद झाल्यावर

**प्रश्न**—येथून पुढें कोठें जाण्याचा आपला विचार आहे?

**उत्तर**—इटालीकडे जाणार आहोंत.

**प्रश्न**—कधीं जाणार तें कांहीं ठरलें आहे काय?

**उत्तर**—पुढील प्रवास हा सर्व राणीसाहेबांच्या प्रसूतीवर अवलंबून राहील. त्या केव्हां प्रसूत होतील तें सांगतां येत नाहीं आणि त्यांतून त्या मोकळ्या झाल्यावर मगच आम्ही येथून निघूं.

याप्रमाणें मुलाखत झाल्यावर उपचाराचें आभार प्रदर्शन झाल्यावर "राम राम" ठोकून परत फिरतांना बाहेरच **अमानउल्ला** कांहीं लिहीत होते त्यांचें दर्शन झालें. चिंताग्रस्त. पिकलेल्या केंसांचा वगैरे टाईम्सचे वर्णन कल्पित कादंबरीच दिसली! स्थानच्युत झाल्यामुळें आपण आतां कोणापुढें जाऊं नये याच इच्छेचें त्यांच्या मुद्रेवर प्राबल्य दिसलें. अगदीं त्वरेनें एक कागद लिहून त्याची पुढील व्यवस्था करण्यास ते एका हस्तकास सांगत होते. त्यांचा पोषाख अगदीं साधा घरगुती होता.

अफगाणिस्थानाच्या माजी राजाची आज अवस्था काय आहे! आसन्नसेवकांच्या किंवा शरीररक्षकांच्या समवेत हिंडणाऱ्यांच्या घरापुढें सशस्त्र सैनिक उभे कां केले गेले? आणि आगगाडींतून प्रवास करणे ज्या राणीला शक्य झालें तिला बोटीवरून समुद्रतरंगणें अशक्य कां असावें? समुद्रयानावर तर आगगाडीपेक्षां किती तरी अधिक पटीच्या सोयी असतात. पण ...... हें आपलें काम नव्हे. आहे ही परिस्थिति अशी आहे. तिच्यापासून काय निष्कर्ष काढावयाचा तो वाचकांनींच काढावा.

---

# खेडेगांवविषयक व्याख्यानमाला

## डॉ. बा. चिं. लागू यांचीं व्याख्यानें

ता. १८ व ता. १९ मे रोजीं डॉ. लागू यांची 'खेडेगांवांतील सांसर्गिक रोग' या विषयावर व्याख्यानें झालीं. तीं पुढीलप्रमाणे--आरोग्याचा प्रश्न हा सर्वस्वी सरकार व सरकारनें उत्पन्न केलेल्या स्थानिक संस्था यांनीं सोडविला पाहिजे. रयतेकडून घेतलेला सारा व इतर कर यावद्दल लोकांच्या आरोग्याची व्यवस्था करणें ही सरकारची जबाबदारी आहे. स्वतंत्र देशांतील सरकार या गोष्टी करतें, आपलें सरकार करीत नाहीं. हा स्वातंत्र्य व पारतंत्र्य यांतील भेद आहे. सरकार व लोक यांचा राजकीय विरोध असल्यामुळें हें आवश्यक असें काम प्रचारकांनीं केलें पाहिजे.

आरोग्याचा विचार करतांना तीन गोष्टी पाहाव्या लागतात--(१) प्रतिकारशक्ति वाढविणें (२) संसर्गापासून संरक्षण (३) रोगनिवारणार्थ उपाय. शुद्ध हवापाणी, चांगलें अन्न, चांगला व्यायाम व मानसिक व शारीरिक विश्रांति या गोष्टी असल्या म्हणजे मनुष्याची प्रतिकारशक्ति वाढते, रोग येत नाहीं व आल्यास फारसा बळावत नाहीं. परंतु खेडेगांवांत या सर्व गोष्टींचा अभाव दिसून येतो. यासाठीं सामान्य आरोग्याचे ज्ञानाचा शक्य तितका जास्त प्रसार झाला पाहिजे.

अन्नाचें दारिद्र्य आहे व तो प्रश्न स्वराज्याशिवाय सुटावयाचा नाहीं. पाणी चांगलें राहण्यास लोकांत ज्ञानाचा प्रसार व ग्रामपंचायती कार्यक्षम झाल्या पाहिजेत.

अशा परिस्थितीत खेडेगांवांत सांसर्गिक रोगांचा फैलाव फार झपाट्यानें होतो. सांसर्गिक रोगाचें सर्व शास्त्र 'जंतूवर' उभारलें आहे. हे जंतू अन्न, पाणी, हवा वगैरेमधून शरीरांत प्रवेश करतात. पाण्यांत जंतू उत्पन्न होऊन महामारी हा रोग होतो. तें पाणी पिणारे सर्व लोक दगावतात असें नाहीं. जे दगावत नाहींत त्यांच्या ठिकाणीं प्रतिकारशक्ति अधिक असते. महामारीवर टोचण्याचा उपायहि कांहीं ठिकाणीं सुरू झाला आहे. हा सांसर्गिक रोग पचनमार्गानें होणारा आहे. हवेंतून जंतू शरीरांत प्रवेश करतात व त्यामुळें रोग होतो. त्यांपैकीं प्लेग, महारोग वगैरे आहेत. पिसवा, ढेकूण वगैरेच्या द्वारें होणाऱ्या रोगांत मलेरिया वगैरे येतात. या सर्वांत महामारी प्लेग, देवी व हिंवताप हे एकदम उद्भवणारे व झपाट्यानें वाढणारे असे रोग आहेत. महामारीचे जंतू आजाऱ्याचे ओकारींत व जुलावांत असतात, करितां रोग्याचे कपडे,भांडीं वगैरे स्वच्छ ठेवलीं पाहिजेत.सदर कपडे--भांडीं नदींत अगर तळ्यांत धुतलीं गेल्यास साहजिकच हा रोग चोहोंकडे फैलावतो. महामारीचे जंतू माशा पसरवितात. मेवामिठाई दूषित करतात. व यामुळे यात्रेच्या वेळीं याचा प्रसार ताबडतोब होतो व आसपासच्या गांवीं पसरतो. यानंतर या रोगाची लक्षणें कोणतीं, काय काळजी घ्यावी व औषध काय द्यावें याची माहिती त्यांनी दिली.

नंतर दुसरे दिवशीं देवीच्या रोगासंबंधीं माहितीस सुरुवात झाली. देवीचा जंतु आहे पण तो अद्याप सांपडला नाहीं. टोचण्यानें देवी येत नाहींत हें आतां सर्वांना कळून चुकलें आहे. कपड्यास लागलेल्या लशीपासून या रोगाचा फैलाव होतो त्याबद्दल काळजी घ्यावी. यानंतर रोगाची लक्षणें व उपाय यांची माहिती देऊन रोगाचा फैलाव न होण्यास कोणते प्रतिबंधक उपाय योजावेत हेंहि त्यांनी सांगितले. दुसरे सांसर्गिक रोग म्हणजे गोवर व डांग्या खोकला हे होत. यानें थोडाफार त्रास होतो. परंतु यापासून रोगी फारसे दगावत नाहींत. इन्फ्ल्युएन्झा हा एक फार झपाट्याने वाढणारा व प्रसंगविशेषीं अत्यंत तीव्र स्वरूप धारण करणारा असा रोग आहे. १९१८ सालीं हिंदुस्थानांत या रोगाने ५२५३ लाख लोक बळी घेतले.

यानंतर प्लेगाची माहिती सांगण्यांत आली. हा रोग हिंदुस्थानांत कच्छ प्रांतांत प्रथमतः १८१५ मध्यें आला. पुढें हळूहळू फैलावत त्यानें बहुतेक देश व्यापला व १९१२ सालीं तर त्यानें फारच तीव्र स्वरूप धारण केलें. पण पुढें त्याची तीव्रता कमी होत चालली आहे असें दिसते. इनॉक्युलेशन हा एक उपाय आहे. परंतु अगदीं नक्की व खात्रीचा उपाय यावर सांपडला नाहीं. औषधाचा फारसा उपयोग होत नाहीं. प्लेगाचा उद्भव होण्यापूर्वी तो उंदरांना सुमारें १५ दिवस अगोदर होतो. स्थानिक संस्थांनीं यावर अधिक काळजी घेतली पाहिजे.

कफक्षय हा एक मोठा सांसर्गिक रोग आहे. आपल्याकडे याचा फैलाव अधिक होण्यास सुरुवात झाली आहे. वाटेल तेथें गलिच्छपणें थुंकण्याची संवय पुष्कळ लोकांना असते. कफक्षयी मनुष्य असल्यास त्याचे थुंकण्यांतून जंतू मातीत मिसळतात व तेथून धुळीच्याद्वारें हळहळ फैलावतात. याकरितां स्वतंत्र दवाखाने पाहिजेत. क्षयरोगाचे जंतू उन्हानें मरतात. हा रोगी मनुष्य हळूहळू क्षीण होऊन मृत्युमुखीं पडतो.

## श्री. भालेराव यांचें व्याख्यान

हिंवतापहि खेड्यांत बराच असतो. परंतु रोगी त्याची काळजी घेत नाहीं. डास न होतील अशी काळजी घेतली पाहिजे. याचीं लक्षणें व त्यावर उपाय सांगून व्याख्यात्यांनीं आपला विषय संपविला.

ता. १०-५-२९ रोजीं शेतकी कॉलेजांतील श्री. **श्री. ग. भालेराव** बी. एजी. यांचें '**शेती व बीजसंवर्धन**' या विषयावर व्याख्यान झालें. ते म्हणाले, "जमिनींतून उत्पन्न मिळण्यास दोन गोष्टींची आवश्यकता आहे. एक बी व दुसरी मशागत. बी रुजण्यासाठीं पाऊस लागतो, व ते वाढण्यासाठीं मशागत लागते. जमिनीच्या आंतील पाणी वर आणून त्याचें बाष्पीभवन करण्याचें काम झाडांची पानें करीत असतात व त्याचाच पुढें परिणाम पाणी पडण्यांत होतो. म्हणून वृक्षवर्धन हे पाऊस आणण्यास अत्यंत जरूर आहे. वनस्पतिवर्गावर प्राणिवर्ग पुष्कळ अंशांनीं अवलंबून आहे. असें असतांही आपण वृक्षवर्धनासाठीं जितकी खटपट करावयास पाहिजे तितकी करीत नाहीं. उलट संहार करण्यास नेहमी उद्युक्त असतों. यामुळें झाडी कमी होऊं लागली आहे व त्याचा परिणाम पाऊस कमी होऊन दुष्काळ पडण्याकडे होऊं लागला आहे. पूर्वी वृक्षसंवर्धन हें एक पुण्यकर्म व परमेश्वराची सेवा असें मानलें जात असे. दारीं तुळस लावणें हा त्याच भावनेचा अवशिष्ट भाग आहे. हीं झाली वैयक्तिक प्रयत्नाची स्थिति. सामुदायिक प्रयत्न यापेक्षां फार कमी. सीमोल्लंघनाचे दिवशीं वृक्षच्छेदनाचे ऐवजी वृक्षारोपण केलें गेलें तर किती फायदेशीर होईल ! वर्षांतून निदान एक दिवस तरी वृक्षारोपणाकरितां खर्च करावयाचा असा पाश्चात्य देशांत प्रघात आहे. वृक्षसंवर्धनाचे बाबीकडे सामुदायिक रीतीनें जर चांगलें लक्ष दिलें गेलें नाहीं, तर लवकरच जळणाचा तुटवडा पडेल अशी भीति वाटते.

वृक्षसंवर्धनाचें महत्त्व कळल्यानंतर त्याच्या पुढील महत्त्वाची गोष्ट म्हणजे जो वृक्ष लावावयाचा त्याचे बीजाची निवड करणें ही होय. एकाच झाडाच्या निरनिराळ्या जाती आहेत. एकांत फळ चांगलें तर दुसऱ्यांत फुल चांगलें तर तिसऱ्यांत पान चांगलें अशा प्रकारचा फरक आढळतो. निसर्गतःच कांहीं बीजांमध्यें दोष असतात. ते नाहींसे करून अगर वगळून बीजाचे सद्वंश निवडून काढले पाहिजेत. सरकारच्या शेतकी खात्यानें कोळंबा नांवाच्या भातावर प्रयोग करून त्यांत पुष्कळ सुधारणा केली आहे. (याबद्दलचे प्रयत्न कसे चालले आहेत व त्याचा काय उपयोग होत आहे याबद्दलचे प्रयोग या वेळीं व्याख्यात्यांनीं दाखविले.) बीज सुधारण्याच्या दोन पद्धती आहेत. एक निवड पद्धति व दुसरी संकर पद्धति. पहिलींत चांगला दाणा एक प्रकारचा असा निवडून घ्यावयाचा व दुसरींत एक प्रकारच्या झाडाच्या फुलांतील पुंकेसर काढून टाकावयाचे व त्याच फुलांतील स्त्रीकेसरावर दुसऱ्या चांगल्या प्रकारच्या फुलांतील पुंकेसर घालावयाचे व अशा रीतीनें चांगलें बी निर्माण करावयाचें. संकर पद्धतीनें बीजांत सुधारणा झाली आहे ती अशी—त्यानें (१) लवकर पिकणारी (२) जास्त उत्पन्न देणारी (३) भारी किंमत देणारी (४) रोगास दाद न देणारी, अशा चार प्रकारची जात निर्माण झाली आहे. भात, जोंधळा, कापूस व गहूं या पिकांचे बाबतींत सदर प्रयोग पूर्ण झाले आहेत, व कोणासहि याबद्दलची माहिती शेतकी खात्याकडून मिळं शकेल. हे प्रयोग करणें फार खर्चाचें आहे, म्हणून व्यक्तीला प्रयत्न करतां येणार नाहीं. परंतु सरकारनें तयार केलेलें चांगलें बी शक्य त्यानें अवश्य घ्यावें. खेडेगांवांत काम करूं इच्छिणाऱ्यानें बीं आणवून देण्याचें काम अवश्य करावें. बीजसंवर्धन करण्याचा खासगी रीतीनेंहि जोराचा प्रयत्न व्हावयास पाहिजे, व शेतकऱ्यांस या गोष्टीचें महत्त्व लक्षांत आणून दिलें पाहिजे.

## प्रो. देशपांडे यांचीं व्याख्यानें

ता. १२ व १३ मे रोजीं शेतकी खात्यांतील कीटकशास्त्राचे तज्ज्ञ प्रो. **व्ही. जी. देशपांडे** एम. एजी. यांचीं "**पिकांचे उपद्रव व त्यावर उपाय**" या विषयावर व्याख्यानें झालीं. चांगलें बी निवडणें हे पीक चांगलें येण्यास फार जरूर आहे. बियांत कीड असेल तर पीक येणार नाहीं. आलें तरी झाड किडके येईल. किडीपासून बियाणें चांगलें सुरक्षित ठेवण्यास उपाय असा कीं, बीं थोडें असेल तर नेपथिनमध्यें ठेवावें व जास्त असेल तर रांजणांत भरून त्यावर ४ इंच वाळूचा थर द्यावा म्हणजे कीड उत्पन्न होणार नाहीं. पिकांना ३ प्रकारांनीं उपद्रव होत असतो (१) कीटक-जन्य (२) वनस्पति-जन्य (३) कीटकेतर-जन्य. यांपैकीं पहिले दोन उपद्रव फार जाचक व हानिकारक असतात. किडींत प्रथमतः अंडीं नंतर आळ्या व नंतर त्याचे पतंग अशा रीतीनें वाढ होत असते. कीड ही आळीच्या स्वरूपांत म्हणजे

दुसऱ्या पायरीला येते त्या वेळींच मारली पाहिजे. नावा म्हणून जो किडीचा एक प्रकार आहे त्याला पंख नसतात. तो ढेकणाप्रमाणें झाडाचा रस शोषून घेतो. कांहीं ठिकाणीं पिकांवर औषध टाकावें लागतें तर कांही ठिकाणीं त्या किडीवर औषध टाकावें लागते. लेड आर्सेनेल हें औषध वनस्पतीवर टाकतात व एमरल्डग्रीन हें औषध किडीवर टाकतात. सदर औषधें पाण्यांतून अगर पूड करून वापरतात. या कोणत्याही औषधाची माहिती व औषधें ही डिस्ट्रिक्ट ॲग्रिकल्चरल ओव्हरसीअर अगर तालुका डेव्हेलपमेंट असोसिएशनकडे मिळूं शकतात.

कीड उत्पन्न झाल्यावर औषधयोजना करण्यापेक्षां कीड उत्पन्न होऊं नये म्हणून आगाऊ काळजी घेत जावी. शेतांतील तण काढून टाकणें हा कीड उत्पन्न न होण्याचा महत्त्वाचा उपाय आहे. लागवडीचा हंगाम बदलण्यानेंहि कांहीं पिकांस कीड पडत नाहीं. मार्चमध्यें पेर केल्यास उंसास कीड पडते, परंतु जानेवारींत पेर केल्यास कीड पडत नाहीं. कीटकेतर उपद्रव देणाऱ्या प्राण्यांत गोचीड, खेकडे, उंदीर, रानडुकरें वगैरे होत. गोचीड बटाट्यावर पडते, त्यावर चुन्याची बकणी व गंधक टाकलें असतां ती नाहींशी होते. खेकडे व उंदीर यांचे बिळांत पंपानें "कॅलशिअड सायनाईड" सोडलें असतां ते मरतात. यास खर्च फार येत नाहीं. एकरी सुमारें २ रु. खर्च येतो. रोग पडणें हा पिकांच्या उपद्रवाचा तिसरा प्रकार होय. हे रोग म्हणजे एक प्रकारच्या वनस्पतीच असतात. ही वनस्पती मूळ पिकावर वाढते, नंतर मूळ पिकास मारते व मागाहून आपणहि मरते, अशा प्रकारच्या विचित्र स्वभावाची ती आहे. जोंधळ्यावरील 'काळी काजळी' गव्हावरील 'तांबेरा' द्राक्षावर पडणारा रोग अशा प्रकारचे रोग हे या जातींपैकीं होत. अशा वेळीं शेतकी खात्यांतील तज्ज्ञांचा सल्ला घेऊन वागावें. मोरचूद, गंधक वगैरेसारख्या औषधांनीं हा उपद्रव नाहींसा होतो. तरी त्याचा उपयोग जरूर करावा.

# लष्करी शिक्षण

## (डॉ. मुंजे यांची मुलाखत)

मद्रास इलाख्यांतील दौऱ्याच्या वेळीं 'मद्रास मेल'च्या बातमीदाराला डॉ. मुंजे यांनीं मुलाखत दिली. सदर मुलाखतींत ते म्हणाले:—

गेल्या महायुद्धांतली जर्मनीची युद्धाची तयारी व लढण्याची पद्धत पाहून, इतर सर्व राष्ट्रांना आतां असें वाटूं लागलें आहे कीं, जर्मनीप्रमाणें आपणहि सर्व तरुण स्त्रीपुरुषांस लष्करी शिक्षण दिलें पाहिजे. तर पुरुषांना प्रत्यक्ष लष्करी शिक्षण देणें अवश्य असून, स्त्रियांनीं स्वराष्ट्रसंरक्षणाला लागणाऱ्या इतर आनुषंगिक विषयांचें शिक्षण घेणें जरूरीचें आहे. हिंदी लोकांच्या परिस्थितीचें अवलोकन या दृष्टीनें केले असतां, असें दिसून येतें कीं, यापुढें आपले सर्व प्रयत्न स्व-संरक्षणाची जबाबदारी घेण्याची पात्रता हिंदी लोकांचे अंगीं आणण्याकडे झाले पाहिजेत. हिंदी लोकांमध्यें बहुसंख्य हिंदु लोकच असे आहेत कीं, ज्यांच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. कारण वर्णविशिष्ट समाजव्यवस्थेमुळें त्यांच्यामध्यें मूलतःच तेजाची उणीव आहे. मुसलमानांमध्यें ही वर्णव्यवस्था नाहीं. म्हणून प्रत्येक सशक्त मुसलमान तरुण जात्याच सैनिक असतो. यामुळे स्वदेश, स्वधर्म व संस्कृति याकरितां त्यांची लढण्याची तयारी थोड्याफार शिक्षणानें होऊं शकते. किंबहुना हिंदूपेक्षां तो अधिक यशस्वीहि होईल. या बाबतींत मुसलमान व हिंदु यांचेमध्यें फारच मोठें अंतर आहे.

हिंदुधर्मांतील वर्णाश्रमधर्माच्या विशिष्ट तत्त्वज्ञानामुळें, फक्त क्षत्रिय लोकांचेंच 'लढणें' हें कर्तव्य होऊन बसलें आहे. समजूतच अशी कीं, ब्राह्मण, वैश्य व शूद्र या वर्णांच्या लोकांचें हें काम नव्हे. त्यांची लोकसंख्या तीन-चतुर्थांशोपक्षांहि जास्त आहे. आणि पूर्वकालीन शेकडो वर्षांच्या चालीरीतीमुळें त्यांची क्षात्रवृत्ति क्षीण झाली आहे. त्यांचेमधील क्षात्रतेज कांहीं विवक्षित व्यक्तींमध्यें तितक्याच तेजस्वितेनें आढळतें, पण हें क्षात्रतेज सर्व व्यक्तींमध्यें दिसून येत नाहीं. याकरितां हिंदु लोकांनी आपल्या संख्येच्या प्रमाणांत स्वदेश व साम्राज्य यांच्या संरक्षणाची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्यास तयार व्हावें. या दृष्टीनें विशेष प्रयत्न करणें जरूरीचें आहे. कारण प्रसंग आला असतां हिंदू व मुसलमान यांच्या सहकार्याशिवाय इंग्रज लोकांना स्वदेशसंरक्षण करणें झेपणार नाहीं. यामुळें हिंदुसभेनेंच इंग्रजांशीं परिणामकारक असें सहकार्य कसें करतां येईल हा प्रश्न सोडवला पाहिजे. हिंदु लोकच इतर धर्मीय लोकांपेक्षां मागसलेले आहेत हें आतां

हिंदुसभेला करून चुकलें आहे. व हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी घेण्याकरितां मुरुवातीला सक्तीचें शारीरिक शिक्षण, लष्करी कवाईत व रायफल प्रॅक्टिस यांचें शिक्षण त्यांना दिले पाहिजे. या हेतूनेंच व्यायामशाळांची स्थापना करण्याची खटपट मी करीत आहे. या व्यायामशाळांत मुलांना लाठी, कुस्ती, तलवारीचे हात, लष्करी कवाईत, रायफल प्रॅक्टिस व इतर देशी खेळ व स्व-संरक्षणाच्या इतर खुब्या शिकविल्या जातील व जेणेकरून १२ ते २५ वर्षे वयाच्या तरुणांना प्रसंगोपात्त लष्करांत नोंदणी केल्यानंतर थोडयाच दिवसांत चांगले सैनिक बनवितां येईल. सक्तीचें शारीरिक शिक्षण, लष्करी कवाईत व रायफल प्रॅक्टिस या संबंधाची माझी ही त्रोटक कल्पना आहे.

रायफल प्रॅक्टिससंबंधानें माझें मत असे कीं, शाळा व कॉलेजे यांचे वेगवेगळे संघ बनविण्यांत यावेत व त्यांचेवर संस्थेच्या चालकांचा देखरेख असावी, व सरकारनें त्यांना ग्रॅंटच्या रुपानें मदत करावी. जिल्हानिहाय व प्रांतानिहाय स्त्रीपुरुषांना शिक्षण देण्याकरितां रायफल असोसिएशन्स स्थापन करून बंदुकीचें शिक्षण घेणाऱ्या स्त्रीपुरुषांना त्यांचे सभासद होतां आलें पाहिजे. ही पद्धति कॅनडा, ऑस्ट्रेलिया, साऊथ आफ्रिका इत्यादि देशामधून चालू आहे. व त्यांचेंच अनुकरण मी करीत आहे. तरुण मुलांमध्ये बंदुकीच्या शिक्षणाची आवड उत्पन्न होईल, अशी चळवळ केली पाहिजे. लष्करी व बिगर-लष्करी जात अशा प्रकारचा भेदाभेद करण्यांत येतो, पण असा कांही भेद उपजतच आहे असें हिंदुसभेला तरी वाटत नाहीं. हिंदुसभेला अशी उमेद वाटत आहे कीं, वाण्याचा मुलगा देखील इंग्लिश वैश्य वृत्तीच्या दुकानदाराचा मुलगा जसा धिप्पाड पठाणाच्या देशांत वाकब सैनिक तयार होतो तसा तयार होईल. आणि हा उद्देश मनांत धरूनच मी असे म्हणतो कीं, १२ ते २० वर्षे वयाच्या मुलांना शारीरिक शिक्षण व रायफल प्रॅक्टिस हे विषय आवश्यक ठेविले पाहिजेत. रायफल प्रॅक्टिस हा विषय आवश्यक समजण्यांत यावा. या माझ्या मताशी सरकारचें मत तंतोतंत जमत नसलें तरी माझ्या विचारसरणीचा रोख सरकारला बराचसा पटला आहे. यापुढें सरकारच्या अनुकूल धोरणाचा फायदा घेणें हें मुलांच्या पालकांचें व लोकांचे कर्तव्य आहे. असेब्लीनें सध्याच्या परिस्थितीत जितके करतां येणे शक्य होतें तेवढे केलें आहे. प्रांतिक सरकाराच्या कार्यक्षेत्रांत शिक्षणखातें हें सोपीव खातें असें समजण्यांत येतें त्याअर्थी शारीरिक शिक्षण व रायफल प्रॅक्टिस हे विषय आवश्यक करण्याकरितां, बिलें आणणें हें प्रांतिक सरकारच खासगी सभासदांचेंच काम आहे. मी अशा प्रकारच्या बिलाचा मसुदा केला आहे. वेळेनुसार प्रांतविशिष्ट परिस्थितीप्रमाणें त्यांत फेरबदल करतां येईल. या बिलाच्या प्रती हिंदुमहासभेचे चिटणीस देवरतन शर्मा नया बझार दिल्ली, यांजकडे अगर माझ्या नागपूरच्या पत्त्यावर मिळू शकतील.

हिंदुमहासभेनें हातीं घेतलेल्या सामाजिक सुधारणेच्या चळवळीसंबंधानें ते म्हणाले:—

धार्मिक व सामाजिक अशा दोनहि दृष्टींनी हिंदुमहासभेनें ही चळवळ हातीं घेतली आहे. राजकारणांत शिरावयाचें नाहीं अशी हि. म. सभेची उत्कट इच्छा आहे, आणि राजकारणांत हात घालण्याचा प्रसंगहि क्वचित्‌च येतो. राष्ट्रीय सभेनें शुद्ध राष्ट्रीयत्वाच्या तत्त्वांचा अव्हेर करून विशिष्ट जातीला आपल्या काखेंत मारण्याचा विचार केला तरच नाखुषीनें त्या वेळेपुरतें अखिल भारतीय हिंदुसभेला आपलें अधिष्ठान कायम राखण्याकरितां राष्ट्रीय सभेच्या कारभारांत हात घालणे भाग पडेल. गेल्या शेकडो वर्षांत लोकसंख्येच्या दृष्टीनें हिंदु समाजाची जी हानि झाली आहे ती भरून काढणें जर शक्य झालें तर ठीकच. नाहीं तर हिंदु समाजाचें विद्यमान स्थान तरी कायम राखण्याकरितां संघटित स्वरूपाची चळवळ करणें हाच हिंदुमहासभेचा मुख्य हेतु आहे. या दृष्टीनें हिंदुसभेचा कार्यक्रम असा आहे कीं,

(१) अस्पृश्यतानिवारणाच्या दृष्टीनें विहिरी, शाळा व कॉलेजे यांचा उपयोग करण्याकरितां अस्पृश्यांना पूर्ण मोकळीक देणे व इतर जातींच्या बरोबरीनें देवालयांत त्यांना प्रवेश मिळेल अशी समाजाची मनोरचना तयार करणे.

(२) ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद ज्या धार्मिक व सामाजिक अडचणींमुळे उत्पन्न झाला आहे त्या अडचणी दूर करून सर्व हिंदु समाजाचें संघटन करणें. कारण या धार्मिक व सामाजिक निर्बंधांस धर्मशास्त्राचा आधार आहे असे मला वाटत नाहीं.

(३) शारीरिक शिक्षण, लष्करी ड्रिल व लाठी, कुस्ती, तलवारीचे हात यांसारख्या स्वसंरक्षणाच्या देशी खेळांचें शिक्षण देण्याकरितां व्यायामशाळांची स्थापना करणें.

(४) प्रत्येक प्रांतांत, तालुक्यांत व जिल्ह्यांत शाळा व कॉलेजें यांमध्यें शिकणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां 'रायफल क्लब' काढणें व मुलांमध्यें लहानमोठ्या शिकारीची आवड उत्पन्न करणें.

(५) इंग्लंडमधील लष्करी कॉलेजांतून प्रवेश मिळण्याकरितां हिंदी तरुणांमध्यें ज्या गुणांची उणीव भासते व जे गुण कमी प्रमाणांत आहेत

असें सँढर्स्ट कमिटीनें प्रतिपादिले ते गुण हिंदी तरुणांमध्यें उत्पन्न करण्याकरितां इंग्लंडमधील पब्लिक स्कूलसच्या धर्तीवर शाळा व कॉलेजे यांना जोडून वसतिगृहें काढणे व तशा प्रकारचें शिक्षण देणे

( ६ ) परधर्मीय प्रचारकांच्या जाळ्यांत लहान बालकें व विधवा स्त्रियां सांपडूं नयेत याकरितां अनाथ बालिकाश्रम व सेवासदन यांसारख्या संस्थांची स्थापना करणें.

( ७ )हिंदुधर्मांत परत येऊं पाहाणाऱ्या लोकांना शुद्ध करून घेणें.

थोडक्यांत या सर्वांचा मथितार्थ असा कीं, ज्याप्रमाणे इंग्लंडचा बादशहा ख्रिश्चन धर्माचा संरक्षक आहे, अगर इस्लामी धर्माचे संरक्षक इतर राजे आहेत त्याप्रमाणेंच हिंदुमहासभा ही हिंदु-धर्माच्या संरक्षणाचें काम करणार आहे.

हा उद्देश सफल होण्याकरितां व हिंदुमहा-सभेची चळवळ चालविण्याकरितां ' सर्व्हंट्स ऑफ धी हिंदु सोसायटी ' ( हिंदु समाजसेवकसंस्था ) या नावाची एक संस्था काढावयाची आहे. या संस्थेंत वीस वर्षेपर्यंत या चळवळीला वाहून घेणाऱ्या तहाहयात सभासदांचा समावेश केला जाईल. कौटुंबिक गरजेच्या मानाने प्रत्येक सभासदाला १०० ते १५० यांचे दरम्यान दरमहा पगार मिळेल. याशिवाय त्याचा ५००० रुपयांचा विमा उतरला जाईल. तूर्त कल्पना अशी आहे कीं, प्रांतानिहाय एकेका सभासदाची योजना करून त्यांनी वर निदर्शित केलेल्या कार्यक्रमाचा प्रसार करण्याकरितां जिल्हानिहाय व तालुका-निहाय हिंदुमहासभेच्या शाखा स्थापन कराव्या. या-करितां तूर्त एक लाख रुपयांचा कायमनिधि जमविण्याची आवश्यकता आहे. या रकमेच्या फक्त व्याजाचा विनियोग संस्थेच्या चालू खर्चाकडे केला जाईल. लोकांना याची उपयुक्तता पटली व हा प्रयोग यशस्वी झाला म्हणजे हा कायमनिधि पुढे वाढूं शकेल.

अस्पृश्यतानिवारणाच्या दृष्टीनें पुराणमतवादी ब्राह्मण वर्गाच्या प्रतिकूलतेसंबंधाने जी साशंक वृत्ति प्रदर्शित करण्यांत येते त्यासंबंधाने माझा अनुभव असा आहे कीं, पुराणमतवादित्व या अस्पृश्यता-निवारणाच्या आड येते ही समजूत चुकीची आहे. खेदाची गोष्ट अशी की पुराणमत-वादी लोक अगर अस्पृश्यतानिवारणाचे पुरस्कर्ते या दोघांनींहि धर्मशास्त्राबद्दलचें अज्ञान सारखेच आहे. धर्मशास्त्रांतील तदनुषंगिक तत्त्वांचें पूर्ण ज्ञान झाल्यावर अस्पृश्यतेला आधार नाहीं हेच त्यांना कबूल करावे लागेल. बुद्धि व विचारशक्ति यांची समजूत पटल्यावर, प्रश्न उरतो तो फक्त वर्षानुवर्षे चालत आलेल्या रूढीचा. पण ही रूढी सतत व उत्कट प्रयत्नांनीं सहज बदलू शकेल. विद्यमान परिस्थितींत अखिल हिंदुस्थानाचा साकल्याने विचार केला असतां असें दिसून येईल कीं, पुष्कळ बाबतींत ही अस्पृश्यता नाहीशी झाली आहे व ही पुढेंहि नाहीशी होईल. हिंदु-महासभेच्या कार्याचा प्रचार चिकाटीनें व श्रद्धापूर्वक चालविला असतां मला असा आत्मविश्वास वाटतो कीं, पुढील १० वर्षांत हिंदु-समाज पूर्वकालीन वैभव व पावित्र्य यांना अनुसरून दिवसेंदिवस अधिक तेजस्वी होईल.

# इराणांतून बलुचिस्थानांत

इराणांतून बलुचिस्थानांत विमानांतून येणें सुखाचें होतें. तरी सदर प्रदेशाची नीट ओळख करून घेण्यासाठीं मोटारीतूनच यावयास निघालो. तेहेरानहून सकाळीं निघावयाचें असें ठरलें होतें. तरी सायंकाळी सूर्यास्ताचे सुमारास मोटार हलली ! तेहेरानच्या सीमेबाहेर तर दिवे लागल्यावरच पडलो. बाकी ही पद्धत नेहमीचीच असल्याचें समजले. इतकेंच नव्हे तर त्याच दिवशीं निघाल्या-बद्दल मोटारहांक्योंच आभार माना असेही कोणी म्हणाले ! " बारा" उतारूंसाठीं किंवा ४० मण बोजासाठी बनविलेल्या अमेरिकन यंत्रयानांत सुमारें २५–३० मण सामान आणि १६ उतारू 'कोंबले' होते !

बरें; रस्ता तरी चांगला असावा अशी अपेक्षा करावी तर तेंही मूर्खपणाचेंच ! पुढे गेलेल्या मोटारच्या खुणेवरून " पावलावर पाऊल टाकत " जावयाचे हा क्रम ठेवावा लागला. तेहेरान–मशहद हें अंतर ५६० मैलांचे आहे. दिवसा यंत्रयान मार्ग आक्रमण करी व रात्रौ सर्व प्रवासी निद्राराधन करीत. अंधारांत मार्गहि दिसत नसे आणि दिवसभराच्या शीणानें सर्वचजण थकून–भागून जात. एकंदर ५ रात्री या प्रवासास लागल्या व सहाव्या मध्यरात्रीं उद्दिष्ट गांवी आम्ही पोंचलों. मोटारीच्या भानगडीहि मधून मधून होत असतात. त्यासाठींहि कांहीं अवधि द्यावा लागतो. रस्त्यांची परिस्थिति वर सांगितलीच आहे. त्यांत यांत्रिकांच्या अकलेची भर पडावयाची राहिली आहे. प्रवासाला निघण्यापूर्वी यंत्रयानाची त्यांनीं

तपासणी करावयाची नाहीं असा निश्चय केलेला दिसला. जेव्हां कांहीं मोडतोड होई तेव्हांच तिकडे त्यांचे लक्ष जाई. संसारांत राहून विरक्त राहणारास पद्मपत्राची उपमा देतात. तो प्रघात सोडून त्या ठिकाणीं इराणांतील मोटारहांक्याची उपमेसाठीं योजना करावी. मोटारीत असूनहि जशी कांहीं मोटार आपली नव्हेच या भावनेनें त्यांचें वर्तन असतें. आडरानांत किती तरी मोटारी अडकून पडल्या होत्या. कोणाजवळ हवा भरण्याचा पंप नाहीं तर कित्येकांचे पेट्रोल संपलेलें. कांहींजवळ तर नेहमीं आवश्यक असणारीं हत्यारेंहि नव्हतीं. अशा अगदीं साध्या क्षुल्लक बाबींसाठीं उतारूंचे हाल होत. कोठें तरी मोटार अडली म्हणजे ती पुढें जावी कशी? उतारूंना दुसरीकडे जातां येत नसे. तेव्हां मनोभावाने मोटारहांक्याबरोबर तेही जिवापाड परिश्रम करीत.जितके काम लवकर होईल तितका त्यांचा प्रवास जलदी संपणारा असल्यानें ते धडपडत. पण यांत्रिक अगदीं निर्विकार दिसे. त्याला त्यांचें कांहीच वाटत नसे.

इराणांत वाहतुकीची साधनें उपलब्ध झालीं असल्यानें त्याचा फायदा प्रथमतः व्यापारी घेतात हे खरें, पण बहुतेक उतारू यात्रेसाठीच हिंडत असतात. इराणी हे शिया पंथाचे मुसलमान, तेव्हां इराकमधील 'करबला' या ठिकाणीं जाण्याची त्यांची उत्कट इच्छा असणारच. मशहद ही अत्यंत महत्त्वाची यात्रेची जागा असल्यानें धार्मिकांची तेथे अत्यंत गर्दी जमते. मशहदचे माझ्याबरोबरचे उतारू सर्व यात्रेकरूच होते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे फाजील धर्मवेडानें वेडावलेली ती मंडळी होती. दिवसा तीनचार वेळ प्रार्थनेसाठीं मोटार थांबविण्याची त्यांची ओरड असे पण मोटारहांक्याशी संगनमत करून केवळ दोन वेळच प्रार्थनेसाठीं मोटार थांबविली जाईल असे ठरवले. एकदां खालीं मंडळी उतरली कीं, मग तो मेंढ्यांचा कळप पुनः कोंडवाड्यांत हांकण्यास निदान तास दीड तास जाई. शिवाय आहारासाठीं १-२ वेळां मुक्काम दिवसा करावा लागेच. इतका वेळ जाऊन मोटार सुरळीत चालल्यास आमच्या प्रवासाची प्रगति व्हावयाची !

## पैगंबराचा धांवा

धर्मनिष्ठांचा उपयोग संकटहरणाचे कामीं बराच झाला. एखादा मोठा खळगा आला किंवा ओढ्यांतून पलीकडे जावयाचे असेल म्हणजे सर्व यात्रेकरू एकस्वरानें 'पैगंबरा'चा धांवा करीत आणि संकटांतून सोडविण्याची विनंति त्याला करीत. त्यांचा तो अल्ला-रसुलिल्लाचा ' इल्लागुल्ला ' कर्णकटु वाटे. पण करतां काय ? मुसलमानी राज्यांत असल्यानें तें सोसावें लागलें.

इराणांत खनिज संपत्ति किती आहे याचा अंदाज याच प्रवासांत आला. डोंगरांचे हिरवे, तांबडे, पिंवळे, पांढरे असे वेगळे वेगळे रंग दिसत. कारण तेथील माती अथवा दगड त्या त्या रंगाचे आहेत. कित्येक ओढे अगदीं खारट पाण्याचे असून शुभ्र मिठाचे मोठमोठे ढीग आढळत. जमिनीवर किती तरी ठिकाणीं पांढरा पातळ थर पसरलेला असे तो मिठाचाच ! गिरिपृष्ठभाग कांही ठिकाणीं काळाकुट्ट दिसून दगडी कोळशाचें आस्तित्व सुचवी तर मधून मधून चम् चम् करणाऱ्या टेकड्या अभ्रक असल्याची साक्ष देत.

आमचा प्रवास दिवसा होई; आणि रात्रीं एखाद्या उपाहारगृहांत वास्तव्य करावें लागे. " काहवाखाना " असें नांव इकडील उपाहारगृहांना असते. तेथे सर्व खाद्यपेय पदार्थ तर मिळतातच पण उतारूंसाठीं निजण्याबसण्याचीहि सोय केलेली असते. मोटारींची वाहतूक वाढल्यामुळे अशा काहवाखान्यास साहजिकच तेजी आली आहे. रस्ता ज्या गांवांमधून जाई तेथे असे " खाने " असत. त्या त्या गांवांतला मुख्य मार्ग आणि तेहेरान-मशहद हा रस्ता हे कांहीं भिन्न नसत. दोन घरांमधील अरुंद भाग किती तरी ठिकाणीं "रस्ता" म्हणून उपयोगांत आणला जाई. एक मोटार कशीबशी निघून जाण्याइतकीच ती वाट असे. पण तशा अडचणींतूनहि रहदारी जोरानें चालते. दुसरा मार्गच नाही, मग काय करावयाचें ?

पांच रात्रीं पांच वेगळ्या ठिकाणीं मुक्काम झाला. तेथें गेल्याबरोबर जें पुढें येईल त्यावर हात मारून आडवे व्हावयाचें हा ठरलेला कार्यक्रम असे. बरोबरचे प्रवासी लोक बिसमिल्लासाठीं निमंत्रण देत आणि मी हिंदी मुसलमान आहे अशीच सर्वांची समजूत असल्यानें ती विनंति नाकरतां येत नसे. भोजनप्रसंगीं दुसऱ्यास खाद्य पदार्थांचा आस्वाद घेण्यास विनंति करावयाची असली म्हणजे बिसमिल्ला कर असे आपल्याकडील मुसलमानही सांगतात. तशापैकींच तो प्रकार. मुसलमान मंडळीच्या हातांत असलेल्या रोटीचा थोडासा तुकडा घेऊन त्यांच्या मनाचें समाधान करावें लागे.

## गांधी-छापाच्या गुंड्या

याच्या उलट परिणामाची महात्माजींचीच एक कथा सांगतों. दोनप्रहरच्या भोजनासाठीं एके खेडेगांवीं थांबलो असतां तेथील बाजारांतील लोकांशीं मिळूनमिसळून तेहेरानमधील प्रचलित सुधारणेविषयीं त्यांचें काय मत आहे तें पाहावें म्हणून एका दुकानांत शिरलों. मी

नफर-इ-हिंद-हिंदी मनुष्य हें न सांगतांच कळलें, आणि हिंदी मनुष्य इराणांत आलेला म्हणजे तो मुसलमानच अशी समजूत सर्वत्र असे. ती माझ्या बरीच पथ्यावर पडे. इराण फार चांगलें आहे असें मी म्हटलें. इराणी लोकांनींहि हिंदुस्थानांतील 'गर्मी' (उष्णता), तेथें मिळणारा पुष्कळ पैसा, कामहि भरपूर इत्यादि ऐकीव गोष्टींचें वर्णन केलें. दुकानदाराच्या कोटावर गुंड्या होत्या त्या महात्मा गांधींच्या गुजराथी वेषांतील चित्रांकित असल्यानें 'हा मनुष्य कोण' असें त्याला विचारतांच 'नमीदानीम' (ठाऊक नाहीं) इतकें उत्तर देऊन मला त्यानें तोच प्रश्न टाकला. कोणी थोर पुरुष आहे इतकेंच त्याला ठाऊक होतें. त्याचें नांव "गांधी" असें सांगून तो हिंदुस्थानांतील आहे असं मी सांगतांच दुकानदारानें "गांधी मुसलमानच-ना?" असा सवाल केला. महात्माजींना सगळें जग कुटुंबवत् वाटत असल्यानें सर्व लोक त्यांचे "भाऊ" होत. पण हिंदी वातावरणाचा परिणाम मजवर साहजिकच झालेला होता आणि पुढील परिणामाची कल्पना नसल्यानें "छेः छेः गांधी हिंदु आहेत" असें मी सांगतांक्षणींच त्या दुकानदारानें "का—फी—र" अशीं अक्षरें डोळे मोठे करून तिरस्कारयुक्त वाणीनें उच्चारलीं आणि ताडकन् सर्व गुंड्या तोडून फेकून दिल्या!

आपली इतके दिवस वंचना झाल्याबद्दल त्याला अतिशय वाईट वाटलें. कारण इतक्या दूरच्या खेडेगांवीं गांधीछापाच्या गुंड्या जाणें म्हणजे त्यांना बरीच किंमत पडला असली पाहिजे. "मग हिंदूही आमच्याप्रमाणें रुमाल बांधतात काय?" हा त्याचा प्रश्न कोणत्या वृत्तीनें विचारला गेला असेल याची कल्पना करावी! गांधींनीं गुजराथी रुमाल डोक्यास गुंडाळला होता व तेवढ्यावरून तेही मुस्लीमानुयायी असावेत अशी तेथील लोकांची समजूत होती. पेहेलवी टोपीचा कायदा त्या प्रदेशांत आणखी ५ वर्षे तरी पोहोंचूं शकणार नाहीं असें वाटतें. त्या ठिकाणचे लोक पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें डोक्यास रुमालच गुंडाळीत.

### रोटी, दहीं, मध

अस्तु. प्रवासांतील "फराळ" हि साधाच असे. "नून (रोटी) मॉस (दहीं) असाल (मध) आणि प्याज (कांदा)" याव्यतिरिक्त कोणतेहि पदार्थ मी घेतले नाहींत. भाजी नेहमींच सामिष असे आणि मी पडलों शाकाहारी! तेव्हां निरामिष पदार्थ मिळतील तेवढेच घ्यावयाचे. नूनचे प्रकार इराणांत फार आहेत. हत्तीसाठीं लागणाऱ्या जाड रोटांपासून ते कागदाप्रमाणें पातळ पोळ्यापर्यंतचे सर्व प्रकार मिळूं शकतात. आकारांतही त्यांची विविधता असे. हातांत रोटी घेऊन ४-५ जणांचें मिळून एक दह्याचें भांडें असे. त्यांतील दही सर्वांनीं मिळून सहभोजनाप्रमाणें घ्यावयाचें ही रीत आहे. या प्रचाराविरुद्ध जाणें म्हणजे मुसलमान नसल्याची ती कबुलीच होय! तेव्हां येईल तो आपला धाकटा भाऊ समजून अक्षरशः एका ताटांत ५-६ जण जेवत असूं.

स्वच्छतेच्या बाबतींत बरेंच नियमोल्लंघन घडलें. रोजचें स्नान साप्ताहिकांत येऊन पडल्याचें लिहिलेंच आहे. पण त्याच्याहि पलीकडील बाब म्हणजे पेय पाण्याची. पाणी कोठें मिळेल तेथे ते उंटाप्रमाणें पोटांत भरून घ्यावयाचें हाच प्रघात सर्व प्रवासांत पाडावा लागला. जवळ पाणी बाळगलें असतें तर असा प्रसंग आला नसता असें जर कोणास वाटेल तर तें चुकीचें आहे. कारण इतर उतारू तुमच्या कळत वा न कळत त्या भांड्याला तोंड लावून त्याला केव्हांच शुद्ध करून ठेवीत! प्रत्येकाच्या बरोबर मातीचा खुजा पाण्यासाठीं असे. पण पिण्याचें भांडें एकहि नव्हतें. जरूर पडेल तेव्हां बिनदिक्कतपणे खुजा तोंडाला लावला कीं झालें. भांड्याची आवश्यकता उरते कोठे? बाजारांतील रोट्या विकत घ्यावयाच्या त्या तरी शुद्ध असाव्यात. पण मला वाटतें एखाद्या सार्वजनिक वाचनालयांतील दैनिक पत्रांना हात लागत नसतील इतके हात भाकरी पोटांत जाण्यापूर्वी तिला लागत असत. पुण्यांतल्या मंडईत ताज्या फळांना देखील वाटेल त्यास हात लावूं देत नाहींत. पण इराणांतल्या रोटीस वाटेल त्यानें हात लावावा. हात कसलाहि असो, कोणी बोलावयाचें नाहीं. पण हे सर्व प्रकार दृष्टीसमोर होत असूनहि डोळ्यावर कातडें ओढून पुढें येईल त्या अन्नावर हात मारावा लागला.

"विश्वामित्रः श्वमांसं श्वपच इव पुरा भक्षयन्यन्निमित्तम्"

त्याच कारणासाठीं स्वच्छास्वच्छतेचा, आरोग्याचा आणि पथ्यापथ्याचा विचार पार हांकून द्यावा लागला! विश्वामित्रासारखा कमालीचा प्रसंग आला नाहीं ही परमेश्वराची कृपा म्हणावयाची.

सुर्खा, सिमनान, दमगांव, शारूद, सब्झेवार, निशापूर या गांवांवरून मशहदला आलों. निशापूर येथें पाश्चात्यांचा आवडता इराणी कवि उमर खय्याम याची कबर आहे आणि परकीय प्रवासी तेथें जाऊन दर्शन घेणें अगदीं महत्त्वाचें समजतात. खुद्द इराणी जनतेस उमरची फारशी ओळख नाहीं असें म्हटल्यास वस्तुस्थितीचा विपर्यास होणार नाहीं. फिर्दोसी किंवा सादी मात्र प्रत्येकास ठाऊक आहेत. खय्याम हा युरोपियन राष्ट्रांत इतका लोकप्रिय झाला

याचीं कारणें दोन आहेत. एक तो मदिरादेवीचा निःसीम उपासक होता. इतका कीं, "तळिराम" देखील त्यापुढें फिक्का पडेल ! दुसरें कारण असें कीं तो पारमार्थिक सुखाविषयीं बेफिकीर असून इहलोकींच्या वास्तव्यापलीकडे त्याच्या कल्पनेची मजल मुळींच जात नसे ! चार्वाकाच्याहि पलीकडे तो गेला आहे असें म्हणतां येईल. चार्वाक फक्त " ऋणं कृत्वा घृतं पिबेत् " असें सांगतो तर खय्यामची शिकवण

" ऋणं कृत्वा सुरां पिबेत् "

अशा प्रकारची आहे. नुसत्या मदिरेपर्यंतच त्याचा विचारपरंपरा आहे असें नाहीं. " मदिरा, काव्याचें पुस्तक, रोटी आणि तूं मजजवळ असलीस तर जगलांतहि स्वर्ग अवतरेल " असें तो मदिराक्षीस उद्देशून म्हणतो. एके ठिकाणीं तर " भर पेला— आजचा हा दिवस गतकालाच्या ढिगांत जाऊन पडण्यापूर्वी मला मदिरेचें आकंठ सेवन करूं दे " असें स्पष्ट शब्दांत तो सांगतो ! (अपूर्ण)

# कॉं. वर्किंग कमिटीचे बालिश ठराव

कॉंग्रेस वर्किंग कमिटीला 'करणेकरीपणा'ची बाधा आज पुष्कळ दिवसांपासून झाली आहे. ती कांहीं केल्या बरी होतच नाहीं. मिथ्या असहकारितेच्या कल्पना तिच्या डोक्यांत शिरल्या आहेत. त्या अजून तिला भ्रमांत पाडतात व इतरांना उपद्रव करतात. या कल्पनांपैकीं एक अशी दिसते कीं, राजकारणांत सामान्यतः जें करावें किंवा करतात तें न केलें म्हणजे तीच असहकारिता. असल्या असहकारितेनें स्वराज्यसिद्धि नाहीं हें ठरून आज आठनऊ वर्षें झालीं. तरी अजून दुनिया झुकती आहे व ती झुकविणारा विचार तिला अजून झुकवितोच आहे. याचें आपण एकच उदाहरण घेऊं.

***

असेंब्ली व कायदे–कौन्सिलें यांच्या नव्या निवडणुकी यंदा नोव्हेंबरच्या सुमारास व्हावयाच्या. पण व्हाइसरॉयसाहेबांनी आपल्या अधिकारांत त्या कांहीं दिवस लांबणीवर टाकल्या. ही लांबणीची मुदत ते निश्चितपणानें ठरविते तर तें सरळ झालें असतें. परंतु ते स्वतः आतां विलायतेला जाणार, तेथील तालमाल पाहाणार, सायमन कमिटीचा रिपोर्ट होण्याची वाट बघणार, त्या रिपोर्टानंतर नवीन मंत्रिमंडळ पुढील योजना काय करावयाची हें ठरविणार, हिंदुस्थानांतील जे पक्ष व पुढारी सायमन कमिशनावर रुसले रागावले त्यांची मनधरणी करण्याची कांहीं तोड निघते कीं नाहीं हें अजमावणार, आणि मग नव्या निवडणुकी केव्हां करावयाच्या हें ठरविणार !

***

तात्पर्य, नव्या निवडणुकी करणें हें सरकारला फायदेशीर किंवा सोयीचें केव्हां होईल हें पाहून मग त्याप्रमाणें हल्लींचीं कायदेमंडळें सरकार बरखास्त करणार हें उघड दिसतें. ही सोय एकतर्फी आहे, दुतर्फी नाहीं. म्हणून सरकारचें हें कृत्य न्यायाचें किंवा सरळपणाचें नाहीं हें कोणीहि कबूल करील. पण सरकारनें असें केलें म्हणून लोकांनी काय करावें हा प्रश्न शिल्लकच राहतो, व तो सोडवितांना पंडित मोतीलाल नेहरू व त्यांच्या सल्ल्यानें वागणारी कॉंग्रेस वर्किंग कमिटी " करणे–करी " कशी वनू पाहते हेंच आम्हास दाखवून द्यावयाचें आहे.

***

दिल्ली येथील असेंब्लीच्या बैठकीच्या वेळीं कायदेमंडळाच्या निवडणुकी पुढें ढकलल्या जाणार ही कुजबूज निघालीच होती. त्यापूर्वी कित्येक प्रां. कायदेमंडळांनीं अशा अर्थाचे ठराव मंजूर केले होते, कांहींनी नामंजूर केले होते, किंवा तटस्थपणा स्वीकारला होता. या विषयासंबंधानें असेंब्लीनें कांहीं तरी आपलें म्हणून धोरण प्रगट करणें योग्य होतें, व त्याप्रमाणें पं. नेहरू यांनीं या हेतूनें एक तहकुबीची सूचना अध्यक्षांकडे पाठविली होती. पण ती सूचना पुढें मांडण्यापर्यंत मजल पोंचली नाहीं.

***

याचें एक कारण असें कीं व्हाइसरॉय हेच स्वतः त्या वेळीं निवडणुकी पुढें ढकलण्याच्या विरुद्ध होते. निवडणुकी व्हाव्या असेंच त्यांचें मत होतें. व तें त्यांनीं पटेल यांच्या मार्फत नेहरूंना कळविलें. अर्थात् औषधाविणें खोकला गेला. निवडणुकी जर सरकार लांबवीत नाहीं तर त्या ते लांबवितात असें म्हणून निषेध करण्याचें काय प्रयोजन? पुढें विलायतेहून उलट हुकूम आला. तेव्हां व्हाइसरॉयसाहेबांना आपलें आश्वासन परत घ्यावें लागलें. पण निषेधदर्शक तहकुबीची सूचना पुढें आणण्याला अवसर उरला नाहीं. व उरता तरी व्हाइसरॉय यांनीं आपल्या अधिकारांत सूचना नामंजूर करण्याचें ठरविलें होतें व त्या-

प्रमाणें त्यांनीं नेहरूंना निरोप पाठविला. पण तो त्यांना पोंचला नाहीं.

***

तात्पर्य, निवडणुकी थांबल्या पण असेंब्ली त्यावर आपलें म्हणणें प्रगट करूं शकली नाहीं ही गोष्ट खरी आहे. पण याला खरा उपाय कोणता ? जी निषेधार्थक तहकुबीची सूचना गेल्या फेब्रुवारींत नेहरू यांना दिल्लीस आणतां आली नाहीं ती त्यांना सप्टेंबरांत सिमल्यास आणतां येईल. सिमला येथील सूचना व्हाइसरॉय कदाचित् नामंजूर करणारहि नाहींत. पण ती त्यांनीं नामंजूर केली असें मानलें तरी गेल्या फेब्रुवारींत तो प्रसंग होताच. व ती तेव्हां नामंजूर होती तर नेहरूंनीं काय केलें असतें ? तेंच फार तर त्यांनीं आज करावें. पण नाहीं. कांहीं तरी जें न करावें, असें केल्याशिवाय आज त्यांना स्वस्थ बसवत नाहीं ! 'करणे-कऱ्याचा वसा' तो हाच.

***

गेल्या फेब्रुवारींत तहकुबीची सूचना व्हाइसरॉय नामंजूर करते तर असेंब्लींतला स्वराज्य पक्ष त्रागा करून आपल्या जागा मोकळ्या टाकून कागदपत्र गुंडाळून दिल्ली सोडून खचित परत येत नव्हता. पण आज वर्किंग कमिटीनें असेंब्लीकरितां व प्रां. कायदेमंडळाकरितां तशा अर्थाचा ठरावच मुंबईस केला आहे. म्हणून तो कितपत बरोबर आहे हें पाहावयाचें.

***

पहिली गोष्ट संशयास्पद म्हणून लक्षांत येते ती ही कीं हा रुसून बसण्याचा ठराव तीनच महिन्यांपुरता आहे ! पण तो तीन महिन्यांपुरताच कां ? कायदे—मंडळाच्या निवडणुकीची मुदत तर जवळ जवळ एक वर्षभर लांबली. मग रुसव्याचा ठराव या सर्व मुदतीकरितांच कां केला नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर देतांना थोडेसें कडू बोलल्याशिवाय गत्यंतर नाहीं. व तें असें कीं वर्किंग कमिटीचा ठराव मायावी, निवळ ढोंगीपणाचा, अप्रामाणिकपणाचा आहे. तिला खरा बहिष्कारच घालावयाचा तर उरलेल्या सर्व मुदतीचा घातला पाहिजे होता. पण बोलूनचालून नाटक ! त्यांत सुसंगतपणा कोठला ?

***

मेअखेरचे तीन महिने ऑगस्टांत संपतात. असेंब्लीची पुढील बैठक साधारणपणें ऑगस्टांत भरेल. मग मुदतीच्या ज्वरासारखा पंडितजींचा हा रुसवा, हा राग, हा बहिष्कार, ही असहकारिता तीन महिन्यांत संपून पंडितजी आपले असेंब्लीच्या बैठकीला जावयाला मोकळेच्या मोकळेच ! पण अनेक प्रांतांतून प्रां. कायदेमंडळांच्या बैठकी जुलैमध्यें, म्हणजे या तीन महिन्यांच्या मुदतींत भरणार त्यांची वाट काय ? प्रां. कायदेमंडळांतलें काम लाथाडलें लवंडलें तरी चालतें. पण असेंब्लीतलें शिल्लक उरलें म्हणजे झालें असेंच समजावयाचें कीं काय ?

***

समजा, येत्या जुलै महिन्याच्या बैठकींत मुंबई कौन्सिलांत लँड रेव्हेन्यू बिल आलें किंवा लँड फ्रॅगमेंटेशन बिल (जमिनीच्या तुकड्यांचें बिल) आलें, तर काँग्रेस पक्षांतील आमदार सभासदांनीं घरीं बसावें आणि तें बिल पास होऊन सरकारच्या पदरांत पडूं द्यावें हा कोण शहाणपणा ? निवडणुकी पुढें ढकलल्याबद्दल लॉर्ड आयर्विन यांच्यावरचा राग असा चांगला निघेल ? कीं कायदेमंडळांत हजर राहून सरकारचा डाव फसविल्यानें निघेल ? पण मग करणेकऱ्याचा वसा तो काय ?

***

स्वतः पं. नेहरू हे असेंब्लीच्या कोणत्याहि कमिटींत नाहीत, म्हणून त्यांनीं त्यांतल्या त्यांत 'करणेकऱ्याचा' असा एक विशेष प्रकार केला आहे कीं, तीन महिन्यांनंतर असेंब्लीला सिमल्यास जाण्याला हे मोकळे. पण असेंब्लीच्या उपमंडळांतून ज्यांची नेमणूक झाली आहे त्यांनी मात्र आपले काम तीन महिने बंद ठेवावें ! तें कां ? रेलवे फायनॅन्स कमिटी आहे, रेलवे सेपरेशन कमिटी आहे, ट्रॅन्सफर ऑफ प्रॉपर्टी बिलाची कमिटी आहे, स्टॅंडिंग फायनॅन्स कमिटी आहे, पब्लिक अकौंटस कमिटी आहे, व्हीटली कमिशन आहे, शेतकी बोर्ड आहे, या सर्व कमिट्यांना काँग्रेस पार्टीच्या सभासदांनीं हजर राहावयाचें नाहीं ! खासा कारभार !

***

अशा कमिट्यांतून हजर राहिले असतां लोकपक्षाचें थोडेसें काम होऊं शकेल, सरकारच्या धुमाकुळाला कांहीं आळा बसेल. पण हें झालें तर ती असहकारिता कसली ? फॅशनेबल असहकारिता म्हणजे जें करतां येईल तें नच करावें, आणि जें न करतां येईल तें करतों करीन असें तोंडानें म्हणत असतां तें हातानें कां करीत नाहीं असें कोणी विचारलें तर "वाः ! करावें असें म्हटलें म्हणजे केलेंच पाहिजे असें शास्त्र कोठें आहे" असें उत्तर द्यावें !

***

तीन महिन्यांनीं पं. नेहरूंचा राग रुसवा संपणार आणि मग ते प्रसन्न मनानें सिमला येथील असेंब्लीच्या बैठकीला जाणार ! ते असेंब्लींत जाऊन करतील तें मात्र खरें काम. बाकी सर्व फुकट ! वर सांगितलेलीं उपमंडळें, प्रांतिक कायदेकौन्सिलं, यांतले काम बुडालें नासलें तर काय हरकत ? कारण

तें काम स्वतः पंडितजींनीं करण्यापैकीं नाहीं! याच्या पलीकडे जाऊन आणखी अधिक नाटकी अशा एक रुसव्याचा पवित्रा पंडितजी टाकून पाहणार होते. पण त्यांना वेळींच चांगला कानमंत्र मिळाला!

* * *

असेंब्लीच्या पुष्कळशा सभासदांनी राजीनामे देऊन फिरून आपल्यापुरत्या नव्या निवडणुकी करवून निवडून यावें, म्हणजे सरकारावर फार परिणाम होईल, अशी एक शक्कल पं. नेहरू यांचे मनानें काढली होती. पण तिला बॅ. जिना, सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांसारखे स्वतंत्र पक्षाचे, व केळकर मुंजे यांच्यासारखे राष्ट्रीय पक्षाचे सभासद प्रतिकूल होते. व त्यांनीं हा प्रकार आत्मघातकीपणाचा कसा होईल हें पंडितजींना चांगलें पटवून दिल्यामुळेंच तो बेत रहित झाला. परंतु वर्किंग कमिटीमध्यें आपल्या वजनाचा उपयोग करून कौन्सिलच्या कामीं नसता बखेडा करण्याची बुद्धि त्यांना झाली तो त्यांनीं केलाच. पण आमच्या अदमासाप्रमाणें काँग्रेस पक्षांतील लोकांकडूनहि पंडित नेहरू यांच्या म्हणजे वर्किंग कमिटीच्या डोळ्यांत अंजन घालण्यास सुरवात झाली आहे.

* * *

त्यांतल्या कित्येक सभासदांनीं कांग्रेस पक्षाचे राजीनामे दिलेहि. कांहींनीं देण्याचा विचार केला आहे. कांहींनीं रागारागानें वर्किंग कमिटीचा निषेध करून खासगी पत्रें पाठविलीं आहेत. कांहींनीं हा प्रकार किती मूर्खपणाचा आहे, किती नुकसानीचा आहे, हें सोदाहरण दाखवून दिलें आहे. इतकें होऊन जर वर्किंग कमिटी आपला ठराव बदलणार नाहीं, तर त्या पक्षांत प्रत्यक्ष बंडाळी झाल्याशिवाय राहणार नाहीं असें आम्हाला उघड दिसत. 'शेळीचे कान गोसाव्याच्या हातीं' ही स्थिति कौन्सिल मतदारांनीं किती दिवस सोसावी व कां सोसावी?

* * *

लोकांचे कांहीं काम करण्याचे आश्वासन दिल्यामुळें तर मतदारांनी सभासदांना निवडून दिलें; व ऐनप्रसंगाच्या वेळीं वर्किंग कमिटी त्या सभासदांना 'कौन्सिलें सोडून बाहेर पडा'—बाहेर पडा असेंहि नव्हे तर 'जागा अडवून गैरहजर राहा' असे हुकूम देणार. यांत दुसऱ्याला अपशकुन करण्याच्या खोट्या मोहांत स्वतःचें नाक कापिलें जातें ही साधी गोष्ट पंडित नेहरूंसारख्यांना कळूं नये हे दुर्दैव होय.

* * *

कौन्सिलांतील सभासदांचे खरे धनी मतदार होत, काँग्रेसकमिटी नव्हे. तसेंच प्रांतानिहाय जिल्ह्याचे महत्त्वाचे प्रश्न कोणते हें मतदारांना कळतें, वर्किंग कमिटीला कळत नाहीं. अशा स्थितींत वर्किंग कमिटीनें आपलाच अधिकार चालविल्यास तिच्याविरुद्ध बंडखोरी रोकडी ठेवलीच आहे हें नक्की समजावें. पण हा ठरावच काय, इतर अनेक ठरावांनींहि आपला करडा अंमल चालविण्याच्या मोहानें काँग्रेसमधील प्रधानमंडळानें आपल्या बुडाखालची खांदी मागून तोण्याचा उपक्रम चालविला आहे. व लवकरच अशा ठरावांनीं आपली शोभा आपण करून घेतली असें जगजाहीर होण्याचा प्रसंग तिला आल्याशिवाय राहणार नाहीं.

# मजूर पक्षाचा पुनश्च अधिकारयोग

पांच वर्षांपूर्वी झालेल्या ब्रिटिश पार्लमेंटाच्या निवडणुकीनंतर हुजूर पक्षाचा पार्लमेंटांत पराभव होऊन मजूर पक्ष प्रथम सत्ताधारी झाला. तथापि त्या वेळीं मजूर पक्षाचे प्रतिनिधी बहुसंख्य नसल्यानें त्यांना उदार पक्षाच्या मतावर अवलंबून राहावें लागत होतें. आणि उदार पक्षानं अनुदार होऊन आंधळ्याच्या हातची कांठी काढून घ्यावी त्याप्रमाणें मध्येंच आपला आधार काढून घेतांच मजूर पक्ष कोलमडून खालीं पडला. त्या परिस्थितीचा फायदा घेऊन हुजूर पक्षानें नवीन निवडणुकीचा नवा डाव उभारला, आणि त्यांत रशियन बोल्शेव्हिकांशीं मजूर पक्षाचे सूत जमलें आहे असा कांगावा केला. या सुताचें भूत झाल्यामुळे हुजूर पक्षाला कल्पनातीत पाठिंबा मिळून तो पक्ष निर्विवाद बहुमतानें निवडून आला आणि पांच वर्षेपर्यंत त्याने अनिरुद्ध सत्ता गाजविली. पण अखेरीस हें पाप त्यास भोंवल्याशिवाय राहिलें नाहीं. लोकमत धाब्यावर बसवून पांच वर्षे बेगुमानपणें सत्ता गाजविल्यामुळे जनतेंत अंतःक्षोभ वाढत चालला. त्यांतच बेकारवर्गाची कांहींच तरतूद केली गेली नसल्यामुळें असंतोषाची आणखी भर पडली. आणि स्त्रियांना पुरुषवर्गाच्या बरोबरीनें मताधिकार दिला तर आपला पक्ष सबळ होईल या कल्पनेनें स्त्रीमतदारांची जी वाढ करण्यांत आली तीच हुजर पक्षाच्या अंगावर उलटून, नव्या निवडणुकींत हुजर पक्ष अल्पसंख्य ठरला आणि मजूर पक्षाचे संख्याबल कोणत्याहि एका पक्षाहून अधिक

असल्यानें राज्यकारभाराचीं सूत्रें त्या पक्षाच्या हातीं देणें क्रमप्राप्त झालें.

हुजूर पक्ष व उदार पक्ष यांनीं संगनमत केल्यास त्यांच्या संयुक्त बलाशीं सामना देण्याला एकट्या मजूर पक्षाचें संख्याबल अपुरें पडतें हें खरें. पण ते दोन पक्ष अहिनकुलवत् आहेत. म्हणून त्यांचें ऐकमत्य होईल असें गृहीत धरून मजूर पक्षाच्या पदरीं उणेपणा बांधणें हा न्याय नव्हे. उदार पक्षानें आपला पक्ष मोडून टाकून तो हुजूर पक्षांत सामील केल्याचें जाहीर केलें तरच त्या उभयतांच्या मानानें मजूर पक्ष अल्पसंख्य ठरेल. परंतु ऊंस व भोपळे यांची अशी गट्टी जमणें अशक्य असल्यानें, या काल्पनिक परिस्थितीचा आजच विचार करण्याचें कारण नाहीं. संभवच विचारांत घ्यावयाचा झाल्यास उदार पक्ष मजूर पक्षांत विलीन होण्याचीच शक्यता अधिक दिसते. सध्या जें मंत्रिमंडळ बनविण्यांत आलें आहे त्यांत मि. जोविटसारखे कायदेपंडित आपला जुना पक्ष सोडून मजूर पक्षांत सामील झाले आहेत हें काय दर्शवितें ? नवे भारतमंत्री कॅप्टन वेजवुड बेन यांनीं देखील नुकतेंच एकदोन वर्षांपूर्वीं मतांतर केलें असून ते उदार पक्ष सोडूनच मजूर पक्षांत सामील झाले आहेत. अर्थातच हुजूर पक्ष व उदार पक्ष यांच्यांत जसा कायमचा ३६ चा आंकडा आहे तसा कांहीं मजूर पक्ष व उदार पक्ष यांच्यांत नसल्यानें, शक्य तोंवर उदार पक्षाकडून मजूरमंत्रिमंडळाला पाठिंबाच मिळेल. आणि मजूर पक्षाची सत्ता पांच वर्षांपूर्वींच्यासारखी अगदींच डळमळीत न राहतां बरीच स्थिर राहील असें वाटतें. शिवाय पूर्वीं ज्या वेळीं पार्लमेंटांत दुरंगी सामने चालत होते त्या वेळीं अधिकारारूढ पक्षाचें निर्विवाद बहुमत असलेंच पाहिजे हा नियम जसा पाळला जात असे तसा कांहीं तो आतांच्या तिरंगी किंबहुना चौरंगी सामन्याच्या परिस्थितींत निरपवाद पाळला जाणें शक्य नाहीं. अर्थातच इतर कोणत्याहि एकट्या पक्षापेक्षां अधिकारारूढ पक्षाचें बहुमत असलें म्हणजे झालें असाच संकेत यापुढें पार्लमेंटांत पाळला जाईल असें वाटतें. कारण दिवसेंदिवस पक्षभेद वाढत जाऊन, कोणताहि एकच एक पक्ष इतर सर्वांच्या संयुक्त संख्येहून अधिक बलवान ठरणें अशक्य नसलें तरी असंभाव्य ठरत जाईल.

असो. तूर्त तरी मजूर पक्ष हा बहुसंख्य पक्ष म्हणून सत्ताधारी बनला आहे तेव्हां या अधिकारक्रान्तीचे परिणाम काय होतील तें पाहूं. मागील निवडणुकीच्या वेळीं हुजूर पक्षानें मजूर पक्षाविषयीं भयंकर गैरसमज पसरविल्यामुळें या खेपेस मजूर पक्षानें आपला डाव अत्यंत सावधगिरीनें टाकला आहे. निवडणुकीच्या आधीं बरेच दिवसांपासून त्या पक्षानें कम्युनिस्ट पक्षाशीं असलेला आपला अप्रत्यक्ष संबंध देखील उघडपणें तोडून टाकला, आणि गैरसमज उत्पन्न करण्याचें एक प्रतिपक्षाचें मोठें साधनच नाहींसें केलें. कम्युनिस्टांच्या संबंधाप्रमाणेच मागील निवडणुकींत बांधलेलें 'कॅपिटल लेव्ही'चें धोरणहि या वेळीं मजूर पक्षानें पुढें आणलें नाहीं. देशांतील सगळे कारखाने राष्ट्राच्या मालकीचे करावयाचे ही भाषाहि या निवडणुकींत फारशी कोठें ऐकूं आली नाहीं. आणि हिंदुस्थानाचा प्रश्न पक्षबाह्य ठरविल्यामुळे तेथील कट्टर साम्राज्यवाद्यांनाहि तक्रार करण्यास जागा उरली नाहीं. हे सर्व वादग्रस्त प्रश्न वगळून मजूरवर्गांतील बेकारी दूर करणें, जर्मन खंडणीचा आणि परराष्ट्रांच्या देण्याघेण्याचा प्रश्न इंग्लंडाच्या हिताच्या दृष्टीनें सोडविणें, लष्करी व आरमारी खर्चांत काटकसर करणें, आणि युरोपांतील शांततेचा भंग होण्याची भीति दूर होईल असें परराष्ट्रीय धोरण राखणें—या प्रश्नांनाच मजूर पक्षानें या निवडणुकीच्या वेळीं प्रामुख्य दिल्यामुळें बहुजनसमाजाचें चित्त मजूर पक्षाला आपल्याकडे आकर्षून घेतां आलें.

निवडणुकीच्या पूर्वींच्या धोरणाविषयीं हा विचार झाला. निवडणूक जिंकल्यावर देखील मजूर पक्षानें आपलें हें सावधगिरीचें धोरण कायमच राखलें आहे. निवडणुकीच्या विजयानें डोळ्यावर धुंदी येण्याइतका निश्चित स्वरूपाचा विजय मजूर पक्षाला लाभला नसल्यामुळें, निदान उदार पक्षाला तरी निष्कारण दुखवावयाचें नाहीं इतकी दक्षता राखणें त्यास प्राप्तच आहे. परंतु 'दुधानें तोंड भाजलें असतां पामर मनुष्य ताक देखील फुंकून फुंकून पितो' या न्यायास अनुसरून, उदार पक्षालाच नव्हे तर हुजूर पक्षालाहि सहसा दुखवावयाचें नाहीं असा मजूर पक्षाचा इरादा असावा असें मंत्रिमंडळाची जी रचना करण्यांत आली आहे तिजवरून अनुमान निघतें.

पांच वर्षांपूर्वीं रॅम्से मॅक्डोनाल्ड हे मुख्य प्रधान झाले त्या वेळीं त्यांनीं परराष्ट्रीय राजकारणाचीं सूत्रें स्वतःच्या हातीं घेतलीं होतीं हें एक त्यांच्या विरुद्ध इंग्लंडांतील लोकमत कलुषित करण्यास हुजूर पक्षाला साधन सांपडलें होतें. या खेपेस आर्थर हेंडरसन यांच्या गळ्यांत तें लोढणें अडकवून मॅक्डोनाल्ड हे स्वतः मोकळे राहिले आहेत. जर्मन महायुद्धांत हेंडरसन हे युद्ध चालवावें म्हणणाऱ्या पक्षांतले असल्यामुळें, १९१७ च्या संयुक्त मंत्रिमंडळांत त्यांचा प्रवेश झाला होता. एवढेंच नव्हे तर युद्धाच्या सूत्रधारपंचकांतहि त्यांचा समावेश झाला होता. राष्ट्रसंघांतहि त्यांनीं महत्त्वाची कामगिरी केली आहे. सारांश, हेंडरसन हे परराष्ट्रीय

राजकारणांत अगदींच नवशिके नसून मजुरेतर पक्षांच्याहि विश्वासास ते पात्र आहेत. थॉमस शॉ यांना लष्करी खात्याचें आणि लॉर्ड थॉमसन यांना विमानखात्याचें मंत्री नेमण्यांतहि मजूर पक्षानें बराच दूरदर्शीपणा दर्शविला आहे. सध्या लष्करापेक्षां विमानांना महत्त्व अधिक प्राप्त झालें आहे आणि त्याच दृष्टीनें विमानखात्यावर लॉर्ड थॉमसनसारख्या तज्ज्ञाची नेमणूक करण्यांत आली आहे. आरमार खात्यावर मात्र लॉर्ड चेल्म्सफर्ड यांची नेमणूक न करतां मि. अलेक्झँडर या नव्याच मंत्र्याची योजना झाली आहे.

१९२४ च्या मंत्रिमंडळांत फिलिप स्नोडन हे फडणीस होते आणि नव्या मंत्रिमंडळांतहि त्यांच्याकरितां तीच जागा राखून ठेवण्यांत आली आहे. यावरून त्यांच्या कर्तबगारीवर मजूर पक्षाचा भरपूर विश्वास असल्याचें स्पष्ट दिसून येतें. लॉर्ड बाल्फोर यांनीं परराष्ट्रीय कर्जफेडीविषयीं जी योजना केली तिच्यावर कडक टीकेचे घाव घालून, बाल्डविन पक्षाची दाणादाण उडविण्यास फिलिप स्नोडन हेच बऱ्याच अंशीं कारणीभूत झाले असल्यानें आपलें हिशेबी कौशल्य प्रकट करण्यास त्यांस संधि देण्यांत यावी हें स्वाभाविकच आहे. भारतमंत्र्याची जागा भरण्यांत मात्र रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी बरीच धरसोड केल्याचें दिसून येतें. मागील मंत्रिमंडळांतले लॉर्ड आलीव्हियर यांचें नांव साहजिकपणेंच प्रथम पुढें आलें होतें व त्यासंबंधानें कोणाला भलेंबुरें कांहींच विशेष म्हणण्याजोगें नव्हतें. पण मागाहून लॉर्ड चेल्म्सफर्ड यांचे नांव जाहीर झालें. चेल्म्सफर्ड यांचे नांव मॅंटेग्यू यांच्या नांवाच्या बरोबरीनें नव्या सुधारणांच्या पुरस्कर्त्यांच्या स्थानीं झळकत असलें तरी रौलेट ॲक्ट, लष्करी कायदा, अमृतसरची कत्तल, जनरल डायरला दिली गेलेली शाबासकी इत्यादि प्रकरणांमुळें त्यांच्याविषयीं हिंदी जनतेच्या मनांत एक प्रकारची अढी बसलेली आहे. अशा अरेरावी इसमाची योजना या वेळीं भारतमंत्र्याच्या जागीं केल्यानें पुनः १९१८–१९ सालाची परिस्थिति हिंदी वातावरणांत निर्माण झाली असती. पण मि. मॅक्डोनाल्ड यांनीं आपला पूर्वीचा बेत बदलून कॅप्टन वेजवुड बेन यांची नेमणूक केल्याचें जाहीर केलें आहे. हे कॅप्टन वेजवुड बेन म्हणजे हिंदी लोकांच्या परिचयाचे कर्नल वेजवुड नव्हत. कर्नल वेजवुड यांचें नांव जोशिया क्लेमेंट वेजवुड असें असून ते १९१९ सालापासून मजूर पक्षांत सामील झाले आहेत आणि सायमन कमिशनची नेमणूक त्यांना बिलकुल पसंत पडली नसून त्या कमिशनावर बहिष्कार घालणें हेंच योग्य आहे असें त्यांनीं त्याच वेळीं लाला लजपतराय यांना पत्रद्वारें कळविलेंहि होतें. याच कारणामुळें मजूर पक्षाशीं त्यांचें पटेनासें झालें, आणि विद्यमान मंत्रिमंडळांत कर्नल वेजवुड यांच्या नांवाला थारा मिळालेला नाहीं! त्यांच्या ऐवजीं भारतमंत्री झालेले कॅप्टन वेजवुड हे परवां-परवांपर्यंत उदार पक्षांत सामील होते आणि ॲस्क्विथसाहेबांचे ते उजवा हात मानले जात असत. उत्तम वावदूक म्हणून पार्लमेंटांत त्यांची ख्याति आहे, आणि विश्वविद्यालयांतहि त्यांनीं आपलें नांव गाजविलें आहे. महायुद्धांत लष्करी कामगिरी करून यांनीं कॅप्टन ही पदवी व इतर बहुमान मिळविला असला, तरी आपल्या सदसद्विवेकबुद्धीच्या विरुद्ध कोणालाहि सर्कारनें लष्करांत सामील करून घेऊं नये असेंच त्यांचें मत आहे. अर्थातच ते वैयक्तिक स्वातंत्र्याचे चाहते आहेत व त्याच वृत्तीमुळें १९२७ सालीं त्यांनी लॉइड जॉर्ज यांचें अनुयायित्व झिडकारून देऊन मजूर पक्षाचें अनुयायित्व पत्करलें. हें सर्व त्यांच्या दृष्टीनें यथायोग्य झालें. पण या नव्या भारतमंत्र्यांना हिंदुस्थानाविषयीं कितपत माहिती असेल आणि कितपत प्रेम वाटत असेल हें एक गूढच आहे. भारतमंत्री हा अगदीं कोराकरकरीत असावा, त्याला हिंदुस्थानाची बिलकुल माहिती नसावी, म्हणजेच तो पूर्वग्रहानें कलुषित न होतां निर्विकारबुद्धीनें कारभार हांकतो, अशीच रॅम्से मॅक्डोनाल्ड यांचीहि पूर्वपरंपरेस अनुसरून समजूत असल्यास न कळे!

असो. हिंदुस्थानांतील स्वराज्याचा लढा आतां अशा पल्ल्यापर्यंत येऊन पोचला आहे कीं, कोणी कसलाहि भारतमंत्री नेमला गेला तरी त्यापासून येथील वातावरणांत आशेचें किंवा निराशेचे यत्किंचितहि आंदोलन होणार नाहीं. सायमन कमिटीचा रिपोर्ट कांहीहि म्हणो आणि भारतमंत्री त्यासंबंधीं कसलाहि कायदा करो, ठराविक मुदतींत वसाहतीचें स्वराज्य न मिळाल्यास आपण पुढें काय करावयाचें तें हिंदी राष्ट्रानें आपल्या मनानें ठरविलें असल्यामुळें, हिंदवासीयांना ग्रेटब्रिटनमध्यें कोणताहि एक पक्ष अधिकारच्युत झाला व दुसरा कोणताहि अधिकारारूढ झाला तरी त्याची तादृश पर्वा नाहीं. तथापि चिकाटीनें व सनदशीर रीतीनें प्रयत्न केल्यास, कालावधीनें का होईना, पण केवढी अधिकारक्रान्ति घडवून आणतां येते याचें हें प्रत्यक्ष उदाहरण पाहून मजूर पक्षाचें साश्चर्य कौतुक करावेसें वाटतें. १८९२ सालीं मजूर पक्षाचा अवघा एक प्रतिनिधि प्रथम पार्लमेंटांत निवडून आला! त्या वेळीं जर कोणी असा प्रश्न केला असता कीं, सातशें प्रतिनिधींत मजूर पक्षाचा एक प्रतिनिधि

बसल्यानें काय मिळालें, तर त्याला मजूर पक्षाचा अत्यंत आशावादी पुढारी तरी त्या वेळीं काय उत्तर देऊं शकला असता! पण योग्य मार्गानें केलेल्या चळवळींत सामर्थ्यच असें असतें कीं तिच्या सूक्ष्म बीजापासूनच कालावधीनें वटवृक्षासारखा प्रचंड वृक्ष विस्तार पावतो. पांच वर्षांपूर्वी मजूर पक्षास औट घटकेचें नव्हे पण औट महिन्यांचें राज्य लाभलें. या खेपेस त्याची सत्ता आणखी बळावून औट वर्षेपर्यंत त्यास स्वराज्य लाभण्याचें लक्षण दिसत आहे. आणि यापुढें कदाचित् मजूर पक्ष हा इंग्लंडांतला कायमचाच सत्ताधारी पक्ष होईल. अर्थातच मजूर पक्षाच्या ज्या पुढाऱ्यांनीं आपल्या चळवळीला योग्य दिशा लावून येवढा विजय संपादन केला त्याचें कोणीहि समंजस व सहृदय मनुष्य कौतुकच करील यांत शंका नाहीं.

# इराणांतून बलुचिस्थानांत

दमगांवापासून रस्ता जरा बरा होता. म्हणजे पूर्वीच्या त्या मार्गावरून मोटारींची वाहतूक असल्यानें तो रस्ता झाला होता कीं, सडक आहे म्हणून यंत्रयानें जा–ये करूं लागलीं, हें निश्चितपणें सांगतां येत नसे. पण पुढील रस्ता कोणाच्या तरी मालकीचा आहे आणि तो कधीं तरी दुरुस्त करावा लागतो अशी जाणीव झाल्याचीं चिन्हें दिसत!

## मशहदचा इमाम रेझा

मोठमोठे चढ–उतार नद्या–नाले इत्यादिकांना ओलांडून मशहदला आलों. तेथील लोकांची गर्दी, व्यापार, मोटारींची वाहतूक पाहूनच त्या शहराच्या महत्त्वाची कल्पना झाली! अफगाणिस्थान बलुचिस्थान आणि रशियन तुर्कस्थान यांनीं वेढलेला हा इराणाचा भाग "खुरासान" म्हणून ओळखला जातो आणि त्या प्रांताची राजधानी मशहद येथें आहे. खुद्द मशहदलाहि खुरासान असें म्हणतात. तेहरान, कंदाहार, पेशावर, या मार्गानें लुटारूंच्या ज्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर झाल्या त्यांच्याच मार्गांत मशहद आहे. गतकालांत हिंदुस्थानाची किती अलोट संपत्ति लुटली गेली आहे याचें स्पष्ट प्रदर्शन आजमितीसहि मशहद येथील मशिदींत पाहावयास मिळतें. तेथील मनोरे व घुमट एवढेच सुवर्णानें मढविलेले नसून आंतील भागहि रत्नें माणकें इत्यादि मौल्यवान जवाहिरांनीं सोन्याच्या कोंदणांत बसवून शोभिवंत केला आहे! आणि इराणांत बर्फ पुष्कळ पडतें किंवा बदाम पिस्ते द्राक्षें विपुल आहेत एवढ्यावरून तीं रत्नें तेथेंच पैदा झालीं असें नव्हे. खनिज संपत्ति आहे ती सर्व पृथ्वीच्या पोटांत असल्यानें इराणांतील सर्व जडजवाहीर हें जवळच्या हिंदुस्थानांतून चोरून लुटूनच आणलेलें आहे यांत शंका नाहीं. लुटारू जातां येतां मशहदमधून जात आणि आपण आणलेली संपत्ति पापक्षालनाच्या हेतूनें मशिदीसाठीं देत! मुख्य मशीद म्हणजे हजरत इमाम–रेझा यांच्या कबरीभोंवतीं बांधली आहे. इमाम-रेझा हे पैगंबराचे आठवे शिष्य होत! आणखीहि बऱ्याच मोठ्या मुसलमानांच्या कबरी तेथें आहेत. इस्लामेतरांस आंत जाण्याची सक्त बंदी आहे आणि मुसलमानी धर्माचें फाजील वेड व तज्जन्य रक्ततृष्णा इराणांत कोठें आढळत असेल तर ती या मशिदींतच! हिंदुस्थानांतून आणि इतर मुसलमानी प्रदेशांतून शिया पंथाचे हजारो यात्रेकरू येथें प्रत्यहीं येत असतात.

मशहदचें राजकीय दृष्ट्या महत्त्व कांहीं कमी नाहीं. हिंदुस्थानाचे रक्षक मशहद येथें आहेत असें सांगितलें तर वाचकांना खरें वाटणार नाहीं. पण ही गोष्ट अगदीं सत्य आहे. फार तर वायव्य सीमाप्रांत—अथवा बलुचिस्थान येथेंच हिंदुस्थानाचे द्वारपाल असावेत अशी अपेक्षा चुकीची होणार नाहीं. पण सुवर्णभूमींत प्रवेश करण्यापूर्वी पहिली देवडी लागते ती मशहद येथें. येथील संरक्षकांच्या संख्येवरून राज्यकर्त्यांना हिंदुस्थानासाठीं किती दक्षता बाळगावी लागते, काय परिश्रम सोसावे लागतात याची कल्पना येईल.

रशियाचेंहि वर्चस्व मशहदमध्यें कमी नाहीं. अफगाणिस्थानांतील "हिरात" या शहरीं जाण्याचा रस्ता येथून असल्यानें त्या देशाचा मोठा राजकारणी वकील मशहद येथे सदैव असतो. प्रस्तुत प्रतिनिधी मशहदमध्यें असतांना अमानउल्लाची भगिनी व राणी सुरियाची माता या हिरातहून मशहदला आल्या होत्या.

## नादिरशाहाची कबर

नादिरशाहा पूर्वी आपणास नादीर–कुली म्हणजे दास नादीर ( गुलाम-बंदा ) असें म्हणवीत असे आणि लुटालूट करून आपलें वर्चस्व स्थापण्यापलीकडे त्याला विशेष महत्त्व आमच्या दृष्टीनें नाहीं. एका बाल राजवंशीयास हातीं धरून त्याला निमित्तमात्र करून नादीरानें तेहरानचें तख्त आपणासाठीं मिळविलें ही गोष्ट प्रशंसनीय खरी. पण त्यानें अवलंबिलेल्या मार्गामुळें त्याची थोरवी

कमी ठरते. इराणी राष्ट्रीय वृत्तीच्या लेखकांनीं नादिरशाहाला इतकें चढविलें आहे कीं शाळेंत न जाणारा मुलगाहि "नादिरशाहानें इराणांत हिंदुस्थानांतून पुष्कळ द्रव्य लुटून आणलें" असें मोठ्या अभिमानानें सांगतो! 'नादिरशाहाची हिंदुस्थानावर स्वारी' हें चित्र, शिवाजीमहाराजांचें अनुयायासहितचे रविवर्म्याचें चित्र आपणास जितकें परिचयाचें आहे तितकेंच इराण्यांच्या नेत्रद्वयांच्या ओळखीचें होऊन बसलें आहे. हा परिणाम फार दिवसांचा नव्हे. केवळ १०-१२ वर्षांतलाच आहे ही आश्चर्य करण्यासारखी गोष्ट नव्हे का?

नादिरशाहा सुनी पंथानुयायी असल्यानें किंवा अन्य कारणानें त्याला मान फारसा नसे. पण जागृत झालेल्या इराणी जनतेस हे पाहवेना! मशहदपासून कांहीं अंतरावर आडरानांत एका खेडेगांवीं नादिरशाहा पैगंबरधामास गेला होता.त्याच्या थडग्याकडे तोंपर्यंत कोणाचें लक्षहि नव्हतें. आतां मशहदमध्यें एक मोठें उपवन त्याच्या स्मारकाप्रीत्यर्थ बांधण्यांत आलें असून मध्यभागीं त्याची कबर आणण्यांत आली आहे. एक चांगलें वाचनालय व एक सभागृह त्या स्मारकास जोडलें असून लोकदृष्टीपासून दूर पडलेला नादिरशाहा आतां राजमार्गावर येऊन मशहदमधील यात्रेकरूंच्या व प्रवाश्यांच्या प्रेक्षणीय भागांपैकीं एका स्थळीं येऊन शयन करीत आहे! श्रीमंत थोरले बाजीराव आणि नादिरशाहा यांचें युद्ध होणार असें प्रसिद्ध झालें असूनहि कांहीं अपरिहार्य कारणामुळें तें घडून आलें नाहीं. तेवढ्यानें मराठा वीरांची योग्यता कमी ठरत नाहीं. उलट उत्तर-हिंदुस्थानाचें लक्ष दक्खनकडून येणाऱ्या समरपट्टकडे लागलें यांतच त्यांची योग्यता दिसून येते!

मशहद ते दुजदाब हा रस्ता इंग्रजांनीं हिंदी मजुरांकरवीं करविला तो कां व केव्हां हे सांगण्याचें प्रस्तुत काळीं प्रयोजन नाहीं.इराणातील बहुतेक मुख्य रस्ते हिंदी लोकांनींच केले आहेत आणि ते सर्व इराणी सरकारास दान दिल्याप्रमाणे फुकटांत मिळाले. मशहदपासून दुजदाब सुमारें ५५० मैल असून प्रथमचा रस्ता डोंगरांतून तर नंतरचा रखरखीत वाळवंटांतून आहे. मैलच्या मैल गेले तरी पाण्याचा थेंब दृष्टीस पडत नाहीं. हा प्रवास विशेष त्रासदायक असला तरी अविस्मरणीय असाच झाला. बर्फाच्या अनुपमेय शोभेमुळे बगदाद-तेहरान रस्ता विसरणे शक्य नाहीं. तसेंच मशहद-दुजदाबआक्रमण वाळवटाच्या देखाव्या (?) मुळें स्मृतिफलकावरून जाणें अशक्य आहे! डोंगरांतील चढाव फारच कठीण आहेत. आणि उतारहि साहजिकच धोक्याचे असल्यानें एकसारखें लक्ष सबसे प्यारा जान सुरक्षित कसा राहील इकडे लागते. मोटार अपघातांतून म्हणजे कोलांडून पडतांना दोनदां वांचलों होतों. प्रस्तुत लेखकाचा एक डोळाहि कायमचा जाणार असाहि प्रसंग आला होता, पण सर्व थोडक्यांत बचावलें! अशा सत्त्वपरीक्षेतून शीरसलामत बाहेर पडलों ही जगदीशाची कृपाच म्हणावयाची! केसरीच्या वाचकांशीं बोलतांना जगदीशाचें नांव घेत आहे. इराणांत असतांना कांहींहि झाले की "माशा अल्ला" (ईश्वरेच्छा) असें म्हणावें लागे किंवा "इन्शा अल्ला" हा प्रयोग उपयोगांत आणावा लागे. "आपण तासाभरानें दुजदाबला पोहोचूं" असें साधें वाक्य उच्चारतांनाहि त्यांत "इन्शा अल्ला" हे भूषण अडकविणें इष्ट व आवश्यक असे. "परमेश्वराची कृपा असल्यास" असा त्या वाक्प्रचाराचा अर्थ आहे.

धर्मवेड्या अडाणी आणि खेडवळ लोकांत मिसळण्यास उपवचनांचा उपयोग झाला; पण त्याजबरोबर सलामुनअलेकुम आणि खुदा फझली शुमा यांचाहि मुक्तकंठानें उपयोग केला. पहिलें वचन प्रथम भेटीच्या वेळीं उच्चारावयाचें. त्याचा अर्थ सलाम असा आहे. दुसरे म्हणजे खुदा तुमचें कल्याण करो अशा अर्थाचें वचन निरोप घेतांना तोंडांतून काढावयाचें असतें.

पाश्चिमात्य सुधारणा स्त्रीवर्गांत चोहोंकडे फैलावत आहे. अगदीं दूर अशा खेड्याच्या ठिकाणीं स्त्रियांचे तलम मोजे किंवा उंच टाचांचे बूट आढळत नसले तरी मोठमोठ्या गांवीं स्त्रियांची प्रगति सुधारणेकडे फार आहे हें खरें. पुरुषवर्ग त्या मानानें मागें आहे, साधी पेहेलवी टोपी देखील सर्वत्र संमत नसून कित्येक ठिकाणीं तिजबद्दल तिरस्कार दिसून आला. मात्र सूत किंवा लोकर कांतणें, रंगवून वस्त्रें विणणें हीं कामें ज्या त्या खेड्याच्यासाठीं तेथील लोकच करीत.

दुजदाब हे नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेचें स्टेशन आहे. क्वेट्यापासून ४५६ मैलांवरील हें ठिकाण इराणी हद्दींत असलें तरी सर्वस्वी हिंदी जनतेनें वसविलें आहे. आणि गेल्या १२।१५ वर्षांतच तें उद्भवले असल्यानें अगदीं नवें दिसतें.रुक्षपणांत या नवीन गांवाची बरोबरी मारवाडांतील एखादें खेडें करूं शकेल. आजूबाजूस डोंगर असले तरी इतर शोभा कांहीच नाहीं.रेल्वेंतून येणाऱ्या इराणी व्यापारासाठीं माल येथेंच उतरत असल्यानें इराणी सरकारचें मोठें उत्पन्न या गांवीं होतें! पंजाबी व शीख व्यापारी येथें पुष्कळ आहेत. गेल्या महायुद्धांत हिंदी सैन्याचें तें एक मोठें ठाणें होतें!

मी त्या गांवीं असतांना टोळधाडीचा त्रास सुरू झाला होता. अगोदर गांव रुक्ष, त्यांत टोळधाड आलेली, तेव्हां जीं काय थोडीं हिरवीं पानें बागेंत असत तींहि खाऊन फन्ना करून टाकणारे टोळ किती त्रासदायक वाटले असतील ? आपणास उद्यानाचा आवश्यकता म्हणजे श्रीमंती चैन वाटते; पण मनुष्याचें मन कार्यमग्न करण्यासाठीं नैसर्गिक हिरव्या रंगाचा उपयोग किती होतो हें समजण्यास अशा वाळवंटांतील वनस्पतिविहीन प्रदेशांत किंचित्काल वास्तव्य करावें. रोजचे जेवण जात नाहीं, कांहीं विचार सुचत नाहींत किंवा अमुक काम करावें अशी इच्छाहि होत नाहीं! हा प्रभाव केवळ रुक्षतेचा!

## अल्लाचा गजर

दुजदाबहून आठवड्यांतून दोनदां क्वेट्यास गाड्या जातात. प्रचलित समय हा मक्केच्या यात्रेचा हंगाम असल्यानें अलोट गर्दी जमली होती. आणि त्या गाडीस "यात्रेकरूंची खास गाडी" असेंच म्हणत. कारण सबंध गाडींत ३ उतारू प्रवासी होते. बाकीचे एकजात इराणी मक्केला निघालेले असून आपण गाडी विकत घेतल्याप्रमाणें इतर कोणासही आपल्या डब्यांत शिरूं देत नसत. अल्लाचा गजर, निमाज पढण्याची आतुरता, गाडी चालू झाली तरी पैगंबराची लागलेली एकतानता न सोडण्याची वेडी बेपर्वाई, चालत्या गाडीत चढण्याची धडपड हीं सर्व प्रत्येक स्टेशनावर पाहावयास मिळत! आगगाडी कधीं बापजन्मींहि पाहिली नसल्यानें आणि धर्मावर अलोट श्रद्धा असल्यानें आपण निमाज पढत आहोंत हें पाहून गाडी पुढें जाणार नाहीं अशी त्यांची दृढ समजूत असे. निदान ठराविक वेळीं तरी प्रार्थनेसाठीं गाडी थांबेल असा त्यांचा विश्वास असे. परंतु काफरांनीं बनवलेली आगगाडी पैगंबराविषयीं बेफिकीर असल्यास नवल कोणतें ?

अशा हाज यात्रेकरूंच्या समवेत एक हिंदी इसम प्रवास करतो याबद्दल रेल्वे अधिकाऱ्यांना राहून राहून आश्चर्य वाटे! कारण तिकीट तपासण्यास किंवा अन्य कार्यासाठीं ते डब्यांत शिरण्याचा प्रयत्न करूं लागले कीं सर्व उतारू एकत्र होऊन त्यांना खालीं ढकलून देत! बलुची शिपाई कडव्या जातीचे; पण त्यांनाहि या इराणी "जनावरां"पुढें हात टेकावे लागले! कांहीं बलुच्यांवर अगदीं कठीण प्रसंग आला असतां त्यांची सोडवणूक करण्याची पाळी प्रस्तुत लेखकावर आली तेव्हां हीं माणसें नव्हत, तीं शुद्ध जनावरें होत असे उद्गार त्या बलुच्यांनीं काढले. एका स्टेशनमास्तरावरहि तशी विचित्र वेळ आली असतां तो थोडक्यांत बचावला! इराणी अज्ञानी व दुराग्रही असले तरी त्यांनीं एक अगदीं योग्य आचरण रेल्वेवर केलें. रेल्वेची व त्यांची दृष्टादृष्ट प्रथमच झालेली; पण तितक्या अल्पावधींत त्यांनीं डब्यांत असलेल्या पाट्या वाचून ठराविक माणसांपेक्षां एकाहि अधिक उतारूस आंत घेतलें नाहीं. स्टेशनमास्तरावर आलेला प्रसंग म्हणून म्हटलें तो याच वेळचा. अधिक उतारू डब्यांत कोंबण्याच्या प्रयत्नास इराणी यात्रेकरूंनीं विरोध केला. स्टेशनाधिकारी आपण बचावलों याच आनंदांत गर्क झाला. ४५६ मैलांच्या अंतरांत एकहि उतारू त्या गाडींत चढला नाहीं हें आश्चर्य नव्हे का? आमचे यात्रेकरू मात्र ठराविक संख्येपेक्षां दुप्पट उतारू डब्यांत असले तरी चकारशब्द काढीत नाहींत किंवा कांहींच व्यवस्था करण्याचें मनांत आणीत नाहींत. इराणी अडाणी यात्रेकरूंपासून आमच्यापैकीं सुशिक्षित प्रवासी कांहीं धडा घेतील तर रेल्वेला व्यवस्था करणें क्रमप्राप्त होईल.

दुजदाब ते क्वेटा हा तीस तासांचा प्रवास पुनः अगदीं रुक्ष वाळवंटांतून झाला! क्वेट्याजवळ ८० मैल येतांच घाट लागला आणि गार झाडे दिसूं लागलीं. खुद्द क्वेटा शहर तर उद्यानमयच आहे. त्यामुळें मनाला इतकी प्रसन्नता आली कीं हें शहर सोडून जाऊं नये असें वाटूं लागले.

## पुण्याचा ब्राह्मण

इराणांत गेल्यापासून मला बऱ्याच अधिकाऱ्यांना व प्रमुख नागरिकांना भेटण्याचा प्रसंग आला. पण एकाही वेळीं चुकून देखील "हिंदु का मुसलमान" अशा प्रकारचा धर्मासंबंधीं प्रश्न निघाला नव्हता. इराणी सफर संपवितांना मात्र एक गंमतीचा अनुभव आला. इंग्रज सरकारच्या बड्या वकिलास भेटावयास गेलों असतां त्यांनीं पहिला प्रश्न "तुम्ही कोण?" असा केला. नामपत्रिका पुढें पाठविली असतां आणि परिचयपत्रांत सर्व खुलासा असूनही असा प्रश्न कां उद्भवला हें मला कळेना. तेव्हां स्वतः-संबंधीं थोडीशी माहिती मीं त्यांना सांगितली. तेवढ्यानें साहेबांचें समाधान झालें नाहीं. म्हणून त्यांनीं स्पष्टपणे ख्रिश्चन, मुसलमान का हिंदु तें जाणण्याची इच्छा दर्शविली. त्याच्याही पुढें जाऊन हिंदूंपैकीं कोणती जात हेही त्यांना विचारावें वाटलें. हिंदु त्यांतून केसरीचा हिंदु प्रतिनिधि मुसलमानी देशांत निःशंकपणें वावरतो कसा याचें त्यांना कोडे पडलें. हिंदी परिस्थितीची ओळख पूर्णपणें असल्यानें त्यांचें कुतूहल मुळींच थांबले नाहीं. हिंदुस्थानांतील 'ब्राह्मण' इतका खुलासाही पुरेसा वाटेना. कोणत्या भागांतील? हा त्यांचा सवाल तत्काळ पुढें आलाच. "मुंबईकडील" हे उत्तर त्यांना समाधानकारक न वाटल्यानें "कोणता

जिल्हा?" म्हणून त्यांनीं विचारलें. "पुणें" असें माझें उत्तर ऐकतांच इंग्रज वकील हंसत हंसत एक हात विजारीच्या गोमुखींत घालून तोंडांतील "पाईप" सांवरीत म्हणाले, "अस्सं. एकंदरींत तुम्ही पुण्याचे ब्राम्हण आहां म्हणावयाचें. ठीक, ठीक." त्यांच्या हास्यांत काय अर्थ होता हें त्यांच्या नेत्रद्वयांत स्पष्ट दिसे. वाचकांना त्याची जाणीव पाहिजे असल्यास हिंदुस्थानसरकारच्या गुप्त खात्यांत "पुण्यांतील ब्राम्हणांना" काय महत्त्व आहे तें पाहावें. थोडीशी चुणूक रौलेटसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं प्रसिद्ध झालेल्या 'सिडिशन कमिटीच्या' वृत्तांताच्या प्रथम भागांत आढळेल.

दुजवाब येथील ख्रिस्ती मिशनऱ्याकडे उपाहारास गेलों असतां प्रवासासंबंधीं बऱ्याच गोष्टी निघाल्या. निरोप घेतांना मिशनरीसाहेबांनीं काढलेले उद्गार पाहा:—

तुम्ही उच्च वर्णीय हिंदु--धर्मगुरु--असाल असें मला मुळींच वाटलें नाहीं. कारण तुम्ही आमचेबरोबर पेयपान व उपाहार केला होता. आतां तुम्हाला कोणत्याही हिंदु देवालयांत जातां येणार नाहीं किंवा तुमच्या घरच्या मंडळींत मिसळतां येणार नाहीं याबद्दल मला फार वाईट वाटतें! तुम्हाला वाळीत टाकतीलना ?

हें ऐकून प्रथमतः मला हंसूच आलें. "चहाच्या कपा" विषयीं वादळ माजण्याचे दिवस पार निघून गेले असतां एका इंग्रज समाजसेवकानें अशी शंका प्रदर्शित करावी हें पाहून गंमतच वाटली. त्या शंकेचें निराकरण करतांच साहेबबहादुरांची हिंदुधर्माबद्दलची जिज्ञासा वाढली आणि झपाट्यानें सुधारत असलेल्या हिंदुधर्माची माहिति त्यांनीं कुतूहलपूर्वक विचारली.

# दे. वल्लभभाई पटेल यांचे विचार

मे महिन्याचे अखेरीस दे. वल्लभभाई पटेल यांनीं खानदेशांत दौरा करून धुळे, रावेर, भुसावळ, चाळिसगांव, बोदवड, रांजणगांव, जळगांव, एरंडोल, चहार्डी, चोपडा इ. ठिकाणीं भेटी दिल्या. ठिकठिकाणी त्यांस मानपत्रे देऊन इतर रीतीनें उत्साहानें त्यांचा सन्मान करण्यांत आला व त्यांनींहि मोकळ्या मनानें शेतकऱ्यांच्या चळवळींतील आपले अनुभव व सिद्धांत शेतकऱ्यांस व जनतेस निवेदन केले. त्यांच्या या दौऱ्याचें समग्र वृत्त धुळ्याच्या प्रबोध पत्रानें प्रसिद्ध केलें आहे. त्यांतून वल्लभभाई यांनीं ठिकठिकाणीं काढलेल्या उद्गारांतील कांहीं महत्त्वाचे भाग पुढें देत आहों. सवाई मुकटी येथें शेतकऱ्यांच्या मानपत्राला उत्तर देतांना दे. पटेल म्हणाले:—

## खानदेशचा शेतकरी व खादी

"खानदेशाचा किसान कपास पिकवितो, तो परदेशांत पाठवितो, व त्याऐवजीं परदेशी कापड विकत घेतो! पाहा हें केवढे नवल आहे!! जो आपले शेतांतील होणाऱ्या कापसाचें कापड स्वतः बनवून तें वापरणार नाहीं तो खरा किसानच नव्हे. बार्डोलीच्या किसानाला हा धडा मी आज सात वर्षे शिकवीत आहे व तेथील स्त्रीपुरुष तो शिकले तेव्हांच त्यांना बलाढ्य सरकारला तोंड देतां आलें. सबब आपल्या पैशानें तोफा बनवून, त्या आपल्यावर सोडणाऱ्या साहेबाला कापूस विकूं नका. त्याचें स्वतः सूत कातून कापड बनवा व तेंच कपडा वापरा; व आपल्या शेतांत पिकेल तेंच खात जा. खऱ्या किसानाचे हे लक्षण आहे."

## अस्पृश्यता–निवारण

रावेर येथें अस्पृश्यांच्या मानपत्राला उत्तर देतांना ते म्हणाले "तुम्ही आपल्याला दुर्बल समजाल तर मरेतों तसेंच राहाल. ईश्वरानें इतरांपेक्षां तुम्हास कांहीं कमी दिले नाहीं. शेंकडो वर्षांच्या संकटानें आजची स्थिति आली आहे, तथापि भिऊं नका. महाराष्ट्र प्रांतिक परिषदेने अस्पृश्यांबाबत केलेल्या ठरावांनं तुम्हास फार मदत होणार आहे हे लक्षांत ठेवा. महाराष्ट्र करील तें होतें. सबब निराश होऊं नका."

## ब्राह्मण–ब्राह्मणेतरवाद

त्याच ठिकाणीं ब्राह्मण–ब्राह्मणेतरवादासंबंधानें ते म्हणाले, "महाराष्ट्रांत ब्राम्हण--अब्राम्हण हा झगडा चालू आहे. जेथें ९०।९५ टक्के अब्राम्हण आहेत तेथें हा वाद कां चालावा हें कळत नाहीं. शेतसाऱ्यासंबंधीं सरकारनें जें धोरण स्वीकारलें आहे त्याचे सामन्यांत तरी हा वाद आडवा येऊं नये. अब्राह्मणांचे प्रतिनिधी कौन्सिलांत आहेत. पण बार्डोलीच्या प्रश्नांच्या वेळीं ते सरकारला भिळाले! अब्राह्मण मिनिस्टर आहेत, पण ते किसानकरितां कांहीं करींत नाहींत हें नवल नव्हे काय ? इलाख्यांत सर्वत्र धारावाढ होत आहे व हे मिनिस्टर पगारावर लक्ष ठेवून कांहीं करीत नाहींत! अब्राह्मण हराम नोकरीच्या मागें लागले आहेत. आपल्या मुलांस अगर संबंध्यांस एखादी भिकार नोकरी

मिळविण्याकरितां हे सरकाराशीं लाळ घोटीत आहेत व त्यामुळें राष्ट्रकार्याची हानि करीत आहेत.

सर्वच गुलाम ! तेथें ब्राह्मण अब्राह्मण काय घेऊन बसलांत ? परदेशीयांना सर्वच नमन करतो. केवळ नोकऱ्यांसाठीं अब्राह्मण व त्यांचे पुढारी यांनीं हा झगडा माजविला आहे. सर्व अब्राह्मणांना नोकऱ्या मिळणें शक्य नाहीं. ती फार तर हजार दोन हजारांना मिळेल, व त्यांचे मार्फतीनें सरकार आपले जुलूम चालवील."

### शेतकऱ्यांची संघटना

भुसावळ येथें म्यु. पालिटी, शेतकरी संघ, वरणगांवची ग्रामपंचायत यांच्या मानपत्रांस उत्तर देतांना दे. वल्लभभाई म्हणाले, "गुजराथेच्या प्रत्येक किसानाच्या घरचे हाल मला माहीत आहेत. महाराष्ट्रांतला किसान त्याहून अधिक दुःखी आहे. किसान मरणार का जगणार असा आज सवाल आहे. बार्डोलीला सरकारनें थप्पड खाल्यामुळें शेतसाऱ्याचा प्रश्न कौन्सिलांत येणें भाग आहे. शेतसाऱ्याचा प्रश्न आजन्म चालविणार आहे अशी मी सरकारला नोटीस दिली आहे. मूर्खपणानें सरकारनें बॅकबेत पैसा घालविला. एकीकडे सिंधचा रेताड मुलुख बागायत करण्याकरितां सक्कर बॅरेजमध्यें क्रोडो रुपये सरकार ओतीत आहे तर दुसरीकडे सारावाढ करून गुजराथेचा बाग ओसाड पाडीत आहे व शेतकरी निमूटपणें हें सर्व सहन करीत आहे. पण यापुढें शेतकरी स्वस्थ बसणार नाहीं. मी त्याला जागृत करीन. भिऊं नको, सरकारशीं टक्कर दे असे मी त्याला सांगेन. लढण्यांत तुझें जाईल तर एक झोपडें एक गोधडी व अर्धी भाकर जाईल; पण सरकार हरले तर त्यांचें सबंध राज्य जाईल, असा सल्ला मी किसानाला देईन. परमेश्वर कोपेल तरच तुझी अर्धी रोटी जाईल, इंग्रजांच्या रागानें जाणार नाहीं असें मी त्यास म्हणेन. जमीन तुझ्या बापाची आहे, सरकारच्या बापाची नाहीं हे किसानाला शिकवीन. किसानाच्या जमिनीच्या तुकड्यावर कोणी परकी आला तर याद राखा असें मी सरकाराला आव्हान केलें आहे. मरणास भिऊं नका असें मी किसानालाच काय पण त्याच्या बायकोलाहि शिकविलें आहे. एकाचें दुःख तें सर्वांचें दुःख असें मानावे ही मृत्युंजयाची मात्रा मी किसानाला दिली आहे. फौजदार, मामलेदार, शिपाई वगैरे सर्व अधिकारी तुझे नोकर आहेत. ते तुझे शेट नाहीत. वेळ आली तर त्यांचे कान धर व पगार तोड अशी खणखणीत दीक्षा मी किसानाला दिली. अशा प्रकारें सर्वांगीण संघटन केलें तेव्हां सरकारला दातीं तृण धरावें लागलें."

## अर्धवट असहकारितेची लहर

कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या बालिश ठरावांनीं कायदेमंडळांतील कॉंग्रेस पक्षांत मोठीच खळबळ उडवून दिली आहे असें या आठवडाभर आलेल्या बातम्यांवरून दिसतें आणि तसें झालें नसतें तरच आश्चर्य. कारण त्या पक्षांतल्या निम्याहून अधिक लोकांना हे ठराव पसंत नाहींत, व बाकीच्यांना अशा ठरावांची पूर्वी गंधवार्ताहि नसल्यामुळें ते आश्चर्यचकित व विचारमूढ बनले आहेत. शितावरून भाताची परीक्षा, या न्यायानें स्वतः पंडित मोतीलाल नेहरू यांच्याच म्हणजे अलाहाबाद–आग्रा–लखनौ प्रांतांतूनच या ठरावांना घरचा अहेर कसा काय दिला गेला आहे याचा विचार केला म्हणजे इतर पक्षांतून त्या ठरावाची संभावना कशी काय होईल हें दिसतच आहे. वर्किंग कमिटीनें स्वीकारलेलें नवें धोरण वास्तविक ऑल–इंडिया कॉं. कमिटी मुंबईस भरली तेव्हांच तिच्यापुढें यावयास पाहिजे होतें. पण तें तेव्हां पुढें आलें असते तर त्याची शोभा व दुर्दशा कशी झाली असती हें पंडितजींना पूर्णपणें माहीत होतें, म्हणूनच त्यांनीं तो प्रसंग टाळला. प्रधानमंडळे बनवावीं कीं नाहीं या प्रश्नाबद्दल दुमत आहे असे भासविणें पंडितजींना जितकें सोपें होतें, तितकें कायदेमंडळांतील उठाबशा किंवा ये–जा यांसंबंधीं दुमत आहे असें भासविणें सोपें नव्हते. आपले घर शेकडों कोसांवरूनहि दिसतें अशी म्हण आहे. याप्रमाणें प्रत्येक प्रांतांतून आलेल्या सभासदांना आपल्या प्रांतांत नडणारे प्रश्न कोणते, कौन्सिलांत विरोधानें किंवा सहकारितेनें सुटण्यास मदत होण्यासारखे प्रश्न कोणते हे मुंबईच्या सभेंतहि स्पष्ट दिसत होते. म्हणून पं. नेहरू हे कौन्सिलाच्या जागा रिकाम्या ठेवण्याचा प्रश्न मुंबईस काढते तर त्यांच्या सूचनेला तेथल्या तेथें तोंडावरच विरोध झाला असता. पण हा विरोध त्यांनीं टाळला आणि त्या प्रश्नाचा नुसता ओझरता उल्लेख करून त्या संबंधानें धोरण काय ठरवावयाचें याचा अधिकार वर्किंग कमिटीकडे घेतला. पण त्या अधिकाराचा दुरुपयोग झाल्यामुळे तोंडावर नाहीं तरी पाठीमागे विरोध झालाच, व तोहि मनानें नव्हे तर कृतीनें ! अलाहाबाद प्रांतातल्या कॉंग्रेस पक्षानें "आपण ठरावाचा हुकूम अमान्य करणार नाहीं"

असें अकरणरूपी विधान केलें आहे आणि त्याबरोबरच आपली नापसती स्पष्टपणें व्यक्त करून ठरावांत दुरुस्ती व्हावी अशी विधायक सूचनाहि केली आहे. पण हे शिस्त पाळणें झालें असें कोणी म्हणेल तर शिस्त न पाळल्याची, शिस्त मोडल्याची, उदाहरणेंहि अनेक घडली आहेत ती पाहा.

### कमिट्यांतून काम चालूच आहे

एक उदाहरण असेंब्लीचे उपाध्यक्ष मौ. महंमद याकूब यांनीं आपल्या मुलाखतींत नमूद केलें आहे. तें म्हणजे स्वराज्य पक्षाचे असेंब्लींतील व्हिप श्री. मित्र हे वर्किंग कमिटीचा ठराव धाब्यावर बसवून संमति-वयाच्या बिलाच्या कमिटीवर काम करीत आहेत हें होय. कमिटीवर कामें करण्याचीं दुसरींहि अशीं उदाहरणें सांगतां येतील. असेंब्लींत ट्रान्स्फर ऑफ प्रॉपर्टीच्या कायद्याच्या दुरुस्तीचें बिल सुधारण्या-करितां नेमलेल्या सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावर कॉंग्रेस पक्षाचे सभासद श्री. अमरनाथ दत्त व श्री. जोगिया यांनीं, वर्किंग कमिटीचा ठराव झाल्यानंतर, सभासद या नात्यानें सह्या करून सिलेक्ट कमिटीचें काम पूर्ण केल्याचें समजतें. त्याचप्रमाणें नीळकंठ दास व द्वारका प्रसाद मिश्र हे कॉंग्रेस पक्षाचे सभासद असेंब्लीच्या रेल्वे फिनॅन्स कमिटीवर काम करीत असून वर्किंग कमिटीच्या ठरावानंतरहि या कमिटीच्या सभाना हजर राहात आहेत. प्रांतिक कौन्सिलांतहि कांहीं कमिट्यांवर स्वराजिस्ट सभासद काम करीत असले पाहिजेत. मद्रासच्या 'हिंदु' मध्यें एका गृहस्थानें पत्र लिहून व मद्रास कौन्सिलाच्या कमिट्यांचे सभासद असलेल्या स्वराजिस्टांची नांवें देऊन हे गृहस्थ कमिट्यांचे राजीनामे केव्हां देणार, असा सरळच सवाल केला आहे! वर्किंग कमिटीच्या निर्णयानंतर दोन आठवडे झाले तरी अजून असा एखाद्या कमिटीचा राजीनामा कोणा कॉंग्रेस पक्षीय सभासदानें दिल्याचें ऐकिवांत नाहीं. कॉंग्रेस पक्षाचे चमनलाल यांनीं व्हिटले कमिशनवरील जागेचा राजीनामा दिलेला नाहीं. आज कौन्सिलें चालू नाहींत म्हणून वर्किंग कमिटीच्या ठरावानें उडणारा गोंधळ स्पष्ट दिसत नाहीं, इतकेंच. बाकी कायदेमंडळाच्या कमिट्यांत दडपून काम करणाऱ्या सभासदांच्या वरील उदाहरणां-वरून पुढें कौन्सिलें सुरू झाल्यावर काय प्रकार होईल याचें कल्पनाचित्र कोणासहि आगाऊच रंगवितां येण्यासारखें आहे.

### तेजस्वी नव्हे व युद्धहि नव्हे

संयुक्त प्रांतांतील स्वराजिस्ट हे केवळ शिस्तीसाठीं वर्किंग कमिटीचा ठराव पाळणार आहेत. पण वर्किंग कमिटीच्या ठरावाप्रमाणें स्वराज्य पक्ष कौन्सिलाबाहेर राहिल्याची गोष्ट या पक्षाला घातक होईल म्हणून हा ठराव अव्यवहार्य व अनिष्ट आहे असें मत सं. प्रां. स्वराज्य पक्षानें जाहीर केलें आहे. एखादा वरिष्ठाचा हुकूम अनिष्ट व घातक आहे हें माहीत असतांहि शिस्तीसाठीं तो पाळल्याचीं उदाहरणें सैन्यांत कधीं कधीं घडतात. गेल्या शत-कांत इंग्लंड व रशिया यांच्यामध्यें झालेल्या क्रिमियन युद्धांत ६०० इंग्लिश सैनिकांच्या एका तुक-डीला तोफांच्या तोंडावर चालून जाण्याचा चुकीनें हुकूम देण्यांत आला. ही चूक लक्षांत येऊनहि कर्तव्य व शिस्त म्हणून या सैनिकांनीं तोफांवर चाल केली व त्या तोफांच्या माऱ्यानें यांपैकीं बहुतेक सैनिक ठार झाले. या सहाशें सैनिकांचीं स्तुतिस्तोत्रें इंग्रज कवींनीं गाइलीं आहेत. पण या प्रकारासंबंधीं युद्धनीति जाणणारे लोक म्हणत असतात कीं "It is glorious but it is not war" तेज झळकलें पण युद्ध बिनसलें. संयुक्त प्रांतीय स्वराजिस्टांनीं शिस्तीसाठीं केलेल्या निश्चयांत युद्ध तर नाहींच पण तेजस्वीपणाहि नाहीं. कारण कौन्सिलांत गैरहजर राहिल्यानें त्या सभासदांच्या हातून कांहींच त्याग घडत नाहीं. उलट त्यांतील वकील डॉक्टर वगैरेंना आपले धंदे अव्याहत चालवितां येतील. उलट प्रतिपक्षावर हल्ला करण्याच्या दृष्टीनें एकादा चुकीचा हुकूम आल्यास तो न पाळून धन्यवाद मिळविल्याचें उदाहरणहि इंग्रजी इतिहासांत आहेच. प्रख्यात इंग्रजी दर्या-सारंग लॉर्ड नेल्सन याच्यावर कोपनहेगनच्या दर्यायुद्धांत असाच प्रसंग आला होता. प्रतिपक्षाचीं जहाजें तोफांच्या माऱ्याच्या आटोक्यांत असतांहि नेल्सनला वरिष्ठानें मागच्या जहाजांतून खुणेनें हुकूम दिला कीं तोफा चालवूं नका. पण नेल्सननें या हुकमाकडे अक्षरशः कानाडोळा केला व हुकूम मोडून तोफा चालविल्या आणि विजय मिळविला! यालाहि तेजस्वी आज्ञाभंग असें इतिहासांत नांव दिलें आहे. कौन्सिलांत नोकरशाहीचे व्यूह हाणून पाडण्याची संधि पुढें दिसत असल्या-मुळें वर्किंग कमिटीचा भलता हुकूम न पाळतां त्या संधीचा पुरेपूर फायदा घेणें हेंच या प्रसंगीं अधिक युक्त ठरणार आहे.

### नेहरूंचें विषयांतर

वर्किंग कमिटीच्या ठरावावर जी टीका झाली तिला उत्तर म्हणून पंडित मोतिलाल यांनीं एक लांबलचक पत्रक काढलें आहे. त्यांत पंडितजींनीं मुख्य मुद्द्याचा प्रश्न टाळून अवांतर व अप्रस्तुत अशा मुद्द्यांचा निष्कारण काथ्याकूट केला आहे. हे अवांतर विषय म्हणजे भावी असहकारितेची तयारी, सायमन कमिशनावरील बहिष्कार व विधायक कार्यक्रम

करण्याची आवश्यकता इत्यादि होत. एक समर्थन सोडून मनुष्य दुसरें शोधूं अगर पत्करूं लागला म्हणजे निश्चित समजावें की घसरलेली बाजू सांवरण्याचा किंवा सजविण्याचा हा प्रयत्न आहे. कौन्सिलांतील गैरहजेरी ही व्हाइसरॉयांच्या निवडणुकी लांबविण्याच्या धोरणाला उत्तर किंवा प्रतिकार म्हणून प्रथम पुढें आली. पण या गैरहजेरीनें सरकारचा निषेध किंवा अडवणूक होण्याचे ऐवजीं सरकारचा मार्ग मोकळा होऊन लोकांची मात्र अडचण व कुचंबणा होते. या आक्षेपाला सरळ व समर्थक उत्तर पं. मोतिलाल यांना देतां येत नाहीं, म्हणून या गैरहजेरीचे समर्थनांत बऱ्याच अवांतर गोष्टी त्यांना घुसडाव्या लागल्या आहेत.

### वर्किंग कमिटीकडे काय सोंपविलें होतें ?

पण या अवांतर गोष्टींचें जाळें एकाच भेदक प्रश्नानें बाजूला सारतां येण्याजोगें आहे. तो प्रश्न असा कीं, वर्किंग कमिटीकडे कोणतें काम मुंबईच्या ऑल-इं. कॉं. कमिटीनें सोंपविलें होतें ? भावी असहकारितेची पूर्वतयारी करणें, विधायक कार्यक्रम कौन्सिलरांचे हातून होण्याची तजवीज करणें अगर सायमन कमिशनाचा बहिष्कार पुढें चालविण्याची योजना करणें हीं कामें कांहीं मुंबईस वर्किंग कमिटीकडे सोंपविलीं गेलीं नव्हतीं. वर्किंग कमिटीकडे जो एक निर्णय सोंपविला होता तो व्हाइसरॉयांच्या निवडणुकी लांबविण्याच्या कृत्याला उत्तर म्हणून कॉंग्रेसवाल्यांनीं काय करावें यासंबंधीं होता. अर्थात् वर्किंग कमिटीच्या निर्णयाचें खरें समर्थन करावयाचें तर या निर्णयानें व्हाइसरॉयांच्या कृतीचा प्रतिवाद अगर निराकरण कसें होतें हें दाखवावयास पाहिजे. पण तसें निराकरण मुळींच होत नाहीं. सर्व सभासदांनीं राजीनामे देऊन व्हाइसरॉयांवर पुनः निवडणूक करण्याची पाळी आणण्याची योजना केली असती; किंवा निदान कौन्सिलांची गणसंख्या न भरल्यामुळे कौन्सिलें चालविणेंच अशक्य करण्याची योजना केली असती तर तें एक प्रकारें व्हाइसरॉयांच्या कृतीला उत्तर झालें असतें. पण तशी कांहींच योजना वर्किंग कमिटीनें मांडलेली नाहीं. आणि नेहरूंच्या विस्तृत खुलाशावरून तर असें दिसतें कीं, वर्किंग कमिटीला एका विशिष्ट उद्देशानें एक निर्णय करावयास सांगितला असतां तो उद्देश बाजूला ठेवून दुसऱ्या व स्वतःच्या मनांतील उद्देशानें त्यांनीं तिसरेंच कांहीं तरी केलें आहे!

### कॉंग्रेसचाहि आधार नाहीं

हें झालें वर्किंग कमिटीकडे सोंपविलेल्या विशिष्ट अधिकारासंबंधीं. पण वर्किंग कमिटीनें हें विशिष्ट कार्य केलें नाहीं असें दिसल्यामुळें आतां वर्किंग कमिटीच्या सामान्य अधिकाराचा आधार या निर्णयाला देण्यांत येत आहे. हा सामान्य अधिकार म्हणजे कॉंग्रेसचे व ऑल-इं. कॉं. क. चे ठराव अमलांत आणण्याचा. पण भावी असहकारितेची पूर्वतयारी आजपासूनच करावयास पाहिजे असें कॉंग्रेसच्या अगर ऑल-इं.कॉं. क. च्या कोणत्या ठरावांत नमूद केलें आहे ? उलट 'असहकारितेला आजपासून सुरवात नाहीं ती वर्षअखेर करावयाची आहे व तोंपर्यंत सरकार व लोक नीट रीतीनें वागल्यास ( प्ले दि गेम ) त्या असहकारितेची जरूरहि पडणार नाहीं' असें या भावी असहकारितेच्या ठरावाचे जनक महात्मा गांधी हेच परवापर्यंत बजावून सांगत होते. त्याचप्रमाणें सायमन कमिशन विलायतेत गेल्यावर व त्याचा रिपोर्ट होण्याच्या आधीं हिंदुस्थानांत कमिशनबहिष्कारार्थ कांहीं आचरण करण्याची जरूरी आहे असा नुस्ता ध्वनि देखील कॉंग्रेसच्या ठरावांतून निघत नाहीं. त्याचप्रमाणें विधायक कार्यक्रमासाठीं कौन्सिलें कायमचीं किंवा तात्पुरतीं सोडलीं पाहिजेत असेंहि ऑल-इं. कॉं. क. नें अगर कॉंग्रेसनें सांगितलेलें नाहीं. सारांश, वर्किंग कमिटीनें आपणाकडे सोंपविलेलें काम तर केलें नाहींच. पण सामान्य अधिकाराच्या दृष्टीनेंहि वर्किंग कमिटीचा निर्णय शिस्तीला सोडून आहे. असल्या ठरावाचा उदो उदो शिस्तीच्या नांवाखालीं कट्टरांनीं करणें म्हणजे निवळ आंधळेपणा नव्हे काय?

### अप्रस्तुत कल्पनांचा गोंधळ

असहकारितेच्या तयारीची ही कल्पनाहि विचित्र दिसते. सुधारणा कायद्याच्या सरनाम्यांत 'जबाबदारीचें स्वराज्य क्रमशः अनुभवाच्या हप्त्यानें द्यावयाचें' अशी दीर्घसूत्री शब्दयोजना करून सरकारनें स्वराज्याच्या हप्तेबंदीची जशी थट्टा चालविली आहे तशाच प्रकारची ही असहकारितेची हप्तेबंदी दिसते. इकडे पंडित मोतीलाल बजावून सांगतात कीं, कॉंग्रेसवाल्या कौन्सिलरांचा कौन्सिलांवर मुळींच विश्वास नाहीं व कौन्सिलांपासून बारीकसारीक गोष्टी सुधारून घेण्याचा क्षुद्र उद्योग करण्याची त्यांची कल्पनाहि नाहीं. इतके जर सोंवळे व अलिप्त असे हे कॉंग्रेसवाले आहेत तर मग त्यांना कौन्सिलें सोडण्यास तयार करण्यासाठीं पूर्वतयारीचे इतके हप्ते, वळसे व आयास कशाला? बरें, कौन्सिलें एकदम सोडण्याच्या कृत्यासाठीं इतकी पूर्वतयारी करण्याइतकें कॉंग्रेसवाल्यांचें मन नाज़ुक असेल तर तें या गैरहजेरीच्या ठरावानेंहि विव्हल होणार नाहींत काय! मग यासाठीं पंडित नेहरूंनीं या तयारीचे आणखी क्रमशः विभाग पाडा-

वेत. प्रथम कांहीं दिवस कौन्सिलांत जाऊन गप्प बसावें, नंतर आंत न जातां लॉबीमध्ये घुटमळून आंत डोकावावें, नंतर कौन्सिलाच्या इमारतीकडे पाहूनच परतावें, असे कांहीं तरी पर्याय त्यांनीं करावयास पाहिजे होते! कौन्सिलांतील गैरहजेरीमुळें अमुक कार्यभाग होईल असा मूलभूत अंगचा गुण त्या गैरहजेरीत नसल्यामुळे या गैरहजेरीचा धागा कसा तरी भावी असहकारितेच्या कल्पनेला जोडण्यांत येत आहे व दुसरीकडून या गैरहजेरीला विधायक कार्यक्रमाचा आगंतुक गुण चिकटविण्यांत येत आहे. कौन्सिलें सोडणे हे विधायक कार्यक्रमासाठीं अवश्य आहे व जो कौन्सिलांतील गैरहजेरीच्या धोरणास विरोध करील तो विधायक कार्यक्रमास विरोध करतो असें भासविण्यांत येत आहे! जणुं काय कॉंग्रेसवाले कौन्सिलर्स कौन्सिलें बंद असतांना सारखा विधायक कार्यक्रमच चालवीत होते व कौन्सिलांत हजर राहाण्याची वेळच तेवढी या अव्याहत चाललेल्या कार्याला आड येत होती! कौन्सिलांतील गैरहजेरी नसतांनाहि पंडित मोतीलाल नेहरूंना मोठमोठे मुकदमे चालवितां येतात तर विधायक कार्यक्रम करण्यासाठीं कौन्सिलें सोडावयाची काय जरूर ?

### मागचा-पुढचा विचार केला नाहीं

कौन्सिलांत गैरहजर राहिल्याशिवाय विधायक कार्यक्रम चालवितां येत नाहीं हे जर खरें असेल तर विधायक कार्यक्रम टाळल्यानें हे पाप पं. मोतिलाल गेलीं सहा वर्षे करीत आहेत. इतकेंच नव्हे तर नेहरूंनीं आपल्या पक्षांतील सभासदांना तारावर तारा पाठवून असेंब्लींत हजर राहाण्यासाठीं बोलावून आणलें होत! कौन्सिलांतील गैरहजेरीतच जर कांहीं पुण्य असेल तर त्याचा संचय आपल्या पक्षांत कोणी करूं नये अशीच आजपर्यंत नेहरू खबरदारी घेत होते! आतां तेच नेहरू व त्यांचे समर्थक म्हणतात कीं "कौन्सिलांत जाऊन वेळ फुकट दवडण्यांत कांहीं अर्थ नाहीं." पण गेल्या सहा वर्षांत नेहरू कॉंग्रेसशीं भांडले, त्यांनीं सवते पक्ष स्थापन केले, निवडणुकी लढवल्या या सर्व गोष्टी वेळ फुकट घालविण्यासाठींच केल्या कीं काय? गैरहजेरीच्या फर्मानाविरुद्ध झालेलें बंड शिस्तीसाठीं मोडून काढावें असें कित्येक कट्टर पं. नेहरूंना जोरजोरानें सांगत आहेत. पण पंडित मोतीलाल नेहरू प्रथम कौन्सिलांत गेले ते कॉंग्रेसविरुद्ध बंड करूनच गेले. कॉंग्रेसच्या इतिहासांत पंडित मोतिलाल यांचें नांव एक बडे बंडवाले म्हणूनच प्रसिद्ध राहाण्यासारखें आहे. अशा बंडवाल्याला शिस्तीच्या नांवाखालीं दुसऱ्यावर शस्त्र धरण्यास सांगणारांनीं मागचा-पुढचा कांहीं विचार करावयास हवा होता.

व्हाइसरॉयांनीं असेंब्ली बरखास्त करून आजच फेरनिवडणूक केली नाहीं याबद्दलच्या रागाच्या भरांत पंडित मोतीलाल नेहरूंकडून हें फर्मान निघालें. राग अशाबद्दल कीं नेहरू रिपोर्टावर निवडणुकी लढविण्याची संधि गेली. अर्थातच निवडणुकी झाल्या असत्या तर त्या जोरानें लढविण्याचें नेहरूंनीं मनांत योजलें होतें. ही काय भावी असहकारितेचीच योजना होती ? या निवडणुकी लढवितांना व त्यानंतर कौन्सिलांत हजर राहतांना त्यांना असहकारितेची कितपत आठवण राहिली असती ?

### वर्किंग कमिटीला झालेला साक्षात्कार

पंडित मोतीलाल आपल्या पत्रकांत म्हणतात कीं, "३१ डिसेंबर १९२९च्या आंत नेहरू रिपोर्टाप्रमाणें डोमीनियन स्टेटस दिल्यावांचून कॉंग्रेसवाल्यांचें समाधान नाहीं, म्हणून आतां कॉंग्रेसवाल्यांना कौन्सिलांचा कांहीं उपयोग राहिला नाहीं. आतां यापुढें गेल्या वर्षाप्रमाणें कौन्सिलांना चिकटून राहणें हें, फक्त सायमन कमिशनावर विश्वास ठेवणाऱ्या व डोमीनियन स्टेटसपेक्षां कमी असला तरीहि सायमन रिपोर्ट स्वीकारण्याची तयारी असणाऱ्या लोकांचेंच काम आहे!" कॉंग्रेसनें डोमीनियन स्टेटससंबंधानें ठराव केला तो गेल्या डिसेंबरांत. तेव्हांपासून गेल्या सहा महिन्यांत कौन्सिलांचा कांहीं उपयोग राहिला नाहीं हें तत्त्व नेहरूंना सुचलें नाहीं. तसेंच मुंबईच्या ऑल-इं. कॉं. क. च्या बैठकीच्या वेळींहि तें त्यांस स्फुरलें नाहीं. मात्र त्या तत्त्वाचा साक्षात्कार त्यांना एकदम वर्किंग कमिटीच्या बैठकीच्या वेळींच झाला! शिवाय सायमन कमिशन हिंदुस्थानांत हिंडत असेपर्यंत कॉंग्रेसवाले कौन्सिलांना चिकटून होते. इतकेंच नव्हे तर कमिशनाचे सभासद वर प्रेक्षकांच्या जागेंत येऊन बसले असतांहि खालीं कौन्सिलांत ते काम चालवीत होते. पण आतां वर्किंग कमिटीला साक्षात्कार झाल्यानंतर मात्र, सायमन कमिशन हिंदुस्थानांत नसतांना देखील, कौन्सिलांत राहणें म्हणजे सायमन कमिशनावर विश्वास ठेवल्यासारखें होतें असें पंडितजी म्हणणार. बरें, कौन्सिलांचा उपयोग राहिला नाहीं तर राजीनामे देऊन मोकळे कां होत नाहीं? या प्रश्नाला पंडितजी एवढेंच उत्तर देतात कीं, तसें करण्याची अजून वेळ आली नाहीं! तसला दुसरा साक्षात्कार वर्किंग कमिटीस होईपर्यंत कौन्सिलत्यागाची ही पहिली पायरीच पुरेशी माना असेंच यांत नेहरू सांगत आहेत. पण या अर्धवट धोरणानें गंजीवरील कुत्र्याप्रमाणे कॉंग्रेसवाल्या कौन्सिलरांची अवस्था होणार आहे. यांना स्वतःला कौन्सिलांचा आतां कांहीं उपयोग वाटत नाहीं. पण हे बाजूला होऊन दुस-

त्यांनाहि त्यांचा उपयोग करूं देणार नाहींत. यामुळें यांच्या जागा रिकाम्या अडलेल्या राहिल्यानें लोकमताचे बळ कमी होऊन इतरांची कुचंबणा मात्र होणार. शिवाय कौन्सिलांत हजर राहिल्यानें जर सायमन कमिशनावर विश्वास ठेवल्यासारखा होतो तर सभासद राहिल्याने तसलाच विश्वास ठेवल्यासारखें होणार नाहीं काय ?

## नव्या धोरणाचा चोरटा प्रवेश

पं. नेहरू आपल्या पत्रकाचे अखेरीस स्पष्ट म्हणतात कीं, यापुढें जुनें धोरण बदलून नवे धोरण सुरू करण्याची आणीबाणीची वेळ आली आहे हें ओळखून वर्किंग कमिटीनें हा मार्ग आंखला आहे. वर्किंग कमिटीचा अधिकार वस्तुतः ठरलेल्या धोरणानें कार्य करण्याचा आहे. नवी धोरणें प्रसृत करण्याचा नव्हे. असे धोरण पुढे आणावयास थोडाबहुत रूढीनें अधिकार पोचतो तो ऑल–इं. कॉं. कमिटीला. तेव्हां हा प्रश्न ऑल–इं. कॉं. कमिटीपुढेंच येऊन व त्यावर रीतसर वादविवाद होऊन त्याचा निर्णय व्हावयास पाहिजे होता. व्हाइसरॉयांनीं असेंब्लीची मुदत लांबवल्याची वार्ताहि ऑल–इं. कॉं. कमिटीच्या बैठकीच्या वेळीच समजली होती. पण त्या वेळी हा प्रश्न पंडित मोतीलाल नेहरू यांनीं पुढे आणला नाहीं. त्या बैठकीनंतर असे काय नवीन घडलें कीं त्या वेळी न सुचणारें असें धोरण वर्किंग कमिटीला सुचावे. व्हाइसरॉयाच्या आगळिकीस तोंड देण्याच्या दृष्टीनें अधिकारांच्या जागासंबंधाचा प्रश्न या वेळीं पुढें आणून वाद माजवूं नये यासाठीं मद्रासकरांनीं तो प्रश्न पुढें आणला नाहीं. पण मद्रासकडे या बाबतींत लोकमताचा वारा कसा वाहात आहे हे पापनाशम् येथे डॉ. वरदराजलू नायडू यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या राजकीय परिषदेतील त्यांच्या भाषणावरून व ठरावावरून स्पष्ट दिसत आहे. म्हणजे आज कौन्सिलातील जागाच घेतल्या आहेत त्या घेऊन शिवाय अधिकारांच्या जागाहि आक्रमण कराव्या या दिशेकडे कॉंग्रेस पक्षांतील कित्येकांचा कल हळूहळू वळत असतां कौन्सिलांतील सभासदांच्या जागांवरूनहि काम न करण्याचा प्रश्न किती वादग्रस्त होण्यासारखा आहे याची कल्पना पंडितजींना नसेल हे संभवत नाहीं. असला वादग्रस्त प्रश्न, संधि असतांहि, ऑल–इं. कॉं. कमिटीकडून रीतसर निर्णीत करून न घेतां, वर्किंग कमिटीच्या अधिकाराचें अतिक्रमण करून आडमार्गाने त्याचा प्रवेश करविणे हें अत्यंत गैरशिस्त होय. आंध्र प्रां. कॉं.क.च्या कार्यकारी मंडळानें पंडित नेहरूंना असें कळविलें आहे कीं, वर्किंग कमिटीचा ठराव एक नवेंच धोरण प्रस्थापित करणारा असल्यामुळें त्यावर चर्चा करण्यासाठीं ता. १५ जुलैच्या आंत व शक्य तर मद्रासलाच ऑल–इ. कॉं.क.ची बैठक बोलवावी. आंध्र कमिटीची ही मागणी रास्त असून तिचा निकाल मोतिलालजी कसा लावतात पाहूं.

## इतरांना तक्रार करण्याचें कारण

वर्किंग कमिटीच्या ठरावानें कॉंग्रेस पक्षीय कौन्सिलरांत तर खळबळ उडाली आहेच, पण कॉंग्रेसबाहेरील इतर पक्षांच्या सभासदांनींहि वर्किंग कमिटीच्या ठरावांचा निषेध केला आहे. या बाबतींत इतरांनी कां तक्रार करावी असा प्रश्न उथळपणानें कित्येक कट्टर विचारतात. त्यालाहि उत्तर मोतिलालजींच्या पत्रकावरूनच सुचण्यासारखें आहे. कौन्सिलांत कांग्रेस पक्ष आजपर्यंत इतरांशीं सहकारितेनें वागत आहे. इतर पक्षांच्या सहकारितेनेंच कांग्रेस पक्षानें नोकरशाहीचीं धोरणें हाणून पाडलेलीं आहेत. कांग्रेस पक्षाला अशी इतरांकडून सहकारिता मिळत असतां कॉंग्रेस पक्षानें मध्येंच एकाएकीं कौन्सिलातून पाय काढून इतर पक्षांना लंगडे करणें हे कृतघ्नपणाचें व अवसानघातकीपणाचें नव्हे काय ? सरकारला विरोध करण्याचे बाबतींत इतर पक्षांनीं जसें कॉंग्रेसवाल्यांना साह्य केलें तसेंच कॉंग्रेसवाल्यांनी इतर पक्षांना या विरोधाचे कामांत साह्य करणें हे त्यांचें कर्तव्य ठरत नाहीं काय ? पंडित नेहरू आपल्या पत्रकांत म्हणतात कीं 'कॉंग्रेस पक्षाच्या साह्याशिवाय इतर पक्षांचें सरकार पक्ष व सरकारजमा इतर पक्ष यांच्या कंपूविरुद्ध कांहीं चालणार नाहीं. इतर पक्षांना सरकारी धोरणास यशस्वी रीतीनें विरोध करतां येणार नाहीं.' यावरून कॉंग्रेसच्या गैरहजेरीच्या धोरणानें इतर पक्षांचे कसे पाय मोडतील याची स्पष्ट कल्पना पंडितजींना आहे. ही कल्पना असूनहि त्यांनीं इतर पक्षांच्या पुढाऱ्यांना न विचारतां वर्किंग कमिटीचा निर्णय जाहीर केला ! इतर पक्षांना या बाबतींत कधींच विचारावयाचें नाहीं असें पंडितजींचें मत असतें तर गोष्ट निराळी. पण असें नाहीं. कारण कौन्सिलें कायमचीं कां सोडीत नाही, या प्रश्नाला उत्तर देतांना नेहरू असें म्हणतात कीं " कौन्सिलें कायमचीं सोडण्याच्या धोरणाचे बाबतींत कॉंग्रेसवाले व इतर राष्ट्रीय पक्ष यांचें संगनमत होण्यासाठीं विचार-विनिमय करण्याची संधि मिळाली पाहिजे " म्हणून ही तात्पुरती अर्धवट असहकारिता पुकारण्यांत आली आहे. अर्थात् कौन्सिलें कायमचीं सोडण्याच्या बाबतींत जर इतर राष्ट्रीय पक्षांशीं विचारविनिमय करण्याची जरूरी पंडितजींना वाटते, तर तात्पुरत्या गैरहजेरीच्या बाबतींतही ती कां वाटूं नये ? भावी असहकारितेसाठीं कॉंग्रेसवाल्यांनाहि जर गैरहजेरीच्या पूर्वतयारीचे धडे गिरवावे लागणार, तर मग इतर

पक्षांकडूनहि तेच धडे गिरविण्यासाठीं पंडितजींनीं त्यांच्याशीं याच वेळीं विचारविनिमय करावयास पाहिजे होता. कारण भावी कायमच्या कौन्सिलत्यागात पंडितजींना त्यांचें सहकार्य घ्यावयाचें आहे. पण आतां हें सहकार्य साधणार कसें ?

### संघटनेच्या ऐवजीं विघटना

पं. मोतीलाल नेहरू यांनीं हें जें नवें विक्षिप्त धोरण सुरू केलें आहे त्यायोगानें संघटनेच्या ऐवजीं विघटना होऊन हटकून कार्यनाशच होईल. असहकारितेच्या वेळेपासून नेमस्त पक्ष काँग्रेसपासून अलग झाला होता. पुढें काँग्रेसमध्येंहि कौन्सिलप्रवेशाच्या बाबतींत मतभेद होऊन कट्टर व स्वराजिस्ट असे दोन विभाग झाले.त्यानंतर दिवाणगिरीच्या स्वीकारण्याचा प्रश्न उद्भवून काँ. नॅशनॅलिस्ट असा निराळा पक्ष स्थापला गेला.अशी ही होत चाललेली विघटना घातुक आहे हें लक्षांत आल्यानें स्वराज्ययोजनेच्या प्रसंगानुरोधानें सर्व पक्षांच्या एकीकरणास सुरवात करण्यांत आली आणि नेहरू कमिटीचा रिपोर्ट हें या एकीकरणाचेंच मधुर फळ होय. ही संघटना बिघडूं नये म्हणून तर कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत निर्भेळ स्वातंत्र्याऐवजीं म. गांधींचा तडजोडीचा ठराव पुढें येऊन तो अत्यंत प्रयासानें मंजूर करून घेण्यांत आला. त्यानंतर अलीकडे नवीन निवडणुकी तहकूब झाल्याचें जाहीर होण्याच्या आधींपर्यंत भावी निवडणुकी परस्परांशीं विरोध न येतां एका धोरणानें लढविण्यांत याव्या या हेतूनें संयुक्त जाहीर विनंति प्रसिद्ध करण्याचीहि वाटाघाट चालू होती. एवंच आपण कौन्सिलें तूर्त बरखास्त करीत नाहीं असें व्हाइसरॉयांनीं जाहीर करीपर्यंत तडजोडीच्या तत्त्वावर अधिकाधिक संघटना करण्याकडेच काँग्रेसचा कल होता. राष्ट्राचें संयुक्त बळ नोकरशाहीच्याविरुद्ध उभें करावें अशीच भावना सर्व राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या मनांत वागत होती. असें असतां व्हाइसरॉयांनीं कायदे–मंडळें सध्या बरखास्त करीत नाहीं एवढें म्हणतांच संघटनेचें धोरण सोडून विघटनेचें धोरण स्वीकारणें हें कोठल्या गांवचें शहाणपण? नोकरशाहीच्या घातुक कारवाईला तोंड देण्यासाठीं संघटनेची आवश्यकता पूर्वींहून अधिक भासूं लागली असतां पुनः आपसांतच यादवी माजून फाटाफूट होण्यासारखें विचित्र धोरण स्वीकारण्यांत यावें, आणि तेंहि काँग्रेसमध्यें किंवा निदान ऑल–इं. कॉ. कमिटीमध्यें वाटाघाट झाल्यावांचून केवळ वर्किंग कमिटीनेंच जाहीर करावें,हें देशाचें दुर्दैव होय. या धोरणामुळें सर्वपक्षीय परिषदेंत सामील झालेले बॅ. सप्रूंसारखे नेमस्त तर दुरावतीलच. पण प्रत्यक्ष काँग्रेसमध्यें कट्टर पक्ष व इतर सर्व पक्ष यांच्यात जो सलोखा होता तोहि यापुढें राहणार नाहीं. काँग्रेस नॅशनॅलिस्ट पक्ष हा काँग्रेसच्या तिकिटावर निवडून आला नसल्यामुळें वर्किंग कमिटीचा ठराव त्याला तर बंधनकारक नाहींच; पण जे स्वराजिस्ट आतांपर्यंत काँग्रेसच्या ठरावांची मुर्वत राखीत होते त्यांतलेहि बरेच स्वराजिस्ट, या नाहीं त्या कारणानें कौन्सिलांतली आपापली कामें सोडण्याला नाराजच होतील. डॉ. वरदराजलू नायडूसारखे एका काळचे पक्के कट्टर असहकारितावादी हे देखील आतां कौन्सिलांतल्या सगळ्या मान्याच्या जागा काबीज करा असें म्हणूं लागले आहेत. अर्थातच असहकारिता ही सरकारला अडविणारी व्हावी, निदान ती रयतेचें नुकसान करून त्यांना रडविणारी अशी असूं नये, हीच सर्वांची इच्छा असणें स्वाभाविक आहे. परंतु तिच्या ऐवजीं केवळ सरकारधार्जिणी व लोकमताची कुचंबणा करणारी असली आत्मघातकी असहकारिता राष्ट्रावर लादण्याचा प्रयत्न वर्किंग कमिटीकडून होऊं लागेल तर तिला काँग्रेस पक्षांतूनच तीव्र विरोध होऊन देशांत संघटनेच्या ऐवजीं विघटन केल्याचें पाप मात्र पं. मोतीलाल नेहरू यांच्या माथीं बसेल याचा त्यांनीं वेळीच विचार करावा.

---

# आयुर्वेदीय प्रथमोपचारक वर्गाचा समारोपसमारंभ

गेल्या गुरुवार ता. १३ रोजीं टिळक महाविद्यालयानें सुरू केलेल्या आयुर्वेदीय प्रथमोपचारक वर्गाचा समारोपसमारंभ **रा. ब. डॉ० शिखरे** यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत आला. या वेळीं दे. भ. शि. म.परांजपे, नानासाहेब वैद्य, जिल्हाबोर्डाचे ॲ.ऑफिसर श्री.दीक्षित,चीफ ऑफिसर श्री. गोवित्रीकर, सभासद काळभोर, श्री. गुप्ते, वै.भावे, श्री. नारायणराव गुंजाळ वगैरे मंडळी हजर होती. प्रथमतः अध्यक्षस्थानीं **डॉ. शिखरे** यांची निवड झाल्यानंतर महाविद्यालयाचे अधिपति आचार्य रबडे यांनी या वर्गाची माहिती सांगितली. ते म्हणाले, खेड्यांतील प्राथमिक शिक्षकांना प्रथमोपचारकाचें शिक्षण देऊन त्यांच्याजवळ थोडी औषधें ठेवण्याची कल्पना १९२४ सालीं सर्जन–जनरल हूटन यांनी मुंबईसरकारापुढें मांडली व त्याप्रमाणें सुमारे तीस प्रथमोपचारक शिकून तयारहि झाले. यांपैकीं या जिल्ह्यांतील दहा शिक्षक होते. पण हे सर्व पाश्चात्य पद्धतीनें शिकलेले व पाश्चात्य उपचार करणारे होते. त्यांच्याऐवजीं आयुर्वेदीय पद्धतीनें शिकलेले प्रथमोपचारक तयार केल्यास ते लोकांत अधिक प्रिय होऊन थोड्या खर्चात लोकांची अधिक सोय होईल व एका प्राचीन आर्यवैद्यकाचें पुनरुज्जीवन होण्याला मदत होईल अशी कल्पना आमच्या मनांत आली आणि तिला मूर्त स्वरूप येण्याला येथील जिल्हाबोर्डाची आम्हाला मदत झाली. यंदा त्यांनीं आमच्याकडे तीस प्राथमिक शिक्षक तीन महिन्यांचा अभ्यासक्रम शिकण्यासाठी पाठविण्याचें ठरविलें व आम्हीहि त्यांचेकरितां एक अभ्यासक्रम आंखून त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करण्याचे मान्य केले. याप्रमाणें गेले तीन महिने हा वर्ग चालून आज त्याची परीक्षाहि झाली. आतां निकाल होऊन थोड्याच दिवसांत शिफारसपत्रें देण्यांत येतील. या कामीं बोर्डानें आमच्याशीं केलेल्या सहकार्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

यानंतर रा. सा. दीक्षित, श्री. काळभोर, श्री. गुप्ते, श्री. गुंजाळ यांचीं भाषणें झालीं. त्यांत बोर्डातील मंडळीनें महाविद्यालयाचे व वैद्य नानलशास्त्री यांचे आभार मानले. तसेंच आयुर्वेदीय पद्धतीनें प्रथमोपचारक तयार करण्याचा हा पहिला मान पुणें जिल्हाबोर्डानें घेतला आहे. त्याचें इतरांनींहि अनुकरण करावें असें सांगितलें.

नंतर कार्यवाह श्री. हर्षे यांचें भाषण झालें. त्यांत त्यांनी आयुर्वेद हें फार प्राचीन शास्त्र आहे, त्यांतील औषधें अत्यंत गुणकारक आहेत; मात्र पाश्चात्यांच्या विवेचक पद्धतीनें त्याचें शोधन व मांडणी कोणी केली नाहीं म्हणून त्याचें महत्त्व पाश्चात्यांना पटत नाहीं; पण आपण त्याच्यावरची श्रद्धा सोडतां कामा नये व त्याचें संशोधन करून हल्लींच्या विवेचक दृष्टीला पटेल अशी त्याची मांडणी केली पाहिजे असे सांगितलें. तसेंच येथे शिक्षण घेतलेल्या शिक्षकांनीं केवळ बढतीच्या दृष्टीनें या शिक्षणाकडे न पाहतां लोकांचा उपयोग करून लोकसेवा करण्याच्या दृष्टीनें त्याचा उपयोग करावा, असेंहि त्यांनीं सुचविलें.

यानंतर अध्यक्ष **डॉ. रा. ब. शिखरे** यांचें भाषण झालें. ते म्हणाले, "मला या समारंभास येण्याची संधि मिळाली याबद्दल मी टिळक महाविद्यालयाचा आभारी आहें. सर्जन–जनरल हूटन हे येथील हॉस्पिटलमध्यें होते तेव्हां माझें व त्यांचें अशा योजनेबद्दल बोलणें झालेलें आहे. पण त्या वेळची योजना पाश्चात्य पद्धतीची होती. आपली योजना आयुर्वेदीय पद्धतीची आहे. मी पाश्चात्य पद्धतीनें शिकलों असल्यामुळे मला प्रथम आयुर्वेदाबद्दल आदर नव्हता. पण माझा अनुभव व वाचन वाढत गेलें त्याप्रमाणें आयुर्वेद हें शास्त्र असून सर्व वैद्यकांत तें प्राचीन आहे अशी माझी खात्री झाली. ऋग्वेदांत याचा उगम सांपडतो. पुढें अलेक्झांडरच्या वेळीं या शास्त्राचा प्रसार इकडून पाश्चात्य देशांत झाला. बौद्ध लोकांनींहि या शास्त्राचा प्रसार केला. पण त्यांचें अहिंसेचें तत्त्व विच्छेदनाच्या वगैरे कार्यास विरोधक होऊं लागलें. पुढें पुढें या शास्त्राची वाढ खुंटली. आपलें राज्य गेल्यावर तर त्याची स्थिति फारच खालावली. आतां त्याचा पुनरुद्धार सुरू आहे हें फार चांगलें आहे. पण केवळ 'जुनें तेवढें सोनें' अशी दृष्टि नसावी. तसेंच पृथक्करणादि साधनांनीं आपण आयुर्वेदीय औषधांची सशास्त्रता विवेचक बुद्धीला पटवून दिली पाहिजे. केवळ श्रद्धेनें काम भागणार नाहीं. असो. येथून शिकणाऱ्यांनीं खरी लोकसेवेची दृष्टि ठेवावी; द्रव्यदृष्टि बनूं नये." अशा आशयाचें भाषण झाल्यावर आभारप्रदर्शन व हारतुरे होऊन समारंभ संपला.

# स्फुट सूचना

संगमनेर येथील मारुतीच्या रथाची मिरवणूक काढण्यास तेथील मॅजिस्ट्रेट श्री. तांबे यांनीं मनाई केली होती. हा मनाईहुकूम अर्थातच मुसलमानांच्या मशिदींवरून मिरवणूक जातांना मुसलमान दंगा करतील हे निमित्त पुढें करून काढण्यांत आला होता. परतु कर्मधर्मसंयोगानें जी मिरवणूक काढण्यांत पुरुषांची छाती झाली नाहीं ती मिरवणूक अखेर स्त्रियांनीं काढली व दंगाधोपा न होतां ती शेवटासहि गेली. त्यावरून एक गोष्ट सिद्ध झाली ती अशी कीं, सरकारच्या मनांत आल्यास जशी हिंदूंची मिरवणूक त्यास बंद पाडतां येते त्याचप्रमाणें सरकारनें मनांत आणल्यास त्यास पोलिसांचा बंदोबस्त ठेवून दंग्याधोप्याची भीतिहि दूर करतां येते. असें आहे तर सरकार पोलीसचा बंदोबस्त ठेवण्याचें टाळून हिंदूंच्या मिरवणुकीच मनाई करून व त्यांचीं मनें दुखवून त्यांना वहिवाटीचा धार्मिक हक्क कां बुडवितें असा प्रश्न साहजिकच विचारावासा वाटतो. पण त्याचें उत्तर प्रत्येकास न सांगतांच सुचण्यासारखें आहे.

संगमनेरच्या शूर स्त्रियांनीं श्री. तांबे यांच्या दंडेलीच्या हुकुमास योग्य तें सक्रिय उत्तर देऊन अशा हुकुमाची संभावना कशी करावी याचा मार्ग दाखविला आहेच. तथापि तेवढ्यावर न थांबतां श्री. तांबे यांच्यासारख्यांच्या दंडेलीच्या व लहरी हुकुमावर कायदेशीर इलाज कांहींच नाहीं कीं काय, अशी कित्येकांस शंका वाटत असल्यास तिचेंहि निरसन संगमनेरकरांनीं कायदेशीर उपायानें करून घेतलें आहे. संगमनेर येथील सर्व जातींच्या हिंदु पुढाऱ्यांनी श्री. तांबे यांनीं क्रि. प्रो. कोडाच्या १४४ कलमाखालीं काढलेल्या मनाई हुकुमाविरुध्द मुंबई हायकोर्टाकडे अपील केलें. सदर अपिलाची सुनावणी न्या. पाटकर व न्या. वाईल्ड यांजपुढें होऊन त्यांनीं तांब्यांचा मनाई-हुकूम बेकायदेशीर ठरविला. या निकालाबद्दल जसे उभयतां न्यायमूर्तींचे तसेंच संगमनेरकरांतर्फे काम चालविणारे बॅरिस्टर जयकर आणि सॉलिसिटर खेर व रेळे यांचेंहि अभिनंदन करणें जरूर आहे. हायकोर्टाच्या या निकालाचा फायदा संगमनेरच्या पुढील सालच्या मिरवणुकीस होईलच. पण त्याखेरीज अशा प्रकारचे दंडेलीचे व अन्यायाचे हुकूम सोडणाऱ्या मुंबई इलाख्यांतील ठिकठिकाणच्य मॅजिस्ट्रेटांवरहि याचा परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं अशी आम्हास आशा आहे.

सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय कवि व पुण्याचे नागरिक अनंततनय ऊर्फ दत्तात्रेय अनंत आपटे यांस मागील मंगळवारीं दुपारीं पुणें येथें देवाज्ञा झाली हे कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें. श्री. अनंततनय यांचा जन्म स. १८८२ सालीं झाला. त्यांचें प्राथमिक व हायस्कूलपर्यंतचें शिक्षण जुन्नर व पुणें येथें झालें. परंतु अनेक कारणांनीं त्यांची शिक्षणाची मजल पुढें जाऊं शकली नाहीं. पुढें संसारतापाचे चटके त्यांना अत्यंत तीव्रतेनें बसूं लागले. कांहीं दिवस खेड येथील मिशन शाळेंत नोकरी केल्यानंतर इरिगेशन खात्यांत त्यांनीं नोकरी धरली. अशा रीतीनें ते प्रतिकूल परिस्थितींत गुरफटले असतांहि त्यांच्यांत असलेली काव्यज्योत अधिकाधिक चमकूं लागली. अनंततनय अर्वाचीन मराठींतील एक श्रेष्ठ कवि असून त्यांची कविता जुन्या कवींच्या वळणावर असे. त्यांचीं अनेक स्फुट काव्यें, खंडकाव्यें व महाकाव्यें प्रसिद्ध आहेत. त्यांची स्फुट कविता, हृदयतरंग नांवानें तीन भागांत प्रसिद्ध झाली आहे. थोरले माधवराव पेशवे, तिलकविजय हीं त्यांचीं महाकाव्यें सुप्रसिद्ध आहेत. त्यांचें अंतःकरण किती मृदु व भक्तिपूर्ण होतें हें तिलककाव्यावरून चांगलें लक्षांत येतें. गीता ग्रंथावर त्यांचा चांगला व्यासंग असून लहान मुलींसाठीं झोपाळ्यांवरील ओवीबद्ध गीता, मुलांसाठीं गद्य बालगीता हीं त्यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. त्यांच्या खंडकाव्यांतील श्रीशारदा दूतिका, पर्वतीचा पोवाडा, अंतर्विद्ध कलिका हीं काव्यें सरस आहेत. त्यांचा शेवटचा मोठा काव्यग्रंथ 'तिलकविजय' हा होय. त्यांचें काव्य ठसठशीत, प्रसादपूर्ण व भक्तिभावनायुक्त असें असल्यानें वाचकांस तें फार प्रिय होत असे. पुणें महाराष्ट्र शारदामंडळाचे ते एक संस्थापक होते. त्यांच्या मृत्यूनें मराठी काव्याचा एक पुरस्कर्ता, अभिमानी भक्त व जुन्या नव्या काव्यपद्धतीची सांगड घालणारा रसिक कवि नाहींसा झाला ही मराठी साहित्याची निःसंशय मोठी हानि झाली.

# बिनवकीलपत्राचे वकील !

गेल्या गुरुवारीं सिमला येथील चेम्सफर्ड क्लबांत व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांना एक बडी मेजवानी देण्यांत आली. ही मेजवानी त्यांना विलायतेच्या प्रवासाला निरोप देण्यादाखल होती. अध्यक्षस्थानीं वरिष्ठ कार्यकारी कौन्सिलांतील सर्वांत जुने हिंदी सभासद सर भूपेंद्र नाथ मित्र हे होते. या प्रसंगीं अर्थातच मेजवानीपेक्षां भाषणांना महत्त्व अधिक होतें. व त्याप्रमाणें सर भूपेंद्र नाथ मित्र व लॉर्ड आयर्विन या दोघांनीं केलेलीं भाषणें महत्त्वाचींच झालीं. सर भूपेंद्र हे बोलूनचालून अधिकारी. पण ते किती झाले तरी हिंदी व बरेचसे राष्ट्रीय वृत्तीचे गृहस्थ असल्यामुळें, त्यांनी जें भाषण केलें ते पाहा. आणि उडत्या पाखराप्रमाणें चार दिवस हिंदुस्थानात येऊन गव्हर्नरीच्या मळ्यांत विहरणाऱ्या व्हाइसरॉयसाहेबांचें भाषण पाहा म्हणजे त्या दोहोंतील स्वाभाविक अंतर तेव्हांच दिसून येईल.

ज्या कार्याकरितां व्हाइसरॉय विलायतेस जाणार तें कार्य म्हणजे हिंदुस्थानाच्या भावी राजकारणासंबंधानें नव्या प्रधान—मंडळाशीं सल्लामसलत करण्याचें होय. अर्थात् तेथें कोण काय सल्ला विचारील, कोण काय सल्ला देईल, व स्थानिक कारस्थानांच्या समुद्रमंथनांतून शेवटीं कोणतें रत्न बाहेर निघेल हे आज कोणीहि सांगूं शकत नाहीं. तथापि सर भूपेंद्र यांनीं आशा प्रदर्शित केली कीं, हिंदुस्थानाची भावी स्वराज्यघटना अशी बनविण्यांत यावी कीं ती आपोआप प्रगति करील व परिणति पावेल; ती बाहेरून मधून मधून लिंपावी किंवा जोडावी लागणार नाहीं. उदाहरणादाखल त्यांनीं कॅनडा वसाहतीतील स्वराज्यप्राप्तीचा दाखला दिला. आमच्या मतें हा दाखला फार मार्मिक होता. कारण तत्त्वाच्या दृष्टीने हिंदी जनता इंग्रजांपाशीं जे काय मागते त्याचे खरे बीज या दाखल्यांत आढळतें. तें असे कीं, प्रत्यक्ष जबाबदारी अंगावर टाकल्याशिवाय कोणीहि राज्यकारभार यशस्वी करूं शकत नाहीं व त्यांतील अडचणींतून पार पडत नाहीं. आजकाल हिंदुस्थानाला स्वराज्य देण्यासंबंधानें इंग्रज ज्या अडचणी पुढें आणतात त्यांत धर्मभेद, जातिभेद व तज्जन्य द्वेष ह्या मुख्य अडचणी असतात. सर भूपेंद्र यांना या अडचणींची जाणीव नव्हती असें नाहीं. पण कानडा वसाहतीचें उदाहरण देऊन त्यांनीं हें सुचविलें कीं जरी हिंदुस्थानांत आज जातिभेद, धर्मभेद वगैरे अडचणीचे प्रकार आहेत तरी, लॉर्ड डरहॅम यांनीं कानडा वसाहतीसंबंधानं सुचविल्याप्रमाणें हिंदुस्थानाला जबाबदारीचें स्वराज्य देऊन टाका किंवा निदान देऊं करा म्हणजे या अडचणी, तिकडे फ्रेंच व इंग्रज यांच्या हातून निघून गेल्या तशा, इकडेहि हिंदु मुसलमान वगैरे लोकांच्या हातून पार पडतील.

सर भूपेंद्र यांच्या भाषणांतील दोनहि मुद्दे व्हाइसरॉयसाहेबांना थोडे अडचणीचेच वाटले असले पाहिजेत. पैकीं एक त्यांनीं हुजत न घालतां मान्य केला. तो असा कीं, स्वराज्यघटनेची योजना म्हटली म्हणजे ती स्वतःसिद्ध, स्वतःसंवर्धक व स्वतःपरिणामी अशी असली पाहिजे. आणि हे अवघड विचार व्हाइसरॉयसाहेबांनीं खरोखरच सोप्या शब्दांनीं प्रगट केले. ते म्हणाले, "राज्यघटना ही झाडाच्या सालीसारखी असावी. मनुष्याच्या आंगावर बेतलेल्या कपड्यासारखी नसावी. कपडा बेतून शिवल्यानंतर कांहीं दिवसांनी तो आंगाला येईनासा होतो. कापड तरी आटते किंवा आंग तरी वाढते. व असे झालें म्हणजे जुने कपडे टाकून देऊन नवे बेतून शिवावे लागतात. झाडाच्या सालीचें तसें होत नाहीं. कारण झाडांतील गाभा व झाडाची साल दोनहि एकाच जीवनरसानें पोसलीं जातात, व समप्रमाणानें एकाबरोबर एक वाढत जातात. यामुळे एक दुसऱ्याला केव्हांहि आखूड पडत नाहीं. शिवाय दोहोंमध्यें एक प्रकारचा जिव्हाळा नांदतो."

पण व्हाइसरॉयसाहेबांनीं लगेच हातांत पण—परंतूत बुडविलेला हरताळाचा कुंचला घेऊन तो या समर्पक विधानावर फासला. स्वराज्यघटना स्वतःसिद्ध असावी. पण ! स्वतःसंवर्धक असावी. पण ! स्वतःपरिणामी असावी. पण ! सर्व कांहीं असावें. पण ! पण काय ? तर तें हिंदुस्थानांत होऊं शकत नाहीं. जगाच्या पाठीवर इतर कोठें घडूं शकेल. कां ? तर हिंदुस्थानांत जातींचीं व धर्मांचीं भांडणें आहेत. छोट्या मोठ्या जमातींची भांडणें आहेत. छोट्या जातींचा अविश्वास व भीति नाहींशी करून, मोठ्या जमातींनी छोट्यांचा विश्वास संपादन केला नाहीं. तात्पर्य, हिंदुस्थानांत कानडा वसाहतीप्रमाणें स्वराज्याची वाढ होण्याला स्वतः देशांतील लोकच आड येत आहेत. व त्यांतल्या त्यांत या दोषाची जबाबदारी मोठ्या जमातीवर पडते. अर्थात् छोट्या जमातीवर ती मुळींच पडत नाहीं. म्हणजे एका वाक्यांत सांगावयाचें तर व्हाइसरॉयसाहेबांचें म्हणणें असें कीं "मुसलमान जे काय मागतात ते हिंदूंनीं द्यावें. कारण हिंदूंची जमात मोठी पडली व मुसलमान जमात लहान आहे. व जोंपर्यंत हें घडून

येत नाहीं तोंपर्यंत हें भांडण असेंच चालणार. व जोंपर्यंत हें भांडण चालू राहणार तोंपर्यंत आम्ही स्वराज्य देऊं शकत नाही हें उघडच दिसतें." आणि अशा तऱ्हेची एक तर्फी वृत्ति मनांत ठेवून व्हाइसरॉयसाहेब विलायतेला जात असतां कांहीं लोक त्यांना हिंदी राष्ट्राचे वकील म्हणवयाला व ते स्वतः तसें म्हणवून घ्यावयाला तयार आहेत.पण यांत खरी वकिली नाहीं व खरी मुनसुफीहि नाहीं. तर स्वार्थी ब्रिटिश कारस्थानाचा हा सर्व खेळ आहे.

प्रधान–मंडळ काय, विलायती मुत्सद्दी काय, व व्हाइसरॉय काय आम्हाला आज सर्व सारखेच. ब्रह्मा, विष्णु व महेश हीं तीनहि जगाचीं अधिदैवतें व जुळीं भावंडें असतां, एक सात्विक, एक राजस व एक तामस असे त्रिगुण तिघांच्या ठायीं वांटून गेल्याचे पुराणें सांगतात. ब्रम्हदेव स्वतः भिडस्थ किंवा बुद्धिमंद व सात्विक, याकरितां तो कारस्थानांत खेळणाऱ्या राजस स्वभावाच्या श्रीविष्णूला वकील म्हणून पुढें करून, रागीट व तामस श्रीशंकराकडे जगाचीं गाऱ्हाणीं सांगून, क्रोध आवरून संहार थांबविण्याबद्दल वकिली करतो. पण पुराणांतली ही कल्पना पुराणांत ठीक आहे. कारण तेथें त्रिगुणांचा मेळ बसत असतो. पण लॉर्ड आयर्विन हे विलायतेस गेल्यानंतर जो विचारविनिमय तेथें होणार तो स्वार्थी राजस गुणांचा एकजिनसी खेळ आहे. त्यांत तिसरा नेत्र उघडून, जटा आपटून हिंदुस्थान जाळण्याला आज कोणी शंकर उभा राहिलेला नाहीं. किंवा स्वराज्याची सृष्टि खऱ्या प्रेमानें उत्पन्न करणारे कोणी सात्विक ब्रह्मदेवहि नाहींत. आहेत ते सगळे कृष्णावतारी कपटपटुत्व प्रगट केलेले एकजात राजस विष्णूच आहेत. म्हणजे त्यांना आपला कोण,जवळचा कोण, दूरचा कोण, परका कोण, कोणाचा प्रतिपाळ करावा, कोणाला खड्ड्यांत घालावा,कोणाचा कार्यघात करावा, व इतकें करून स्वतः नामानिराळें कसें राहावें हें चांगलें समजतें व चांगलें आंगवळणींहि पडलें आहे.म्हणून हिंदी राष्ट्राची वकिली करण्याच्या पेशानें निघालेल्या व्हाइसरॉयसाहेबांबद्दल आम्हाला विश्वास वाटत नाहीं व विलायतेंतील खलबतांतून खरें स्वराज्यसाधक असें कांहीं निष्पन्न होईल अशी आशा वाटत नाहीं. सायमन कमिशनावरील हिंदी जनतेचा राग कबूल करावा लागत असल्यामुळें, ते कमिशन नेमण्याचा मूळ हेतु तर कसा कायम राहील पण जमल्यास हा राग घालवून किंवा कमी करून आपल्याला जवळ असणाऱ्या लोकांच्या तोंडावरून हात कसा फिरविला जाईल, व गोगलगाईच्या पावलानें होणाऱ्या स्वराज्याच्या प्रगतीला त्यांची स्पष्ट नसली तरी मूक संमति कशी मिळवितां येईल, इतक्याचाच विचार विलायतेत होणार आहे. आणि हें झालें तरी इतक्याचकरितां कीं, दगडापेक्षां वीट मऊ या न्यायानें कॉनझर्व्हेटिव्ह प्रधानमंडळ जाऊन प्रजासत्तावादी नवें प्रधानमंडळ आलेलें आहे.

व्हाइसरॉयसाहेबांची नेमणूक हिंदुस्थानांत पंचवार्षिक म्हणून ठरलेली असते. पार्लमेंटमधील अदलाबदलीनें किंवा प्रधानमंडळाच्या अदलाबदलीनें ती मुदत कमी होत नाहीं किंवा वाढत नाहीं. यामुळें केव्हां केव्हां एका पक्षाचें प्रधानमंडळ व हिंदुस्थानाचे स्टेटसेक्रेटरी, आणि दुसऱ्या पक्षाचे व्हाइसरॉय, अशी विजोड दंपत्यें किंवा मेहुणें अधिकाराच्या पाटावर बसून, कारभाराचें पुण्याहवाचन चालवीत असलेलीं आढळतात! पण साम्राज्यविषयक स्वार्थ, व त्याहिपेक्षां मुत्सद्देगिरीची शिस्त व शिक्षण, हीं या विजोड दांपत्याच्याहि अंगांत इतकीं मुरलेलीं असतात कीं, एकाचा नवरा एकाची बायको अशी जोडी जमल्याची जाणीव असतां, तीं दिसूं न देतां, एकमेकांच्या हाताला बेलाशक हात लावून स्वार्थसाधनाचें मंगलकार्य तीं खुशाल पार पाडतात. खुशाल या शब्दाऐवजीं निर्लज्जपणानें हा शब्दहि उपमेला अनुसरून घालण्याला फारशी हरकत नव्हती.पण इंग्रजांची शिस्त व यशस्वी मुत्सद्देगिरी आम्हा लोकांविरुद्ध प्रभावी झालेली पाहावयाला इतके दिवस मिळत असल्यामुळें, त्यांना निर्लज्ज म्हणण्यापेक्षां हिंदी जनतेनें स्वतःलाच निर्लज्ज म्हणून घेण्याची पाळी आली आहे.मग स्वतः लाजलेला मनुष्य दुसऱ्याला कसा लाजविणार!

असो.हिंदी जनतेनें सही न करतां मिळालेले तिचें वकीलपत्र घेऊन व्हाइसरॉयसाहेब तर विलायतेला निघालेच. आमची वकिली ते कशी काय करणार याचा अंदाज सिमला येथील त्यांच्या भाषणांत आलाच आहे. पण आम्ही त्यांचे पक्षकार असलों किंवा नसलों तरी न्यायाधीशाच्या खास चेंबरमध्यें म्हणजे अंतर्गृहांत पक्षकाराला प्रवेश नसल्यामुळें,तेथें काय होणार हे दुरून पाहाण्यापलीकडे व आपल्या ठिकाणीं हा अंदाज करण्यापलीकडे आम्हाला अर्थात् कांहीं करतां येत नाही. मात्र 'जें जें होईल तें तें पाहावें' हा तुकोबाच्या अभंगाचा दुसरा चरण जरी नाइलाजानें मान्य करावा लागत आहे. तरी, पहिला चरण म्हणजे 'तुका म्हणे उगी राहावें' हा चरण आम्हाला मान्य करतां येत नाहीं.म्हणून व्हाइसरॉयसाहेब तिकडे वकिली करीत असतां, इकडे किंवा साधल्यास विलायतेंतहि आम्ही चळवळ केली पाहिजे,आणि कोर्टांत वकील भलतेंसलतें बोलूं लागला तर मागून त्याचा झगा किंवा आंगरखा ओढओढून त्याचें बोलणे आपणाला मान्य नाहीं असें कोर्टाला कळविण्याची जी युक्ति पक्षकारांना साधते ती हिंदी जनतेनेंहि अनुसरली पाहिजे.

# खेडेगांवविषयक व्याख्यानमाला

## श्री. वा. कृ. कोगेकर एल. एजी. यांचें व्याख्यान

तारीख १४-५-२९ रोजीं श्री. कोगेकर यांचें 'शेती व खतें' या विषयावर व्याख्यान झालें. त्यांत त्यांनीं सांगितलें कीं, मशागत, पाणी, व खत हीं शेती चांगली येण्याचीं मुख्य साधनें आहेत. त्यांपैकीं खतासंबंधीं विचार करतांना असें आढळून येतें कीं खतानें जमिनीचा पोत सुधारतो, पाणी धारण करण्याची शक्ति वाढते, पिकाला योग्य अन्न मिळतें, व जमिनींतील द्रव्यें झाडाला मिळण्याच्या स्थितीप्रत येतात. खताचे तीन प्रकार आहेत—(१) प्राणिज, (२) वनस्पतिज (३) खनिज. प्राणिज खतामध्यें शेण, मूत, सोनखत, हाडें, मासळी, रक्त वगैरे खतें येतात. या सर्वांत अत्यंत महत्त्वाचें, सर्व ठिकाणीं मिळण्यासारखें व गुणानें चांगलें असें खत म्हणजे 'शेणखत' हें होय. हें खत सांठविण्यांचे बाबतींत फार अनास्था होते. हें खत वाळून गेल्यानें त्यांतील अमोनिया व नायट्रोजन हीं द्रव्यें उडून जातात. शिवाय त्यामुळें आसपासचें आरोग्य बिघडतें. याला उपाय असा कीं, गांवापासून १।२ फर्लोगांचे अंतरावर खड्डे खणून त्यांत सदर खत व्यवस्थित टाकलें जाईल, त्यांतील ओल निघून जाणार नाहीं अशी काळजी घेतली पाहिजे. हे शेणखत इतर कोणत्याही खतापेक्षां सकस आहे. हें पाश्चिमात्य तत्त्वज्ञानें पूर्वी सिद्ध करून दाखविलें आहे. शेणखतानें चिकट जमीन भरभरीत होते. या वर्षी घातलेलें शेणखत पुढील वर्षी लागू पडतें. शेणाचा आज गोवऱ्या करण्याकडे उपयोग केला जातो तो ठीक नाहीं. त्यानें नुकसान अधिक होतें. मूत्रामध्यें शेणखतापेक्षां दुपटीनें नायट्रोजन असतो, म्हणून मूत्रखतही वांया जाऊं देतां उपयोगी नाहीं. तें गोळा करून गांवाबाहेर केलेल्या खड्ड्यांत जाईल अशी तजवीज करावी. मूत्रखताचा मात्र उपयोग तात्काळ होतो. जनावरांचे गोठे चांगले स्वच्छ ठेवल्यानें हीं दोनही खतें योग्य ठिकाणीं पडतील व जनावरास गोचीड वगैरे होणार नाहीं. मेंढ्या शेळया शेतांवर बसविण्यांत त्यांच्या मूत्राचा व लेंड्यांचा उपयोग व्हावा हा उद्देश असतो. हें खत फार उष्ण असतें व म्हणून त्याला पाणी फार लागतें. शिवाय सदर खत ५ वर्षेपर्यंत लागू पडत नाहीं.

सोनखताचें महत्त्व फारच आहे. शहरांतील मैल्याची कांहीं तरी व्यवस्था करतात. परंतु खेडेगांवांत तो अगदीं व्यर्थ जातो. चराची पद्धति शौचकुपाचे बदलीं खेडेगांवीं झाली तर सोनखत रक्षण होऊन त्याचा चांगला उपयोग करून घेतां येईल. याहि खताला पाणी फार लागतें. हें खत बहुतकरून उंसाला देण्यांत येतें. हिंदुस्थानांत वांया जाणाऱ्या मैल्याची किंमत ८० कोटी रुपये होईल असें एका गणितज्ञाने काढलें आहे. हाडांचें खत सुद्धा चांगलें असतें. त्यानें फळांचा व फुलांचा गुण सुधारतो. परंतु त्याला उपयोगी पडण्यास बराच कालावधि लागतो. आज हाडें गोळा करून परदेशीं पाठविलीं जात आहेत हें आपलें नुकसान आहे. हाडें व चुना यांचा थर देऊन हाडांचें खत तयार करतां येतें. मासळीच्या खताचाही कोंकणांत उपयोग करतात.

वनस्पतीच्या खतामध्यें तीन प्रकार आहेत. एक पेंडीचा उपयोग, दुसरा ताग वगैरे पिकें गाडणें व तिसरा राब करणें म्हणजे जमीन जाळणें हे होत. याचा मध्यम प्रमाणांत उपयोग होतो. खनिज खतामध्यें शेण खताप्रमाणें सर्व द्रव्यें व गुण नसतात. एक एक खतांत एक एक विशिष्ट गुण असतो. उ. नायट्रेट ऑफ सोडा. हें नायट्रोजन देणारें खत आहे. हाडें हीं फॉस्फरिक ॲसिड देणारीं आहेत. तर सल्फेट ऑफ पोटॅश हें पोटॅश देणारें खत आहे. हीं सर्व खतें शेणखताला पूरक म्हणून वापरलीं असतां अधिक उपयोग होतो असें सांगून व्याख्यात्यांनीं आपलें भाषण संपविलें.

### श्री. शं. द. जावडेकर यांचें व्याख्यान

ता. १४ ५-२९ रोजीं श्री. शं. द. जावडेकर (टि. म. वि.) यांचें 'खेडेगांव व राजकारण' या विषयावर व्याख्यान झालें. खेडेगांवांत काम करणारास राजकारणाचें ज्ञान असणें फार जरूर आहे. मनुष्याचें मुख्य ध्येय अध्यात्मिक उन्नति करून घेणे हें आहे. व त्याची आर्थिक सामाजिक राजकीय व धार्मिक अशीं निरनिराळीं अंगें आहेत. हीं एकमेकांपासून फारशीं अलग ठेवतां येत नाहींत. स्वतंत्र देशांत सुद्धां राजकारणाचे धागे निरनिराळ्या क्षेत्रांत येत असतात, मग परतंत्र देशांत तर ते जास्त प्रमाणांत येणार हें निर्विवाद आहे. ब्रिटिश सत्तेपूर्वी खेडेगांवें स्वयंपोषित व त्याहिपूर्वी स्वयंसत्ताक होतीं. परंतु त्या वेळीं देशाची कल्पना लोकांत नव्हती. आपलें गांव हेंच आपलें सर्वस्व अशी समजूत होती. ब्रिटिश सत्तेपासून

खेडेगांवाचा स्वावलंबीपणा व स्वतंत्रता हीं गेलीं असून शिवाय खेडेगांव हें सर्व देशाचा एक घटक आहे अशी समजूतहि खेडेगांवांतील लोकांत उत्पन्न झाली नाहीं. अशी समजूत असणें फार जरूर आहे. आपला व देशाचा व इतर देशाचा संबंध काय, व्यवहार काय, सरकारचे अधिकार व कर्तव्य काय आहे, लोकांचे हक्क काय आहेत, या सर्व गोष्टींची स्थूल मानानें माहिती असणें फार जरूर आहे. शेतकी शिक्षण वगैरे महत्त्वाच्या खात्यांत सरकार आज खर्च करतें तो मुळींच पुरत नाहीं. सरकारनें या कामीं अगदीं मुक्तहस्तानें खर्च केला पाहिजे. याकरितां सरकार लोकांस जबाबदार राहिलें पाहिजे. हुंडणावळीचा प्रश्न पुष्कळांस समजत नाहीं, त्यामुळें त्या मार्गानें आपले देशाचा होत असलेला तोटा जाणवत नाहीं. कांहीं म्हणतात कीं खालून वर सुधारणा करीत जावी, म्हणजे अगोदर गांव, जिल्हा, प्रांत व मग मध्यवर्ती मंडळ या मार्गानें सुधारणा घडवून आणाव्यात व हक्क मिळविण्याची खटपट करावी. परंतु दुसरे कांहीं लोकांची अशी समजूत आहे की हिंदुस्थानाचे बाबतींत हा क्रम उलट व्हावयास पाहिजे. म्हणजे अगोदर मध्यवर्ती मंडळांत सुधारणा व्हावयास पाहिजे. म्हणजे पायास उपाय न करतां मेंदूस उपाय केला पाहिजे, व असें केलें असतां ग्राम-सुधारणेचें काम अधिक सुकर होईल. या कामांत श्रमविभागाचे तत्त्वावर काम झाले तर बरेंच यश येण्याचा संभव आहे. त्यांत अनेक अंगें आहेत. ज्याला जें महत्त्वाचें वाटेल तें त्यानें मनोभावें करावें व इतराच्या कामांत शक्य तों मदत व सहानुभूति दाखवावी, असे सांगून व्याख्यात्यांनीं आपलें भाषण संपविलें.

## शं. श्री. देव यांचें व्याख्यान

ता. १६।५।२९ रोजी धुळ्याचे श्री. शं. श्री. देव यांचें 'खादी व ग्रामसंघटन' या विषयावर व्याख्यान झालें. ते म्हणाले, ग्रामसंघटनेंत खादीला आद्यस्थान दिलें पाहिजे. ग्रामसुधारणेच्या इतर ज्या बाबी आहेत त्या या खादीच्यासभोंवतीं फिरणाऱ्या आहेत. सुधारणेच्या तात्विक कल्पना लोकांना पटत नाहींत, परंतु त्या खादीच्या कल्पनेमधून सांगितल्या तर पटतात व आवडतात. पश्चिम-खानदेशांत मुगटी म्हणून गांव आहे. त्या ठिकाणीं आज ग्रामसेवेचा प्रयोग चालू आहे. तेथील अनुभव वरीलप्रमाणें आहे. खेडेगांवांत लोकांचा रिकामा वेळ फार जातो. या वेळांत गप्पासप्पा, पत्ते अगर चिलीम वगैरे गोष्टींत लोक दंग असतात. हाच वेळ जर सूत काढण्यांत घालविला तर अनायासें फायदा होईल. चरितार्थाकरितां जो धंदा करावा लागतो त्यांतील वेळ सूत काढण्याकडे देण्याची जरूरी नाहीं, फक्त फुकट जाणारा वेळ या कामाला देण्यांत यावा एवढीच खटपट व्हावयास पाहिजे. खादीमुळें वेळेचा उपयोग चांगला होतो, आळस कमी होतो व त्यामुळें हौस उत्पन्न होते. आपले देशांत जर कशाची विशेष वाण असेल तर ती या हौसेची आहे. खादी वापरल्यामुळें अगर तत्संबंधीं इतर काम केल्यामुळें आपण कांहीं तरी चांगलें काम करीत आहों, अशी भावना उत्पन्न होते. कर्तव्याची जाणीव अधिक होते, व अधिक जबाबदारी वाटूं लागते. व याचा परिणाम साहजिक व्यसनापासून परावृत्त होण्याकडे होतो असा अनुभव येऊं लागला आहे.

खादी हें उच्च भावनेचें व मनोवृत्तीचें प्रतीक आहे व खादी वापरणारांत लबाड लोक नसतात असें नाहीं, न वापरणारांत देशभक्ति कमी असते असेंहि नाहीं. परंतु भावना समजण्यास लवकर व बरीच बरोबर कल्पना होते. याबद्दल व्याख्यात्यांनीं कल्याण स्टेशनावरील एका खादीची टोपी घालणाराची गोष्ट सांगितली व त्याचा परिणाम त्यांचे मनावर फार दृढ झाला. खादीमुळें वर्तनावर व विचारावर निःसंशय सुपरिणाम होतो असेंहि त्यांनीं सांगितलें. खादीपासून आर्थिक फायदा काय असा प्रश्न विचारतात, त्याला उत्तर एवढेंच की फुकट जाणाऱ्या वेळांत एक कवडी मिळाली तरी ती फायद्याचीच आहे. खेडेगांवांतील लोकांचें रोजचे माणशीं उत्पन्न ८१। आणा आहे. त्यांत पाव–अर्धा आणा जास्त मिळाला तर कांहीं वाईट नाहीं. परंतु या आर्थिक फायद्यापेक्षां खादीपासून नैतिक फायदा जास्त आहे. खेडेगांवांत भांडणें फार; पण ती खेडेगांवांना शहरेच शिकवितात. प्रचारकानें आपणाकडे कमीपणा घेऊन वागल्यानें भांडणाचें मूळच नाहींसें होतें. गोड वाणी असणें हा प्रचारकांतील दुसरा मोठा गुण आहे. लौकिकाचा अभिलाष धरतां कामा नये. समर्थांचा दासबोध ग्रंथ चांगला अभ्यासून त्यांतून अधिकृत अशीं हजारपांचशें वचनें मुखोद्गत ठेवावीत. खादीचें कार्य सुरू झालें म्हणजे त्याचेबरोबर इतर चांगलीं कामें आपोआप येतात. चार लोकांनीं एकत्र जमणें, खेळणें, भजन करणे वगैरे गोष्टींनीं विचारांत हळूहळू बदल करतां येतो व त्याचा परिणाम खासगी आचरणांत दिसून येतो. जिल्ह्यांत एक तरी कायम प्रचारक व नमुनेदार असें एखादें खेडेगांव असावयास पाहिजे म्हणजे त्याचा परिणाम पंचक्रोशींत व हळूहळू वाढत वाढत सर्व जिल्हाभर होणें शक्य आहे व या कार्यांत पुणेकरांनीं लक्ष घातलें तर

त्यांना तें फार अवघड नाहीं, तर महाराष्ट्राचें केंद्र या दृष्टीनें अवश्य आहे. तरी प्रचारकद्वारा हें खादी-कार्य व तदनुषंगानें खेड्यांची संघटना करावी अशी विनंति करून व्याख्यात्यांनीं आपलें भाषण संपविलें. यानंतर मुगटी येथें काम करीत असलेले शंकरराव ठकार यांनीं आपल्या कामांतील अनुभव मोठ्या मनोरंजक रीतीनें सांगितल्यावर सभा-विसर्जन झालें.

**श्री. ल. ब. भोपटकर यांचीं व्याख्यानें**

ता. १७ व १८ मे रोजीं श्री. ल. ब भोपटकर एम्. ए. एलएल. बी. यांचीं दिवाणी कायद्यावर व्याख्यानें झालीं. त्यांनीं प्रथमतः कायदा म्हणजे काय हें विशद करून सांगितलें. कायदा म्हणजे राजकीय वरिष्ठानें राजकीय कनिष्ठाला घालून दिलेला नियम. त्यामागें दंड पाहिजे. कायदा सारासार बुद्धीला धरून नेहमीं असतो व असे नाहीं. कायद्या-कायद्यांतहि भेद असतो. एकच कृत्य हेतूवरून निरनिराळया कायद्याखालीं येऊं शकतें. मुख्य नियम म्हणजे कायद्यामागें राजकीय दंड पाहिजे. शंकराचार्यांची आज्ञा कोणी मानीत नाहीं, कलेक्टराची आज्ञा सर्व मानतात यावरून वरील नियमाचें महत्त्व दिसून येईल. पुष्कळ दिवाणी कायदे खेडेगांवालाच लागू पडतात. खटल्याचें प्रमाण पाहिलें तर खेडेगांवांतील लोकांचे खटले शेंकडा ९९ असतात, शहरवासी लोकांचे शेंकडा १ असतात. शेतकऱ्याचा कायद्याशीं दोन रीतींनें संबंध येतो (१) ऐच्छिक व (२) अनैच्छिक. कर्ज देणें घेणें हा ऐच्छिक संबंध. सारा देणें वगैरे हा अनैच्छिक संबंध होय. अनैच्छिक संबंध टाळतां येत नाहीं. लँड रेव्हेन्यू कोड सन १८७९ पासून आहे तसें चालू आहे. बदललेल्या परिस्थिती-प्रमाणें कांहीं बदल झाला नाहीं. आतां थोडा प्रयत्न चालू आहे असें ऐकतों. त्यांतील मुख्य तत्त्व असें कीं, जमिनीची मालकी सरकारची का जनतेची हा प्रश्न आहे. आज सरकार मालक आहे व म्हणून जमिनीचा खंड वाटेल तेव्हां वाढविण्यास त्याला अधिकार आहे. जमिनीची मालकी लोकांची असें तत्त्व प्रस्थापित झालें तर सरकारास निव्वळ फायद्याचा हिस्सा म्हणजे कर मिळेल व अशा रीतीनें सारावाढ ही बाब सरकारचे हातीं राहाणार नाहीं. तात्विक दृष्टीनें लोकांची मागणी विसंगत दिसते. कायमसारापद्धतीनें अगर दुसऱ्या एखादे पद्धतीनें सरकारच्या खंडवाढीस आळा घालतां येईल. परंतु मालकी सरकारचीच असावी हे तत्त्व जास्त दूरदृष्टीचें आहे.

शेतकऱ्याचा संबंध पाटील, कुलकर्णी, मामलेदार, कलेक्टर अशा मुलकी अधिकाऱ्यांशीं फार येतो. जमीनमहसुलाचा कोणताहि प्रश्न दिवाणी कोर्टांत येत नाहीं. दिवाणी कोर्टांत ५ रुपयांसाठींसुद्धां प्रिव्ही कौन्सिलपर्यंत जातां येते, परंतु साऱ्याच्या तक्रारीसाठीं ५० हजारांचा प्रश्न असला तरी कांहींएक दिवाणी कोर्टाला करतां येत नाहीं. रेव्हेन्यू कायद्यांतील अशीं कलमें काढून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पाटील कुलकर्णी हे खेडेगांवचे विश्वकर्मे आहेत. शेतकऱ्यास दरवर्षी होणारी हक्कनोंदणी नीट पाहण्यास सांगितलें पाहिजे, शिकविलें पाहिजे. पुष्कळ बाबतींत शेतकऱ्यांना हक्कनोंदणी नीट माहीत नसते म्हणून नुकसान होत असतें. आणे-वारीचा प्रश्न अशाच प्रकारचा आहे. पीक बुडालेलें पाहात असतां तसें म्हणणारा मामलेदार आढळत नाहीं. बहुतेक आणेवारी पाटील–कुलकर्ण्यांच्या रिपोर्टावरून सेटलमेंट ऑफिसमध्यें केली जाते. पिकाची खरी चौकशी केली जात नाहीं. अशा परिस्थितींत शेतकऱ्यानें आपले हक्क सांभाळण्याचा सारखा प्रयत्न केला पाहिजे, तक्रारी केल्या पाहिजेत म्हणजे सरकारास लक्ष देणें भाग पडेल. सारा न दिल्यास सरकारास वाटेल ते करतां येतें; तुरुंगांतहि टाकतां येते. पाटील-कुलकर्णी या बाबतींत फार गोंधळ घालतात व रेव्हेन्यू अधिकारी तो गोंधळ कधीं बाहेर आणीत नाहीत.

कोऑपरेटिव्ह सोसायटीचा कायदा असाच जाचक आहे, व तोहि दिवाणी कोर्टापासून अलिप्त ठेविला आहे. ठेवलेली ठेव हक्कानें परत मागतां येत नाहीं हा त्यांत मोठा दोष आहे, याची सुधारणा झाली पाहिजे. कुळाकुळांतील तंटा मामलेदारच्या कायद्याप्रमाणें तूर्तातूर्त मिटतो. कायमचा मिटण्याला दिवाणी कोर्टामार्फत निकाल लावून घ्यावा हें चांगलें. खेडेगांवांतील नेहमींचे व्यवहार म्हणजे, प्रॉमिसरी, खंड, गहाण, वारस, दत्तक, अशासारखे असतात. प्रत्येक व्यवहार शक्य तो रजिस्टर करणें उत्तम; अर्ज वगैरे करावयाचा तो मुदतीपूर्वी करावा, स्टॅंप जास्तींत जास्त लावावा, अशा गोष्टी शेतकऱ्यांना सांगून ठेवल्या पाहिजेत. शेतकरी कायद्यानें शेतकऱ्यांस बऱ्याच जास्त सवलती दिल्या असल्यामुळें कांहीं लबाड शेतकरी त्यांचा दुरुपयोग करतात. तेव्हां अशा बाबतींत सावकारांनीहि व्यवस्थित राहिलें पाहिजे. शेतकऱ्यांना न्याय मिळावा म्हणून कायदा झाला. पण त्यापासून दोघांचेहि नुकसान होत आहे. दत्तक–प्रकरणें उत्पन्न करण्याचा खेडेगांवांतील कुटाळ व निरुपयोगी लोकांचा एक धंदाच आहे. सार्वजनिक जागेंत कोणी अडथळा आणीत असल्यास त्याला कलेक्टराकडून बंदी करतां येते. सार्वजनिक

आरोग्य कोणी बिघडवीत असला तर सरकारला तें बंद करण्यास भाग पाडतां येतें. अशा रीतीनें विचार करतां खेडेगांवांतील असल्या कोणत्याहि भानगडींत प्रचारकानें न पडणे हें चांगलें. कायद्याचा सल्लाहि फारसा कोणास देऊं नये. जर कांहीं करणें शक्य व इष्ट असेल तर खेडेगांवचे लोकांत कोर्टाकडे धावण्याची जी हाव वाढली आहे ती कमी करण्याचा प्रयत्न करावा. असें सांगून व्याख्यात्यांनी आपल्या भाषणाचा समारोप केला.

# औंध संस्थानांतील कायदे-मंडळ

औंध संस्थान हे बरेंचसे लहान संस्थान आहे. क्षेत्रफळ ५०० चौरस मैल असून लोकसंख्या ६४५६० आहे. उत्पन्न सुमारे ४ लक्ष आहे. येवढयाशा संस्थानांत कायदेमंडळ तें कसलें करावयाचे असें सकृद्दर्शनीं कोणालाहि वाटेल. पण तेथें आज ३७ सभासदांचें मंडळ असून त्यांत ११ अधिकारी, ६ सरकारनियुक्त पण बिनअधिकारी, व २० लोकनियुक्त सभासद अशी त्याची रचना आहे! हे २० सभासद ४ तालुके व त्यांतील ४ गांवें इतक्यांना मिळून वांटून दिले आहेत. यांपैकीं मतदारसंघ असलेला लहानांत लहान गांव संगम—माहुली. त्याची लोकसंख्या सुमारे साडेसातशें इतकीच असतां त्याच्याहि वांट्याला एक प्रतिनिधि आलेला आहे. उलट खुद्द औंध हें साडेतीन हजार वस्तीचें व राजधानीचें गांव असतांहि त्याला एकाहून अधिक प्रतिनिधि दिलेला नाही. मतदारांच्या वांटणींत याला कोणी विषमता म्हणेल, परंतु सरासरीनें आठ-नउशें वस्तीला एक प्रतिनिधि पडावा अशा बेतानें सभासदांची वांटणी करण्यांत आली आहे.

या सालचें कायदेमंडळाचें दुसरें अधिवेशन गेल्या १७।१८ तारखांना झालें. दोन दिवसांत चार बैठकी झाल्या. त्या लोकनियुक्त अध्यक्ष रा. ब. रावजी रामचंद्र काळे, मुंबई कौन्सिलाचे एक सभासद, यांच्या अध्यक्षतेखाली झाल्या. त्या चालू असतां संस्थानाधिपति हे कांहीं अंतरावर पडद्यामागे बसून मधून मधून सभेंतील भाषणे ऐकत. शेवटच्या बैठकीनंतर आपल्या पत्नीसहवर्तमान सभास्थानीं येऊन त्यांनी समारोपाचें भाषण केले.

कायदेमंडळाच्या बैठकींत सभासदांकडून रीतीप्रमाणे अनेक प्रश्न व पुरवणीप्रश्न विचारण्यांत आले. दोनतीन खासगी ठरावहि मांडण्यांत आले व तीनचार बिलांची चर्चा झाली. कायदेमंडळाचें हें काम नवीन व अपरिचित असलें तरी सभासदांनीं उपजत बुद्धीमुळें, व अध्यक्ष रा. ब. काळे यांच्या शिकवणीनें, काम करण्याची पात्रता चांगलीच दाखविली आहे. संस्थानांतील प्रजा थोडी असली किंवा संस्थानें हीं अल्पप्रमाण असलीं म्हणून ती प्रजा खालसांतील प्रजेहून विशेष बुद्धिमंद असते असें मानण्याचे कारण नाहीं. निदान या मंडळाचें काम पाहणाराला मुंबईच्या कायदेमंडळाचें काम आपण पाहात आहों असा क्षणभर भास होण्याइतके तें सुव्यवस्थित व जाणतेपणाने चालू होतें. आणि जे दोष क्वचित् येथें दिसून आले ते मुंबई किंवा दिल्ली सिमला येथील कायदे-मंडळांच्या सभांतूनहि दिसून येतच नाहींत असें नाहीं.

किंबहुना संस्थानांतील कायदे-मंडळ छोटेखानी व घरगुती स्वरूपाचें दिसलें तरी उलट त्याचा एक प्रकारें फायदाच वाटतो. तो असा कीं, कोणतेंहि काम व्हावयाचें तर त्याचा निकाल झटपट लागतो. खासगी सभासदांचीं बिलें झटपट निकालांत निघालेलीं पाहून तर ब्रि. कायदेमंडळांतील सभासदांना हेवाच वाटला पाहिजे. हिंदुधर्मशास्त्र व सामाजिक सुधारणा अशाविषयींचीं बिलें जीं ब्रिटिश कायदेमंडळांत कधीं पास झालींच तर अतिशय कालावधीनें, परिश्रमानें व द्राविडी प्राणायामानें पास व्हावयाचीं, तीं येथें साधकबाधक चर्चा होऊनहि थोडया वेळांत निकालांत निघतात.

जमाखर्चाच्या बाबतींत कायदेमंडळाचें नियंत्रण औंधच्या अधिपतींनीं आपल्या इच्छेनें आपणावर घालून घेतलें आहे, व त्याप्रमाणें ते हें नियंत्रण आनंदानें सोसतात असें दिसून येतें. सरकारी सेक्रेटरी आणि लोकपक्षाचे प्रतिनिधी हे एकत्र बसून फायनॅन्स कमिटीमध्यें अंदाजपत्राकाची चर्चा हुडसून-खडसून तरी पण मिळूनमिसळून करतात. यामुळें जमाखर्चाच्या कमजास्तीपणाविषयीं कांहीं सूचना असल्याच तर, त्या सर्वानुमतें मोडून तरी काढल्या जातात किंवा स्वीकारल्या तरी जातात; व अखेर अधिपतींना होय नाहीं म्हणण्याचीं अशीं थोडींच कलमें उरतात. यंदाच्या बैठकींत तर असा विरोध फारसा दिसला नाहीं. औंधच्या अधिपतींनीं खुद्द खासगी खर्चाची नेमणूक ठरवून घेतली आहे. तिचें प्रमाण यंदाच्या बजेटाच्या आंकड्यावरून उत्पन्नावर चार लक्षांस छत्तीस हजार असें पडतें व हें बेसुमार आहे असें म्हणवत नाहीं.

यंदा एक राजकुमार डेक्कन कॉलेजांत शिक्षण घेण्याकरितां प्रविष्ट झाला. त्याच्या खर्चाकरितां अंदाजी चार हजारांची जादा रक्कम मागण्यांत आली होती तीत लोकपक्षानें सहाशें रु. कमी केले. ती कपात श्री. बाळासाहेब यांनीं मान्य केली. तसेंच हायकोर्टाचे अधिकार देऊन एखादा हंगामी न्यायाधिकारी नेमून दिवाणी अपिलांचा निकाल स्वतंत्रपणें करावा असे विषयीं लोकपक्षानें सूचना केली तीहि त्यांनीं मान्य केली. अर्थात् ब्रि.कायदेमंडळांत लोकपक्षाला नसणारा असा एक अधिकार, म्हणजे सरकारनें अंदाजलेल्या रकमेपेक्षां जमेकडे किंवा खर्चाकडे अधिक रक्कम सुचविण्याचा अधिकार, या संस्थानी कायदेमंडळांतील सभासदांना अप्रत्यक्ष रीतीनें लाभलेला दिसतो. जेथें मोकळ्या मनाच्या सल्लामसलतीनें दुतर्फी काम चालतें तेथें नसलेले अधिकारहि भोगण्यास सांपडावेत हें सरळच आहे.

येऊन-जाऊन लोकपक्ष व श्रीमंत बाळासाहेबपंत यांच्यामध्यें जो थोडासा विरोध दिसला तो दोन-तीन बाबींसंबंधानें. त्या अशा—हायस्कूलच्या शिक्षणावर खर्च कमी करावा असें लोकांचें म्हणणें होतें तें अधिपतींना मान्य झालें नाहीं. स्टेट बँकेच्या व्यवहारांत संस्थानाचें थोडेंबहुत नुकसान होतें तें करूं नये असें लोकपक्षाचें म्हणणें. पण हें नुकसान झालें तरी संस्थानांतील शेतकऱ्यांच्या फायद्याकरितांच होते म्हणून तें सोसावें असें संस्थानाधिपतींचें म्हणणें.

स्वतः यजमानांच्या हातून होणाऱ्या खर्चाच्या तक्रारीची अशी एक बाब म्हटली म्हणजे ती त्यांच्या संग्रही असणारे शिल्पकार चितारी फोटोग्राफर यांच्यावर होणाऱ्या खर्चाविषयीं. पण याविषयीं श्री.बाळासाहेब यांचें प्रजेला हट्टाचें म्हणणें इतकेंच कीं, चित्रकला व शिल्पकला हेंच येऊनजाऊन एक व्यसन मला आहे. पण त्याचाहि उपयोग संस्थानाची अब्रू व विशेषतः देशी कारागिरी यांच्या वाढीला होतो. म्हणून ही माझी हौस (वाटेल तर त्याला व्यसन हें नांव ठेवा पण तें व्यसन निरुपद्रवी आहे) कशी तरी पुरवावी. व अखेर ती कायदे-मंडळानें पुरविली. याचें कारण असें दिसते कीं ही विद्याव्यसनिता खरोखरीच निरुपद्रवी आहे, इतकेंच नव्हे तर देशी कारागिरीला उत्तेजन देणे हाच तिचा हेतु आहे हें कायदेमंडळांतील सभासदांना इतर रीतीनें पटलेलें आहे. असो. हल्लीच्या यजमानांनीं आपल्या हयातीत नवीन असें कर्ज कोणतेंच केलें नाहीं. उलट रा. ब. काळे यांनीं सांगितल्याप्रमाणे जुन्या कारकीर्दींतील अव्यवस्थित कारभारामुळें झालेलें कर्ज फेडण्याचे काम यांना करावें लागत असून तें ते करीत आहेत.

शिवाय यांच्या हातून जर कोठें धाडसाच्या उडीनें खर्च होत असेल तर तो संस्थानांतील कारागिरी वाढविण्याकडे व नव्या वसाहती करण्याकडेच होतो. या लहानशा संस्थानांत किर्लोस्करवाडी व ओगलेवाडी येथील कारखाने नवे स्थापन होऊन भरभराटीला आले. पंडित सातवळेकर यांचा छापखाना निघाला. किन्हई येथें यांत्रिक, औषधी व सुगंधिक कारखाने निघाले व आणखी भवानपूर वगैरे नवीन ठिकाणीं नव्या वसाहती व नवे कारखाने निघण्याची योजना सुरू आहे. यावरून वरील गोष्ट पटण्यासारखी आहे. लोकांना हेंहि माहीत आहे कीं, या संस्थानिकांच्या घरची राहणी अगदीं साधेपणाची व बिनमिजासखोरीची असून, स्वतः आपला आणि आपल्या कुटुंबांतील माणसांचा व नोकरवर्गाचा पोषाक पेहेराव हा संस्थानांत उत्पन्न झालेल्या विणकरीच्या, किंवा नव्या कारागिरीनें तयार झालेल्या, कपड्याचाच असला पाहिजे, अशी त्यांची मोठी कदर व शिस्त आहे. शिवाय त्यांना स्वतः चहाचेंहि व्यसन नाही, घरच्या मुलाबाळांतहि ते नाहीं. व सूर्यनमस्कार वगैरे शरीरबलवर्धनाचे प्रकार स्वतःच्या घरीं अमलांत आणून संस्थानी शाळांतून व ब्रि. मुलखांतूनहि अमलांत आणण्याचा त्यांचा प्रयत्न पाहिला, म्हणजे त्यांच्या कांहीं हौशी कदाचित् खार्चिक असल्या तरी त्या राष्ट्रगुणसंवर्धनाच्या आहेत अशी खात्री पटल्यामुळें, एतद्विषयक खर्चासंबंधानें कोणी फारशी घासाघीस करीत नाहीं. कारण त्यांना व्यसन असले तरी तें शर्यतीचे घोडे पाळण्याचें नाहीं, आळशी रंगेल पहीलवान पदरीं ठेवून लढविण्याचें नाहीं, युरोपियन पाहुणे बोलावून त्यांना मेजवान्या देण्याचे नाहीं, किंवा विलायती चैनीचें सामान विकत घेण्याचें नाहीं. शिवाय का. मंडळाच्या स्थापनेनें संस्थानाची जमा व खर्च हीं आतां नियमाच्या चौकटींत इतकीं खेंचून बसल्यासारखीं झालीं आहेत कीं, संस्थानिक उधळपट्टी करूं म्हणतील तरी त्यांना त्यांत फारशी जागा राहिलेली नाहीं. आणि संस्थानिक व लोकपक्ष यांनीं हल्लीं असलेलें संस्थानाचें कर्ज ठराविक मुदतींत फेडण्याचा निश्चय केला असल्यामुळें कोठें हौसेखातर खर्च झालाच तर तो बेताचाच होणार असा आज तरी रंग दिसतो.

असो. श्रीमंत बाळासाहेब औंधकर यांनीं कायदेमंडळाची योजना आपल्या संस्थानांत आज चालू केलीच आहे. पण त्यांतील विशेष हा कीं, ही व्यवस्था पुढेंहि अबाधित निरंतर चालावी अशी त्यांची इच्छा असून, तशा प्रकारचे आपले विचार त्यांनीं बटलर कमिटीकडे पाठविलेल्या आपल्या कैफियतींत प्रकट

केले आहेत. बाळासाहेब यांची चिंता एका अर्थानें बरोबर आहे. कारण संस्थानांत सुधारणा झालेल्या पोलिटिकल अधिकाऱ्यांना फारशा पाहावत नाहींत व मानवत नाहींत. शिवाय संस्थानाच्या गादीवर एकामागून एक जे लोक बसतात त्यांची वृत्ति सारखीच उदारपणाची असते असें नाहीं. म्हणून एकाच्या लहरीच्या वाऱ्यानें आलें व दुसऱ्याच्या लहरीच्या वावटळीनें गेलें असें सुधारणांचे होणें शक्य असतें. पण कोणत्याहि पिढीला संस्थानिकाची व्यक्तिशः वृत्ति कशीहि असली तरी, औंध संस्थानाला हल्लीं मिळालेलें कायदेमंडळ ही एक 'कॉन्स्टिट्यूशन' म्हणजे कायमचें राजनियंत्रण आहे असें मानलें जावें व अशाविषयीं इंग्रज सरकारनें एक प्रकारची जामिनकी द्यावी, असें त्यांनीं आपल्या कैफियतीत सुचविलें आहे हें पाहून त्यांच्या उदारमतवादित्वाबद्दल त्यांना कोणीहि धन्यवाद देईल.

# स्फुट सूचना

बंगालच्या नव्या निवडणुकींवरून हिंदी लोकांच्या अंतःकरणांत वास करणारी द्विदल-राज्यपद्धतीविषयींची चीड आणि प्रांतिक स्वायत्ततेची तीव्र इच्छा जशी व्यक्त होते त्याप्रमाणेंच आपल्या प्रांतांतील राज्यकारभार आपल्या इच्छेस अनुसरून चालावयाचा असल्यास कायदेमंडळांत आपल्या पक्षाचें बहुमत असलें पाहिजे व त्याकरितां आपण कायदेमंडळांत घुसलें पाहिजे आणि तेथून पळून न येतां चिकाटी धरून तेथें बसून अनुकूल धोरणास दुजोरा देणें व प्रतिगामी धोरण हाणून पाडणें हीं कार्यें अहर्निश केलीं पाहिजेत ही गोष्टहि स्पष्ट होते. परंतु उलट्या बाहुल्या असलेल्या कित्येकांस याच गोष्टी उलट्या दिसूं लागल्या आहेत ! बंगालच्या नव्या निवडणुकींत कॉंग्रेस पक्षाचा विजय झाला खरा, पण तो कोणत्या धोरणामुळें झाला ? उमेदवारांनीं मतदारांस कोणतीं अभिवचनें दिलीं ? मतदारांनीं आपल्या प्रतिनिधीपासून कोणत्या कार्याची अपेक्षा केली ? ज्याला आज आपण कौन्सिलांत आपला प्रतिनिधि म्हणून निवडून देत आहों तो उद्यां कौन्सिल सोडून घरीं येऊन बसावा व तिकडे सरकारच्या बगलबच्यांनीं दिवाणगिरी स्थापावी, वाटेल तसले घातुक कायदे पास करावेत व दडपशाहीच्या जोरावर राज्यशकट हांकावा याकरितां मतदारांनीं ही निवडणूक केली काय ? वकिलास जें वकीलपत्र द्यावयाचें तें तो कोर्टांत आपल्या वतीनें एकसारखा हजर राहून दक्षतेनें आपली बाजू संभाळील म्हणून दिलें जातें; कोर्टावर रुसून अगर दुसऱ्याच कोणा तरी मतिभ्रष्टाच्या नादीं लागून कोर्टांत गैरहजर राहून आपला दावा बुडविण्याकरितां कोणीहि कोणास वकीलपत्र देत नाहीं. अर्थातच बंगालच्या नव्या निवडणुकींत कॉंग्रेस पक्षाला जो विजय मिळाला तो कौन्सिलांत हजर राहून काम करण्याच्या अपेक्षेनेंच मिळाला आहे. त्याचाच उलटा अर्थ करून बंगालच्या उदाहरणावरून वर्किंग कमिटीच्या पळपुट्या धोरणाचें समर्थन करणें हा विक्षिप्त तर्कटपणा होय !

वर्किंग कमिटीचा हा 'अवलक्षणी' ठराव जाहीर होण्याच्या पूर्वीच बंगालची निवडणूक होऊन गेली होती. अर्थातच बंगालच्या राष्ट्रीय पक्षाच्या जयाचा आणि वर्किंग कमिटीच्या ठरावाचा 'काकतालीय न्याया' इतकाहि संबंध येत नाहीं. वर्किंग कमिटीचा हा ठराव जाहीर झाल्यानंतर उमेदवार उभे करण्याला सुरुवात झाली असती तर मतदारांनीं वर्किंग कमिटीच्या ठरावाच्या कशा चिंधड्या उडविल्या असत्या ते या उलट्या बाहुल्यांच्या टीकाकारांसहि दिसलें असतें. आणि वर्किंग कमिटीला अद्यापि जर आपल्या ठरावाच्या सयुक्तिकतेविषयीं घमेंड वाटत असेल तर तिनें कौन्सिल सोडून येण्याच्या स्पष्ट धोरणावर पुनः निवडणुकी लढवाव्यात म्हणजे तिला अनुभव येईलच. परंतु या गोष्टीचें प्रत्यंतर पाहावयास नव्या निवडणुकींपर्यंत वाट पाहण्याचेंहि कारण नाहीं. आतांपर्यंत आलेल्या बातम्यांवरून असें कळतें कीं, आंध्र, अलाहाबाद, बंगाल व मुंबई या चार प्रांतिक कॉं. कमिट्यांनीं पंडित नेहरू यांना वर्किंग कमिटीचे कायदेमंडळाबाबतचे ठराव बदलून घेण्याविषयीं आग्रहाची विनंति केली आहे. प्रत्येक प्रांतांतील कायदेमंडळाच्या पावसाळ्यांतील अधिवेशनाची तारीख जवळ आली असून प्रत्येक कायदेमंडळापुढें लोकपक्षाच्या दृष्टीनें महत्त्वाचे प्रश्न उपस्थित झाले आहेत. यामुळें कॉंग्रेस–कौन्सिल पक्षांत असंतोष व चुळबूळ सुरू व्हावी यांत आश्चर्य नाहीं. धडधडीत डोळ्यापुढें कार्यनाश दिसत असतां या पक्षांतल्या झालें तरी लोकांना स्वस्थ कसें बसवेल? मग कार्यनाश पं. नेहरू यांना कां दिसत नाहीं? दिसतहि असेल पण उगीच कांहीं तरी असहकारितेच्या स्वरूपाचें जहालपणाचें कृत्य केलें म्हणजे, राष्ट्रीय चळवळ झाली, नेहरू रिपोर्टाचें पाऊल पुढें पडलें व सायमनबहि-

ष्कार अधिक तीव्र झाला अशी भ्रामक समजूत पंडितजींनीं करून घेतली आहे, त्याला काय करणार? असो. या निरनिराळ्या प्रां. कॉं. कमिट्यांच्या विनंत्यांना वर्किंग कमिटी कितपत मान देते हें लवकरच कळून येईल. पंडितजींनीं कमिटीला गैर-मुत्सद्दीपणाचा सल्ला देऊन आपल्या व आपल्या पक्षाच्या पायांत विनाकारण खोडा घालून घेतला. आतां वर्किंग कमिटीचे ठराव बदलून चूक पदरांत घ्यावी तरी एक किंवा पक्षांतील लोकांनीं बंड केल्यामुळें झालेला कॉंग्रेसचा अपमान सोसावा तरी एक, असा प्रसंग उत्पन्न झाला आहे. पण पंडिजती हे बुद्धिमान वकील असल्यामुळे यांतून कांहीं तरी मार्ग काढतीलच व तो काय निघतो हें पाहिल्यावर या विषयावर आणखी लिहूं.

# छोट्या जमातींचा पुंडावा

लॉर्ड आयर्विन यांनीं सिमला येथील भाषणांत इकडील राजकीय परिस्थितीबद्दल हिंदुस्थानांतील मोठ्या जमातींना, म्हणजे प्रत्यक्ष नांवच न घेतलें तरी पर्यायाने हिंदु पुढाऱ्यांना, जबाबदार कसें धरले हें मागील अग्रलेखांत दर्शविलेंच आहे. पण व्हाइसरॉय-साहेबांचा हा दोषारोप खोटा आहे, व छोट्या-मोठ्या जमातींचें भांडण न तुटण्याबद्दल स्वतः सरकारच जबाबदार आहे असे उलट आमचे म्हणणे आहे. कारण येऊन-जाऊन एकट्या हिंदुस्थानांतच काय ते छोट्या-मोठ्या जमातींचे भांडण आहे असें नाहीं. तर तें जगभर आहेच. पण तें राजकीय प्रगतीच्या आड तेथें न येण्याचें खरे कारण असे आहे कीं, या इतर देशांत तेथील सरकार इकडच्याप्रमाणें पक्षपात करीत नाहीं, तर कांहीं व्यवहार्य नियम ठरवून त्या-बरहुकूम सर्व जमातींना सारखें वागवितें व सर्वां-वर सारखा अंमल करतें. म्हणून सरकार मनांत आणील व करील तर येथेहि जमातींचें भांडण मिटेल. म्हणून तें कसे याचा विचार करण्याचे आज योजिलें आहे.

नेहरू रिपोर्टांत स्वराज्याची जी योजना आंखली आहे, व तिचीं मुख्य किंवा उपांगभूत अशीं जीं कलमें लिहिलीं आहेत, त्यांत अमुक एक गोष्ट हिंदु लोकांच्या हिताकरितां आहे असें कोठेंहि कोणासहि आढळणार नाहीं. मग त्या रिपोर्टानें हिंदु लोकांचें हित तें कसें साधलें ? त्याचें उत्तर अर्थात् मुसलमान तरी असें देतात कीं, "स्वराज्याची मतदारी किंवा कायदे-मंडळांतील प्रतिनिधींची संख्या ही शिरगणतीनें किंवा संख्येच्या प्रमा-णावर बसविण्याचें गृहीत धरल्यामुळें, संख्येनें जे आधींच फार पुष्कळ अशा हिंदु लोकांचें कल्याण, आणि संख्येनें जे आधींच थोडे अशा मुसलमान लोकांचें सहजच अकल्याण होणार." पण यावर उलट प्रश्न असा कीं, "याला पं. नेहरू यांनीं तरी काय करावें ? हिंदु संख्येनें पुष्कळ व मुसलमान संख्येनें थोडे ही गोष्ट कांहीं त्यांनीं घडविलेली नाहीं. मुसलमानांनीं या देशांत ८०० वर्षे वस्ती केली, बादशाही गाजविली, हरएक प्रकारच्या वाम मार्गांनीं लोकांना बाटवून धर्मप्रसार केला, व स्वतःची लोकसंख्या इतर रीतीनें वाढविण्याचे शक्य ते प्रयत्न केले. असें असतां, मुसलमानांच्या चौपट हिंदू हिंदुस्थानांत उरले याला नेहरू काय किंवा दुसरे कोणी काय, काय करणार ! बरें, यापुढें या दोन जमातींतील संख्येचे अंतर अगदीं तुटत गेलें म्हटलें तरी, मुसलमान हे संख्येनें १००० वर्षांत तरी हिंदूंच्या बरोबरीला येऊं शकतील काय? मग परलोकाकडे मजल मारून स्वतः बहुसंख्य बनण्याची गोष्टच नको. या देशाला हिंदुस्थान हे नांव असलेलेंहि मुसलमानांना आवडत नाहीं. पण हें नांव आतां बदलावयाचें कसें ? आणि या दोन जमातींच्या संख्येंत जर इतका फरक आहे व राहणार तर ते बदलावयाचें तरी काय म्हणून ? युरोप खंडाचीच गोष्ट ध्याना. तेथें युद्धानंतरच्या घटनेंत जीं राष्ट्रें पूर्वीचींच ठेवलीं किंवा जीं नवीं बन-विलीं त्यांतहि असें आढळतें कीं, शेकडा ६९ इतके पोलिश लोक असणाऱ्या देशाला पोलंड म्हणतात; शेकडा ६४ इतके झेकोस्लाव्ह लोक असणाऱ्या देशाला झेकोस्लाव्हिया म्हणतात; शेंकडा ७३ इतके सर्व्हियन लोक असणाऱ्या देशाला सर्व्हिया म्हणतात; मग ज्या देशांत शेंकडा ७५ इतके लोक हिंदु त्याला हिंदुस्थान कां म्हणूं नये ? "

पण याहि पुढचा व अधिक महत्त्वाचा प्रश्न असा कीं, युरोपांतील या देशांचीं नांवें कोणतींहि असोत, त्यांत मोठ्या व छोट्या जमातींचें प्रमाण असें असतां त्यांचीं आज राजकीय दृष्ट्या राष्ट्रें बनलीं आहेत. मग त्या सर्वांहून हिंदूंचें प्रमाण ज्या देशांत अधिक पडतें त्याचेंहि राजकीय दृष्ट्या राष्ट्र कां बनूं नये ? व त्यांत शेंकडा २५ मुसलमान असल्यानें त्यांचें राष्ट्र बनण्याला बाध कां यावा ? हिंदुस्थानांतील मोठ्यांतील मोठी अशी 'छोटी जमात' जी मुसलमानांची तिची जर ही स्थिति, तर ख्रिस्ती, यहुदी, पार्शी असल्या अगदीं छोट्या जमातींची तर गोष्ट बोलावयालाच नको. वर

सांगितलेल्या युरोपांतील राष्ट्रांवर राष्ट्र या नांवाचा शिक्का ज्या त्या लोकांनीं स्वार्थी दृष्टीने मारलेला नाहीं, तर खुद्द 'लीग ऑफ नेशन्स' या नांवाच्या सर्वराष्ट्रीय संघाने मारलेला आहे. हा सर्व–राष्ट्रीय संघ महायुद्धानंतर तेथे अवतीर्ण झाला, व त्यांत आज युरोपांतील बहुतेक सर्व राष्ट्र सामील आहेत. त्याचा अवतार लहानसान राष्ट्रांना स्वयंनिर्णयाचा हक्क देण्याकरितांच झाला ही गोष्ट त्यांतल्या त्यांत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अर्थात् हा स्वयं-निर्णयाचा हक्क देऊन, राष्ट्रे बनवून, त्यांचा कारभार राष्ट्रीय दृष्टीने सुरू करून देण्याला लीग ऑफ नेशन्सला जर अडचण पडली नाहीं तर हिंदुस्थानांत तीच गोष्ट करण्याला इंग्रज सरकारला अडचण कां पडावी? इतकेंच नव्हे तर आणखी ही गोष्ट देखील लक्षांत ठेवली पाहिजे कीं, स्वतः इंग्लंड व त्याबरोबर हिंदुस्थान हे दोघेहि या सर्वराष्ट्रीय संघाचे आद्य घटक आहेत. आणि युरोपांत छोट्या जमातींचें हितसंरक्षण करण्याची जी योजना या संघानें विचारपूर्वक निश्चित केली, तिला ब्रिटिश सरकार व हिंदुस्थान–सरकार या दोघांनीहि मान्यता दिली आहे. अर्थात ती योजना बंधन-कारक म्हणून हिंदुस्थानांतहि अमलांत आली पाहिजे असेंच कोणासहि म्हणतां येईल. अर्थात् त्या योजनेनें मुसलमानाचें समाधान झाले पाहिजे. त्याहून अधिक कांहीं त्यांनाहि मागतां येणार नाहीं. आणि मुसलमानांचा प्रश्न सुटला म्हणजे बाकीच्यांचा सहजच सुटला. कारण अस्पृश्य व ब्राह्मणेतर या जमाती 'हिंदु' या सदराखालीच समाविष्ट होतात. आणि ख्रिस्ती, यहुदी, पार्शी या जमाती वेगळ्या असल्या तरी मुसलमान जमातीच्या मानानें त्या फारच लहान, तेव्हां मग हिंदूंच्या मानानें त्या किती लहान हे सांगावयास नको.

अशा रीतीने या प्रश्नाचा विचार केल्यावर युरोपांत स्वयंनिर्णयाकरितां अवतार घेतलेल्या सर्व–राष्ट्रीय संघानें, जगांतील छोट्या जमातींच्या हितसंरक्षणाची कशी व्यवस्था केली आहे, व राष्ट्रीयत्वाच्या मार्गांत विघ्नासारखा दिसणारा हा अवघड प्रश्न कसा सोडविला आहे, याचा आतां विचार करूं. या विषयासंबंधीं लखनौ युनिव्हर्सिटींतील इतिहास विषयाचे प्रोफेसर डॉ. राधा कुमुद मुकर्जी यांनी बरेंच संशोधन केलेलें असून त्यांनीं आपले विचार पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले आहेत. अलाहाबाद प्रांताच्या कायदेमंडळांतील सभासदां-पुढे, सी. वाय. चिंतामणी यांच्या अध्यक्षतेखालीं गेल्या फेब्रुवारींत त्यांनीं व्याख्यान दिले. आणि दिल्लीसहि गेल्या ता. २ एप्रिल रोजीं श्री. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं असेंब्ली व स्टेट कौन्सिल यांच्या सभासदांपुढें त्यांनीं व्याख्यान दिलें. दोनहि ठिकाणीं व्याख्यानानंतर चर्चा झाली, व त्यांचे विचार व अनुमाने हीं कोणालाहि फारशीं खोडून काढतां आलीं नाहीत. डॉ. मुकर्जी यांनी या पुस्तकांत व व्याख्यानांत असे सिद्ध केलें कीं, युरोपांत सर्वराष्ट्रीय संघानें निरनिराळ्या छोट्या जमातींच्या राजकीय हितसंरक्षणाची कसून व काळजीपूर्वक व्यवस्था केली, व नव्याजुन्या राष्ट्रांना स्वराज्याची घटना त्यांच्या इच्छेप्रमाणे करून दिली. तरी तेथेहि कायदेमंडळांतून जातवार मतदारसंघ बन-विले गेले नाहीत; किंवा वंश, धर्म, जाति यांना अनुलक्षन कायदेमंडळांतील प्रतिनिधींचें प्रमाण ठरविलें नाहीं. याचा अर्थ ज्या मुद्द्यावर नेहरू रिपोर्टाला आज इतका विरोध होत आहे, व हिंदी राष्ट्राची स्वराज्यघटना बनविणें दुष्कर असल्याचा बाहणा छोट्या जमातींच काय पण खुद्द सरकारहि करीत आहे, आणि ज्या मुद्द्यावरच सायमन कमिशनापुढील साक्षी-पुराव्यांत सर्व भर दिला गेला, तो मुद्दा युरोपांतील स्वयंनिर्णयांत व स्वराज्यघटनेंत राष्ट्रसंघानें मान्य केला नाहीं; किंवा कोणी छोट्या जमातींनी पुढेंहि आणला नाहीं. मग या छोट्या जमातींचे संभाळण्याचें व संरक्षण करण्याचें हित तरी कोणतें आहे असें मानण्यांत आलें? व त्या संरक्षणाची व्यवस्था कोणत्या रीतीनें करण्यांत आली?

डॉ. मुकर्जी यांनीं संशोधनपूर्वक या प्रश्नाचें उत्तर असें दिलें आहे कीं, हें हित फक्त तीन प्रकारचें मानलें जातें, इतर प्रकारचें मानलें जात नाहीं. ते प्रकार म्हणजे, १ तात्विक धर्म व धार्मिक आचार २ शिक्षण आणि ३ आनुवंशिक संस्कार, समारंभ व चालीरीती यांचें स्वातंत्र्य. यापलीकडे छोट्या जमातींना इतर कोणत्याहि बाबतींत विशेष सवलती मागण्याचा अधिकार नाहीं. धर्मासंबंधानें पाहातां राष्ट्र-संघानें केलेल्या तहांतून असें कलम घातलें आहे कीं, "कोणतीहि जमात कितीहि छोटी असो, तिला धर्मस्वातंत्र्य राहावें, म्हणजे ज्याला त्याला आपल्या धर्माचें पालन व आचरण आपल्या मनाप्रमाणें करतां यावें." किंबहुना ही गोष्ट त्यांना सार्वजनिक स्थळींहि करतां यावी. इतर जमातींनीं त्यांना या बाबतींत विरोध करूं नये किंवा त्यांच्यावर जुलूम करूं नये. आणि तो कोणी करील तर राष्ट्राच्या सरकारनें त्याचें निवारण करावें. सार्वजनिक जागेंत स्वधर्माचरण करण्याचें हें तत्त्व हिंदुस्थानाला लावलें असतां फार तर मुसलमानांना इतकेंच म्हणतां येईल कीं त्यांच्या गोवधाला हिंदूंनीं हरकत घेऊं नये! आतां कुराणांत गोवध हा धर्माचार म्हणून सांगितला तरी आहे कीं काय ही गोष्ट वेगळीच. पण त्याबरोबर

ओघानेंच हें प्राप्त होते कीं सार्वजनिक रस्त्यावर माशिदीपुढे हिंदूंनीं वाद्यें वाजविलीं तर मुसलमानांनीहि त्यांना हरकत करूं नये. पण मुख्य मुद्दा हा कीं, धार्मिक आचाराचें स्वातंत्र्य छोटया जमातींना दिलें म्हणून या हक्काची लुडबूड राजकारणांत चालावयाची नाहीं.

छोट्या जमातींचा रक्षणीय असा दुसरा हितसंबंध म्हटला म्हणजे शिक्षणाचा. या संबंधानें राष्ट्रसंघानें असे ठरविलें आहे कीं, सरकारनें सर्व जमातीच्या मुलांना प्राथमिक शिक्षण सरसकट सारखें व तेंहि सक्तीनें दिले पाहिजे. आणि हें शिक्षणहि असें पाहिजे कीं त्यामुळें मुलांच्या मनांत धर्मसहिष्णुता, राष्ट्रीय बुद्धि व स्वतःच्या राष्ट्राचा अभिमान उत्पन्न होईल. शिक्षणाच्या बाबतींत एक मात्र सोय विशेष अशी करण्यांत येते कीं,प्राथमिक शिक्षण द्यावयाचें ते छोट्या जमातींच्या मुलांना त्यांच्या मातृभाषेंतूनच द्यावें. यानंतर एक प्रश्न उद्भवतो कीं, आपल्या भाषेतून शिक्षण मिळण्याचा हक्क सांगण्याला कांहीं किमान मर्यादा आहे कीं नाहीं? त्याचेंहि उत्तर सर्वराष्ट्रीय संघानें दिलेलें आहे. जर्मन–पोलिश तहांत एक कलम असें आहे कीं, शाळेत शिकणारी कमीत कमी ४० मुलें एक ठिकाणीं मिळाली तर त्यांच्याकरितां त्यांची भाषा शिकविण्याला वेगळा वर्ग काढला पाहिजे. तसेंच ४० मुलांचा वर्ग बनवितां आल्यास त्यांच्या धर्मशिक्षणाचीहि व्यवस्था करण्यांत आली पाहिजे. जेथें सबंध शाळा होऊं शकत नाहीं तेथें १८ मुलांच्या शिक्षणाकरितां भाषेचा वर्ग व १२ करितां धार्मिक शिक्षणाचा वर्ग काढण्यांत येतो. दुय्यम शिक्षणाची वेगळी शाळा काढावयाची असेल तर कमीत कमी ३०० विद्यार्थी एकत्र शिकवितां आले पाहिजेत. १५० मुलांची शाळा होऊं शकली, व सार्वजनिक अशी शाळा काढण्याचें तेथें कारण उरलें नाहीं, तर अशा शाळेला सरकारांतून फक्त पैशाची मदत मिळते. तात्पर्य, अशा रीतीनें शाळा, वर्ग वगैरे काढण्याकरितां लागणारें विद्यार्थ्यांचें प्रमाण कोठे कमी तर कोठे जास्त आहे इतकेंच; पण शिक्षणाची व्यवस्था छोट्या जमातीकरितां करणें अवश्य मानलें आहे; व त्यानें या जमातींचें समाधानहि झालें आहे.

राजकीय दृष्ट्या जिचे हक्क संरक्षणास योग्य मानतां येतात ती जमात शेंकडा निदान २० पासून २५ पर्यंत तरी एकंदर लोकसंख्येंत असली पाहिजे. व हें प्रमाण लावलें असतां, हिंदुस्थानांत मुसलमान ही एकच जमात संख्येनें अशी आहे कीं,तिच्याकरितां कांहीं विशेष प्रकारच्या सोयी केल्या पाहिजेत. हें प्रमाण हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांना लावून पाहिलें तर पूर्व–बंगाल, पंजाब व पेशावर या प्रांतांत मुसलमान हेच संख्येनें हिंदूंपेक्षां अधिक असल्यामुळें, संरक्षणाच्या विशेष सोयी तेथें करावयाच्या तर त्या हिंदूंकरितांच केल्या पाहिजेत. पण इतर कोणताहि प्रांत घेतला तरी त्यांत मुसलमानांची संख्या वरील शेंकडा २५ इतक्या प्रमाणांतहि पडत नाहीं. असे असतां लखनौ येथील तहानें त्यांना किती तरी अधिक सवलती दिल्या!तरीहि पण त्यांचें समाधान होत नाहीं हें आश्चर्य नव्हे काय?

वरील विवेचनावरून दोन–तीन गोष्टी दिसून येतात. त्या पुनः एकवार सांगतों. कोणतेंहि राष्ट्र म्हटलें म्हणजे त्यांतील कोणत्याहि मनुष्यव्यक्तीला नैसर्गिक व जन्मसिद्ध असे कांहीं हक्क असतात. म्हणजे (१) जीवित व मालमत्ता यांचे सरक्षण होणे (२) कायद्याच्या वागणुकींत किंवा न्यायकोर्टातील न्यायदानांत पक्षपात न होणे व सारखेपणानें वागविलें जाणे वगैरे.या हक्कांचा प्रश्न उपस्थित झाला असतां,ती व्यक्ति छोट्या जमातींपैकीं कीं मोठ्या जमातींपैकीं हा फरकच उरत नाहीं.राष्ट्राच्या राजकीय घटनेच्या मूळ तत्त्वांतच अशा हक्कांचा उल्लेख असतो, व नेहरू रिपोर्टांत पाहिलें तरी कायदा न्याय,किंवा सरकारी सार्वजनिक जागा,माल-मिळकत यांच्या उपभोगाचा हक्क कोणत्याहि जमातीतील व्यक्तींना सारखाच दिलेला आढळेल. यानंतरचा हक्क व तोहि मूलभूत स्वरूपाचा म्हणजे वर सांगितल्याप्रमाणें धर्मस्वातंत्र्य, प्राथमिक शिक्षण, मातृभाषेतून शिक्षण इत्यादिविषयींचा. याविषयीं नेहरू रिपोर्टांत केलेली योजना वर सांगितलेल्या लीग ऑफ नेशन्सच्या योजनेला सोडून नाहीं. राहतां राहिला प्रश्न राजकीय हक्काचा व अधिकाराचा. यांपैकीं, अधिकाराच्या जागा व सरकारी नोकऱ्या यांच्या संबंधांत सर्वराष्ट्रीय संघानें छोट्या जमातींना वेगळे असे कांहींच अधिकार दिलेले नाहींत. नेहरू रिपोर्टाचीहि तीच गोष्ट आहे. कायदेमंडळासंबंधीं मतदारीमध्ये सर्वराष्ट्रीय संघाप्रमाणेंच नेहरू रिपोर्टानें सवता सुभा मान्य केलेला नाहीं. पण या मंडळांतील सभासदांच्या संख्येसंबंधानें, सर्वराष्ट्रीय संघानेंहि केली नाहीं अशी व्यवस्था व दिली नाहीं अशी सवलत नेहरू रिपोर्टानें छोट्या जमातींना दिली आहे. ती अशी कीं, युरोपांत छोट्या जमातींना राखीव जागा मुळींच ठेवल्या नसतां, नेहरू रिपोर्टानें छोट्या जमातीकरितां लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा राखून ठेवल्या आहेत.म्हणजे सर्वराष्ट्रीय संघानें छोट्या जमातींचें रक्षण जितकें केलें नाहीं तितकें नेहरू रिपोर्टानें हिंदुस्थानांत केलें आहे. असे असतां मुसलमान त्या रिपोर्टाला दुरून देखील स्पर्श करण्यालाहि तयार नाहींत! बॅ. जिनासारखे

राष्ट्रीय वृत्तीचे म्हणविणारे लोक वरिष्ठ कायदेमंडळांतील जागांचा तिसरा हिस्सा राखून ठेवा म्हणतात, व सरकारहि नेहरू रिपोर्टाविषयीं एका शब्दानेंहि न बोलण्यानें जितकी कमालीची अमान्यता दाखवितां येईल तितकी दाखवितें! अशा रीतीनें सर्व-राष्ट्रीय संघानें छोट्या जमातींचा प्रश्न कसा सोडविला याचा दाखला स्वार्थी, शिरजोर व बेछुट हक्क सांगणारे मुसलमान न मानोत, परंतु हिंदुस्थानाला बरोबर घेऊन ज्यांनीं या सर्वराष्ट्रीय संघांत प्रवेश केला, तेथें कायमचें ठाणें बसविलें, त्याच्या तहावर सह्या केल्या, व त्याची आज्ञा म्हणून जगांतील कित्येक भागावर ट्रस्टीपणा स्वीकारला, त्या खुद्द ब्रिटिश सरकारनें हा दाखला मानूं नये, आणि पार्लमेंटानें पाठविलेल्या सायमन कमिशनानें, स्वराज्याच्या चर्चेंतले मोठे प्रश्न बाजूला टाकून जातिविषयक भांडणें तेवढीच चिवडीत बसावें व जातिविषयक हक्क निवडीत बसावें हे आश्चर्य नव्हे काय?

# इंग्रजांचीं जगांतील कारस्थानें

( ले. १ ला )

## कर्नल लॉरेन्सचें चरित्र

जगाला रंगभूमीची उपमा नेहमीं देतात. आणि अशा विस्तृत नाटकगृहांत अखिल सुधारलेल्या जगाचें लक्ष वेधून घेणारें नाटक आज कोठें चालू असेल तर तें शेजारच्या अफगाणिस्थानांत. कांहीं काळ राजा म्हणून गाजलेला अमानुल्ला सध्या तरी रंगभूमीवरून निघून गेला आहे. पण तेवढ्यानें नाटकांतील रंग कमी झाला नाहीं; उलट प्रेक्षकांची जिज्ञासा अधिक वाढली आहे.

जगांतील नाटकें हीं विस्तृत प्रमाणावर चालत असल्यानें त्यांचें पूर्णपणें आकलन होण्यास कांहीं काळ जावा लागतो. सर्वच प्रवेशांकडे एकदम पाहतां येत नाहीं व कांहींकडे दुर्लक्ष झाल्यानें कथा-सूत्राचा संबंध जुळविणें अवघड जातें. तशीच थोडीशी गोष्ट या अमीर अमानुल्लाच्या जीवनक्रमाचें जें नाटक आपणापुढें चाललें होतें त्याची झाली आहे. अगदीं ताजीच बाब घेतली तर राजसंन्यास करण्याची पाळी अमानुल्लावर कां यावी याचा उलगडा स्पष्टपणें अद्याप झाला नाहीं. पाश्चिमात्य सुधारणा रानटी प्रजेवर कायद्यानें लादण्याची घिसाडघाई केल्यामुळें हा अनर्थ ओढवला हें कांहींसें खरें असलें तरी एवढेंच कांहीं कारण याच्या मुळाशीं नाहीं ही गोष्ट सर्वांसच कळून चुकली आहे. कारस्थानांच्या धामधुमीत उडणारा धुरळा इतका दाट आहे कीं, हल्ला कोण व कोठून करतो हें समजत नाहींसें झालें आहे. पण मागील परिस्थितीवर बराच प्रकाश पाडणारी कांहीं हकीकत वाचकांपुढें मांडीत आहों त्यावरून गोष्टीची जुळणी लक्षांत येईल.

### कर्नल लॉरेन्स

कराचीस असणाऱ्या एअरक्राफ्ट्समन टी. ई. शॉ या इंग्रजी वैमानिकाची बदली १९२८ च्या मे महिन्यांत पेशावर येथें करण्यांत आली. त्याच वेळेला पेशावरहून काबूलला गेलेला एक इसम शॉचें वर्णन असें करीत होता.

"तो लॉरेन्सना! बसला असेल एका विमानाशीं खेळत. जसें कांहीं विमान त्यानें आपल्या घरींच बांधून घेतलें आहे! त्याला या यंत्राची इतकी माहिती कशी झाली कोण जाणे? त्याचे वरिष्ठ त्याजबद्दल काय म्हणतात म्हणून विचारतां काय? तो आपल्या वरिष्ठाशीं कधींच बोलत नाहीं. सरहद्दीवरील रानटी लोकांत तो आपला सदानूकदा बसलेला असतो. त्याला त्यांची भाषा येते का? होय, अहो त्यांच्यांतल्या पंडितापेक्षांहि लॉरेन्स त्यांची भाषा सफाईनें बोलतो. आणि त्यांच्याशीं काय बोलतो म्हणतां? लॉरेन्सचें म्हणणें असें कीं मी त्यांच्याशीं बोलावयाला लागलों कीं ते आपल्या पोटांतलें सर्व मजजवळ ओकून टाकतात. भारी विचित्रच नाहीं हो हा मनुष्य? हो आहे खरा तसा."

काबूल येथें इंग्रज वकिलातींत एका अमेरिकनाच्या देखत झालेलें या अर्थाचें संभाषण अमेरिकन पत्रांतून नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे.

शिनवारी लोकांनीं बंडाची तयारी नोव्हेंबर १९२८ पासून चालविली. त्यांच्या उद्वेगाचें व संतापाचें मुख्य कारण म्हणजे राणी सूरियाचे शिनवारी लोकांच्या दृष्टीनें अर्धनग्न पण विलायती शिष्टाचारास संमत असे फ्रान्समधील कांहीं लोकांसमवेत घेतलेले तिचे फोटो त्यांना पाहावयास मिळाले हें होय व त्यामुळेंच ते खवळले. फ्रान्समध्यें शिनवारी लोकांचा कोणी खास बातमीदार किंवा एखादा 'प्रवासी प्रतिनिधी' नाहीं इतकेंच काय पण त्यांना "तुमच्या राणीचे

फोटो पाहा" असें अत्याग्रहानें सांगितल्याशिवाय स्त्रियांच्या चित्राकडे ढुंकूनहि न पाहणारे हे लोक आपल्या राणीचे चित्र ओळखूं शकले कसे हेंहि एक कोडे आहेच. तें असो.

### लॉरेन्सला पकडणारास बक्षीस

काबूलचें सरकारी वृत्तपत्र अमान-इ-अफगाण म्हणून आहे. त्यांत "जगांतील बिलंदर जासूद (हेर) क. लॉरेन्स म्हणून आहे. त्याला पकडून देणारास भलें मोठें बक्षीस मिळेल" अशी जाहिरात जानेवारी १९२९ च्या पहिल्या आठवड्यांत प्रसिद्ध झाली होती.

जानेवारी ८।१९२९ ला पेशावर येथें बदलून आलेल्या एअरक्राफ्ट्समन शॉला विलायतेस जाण्याचा हुकूम देण्यांत आला व एका थर्ड क्लासमधून प्रवास करीत अत्यंत संशयास्पद रीतीने तो इंग्लंडांत साउथॅम्टन येथें उतरला. तेथून वर्तमानपत्राचे बातमीदारांना चुकवीत चुकवीत तो कोठें गेला त्याचा पत्ता नाही. मध्यंतरी त्यानें इंग्रजी नाटककार बर्नार्ड शॉ याच्यासमवेत उपाहार केला अशी एक गप्प उठविण्यांत आली. पण खुद्द बर्नार्ड शॉनेच तें खोटें असल्याचे सांगितलें.

वैमानिक शॉ व कर्नल लॉरेन्स ह्या व्यक्ती भिन्न नसून एकच आहेत असें जें कित्येकांचें म्हणणें आहे. त्याचा यावरून वाचकांनींच विचार करावा.

कर्नल लॉरेन्स ही कोण व्यक्ति आहे असेंहि कोडें कित्येकांना पडेल. टॉमस एडवर्ड लॉरेन्स या नांवाचें एक गोरें बाळ वेल्समध्यें १५ आगस्ट १८८८ मध्ये जन्मलें. ऑक्सफोर्ड हायस्कूल, ऑक्सफर्ड कॉलेज, मॅघडिलीन कॉलेज इत्यादि शिक्षणसंस्थांतून आपला अभ्यासक्रम पुरा करून त्याने बी. ए. ची पदवी १९११ त घेतली. संशोधनकार्याची आवड असल्यानें वयाच्या तेविसाव्या वर्षी हा इंग्रज तरुण युफ्राटीस नदीवरील पुराण वस्तुसंशोधन करणाऱ्या ब्रिटिश म्यूझियमच्या मंडळीबरोबर अरबस्थानांत–मेसापोटेमियांत गेला. आरबी भाषेचें व रीतरिवाजाचें ज्ञान त्यास इतकें उत्तम झालें की आरबी वेशांत असल्यावर लोक त्याला साधु पुरुष म्हणून मानूं लागले. अगोदरच गौरवर्ण, त्यातून हा लॉरेन्स विशेष पाणीदार असल्याने त्याचें वजन आरबांवर विशेष पडलें. बेधडकपणें भीतीची छटा चर्येवर मुळीच दिसूं न देतां तो शेकडो रानटी लोकांमध्यें एकटा निःशस्त्र असा जाई. आणि जसा कांही त्यांचा अनभिषिक्त राजा असा वाटे. मानवी स्वभावाची परीक्षा त्याला अचूक आणि तत्काळ करतां येत असल्यानें तो सर्वांना आवडूं लागला. युरोपियन महायुद्धांत त्यानें लष्करी पेशा पत्करला. आणि सेकंड लेफ्टनंटचा हुद्दा मिळविला. निरनिराळ्या आरब नायकांना भेटून स्वतंत्र होण्याचा कानमंत्र देऊन तुर्कांचें बळ कमी करण्याची महत्त्वाची कामगिरी या लॉरेन्सनेच केली आहे. दमास्कस-मदीना रेल्वेचा फांटा तोडून त्यानें तुर्की सत्तेवर पहिला आघात केला.

लढाईच्या वेळीं "सीक्रेट सर्व्हिस" म्हणून सी. आय. डी. खात्याची बहीण निर्माण करण्यांत आली आणि अशी भगिनी लागतेहि. त्या सर्व्हिसच्या वरिष्ठाकडे अलोट पैसा ठेवतात व त्याचा त्याने उपयोग राष्ट्रकार्याकडे करावयाचा असतो. अर्थातच अशा रकमांचा हिशेब कोणी ठेवीत नाहीं, आणि ठेवला तरी तो बाहेर येत नाहीं. अशा परिस्थितींत लॉरेन्सकडे अगणित द्रव्य असल्याने वर निर्दिष्ट केलेल्या गुणसमुच्चयाच्या साहाय्यावर त्याची लोकप्रियता किती वाढली असेल, याची कल्पनाच केलेली बरी. इंग्रजांची सर्व तिजोरीच लॉरेन्सच्या हातांत होती असें म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. मक्केच्या शेरिफाचा मुलगा फैसल हल्लींचा इराकचा राजा हा लॉरेन्सच्या मोहक स्वभावानें आणि आंगच्या कर्तबगारीनें मोहून गेला व त्या दोघांची गट्टी जमली. फैसलचा सेनाधिपति आणि लष्करी सल्लागार होऊन लॉरेन्सने तुर्कांशीं लढाई दिली. फैसलच्या बापाला पुष्कळच पेन्शन मिळत असे आणि खुद्द फैसलला तर लॉरेन्सनें बगदादची गादी मिळवून दिली.

लढाईत अनेक अधिकाऱ्यांच्या हाताखालीं काम करून लॉरेन्सने आपली बढती मेजरपेक्षांहि वर म्हणजे लेफ्टनंट कर्नल या हुद्द्यावर करून घेतली. नंतर १९१९ च्या शांतता परिषदेस ब्रिटिशांचा प्रतिनिधि म्हणून लॉरेन्स गेला होता व आरबांच्या स्वायत्ततेसाठीं त्यानें फार खटपट केली. ब्रिटिश मंत्रिमंडळांतील कलोनियल खात्यांत कर्नल लॉरेन्ससाठीं खास जागा करण्यांत आली. मध्यपौर्वात्य भागाचे सल्लागार म्हणून त्याला कलोनियल सेक्रेटरींनीं आपल्याकडे घेतलें !

### स्त्री-वेषांतला लॉरेन्स

अशा प्रकारे स्वदेशप्रीत्यर्थ कर्नल लॉरेन्सने खटपट केली आहे. त्याच्या धाडसाचीं कृत्यें लिहिलीं तर एक ग्रंथच होईल. त्यानें स्त्रीवेष धारण करून व आरबी स्त्रियांशीं लग्नें लावून आपलें काम साधून घेतलें. आतां ब्रिटिश साम्राज्याचे हेतू चांगले नाहीत हा दोष त्याचा नव्हे. परंतु त्याची देशप्रीति व त्यासाठीं स्वप्राणार्पण करण्याची मनःस्थिति यांची किंमत कशानेंहि कमी ठरणार नाही.

हाच कर्नल लॉरेन्स, इतक्या मोठ्या पदवीवरचा हुद्देदार, साधा एअरक्राफ्टसमन शॉ म्हणून करा-

च्चीला राहिला असेल असे कसें म्हणावें ? सरकारी खात्यांत नोकरी करणारांनी खोटीं नांवें सांगणें हा एक गुन्हा असतां आणि ब्रिटिश सरकारची इतकी करडी नजर असतां हा बिलंदर हेर वैमानिक खात्यांत येऊं शकेल कसा, अशा शंका मनांत येतात. पण कर्नल टॉमस एडवर्ड लॅरेन्स हाच गृहस्थ टी. ई. शॉ या नांवानें कांहीं दिवस वावरत होता हें खरें आहे. शॉनें अफगाणिस्थानाविरुद्ध ज्या गोष्टी केल्या असा त्याजवर आरोप आहे त्या उत्तम प्रकारें पार पाडण्याची योग्यता कर्नल लॅरेन्समध्यें आहे हेंहि अगदीं सत्य! सध्याची राजकीय परिस्थितीच अशी आहे कीं "यद्यपि सत्यं राजविरुद्धं नोच्चरणीयम्" असें पूर्वीचें वचन थोडें फार बदलून उपयोगांत आणावें लागतें. "स्वयंवरां"तील दिनेश्वर ज्योतिषी म्हणतो त्याप्रमाणें अफगाणिस्थानाविषयी कांहीहि बोलावयाचें झाल्यास 'मागें पुढें खालीं वर आजूबाजूस पाहूनच बोलावें लागतें'

# खेडेगांवविषयक व्याख्यानमाला

## के. एस. गुप्ते वकील यांचीं व्याख्यानें

ता. १९ व २० मे रोजीं येथील वकील श्री. के. एस. गुप्ते बी. ए. एलएल. बी. यांचें शेतकरी व मामलेदारी कायदा या विषयावर व्याख्यान झालें. ते म्हणाले, परवां मुंबईस जो दंगा झाला त्यांत पठाणांवर मजूर लोकांचा दांत दिसला. त्याचें कारण पठाण-सावकारांचें तिरस्करणीय वर्तन, या मजूर लोकांना दिवसेंदिवस जास्त जाचक होत होतें असें अनुमान निघतें. पूर्वी मारवाडी सावकाराविरुद्ध सुद्धां असाच गिल्ला झाला होता व त्या वेळीं त्याचें कारणहि अशाच प्रकारचें होतें. बाकीचे धंदे बुडाले, फक्त शेती हा एकच धंदा उरला. त्यावर वाडवडिलांचें कर्जाचा बोजा. वेळीं पैसे येत नाहीत म्हणून घेईल त्या स्वस्त भावानें धान्य विकावें लागतें. पुढील तरतूद थोडी फार सुद्धां करून ठेवण्याची त्यांना शक्ति व इच्छाहि नसते. तशांत एखादें वर्षी दुष्काळ पडला कीं काम आटोपलें. कर्ज काढणें हा नित्याचा व्यवहार होतो व तोहि पोट भरण्याकरितां, अशी शोचनीय स्थिति आहे मध्यंतरीं या परिस्थितीचा फायदा मारवाडी सावकारांनीं फार घेतला. त्यामुळें कित्येक घरें उध्वस्त झालीं, लोकांचें शेतीवरून लक्ष उठलें व त्यामुळें एकंदरीत शेतीचें नुकसान होत गेलें. शेतकरी कायदा झाल्यापासून वरील गोष्टी बऱ्याच थांबल्या आहेत, पण त्यामुळें दुसरी आपत्ति अशी उत्पन्न झाली कीं, शेतकरी सावकारास बुडविण्याचा अधिक प्रयत्न करूं लागले. व यामुळें शेतकरी व सावकार यांचे संबंध जास्तच वाईट झाले. अशा या शेतकरी कायद्यांतील मुख्य मुख्य गोष्टी विचारांत घेऊं.

'शेत करणारा तो शेतकरी,' अशी व्याख्या करण्यांत आली आहे. ही फार व्यापक आहे, व इतर धंद्यापासून जास्त पैसा मिळविणारा गृहस्थ सुद्धां त्याचा फायदा घेतो. देण्याघेण्य चे खटले शेतकरी राहात असेल तेथें चालावेत. यामुळें लांबचे सावकार त्याला थारा देत नाहींत. दस्तऐवजाव्यतिरिक्त तोंडी पुरावाहि महत्त्वाचा मानला जातो. त्यामुळें कोणताहि व्यवहार कसाहि बदलावा अशी शेतकऱ्यास इच्छा होते. खरेदीखत झाल्यावर ६० वर्षेपर्यंतसुद्धां व्यवहाराची निश्चितता धरतां येत नाहीं. तो केव्हांहि बदलण्याचा प्रयत्न करण्यांत येतो. गहाण जमिनी मुदतीच्या आंत सोडविण्याच्या सवलतीमुळें एक रकमी सावकारानें दिलेला पैसा अगदी लहान हप्त्यानें परत मिळण्याची आपत्ति ओढवते. हुकूमनामा झाल्यावर सुद्धां तो बजावण्यासाठीं दरखास्त दिल्यावेळीं शेतकऱ्यास हप्तेबंदी मागतां येते. शेतकऱ्याला दिवाणी तुरुंगांत बसवितां येत नाहीं. शेतकऱ्याला ५० रु. च्या कर्जासाठींसुद्धां नादारी मागतां येते ही सवलत विशेष आहे. पण अपमानास्पद म्हणून या सवलतीचा फायदा फारसा कोणी घेत नाहीं.

शेती हा धंदा फायदेशीर जरी नाहीं तरी त्यापासून कांहीं तरी उदरनिर्वाह होतो या समजुतीनें शेतकरी जमीन सोडीत नाहीं. खेडेगांवांतील प्रचारकानें तेथील लोकांना कायद्यांतील हक्काची व कर्तव्याची जाणीव करून दिली पाहिजे. २५ रु. पर्यंत खटल्याचा निकाल करण्यासाठीं गांव-मुनसफ मागतां येतो. आपसांत तंटे मिटविण्यासाठीं लवादाची योजना करतां येते. दोघांचे संमतीनें अवार्ड करून घेतां येतो. ग्रामपंचायतीस हे अधिकार दिल्यानें सरकार व शेतकरी या दोघांचेंहि काम होणार आहे. दस्तऐवजनोंदणीकरितां सब-रजिस्ट्रार नेमलेला असतो. पैसे परत करतेवेळीं शेतकऱ्यास सावकारानें पावती दिली पाहिजे याचीहि माहिती असली पाहिजे. प्रतिवादी शेतकऱ्याला सरकारकडून वकील मिळतो. त्या सवलतीचा फायदा फारसे लोक घेत नाहींत.

शेतकऱ्याचे दृष्टीनें दुसरा महत्त्वाचा कायदा म्हणजे वहिवाटीचा कायदा होय. तो पूर्वी कलेक्टराकडे होता, आज तो मामलेदाराकडे आला आहे. चालू वहिवाटींतील अडथळा दूर करणें हा या कायद्याचा विशेष आहे. या बाबतींत दिवाणीकडेहि जातां येतें. पण ताबडतोब निकाल पाहिजे असेल तर मामलेदाराकडे अर्ज करणें हें चांगलें. अशा कामांत वादीला वकिलाला मुखत्यारीचा हक्क देतां येतो. हक्कनोंदणीच्या उताऱ्यासह ६ महिन्यांचे आंत अर्ज केला पाहिजे.गांवांतील खातेदाराचे रजिस्टर कोणाहि गांवकऱ्यास पाहाण्याचा अधिकार आहे. हा अधिकार कोणी बजावीत नाहीं. क ड ई पत्रकें चांगली माहीत करून घ्यावीत. मामलेदारांनीं दिलेल्या निकालावर कलेक्टराकडे अर्ज करतां येतो. मात्र तो २ महिन्यांचे आंत करतां येतो. अशा रीतीनें पुष्कळ तपशिलानें भरलेली माहिती सांगून व्याख्यात्यांनीं आपला विषय संपविला.

## सोमण वकील यांचीं व्याख्यानें

ता. २१।२२ मे १९२९ रोजीं सातारचे वकील रा. ग. सोमण यांचीं फौजदारी कायद्यावर व्याख्यानें झालीं. त्यांनीं सांगितलें, हक्काची जाणीव करून देणारा तो दिवाणी कायदा व जबाबदारीची जाणीव करून देणारा तो फौजदारी कायदा होय. कायद्याचें ज्ञान जितकें अधिक वाढेल तितका समाज अधिक सुखी होईल. समाजाचें सुख व सोय हें कायद्याचें ध्येय आहे. कायद्यांतील हक्क अज्ञानामुळें कळत नाहींत. गांवांतील स्वच्छतेचा एक कायदा १८८९ सालीं झाला.त्या कायद्यानें प्रत्येक गांवाला सॅनिटरी कमिटी मागण्याचा हक्क मिळाला आहे.पण कोणाचें लक्ष नाही. ग्रामपंचायतीला कर बसवण्याचा अधिकार आहे, सॅनिटरी कमिटीला नाहीं, हा दोहोंत फरक आहे. मात्र घाण केल्याबद्दल ११२ रु. दंड करण्याचा फौजदारी अधिकार वरील कमिटीला आहे. सार्वजनिक दवाखान्याची तुटपुंजी व्यवस्था आहे. जपानांत दर १० मैलांला एक दवाखाना असतो. देवी काढण्याबद्दलमुद्धां एक कायदा आहे. देवी काढण्यास न नेलें तर दंड करण्याचा अधिकार आहे.हें काम लोकल बोर्डाचें आहे.सरकारकडे तक्रार करून या कामाकरितां जास्त पैसा घेतला पाहिजे. पाणीपुरवठा करण्याचे बाबतींत अशीच फार गैरसोय व दुर्लक्ष आहे. त्याकडे लोकल बोर्डाचें लक्ष फारच कमी जातें. पाणी कोणी घाण केलें तर त्याला कायद्यानें शिक्षा करतां येते. हक्कनोंदणीची नक्कल न मिळाल्यास फौजदारी करतां येते हा कायदा माहीत असला पाहिजे. खून, मारामारी, जबरी संभोग, धमकी, फसवणूक, पिकास अपक्रिया, जबरीनें शेतांत शिरणें वगैरेबाबत असलेला फौजदारी कायदा खेडेगांवचे लोकांस माहीत करून दिला पाहिजे. २४ तासांत जनावर कोंडवाड्याकडे नेलें पाहिजे. नेतांना मालकानें सोडवून आणणें हा गुन्हा होतो. जंगलांतील कोणतीहि वस्तू आणणें ही चोरी होते. २५ यार्डांत विस्तव केला तर गुन्हा होतो. खटल्याची भीति घालून शेतकऱ्याकडून फॉरेस्टचे लोक फार पैसे उकळतात. जंगलास आग लागल्यास ती विझवण्यास गेलें पाहिजे. जनावरांना निर्दयपणानें वागविणें हा गुन्हा होतो. शेजारच्या लोकांची आग विझविण्याची जबाबदारी असते. गुन्हेगार जातीच्या लोकांना हजेरीची सक्ती असते.लो. बोर्डाचे कायद्याखालीं सभासदानें एखादे कॉंट्रॅक्टमध्ये भाग घेणें हा फौजदारी गुन्हा होतो. मिलिटरीसाठीं गाड्या धरणें, पिकें, उपटणें वगैरे गोष्टी कायद्यानें घडतात, पण त्याबद्दल योग्य मोबदला मिळणें हेहि कायद्यांत आहे. अबकारी कायद्याखालीं बरेच गुन्हे घडत असतात. चोरून दारू करणें हा गुन्हा होतो. हत्याराच्या कायद्याखालीं ९ इंचांपेक्षां अधिक पात्याचें हत्यार वापरणें हा गुन्हा होतो. पोलिसानें नांव-गांव विचारलें असतां सांगितलें नाहीं तर गुन्हा होतो. गांवचा महार हा रखवालदार असतो. त्याला अधिकार नाही, मात्र जबाबदारी फार आहे. तोंडी पुरावा ऐकून दंड करण्याचा व ४८ तास अटक करण्याचा अधिकार पाटलास आहे. प्रचारकानें पाटील-कुलकर्णी आपलेसे करून घेतले तर मोठें काम होईल. असें सांगून व्याख्यात्यांनीं आपलें भाषण संपविलें.

# पुणें नगर म्युनिसिपालिटीचा राष्ट्रीय ध्वजारोपणसमारंभ

राष्ट्रीय ध्वजारोपणाची प्रथम कल्पना गेल्या जानेवारी महिन्यांत कांहीं राष्ट्रीय पक्षाच्या सभासदांच्या मनांत आली, व राष्ट्रीय सभेनें मान्य केलेले निशाण पुणें म्युनिसिपालिटीच्या मुख्य इमारतीच्या शिखरावर फडकविण्यांत यावें अशा अर्थाचा ठराव मंजूर करण्यांत आला. त्यानंतर शुक्रवार तारीख २८ रोजी म्युनिसिपालिटीचे दिवाणखान्यांत सायंकाळीं ४॥ वाजतां **श्री. न. चिं. केळकर** यांच्या हस्तें ध्वजारोपणसमारंभ यशस्वी रीतीनें पार पडला. ध्वजारोपणसमारंभाला म्युनिसिपल कौन्सिलर्स व शहरांतील प्रमुख नागरीक मिळून सुमारें ५०० मंडळी हजर होती. प्रारंभीं अध्यक्ष श्रीयुत मानूरकर यांनीं या समारंभाचा पूर्वइतिहास सांगितला. ते म्हणाले, "राष्ट्रीय झेंडा उभारण्याचा ठराव बहुमतानें मंजूर झाला व आज या राष्ट्रीय झेंड्याला म्युनिसिपालिटीकडून मान्यता देण्यांत येत आहे. हा समारंभ यापूर्वीच व्हावयाचा होता. पण आपले नियोजित अध्यक्ष गेल्या गुढीपाडव्याचे दिवशीं येऊं शकले नाहींत. म्हणून हा समारंभ तहकूब ठेवावा लागला."

यानंतर अध्यक्ष **श्री. न. चिं. केळकर** म्हणाले, " पूर्वी २०–२२ वर्षे माझा या शहर म्युनिसिपालिटीशीं संबंध होता व आतां जरी प्रत्यक्ष संबंध सुटला असला तरी ममत्वाच्या नात्यानेंच मी म्युनिसिपालिटीच्या कारभाराकडे लक्ष देत असतों. राष्ट्रीय निशाण उभारण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीचा आहे. आज योगायोग असा आहे कीं, पुणें शहरांत छपन्न देशचे राजे व व्हाइसरॉय येथें आले आहेत व त्यांच्या सभा बैठकी होत आहेत. पण म्युनिसिपालिटी ही आपली नगरमाउली आहे व हिच्या घरचा समारंभ तोच आपला खरा समारंभ व तो राष्ट्रीय ध्वजारोपणाचा समारंभ आज होत आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे. निशाणाचें दर्शन राष्ट्रीय स्वरूपाचें आहे. हिंदुधर्माचें द्योतक म्हणून तांबडा, मुसलमानांच्या धर्माचें द्योतक हिरवा हे दोन रंग प्रामुख्यानें या राष्ट्रीय निशाणावर दिसत असून पांढरा रंग हा पावित्र्याची खूण आहे इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानांतील बाकीच्या इतर धर्माबद्दल सहिष्णुता व आदर या शुभ्र रंगानें व्यक्त होत आहे. गरीबांच्या उपजीविकेचें साधन जे चरखा त्या चरख्याचें चित्रहि आपल्या निशाणावर काढलें आहे. सर्वमान्य अशा या राष्ट्रीय निशाणाचें रक्षण करण्याची जबाबदारी आतां आपणावर पडत आहे. आपल्याला माहीतच आहे कीं, निशाणाकरितां लढाया होतात व युद्धामध्यें निशाणाभोंवतींच पराक्रमहि घडतात. तर या निशाणाच्या रक्षणाची जबाबदारी आपण पार पाडली पाहिजे. तसेंच या इमारतीवर हें राष्ट्रीय निशाण फडकत असतां, ज्या तत्त्वाकरितां हें निशाण उभारलें जात आहे त्या तत्त्वाविरुद्ध या आपल्या दिवाणखान्यांत वादविवाद अगर भांडणें होऊं नयेत. राष्ट्रीय बुद्धीनेंच सर्वांनीं वागलें पाहिजे."

---

# बलुचिस्थानावरील इंग्रजी अंमल

बलुचिस्थानाचे ब्रिटिश बलुचिस्थान व स्वतंत्र बलुचिस्थान असे दोन भाग असून ब्रिटिशांची राजधानी क्वेटा येथें आहे व "कलात" ही स्वतंत्र बलुच्यांची राजनगरी आहे. मात्र बलुचिस्थानाच्या स्वातंत्र्याचा अर्थ अगदी निराळा आहे हें सांगितलें पाहिजे. कलाताधिपतींना 'खान' म्हणतात. प्रस्तुतचे खान "धृतराष्ट्र" पदवीला पोहोचले असल्यानें त्यांचा सर्व कारभार वजीर पाहतो. आणि वजीर हे माजी ब्रिटिश नोकरींतले असल्याने त्यांच्या कर्तबगारीचें वेगळें वर्णन नकोच. बलुचिस्थानाचे धृतराष्ट्र स्वतंत्र असल्याचे इंग्रज अधिकाऱ्यांनीं इ. स. १८७६ च्या तहानें मान्य केलें आणि आम्ही ब्रिटिश सरकारच्या सहकार्यानें राज्यव्यवस्था पाहूं आणि इंग्रजांच्या तंत्राने चालूं असें खानसाहेबांनीं कबूल केलें. ब्रिटिशांच्या वतीनें गव्हर्नर—जनरलचे क्वेटा येथील एजंट यांनीं कलातच्या खानांच्या 'राजकीय' कारभारावर देखरेख करावी असें ठरलें आहे. मग स्वातंत्र्य उरलें कोठें? पण पुस्तकांत आणि कागदोपत्रीं कलाताधिपति स्वतंत्र मानले जातात.

दुसऱ्या अफगाणयुद्धानें पिशिन, शोरारूद, दुकी, सिबी आणि शारीग हे जिल्हे इंग्रज निशाणाखालीं आले. नंतर सुमारें तीन वर्षांनी म्हणजे इ. स. १८८३ मध्यें 'खानांनीं सालिना ५५ हजार रुपये घेण्याचें मान्य करून क्वेटा व बोलन हे दोन जिल्हे इंग्रजांना दिले. बोरी व्हॅली हा लष्करी ठाण्यासाठीं एक भाग इ. स. १८८६ मध्ये आपण होऊनच ब्रिटिशांनीं घेतला. आणखी एका वर्षानें खेतरान प्रांत हवासा वाटल्यानें तोही लाल रंगानें रंगून गेला! झोबकाकर व खुरासान हे जिल्हे इंग्रजी अमलाखालीं येणें आवश्यक झालें. १८९९ मध्यें खानसाहेब 'नुष्कीचा भाग घ्या' म्हणून सरकारच्या मागें लागले तेव्हां त्यांना सालिना ९ हजार रुपये देण्याचें मान्य करून तोही भाग आपल्या हाताखालीं ब्रिटिश सरकारनें घेतला. नसिराबादचा जिल्हा १९०३ मध्यें "भाड्यानें" घेतला. त्याला दरसाल रु. १, १७, ५०० द्यावे लागतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हे सर्व भाडें दरसाल आजन्म चालूं राहावयाचें आहे—आणि तें भाडेंच म्हणावयाचें, खानाला ती खंडणी देतात अशांतला भाग नव्हे. मात्र खानाच्या मनांत भाडोत्री जागा परत मागण्याचें आलें तर ती त्याला पाहावयास तरी मिळेल कीं नाहीं कोण जाणे!

## क्वेट्यासारखें शहर नाहीं

ब्रिटिश बलुचिस्थानाची राजधानी क्वेटा ही आहे. क्वेटा हें नांव उच्चारण्यास कठिण व कठोर आहे. बलुचिस्थानाचा भाग हिंदुस्थानापासून दूर व तुटलेला आणि तिकडे जातांना सिंधच्या रुक्ष वाळवंटांतून जावें लागतें. या सर्व कारणांमुळे "क्वेटा" कसले तरी भिकारडें गांव असावें अशी कल्पना होते. परंतु ती अत्यंत चुकीची आहे हें एका दिवसाच्या अनुभवानेंहि कळणारें आहे. उद्यानमय शहर. समुद्रसपाटीपासून ५८५८ फूट उंची आजूबाजूस वृक्षहीन टेकड्या आणि सदैव उत्तम हवा यांनीं तर क्वेटा मनोहर ठरतेंच; पण फुलाफळांची रेलचेल पाहूनहि क्वेट्यासारखें दुसरें शहर नसेल असें वाटतें! उन्हाळ्याच्या प्रारंभीं तेथे गुलाबांची इतकी पैदास होते कीं जिकडे तिकडे पाहावें तो गुलाबाशिवाय दुसरें फूल दिसत नाहीं! खासगी बंगल्यांना किंवा घरांना आवार म्हणून गुलाबांचीं झाडें लावतात. आपल्याकडे श्रावणाच्या आरंभीं लाह्या भाजून देण्यासाठीं भडभुंज्यांच्या भट्टया जशा लागतात तशा गुलाबपाण्याच्या भट्टया क्वेट्यास लागतात आणि उच्च दर्जाचें सुवासिक गुलाबपाणी, गुलाबी अत्तर आणि गुलकंद इत्यादि बादशाही पदार्थ तेथे तयार होतात. कंदाहारकडून गुलाबफुलांच्या 'वाघिणी' भरून येतात तेव्हां तर शहरांत दुसरा वासच येत नाहीं. अफगाणिस्थानांतील गुलाब विशेष सुवासिक असतो.

क्वेटा येथें बदाम, आक्रोड, तुती यांचींहि झाडें असून इतर सर्व प्रकारचीं फळे त्या त्या मोसमांत पुष्कळ मिळतात. थंडींत क्वेट्यास सुमारें ४ महिने बर्फ असते. आणि तज्जन्य होणारा त्रास मनांत ठेवला नाहीं तर दिसणारी शोभा अवर्णनीय असते.

## क्वेट्याचें खरें नांव

क्वेटा हें नांव इंग्रजी भाषापटूंनीं अपभ्रष्ट केलें आहे! मूळचें नांव 'शाल' असें होतें. म्हणजे अंगावर घेण्याची शाल जशी सुंदर दिसते तसेंच हे नगर हिरव्या वृक्षराजीनें विभूषित झालें म्हणजे रम्य दिसे. पूर्वी अफगाणिस्थानाचा ताबा क्वेट्यावर होता आणि अठराव्या शतकाच्या अखेरीस अफगाणांच्या अमिराची व बलुचिस्थानाच्या खानाची सोयरीक झाली त्या वेळीं क्वेटा आंदण म्हणून कलाताधिपांस मिळालें. "क्वाता" म्हणजे किल्ला असा अर्थ ब्रहुई भाषेत आहे. "शाल कोट" म्हणजे शाल किल्ला असें चांगलें नांव असतां

शाल कोणी तरी हिरावून घेतली आणि नुसतें " क्वाता " " क्वाता " करूं लागले. त्याचा इंग्रजी ओजिरांनीं क्वेटा असा विपर्यास केला! हिंदींत आज " कोइटा " असेंच लिहितात.

क्वेटा येथें हुमायून दिल्लीहून पळून निघाला तेव्हां आला होता. अकबर बादशहा येथे असतांना १–१॥ वर्षांचा होता. त्याला आपल्या नातलगाकडे ठेवून पळपुटे मोंगल बादशहा पुढे गेले!

सर्व बलुचिस्थानाची व्यवस्था ब्रिटिशच पाहतात असें म्हणतां येते. हिंदुस्थानाचे प्रवेशद्वार म्हणून या प्रांताचे विशेष महत्त्व ओळखून इंग्रज मुत्सद्यांनीं तो पटकावला आहे. याच्याहि पुढे जाऊन कंदाहार इंग्रज अमलाखालीं असणें हिंदुस्थानाच्या संरक्षणाच्या दृष्टीनें आवश्यक आहे असे प्रतिपादण्यापर्यंत कांहीं व्हाइसरॉयांची मजल गेली होती! आणि स्टेट—सेक्रेटरींनीं नको म्हणून आज्ञा दिल्यामुळें व पुनः पुनः बजावल्यामुळे कंदाहार ताब्यांत आलेले अफगाण अमिरास परत द्यावे लागले!

अशा डोंगराळ व रानटी लोकांनीं भरलेल्या प्रांताचा राज्यकारभार करणें म्हणजे सर्पावर राज्य चालावेण्यापैकींच आहे. कोण कोठून आणि कसा सुटून जाईल हें कळावयाचे नाहीं. दंश होईल तोहि प्राणांतकच. तेव्हां ही बिकट परिस्थिति ओळखण्यासाठीं राज्यकर्त्यांनी योजलेले उपाय अभ्यासी दृष्टीने पाहणे अयोग्य होणार नाहीं.

एकंदर बलुचिस्थानाचे उत्पन्न सालिना सुमारे वीस लाख असून खर्च पाऊण कोटि रुपयांवर आहे. हा जास्त होणारा खर्च मध्यवर्ती सरकारच्या थैलींतून येतो. जमिनीचा सारा रुपयांत घेण्याची पद्धत हिंदुस्थानांत सर्वत्र असली तरी बलुची शेतकरी आपापल्या शेतांतील धान्यहि सरकारचा भाग म्हणून सरकारी कोठारांत नेऊन भरतात! जरूरीप्रमाणे त्याची वहिवाट लावण्याचें काम सरकारचे असतें. स्थानिक स्वराज्य संस्था म्हणजे क्वेट्याची एकटी म्युनिसिपालिटी. बाकी सर्व ठिकाणीं सरकारचा प्रत्यक्ष अंमल चालतो. " लेव्ही " पद्धतीने सरकारनें आपला कार्यभाग मोठ्या काव्यानें व धूर्ततेने पार पाडला आहे. प्रत्येक ठिकाणीं कांहीं " लेव्ही " ठरलेले असतात. त्यांना मासिक वेतन सरकाराकडून मिळालें तरी ते सरकारचें काम करण्यास २४ तास बांधलेले नसतात. अमुक भागांतून कोणी अधिकारी जावयाचा असेल तर त्या त्या लेव्हींना सूचना द्यावयाच्या. बाकीची सर्व व्यवस्था त्या लेव्हींकडे. टपाल पोहोचविणें, फरारी आरोपींचा शोध लावणें इत्यादि सर्व कामें लेव्हीकडे वांटून दिलेलीं असून प्रत्येकाचें कार्यक्षेत्र ठरविलें आहे. जिल्ह्यांत चोरी झाली किंवा दरवडा पडला तर त्याबद्दल सर्वस्वी जबाबदार तेथील लेव्ही. मग त्यांनी त्या गुन्हेगारांना पकडून तरी आणावें, नाहीं तर सरकार ठरवील तो दंड तरी द्यावा. अशानें " लेव्ही " संपूर्ण स्वायत्त आहेत असें कां म्हणूं नये?

## बाटलाबाईचा व आफिणीचा प्रसार

ब्रिटिशांच्या अमलांत " बाटलाबाई " चें साम्राज्य फार माजते ही गोष्ट आतां नव्यानें कोणास सांगावयास नको. इराक व पॅलेस्टाईन या मॅंडेटस्‌मध्येहि दारूचा सुकाळ करून ठेविला म्हणून कित्येक जबाबदार मुत्सद्दी इंग्लंडला दोष देत आहेत. जनतेंत मद्याचा फैलाव करून त्यांची शक्ति कमी करण्याचा आणि त्यांचा विरोध गुळांतच नाहींसा करण्याचा हा हेतु आहे असेहि म्हणण्यास कांहीं अधिकारी गृहस्थ कमी करीत नाहींत. ब्रिटिश अमलाखालच्या बलुचिस्थानांतहि तशाच प्रकारचा आरोप करतां येण्यासारखा आहे. बलुची प्रजा ही कडवी, राकट आणि क्रूर पडली. ती बाटलाबाईच्या आधीन बनून निःसत्त्व होत आहे. "अफू"चाहि खप एकदम जवळजवळ दुप्पट वाढला आहे. १९२६-२७ सालांत केवळ ३२७ शेर अफू खपली असतां पुढील वर्षी हा खप ६२३ शेरांवर गेला. अर्थात् हा वाढता आंकडा सरकारच्या लक्षांत आला नाहीं असें नव्हे. पूर्वी अफूचा भाव सवादोन ते अडीच रुपये शेर असा होता तो कायद्यानें सवा रुपया राहावा अशी व्यवस्था केल्यानें खप वाढला हें खरें, परंतु कायद्यानें अफूचा भाव उतरविण्यास तरी काय कारण, हा प्रश्न शिल्लक राहातोच. त्याचे उत्तर सरकारनें असें दिलें आहे कीं अफगाणिस्थानांतून गैरकायदा अफू येते तिला आळा पडावा म्हणून कायद्यानें किंमत ठरविणें भाग पडलें! एका वर्षांत सुमारें १३॥ शेर अफू गैरकायदा आयात होते. ही आपत्ति टाळण्यासाठीं किंमत उतरविल्यानें तीनशें शेर अफू जास्त खपूं लागली! राष्ट्रसंघाच्या बैठकींत अफूचें समूळ उच्चाटन करण्याच्या ठरावास दुजोरा द्यावयाचा आणि इकडे अशा प्रकारची कृति करावयाची या नीतिस काय म्हणावें! सर्वांत आश्चर्य वाटत असेल तें खालील बढाईचे :—

"बलुचिस्थानाच्या ताज्या वार्षिक अहवालांत पृ. २७ वर सरकार म्हणतें—"आमच्या लेव्हींमार्फत व इतर अधिकाऱ्याकरवीं, अफू मुलांना दिल्यानें काय दुष्परिणाम होतात याची जाणीव, प्रजेला करून देण्यांत आली आहे. अशा तऱ्हेची घातुक चाल प्रचलित असावी असें समजण्यास कांहीं पुरावा नाहीं. आणि अशा

प्रकारचें एकहि उदाहरण आमच्या नजरेस आलें नाहीं. " मग अफूचा खप वाढला कशासाठीं ? व तो इष्ट आहे का ? यांची चर्चा नको का करावयास?

एकंदर खर्च कोणत्या सदरांखाली काय प्रमाणांत होतो हें पाहण्यासारखें आहे. पाऊण कोटीपासून ते सुमारें एक कोटि रुपयांची विल्हेवाट अशी लागतेः—

| | | |
|---|---|---|
| राजकीय खर्च | शेकडा | १६–४ |
| सरहद्दसंरक्षण | " | २९–९ |
| पोलीस... | " | १२–३ |
| सरहद्दसंरक्षणाचीं कामें इमारती वगैरे | | १५–४ |
| | | ७४–० |

म्हणजे रुपयांतील सुमारें " बारा आणे" अशा राजकीय खर्चातच गेले. उरलेल्या रकमेंत

| | | |
|---|---|---|
| शिक्षण | शेकडा | ३–३ |
| आरोग्य | " | ३–३ |
| जमीनमहसूल | " | ३–२ |
| कारभाराची व्यवस्था | " | २–१ |
| किरकोळ | " | २–७ |

या रीतीनें खर्च चालतो आणि राष्ट्र–घटनेच्या खात्याची गळचेपी कशी होते हें दर्शविण्यास वरील प्रमाण पुरेसें आहे.

'बोलन घाट' हा अफगाणिस्थानांतून येण्याचा मार्ग याच भागांत असल्यानें लष्करी दृष्ट्या किती महत्त्वाची नाकेबंदी तेथें आहे हे पाहाण्यास क्वेट्याला रेल्वेंतून गेलें म्हणजे पुरे. प्रत्येक टेकडीवरील उच्च ठिकाणीं टेहळणीचें नाकें, पूल असल्यास तो बंद करण्यासाठी लोखंडी दरवाजे व त्याचें संरक्षण करण्यासाठीं थोडीं लष्करी माणसें, तारांचें जाळें, गुप्त पोलिसांचा सुळसुळाट इत्यादि गोष्टींवरूनच आपण एका लष्करी छावणींत शिरलों ही जाणीव स्पष्ट होते. क्वेट्यास " नुसतें जाऊन येऊं " म्हणून कोणी गेल्यास त्याला वाटेंतूनच परत फिरण्याची पाळी यावयाची. कारण कोण, कोठला, कशासाठीं आला, राजकीय चळवळ्या आहे कीं कसे ? या चौकशीच्या माऱ्यांतून सुटका झाल्यावरच प्रवास पुरा होऊं शकतो. गाडींतच गुप्त पोलीस तपास लावतात. आणि 'नको' असतील त्यास परस्पर परत पाठवितात. दुजदाब ते क्वेट्टा तीन सी. आय. डी. च्या अधिकाऱ्यांनीं तीन वेळां पासपोर्ट तपासल्यानंतर खुद्द क्वेट्यासहि सी. आय. डी. इन्स्पेक्टर नांव टिपून घेण्यास आलाच !

कलात हें जसें एक ब्रिटिशांच्या हातांतील स्वतंत्र बाहुलें आहे, तसेंच पण बोलूनचालून संरक्षणाखालीं आलेलें दुसरें एक संस्थान आहे. त्याचें नांव लासबेला आणि तेथील अधिपांस जामसाहेब म्हणतात.

## द्रविड भाषेचें बेट

ह्या दोनहि राजघराण्यांपूर्वी बलुचिस्थानांत हिंदु राजे राज्य करीत. सुमारें तीनशें वर्षांपूर्वी कलातचें राज्य हिंदूकडे होतें ! नादिरशहानें हिंदुस्थानावर स्वारी केली त्याच सुमारास हिंदु राजास पदच्युत करून एका पठाणी धनगराने राज्य बळकावलें तें त्याच्याच वंशांत चालत आहे. बलुचिस्थानांतील मुख्य भाषा 'ब्रहुई' ही दक्षिणेकडील तामीलशीं फार जमते. आणि ती द्रवीड भाषांपैकीं आहे असेंच तज्ज्ञ म्हणत आहेत. सिंधी, पंजाबी, फार्सी व पुश्तु भाषा " हिंदी–इराणी " ( इंडो-इराणियन ) वर्गातल्या असतां मध्यंतरींच हें द्रविड भाषेचें बेट कसें आलें याची कारणमीमांसा समाधानकारक रीत्या कोणासच देतां येत नाहीं. बलुचिस्थानाचें पूर्वीचें नांव " बोलेदिस्थान " असें असावें. बोलेदी जात तेथें अजून आहे. आपल्या इच्छेविरुद्ध विश्वामित्र आपणास मारहाण करून वसिष्ठाश्रमांतून घेऊन जातो ह्या उन्मत्तपणामुळें संतप्त झालेल्या " सुरधेनु नंदिनी "नें "पुच्छापासुनि केले प्रकट तिनें म्लेंच्छ यवन शबर शक " असें वर्णन आहे. त्यांतील " शक " लोक हे बलुचिस्थानांतीलच असें तज्ज्ञाचें मत आहे. " बेलू " म्हणून एक जुने अधिकारी अभ्यासी आहेत. ते म्हणतात की " नाग " आणि "गरुड" अशा दोन प्रकारचे लोक हिंदु पुराणांत वर्णिलेले आहेत. त्यांपैकीं " गरुड " प्रचलित कालीं बलुचिस्थानांत बदललेल्या स्वरूपांत–म्हणजे धर्म, जात धंदा बदलून गेल्यामुळें अगदीच निराळ्या स्वरूपांत–अवशिष्ट आहेत.

खनिज संपत्ति या प्रांतांत विपुल आहे; पण रेल्वेच्या साधनाभावीं तिची भूगर्भातून सुटका होणे कठीण झालें आहे. तरी कोळसा, क्रोमाईट हीं द्रव्यें सध्या बाहेर पडत आहेत.

क्वेट्टा ते चमन हा ९० मैल लांबीचा रेल्वेचा फांटा अफगाण सरहद्दीवर जाऊन पोहोचतो आणि सुमारें दोन मैल लांबीचा एक बोगदा याच रस्त्यावर आहे. सर्व हिंदुस्थानांत सर्वांत लांब असा हाच बोगदा असल्याचे अधिकारी सांगतात. मुंबईहून बोटीनें कराची व नंतर क्वेट्याला जाणारी गाडी किंवा बी. बी. सी. आय. मार्गानें मारवाड जंक्शनवरून सिंध–हैद्राबादमार्गानें क्वेट्टा असे दोन रस्ते बलुचिस्थानाच्या राजधानीस जाण्याचे आहेत.

# आमची लिपी व भाषा ठार होणार काय?

( लेखक—एक लष्करी तज्ज्ञ )

सेंट ऑगस्टाईन म्हणतो, "रोमन साम्राज्यसरकारानें आपलें राजकीय जोखड जिंकलेल्या लोकांच्या मानेवर बसविलें. इतकेंच नव्हे तर आपली भाषा सुद्धां त्यांच्यावर लादली. हिंदुस्थानांत मुद्धां हळूहळू हेंच घडून येत आहे. हिंदुस्थानांत कांहीं लक्ष माणसें इंग्रजी भाषा बोलतात. पण ही भाषा केवळ सरकारदरबारीं बोलावयाची भाषा न राहातां तिनें एकीकरणाचेंहि कार्य केले पाहिजे. रोमन साम्राज्याची सरहद्द ज्यांनीं वाढविली त्यापेक्षां रोमन लोकांच्या भाषेची सरहद्द वाढवितील. ते लोक अधिक श्रेष्ठ असें सीझरनें म्हटलें होतें. जो इंग्रज आपल्या भाषेचें व वाङ्मयाचें वैभव वरील प्रमाणें वाढवील तो सीझरनें दिलेल्या मानास पात्र होईल."

( मोर्लेचें हिस्टरी अँड पॉलिटिक्स हे पुस्तक पान ६७)

इंग्रज म्हटला म्हणजे येथूनतेथून सर्व एकाच जातीचा. ह्या न्यायानें पाहूं जातां हिंदुस्थानाचे एके काळीं सेक्रेटरी ऑफ स्टेट असलेले व हिंदुस्थानाला स्वराज्याचे पहिले हक्क देणाऱ्या कायद्याचे जनक मोर्लेसाहेब ह्यांचे वरील उद्गार फारच विचार करण्यासारखे आहेत. हिंदुस्थानांतील वाढत्या असंतोषास एकीकडे बांध घालून त्याच वेळी गुपचूप रीतीनें ह्या राजकीय असंतोषास कायमचे गाडून टाकून पुनः वर साळसूदपणाचा आव आणणाऱ्या अनेक इंग्रज गृहस्थांतच मोर्लेसाहेबांची गणना केली जाईल. सन १९०८ साली मोर्ले—मिंटो सुधारणारूपी कांहीं किरकोळ फेरफार सुचविले गेले, त्यां वेळीच रोमन-उर्दूरूपी एक निराळी पठाडी गोम सरकारानें आपल्या पोतडीतून बाहेर काढली.

इंग्रज लोक हे नेहमीं प्रत्येक गोष्ट दूरवर विचार करूनच करीत असतात हे कांहीं खोटें नाहीं. पारतंत्र्यानें जखडले गेलेले प्रत्येक राष्ट्र आज नाहीं उद्यां स्वातंत्र्यार्थ धडपड करणारच, त्याची साक्ष इतिहास देतच आहे. अर्थात् हिंदुस्थानाचा हा ऊर्जित दशेचा काल शक्य तितक्या दूरवर लोटणें हें इंग्रजांच्या फायद्याचेंच आहे. प्रत्येक राष्ट्राचे विशेष म्हणजे त्याची संस्कृति, भाषा, वाङ्मय, भूतकालाचा इतिहास वगैरे होत. तेव्हां हिंदुस्थानास पारतंत्र्यांत खितपत ठेवण्यास त्यांची पूर्वस्मृति, जसें उज्ज्वल भूतकाल, वाङ्मय, भाषा वगैरे नष्ट करणें हें ओघानेंच प्राप्त होतें. गेल्या ५० वर्षांच्या अनुभवावरून तरी इंग्रजांनीं हिंदुस्थानाचा भूतकालीन इतिहास व वाङ्मय ह्यांची कशी विल्हेवाट लाविली तिची पुनरावृत्ति करणेंच नको. असो. जेणेंकरून परतंत्र राष्ट्राच्या भावी आकांक्षा मारल्या जातील, त्या राष्ट्राची प्रजा दुर्बळ, हीन, स्वदेश, स्वधर्म वगैरे बाबतींत विचारशून्य व किंकर्तव्यमूढ राहील असेच उपाय त्यांचेकडून अमलांत आणले जातात हे उघड आहे. तरी जे त्यांचे हे असले प्रयत्न हाणून पाडणें व अशाच दुसऱ्या अनेक बाबी ज्या जेत्यांकडून योजिल्या जाण्याचा संभव आहे, त्याविषयीं डोळ्यांत तेल घालून राष्ट्रास जागें ठेवणें हे त्यांतील पुढाऱ्यांचे पहिलें व पवित्र कर्तव्य आहे.

### उर्दू भाषा व रोमन लिपी

केसरीच्या ता. ७।५।२९ च्या अंकांत संपादकीय स्फुटांत रोमन-उर्दू विषयींच्या सरकारच्या कारवाईची परिस्फुटता करण्याचा प्रयत्न केला गेला आहे. त्या वेळचे मुंबई इलाख्याचे गव्हर्नर विल्सन यांनीं या रोमन—उर्दू प्रश्नाचा तात्पुरता उल्लेख केलेला होता. त्याचप्रमाणें त्याच सुमारास मुंबईच्या टाईम्ससारख्या एका अँग्लो—इंडियन वर्तमानपत्रानें यावर एक अग्रलेख लिहून असें सुचविलें होतें कीं, सरकारनें रोमन-उर्दूऐवजीं हिंदी भाषाच उपयोगांत आणली अगर एकराष्ट्रीय भाषा म्हणून तिला उत्तेजन दिलें तर ते जास्त श्रेयस्कर होईल.

हिंदुस्थानांत अनेक जाती व अनेक भाषा आहेत. अर्थात् प्रत्येक भाषेची लिपीहि बहुधा निरनिराळी आहे. सरकारी रिपोर्टावरून असें दिसून येतें कीं, हिंदुस्थानांत हल्लीं प्रचलित अशा सुमारें दोनशें निरनिराळ्या भाषा आहेत. अर्थात् एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेच्या मार्गांतील ही एक मोठी धोंडच आहे. साधारणतः यांपैकीं बऱ्याच भाषा मूळ एकाच म्हणजे संस्कृत भाषेच्या कन्या आहेत. कमीजास्त फरकानें बहुतेकांची लिपीहि देवनागरी लिपीशीं सुसंगत अशीच आहे. ह्या दृष्टीनें पाहूं गेल्यास देवनागरी लिपी व हिंदी भाषा मिळून राष्ट्रीय भाषा म्हणून समजण्यास कांहींच हरकत नाहीं.

सरकारनें मात्र हा सरळ मार्ग सोडून रोमन-उर्दूचें एक नवीनच पिल्लूं उभारलें आहे. ह्यांतील सरकारी कावा बारकाईनें विचार करणाऱ्यांच्या तेव्हांच लक्षांत येईल. रोमन—उर्दूचा चंचुप्रवेश सरकारनें

प्रथमतः लष्करांत केला आहे; व त्यानंतर तो प्रयोग सर्वत्र करण्याचा सरकारचा प्रयत्न सुरू आहे. प्रथम रोमन-उर्दूचा प्रवेश लष्करी खात्यांत कोणत्या उपायानें करण्यांत आला तें पाहूं.

हिंदुस्थानांत रावळपिंडी, महू, कराची, शिकंदराबाद, पुणें, अहमदनगर, बेळगांव वगैरे ठिकाणीं सिग्नलिंग, मस्केट्री वगैरे विषयांचे विशेष शिक्षण देणाऱ्या शाळा आहेत. ह्या ठिकाणी निरनिराळ्या ठिकाणाहून लोक येतात. हिंदुस्थानांत एकदर १२० पायदळाच्या पलटणी व २१ घोडदळाच्या पलटणी असून शिवाय तोफखाना, सॅपर्स अँड मायनर्स, इंजीनियर्स वगैरे अनेक दळे आहेत. ह्या प्रत्येक दळांतून दरवर्षी चारसहा लोक निरनिराळ्या दळांत पाठविले जातात. तेथील सर्व शिक्षण रोमन–उर्दूत दिलें जातें. व ह्या परीक्षांत ते पास झाल्यास मगच त्यांस बढती मिळते. अशा रीतीनें केवळ पोटाच्या आशेनें हे गरीब शिपाई मातृभाषेचा गंधहि नसतां रोमन–उर्दूसारखी धड ना देशी धड ना परदेशी अशी तृतीय पंथीच भाषा शिकतात. किंबहुना त्यांस ही भाषा शिकणे खुषीच्या सक्तीनें भाग पाडलें जातें. अशा रीतीने रोमन–उर्दूचा प्रवेश झपाट्यानें व्हावा ह्या सदिच्छेने लष्करी अधिकाऱ्यांनी गणित, सिव्हिक्स, इतिहास, भूगोल, आरोग्य, इत्यादि विषयांवरील पुस्तकें मुद्दाम या लिपीत छापून प्रसिद्ध केलीं असून तीं लष्करांतील शिपायांस अभ्यासावयास दिलीं जातात. दूरवर विचार करणाऱ्यांस ह्या सरकारी प्रयत्नांचा परिणाम समजून आल्याशिवाय राहाणार नाहीं.

### रोमन-उर्दूचें बंड

आतां हे रोमन उर्दूचें बंड आहे तरी काय तें पाहूं. उर्दू ही भाषा पर्शियन व हिंदी ह्या दोन भाषांचे मिश्रणाने झालेली आहे. अर्थात् कोणतहि उर्दू शब्द हिंदी भाषेंत म्हणजे देवनागरी लिपीत व पर्शियन भाषेत म्हणजे उजवीकडून डावीकडे जाणाऱ्या फराट्यांनींहि लिहिला जाईल. सरकारनें मात्र भाषा-उर्दू कायम ठेवून देवनागरी व पर्शियन लिपी ह्याऐवजी रोमन म्हणजे A. B. C. D. इत्यादि अक्षरें घुसडून दिली आहेत. खास हिंदी फौजेंतील शिपाई लोकांकरितां निघणाऱ्या फौजीअखबार ह्या साप्ताहिक पत्राच्या प्रत्येक अंकांत ह्या रोमन-उर्दूमध्यें मुद्दाम कांही पानांचा मजकूर येत असतो. खाली दिलेला मजकूर फौजीअखबार वर्ष ४ अंक ४७ ( १९-११-२६ ) घेतलेला आहे.

Panjab men mahakma-i-pulis ke intizam ke mutalik jo report san 1926 ki babat chhapi hai us se malum hota hai kih yih mahakma am logon ke faidon ki hifazat our tarakki ke kam men barabar lana raha. ह्याचें देवनागरी लिपीमध्यें खालील वाक्य होईल:—

पंजाबमें महक्मा-इ-पुलीसके इंतिझामके मुतालिक जो रिपोर्ट सन १९२६ की बाबत छापी है, उस से मालुम होता है की यी महक्मा आं लोगोंके फायडोन की हिफाझत और तरक्कीके काममें बराबर लगा रहा.

ह्याचेंच इंग्रजी भाषांतर पुढीलप्रमाणें होईल:– The annual report on the working of the Police Administration in the Punjab for 1926, shows that the Department continued to exert itself in protecting and advancing the interests of the public.

रोमन-उर्दू ही काय चीज आहे ह्याची कल्पना वाचकांस कदाचित् येणार नाहीं म्हणून आपण मराठींतील एक वाक्य घेऊन त्याचे रोमन-मराठी करूं. उदाहरणार्थ, "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" हें मराठींतील वाक्य रोमन मराठीमध्यें "Swarajya ha maza janmasidha hakka ahe" असें होईल.

### अनियमित उच्चार व अनियमित स्पेलिंग

अशा रीतीनें रोमन लिपीचा प्रवेश हिंदी भाषांत झाला असतां जे अनंत तोटे होणार आहेत त्यांपैकी मुख्य म्हणजे अनियामित उच्चार व अनियामित स्पेलिंग हे होत. इंग्रजी भाषेंत रोमन लिपींतील a e वगैरे स्वरांचा उच्चार निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळा होतो. हा दोष आज बरेच वर्षांपासून इंग्रजी भाषाभिज्ञांच्या लक्षांत आला असून अमेरिकेमध्ये तर ह्या अनिश्चित उच्चारांस सुटसुटीतपणा व कांहींशी निश्चिती आणण्याची खटपट चालू आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास जर्मन भाषेतील शब्दोच्चाराप्रमाणें ठराविक स्वरांचे ठराविक उच्चार असे नियम रूढ करण्याकडे अमेरिकन लोकांची प्रवृत्ति आहे.

दुसरी गोष्ट अनिश्चित स्पेलिंगची. प्रथम असा प्रश्न उद्भवूं शकेल कीं स्पेलिंग उच्चाराप्रमाणें करावयाचें कीं, उच्चार स्पेलिंगाप्रमाणें करावयाचा? बेळगांव या नांवाचें स्पेलिंग Belgaum अगर Belgaon अगर Belgain अशा अनेक तऱ्हानीं होऊं शकेल. कारण काय तर आमचा उच्चार निराळा व साहेबाचा उच्चार निराळा. खडकीचा उच्चार साहेब लोक किरकी करून

स्पेलिंगहि Kirkee असें तृतीयपंथीय करतात! इंग्रजी भाषेत हल्ली असे बरेच शब्द आहेत कीं त्यांचे स्पेलिंग इंग्लंड व अमेरिका ह्या दोन देशांत निरनिराळे केलें जाते. उदाहरणार्थ, इंग्लडमध्यें इंग्लिशमधील लेबर ह्या शब्दाचें स्पेलिंग labour असें करतात, परंतु अमेरिकेत या अक्षरसमूहांतील u ह्या अनवश्यक अक्षराला फाटा देऊन लेबर ह्या शब्दाचें labor असे सुटसुटीत स्पेलिंग केलें जातें.

तेव्हां ह्या दृष्टीने पाहूं गेले असतां रोमन लिपी व देशी भाषा अशा धेडगुजरी प्रकारामध्ये अनंत अडचणी व खांचखळगे आहेत. अतएव ही भेडगुजरी भाषा अत्यंत टाकाऊ व नालायक अशी आहे, म्हणून वर उल्लेखिलेल्या राष्ट्र विघातक सरकारी धोरणाची शहानिशा करून ह्या उद्योग हाणून पाडणें हें आमच्या पुढाऱ्यांचें पहिलें कर्तव्य आहे असें आम्हास वाटतें. राष्ट्रभाषा हिंदी का उर्दू वगैरेसारखे प्रश्न अजून यावयाचेच आहेत. परंतु असले प्रश्न तूर्त बाजूला ठेवून हा रोमन–उर्दूचा प्रश्न सर्व हिंदी राष्ट्रास सारखाच जाचक आहे असे समजून सर्व लोकांनीं जाती, पोटजाती वगैरे न पाहातां एकमेकांस साह्य करून सरकारचा हा डाव हाणून पाडावा.

# मद्यपानाचे प्रचारक कोण?

हिंदुस्थानांतील लोकांच्या दारिद्र्याचीं जीं अनेक कारणें आहेत त्यांत मद्यपानाचा प्रसार हें एक प्रमुख कारण आहे. अनेक शासनसंस्था भारतवर्षांत होऊन गेल्या. परंतु त्यांपैकीं कोणींहि प्रजेला मद्यपानाचें घातुक व्यसन लावून व चारित्र्यहीन बनवून द्रव्यशोष केला नाहीं. इंग्रजी शासन हिंदुस्थानांत सुरू होतांच या बयेचा पाय इंग्रजाबरोबर हिंदुस्थानाला लागला व तिच्या जंजाळांत प्रजा सांपडून ती द्रव्यनाशाबरोबरच चारित्र्यहीनहि बनूं लागली. उत्तम उत्तम मद्ये विक्रीस येऊं लागली. मोठमोठ्या आकर्षक अशा जाहिराती सुंदर चित्रे घालून प्रसिद्ध होऊ लागल्या. इंग्रज लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वी ज्यांना मद्यप्राशन हे महापातकाप्रमाणे वाटत होते त्यांच्यात मद्यप्राशनाची लालसा जेणेकरून उत्पन्न होईल असे प्रयत्न सरसहा सुरू झाले. मद्य आदिकरून मादक पदार्थासंबंधीचा सर्व कारभार सरकारनें आपले हातीं घेतला. दारूचे मक्ते देण्यास सुरुवात झाली व आळोआळी मद्याची दुकाने उघडण्यांत येऊं लागली. या प्रकारामुळें दारू पिणें जेथे लोकाना माहीतहि नव्हतें तेथें मद्याचे पूर लोटूं लागले ही गोष्ट एकट्या इंग्रजांचीच नसून पाश्चात्य जाती जेथे जेथें जातील तेथे तेथे त्यांनीं आपल्याबरोबर आपल्या सहचारिणी वारुणीला नेलें आहेच. व त्यामुळे तेथील जनतेचे अपरिमित नुकसान झालें आहे.

**अमेरिकेंत मद्यप्रसार कसा झाला?**

युरोपियन लोक अमेरिकेत जाण्यापूर्वी तेथील लोकांना मद्याचें नांवहि माहीत नव्हतें. परंतु युरोपियनांचा पाय तेथे स्थिर होताच त्यांनीं मद्याच्या प्रसारास सुरुवात केली. सन १५३५ पासून त्यांनीं हा क्रम जारीने सुरू केला. तेथील मूळ रहिवाश्यांना मेजवानीस बोलावून नाना प्रकारचीं मद्यें त्यांना देण्यांत येत. हल्ली ज्या टापूवर न्यूयॉर्क शहर वसले आहे त्या टापूचे नांव मॅनहॅक्टनेक. याचा अर्थ 'या जागीं आम्ही सर्वांनीं मद्य प्राशन केले' असा आहे. मॅसाचुसेटच्या रेड इंडियनांस तर खुद्द पाद्री लोक मद्य पाजीत. स. १६२० मध्यें रेड इंडियनांचा एक सरदार पाद्र्यास भेटण्यास गेला असतां त्याला मद्य पाजून त्याचें स्वागत करण्यांत आलें.

अशा रीतीनें लोकांस मद्याची एकदां चटक लागतांच त्याचा प्रसार वाढत चालला. तेथें रेड इंडियन लोकांत मद्याचा प्रसार इतका जारीने होऊं लागला कीं, रेड इंडियनांच्या प्रमुखांस मद्यपानास कांहीं तरी आळा घालणे अत्यंत जरूर वाटूं लागलें. परंतु त्यांच्यानें हा मद्याचा ओघ थांबवेना तेव्हां त्यांनी मद्याविरुद्ध चालविलेल्या धर्मयुद्धांत आम्हास साहाय्य करा अशी वसाहत करणाऱ्याकडे याचना केली. मद्यपानाविरुद्ध चळवळ करणारामध्यें रेड इंडियनांतील पुढारी 'लिटल टर्टिल" नांवाने प्रसिद्ध होता. याने मद्यबंदीबद्दल पराकाष्ठा केली. त्या वेळेचा अध्यक्ष ॲडम्स यांजकडे जाऊन गोऱ्या लोकांनीं आमच्या हद्दीत दारू आणूं नये असा प्रतिबंध घालण्यास विनंति केली. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

पुढें लवकरच पाद्री लोकांची एक वार्षिक सभा भरली असतां तिजपुढें लिटल टर्टिलनें पुढील आशयाचें भाषण करून आपलें म्हणणें त्यांना ऐकविलें. "तुम्ही आमच्या लोकांत मद्याच्या रूपाने विषाचा प्रचार चालविला आहे. मद्याच्या प्रसारापासून आमची ज्ञातीच नष्ट होऊं लागली आहे. त्यामुळें आमच्यांत असे कित्येक रोग उत्पन्न

झाले आहेत कीं, त्यांचीं नांवेंहि आम्हास माहीत नाहींत. तुम्ही जर आमचे खरे हितकर्ते असाल तर ही बुद्धि भ्रष्ट करणारी वस्तु आमच्यांत आणूं नका. आम्हाला तलवार किंवा बंदूक यापेक्षांहि तिचें फार भय वाटतें. तिजमुळें आम्ही दरिद्री बनत चाललो. आमचीं बायकापोरें उपाशी व नग्न हिंडत आहेत." लिटल टर्टिलनें याप्रमाणें मद्यपानानें होणारी हानि सांगितल्यावर गोरे लोक रेड इंडियनांत मद्याचा प्रसार कसा करीत आहेत हें सांगितलें. "आमचे तरुण शिकार करून परत येऊं लागले कीं, त्यांच्या मार्गावर गोरे दारूवाले बसतात, थोडी तरी दारू घ्या,असा त्यांस आग्रह करतात.एकाच्या मोहां-तून तो शिकारी सुटलाच तर दुसरा दुकानदार पुढें असतोच. त्यांतूनहि तो सुटलाच तर तिसरा आपलें जाळें पसरून तयार असतो. यामुळें तो कोठेंना कोठें अडकतो, व एकदां दारूच्या प्याल्यांत सांपडला म्हणजे त्याला शुद्धबुद्ध राहातें कशाला! तो दारूच्या निशेंत पडला म्हणजे त्याची शिकार हिसकावून घेऊन त्यास हांकून द्यावा." लिटल टर्टि-लच्या या भाषणाचा अर्थातच कांहीं परिणाम झाला नाहीं. व अखेरीस रेड इंडियनांना मद्यप्रतिबंधासाठीं हातीं शस्त्र घ्यावें लागले. अमेरिकेंत गोरे लोक व रेड इंडियन यामध्यें झालेल्या या मद्यबंदी-युद्धांतच रेड इंडियन जास्त कामी आले आहेत.

अमेरिकेंत मद्याचा ज्या पद्धतीनें प्रसार करण्यांत आला तसाच गोऱ्या महानुभावांनीं आफ्रिकेंत हबशी लोकांत मद्यप्रसार केला. रोड बेटांत रम दारू घेऊन सहा जहाजे गेलीं व दारूच्या मोबदल्यांत एक जहाजभर हबशी गुलाम तेथून अमेरिकेंत नेण्यांत आले. व या दारूपायीं हा गुलामांचा व्यापार तेथें वाढला. युरोपियन लोक इतर जातींवर सत्ता स्थापित करतांना जे अनेक बरेवाईट उपाय योजतात त्यां-पैकीं मद्यप्रसार हा एक आहे.

## हिंदुस्थानांत मद्याचा प्रसार

हिंदुस्थानांत इंग्रजी अमदानीपूर्वी मद्याचा प्रसार नव्हता हें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. हिंदूंच्या धर्मग्रंथांतून मद्यपान हें तर महापातकांतच गणलें गेलें आहे. हिंदूंप्रमाणेंच मुसलमानी धर्मांत मद्यपान निषेधार्ह मानलें जातें. परंतु इंग्रजी सत्ता येथें झाल्यापासून वारुणी देवी हिंदुस्थानभर थैमान घालूं लागली. स. १८७४ सालीं बंगालचे प्रसिद्ध पुढारी केशव चंद्र सेन यांनीं असे स्पष्ट उद्गार काढले आहेत कीं, अमली दारूनें माझ्या देशबांधवांचें शारीरिक, नैतिक व सामाजिक दृष्ट्या जितकें नुकसान केलें आहे तितकें कशानेंहि झालें नाहीं. याला कारणें देतांना दारूदुकानांची भरभराट व वाढ हें एक कारण त्यांनी दिलें आहे.

मद्यपानासंबंधी अशी हाकाटी सुरू झाली. पुढें १८८९ मध्यें कॉमन्स सभेंत सर लॉवर लेथब्रिज यांनी हिंदुस्थानांत मद्यपानप्रतिबंधाला कायद्यानें पूर्ण बंदी केली तरी हिंदी लोकांना पाहिजे आहे अशा अर्थाचें स्पष्टोक्तिपूर्ण भाषण केलें. त्याचा परिणाम असा झाला कीं कॉमन्स सभेनें ता. ३० एप्रिल १८८९ रोजी पुढील आशयाचा ठराव केला:—

"हिंदुस्थानसरकारच्या आर्थिक धोरणामुळें हिंदु-स्थानांत दारू गाळण्याचे कारखाने जास्त निघूं लागले व लोकमत विरुद्ध असतांहि पूर्वी नसलेल्या ठिकाणीं दारूचीं दुकानें उघडली जात असल्यानें लोकांत मद्यपानाचा प्रसार वाढत चालला आहे व त्यामुळें लोक दरिद्री होत आहेत. तेव्हां हिंदुस्थान-सरकारनें मद्यपानाला आळा घालण्याची त्वरेनें व्यवस्था करावी." पार्लमेंटानें असा कायदा केल्यावर हिंदुस्थानसरकारने यासंबंधीं चौकशी केली व असें ठरविलें कीं दारूवर जास्त कर वाढवावा. दारूचा व्यापार पोलीसनियंत्रणाखाली चालवावा. दुकानांची संख्या मर्यादित करावी, व ज्या भागांत दारूदुकान खोलावयाचें तेथील लोकमत अजमावून पाहून मग तेथें दुकान घालणें न घालणें ठरवावें."

## मद्याचें वाढतें उत्पन्न

परंतु या कागदी देखाव्यानें मद्यपानप्रसाराला काडीचाहि आळा बसला नाहीं. दिवसानुदिवस अबकारीचें उत्पन्न वाढूंच लागलें. कसें तें पाहा. स. १८६१=१ कोटि ५० लक्ष; १८७४=२ कोटी २० लक्ष; १८९९=५ कोटी ५० लक्ष; १९०५=८ कोटी १० लक्ष; १९१३=१२ कोटी ७५ लक्ष; १९२०=१९ कोटी २४ लक्ष व १९२८=२०५७३५१०० रु. आंकड्यांवरून मद्याचा प्रसार कसा होत आहे याची यथार्थ कल्पना येईल.मद्यप्रसार ही उत्पन्नाची मोठीच बाब होऊन बसल्यानें त्याचें समर्थन करतांना पानस्वातंत्र्याचा पोकळ मुद्दा पुढें करण्यांत येतो. प्रथम ज्या लोकांना मद्यपानाचा गंधहि नव्हता त्यांना चटक लावावयाची व नंतर पान-स्वातंत्र्याच्या नांवाखालीं त्याचा प्रचार करावयाचा ही अत्यंत कुटिल व निंद्य नीति आहे. पानस्वातंत्र्याबद्दल सरकारास इतका ऊत येण्याजोगा कळवळा यावा व त्यासाठीं गल्लोगल्ली दुकानें उघडावीं हें जर योग्य ठरतें तर याच स्वातंत्र्याच्या भोक्त्या सरकारनें इतर स्वातंत्र्यांवर कां गदा घालावी?

सन १९०५ मध्यें फायनॅन्स खात्यानें दारू-धोरणासंबंधानें एक खलिता प्रसिद्ध केला. त्यांतहि

पानस्वातंत्र्याची महती गायिली असून लोकांनीं जास्त मद्यप्राशन करूं नये म्हणून दारूवर जास्त कर बसविण्यांत येईल, दारूच्या दुकानांची संख्याहि मर्यादित करण्यांत येईल व लोकमत अजमाविण्यांत येईल असें जाहीर करण्यांत आलें. परंतु मद्याच्या बाबतींत लोकमताचा वारा कोणत्या दिशेनें वाहातो याचें ज्ञान सरकारास नाहीं असें थोडेंच आहे. खुद्द पुण्यास कांहीं वर्षांपूर्वी मद्यपानाला अनुकूल-प्रतिकूल किती लोक आहेत याबद्दल लोकमत घेण्यांत आलें होतें व त्या वेळीं मद्यपानप्रतिबंधाला लोकमत प्रतिकूल असतांहि शहरांत आजतागायत दारूचे गुत्ते आहेतच कीं नाहींत? जी पुण्याची स्थिति तीच इतरत्रहि.

यावरून मद्यपानासंबंधानें सरकारचें धोरण कसें आहे तें ध्यानीं येईल. असें असतांहि सरकार नेहमीं दडपून असें म्हणत असतें कीं लोक दारू पितात तें त्यांच्या घरच्या गरजा पूर्णपणें भागल्यावर त्यांच्या शिलकी पैशांतून दारू पितात. म्हणजे लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारत चालली आहे. स. १८८४ सालीं बंगाल एक्साईज कमिशनपुढें साक्ष देतांना श्री. केदारनाथ रॉय यांनीं या विधानाबद्दल सरकारची चांगली हजेरी घेतली आहे.

बाह्यतः मितपानाचा पुरस्कार करण्याचा आव आणावयाचा, परंतु प्रत्यक्ष तशी कोणी चळवळ करूं लागतांच पानस्वातंत्र्याच्या नांवाखालीं दंड शिक्षा इत्यादि आसुरी उपाय योजण्यास माघार घ्यावयाची नाहीं ही प्रस्तुतच्या नोकरशाहीची रीत आहे.

यासंबंधांत लोकमत थोडथोडें जागृत होऊं लागलें आहे. टेम्परन्सचीं शिष्टमंडळें १९०७ व १२ सालीं भारतमंत्र्यांना व १९१३ सालीं व्हाइसरॉयांना भेटलीं. परंतु त्यांचा कितपत उपयोग झाला हे वरील आंकडेच सांगतील. प्रांतिक कायदेमंडळांतहि मधून मधून या संबंधांत थोडी हालचाल होते. परंतु सर्व सत्ताधीश सरकार मद्यपानाचे पुरस्कर्ते असल्यानें या व्यसनास आळा पडत नाहीं. पुढील प्रांतांत मागील सालीं दारूचें उत्पन्न किती झालें हें पाहिलें असतां वरील विधानाची यथार्थता वाचकांस पटेल.

| प्रान्त. | दारू उत्पन्न. | एकंदर उत्पन्न. |
|---|---|---|
| मुंबई | ४ को. रु. | १२ को. ३६ ल. ४३ ह. |
| मद्रास | ४ को. ९८ ल. २४ ह. | २१ को. ३२ ल. १९ ह. |
| बंगाल | २ को. ३॥। लक्ष | १० ,, ७१ ,, ,, ,, |
| सं. प्रान्त | १ को. ८१ लक्ष ९ ह. | १० ,, ८५ ,, २३ ह. |
| पंजाब | २ को. ९ लक्ष ६ ह. | ५ ,, ५७ ,, |
| बर्मा | १ को. २१ लक्ष | ९ ,, ३१ ,, |
| बिहार–ओरिसा | १ को. ९७ ल. ५० ह. | ७ को. ७८ ल. २६ ह. |
| मध्यप्रात | १ को. ४८ ल. १४ ह. | ५ को. २१ ल. १८ ह. |
| आसाम | ७१ ल. ८५ ह. | २ को. ५६ ल. ५ ह. |

यावरून सरकारला दारूचें उत्पन्न किती मोठें आहे हें दिसून येईल. कित्येक प्रांतांत तें शेकडा ३३ तर कित्येकांत तें शे. ३५ आहे. व हें सर्व उत्पन्न कसें मिळतें तर लोकांना निशेंत लोळवून त्यांना बुद्धिभ्रष्ट करून त्यांचें जीवनसुख नष्ट करून व त्यांच्या कच्चाबच्च्यांना भुकेनें तडफडत ठेवून!

वरील रकमेंत सरहद्द प्रान्त अजमीर कुर्ग इत्यादि प्रांतांचे आंकडे त्याचप्रमाणें विदेशी दारूच्या करावरील सरकारला मिळणारा पैसा धरला नाहीं. विदेशी दारूवर शें. ७॥ विलायती सुगंधी दारूवर शें. १५ व शाम्पेनवर शे. ९ याप्रमाणें कर आहे तो वेगळाच.

मुंबई येथें १५ रोजीं भरलेल्या टेम्परन्स परिषदेचे अध्यक्ष सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास यांनीं हिंदुस्थान निर्मद्य झाल्याखेरीज तरणोपाय नाहीं असा आपला स्पष्ट अभिप्राय दिला आहे तोच सत्य आहे. कॉंग्रेसने आपल्या कार्यक्रमांत मद्यपानप्रतिबंधाची चळवळ करणें हा एक मुख्य भाग योजिला असून तें खातें श्री. चक्रवर्ती राजगोपाळाचारियर यांचे स्वाधीन केलें आहे. मनुष्याची बुद्धि ठिकाणीं राहिली तर कसल्याहि चळवळी करतां येतील. परंतु मद्याच्या अंगीं बुद्धि भ्रष्ट करण्याचेंच आसुरी सामर्थ्य असल्यानें त्याचें उच्चाटन शक्य त्या रीतीनें करणें प्रत्येक हिंदवासीयाचें कर्तव्य आहे.

# बार्डोलीच्या चौकशीचा निष्कर्ष

बार्डोली तालुक्यांतील रिव्हिजन सेटलमेंट-मध्यें, खेड्यांची वर्गवारी करतांना व दर ठरवितांना कसा गोंधळ उडाला, आणि कित्येक खेड्यांची इकडून तिकडे तिकडून इकडे कशी उचलबांगडी झाली तें पुढील तपशिलावरून दिसून येईल.

**हेलकावा नं. १**

सेटलमेंट कामगार मि. **जयकर** यांच्या सूचना—

(अ) अफवा, अकोली, बामणी, भरमपूर, गोटासा, कंटाली, खोज, पलसोड, पार्डीकरोड, रुवा, संठण, सरेठी, वांकानेर हीं गांवें प्रत नं. २ मधून वर चढवून प्रत नं. १ मध्यें घालावीं.

(आ) चित्रा, खराड, कुवाडिया हीं गांवे प्रत नं. १ मधून खालीं ढकलून प्रत नं. २ मध्यें घालावीं.

(इ) कंमलछोड, माढी, माणेकपूर, सुरली हीं गांवें प्रत नं. ३ मधून वर चढवून प्रत नं. २ मध्यें घालावीं.

(ई) बुहारी, ददारिया, देगमा, गोढ्ढा, गोलन, हाथूका हीं गांवें प्रत नं. ४ मधून वर चढवून प्रत नं. ३ मध्यें घालावीं.

वरील प्रतवारी भातजमीन व वरकस दोहोंलाहि सारखीच लागू आहे.

**हेलकावा नं. २**

सेटलमेंट कमिशनर मि. **अंडरसन** यांच्या सूचना—

**वरकस जमिनीच्या बाबतींत—**

(अ) चित्रा, खराड व कुवाडिया हीं गांवें प्रत नं. १ मध्येंच कायम ठेवावीं.

(आ) अकोली, भरमपूर, कंटाली, खोज, पलसोड, पार्डीकरोड, रुवा, संठण, वांकानेर, भामैया, भटलामोटी, फालोदमोटी, मंग्रोळिया, टिंबर्वा, उच्छ्रेल, वाघेचा-कडोड हीं गांवें प्रत नं.२ मधून वर चढवून प्रत नं.१ मध्यें दाखल करावीं.

(इ) इसरोळी, पाती, ताजपूरबुराग हीं गांवें प्रत नं. १ मधून खालीं ढकलून प्रत नं.२ मध्यें घालावीं.

(ई) अल्ल, पेलवाडा, नागला, पावरण, स्यादला, तिटवा, हीं गांवें प्रत नं. ३ मधून चढवून प्रत नं. २ मध्यें घालावीं.

(उ) बुहारी, ददारिया, देगमा, बाहेज, दुमखळ, कंजोड, कसवाव, कोसंबई, कुंभिया, मोरदेवी हीं गांवें प्रत नं. ४ मधून प्रत नं. ३ मध्यें चढवावीं.

**भात जमिनीच्या बाबतींत—**

(अ) अफवा, भटला–मोटी, गोडासा, खोज, पार्डीकरोड, टिंबर्वा ही गांवें नं. २ मधून नं. १ मध्यें घालावीं.

(आ) अंचेली, बबला, भुवसन, चिचा, गोजी, गोसर्डा, इसरोली, खराड, कुवाडिया, राजपूर–लेभा हीं नं. १ मधून नं. २ मध्यें खालीं ढकलावीं.

(इ) अकोली, बामनी, भामैया, भरमपूर, फालोद–मोटी, हरीपुरा, कळसद, कंटाली, पळसोद, रुवा, संठण, उच्छ्रेल, वाघेचा–कडोद, हीं गांवें नं. २ मधून नं. ३ मध्यें घालावीं.

(ई) अगासिया, अंबच, बाहेज, भीमपूर, बुहारी, पदारिया, देगामा, दुमखळ, गोढ्ढा, हाथुका, कंजोड, कसवावा, कोसंबई, कुंभिया, मोरदेवी, नलोन, नलोथा, पेलाड–बुहारी, वेडची हीं गांवे नं. ४ मधून नं. ३ मध्यें वर चढवावीं.

(उ) भटला–मानी, बेलढा, भेसुडला, मियावडी, ओर्गम, पवराम, सिंगाड, वढवानिया, वालोद ही गांवें नं. ३ मधून नं. ४ मध्यें टाकावीं.

**हेलकावा नं. ३**

**कमिशनरचा** रिपोर्ट सरकारकडे गेल्यानंतर ता. १९ जुलै १९२७ रोजीं सरकारनें जो ठराव प्रसिद्ध केला त्यांत कमिशनरनें शिफारस केल्याप्रमाणेंच सगळी वर्गवारी कायम केल्याचें जाहीर केलें. परंतु बार्डोलींत सत्याग्रहाची चळवळ सुरू होतांच कलेक्टरनें रयतांच्या तक्रारी ऐकून जो रिपोर्ट केला त्यावर ता. ३० मार्च १९१८ रोजीं सरकारी ठराव प्रसिद्ध झाला. त्यांत **सरकारनें** गांवांच्या वर्गवारींत पुढील फेरबदल केले —

**वरकस जमीन**

(अ) चित्रा, खेड, कुवाडिया, टिंबर्वा हीं गांवें नं. १ मधून नं. २ मध्यें ढकलावी.

(आ) देलवाडा व पवरण हीं नं. २ मधून नं.३ मध्यें टाकावीं.

(इ) दुमखळ व मोरदेवी हीं गांवें नं. ३ मधून नं. ४ मध्यें ढकलावीं.

**भात जमीन**

(अ) अगाशीया, अंबच, बाहेज, दुमखल, कंजोड, कसवा, कोसंबई, कुंभिया, मोरदेवी, नलोन, नलोठा, पेलाडबुहारी, वेडची हीं गांवें नं. ३ मधून नं. ४ मध्यें ढकलावीं.

या **सगळ्या गोंधळाचा निष्कर्ष** असा निघाला कीं, वरकस जमिनींतलीं १६ गांवें नं. २ मधून नं. १ मध्यें गेलीं व ६ गांवें नं. १ मधलीं नं. २ मध्यें आलीं. ८ गांवें नं. ३ मधून नं. २ मध्यें गेलीं आणि नं. ३ मधलें एकहि गांव नं. ३ मध्यें खालीं आलें नाहीं. त्याचप्रमाणें ८ गांवें नं. ४ मधून नं. ३ मध्यें आली, पण उलट एकहि गांव नं. ३ मधून खाली नं. ४ मध्यें आलें नाही.

भात जमिनीत १० गांवें नं.१ मधून खालीं नं.२ मध्ये गेलीं व ६ गांवें नं. २ मधून वर नं. १ मध्यें चढलीं. १३ गांवें नं. २ मधून नं. ३ मध्ये ढकलली गेलीं. ५ गांवें नं.४ मधून वर न.३ मध्ये चढविण्यांत आलीं, आणि ९ गांवें नं. ३ मधून नं. ४ मध्ये खालीं ढकलण्यांत आलीं.

## वर्गवारीवरून साराआकारणी

हा झाला वर्गवार्ढाचा गांधळ ! आतां **दर ठरविण्याचा गोंधळ** पाहा.

### जमिनीचे दर

| बागाईत | जुने दर रु. आ. | जयकर रु. आ. | अंडरसन रु. आ. | सरकार रु. आ. |
|---|---|---|---|---|
| नं. १ | ११–० | ११–० | ८–० | ८–० |
| नं. २ | १०–० | १०–० | ७–० | ७–० |
| नं. ४ | ७–० | ७–० | ५–० | ५–० |
| भा.ज.नं.१ | १२–० | १५–० | १५–० | १५–० |
| न. २ | १०–८ | १३–२ | १३–२ | १३–२ |
| नं. ३ | ९–० | ११–४ | ११–४ | ११–४ |
| न. ४ | ७–८ | ९–६ | ९–६ | ९–६ |
| जि.ज.नं.१ | ६–० | ७–८ | ८–० | ७–४ |
| नं. २ | ५–० | ६–४ | ६–८ | ६–० |
| नं. ३ | ४–० | ५–० | ५–४ | ४–१२ |
| नं. ४ | ३–० | ३–१२ | ३–१२ | ३–१० |

### कमिटीनें केलेला फेरफार

कमिटीला वरच्या कोणत्याच सूचना पसंत न पडल्यानें तिनें निराळीच वर्गवारी केली. पहिला फरक हा केला कीं, चार वर्गाच्या ऐवजी पांच वर्ग केले. त्यांत जुन्या वर्गवारीतले कोणतेंहि गांव वरच्या वर्गांत दाखल केलें नाहीं. उलटपक्षीं पहिल्या वर्गातलीं चित्रा, इसरोली, खरड, कुवाडिया, पाठी, ताजपूर हीं सहा गांवें दुसऱ्या वर्गांत ढकललीं. दुसऱ्या वर्गातलीं भतलावमोटा, करचका, किकवाड, पिपारीया, आणि वढाव हीं पांच गांवें तिसऱ्या वर्गांत टाकलीं. आणि तिसऱ्या वर्गांतलीं राहिलेलीं १२ गांवें आणि चौथ्या वर्गांतलीं अंबच, देगाम व वेडची हीं तीन गांवें मिळून चौथा वर्ग केला. आणि चौथ्या वर्गातली शिल्लक राहिलेलीं २७ गांवें पांचव्या वर्गांत दाखल केलीं.

### दरांत केलेले फरक

नंबर १ च्या भात जमिनीला जुना दर १२ रुपये होता. सेटलमेंट ऑफिसरापासून सर्वांनींच हा दर वाढवून १५ रु. केला होता. कमिटीनें तो पुनः १२ रु. केला. मुंबईसरकारनें ठरविलेल्या दरांत कमिटीनें किती फरक केला तें पुढील कोष्टकांत दर्शविलें आहे—

| जमिनीचा प्रकार | | सरकारनें ठरविलेला दर | कमिटीनें ठरविलेला दर |
|---|---|---|---|
| बागाईत | न. १ | ८–० | ८–० |
| ,, | नं. २ | ७–० | ७–० |
| ,, | नं. ३ | ५–० | ५–० |
| भात जमीन | न. १ | १५–० | १२–० |
| ,, | नं. २ | १३–२ | १०–० |
| ,, | नं. ३ | ११–४ | ८–८ |
| ,, | नं. ४ | ९–६ | ७–८ |
| ,, | नं. ५ | नाहीं | ६–८ |
| जिराईत | नं. १ | ७–४ | ६–८ |
| ,, | नं. २ | ६–० | ६–८ |
| ,, | नं. ३ | ४–१२ | ४–१२ |
| ,, | न. ४ | ३–१० | ४–० |
| ,, | न. ५ | नाहीं | ३–४ |

बागाईताच्या दरांत मात्र कमिटीने फरक केला नाहीं. कारण सबंध बार्डोली तालुक्यांत बागाईत जमीन ५।४ गांवांतच आहे, व तीहि फार थोडी आहे. भातजमिनीच्या प्रत्येक वर्गाचा दर कमिटीने उतरविला आहे, आणि जिराईत जमिनीतहि नं. ४ च्या वर्गाखेरीज बाकीच्या सगळ्या वर्गांचे दर उतरविले आहेत.

सेटलमेंटच्या प्रतवारीमुळे व वाढत्या दरामुळें कांहीं गांवांतून दुहेरी वाढ झाली होती; म्हणजे वर्गवारीत वरच्या वर्गांत टाकल्यानें झालेली वाढ आणि त्या वर्गाचा दर पूर्वीपेक्षा अधिक केल्यानें झालेली वाढ ! कमिटीनें अशी दुहेरी वाढ कोठेहि होऊं दिली नाहीं.

### सेटलमेंट पद्धतींतले दोष

सेटलमेंट ऑफिसर मि. जयकर आणि सेटलमेंट कमिशनर मि. अंडरसन यांनी सुचविलेली वर्गवारी आणि वाढविलेले दर ब्रमफील्ड कमिटीनें अमान्य कां केले यासबंधानें कमिटीच्या रिपोर्टांत जे विवेचन केलें आहे त्यांतले महत्त्वाचे मुद्दे—

१ एखादें गांव खालच्या प्रतवारीतून वरच्या प्रतवारींत घालण्यापूर्वी तेथील शेतीच्या स्थितींत सुधारणा झाली आहे हें सिद्ध करण्याचा बोजा सेटलमेंट कामगारावर असतो.

२ बार्डोली तालुक्यांत दळणवळणाचीं साधनें वाढलीं नाहींत. तापी व्हॅली रेल्वे झाली खरी; परंतु ती रेल्वे होणार म्हणून १८९६ च्या सेटलमेंटच्या वेळीं आगाऊच सारा वाढविला होता याकरितां तो आतां पुनः वाढवितां येत नाहीं.

३ तालुक्यांतील सडका सुधारण्याच्या ऐवजीं अधिक बिघडल्या आहेत.

४ मोटारींची रहदारी सुरू झाल्यामुळे शेतकऱ्यांचे उलट नुकसानच झालें आहे. शेतकऱ्यांना गाडी-

भाडें मिळत नाहीं, व गवताला मागणी येत नाहीं.

५ जिन्सची संख्या वाढण्या ऐवजीं उलट कमी झाली आहे.

६ जयकर आपल्या रिपोर्टांत लिहितात कीं, गवताची निर्गत वाढली आहे. कमिटी म्हणते, गवताची निर्गत क्वचितच होते. उलट शेतकऱ्यांना बाहेरून गवत आणावें लागतें!

७ धान्याचे दर वाढले आहेत, पण त्याबरोबरच मजुरीचे दर वाढल्यामुळें शेतीचा खर्च वाढला म्हणून सारा अधिक करण्याच्या ऐवजीं तो कमीच केला पाहिजे.

८ जननसंख्या वाढली आहे, पण त्या मानानें लोकसंख्या वाढली नाहीं; यावरून येथले लोक परठिकाणीं अधिक जातात असे दिसतें व हें भरभराटीचें लक्षण नव्हे.

९ नवीं घरे बांधलीं गेलीं; पण तीं शेतीच्या नफ्यांतून बांधलीं नसून दक्षिण-आफ्रिकेतून पैसा मिळाविलेल्या लोकांनीं बांधलीं.

१० शेतीचीं जनावरें १९०४ सालापेक्षां वाढलीं आहेत;परंतु १८९४-९५सालापेक्षां तीं कमीच भरतात

११ शेतीच्या उत्पन्नाचा म्हणजे धान्याचा किंवा कापसाचा व्यापार वाढला नाही, उलट तो कमी झाला आहे. दूध व तूप यांचा व्यापार मात्र वाढला आहे. त्याचप्रमाणें म्हशींची संख्याहि वाढली आहे, परंतु हा नफा शेतीच्या उत्पन्नांत धरावा काय हा प्रश्नच आहे.

१२ मध्यंतरीं कापसाचा भाव तेजीचा झाला, पण आतां तो मंदीचा झाला आहे व मध्यंतरींच जी तेजी झाली तीमुळें शेतकऱ्याच्या कल्याणापेक्षां अकल्याणच अधिक झालें आहे.

१३ तांदळाचा हल्लींचा भाव १९१४ मधल्या भावाच्याच जोडीला येऊन ठेपला आहे त्यामुळे भात जमिनीवर दर वाढविणें अयोग्य आहे.

१४ जयकर यांनी खंडाचे जे आंकडे घेतले त्यांत हिशेबांत न घेण्यासारखे आंकडे कोणते याची छाननी केली नाहीं.

१५ खंडचिठ्यांत लिहिलेला खंड हा नुसता खंडच नसून त्यांत इतर अनेक बाबींचा समावेश झालेला असतो म्हणून त्यांची छाननी केल्याशिवाय त्यावरून शेताचा मगदूर ठरविणें चुकीचें ठरेल.

१६ खंडचिठींत नमूद केलेला सगळा खंड जमिनीच्या मालकास मिळतोच असें नाहीं.

१७ बार्डोली तालुक्यांत १३७ व चोराशी तालुक्यांत ७६ गांवें आहेत. इतक्या गांवांतील खंडचिठ्यांची व जमिनीच्या खरेदीविक्रीच्या किंमतीची जयकर यांनीं ३ महिन्यांत स्वतः चौकशी कशी केली हे एक गूढच आहे. आम्ही ज्या ७० गांवांत चौकशी केली त्यांतल्या एकाहि गांवांत जयकरांनीं समक्ष चौकशी केल्याचे आढळून आले नाही.

१८ सेटलमेंटच्या रिपोर्टांत जीं कोष्टकें दिलीं आहेत ती तलाठी व सर्कल इन्स्पेक्टर यानीं तयार केलीं आणि त्यांची अव्वल कारकून किंवा सेटलमेंट ऑफिसर यांनीं मुळींच तपासणी न करतां तीं कोष्टके रिपोर्टांत दिलीं गेलीं.

१९ ब्रिस्टा यांनी चाळिसगांव व पाटण या तालुक्यांच्या सेटलमेंट रिपोर्टांत लिहिलेला बराच मजकूर जयकर यांनीं आपल्या रिपोर्टांत अक्षरशः उतरून घेतला आहे !

२० नानसद गांवांत अवघा एक नंबर खंडानें दिलेला जयकर यांस आढळला. ती खंडचिठीहि खरी शेतसाऱ्याची नसून व्याजाच्या फेडीची होती! आणि असल्या एका खंडचिठीवरून त्यांनीं तो सबंध गांव वरच्या वर्गांत ढकलला.

२१ सेटलमेंट ऑफिसरांनी खंडचिठ्यांवर विसंबून राहूं नये असा १९१० साली व १९१९ साली सरकारनें ठरावरूपाने इषारा दिला असून जयकर व अंडरसन यांनी सर्वस्वी खंडचिठ्यांवर अवलंबून ही सेटलमेंट केली आहे.

२२ या तालुक्यांतील किती जमीन खंडानें दिली जाते यासंबंधाचे जें कोष्टक दिलें आहे त्यांत सात वर्षांचे मिळून आंकडे दिले असतां ते आंकडे एकाच वर्षाचे आहेत असें समजून चालण्यांत अंडरसन यांनीं घोडचूक केली आहे.

२३ अमरोली गांवांतल्या खंडानें दिलेल्या जमिनींचे जे आंकडे कोष्टकांत दिले आहेत ते आंकडे त्या गांवांतल्या एकंदर जिराईत जमिनीच्या तिप्पट आहेत. यावरून तरी आपली चुकी अंडरसन यांच्या लक्षांत यावयास हवी होती.

२४ मोहनी गांवांतल्या ७९.३ एकरांतून सहा वर्षांत अवघी १८ एकर जमीन खंडानें लागवडीस दिली होती. पण तेवढ्या खंडचिठीवरून अंडरसन यानीं हा गांव ४ थ्या वर्गांतून २ ऱ्या वर्गांत घातला.

२५ चाळीस खंडचिठ्या तपासून पाहिल्यास त्यांतल्या २५ खंडचिठ्या विचारांत घेण्याच्याच लायकीच्या नसतात आणि बाकीच्या १५ तहि बराचसा भाग कोणत्याना कोणत्या कारणानें निरुपयोगी ठरतो.

२६ जयकर व अंडरसन यांनीं खेड्याची प्रतवारी कोणत्या तत्त्वावर केली याचा पत्ताच लागत नाहीं. ज्या वेळीं जें तत्त्व सोयीचें दिसलें तें पुढे करण्यांत आलें आहे.

२७प्रतवारी ठरविण्यांत हवा व पाणी यांचा

कांहीं संबंध नाहीं असें ते एके ठिकाणीं म्हणतात, पण लगेच ओरगम व टिंबर्वा यांच्या मधल्या गांवांची प्रत ठरविण्याला हवा व पाणी हेंच कारण ते पुढें करतात!

२८ भूबसम गांवाच्या खंडमगदुराची सरासरी छापतांना २३ च्या जागीं १३ हा आंकडा चुकून छापला गेला. आणि त्या चुकीच्या आंकड्यावरून तो गांव नं. १ मधून नं. २ मध्यें ढकलला गेला.

२९ खंडचिठ्यांतील दरावरच वर्गवारीची सगळी भिस्त ठेवणाऱ्यांनीं खंडाच्या आंकड्यांचा केवळ आपल्या लहरीप्रमाणे उपयोग केला आहे.

३० बाहेज, कोसंबई, कंजोड, ददारिया, कसवाव या गांवांची जमीन भिकारांत भिकार असून हीं गांवें न. ४ मधून नं. ३ मध्यें घातलीं आहेत व त्यामुळें त्यांचा सारा शेकडा ५८ टक्के वाढला आहे. हा या सेटलमेंटमधील भयंकर चुकीचा एक मासला होय.

३१ प्रतवारी ठरविण्याला खंडचिठ्यांचा जेवढा उपयोग होतो त्या मानानें खरेदीविक्रीच्या दस्तऐवजांचा उपयोग अगदींच कमी होतो.

३२ जमीन खरेदी करणारा इसम आपल्या भांडवलावर निदान ६ टक्के व्याज सुटेल अशी अपेक्षा धरून जमिनीची किंमत देतो असें म्हणणें धाडसाचें आहे.

३३ खंडचिठ्या व खरेदीविक्रीचे दस्तऐवज बाजूस ठेवल्यास सारावाढ करण्याला दुसरा कोणताच आधार जयकर किंवा अंडरसन यांच्या रिपोर्टांत आढळत नाहीं.

३४ शेत जमिनींच्या खरेदीविक्रीच्या किंमतीवरून शेतीच्या निवळ नफ्याचा अंदाज करणें अगदी चुकीचें आहे.

३५ पंधरा गांवांतील ६६५ एकर वरकस जमीन भात जमीन म्हणून नमूद केली गेली आहे आणि त्यावर ५११८ रुपये सारा लादला आहे. त्या जमिनीच्या मालकांनीं व्यक्तिशः दाद मागावी.

३६ चित्रा गांवांतल्या कांहीं खडकाळ जमिनींत गवताखेरीज दुसरें कांहीं पीक येत नसून ती जमीन 'बागाईत' या सदरांत दाखल झाली आहे. त्यांतल्या एका नंबराचा तर स्मशानाकडे उपयोग होत असतो!

३७ कापलथा व कुंभारिया या गांवांतलेंहि कांही गवताचें रान बागाईत म्हणून दाखल झालें आहे!

३८ सुपें या गांवच्या कांहीं जमिनी जुन्या सेटलमेंटमध्यें जिराईत असतांना बागाईत म्हणून नमूद झाल्या व त्यांच्यावर बागाइतीचा आकार लादला गेला! जयकर यांच्या सेटलमेंटमध्यें त्यांचा समावेश जिराईत जमिनींत केला खरा, पण त्यांची आकारणी बागाइतीपेक्षां अधिक ठेवण्यांत आलीं आहे! या सुपें गांवच्या सगळ्याच जमिनींची फेरपाहणी होऊन वर्गीकरण दुरुस्त केलें पाहिजे.

३९ ज्या विहिरींतून मेल्या कित्येक वर्षांत पाण्याचा थेंब देखील नाही तेथल्या जमिनीवर अद्यापि बागाईत म्हणूनच आकारणी केली जात आहे!

### कमिटीच्या पद्धतींतील दोष

ब्रूमफील्ड कमिटीनें जयकर व अंडरसन यांच्या रिपोर्टांत ज्या चुका शोधून काढल्या त्यांचा सारांश, येथवर देण्यांत आला. परंतु ब्रूमफील्ड कमिटीनें आपल्या रिपोर्टांत जीं कांही विधाने केलीं आहेत व जी पद्धती स्वीकारली आहे त्यांवरहि पुढील आक्षेप घेतां येण्यासारखे आहेत.

१ शेतसाऱ्याची आकारणी करण्याला खंडचिठ्या हे मुख्य साधन न मानतां इतर प्रमाणावरून केलेली आकारणी बरोबर आहे का नाहीं हें पडताळून पाहाण्यापुरताच खंडचिठ्यांचा उपयोग करावा असा सरकारी ठराव असून ब्रूमफील्ड कमिटीनेंहि अखेरीस खंडमगदुरावरच आपली आकारणी उभारली आहे.

२ शेत जमिनीचें निवळ उत्पन्न किती येतें तें सरकारी एक्सपेरिमेंटल फार्म्सच्या हिशेबावरून आणि शेतकऱ्यांच्या हिशेबावरून ठरवितां येते. परंतु ब्रूमफील्ड कमिटीनें हे दोनहि प्रकार अविश्वसनीय व निरुपयोगी ठरविले आहेत.

३ व्यापारी पद्धतीनें शेतीच्या व्यवहाराचा जमाखर्च ठेवल्यास शेतींत कांहींच नफा उरत नाहीं, उलट नुकसान येतें हें महादेवभाई वगैरेंनीं आंकड्यांनीं दर्शविलें असतां कमिटीनें तें विधान पुराव्यानें खोडून न काढतां अविश्वसनीय म्हणून बाजूस सारलें आहे.

४ शेतकऱ्याच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्याकरितां ब्रूमफील्ड कमिटीनें म्हशीच्या दूधदुभत्याचें उत्पन्न शेतीच्या उत्पन्नांतच धरावें असा आग्रह दर्शविला आहे! कारण त्याशिवाय निवळ नफा राहात नाहीं असें त्यांच्या प्रत्ययास येऊं लागलें.

५ शेतकरी कर्जबाजारी आहेत याचा दोष जबर शेतसाऱ्यावर न टाकतां त्यांनीं शेतकऱ्यांच्या उधळेपणास दोष दिला आहे! परंतु जमाखर्चावरून ती गोष्ट त्यांनीं सिद्ध करून दाखविली पाहिजे होती.

# खेडेगांवविषयक व्याख्यानमाला

## श्री. गुत्ते वकील यांचें व्याख्यान

ता. २३।५।२९ रोजीं श्री. भा. म. गुत्ते एम्. ए. एलएल. बी. वकील यांचें "लोकल बोर्डाचा कायदा व कामकाज" या विषयावर व्याख्यान झालें. ते म्हणाले "लोकल बोर्ड ही संस्था कृत्रिम आहे. ग्रामपंचायती-प्रमाणें ती स्थानिक संस्था नाहीं. १८६२ सालीं खरा पहिला लोकल बोर्डाचा कायदा झाला. त्या वेळच्या व आजच्या कायद्यांत फारसा फरक नाहीं. प्रथमतः सरकारी अधिकाऱ्याचें प्रस्थ बोर्डांत फार होतें. लोकनियुक्त सभासद फक्त इनामदार असत. सर्व सरकारी नियंत्रण असतांना सुध्दां शेंकडा ८० गांवांत पाणी नाहीं, रस्त्याची सोय नाही अशी स्थिति आढळून आली. आज मतदानपध्दतीत फरक करण्यांत आला आहे. तालुकाबोर्डाचा मतदार-संघ वेगळा व जिल्हाबोर्डाचा मतदारसंघ वेगळा आहे. पूर्वी तालुकाबोर्डाकडून जिल्हा-बोर्डाकडे मतदार निवडून जात. आज जिल्हाबोर्ड लोकांस जबाबदार आहे हे ठीक आहे. परंतु तालुकाबोर्ड व जिल्हाबोर्ड यांना जोडणारा दुवा नाही. तालुकाबोर्डाचे अध्यक्ष हे जिल्हाबोर्डांत यावेत अशी व्यवस्था पाहिजे. आज तालुकाबोर्ड हें देखरेख करणारें व जिल्हाबोर्ड हे कार्यकारी मंडळ दिसते. ८ रु. शेतसारा देणारा तालुका-बोर्डाचा व ३२ रु. शेतसारा देणारा जिल्हा-बोर्डाचा मतदार होऊं शकतो. सत्तेच्या जोरावर मुसलमान मतदारसंघ स्थापण्यांत आले आहेत. बोर्डांत ¾ लोक लोकनियुक्त असतात हे ठीक आहे, पण यांतील पुष्कळ लोक अधिकाऱ्याचे दडपणाखालीं असतात. पूर्वी बोर्डाचा अध्यक्ष मामलेदार, कलेक्टर असा एखादा सरकारी अधिकारी असे. पुढे बिनसरकारी अध्यक्ष नेमण्यांत येऊं लागला आतां तो लोकांनीं निवडलेला असतो व सरकारी नोकरास निवडणुकीस उभेसुद्धां राहातां येत नाही. लोकल बोर्डांतील लोकांची वृत्ति अधिक स्वतंत्र होत चालली आहे. बोर्डाच्या उत्पन्नाच्या बाबी पूर्वीच्याच आहेत. शेतसाऱ्याच्या रुपयाला एक आणा असा हा लोकल फंड आहे. सरकारी ग्रँट ही दुसरी बाब आहे. नवीन कर बसविण्याचा हक्क दिला आहे, पण पूर्वीचेच कर फार भारी असल्यामुळे आतां शिक्षण वगैरे-करितां नवीन कर बसविणें अगदीं अशक्य आहे. बरें, एखादे वेळीं कांहीं कामासाठीं कर बसवून रकम गोळा केली तर सरकार आपली ग्रँट त्या प्रमाणांत निश्चित देतें असें नाहीं. लोकल बोर्डाच्या तपासणीचा हक्क सरकारास आहे. कलेक्टरला बोर्डाची तपासणी करणें, सस्पेंड करणे वगैरे गोष्टी करतां येतात. सस्पेंडचे बाबतींत व्हावयाची चौकशी खासगी व सरकारी अशी मिळून व्हावी अशी तजवीज व्हावयास पाहिजे. जिल्हाबोर्डाचें वर्तन तालुकाबोर्डाचे बाबतीत अरेरावीचें असतें. दोहोंतील संबंध स्पष्ट केलेले नाहींत. तालुक्याचे उत्पन्नाला स्थायिकत्व नाहीं, व तालुका-बोर्डाला स्वातंत्र्य नाही. समंजस सहकारिता मिळत नाहीं. गांवकरी कंत्राटें घेत नाहींत; इतरांस अडथळा करतात. खासगी संस्थांची मदत नाहीं, जाति-विशिष्ट वाद व वशीले वाढत आहेत. अधिक कर्तबगार सभासद बोर्डांत शिरूं इच्छित नाहीत. पक्ष-भेदाचा परिणाम लोकल बोर्डांतील नोकर लोकांवर होतो. याकरितां मध्यवर्ती केंद्रची व्यवस्था असावी. ग्रामप्रचारकानें बोर्डाचे कामास मदत केली तर फार मोठें काम होईल." इतके सांगून व्याख्यात्यांनी आपले भाषण संपविलें.

## डॉ. बाबासाहेब परांजपे यांचें व्याख्यान

ता. २४।५।२९ रोजी खेडेगांवविषयक व्याख्यान-मालेतील शेवटचें व्याख्यान वऱ्हाडांतील डॉ. बाबा-साहेब परांजपे यांचें "ग्रामपंचायती" या विषयावर झालें. त्यांत ते म्हणाले, " शहर हें सुशिक्षित लोकांचे राज्य आहे, तर खेडें हे अशिक्षितांचें राज्य आहे. शहर गुणानें मोठें आहे, खेडें संख्येनें मोठें आहे. शहरच्या कारभारांत स्वच्छतेपासून विश्व-विद्यालयापर्यंत कार्यें येतात. तेथें बोलकीं माणसें असतात म्हणून कोणत्याहि गोष्टीचा गवगवा फार होतो. अलीकडे खेडेगांवाकडे लोकांची दृष्टि जाऊं लागली आहे. त्यांत शहरीकरणाच्या दृष्टीपेक्षां राष्ट्रीकरणाची दृष्टि अधिक पाहिजे. १९०६ ते १९०९ पर्यंत अशा प्रकारचा प्रयत्न वऱ्हाडांत झाला. जिल्ह्याचें एक विद्यालय चालविलें, जिल्हासभा स्थापन केली, जिल्ह्यांतील एकएक प्रश्न एकेकानें घेतला व त्याप्रमाणें खटपट होऊं लागली. त्यामुळे जिल्हाबोर्डाचें महत्त्व वाढलें. १९१६ सालीं बिगार व बलुतें याविरुद्ध चळवळ सुरू केली. बहुमताच्या रूढीच्या पायीं १८ लाख रुपये लोकांचे जाऊं लागले. शेवटीं सरकारनें ५ लाख रुपये महारांची मजुरी म्हणून मंजूर केले. १९२३ पासून ग्रामपंचायतीच्या चळवळीस जोराची सुरुवात झाली. ग्रामपंचायत व स्थानिक संस्था

यांचें नातें अगदीं निकट आहे. शारीरिक, मानसिक, बौद्धिक, व आत्मिक अशा चार तऱ्हांनीं सुधारणा व्हावयास पाहिजे. शहरास जशी म्युनिसिपालिटी तशी गांवांस ग्रामपंचायत होय. या संस्थांच्या उपयुक्ततेबद्दल व जबाबदारीबद्दल व्याख्यानद्वारा व वाङ्मयद्वारा माहिती फार पसरविली पाहिजे. सुधारणेचा व लोकसेवेचा हा एक स्वतंत्र मार्ग आहे. आजचा काळ संघीभूत होण्याचा आहे. युरोपांत २ लाख पंचायती आहेत. तेथें ग्रामपंचायत सक्तीनें लादण्यांत येते. इंग्लंडमार्फत सर्व युरोप खंड आपल्याला आढळत आहे. त्यांत कांहीं विघात आहेत, त्यांतीलच संघीकरण ही एक विद्या आहे. ती आपण हस्तगत करून घेतली पाहिजे. ग्रामपंचायतीसंबंधानं सरकारचे काय काय कायदे आहेत त्यांचा चांगला अभ्यास झाला पाहिजे. या ज्ञानाशिवाय ग्रामसंघटना करतां येणार नाहीं. बंगाल्यांत ग्रामपंचायती ४००० स्थापन केल्या आहेत. पण तिकडे वातावरण याविरुद्ध करण्यांत येत आहे. खेड्यांतील लोक लवकर पेचांत येतील व त्यामुळे त्यांचा लवकर नाश होईल अशी विचारसरणी मांडण्यांत येत आहे; परंतु अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. म्यु. पा. तील गोंधळ काय थोडा आहे? प्रांताप्रांतांत ग्रामपंचायतींचा नमुना वेगवेगळा आहे. याबद्दलचें सर्व वाङ्मय अगोदरच वाचलें पाहिजे, नतर संस्था स्थापल्या पाहिजेत व मग त्या कार्यक्षम करण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. त्या कायद्याचा फायदा घेऊन व जरूर तेथें सुधारून घेण्याची खटपट करून ग्रामपंचायतीचा उपयोग करून घेण्यांतच अधिक फायदा आहे. " यानंतर कांहीं प्रश्नोत्तरें झाल्यावर व्याख्यात्यांनीं आपल्या भाषणाचा समारोप केला.

# मोर्लेसाहेबांची दुसरी आवृत्ति

इंग्लंडचे नवे मुख्य मंत्री मि. रामसे मॅक्डोनाल्ड यांनी गेल्याच वर्षी " हिंदुस्थानास स्वराज्याकरिता फक्त काही महिनेच तिष्ठत राहावें लागेल " असे म्हटले होते. त्या वेळी ते अधिकारपदारूढ नव्हते. पण आता योग असा आला आहे की त्यामुळे सदर उद्गार खरे करून दाखविण्याची संधि साहेबमजकुराना मिळाली आहे. इंग्लंडांतील तीनहि राजकीय पक्षात मजूर पक्ष हा आपणास जनतेचा खरा कनवाळु व न्यायप्रिय म्हणवितो. त्याच्या या लौकिकाच्या परीक्षेची वेळ हीच असून तिला, निदान स्वतःच्या वचनाला, मॅक्डोनाल्डसाहेब कित पत जागतात ते पाहावें असे सर्वांनाच वाटत होते.

ता. २९ जून रोजी लॉर्ड आयर्विन मुंबईहून विलायतेस रवाना झाले. त्यापूर्वी त्यानी कित्येक हिंदी पुढाऱ्यांच्या खासगी भेटी घेऊन त्यांची मने चाचपून पाहिली होती. अर्थात् त्यावरून बनविलेला आपला अभिप्राय त्यानी आपल्यापुढे आधीच तारेने विलायतेस पाठविला असावा असा लोकांचा तर्क होता. यामुळे ता. २ जुलै रोजी पार्लमेंटसभेचा दरबार खोलताना हिंदुस्थानासंबंधी काही तरी महत्त्वाचा उल्लेख राजेसाहेबांच्या भाषणात येईल अशी बहुतेक लोकांची अपेक्षा. पण या भरंवशाच्या म्हशीला टोणगा झाला. कारण या भाषणात हिंदुस्थानासंबंधी एक अवाक्षरहि आले नाही. वर्तमानपत्रांच्या भाविक वाचकांनी तारा पुनः पुनः वाचल्या, डोळे चोळले, चष्मे पुसले, " वाचण्यांत माझीच काही तरी चूक झाली नाहीना," असे शेजारच्या वाचकाना विचारले. पण जेथे मुळातच उल्लेख नव्हता तेथे तो अशा तळमळीने झाला तरी कोठून प्रगट होणार !

मग याचा अर्थ तरी काय ? १९३० साली जानेवारीच्या पहिल्या तारखेला राष्ट्रीय सभा स्वातंत्र्य पुकारून हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यापासून वेगळे करणार ते आज स्वतः राजेसाहेबानीच या अनुल्लेखाने वेगळे केले की काय? हिंदुस्थान आज साम्राज्यात मोडत नाहीसे झाले म्हणूनच त्याचा उल्लेख वगळण्यात आला की काय ? अशा शंकाहि कित्येकांच्या मनात क्षणभर चमकून गेल्या. पण या अनुल्लेखाचा खरा अर्थ तसा नव्हे. त्याचा अर्थ असा की "हिंदुस्थान हे ब्रिटिश साम्राज्यातच आहे, पण त्याच्याबद्दल काय बोलावे याविषयी मुख्य प्रधान रामसे मॅक्डोनाल्ड याना मोठे कोडे येऊन पडले." यात स्वतः राजेसाहेबांचा अर्थाअर्थी काही संबंध नाही. पार्लमेंटचा दरबार खोलताना 'राजेसाहेबांचे भाषण' झाले यात शंका नाही. तथापि राजेसाहेब स्वतः समारंभाला हजर तर नव्हतेच, पण त्यांचे म्हणून झालेले भाषण राजेसाहेबांनी स्वतः लिहिलेलेहि नव्हते. जगात असे परस्पर कारभार किती तरी चाललेले असतात !

पण रामसे मॅक्डोनाल्ड हे तर राजेसाहेबासारखे पराधीन नव्हतेना ? ते मुख्य प्रधान ! राजेसाहेबांच्या नावाने वाचण्यात येणारे भाषण लिहिण्याचा अधिकार त्याना प्राप्त झालेला ! मजूर पक्षाचे ते पुढारी! मजूर पक्ष राष्ट्रातल्या अखिल मत-

दारसंघातील बहुमताने निवडून दिलेला! शिवाय व्यक्तिशः मॅक्डोनाल्डसाहेबानी लोकसत्तेची स्तोत्रे गायिलेली! हिंदुस्थानासंबंधाने उदारमतवादी पुस्तके व भाषणे त्यानी केलेली! सायमन कमिशन-नेमणुकीच्या वेळी कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाच्या धोरणाला मान्यता देता देताहि, हिंदी मुत्सद्याना उद्देशून त्यानी उज्ज्वल आशावाद प्रगट केलेला! असे असता सगळ्या साम्राज्यासंबंधाने बादशाही भाषण करताना त्यानी हिंदुस्थानाचे नुसते नावहि घेऊ नये, ही चालून आलेली पर्वणी त्यानी घालवावी, ही वाहून आलेली गंगा त्यानी आपल्या हाताने दूर लोटावी, येवढे त्याना संकट किंवा कोडे तरी काय पडले असावे?

या संकटाची थोडीशी कल्पना राजभाषणानंतर केलेल्या स्वतःच्या भाषणात त्यांची त्यानीच जगाला आणून दिली. कारण या भाषणात त्याना सायमन कमिशनच्या रचनेचे तर समर्थन करावेच लागले, पण हिंदी लोकाना उद्देशून पूर्वी आपण आशा दाखविली ती सफळ करण्याचा आवहि त्याना घालावा लागला. पण या दोन गोष्टी एकदम कशा साधणार? त्यांची एकवाक्यता कशी होणार? तर लॉर्ड आयर्विन विलायतेस जाऊन पोचल्यावर ही एकवाक्यता होण्याचा मार्ग काही निघेल असा त्याना भरंवसा वाटत असावा, व तो योग्य आहे. कारण मनचे करण्याला मॅक्डोनाल्ड याना खरा विरोध असेल तर तो कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाकडून. तेव्हा या पक्षाशी ऋणानुबंध असलेल्या व्हाइसरॉयाकडूनच या विरोधाची गाठ सुटली तर सुटेल हा मुख्य प्रधानांचा कयास बरोबर. कारण लॉर्ड आयर्विन हे कॉन्झरव्हेटिव्ह पक्षाचे असले तरी आज ते व्हाइसरॉय आहेत. म्हणून हिंदुस्थानाच्या पुढाऱ्यांची भावनाहि त्याना लक्षात घेतलीच पाहिजे.

असो. यावरून राजेसाहेबांच्या भाषणात हिंदुस्थानावर बहिष्कार घातला गेला तो जाणूनबुजून सहेतुकच यात शंका नाही. तथापि तो सहेतुक म्हणूनच संशयास्पद ठरतो. "आदरार्थे अनुल्लेखः" "निश्चयार्थे अनुल्लेखः" असे सूत्र येथे लागत नसून "शंकास्थाने अनुल्लेखः" हेच सूत्र येथे लागू पडते. पण या शंकास्थानातून मॅक्डोनाल्डसाहेब शीरसलामत बाहेर पडतात, की या संशयाच्या भोवऱ्यात प्रतिपक्षाकडून बुडविले जातात हे पाहावयाचे आहे. बोलल्याप्रमाणें करण्याची पाळी येणे ही संधि की संकट हे मनुष्याच्या कृतीवरून ठरावयाचे असते. मॅक्डोनाल्ड साहेबांच्या परिस्थितिवरून पाहाता ते संधिपेक्षा संकट ठरण्याचाच अधिक संभव दिसतो. कृतीच्या कसोटीला ते टिकणार नाहीत असा संभव दिसतो.

सहानुभूतीनेच बोलावयाचे तर त्यांची परिस्थिति बिकट आहे हे नाकबूल करता येत नाही. कसे ते पाहा. मजूर पक्षाचे प्रधानमंडळ अधिकारारूढ होण्याचा हा दुसरा प्रसंग. या प्रसंगी त्याला पहिल्या खेपेपेक्षा पार्लमेंटात संख्याबल थोडे अधिक आहे. तथापि ते नेहमीच पुरे पडणार नाही. कारण इतर जे दोन पक्ष, म्हणजे कॉन्झर्व्हेटिव्ह व लिबरल, त्यापैकी कोणा एकाचा तरी थोडासा आधार मिळेल तरच प्रधानमंडळाचा पराभव होणार नाही. पण पूर्वी घडले तसे एखाद्या प्रसंगी चुरशीच्या सामन्यात हे दोनहि पक्ष एक होऊन लढले म्हणजे प्रधानमंडळाचा पराभव नक्की ठेवलेला आहे. पार्लमेंटातील एकंदर सभासदांची संख्या ६१५. पैकी मजूर पक्षाचे सभासद २८७ कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचे २५७ व लिबरल पक्षाचे ५७. यावरून कोणा एका पक्षाच्या तरी आधाराशिवाय, किंवा निदान तटस्थपणाशिवाय, प्रधानमंडळाचे बहुमत एक दिवसहि टिकणार नाही.

कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष तर नुकताच पराजित झालेला. आणि मजूर पक्षाचा जर पराभव झाला तर फिरून कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षच अधिकारारूढ होणार हे निश्चित आहे. म्हणून तो मजूर पक्षाचा पराभव करण्याची वाट पाहत बसणारच. उरता उरला लिबरल पक्ष. त्याची संख्या ५७ आहे. तेव्हा या संख्येपैकी सुमारे ३०–३२ लोक निदान तटस्थ राहातील तरच मॅक्डोनाल्ड यांचे प्रधानमंडळ जागेवर राहील. प्रधानपद गाजविण्याची सत्ता लिबरल पक्षाच्या हातीं नसली तरी, जो पक्ष आज अधिकारारूढ आहे त्याचा पराभव करून त्याला खाली पाडण्याची— म्हणजे विधायक नसली तरी विध्वंसक— सत्ता त्याच्याजवळ आहे. अशा रीतीने मजूर प्रधानमंडळ गादीवर बसले आहे खरे, पण त्याच्या खाली आधाराला उभी असलेली एखादी काठी डळमळली किंवा निखून गेली म्हणजे ही गादी कोसळून पडावयाची. दोन रिकेबींत सारखे ताठ पाय राहिले तरच स्वार घोड्याच्या पाठीवर टिकू शकतो. नाही तर रावसाहेब घोड्यावरून खाली येतात! त्याप्रमाणे कॉन्झर्व्हेटिव्ह व लिबरल या दोन पक्षावर आपला दाब जर मॅक्डोनाल्ड हे ठेवतील तरच त्यांचे प्रधानमंडळ टिकेल. मात्र हा दाब काही अंशी आपोआप परिस्थितीमुळे पडतो व काही अंशी तो प्रयत्नाने संभाळावा लागतो.

पहिल्याचा प्रकार असा की, लिबरल पक्षाने उद्या मजूर पक्षाविरुद्ध मते देऊन त्याचा पराभव केला तरी स्वतः लिबरल पक्षाला आपले प्रधानमंडळ बनविता येणे सर्वस्वी अशक्य आहे. मग त्याने विनाकारण मजूर पक्षाला का दुखवावे बरे? ममत्वाच्या दृष्टीने पाहिले तरी मॅक्डोनाल्ड यांचा पक्ष हा बाल्डविन यांच्या पक्षापेक्षा लॉईड जॉर्ज याना अधिक

जवळ आहे. कारण लिबरल व रॅडिकल ही जशी कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षातून निघालेली पुढची पिढी, तशीच मजूर पक्ष ही रॅडिकल लिबरल पक्षातून निघालेली पुढची पिढी होय. अर्थात् नातु हा आजापेक्षा बापाला अधिक जवळचा ठरतो. या विशिष्ट परिस्थितीचे दुसरे कारण असे की, कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष हा मजूर पक्षाला जवळ जवळ तुल्यबळ असला तरी, लिबरल पक्षाशी संगनमत करून व मजूर पक्षाचा पाडाव करून उद्या प्रधानमंडळ बनवावयाचे झाल्यास, लॉइड जॉर्जेसारख्या उपद्व्यापी व बेभरवशी मुत्सद्याच लोढणे बाल्डविन याना गळ्यात अडकवून घ्यावे लागणार ते त्याना नकोच आहे. याशिवाय परिस्थितीचे एक तिसरेहि उपांग असे आहे की, प्रधानमंडळाचा पराभव महत्त्वाच्या बाबतीत झाला तर नुसत्या प्रधानमंडळाची अदलाबदल होऊन भागत नाही, तर अवघ्या पार्लमेंटाचीच फेरनिवडणूक करावी लागते. पण या उपद्व्यापाला सगळेच पक्ष आपापल्या परीने थोडथोडे कंटाळतात. उमेदवाराना तर ती खर्चाची बाब म्हणून मोठीच अवघड वाटते. पण फुकाचे मत देणाऱ्या मतदारालाहि कारणाशिवाय वरचेवर झालेली निवडणूक आवडत नाही. म्हणजे प्रधानमंडळ बुडाले तर बुडवावे अशी दुष्ट बुद्धि प्रतिपक्षांच्या मनात भरपूर असेल, पण ती प्रभावी न होण्याचे कारण खाली दिलेल्या सुभाषितात लिहिल्यासारखे आहेः—

व्याघ्रस्य महदालस्यं सर्पे चैव महद्भयम् ।
पिशुनेऽपि च दारिद्र्यं तेन जीवन्ति जन्तवः ॥

म्हणजे वाघ आळशी, साप भित्रा, आणि दुष्ट मनुष्य दरिद्री असतो, आणि अशा दुर्गुणांची जोड ईश्वराने घालून दिली म्हणूनच जग जगते, नाहीं तर रोज प्रलय ठेवलेला !

पण कॉन्झर्व्हेटिव्ह व लिबरल या पक्षांवर दाब ठेवून मॅक्डोनाल्ड हे प्रधानपदावर उभे आहेत, व वर्ष दोन वर्षे ते त्या पदावर स्थिर राहातील असा संभव आहे, याचे आत्मनिष्ठ प्रयत्नाधीन कारण असे की, मॅक्डोनाल्ड हे होता होईतो सामोपचाराचे व नेमस्तपणाचे धोरण ठेवणारे आहेत. यामुळे त्यांच्याविरुद्ध उचल करून हत्यार उगारण्याला दुसऱ्या दोन पक्षाना फारसे कारण उरणार नाही. मजूर पक्षामध्ये सर्वात अधिक समतोल व नेमस्त वृत्तीचे अशी मॅक्डोनाल्ड यांची ख्याति आहे. ही वृत्ति त्यांच्या पक्षातील उतावळया व जहाल लोकाना आवडत नसल्यामुळे ते याना अप्रिय आहेत. पण मुख्य प्रधानकी ही जागा अशीच काही आहे की, तेथे समतोल व नेमस्त वृत्तीचाच मनुष्य चार दिवस टिकेल व काही काम करील. म्हणून प्रधानमंडळ बनविण्याची गोष्ट निघाली म्हणजे या मानीव अवगुणांकडे दुर्लक्ष करून, त्यांचे खरे इतर गुण लक्षात घेऊन, किंबहुना अवगुण तेच या पदाला गुण असे पटून, मजूर पक्षाचे निरनिराळे पुढारी मॅक्डोनाल्ड यानाच एकमताने पुढे करतात. म्हणून राजेसाहेब त्यानाच बोलावणे पाठवितात.

प्रत्यक्ष पार्लमेंटात मजूर पक्षाला संख्याबल थोडे कमी किंवा असावे तितके नसले तरी, एकंदर देशात मजूर पक्षाच्या मताचेच वारे वाहात आहे हे इतर पक्षाना माहीत आहे. तेव्हा कोणतेहि प्रधानमंडळ यापुढे टिकावयाचे तर प्रगतिपर धोरण पत्करल्याशिवाय त्याला गत्यंतर नाही. म्हणून या दोन पक्षांचे पाहाणे इतकेच की, मजूर प्रधानमंडळाला "तुमचा पराभव केव्हाच करून टाकू, संभाळा" असे नित्य भासवून डोळ्याच्या धाकात ठेवल्यामुळे प्रधानमंडळाच्या उड्या थोड्या कमी होतील, किंवा त्याचे पाऊल जरा धिमे होईल, हा फायदा सहजासहजी साधल्यास साधून घ्यावा. आणि जी गोष्ट मजूर पक्षाच्या इतर कार्यक्रमाची तीच हिंदुस्थानाच्या राजकीय सुधारणांची होय.

हिंदुस्थानात राजकीय सुधारणा होणे टळत नाही हे पदभ्रष्ट कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाला कळून चुकले आहे. परंतु पराभवाची तलवार डोक्यावर लोंबत ठेवल्याने या बाबतीत लोकसत्तावादी अशाहि मजूर पक्षाचे पाऊल थोडे जड होईल व धिमे पडू लागेल, असा कयास करूनच बाल्डविन यानी परवा स्पष्ट शब्दानी तसे जाणविलेहि. ते म्हणाले "तुमचा आमचा बेबनाव इतक्यात न व्हावा आणि प्रकरण हातघाईवर येऊ नये असे असेल, तर इतर गोष्टीपेक्षाहि हिंदुस्थानासंबंधी तुम्ही धोरण काय ठेवणार याकडेच आम्ही अधिक लक्षपूर्वक पाहू व तीच खरी कसोटी समजू." याचा अर्थ मजूर पक्षाच्या प्रगतिप्रियतेने खुद्द इंग्लंडच्या लोकांच्या हाती थोडी अधिक सत्ता गेली तरी चालेल. कारण ते फार तर 'वाटीतले ताटात सांडल्यासारखे' होईल. पण हिंदुस्थानाच्या जनतेच्या हाती जर अधिक सत्ता मॅक्डोनाल्ड यानी जाऊ दिली तर कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाच्या बेचाळीस पिढ्या नरकातच न गेल्या तरी कुळाला बट्टा खास लागणार! नाही तर तो पक्ष जगला काय मेला काय सारखेच. कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष म्हणजे साम्राज्यसत्तावादी पक्ष, आणि हिदुस्थानाच्या लोकाना जर स्वराज्य मिळाले तर मग साम्राज्य कोठे राहिले? तात्पर्य, ग्रंथलेखक व तत्त्वज्ञानी मॅक्डोनाल्ड आणि प्रधानमंडळ चार दिवस चालविण्याची इच्छा धरणारे मॅक्डोनाल्ड, यांच्या हिंदुस्थानविषयक भावनेत जे अंतर दिसते त्याचे कारण वरीलप्रमाणे होय.

मॅक्डोनाल्डसाहेबांच्या अडचणीचा विचार कोणाला सहानुभूतीने करावयाचा असल्यास तो वरील-प्रमाणे करता येईल. आणि आम्ही तो तसा करण्याचे कारण इतकेच की राज्यकारभारातल्या अडचणी आम्हालाहि कळतात. पण हिंदी लोकांच्या राजकीय अडचणीचा विचार त्यानीहि सहानुभूतीने करावयास नको काय ? श्रीमंताच्या अडचणी गरीबानी पाहाव्या हे जर योग्य,तर गरीबाच्या अडचणी श्रीमंतानी त्याच्याहि आधी पाहाव्या हे योग्य नव्हे काय? तात्पर्य,प्रधानमंडळ टिकावे म्हणून मॅक्डोनाल्ड-साहेब आपली खरी उदार मते काखेत दडपून ठेवणार. प्रतिपक्षाने उचल खाऊ नये म्हणून ते हिंदुस्थानाची महत्त्वाकांक्षा दाबून टाकणार. मग लॉर्ड मोर्ले यानी तरी दुसरे काय केले ? म्हणून ग्रंथातून उदारमतवादित्वाचे भरपूर पांडित्य करणाऱ्या, पण अधिकारारूढ झाल्यावर हिंदुस्थानाला दगा देणाऱ्या, मॅक्डोनाल्डसाहेबाना लॉर्ड मोर्ले यांची दुसरी आवृत्ति का म्हणू नये !

# नफा दाखवा आणि मग सारा घ्या

ब्रूमफील्ड कमिटीनें बार्डोलीच्या रिव्हिजन सेटलमेंटसंबंधीं रिपोर्ट केल्यावेळेपासून मुंबई-सरकारच्या जमीनमहसूलपद्धतीतील सर्व बिंगें बाहेर आलीं आहेत. आजपर्यंत सरकारला यासंबंधांत कोणी ना पुसता ना विचारता अशी स्थिति होती. त्यामुळे जमीनमहसुलाच्या आकारणीचा कारभार बेदाद चालला होता. रयतांना दिवाणी कोर्टाचा मार्ग बंद केलेला आहे; आणि रेव्हेन्यू खात्यांत तर खालपासून वरपर्यंत सगळाच कारभार एकतंत्री असल्याने कनिष्ठ अधिकाऱ्यांविरुद्ध वरिष्ठांकडे दाद लागण्याची आशाच नसते. अशा कोंडींत सांपडल्यामुळे रयतांचा आजपर्यंत असह्य कोंडमारा झाला. परंतु बार्डोलीच्या निमित्तानें ब्रूमफील्ड कमिटी नेमली गेली, त्यामुळें या कोंडींतून बाहेर पडण्याला, अतिशय अवघड का होईना, पण एक वाट आहे असें रयतांना कळून चुकलें.आणि स्वाभाविकपणेच शक्य तर आपणहि त्याच वाटेनें जाऊन आपली होत असलेली कुचंबणा टाळावी असे इतर ठिकाणच्या रयतांना वाटूं लागले आहे.

रिव्हिजन सेटलमेंट होऊन त्यावर एकदां सरकारचें शिक्कामोर्तब झालें कीं, तें ब्रम्हवाक्य!कालत्रयींहि तें फिरावयाचें नाहीं अशीच जणुं काय आजपर्यंतची स्थिति होती.ती बदलून सरकारी फर्मानहि फिरूं शकते अशी जाणीव शेतकऱ्यांत उत्पन्न होणें म्हणजे रेव्हेन्यू खात्याच्या आजपर्यंतच्या पद्धतींत एक प्रकारची क्रांतीच होय. आणि ही क्रांतीची वाट डोळयापुढें दिसूं लागल्यावर रिव्हिजन सेटलमेंटचा असह्य भार बिनतक्रार सोसण्याइतकी कांहीं रयत दुबळी नाहीं.अर्थातच जेथें जेथें नुकतीच बार्डोलीप्रमाणें जुलमी सेटलमेंट झाली आहे, त्या त्या तालुक्यांतले प्रतिनिधी एकत्र जमून त्यांनीं या समान संकटांतून बार्डोलीप्रमाणें आपलीहि सुटका करून घेण्याचा उपाय योजण्याचें मनांत आणणें स्वाभाविक आहे. याच हेतूनें गेल्याचे मागील रविवारीं मुंबईस वल्लभभाई पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं बागलाण, वसई, देवगड वगैरे ठिकाणच्या रयतेची खासगी परिषद भरली होती, आणि त्या परिषदेने सेटलमेंटमध्यें झालेल्या जुलमाचा प्रतिकार करण्याचा विचार ठाम केला.

सत्याग्रह हा या प्रतिकाराच्या लक्ष्यांतला अखेरचा बाण आहे व तो केव्हांहि हटकून यश देतो. पण हें निर्वाणीचें शरसंधान करण्यापूर्वी इतर कित्येक उपायांनींहि झालेला अन्याय दूर करण्याचा प्रयत्न करून पाहावा या बुद्धीनें लॅंड लीग स्थापून चळवळ करण्याचें ठरविण्यांत आलें आहे. सरकारला देखील आतां आपलें मर्मस्थान प्रतिपक्षाला समजून आल्याची उमज पडली आहे. त्यामुळे या बाबतींत सरकार बार्डोलीप्रमाणें तुटेपर्यंत ताणणार नाहीं असें वाटतें. सरकारच्या वागणुकींत अशा प्रकारचा कांहीं फेरबदल झाला आहे कीं नाहीं हें आतां लवकरच कळून येणार आहे. कौन्सिलाच्या बैठकीला पुढील आठवड्यांत सुरवात होणार असून लॅंड रेव्हेन्यू कोडाच्या दुरुस्तीचें बिल सरकाराकडून पुढें येणार आहे. हें बिल जर पूर्वीच्याच स्वरूपांत पुढें येईल तर सरकारची वृत्ति पूर्वीइतकीच कोडगेपणाची आहे असें समजून रयतांना स्वावलंबनाच्या उपाययोजनेस लागावें लागेल. कदाचित् सरकारने हें बिल या बैठकींत पुढें आणण्याचे तहकूब केलें तरी देखील या बाबतींत कांहीं तरी नवें निश्चित धोरण जाहीर केल्यावांचून सरकारची सुटका होऊं शकत नाहीं. कारण देवगड, बागलाण वगैरे ज्या ज्या तालुक्यांतून बार्डोलीप्रमाणेंच रिव्हिजन सेटलमेंटचा अन्याय घडला असेल, त्या त्या ठिकाणीं फेरचौकशीकरतां ब्रूमफील्ड कमिटीसारखीच एखादी कमिटी नेमावी अशा आशयाचा ठराव अनेक सभासदांकडून पुढे येणार असल्याचें जाहीर

झालें आहे. तेव्हां त्या ठरावाच्या चर्चेच्या वेळीं तरी सरकारला आपलें धोरण जाहीर करणे प्राप्त आहे.

सेटलमेंटच्या बाबतींत रयतांची मागणी अगदी माफक आहे. हल्लींच्या लँड रेव्हेन्यू कोडाच्या १०७ कलमांत असें म्हटलें आहे कीं शेतीच्या जमिनीवर जो सारा आकारावयाचा तो नफ्याच्या प्रमाणांत आकारला जावा. याचा सरळ अर्थ असाच कीं शेती पासून शेतकऱ्यांना खर्चवेंच वजा जाता निवळ उत्पन्न कांहीं राहातें असें सरकारनें प्रथम दाखविलें तरच त्यावर साऱ्याची आकारणी करण्याचा सरकारला हक्क पोंचतो व हा हक्क बजावण्याच्या पूर्वी निवळ नफा झाला आहे असें सिद्ध करण्याचा बोजा सरकारावर पडतो. तो ओळखून शेतीपासून नफा होत असल्याचें सरकार जर सिद्ध न करील तर त्यास सारा आकारण्याला अधिकारच पोंचत नाहीं. यास्तव सेटलमेंट करण्यापूर्वी शेतीच्या जमाखर्चाची पाहाणी करण्याची व्यवस्था सरकारनें केली पाहिजे. बार्डोलीच्या ब्रूमफील्ड कमिटीनें सेटलमेंट ऑफिसरच्या हातून घडलेल्या कित्येक चुकांचें परिमार्जन केलें आहे. पण त्या कमिटीनें देखील साऱ्याची आकारणी नफ्याच्या हिशेबावरून न करतां खंडाच्या रकमेवरूनच केली आहे. एवढेंच नव्हे तर महादेवभाई देसाई यांनी शेतकऱ्यांच्या जमाखर्चाचे हिशेब कमिटीपुढें मांडून शेतीपासून नफा न होतां उलट तोटा होत असल्याचीं कित्येक उदाहरणें दाखविलीं असतां, तीं खोडून काढण्याच्या ऐवजीं त्यांच्याकडे कानाडोळा करून खंडावरून आकारणी करण्याचा अंडरसेनी मार्गच कमिटीनेंहि स्वीकारला आहे.

महादेवभाई देसाईप्रभृतींनीं शेतीच्या जमाखर्चाचे जे हिशेब कमिटीपुढें दाखल केले ते अतिशयोक्तिमूलक असल्यानें विश्वसनीय नाहींत असा त्यावर कमिटीनें आक्षेप घेतला. आक्षेप घेणाऱ्यानें स्वतः आपला आक्षेप सिद्ध करून दाखविला पाहिजे. कमिटीनें स्वतःवर शेकणारा हा पुराव्याचा बोजा पार पाडला नाहींच; पण इतर कोणत्याहि रीतीनें जमिनीच्या निवळ उत्पन्नाचे आंकडे दिले नाहींत. तथापि वादाकरितां असें गृहीत धरूं कीं, महादेवभाई देसाईप्रभृति मंडळी बार्डोलीच्या रयतांच्या तर्फेनें वकिली करीत असल्यामुळें त्यांचा पुरावा एकतर्फी असेल, व त्यामुळें ब्रूमफील्ड कमिटीला त्यावर सर्वस्वी विश्वास ठेवावासें वाटलें नसेल. पण ज्या पुराव्यावर असला एकतर्फीपणाचा आक्षेप सरकार घेऊं शकणार नाहीं असा पुरावा आम्ही आज सरकारच्या नजरेस आणूं इच्छितों. शेतकी खात्यांतले तज्ज्ञ व अर्थशास्त्रज्ञ अशा एका अधिकाऱ्यानें पुणें जिल्ह्यांतीलच कित्येक गांवांतून शेतीच्या उत्पन्नाचे व खर्चाचे हिशेब काळजीपूर्वक तयार केले आहेत. त्यांतले कांहीं आंकडे आजच्या अंकांत आम्ही दुसरीकडे दिले आहेत. त्या आंकड्यांवरून शेतीच्या कामांत निवळ नफा राहाणारीं उदाहरणें किती दुर्मिळ आहेत, आणि जेथें असा निवळ नफा राहात असेल तेथें तो परिश्रमाच्या मानानें किती अल्प आहे हे दिसून येईल. हे आंकडे कांहीं तरी आपली बाजू कमिटीपुढें मांडण्याकरितां रयतांच्या वकिलांनीं आयत्या वेळीं तयार केलेले नाहींत. हे सरकारी तज्ज्ञांनीच तयार केलेले आहेत; आणि बार्डोलीचा वाद उपस्थित होण्याच्या आधींचे ते असल्यानें त्यांच्यावर बुद्धिपुरःसर अतिशयोक्ति केल्याचा आक्षेपहि घेतां येण्यासारखा नाहीं.

असे हे आंकडे काय दर्शवितात? उंसाच्या लागवडीचे दहा नंबर घेतले तर सहा नंबरांत तोटा आलेला असून अवघ्या चार नंबरांत निवळ नफा उरत आहे. बरें, तो नफा तरी किती म्हणाल तर कोठें एकरी ३ रुपये तर कोठें १८ रुपये. आणि जास्तींत जास्त नफा किती तर ५६ रुपये. याच्याचबरोबर तोट्याचे आंकडे पाहिल्यास नुकसानीची कमाल मर्यादा ३६२ रुपयांपर्यंत गेलेली आढळून येते! बार्डोलीच्या चौकशी कमिटीपुढें असलेच आंतबट्ट्याचे हिशेब दाखल करण्यांत आले होते. त्यावर कमिटीनें असा अभिप्राय दिला कीं, इतकें नुकसान सोसून शेती कोणीहि करूं इच्छिणार नाहीं, यास्तव आम्हास हे आंकडे विश्वसनीय वाटत नाहींत! परंतु सरकारी तज्ज्ञांचे हिशेब देखील शेतकऱ्यांची तीच हलाखी व्यक्त करीत आहेत. तेव्हां शेतीच्या निवळ उत्पन्नावरच आम्ही शेतसाऱ्याची आकारणी करतों असा बाहणा करणाऱ्या सरकारनें शेतीचें निवळ उत्पन्न किती येतें तें आधीं सिद्ध करून दाखवून मगच सेटलमेंट करण्यास उद्युक्त व्हावें हेंच उचित नव्हे काय?

उंसाच्या पिकाची जी स्थिति तीच इतरहि बहुतेक पिकांची आहे. बाजरीच्या पिकाचे २० ठिकाणचे आंकडे घेण्यांत आले; त्यांत दहा ठिकाणीं नफा राहिला तर बाकीच्या दहा ठिकाणीं मुदलांतच नुकसान आलें. आणि नुकसानीच्या आंकड्यांची बेरीज नफ्याच्या आंकड्यांहून अधिकच आहे. ज्वारीच्या पिकाचीं १४ उदाहरणें पाहण्यांत आलीं. त्यांत अवघ्या चार ठिकाणीं नफा झालेला आढळला आणि बाकी दहा ठिकाणीं सगळा कारभार अंगलटच आला! गहूं, हरभरा, भुईमूग, कांदे, शाळू इत्यादि सर्वच पिकांची अशीच रडकथा आहे

निरनिराळ्या पिकांचे हे जे जमाखर्च दिले आहेत त्यांत शेतकऱ्याच्या श्रमाचा वर्षाचा मोबदला खर्चात धरला नसून, जितके दिवस प्रत्यक्ष काम झालें तितक्या दिवसांची प्रत्यक्ष मजुरी तेवढीच खर्चात दर्शविली आहे. वास्तविक स्थिति अशी असते कीं, शेती लहान असो वा मोठी असो, शेतांत वर्षभर सतत काम असो वा थोडेच दिवस काम असो, शेतकऱ्याला वर्षानुवर्ष त्या शेताला धरूनच राहावें लागतें. याकरितां त्याच्या खर्चाची आकारणी करतांना जितके दिवस तो प्रत्यक्ष राबला तितक्या दिवसांच्या पगाराचीच तेवढी आकारणी करणे युक्त नव्हे. निदान वर्षाची मजुरी तरी त्याच्या पदरांत पडली पाहिजे. पण असा हिशेब करूं लागल्यास ज्या कित्येक शेतांतून सध्याच्या हिशेबाप्रमाणे नफा उरलेला दिसतो त्या शेतांची लागवडहि आंतबट्ट्याचीच आहे असें दिसून येईल. परंतु तितका कांटेकोरपणा सोडून देऊन निदान प्रत्यक्ष खर्चाचा जमेशीं मेळ बसतो का नाही, हे पाहूं गेल्यासहि शेकडा ५० हून अधिक सर्व्हेनंबरांत ऐनजिनसी नुकसान होत असल्याचें हिशेबानेंच ठरतें.

अशा परिस्थितींत शेतसाऱ्याची आकारणी तरी कशी करावयाची हा खरोखरीच न सुटण्यासारखा प्रश्न आहे. बार्डोलीच्या चौकशीच्या वेळीं ब्रूमफील्ड यांनीं रयतांचे अॅडव्होकेट भुलाभाई यांना शेवटीं असाच प्रश्न टाकला कीं, शेतीपासून ऐनजिनसी नफा जर मुळींच होत नाहीं असें जर तुम्ही म्हणतां, तर शेतसाऱ्याची मुळीच आकारणी न करतां शेतकऱ्यांनीं सगळी जमीन फुकट वापरावी अशी त्यांना मुभा द्यावयाची की काय? त्यावर भुलाभाईनीं कबूल केलें कीं, जमिनीची वहिवाट करण्याबद्दल भाडे म्हणून कांहीं तरी रक्कम रयतानें सरकारला दिली पाहिजे. भुलाभाईच्या या कबुलीजबाबांतून जमिनीची मालकी रयतांची नसून सरकारची आहे असा ध्वनि निघतो. पण तो प्राचीन परंपरेस व समजुतीस अनुसरून नाहीं. शेतसारा हा भाड्याच्या स्वरूपाचा नसून राज्यकारभाराच्या व्यवस्थेसाठीं रयतांनीं सरकारला द्यावयाचा एक कर आहे. 'टॅक्सेशन इन्क्वायरी' कमिटीनेंहि तो कर आहे हेंच म्हणणे मान्य केलें आहे. अर्थातच व्यापारी ज्याप्रमाणे आपल्या उत्पन्नाच्या प्रमाणांत सरकारला कांहीं कर देतात त्याप्रमाणें शेतकऱ्यांनींहि आपल्या जमिनीच्या उत्पन्नाच्या विशिष्ट प्रमाणांत कर द्यावा हें म्हणणें उभय पक्षांस सारखेंच मान्य आहे. परंतु उत्पन्नावर कर आकारण्यापूर्वी उत्पन्नांतून नफा दाखवितां आला पाहिजे व तो दाखविण्याची सरकारची तयारी पाहिजे. कारण सरकारला जर कर हवा आहे तर नफा दाखवून देण्याच्या पुराव्याचा बोजा सरकारावरच पडतो. आजपर्यंत सरकारने हा बोजा स्वतःवर घेण्याचें टाळलें आहे. परंतु अतःपर अशी टाळाटाळी चालावयाची नाहीं व रयतांनीं ती अतःपर चालूं न देण्याचा निश्चय केला पाहिजे. कर म्हणूनच शेतसारा घ्यावयाचा हे तत्त्व एकदां प्रस्थापित झाल्यावर त्या कराची आकारणी कशी करावी हा प्रश्न उपस्थित होतो. बार्डोलीप्रमाणें सगळीकडे सत्याग्रह करून शेतीचा वसूल बंद पाडूं म्हणाल तर उद्यां स्वराज्य मिळाल्यावर तरी शेतसाऱ्याशिवाय राज्यकारभार कसा चालविणार असा मुंबईच्या टाईम्सकारांनीं आढ्यतेनें प्रश्न विचारला आहे! स्वराज्याचा कारभार आमचा आम्ही कसाहि चालवू.त्याची उठाठेव करण्याचा टाईम्सकारांना मुळींच हक्क पोंचत नाहीं. तशीच परिस्थिति येऊन राज्यशकट अडूनच राहिला तर तो चालविण्याकरितां आम्ही जरूर तेवढा कर आपखुषीनें देऊं. परंतु शेतीचा धंदा हा किफायतशीर आहे, त्या धंद्यांत शेताच्या मालकांना भरमसाट फायदा मिळतो, व त्या फायद्यांतला अगदीं लहानसा हिस्सा आम्ही शेतसाऱ्याच्या रूपानें घेतों असा जो ऐंद्रजालिक देखावा सरकारनें गेलीं ५०–६० वर्षे उत्पन्न केला आहे त्याचें खरें वास्तविक स्वरूप जनतेच्या नजरेस आलें पाहिजे. ब्रूमफील्ड कमिटीनें हा भ्रम अर्धामुर्धा नाहीसा केलाच होता. परंतु शेतीच्या उत्पन्नाचे जे आंकडे आम्ही आजच्या अंकात दुसरीकडे दिले आहेत त्या आंकड्यांवरून या भ्रमाचा पूर्णत्वानें निरास होईल असें वाटतें.

पूर्वग्रहदूषित भ्रमाचीं हीं जळमटें झाडून टाकल्यानें मनोभूमिका साफ झाल्यावर तेथें नव्या विचाराची मांडणी सुलभतेनें होऊं शकते.शेतीचा धंदा किफायतशीर नसला तरी जो जो शेतकरी शेतीची जमीन वापरतो त्यानें त्यानें त्या वहिवाटीच्या हक्काबद्दल कांहीं तरी कर द्यावा असें भुलाभाई देसाई म्हणतात. वल्लभभाई पटेल यांचेंहि मत असेंच दिसतें कीं, सरकारनें शेतकऱ्यांकडून नुसता जमीन वापरण्याबद्दल कर घ्यावा. यात एक गोष्ट गृहीत धरली जाते कीं, कोणत्याच जमिनींतून शेतकऱ्यांना निवळ नफा मिळूं शकत नाहीं. असें निरपवाद विधान करणें आमच्या मतें गैरशिस्त होय. शेंकडा पन्नास सर्व्हेनंबरांतून शेतकऱ्याला कांहींच निवळ नफा उरत नाहीं असें जरी घटकाभर मानलें तरी बाकीच्या पन्नास नंबरांत तरी नफा राहात असला पाहिजे.मात्र असा नफा राहातो हे सिद्ध करण्याचा बोजा सरकारावर असून सरकारनें तसें दाखवून दिल्याखेरीज कायद्याप्रमाणें

त्यास शेतकीच्या 'नफ्या'वर शेतसाऱ्याची आकारणीच करतां येणार नाहीं हेंहि निश्चित आहे. अर्थातच 'जेथें असा निवळ नफा उरत असेल तेथें टॅक्सेशन कमिटीच्या' शिफारसीस अनुसरून निवळ नफ्याचा चौथा हिस्सा कर म्हणून सरकारनें घ्यावा. परतु शेत जमिनी अगदींच निकस असल्यामुळे जेथे शेतकरी जेमतेम चार महिन्यांचा गुजराणा करूं शकतो, याहून त्यास अधिक प्राप्ति कधींच होत नाहीं, तेथे सरकारनें केवळ शेतकऱ्यांच्या संरक्षणाचा कर म्हणून दरएकरीं नांवापुरता कांही अल्प कर घ्यावा. ही तत्त्वें मान्य करून सरकार जर या धोरणानें नवीन बिल तयार करील तर त्यास सर्वांचा पाठिंबा मिळेल. जेथें शेती खरोखरच फायदेशीर असेल तेथे शेतीचें तें उत्पन्न पदरांत घेऊन सरकारदेणें मात्र टाळावें हा प्रजाधर्म नव्हे; पण त्याबरोबरच ज्या जमिनींतून शेतकऱ्याला निवळ नफा एक कपर्दिकहि मिळत नसून उलट शेतकऱ्याच्या पदराला खार लागत असेल तेथें भरमसाट कर आकारून शेतकऱ्यांना सतावून सोडणें आणि त्यांच्या घरांदारांवर पठाण सोडणें हा राजधर्महि नव्हे. यास्तव आमचें सरकारास, रयतांच्या वतीनें, असें निक्षून सांगणें आहे की, 'आंधळें दळतें आणि कुत्रें पीठ खातें' असला प्रकार यापुढें चालावयाचा नाहीं. तुम्हास शेतजमिनीवर सारा आकारावयाचा असेल तर आधीं निवळ नफा दाखवा आणि मग त्या नफ्यावर सरकारदेण्याची आकारणी करा. घरचें खाऊन लष्करच्या भाकरी भाजण्याचा आंतबट्ट्याचा धंदा करण्याला यापुढें शेतकरी केव्हांहि राजी होणार नाही !

# महाराष्ट्रांतील स्पृश्यकृत अस्पृश्यतानिवारणाचे प्रयत्न

## ( १ )

गेल्या महिन्यांत येथील अस्पृश्यतानिवारक मंडळानें अस्पृश्यतानिवारणासंबंधाने विचार व खटपट करणारांची जी एक परिषद भरविली होती, तिजपुढें संस्थेचे चिटणीस श्री. माटे यांनी मथळ्यांत सांगितलेल्या विषयावर एक सुविस्तृत भाषण केलें. त्याचा सारांश असाः—

### प्रास्ताविक

अलीकडील सर्व चळवळींचे उगम ज्याप्रमाणें कै. न्यायमूर्ति रानडे यांच्या धोरणांत दिसून येतात, त्याप्रमाणेंच पूर्वीच्या सर्व चळवळींचे उगम श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या तत्त्वज्ञानविषयक औदार्यांत आहेत. धर्मतत्त्वांचें ज्ञान जनतेस प्राप्त करून देणें हे फार उदारपणाचें काम ज्ञानेश्वरांनीं केलें. त्यांचे भक्तिमार्गांतील अनुयायी जे एकनाथ आणि तुकाराम त्यांनी प्रत्यक्ष अस्पृश्यांपर्यंत या ज्ञानप्रसाराची शीव नेऊन भिडविली. नामसंकीर्तनांत, परमेश्वराच्या भक्तींत आपण जातगोत कांहींएक ओळखत नाही, श्रेष्ठ-कनिष्ठ भाव मानीत नाहीं, असा उंच घोष या साधु पुरुषांनी केला. महाराचे मूल उचलणें, श्राद्धाच्या अन्नाचें अस्पृश्यांस संतर्पण करणे, धर्मग्रंथाचें प्रतिपादन जेथें चालावयाचें, तेथें अस्पृश्यांस प्रवेश करूं देणें अशासारख्या कित्येक गोष्टी एकनाथासंबंधानें सांगितल्या जातात. तुकारामासारख्या विदेही भगवद्भक्ताचें या बाबतींतील धोरण सर्वांस महशूर आहे. भक्तिमार्गांत सर्वांस मुक्तद्वार असल्यामुळे या ज्ञानाचा संस्कार मनावर होतांच अस्पृश्यांच्या भिन्न भिन्न जातींतून अनेक साधुसंत पैदा झाले. भक्तिमार्गाच्या इतिहासांत चोखा, रोहिदास इत्यादींचीं नांवें संत म्हणून कायम झालीं इतकेंच नव्हे तर त्यांनी केलेले अभंग भक्तिमार्गाच्या वाङ्मयांतसुद्धां कायम राहून गेले. याचा अर्थ असा कीं, संतश्रेणींत आणि भक्तिमार्गाच्या वाङ्मयांत अस्पृश्यांचा कायमचा प्रवेश झाला. केवळ अस्पृश्य म्हणून तो संत नव्हे, आणि अस्पृश्याचें म्हणून तें वाङ्मय नव्हे, हे विचार इतःपर कधींहि उद्भवले नाहीत.

परंतु या साधुसंतांच्या प्रयत्नांच्याहि आधीं आपल्या गांवगाड्यानें खेडेगांवच्या सांपत्तिक जुळणींत अस्पृश्यांचा प्रवेश आधींच करून घेतला होता. अस्पृश्याचें त्या जुळणींतील स्थान अगदीं कनिष्ठ होते हे खरेंच आहे. पण भिल्ल, गोंड, संताळ अशासारख्या रानटी जातीं कीं, ज्या समाजापासून दूरच राहिल्या होत्या, त्यांजसारखें या जातींचें जिणें राहिलें नाहीं. राष्ट्रांतील संपत्तीच्या वांटणींत कायमचा प्रवेश अस्पृश्यांना प्राप्त झालेला होता. कमीपणा हा कीं, अमुक एका मर्यादेच्या पलीकडे आणि केवळ सेवाधर्माच्या अलीकडे त्यांस जातां येत नसे व नाहीं. मराठी राज्यांत आणि खुद्द पेशवाईंतहि निदान महार लोक तरी

लढवय्ये म्हणून फौजेंत दाखल होत होते. आणि महारांची छावणी पेशव्यांच्या तंबूच्या शेजारीं असे. म्हणजे असें कीं, त्यांची उपयुक्तता समाजाला मान्य होऊन गेली होती. गांवगाड्यांत त्यांना हक्कदारी प्राप्त झाली होती. संतश्रेणीत त्यांच्या प्रवेशास हरकत उरली नव्हती आणि त्यांच्या वाङ्मयास आधार मिळूं लागला होता. इंग्रजी संस्कृतीचा फैलाव इकडे सुरू होण्या-पूर्वी अस्पृश्यांच्यासंबंधाने काय काय झाले होते त्याचा हा अगदीं थोडक्यांत आढावा आहे. हा वाचला म्हणजे बरेंच झालें होतें असें वाटावयास लागतें; पण तें खरे नाहीं. त्यांच्या संतांस संत मानिलें आणि अभंगांस वाङ्मय मानिलें, येथेंच हे औदार्य संपले. चरितार्थाचें साधन त्यांस दिलें, पण तें केवळ पोटापुरतें, आणि वाईट सेवेनें प्राप्त होणारें, असें दिले. लष्करांत उपयुक्तता ओळखली, पण त्यांस राबवून घेण्यापलीकडे विशेष कांहीं झालें नाहीं.

## अस्पृश्य व ख्रिस्ती मिशनरी

यानंतर इंग्रजी संस्कृतीचा प्रसार सुरू झाला.इंग्रजी संस्कृति प्रसारानंतर ख्रिस्ती मिशनरी लोकांनी आपलें धर्मप्रसाराचें काम चालू केलें. तें अर्थातच अस्पृश्य लोकांत लवकर फैलावलें. पूर्वी मुसलमानांच्या अस-ल्या प्रयत्नाने लोकांच्या मनावर काय संस्कार झाला असेल,हें माहीत नाहीं.परंतु मिशनऱ्यांनीं अस्पृश्यांस ख्रिस्ती बनवितांच तो स्पृश्य बनतो,आणि समाजामध्यें उघडपणें वावरू शकतो, ही धर्मांतराची किमया उभयतांसहि चमत्कारिक वाटली असावी. आपण बाटतांच स्पृश्य होतों, ही जाणीव अस्पृश्यांस सुखावह वाटली असावी, आणि हा बाटतांच स्पर्श-योग्य होतो, हे ज्ञान इतरांस चमत्कारिकच वाटलें असावें. ते कांहीं असो, परंतु ख्रिस्ती मिशनऱ्यांची ही ख्रिस्तीकरणाची खटपट फार बोधप्रद ठरली असावी. त्या वेळीं या त्यांच्या प्रयत्नांस चांगलेंच यश आलें हें शिरगणतीच्या आंकड्यावरून स्पष्ट दिसून येतें.

पण ख्रिस्ती मिशनरी हे कांहीं महा-राष्ट्रीय स्पृश्य नव्हेत. त्यांच्या प्रयत्नाचा उल्लेख, एतद्देशीय प्रयत्नांस कसा कारणीभूत झाला, हे दाखविण्यापुरताच केलेला आहे. ख्रिस्ती मिशनरी जर थोड्याशा संस्कारानें एवढा बदल घडवून आणूं शकतो, तर आपल्यालाच ही किमया कां करतां येऊं नये, अशी कल्पना, ख्रिस्ती मिश-नऱ्यांच्या स्नेहभावांत आणि कृपाछत्रांत वागत असलेल्या फुले या गृहस्थांना प्राप्त झाली. वर सांगितलेल्या अवघड वाटेची, म्हणजे धर्मांत-राची जरूरी त्यांनीं मुळींच ठेवली नाहीं. अस्पृश्य लोकांना शिक्षण देण्याचें काम त्यांनीं १८४८ सालीं चालू केलें. या त्यांच्या प्रयत्नाला "मोरो विठ्ठल वाळवेकर, सखाराम यशवंत परांजपे, व सदाशिव बल्लाळ गोवंडे" या गृहस्थांची चांगली मदत असे. फुले यांनीं आपल्या घरच्या विहिरीवर पाणी भरण्यास अस्पृश्यांस परवानगी दिली. फुले यांच्या प्रयत्नासंबंधाने समाजाच्या मनांत विशेष आदरबुद्धि उत्पन्न होणें, निदान त्या काळीं तरी, अशक्य होतें. एक तर ही बाब जनसमूहाला अशी नवीनच होती, आणि दुसरें असें कीं फुले यांचीं इतर प्रतिपादनें, धोरणें, व आश्रय-स्थानें समाजास पटण्यास अयोग्य अशींच होतीं. हे त्यांच्या लिखाणावरून स्पष्ट दिसून येते. चळ-वळीचें तत्त्व कोणतें, आणि चळवळीचा पुरस्कर्ता कोण, या दोनहि गोष्टींकडे अज्ञ समजल्या जाणाऱ्या समाजाचें सुद्धां बारीक लक्ष असतें.अर्थात् फुले यांच्या प्रयत्नाकडे फारसें कोणाचें लक्ष गेलें नसल्यास त्यांत कांहींच नवल नाही. यानंतर एका ब्रह्मचाऱ्याचा उल्लेख करावयास हवा. तो ब्रह्मचारी म्हणजे विष्णु-बोवा गोखले हा होय. ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या उप-देशाची व प्रयत्नांची उठलेली लाट विरोधी तत्त्व-ज्ञानाच्या बळावर थोपवून धरणारा हा तेव्हांचा मोठा प्रसिद्ध वावदूक होता. त्याचे ग्रंथहि प्रसिद्ध आहेत. आपण सध्या सुधारणाविषयक जे जे बोलतों त्या त्या विषयाचें कडकडून, परंतु आत्म-भावानें, केलेले प्रतिपादन त्याच्या लिहिण्यांत दिसून येतें. यानंतर प्रार्थनासमाजानें या बाबतींत जे प्रयत्न केले ते विशेष महत्त्वाचे असे झाले.या समाजाच्या पुरस्कर्त्यांनीं समानता, बंधुभाव इ. तत्त्वें आपल्या आचरणाचे आधार मानिलीं, व तदनुसार अस्पृश्य लोकांशीं व्यवहार सुरू केला.

ही मंडळी ख्रिस्ती किंवा ख्रिस्त्यांच्या छापेंतील अशी अर्थातच नव्हती. यांच्यांत भांडारकर, रानडे, केळकर अशांसारखे मोठाले पंडित,विचारी व प्रयत्न-वादी असे अनेक लोक होते. हे लोक इतर अंगांनींहि आपल्या समाजाच्या उपयोगी पडणारे असे होते. अर्थात् समाजाला या प्रयत्नांकडे किंचित् का होईना, पण आपुल-कीच्या भावाने पाहणें योग्यच वाटलें. तरी पण त्यांत एक कूस राहिली होती. हे गृहस्थ आपल्यां-तीलच होते हें तर समाजाला माहीतच होतें, पण त्यांनीं जीं धर्ममतें अंगिकारिलीं होतीं,तीं समाजाला पसंत नव्हतीं. कां कीं, त्यांनीच जाणूनबुजून आपला स्वतंत्र सुभा उत्पन्न केला होता. वर सांगितलेंच आहे कीं, चळवळींचें तत्त्व कोणतें व पुरस्कर्ते कोण इकडे समाजाचें लक्ष असतें. एखादे वेळीं दोनही पसंत नसतात; एखादे वेळीं तत्त्व पसंत असून

पुरस्कर्ता नापसंत असतो, अथवा पुरस्कर्ता पसंत असून त्याची मतें पसंत नसतात. चळवळ खरी यशाच्या मार्गास लागावयास समाजाला दोघेहि पसंत असावे लागतात. प्रार्थनासमाजाचे पुरस्कर्ते अन्य कारणानें समाजाला वंद्य झालेले होते. परंतु धर्मविषयक बाबतींत ते समाजापासून फटकूनच राहात असल्यामुळे त्यांच्या एतद्विषयक प्रयत्नासंबंधानें बहुजनसमाज उदासीनच राहिला. तरी पण या प्रश्नाचें पाऊल जोरानें पुढें पडावयास या पुरस्कर्त्यांचा फार उपयोग झाला, आणि म्हणून "हा प्रश्न सोडविलाच पाहिजे" असें मत ज्यांनीं आतां पत्करलें आहे त्यांनीं यांचें ऋणी राहिलें पाहिजे. राष्ट्राचें कल्याण व्हावें म्हणून जी वरात निघालेली असते, तिजपुढे दरकोपऱ्यावर फुटणाऱ्या नारळासारखे हे लोक होत. ते आपआपल्यापरी वांया गेल्यासारखे झाले असतील, परंतु भविष्यत्कालांतील लोकांच्या सुखसाधनाच्या आड येणाऱ्या आपत्ती टाळण्यासाठीं त्यांनीं आत्मदान केलें, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं.

# शेतींतील नफ्यातोट्याचा हिशेब

महाराष्ट्रांतील शेतीचा धंदा कितपत फायदेशीर होतो हें समजून घेण्याकरितां **शेतकी खात्यांतील एका अर्थशास्त्रज्ञ अधिकाऱ्यांनीं नमुन्यादाखल कित्येक गांवांतील जमिनीच्या लागवडीचा जमाखर्च ठेवून पाहिला**. त्यावरून त्यांना जी माहिती मिळाली तिचा मथितार्थ पुढें दिल्याप्रमाणें आहे.

### (१) उंसाच्या शेतीचा हिशेब

| नं. | लागवडीचा खर्च दरएकरीं | शेतीचें उत्पन्न दरएकरीं | नफातोटा दरएकरीं |
|---|---|---|---|
| १ | ९७३-१० | ९०३-१५ | −६९-११ |
| २ | ९४२-८ | ९७७-१४ | +३५-६ |
| ३ | ९६८-१० | ९७२-७ | +३-१३ |
| ४ | १०५६७-१४ | ७०५-३ | −३६२-११ |
| ५ | ८९७-१४ | ८५९-१३ | −३८-१ |
| ६ | ८७२-६ | ८९१ | +१८-१० |
| ७ | ८५१-१२ | ९०८-७ | +५६-११ |
| ८ | ५४५-६ | २७६ | −२६९-६ |
| ९ | ६५१-१४ | ५१२-७ | −१३९-७ |
| १० | ८३८-७ | ६४९-८ | −१८८-१५ |

### (२) बाजरीच्या पिकाचा हिशेब

| नं. | द.ए. खर्च | द.ए. उत्पन्न | द.ए. नफातोटा |
|---|---|---|---|
| १ | ३७-१४ | ४३ | +५-२ |
| २ | २४-१५ | २४-१३ | −-२ |
| ३ | १७-१ | ६-५ | −१०-१२ |
| ४ | ३१-१५ | ४६-१५ | +१५ |
| ५ | १०८-१ | ११८-५ | +१०-४ |
| ६ | ६८-१ | ५४-६ | −१३-११ |
| ७ | ३३-६ | ८-६ | −२५ |
| ८ | ३०-६ | ४५-७ | +१५-१ |
| ९ | २०-१२ | ३७-७ | +१६-११ |
| १० | २१ | २३-५ | +२-५ |

### (३) शाळूच्या पिकाचा हिशेब

| नं. | द.ए. खर्च | द. ए उत्पन्न | द.ए. नफातोटा |
|---|---|---|---|
| १ | ३०-१३ | ११-१२ | −१९-१ |
| २ | २९-१४ | २१-११ | −८-३ |
| ३ | १०-९ | १-९ | −९ |
| ४ | ८-९ | १-९ | −७ |
| ५ | २२-३ | ६ | −१६-३ |
| ६ | ६-१० | ४ | −२-१० |
| ७ | १३ | २-४ | −१०-१२ |
| ८ | ४८-१० | ५३-१५ | +५-५ |
| ९ | ३७-६ | ५१ | +१३-१० |

वर जीं तीन कोष्टकं दिलीं आहेत, त्यांतली उंसाची लागवड तेवढी कालव्याच्या पाण्यावरची आहे. बाजरी व शाळू ज्वारी यांची लागवड केवळ पावसावर अवलंबून असलेली अशीच घेतली आहे. कारण हीं पिकें कालव्याचें पाणी घेऊन क्वचितच केली जातात.

वरील कोष्टकांत दरएकरीं खर्च आणि दरएकरीं उत्पन्न यांचे जे आंकडे दिले आहेत ते कोणत्या हिशेबावरून काढले हें समजण्याकरितां नमुन्यासाठीं म्हणून कांहीं जमाखर्चाचा तपशील पुढील कोष्टकांत दिला आहे:—

### उंसाच्या पिकाचा जमाखर्च

खर्चाचा तपशील

| कामाचा प्रकार | ए. खर्च नं.१ | ए. खर्च नं.२ |
|---|---|---|
| नांगरणी इ. | ५३-४ | ६० |
| खत कचऱ्याचे | २१-५ | ५० |
| ,, अमोनियम सल्फेट | ५८-१० | ४६ |
| ,, मासळीचें | १५० | १०२ |
| ,, पेंडीचे | ००० | ६६ |
| खताची वाहतूक | ६६-५ | ११६-८ |
| बींखरेदी | ६१-१० | ७५ |
| बींपेरणी | १६ | १५ |

| | | |
|---|---|---|
| कालव्याचें पाणी | ४५ | ४५ |
| पाणी लावणेंमजुरी | १० | १०।६ |
| भांगलणें कोळपणें इ. | ५७।५ | २८ |
| राखणावळ | ३६ | १२।८ |
| गुऱ्हाळाचें भाडें | २५।५ | २० |
| सर्पण इ. | २४ | ९ |
| गूळ तयार करणें | १४३।४ | १२२।१४ |
| गुळाची वाहतूक | १० | ९।१२ |
| एजंटाचें कमिशन इ. | ४२।१ | ३३।१२ |
| भांडवलावरील व्याज | ५८।१३ | ५७।१२ |
| जमिनीचा खंड | ६५ | ६३ |
| संकीर्ण | ३० | ५ |
| एकूण खर्च | ९७३।१० | ९६८।१० |

जमेचा तपशील

| | | |
|---|---|---|
| गूळ तयार | ८३५।१३ | ९०१।१५ |
| उंसाचीं वाडें | ६८।१।७ | ७०।८ |
| एकूण जमा | ९०३।१४।७ | ९७२।७ |
| नफा अगर नुकसान | −६९।११।५ | +३।१३ |

### बाजरीच्या पिकाचा जमाखर्च

खर्चाचा तपशील

| कामाचा प्रकार | नमुना नं. १ | नमुना नं. २ |
|---|---|---|
| नांगरणी | ३५।८।९ | २७।११ |
| पेरणी | २।७।११ | २।१२।९ |
| भांगलणें इ. | २।२।२ | २।४ |
| कापणी मळणी | २६।४ | १९।१।६ |
| खंड | ४० | १५ |
| संकीर्ण | १।१०।७ | १।४ |
| एकूण खर्च | १०८।१।५ | ६८।१।३ |

जमेचा तपशील

| | | |
|---|---|---|
| बाजरीविक्री | ९१।१०।८ | ३९।६ |
| सरमाड | २०।१५।३ | ११ |
| भुसा | १।१४।५ | १ |
| उडीद | ३।१२।१० | ३ |
| एकूण जमा | ११८।५।२ | ५४।६ |
| नफा अगर तोटा | +१०।३।९ | −१३।११।३ |

### (४) भुईमुगाच्या पिकाचा जमाखर्च

खर्चाचा तपशील

| | | |
|---|---|---|
| नांगरणी | १०।४ | ११ |
| खत घालणें | २४ | ०० |
| बीं व पेरणी | १७ | २१।८ |
| पाणी देणें | ८।६ | २७ |
| राखणावळ | ३।१२ | १० |
| काढणी | १२।११ | ९।८ |
| खंड | १५ | १० |
| किरकोळ | ५।१०।६ | ४।१५ |
| एकूण खर्च | ९६।११।६ | ९३।१५ |

जमेचा तपशील

| | | |
|---|---|---|
| भुईमूगशेंगा | ८८।७।९ | ८५ |
| भूस | ६ | १२ |
| एकूण जमा | ९४।७।९ | ९७ |
| नफा अगर तोटा | −२।३।९ | +३।१ |

### (५) कांद्याच्या पिकाचा जमाखर्च

खर्चाचा तपशील

| | | | |
|---|---|---|---|
| नागरणी | २१।१४ | खत घालणें | २८।८ |
| बीं व पेरणी | २२।४ | राखणावळ | २३।८ |
| पाणी लावणें | ४५ | पीक काढणें व वि. | ३०।२ |
| खंड | १० | किरकोळ | ५।१ |

एकूण खर्च १८६।५

जमेचा तपशील

| | | | |
|---|---|---|---|
| कांदेविक्री | १७१।७।६ | फोलपटविक्री | ४।५।६ |
| एकूण जमा | १७५।१३ | तोटा | १०।८ |

याप्रमाणें नमुन्याकरितां कांहीं पिकांचे जमाखर्च दिले आहेत. जेथें नफा व नुकसान दोहोंचे आंकडे आहेत तेथें एक नफ्याचें व एक तोट्याचें असें उदाहरण दिलें आहे. जेथें नफ्याचें उदाहरण आढळलें नाहीं तेथें नुसत्या तोट्याचेंच उदाहरण दिलें आहे.

वरील नमुन्यावरून शाळू, ज्वारी, हरभरे, गहूं, निळवा इत्यादि पिकांच्याहि जमाखर्चाचा प्रकार वाचकांच्या ध्यानांत येईलच.

# आमच्या प्रवासी प्रतिनिधींचें कार्य

'केसरी' नें अगदीं नवा उपक्रम करून परदेशांत एक खास प्रतिनिधि पाठविला होता हें वाचकांना आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या बातमीपत्रांवरून कळलेंच असेल. आमच्या प्रतिनिधीस अफगाणिस्थानांत पाठविण्याचा मूळ हेतु सफल झाला नसला तरी इराक, इराण व बलुचिस्थान यांमधील महत्त्वाच्या गोष्टी बातमीपत्रांच्या द्वारें महाराष्ट्र जनतेपुढें ठेवल्या गेल्या आहेत. वाचकांना नवी माहिती देऊन, जगांतील घडामोडींचें व विशेषतः आपणाशीं संबंध येणाऱ्या राष्ट्रांचें ज्ञान करून देणें, हें वर्तमानपत्रकारांचें एक मुख्य कर्तव्य असल्यानें असे प्रवासी प्रतिनिधी पाठविणें आवश्यक होय हें कोणीहि कबूल करील.

आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या बातमीपत्रांसंबंधीं आलेल्या चौकशीपत्रांवरून असें स्पष्ट दिसतें कीं हा नवा प्रकार वाचकांना पूर्णपणें पसंत पडला आहे. परंतु 'प्रवासी प्रतिनिधी'नें केलेल्या कामगिरीचें खरें महत्त्व जनतेपुढें आलेल्या लेखां-

वरूनच ठरवितां येणार नाहीं. 'केसरी'चा प्रवासी प्रतिनिधि हा परदेशांत अखिल हिंदुस्थानाच्या लोकांचाच प्रतिनिधि मानला गेला यांत नवल नाहीं. कारण आपणाकडे येणाऱ्या अमेरिकन अथवा युरोपियन प्रवाशाच्या अनुभवावरून आपणहि तिकडील जनतेची कल्पना नाहीं का करीत? तसाच प्रकार इकडून परदेशीं जाणाऱ्या मुशाफरांचा होतो. इराकमधील 'लोकमान्य,' 'राजमान्य' आणि 'आंग्लमान्य' अशा सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांनीं आमच्या प्रतिनिधीस मुलाखती दिल्या, आपले विचार सांगितले, हिंदुस्थानाविषयीं त्यांना काय वाटतें हें त्यांनीं बोलून दाखविलें. अशा मंडळींत इराकचे ब्रिटिश हाय-कमिशनर, माजी मुख्य मंत्री सर म्हार्सान बेग सादून, सेनेटचे माजी अध्यक्ष श्री. रशीद बेग गिलानी, तरुण राष्ट्रीय पक्षाचे पुढारी आणि इराकचे लंडनमधील माजी वकील श्री. मुझाहिमबेग पाचाची, फडनिशी खात्याचे मंत्री, 'इराकभूषण' सर ससून अफंदी (इराकचे "सर हुकुमचंद") "अल् इस्तकलाल" आणि दुसऱ्या एका आरबी पत्राचे संपादक, 'टाईम्स ऑफ मेसापोटेमिया'चे इंग्रजी संपादक, आरबी भाषापटु विद्वान मिशनरी रे. डॉ. व्हॅन एस्., शेक्सपिअरच्या नाट्यकृतींना इराणी वेष चढविणारे खानबहादुर मिर्झा महंमद इत्यादिकांनीं विचारविनिमय करून बरीचशी माहिती आमच्या प्रतिनिधीस दिली. इतकेंच नव्हे तर पुढील प्रवासासाठीं सोयीची व्यवस्थाहि करविली याबद्दल त्या सर्वांचे आभार मानले पाहिजेत.

इराणांतहि कसर इ-शिरिन आणि कर्मानशाहा येथील गव्हर्नर आणि हमादान, तेहेरान, मशहद, दुजदाब या ठिकाणचे मिशनरी यांनीं प्रवासासंबंधीं माहिती गोळा करण्यांत आणि इतर अनेक प्रकारें साह्य केलें आहे. खुद्द तेहेरानमधील इंग्रज वकिलातींतील अधिकाऱ्यांनीं इराणी "मजलीस" (पार्लमेंट) मध्यें जाऊन बसण्याकरितां तेथील प्रमुख अधिकाऱ्याशीं परिचय करून दिला आणि पासपोर्टाच्या निर्बंधांतील त्रास वांचविण्यासाठीं पुष्कळच मेहनत घेतली. लंडन टाईम्सनें ज्या गृहस्थांचा 'पौर्वात्य राष्ट्रांतील नामांकित मुत्सद्दी' म्हणून गौरव केला असे इराणी दरबारांतील मुख्य अधिकारी श्री. तैमूर ताश यांच्याच निमंत्रणावरून शाहाचा सलामसमारंभ आमच्या प्रवासी बातमीदारास पाहावयास मिळाला, आणि आजपर्यंत इराणांत आलेल्या लुटीचें व मिळविलेल्या नजराण्याचें प्रदर्शन पाहतां आलें. नादिरशाहानें हिंदुस्थानांतून नेलेलें रत्नखचित सिंहासन आमच्या प्रतिनिधीला पाहावयास मिळालें, इतकेंच नाहीं तर त्याचा एक सुंदर फोटोग्राफहि सारखें साहाय्य डॉ. जॉर्डन, मि. हॉपमन, मि. व मिसेस यंग या अमेरिकनांचें झालें. ॲंग्लो-पर्शियन ऑईल कंपनीचा आबादान येथील प्रचंड कारखाना पाहाण्यासाठीं प्रवेश मिळणें अत्यंत कठीण असतांहि, तेथील व्यवस्थापकांनीं त्या त्या शाखेच्या तज्ज्ञांकरवीं सर्व रचना व कार्यपद्धति आमच्या प्रतिनिधीस समजावून सांगितली. अभिमान वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे कोणाहि त्रयस्थांना फोटो घेण्याची अनुज्ञा आजपर्यंत दिली नसतां आमच्या प्रतिनिधीस ती संधि मिळाली व त्याप्रमाणे त्यांनीं फोटो घेतले. तीं सर्व चित्रें उत्कृष्ट प्रकारें छापवून महाराष्ट्रीय जनतेपुढें यावींत अशी व्यवस्था लवकरच होत आहे.

अली बंधूंना आणि हिंदुस्थानांतल्या कडव्या धर्मनिष्ठ (?) मुसलमानांना 'आजोळचा आहेर' काय मिळाला आहे हें आतां वाचकांना कळून चुकलें आहेच. ही वस्तुस्थिति आपणास समजल्यानें, साम्राज्यशाहीचा झेंडा सांपडेल त्या ठिकाणीं रोवण्यासाठीं चालू असलेली इंग्रज अधिकाऱ्यांची जिवापाड मेहनत दृष्टीस पडल्यानें, आणि इतर शेजारच्या राष्ट्रांत होत असलेली जागृति पाहून आपणास पाऊल पुढें कसें टाकावयाचें तें ठरवितां येईल या दृष्टीनें, आमच्या प्रवासी प्रतिनिधीचें कार्य यशस्वी झालें असलें तरी आणखीहि कांहीं बाबी विचारांत घेण्यासारख्या आहेत.

महाराष्ट्रांतील सुशिक्षित तरुणांना बेकारीची आंच फारच तीव्रतेनें लागत आहे. व्यापारी वर्गांत बेसुमार स्पर्धा वाढत असल्याबद्दल ओरड सुरू आहे तेव्हां त्याला कांहीं तरणोपाय सांपडेल का? अशा दृष्टीनें आमच्या प्रतिनिधीनें निरीक्षण केलें असून शिंपी, मोटारहांके व कुशल दुकानदार यांना तिकडे पुष्कळच वाव आहे असें त्याचें म्हणणें आहे. शेतीच्या आउतांचे कारखानदार किर्लोस्कर व कूपर, सुगंधी मालाचे व्यापारी, तयार कपड्यांचे व्यापारी आणि कलाकुसरीचीं कामें करणारे कारागीर या सर्वांस इराणांत कार्यक्षेत्र विस्तृत असल्याचें समजतें. हिंदी गिरण्यांचें सूत व कापड तिकडे कोट्यवधि रुपयांचें खपतें व आणखीहि खपेल. परंतु कोणत्याहि प्रकारचा संघटित प्रयत्न गिरणीवाल्यांकडून होत नाहीं. तशी खटपट केल्यास व्यापारधंदा वाढून बेकारी कमी होण्यास व मजूर वर्गाचे शिव्याशाप वांचविण्यास बरीच मदत होईल. एकाच ठिकाणीं दहाचीं वीस दुकानें करण्यापेक्षां अशा जवळच्या देशांत व्यापारधंदा वाढविण्यास कां जाऊं नये? महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्सच्या उत्साही व सद्भावनावश अध्यक्षांनीं या प्रश्नाचा अवश्य विचार करून अधिक खुलासा आमच्या प्रतिनिधीकडून मिळवावा व यासंबंधी एखादी उपयुक्त योजना आंखावी अशी आमची त्यांस सूचना आहे. अशा

# लो. टिळकांची भाषाशैली

( ले.—ग. वि. केतकर )

( ले. १ ला )

टिळकांच्या लेखनशैलीची सामान्य कल्पना प्रत्येक महाराष्ट्रीय वाचकानें आपापल्या मनाशीं केलेली असेलच. श्री. न. चिं. केळकर यांनीं टिळकचरित्राच्या तिसऱ्या खंडामध्यें शेवटीं टिळकांच्या भाषाशैलीचें जें थोडक्यांत पण मार्मिक वर्णन केलें आहे तें बहुतेकांस पटण्यासारखेंच आहे. पण यापेक्षां अधिक तपशिलांत शिरून भरपूर प्रमाणांसह हें विवेचन प्रस्तुत लेखमालेंत करावयाचें आहे. टिळकांच्या लेखनशैलीचा त्यांच्या स्वभावाशीं, स्वभावाचा मतप्रतिपादनाशीं, व मतप्रतिपादनाचा त्यांच्या आयुष्यांतील कार्याशीं निकट संबंध येतो. अर्थात् त्यांच्या भाषेचें साधार व सांगोपांग विवेचन म्हणजे भाषेच्या गवाक्षामधून त्यांच्या चरित्ररूपी प्रासादाचें अवलोकनच होय. या दृष्टीनें आठवणींच्या ओघांत जसें एक प्रकारें सर्वच चरित्र येतें तसेंच पण निराळ्या रीतीनें भाषा—विवेचनाच्या अनुषंगानें टिळकांच्या पुण्य चरित्राच्या अनेक उत्कट व स्मरणीय अंगांचे स्मरण व चिंतन या लेखमालेनें त्यांच्या नवव्या पुण्यतिथीचे वेळीं होणार आहे. अर्थात् भाषाभ्यासकांप्रमाणें ते टिळकचरित्र-भक्तांसहि वाचनीय, उद्बोधक, व नवीन पद्धतीनें तोच आवडता विषय सांगणारें असें वाटल्यावांचून राहणार नाहीं.

'स्टाईल इज दि मॅन' म्हणजे जसा मनुष्याचा स्वभाव तशीच त्याची भाषासरणी बनते अशी इंग्रजींत म्हण आहे. सर्व माणसांना परमेश्वरानें डोळे, नाक, कान, तोंड हीं दिलीं आहेत. पण प्रत्येकाच्या चेहऱ्याची ठेवण वेगळी असते. यामुळें प्रत्येकाचा चेहरा पाहिल्याबरोबर हा मनुष्य अमुक अशी ओळख पटते व चुकभूल होत नाहीं. भाषेतले शब्द तेच व अक्षरांची लिपी तीच, पण प्रत्येकाचें हस्ताक्षराचें वळण निराळें असतें. आणि हस्ताक्षर ओळखीचें झालें म्हणजे हें अमक्या माणसाचें पत्र असें त्या पत्रावर लिहिलेल्या पत्त्यावरूनहि मनुष्य ओळखूं शकतो. मनुष्याचा चेहरा व त्याची लिहिण्याची तऱ्हा यावरून प्रत्येकजण व्यवहारांत त्याच्या स्वभावाविषयींहि कांहीं कल्पना किंवा अटकळ करीत असतो व ती पुष्कळ वेळां बरोबरहि ठरते. चेहरा पाहून मनुष्याची कुंडली मांडणें किंवा हस्ताक्षरावरून स्वभावरचना ओळखणें आणि यासंबंधाचें शास्त्र बनविणें हे प्रयत्न पूर्ण साधले नसतील. पण हे प्रयत्न करण्याला लोक ज्या समजुतीनें प्रवृत्त होतात त्या समजुतींत बराच तथ्यांश आहे. ती समजूत म्हणजे मनुष्याची मुद्रा व हस्ताक्षराचें वळण यांचा त्याच्या स्वभावाशीं व त्याच्या व्यक्तित्वाशीं निकट संबंध आहे. हालचालीची ढब, चेहेऱ्याची ठेवण व अक्षरांचें वळण हेंहि स्वभावाप्रमाणेंच पुष्कळांशीं आनुवंशिक असतें. ज्या मुलानें आपल्या बापाला पाहिलें नाहीं असा पितृमरणोत्तर जन्मलेला मुलगा देखील स्वभावानें, बोलण्या-चालण्याच्या शैलीनें बापासारखाच होतो. इतकेंच नव्हे तर त्याचें हस्ताक्षर देखील त्यानें कधींहि न पाहिलेल्या त्याच्या पित्याच्या हस्ताक्षरासारखें बनतें असा व्यवहारांतील अनुभव आहे.

### भाषा व स्वभाव

चेहरा व अक्षरांचें वळण यांच्याइतकीच भाषेची शैली हीहि स्वभावनिदर्शक आहे. आणि ज्याप्रमाणें एखादी लिहिलेली ओळ वाचल्याबरोबर 'हें अमक्याचें अक्षर आहे' असें कोणीहि त्या अक्षराच्या वळणाची ओळख असलेला मनुष्य सांगूं शकतो त्याप्रमाणेंच एकदोन छापील मजकुराच्या ओळी वाचून हा अमक्याचा लेख आहे हेंहि मनुष्य भाषाशैलीची चांगली ओळख झाल्यावर जाणूं शकतो. मनुष्य लहानपणीं कित्ते गिरवीत असतां त्याच्या हस्ताक्षराला वैशिष्ट्य नसतें. पण पुढें तो स्वतंत्रपणें लिहूं लागला म्हणजे हें वैशिष्ट्य उत्पन्न होतें. तसेंच भाषाशैलीचें आहे. प्रथम अनुकरणबुद्धीनें वाचलेल्या व अभ्यासिलेल्या पुस्तकांतील रीती मनुष्य उचलतो व ही प्राथमिक भाषाशैली खडर्याप्रमाणे ओळखतां येण्यासारखी नसते. पण हळूहळू तो या वाचलेल्या व अभ्यासिलेल्या पुस्तकांतील त्याला स्वाभाविकपणें आवडणारीं वळणें उचलतो व बाकीचीं सोडून देतो. अशा क्रमानें त्याचें भाषावैशिष्ट्य निर्माण होतें. एकाच कित्त्यावरून अक्षरें गिरवून तयार झालेल्या मुलांचीं अक्षरें जशीं निरनिराळीं होतात त्याचप्रमाणें एकाच प्रकारचें वाङ्मय वाचलेल्या लोकांच्या भाषाशैली भिन्न होतात. गीतेंतील १७ व्या व अठराव्या अध्यायांत

स्वभावानुसार माणसाच्या सर्व प्रकारच्या क्रिया कशा होतात याचें त्रिगुणात्मक वर्णन केलें आहे. सर्व कांहीं त्याच्या सत्त्वानुरूप म्हणजे त्याची प्रकृति अगर स्वभाव यांस अनुसरून होतें. त्याच तत्त्वास अनुसरून "सत्त्वानुरूपा सर्वस्य रीतिर्भवति वाङ्मयी" असा नियम सांगतां येईल.

भाषाशैलीची स्वभावाशीं पूर्ण समरसता झाली म्हणजे ती त्या माणसाची स्वाभाविक शैली बनली. 'ऐकावें जनाचें पण करावें मनाचें' हा कृतीचा नियम प्रत्येकानें अमलांत आणला म्हणजे त्याची कृति 'मनःपूत' होते; म्हणजे त्याच्या प्रकृत्यनुसारच होते. त्याप्रमाणें माणसानें भाषेचा अभ्यास करावा, पण ह्या अभ्यासाचा उपयोग कृत्रिम रीतीनें व केवळ अनुकरणबुद्धीनें करूं नये. त्या अभ्यासानें भाषाप्रभुत्व मिळवावें व मग ती भाषा स्वभावानुसार प्रगट व्हावी ही भाषाशैली बनण्याची खरी रीत. पण कृत्रिमपणा, दरबारीपणा, औपचारिकपणा, अगर तोंडदेखलेपणा हाच कित्येकांचा कमी-अधिकपणाने स्वभाव असतो. कित्येक माणसें भयानें अगर मतलबानें विशिष्ट प्रसंगीं मुद्दाम विशिष्ट प्रकारची कृति करतात अगर भाषा बोलतात. अर्थात् स्वभावा-स्वभावांतहि अकृत्रिमपणा, सरळपणा, निर्भीड मनमोकळेपणा किंवा औपचारिक दिखाऊपणा असे भेद असतात. आणि तदनुसार या मनुष्याचा स्वभावच सरळ व मनमोकळा आहे व त्या मनुष्याचा स्वभावच कृत्रिम आविर्भाव करण्याचा आहे असें आपण म्हणत असतों. अर्थात मनुष्याच्या स्वाभाविक वर्तणुकींतहि अकृत्रिमपणा व धोरणी धूर्तपणा असे विभाग पडतात त्याचप्रमाणें स्वाभाविक अशा भाषाशैलींत देखील कृत्रिमपणा व अकृत्रिमपणा असे भेद पुनः पडतातच. या दृष्टीने बोलावयाचें तर लोकमान्य टिळकांची भाषाशैली त्यांच्या स्वभावाप्रमाणें सरळ, अकृत्रिम, निर्भीड व प्रामाणिक अशीच बनली होती असें म्हणावें लागतें.

## स्वभाव व अभ्यास

स्वाभाविक भाषाशैली म्हणजे भाषेचा अभ्यास न करतां उत्पन्न झालेली शैली नव्हे. किंवा उपमा, दृष्टान्त, विद्वत्ता, अवतरणे इ. मुळींच नसणे हेंहि स्वाभाविक भाषेचें लक्षण नव्हे हे लक्षांत ठेवलें पाहिजे. स्वाभाविक म्हणजे अनभ्यस्त व असंस्कृत नव्हे. तर अभ्यास व वाचन यांनीं मनांत सांठविलेले वाक्प्रचार, उपमा, दृष्टान्त, उपपत्ति इ. गोष्टी स्वाभाविक स्फूर्तीनें यथास्वभाव प्रकट होणें. लोकमान्य टिळकांना कॉलेजांत संस्कृत व गणित या विषयांची विशेष आवड होती. कालिदासादिकांचे काव्यग्रंथ त्यांना प्रिय वाटत असत, हें गीतारहस्याच्या अर्पणपत्रिकेत दिसून येते. पण 'कालिदासाक्षरैः प्रियैः' हे शब्द ज्या संस्कृत श्लोकांत ग्रथित केले आहेत त्यांच्या धाटणींत कालिदासाच्या वाङ्मय-रीतीपेक्षां त्यांना महाभारताची वाङ्मय-रीतीच अधिक स्वभावानुकूल वाटत होती हें उघड दिसतें. विद्यार्थीदशेंत त्यांनीं केलेल्या कवितांवर संस्कृत काव्यग्रंथांचीच छाप विशेष असलेली दिसते. पण पुढें महाभारताचा अभ्यास अधिक झाल्यावर त्यांतच त्यांचा स्वभाव रमला. वैदिक वाङ्मय त्यांनीं संशोधनार्थ व परंपराभिमानी आपलेपणानें वाचले; स्मृति-ग्रंथ हे हिंदु समाजरचनेचीं तत्त्वें समजून घेण्याच्या जिज्ञासाबुद्धीनें अभ्यासिले; संस्कृत भाषेच्या अभ्यासासाठीं त्यांनी कालिदासादिकांच्या काव्यग्रंथांचेंहि परिशीलन केलें. पण या सर्वांतील भाषासरणीपेक्षां महाभारताची साधी, ठसठशीत व परिणामकारक भाषासरणीच त्यांना अधिक आवडली.

## महाभारत

महाभारतासंबंधाने त्यांचा आदर वाढण्याला त्या ग्रंथाचे इतर गुण कारणीभूत नव्हते असें नाहीं. पण या ग्रंथानें त्यांचें जें मन आकर्षून घेतलें त्याच्या अनेक कारणांपैकीं भाषाशैली हें एक कारण असलें पाहिजे. थोडक्यांत पुष्कळ अर्थ व्यक्त करण्याचा संस्कृत भाषेचा गुण लोकमान्यांना स्वभावतः आवडत होता. मराठी लेखांवर एखादे संस्कृत वचन घालण्याची जी त्यांची प्रवृत्ति होती त्याचें कारण हेंच होय. लेखाचा मराठी मथळा समर्पक व परिणामकारक असावा त्याप्रमाणेंच त्यावर थोडक्यांत लेखाचें मर्म मनावर बिंबवणारें संस्कृत वचन घालावें असें त्यांस वाटे. "संस्कृतचें पाठांतर पाहिजे. मराठी भाषेवर प्रभुत्व येण्यास संस्कृत पाठांतराचा पुष्कळ उपयोग होतो. वर्तमानपत्राच्या संपादकांना तर त्याची फार जरूरी आहे. विषयप्रतिपादनांत किंवा समारोप करतांना त्यांचा फार उपयोग होतो" (आ. १-१२८) असा ते विद्यार्थ्यांनाहि उपदेश करीत. अशा रीतीनें उद्धृत केलेल्या वचनांत महाभारतांतील वचनेंच पुष्कळ आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. त्याच्या खालोखाल जर या बाबतींत दुसऱ्या कोणत्या ग्रंथाला क्रमांक द्यावयाचा तर तो भर्तृहरीच्या नीतिशतकाला. मराठी श्लोक अगर वचन त्यांनीं मथळयावर दिलेलें आढळत नाही. इंग्रजी उतारे तर मुळीच कोठें दिले नाहींत. मुंबईच्या युद्धपरिषदेंतून उठून आल्यावर लॉर्ड विलिंग्डन यांचा अत्याचार हा जो त्यांनीं १९१८ सालीं केसरींत अग्रलेख लिहिला त्याच्यावर "मय्यप्यास्थान चेत् त्वयि मम सुतरां एष राजन् गतोऽस्मि" हें भर्तृहरीचें संस्कृत वचन घालून

खालीं टीपेंत वामनपंडिताच्या समश्लोकी भाषांतरांतील चरण दिला आहे. आणि तोहि त्यांत 'तुच्छ' हा एक अधिक शब्द आहे म्हणूनच दिला आहे. भर्तृहरीच्या खालोखाल संस्कृत सुभाषितें व वैदिक वचनें यांचा क्रमांक येईल. त्यांतील विचार चांगला म्हणून ते उतारे घेतले हें खरें.पण ते निवडण्यांत निवडणाऱ्याला कोणत्या प्रकारच्या भाषेची आवड आहे हेंहि दिसून येतें.

## इंग्रजी भाषा

इंग्रजी भाषेची लोकमान्यांना विशेष स्वाभाविक आवड नव्हती. इंग्रजी भाषा ही संस्कृतप्रमाणें थोडक्यांत स्पष्टार्थप्रतिपादक नाहीं असें त्यांस वाटत असावें. कॉलेजांत प्रथम 'एफ. ए.' मध्यें ते नापास झाले. ते 'इंग्रजी' या विषयांत झाले असावेत असें त्यांचे सहाध्यायी बडोद्याचे कै. रा. सा. शारंगपाणी हे आपल्या आठवणींत सांगतात. पण पुढें त्यांनीं जरूर म्हणून व इंग्रजी भाषेंतील मिल्ल स्पेन्सरादिकांच्या ग्रंथांची विषयदृष्ट्या आवड म्हणून इंग्रजीचा अभ्यास व व्यासंग केला. त्या काळच्या सुशिक्षित लोकांप्रमाणें बराचसा खासगी पत्रव्यवहार इंग्रजींत करण्याची त्यांना संवय होती. केवळ भाषेच्या आवडीनें त्यांनीं इंग्रजी ग्रंथांचें वाचन केलेलें दिसत नाहीं. मंडालेच्या तुरुंगांतून त्यांनीं आपल्या मुलांच्या मॅट्रिकच्या अभ्यासासाठीं ज्या सूचना पाठविल्या त्यांत इंग्रजी भाषेच्या दृष्टीनें चांगले उतारे मुलांकडून पाठ करून घ्यावेत असें लिहिलें आहे. त्याचप्रमाणें संस्कृत श्लोकहि पाठ करवून घ्यावेत असें म्हटलें आहे. यावरून भाषेच्या दृष्टीनें संस्कृत व इंग्रजी पाठांतराहि लोकमान्यांनीं विद्यार्थीदशेंत थोडेंफार केलें असेलहि. पण त्यांची स्मरणशक्ति दांडगी असल्यामुळें या पाठांतराला फारशी घोकंपट्टी त्यांनीं केली असेल असें वाटत नाहीं. डेक्कन ए. सोसायटीचा त्यांनीं राजिनामा दिला तो इंग्रजींत लिहिलेला आहे. श्री. दिवेकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या इंग्रजी चरित्रामध्यें शेवटीं तो परिशिष्टांत आतां समग्र प्रसिद्ध झाला आहे. या राजीनाम्याची भाषा पाहिली तर ती गंभीरपणा, प्रामाणिकपणा व खेदभावना प्रदर्शित करण्यास अत्यंत अनुरूप, स्पष्ट व परिणामकारक अशीच आहे.

पुढें त्यांनीं लिहिलेल्या आर्क्टिक होम व ओरायन या इंग्रजी ग्रंथांतहि शास्त्रीय ग्रंथांना जशी निःसंदिग्ध, खुलासेवार, बालबोध व ठसठशीत भाषा लागते तशीच ती आहे. अर्थात् जरूर ते लेख व ग्रंथलेखन या कामीं इंग्रजी भाषेचा लोकमान्यांना जेव्हां जेव्हां उपयोग करावा लागला तेव्हां तीं प्रसंगोचित कार्यभाग योग्य रीतीनें करण्याइतकी समर्पक व अर्थवाहक अशीच त्यांच्या लेखणींतून उतरली. सुरतेच्या कॉंग्रेसच्या वेळचें त्यांचें इंग्रजी वक्तृत्व ऐकून त्यांच्या कित्येक भक्तांनींहि आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं. कारण प्रसंग अत्यंत आणीबाणीचा होता. आणि टिळकांना इंग्रजी वक्तृत्वाची संवय नाहीं, तेव्हां हा प्रसंग टिळक कसा निभावून नेणार अशा आपलेपणाच्या काळजींत त्यांचे कित्येक अनुयायी होते. पण टिळकांनीं तें कार्य अत्यंत सुबोध, व्यवस्थित व इष्ट परिणामकारक रीतीनें केलें हें पाहून "Tilak rises to the occasion" प्रसंग जितका मोठा तितकें किंवा त्याहूनहि कांकणभर अधिक होण्याची अद्भुत शक्ति टिळकांपाशीं आहे याचा त्यांना प्रत्यय आला. पुढें सामाजिक विषयासंबधानें टिळक व डॉ. रघुनाथराव परांजपे यांच्यांत जो वाद झाला त्यांत टिळकांनीं डॉ. परांजपे यांच्या इंग्रजी लेखाला मराठीप्रमाणें इंग्रजींतहि उत्तर दिलें आहे. त्याचीहि भाषा सराईत, समर्पक व परिणामकारक आहे. टिळकांनीं लिहिलें यापेक्षां अधिक इंग्रजी लिहिण्याचें मनांत आणलें असतें तर तें त्यांना लिहितां आलें असतें. पण त्यांना इंग्रजींत लिहिण्याची अगर बोलण्याची विशेष अशी हौस नव्हती. मात्र त्यांनीं केलेल्या दहा-पांच संस्कृत श्लोकांत जसा त्यांचा स्वभावगुण उतरला तसाच तो इंग्रजींतहि उतरला आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. म्हणजे स्वाभाविक भाषा लिहिण्याइतकें प्रभुत्व या दोनहि भाषांवर त्यांचें होतें. पण त्यांचें पुष्कळसें लिहिणें मराठींत आहे व त्या लिहिण्याची शैली कशी होती याचेंच विवेचन प्रस्तुत लेखमालेंत मुख्यतः करावयाचें आहे. त्याला प्रस्तावनेदाखल त्यांच्या इंग्रजी-संस्कृत अभ्यासाचा निर्देश व संक्षिप्त विवेचन करणें हे पुढील प्रतिपादनास बऱ्याच अंशीं उपकारक असल्यामुळें येथें केलें आहे. लो. टिळकांचें मराठी लिखाण बरेंच असल्यामुळें त्यांचें स्वभाववैशिष्ट्य त्यांतच पूर्णपणें व सर्वांगानें प्रतिबिंबित झालेलें आढळून येतें. आणि टिळकचरित्र अगर आठवणी यांतून टिळकांच्या स्वभावाचें जें एक चित्र वाचकांच्या मनश्चक्षूपुढें उभें राहतें तेंच त्यांच्या भाषेच्या स्वाभाविक शैलीमध्यें कसे दिसतें हें पाहाणें टिळकांच्या भक्तांना व भाषेच्या अभ्यासकांनाहि उद्बोधक व अगत्याचें वाटण्यासारखें आहे.

# महाराष्ट्रांतील स्पृश्यकृत अस्पृश्यतानिवारणाचे प्रयत्न

## श्री. म. माटे यांच्या व्याख्यानाचा सारांश
### ( २ )

प्रार्थनासमाजाप्रमाणेंच, पण पूर्वीच्या बंधनापासून अधिक मोकळा झालेला असा जो ब्रम्हो समाज, त्याचे महाराष्ट्रांतील पुरस्कर्ते श्री.व्ही.आर. शिंदे यांनीं या बाबतींत केलेले प्रयत्न अनुक्रमवार पुढें येतात. थोड्याफार फरकानें दोनहि समाज एकच आहेत, निदान प्रस्तुत प्रश्नाविषयीं दोघांचें धोरण एकच आहे; व प्रार्थनासमाजांतील पुढारी हे संख्येने व इतर कारणांनी महाराष्ट्रांतील ब्रम्हो लोकांपेक्षां श्रेष्ठ असले तरी या प्रश्नासंबंधानें जोराची उचल श्री. शिंदे या ब्रम्ह समाजिस्टांनीच केली. निराश्रित–साह्यकारी मंडळीची स्थापना करून अखिल भारतभर तिच्या शाखोपशाखा त्यांनीं चालू केल्या. मुख्य ठाणें महाराष्ट्रांतच असल्यामुळें खालीं बगलोरपर्यंत, त्यांनी सुरू केलेल्या कामाचा प्रसार अनेक ठिकाणीं झाला.

शिंदे हे स्वतः धर्मविद्येच्या अभ्यासासाठीं विलायतेस जाऊन आलेले; निरनिराळ्या धर्मांचा त्यांनीं तुलनात्मक अभ्यास केलेला. अर्थात् त्या त्या मानानें धर्मासंबंधीं स्वतंत्र कल्पना मनाशीं वागत असल्यामुळें त्यांनीं हे काम हिंदुधर्माचें म्हणून न करतां, अस्पृष्ट लोक हे शुद्ध मानवधर्मापासूनच दूर ठेवण्यांत आलेले आहेत पण आतां त्यांस जवळ केलें पाहिजे या भावनेनें त्यांनीं आपलें काम चालू केलें. अहोरात्र तोच विषय मनाशी ठेवून त्याची सर्व अंगे–उपांगें त्यांनीं बारकाईनें पाहिली. महाराष्ट्रांत त्यांनीं पुष्कळच प्रवास केला, व अस्पृष्ट लोकांची परिस्थिति प्रत्यक्ष पाहिली. अनेक ठिकाणी शाळा स्थापन करून विद्यादानाचें काम चालू केलें, व वेळोवेळीं इतर समाजाच्या धर्मबुद्धीला आवाहन करून या संस्थेला हरतऱ्हेचें साह्य मिळविलें. सध्या अस्पृष्ट समाजांत, दोनतीन उदाहरणें सोडून बाकीचे अर्धशिक्षितच का होईनात पण पुढारी म्हणून जे लोक कामें करीत आहेत, त्यांपैकीं बहुतेक शिंदे यांच्या संस्थेंतूनच बाहेर पडले आहेत. या त्यांच्या विस्तृत प्रयत्नांत ज्या माणसांचें कित्येक वर्षेपर्यंत त्यांस बरोबरीनें साह्य झालें, त्यांत श्री. सोहनी, श्री. पटवर्धन यांचीं नांवे ध्यानांत ठेवण्यासारखी आहेत.

सरासरी १८-१९ सालापर्यंत या संस्थेचीं धोरणें व कार्यपद्धति सुसंगत राहिलेल्या होत्या. पुढेंहि काँग्रेसच्या द्वारा वगैरे हा प्रश्न लोकांपुढें मांडण्यासाठी बरीच खटपट सदर संस्थेनें केली. शिंदे हे ब्रम्ह समाजी असल्यामुळें त्यांच्या प्रतिपादनावर आणि पद्धतीवर त्या समाजाच्या मताची दाट छाया असे. अस्पृश्योद्धाराचा प्रश्न जरी त्यांनी हातीं घेतलेला असला तरी त्या समाजाचीं समाजसुधारणेचीं व धर्मसुधारणेची इतर सर्व मते ते पुरस्कारीत असत. अर्थात् जनसमाजाला त्यांच्या या मतांचें पुरें वावडे असल्यामुळें त्यांच्या मुख्य कामगिरिसंबंधानेंहि जनसमाज उदासीन राहात आला. इतर सर्व बाबींत जर सुधारक हा आपला आहे असे समाजास वाटत असलें, तर त्याच्या एखाद्या नव्या मताकडे समाज आदरानें पाहातो व ते कदाचित् पत्करतोहि. परंतु आपल्याशीं याच्या मतःसंप्रदायाचा कोठेहि लागाबांधा नाहीं असें जर दिसत असलें, तर समाज 'यूयं यूयं, वयं वयं' या न्यायानेंच वागत रहातो. असो.

सामाजिक सुधारणेच्या सर्वसामान्य दलदलींतच याही प्रश्नाचे पाय गुंतविले गेल्यामुळे त्याची प्रगति लवकर होईना. कै. रानडे हे प्रार्थनासमाजिस्ट नसते व शिंदे हे ब्रम्ह समाजिस्ट नसते तर हिंदु समाजाची सुधारणा यांच्या हातून फार त्वरेनें झाली असती. बरें, गूढ धर्मबुद्धि ही त्यांना बाहेरूनच आणावयास हवी होती असें मुळीच नाही. आपल्याच भक्तिमार्गसंप्रदायांत या बुद्धीची पूर्ण वाढ झालेली होती. तिचाच अंगीकार करून स्वतंत्र सुभा न करतां समाजाच्या पोटीं राहूनच समाजसुधारणा करण्याचें काम या उभयतांनीं केलें असतें तर कामांत सुकरता आणि सुधारणेत गति उत्पन्न झाली असती पण तें व्हावयाचें नव्हतें. साहजिकच हिंदु समाज त्यांच्यापासून दूर राहिला. तें कसेंहि झालें। असलें तरी समाजापासून आपण होऊन दूर राहण्याची आपत्ति रा. शिंदे यांनी आपण होऊन पत्कारिली व तेव्हांच्या मानानें पाहतां सरकारदरबारीं मोठें पदवीचें स्थान सहज मिळवितां येण्यासारखे असतां तिकडे पाठ फिरवून आपद्ग्रस्त लोकांच्या उद्धारासाठीं त्यांनी जी अहर्निश खटपट केली, ती आधुनिक कालांतील सुधारणाविषयक परिश्रमांच्या इतिहासांत प्रमुख जागीं आणि ठळकपणानें शोभण्यासारखी अशी आहे यांत कांहीएक शंका नाही.

शिंदे यांच्या प्रयत्नांबरोबरच इतरत्र जें कांही कल्पनाप्रसाराच्या रूपानें किंवा प्रत्यक्ष आचाराच्या रूपानें घडून येत होतें त्याचाहि

उल्लेख व्हावयास पाहिजे. श्रीमंत सयाजीराव महाराज यांनीं वाचेनें व आर्थिक मदतीनें या प्रश्नाचा जोराचा पुरस्कार केला व या त्यांच्या पुरस्काराचे फळ म्हणजे अस्पृष्ट समाजाला आपल्या जातीचे शूर पुढारी लाभले हें होय. कै० छत्रपति शाहू महाराज यांचीहि या बाबतींतील मेहनत व उडी केवळ प्रशंसनीय आहे. ब्राह्मणांचें धार्मिक वर्चस्व मोडून पाडण्याचा महाराजांचा जो मूळ हेतु, त्यास पुढें कशीहि रूपें प्राप्त झालीं असोत, पण त्या हेतूच्या व्यापकपणांत अस्पृश्यांचा प्रश्न त्यांनीं सामावून घेतला होता. आपल्या अधिकाराचा, संपत्तीचा आणि नैसर्गिक पुढारीपणाचा जितका देतां येईल तितका लाभ त्यांनी अस्पृष्ट समाजांस प्राप्त करून दिला. त्यांजबरोबर चहापान करणें, स्वतःच्या बावडीवर त्यांस पाणी भरूं देणे व त्यांचीं स्वतंत्र बोर्डिंगें उभारून चळवळीस द्रव्यसाह्य करणे, प्रतिष्ठित धंद्यांमध्ये त्यांचा मुद्दाम प्रवेश करून देणें, अशासारख्या अनेक गोष्टी त्यांनीं अस्पृश्य समाजासाठीं केल्या. त्यांच्या प्रयत्नांचें मुख्य ठिकाण जरी त्यांचे संस्थानच असलें तरी बाहेर अनेक ठिकाणी त्यांच्या औदार्याचा हात पोंचतच होता. असो.

भोपटकर बंधू यांच्या भाला पत्राचाहि उल्लेख याच सुमारास करावयास पाहिजे. महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षांत ज्या वेळीं या प्रश्नासंबंधानें कोणी कांहींच बोलत नव्हतें, किंवा बोलले तर सविस्तर आणि कडकडून बोलत नव्हतें, त्या वेळीं श्री. भास्कर बलवत व लक्ष्मण बलवंत या भोपटकर बंधूंनीं या प्रश्नाला आपल्या पत्रांत फार महत्त्वाचे स्थान देऊन नाखूष वाचकांना सुद्धां त्याची चर्चा वाचावयास भाग पाडिले. पण याहीपेक्षां मत्सरी, गैरसमज माजवून देण्यास टपलेले, राजकारणांत फिके पडलेले, मर्दुमकीनें नव्हे तर गैरसमजाच्या बळावर बहुजनसमाज आपल्यामागे ओढावयास पाहाणारे, टिळक हे लोकछंदानुवर्ती असून समाजसुधारणेला विरोध करणारे आहेत या माळेचे मणी सारखे ओढीत बसलेले, अशा लोकांचा भोंवतालीं गराडा पडलेला असतांना आणि सरकारी अवकृपेचे लांडगे गाडी चोहोकडून ओढावयास पाहात असतांना लो. टिळक यांनीं १९०७-०८ सालापासून तों शेवटपर्यंत शेलके प्रसंग साधून या विषयाच्यासंबंधानें जीं सूत्रमय वाक्यें बोलून टाकिलीं, त्यांचा विचार करणें त्यांच्या अफाट अनुयायी वर्गास भागच पडलें. पुरुषसूक्ताचा उल्लेख करून त्यांनी बेधडक सांगितलें कीं, "पायाचा विटाळ जर शरीराला होत नाहीं, तर परमेश्वराच्या अफाट शरीराचा अवयव असलेले अस्पृष्ट लोक हे त्याच्या इतर देहास विटाळ करूं शकत नाहींत!"

गणपतीच्या मिरवणुकीच्या वेळीं चांभाराचा गणपति त्यांनी आपल्या स्वतःच्या गणपतीच्या गाडीत बसवून घेतलेला होता हे सर्वांनीं पाहिलें होतें. अस्पृष्टांना देवालयप्रवेश मिळाला पाहिजे या आपल्या मताचा उपयोग 'प्रोपॅगंडा' (मतप्रसार) साठीं करावयास त्यांनी मला सदर परवानगी दिली होती. त्यांच्या मानपत्राला अपशकुन करण्याच्या बुद्धीनें जे जेवणाविषयीं बोलले त्यांना त्यांनी बजाविले कीं, "राष्ट्रकार्यासाठी जेवणाची जरूरी आहे असें सिद्ध झाले तर जेवीनहि"; पण त्यांचे एक वाक्य मात्र या सर्वांवर निकालाचें म्हणून नमूद करावयास पाहिजे. ते म्हणाले, "प्रत्यक्ष परमेश्वरानें जर अस्पृश्यता मानिली पाहिजे असे सांगितलें तर मी त्या परमेश्वरास अस्पृश्य मानीन!" हीं वचनें अनुयायीशून्य फाटिंगाचीं, किंवा अनभ्यस्त प्रतिपादकाचीं नव्हत. सर्व हयातभर संकटे सोसून लक्षावधि अनुयायी ज्यानें मिळविले, आणि म्हणून ते जपून धरावयास पाहिजेत अशी चिंता ज्यास पडावयास हवी, अशा व सर्व शास्त्रांचा देशकालपरत्वें अभ्यास करणाऱ्या पुढाऱ्याचीं हीं वचनें आहेत, हेंच त्यांच्या उडेतोड उद्गारांचें खरें महत्त्व आहे. सर्वथा वंद्य अशा आपल्या पुढाऱ्यांचे हें प्रतिपादन लोकांच्या मनांत चरचरतच उतरलें असलें पाहिजे!

# सरकारी हिशेबांतील गोंधळ

हिंदुस्थान--सरकारच्या जमाबंदी खात्याचे मुख्य अधिकारी अकौंटंट--जनरल यांनी १९२७--२८ सालाचे हिशेब तपासून एक रिपोर्ट नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यावरून सरकारी हिशेबांत व जमाखर्चांतहि किती आंधळा कारभार व अफरातफर होत असते याची कल्पना येते. सरकारी पैशाची अफरातफर, लांचलुचपतीचे प्रकार, चोरी, फसवेगिरी असे प्रकार घडून आलेले पाहिले म्हणजे दिव्याखालीं अंधार कसा असतो याची बरोबर कल्पना येते. यासंबंधानें स्वतः सरकारच्याच रिपोर्टांतील कांहीं उदाहरणें वाचकांचे माहितीकरितां खालीं दिलीं आहेत, त्यावरून लोकांना सहज योग्य तें अनुमान काढतां येईल.

एका लहानशा खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याला

१९२६ च्या डिसेंबर महिन्यांत सादिलवार खातें या सदराखालीं कांहीं रक्कम मंजूर करण्यांत आली. अर्थात् सादिलवार खातें याचा अर्थ आयत्या वेळी किरकोळ म्हणून कराव्या लागणाऱ्या खर्चाचें खातें. या पैशाचा विनियोग या अधिकाऱ्याच्या लहरी चैनीकडे करण्यांत आला ! ती चैन अशी कीं, गोष्टींचीं पुस्तकें, कादंबऱ्या, चित्रांचे कॅटलॅाग, मासिकें हीं विकत घेण्यांत आलीं व या पुस्तकांचा खर्च सादिलवार या सदराखालीं मंजूर झालेल्या रकमेंतून करण्यांत आला. बरें, ही गोष्ट घडली १९२६ च्या डिसेंबरांत. १९२७ च्या फेब्रुवारी महिन्यांत ती उघडकीस आली व वरिष्ठ अधिकाऱ्याकडे दाद लावण्यांत आली. १९२८च्या जुलै महिन्यांत मार्गाल हिशेब करण्यांत आले. परंतु या खर्चाची दाद लागेना व शेवटीं दाद लागतां लागली ती अशी कीं, झाला खर्च होऊन गेला, नसती कुराप ! काढूं नका.खर्च बरोबर झाला असें म्हणा व मंजूर करा! एकूण गुळाचा गणपति व गुळाचा नैवेद्य हीच स्थिति!

दुसरी एक मौज अशीच आहे. ती अशी कीं, हिंदुस्थान-सरकारने १९१३ सालीं स्थानिक सरकारला असा हुकूम काढला कीं, दिल्ली येथील वेसिलियन चर्चच्या पाद्र्याला वसतिगृह देण्याची जबाबदारी घेऊं नये व त्याची सोय आपण करूं नये. तथापि पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटनें सतत १४ वर्षे या भटजीबुवांची सोय केली. १४ वर्षांचें बिल फुगत फुगत हा आंकडा ४९.०० वर गेला. सगळे वरिष्ठ कनिष्ठ अधिकारी १४ वर्षे कुंभकर्णाची झोप घेत होते! वसतिगृहाच्या खर्चाचा आंकडा वाढे. खर्चाचे पैसे पब्लिक वर्क्स खात्याच्या अधिकाऱ्याच्या हातीं येत, खर्च होत. पण भाड्याचे पैसे पाद्र्याकडून वसूल होत नाहीत याची दाद कोणालाच नाहीं ! शेवटीं हे ५००० रुपयांचे बिल मंजूर करण्यांत आले व कारण काय तर मूळ हुकूम जो निघाला तो प. वर्क्स खात्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या नजरेस न आणतां हाताखालच्या अधिकाऱ्याला दाखविला गेला ! पण ही चूक ज्याची तो अधिकारी व वरिष्ठ अधिकारी कोणत्या जातीचे व धर्माचे होते हे प्रसिद्ध झालें असतें तर याचा उलगडा चटकन होता. पण सगळाच आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ, तेव्हां डोळ्यांना दिसत असतां झापड लावली गेली तर काय नवल!

ही झाली निष्काळजीपणाची तऱ्हा. पण याहिपेक्षां पैशाची अफरातफर, रयतेच्या पैशाचा अपव्यय व दुरुपयोग, आणि फसवेगिरी यांचीहि उदाहरणें कांहीं कमी नाहींत. यांपैकीं एक प्रकार असा कीं, जपानाशीं व्यापार करणारी एक व्यापारी कंपनी एका कस्टम ऑफिसमध्यें कस्टम ड्यूटी कमी करण्याच्या बुद्धीनें आलेल्या मालाचे खोटे इनव्हॉयसिस हजर करी. हा घोटाळा वर्षभर चालला. कोर्टांत प्रकरण गेलें. दोनहि बाजूंचे वकील बॅरिस्टर झुंजले. अखेर व्यापारी कंपनीच्या वकिलाने १२००० रुपये देऊं केले व ती रक्कम घेऊन दावा काढून घ्यावा असा सरकारी वकिलानें सल्ला दिला व मूळ दावाच काढून घेण्यांत आला ! अर्थात् गुन्हा खोट्या दस्तऐवजाच्या बरोबरीचा व त्याचें प्रायश्चित्त काय तर सरकाराला कस्टम ड्यूटी मिळू लागली असती इतकी रक्कम वादीनें दिली व हिंदुस्थानसरकारनें मान्यता दिली!

अशाच प्रकारचा दुसरा एक प्रकार असा कीं, नरेंद्र-मंडळाच्या सभागृहांत संस्थानिकांची राजचिन्हें लावण्यांत यावीं असे १९२४ सालीं ठरलें. सरकारी कारागिरानें दरढालीला २० पौंड म्हणजे सुमारें २६० रुपये (अगर ३०० रु.) या दरानें एक कंत्राटदार माल पुरविण्यास तयार आहे असें चीफ इंजीनियराला कळविलें. चीफ इंजीनियरानें राजचिन्हें बसविण्याचा व इतर खर्च मिळून ५०० रुपयांचा दर दिला. १९२६ च्या ऑगस्ट महिन्यांत ५०० रुपयांत राजचिन्हें सभागृहांत बसविण्यापर्यंतचा सर्व खर्च होतो असा करार झाल्याचें उघडकीस आले. कंत्राटदाराची तक्रार अशी कीं कस्टम गाडीभाडें वगैरे खर्च सरकारनें वेगळा द्यावा. अखेर होतां होतां दिल्ली कॅपिटल कमिटीनें ९००० रुपये इतर खर्चाकरितां मंजूर केले ही उधळपट्टी लेखी करारपत्र चीफ इंजीनिअरानें करून घेतले असतें तर सहज टळली असती. पण इतकी दक्षता ठेवल्यावर पब्लिक वर्क्स खातें तें कसलें?

आणखी दुसरा एक अफरातफरीचा प्रकार असा कीं, खजिन्यांतून ६८ लक्ष ६० हजार रुपयांच्या नोटा एका गांवाहून दुसऱ्या गांवीं जावयाच्या होत्या. गाडी स्टेशनावर येण्याचे पूर्वीच नोटांच्या पेट्या नेण्याकरितां खटारगाड्या ठरवून ठेवल्या होत्या. गाडी स्टेशनांत आल्यावर ट्रॉलींतून नोटांच्या पेट्या संगिनीच्या पाहऱ्याखालीं स्टेशनाबाहेर नेण्यांत आल्या. पेट्या गाडींत थडीवर थडी लावून भरण्यांत येत होत्या. एवढ्या मुदतींत शिपाईबुवा विडी पिऊं लागले व विडी पिण्यांत तर्र झालेले पाहातांच ६०००० रुपयांच्या १० रुपये नोटांची पेटी लांबविली गेली व तशीच एक पेटी नगास नग ठेवली गेली. हा घोटाळा असा झाला कीं, गाडी पेट्यांनीं भरतात तों प्राणीसंरक्षक मंडळाच्या स्वयंसेवकानें ह्या

गाडीच्या एका बैलाला लंगडा या सबबींवर धरून नेलें अशी भुमका उठली. व दुसरी गाडी पाहाणें, पेव्या भरणें वगैरे प्रकार सुरू झाला. व सगळ्यांची नजर बंद झाली. पुढें गुन्हेगार सांपडले व शिक्षाहि झाल्या. तथापि ६० हजार रुपयांपैकी फक्त ३८ हजार रुपयेच वसूल झाले!

पोस्ट खातें हें अगदीं साळसूद खातें अशी लोकांची समजूत आहे. पण तेथेहि पैशाचे गोंधळ कांहीं कमी होत नाहींत. तूर्त गेल्या तीन वर्षांतील गुन्ह्यांचे व अफरातफरीचे आंकडे खालीं देतों त्यावरून कल्पना येईल.

| सन | गुन्हे | अफरातफरीची रक्कम रु. |
|---|---|---|
| १९२५–२६ | ५०४ | १,३९,६१० |
| १९२६–२७ | ४५९ | १,१२,३५७ |
| १९२७–२८ | ५५२ | ८०,४५७ |

# जमीनमहसुलाचें धोरण

## पुनर्घटना होणार

पालघरचे श्री. छोटालाल श्रॉफ यांनीं मुंबईच्या गव्हर्नरांशीं सारावाढीच्या धोरणाचे बाबतींत पत्रव्यवहार करून, बार्डोली–चौकशीच्या निर्णयाचे दृष्टीनें सरकार आपलें धोरण सुधारणार किंवा नाहीं याबद्दल सरकारचें मत मागविलें. हा पत्रव्यवहार आतां सरकारतर्फे प्रसिद्ध करण्यांत आला आहे.

श्री. छोटालाल श्रॉफ यांनीं गव्हर्नरांना ता. १० जुलै रोजीं लिहिलेल्या पत्राचा सारांश असा–"मुंबई इलाख्यांत विशेषतः ठाणें व नाशिक या जिल्ह्यांत धारावाढीसंबधीं चळवळ चालू आहे. सरकारचें अन्याय्य धोरण व बेफिकीरपणा यामुळें ही चळवळ उत्पन्न झाली आहे. मुंबई कौन्सिलाचे ठराव, जॉइंट पार्लमेंटरी कमिटीची सूचना, कर–कमिटीचा रिपोर्ट व जमीनमहसूल कमिटीचा रिपोर्ट यांच्याकडे लक्ष न देतां सरकारनें शेतकऱ्यांवर डोईजड सारा बसविण्याचें धोरण चालविलें आहे. त्यायोगें शेतकरी वर्ग नामशेष होऊन सर्व शेतकरी वर्ग मजूर बनेल. बागलाण, मालेगांव, देवगड, वसई व पालघर या तालुक्यांतील सेटलमेंट रिपोर्ट गव्हर्नरांनीं पाहिले तर ते एकाच धर्तीवर व आधारावर तयार केलेले आहेत असे आढळून येईल. हे आधार अगदींच पोरकट आहेत व त्याकरितां गोळा केलेली माहिती अपूर्ण व अविश्वसनीय आहे. ब्रूमफील्ड कमिटीच्या रिपोर्टांत हीच गोष्ट दर्शविलेली आहे. असें ब्रूमफील्ड कमिटीनें कांहीं नवीन शोध लावला असें नाहीं. कारण बार्डोलींत जी पद्धत अमलांत आली तीच सर्वत्र आहे. बार्डोलीप्रमाणें इतरत्र सत्याग्रह होत नाहीं येवढ्यावरून तेथल्या फेरपाहण्या बरोबर आहेत असें मुळींच म्हणतां येणार नाहीं पण बार्डोलीसारखा झगडा करतां येत नाहीं या त्यांच्या दुर्बलतेचा सरकारनें फायदा घेऊं नये व त्यांच्यावर जबर आकारणी करूं नये. या धोरणानें तेहि **सत्याग्रहास प्रवृत्त होतील. याप्रमाणें परिस्थिति** आपल्यापुढें मांडली आहे. पंजाब–सरकारनें लोकांच्या मागणीप्रमाणें लॅंड रे. कोडांत दुरुस्त्या केल्या. मुंबई इलाख्यांतहि सर्व परिस्थितीचा विचार करून लॅंड रे. कोडांत लोकांच्या इच्छेप्रमाणें योग्य ते फेरबदल करून सरकार व लोक यांच्यांत सलोखा उत्पन्न करण्याची हीच वेळ आहे. जरूर पडेल तर हा फेरबदल कसा करावयाचा हेंहि गव्हर्नरांपुढें मांडण्याची माझी तयारी आहे."

### गव्हर्नरांचें उत्तर

या पत्राला ता. १३ जुलै रोजीं गव्हर्नरांनीं सेक्रेटरी-मार्फत पुढीलप्रमाणें उत्तर दिलें आहे. "आपलें ता. १० चें पत्र पोंचलें. आपल्या व इतर विभागांत जी परिस्थिति दिसली ती आपल्या मताप्रमाणें आपण सरकारला कळविण्याची जबाबदारी आपल्यावर आहे असें आपण मानलें हें प्रशंसनीय होय. उलट तूर्त या परिस्थितीसंबंधानें सरकारचे हेतू काय आहेत, हें आपल्याला व इतरांना कळविण्यांत येत आहे. पुढें कौन्सिलांत या संबंधाच्या धोरणाचा सविस्तर खुलासा होईलच.

गव्हर्नरसाहेब येथें आल्यापासून जमीनमहसुलाच्या प्रश्नाचा बारकाईनें अभ्यास करीत आहेत. गेल्या कौन्सिलाच्या बैठकींत कार्यक्रमपत्रिकेवर यासंबंधींचें सरकारी बिल होतें. पण अधिक चौकशी केल्यावांचून–विशेषतः बार्डोली व चोराशी तालुक्यांच्या सेटलमेंटसंबंधाची चौकशी चालू होती म्हणून–हें बिल पुढें आणूं नये असें सरकारला वाटलें. या चौकशीचा रिपोर्ट एप्रिलच्या प्रारंभीं सरकारकडे आला. तेव्हांपासून जमीनमहसुलाच्या धोरणाचा व योग्य प्रकारचें बिल तयार करण्याचा विचार सरकार सारखें करीत आहे. जुनें बिल रद्द करण्याचें आतां ठरलें आहे. पण नवीन बिल अजून तयार झालें नाहीं म्हणून तें जाहीर करतां **आलें नाहीं. येत्या कौन्सिलाच्या बैठकीपुढें तें मांड-**

ण्याचा शक्य तेवढा प्रयत्न करण्यांत येत आहे. मात्र योग्य व प्रगतिपर धोरणावर हें बिल तयार झालें अशी सरकारची खात्री होईपर्यंत तें कौन्सिलापुढें मांडण्यांत येणार नाहीं. येत्या बैठकींत तें बिल आणतां आलें नाहीं तरी, अर्धवट बिल पुढें मांडून त्यावर चर्चा करण्यापेक्षां तें त्यापुढील बैठकींत आणलेलेंच बरें असें आपल्याला व या बाबतींत लक्ष घालणाऱ्या इतरांना वाटेल असा गव्हर्नरांस भरंवसा आहे. पण लोक या बाबतींत या बिलाची किती आतुरतेनें वाट पाहात बसले आहेत याची जाणीव गव्हर्नरांस असल्यामुळें ते शक्य तितक्या लवकर हें बिल पुढें यावें असा व्यक्तिशः प्रयत्न करीत आहेत.

दरम्यान बार्डोली व चोराशी तालुक्यांखेरीज इतर ज्या तालुक्यांत साऱ्याची वाढ जाहीर करण्यांत आली नाहीं त्या तालुक्यांच्या रीसेटलमेंट्स अमलांत आणावयाचा सरकारचा विचार नाहीं. या सेटलमेंट्सचा आतां पुढें येणाऱ्या नव्या तत्त्वानुसार पुनः विचार होईल. आणि ज्या तत्त्वांवर व आधारांवर या सेटलमेंट्स करण्यांत आल्या तीं तत्त्वें व आधार नव्या बिलास अनुसरून नसतील तर तेवढयापुरती पुनः पाहणी करण्यांत येईल व तोंपर्यंत वाढ आकारण्यांत येणार नाही. कायदा लवकर पुढें न आल्यानें हल्लीं सुरू झालेल्या सेटलमेंट्सचे बाबतींत लोकांना जी चिंता वाटत आहे ती दूर होईल असें गव्हर्नरांस वाटतें."

आर. एम. मॅक्सवेल (सेक्रेटरी).

# चीन–रशियामधील लढा




चीनमधील युद्धक्षेत्र

चीन व रशिया यांजमधील प्रकरण गेल्या आठवड्यांत बरेंच हातघाईवर आलें व या दोन राष्ट्रांत लढाई जुंपेल कीं काय अशी भीतिहि वाटूं लागली होती. चीनच्या उद्धारास रशियाची मदत थोडीथोडकी झाली नाहीं. या दृष्टीनें चीन व रशिया यांचें नातें परस्परांशीं दोस्तींचेच होतें. अशा या दोस्त राष्ट्रांत वितुष्ट वाढून त्यांना एकमेकांशीं लढाईच्या गोष्टी बोलूं लागावें याचें कोणासहि आश्चर्य वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. लढाईचें तात्कालिक निमित्त मांच्यूरियांत घडलें. मांच्यूरियाची राजधानी मुकडेन असून तें रेलवेचें मोठें जंक्शन आहे. मुकडेन पासून एक फांटा कोरियांत जातो व दुसरा सैबेरियांत जातो. सैबेरिया हा प्रांत रशियाचा व रशियास पूर्वबाजूस बंदर असें लॅडिव्होस्टाक हें एकच. तें बंदर रशियाच्या ताब्यांत आहे व त्यास सैबेरियाशीं जोडणारा जवळचा रेलवेचा फांटा चीनमधून गेला आहे. अशा रीतीनें मांच्यूरिया बऱ्याच अंशीं चीनचा, मांच्यूरियांतील पोर्ट आर्थर, डेरेन हीं स्थळें व कोरिया जपानाचा आणि लॅडिव्होस्टाक बंदर व सैबेरिया रशियाचा. असा तिहेरी संबंध मांच्यूरियाशीं आल्यामुळें मांच्यूरियांतील राजकारण नेहमींचेच अवघड होऊन बसलें आहे. खेरीज मांच्यूरियांत एकट्या चीनची सत्ता नसून जपानाचीहि असल्यामुळें व मांच्यूरियांतून जाणारी चायनीज ईस्टर्न रेल्वे चीन व रशिया या उभयतांच्या समाईक वाटणीची व समाईक वहिवाटीची झाल्या कारणाने त्या अवघड जागीं एक गांठ उद्भवली आहे. त्या रेलवेवरील साठ रशियन अधिकाऱ्यांना चिनी सरकारनें पकडलें व सर्व रेलवेचा कारभार आपल्या एकट्याच्या हातांत घेतला. तेवढ्यावरून रशियानें संतापून 'त्या साठ आसामींस चीननें तीन दिवसांत मुक्त न केलें व रेलवेचा कारभार पूर्ववत् सुरळीत न चालूं दिला तर त्याचे परिणाम फार वाईट होतील' असें चिनास कळविलें.

रशियाच्या या दमदाटीचा अर्थ उघड होता. तो ओळखून चीननें रशियास सामोपचाराचेंच उत्तर दिलें. 'मांच्यूरियांतील रेलवेवरील साठ असामींस आम्ही पकडलें तें रशियाशीं कांहीं तरी कुरापत काढावी म्हणून पकडलें नाहीं. ते लोक तार व टेलिफोनवर बसून कम्युनिस्ट मतांचा प्रसार चीन देशांत करीत होते व सांप्रतचें चिनी सरकार कम्युनिस्ट तत्त्वावर स्थापित झालें नसल्यामुळें तें लोकांस चिथावणी देऊन उलथून पाडण्याचा त्यांचा विचार होता. अशा रीतीनें जे आमच्या जिवावर

उठले त्यांचें पारिपत्य करणें भाग पडल्यावरून त्यांना पकडावें लागलें. त्याचप्रमाणें रशियांत रहाणाऱ्या चिनी लोकांना तुम्ही जसे पकडून ठेवले तसेंच आम्ही यांना पकडले आहे!' असा जबाब चीननें रशियाकडे पाठविला. चिनास युरोपियन राष्ट्रांच्या कैचींतून आपलें स्वातंत्र्य मिळवितां आलें तें समोपचाराच्या गुणामुळेंच. तोच गुण चीननें याहि वेळी प्रकट केला असल्यानें त्याजविषयी या क्षणीं सर्व राष्ट्रांस सहानुभूतीच वाटत आहे. बोल्शेव्हिक राज्यक्रांति झाल्यापासून रशियाची घडी अद्यापि नीट बसलेली नाहीं व चिनांत आतांच कोठें स्थिरस्थावर होत आहे इकडे लक्ष दिल्यास त्या उभयतांच्याहि अंगांत लढाईची खुमखूम नाहीं ही गोष्ट उघड दिसते.

रशियाशीं चीनचा दावा नाहीं. पण रशियांतील राज्यपद्धति व समाजरचना मात्र त्यास आपल्या देशांत येऊं द्यावयाची नाहीं. रशियांतल्याप्रमाणें समाजरचना उलथून पाडण्यास आपण हात घातला तर आजचें राज्य जाग्यावर न राहून चीन भलत्याच संकटांत सांपडून कदाचित् युरोपियन राष्ट्रांच्या भक्ष्यस्थानीं पडेल अशी चिनी राष्ट्रीय सरकारास भीति वाटत आहे. म्हणूनच गेलें वर्षभर त्यांनीं कम्युनिस्टांची देशांतील चळवळ चिरडून टाकण्याचा प्रयत्न चालविला आहे. व कम्युनिस्टांचा चिनी पुढारी मार्शल फेंग याला चिनांतून काढून युरोपच्या सफरीस पाठवून दिलें आहे. या दृष्टीनें स्वराज्यसंरक्षणासाठीं ईस्टर्न रेलवेवरील रशियन कम्युनिस्टांस चिनी सरकारनें पकडलें तें योग्यच केलें असें म्हणावें लागतें. रशियास हें कृत्य पसंत न पडून त्यानें चीनच्या दरबारांतील आपले वकील परत बोलावले व आपल्या दरबारांतील चीनच्या वकिलांना देशीं जावयास सांगितलें. चीननेंहि रशियन वकीलास असेंच सांगितलें. रशियानें आपलें सैन्य मांच्यूरियांत उतरविलें असून उलट चीननेंहि आपलें सैन्य त्या तोंडावर पाठविलें असल्याची बातमी प्रसिद्ध झाली इतकेंच नव्हे तर रशियन सैन्यानें मांच्यूरियाच्या सरहद्दीवरील चीनचीं पोग्रॅनिच्नाया व मांचूली हीं शहरेंहि घेतल्याची वदंता उठली.

पण आधुनिक काळांत जगांतील देश दिसण्यांत वेगवेगळे असले तरी राजकीय रीत्या त्यांचें एक विराट शरीर बनलें असल्यामुळें 'जगाच्या पाठीवर कोठेंहि खुट्ट झालें कीं सर्व राष्ट्रें खडबडून त्या दिशेस पाहूं लागतात व त्या स्थळावर आपल्या सामर्थ्याचें वजन पाडतात. तीच गोष्ट चीन व रशिया यांच्या बाबतींत घडून जपान, अमेरिका, फ्रान्स व जर्मनी या सर्वांची एकच धांदल उडाली व त्यांपैकीं बहुतेकांनीं हें प्रकरण लढाईवर न जाऊं देण्याची शिकस्त चालविली. कारण ही लढाई प्रथम चीन व रशिया यांचे दरम्यान सुरू झाली तरी तिच्यांत या नाहीं त्या कारणानें इतर युरोपियन राष्ट्रांचा संबंध येऊन हें एक नवें महायुद्धच पेटणार म्हणून अमेरिकेनें केलॉग प्रणीत युद्धनिवारणाच्या तहावर चीन व रशिया या दोनही राष्ट्रांनीं सह्या केल्या असल्याची आठवण त्यांस दिली. फ्रान्सच्या परराष्ट्रमंत्र्यानें तुमचा तंटा मी मिटवितों असें त्यांस आश्वासन दिलें आणि इंग्लंडानेंहि युद्ध होणें बरें नव्हे असेंच आपलें मत दिलें. रशियानें तर आतां लढाई करणें हें आपल्या ब्रीदास सोडून असल्याचें जगास कळविलें आहे. सारांश, लढाई रशियास नको, चिनास नको व जगासहि नको, असें असेल तर ती होणार कशी? तथापि ज्या कम्युनिस्टांच्या चळवळीमुळे लढाईचा दुंदुभि गाजूं लागला त्या कम्यूनिस्टांच्या चीनमधील चळवळीस रशिया कोणत्या उपायानें आळा घालण्याचें कबूल करतो त्यावर रशिया व चीन यांजमधील लढा कायमचा मिटणें अवलंबून आहे हें सांगावयास नकोच.

# लो. टिळकांची भाषाशैली

( ले.—ग. वि. केतकर )

( ले. २ रा )

संस्कृत व इंग्रजी वाचनाचा उल्लेख मागील लेखांत केलाच आहे. मराठी गद्य त्यांच्या विद्यार्थीदशेच्या वेळीं हल्लींच्याइतकें विस्तार पावलें नव्हतें. चिपळूणकरांच्या भाषेचा तेजस्वीपणा व जोम त्यांस आवडला असावा "ज्ञानेश्वरीच्या लेखनानें मराठी भाषेंत जसें एक नवीन युग निर्माण झालें, तसेंच विष्णुशास्त्र्यांच्या निबंधमालेनें एक नवीन युग निर्माण केलें" ( ले. १ पृ. १०५ ) असें ते म्हणत. वामन, मोरोपंत, ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम हे त्यांनीं विषयाच्या माहितीसाठीं जरूरीपुरते

वाचले, पण भाषेच्या आकर्षणानें वाचले असतील असें दिसत नाहीं. त्यांतल्या त्यांत तुकारामाची भाषा त्यांना आवडली असावी, पण तुकारामाचे निवृत्तिपर धोरण त्यांना पसंत नव्हतें. दासबोधाचे प्रवृत्तिपर धोरण त्यांना पसंत असलें तरी त्यांतील बऱ्याच भागांत केलेले पाल्हाळिक विवेचन त्यांना पसंत पडणारे नसावें असे त्यांच्या भाषेवरून, स्वभावावरून व तत्त्वप्रतिपादनावरून म्हणण्यास हरकत नाहीं.

## ललित वाङ्मय

कादंबऱ्या, नाटकें, काव्य असलें ललित वाङ्मय त्यांनी कधींच हाताशीं फारसे धरले नाहीं. गायन, नाट्य, चित्रकला, शिल्प, इत्यादि कलाविलासाची आवड त्यांना मुळींच नव्हती. आणि ललित वाङ्मय हे शब्दांतील चित्र अगर शिल्प या स्वरूपाचें असल्यामुळे तेंहि त्यांना आवडत नव्हतें. मान-सन्मानाकरितां त्यांना लोक गायन, नाटक यांच्यांत एखादे वेळीं ओढून नेत व लोकांना नाखूष करावयाचे नाहीं या भिडस्त स्वभावामुळे ते जातहि. पण तें त्यांनी आवडीनें ऐकलेले व रुचीनें त्याचें वर्णन केलेलें कोणाच्या आठवणींत आढळणार नाहीं. ज्यानें स्वतःच्या शरीराचा अगर घराचा जरूरी-पेक्षां अधिक शृंगार कधीं केला नाहीं व इतरांनी केलेला ज्यास कधीं आवडला नाहीं त्याला भाषेचा शृंगार तरी कसा आवडणार ! नाटकें—कादंबऱ्या वाचण्यांत, चित्रे व शिल्प पाहण्यांत, गायन—काव्य ऐकण्यात वेळ खर्चणें म्हणजे तितका वेळ व्यर्थ दवडणें असेंच त्यांस वाटे. त्याचप्रमाणें आपल्या मनांतले विचार, भावना व स्फूर्ति हीं सहज ओघानें व परिणाम-कारक रीतीनें लोकापुढे मांडण्यापलीकडे भाषेच्या कलाकुसरीचा अधिक विचार करणे व्यर्थच नव्हे तर हानिकारक होय असें त्यांचें मत असावें.

## ग्रंथवाचनपद्धति

ललित वाङ्मय एक वेळ सोडलें तरी इतिहास, अर्थशास्त्र, राजकारण, तत्त्वज्ञान, कायदा, धर्मशास्त्र इ. ग्रंथांचा लोकमान्यांचा व्यासंग मोठा होता. शाळेंतील शिक्षक जन्मभर पुरत नाहींत. यास्तव ग्रंथ हेच आपले कायमचे गुरू होत असे ते म्हणत (सू. ४२५) व या कायमच्या गुरूंवरील त्यांची भक्ति थोडीथोडकी नव्हती. मग अशा प्रकारच्या शास्त्रीय अगर तात्विक विषयावर लिहि-णाऱ्या इंग्रजी अगर संस्कृत ग्रंथकारांची देखील भाषेची सजावट म्हणून असतेच कीं नाहीं ? या प्रकारच्या ग्रंथांतूनहि पुष्कळ वेळां लेखक विषयप्रतिपादनाबरोबर उत्कृष्ट भाषाशैली प्रगट करीत असतात. पण हे ग्रंथ वाचतांनाहि टिळकांचें त्यांच्या विषयाकडेच सर्व लक्ष वेधलें जात असलें पाहिजे. "ग्रंथ वाचतांना लिहिणाराचा हेतु शोधून काढून तो शेवटपर्यंत साधला आहे कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे" (सू. ४२६). या त्यांच्या दृष्टीप्र-माणे ग्रंथाच्या अंतरंगाचें आकलन करण्याकडेच त्यांच्या बुद्धीची एकाग्रता होत असावी. त्याच्या बहिरंगाचा अभावितपणे त्यांच्यामनावर काय परिणाम होईल तेवढाच. पण त्या बहिरंगाकडे म्हणजे भाषा-सरणीकडे विशेष लक्ष देऊन अनुकरणबुद्धीनें अशा अशा तऱ्हेची भाषासरणी आपल्या लेखांतहि वठली पाहिजे असा त्यांनीं प्रयत्न केला नाहीं.

आपले विचार लेखरूपानें मांडण्याची टिळकांना हौस नसतांनाहि त्यांनी प्रसंगप्राप्त म्हणून तें काम केलें. पण त्यांनी या कामांत स्वतः हातांत लेखणी फार थोड्याच वेळां धरली. बहुतेक सर्व केसरींतील लेख त्यांनीं तोंडी सांगून लेखकांकडून लिहून घेतले आहेत. असे लेख सांगण्यास त्यांना सोयीचें वाटलें याचें कारण त्यांची स्मरणशक्ति ही होय. म्हणजे पुढचें वाक्य सांगतांना मागचें पाहण्याची त्यांना जरूरी नव्हती व पुढचा छेदक सांगतांना मागच्या छेदकांत काय झालें हे पाहाण्याची जरूरी नव्हती. किंबहुना केवढा लेख लिहावयाचा व त्यांत कोणत्या क्रमानें कोणते मुद्दे मांडावयाचे हे त्यांच्या मनांत अगोदर तयार झालेलें असे. आणि ज्याप्रमाणें एखादा गुंडाळलेला गालिचा उलगडावयाचा त्याचप्रमाणें त्यांच्या मुखांतून लेख बाहेर पडे.

## हस्तानें लिहिण्याचा कंटाळा

शिवाय भाषेच्या दृष्टीनें फेरपाहणी करण्याची ज्याला जरूर वाटते तो वाक्य लिहितो, पुनः वाचतो, दुरुस्त करतो आणि पुढें कांहीं वाक्यें लिहिल्यावरहि त्या पुढच्या वाक्याच्या दृष्टीनें मागील वाक्यांत दुरुस्ती करतो. पण अशा दुरुस्त्या करण्याची त्यांना जरूरी वाटत नसे. जें स्वाभाविक वाक्य स्फुरलें त्यांत मागाहून बदल करण्यानें त्याची परिणामकारकता कमी होते असें ते म्हणत. अगदीं जरूर पडल्याशिवाय त्यांनी लेखासाठीं स्वतः लेखणी हातीं धरली नाहीं, दुसऱ्याला सांगून लिहविलें आणि तें त्यांच्या भाषेच्या स्वाभाविकपणाला उप-कारकच झालें. टिळकांचे लेख वाचणाऱ्याला टिळक आपल्याशीं बोलत आहेत असेंच वाटे आणि ज्यांनीं त्यांना प्रत्यक्ष असे लेख लिहवून घेतांना पाहिलें असेल त्यांच्यापुढें विषयांशीं तादात्म्य करून, डोकें भणाणून, येरझारा घालून अगर आरामखुर्चीवर सुपारी कापीत बसून, आवेशाबरोबर आवाज चढ-वीत व मधून मधून खुर्चीच्या फळीवर हात आप-टीत लेख सांगणारी त्यांची मूर्तीच उभी राहते.

# मुंबई इलाख्यांतील शेतकऱ्यांचा स्वराज्य-संघ

"हिंदुस्थानांत शेतकरी हा राष्ट्राचा आत्मा आहे. त्याच्यावरील मालिन्याचा पगडा जर दूर करतां आला तरच हिंदुस्थानाचा उद्धार होईल".

—लो. टिळक.

गेल्या मंगळवारीं येथील टिळकमंदिरांत शेतकरी-संघ स्थापनेची जी सर्वपक्षीय सभा झाली तिची हकीकत आजच्या अंकामध्यें दुसरीकडे दिली आहे. गेल्या अंकीं आम्ही असें म्हटले होतें कीं, जमीनमहसुलाच्या प्रश्नाचे बाबतींत साधलें किती व साधावयाचें उरलें किती याचा योग्य विचार करून एकदिलानें शेतकरी संघाची योजना करण्यांत यावी. गेल्या मंगळवारच्या सभेंत मंजूर झालेले ठराव व शेतकरी संघाची घटना हीं पाहिलीं असतां हें कार्य अत्यंत समर्पक रीतीने व निरनिराळ्या पक्षांच्या ऐक्याने झालें आहे हें कोणाच्याहि लक्षांत येईल. सभेत झालेल्या कार्याचे दोन भाग पडतात. एक—गव्हर्नरांनीं जाहीर केलेल्या निर्णयाला शेतकऱ्यांचे तर्फे उत्तर देण्याचा; व दुसरा—शेती शेतजमीन व शेतकरी यांच्यासंबंधी उत्पन्न होणाऱ्या सर्व प्रकारच्या प्रश्नांचे बाबतीत संघटित रीतीनें प्रयत्न करणाऱ्या व्यापक संस्थेची योजना करण्याचा. हे दोनहि भाग सभेनें उत्तम रीतीनें पार पाडले. ना. जाधवांच्या मूठभर प्रतिनिविष्ट व दुराग्रही अनुयायांचा कंपू सोडला तर, या ठरावास व योजनेस सर्व पक्षांचा पाठिंबा होता व पुढेंहि मिळत राहील याबद्दल आम्हास शंका वाटत नाहीं.

सरकारला व विशेषतः गव्हर्नरांना उद्देशून केलेल्या ठरावांत एक भाग आजच्या प्रत्यक्ष व्यवहारासंबंधीं व दुसरा पुढच्या नव्या चिरस्थायी कायद्यासंबंधीं आहे. गव्हर्नरांनीं श्री. श्रॉफ यांना दिलेल्या उत्तरावरून ते रेव्हेन्यू खात्याच्या धोरणाचा व कार्यपद्धतीचा स्वतंत्र विचार करूं लागले आहेत व त्याप्रमाणें थोडीबहुत कृति करावयास सिद्ध झाले आहेत असें दिसून आलें. याबद्दल सरकारचें अभिनंदन करून सरकारच्या या निर्णयांत संशयितपणा कोठें राहिला आहे हें पहिल्या ठरावांत दाखविलें आहे. सरकारनें दिलेल्या निर्णयानें कित्येक लोक घोटाळ्यांत पडले. १९२० सालापासून ज्या ज्या तालुक्यांतील फेरपाहण्या होऊन वाढ आकारण्यांत आली त्या सर्व वाढी वसूल करण्याचें तहकूब ठेवणें या प्रसंगीं इतकें क्रमप्राप्त होतें कीं, तेंच सरकारनें केलें आहे असा कित्येकांस भास झाला. पण गव्हर्नरांच्या पत्रांतील शब्दयोजना पाहतां त्यायोगें केवळ पालघर, बागलाण व मालेगांव या तालुक्यांतील होऊं घातलेली सारावाढ तहकूब राहते; पण वसई, देवगड, अलीबाग, पेण इ. तालुक्यांतील जाहीर झालेली व वसूल होत असलेली वाढ मात्र तहकूब केली जात नाहीं. हा घोटाळा व संशयितपणा काढून टाकून १९२० सालापासून झालेली सर्व सारावाढ रद्द करा व वसूल केलेलीहि परत द्या अशी पहिल्या ठरावांत मागणी केलेली आहे.

वस्तुतः साऱ्याची फेरपाहाणी चुकीच्या पायावर होत आहे हें बार्डोली-चौकशीचें तत्त्व मान्य केल्यावर झालेली सर्व वाढ रद्द करणें ही स्वाभाविक सुचणारी गोष्ट आहे। ती न करतां केवळ होऊं घातलेली वाढ तेवढीच तहकूब ठेवणें यांत, श्री. वल्लभभाई पटेल यांनीं म्हटल्याप्रमाणें, सरकारच्या जमीनमहसूल खात्यांतील परंपरागत अप्रमाणिकपणाच दिसतो. पण या बाबतींत स्वतंत्र बुद्धि शिरकवूं पाहाणाऱ्या नव्या गव्हर्नरांवर या परंपरागत अप्रामाणिकपणांत सहभागी होण्याचा आरोप एकदम न करतां, मंगळवारच्या सर्वपक्षीय सभेनें त्यांना एक प्रकारें संशयाचा फायदा दिला आहे. आणि सरकारी निर्णय अप्रामाणिकपणाचा आहे तो प्रामाणिकपणाचा होऊं द्या असें एकदम न म्हणतां, तो संशयित आहे यास्तव निःसंदिग्ध करा असा सभेनें ठराव केला आहे. रेव्हेन्यू खात्याच्या प्रतिनिविष्ट धोरणाला बाजूस सारणाऱ्या नव्या गव्हर्नराच्या मनांत जर खरोखरच शेतकऱ्यांचें हित करावयाचें असेल, आणि रेव्हेन्यू खात्यांतील सांचलेला गोंधळ झाडून साफ करावयाचा असेल, तर मनांत कोणत्याहि प्रकारची अढी न ठेवता शेतकऱ्यांचे प्रतिनिधी त्यांना योग्य तें साह्य देण्यास मोकळ्या मनानें तयार आहेत असें या ठरावाचें तात्पर्य आहे. कारण सत्याग्रही वल्लभभाईंनींहि या ठरावावर बोलतांना सांगितलें कीं, सरकार जर चांगली गोष्ट करावयास खरोखर उद्युक्त झालें असेल तर आम्ही त्या कामांत सहकारिता करण्यास केव्हांहि तयार आहों.

हें झाले आजच्या प्रत्यक्ष कृतीसंबंधानें. पण यानंतर जें नवें जमीनमहसुलाचें बिल यावयाचें आहे, तें खरें पायाशुद्ध व प्रगतिपर करावयाचें असल्यास तें लोकमतास अनुसरून झालें पाहिजे. यासाठीं जमिनीची मालकी कोणाची, जमीनमहसूल हा खंड कीं कर, जमीनमहसूल कोणत्या प्रमाणांत घ्यावा, फेरपहाणीची व वसुलाची पद्धति कोणती असावी, या सर्व प्रश्नांचा योग्य व लोकमतानुसार निर्णय

मिळावयास पाहिजे. यासंबंधी लोकमत सरकाराकडे आजपर्यंत अनेक वेळां कळविण्यांत आलें आहे. पण पुनः एकदां तें वेळींच व निःसंदिग्धपणें सरकारच्या निदर्शनास आणण्यासाठीं, शेतकरी संघाच्या कार्यकारी मंडळानें एक कमिटी नेमून या प्रश्नासंबधीं निश्चित मतें सरकारापुढें व लोकांपुढें मांडावीं, अशी योजना दुसऱ्या ठरावानें केली आहे. जमीनमहसुलाची आकारणी वाढ व वसुली या तीनहि गोष्टी अनियंत्रित व लोकांना जाचक अशा रीतीनें आजपर्यंत चाललेल्या आहेत. इतर करांची वसुली करणाऱ्या अधिकाऱ्यांस जे अधिकार नसतात ते अधिकार रे. खात्याला दिलेले आहेत, व त्या अधिकाराचा खुनशीपणानें आजपर्यंत अनेक वेळां दुरुपयोग झालेला आहे. नवीन कायदा व्हावयाचा तर त्यानें हा सर्व अनियंत्रितपणा समूळ काढून टाकावयास पाहिजे.

याप्रमाणें सरकारचा संशयित निर्णय व नवा कायदा यासंबंधानें विचार प्रदर्शित करून गेल्या मंगळवारच्या सभेंत मुंबई इलाखा शेतकरी संघाची व्यापक स्वरूपाची घटना तयार करण्यांत आली. जमीनमहसूल खात्याप्रमाणेंच अबकारी, जंगल व इरिगेशन इ. खात्यांचा व्यवहार शेतकऱ्याला अनेक रीतींनीं जाचक होत असतो. अर्थात् शेतकऱ्यांच्या हक्कांचा व हिताचा विचार करणाऱ्या व त्यासाठीं संघटित प्रयत्न करणाऱ्या संस्थेचा केवळ एका जमीनमहसूल खात्याशींच संबंध येत नसून वरील सर्व खात्यांशीं संबंध येतो, व या सर्व खात्यांच्या जाचांतून शेतकऱ्याला मुक्त करण्याचें व्यापक धोरण शेतकरी संघाने ठेवलें आहे. शेतकरी या जंजाळांतून मुक्त होऊन आपल्या पायावर उभा राहून पुढें काय कृति व सुधारणा करील हा पुढचा प्रश्न आहे. पण सध्या तरी त्यास निरनिराळ्या सरकारी खात्याच्या जाचांतून मुक्त करणें हें महत्त्वाचें व चिकाटीच्या प्रयत्नांनींच तडीस जाणारें काम आहे. हे काम डोळ्यापुढें ठेवून मुंबई इलाख्यांतील लहानमोठ्या सर्व शेतकऱ्यांना या नव्या संघटनेंत गोवून घेण्यासारखीच या संघाची इतर रचना करण्यांत आली आहे.

कोणताहि जमिनीचा खातेदार अगर प्रत्यक्ष जमीन कसणारा हा या संघाचा सभासद होऊं शकतो. तो जर २५ रु. च्या आंत सारा अगर खंड देत असेल तर त्यास कांहींच वर्गणी न देतां, केवळ संघाच्या उद्देशपत्रिकेवर सही करून, संघाचा सभासद होतां येतें. २५ ते ५० रु. पर्यंत वार्षिक धारा अगर खंड देणाऱ्यास फक्त एक आणा वार्षिक वर्गणी ठेवली आहे. ५०ते१००रु. पर्यंत सारा अगर खंड देणारास चार आणे व त्याहून जास्त सारा अगर खंड देणारास एक रुपया अशी वर्गणी ठेवण्यांत आली आहे. इन्कमटॅक्स घेतांना कांहीं एका मर्यादेच्या आंतील उत्पन्न अजीबात वगळण्यांत येतें व पुढेंहि क्रमशः वाढत्या दरानें आकारणी होते, तशीच शेतसाऱ्याच्या बाबतींत पद्धत असावी असे लोकांचें म्हणणें आहे. तें सरकारच्या कृतींत केव्हां येईल तेव्हां येवो. पण तें तत्त्व या संघानें आपल्या रचनेंत घेतल्यानें कोणावरहि विशेष बोजा न पडतां त्याला या संघाच्या कार्यास हातभार लावतां येईल. बिगरशेतकरी लोकांना हितचिंतक म्हणून या संघांत सामील होतां येतें, आणि त्यांना वार्षिक ५ रु. वर्गणी अगर एकदम १०० रु. देणें अशी अट ठेवली आहे. बिगरशेतकरी लोकांचे व्यवहार शेतकऱ्याच्या जिवावर चाललेले असतात. अर्थात् त्यांनीं या शेतकऱ्यांच्या उन्नतीसाठीं आर्थिक दृष्ट्या इतकें तरी साह्य करणें हें कृतज्ञतेच्या दृष्टीनें अत्यावश्यक आहे.

निरनिराळ्या तालुक्यांतून सारावाढीच्या प्रतिकाराची चळवळ करणाऱ्या कार्यकर्त्यांनीं व पुढाऱ्यांनीं आतां यापुढें काय करावयाचें याची बरोबर दिशा गेल्या मंगळवारच्या सभेने अशा रीतीनें दाखवून दिली आहे. आजची सारावाढ सरकारला तहकूब करण्यास लावणें येवढेंच कार्य नसून एका व्यापक कार्याचा तो एक तपशील आहे. या तपशिलाचे बाबतींत जें मर्यादित यश चळवळ्यांना मिळालेलें आहे तेवढ्यावर त्यांनी हायसें होऊन स्वस्थ न बसतां भावी स्वराज्याचा पाया घालणाऱ्या या शेतकऱ्याच्या कार्यासाठीं 'शेतकरी संघाची' जिवंत, जागती जुटीची व प्रभावी संघटना फैलावण्याच्या व दृढ करण्याच्या मार्गास लागलें पाहिजे. ठिकठिकाणीं शेतकऱ्यांच्या सभा भरवून गेल्या मंगळवारच्या सभेंत झालेल्या दोन ठरावांना पाठिंबा देऊन शेतकऱ्यांना या नव्या संघटनेचें मर्म समजावून दिलें पाहिजे. या संघाच्या शाखा-उपशाखांचें जाळें इलाखाभर पसरलें पाहिजे. मंगळवारच्या सभेला निरनिराळ्या जिल्ह्यांतील कार्यकर्ते किंवा त्यांचे प्रतिनिधी आले होते. ते आपापल्या जिल्ह्यांत गांवोगांवीं शेतकरी संघाच्या कार्याचा हा संदेश पोंचवितील अशी आम्हास उमेद आहे.

---

# आत्मनिवेदनाचे दोन शब्द

लो. टिळकांची नववी पुण्यातिथि परवा झाली. आज द्विसाप्ताहिक केसरीचा पहिला अंक निघत आहे. ही गोष्ट टिळकांच्या ह्यातीतच घडली असती तर त्याना किती तरी आनंद झाला असता. कारण त्यांचे सर्वच आयुष्य केसरीचे संगोपन व संवर्धन करण्याकडे गेले. स्वराज्यसंपादन हे टिळकांचे साध्य होते. आणि जसे ज्यांचे साध्य त्या मानाने त्यांचे साधनहि असावे लागते. म्हणूनच टिळकांनी केसरी पत्र हाती घेऊन त्याची कार्यक्षमता निरनिराळ्या रीतींनी वाढविली. त्यानी त्याचा आकार वाढविला, पाने वाढविली, थोड्या वेळात पुष्कळ प्रती निघाव्या म्हणून अवश्य ती यंत्रसामुग्री जुळविली, सोयीच्या इमारती बांधल्या, नवीन माणसे हाताशी घेतली. तात्पर्य, केसरीचा वाचक वर्ग व त्या द्वारे पत्राचा लोकोपयोग वाढावा म्हणून जो जो प्रयत्न अवश्य तो तो सर्व त्यानी केला.

## साधनांची जुळवाजुळव

साध्य किंवा ध्येय हे मात्र आपले, आणि ते साधण्याला लागणारी साधने मात्र दुसऱ्याची, अशा स्थितीत कोणाचाहि उद्योग यशस्वी होऊं शकत नाही. आणि हा अनुभव टिळकाना प्रारंभापासूनच आला. डे. ए. सोसायटी कायमची सोडून देऊन सार्वजनिक चळवळीत पडावयाचे व स्वमतप्रसार करावयाचा हे टिळकानी निश्चित केल्याबरोबर, त्यानी पहिली गोष्ट केली ती ही कीं छापखाना व वर्तमानपत्रे यांच्या वाटणीत कर्जासकट वर्तमान-पत्रे आपल्या वाटणीला घेतली, छापखाना दुसऱ्या भागीदाराला दिला, व स्वतः जबाबदार संपादक होऊन अखत्यारीनें मतप्रसार सुरू केला. यानंतर १८९७ साली आर्यभूषण छापखान्याने, टिळक तुरुंगात असता, केसरी छापीत नाही असे म्हणून दगा दिला तेव्हा टिळकाना स्वतःचा छापखाना काढण्याची सहजच इच्छा झाली.

प्रथम केसरीच्या बटवड्याची व जमाखर्चाची व्यवस्थाहि आर्यभूषणाकडेच होती. पण उभयतातील हितविरोधाचा परिणाम केसरीच्या उपयुक्ततेवर होतो असे दिसून येताच त्यानी आपली स्वतंत्र कचेरी स्थापिली. केसरीच्या पुष्कळ प्रती काढाव्या लागू लागल्या, तेव्हा छपाईचे मोठे यंत्र त्यानी आणिले. व असले धूड चालावयाचे म्हणून त्याला ऑईल-इंजिनाची जोड द्यावी लागली. पुष्कळ प्रती निघावयाच्या म्हणजे अर्थात् टाईप वरचेवर झिजावयाचा म्हणून टिळकांनी स्वतःची टाईप फाउंडरी काढली. आणि पुढे त्यानी अखंड टाईपाची योजना केली तेव्हां तर घरची स्वतंत्र फाउंडरी असणे आवश्यकच झाले. महायुद्धानंतर स्वराज्याच्या चळवळीत केसरीची लोकप्रियता इतकी वाढली कीं त्याना पूर्वीचे 'डबल फीडर' यंत्रहि पुरेना. म्हणून तासाला सात आठ हजार प्रती छापून घड्या घालून देईल असले मोठे यंत्र आणावे लागले. व या नव्या यंत्रावर चौकोनी रिमाचे कागद निरुपयोगी म्हणून वाटोळे रीळचे कागद आणावे लागले. आणि छपाईचे यंत्र 'रोटरी' पद्धतीचे म्हणून 'स्टीरिओ' करण्याचे यंत्र जोडावे लागले.

असो. या नव्या मनूत मतप्रसाराच्या दृष्टीने पाहाता, स्वतंत्र वर्तमानपत्रासारखे दुसरे परिणाम-कारक साधन नाही ही गोष्ट सामान्य माणसालाहि जर कळते, तर ती टिळकाना उमगली नाही हे कसे होईल? ती त्याना तेव्हाच उमगली. आणि म्हणूनच पूर्वी सांगितल्याप्रमाणे त्यानी केसरीपत्र घेऊन सार्वजनिक कार्यात प्रवेश केला. केसरीची लोकप्रियता यापूर्वीच सिद्ध झाली होती. पण त्यानी ते पत्र हाती घेतल्यापासून ती श्रेढीने एक. सारखी वाढतच गेली. केसरीच्या या लोकप्रियतेत टिळकांच्या चळवळीची लोकप्रियता व उपयुक्तता पूर्णपणें प्रतिबिंबित झाली होती.

## दैनिक की अर्धसाप्ताहिक

साप्ताहिक वर्तमानपत्राचा जर इतका उपयोग तर ते पत्र द्विसाप्ताहिक केल्यास त्याचा उपयोग त्या प्रमाणाने वाढणारा आहे ही गोष्टहि टिळकाना अवगत होती. म्हणूनच केसरी अर्धसाप्ताहिक करण्याची कल्पना त्यांच्या विचारकक्षेत घोळत असे. पण हे उपयुक्ततेचे प्रमाण त्यानी मनाने केसरी दैनिक कर-ण्यापर्यंत वाढविले नव्हते हे आम्हास निश्चित माहीत आहे. व ती गोष्ट सकारण होती. अर्थशास्त्रातील एका प्रसिद्ध सिद्धांतात सांगितल्याप्रमाणें कोणत्याहि गोष्टीची उपयुक्तता केवळ त्रैराशिकाच्या हिशे-बानें वाटेल तेथपर्यंत वाढत नसते. या सिद्धांताला The Law of diminishing returns असे म्हणतात. कोणत्याहि धंद्यात अशी एक मर्यादा कोठे तरी येऊन पोचतेच की, त्यापलीकडे त्रैराशि-काचा हिशेब उपयोगी पडत नाही तो हटकून चुकते. ही मर्यादा केसरीच्या बाबतीत टिळकानी आपल्या आवडत्या ग्राहकाना पडणाऱ्या टपालखर्चावरून व वर्गणीवरून निश्चित केली होती. कारण दैनिक पत्र एक पैशाच्या तिकिटाने वाटले जात असले तरी, वर्षभर दैनिक पत्र घेणारास नुसता टपालखर्चच साडेचार रुपये पडणार. आणि वर्गणी कितीहि कमी म्हणजे दर अंकाला अर्धा आणा ठेविली तरी तिचा वार्षिक खर्च नऊदहा रुपये पडणार. मिळून वर्गणी-दाराला दैनिक पत्राकरिता ते साडेचार व हे साडेनऊ मिळून चौदा रुपये दरसाल खर्चावे लागणार. पण खेडेगावच्या किंवा शहराच्याहि लोकांपैकी येवढी

रक्कम खर्चण्याची ऐपत असणारे लोक किती ? अर्थात् केसरी दैनिक करणें म्हणजे त्याचा प्रसार पुष्कळच कमी होणार, व वाचकवर्ग कमी झाला म्हणजे केसरीची नियोजित उपयुक्तताहि कमी होणार, ही गोष्ट टिळकांना दिसत होती. आणि त्यांचे तर ध्येय असे कीं, आपला केसरी खेड्यापाड्यातल्या गरीब लोकांनीहि वाचावा! म्हणून केसरीच्या प्रगतीची टिळकांची कल्पना अर्धसाप्ताहिकापलीकडे दैनिकापर्यंत गेली नाही. असे असता त्यानी 'राष्ट्रमता' सारखे दैनिकपत्र का काढविले ? याचे उत्तर हेच की त्याचा खरा उपयोग त्यानी शहरापुरताच मानला. शिवाय दैनिकपत्र काढावयाचे तरी ते दुसरे एखादे काढावयाचे, पण केसरी दैनिक करावयाचा नाही असे धोरण त्यानी मनाशी पक्के केले होते.

असो. अशा रीतीने टिळकांची केसरीच्या प्रगतीची कल्पना आवृत्तीच्या दृष्टीने काय होती याचे विवेचन येथवर केले. आता आज आम्ही केसरी अर्ध–साप्ताहिक करीत आहो याचे खरें श्रेय कोणाला आहे एवढेच सांगावयाचे उरले. व ते श्रेय आम्ही केवळ टिळकांच्या पुण्याईला आणि वाचकवर्गाच्या उदार आश्रयाला देतो. ते प्रस्तुत चालकवर्गाला आपणाकडे घ्यावयाचे नाही. त्याला आज आनंद व अभिमान वाटण्यासारखा असला तर तो इतक्यापुरताच की, लोकमान्यांच्या मनात असलेल्या केसरीसंबंधी निदान एका कल्पनेला त्याना मूर्त स्वरूप देता आले आहे. तथापि १९०२ साली टिळकांनी केसरीच्या दोन पानांची चार केली त्यावेळी त्यानीच म्हटल्याप्रमाणे 'आनंदापेक्षा किंवा अभिमानापेक्षा आम्हाला जबाबदारीचीच जाणीव अधिक होत आहे.'

गेल्या नऊ वर्षांत घडलेल्या गोष्टी पाहिल्या म्हणजे टिळकांची पुण्याईच अलौकिक खरी असे म्हटल्यावाचून राहावत नाही. द्वेष विरोध व अडचणी याना लोकमान्यानी जिवंतपणी सतत तोंड दिले, विरोधाला पचनीं पाडलें. द्वेषाची धार बोथट केली. व अडचणीना त्यांनी बाजूस सारले. मरणोत्तरहि त्यांच्या यशाला अशाच प्रकारें कमीपणा आणण्याचे प्रयत्न झाले. पण त्यांची पुण्याई अखेर याला पुरून उरली असेच गेल्या नऊ वर्षांचा अनुभव सांगतो. पुणें, नागपूर, अहमदाबाद, कराची येथे स्वपर–विरोधाला बाजूस सारून त्यांचे पुतळे उभारले गेले. त्यांनीं शिक्षण घेतलेल्या संस्थेत, व त्यानी काढलेल्या शिक्षण–संस्थेतहि, त्यांची स्मारके उभारली गेली. त्यांची लहान इंग्रजी मराठी चरित्रे प्रसिध्द झालींच. पण विस्तृत असे त्यांचे चरित्र, आठवणी सारखे अपूर्व असे तीन ग्रंथ त्यांचे अनेक लेखसंग्रह, सूक्तिसंग्रह, त्यांच्या धर्मविषयक मतावरील निबंध, इंग्रजी व हिंदी विस्तृत चरित्रग्रंथाचा पहिला भाग, हीं प्रसिद्ध झाली. या शिवाय त्यानी आपल्या हयातीत प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांच्या व त्यांच्या भाषांतरांच्याहि आवृत्त्या निघाल्या. पुण्यास त्यांचें स्मारकमंदिर स्थापन झालें, आणि मुंबईचा चौपाटीवरील पुतळाहि लवकरच उभारला जाईल. धार्मिक दृष्ट्या त्यांच्या पुण्यतिथीच्या उत्सवाची स्थिरनिधीनें चिरकालिक व्यवस्थाहि जमत आली आहे. कर्मयोगाच्या तत्त्वज्ञानाच्या प्रसाराची व्यवस्था झाली आहे. त्यांच्या सामाजिक व हिंदुसमाजविषयक मतांची परिणति आज हिंदुसंघटनेच्या रूपाने महाराष्ट्रात दृग्गोचर झाली आहे. आणि राजकारणातहि त्यांच्या अनेक धोरणांची उपयुक्तता लोकाना अनुभवाने पटली आहे. असें अलौकिक यश किंवा पुण्याई फारच थोड्या पुरुषांना लाभते.

याच न्यायाने गेल्या नऊ वर्षांत अनेक अडचणींना, विरोधांना व उच्छेदक प्रयत्नांनाहि न जुमानतां केसरीची उन्नतीच होत गेली. आणि लो. टिळकांच्या संकल्पाप्रमाणे आज आठवड्यांतून दोनदां वाचकांच्या भेटीला जाण्याचा योग त्यास आला ही आम्ही टिळकांची पुण्याईच का मानू नये ? महात्मा गांधीसारखा पुरुष अगदी तावून सुलाखून योग्यता पाहून माणसांचा संग्रह करणारा; पण तो तुरुंगांत गेला असतां तेवढ्या अवधींत त्यांच्या वर्तमानपत्राचे तीन संपादक झाले, व त्याचा खप पंचवीस हजाराच्याहि वर होता तो तीन हजारावर आला हे स्वतः म. गांधींनीच एकदा जाहीर केले होते ! हा तुलनात्मक विचार मांडण्याचे कारण हेच की टिळकांची पुण्याई आम्ही का व कोणत्या दृष्टीने म्हणतो हे ध्यानात यावे. आणि टिळकांचे स्मरण ठेवून, प्रामाणिक तत्त्वनिष्ठेने, आपल्यात असेल ती शक्ति व कर्तृत्व या कामांत वेचून, टिळकांनी निर्माण केलेल्या या 'केसरी' पत्राला व 'केसरी' संस्थेला चिरस्थायी, उपयुक्त व संग्राहक स्वरूप देण्याचा जसा गेली नऊ वर्षे आमच्याकडून प्रयत्न होत आला आहे, तसाच तो पुढेहि चालू राहील व केसरी आठवड्यांतून दोनदा निघण्याने त्यात भरच पडेल. यामुळे वाटणाऱ्या समाधानात आमच्या प्रमाणे आमचे हजारो हितचिंतक व टिळकांचे भक्त, अनुयायी, चहाते हेहि सहभागी असल्यामुळे, आमच्या मनात या प्रसंगी आलेल्या विचारासारखेच विचार त्यांच्याहि मनात उद्भूत होत असतील यांत शंकाच नाही. कित्येकानी ते आम्हास मित्रभावाने लिहूनहि कळविले आहेत. अर्थात् "बोधयंतः परस्परम्" याच न्यायाने आम्ही ते आजच्या प्रसंगास उचित व अनुरूप म्हणून व्यक्त केले आहेत.

# बॅ. मुकुंदराव जयकर यांची साक्ष

मुंबईतील दंगाचौकशी कमिटीपुढें ज्या साक्षी चालू आहेत त्यांत गेल्याचे मागील सोमवारीं बॅ. मुकुंदराव जयकर यांची महत्त्वाची साक्ष झाली. तिचा सारांश पुढें दिल्याप्रमाणें:—

**बॅ. जयकर**—हिंदुमहासभेची मुंबईची शाखा १९२४ सालीं स्थापन झाली. गेलीं चार वर्षे मी त्या संस्थेचा अध्यक्ष आहे..

प्रश्न—हिंदुमहासभा ही मुसलमानांना विरोध करण्याकरितां स्थापन झाली आहे काय ?

उत्तर—नाहीं. हिंदु समाजांतील विविध घटकांचे एकीकरण करून समाजाची संघशक्ति वाढविणें आणि इतर समाजांशीं सख्य जोडून हिंदुस्थान हें संघटित व स्वयंशासित राष्ट्र बनविणें हे हिंदुसभेचे उद्देश आहेत. यांतच अस्पृश्योद्धार आणि धार्मिक, सामाजिक व आर्थिक उन्नति साधणें, यांचा समावेश होतो. या संबंधानें जर कोणाचा गैरसमज झाला असेल तर त्यानें माझें स्वागताध्यक्ष या नात्यानें चार वर्षांपूर्वी झालेलें भाषण आणि जबलपूरच्या अधिवेशनांतलें श्रीयुत न. चिं. केळकर यांचें अध्यक्षपदावरचें भाषण वाचून पाहावें म्हणजे तो गैरसमज दूर होईल.

प्रश्न—तुम्ही शुद्धीची चळवळ कां सुरू केली?

उत्तर—इतर धर्मांतले लोक हिंदूंना वाटवूं लागल्यानें हिंदूंची संख्या कमी होऊं लागली म्हणून. हें धर्मांतर परधर्मांचीं तत्त्वें पटल्यामुळे होत नसून अज्ञानामुळें, जुलमामुळें अथवा केवळ पोटाला मिळविण्यासाठीं होत असतें.

प्रश्न—धर्मांतराचे आंकडे तुम्ही द्याल काय?

उत्तर—हें बाटविण्याचें काम गुप्तपणें होत असल्यामुळे सगळे आंकडे मिळणें शक्य नाहीं; पण जुलमानें किंवा फसवून बाटविल्याचीं कित्येक उदाहरणें मी सांगूं शकेन. सिंधमध्यें अशा रीतीनें बायकांना बाटविल्याचीं किती तरी उदाहरणें आहेत.

प्रश्न—हें धर्मांतर सरकारला कसें बंद पाडतां येईल?

उत्तर—सरकारी अधिकाऱ्यांच्यासमोर व पूर्ण चौकशीअंतीं जें धर्मांतर होईल तें तेवढें धर्मांतर मान्य करावयाचें असा सरकारनें कायदा करावा. डॉ. परांजपे हे अशाच अर्थाचें एक बिल तयार करणार होते.

प्रश्न—हिंदुमहासभेचा या दंग्याशीं संबंध जोडला जातो तो खरा आहे काय ?

उत्तर—तो साफ खोटा आहे. ता. ९ फेब्रुवारी रोजीं हिंदुसभेच्या कार्यकारी मंडळाची सभा भरली होती. तींत या दंग्यासंबधानें खेद व्यक्त करून हिंदू-मुसलमानांनीं हा दंगा मिटवावा अशी विनंति केली होती. हिंदुसभेचा असा एकहि ठराव दाखवितां येणार नाहीं कीं जो प्रतिपक्षाला चिडविणारा किंवा दंग्याला उत्तेजन देणारा असा आहे.

प्रश्न—हिंदु मजुरांना मुसलमानांविरुद्ध चिथविण्याकरितां हिंदुसभेनें गिरणीकामगार-संघाशीं संगनमत केलें काय ?

उत्तर—असे समजणें साफ चुकीचें आहे. कम्युनिस्टांचीं मतें हिंदुसभेच्या मतांशीं मुळींच जुळत नाहींत. अर्थातच या उभयतांनीं संगनमत केलें असें म्हणणें साफ खोटें आहे.

प्रश्न—हिंदु लोक बाटविले जाऊं नयेत एवढाच हिंदुसभेचा हेतु आहेना ?

उत्तर—होय.

प्रश्न—हिंदु लोक जुलमानें बाटविल्याचीं उदाहरणे तुम्हास देतां येतील काय ?

उत्तर—होय. मलबारांत मोपल्यांनीं बंड केलें त्या वेळीं भयंकर जुलमानें हिंदूंना बाटविण्यांत आलें. कांहीं अस्पृश्य (थिय्या) लोकांखेरीज इतर कोणास तेथे बाटविण्यांत आलें नाहीं असें जें शौकतअल्लींनीं सांगितलें तें निवळ खोटें आहे. सर शंकरैन नांयर यांनीं मोपल्यांच्या बंडाचा इतिहास लिहिला आहे. त्यांतला हा उतारा पाहा—" नायर लोकांतील उच्च जातीच्या तरुण स्त्रियांना जुलमानें पकडून नेऊन मोपल्यांनीं त्यांना उघडें-नागडें केलें आणि त्यांच्यावर बळजबरी करण्यांत आली. एका स्त्रीशीं डझनवारी नरपशूंनीं जबरी संभोग केल्याचींहि उदाहरणें आहेत. तरुण पुरुषांनाहि जुलमानें भ्रष्ट करण्यांत आलें! "

अध्यक्ष—या हकीकतीचा प्रस्तुत चौकशीशीं संबंध काय व तिचा आतां उपयोग काय?

उत्तर—मोपल्यांच्या बंडाच्या वेळीं कोणालाहि जुलमानें बाटविलें नाहीं असें शौकतअल्लींनीं आपल्या साक्षीत सांगितलें तें खोडून काढण्याकरितां मला हा इतिहास सांगणें प्राप्त आहे.

प्रश्न—शुद्धीकरणास प्रथम प्रारंभ कोणी केला?

उत्तर— हिंदुमहासभेनें ही चळवळ नवीनच काढली असें नाहीं. स्मृतिकाळापासून शुद्धीकरण चालूच आहे. मुसलमानांना हिंदु करून

घेतल्याचींहि अनेक उदाहरणें इतिहासांत आढळतात. पेशव्यांच्या कारकीर्दींत मुसलमानांना हिंदु केल्याचे दाखले आहेत.

प्रश्न—मुंबईतील दंग्याच्या वेळीं हिंदुसभेनें काय कामागिरी केली ?

उत्तर—'शांतता कमिटी'च्या अनुरोधानें दंग्याच्या भागांत हिंडून हिंदुसभेनें लोकांना शांतता राखण्याचा उपदेश केला. हिंदुसभेचे स्वयंसेवक शांतता राखण्याकरितां हिंडत असत.

प्रश्न—काळबोदेवी रस्त्यावर 'शांतता कमिटी'चा दौरा चालू असतां हिंदुसभेचे दोघे 'दूत' शांतता होणें शक्य नाहीं असें ओरडले व त्याबरोबर पुनः दंगा सुरू झाला असें म्हणतात, हें खरें आहे काय?

उत्तर—मी तर कांहीं असला प्रकार ऐकला नाहीं. त्या इसमांची नांवे कळविल्यास मी चौकशी करीन, पण दंग्याच्या वेळीं उगाच निष्कारण गैरसमज पसरतात.

प्रश्न—हिंदु स्त्रियांना पळवून नेणाऱ्या संस्था अस्तित्वांत असल्याची तुम्हास माहिती आहे काय ?

उत्तर—कोणत्या संस्था हे काम करतात तें सांगतां येत नाहीं, पण धर्माच्या नांवाखालीं हा प्रकार चालतो! माटुंग्यास आम्ही अनाथ स्त्रियांकरितां आश्रम काढला आहे. तेथें अशा रीतीनें पळवून नेलेल्या स्त्रिया सोडवून आणलेल्या असून पोलिसांना त्याबद्दल वर्दीहि देण्यांत आली आहे. पण त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं.

अध्यक्ष—या बाबतींत पिनल कोडाप्रमाणें गुन्ह्याची चौकशी व शिक्षा होत नाहीं काय?

उत्तर—हसन निझामी यानें हिंदूंना कसें बाटवावें याविषयीं २४ आसुरी उपाय नमूद केलेलें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत मुसलमानांनीं फकिराच्या किंवा फेरीवाल्याच्या वेषानें हिंदूंच्या घरांत शिरावें व बायकांना बाटवावें असें लिहिलें आहे. पण सरकारनें त्यांविरुद्ध बिलकुल हालचाल केली नाहीं.

अध्यक्ष—या पुस्तकाकडे कोणी सरकारचें लक्ष वेधलें होतें काय ?

उत्तर—लक्ष काय वेधावयाचें ? हीं पुस्तकें उघड बाजारांत विक्रीला मांडलीं जातात! असें असून सरकारच्या सी. आय. डी. खात्याचें तिकडे लक्ष जाऊं नये काय ?

प्रश्न—हिंदुसभेनें कांहीं आखाडे काढले आहेत काय?

उत्तर—हिंदुसभेचा असा एकहि आखाडा नाहीं. आणि शहरांत जे आखाडे आहेत त्यांतून कधीहि मुसलमानांविरुद्ध चिथावणी देणारीं भाषणें होत नाहींत.

प्रश्न—हिंदूंना मुसलमान व नोकरशाही अशा दोघां शत्रूंविरुद्ध लढावयाचें आहे असें डॉ. मुंजे म्हणाले काय ?

उत्तर—त्यांच्या भाषणांतलें मधलेंच एक वाक्य घेऊन त्यावर भाष्य करणें बरें नव्हे. डॉ. मुंजे यांचीं भाषणें कितीहि कडक असलीं तरी 'मी हिंदूंचे डोळे फोडून बाहेर काढीन, असली अलीबंधूंची भाषा डॉ. मुंजे यांनीं कधींहि वापरली नाहीं.

प्रश्न—हिंदू-मुसलमानांतील भांडणतंटे मिटण्याला काय केलें पाहिजे?

उत्तर—संयुक्त मतदारसंघ स्थापणे, उदारमताचें शिक्षण देणे आणि पूर्वापार चालत आलेले हिंदूंचे हक्क राखण्याकरितां त्यांना पोलिसांची मदत देणें हेच शांतता स्थापण्याचे मार्ग होत.

अध्यक्ष—उदार शिक्षण देण्याला पैसा कोठून आणावयाचा ?

उत्तर—सरकारला पैसा मिळत नसेल तर सरकारनें आमच्या हातीं सत्ता द्यावी, म्हणजे आम्ही पैसा मिळतो कीं नाहीं तें पाहूं.

अध्यक्ष—मद्रासच्या कॉंग्रेसमधला करारनामा पं. मोतीलाल नेहरू यांनीं मोडला ही शौकतअल्लींची तक्रार खरी आहे काय?

उत्तर—साफ खोटी आहे. उलटपक्षीं मुसलमानांनींच तो करारनामा मोडला आहे. प्रत्यक्ष ठिकाणीं लोकसंख्येच्या प्रमाणांत मुसलमानांना प्रतिनिधी दिले जावेत असा करार असतां मुसलमान पुढारी असेंब्लींत ⅓ प्रतिनिधी मागत आहेत!

---

# पुणें येथील टिळकदिन दे. गंगाधरराव यांचें स्फूर्तिदायक भाषण

**दे. भ. गंगाधरराव देशपांडे**

पुणें येथें ता. १।८।२९ रोजीं लो. टिळक **स्मारकमंदिरांत** लोकमान्यांच्या ९ व्या पुण्यतिथी-निमित्त बेळगांवचे सुप्रसिद्ध पुढारी **देशभक्त गंगाधरराव देशपांडे** यांचें **श्री. हरिभाऊ तुळपुळे** यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर व्याख्यान झालें.

**दे. गंगाधररावांचें भाषण**

आज आपण लोकमान्यांच्या ९व्या पुण्यतिथीच्या निमित्तानें जमलो आहों. या प्रसंगीं त्यांच्या चरित्रांतील मुख्य गोष्टींचे व गुणांचें स्मरण करून पुढील कार्याची दिशा आंखणें हे आपलें काम आहे. त्यांचे चरित्र प्रसिद्ध आहे व तें उघड आहे. त्यांच्या निधनानंतर लोकमान्यांच्या आठवणी व चरित्र हीं प्रसिद्ध झालेलीं आहेत. पुण्याच्या जनतेपुढें लोकमान्यांचें सारें आयुष्य गेलें आहे. त्यांना मी कांहीं सांगावें असें नाहीं. मात्र माझ्या तरुणपणीं माझ्यावर त्यांच्या चरित्राचा जो परिणाम झाला तसा परिणाम माझ्या या तरुणबंधूंवर व्हावा म्हणूनच मी माझा स्वतःचा अनुभव आज सांगणार आहे. तरुणपणीं म्हणजे डेक्कन कॉलेजांत प्रीव्हियसच्या वर्गांत असतांना लोकमान्यांचा व माझा संबंध आला. त्या वेळीं मी त्यांच्या विरोधकांपैकीं एक होतों. संमतिवयाच्या बिलाच्या वेळीं लोकमान्यांचीं मतें पाहून मला अत्यंत राग आला. सर्व देशाचा घात करणारा जर कोणी असेल तर हाच एक मनुष्य आहे व अशा इसमाचे पाय कर्नाटकास लागूं नयेत असे मला त्या वेळीं वाटलें. परंतु ही माझी स्थिति पालटून पुढें देशाचा उद्धार व उत्कर्ष करणारा जर कोणी असेल तर तो हा एकच मनुष्य आहे अशी खात्री झाली व मी लोकमान्यांचा दास बनलों. आपला देश किती हीन स्थितीस पोहोंचला आहे, प्रत्यहीं आपली मानहानी कशी होत आहे, पूर्ववैभवाची विस्मृति झाल्यानें आम्ही इंग्रजांचे गुलाम कसे बनलों आहों, आपल्या देशांत बायकांची व मोठ्या माणसांची अब्रू कशी राहात नाहीं याची जाणीव त्यांनीं लोकांना करून देऊन लोकांच्या मनांत त्यांनी प्रस्तुत परिस्थितीविषयीं असंतोष उत्पन्न केला.

कोणतेंहि सरकार आपलें राज्य चिरस्थायी होण्यासाठीं त्याला पोषक अशीच परिस्थिति निर्माण करीत असतें. त्यामुळें लोकहि स्वदेशाभिमानशून्य होऊन सुखांत व चैनींत दिवस काढूं लागतात. अशा वेळीं आपण आपल्या देशाच्या हिताकरितां न झटलों तर आपल्या देशांत आपणास जिवंत राहण्याचाहि अधिकार नाहीं अशा प्रकारची वृत्ति जनतेंत लोकमान्यांनी जागृत केली, यांतच त्यांचा थोरपणा आहे. चिरोलनें टिळकांना ओळखलें व त्यांस 'हिंदी अशांतीचे जनक' अशी पदवी दिली. लोकमान्यांनीं चालविलेली चळवळ राजसत्तेच्या नाशास कशी कारणीभूत होईल हें त्यानें ओळखलें.

एकदां बेळगांवास लोकमान्य आल्यावेळीं त्यांना पोहोंचविण्याकरितां मी स्टेशनावर गेलों असतां एका यःकश्चित् टोपड्यानें मला अडविलें. पुढें गेल्यावर मी मोठ्यांदा हंसलो. तें पाहून लोकमान्य म्हणाले "तुला हंसण्यासारखें काय झालें आहे ? ज्या गांवांत तूं प्रतिष्ठेनें मिरवतोस त्या गांवांत तुझी ही किंमत, अशा स्थितींत तुला हंसूं कसें येते? जोपर्यंत हिंदुस्थान परकी राजसत्तेच्या ताब्यांत आहे तोंपर्यंत आनंद व सुख मानण्यास जागाच नाहीं." अशा प्रकारची वृत्ति ज्यांनीं ज्यांनीं म्हणून त्यांचे भाषण ऐकिलें आहे, मग ते विद्वान असोत अडाणी असोत, त्या सर्वांची त्यांनीं पालटविली आहे. असें स्पष्टपणे सांगणारा तो इसम एकच. तो मरणार नाहीं. तो मरेल कसा ? ज्या ठिकाणी पारतंत्र्य व स्वातंत्र्य यांचा झगडा चालू आहे त्या ठिकाणीं कोणत्या तरी रूपानें लोकमान्य हजर आहेतच. १९३० सालाकडे त्यांचे लक्ष आहे. ते वरून पाहात आहेत. एका राजसत्तेनें दुसऱ्यावर राज्य करावें हे परमेश्वरी न्यायाविरुद्ध आहे. हेंच तत्त्व त्यांनीं प्रतिपादिलें. हे तत्त्व अबाधित आहे.

असंतोषाशिवाय स्वराज्यविषयक तळमळ उत्पन्न होत नाहीं म्हणून त्यांनीं जनतेंत असंतोष उत्पन्न केला. असा असंतोष पसरविणें आज आपलें काम आहे. पक्षभेद व मतभेद विसरून आपण आतां काम केलें पाहिजे. पूर्वींहि पक्षभेद व मतभेद होते. आतांहि आहेत. पक्षभेद वगैरे असणें हें मी जिवंतपणाचें लक्षण मानतों. लोकमान्यांनीं १९१६ सालीं प्रांतिक परिषद बेळगांवास भरली होती त्या वेळीं पक्षभेद विसरून कॉंग्रेसला जाण्याचें ठरविलें. बाहेरच्या शत्रूबरोबर आपणास झुंज करावयाची आहे हें जाणून ते आपल्या विरोधकांकडेहि जात व त्यांना हाताशीं धरून काम करून घेत असत. आपल्या प्रतिपक्षावर त्यांच्या टीकेचा भडिमार होत असे व या तोफखान्याच्या माऱ्यापुढें ते शत्रूला अगदीं जेरीस आणीत असत पण ही ईर्षा अगर स्पर्धा कोठपर्यंत असावी हे ते जाणत असत. विठ्ठलभाई पटेलहि

एकदां लोकमान्यांचे विरोधक होते. पण त्यांना घेऊन टिळक विलायतेला गेले. तेच पटेल आज टिळकांची मुक्तकंठानें स्तुति करीत आहेत. सारांश, देशाच्या दास्यविमोचनासाठीं ते पडते घेऊन सर्वांकडून काम करून घेत असत. त्यांच्या डोळ्यापुढे भावी वैभव दिसत होतें स्वराज्य घेईनच अशी त्यांना आशा वाटत होती. मी म्हणतो ते स्वराज्य संपादूनच गेले. त्यांनीं जें बीजारोपण केले आहे ते कधींहि व्यर्थ जाणार नाहीं. कालावधीने ते मिळेलच. थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे त्यांची कर्तव्यनिष्ठा अढळ होती व ते मोठ्या कळकळीनं राष्ट्रकार्य करीत असत.

मी लोकमान्यांचा अनुयायी कसा झालो हे सांगण्यासारखें आहे. लॉर्ड कर्झनच्या कारकीर्दींत 'वंगभंग' झाला होता. तो जवळ जवळ वज्रलेप असांतीलच होता. त्या वेळीं "शाबास, वंग बंधूंनों शाबास" अशा मथळ्याखालीं केसरीमध्यें लेख आला, व त्या प्रश्नाला चालना देऊन महाराष्ट्रांतील जनतेला त्यांनीं जागे केलें व असंतोषाची आग लावून दिली. त्याच वेळीं मी त्यांचे शिष्यत्व पत्करलें. हल्लीं सुद्धां तशाच कार्याची वेळ आली आहे, १९३० साल येण्यास पांच महिन्यांची मुदत आहे. त्या मुदतींत सरकारने भरीव असें कांहीं दिलें तर ठीक आहे; नाहीं तर आम्ही स्वराज्य घेऊं असा लोकांनीं चंग बांधला आहे. सर्व लोकांनीं मनांत आणले तरच ते खरें होईल. आपले राज्यकर्ते मोठे धूर्त व मोठे चाणाक्ष आहेत. त्यांनीं आपले आसन स्थिर करण्याकरितां लोकांना नाना प्रकारचीं आमिषें दाखविलीं आहेत. अशा वेळीं लोकांमध्ये चैतन्य उत्पन्न करणे ही गोष्ट कांहीं लहान नाहीं. होमरूलच्या वेळीं लोकमान्य एकटे जरी बोलत असले तरी त्यांचे मागें महाराष्ट्र व कर्नाटक मिळून तीस हजार माणसें बोलत आहेत हें सरकारला ठाऊक होतें. लोकांमध्यें आपल्या कार्याबद्दल प्रेम व निष्ठा उत्पन्न करणारी अशी ही प्रचंडशक्ति होती. म्हणूनच टिळक मेले नाहींत. ते अद्याप जिवंत आहेत. प्रत्येकाचे अंतःकरणांत ते वसत आहेत हें मी सध्या चाललेल्या गोष्टींकडेहि पाहून म्हणत आहे.

टिळक जरी दिवंगत झाले आहेत तरी त्यांच्या अस्थी व राखेचे कण हे सुद्धां मृत्यूनंतर थैमान घालीत असलेले आपणास दिसत आहेत. तेव्हां आपण आपल्यामधील भांडण विसरून कामास लागा. आपसांत पूर्वी भांडण होतें म्हणूनच आम्ही हिंदुस्थान गमावून बसलो. आपल्यांत वीर्य आहे, तेज आहे, पण भांडण असल्यानें सर्व कांहीं नासतें, तेव्हां संघटना करूनच चळवळ केली पाहिजे. आपण तरुणांनीं स्वराज्याचा प्रश्न नेटास लावून त्याकरितां जोराचा प्रयत्न केला पाहिजे. शील्ड मॅचेसचा मोह टाकून राष्ट्रीय सभेने जो "चॅलेंज" ब्रिटिश राष्ट्राला दिला आहे तो ध्यानांत धरून स्वराज्यरूपी शील्ड परत मिळविण्याचे मार्गास लागा.

याप्रमाणे स्फूर्तिदायक भाषण झाल्यावर **श्री. तात्यासाहेब केळकर** यांनीं व्याख्यात्यांचे आभार मानले. ते म्हणाले, "श्री. गंगाधरराव यांनीं येथें येऊन व्याख्यान दिले याबद्दल मी त्यांचे आभार मानतें. महाराष्ट्रांतील इसमानें हांक मारली तर कर्नाटकचे पुढारी येतात. या एकाच गोष्टीवरून महाराष्ट्र व कर्नाटक यांचे प्रेम कायम आहे हें ध्यानांत येईल. गंगाधररावांनीं आपला अनुभव सांगून आपलें कसें परिवर्तन झालें हे सांगितलें व तें पटण्यासारखें आहे. त्यांच्याप्रमाणेच हजारों लोकांचा अनुभव आहे. समुद्राला हल्हल्‌ भरती येते व तींत दगड व खडक साफ बुडून जातात, त्याप्रमाणे टिळकांच्या मान्यतेने त्यांच्या शत्रूंनाहि अखेर बुडविलें. पण समुद्राची भरती संपून ओहोटी लागते तसें मात्र टिळकांचें झालें नाहीं. ज्या लोकांनीं अगोदर त्यांच्याशीं विरोध केला त्यांनींच लोकमान्य एक मोठे देशभक्त व हिंदमातेचे एक सुपुत्र होऊन गेले अशीच कबुली अखेरीस दिली. हेंच त्यांचें वैशिष्ट्य होय. याचा मासला श्री. गंगाधरराव व सदूभाऊ बापट यांच्या आठवणींनीं आपल्यास आणून दिला आहे. तेव्हां अशा लोकोत्तर पुरुषाचे इच्छेस अनुसरून आपण सर्वांनीं झटून स्वराज्य मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे." नंतर हार अर्पण केल्यावर अध्यक्षांनीं योग्य शब्दांत समारोप केला व श्री. वासुदेवराव भावे यांनीं उभयतां अध्यक्ष व व्याख्याते यांचे आभार मानल्यावर सभा बरखास्त झाली.

# कौन्सिल-बहिष्कारवादाचीं पूर्वचिन्हें

## अलाहाबाद येथील चर्चा

( आमच्या खास प्रतिनिधीकडून )

गेल्याचे मागील शनिवारीं व रविवारीं प्रयागक्षेत्रीं ऑलइंडिया काँग्रेसकमिटीची बैठक झाली व कौन्सिलबहिष्काराचा प्रश्न, लाहोरच्या राष्ट्रीय सभेपर्यंत तहकुब ठेवण्यांत आला, हें वर्तमान वाचकांस विदित झालेंच आहे. १९२२ सालीं काँग्रेसमार्फत कौन्सिल-प्रवेश करण्याकरितां गया येथें स्वराज्य पक्ष स्थापन करण्यांत आला; व परवां कौन्सिलाची मुदत वाढविल्याचा व्हाइसरॉयसाहेबांचा जाहिरनामा बाहेर पडेपर्यंत राष्ट्रीय दृष्टीनें कौन्सिलांचा फायदा घेण्याचें काम व्यवस्थित रीतीनें चाललेंच होतें. या जाहिरनाम्यानंतर कौन्सिलबहिष्कारानें पुनः उचल खाल्ली व गेल्या एप्रिल महिन्यांत मुंबई येथें ऑल-इंडिया काँग्रेसकमिटीची सभा झाली तेव्हांपासून हा प्रश्न काँग्रेसपुढें एकसारखा आहे.

मुंबईच्या सभेनें वर्किंग कमिटीकडे या बाबतींतील सर्व अधिकार देण्यापलीकडे कांहीं केलें नाहीं; मग याचें कारण राष्ट्रांतील इतर राष्ट्रीय पक्षांनीं या बाबतींत सहकार्य केलें नसतें हें असो, किंवा खुद्द ऑ. इं. कॉं. कमिटी ही बहिष्काराचें तत्त्व मान्य करील किंवा नाहीं ही भीति राष्ट्रीय सभेच्या नेत्यांच्या पोटांत उभी राहिली, हें असो. वर्किंग कमिटीनें मुंबईची सभा संपते न संपते तोंच काँग्रेस पक्षीय कौन्सिलवाल्यांनीं कौन्सिलांत जाऊं नये असा फतवा काढला. या फतव्यावर सर्व बाजूंनीं टीकेचा भडिमार झाला म्हणून, एकदां ऑ. इं. कॉं. कमिटीकडून मुंबई येथें अष्टाधिकार घेतला असतांहि, दिल्ली येथील वर्किंग कमिटीनें पुनः हा प्रश्न ऑ. इं. कॉं. कमिटीकडे सोंपविला.

अलाहाबादची परवांची सभा भरण्यापूर्वी या कौन्सिलबहिष्काराच्या प्रश्नाची अशी टोलवाटोलवी झाली. अलाहाबाद येथें या प्रश्नाचा अखेरचा निर्णय लागेल अशी आशा वाटत होती. परंतु तेथील सभेनें देखील आलेला चेंडू लाहोरच्या काँग्रेसकडे फेंकून दिला. आतां लाहोर येथें देखील हाच प्रश्न पुनः वर्किंग कमिटीकडे न येवो म्हणजे मिळविली. अलाहाबाद येथें वर्किंग कमिटीमध्यें या प्रश्नासंबंधीं पुष्कळ चर्चा झाली. परंतु खुद्द अलहाबादची हवा बरसातीमुळें ज्याप्रमाणें कुंद झाली होती त्याप्रमाणें वर्किंग कमिटीमधलीहि झाली होती. बाहेर आकाशांत जें मेघाच्छादन होतें त्याचीच दाट छाया काँग्रेसमधील नेत्यांच्या मनावर पडलेली. तसे पाहिलें तर कौन्सिलबहिष्काराला मातबर कारण असें कांहींच नव्हतें. व्हाइसरॉयसाहेबांच्या जाहिरनाम्याला उत्तर द्यावयाचें तर खरोखर इतक्या बहुसंख्य लोकांनीं राजिनामे द्यावयास पाहिजे होते कीं त्यामुळें सरकारला कौन्सिलें बरखास्त करणेंच भाग पडलें पाहिजे. पण ही गोष्ट शक्य नाहीं ही प्रत्येकाची मनोमन खात्री. खुद्द पंडित मोतीलाल नेहरूंना देखील याविषयीं संशय होता असें नाहीं. तथापि पं. जवाहरलाल हे कट्टर कौन्सिलबहिष्कारवादी व पं. मोतीलाल हे असल्या लेकाचे वडील! महात्मा गांधींचा तर कौन्सिलांवर केव्हांच विश्वास नव्हता. पण त्यांनाहि असें वाटे कीं, कौन्सिलबहिष्कार पुकारावयाचा तर सरदार वल्लभभाईच्या लॅंड रेव्हेन्यू कोड दुरुस्त करून घेण्याच्या खटपटीचें काय होणार? शिवाय कलकत्ता येथील राष्ट्रीय सभेनें कौन्सिलांत जाऊन काँग्रेसच्या सभासदांनी दारूबंदी वगैरे कार्यक्रम पार पाडावा असा जो ठराव केला त्यासहि कौन्सिलबहिष्कार पूर्णपणें विसंगत. कौन्सिल-बहिष्कार पुकारून सर्व राष्ट्रीय सभावाल्यांनीं काँग्रेसच्या प्रतिज्ञापत्रकावर सही केल्यामुळे तांत्रिक रीतीनें तो पाळला व राजिनामे देऊन पुनः तेच गृहस्थ स्वतंत्र पक्षीय म्हणून निवडून आले तरी काँग्रेसची बेइज्जतच. पुनः बहिष्काराचा प्रश्न गाडून टाकावा तर वर्किंग कमिटीची इभ्रत कमी होते. खुद्द वर्किंग कमिटींत निरनिराळ्या प्रांतिक कमिट्यांनीं व कौन्सिलमधील कॉंग्रेस पक्षीयांनीं बहिष्काराला कसून विरोध केलेला. अशा रीतीनें वर्किंग कमिटी उलटसुलट विचारांच्या भोवऱ्यांत सांपडलेली होती व लाहोरच्या काँग्रेसचा आधार घेऊन वर्किंग कमिटीनें व ऑ. इं. कॉं. कमिटीनें आपला जीव बचावला.

योगायोग असा कीं, कौन्सिलबहिष्काराचा विचार करण्यासाठीं ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा भरली ती अलाहाबादेच्या मेयो हॉलमध्यें आणि मेयो हॉल तर संयुक्त प्रांताचा एके काळचा कौन्सिल हॉल! खुद्द ऑ. इं. कॉं. कमिटीमध्यें कौन्सिलबहिष्काराच्या प्रश्नाला बहुमत मिळालें असतें अशीच स्थिति होती. तें कांहीं असलें तरी वर्किंग कमिटीच्या

पुढाऱ्यांना तूर्त तरी बहिष्कार तहकूब ठेवण्याची सुबुद्धि सुचली हे हिंदुस्थानाचें भाग्यच म्हटलें पाहिजे.

हे सुदैव हिंदुस्थानाला व विशेषतः राष्ट्रीय सभेला किती दिवस लाभतें हें पाहिलें पाहिजे. कारण अलाहाबाद येथील ठरावांत शेवटीं नवीन कांहीं प्रश्न निघाल्यास लाहोरच्या राष्ट्रीय सभेच्या अगोदरहि राजीनामे देण्यांत यावेत असें नमूद करून ठेवलेंच आहे. कदाचित् सप्टेंबर महिन्यांत ले. असेंब्लीची बैठक सुरू झाल्यावर सरकारनें पब्लिक सेफ्टी बिल पुनः आणलें किंवा असाच दुसरा कांहीं प्रकार केला तर पं. मोतीलाल नेहरू व स्वराज्य पक्षाचे सभासद राजीनामे देण्याचा सूट काढणार असेंच अलाहाबादेस बरेच विश्वसनीय पुढारी म्हणत होते. एवढा खटाटोप करून पंडितजी काय मिळवितात ते पाहावें व किती सभासद त्यांचें अनुकरण करतात हेंहि तेव्हां कळून येईलच. एवढी गोष्ट खरी कीं, या बहिष्काराच्या वादानें डोकें वर काढलें तें प्रथम केवळ व्हाइसरॉयसाहेबांच्या जाहिर-नाम्यामुळें. परतु आतां तेच पंडितजी ही भूमिका सोडून स्वराज्यप्राप्तीच्या चळवळीस जोर लागावा म्हणून राजीनामे द्यावेत असें कारण पुढे करीत आहेत. कौन्सिलाच्या बाहेर येऊन हल्लींचे राष्ट्रीय सभावाले देशाचें कितपत काम करतील किंवा आपआपल्या धंद्यांत पक्के गुरफटून जातील हें सांगणें कठीण आहे. फार कशाला, वर्किंग कमिटीच्या चर्चेंत देखील कांहीं सभासदांनीं हें सांगितलें. तथापि पं. जवाहरलाल यांचा आग्रह इतका कीं प्रथम कौन्सिलें सोडा, बाहेर विधायक कार्यक्रम कांहीं केला नाहीं तरी चालेल! बिचाऱ्या कौन्सिलां-नींच इतकें काय त्यांचें घोडें मारलें आहे कोणास ठाऊक!

सरकारावरील रागानें जशीं कौन्सिलें सोडावया-चीं तशीं दुसरीं शंभर कृत्यें नाहीं का करतां येण्या-सारखीं? पण इतर बहिष्कारांचें नांव नाहीं! कां तर [illegible]डित मोतीलाल म्हणाले, जेवणें, झोंपणें वगैरे क्रिया [illegible]शा शरीरास आवश्यक तशा वकिली करणें, शाळेंत जाणें वगैरे क्रियाहि योगक्षेमास जरूर! कौन्सिलांत जाऊन कोणी सभासद आपला उदरनिर्वाह करूं शकत नाहीं. पण कौन्सिलांत शिरून जनतेचें थोडें-बहुत हित साधलें जातें हें पं. मोतीलालजींना मान्य आहे, तें निजण्या-जेवण्यासारखें जरूरीचें नाहीं असें का समजावयाचें? याचें उत्तर ते देऊं शकले नाहींत. कौन्सिलांत जाणें हें एक पाप आहे असा गैरसमज बहिष्कारवाद्यांनीं पक्का करून घेतला आहे व तें पाप धुवून टाकण्यासाठीं त्यांनीं राजीनामे देण्याचें प्राय-श्चित्त घेतलें पाहिजे, या मनोवृत्तीचा हा सगळा खेळ होय असें म्हटल्याशिवाय गत्यतर नाहीं.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ऑल-इंडिया कमिटीच्या अलाहाबादेच्या सभेंत लाहोर येथें होणाऱ्या कौन्सिलप्रवेशाबद्दलच्या वादाच्या पुनरावृ-त्तीचीं पूर्वचिन्हें दिसून आलीं. देशबंधु दास यांचे पट्टशिष्य सुभाष चंद्र बोस यांना तर अशी धास्ती वाटूं लागली आहे कीं, स्वराज्य पक्षाचे सरचिटणीस व मोतीलालच कौन्सिलबहिष्काराचा पुरस्कार करूं लागल्यामुळें दे. बं. दास यांचें सारें कार्य नष्ट होणार. कौन्सिल-बहिष्कार करावयाचा होता तर कायदेभंग-चौकशी कमिटी नेमली कशाला, गया येथें स्वराज्य पक्ष स्थापला कशाला, दिल्लीच्या जादा राष्ट्रीय सभेंत त्या पक्षाला मान्यता मिळवून कौन्सिल-कार्याला राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांत मानाचें स्थान प्राप्त करून देण्याकरितां जिवाचा आटापीटा दासप्रभृति स्वराज्य पक्षीय नेत्यांनीं केला तो कशाला?

ग्रीसच्या इतिहासांत रिसीफस राजाची एक गोष्ट आहे. त्याला अशी शिक्षा सुनावण्यांत आली होती कीं, एक दगड टेकडीवर चढवावयाचा, पण तो चढवितां चढवितां एकसारखा खालीं घसरावयाचा व असें हें कार्य जन्मभर चालावयाचें! राष्ट्रीय सभेच्या राजकारणांत असेंच चाललें आहे. १९२२ सालीं कौन्सिल-प्रवेशाचा वाद एकदां जिंकला. आतां लाहोरांत पुनः तेंच भांडण भांडावयाचें व तेंच दळण दळावयाचें. स्वातंत्र्याच्या ध्येयाचा प्रश्न लाहोरच्या राष्ट्रीय सभेपुढे निकरानें येणार व धसासहि लागणार. पण दुसरा वाद कौन्सिल-बहिष्काराचा अधिक गाजणार. बहुशः म. गांधी हे येत्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होणार. व त्यांचें अध्यक्षत्व जसें आशाजनक तसें या वादा-च्या दृष्टीनें भीतिप्रदहि होणार असें म्हणणें निराधार नाहीं. आजच राष्ट्रीय सभेची शकलें थोडीं झालीं आहेत असें नाहीं. लाहोर येथें त्यांत आणखी भर पडावयाची असेल तर राष्ट्रांचें नष्टचर्य संपलें नाहीं असें म्हटलें पाहिजे. लाहोरच्या अधिवेशनाला उणे पुरे पांच महिने आहेत. दरम्यान सभेच्या चालकांनीं आणि ऑल-इंडिया कमिटीच्या सभासदांनीं स्वतंत्र विचार करून लाहोर येथें राष्ट्रीय सभेचें दृढीकरण करण्याचे उपाय योजावेत. राष्ट्रीय सभा म्हणजे पं. मोतीलाल म. गांधी व पं. जवाहरलाल एवढीच त्रिमूर्ति नव्हे. तिचा प्रपंच देशभर वाढविणें व तो भरभराटीस आणणें हेंच राष्ट्रीय सभेच्या अभिमान्याचें ध्येय पाहिजे व त्या दिशेनें प्रयत्नहि पाहिजेत. यापुढें कौन्सिलबहि-ष्काराच्या नसत्या उपस्थित केलेल्या प्रश्नास पंडितजी कसा काय रंग चढवितात हे दिसून येणारच आहे.

# विद्याधनाच्या कायद्याची सुधारणा

## श्री. जयकर यांचें नवें बिल

(ले.—काशीनाथ नरसिंह केळकर, ॲडव्होकेट.)

" जिंकील त्याची सत्ता आणि मिळवील त्याची मत्ता" अशी मुळीं म्हणच आहे. स्वकष्टार्जित मिळकतीवर ज्याची त्याची स्वतंत्र मालकी असावी हें रास्त आहे. किंबहुना या विश्वासावरच जग चाललें आहे.

***

पण हिंदुधर्मशास्त्रांत विद्येनें प्राप्त झालेलें धन विद्या मिळविणाराच्या स्वतंत्र मालकीचें होत नाही. तें समाईक व अविभक्त कुटुंबाचे होय असें कायद्यानें हल्लीं ठरलें आहे!

***

यामुळें कज्जेदलाली व असंतोष तर वाढतोच, पण विद्याधन मिळविणाराच्या **स्त्री—वारसांना** निष्कारण हाल व जाच सोसावा लागतो. कष्टानें विद्याधन मिळविणारा पुरुष मृत झाल्यावर त्याचें सर्व धन दायाद पुरुषबांधव घेतात, व मृत माणसाची विधवा स्त्री व मुली अनाथ होऊन केवळ अन्नवस्त्राच्या धनी होतात!

***

ही आपत्ति दूर व्हावी म्हणून बॅ. जयकर यानीं असेंब्लींत एक बिल आणलें आहे. त्याचा सारांश असा कीं, " विद्याधन हें पितृद्रव्याच्या किंवा एकत्र कुटुंबाच्या मदतीने मिळविलेलें असो किंवा नसो, तसेंच मिळविलेले शिक्षण सामान्य प्रतीचे असो किंवा उच्च शिक्षण असो; विद्याधन हें मिळविणाराच्या **स्वतंत्र मालकीचें** समजण्यांत यावें."

***

हिंदु कायद्याचा जाच कसा होतो तें एकदोन उदाहरणांवरून स्पष्ट समजेल. समजा, तुम्ही दोघे भाऊ एकत्र कुटुंबांत राहतां व समाईक आहां. तुम्ही विद्या संपादन केली व वकील बॅरिस्टर झालां. तुमचा भाऊ उनाडपणाखेरीज कांहीं करीत नाहीं. आतां भावानें तुम्हाला छळावयाचें म्हटलें तर त्याने ताबडतोब वांटणीची फिर्याद करावी! विद्याधन हें तुमचें स्वकष्टार्जित असलें तरी तें कोर्टांत 'समाईक' कुटुंबाचेच ठरणार, व उनाड भावाला बापाच्या मिळकतीची वांटणीच काय पण तुमच्या विद्याधनांतला हिस्साहि हक्कानें मिळणार! कारण आज कायदाच तसा आहे.

***

तुमच्या भावानें व्यापारधंदा करून इस्टेट केलेली असली तरी तुम्हाला मात्र उलट त्याच्या मिळकतींत वांटा मिळणार नाहीं. कारण तुमची मिळकत ही मात्र "विद्याधन" आहे, त्याची नाहीं. तुम्ही विद्या शिकलां पाप केलें. उनाडपणा केला असता तर बरें नसतें झालें? असेंहि तुम्हास पश्चात्तापानें वाटेल. पण त्याला इलाज काय?

***

पण तुमचा भाऊ जगाच्या स्वार्थी व कावेबाज व्यवहारांत हुषार असला तर तो असें करील. जिवंतपणी तुमच्याशीं समाईक व एकत्रच राहील. तुम्हालाहि वाटेल 'सुखासमाधानाचें अविभक्त कुटुंब कशाला मोडा व भांडणें करून वेगळे कां व्हा?' पण तुम्ही मेल्यावर तुमचें सर्वच विद्याधन "शेषाधिकारी" म्हणून भावाकडे जमा होईल, व तुमच्या स्त्री—वारसांना फक्त पोटगी व अन्नवस्त्राशिवाय कांहीहि मिळणार नाहीं! संसारव्यवस्थेंत धनाचे वारस शेषाधिकारी म्हणून पुरुष बांधवच असणें याचेंच नांव "**हिंदु एकत्र कुटुंबपद्धति**"!

***

वकीलहि उनाड भावाला सांगेल, "शहाणा असशील तर भावाच्या हयातींत विद्याधनाच्या वांटणीबद्दल भांडूं नको. कारण विद्याधनाची वांटणी झाली तरी स्वतः विद्याधन मिळविणाराला यथान्याय कांहीं तरी जाणारच. घेऊन घ्यावयाचें, मग अर्धेच का? सर्वच घे. भाऊ मरेपर्यंत वाट पाहा. चांगुलपणाचें यश तुझ्या पदरांत पडेल. भावाच्या विधवा, मुली वगैरे केवळ अन्नवस्त्राच्या धनी होतील. व 'शेषाधिकारी' म्हणून सर्वच संपत्ति तुला मिळेल!" पुराव्याचा बोजाहि अनाथ स्त्री-वारसांवरच कायद्यानें पडणार. कारण हिंदुधर्मशास्त्राचें प्रमेयच (Presumption of Law) असें आहे कीं 'हिंदु कुटुंब नेहमीं एकत्र, अविभक्त व समाईक असणें हा नियम. व असें नसणें हा अपवाद.' अर्थात् सामान्य नियमाविरुद्ध अपवाददर्शक परिस्थिति ज्याला प्रतिपादन करावयाची असेल त्यानेंच पुराव्यानें शाबीत करावी!

***

पण हा सर्व अनर्थ व घोटाळा शब्द—प्रामाण्यानें केला! व तो करणारांत संस्कृत धर्मशास्त्रकार, निबंधकारहि होते; तसेंच संस्कृत ग्रंथां-

च्या भाषांतरांच्या सहाय्यानें हिंदुधर्मशास्त्राचा न्याय देणारे, म्हणजे उंटावरून शेळ्या हांकणारे, युरोपियन न्यायाधीशहि होते! बिचारे मनु व याज्ञवल्क्य पोथ्या-पुस्तकांत राहिले! त्यांचा मूळ हेतु कोणालाच कळेना. धर्मशास्त्र कळेना तर राहो. Equity, justice and good conscience या त्रीदत्रयीला तरी या न्यायाधीशांनीं जागावयाचें होतें! 'अदमास पंचे' अवास्तव टीका लिहिणाऱ्या देशी पंडितांकडे व निबंधकारांकडे त्यांनीं बुद्धि गहाण टाकली. त्यांच्या हाताला नुसता हात लावला व 'मम' म्हणून न्यायपीठावरून निर्णय दिले! ज्याने कष्ट करावे व धन मिळवावें त्याच्याच मालकीची ती संपत्ति व्हावी हें कांहीं येवढें अगाध ज्ञान नाहीं, सामान्य तारतम्य आहे. मूळ स्मृतीमध्ये ते सांगितलेले नसेल हेंहि शक्य नाहीं. पण पाहातो कोण? शब्दप्रामाण्य अगदीं वेदांपासून अलीकडील संस्कृत टीकाकारांपर्यंतहि येऊन बसलें म्हणजे मूळ हिंदुधर्मशास्त्र असेच वाहून जावयाचें!

***

या विषयासंबंधाने याज्ञवल्क्यस्मृतींतले मूळ दोन श्लोक आहेत ते असे—

पितृद्रव्याविरोधेन यदन्यत्स्वयमर्जितम् ।
मैत्रमौद्राहिकं चैव दायादानां न तद्भवेत्—११८
क्रमादभ्यागतं द्रव्यं हृतमभ्युद्धरेत्तु यः ।
दायादेभ्यो न तद्दद्याद्विद्यया लब्धमेव च—११९

याचा सरळ अर्थ असा कीं, "पितृद्रव्याच्या मदतीवांचून जें कांहीं स्वकष्टार्जित असेल तें धन, मित्राकडून मिळालेलें धन, विवाहांत बक्षीस मिळलेले धन हीं दायाद बांधवांची (समाईक) मिळकत होत नाहीं—११८."

तसेंच "परंपरेनें वारस म्हणून मिळालेलें धन, कांहीं कारणाने नष्ट झालेले पण पुनः एखाद्यानें स्वतः प्रयत्न करून मिळविलें असेल तर तें धन, तसेच विद्येच्यायोगानें मिळविलेली संपत्ति ही इतर दायादांना देण्याचें कारण नाहीं—११९."

***

वरील श्लोकांचा सरळ अर्थ काय होतो हे वाचकांनीं पाहावे. वरील दोन श्लोक हीं पृथक् व स्वतः संपूर्ण वाक्यें आहेत. "विद्यया लब्धमेव च" या पदाशीं "पितृद्रव्याविरोधेन" या पदाचा संबंध मिताक्षरेमध्यें जोडण्यांत आला आहे, पण तो कितपत योग्य आहे हें सामान्यपणे व्याकरण जाणणारासहि कळेल, त्याला मीमांसक नकोत! "विद्यया लब्धमेव च दायादेभ्यो न दद्यात्" असे स्पष्ट व निःसंदिग्ध विधान आहे. 'विद्यया लब्धं' धनाची व्याप्ति आणखी मर्यादित करावयाची असती तर वरच्या श्लोकांतील पितृद्रव्याविरोधेन किंवा त्या अर्थाचे दुसरे शब्द याच श्लोकांत पुनः आले नसते काय?

***

'यदन्यत्स्वयमर्जितम्' इतक्यापुरताच 'पितृद्रव्याविरोधेन' याचा संबंध आहे. म्हणजे उदाहरणार्थ, पितृधनाच्या भांडवलावर मुलानें व्याजबट्टा करून (त्यांत व्यापार येत नाहीं!) सावकारी सुरू केली तर ती त्याची स्वतंत्र मिळकत नव्हे. कारण या धंद्याला मुख्यतः पितृधनच कारणीभूत झालें, म्हणून ती समाईक मिळकत होते हें सरळ आहे. पण ११८ व ११९ हे दोन श्लोक आपापल्यापुरती संपूर्ण वाक्ये असतांना वरच्या श्लोकांतील एक पद उचलून दुसऱ्या वाक्यांतल्या पदाच्या मागे मर्यादा म्हणून जोडून द्यावें, हा शुद्ध वडाची साल पिंपळास चिकटविण्याचा प्रकार होय! दुसरें असें कीं, विद्यालब्ध धनाला 'पितृद्रव्याविरोधेन' असे विशेषण लावावयाचें तर मैत्रं, औद्वाहिकं, क्रमात्, अभ्यागतं व हृतं, या सर्वांनाहि तें लागलें पाहिजे. पण यांना तें न लागतां 'विद्याधन' याला मात्र लावावयाचें हा नुसता दूरान्वयच नव्हे तर अर्थाचा अनर्थ होय!

***

यालाच आणखी प्रत्यंतर प्रमाण पुढच्याच १२३ व्या श्लोकांत सांपडतें. "पितृभ्यां यस्य यद्दत्तं तत्तस्यैव धनं भवेत्" म्हणजे "आईबापांनीं ज्याला ज्याला जे जें कांहीं दिले असेल तें तें त्याच्या एकट्याच्या मालकीचे होते." बापानें इतरांना अनेक वस्तू दिल्या, व विद्या शिकणारा होता त्याच्या विद्येवरच मुख्यतः पैसे खर्च केले, तर या श्लोकाप्रमाणे ती विद्या त्याची होते, पण त्या विद्येच्यायोगानें तो जें धन मिळवील तें धन मात्र त्याचे होत नाहीं, असे कसें म्हणतां येईल? 'स्वयमर्जितं' असें धन कोणतें? तर जें 'पितृद्रव्याविरोधेन' मिळविलें असेल तें, ही व्याख्या सामान्यतः खरी व बरोबर आहे. पण विद्याधन हें त्याला मुद्दाम स्पष्टपणे अपवाद करावें असाच स्मृतिकरांचा हेतु आहे. कारण मनुस्मृति याज्ञवल्क्यापूर्वीची असून त्यांतहि असें स्पष्टपणानें सांगितलें आहे कीं, 'विद्याधनं तु यद्यस्य तत्तस्यैव धनं भवेत् । मैत्र्यमौद्वाहिकं चैव माधुपर्किकमेव च ॥-९-१४६ या श्लोकांत विद्याधन हें ज्याचे त्याचें स्वतंत्र मालकीचे हें स्पष्टपणें सांगितलें आहेच. पण मैत्र्यं, औद्वाहिकं यांचाहि याज्ञवल्क्याप्रमाणें उल्लेख आहे. 'पितृद्रव्याविरोधेन' या विशेषणाचा संबंध 'विद्यया लब्ध' धनाशीं नाहीं असें या उदाहरणानें तर स्पष्टच शाबीत होतें.

***

पण या मुद्द्याची आणखी चर्चा करण्याचें कारण नाहीं. बिचाऱ्या मनु-याज्ञवल्क्यांच्या वेळेला उद्योगधंद्यांची इतकीशी वाढ झाली नव्हती. पण इतर स्मृतिकारांच्या वेळीं ती थोडीबहुत तरी झाली असावी. म्हणून 'विद्याधन' व 'पितृद्रव्याविरोधेन' या शब्दांचा संबंध जोडून ओढाताण सुरू झाली. अलीकडे कोर्टांत नवे खटले आले म्हणजे जसे नवे निकाल होतात त्याप्रमाणें, व्यास, कात्यायन, नारद, बृहस्पति, वसिष्ठ इत्यादिकांनीं मूळ अर्थाची कशी फिरवाफिरव केली आहे व नव्या गोष्टी लक्षांत आणून कसे नवे निर्णय दिले आहेत हें स्मृतिचंद्रिकेंत पाहाण्यासारखें आहे! 'स्मृतींत बदल होत नाहीं, नव्या काळाला नवी स्मृति होत नाहीं' या ढोंगी सिध्दांताचेंच हें खासें उदाहरण होय!! याकरितां वाचकांनीं कृपा करून देवण्णाभट्ट यांनीं केलेल्या 'स्मृतिचंद्रिका' या ग्रंथाचीं पृष्ठें २७३ ते २७८ हीं चाळून पाहाण्याची तसदी घ्यावी.

***

नव्या परिस्थितीला अनुरूप असे स्मृतिकारानीं नवे अर्थ लावले यांत त्यांची चूक नाहीं. आम्हालाहि आज तोच हक्क असावा इतकेंच आमचें म्हणणें. जयकरांचें बिल हिंदुधर्मशास्त्राच्या मूळ हेतूंना धरून तर आहेच, पण इतर स्मृतिकारांशीं ते विरोधी आहेत असें कोणी म्हटल्यास Notwithstanding any rule, or interpretation of Hindu Law to the contrary हे शब्द त्यांनाहि इतर स्मृतिकारांप्रमाणेंच हक्कानें घालतां येतील, व तसें त्यांनीं आपल्या बिलांत घातलेहि आहेत.

# लो. टिळकांची भाषाशैली

( ले.—ग. वि. केतकर.)

( ले. ३ रा )

लोकमान्य टिळकांचें प्रतिपादन निश्चितार्थक व स्पष्ट असे ही गोष्ट मोघमपणें प्रत्येक वाचक सांगूं शकतो. पण या स्पष्टार्थ-प्रतिपादनाच्या त्यांच्या ठराविक व संवयीच्या अशा कोणत्या वाक्यरचना व पद्धती होत्या हे वर वर वाचणाऱ्यास चटकन सांगतां येण्यासारखें नाहीं. पण सूक्ष्म दृष्टीने पाहिल्यास निश्चितार्थक प्रतिपादनाचे कांहीं ठराविक रचनाप्रकार लोकमान्यांच्या सर्व लेखांत पदोपदी दिसून येतात. आणि हे सर्व प्रकार स्पष्ट करून मांडल्यावर लोकमान्यांचें विषयप्रतिपादन निश्चित व सडेतोड असें कां होत असे हें नक्की सांगतां येतें.

### निश्चयी वाक्यान्त

लोकमान्यांचें कोणतेंहि प्रतिपादन नेहमीं निश्चितार्थक असल्यामुळें त्यांच्या लिहिण्यांत वाक्यांचे शेवट एका विशिष्ट प्रकारचे येतात. "आमची अशी खात्री आहे"(ले. भा. १ पृ. १०)"आम्हास हेंच सर्वतोपरी इष्ट दिसतें" (ले. भा. १ पृ. ५) "आम्हास असें वाटतें कीं, कोणत्याहि दृष्टीने या प्रश्नाचा विचार केला तरी सरकारनें दिलेल्या आश्वासनास धरून चालावें हेंच श्रेयस्कर आहे. असें जर सरकार करणार नाहीं तर त्यांचें वर्तन एकतर्फी, हेकेखोर, अन्यायाचें असेंच साऱ्या लोकांस वाटेल" (ले. भा. १ पृ. १७) हीं वाक्यें पाहा. या शेवटच्या वाक्यांत त्यांनीं विकल्प असा कोठेच ठेवलेला नाहीं. किंवा हे वाक्य पाहा "शिकलेले नेटिव्ह लोक सरकारास जो सल्ला देत आहेत तोच यथार्थ आहे व कँबेल आणि त्यांच्या जोडीचे गृहस्थ हेच सरकारचे आणि ह्या देशाचे खरे शत्रु होत. हें जर अजून सरकारच्या नजेरस आलें नाहीं तर आमचें व देशाचे मोठें दुर्भाग्यच समजले पाहिजे" ( ले. भा. १ पृ. ३१७ ) "हें स्पष्ट सिद्ध होतें" "हें सर्वांनीं लक्षांत वागविलें पाहिजे" "असा आमचा समज आहे" "यापेक्षां राष्ट्रीय सभेविषयीं आणखी सबळ पुरावा पाहिजे आहे असे आम्हास वाटत नाहीं" "येवढी गोष्ट निःसंशय आहे" "अशी आमची पूर्ण उमेद आहे" "अधिकाऱ्यांची दांडगाई कमी झालीच पाहिजे" "असें आमचे मत स्पष्टपणे कळविण्यास आम्हास दिक्कत वाटत नाही"( अग्रलेख २०-४ १९२०) अशासारखीं वाक्ये लेखाच्या व छेदकांच्या अंतीं व मध्येंहि नेहमीं येतात. विधानें एकापाठीमागून एक, निःसंदिग्ध व विकल्पास जागा किंचित्‌हि न ठेवतां येतात. निश्चयदर्शक क्रियापद असलें तरीहि पुनः निश्चयदर्शक क्रियाविशेषण, विशेषणें, सर्वनाम, अव्यय इत्यादिहि येतातच. एकामागून एक निश्चितार्थक वाक्यांचा पुढील नमुनेदार छेदक पाहा—

### निश्चयी वाक्यांचा नमुनेदार छेदक

"सर्व लोकांस आमची आग्रहपूर्वक अशी विनंति आहे की, त्यांनीं आपल्या हातून या अन्यायाचा होईल तितकें करून प्रतिकार करण्यास झटलें पाहिजे. हिंदुस्थानाचें राज्य हिंदुस्थानाच्या कल्याणाकरितां चालावयाचें आहे; मँचेस्टरच्या कल्याणाकरितां नाहीं ही गोष्ट प्रत्येकाच्या अंतःकरणांत बिंबून त्याप्रमाणें त्यानें आचरण करावयास पाहिजे. अन्याय ज्याच्या अंतःकरणास झोंबत नाहीं त्यास 'स वै मुक्तोऽथवा पशुः' या दोहोंपैकीं कोणत्या तरी वर्गांत घातलें पाहिजे. अमेरिकन लोक इंग्रज लोकांचे सख्खे भाऊबंद असतांहि जकातीच्या त्रासामुळें त्यांच्यापासून वेगळे झाले. आम्हास तसं करावयाचें नाहीं. पण तेवढ्यानें सरकार करील तें मुकाट्यानें ऐकून घ्यावें असे मात्र होत नाहीं. कायदा कितीहि कडक असला तरी तो जर अन्यायाचा आहे तर त्याचा प्रतिकार करण्यास कडक उपायांचीच योजना केली पाहिजे. सरकारनें कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त सभासद नेमून पुनः तेथें निवळ दांडगाईनें एखादा कायदा पास करून सोडावा, हें पाहून जर आम्हास त्वेष येत नाहीं व वाईट वाटत नाही तर आमची मनुष्यांत गणना न करतां मेंढरांतच करावी लागेल. एका गालांत मारली असतां दुसरा पुढें करण्याचे दिवस आतां उरले नाहींत. ज्यानें त्यानें आपापल्या हक्कांस जपलें पाहिजे, मग तो राजा असो वा रंक असो. हिंदुस्थानसरकारच्या कायदे-कौन्सिलांतील सभासद आपणास अनुकूल असते तर ठीकच झालें असतें; पण ते अनुकूल नाहींत म्हणून रडत बसण्यांत हंशील नाहीं. सरकारनें जरी अन्याय केला तरी त्याचा प्रतिकार करणें कांहीं अंशीं तरी तुमच्या स्वाधीन आहे. तो प्रकार कोणता म्हणाल तर सर्वांनीं देशी कपडा वापरावयास लागावें हा होय....... देशी कापड वापरण्याचा संकल्प करण्यास उपाध्याची जरूरी लागत नाहीं अगर विशेष मुहूर्ताचीहि अपेक्षा नाहीं. सर्व प्रकारचें देशी कापड हल्लीं निघूं लागलें आहे व तें बहुतेक सर्व ठिकाणीं मिळण्याच्या सोयी झाल्या आहेत. करितां सरतेशेवटीं सर्व महाराष्ट्रांतील लोकांस आम्ही अशी प्रार्थना करतो कीं, जर तुम्हास देशाचें खरें कल्याण करणें असेल, जर तुम्हाला सरकारच्या कायद्याचा कांहीं राग आला असेल, जर तुम्ही तुमच्या करारी व दृढनिश्चयी पूर्वजांचे वंशज असाल, मँचेस्टर व्यापाऱ्यांचा जर खरोखर तुम्हास सूड घ्यावयाचा असेल, हिंदुस्थानाचें राज्य हिंदुस्थानांतील लोकांच्या हिताकरितांच चालविलें पाहिजे असें तुम्हास वाटत असेल, अर्थशास्त्राचीं व राजनीतीचीं खरीं तत्त्वें जर तुम्हास माहीत असतील, किंबहुना अन्याय सहन न झाल्यामुळें तुमच्या जिवाची जर खरोखरच तळमळ होत असेल, व तुमच्या अंतःकरणांत चटका लागून राहिला असेल तर इतउत्तर कोणताहि सबब न सांगतां देशी कापड वापरण्याचा निश्चय करून त्याप्रमाणे वर्तन करण्यास लागा."

### पर्यायांतीं निश्चय

'कायदेशीर व सनदशीर' 'स्वराज्य व सुराज्य' 'तत्त्ववेत्ता व मुत्सद्दी' यांची तुलना करतांनाहि त्यांनीं तुलनात्मक वाक्यें बनविलीं नाहींत. 'कदाचित्' 'किंवा' 'अथवा' अशा शब्दांनीं त्यांनीं निरनिराळे संभव दाखविले तरी या सर्व संभवांत अमुक एक सिद्धांतच निघतो असेंच त्याचें पर्यवसान केलेले असावयाचें. म्हणजे या सर्व संभवांचा कदाचित्पणा अखेरच्या सिद्धांताचें व्यापकत्व व निरपवादित्व सिद्ध करण्यासच उपयोगी पडावयाचा. उदाहरणार्थ, पुढील वाक्यें पाहाः—

"समाज हिंदूंचा असो वा म्लेंछांचा असो, प्राचीन असो वा अर्वाचीन असो, पौरस्त्य असो वा पाश्चिमात्य असो, त्यांत चातुर्वर्ण्यव्यवस्था अमलांत असल्यास त्याप्रमाणें किंवा दुसरी समाजव्यवस्था अमलांत असेल तर त्याप्रमाणें जें काम आपणास प्राप्त झाले, अथवा शक्य असल्यास आपल्या अभिरुचीप्रमाणें आपण कर्तव्य म्हणून एकदां पत्करलें तेंच आपला स्वधर्म बनतें" "गीतेंतील अध्यायाची संगति पाहा, किंवा त्यांतील विषयांचें मीमांसकाच्या पद्धतीनें पृथक् पृथक् विवेचन करा, कोणत्याहि बाजूनें पाहिलें तरी ...... ज्ञानभक्तियुक्त कर्मयोग हेंच गीतेचें खरें तात्पर्य आहे असें सिद्ध होतें." (गी. र. पृ. ४६९) "या गोष्टीस कोणी कालाची सद्दी म्हणोत, कोणी पुण्याई म्हणोत, कोणी ईश्वरी कृपा म्हणोत वा कोणी नास्तिक मोठा 'अ' काढून अज्ञेय किंवा अतर्क्य प्रकार म्हणोत, सर्वांचा अर्थ एकच आहे." "स्वतंत्र लोकमत काय आहे, मग तें प्रिय असो वा अप्रिय असो, तें सरकारनें समजून घेतलें पाहिजे" (ले. ३।५४७) "आणि ही गोष्ट जर कबूल असेल, तर मग बाईच्या भक्तांस ती वाजवी म्हणून कबूल असो वा वावगी म्हणून कबूल असो, तर वादच मिटला म्हणावयाचा."

### अन्वय-व्यतिरेक

वाक्यार्थ निश्चित मांडण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीचा दुसरा प्रकार असा कीं, कोणताहि सिद्धांत अन्वयानें व व्यतिरेकानें, Positively व Negatively करणरूपानें व अकरणरूपानें, असा मांडण्यासारखा

असेल तर त्याच्या दोनही बाजू मांडल्याशिवाय टिळकांचें समाधान होत नाहीं. 'हेंच खरें दुसरें नाहीं,' "याचें कारण हें नसून हें आहे" 'याचा अर्थ असाच आहे असा नाहीं' 'अमुक न करतां अमुक केलें पाहिजे' 'अमुक केलें पाहिजे अमुक करतां कामा नये' अशीं दुहेरी वाक्येंच पुष्कळ ठिकाणीं सिद्धांतनिदर्शनासाठी येतात. उदाहरणार्थ—" राज्यपद्धतींतील दोष अधिकाऱ्यांच्या नजरेस आणणें हीच खरी राजनिष्ठा होय, एखाद्या नोकराप्रमाणें सरकारच्या प्रत्येक कृत्याला मान डोलवीत राहणें म्हणजे कांहीं खरी राजानिष्ठा नव्हे ( सू.१२८६–७ ) 'देव भावाचा भुकेला, पूजा-द्रव्याचा नव्हे' (सू.१४२) "भक्तीचें पर्यवसान ज्ञान असून भक्ति हें त्याचें साधन आहे, साध्य नव्हे"(सू. १०३२) 'क्षुब्ध झालेल्या राष्ट्राच्या मनोवृत्ती तरुणांच्या कृतीनेंच प्रगट व्हावयाच्या, म्हाताऱ्यांच्या कृतीनें नव्हे' (सू. ५५१) 'उत्सव व्यक्तिशः उपासनेकरितां नाहीं, सामाजिक धर्मबुद्धि जागृत करण्याकरितां आहे' ( सू. २०० ) 'यशः प्राप्तीला असंतोष हें साधन आहे.' संतुष्ट मनुष्य राजकारणांत निरुपयोगी आहे. " ( सू. ६५ )

### विशेषणांचे ठोके

टिळकांचा स्पष्टवक्तेपणा प्रगट होण्याची तिसरी रीति अशी कीं, एका विशेषणानें अगर क्रियाविशेषणानें कदाचित् वाचकांच्या मनावर सिद्धांत पूर्णपणें बिंबणार नाहीं म्हणून ते जवळ जवळ समानार्थक अशीं ओळीनें दोन, तीन किंवा चार विशेषणें घालीत. किंवा त्यांच्या मनांत असलेला अर्थ अगर आवेश एका विशेषणानें व्यक्त होईल असें न वाटून ओळीनें दोन दोन तीन तीन विशेषणें ते योजीत. खुंटा अगदीं हलवून बळकट करण्यापैकींच हा प्रकार होय. या प्रकाराचे पुढील कांहीं नमुने पाहाण्यालायक आहेत. या नमुन्यांमध्यें स्तुति व निंदा, मंडन व खंडन या दोहोंचेहि मासले आहेत. या दोहोंतहि आपल्या मनांतील अर्थ संपूर्णपणें वाचकांच्या मनावर ठसावा, न्यून पडूं नये, थोडें अधिक झालें तरी चालेल अशीच वृत्ति दिसते. या वाक्यांना ठोकीव विधानांचीं वाक्यें असें नांव देतां येईल. कारण यांत लेखकाच्या मनांतील अर्थ वाचकाचे मनावर पक्का ठसेल इतकी खात्री होईपर्यंत एकावर एक शब्दांचे व विशेषणांचे ठोके मारलेले दिसतात.

"आपला हिंदुस्थान देश ज्ञानाचे, वैभवाचें, यशाचें आणि पूर्ण स्वराज्याचें सुख अनुभवीत आहे, अशी जेव्हां त्याची ख्याति चोहोंकडे झाली होती तेव्हां एका सर्वज्ञ, महापराक्रमी, यशस्वी व परमपूज्य क्षत्रियानें दुसऱ्या महान् धनुर्धरास क्षात्रधर्माच्या स्वकार्यास प्रवृत्त करण्यासाठीं गीता सांगितली आहे."( गी. र. पृ. ४४२ ) "आम्ही हिंदुस्थानांतील लोक कर्तव्यानें, हुषारीनें, उद्योगानें, साहसानें व चातुर्यानें श्रेष्ठ आहोत असा अहंभाव त्यांचे ठिकाणी उत्पन्न झाला आहे." ( ले. १ पृ. ४३५ ) "अशा वेळीं कोणतेहि राष्ट्र सहजच मोठ्या उत्साहानें आपल्या राज्यकर्त्यांचें आनंदानें, प्रेमानें, उल्हासानें गौरव करील." ( ले. भा. १ पृ ६५७ ) "या त्यांच्या गैरसमजामुळें अथवा अज्ञानामुळें त्यांनीं केलेलें अस्वस्थतेचें निदान शास्त्रदृष्ट्या फारच चुकींचें किंबहुना उपहास्यास्पद आहे असें म्हटलें तरी चालेल." ( ले. भा. २ पृ. १६) "देशांत शांतता राखल्यानें सरकारचें काम संपत नाहीं किंवा पुरें होत नाहीं. सर्व राष्ट्र किंवा सर्व प्रजा आहे त्यापेक्षां अधिक सुखी कशानें होईल; त्यांस मिळत आहे त्यापेक्षां अधिक अन्न कशानें मिळेल, ते स्वाभिमानी, निश्चयी, करारी व तेजस्वी कशाने होतील हें सरकारनें पाहिले पाहिजे. आणि जें सरकार या गोष्टींकडे लक्ष देत नाहीं ते भाडोत्री व आपमतलबी समजलें पाहिजे. तें सरकार लोकांच्या कल्याणाकरितां नव्हे, आणि तें सरकार आपली खरी जबाबदारी ओळखीत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. आमच्या दुर्दैवानें आम्हास अशा प्रकारचें सरकार मिळालेलें आहे" (ले. ३ पृ. ११३)

# मजूर पक्षाला पडलेला नवा पेंच

महायुद्ध समाप्त झाल्यावेळेपासून जर्मनीकडून नुकसानभरपाईच्या नांवावर उकळल्या जाणाऱ्या खंडणीची रक्कम व तिची हप्तेबंदी हा प्रश्न सर्वच दोस्त राष्ट्रांच्या मुत्सद्द्यांस पुरून उरला आहे. युद्धसमाप्तीच्या वेळचा दृष्टिकोन वेगळा असल्यानें त्या वेळीं भरपाईची रक्कम जितकी चढवितां येईल तितकी चढविण्यांत आली. पण असला अनागोंदी जमाखर्च कागदपत्रांत फुगवून दाखविला तरी प्रत्यक्ष वसूल होणाऱ्या रकमेला कांहीं नैसर्गिक मर्यादा असतेच, हे दोस्त राष्ट्रांच्या लवकरच लक्षांत येऊन अमेरिकन तज्ज्ञ डॉवेज यांच्याकडे व्यवहार्य हप्तेबंदी ठरविण्याचें काम सोपविण्यांत आलें. डॉवेज यानें एकंदर भरपाईचा वट आंकडा किती असावा याचा विचार

करण्याचें तूर्त सोडून देऊन, वार्षिक हप्ता जास्तींत जास्त किती घेतां येईल तेवढेंच ठरवून त्या हप्त्याची वांटणी दोस्त राष्ट्रांत कोणत्या प्रमाणांत करावी ते ठरवून दिलें. या योजनेप्रमाणें जर्मनीनें द्यावयाच्या वार्षिक हप्त्याची रक्कम सुमारें १८० कोटि रुपयांची ठरली असून त्यांतले २३ टक्के इंग्लंडाला मिळावे असें ठरविण्यांत आलें. ही हप्तेबंदीहि जर्मनीला डोईजड होऊं लागल्यामुळे पुनः एकदां ओवेन यंग यांच्याकडे हा प्रश्न सोंपविण्यांत आला व यंग-साहेबानें जर्मनीची हप्तेबंदी चढत्या- उतरत्या भांजणीच्या पद्धतीची ठरविली. १९३० सालीं जर्मनीनें सुमारें ११० कोटी रुपयांचा हप्ता भरावा व ही हप्त्याची रक्कम दरसाल चढत चढत १५५ कोटी रुपयांपर्यंत चढावी व तेथून पुनः कमी होत होत ती संपुष्टांत यावी असें ठरविण्यांत आलें. जर्मनी-कडून वसूल करावयाचा हप्ता पूर्वीपेक्षां कमी करण्यांत आला तसाच इंग्लंडाचा हिस्साहि पूर्वी २३ होता तो १९ टक्के करावा असें या ओवेन यंग योजनेंत नमूद केलेलें आहे. त्या वेळचे परराष्ट्रीय मंत्री ऑस्टेन चेंबर्लेन यांनीं त्या वेळीं या कलमाला हरकत घेतली नसून ही योजना इंग्लंड मान्य करील अशीच सर्वांची तेव्हां समजूत होती; आणि खुद्द इंग्लंडांतील वृत्तपत्रांनी फारशी तक्रार केली नव्हती. या ओवेन यंग योजनेला मूर्त स्वरूप देण्याकरितां सध्या हॉलंडमध्यें हेग येथे परिषद भरली असून इंग्लंडचे फडणवीस मि. स्नोडन हे स्वतः त्या परिषदे-करितां तेथें गेले आहेत आणि इंग्लंडाच्या खिशाला चट्टा बसणारी ही योजना आपणास बिलकुल मान्य नाहीं असें साफ सांगून त्यांनी सगळाच डाव कुजवावयास लावला आहे. ओवेन यंग कमिटीच्या योजनेविरुद्ध मोहीम मजूर पक्षानें निवडणुकीच्या वेळींच चालू केली होती. पण त्या वेळीं केवळ निवडणूक जिंकण्यापुरती ती एक शक्कल लढ-विली जात असेल असें समजून तिकडे कोणी विशेष लक्ष दिलें नाहीं. परंतु आतां हेगच्या परिषदेंत फ्रान्स, इटाली, बेल्जम, जपान वगैरे प्रमुख राष्ट्रांनीं ती योजना मान्य केली असतां, एकट्या इंग्लंडानें ती फेटाळून लावून सगळ्यांची अडवणूक करावी याची इतर सर्व राष्ट्रांना मोठी चीड आली आहे. याचा परिणाम साहजिकच असा होईल कीं इंग्लंडाला युरोप खंडांत कोणीच दोस्त राहाणार नाहीं.

मि. स्नोडन यांचें म्हणणें असें कीं, महायुद्धांत इंग्लंडानें भयंकर नुकसान सोसलें. आजमितीला इंग्लंडाच्या शिरावर ६०० कोटी पौंडांच्या राष्ट्रीय कर्जाचा बोजा आहे व त्यांतले १०० कोटी पौंड अमेरिकेचेच द्यावयाचे आहेत. फ्रान्सच्या डोक्या-वरील कर्जाचा बोजा अवघा २०० कोटी पौंडांचा आहे. आणि जर्मनीच्या नुकसानभरपाईतला मोठ्यांत मोठा हिस्सा फ्रान्सलाच मिळतो ! अशा स्थितींत जर्मनीला हप्तेबंदींत जर कांहीं सवलत देण्यांत आली तर तिचा सर्व तोटा इंग्लंडानेंच कां सोसावा, फ्रान्सनें कां सोसू नये ? इंग्लंडाचा जो हिस्सा २३ टक्के आहे तो १९ टक्के करण्याऐवजीं फ्रान्सचा जो ६३ टक्के हिस्सा आहे तो ५९ टक्के कां करूं नये ? बरें, महायुद्धांत फ्रान्सच्या मुल-खाची अत्यंत खराबी झाल्यामुळें त्याच्या वांटणीच्या हिश्शास हात लावणें वाजवी नव्हे असें जर कोणी म्हणेल, तर सगळ्या नद्या अखेरीस जशा समुद्रालाच मिळतात त्याप्रमाणें जर्मनीकडून येणारा सगळा द्रव्यौघ ज्या अमेरिकेच्या खजिन्याकडे लोटतो त्या अमेरिकेनें स्वतः थोडेसें नुकसान सोसून इतर राष्ट्रांस त्यांच्या कर्जाची सूट देऊं नये काय ? अमेरिका जर इंग्लंडाला कांहीं सूट देईल तर इंग्लंड तेवढीच सूट इतर दोस्त राष्ट्रांना किंवा जर्मनीलाहि देण्याला तयार होईल. सारांश, ओवेन यंग कमिटीची योजना वांझोटी ठरविण्याचें पातक जर कोणतें राष्ट्र करीत असेल तर ते अमेरिका होय असें स्नोडन यांचें म्हणणें आहे !

स्नोडन यांच्या या विचारसरणींत एका दृष्टीनें बरेंचसें तथ्य आहे. इंग्लंडानें आजपर्यंत इटाली, फ्रान्स, बेल्जम, सर्व्हिया इत्यादि दोस्त राष्ट्रांस कर्जफेडीच्या बाबतींत पुष्कळच सूट व सवलत दिली आहे. पण त्याबरोबरच जर्मनीचा व तुर्कस्थानाचा जेवढा मुलूख मॅंडेटरी टेरीटरी म्हणून इंग्लंडाला मिळाला तेवढा इतर कोणत्याहि राष्ट्रास मिळालेला नाहीं. त्यांतल्या त्यांत अमेरिकेला तर एक तसूभर देखील जमीन मिळाली नाहीं याचा उल्लेख मात्र स्नोडन यांच्या भाषणांत कोठेंहि नाहीं. तें कसेंहि असो; इंग्लंडानें अधिक शायलॉकगिरी केली का अमेरिकेनें किंवा फ्रान्सनें केली हा कांहीं प्रस्तुतचा प्रश्न नाहीं. प्रस्तुतचा प्रश्न एवढाच की इंग्लंडानें ही ओवेन यंग योजना फेटाळून लाविली तर त्याचा परिणाम काय होईल? इंग्लं-डाला वगळून कांहीं इतर सर्व राष्ट्रें ही योजना अमलांत आणूं शकत नाहींत. अर्थातच इंग्लंडाच्या हेकेखोरपणामुळें सगळाच डाव उधळला जाऊन पुनः जुनी डॉवेज स्कीम कायम राहील. परंतु जर्मनीनें जुन्या योजनेप्रमाणें भरपाई कर-ण्याचें नाकारून राष्ट्रसंघाकडे गाऱ्हाणें नेल्यास राष्ट्रसंघ काय निर्णय देईल ? राष्ट्रसंघ कांहीं कोणावर सक्ती करूं शकत नाहीं. तथापि राष्ट्रसंघा-विरुद्ध बंडखोरी करावयास इंग्लंड तयार होईल असेंहि वाटत नाहीं. तात्पर्य, इतर सर्व राष्ट्रांनीं

एकजुटीनें इंग्लंडाविरुद्ध गिल्ला केल्यास इंग्लंडाला या बाबतींत आपण होऊनच माघार घ्यावी लागेल; मग मजूर पक्षच आपला दुराग्रह सोडून स्वतः माघार घेवो किंवा हुजूर व उदार पक्ष एक होऊन मजूर पक्षाचा नक्षा उतरविण्याकरितां त्यास तशी माघार घ्यावयास लावोत. या दोहोंतून कोणतीहि गोष्ट घडून आली तरी तींत इंग्लंडाच्या इभ्रतीस धक्काच पोंचणार. इंग्लंडांतील बहुतेक सर्व पत्रें सध्या स्नोडन यांच्या निर्भीडपणाची व खंबीरपणाची स्तुतीच करीत आहेत. परंतु त्यांच्या या आग्रहामुळें फ्रान्स, जर्मनी व अमेरिका या तीनहि राष्ट्रांतील लोकमत इंग्लंडाविरुद्ध कुलुषित झालें असून इंग्लंडच्या अडचणी उत्तरोत्तर वाढत आहेत. ही भावी आपत्ति लक्षांत घेऊन मजूरपक्ष जर ओवेन यंग योजनेला संमति देईल तर इंग्लंडचें कायमचें आर्थिक नुकसान केल्याबद्दल तिकडूनहि हुजूर पक्ष मंत्रिमंडळावर हल्ला चढवील. सारांश, हा यंग कमिटीचा रिपोर्ट कोणीकडून तरी मजूर पक्षाला भोवणार हें खास. या नव्या पेंचांतून मजूर पक्ष शीर सलामत राहून निसटतो का त्यांत गटगळ्या खाऊं लागतो याकडे तूर्त ब्रिटिश राष्ट्राचें लक्ष वेधून राहिलें आहे.

# तळेगांवची मिरवणूक पार पडली

( आमच्या खास बातमीदाराकडून )

श्रावण शु. ६ हा दिवस तळेगांवकरांना अत्यंत उत्साहाचा असा गेला. ज्यांनीं पूर्वी आठ घटका राज्य भोगून उदारपणाबद्दल आपली दिगंत कीर्ति करून ठेवली त्या श्री. शिराळशेटचा स्मारकदिन इतर ठिकाणाप्रमाणेंच तळेगांव येथेंहि शिंपी जातींतील मंडळी पाळीत असतात. शिराळशेटच्या मातीच्या मूर्तीची पूजाअर्चा करून त्याचे विसर्जन सर्व मंडळीसह येथील दाभाड्याचे तळ्यावर करण्याचा संप्रदाय आहे. पण या मिरवणुकीच्या वाद्यांस सन १८९६ च्या सुमारास प्रथमच हरकत उपस्थित झाली. त्या कामीं कोर्टदरबार होऊन व जाबजबाब होऊन त्या वेळचे पुढारी श्री. गंगाजी सलागरे यांनीं आपला मशिदीवरून सवाद्य मिरवणूक नेण्याचा हक्क फार पुरातन आहे असें सिद्ध केलें व त्यामुळें त्या वेळीं वाद्यांवर आलेले संकट दूर झालें. पण पुढें १९२६ च्या सुमारास मुसलमानांच्या तक्रारीवरून अधिकाऱ्यांनी वाद्यांवर निष्कारण नियंत्रण घालून वाद्यांची संख्या कमी केली. ही अपमानकारक अट मान्य करून मिरवणूक नेणें योग्य नसल्यानें तेव्हांपासून मिरवणूक बंद ठेवण्यांत आली.

सन १९२७ सालीं परवानगी मिळण्याचे सर्व प्रयत्न विफळ झाल्यामुळें तळेगांवकरांनीं श्रीपांडुरंगाची मिरवणूक कायद्याचें जुलमी बंधन झुगारून देऊन सत्याग्रह करून सवाद्य मशिदीवरून नेली. त्यामुळें या प्रश्नास अधिक चालना मिळाली. अखेरीस जुने दाखले वगैरे पाहण्यांत येऊन जुन्या वहिवाटीप्रमाणें सरकारी अधिकाऱ्यांनीं यंदाच्या मिर[illegible]पूर्वीप्रमाणें [illegible] पुरास परवानगी दिली. यामुळें स्वाभाविकच यंदाच्या मिरवणुकीला कल्पनेपेक्षां अधिक समाज जमला होता.

पो. इं., पो. सु., वडगांवचे मामलेदार, पश्चिमभागचे प्रांतसाहेब व स्वतः कलेक्टर अशी सरकारी मंडळी आपल्या सरंजामानिशीं हजर होती. पुण्याहून श्री. विश्वासराव डावरे वगैरे मंडळीहि आली होती.

मिरवणूक टाळ, विणे, मृदंग इत्यादि मंजुळ वाद्यांसह मोठ्या थाटानें बाजारपेठेतील नव्या मशिदीवरून नेण्यांत आली. तेथून मिरवणूक जाण्यापूर्वी मशिदींत दगडाविटा वगैरे साहित्य लपवून ठेवलें आहे किंवा कसें याची अधिकाऱ्यांनीं आंत जाऊन पाहून खात्री करून घेतली. नंतर तेथील सर्व मुसलमानांस बाहेर घालवून देऊन मशिदीचे दारास बाहेरून कडी लावून घेण्यांत आली व त्या मशिदीचे आसपास सशस्त्र पोलीस एका युरोपियन अधिकाऱ्याचे देखरेखीखालीं उभे करण्यांत आले. अशा तऱ्हेचा बंदोबस्त झाल्यावर मशिदीवरून हरिनामाचा गजर करीत मंजुळ वाद्यांसह मिरवणूक नेण्यांत आली.

मिरवणूक मशिदीवरून गेल्यावर, सरकारी अधिकाऱ्यांपैकीं डे. पो. सुपरिंटेंन्डेंट मि. क्लार्क व डिव्हिजनल मॅजिस्ट्रेट श्री. हुल्याळकर यांनीं, यंदाचा बंदोबस्त तुम्हास पसंत पडला ना? असें श्री. विश्वासराव डावरे यांना विचारिलें. त्यावर श्री. डावरे यांनीं त्यांस स्पष्ट सांगितलें कीं, "मी तरी हेंच म्हणत होतों व हल्लींहि म्हणत आहें कीं, तळेगांवी किंवा इतर कोठेंहि सरकारी अधिकाऱ्यांनीं मनांत आणिलें म्हणजे [illegible] रक्षण होऊं शकतें. आजचा बंदोबस्त चांगला आहे; पण अशीच व्यवस्था करण्याचें अधिकाऱ्यांनीं यापूर्वींच मनांत आणलें असतें तर यापूर्वींहि त्यांना तें सहज करतां आलें असतें आणि मिरवणूक

बंद ठेवण्याचें कारणच पडलें नसतें."

मिरवणूक पार पडल्यावर सर्व समाज श्रीविठ्ठल-मंदिरांत जमला व तेथें समारोपादाखल श्री. डावरे यांचें भाषण झालें. भाषणांत त्यांनीं तेथील हिंदूंना समजावून दिलें कीं, "ही परवानगी काहीं अटीवर देण्यांत येत आहे; जर हिंदु जाणूनबुजून खोडसाळ-पणा करून मुसलमानास दुखविण्याचा पुनः प्रयत्न करतील तर हा हक्क रद्द करण्याचा प्रसंग अधि-काऱ्यांवर येईल" अशी धमकावणीची व हिंदु-समाजावर नसते आरोप लादून त्यांचीं मनें दुख-विणारी भाषा कलेक्टरकडून मिळालेल्या उत्तरांत आहे ? परंतु तळेगांवच्या हिंदूंची चढाईची वृत्ति केव्हांहि नसून, फक्त असलेले पुरातन हक्क राख-ण्याचा त्यांचा सात्त्विक आग्रह आहे. तळेगांवच्या मुसलमानांच्या अर्जास उत्तर देतांना सरकारी अधि-कारी मुसलमानांस म्हणतात की, "तुम्ही उद्दामपणानें वागून हिंदूंच्या धार्मिक हक्कांत ढवळाढवळ करतां व त्यामुळें तुमच्यावर पडलेल्या बहिष्कारास तुम्ही पात्रच आहां; यापुढें तरी हिंदूंना सतावण्याचा प्रयत्न तुम्ही सोडून द्यावा हें बरें." इकडे मुसलमानांस असें म्हणत असतां हिंदूंसहि नसते टोमणे द्यावयाचे याचा अर्थ काय? या दोहोंपैकीं खरें विधान कोणतें? कां दोन्हीं खरीं नसून अधिकारी आपल्या सोयी-प्रमाणें व लहरीप्रमाणे वाटेल त्या वेळीं वाटेल ती भाषा वापरतात असें मानावयाचें? वास्तविक येथील हिंदूंनीं कलेक्टरसाहेब म्हणतात तसा अधिक प्रसंग कधींहि केलेला नाहीं. सबब हिंदूंचे पुरातन हक्क पूर्वी प्रमाणेंच पुढेहि राखले जातील अशी आशा आहे आणि सत्य संकल्प पूर्ण करणार श्री पांडुरंग समर्थ आहे.

इतकें भाषण झाल्यावर मंडळींस प्रसाद वगैरे देण्यांत येऊन हा समारंभ संपला.

# इटालीमधील सध्याची तरुण पिढी

**( ले. अनंत जनार्दन करंदीकर )**

(युगो ओजेत्ती इटालियन या लेखकाच्या लेखावरून)

गेल्या महायुद्धांत भाग घेतलेल्या बहुतेक सर्व राष्ट्रांना आपापल्या तरुण पिढीच्या भवितव्यते-विषयीं अतिशय काळजी वाटत आहे. कारण इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरे देशांतील तरुण पिढीच्या मनांतून उत्साह, महत्त्वाकांक्षा, ध्येयवादीपणा वगैरे भावनांचा बहुतांशीं लोप होऊन त्यांची जागा नीतिभ्रष्टतेनें व निराशावादानें व्यापली आहे. यामुळे देशामध्यें अरा-जक माजते की काय अशीहि त्या राष्ट्रांना भीति वाटत आहे. नुसत्या तरुण पिढीच्या दृष्टीनेंच विचार केल्यास अराजक अवस्थेला भिण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण बेबंदशाही ही तर तरुणांच्या अजेय इच्छाशक्तीला व अचाट कर्तृत्वाला जागृत करणारी व संधि मिळवून देणारी देवता आहे. महायुद्ध संपल्यावर इटालीमध्यें कांहीं दिवस अराजक माजले होतें; पण वृद्धांना बाजूला सारून देशांतील साऱ्या कारभाराचीं सूत्रें तरुणांनीं आपल्या हातीं घेण्यांतच त्याचें पर्यवसान झालें, व त्यायोगानें इटालीचा उत्कर्ष अधिक झपाट्यानें झाला. हा देशाचा कारभार तरुणांनींच आणि तरु-णांच्या हितासाठींच चालविला पाहिजे हे सूत्र डोळ्यांपुढे ठेवून इटालीचे सध्याचे मुत्सद्दी वागत आहेत. इटालीच्या प्रधानमंडळांतील सर्व मंडळी अगदीं तरुण आहेत. त्यांची बहुतेकांचीं वयें ३० ते ४५ च्या दरम्यान असून कित्येकांच्या वयाला तर अजून तीस वर्षेहि पुरीं झालेलीं नाहीत. इटालीच्या शेजार-च्याच फ्रान्सच्या प्रधानमंडळांतील बहुतेकांचीं वयें सत्तरापुढचीं आहेत. तेथें एखादा साठीच्या सुमाराचा मनुष्य प्रधान झाला तर लोकांना त्याचें नवल वाटतें ! पण इटालीचीं राज्यसूत्रें हातीं धर-णारा मुसोलिनी याचें वय अवघें ४६ वर्षांचें आहे. इटालीचे आतांचे सर्व पुढारी तरुण आहेत; इतकेंच नव्हे तर त्यांना धांवणें, उड्या मारणे, नाचणे, पोहणें, डुंबणे किंवा हवेंत उडणें यासारखे खेळ नित्य खेळून आपला तरुणपणा जनतेला पटवून द्यावा लागतो. यासाठीं एका विनोदी पत्रानें इटा-लीच्या लोकसभेची सर्कशीच्या रिंगणाशीं तुलना केली होती !

यावरून कित्येकांची कल्पना अशी होईल की, इटालींतील तरुण अगदीं उच्छृंखल बनलेले असतील. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. इटालींतील तरुणांइतके शिस्तीनें वागणारे व आज्ञा पालन करणारे तरुण क्वचितच आढळतील. यामुळें त्यांच्या पुढाऱ्यांना वायफळ व्याख्यानें देण्यांत व वादविवाद करण्यांत काळ दवडावा लागत नाहीं. ते आपल्या भाषणांतून एखाद्या विशिष्ट प्रश्नाचें विवरण करतात व आपल्या सहकारी मंडळींना

त्यांचें कर्तव्य निश्चित आंखून देतात. 'अमुक बाबतींत आपली अवनति होत आहे, त्या अवनतीवर अमुक उपाय केला पाहिजे, हा उपाय आपल्या स्वाधीनचा आहे आणि इतर अनेक कार्यें आपली वाट पाहात असल्यामुळे जास्तींत जास्त अमुक मुदतींत हे कार्य संपलें पाहिजे, तर मग ताबडतोब कामाला लागा,' असाच ह्या पुढाऱ्यांच्या भाषणांचा सारांश असतो.

इतर देशांतील तरुणांप्रमाणें इटालींतील तरुण नास्तिक बनले नाहींत. लहानपणापासून त्यांना योग्य तऱ्हेचें धर्मशिक्षण दिलें जातें व त्याचा सुपरिणाम त्यांच्या वर्तनांत नेहमीं दिसून येतो. या बाबतींत मुसोलिनीचें मत असें आहे कीं, धर्मनिष्ठेच्या अभावीं कौटुंबिक प्रेम, देशभक्ति, कर्तव्यनिष्ठा पुढाऱ्यांवरील श्रद्धा व त्यांच्या शब्दासाठीं वाटेल तो त्याग करण्याची तयारी वगैरे गुणांचा योग्य परिपोष होत नाहीं. यास्तव त्यानें नुकतांच पोप. बरोबर समेट करून इटालियन तरुणांच्या मनांत कॅथॉलिक पंथाविषयीं जी विरोधबुद्धि दिसून येते तिला आळा घालण्याचा प्रयत्न केला आहे.

इटालियन तरुण धर्माप्रमाणेच कुटुंबाला मान देतात. पूर्वी इटालीमध्यें घटस्फोटाचा कायदा पास करून घेण्यासंबंधीं बरीच चळवळ चालली होती; पण आतां तरुण मंडळींनीं ती चळवळ दडपून टाकली असून घटस्फोटाची तरफदारी करणारा एक शब्द देखील इटालींत हल्लीं ऐकूं येत नाहीं. तेथें अविवाहित मंडळींवर विशेष कर बसविला आहे आणि साताहून अधिक मुलें असणाऱ्या मातापित्यांना कराची सूट, सर्व तऱ्हेच्या सवलती व मान–सन्मान देण्यांत येतात. स्त्रियांना मतदानाचा अधिकार नाहीं व यासंबंधी स्वतः स्त्रियांच्या संस्था देखील चळवळ करीत नाहींत. मग स्त्रियांना इतर कोणतेहि राजकीय हक्क नाहींत हे तर सांगावयाला नकोच. कुटुंब हेंच स्त्रियांचे कर्तव्यक्षेत्र, असेंच इटालियन तरुणांचें मत आहे. आणि कुटुंबाबाहेरच्या व्यवसायांत स्त्रिया पडल्यास त्यायोगानें त्यांच्या प्रजोत्पादनाच्या कर्तव्यांत अडथळा येईल अशी त्यांना भीति वाटते. आणि त्यांची प्रजोत्पादनक्षमता कमी झाल्यास आधुनिक इटाली पूर्वीच्या रोमन साम्राज्याची बरोबरी कशी करणार!

इटालियन तरुणांना लहानपणापासूनच लष्करी शिस्तींत वाढविलें जातें. मुलगा आठ वर्षांचा झाला कीं त्याला बालिला नांवाच्या बॉयस्काउटसारख्या संस्थेंत घालण्यांत येतें. या संस्थेंत सहा वर्षें काढल्यावर त्याचा ॲडव्हान्स गार्डस् या लष्करी पथकांत प्रवेश होतो. या पथकांत चार वर्षें काढल्यावर त्याला साहाय्यक सैन्यांत सामिल करून घेण्यांत येतें. १९२७ च्या अखेरीला बालिलामधील मुलांची संख्या आठ लाखांहून अधिक होती. त्याचप्रमाणें ॲडव्हान्स गार्डसमध्यें सवाचार लाख व साहाय्यक सैन्यांत सवातीन लाख इतके तरुण लष्करी शिक्षण घेत होते. अशा रीतीनें लष्करी शिक्षण घेतलेल्या तरुणांमधूनच एक लाख निवडक तरुणांना दरवर्षी फॅसिस्ट पक्षांत घेतलें जातें. या तरुणांखेरीज इतर कोणालाहि आतां फॅसिस्ट पक्षांत प्रवेश करण्याची संधि मिळत नाहीं. फॅसिस्ट पक्षांतील कोणीहि इसम वारला तर त्याच्या अंत्यविधीला त्या गांवांतील सर्व पथकें जमतात. सर्व मंडळी जमल्यावर त्यांचा पुढारी मृताचें नांव घेऊन पुकारतो. त्याबरोबर सर्व पथकें एका आवाजानें 'हजर' म्हणून उत्तर देतात आणि त्या मृताची उणीव आपण भरून काढण्याची प्रतिज्ञा करतात.

गेल्या महायुद्धाचे वेळीं इटालीला आपलें वैभव वाढविण्याची उत्कृष्ट संधि प्राप्त झाली होती. पण तेव्हांच्या इटालियन मुत्सद्यांना त्या संधीचा योग्य उपयोग करून घेतां आला नाहीं. यासाठीं इटालियन तरुणांचा त्यांच्यावर अतिशय रोष झाला आहे, आणि यापुढें तरी अशी संधि पुनः वांया जाऊं नये म्हणून ते डोळ्यांत तेल घालून जपत आहेत. याच सावधपणामुळे त्यांनीं इटालियन लोकांच्या परदेशगमनावर नियंत्रण घालणारे कायदे पास केले आहेत. उद्योगधंद्याच्या निमित्तानें परदेशीं जाणाऱ्या मंडळींना आपलें कुटुंब स्वदेशीं ठेवूनच परदेशीं जावें लागतें. विशेषतः लहान मुलें व त्यांची माता यांना तर परदेशीं जाण्याला परवानगीच मिळत नाहीं. कायमचा देशत्याग करणाऱ्यांची संख्या कमी व्हावी, यासाठीं करून प्रयत्न करण्यांत येत आहेत. १९२७ सालापेक्षां १९२८ सालांत देशत्याग करणाऱ्यांची संख्या निम्म्यानें कमी झाली.

इटालींतील तरुणांप्रमाणेच हिंदुस्थानांतील तरुणहि भावी महायुद्धाची प्रतीक्षा करीत आहेत. पण ते आपलें शारीरिक, बौद्धिक व नैतिक सामर्थ्य वाढविण्याविषयीं कोणता संघटित प्रयत्न करीत आहेत? इटालींतील तरुण पिढी व फॅसिस्ट सरकार यांचा एकजीव असल्यानें तेथील तरुणांच्या चळवळीस फॅसिस्ट सरकाराकडून प्रोत्साहनच मिळतें. येथें तसें प्रोत्साहन न मिळतां उलट विरोध मात्र होतो. परंतु तेवढ्यामुळे हे प्रयत्न सोडावयाचे किंवा त्यांना भलतीच दिशा लावावयाची काय?

# महाराष्ट्रांतील चार जिल्हे

( ले.—सदाशिव विनायक बापट. )

( लेखांक १ ला )

शके १८५० सालीं 'पुणें सार्वजनिक सभे'तर्फे मी खेडेगांवीं प्रचाराचें काम करीत असतां तेथील लोकांच्या विशेष जरूरीच्या व त्यांस अधिक उपयुक्त तेवढ्याच विषयांवर व्याख्यानें देत असे. पण त्या वेळीं देशांतील राजकीय चळवळ अनपेक्षित रीतीने 'नेहरू रिपोर्टा'च्या पुत्ररत्नास प्रसवल्यामुळें त्याच्या आनंदांत राष्ट्रांतील प्रमुख पुढाऱ्यांनीं सर्व देशभर दौऱ्याच्या हत्तीवरून व्याख्यानाची साखर वांटण्यास सुरवात केली. तें पाहून आपणही शक्त्यनुसार या साखरेची एक एक चिमूट खेडेगांवांतील लोकांस द्यावी असे ठरवून मी तो उद्योग सुरू केला. परंतु दुर्दैव कीं, त्या लोकांस ती आवडेना, मानवेना, फार काय पण कडू औषधाप्रमाणें ती त्यांस वाटूं लागली! 'पुणें सार्वजनिक सभे'स सादर केलेल्या रिपोर्टांत याविषयीं मी म्हटले आहे, "कांहीं लोक तर मला असे स्पष्ट म्हणाले, 'या विषयावरील (नेहरू रिपोर्ट) तुमचें भाषण आम्हास कांहींच कळत नाहीं. हीं शहरीं लेक्चरें आम्हा खेड्याच्या लोकांस कशाला पाहिजेत?' म्हणून हा विषय यापुढें खुद्द तालुक्याच्या गांवीं अद्याप न ऐकलेल्या शेकडो लोकांस प्रथम समजावून द्यावा असें मी ठरविलें. सुदैवानें याच सुमारास लो. टिळक स्मारक ट्रस्ट संस्थेनें एतद्विषयक एक ठराव केला. त्याचा फायदा घेऊन सदर संस्थेचे चिटणीस यांच्या आज्ञेनुसार मी मुख्यतः नेहरू रिपोर्ट या विषयाचा प्रचार तालुक्याच्या मुख्य मुख्य गांवांतून करण्यास आरंभ केला.

अशा रीतीनें फक्त तालुक्यांचे गांवाएवढेच किंवा त्याहून लहान पण इतर दृष्टीनें महत्त्वाचे गांव घेण्याचें मी योजिल्यामुळें मला फक्त चारच जिल्ह्यांत जातां आलें. पुणें, सातारा, सोलापूर व अहमदनगर अशा या चार जिल्ह्यांतील ज्या सुमारें साठ गांवीं मी गेलों होतो तीं गांवें येणेंप्रमाणेः— (पुणें जिल्हा) खेड, जुन्नर, तळेगांव-ढमढेरें, वडगांव, लोणावळें, सासवड, बारामती, इंदापूर, दौंड. (सोलापूर जिल्हा) करमाळें, कुर्डुवाडी, माढें, बार्शी, अकलूज, माळशिरस, पंढरपूर, सांगोलें, सोलापूर. (सातारा जिल्हा) वांई, लिंब, मेढें, श्रीजयरामस्वामींचें वडगांव, विटें, तासगांव, भिलवडी, कोरेगांव, चाफळ, कऱ्हाड, पाटण, कासेगांव, बत्तिसशिराळें, इस्लामपूर, अष्टें, सबनिसवाडी, दहीवडी, म्हसवड, रहिमतपूर, मसूर, उंब्रज, वाळवे. (अहमदनगर जिल्हा) पारनेर, संगमनेर, अकोलें, शेवगांव, नेवासें, कोपरगांव, खर्डे, जामखेड, कर्जत, श्रीगोंदें, पाथर्डी, अहमदनगर, बेलापूर, राहुरी वगैरे.

वरील चार जिल्ह्यांत एकंदर छत्तीस तालुके आहेत. छत्तीस तालुक्यांच्या या छत्तीस गांवीं व त्याशिवाय सुमारें पंचवीस गांवीं मी गेलों होतों.

या बहुतेक सर्व गांवीं व्याख्यानें कमींत कमी दोनशें व जास्तीत जास्त सुमारें दोन-अडीच हजार श्रोत्यांपुढें होत. पण अजीबात व्याख्यान झालें नाहीं अशीं फक्त दोनच गांवें. तीं म्हणजे पुणें जिल्ह्यांतील सासवड व बारामती हीं होत.

### लोकस्थितीचे चार प्रकार

सार्वजनिक बाबतींत वरील जिल्ह्यांत साधारणपणें चार प्रकारची लोकस्थिति दिसून आली—(१) कांहीं ठिकाणीं विशेष उत्साह व जागृति तर (२) कांहीं ठिकाणीं सर्वस्वी गारठा (३) कोठें थोडीबहुत जागृति पण पराकाष्ठेचें औदासीन्य व ताटस्थ्य तर (४) कांहीं ठिकाणीं बेपर्वाई किंबहुना विरोध. पहिल्या प्रकारच्या गांवीं सभा सहज व बऱ्याच मोठ्या प्रमाणावर भरत. आजूबाजूच्या गांवांचेहि लोक येथें बोलावण्यांत येत, आणि श्रोतृवृंदहि जाणता असे. अशा ठिकाणीं नेहरू रिपोर्ट या व्याख्यानविषयाचें सशास्त्र व सोपपत्तिक प्रतिपादन सहजच होत असे. पण दुसऱ्या प्रकारच्या गांवीं सभा भरविणेंच अगोदर फार कष्टप्रद होई, म्हणून अशा ठिकाणीं कुस्त्यांचे फड, बाजाराच्या जागा, भजनांचे अड्डे व जाहीर भंडाऱ्यांच्या जागा हींच व्याख्यानांचीं स्थळें ठरवावीं लागत. पण अशा ठिकाणीं स्वस्थपणानें व्याख्यान देणें व ऐकणें सर्वस्वी गैरसोयीचें होई. पण नाइलाज म्हणून तसे करावें लागे. या ठिकाणीं व्याख्यानाचा प्रस्तुत विषय सर्वांस अगदींच अपरिचित व नवा असल्यामुळें त्याची मांडणीहि कांहीं निराळ्याच रीतीनें करावी लागे. तथापि विषय कितीहि सोपा करून तो फुलवून व खुलवून सांगण्याचा प्रयत्न केला तरी तो त्यांस किचकट, दुर्बोध व भानगडीचा वाटे. केवळ भावना उद्दीपित करणाऱ्याच गोष्टी सांगावयाच्या किंवा निवळ पुराणी गप्पाच मारावयाच्या तर तें श्रोत्यांस व वक्त्यांसहि सोपें व सुखाचें आहे. पण राज्य-घटनेच्या गुंतागुंतीच्या अवघड विषयाची समजूत पाडणें व ती पाडून घेणें जरा जिकिरीचेंच काम

वाटे. पण लोकांनीं तरी काय करावें? सर्वच लोक वर्तमानपत्रें वाचतात असें नाहीं. हिंदुस्थानांत अगोदर शेकडा आठ लोक साक्षर, त्यांत वर्तमानपत्रें वाचणाऱ्यांचें प्रमाण शेंकडा तर राहूं द्याच, पण तें हजारांतहि एक पडत नाहीं.

### दहा वर्षांत व्याख्यान नाहीं !

अशा स्थितींत सर्वांस हा विषय कळावा कसा? व्याख्यान वगैरेच्याद्वारें लोकांस या विषयाची माहिती दिली तर ती त्यांना न कळण्याइतके ते झुलू किंवा हॉटेन्टॉट लोकांसारखे बुद्धीनें खास मद्दड नाहींत. निदान महाराष्ट्रीय जनता, ती निरक्षर असली तरी, राजकीय कल्पना ग्रहण करण्यास खास समर्थ आहे. पण तिला हें शिक्षण मिळतें आहे कोठें? एका तालुक्याच्या गांवीं माझें व्याख्यान झाल्यावर लोक मला म्हणाले, "गेल्या दहा वर्षांत येथें सभा नाहीं कीं व्याख्यान नाहीं. दहा वर्षांनंतर आज तुमचें हे येथे पहिलेंच व्याख्यान होत आहे!"

दुसऱ्या एका तालुक्याच्या गांवीं तेथील मंडळींनीं जवळच्या गांवची मंडळी व्याख्यानास बोलावली होती. त्यापैकीं एक गृहस्थ व्याख्यानाचे जागीं येऊन बसले. पण त्यांची चित्तवृत्ति बावरल्यासारखी दिसत होती. माझें अर्धा-अधिक तास व्याख्यान झाल्यावर ते मध्येंच उठून म्हणाले, "इतका वेळ मस्त तुमचें बोलणें आम्ही ऐकलें. आतां कांहीं देवादिकांच्या—रामकृष्णाच्या—गोष्टी सांगाल कीं नाहीं? नाहीं तर लवकर एकदांचें आख्यान तरी लावा! नाहीं तुमच्याजवळ विणा, नाहीं झांज, नाहीं पखवाज. कसचे तुम्ही आख्यान लावणार?" हे ऐकून मी जरा गांधळून गेलों. पण पुढें समजलें कीं, 'व्याख्यानास' ते 'आख्यान' समजून मी कथा करणार आहें या कल्पनेनें ते आले होते! तेव्हां येथें माझ्या नेहरू रिपोर्टाच्या आख्यानानें त्या बिचाऱ्याचें कसें समाधान व्हावें?

हें सर्व वर्णन वर लिहिलेल्या दुसऱ्या प्रकारच्या लोकस्थितीचें झालें. आतां तिसरा वर्ग म्हणजे अर्धवट जागृत, पण पराकाष्ठेचा उदासीन व तटस्थ याविषयीं लिहितो. तालुक्याच्या गांवीं थोडेबहुत वकील असतातच. अनन्यगतिकत्वामुळें समाजाचा या वर्गाशीं नित्यसंबंध येत असतो. यामुळे त्यांचें त्यावर वजन असणे स्वाभाविक आहे; पण या वजनाचा फायदा शेंकडा किती वकील सार्वजनिक कामास देत असतील हें त्यांचें त्यांसच ठाऊक!

श्रीयुत तात्यासाहेब केळकर यांनीं नेहरू रिपोर्टाचें मराठींत रूपांतर करून त्या पुस्तकाच्या ३५००० प्रती छापल्या व महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस-कमिटीमार्फत प्रत्येक तालुक्याचे गांवीं लोकांस फुकट वांटण्याकरितां त्याच्या शेंकडो प्रती पाठविल्या. पण दुःखाची गोष्ट ही कीं, कांहीं ठिकाणच्या वकिलांच्या घरीं ते गठ्ठे सांदींत पडून त्यांस बांधलेल्या दोऱ्याहि तुटल्या नव्हत्या असें पाहाण्यांत आलें! अखेर माझ्या व्याख्यानाचे वेळीं त्यांस बंधमुक्त करून सर्वांस त्यांचा फायदा देतां आला!

### नेहरू रिपोर्टांत ब्राह्मणी गादी !

आतां शेवटचा वर्ग म्हणजे बेपर्वा व विरोधी लोकांचा. पण वरच्यासारख्या सहानुभूति बाळगणाऱ्या स्वकीयांची जेथें अशी स्थिति तेथें येन केन प्रकारेण खुसपट काढून विरोध करण्याचें कंकण बांधणाऱ्याविषयीं तक्रार करण्यांत काय अर्थ आहे? हा विरोध क्वचित् स्थळीं नेमस्तांकडूनहि झाला; पण मुख्यतः तो कांहीं ब्राह्मणेतर सत्यशोधकांकडून करण्यांत आला. कांहीं ठिकाणीं खासगी बैठकींत, तर कांहीं ठिकाणीं जाहीर सभेंत या विरोधकांनीं पाठपुरावा करण्याचा प्रयत्न केला. खाजगी चर्चा बरीच मनमोकळेपणानें व खालच्याच सुरांत होई. पण जाहीर सभेंतील विरोधी भाषणें रणांगणावरील सेनापतींच्या भाषणासहि लाजवीत! एका सभेंत हजार पंधराशे लोकांपुढें एका गृहस्थानें असें धडधडीत सांगितलें कीं, "हा नेहरू रिपोर्ट केवळ ब्राह्मण जातीच्या कल्याणाकरितां आहे. ब्राह्मणासच राज्यपद मिळावें असें या रिपोर्टांत म्हटले आहे! हा रिपोर्ट पास झाल्यास पुण्यास पुनः ब्राह्मणी गादी स्थापन होणार, त्यावर केळकर परांजपे बसणार आहेत वगैरे वगैरे!" अशा प्रकारच्या असत्य व ज्यास ताळ ना तंत्र अशा शेकडो भयंकर विषारी गोष्टी अत्यंत ग्राम्य भाषेंत सांगून लोकांचीं मनें कलुषित करण्यांत येत. पण त्या सर्व आक्षेपांस उत्तर देणें सभ्य मनुष्यास परवडणार नाहीं. वरील सभेंत मी फक्त नेहरू रिपोर्टाच्या आक्षेपापुरतेंच (रिपोर्टाची प्रत हातांत घेऊन) बोललों कीं, "जो कोणी या रिपोर्टांत वरील शब्द दाखवून देईल त्यास मी हजार रुपयांचें बक्षीस देईन. पण जर कोणी तसें दाखवून देण्यास पुढें न येईल, तर—" इतके म्हणतांक्षणींच सभेंत दंगा होऊन प्रकरण हातघाईवर आलें, व सभा उधळली गेली. इतर कांहीं ठिकाणीं अजीबात सभाच होऊं न देण्याबद्दल प्रयत्न करण्यांत आले; पण ते गांवांतील लोकांच्या जुटीमुळें विफल झाले.

### मतामतांचा गलबला

येणेंप्रमाणें सार्वजनिक बाबतींत चार जिल्ह्यांतील चार प्रकारच्या लोकांच्या मानसिक स्थितीचें थोडक्यांत वर्णन झालें. आतां नेहरू रिपोर्टासंबंधानें एकांतिक मताचा पण परस्परविरुद्ध दिशेचा एक वर्ग आढळला. त्याचें म्हणणें सांगतों. यांपैकीं एका मताच्या लोकांचें म्हणणें असें आहे कीं,

"कसला हा भीकमाग्या स्वराज्यमागणीचा 'नेहरू रिपोर्ट' तुम्ही उराशीं घेऊन बसलां आहां ! भिक्षांदेहीनें कोठें राज्यें मिळालीं आहेत ? राज्य मिळविण्याचे मार्ग फार न्यारे आहेत. कृपा करा आणि हें भीक मागण्याचें वळण लोकांना लावूं नका !" नेहरू रिपोर्टांतील योजनेशिवाय दुसरें एक अक्षरहि तुम्ही व्याख्यानांत बोलूं नका असें क्वचित कोठें सांगण्यांत येई,तर 'सदर योजनेसंबंधीं आम्हास कांहीं कळणार नाहीं, त्या खोल पाण्यांत आम्हास नेऊं नका, वरवरच चार सोप्या गोष्टी सांगा ' असेंच पुष्कळांकडून व्याख्यानापूर्वी मला सुचविण्यांत येई. कांहीं ठिकाणीं फक्त 'खादी व महात्मा गांधींची चळवळ' या विषयावर तुम्ही बोला असें लोक सांगत, तर कांहीं ठिकाणीं ' लो. टिळकांचे राजकारण ' हाच व्याख्यानास विषय घ्या असें लोक म्हणत. ब्राह्मणांनीं यापुढे राजकारणांत पडूं नये असें आतां तुमच्या व्याख्यानाचें धोरण असूं द्या असें सद्बुद्धीनें कांहीं सजातीय सुचवीत, तर मत्स्योदकाप्रमाणें ब्राह्मण व राजकारण यांचा संबंध असल्यामुळें तो निरपवाद टिकविण्याविषयींचें विवेचन करण्याविषयीं कांहीं आग्रह करीत. "धर्माशिवाय सर्व फुकट आहे, म्हणून प्रथम ' हिंदु संघटन' यासारख्या विषयाचाच तुम्ही प्रचार करा"असें कांहीं म्हणत, तर "स्वराज्याशिवाय अक्षरहि बोलूं नका" असे कांहीं आग्रहानें सांगत. कांहीं ब्राह्मणेतरांना हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य असण्यांतच देशाचा फायदा आहे या कल्पनेनें सध्या घेरलें असल्यामुळें स्वराज्य या विषयावर तुम्ही बोलतां कामा नये अशीहि एके ठिकाणीं मला तंबी मिळाली ! तात्पर्य, मतामतांचा गलबला। कोणी पुसेना कोणाला। जो जे मतीं सांपडला । तयास तेंचि श्रेष्ठ ॥ अशी आपल्या समाजाची हल्लीं स्थिति झाली आहे. म्हणून श्रीसमर्थ म्हणतात, हे जाणोनिया जीवें । जनीं वाद करणें त्यागावें ॥ नाहीं तरी लागेल शिणावें । व्यर्थ बापा ॥ याप्रमाणे वागण्याचें धोरण मी ठेविलें होतें.

वर दिलेलीं नाना मतें व एकंदर लोकस्थिति लक्षांत घेऊन मी व्याख्यानांचा पूर्वरंग नेहरू रिपोर्टाच्या आधारें करी व उत्तररंग त्या रिपोर्टांत ठरविलेलें साध्य साधण्याकरितां साधनीभूत असणाऱ्या अनेक गोष्टींच्या निरूपणानें करी.उदाहरणार्थ, बार्डोलीची चळवळ, धारावाढनिषेध, स्वदेशी, बहिष्कार, खादीचें माहात्म्य, अस्पृश्यतानिवारण वगैरे. आरतीच्या पूर्वी समर्थ सांप्रदायी हरिदास जशी श्रीसमर्थांची गोष्ट सांगतात त्याप्रमाणें माझ्या व्याख्यानाचे शेवटीं गोरक्षण व तें सिद्ध होण्यास मध्यवर्ती गोवर्धननिधीस मदत करण्याची आवश्यकता या संबधानें मी विनंति करीं. शेवटीं आरतीदाखल ज्या संस्थेतर्फे मी प्रचारकार्य करीत आहे त्या संस्थेची लोकांस फारशी माहिती नसल्याचें दिसून आल्यावरून ती संपूर्ण निवेदन करून मी व्याख्यान संपवीत असें.

### मुंबई कौन्सिल ब्राह्मणेतर पार्टीसाठीं

# महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांचा बळी

**रा. केसरीकर्ते यांस—**

वि.वि. गेल्या ता.१३-७-२९ रोजी पुण्यास सरदार वल्लभभाई पटेल यांचे नेतृत्वाखालीं मुंबई इलाखा शेतकरी संघ स्थापन झाला. हे पाहातांच शेतकऱ्यांच्या हिताचे ढोंग करून शेतकऱ्यांच्या मतावर गलेलठ्ठ बनलेल्या मुंबई ब्राह्मणेतर पार्टीचे पोटांत कळ उठून त्यांचा तडफडाट झाला आहे. या ब्राह्मणेतर पार्टीला शेतकऱ्यांचे वाटोळे झालें तरी चालेल पण ब्राह्मणांकडून शेतकऱ्यांचे हित झाले तर त्यांना पाहावत नाहीं. कारण मग यांचा बोज शेतकऱ्यांवर कसा राहाणार ? ब्राह्मणांना शिव्या देऊनच ज्यांनीं आपलें महत्त्व वाढविले त्यांचें महत्त्व तरी कसें टिकणार ? "पोर होईना व सवत साहीना" अशी या ब्राह्मणेतर पार्टीची स्थिति झाली आहे. आजपर्यंत ब्राह्मणांना शिव्या देऊनच यांनीं आपला लब्धप्रतिष्ठितपणा मिरविला व शेतकऱ्यांना झुलविलें; पण आतां सरकाराशीं गांठ पडतांच आपले कातडे बचवून, सांदींत तोंडे खुपसलीं ! बागलाण मालेगांव तालुक्यांतील चळवळीस थोडें यश येतांच वाटेल त्याच्यावर ते भूंकूं लागले आहेत. सरदार वल्लभभाई पटेल यांनीं शेतकऱ्यांचे हित करून दाखविलें आहे. तसें या मुंबई कौन्सिल ब्राह्मणेतर पार्टीतील एकानें तरी शेतकऱ्यांचें हित करून दाखविले आहे काय ?

मुंबई कौन्सिल ब्राह्मणेतर पार्टीचे मुख्य मेरुमणी भास्करराव शेतकऱ्यांचे मतावर नामदार झाले. त्या उपकाराची फेड, सरकारचे नामदार पण शेतकऱ्याचे ना—मदार होऊन त्यांचे डोक्यावर जंगलचराईचा दुप्पट बोजा लादून त्यांनीं केली. हीच का शेतकऱ्यांची कळकळ व असेंच का हे शेतकऱ्यांचे

हित करणार ! सोन्याची सुरी झाली म्हणून उरीं मारून घेतल्यास ती प्राणनाश केल्याखेरीज थोडीच राहणार ! तसेंच हे आपल्या जातीचे असले तरी जोंपर्यंत हे सरकारचा पगार खाणार तोंपर्यंत पगार-वाल्या सरकारचे हिताकरितां शेतकऱ्यांचा बळी पडला तरी तिकडे न पाहतां आपला चार हजारी तनखा सांभाळणार. हें म ओळखतां आपण मात्र त्यांना आपले आपले म्हणून नाचतों व त्यांना निवडून देतों. हा आपलाच मूर्खपणा नव्हे काय ?

मानपत्राकरितां हपापून जे जाधवराव थोड्याच दिवसांपूर्वी नाशिकास धावून आले, त्यांना अवघ्या दीड-दोन तासांच्या रस्त्यावर बागलाणास अगर मालेगांवास येऊन तेथील शेतकऱ्यांना भेट द्यावयास सवड झाली नाहीं. कारण त्या वेळी सारावाढीची चळवळ जोरांत होती, व रा. जाधवरावांचे पोशिंदे जें सरकार त्या सरकारचें या बाबतींत धोरण ठरलेलें नव्हतें. अशा वेळीं सरकारचे नेत्रकटाक्षावर अवलंबून राहणारे बिचारे भास्करराव जाधव शेतकऱ्यांस काय सांगणार ! नाशिकास तरी त्यांनीं काय दिवे लावले? गुरुचरण-फी कमी करण्याची बात न बोलतां आतां नवीन वाढविलेल्या फीच्या दुप्पट फी शेतकऱ्यांनीं भरली तरी शेतकऱ्यांचा फायदाच आहे असें शेतकऱ्यांस सांगावयास ज्याला दिक्कत वाटली नाहीं तो इसम वाढलेला शेतसारा द्यावा हेंच सांगणार. ब्राह्मणांना शिव्या देणारी जीभ सरकारापुढे मलूल पडते. मते मिळवावयास हिंडण्यांत त्यांचा स्वार्थ आहे, तसा कांहीं शेतसारावाढींत नाहीं.

ही स्थिति मुंबई कौन्सिल ब्राह्मणेतर पार्टीचे अध्वर्यूंची झाली. बाकीचे ब्राह्मणेतर पार्टीचे कौन्सिल मेंबर रा. वंडेकर, रा. नवले, रा. डोंगरसिंग पाटील,रा. लिगाडे वगैरे यांच्या कृतीकडे पाहिल्यास यांचे जिल्ह्यांत सरकारनें सारावाढ केली तेव्हां यांपैकीं एकाहि आमदारानें सारावाढीविरुद्ध तोंड उघडले नाहीं. हे सर्व ब्राह्मणांना शिव्या देण्यांतच दंग झाले होते ! सारावाढीविरुद्ध 'ब्र'हि उच्चारण्याचें जेथें धैर्य नाहीं तेथें सरदार वल्लभभाई पटेलप्रमाणें यांनीं शेतकऱ्यांकरितां लढावें कसें? 'उत्तर बाळ बायकांतच बडबड करणारा,' तसे हे ब्राह्मणाला शिव्या देण्यांत धन्यता मानणारे नादान. या नादानांनीं महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांस सरदार वल्लभभाईचे नादीं लागूं नका असा उपदेश करूं नये तर काय करावें ?

भटशाहीचे नांवानें शंख करून यांनीं गोरी भटशाही पुष्ट केली आहे, व ब्राह्मण भटाचे जागीं क्षात्र भटजी उत्पन्न करून ते शेतकऱ्यांचे बोकांडी बसविले आहेत. ब्राह्मणेतर पार्टी जिवंत ठेवावी म्हणून हे आज महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांचा बळी द्यावयास तयार झाले आहेत. याचा शेतकऱ्यांनीं विचार करावा व यापुढें अशा वावदूक लोकांना कोठेंहि निवडून न देतां खऱ्या शेतकऱ्यासच निवडून द्यावें.

आपला

**माधवराव खंडेराव पवार,**

सडक सौंदाणें.

# शारीरिक शिक्षण कमिटी

## अहवालाचा सारांश

मुंबई इलाख्यांतील प्राथमिक व दुय्यम शाळांतून शारीरिक शिक्षण कसें द्यावें या संबंधानें चौकशी करण्यासाठीं मुंबई-सरकारनें आक्टोबर १९२७ मध्यें एक कमिटी श्री. के. एम्. मुनशी यांच्या अध्यक्षतेखालीं नेमिली होती. सदर कमिटींत मि. हॅम्ले, श्री. ल. ब. भोपटकर, डॉ. मेहता, मिस मोतीवाला, खा. ब. भुतो, पुराणी, श्री. गुणे, जयरामदास, जगताप, प्रि. कानिटकर, हे सभासद होते. कमिटीच्या २५ सभा झाल्या व कमिटीकडे १३० इसमांकडून कैफियती आल्या व कमिटीनें ६३ जणांच्या साक्षी घेतल्या. कमिटीनें एकंदर चौकशी करून पुढील निष्कर्ष काढला आहे:—

(१) सध्या हायस्कूलमधून जें शारीरिक शिक्षण दिले जातें तें अपुरें असून सर्वांना मिळत नाहीं.

(२) उत्तर-भाग व मध्यभागांतील कांहीं ठिकाणीं सरकारनें या बाबतींत अल्पसा प्रयत्न केला. परतु इतरत्र सरकारनें कांहींच प्रयत्न केला नाहीं.

(३) विद्यार्थ्यांची वैद्यकतपासणी म्हणण्यासारखी कोठेंच होत नाहीं. व त्याची नोंदहि समाधानकारक नाहीं.

(४) पाश्चात्य धर्तीच्या व्यायामशाळा काढून त्यांतून शारीरिक शिक्षण देण्याचा उपक्रम करण्याला वाव फार थोडा आहे. पाश्चात्य व्यायामसामुग्री फार खर्चाची असल्यानें तिच्या आधारें शारीरिक शिक्षण सक्तीचें करणे योग्य होणार नाहीं.

(५) देशी व्यायामपद्धतच लोकप्रिय होऊं लागली आहे, व इलाख्यांत अनेक अशा संस्था आहेत कीं,तीं शारीरिक शिक्षणाचीं केंद्रें करतां येतील.

(६) हल्लींचें शारीरिक शिक्षण सर्वस्वी स्वदेशी असलें तरी त्यांत पाश्चात्य पद्धतींतील चांगल्या पद्धतींचा समावेश केला असल्यानें त्या धर्तीवर लागू पडेल असा अभ्यासक्रम आंखतां येईल.

(७) देशी पद्धतीनें खर्चहि फार लागणार नाहीं.

कमिटीच्या मतें शारीरिक शिक्षण सुरू करण्यांत थोड्याफार अडचणी आहेत त्या अशाः—शारीरिक शिक्षणाचें यथार्थ ज्ञान नसणें; त्यासंबंधानें योग्य प्रयत्न न होणें; उत्तम शिक्षक न मिळणें; इलाख्यांतील कांहीं लोकांच्या गैरसमजुती; शारीरिक शिक्षणासंबंधानें लोकमत तयार नसणें; शारीरिक शिक्षणाची वाढ करण्याला प्रचलित शिक्षणपद्धति अनुकूल नसणें; लोकाचें दारिद्र्य; व या कामावर खर्च करण्यासाठीं सरकाराजवळ द्रव्य नसणें.

परंतु अशी स्थिति असतांहि कमिटीच्या मतानें सरकारनें पुढील गोष्टी केल्या पाहिजेत.—

शिक्षणखात्यांतीलच एक भाग म्हणून शारीरिक शिक्षणखातें काढावें. या नव्या खात्याची संघटना करण्यासाठीं शारीरिक शिक्षणाचा एक डायरेक्टर नेमावा. डायरेक्टरच्या कामाला लायक होण्यासाठीं एक पदवीधर इंग्लंडांत अगर अमेरिकेंत दोन वर्षेपर्यंत तेथील शारीरिक शिक्षणसंस्थांचा अभ्यास करण्यासाठीं पाठवावा. या डायरेक्टराची इलाख्याची मुख्य कचेरी मुंबईस असावी. यासाठीं एक मध्यवर्ती बोर्ड स्थापन करावा. त्यांत एक विद्याखात्याचा डायरेक्टर व शारीरिक शिक्षण देणाऱ्या शिक्षकांना मान्यतापत्रें देणाऱ्या सरकारमान्य अशा पांच ट्रेनिंग शाळांमधील प्रत्येकीं एकप्रमाणें पांच सभासद; दोन सभासद कायदे–मंडळांतील; एक सभासद युनिव्हर्सिटी सिंडिकेटचा; शिक्षणमंत्र्यानें नेमलेले तीन सभासद; शारीरिक शिक्षण खात्याची डायरेक्ट्रेस व डायरेक्टर असे १४ सभासद असावेत. या बोर्डानें पुढील कामें करावींतः—

(१) शारीरिक शिक्षणाबाबत शिक्षणमंत्र्यानें कोणतें धोरण स्वीकारावें याबद्दल सूचना; (२) शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रम तयार करणें; (३) शारीरिक शिक्षणोपयोगी वाङ्मय तयार करणें; (४) शाळांच्या कार्यक्रमाबद्दल, आरोग्याबद्दल, वैद्यकीय तपासणी व त्याची नोंद,शारीरिक शिक्षण, व खात्याशीं संबंध येणाऱ्या इतर कामासंबंधीं नियम करणें; (५) शारीरिक शिक्षणाचा प्रतिवार्षिक रिपोर्ट तयार करणें; (५) व वेळोवेळीं गरजेप्रमाणें सूचना करणें.

शिक्षणखात्याच्या प्रत्येक विभागासाठीं एक डे. डायरेक्टर नेमावा व जिल्ह्यासाठी एक सुपरव्हायझर असावा. या खात्यामार्फत सुटणारे हुकूम शाळेच्या हेडमास्तरानें पाळले पाहिजेत, व सुपरव्हायझरला तो मागेल ती माहिती पुरविली पाहिजे.

पौष्टिक अन्नाचा प्रश्न फार महत्त्वाचा आहे. या संबंधांत कमिटीची अशी शिफारस आहे कीं,मुलांच्या प्रकृतीबद्दल त्यांच्या पालकांस वरचेवर कळवावें. मुलांना चांगलें अन्न व चांगल्या संवयींचें महत्त्व पटवून द्यावें; शाळांच्या आसपास खाद्य पदार्थ विकण्यास कायद्यानें मनाई करावी. मुलांना खेळण्यासाठीं प्रत्येक शाळेला एक मैदान असावें; तसे नच जमल्यास अनेक शाळांसाठीं एक तरी असावें; गांवांत एखादी शारीरिक शिक्षण–संस्था असल्यास तिच्याशीं सहकार्य करावें; देशी आखाडे काढावेत; ज्या शाळा शारीरिक शिक्षणाची सोय करतील त्यांनाच मान्यता द्यावी; रेल्वे कंपन्यांनीं वर्षांतून एकदां तरी नाममात्र भाडें घेऊन विद्यार्थ्यांच्या सहलींना मदत करावी;शाळेंतील विद्यार्थ्यांना वर्षांतून निदान दोनदां तरी आपल्या गांवाबाहेर वनविहारास नेलें पाहिजे.

या सर्व कामांसाठीं तज्ज्ञ लोक पाहिजेत. त्याबद्दल कमिटीच्या सूचना अशाः—प्रत्येक विभागांत कमींत कमी तीन तरी सेंट्रल रेकग्नाइज्ड फिजिकल ट्रेनिंग शाळा असाव्या व त्यांना सरकारनें मदत करावी. शारीरिक शिक्षण देण्याच्या इतर संस्थांनाहि सरकारनें मदत द्यावी.

मुलींनाहि शारीरिक शिक्षणाची अत्यावश्यकता आहे. यासाठीं एक हिंदी डायरेक्ट्रेस असावी. तिच्या हाताखालीं दरविभागासाठीं एक याप्रमाणें स्त्री-सुपरव्हायझर्स असाव्यात.

४७३००० रु. खर्च येईल

---

# विद्याधनाच्या कायद्याची सुधारणा

( ले.—काशीनाथ नरसिंह केळकर, ॲडव्होकेट. )

( ले. २ रा )

**कांहीं आक्षेपांस उत्तर**

'विद्याधना' संबंधीं (Gain of Science) कायदा असावयाचाच तर तो मूळ मनुस्मृतींतल्याप्रमाणें असावा, अगर अलीकडे जयकर यांनीं जें बिल आणलें आहे तसा निश्चितार्थक पाहिजे. पण सध्याची कायद्याची अनिश्चित स्थिति पाहिली म्हणजे आपण केवळ धुक्यांत उभे आहों असें वाटतें. अगर स्केटिंग रिंगच्या खेळाची आठवण होते! ठामपणें जरा पावलावर जोर द्यावा तो घसरगुंडी सुरू होते व तोल जातो. स्मृतिवाक्यांच्या शब्दांचा छल करून शेवटीं तारतम्यानें निकाल देत असतांना इंग्रजी न्यायाधीशांना याचा चांगलाच प्रत्यय आला आहे !

***

विद्याधनासंबंधीं मनु—याज्ञवल्क्यांची कल्पना काय होती, हें मागील लेखांत सांगितलेंच. पण ज्या इतर स्मृतिकारांनीं ते मूळ हेतू सोडून विद्याधन हें समाईक व एकत्र कुटुंबाचे ठरविलें, त्यांना वाटूं लागलें कीं, आपण केलें खरें, पण तें थोडेसें चूकच झालें! कारण तपाशिलांत शिरावयाचें तर 'सब घोडे बारा टक्के' असा न्याय करणें हास्यास्पद होईल. व असा निर्णय तरी कोण मान्य करील ? म्हणून विद्याधनाचे दोन भाग कल्पून 'विशेष विद्या' व 'सामान्य विद्या' असे दोन भेद करण्यांत आले.

***

इंग्रजी पंडित ऊर्फ न्यायाधीश तर बोलूनचालून परके. तुमच्या शास्त्रांत असेल तसा ते न्याय देणार. त्यांनींहि 'सामान्य विद्या' म्हणजे Ordinary or general education आणि 'विशेषविद्या' म्हणजे Special training of any profession अशीच वर्गवारी केली. पितृद्रव्याविरोधेन म्हणजे "एकत्र कुटुंबाच्या समाईक मिळकतीची मदत न घेतां" असा अर्थ आहे हें त्यांना सांगण्याचें कारणच नव्हतें. कारण मिताक्षरेंतच तसें सांगितलें आहे. अलीकडची एकत्र हिंदु कुटुंबाची कल्पनाच अशी आहे कीं, बापाला वडिलार्जित संपत्तींत मुलापेक्षां अधिक हक्क नाहींत. मुलगा जन्माला येण्याचा अवकाश. तो बापासारखाच या मिळकतीचा समाईक हक्कदार व वारस बनतो. पण जयकरांनीं म्हटल्याप्रमाणें 'स्पेशल ट्रेनिंग' ह्मणजे काय व 'जनरल एजुकेशन' म्हणजे काय याची मर्यादा ठरविणें अवघड आहे. व न्यायाधीशांनाहि अनुभवांतीं असेंच आढळून आलें. ( लॉ-रिपोर्ट ६ बॉंबे २२५ पाहा ) Equity varies as the chanceller's foot म्हणजे "पाय लहान मोठा, तसा न्याय खरा खोटा" असें होऊं लागलें ! कायदा अनिश्चित, तर कायदा करावयाचा कशाला ?

***

'आवश्यक' 'सामान्य' किंवा 'बेताचें' शिक्षण कोणतें हें कोण कसें ठरविणार ? कारण कालाच्या ओघाप्रमाणें व शिक्षणाच्या प्रसारामुळें एका वेळीं उच्च गणण्यांत येणारें (स्पेशल ट्रेनिंग) शिक्षण हें उद्यां सामान्य कोटींतच जाईल. आजच्या बी. ए. झालेल्या वर्गाची शोचनीय स्थिति पाहिली म्हणजे याचा उलगडा होईल. 'पितृद्रव्याविरोधेन' याचाहि अर्थ असाच तारतम्याने व विवेकानें केला पाहिजे. कारण आयुष्यांत लहानपणीं अगर केव्हां तरी, माणसानें आपल्या एकत्र कुटुंबाची कांहीं तरी मदत घेतलेली आढळून येणारच! दायभागाचा कर्ता जीमूतवाहन यानें असें मार्मिकपणानें म्हटलें आहे कीं, असला कांटेकोर सासूपणा तुम्ही कराल तर अनवस्था होईल! कारण प्रत्येक मनुष्य एकत्र कुटुंबांत जन्माला येतो व आपल्या आईचें स्तनपान करूनच वाढतो. त्याशिवाय त्याला गत्यंतर नसतें. म्हणून एकत्र कुटुंबांतूनच याचें पालनपोषण झालें आहे असें ठरवून तुम्ही त्याची स्वतंत्र मिळकत उद्यां जप्त करूं लागाल तर जगांत स्वतंत्र मिळकतच कोणाची उरावयास नको !

***

कोर्टाचे निकाल तरी कसे चमत्कारिक आहेत पाहा. बी. ए. होणें हें सामान्य शिक्षण, पण मुलगा मॅट्रिक्युलेट होऊन वकील झाला कीं, तें स्पेशल ट्रेनिंग झालें व त्याची मिळकत समाईक ठरतें ! (७ मद्रास ४७.) विलायतची यात्रा करून आय. सी. एस. अगर बॅरिस्टर होणारांची मिळकत समाईक मानली तर क्षणभर कदाचित् तें रास्त म्हणतां येईल ( गोकुळचंद-केस ). कारण बापाला चांगली झीज सोसूनच या खर्चाला तोंड द्यावें लागतें. पण विलायतेला पाठविलेल्या मुलांपैकीं एक पास झाला, व नापास झालेल्या दुसऱ्या चिरंजिवांनीं इतर व्यापार-

धंद्यांत नांव काढून पैसा केला तर त्याची मात्र इस्टेट स्वतंत्र मालकीची होते! (४ मद्रास.) एका नायकिणीचा खटला तर याहून गमतीदार आहे. या नायकिणीनें गाण्यानाचण्याच्या कलेवर अलोट संपत्ति केली. त्याबरोबर तिच्या दत्तक आईनें तिच्यावर वांटणीची फिर्याद केली व सांगितलें कीं, आपण तिला या कलेचें स्पेशल ट्रेनिंग दिलें त्यामुळेंच तिला ही संपत्ति मिळवितां आली. व कोर्टानें मुलीविरुद्ध म्हणजे आईसारखाच निकाल दिला! (चलाकांडा वि. रत्नचलम् २ मद्रास.) यावर मेन या ग्रंथकारानें अशी थोडी थट्टा केली आहे कीं, "खरेंच! गाण्या-नाचण्यापेक्षां तिनें राजरोस वेश्येचाच धंदा केला असता तर अधिक बरें नसतें झालें? बिचारीच्या कपाळीं आपल्या स्वकष्टार्जित मिळकतीला मुकण्याची पाळी तरी आली नसती!"

***

पण इतका सगळा गोंधळ कायद्यांत ठेवण्यापेक्षां तो बदलून विद्याधन हें ज्याच्या त्याच्या स्वतंत्र मालकीचें म्हणून ठरविलेलें काय वाईट? पैशाच्या मदतीशिवाय विद्या शिकतां येत नाहीं हे खरें. पण बुद्धि नसेल तर, कितीहि पैसा ओतला तरी तें फुकटच! भौतिक जगाच्या व्यापारी बाजारकट्ट्यावर ज्ञानाची किंमत इतकी कमी लेखली जावी कीं, त्याला स्वतंत्र अस्तित्वच असूं नये, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय.

***

जयकरांच्या बिलाप्रमाणें आय. सी. एस. चें शिक्षण व त्यायोगें मिळालेलें धन हें मुद्दां समाईक ठरणार नाहीं हे खरें. पण सर्व कुटुंबाचें पालनपोषण व्हावें एवढ्या एकाच हेतूनें प्रेरित होऊन बापानें एका मुलाच्याच उच्च शिक्षणावर प्रमाणाबाहेर खर्च केला असेल तर, आपसांत लेखी करार करवून या गोष्टीला तोड काढतां येईल. व याकरितां This act does not apply to any express agreement in writing to the contrary असा अपवाद किंवा दुरुस्ती जयकरांनाहि आपल्या बिलांत करतां येण्यासारखी आहे. मुख्य मुद्दा इतकाच आहे कीं 'विद्याधना'च्या बाबतींत कायद्याचें जें प्रमेय आहे कीं, 'विद्याधनाची मिळकत सर्वांची समाईक असते ती बदलून ज्याची त्याची ती मिळकत कायद्यानें स्वतंत्र मानण्यांत यावी. मुख्य प्रमेय बदलण्यांत यावें व याविरुद्ध व्यवहार व्हावयाचा असल्यास तो लेखी करारानें व्हावा म्हणजे झालें.

***

जयकरांच्या बिलासंबंधानें कोणाचे चिल्लर किरकोळ आक्षेप असतील तर त्यांचें वरील युक्तिवादानें व प्रत्यक्ष स्मृतिवचनें दाखवूनच समाधान करतां येईल. पण कित्येकांना वाटतें कीं, "हिंदु-एकत्र कुटुंबपद्धतीवर यामुळें अप्रत्यक्ष घाला येणार! तुमचें नवें तें चांगलें व आमचें जुनें तें वाईट, असेंहि कदाचित् असेल, पण त्याची सुधारणा तुम्ही करूं नका. प्राचीन ऋषि कांहीं वेडे नव्हते व त्यांनीं कायद्यानें निर्माण केलेली एकत्र कुटुंबसंस्था आज कमीत कमी दोन हजार वर्षें टिकली आहे! 'कुटुंबसंस्थेचें' हें बंधन नसतें तर हिंदु समाज सनातन अनादि काळापासून टिकून राहिलाच नसता. विद्याधन मिळविणारा मृत झाल्यावर त्यांच्या स्त्रीवारसांना कांहीं मिळत नाहीं व पुरुष मात्र शेषाधिकारी या नात्यानें सर्व धनाचे मालक होतात, इतकेंच कीं नाहीं? पण त्यांत तरी फारसें काय बिघडलें? स्त्रियांना शिक्षण नसतें. त्या अडाणी असतात. त्यांना हे हक्क आणखी दिले तर त्या आपलें धन तर घालवितीलच, पण शेवटीं आपला घात मात्र करून घेतील. मग दुसऱ्याची भर होण्यापेक्षां भाऊबंद अगर पुरुष वारस यांच्या हातीं द्रव्य गेलेलें काय वाईट?"

***

'हिंदु एकत्र कुटुंबसंस्थे' संबंधीं आक्षेपकांची शंका दूर करणें अवघड नाहीं. हिंदु-एकत्र-कुटुंब-संस्था ही कांहीं सनातन नाहीं. पण तुमचा हा भ्रम मात्र 'सनातन' आहे! कारण आज ज्या प्रकारची कुटुंबसंस्था अस्तित्वांत आहे तशीच एक लाख वर्षांपूर्वीपासून कायम आहे, अशी समजूत विशेषतः ऐतिहासिक दृष्टीनें ज्यांनीं धर्मशास्त्राकडे कधींच पाहिलें नसेल त्यांचीच असणार! व अशांनीं "स्मृतींत बदल होत नाहीं, तुम्हास तो करण्याचा अधिकार नाहीं, स्मृतींचा कायदा सनातन आहे, इतकेंच काय पण सर्व स्मृति या एकदम एकाच वेळीं व एकाच काळीं निर्माण झाल्या!" असें म्हणावें हें साहजिक आहे. स्मृतींचा कायदा "आहे" येवढें खरें. पण तो पूर्वी होता तसाच आजहि आहे याची ग्वाही कोणी द्यावी? कारण 'बदल' होणें हाच तर सृष्टिक्रम आहे. Old order changeth yielding place to new" असें टेनिसननें आपल्या काव्यांत म्हटलेंच आहे.

***

विशेषतः स्त्रियांची दुर्दशा होते ती थांबावी हाच जयकर यांच्या बिलाचा मुख्य हेतु आहे. हिंदुधर्मशास्त्राची आपल्या हातानें योग्य पाहिजे तशी सुधारणा करावयाची तर, त्यांत वावगें काय तेंच समजत नाहीं. आपला अंगरखा आपणच हवा तसा शिवला पाहिजे. वडिलांचा जोडा व अंगरखा

अभिमानानें तसाच घालूं म्हटलें तर तो आंगाला कसा येणार व पुरा कसा पडणार? जुन्याविषयीं प्रामाण्य खरें, पण त्यावर कधींच कोणाचा निर्वाह चालत नाहीं. मनुष्य नवें करतो. पण जुन्याचें नांव घेऊन करतो. रंग नवा पण ढंग जुना.यांत गैर कांहीं नाहीं.व असेंच बोलत बोलत आपणास योग्य दिसेल तें करणें यांतच सर्व व्यावहारिक शहाणपण आहे. पण हें न जाणणारे शब्दप्रामाण्यवादी लोक भेटले म्हणजे त्यांच्याशीं डोकें घासतें इतकेंच.

तात्पर्य, धर्मशास्त्राची सुधारणा हा शब्द उच्चारला कीं, बिचकून जाण्याचें कारण नाहीं. वाचकांनीं हे पक्कें लक्षांत ठेवावें कीं, "हिंदुधर्म हा हिंदु समाज बनवीत नाहीं. हिंदु समाज हा (वेळोवेळीं आपला) हिंदुधर्म बनवीत असतो." धर्मशास्त्राच्या सुधारणेच्या वादाचें अगर नव्या स्मृतीबद्दलच्या तंट्याचें हेंच मर्म आहे. व कोणी यत्किंचित्हि संशोधक बुद्धि चालविली तर हेंच म्हणणें खरें आहे, असें त्याला आढळून येईल !

# महाराष्ट्रांतील चार जिल्हे

(ले.—सदाशिव विनायक बापट.)

(लेखांक २ रा)

माझ्या संचारांत जाहीर सभा करून नुसतीं व्याख्यानें देणें एवढेंच काम मी करीत नसे. सभा भरवून व्याख्यान करणें हेंच मुख्य काम असें जरी लौकिक दृष्ट्या मानिलें जाई,तरी तेवढ्यानें माझें मुळींच समाधान होत नसे. जाहीर व्याख्यान देण्यापेक्षांहि प्रत्येक गांवीं तेथील पुढारी मंडळींची खासगी सभा भरवून तींत मोकळेपणानें अनेक विषयांवर चर्चा करून विचारविनिमय होणें व अखेर त्यांतून कांहीं तरी प्रत्यक्ष कामास सुरुवात करणें ही गोष्ट मला फार महत्त्वाची वाटे. एखाद्या गांवीं क्वचित् कोठे व्याख्यान न झालें तरी चालेल, पण ही खासगी चर्चा केल्याखेरीज मी ते गांव सोडीत नसे. या खासगी बैठकीचा फारच चांगला उपयोग होतो असें मला दिसून आलें. या चर्चेस ठिकठिकाणीं मंडळी अगत्यपूर्वक येत, खुल्या दिलानें बोलत व शेवटीं ठरेल त्याप्रमाणें करण्याचें अभिवचन देत. या बैठकींत मी मुख्यतः खालीं दिलेल्या सहा बाबी विचाराकरितां त्यांचेपुढें ठेवी, व त्यांस त्या पटल्यावर तसें घडवून आणण्याची विनंति करी. त्या बाबी येणेंप्रमाणें—(१) कॉंग्रेस-कमिट्या स्थापन करणें (२) कॉंग्रेसचे सभासद वाढविणें, (३) स्वदेशीचें विशेषतः खादीचें दुकान काढणें, (४) सार्वजनिक फंडाची माहिती देणें (५) जिल्हासभा, तालुकासभा भरविणें (६) प्रचारक नेमणें.

यांपैकीं क्रमानें एकेका बाबीविषयीं थोडें लिहितों. (१) प्रत्यक्ष तालुक्याच्या पुष्कळ गांवीं कॉंग्रेस-कमिट्या नाहीत; त्या तेथें स्थापन करण्याचा मी प्रयत्न करी व जेथें त्या मोडकळीस आल्या असतील तेथें त्यांत नवजीवन उत्पन्न करणें ही मूलभूत गोष्ट मी समजत असे.

(२) मुंबई येथील तारीख २५-५-२९ च्या ऑल-इंडिया कॉंग्रेस-कमिटीच्या ठरावाप्रमाणें कॉंग्रेसचे सभासद करणें कसें अत्यंत जरूर झालें आहे हें मंडळींच्या निदर्शनास मी आणल्यामुळें हें काम करण्याचे बाबतींत पुष्कळांनीं उत्साह दाखविला व कामास सुरुवातहि केली, हें नमूद करण्यास आनंद वाटतो.

(३) जाहीर व्याख्यानांत मी खादीचें माहात्म्य वर्णीतच असें. पण या खासगी चर्चेत तिचें नुसतें माहात्म्य न वर्णितां गांवांत स्वदेशी कापडाचें दुकान उघडावें व त्यांत विक्रीकरितां खादी ठेवावी अशी विनंति करी व त्याप्रमाणें कांहीं ठिकाणीं दुकानें उघडण्यांत आलीं. जेथें स्वतंत्र दुकान काढणें अशक्य आहे तेथें पेठेंतील कोणाचे खासगी दुकानात विक्रीकरितां खादी ठेवण्याचें लोकांनीं मला आश्वासन दिलें याबद्दल मी त्या सर्वांचा आभारी आहें.

(४) "पुणें हें सार्वजनिक चळवळीचें केंद्र असून पुढाऱ्यांजवळ अर्थात् लोकमान्यांचें कार्य पुढें चालविणाऱ्या लोकांच्या हातीं अनेक फंडांचा प्रचंड निधि आहे, त्यांतून कांहीं अंश आपल्या गांवच्या चळवळीस मिळावा." अशा तऱ्हेचे उद्गार मधून मधून कानावर येत असल्यामुळें व या फंडाविषयीं लोकांच्या भलभलत्या कल्पना असल्याचें आढळून आल्यामुळें या सार्वजनिक फंडाची तपशीलवार माहिती मी लोकांस सांगत असें. या सर्व संस्थांचे हिशेब व माहिती वेळोवेळीं केसरीमध्यें आरशाप्रमाणें प्रसिद्ध होत असतां लोकांच्या

अशा समजुती असाव्यात हें नवल नव्हे काय ? पण आपल्या देशांतील सार्वजनिक बाबींविषयीं नेहमींच लोक कसें उदासीन असतात हें लक्षांत घेतल्यास त्याविषयीं नवल न वाटतां उलट त्यांची वेळोवेळीं समजूत घालणें हेंच आपलें कर्तव्य आहे असें मला वाटतें, व म्हणूनच वरील फंडाचा इतिहास व सध्याची त्यांची स्थिति लोकांस खुलासेवार समजावून देणें माझेंहि कर्तव्यकर्म आहे असें या चर्चेंतील बराच वेळ मी त्यापायीं खर्च करी.

(५) हल्लीं राष्ट्रीय सभेतील राजकारणाची मजल सरकारनें लोकांस एक वर्षांचे आंत स्वराज्य देऊन टाकण्याची नोटीस देण्यापर्यंत गेली असतांना महाराष्ट्रांतील दहा जिल्ह्यांच्या साध्या दहा जिल्हासभाहि दरसाल भरूं नयेत काय ही गोष्ट राहून राहून माझ्या मनास दंश करी. या दहा जिल्ह्यांपैकीं फक्त दोन-तीन जिल्हेच दरसाल आपल्या जिल्हासभा बिनचूक भरवीत असतात हें त्यांस भूषणावह आहे. बाकीच्या जिल्ह्यांनीं ताबडतोब या कामास लागावें म्हणून याहि बाबतींत मी मंडळीशीं चर्चा करी.

अहमदनगर जिल्ह्याची जिल्हासभा सन १९१७ सालीं झाली, त्यावर एक तप उलटलें ! अहमदनगर जिल्ह्यांतील सर्व तालुके घेऊन मी शेवटीं खुद्द अहमदनगर येथें गेलों व तेथें या बाबतींत चर्चा करण्याकरितां श्रीयुत फिरोदिया वकील यांचे घरीं तेथील प्रमुख मंडळी जमविली. श्री. भाऊसाहेब चौकर, श्री. नानासाहेब सप्तर्षि, श्री. फिरोदिया वकील, श्री. भाऊसाहेब खरे ऊर्फ पंत वकील वगैरे मंडळींना ही कल्पना पसंत पडून त्यांनीं मोठ्या उत्साहानें ती उचलून धरली व तेथल्या तेथेंच जिल्हासभा भरविण्याचें स्थळ व तारखाहि निश्चित केल्या. याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

( ६ ) खासगी चर्चेंत सर्वांत महत्त्वाची बाब मला वाटत असेल तर ती प्रचारकाच्या योजनेची श्रीसमर्थांचे बाराशें शिष्य महाराष्ट्रांत संचार करीत होते असें आपण म्हणतों, किंवा बार्डोलीचा हल्लीं आपण गौरव करतो त्या वेळेस तेथें शेंकडो लोक खपत होते हेंहि आपल्या मनांत असते. पण महाराष्ट्राचें 'आनंदवनभुवन' किंवा 'बार्डोली' करावयाची तर त्या मानानें केवढी तरी आपली तयारी पाहिजे! पण ते सर्व बाजूसच ठेविलें तरी निदान उभ्या महाराष्ट्रांत दहा जिल्ह्यांस दहा तरी प्रचारक नेमणें आपणास शक्य नाहीं काय ? वास्तविक प्रत्येक तालुक्यानें मनांतच आणिलें तर आपल्या तालुक्यापुरता एक प्रचारक नेमणें त्यास खास जड नाहीं. परंतु आज तरी निदान तशी अपेक्षा न करतां अनेक तालुके मिळून एका जिल्ह्याने तरी एक प्रचारक ठेवणें अगदीं शक्य आहे. अनुभविक व उत्साही प्रचारकास दरमहा रु. ५० पगार दिला तर वर्षांचा ६०० रु. खर्च येतो. त्याचा ½ हिस्सा प्रत्येक जिल्ह्यास देण्यास आपण कांहीं काळ तयार आहों असें श्रीयुत न. चिं. केळकर यांनीं अभिवचन दिलें असल्याचें मी ठिकठिकाणीं सांगत असे. यामुळें मंडळींत उत्साह उत्पन्न होई. पण बाकीच्या पैशाची कशी उभारणी करावयाची असा त्यांस प्रश्न पडे. या बाबतींत मी ठरविलेली योजना त्यांच्यापुढें मांडीत असे. ही योजना प्रथम तालुक्याचे गांवीं मांडून तेथील लोकांनीं ती मान्य केल्यावर मग त्या तालुक्याच्या जिल्ह्याचे गांवीं जाऊन तेथील पुढारी मंडळीस मी तो अहवाल सादर करी व आतां सदर योजना आपण आपल्या जिल्ह्यांत अमलांत आणा अशी त्यांस विनंति करी.

सदर योजनेचें तात्पर्य असें:—प्रत्येक जिल्ह्यांत सुमारें आठ—दहा तालुके असतात. प्रत्येक तालुक्यांत असे सोळा गृहस्थ सहज मिळतील कीं जे आपल्या राष्ट्राकरितां दरमहा निदान आठ आणे देऊं शकतील. सातारचे प्रसिद्ध वकील दे. भाऊसाहेब सोमण यांनीं तर एकट्यानें दरमहा पस्तीसचाळीस रुपये देऊन एक प्रचारक नेमिला. व त्यानें कसें अपूर्व काम केलें हें स्फूर्तिदायक उदाहरण मी मंडळीस सांगत असे. तें ऐकून तुमचे योजनेप्रमाणें आमचे तालुक्यांतून दरमहाचे दहमहा आठ रुपये देण्याची मी हमी घेतों अशी तेथील प्रमुख गृहस्थ माझी खातरजमा करीत ! याप्रमाणें आठ—दहा तालुक्यांचे दरमहा सुमारे सत्तर—पाऊणशें रुपये जमून ते परस्पर जिल्हा—मंडळाकडे येण्यास पंचाईत पडणार नाहीं असें वाटतें. पण हें घडवून आणण्यास जिल्ह्याचे ठिकाणीं एक मंडळ स्थापून त्यानें तें काम केलें पाहिजे असें मी सुचविल्यावर तें काम जिल्हासभेचे वेळीं आम्ही करूं असें मंडळी म्हणत. पण या बाबतींत माझा कटाक्ष इतकाच असे कीं, नेमलेल्या प्रचारकाचा संबंध आपल्या पगाराचे हे पैसे जमविण्याचे बाबतींत बिलकुल येतां कामा नये, व त्यास दरमहाचे दरमहा पांच तारखेचे आंत पगार मिळण्यास पंचाईत पडूं नये. या गोष्टी मान्य करूनच वरील चारहि जिल्ह्यांतील कांहीं तालुक्यांनीं व विशेषतः नगर जिल्ह्यानें तर आपले येथें ताबडतोब प्रचारक पाठविण्याविषयीं आग्रहपूर्वक मला सांगितलें आहे.

यावरून प्रचारकाच्या कामाची भूक लोकांस कशी लागली आहे हें दिसून येईल. पण ती भूक शमविण्याकरितां लायक प्रचारक कसे निर्माण करावयाचे हा प्रश्न उत्पन्न होतो. पंचवीस वर्षांपूर्वी लो. टिळकांचे मनांत ही कल्पना जोरानें वास करीत होती. सन १९०७

सालीं याच हेतूनें त्यांनीं तळेगांव येथील श्रीसमर्थ विद्यालयांत ' प्रबुद्ध विद्यार्थी वर्ग ' काढण्याचें ठरविलें होतें, किंबहुना त्यांनीं त्या कामास सुरुवातहि केली होती. पण अनेक अडचणींमुळें त्या वेळीं हें काम होऊं शकलें नाहीं. आतां ती कल्पना अमलांत आणण्याची अगदीं वेळ येऊन ठेपली आहे. चोहोंकडून या विषयास चालना मिळत आहे. खेडेगांवांतील लोकांच्याकडूनहि मागणी होत आहे. करितां प्रचारक तयार करण्याचा हा वर्ग पुण्यास अगर इतर कोठें कोणी काढल्यास देशावर त्याचे मोठे उपकार होणार आहेत.

गेल्या सालीं ' पुणें सार्वजनिक सभे'तर्फे खेडेगांवांत मी प्रचाराचे कामाकरितां हिंडत असतां पोलिसांकडून जशा प्रकारचा मला त्रास झाला तसा या खेपेस झाला नाहीं. क्वचित् कांहीं स्थळीं माझ्या व्याख्यानाच्या जाहिराती भिंतीवर अगर कोठेंहि न लावण्याबद्दल गांवच्या लोकांस पोलिसांकडून सांगण्यांत आलें, व कोठें लाविलेल्या जाहिराती त्यांनीं फाडून टाकल्या, अशा तक्रारी माझ्या कानावर आल्या. पण उलट कांहीं गांवीं ब्राह्मणेतर व मुसलमान लोकांकडून सभेंत दंगा होण्याचा रंग दिसूं लागतांच व्यवस्थेसाठीं पोलीस उभे असलेले पाहण्यांत आलें. कांहीं ठिकाणीं प्रत्यक्ष मामलेदार, फौजदार वगैरे अधिकारी सभास्थानीं येऊन बसत. दोन गांवीं व्याख्यान टिपून घेण्यास सरकारी लघुलेखकहि हजर असल्याचें दृष्टोपत्तीस आलें.

# पत्रकर्त्यांच्या स्फुट सूचना

१ लाहोरला ता. १८ रोजीं कॉंग्रेसच्या येत्या अधिवेशनाच्या स्वागत–मंडळाची सभा होऊन महात्मा गांधी यांनाच अध्यक्षस्थान देण्याचें ठरलें. प्रांतिक मतांमध्यें गांधींना दहा, वल्लभभाई पटेल यांना पांच व जवाहरलाल नेहरू यांना तीन मतें पडल्यामुळे ही निवड क्रमप्राप्तच होती. पं. जवाहरलाल नेहरू यांच्या क्रान्तिवादानें देशाचें लक्ष वेधलेलें असलें व देशांतील तरुणांचे ते पुढारी मानले गेले असले तरी इतक्यांत त्यांना कॉंग्रेसचें अध्यक्षपद देऊं नये असेंच कॉंग्रेसमधील लोकमत या मतविभागणींत दिसून येतें. "मी मागें पडलों. आतां तरुणांनीं पुढें यावें." असें म्हणून महात्मा गांधी यांनीं स्वतः जवाहरलाल यांची शिफारस केली. पण पुढे आलेल्या व धडाडीच्या दिसणाऱ्या कार्यक्रमाच्या पुरस्कर्त्यास, इतर रीतीनें त्याचें कौतुक केलें तरी, केवळ त्या पुरस्कर्तृत्वाबद्दलच कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाची जबाबदारीची जागा यावी असें कॉंग्रेसमधील बहुमताला वाटत नाहीं हेंच या निवडणुकीवरून दिसतें. कॉंग्रेसमधील वाद महात्मा गांधींनीं तडजोडीनें लाहोरच्या कॉंग्रेसपर्यंत मिटविला आहे. पण त्या कॉंग्रेसमध्येंहि निर्णय होण्याचा प्रसंग येईल का पुनः तडजोड करावी लागेल याबद्दल निश्चिति नाहीं. आणि तडजोड करण्याचा प्रसंग आल्यास वल्लभभाई पटेल अगर जवाहरलाल यांच्यापेक्षां गांधीच अधिक उपयोगी पडतील असें कॉंग्रेसमधील लोकमतास वाटत असलें पाहिजे हें उघड दिसतें.

२ महात्मा गांधींनीं लाहोर येथे स्वागतमंडळाची सभा भरली असतां तिला तार पाठवून मला अध्यक्ष करूं नका तर जवाहरलाल यांनाच करा असें पुनः कळविलें होतें. अध्यक्षस्थान न स्वीकारण्याची दोन–तीन नवीं कारणें त्यांनीं या तारेमध्यें सांगितलीं आहेत. या कार्याबद्दल उत्साह वाटत नाहीं, कॉंग्रेसच्या कित्येक अनुयायांचें धोरण मला पसंत नाहीं व मी अध्यक्षस्थान स्वीकारण्यानें माझा व तुमचाहि घोटाळा होईल अशीं तीं तीन कारणें होत. पैकीं उत्साह वाटत नाहीं ही गोष्ट पुढील दोन कारणांवर अवलंबून आहे आणि पुढचीं दोन कारणें जवाहरलाल, वल्लभभाई किंवा दुसरा कोणीहि अध्यक्ष झाला तरी त्यास सांगतां येण्यासारखीं आहेत. अध्यक्षपणाचें काम बिकट असतें, अध्यक्षाचें व इतरांचे मतभेद होतात, म्हणून तर महात्मा गांधींसारखा अनुभवी व भिन्न भिन्न पक्षांवर वजन असलेला शांत मनुष्य अध्यक्षस्थानीं लोकांना पाहिजे आहे. याच दृष्टीने श्रीनिवास अय्यंगारांनीं मद्रासला जाहीर रीतीनें सांगितलें कीं महात्मा गांधीजींनीं अध्यक्षपदाची जबाबदारी दुसऱ्यावर टाकूं नये. त्यांनींच ती स्वीकारली पाहिजे. पंडित मोतीलाल नेहरूंनींहि त्यांना असेंच कळविलें आहे. या राष्ट्रीय नडीच्या वेळीं वैयक्तिक आवड-निवड अगर गैरसोयी किंवा अवघडपणाची भीति ही त्यांनीं बाजूस ठेवणेंच जरूर आहे. आतां स्वागतमंडळाचा निर्णय झाल्यावरहि म. गांधी तो मान्य करतात का अजून आपला नकार चालू ठेवतात हें पाहणें आहे.

३ ता. १८ च्या या स्वागतमंडळाच्या सभेतील वादविवादाची जी हकीकत वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाली आहे तिच्यावरून पंजाबमधील कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांत व कार्यकर्त्यांत बरेंच भांडण धुमसत आहे असें दिसतें. या सभेंत रायजादा

हंसराज यांनीं म्हटल्याप्रमाणें हे वाद लहान-सान गोष्टींवरून उत्पन्न झाल्यासारखे दिसतात. त्यांत तात्विक मतभेदापेक्षां वैयक्तिक रागद्वेषाचें स्वरूपच अधिक दिसतें. सभेत गोंधळ झाला व स्वागतमंडळाचे अध्यक्ष डॉ. किश्लू यांच्या निवडणुकीच्या रीतसरपणाबद्दलच प्रश्न उपस्थित करण्यांत आला. मि. गिरधारीलाल,लाला दुनीचंद व डॉ. अलम हे उठून गेले. यानंतर पुनः सभा भरून स्वागतमंडळाचें कार्यकारी मंडळहि निवडण्यांत आलें आहे. काँग्रेस ज्या प्रांतांत बोलावतात तेथील कार्यकर्त्यांनी आपसांतील मतभेद बाजूस ठेवून काँग्रेसचें काम कसें पार पडेल याकडेच मुख्यतः दृष्टि ठेवणें जरूर असतें. अशा वेळीं पंजाबच्या स्वागतमंडळांत दिसून येणारे हे मतभेद खेदकारकच होत. उभय पक्षांवर वजन असलेल्या काँग्रेसच्या पुढाऱ्यांनीं वेळींच पंजाबांत जाऊन या पक्षांत काँग्रेसचें अधिवेशन पार पडण्याच्या बाबतींत तरी सलोखा घडवून आणणें इष्ट आहे.

---

४ पुणें येथील 'संग्राम' पत्रावर १५३ अ कलमान्वयें हिंदू-मुसलमानांत वैमनस्य उत्पन्न केल्याबद्दलच्या आरोपावरून भरलेल्या खटल्याचा निकाल ता.२१ रोजीं झाला.या पत्राचे संपादक श्री.गणपतराव नलावडे यांना मॅजिस्ट्रेटनें दोषी ठरविलें. आणि तीनशें रु.चा जातमुचलका व अडीचशें रुपयांचे दोन जामीन त्यांचेकडून घेण्यांत आले. श्री. बाबूराव फुले व रंगोबा लडकत हे दोन सद्गृहस्थ जामीन राहिले.कोर्टांत निकालाच्या वेळीं लोकांचा बराच समुदाय जमला होता आणि श्री. नलावडे याना पुष्पहार घालण्यांत आला, यावरून लोकांची या खटल्यासंबंधानें आपलेपणाची भावना लक्षांत येते. संग्रामच्या लेखानें हिंदूंच्या भावना क्षुब्ध झाल्या असें मॅजिस्ट्रेट यांनीं केवळ त्यांच्यापुढें आलेल्या लेखावरून ठरविलें. पण खरी वस्तुस्थिति अशी आहे कीं लोकांच्या मनांत मुंबईच्या दंग्याच्या वार्ता ऐकून जो क्षोभ स्वाभाविकपणे उत्पन्न झाला होता त्याचेंच कांहींसें दिग्दर्शन वर्तमानपत्रकार या नात्यानें संग्रामकारांनीं केलें होतें. वर्तमानपत्रकार या नात्यानें त्यांचें कर्तव्यच त्यांनीं बजाविलें. मुंबईच्या दंग्यांत हिंदूंचें संरक्षण सरकारनें जसें करावयास पाहिजे होतें तसें केलें नाहीं, असा हिंदूंचा सार्वत्रिक समज झाला असल्याचें मुंबईच्या दंगा-चौकशींत अनेक हिंदु साक्षीदारांनीं सांगितलें. अशा स्थितींत एखाद्या समाजानें आपल्या पायावर उभे राहून आपल्या हातून साधेल तसें आपलें संरक्षण करण्यास व गुंडांच्या हल्ल्यांना परिणामकारक रीतीनें तोंड देण्यास शिकलें पाहिजे, इतकेंच दर्शविण्याचा 'संग्राम'कारांचा हेतु होता. यांत त्यांचेकडून सक्त कायदेशीर दृष्ट्या शब्दमर्यादा उल्लंघिली गेली असें मॅजिस्ट्रेटनें मानलें असलें तरी निदान एक प्रकारच्या क्षोभकारक परिस्थितींत हा लेख प्रसिद्ध झाला ही गोष्ट तरी त्यांनीं निकाल देतांना लक्षांत घ्यावयास पाहिजे होती.

---

५ सरकाराकडून संरक्षण मिळत नाहीं व मिळण्याची आशाहि दिसत नाहीं,अशी बिकट परिस्थिति निर्माण झाली म्हणूनच 'संग्राम'कारांना हा लेख लिहावा लागला.एखाद्या ज्ञातीला स्वसंरक्षणासंबंधीं असला बिकट पेच पडूं नये अशा तऱ्हेची सरकारी बंदोबस्त खात्याची वागणूक नियमानें सर्वत्र दिसून येऊं लागली तर अशा तऱ्हेचे लेख लिहिण्याचें किंवा खटले करण्याचेंहि प्रयोजन उरणार नाहीं. शिवाय मुंबईच्या दंग्याचे वेळीं ज्या परिस्थितींत लेख लिहिला गेला तशा तऱ्हेची परिस्थितीहि आज नसल्यामुळें जामीन घेण्यांतहि काय स्वारस्य अगर उपयुक्तता मॅजिस्ट्रेटाला वाटली कोण जाणे! नुस्ती ताकीद देऊनहि ( मॅजिस्ट्रेटांनी घेतलेला अर्थ गृहीत धरला तरी) न्यायदानाचें व शांततारक्षणाचे काम आजच्या परिस्थितींत भागण्यासारखें होतें. पण सरकारनें खटला उभारला असतां आरोपीला अगदींच सोडून देणें बरें होणार नाहीं असें त्यांस वाटले असावें. किंवा सरकारचा मुख्य हेतु 'आम्ही बंदोबस्ताच्या कामीं फार दक्ष आहोंत.' हें कोणत्या तरी रीतीनें मुंबईचा दंगा होऊन गेल्यावर दाखवावयाचें असा मानला तर तो हेतूहि थोडाबहुत शिक्षा केल्याशिवाय साधणार नाहीं, असेंहि त्यांस वाटले असावें. पण अशा रीतीनें सरकारी बंदोबस्ताच्या पश्चात्प्रदर्शनाचे भरांत भलत्याच वेळीं साप साप म्हणून भुई बडविण्याचा हास्यास्पद प्रकार होतो. आणि 'संग्राम'चा खटला हा यांपैकींच एक प्रकार होय असें वाटल्यावांचून राहात नाहीं.

---

६ नाशिक येथें गेल्या गणेशोत्सवांतील विसर्जनाच्या मिरवणुकीचे वेळीं पोलिसांच्या संरक्षणानें हिंदु कायदेशीर मर्यादेंत वागत असतांहि मुसलमानांनी मशिदींतून मिरवणुकीवर हल्ला केला होता. तेव्हां यंदा अशी आगळीक करणाऱ्यांचा बंदोबस्त करावयाचा तें सोडून नाशिकच्या कलेक्टरांनीं उलट हिंदूंवरच बंधनें घालून असा जाहिरनामा काढला आहे कीं मशिदीवरून मिरवणूक सायंकाळीं ४॥ चे आंत गेली पाहिजे व तीहि वाद्यें न वाजवितां. प्रार्थनेच्या वेळीं मुसलमानांना वाद्यांचा त्रास होतो इतकेंच नव्हे तर नुस्ती मिरवणूक शांतपणें गेली तरीहि ती त्यांना चालत नाहीं! प्रार्थनेच्या वेळीं

वाद्यें नकोत असें म्हणतां म्हणतां मिरवणूकहि नको व सर्वेच वेळीं वाद्यें नकोत अशी जी मुसलमानांच्या आग्रहांत वाढ झालेली आहे ती त्यांच्या गुंड-गिरीला दबकून हिंदूंना निष्कारण बंधनें घालणाऱ्या अधिकाऱ्यांच्या हुकुमांमुळें झालेली आहे. आणि या हुकुमांतील अन्याय्यपणाबद्दल हिंदूंनीं वेळींच तक्रार व विरोध केला नाहीं, तर मुसलमानांचा आग्रह 'केव्हांहि मिरवणूक जाऊंच द्यावयाची नाहीं' या थरापर्यंत जाण्याचा संभव आहे. तळेगांवच्या प्रकरणांत यासंबंधीं अधिकाऱ्यांच्या हातून होणारी चूक सरकारच्या लक्षांत आली असतांहि पुनः त्याच प्रकारचे हुकूम इतरत्र निघतात याचें कारण मुंबई-सरकारला अजूनहि हिंदूंच्या न्याय्य हक्कांचें संरक्षण करण्याच्या बाबतींत खालच्या अधिकाऱ्यांना योग्य मार्ग दाखविण्याची बुद्धि सुचत नाहीं हेंच होय. अर्थात् प्रत्येक ठिकाणीं तळेगांवाप्रमाणेंच सर्व हिंदूंनीं जागरूकतेनें व संघटनेनें ही गोष्ट सरकारच्या गळीं उतरवावयास पाहिजे.

# संमति वयाच्या कमिटीचा रिपोर्ट

विवाहाच्या वेळीं वधूवरांचें किमान वय किती असावें आणि किती वयाच्या पूर्वी नवऱ्यानें स्त्रीशीं संभोग केल्यास तो गुन्हा मानावा वगैरेसंबंधाची चौकशी करण्यासाठीं जी कमिटी नेमली होती त्या कमिटीचा रिपोर्ट ता. २६ ऑगस्ट रोजीं प्रसिद्ध झाला.

या कमिटींत पुढील सभासद होते—१ सर मोरोपंत जोशी (अध्यक्ष), २ रायबहादूर पंडित कन्हय्यालाल, ३ मि. ए. रामस्वामी मुदालियार, ४ खा. ब. मियान इमामबक्ष काद्री, ५ मिसेस एम. ओब्रायन बीडन, ६ मिसेस ब्रिजलाल नेहरू, ७ मि. सत्येंद्रचंद्र मित्र, ८ पं. ठाकूरदास भार्गव, ९ मौलवी महंमद याकूब, १० मियान महंमद शहानवाझ आणि मि. एम. डी. सागणे (चिटणीस). या कमिटीनें बहुमतानें पुढील शिफारसी केल्या आहेत.

### कमिटीच्या शिफारसी

१ विवाहित स्त्रीच्या संभोगास कायदेशीर संमतीचें किमान वय १५ वर्षांपर्यंत वाढवावें.

२ पंधरा वर्षांपूर्वी नवऱ्यानें आपल्या स्त्रीशीं संभोग करणें हा गुन्हा ठरविला जावा व तो गुन्हा पिनल कोडाच्या २० व्या भागांत समाविष्ट करावा.

३ त्या गुन्ह्याला मॅरिटल मिसबिहेव्हिअर (वैवाहिक दुर्वर्तन) असें नांव द्यावें.

४ पिनल कोडांतील ३७५ व ३७६ हीं कलमें वैवाहिक संबंधाहून अन्य जबरीसंभोगापुरतींच लागू असावींत.

५ भर्त्याखेरीज अन्य पुरुषाच्या संभोगास संमति देणाऱ्या स्त्रीच्या वयाची किमान मर्यादा १८ असावी.

६ बालविवाह आणि अल्पवयीन संभोग यांच्या दुष्परिणामापासून समाजाला वांचविण्याचा रामबाण उपाय म्हणून विवाहाचे वेळीं वधूचें वय किमान पक्ष १४ वर्षे असावे असा कायदा करावा.

७ वर नमूद केलेल्या वैवाहिक वयाच्या मर्यादेच्या आंत विवाह झाल्यास व त्यास इतर रीतीनें बाध येत नसल्यास या नव्या कायद्यानें त्या विवाहाच्या कायदेशीरपणास बाध येऊं नये. वैवाहिक वयोमर्यादा व संमति वयोमर्यादा यासंबंधीं जे कायदे केले जातील त्यांची समाजांत सर्वत्र प्रसिद्धी होण्याची तजवीज करावी.

९ ठराविक नमुन्याचे विवाहाचें नोंदणीपत्रक ठेवण्यांत यावें व त्याकरितां वधूवर यांनीं अगर त्यांच्या पालकांनीं स्वतः अगर एजंटामार्फत विवाहाची माहिती व वधूवरांचीं वयें योग्य अधिकाऱ्यांस कळवावीं.

१० ही माहिती देऊन नोंद करविल्यावर त्याचें सर्टिफिकेट त्या इसमांस बिनखर्चानें मिळावें.

११ हें नोंदणीपत्रक ठेवणाऱ्या अधिकाऱ्यास जर असें वाटले कीं, यांत 'वैवाहिक कायद्या'चा भंग झाला आहे, किंवा खोटें वय सांगितलें आहे, किंवा विवाहाची नोंदच करण्याचें चुकविलें आहे तर त्यानें जरूर ती पूर्वचौकशी करून जवळच्या मॅजिस्ट्रेटकडे ती तक्रार नमूद करावी.

१२ प्रत्येक मूल जन्मल्यावर ठराविक मुदतीच्या आंत त्या मुलाच्या बापानें किंवा पालकानें योग्य अधिकाऱ्याकडे जाऊन त्याच्या जन्माची वर्दी द्यावी आणि एक वर्षानंतर त्याच अधिकाऱ्याकडे जाऊन त्या मुलाचें नांव काय ठेवले आहे ते ( मूल तोंपर्यंत जगलें असल्यास ) सांगावें. ज्या अधिकाऱ्याकडे हें जन्मनोंदणीचें काम असेल त्यानें त्या नियमाची कडक बजावणी करण्याची व चुकार लोकांवर खटला भरण्याची तजवीज करावी.

१४ मुलाच्या नांवाची माहिती नोंदल्यानंतर नोंदणी करणाऱ्या अधिकाऱ्यानें मुलाची जन्मवेळ, आईबाप, मुलगा अगर मुलगी वगैरे माहिती देणारे सर्टिफिकेट माहिती देणाऱ्यास बिनखर्चानें द्यावे.

१५ जन्माच्या व विवाहाच्या नोंदणीचीं हीं राजिस्टरें कायमचीं राखून ठेवण्यांत यावीं.

१६ 'वैवाहिक दुर्वर्तनाचा' गुन्हा हा नवऱ्यानें केलेल्या जबरी संभोगाच्या हल्लींच्या गुन्ह्याप्रमाणेंच बेलेबल व नॉन-कॉम्प्झिबल गुन्हा समजला जावा.

१७ स्त्रीचें वय १२ वर्षांच्या आंत असल्यास हा गुन्हा कंपौंडेबल असूं नये. स्त्रीचें वय १२ ते १५ च्या दरम्यान असल्यास कोर्टाच्या संमतीनें तो गुन्हा आपसांत समजुतीनें मिटविण्यास हरकत नाहीं.

१८ स्त्रीचें वय १२ च्या आंत असल्यास या गुन्ह्यास १० वर्षेपर्यंतची साधी किंवा सक्तमजुरीची कैद आणि दंड अशी शिक्षा असावी. वय १२ ते १५ असल्यास एक वर्षाची साधी अथवा सक्तकैद किंवा दंड किंवा दोनही अशी शिक्षा असावी.

१९ क्रि. प्रो. कोडांतील ५६२ व्या कलमांत आणखी एक पोटकलम घालून 'वैवाहिक दुर्वर्तना' पासून पुढें तरी बचाव करण्यासाठीं कोर्टानें अशा स्त्रीच्या राहाण्याची व अन्नवस्त्राची काय व्यवस्था करावी हें त्यांत नमूद करावें आणि नवऱ्याकडून अगर तो अल्पवयी असल्यास त्याच्या पालकाकडून त्याबद्दल जामीन घेण्यांत यावा.

२० वैवाहिक दुर्वर्तनावरून एखाद्यास शिक्षा झाल्यास वरील कलमांत नमूद केल्याप्रमाणें त्याजकडून योग्य जामीन घेण्याचा व त्या अटींत जरूरीप्रमाणें फेरबदल करण्याचा अधिकार कोर्टास असावा.

२१ क्रि. प्रो. कोड कलम १२२, १२६ अ ४०६ अ हीं कलमें वर नमूद केलेल्या जामिनास लागू पडतील अशीं व्यापक करावीं.

२२ वर कलम ६ मध्यें 'वैवाहिक दुर्वर्तना' चा जो नवा गुन्हा दाखल करण्याची सूचना केली आहे त्या गुन्ह्याबद्दल केवळ दंडाची शिक्षा न ठेवितां कैद अगर दंड किंवा दोनही अशी शिक्षा ठेवावी.

२३ या विवाहविषयक कायद्याचें उल्लंघन केल्याबद्दल ज्या कोर्टापुढें काम चालेल त्या कोर्टाला आरोपीकडून स्त्रीच्या अन्नवस्त्राची व राहाण्याची तरतूद करण्याविषयीं आणि 'वैवाहिक दुर्वर्तन' न होण्याविषयीं जामीन घेण्याचा अधिकार असावा.

२४ या जामिनालाहि क्रि. प्रो. को. १२२, १२६, १२६ अ व ४०६ अ हीं कलमें लागू होतील अशीं तीं व्यापक करावीं.

२५ वरील सूचनेप्रमाणें एखाद्या अल्पवयी स्त्रीला एखाद्या पालकाच्या किंवा एखाद्या संस्थेच्या स्वाधीन करण्यांत आल्यास त्या स्त्रीच्या शिक्षणाविषयीं व सद्वर्तनाविषयीं कोर्टानें आपला रिपोर्ट मागवावा व त्यास अनुसरून आपल्या हुकमांत जरूर तो फेरबदल करावा.

२६ अशा प्रकारच्या अल्पवयी स्त्रियांचें संगोपन करणाऱ्या संस्था स्थापन होतील अशा प्रकारें त्यांस सहाय्य व उत्तेजन द्यावें.

२७ जबरीसंभोगाच्या गुन्ह्याला शिक्षा जन्मठेप काळेपाणी किंवा १० वर्षें कैद (सक्त किंवा साधी) आणि दंड अशी असावी. पण ज्या स्त्रीवर जबरी झाली तिचें वय १६ ते १८ च्या दरम्यान असून तिनें जर संमति दिली असेल तर दोन वर्षांची कैद (सक्त वा साधी) व दंड एवढीच शिक्षा ठेवावी.

२८ वैवाहिक दुर्वर्तन किंवा जबरी संभोग अशा प्रकारच्या गुन्ह्यांच्या तपासाचे वेळीं स्त्रियांचे जाबजबाब घेणें, तपासणी करणें, साक्षीदार स्त्रियांना नेणें व आणणें वगैरे कामाकरितां शक्य तेथें स्त्रिया पोलीसकामावर ठेवाव्या. निदान स्त्रियांचे जबाब घेतांना शेजारच्या सभ्य स्त्रियांना बोलावून त्यांच्या देखत जबाब घ्यावेत.

२९ ज्यूरर्स किंवा असेसर्स म्हणून काम करण्याची ज्यांची इच्छा असेल अशा स्त्रियांची नोंद ठेवून असल्या खटल्यांत त्यांची ज्यूरींत किंवा असेसरांत योजना करावी.

३० वैवाहिक दुर्वर्तनाच्या खटल्याचें काम चालवितांना मॅजिस्ट्रेटांनी क्रि. प्रो. को. कलम ३५२ मधील सूचनेचा अवश्य फायदा घ्यावा असें त्यांना कळवून ठेविलेलें असावें.

३१ मुलीची शारीरिक तपासणी करावयाची ती डॉक्टरिणीकडून करवावी.

३२ कोर्टाच्या इमारतींत मुली व साक्षीदार स्त्रिया यांना बसण्याकरितां शक्य तोंवर निराळी जागा असावी.

३३ नवीन ॲक्ट पास होऊन तो अमलांत येण्याच्या पूर्वी ज्यांचा विवाह झाला असेल अशा दांपत्याच्या बाबतींत १३ ते १५ वर्षांच्या वयांतील स्त्रीसंभोगाबाबत हा कायदा लागू नाहीं असा अपवाद नव्या कायद्यांत नमूद असावा.

३४ वैवाहिक दुर्वर्तनाच्या बाबतींतल्या फिर्यादीला एक वर्षाची मुदत असावी. गुन्हा घडल्यापासून एक वर्षानंतर फिर्याद घेतली जाऊं नये.

३५ क्रि. पो. को. कलम ५६१ (१ अ) यांत 'रेप...वाईफ' हा भाग गाळून त्या ठिकाणीं 'मॅरिटल मिसबिहेव्हिअर' हे शब्द घालावे.

३६ इं. पिनल कोड कलम ३६१ मध्यें 'सोळा' असे शब्द आहेत तेथें 'अठरा' असे शब्द घालावेत.

३७ क्रि. पो. को. कलम ५५२ मध्येंहि १६ च्या जागीं १८ हा आंकडा घालून दुरुस्ती करावी.

३८ इं. ख्रि. मॅरेज ॲक्टांतील ६० व्या कलमांत '१३' आंकड्याच्या जागीं १४ आंकडा घालावा.

३९ विवाहित स्त्रीचें वय १५ वर्षांच्या आंत असल्यास नवऱ्याला तिचा ताबा मिळावा अगर तिनें आपल्या घरीं नांदावें अशाविषयीं फिर्याद करतां येऊं नये अशी त्या संबंधाच्या कायद्यांत दुरुस्ती करावी.

४० स्त्रिया व पुरुष यांच्यांत ज्ञानप्रसार होईल अशाविषयीं परिणामकारक प्रयत्न करण्यांत यावेत.

कमिटीच्या या सूचना सर्व सभासदांस सारख्याच मान्य नसून पं. कन्हैय्यालाल, मौलाना महंमद याकूब, खा. ब. कादरी, पंडित ठाकुरदास भार्गव, मिसेस नेहरू यांनीं भिन्नमतपत्रिका जोडल्या आहेत; पण स्थलसंकोचास्तव त्यांचा सारांश पुढील अंकावर टाकणें भाग आहे. भिन्नमतवाल्यांतील कांहींची मागणी ही कीं, विशिष्ट कारणाकरितां १४ वर्षांच्या वयापूर्वी मुलीचा विवाह करण्याला परवानगी देण्याचा अधिकार न्यायाधिशास असावा, मात्र त्यायोगानें संभोगाच्या वयोमर्यादेंत फरक होऊं नये. पंडित कन्हैय्यालाल यांनीं बरीच विस्तृत अशी भिन्न मतपत्रिका लिहिली असून तींत हिंदूंच्या व मुसलमानांच्याहि वैवाहिक कायद्याचा धर्मदृष्ट्या ऊहापोह केला आहे.

# सांगली येथील लो. टिळक—स्मारकसमारंभ

रविवार ता. २५ रोजीं सकाळीं सांगली येथें टिळक मंदिराचे जागेंत, मुंबईचे सुप्रसिद्ध शिल्पकार **श्री. फडके** यांनीं तयार केलेल्या **लो. टिळकांच्या अर्ध-पुतळ्याचें** अनावरण **श्री. माधवराव अणे** यांच्या हस्तें अत्यंत थाटानें व उत्साहानें करण्यांत आलें.

या समारंभाकरितां मुद्दाम वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. बापुजी अणे हे यवतमाळाहून आले होते. समारंभास सुमारें दोन हजार लोक जमले होते. स्त्रियांचा समुदायहि बराच जमला होता. सांगलींतील मुख्य अधिकारी, सर्व जातींचे पुढारी, व्यापारी व इतर सभ्य गृहस्थ हजर होते. मिरज, कुरुंदवाड, कोल्हापूर, जमखिंडी येथीलहि पुढारी मंडळी आलेली होती.

प्रथम श्री. **दादासाहेब खाडिलकर** यांनीं या समारंभास यशश्चिंतन करणारे संदेश श्री. औंधकर, डॉ. कुर्तकोटी, श्री. भोपटकर वगैरेंचे वाचून दाखविले. स्मारककमिटीचे अध्यक्ष **विनायकराव करमरकर** यांनीं स्मारकफंडाचा आजपर्यंतचा इतिहास वाचून दाखविला.नंतर सांगलीचे प्रो. अभ्यंकर यांनीं श्री. माधवरावजी अणे यांना पुतळा अनावरण करण्यास विनंति केली,व हा विधि झाल्यानंतर लोकमान्यांच्या शिकवणुकीचें रहस्य श्री. अणे यांनीं फार गंभीर व विद्वत्ताप्रचुर वाणीनें एक तासपर्यंत वर्णन केलें. नंतर पानसुपारी व हारतुरे होऊन हा समारंभ आटोपला.

त्या दिवशीं सायंकाळीं त्याच जागेंत **श्री. गणपतराव अभ्यंकर** यांचे अध्यक्षतेखालीं श्री. माधवराव अणे, दा. वि. गोखले, दि. वा. दिवेकर व पाचलेगांवकरमहाराज यांचीं टिळकांच्या राजकीय तत्त्वज्ञानावर भाषणें झालीं व रात्रीं तेथील **शाहीर खाडिलकर** यांचें पोवाड्याचें गायन झालें. ज्योतिष—संमेलनाच्या कार्यानें व इतर दृष्टीनेंहि लोकमान्यांचा सांगलीकरांशीं निकट संबंध होता व म्हणून हें स्मारक यापूर्वीच व्हावयास पाहिजे होतें हें खरें. तथापि कांहीं स्थानिक अडचणीमुळे हें कार्य लवकर घडून आलें नाहीं. तरी दक्षिण—महाराष्ट्रांतील संस्थानांत संस्थानी प्रजेनें उभारलेलें हेंच पहिलें स्मारक असल्यानें ही गोष्ट सांगलीकरांस विशेष भूषणावह व अभिमानास्पद होय. या स्मारकाची योजना टिळक मंदिर व अर्ध--पुतळा एवढीच नसून त्यांत वाचनालय, व्यायामशाळा, उद्योगमंदिर वगैरे उपांगांचाहि समावेश करण्याचा व्यवस्थापकांचा हेतु आहे. ही योजना सर्व परिपूर्ण करावयाची म्हणजे खर्चाचें काम आहे. तथापि ज्या टिळकभक्तीनें सांगलीकरांनीं अर्ध--पुतळा उभा करण्याचें काम यशस्वी केलें त्याच भक्तीनें टिळकस्मारकाची उर्वरित योजनाहि सांगलीकर मंडळी पुरी करतील अशी खात्री वाटते.

# पर्वती देवस्थानाच्या पंचांना विनंति

महाराष्ट्रांतील सर्व देवळांच्या मालकांना व चालकांना मी केलेल्या जाहीर विनंतीस अनुसरून ठिकठिकाणांहून उत्तेजनपत्रें मजकडे येत असून कांहीं ठिकाणीं माझी सूचना लवकरच प्रत्यक्षपणें अमलांत आणण्याविषयीं जारीनें तयारी चाललेली आहे, व यामुळें देवळांच्या बाबतींतील अस्पृष्टपणाचें निवारण पूर्णपणें चार-दोन वर्षांत झाल्याविना खास राहत नाहीं, अशी उमेद वाटूं लागलेली आहे.

खुद्द पुणें शहर व त्यालगतचा टापू यांत मुख्यतः पर्वती देवस्थानाबद्दल मोठा बोलबाला आहे. विशेषतः दरवर्षी श्रावण महिन्यांतील सोमवारीं या देवस्थानाचें नांव आबालवृद्धांच्या तोंडून ऐकूं येत असतें. पर्वती देवस्थान सार्वजनिक स्वरूपाचें असून त्याची व्यवस्था पंचांमार्फत होत असते. सुदैवानें सदर देवस्थानाचे सध्याचे पंच सुशिक्षित व देशकालपरिस्थिति जाणणारे असे आहेत. हिंदुधर्मीयांमध्यें या देवस्थानाचा नांव-लौकिक होण्याविषयीं पंचांची अहर्निश खटपट चाललेली असते; इतकेंच नव्हे तर परधर्मीय अधिकाऱ्यांचीहि सहानुभूति मिळविण्यासाठीं पंच मंडळी नेहमीं दक्ष असते.

हिंदु समाजापैकीं अस्पृष्ट गणलेले पोट-समाज हिंदुधर्मीय असल्याबद्दल पंचांना पूर्ण जाणीव आहे असें समजण्यास हरकत नाहीं. पर्वतीच्या पायऱ्या चढतांना एक लहानसा पीर ज्या देवस्थानाच्या हद्दींत दृष्टीस पडतो व जो पंचांना सहन करवतो, तें देवस्थान व त्याचे पंच स्वधर्मीयां-बद्दल असहिष्णु असण्याचा संभव दिसत नाहीं. अस्पृष्ट समाजाची अस्पृष्टता घालवून टाकण्या-विषयीं सर्व राष्ट्रीय पुढाऱ्यांची जी एका सुरानें विनवणी चाललेली आहे, तिचा ध्वनि-प्रतिध्वनि पंचांच्या कानावर गेलेला असून त्याचा पडसाद त्यांच्या अंतःकरणांत उमटत असलाच पाहिजे. सध्याची पंच मंडळी स्वार्थत्यागी, कर्मनिष्ठ व धडाडीची असल्याबद्दल त्यांची ख्याति आहे.

म्हणून, या पत्रद्वारें मी त्यांना अशी जाहीर विनंति करण्याचें धाडस करतों कीं, त्यांनीं सर्व दृष्टींनी पोक्त विचार करून, देवस्थानाच्या आवारांत स्पृष्टास्पृष्ट भेदभाव यंदापासून नष्ट करावा, व सर्व देवस्थान व देवता सर्व हिंदुधर्मीयांना खुल्या करा-व्यात, व त्यांच्या धन्यवादाचे धनी व्हावें ! सर्व हिंदु जनता त्यांच्या या कृत्याबद्दल व धैर्याबद्दल त्यांचा गौरव करील, एवढेंच नव्हे तर पुढील अनंत हिंदु पिढ्यांची कृतज्ञता ते निःसंशयपणें संपादन करतील !

ल. ब. भोपटकर.

# व्हिटले-मजूर कमिशनाची प्रश्नावली

हिंदुस्थानांतील मजूरवर्गाच्या स्थितीची चौकशी करण्यासाठीं जें रॉयल कमिशन नेमलें आहे त्या कमिशनाचे सभासद विलायतेहून लवकरच निघणार असून ता. १० ऑक्टोबरला ते मुंबईस येऊन पोंच-तील. तत्पूर्वीच त्यांनीं ज्यासंबंधीं चौकशी कराव-याची आहे त्या बाबतींत प्रश्नावली प्रसिद्ध कर-ण्यांत आली असून त्या प्रश्नांचीं उत्तरें कोणाहि व्यक्तीनें किंवा संस्थेने ता. २५ सप्टेंबरच्या आंत पाठवावींत असें जाहीर झालें आहे. ज्यांना कमिशनपुढें तोंडी साक्ष द्यावयाची असेल त्यांनीं आपल्या लेखी उत्तराबरोबरच आपण कोठें केव्हां साक्ष देऊं शकूं तें स्थळ व ती वेळहि कळवावी. कमिशनाला तोंडी साक्ष घेणें जरूर वाटल्यास साक्षीदारास हजर राहाण्याविषयीं कळ-विण्यांत येईल.

### कमिशनाचें कार्यक्षेत्र

ब्रिटिश हिंदुस्थानांतील औद्योगिक कारखाने आणि चहाकॉफीच्या मळ्यासारखे मोठे मळे यांतील मजुरांचें आरोग्य, त्यांचें शिक्षण, त्यांची राहाणी आणि कारखानदार व मजूर यांचे संबंध यांची चौकशी करून तत्संबंधीं सूचना करणें हें या कमिशनाचें कार्यक्षेत्र होय.

'औद्योगिक कारखाने' या शब्दांत खाणी, खोदकाम, कच्च्या मालापासून पक्का माल तयार करण्याचे किंवा मालाचें रूपांतर करण्याचे सर्व प्रकारचे कारखाने, नौकाबंधन, वीज उत्पन्न करणें, इमारती पाडणें, बांधणें, दुरुस्त करणें, वाह-तुकीच्या खुष्कीच्या किंवा जलमार्गाच्या संबंधाचीं सर्व कामें, उतारूंची ने-आण आणि मालाची वाहतूक यासंबंधाचीं सर्व कामें यांचा समावेश होतो.

या दृष्टीनें कमिशन पुढील बाबतींत चौकशी कर-णार आहे-१ मजुरांची भरती २ कामगारांवरील देख-रेख व ती करणारे अधिकारी ३ कामगारांची राहण्या-ची सोय ४ मजूरवर्गाचें आरोग्य ५ मजूरवर्गा-च्या शिक्षणाच्या व इतर सोयी ६ धंदेशिक्षण ७

कामांतील धोक्यापासून कामकऱ्यांच्या बचावाची तजवीज ८ अपघात झाल्यास मिळणारी नुकसानभरपाई ९ कामाची वेळ व तास (अ) खाणींतील कामें (आ) रेल्वेचीं कामें (इ) वहाचे मळे, बंदरांतील गोद्या वगैरेंतील कामें १० बायका व मुलें यांच्या संबंधाचे विशेष प्रश्न ११ दर्यावरील व नदींतील बोटीवरील खलाशांचे विशिष्ट प्रश्न १२ मजुरीचे दर १३ कामकऱ्यांचे कामांतील प्रावीण्य १४ कामकऱ्यांचे व कारखानदारांचे संघ १५ कारखानदार व मजूर यांच्यांतील वाद १६ धनी व मजूर यांच्या परस्पर संबंधाविषयीं कायदा १७ मजूरवर्गाच्या प्रश्नांची सरकारी देखरेख १८ कारखाने व त्यांतले मजूर या संबंधाच्या माहितीची नोंद.

या अठरा बाबी मुख्य असून प्रत्येक बाबींत अनेक उपप्रश्न आहेत व सर्व प्रश्नांची संख्या १४६ आहे. पण एवढे प्रश्न देखील पूर्ण आहेत असें नसून जर कोणा साक्षीदारांस या प्रश्नावलींत समाविष्ट न झालेल्या परंतु जरूरीच्या आणखी कांहीं प्रश्नासंबंधानें माहिती द्यावयाची असेल तर त्यानें तशी जादा माहिती देण्यासहि हरकत नाहीं.

# मेळ्यांच्या पदांची तपासणी

पुणें शहरांत श्रीगणेशोत्सवांतील मेळ्यांमध्यें सत्यशोधक व ब्राम्हणेतर पक्षीयांनीं उत्पातकारी पदें रचून व म्हणून गोंधळ उत्पन्न केल्यामुळें मेळ्यांच्या पदांवर सरकारी नियंत्रण सुरू झालें. मेळेवाल्यांना दरवर्षी आपलीं पदें तपासणीसाठीं सरकारनियुक्त कमिट्यांकडे पाठवावीं लागतात व त्यांतील कोणतीं पदें मंजूर होतील व कोणतीं नामंजूर होतील याचा नेम नसतो. तीस–बत्तीस पदें पाठवावीं व त्यांतलीं फक्त दहाबारा पदें मंजूर व्हावीं व त्यांतहि बरींच गेल्या वर्षाचीं जुनीं तेवढींच मंजूर व्हावींत असे प्रकार होतात. इतकेंच नव्हे तर गेल्या वर्षी नामंजूर झालेलीं आज मंजूर होतात व गेल्या वर्षी मंजूर ठरलेल्या पदांवरहि आज नापसंतीचा शिक्का पडतो. याचें कारण असें आहे कीं या तपासणी कमिट्यांना पदें तपासतांना कोणती दृष्टि ठेवावयाची याचे कांहीं नियम घालून दिलेले दिसत नाहींत. अर्थात् हें सर्व लहरीच्या कसोटीनें काम चालतें !

तपासणीचा उद्देश ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचा विकोप टाळणें हाच असल्याचें उघड दिसतें. कारण एक ब्राह्मणांची कमिटी व एक अब्राह्मणांची कमिटी अशा दोन कमिट्या नेमलेल्या असून ब्राह्मण मेळ्यांचीं पदें अब्राह्मणांकडे व अब्राह्मण मेळ्यांचीं पदें ब्राह्मणांकडे तपासण्यासाठीं देण्यांत येतात! आणि या दोन कमिट्यांना एकमेकांच्या कामाची माहिती नसते. यामुळें एका कमिटीचें काम फाजील कांटेकोर व दुसऱ्या कमिटीचें काम मोकळेपणानें होतें असें दिसतें. पदें लवकर तपासून मिळत नाहींत. ही दरसालची तक्रार आहेच. शिवाय ब्राह्मण–अब्राह्मण वादाला दुरूनहि स्पर्श न करणारीं अशीं पदें स्वतःच्या विशिष्ट मताला विरोधी दिसलीं कीं मार त्याच्यावर कांट, असाहि केवळ लहरीपणाचा प्रकार चालतो. उदाहरणार्थ, कमिटीनें नापास केलेल्या एका पदांतील पुढील कडवें पाहा—

" आज–काल फॅशनपायीं । संस्कृती लयाला जाई॥
हातीं नारळाची आई । शेवटीं मिळेल ॥"

या कडव्यांत जातीजातींच्या दृष्टीनें अगर सरकारच्या दृष्टीनें आक्षेपार्ह काय आहे ? पण कमिटींतील 'फॅशनप्रेमी' गृहस्थांची या पदावर वक्रदृष्टि फिरली व त्याला छाट मिळाली ! राजकीय दृष्टीहि या कमिटींतील विशेषतः ब्राह्मणेतर कमिटींतील तपासणी–बहाद्दरांनीं भरपूर चालविलेली दिसते. कारण ज्ञातिनिष्ठेचा धुडगूस सरकारी कृपेशिवाय कसा चालणार ?

"नाहिं संघशक्ती जोर। खातसा म्हणोनी मार ॥
शत्रु जाहला शिरजोर। बेकिच्यामुळें रे॥"

हें कडवें व—

"कशि झाली आजि दैना। सांगु तें मी बोल कोणा ।
ही परकिय सत्ता हाणित लाथा। लोक तसे नादान॥"

हीं दोनहि नामंजूर झालेलीं आहेत. यांत जातिविषयक वाद तर नाहींच; पण राजकीय दृष्ट्याहि त्यांत राजद्रोह नाहीं. या कडव्यांत केलेलीं विधानें आज वर्तमानपत्रांतून व व्याख्यानांतून रोज केलीं जात आहेत. कमिटींतील शिष्टांना गणेशोत्सवाला सोंवळें धार्मिक स्वरूपच राहावें असें वाटत असेल कदाचित. पण हें त्यांचें मत प्रस्थापित करण्यास त्यांना कामिटीवर नेमले असेल असें वाटत नाहीं. समाजांत म्हणावयास कोणत्याहि दृष्टीनें आक्षेपार्ह असें पद गाळावयाचें असा कमिटीचा व्यापक अधिकार मानला तरीहि कमिटीस वरील कडवीं रद्द करण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण स्वतःचीं विशिष्ट मतें चालविण्याचा मोह कमिटीमधील सभासदांस झालेला दिसतो.

परमेश्वराची प्रार्थना करण्याचे अनेक प्रकार आहेत. त्यांपैकीं एक प्रकार "देवा अधर्म माजला अवतार घ्या" हा पौराणिक काळापासून रूढ आहे. ब्राह्मणेतर जातीच्या साधू–संतांनींहि या प्रकाराचा आश्रय आपल्या अभंगांतून केला आहे.

कमिटींतील आधुनिक सुशिक्षितांस कदाचित् हा प्रार्थनेचा प्रकार पसंत नसेल. पण यासाठीं त्यांनीं या स्वरूपाच्या पदांवर नापसंतीचा शिक्का मारणें म्हणजे अधिकाराचा भलताच दुरुपयोग करण्यासारखें आहे.

"उठा गोपालकृष्णा । अवतार झणिं कांहो घ्याना ॥
कली प्रबल झाला । धर्म लोपून गेला । कर्ममार्ग सुटला ।
देवा भारतभूची घालवा दैना ॥
नाहीं विचार आचार । माजला भ्रष्टाकार । सर्व गोलंकार । आज धर्माची ओळख नाहीं कोणा ॥ "

हीं कडवीं नापास झालीं आहेत. आज देवळांतून कीर्तनपुराणादि धर्मोपदेशांतून 'धर्म बुडाला' अशा अर्थाचे उद्गार प्रत्यहीं निघत असतात. ते कोणास मतदृष्ट्या पसंत असोत अगर नसोत. पण त्यांत आक्षेपार्ह व बंदी करण्यासारखें काय आहे ?

लाला लजपतराय यांच्यावरील पुढील पद पाहा. हें नापास झालेलें आहे.

कारुण्याचा सिंधु । शरण कुणा जाऊं वंदू ।
जनतेचा प्रिय बंधु । केंवि दडविला॥
लोकमान्य बाल तिलक । दास वाग्भूसेवक ।
हिंदुधर्म उद्धारक । लाल लपविला ॥
भूषण जो आर्यांचा । शिष्य दयानंदाचा ।
जनक स्वातंत्र्याचा । आजि हरपला ॥
कारागृहीं जरि रुतला । स्वातंत्र्यास्तव लढला ।
जनसेवाव्रत ल्याला । पुत्र शोभला ॥
तन मन धन खर्चे करी । देशास्तव दैन्य वरी ।
स्वार्थत्याग ध्येय धरी । वीर झुंजला ॥
असहकार जरि वरला । प्रतियोगी परि ठरला ।
लोकमान्य आचरला । मार्ग चांगला ॥
राजद्रोही ठरला । मातृभूमीसी मुकला।
परदेशीं न विस्मरला । देश आपुला ॥
देशास्तव जो झटला । अंतिं मुर्दे प्राण दिला ॥
वंदन करुं स्मरुं लाला । धन्य व्हा चला ॥

या सोज्वळ पदांत कमिटींतील नाजुक लोकांना कोठें काय बोंचलें असेल देव जाणे! लजपतराय हे कांहीं ब्राह्मण नव्हते, तर जातिभेदाविरुध्द असलेल्या आर्यसमाजाचे पुरस्कर्ते होते. शिवाय लजपतरायांवर नोकरशाहीच्या पोलिसांनीं केलेल्या घातक हल्ल्याचाहि या पदांत उल्लेख नाहीं. मग या पदामध्यें ब्राह्मणेतर कमिटीला आक्षेपार्ह असें काय दिसलें ?

सन्मित्र समाज मेळ्याचीं रस्त्यावर म्हणत जाण्याचीं दणदणीत पदें पुण्यांतील मुलाबाळांना मुखोद्गत झालीं आहेत. गेलीं दोन वर्षें तीं मंजूर होऊन म्हणण्यांत येत आहेत. पण आज तीं कमिटीच्या जाळ्यांत अडकलीं ! वाटेल त्यावर कांट मारण्याचा सर्वाधिकार मिळालेल्या तपासणी–बहाद्दरांना आज तीं खुपूं लागलीं. हीं पदें अशीं—

( १ ) ऊठ ऊठ भारता। साधि शीघ्र ऐक्यता। जाउनी झणीं करी । मातृभूचि मुक्तता । घाल शत्रु पालथा । पाव बा स्वतंत्रता । सोड सोड सत्वरी । स्वाभिमानशून्यता ॥ जें शिवाजीनें दिलें। स्वामिनीं सुमंत्रिलें । ते निशाण हें तुझें । जगीं विजय पावलें ॥

( २ ) भारतभूमी माता अपुली । परदास्याच्या पंकीं बुडाली । हे आर्यांनों हाक तुम्हाला। मारितसे ही कष्टी अबला ।सत्वरि याहो हाक तियेला। ऐशा या सकटसमयाला ।जय बोलोनी श्रीटिळकांचा। फडकूं दे ध्वज स्वातंत्र्याचा । भगवा झेंडा शिवरायांचा। निजराष्ट्राच्या स्वातंत्र्याचा। श्रीटिळकानें नवरूपानें । सिंहगडावरी निजतेजानें । दिव्य उभारुनि दाविलाना । फिरवा तो तुम्ही दाहि दिशांना ॥

हिंदी भाषेमध्यें तपासणी अगर चौकशी याला 'जांच' हा शब्द रूढ आहे. तोच मराठींतलि अर्थानें कमिटीनें स्वीकारलेला दिसतो. गणेशोत्सवांत आक्षेपार्ह पदे म्हटलीं जाऊं नयेत या दृष्टीपेक्षां गणेशोत्सवाचें स्वरूप अमक्या प्रकाराचें असावें व अमक्या प्रकाराचें नसावें या विशिष्ट मताचा प्रभाव या तपासणींत स्पष्ट दिसतो. नाहीं तर लाला लजपतराय यांच्यावरील पद नामंजूर करण्यास काय कारण होतें ? सरकारनें कमिटीचें काम नक्की काय व तिच्या कार्यक्षेत्राच्या मर्यादा कोणत्या हें कमिटीस ठरवून दिलें पाहिजे, म्हणजे असला गोंधळ माजणार नाहीं. पण सरकारला परभारें लोकांच्या एका राष्ट्रीय स्वरूपाच्या उत्सवांत अशा रीतीनें बिघाड करण्याचें काम सहजासहजीं साधत आहे, तें तें कां सोडील ? राहतां राहिले आपलेच दांत व आपलेच ओंठ ! ते चावून रक्तबंबाळ झाले तरी सरकारला काय पर्वा. कमिटींतील मंडळींनाच शहाणपण सुचेल तेव्हां. आणि तें सुचावें यासाठींच या टीकेच्या मात्रेचे वळसे दिले आहेत.

# सांगलीचें बातमीपत्र

# लोकमान्य टिळक यांचें स्मारक

पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणें रविवार ता.२५-८-२९ रोजीं सकाळीं ८॥ वाजतां सांगली येथील टिळक-स्मारक मंदिरांत लो. टिळकांच्या अर्ध–पुतळयाचा अनावरणसमारंभ वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. माधव रावजी अणे यांच्या हस्तें मोठ्या थाटानें व उत्साहानें साजरा करण्यांत आला. श्री. अभ्यंकर वकील यांनीं श्री. अणे यांना पुतळा उघडण्याविषयीं विनंति केली व आपल्या भाषणांत लो. टिळकांच्या अंगीं वसत असलेल्या अनेक गुणांचें वर्णन मार्मिक रीतीनें करून शेवटीं असें सांगितलें कीं, 'टिळक स्वातंत्र्याच्या काळांत जन्मले असते तर त्यांनीं आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें असतें' असे कै. गोखले यांच्या तोंडचे उद्गार आहेत. त्यावरून लोकमान्यांची योग्यता कळून येईल. श्री. अभ्यंकरांच्या विनंती-प्रमाणें श्री. अणे यांनीं लो. टिळकांच्या अर्ध–पुतळयाचा अनावरणविधि टाळ्यांच्या गजरांत केला. नंतर आपल्या तेजस्वी, खणखणीत व अधिकारयुक्त वाणीनें लो. टिळकांच्या चाळीस वर्षांच्या राजकीय कामागिरीचें रहस्य त्यांनीं जमलेल्या लोकांना उत्तम रीतीनें समजावून सांगितलें.

**श्री. अणे यांचें भाषण**

"अध्यक्षांनीं आजपर्यंत आपण लोकमान्यांचें नामसंकीर्तन निराकार मूर्तीपुढें चालविलें होतें, पण तें यापुढें साकार अशा प्रत्यक्ष मूर्तिपुढें होणार एवढाच काय तो फरक होणार आहे. लोकमान्यांचें प्राच्य विद्येचें ज्ञान, पंचांगांतील संशोधक बुद्धि, आयुर्वेदा-बद्दलचें प्रेम, हरिदासांची परंपरा राखण्याबद्दलचा अभिमान वगैरे सर्व गोष्टी लोकोत्तर होत्या; परंतु त्यांचें खरें मोठेपण त्यांत नव्हतें. त्यांचें खरे मोठे-पण निद्रिस्त हिंदुस्थानांतील जनतेत स्वातंत्र्याची जी लालसा त्यांनीं उत्पन्न केली त्यांत होतें. लो.टिळकांना साऱ्या जन्मभर जर कशाची लाज वाटली असेल तर ती आपला देश पारतंत्र्यांत खितपत पडला आहे या एकाच गोष्टीची होय. आणि त्या-करितां सतत चाळीस वर्षेपर्यंत त्यांनीं अहर्निश खटपट करून स्वातंत्र्याचा पुकारा केला व आपल्या पिढीला मार्ग मोकळा करून दिला. स्वातंत्र्याकरितां झगडत असतांना त्यांच्यावर ज्या आपत्ती आल्या त्या इंद्रानें पाठविलेल्या मोहक आपत्ती नसून राक्षसांनीं निर्माण केलेल्या आपत्ती होत्या. स्वातंत्र्यप्राप्तीकरितां त्यांनीं अस्तित्वांत असलेल्या राजसत्तेशीं झगडा सुरू केला. राजसत्ता अगर राजकारण जनतेच्याच सल्ल्यानें चाललें पाहिजे अशी जनतेंत त्यांनीं विचारक्रांति घडवून आणिली. बंगालच्या फाळणीचे वेळीं मोती-लालबाबू व पालबाबूंचे सहाय्यानें 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' ह्या महामंत्राची जेव्हां घोषणा केली त्या वेळीं दादाभाई नौरोजींसारख्या वयोवृध्द पुढाऱ्यांनाहि 'स्वराज्य हें हिंदुस्थानाचें ध्येय आहे' असें जाहीर करावें लागलें. लोकमान्यांनीं १४ वर्षें केलेल्या चळवळीमुळें १९१४ सालीं महायु-ध्दाचे वेळीं याच सरकारला आमचा स्वराज्याचा हक्क कबूल करावा लागला. होमरूलच्या प्रचंड चळ-वळीमुळें पार्लमेंटातर्फे खुद्द बादशहांना 'हिंदु स्वराज्याची आकांक्षा पुरवणें हेंच ब्रिटिश सरकारचें ध्येय आहे' असें जाहीर करावें लागलें. 'स्वराज्य तुमचे, माल तुमचा, आम्ही फक्त रक्षक आहों' ही कबुली बादशहांना द्यावी लागली. हेंच लोकमान्यांचें खरें कार्य होय. लोकमान्यांची स्वराज्याची कल्पना प्रातिनिधिक स्वरूपाची होती, व्यक्तिगत स्वराज्याची नव्हती. लोकमान्य व्यक्तिगत स्वतंत्र राज्य स्थापण्याच्या कल्पनेचे नव्हते. जी सत्ता आज राज्य करीत आहे तिचेंच रूपांतर लोकसत्तेंत घडवून आणावयाचें हा लोकमान्यांचा मार्ग होता. ब्रिटिश सरकार जें यंत्र निर्माण करील त्या यंत्रांतील परकीयत्व काढून टाकून त्यांतच स्वकीयत्व निर्माण करावयाचें हेंच तत्त्व लो. टिळक यांचे होतें. लोकमान्यांना माहीत होतें कीं, सरकार हें सत्तेचें लोलुप आहे. सत्तेच्या एकेक अंशाचा त्याग करावयास सरकारास भाग पाडावयाचें म्हणजे कित्येकांना आपल्या जीविताचा त्याग करावा लागेल आणि म्हणूनच त्यांनीं अलौकिक स्वार्थत्यागाची तयारी केली होती. स्वराज्यमंदीर गांठण्याच्या मार्गाबद्दल मतभेद असोत, पण लोक-मान्यांच्या एका गुणाकडे सर्वांनीं आपलें लक्ष द्यावें. तो म्हणजे निर्भय वृत्ति हा होय. स्वतःच्या मताच्या सयुक्तिकपणाचा दृढ विश्वास त्यांना वाटत होता. हा विश्वासच निर्भयपणा निर्माण करीत असतो. असल्या निर्भय वृत्तीनें संस्थानी प्रजेनें व खालसांतील प्रजेनें एक-

मेकांला साहाय्य करून स्वराज्याचा मार्ग आक्रमण करावयास लागावें, म्हणजे लवकरच स्वराज्याचें ध्येय दृष्टिपथांत येईल."

### चित्रकार फडके यांचा गौरव

श्री. अणे यांचे भाषण संपल्यावर रा. रा. विठ्ठलराव जोशी यांनीं श्री. अणे यांचे व मुंबईचे श्री. फडके आर्टिस्ट यांचे व एकंदर समारंभ यशस्वी होण्याला ज्यांनीं झटून मदत केली त्या सर्वांचे स्मारक कमिटीतर्फे मनःपूर्वक आभार मानले. श्री. फडके आर्टिस्ट यांचे आभार मानतांना रा. जोशी यांनीं सांगितलें कीं, " श्री. फडके यांनीं हा पुतळा केवळ पैशाच्या लोभानें बनविला अशी जर कोणाची समजूत असेल तर ती अगदीं चुकीची आहे. त्यांनीं हा पुतळा टिळकांच्या फोटोवरून तयार केला नसून त्यांचे हयातींत त्यांना समोर बसवून त्यांचे स्केच घेऊन बनविलेला असल्यामुळें इतका हुबेहूब साधला आहे. इतर शिल्पकारांनीं सांगितलेल्या किंमतीपेक्षां कमी किंमतींत हा पुतळा श्री. फडके यांनीं केवळ हौसेनें येथील स्मारककमिटीला दिला याबद्दल ते विशेष स्तुतीस पात्र आहेत. श्री. फडके हे आजच्या समारंभास हजर असते तर फार चांगले झालें असतें." इतकें बोलून रा. रा. जोशी यानीं श्री. फडके यांचेतर्फे मुंबईहून आलेल्या गृहस्थांना त्यांच्या या उपकृती-बद्दल अल्पसें पारितोषिक म्हणून एक जरीचें वस्त्र व चांदीचें तबक अर्पण करण्यास श्री. अणे यांना विनंति केली. खेरीज इतर काम करणाऱ्या मंडळीं-नाहि बाक्षिसें वांटण्यांत आल्यावर मुंबईचे श्री. गणपतराव पागे यांनीं श्री. फडके यांनीं पाठविलेला अर्धे पुतळ्याचा फोटो श्री. अणे यांना श्री. फडके यांचेतर्फे नजर केला. नंतर स्तुतिपर पदें म्हणण्यांत आलीं व हारतुरे, अत्तरगुलाब व पानसुपारी झाल्यावर हा अपूर्व समारंभ आटोपला.

## पंडित कन्हैयालाल यांच्या सूचना

संमतिवयाच्या कमिटीचे उपाध्यक्ष न्याय-मूर्ति पं. कन्हैयालाल एम. ए. एलएल. बी. अलाहाबाद हायकोर्टाचे माजी न्यायाधीश, यांनीं रिपोर्टाला एक विस्तृत भिन्नमतपत्रिका जोडली आहे. तिच्या शेवटीं त्यांनीं आपल्या सूचनांचा थोडक्यांत गोषवारा दिला आहे. तो असा.

१ विवाहाच्या वयाची किमान मर्यादा ठरवून देणाऱ्या कोणत्याहि कायद्यांत अशी सवड ठेवावी कीं, जेथें एखाद्या मुलीच्या भावी हिताच्या, सुखाच्या, कल्याणाच्या अथवा सुरक्षिततेच्या दृष्टीनें तिचा विवाह कायद्यांतील वयोमर्यादेच्या आधीं होणें अत्यंत जरूरीचें वाटेल तेथें त्या मुलीच्या पालकांच्या अर्जावरून त्यांना तिचा विवाह किमान वयाच्या आधीं करण्यास परवानगी देण्याचा अधि-कार डिस्ट्रिक्ट जज्जास असावा.

२ डिस्ट्रिक्ट जज्जानें कायद्याची मर्यादा बाजूस सारून अशा विवाहास परवानगी द्यावयाची झाल्यास त्या जज्जाला सदर मुलीच्या सुरक्षिततेबद्दल नवऱ्यापासून तिला दूर राखण्याबद्दल आणि कायदे-शीर वय होईपर्यंत त्या मुलीचा सांभाळ करण्या-बद्दल पालकाकडून जामीन घेण्याचा अधिकार असावा. आणि त्या जामिनाच्या अटींत जरूरी-प्रमाणें त्यास फेरबदल करण्याची सत्ता असावी.

३ ज्या डिस्ट्रिक्ट जज्जाकडे अशी परवानगी देण्याविषयीं अर्ज केला गेला असेल त्या जज्जा-कडून जो निर्णय दिला जाईल त्यावर त्या जज्जाच्या संमतिविना अपील करण्याची मुभा नसावी.

४ 'वैवाहिक दुर्वर्तना'च्या कलमाखालीं येणारे नवे खटले चालविण्याकरितां शक्य व सोईस्कर असेल तेथें आणि एक सर-न्यायाधीश व दोन जस्टिसेस ऑफ धी पीस यांचें 'मॅट्रिमोनिअल' नेमलें जावें. या कोर्टाचें अधिकारक्षेत्र सरकारनें ठरवून द्यावें. या कोर्टाच्या सर न्यायाधीशाची जागा सेशन्स जज, अथवा ॲडिशनल किंवा असिस्टंट सेशन्स जज या हुद्द्याच्या अधिकाऱ्यासच देण्यांत यावी.

५ नवऱ्याच्या 'वैवाहिक दुर्वर्तना' मुळें बायकोचा मृत्यु घडून आल्यास त्या गुन्ह्याबद्दल जास्तींत जास्त शिक्षा सात वर्षे सक्त किंवा साधी कैद ही असावी व दंडहि घेण्यांत यावा.

६ जेथें 'वैवाहिक दुर्वर्तना' मुळें मृत्यु घडून आला नसेल तेथें शिक्षेची कमाल मर्यादा दोन वर्षांची कैद किंवा नुसता दंड किंवा कैद व दंड अशी असावी.

७ ज्या 'वैवाहिक दुर्वर्तना'च्या गुन्ह्यामुळें मृत्यु घडला नसेल त्या गुन्ह्यांच्या बाबतींत कोर्टाच्या परवानगीनें आपसांत तडजोड करण्याला कायद्यानें सवड ठेवली जावी.

विवाहाची किमान वयोमर्यादा १४ आणि विवा-हित स्त्रीच्या संमतीची वयाची मर्यादा १५ असावी असा दोहोंत फरक असूं नये असें मला वाटत होतें. कारण त्यामुळें खासगी स्वरूपाच्या गोष्टींत

उगाच हात शिरकावला जातो. परंतु विवाहाची मर्यादा १५ पर्यंत वाढविणे अगर संमतीची मर्यादा १४ पर्यंत उतरविणें शक्य वाटेना, आणि जुन्या मताच्या लोकांना १४ वर्षांची मर्यादा अंगवळणीं पडणें देखील कठीण जाईल हें जाणून आणि विवाह व गर्भाधानविधि यांच्यांत हल्लीं देखील थोडाबहुत अवधि जातो हे लक्षांत घेऊन या दोहोंत एक वर्षाचे अंतर राहू देण्यास मी संमति दिली.

# फरारी अफगाण राजपुत्र

अलाहाबाद येथून गेल्या डिसेंबर महिन्यांत अफगाणिस्थानाचे एक राजपुत्र महमद उमरखान हे एकाएकीं नाहींसे झाले. अफगाणिस्थानांत त्याच वेळीं माजलेला घोटाळा व महमद उमरखान हे एकाएकीं अदृश्य होणे या दोन गोष्टींचा साहजिकच संबंध जोडला जाऊं लागला. परंतु आतां उमरखान हे स्वतः फिरून इंग्रज सरकारच्या स्वाधीन झाले असून त्यांनीं आपली हकीकत कलकत्त्याच्या 'स्टेट्समन' पत्रांत मुलाखतीच्या रूपानें प्रसिद्ध केली असल्यामुळें ती वाचून देशांत बरीच खळबळ उत्पन्न होणार आहे. उमरखान हे वयानें अगदी तरुण आहेत. त्यांचा मुक्काम अलाहाबाद येथेंच होता. ता. १६ डिसेंबरपर्यंत अलाहाबाद सोडन अफगाणिस्थानांत पळून जाण्याचा त्यांचा बेतहि नव्हता. पण त्याच सुमारास अमानुल्ला यांस बच्चाच्या फौजेने वेढलें असल्याची बातमी उमरखान यांनीं वाचली. व या गडबडींत आपलें नशीब निघालें तर पाहावें असें त्यांनीं ठरविलें. पण हिंदुस्थान सोडण्याची गोष्ट सोपी नव्हती. अलाहाबाद येथील त्यांच्या घरावर गुप्त पोलिसांची पाळत होती. मधून मधून एक फकीर त्यांच्या घरीं भीक मागण्यास येत असे. तो गुप्त पोलीस असावा अशी उमरखान यांची खात्री होती. त्याची पाळत चुकविण्याकरितां त्यांनीं एक युक्ति योजिली. त्यांनीं १९ डिसेंबर रोजीं सकाळीं आपल्या भावास त्याजबरोबर गप्पा मारण्यासाठीं पाठवून दिले. भावाच्या हातांत एक औषधाची बाटली होती. त्याने फकीरास सांगितलें कीं माझा भाऊ आजारी व अंथरुणांत पडून आहे. त्यास मी औषध घेऊन जात आहे. तेवढें निमित्त फकीरास पुरले व त्यानंतर आपण त्यास कांहीं दिवस न दिसलों तर तो आपली चौकशी करणार नाहीं अशी उमरखान यांची खात्री झाली.

उमरखान नेहमीं इंग्रजी पेहराव करीत असत. पण त्या रात्रीं त्यांनीं आपला तो पोषाक काढून ठेवून अफगाण तऱ्हेच्या पोषाकाच्या चिंध्या पांघरल्या. त्या पोषाकांत ते काबुली फेरीवाल्यासारखे शोभूं लागले व अशा रीतीनें त्यांनीं घर सोडलें. अलाहाबाद स्टेशनावर ते गेले तर लोक ओळखतील या भीतीनें ते शहराबाहेर ११ मैल टांग्यांत बसून मनौरी स्टेशनावर गेले. तेथें गाडींत बसून त्यांनीं लाहोरची वाट धरली. त्यांना गाडींत एक ओळखीचा अफगाण भेटला. तो त्यांजबरोबर अफगाणिस्थानांत येण्यास कबूल झाला. आणि हे दोघे मिळून पेशावर येथे पोहोचले. पेशावरास एक टांगा केला. टांग्यांत बसून शाब्कदार या सरहद्दीवरील गांवीं ते पोंचले. तेथून पुढचा प्रवास पायींच करून ते मोहमंड प्रांतांत शिरले. तेथून एक आठवडा रात्रीं झाडाखालीं निजणें व दिवसा पायीं चालणें हा त्यांचा क्रम होता. ते थंडीचे दिवस, यामुळें त्या उभयतांचे फार हाल झाले. जलालाबादेच्या पलीकडे शामरूदेखानाचा किल्ला त्यांस लागला. या ठिकाणीं अहमद अलमखान व शिनवारी टोळीचे इतर कित्येक प्रमुख त्यांस भेटले. हीच टोळी अमानुल्लाचे विरुद्ध प्रथम उठली होती. उमरखान यांचा आजा अमीर शेरअलीखान व बाप सरदार अयाबखान या दोघांना स्मरून शिनवारी लोक आपणास अफगाणिस्थानाचा अमीर म्हणून कबूल करतील अशी त्यांस खात्री होती, व त्याप्रमाणें त्यांनीं त्यांजपासून कुराणाची शपथहि घेतली. पण इतक्यांत तुम्ही गडबड करूं नका, अली अहमदजान यांच्या सैन्यानें जलालाबाद व्यापून टाकिली आहे व तो शिनवारी लोकांचा जिरगा भरवीत आहे, त्यांजपासून पैसाअडका व हत्यारपात्यार आम्ही मिळवतो व मग तुमच्या बाजूने उठतों असें त्यांनीं उमरखान यांस आश्वासन दिलें. पण हें आश्वासन जागच्या जागीं राहिले. नंतर त्यांनीं काबूलकडे जाण्याचा बेत केला व ते तालुखेल येथें पोंचले.

अलमखान आपणास मदत करील अशी १९ जून. नहि त्यांस आशा होती, पण ती खोटी ठरली. कारण अलमखान यास बच्चापासून साठ हजार रुपयांची रोकड, हत्यारें व दारूगोळा मिळून तो बच्चास सामील झाला होता. तालुखेल येथें बसून उमरखान यांनीं गिलझाई लोकांशीं बोलणें सुरू केले, पण तेंहि वांया गेलें. तेथून ते हसराक येथें आले. व अबदुल रहिमानखान याजपाशी मदत मागूं लागले. पण बच्चाने अबदुल रहिमानास १० हजार रुपये देऊन आपल्या बाजूस मिळवून घेतलें होतें. उमरखान यांनी मग अजुईमंगल येथें पन्नास

मलिकांचा बडा जिरगा भरविला. त्यांनीं अनुकूलता दर्शविली. पण आतां आपण गादीसाठीं खटपट केली तर रक्तपात अधिक होईल, यासाठीं तसें करणें बरें नव्हे असें ठरवून त्यांनीं इंग्रजांच्या स्वाधीन होण्याचा बेत केला! निघतांना त्यांनीं नादीरखानास एक पत्र लिहिलें व त्याच्या कार्यास यश चिंतिलें. ते पुनः रखडत सरहद्दीवर आले. गेल्या शुक्रवारीं ते कुर्रम येथे पोहोंचले व ब्रिटिश पोलिटिकल एजंटाच्या बिनशर्त स्वाधीन झाले. उमरखान यांच्या मतें अफगाण लोकांतील फाटाफूट हेंच सांप्रतच्या घोटाळ्याचें कारण आहे. परराष्ट्रांपैकीं रशिया मात्र अफगाणिस्थानाच्या कारभारांत ढवळाढवळ करीत आहे. अशा स्थितींत एका राजाच्या ताब्यांत सगळा अफगाणिस्थान येण्याचीं चिन्हें तूर्त तरी त्यांस दिसत नाहींत.

# तडजोडीसाठीं दोन डगरींवर हात!

कारण कोणतेंहि असो, सरकारला ब्राह्मण वर्ग स्वभावतःच अप्रिय; त्यामुळें कोणत्याहि मोठ्या महत्त्वाच्या अधिकारावर ब्राह्मणाची नेमणूक सरकार सहसा करीत नाहीं. परंतु सरकारला जेव्हां समाजाच्या मताविरुद्ध एखादी अप्रिय गोष्ट घडवून आणावयाची असते त्या वेळीं ब्राह्मणांची अप्रियता हाच गुण ठरतो. कारण समाजाला अप्रिय असलेली गोष्ट परभारें ब्राह्मणांकडून करवून घेण्यानें, पाहुण्याकडून साप मारविल्याप्रमाणें होऊन स्वतः सरकारच्या लोकप्रियतेला प्रत्यक्ष धक्का बसत नाहीं. अशाच विचारामुळें असो अगर अन्य काहीं कारणामुळें असो, संमतिवयाच्या बिलासंबंधानें चौकशी करणाऱ्या कमिटीवर सरकारनें सर मोरोपंत जोशी यांची अध्यक्ष म्हणून नेमणूक केली. त्या कमिटीच्या मुख्य शिफारशी व भिन्नमतपत्रिका मागील अंकांत दिल्या आहेत. त्यावरून वाचकांच्या हें लक्षांत आलेंच असेल कीं, सर मोरोपंत जोशी यांनीं ही नाजूक जबाबदारी मोठ्या कौशल्यानें पार पाडली आहे.

मृदंगाला ज्याप्रमाणें दोहोंकडून मार बसतो त्याप्रमाणें या रिपोर्टावर सुधारक व दुर्धारक या उभयतांकडून हल्ले चढविले जाणार हें निश्चित आहे. डॉ. गौरप्रभृति सुधारक म्हणणार, 'विवाहाव्यतिरिक्त बाबतींत संमतीचें वय जसें १८ ठेविलें तसेंच तें वैवाहिक संमतीलाहि कां ठेविलें नाहीं? तेथें वयाची मर्यादा १५ ही अगदींच अपुरी आहे. ती निदान १६ तरी ठेवावी, आणि संमतीच्या वयाची मर्यादा जर १८ किंवा १६ ठेवावयाची तर मग विवाहाची वयोमर्यादा १४ ठेवून कसें चालणार? तीहि १८ पर्यंत किंवा निदान १६ पर्यंत तरी ठेवावयास हवी. यास्तव जोशी कमिटीचा रिपोर्ट आम्हांस नाकबूल!'

याच्या उलट कट्टर सनातन मतानुयायांची तक्रार अशी कीं, 'वैवाहिक संबंधांत संमतीचें वय हल्लीं १३ आहे तें एकदम दोन वर्षांनीं वाढविणें म्हणजे घोर अपराध होय. पण विवाहाच्या वेळच्या मुलीच्या वयाची किमान मर्यादा कायद्यानें १४ ठरविणें हा तर धर्मावर भयंकर घालाच होय! धर्माच्या बाबतींत ढवळाढवळ करावयाची नाहीं असें जें सरकारचें वचन आहे त्या वचनाला या बिलानें हरताळ फासला जाणार असल्यामुळें सरकारनें शारदा बिलाचा विचारच करूं नये आणि बिलच गेलें म्हणजे जोशी कमिटीच्या सूचनांच्या युक्तायुक्ततेचा विचारहि करण्याचें कारण नाहीं!

परंतु अशा नुसत्या विरोधाच्या देखाव्यानें कांहीं हा प्रश्न सुटूं शकत नाहीं. त्यांतला कोणता व केवढा भाग आपल्याला असंमत आहे व त्याच्या जागीं दुसरी कोणती योजना करावयास पाहिजे असें जर कोणी नेमकें सांगूं शकेल तरच त्याचें म्हणणें थोडें तरी विचारार्ह ठरेल. या दृष्टीनें जोशी कमिटीच्या शिफारसींचें पृथक्करण केल्यास त्यापासून काय निष्पन्न होतें तें पाहूं. विवाहसंबंध नसलेल्या स्त्रीच्या संमतीची मर्यादा १८ वर्षें असावी असें जें कमिटीनें आपलें मत दिलें आहे त्याला कांहीं कोणाचा विरोध असेल असें वाटत नाहीं, सबब तो मुद्दा वादातीत म्हणून सोडून देऊं. विवाहित स्त्रीच्या संभोगाला वयाची कांहीं तरी अट असावी का नसावी असाच रोकडा प्रश्न विचारल्यास त्याचेंहि उत्तर बहुतेक अस्तिपक्षींच येईल आणि या बाबतींत यापूर्वींच पिनल कोडानें मर्यादा घालून ठेवून स्वतःकडे तो अधिकार घेतलाहि आहे. तेव्हां कायद्यानें तसा अधिकार घेणें न घेणें हा आजच्या वादाचा तरी मुद्दा होऊं शकत नाहीं. हें वय किती असावें एवढाच काय तो खरा वादग्रस्त प्रश्न. त्यांत हल्लींच्या कायद्यानें तें वय १३ वर्षांचें ठरविलें असल्यानें त्याच्या अलीकडे ती मर्यादा येऊंच शकत नाहीं. आणि कमिटीनें ती १५ ठरविली असल्यामुळें त्याच्या पलीकडेहि ती जाणार नाहीं असें धरून चालण्यास हरकत नाहीं. अशा रीतीनें वैवाहिक संबंधांत संमतीचें वय १३, का १४ का १५ एवढाच काय तो वादाचा मुद्दा

राहिला. त्यांत ज्याला जें काय योग्य वाटेल तें त्यानें सुचवावें, पण तेवढ्यासाठी संबंध बिलावर चरफडावयाचें किंवा सरकारनें धार्मिक गोष्टींत हात घातला म्हणून जळफळाट करावयाचें कांहीं कारण नाहीं.

संमतिवयाच्या वादाचें क्षेत्र इतक्या संकुचित मर्यादेंत आणून ठेवल्यानंतर आतां कमिटीनें विवाहाच्या वयाची जी मर्यादा सुचविली आहे तिजकडे वळूं. या बाबतींत मात्र वादाला सगळेंच रान मोकळें आहे. विवाह हा धार्मिक विधि असल्यानें विवाहाचे वेळीं वधूवरांचें वय किती असावें हें ठरविणार सरकार कोण अशा अर्थाच्या ' प्रथमग्रासे मक्षिकापाता ' च्या स्वरूपाच्या आक्षेपापासून तों वधूचें वय किमानपक्ष १८ असावें असें म्हणणाऱ्या कट्टर सुधारकापर्यंत प्रत्येकाला आपापल्या परीनें आक्षेप घेण्यास येथें जागा आहे. पण आम्हास तूर्त कमिटीनें केलेली शिफारस कशी अव्यवहार्य आहे एवढेंच दाखवावयाचें असल्यानें, इतर आक्षेपांचा समाचार पुनः केव्हां तरी घेऊं असें म्हणून, कमिटीच्या सूचनेकडेच वळणें प्राप्त आहे. विवाहाच्या वेळीं वधूचें वय कमींत कमी १४ वर्षांचें असावें आणि संभोगसंमतीच्या बाबतींत तें कमींत कमी १५ वर्षांचें असावें असा दुहेरी अभिप्राय कमिटीनें नमूद केला आहे. कमिटीच्या विचारमालिकेंत जर कोणता दुवा अत्यंत कच्चा असेल तर हा दुहेरी अभिप्राय होय. संभोगाच्या बाबतींत जर वयाची किमान मर्यादा १५ ठेवतां तर मग १४ वे वर्षी विवाहाला तरी कायदेशीर संमति कां देतां असें एकीकडून कमिटीला विचारण्यांत येईल, तर त्याचबरोबर विवाहाला जर १४ ही किमान मर्यादा पुरेशी वाटते तर समतीला देखील तीच मर्यादा पुरे असें कां म्हणत नाहीं असें दुसरीकडूनहि तिला विचारतां येईल. चौदा वर्षांची वधू आणि सामान्यतः २० ते २५ वर्षांचा वर यांचा विवाह जर तुम्ही कायद्यानें बिनधोक मान्य करतां तर त्यांच्या वैवाहिक संबंधाला त्यापुढें एक वर्षाच्या मुदतीची अट घालून ठेवणें हें नैतिक दृष्ट्या व मानवी स्वभावाच्या दृष्टीनेंहि विपरीत नव्हे काय ! चौदाव्या वर्षी विवाहाचा मार्ग कायद्यानें मोकळा ठेवून प्रत्यक्ष संबंध बेकायदेशीर ठरविणें म्हणजे वधू-वरांना असिधाराव्रत करावयास लावणें नव्हे काय? "युवा युवत्या सार्धं यद् मुग्धभर्तृवदाचरत्। अंतर्निवृत्तसगः स्यादसिधाराव्रतं हि तत्" अशीच असिधाराव्रताची व्याख्या आहे. अर्थातच १४ ते १५ वर्षांच्या वधूचा विवाह कायदेशीर पण शरीरसंबंध बेकायदेशीर ठरविणाऱ्या कमिटीच्या मनांत एकीकडून विवाहाचें वय अधिक न वाढविल्याबद्दल पुराणमतवाद्यांकडून शाबासकी मिळवावी आणि दुसरीकडून संमतिवय १५ ठेवल्यामुळें आपोआपच विवाहाचें वय १५ पर्यंत वाढतें असें म्हणून सुधारकांकडूनहि आपली पाठ थोपटून घ्यावी अशी महत्त्वाकांक्षा उद्भूत झाली असेल. पण तिची ही योजना अव्यवहार्य आणि वधूवरांच्या व त्यांच्या पालकांच्या डोक्यावर सदोदित तलवार टांगल्याप्रमाणें जाचक असल्यानें ती कोणासच पसंत पडावयाची नाहीं. जोंपर्यंत संमति बिलांतील वय १२–१३ च्या पुढें गेलें नव्हतें तोंपर्यंत कायद्यांत तें कलम असून नसून सारखेंच होतें. परंतु आतां तुम्ही जर एकदम १५ पर्यंत उडी मारणार तर या कलमाखालीं खटल्यांचा धुमाकूळ माजेल; अशा वेळीं विवाहाचें वय १४ आणि संमतीचें वय १५ ठेवणें म्हणजे तर माकडाच्या हातीं कोलीत देण्यासारखेंच होणार आहे. कारण विवाहाच्या वेळीं वय १५ असलें तरी तें १४च होतें असें गृहीत धरून खासगी द्वेषानें सूड उगवूं पाहाणाऱ्यांना आयतेंच फावेल. यायोगानें खासगी नाजूक गोष्टींत नाक खुपसण्यास तिऱ्हाइतासहि संधि सांपडेल. याकरितां विवाहाचा काल व संमतिवयाचा काल यांत असें अंतर ठेवणें श्रेयस्कर नाहीं व व्यवहार्यहि नाहीं.

असें अंतर न ठेवतां दोहोंची एकच वयोमर्यादा ठेवावयाची असल्यास ती कोणती ठेवावी ? चौदा का पंधरा हा काय तो अखेरचा कडाक्याच्या वादाचा मुद्दा राहणार. आणि असेंब्लींतहि याच मुद्द्यावर रणें माजणार. या बाबतींत आजच्या हिंदी समाजाची परिस्थिति, त्याच्या धार्मिक भावना आणि सरकारी कायद्याची पोलीसकडून होणारी बजावणी यांचा विचार करतां ही वयोमर्यादा १५ ठरविण्यापेक्षां तूर्त तरी १४ च ठरवावी असें आम्हास वाटतें. कमिटीनें विवाहाची मर्यादा १४ असावी हें मान्य केलेंच आहे. आणि विवाहित स्त्रीशीं १५ वर्षांपूर्वी पण १४ वर्षांनंतर होणारा शरीरसंबंध हा गुन्हा मानला असला तरी त्याला शिक्षा अगदींच सौम्य ठेवली आहे. यावरून संमतीचें वय १४ मान्य करण्यास कमिटी फारसें आढेवेढे घेईल असें वाटत नाहीं. विवाहित स्त्रीच्या संमतीचें वय १४ हें कायद्यानें ठरवून तत्पूर्वीं होणाऱ्या संभोगाबद्दल जबर शिक्षा ठेवून त्याची कडक बजावणी करावयाची असें जर सरकारनें ठरविलें आणि तसा अनुभव येऊं लागला तर १४ वर्षांच्या आधीं विवाह करून मग विषाची परीक्षा पाहण्यापेक्षां विवाहच १४ वर्षांपर्यंत पुढें ढकला अशी समाजांत साहजिकच प्रवृत्ति होईल. हल्लींच सुशिक्षित समाजांतले शेकडा ७५ विवाह चौदा वर्षांच्या पुढें होऊं लागले आहेत आणि काशीच्या ब्राह्मण–महासभेच्या ठरा-

वाची मुक्तकंठानें स्तुति करण्याचें कोणी कितीहि अवडंबर माजविलें तरी तसल्या सभेंत देखील वृषलीपती, वृषलीपिते आणि वृषलीपुत्र यांचाच भरणा अधिक असतो. असल्या वृषलीपितापतिपुत्रादिकांनीं 'अष्टवर्षा भवेत्कन्या' इत्यादि वचनांचें प्रामाण्य समाजास पटवून देण्यासाठीं कितीहि कठशोष केला तरी समाजाचें पाऊल कोणत्या दिशेनें पुढें पडत आहे हें सर्वजण जाणून असतात. सांगण्याचा मतलब एवढाच कीं, वैवाहिक संमतिवयाची मर्यादा जोंपर्यंत १२ वर्षेंच होती तोंपर्यंत त्या कायद्याचा विवाहाच्या वयोमर्यादेवर फारसा परिणाम झाला नाहीं. पण ही मर्यादा १४ पर्यंत वाढविली आणि त्याची बजावणी कडक रीतीनें चालविली म्हणजे आपोआपच विवाहाचें वय १४ वर्षांपर्यंत येऊन भिडेल. अर्थातच जी गोष्ट पर्यायानें पण निश्चितपणें घडणारी आहे त्या गोष्टीकरितां निराळा कायदा करून जन्मनोंदीचें व विवाहनोंदीचें एवढें अवडंबर माजविण्याची आणि धार्मिक गोष्टींत हात घातल्याचा आरोप स्वतःवर ओढून घेण्याची जरूरी काय? संमतिवयाची मर्यादा १४ ठरवून त्याचा परिणाम काय होतो तो आधीं पाहून त्यानें जर इष्ट कार्यभाग साधला नाहीं तरच त्यानंतर विवाहाच्या वयाचें प्रत्यक्ष बंधन घालण्याच्या कायद्याचा विचार करणें श्रेयस्कर ठरणार नाहीं काय ?

# महाराष्ट्रीय मंडळ व शारीरिक शिक्षण कमिटी

**मुंबई**—सरकारनें नेमिलेल्या शारीरिक शिक्षण कमिटीचा अहवाल नुकताच प्रसिद्ध केला आहे. कमिटी पुण्यास आली असतांना तिनें पुणें महाराष्ट्रीय मंडळाच्या व्यायामशाळेस भेट दिली होती. त्या वेळीं कमिटीच्या सभासदांनीं मंडळाचें कार्य प्रत्यक्ष पाहिलें. व त्याचा उल्लेख कमिटीनें आपल्या रिपोर्टांत पुढीलप्रमाणें केला आहे:—

"शारीरिक शिक्षण कमिटीचे सभासद श्री. ल. ब. भोपटकर यांच्या देखरेखीखालीं महाराष्ट्रीय मंडळानें चालविलेला आखाडा मध्यविभागातील व्यायामसंस्थांत नमुनेदार आखाडा आहे. मंडळांत दंड, नमस्कार, बैठक, मल्लखांब, कुस्ती, लाठी, लकडी, लेजीम, फरीगदगा, पट्टा, जंबिया, भाला, पोहणें, सिंगल व डबल बार, स्क्वाडड्रिल, व फिजिकल ड्रिल वगैरे खेळ शिकविण्यांत येतात. पटावर ३०० विद्यार्थी असून रोज सरासरीनें २०० विद्यार्थी व्यायाम घेण्यास येतात. मंडळाचें एक भव्य मैदान असून हवाशीर अशा दोन इमारती संस्थेनें बांधिल्या आहेत. विद्यार्थ्यांचे तीन विभाग आहेत—(१) अर्भकें (२) बालकें व (३) मोठीं मुलें या सर्वांना विशिष्ट अभ्यासक्रम आंखून दिला आहे. शिक्षण सामुदायिक व वैयक्तिक दिलें जातें. सामुदायिक शिक्षण देण्यास दर ५०-१०० विद्यार्थ्यांवर एक अगर दोन शिक्षक पुरे होतात. जुने विद्यार्थी लहान मुलांना शिकविण्यास उपयोगी पडतात. विद्यार्थी सकाळीं व सायंकाळीं शिकण्यास जातात. मैदान इमारती उपकरणें शिक्षकांचा पगार वगैरेखेरीज इतर खर्च फार कमी आहे. इतर संस्था व ही संस्था यांमध्यें वैशिष्ट्य असें आहे कीं, या संस्थेंत विद्यार्थ्यांचें दरमहिना वजन मोजमाप घेण्यांत येतें व नियमितपणें त्यांची वैद्यकीय तपासणी करण्यांत येते.

क्रमिक पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम संस्थेनें केला आहे. व श्री. ल. ब. भोपटकर यांनीं 'दांडपट्टा' नांवाचें मराठी व 'फिजिकल कल्चर' नांवाचें इंग्रजी अशीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. मंडळातर्फे लवकरच फिजिकल ट्रेनिंग कॉलेज काढण्यांत येणार आहे असें आम्हास सांगण्यांत आलें; ही संस्था रजिस्टर्ड झाली असून ती एक मध्यवर्ती संस्था होईल अशी आशा आहे.

# बंगालची हिंदू परिषद

डाक्का येथें गेल्या महिन्याच्या अखेरीस भरलेल्या बंगाल प्रांतिक हिंदू परिषदेची हकीकत आज दुसरीकडे सविस्तर दिली आहे. जन्मानें हिंदु असूनही जे हिंदुसंघटनेच्या चळवळीकडे तिऱ्हाइती दृष्टि चालवितात किंवा स्वत्वाचा पीळ नसलेल्या ज्यांच्या उदासीन वृत्तीला राष्ट्रीयत्वाचें सोयीचें पांघरूण घ्यावेसें वाटतें अशांना या परिषदेसंबंधीं केवळ एक चालचलाऊ टीकाविषय यापेक्षां अधिक महत्त्व वाटत नसेल, पण हिंदुसंघटनेच्या कार्याची गेल्या कांहीं वर्षांतील प्रगति जिव्हाळ्याने न्याहाळणारे व यथाशक्ति त्या कार्यास हातभार लावणारे असे हिंदूच सुदैवानें आज बहुसंख्य आहेत. त्याना या परिषदेचे महत्त्व उमगल्याशिवाय राहणार नाही. हिंदुसंघटनेच्या संदेशाची व संचालनाची आज ज्या ठिकाणी विशेष जरूरी आहे अशा विभागांपैकींच पूर्वबंगाल हा एक विभाग होय. 'स्त्रियांची अब्रू का स्वराज्य ?' असा पेंच आल्यास मी स्त्रियांची अब्रू अगोदर सांभाळीन अशा अर्थाचे रामानंद चतर्जी यांनी सुरतेस काढलेले उद्गार मुख्यत: पूर्वबगाल्यांतील अनुभवावरूनच सुचलेले असले पाहिजेत. पण हा पेंचहि काल्पनिक म्हणूनच रामानंदांना मांडला होता. कारण ज्या लोकांना आपल्या स्त्रियांचें संरक्षण करतां येत नाहीं त्यांनीं व ज्यांच्यांत स्त्रियांना पळविण्याचा समाजविघातक रानवटपणा आहे त्यांनींहि आधुनिक काळांतील खरें लोकसत्तात्मक स्वराज्य स्थापन करणें ही गोष्टच अशक्य कोटींतील होय. स्त्रियांच्या संरक्षणासारख्या हिंदु-संघटनेच्या कार्यक्रमांतच अशा अनेक सामर्थ्यवर्धक, संघटनकारक व समाजहितकारी गोष्टी आहेत कीं, त्यांचा अवलंब करण्याइतकी स्वत्वबुध्दि ज्याला नसेल किंवा राष्ट्रीय स्वराज्याच्या नांवानें जो या गोष्टींकडे टीकाकाराच्या बुध्दीनेंच केवळ पाहील त्याचे हातून राष्ट्रीय स्वराज्य-साधनाचा उद्योग कितपत होईल याचीच शंका येते. किंबहुना राष्ट्रीय स्वराज्याचा तपशील स्वत्व वगळून तो आपल्या मनाशीं कसा काय मांडीत असेल हेहि एक कोडेंच आहे. स्वराज्यांतील केवळ 'राज्या'कडे सर्व लक्ष वेधलें जाऊन त्यांतील 'स्व' चा परिवार, त्याचें सामर्थ्य, त्याचे गुणावगुण यांचा त्यांना विसरच पडलेला दिसतो. ज्याला स्वराज्यांतील 'स्व' ची लांबी-रुंदी कळते असा मनुष्यहि हिंदुसंघटनेच्या तपशिलाबद्दल कदाचित् कांहीं मतभेद दर्शवील; पण तो आपलेपणानें दर्शवील, लांबून काठीनें उडविणाऱ्याच्या भूमिकेवरून नव्हे.

संकुचित ज्ञातिनिष्ठेनें कांहीं अब्राह्मण म्हणतात कीं, हिंदुसंघटन ही ब्राम्हणी चळवळ आहे. ही दृष्टि जशी कोती त्याचप्रमाणें राष्ट्रीयत्वाच्या शाब्दिक अभिनिवेशानें हिदुसंघटनेस अराष्ट्रीय ठरविणारी दृष्टीहि कोतीच होय. अराष्ट्रीय तशा ज्ञातिनिष्ठेची व्याख्या स्वातंत्र्यसंघाच्या घटनेंत अशी केली होती कीं, 'विशिष्ट ज्ञातीला केवळ त्या ज्ञातित्वाच्याच सबबीबर विशिष्ट राजकीय हक्क मागणें ही अराष्ट्रीय व त्याज्य ज्ञातिनिष्ठा होय.' या व्याख्येसंबंधीं कोणीहि मतभेद प्रदर्शित केलेला ऐकिवांत नाहीं. या व्याख्येनुसार पाहिल्यास हिंदुस्थानांत आज अराष्ट्रीय अशी ज्ञातिनिष्ठा कोणाची आहे हें सहज समजण्यासारखे आहे. हिंदूमहासभेने हिंदु ज्ञातीला, केवळ हिंदुत्वाच्या सबबीवर कोणते विशिष्ट ज्ञातिनिष्ठ राजकीय हक्क केव्हां मागितले हें तिच्या टीकाकारांनीं केव्हांच दाखविलेलें नाहीं. उलट असे विशिष्ट हक्क कोणासहि नसावेत असेंच हिंदूमहासभेचें पहिल्यापासून म्हणणें आहे. आणि जबलपूरचाच ठराव सुरतेला व सुरतेचाच ठराव डाक्क्याला हिंदूसभा पुनः पुनः जशाचा तसाच पास करते याचें कारण आपल्या भूमिकेंत खऱ्या राष्ट्रीय दृष्टींने दोष नाहीं अशी हिंदूंची खात्री आहे हेंच होय. या शुध्द राष्ट्रीय आग्रहाबद्दल हिंदूसभेला अराष्ट्रीय व ज्ञातिनिष्ठ ठरविणें व राष्ट्रीयत्वाच्या नांवानें मुसलमानांना राष्ट्रघातक ठरणाऱ्या हव्या त्या सवलती देऊं करणें हा धडधडीत उफराटा न्याय होय. हिंदू हे बहुसंख्य असल्यामुळें त्यांना राष्ट्रीयत्वाचा आग्रह धरणें सोयीचें पडते असा कोणी आक्षेप घेतात. पण प्रांतविभागणी लक्षांत घेतली तर आज तीनचार मोठ्या व महत्त्वाच्या प्रांतांमध्यें हिंदू हे अल्पसंख्यच आहेत. आणि अशा प्रांतांतहि अल्पसंख्य म्हणून हिंदू कोणताहि विशिष्ट राजकीय हक्क मागत नाहींत या गोष्टीचा विचार केला तर हा आक्षेपहि फोल ठरतो.

नेहरू रिपोर्ट हिंदूमहासभेनें तडजोड म्हणूनच मान्य केला ही गोष्ट कोणासहि अमान्य करतां येत नाही. असे असतां नेहरू रिपोर्ट म्हणजे हिंदूंची भूमिका असें मतलबीपणानें भासविलें जात आहे. म्हणूनच डाक्क्याच्या सभेनें नेहरू रिपोर्टास हिंदूसभेनें दिलेली मान्यता तडजोडीच्या स्वरूपाची आहे हें पुनः बजावलें. जी गोष्ट नेहरू रिपोर्टाची तीच संयुक्त मतदारसंघाची. संयुक्त मतदारसंघ मुसलमानांनीं मान्य केले. तेव्हां त्यासाठीं मोबदल्यांत

ते मागतात त्या सव सवलती द्याव्या असें म्हणणाऱ्यांना संयुक्त मतदारसंघाचें महत्त्व कशासाठीं आहे हेंच कळलेलें दिसत नाहीं. नेहरू रिपोर्ट म्हणजे हिंदूंची भूमिका म्हणणे हें जितकें खोटें तितकेंच संयुक्त मतदारसंघाला कबूल होणें हा मुसलमानांनीं हिंदूंसाठीं केलेला स्वार्थत्याग असें मानणें हेंहि खोटें. संयुक्त मतदारसंघांत स्वार्थत्याग आहे तो राष्ट्रासाठीं आहे, आणि तो हिंदूंचा व मुसलमानांचा दोघांचाहि सारखाच आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. विभक्त मतदारसंघ सोडले ते दोघांनींहि सोडले, एकट्या मुसलमानांनीं नव्हे.

हेतु बाजूला ठेवून नुसत्या बाह्य स्वरूपाला ज्यांना चिकटावयाचें असेल त्यांची गोष्ट सोडा. पण ज्यांना हेतूचा विचार करणें हें कळतें व पटतें, त्यांनीं संयुक्त मतदारसंघाला इतकें राष्ट्रीय महत्त्व कां प्राप्त झालें याचा विचार अवश्य केला पाहिजे. आणि सयुक्त मतदारसंघाचा जो मूळ हेतु तोच समूळ नाहींसा करण्याची योजना स्वीकारतां कामा नये. संयुक्त मतदारसंघ असले म्हणजे एका ज्ञातीच्या उमेदवारास दुसऱ्या ज्ञातीच्या मतदारांची सहकारिता मिळवावी लागते आणि या सहकारितेच्या व्यवहारामुळें गेल्या दहा वर्षांत बोकाळलेल्या ज्ञातिनिष्ठेला आळा बसेल, हीच राष्ट्रीय दृष्टि संयुक्त मतदारसंघाच्या पुरस्कर्त्यांची आहे. पण संयुक्त मतदारसंघास मुसलमानांची संमति मिळविण्यासाठीं त्यांनीं केलेल्या चौदा मागण्या मान्य करणें म्हणजे संयुक्त मतदारसंघाला न जुमानतांहि बेफाम बोकाळूं शकेल इतक्या ज्ञातिनिष्ठेचा नवा पाया घालण्यासारखेंच आहे. अगोदरच राखीव जागांच्या मागणीने या सयुक्त मतदारसंघाचा अर्धाअधिक फायदा नाहींसा केला आहे. त्यांतहि मंत्रिमंडळांत निम्मे मुसलमान सर्वत्र असले पाहिजेत, प्रमाणशीर नोकऱ्या सर्वत्र पाहिजेत, स्थानिक संस्थांमधूनहि जातवारी पाहिजे, कोणत्याहि सरकारी खर्चाची विभागणी जातवार हिशेबानें झाली पाहिजे असल्या आचरट मागण्या मान्य केल्यास संयुक्त मतदारसंघाचा राष्ट्रीय दृष्ट्या फायदा काय शिल्लक राहिला हे हिंदुसभेच्या टीकाकारांनीं सिध्द करून देण्याची तसदी घ्यावी.

मुसलमानांच्या ज्ञातिनिष्ठेच्या चौदा मागण्या मान्य केल्यास सयुक्त मतदारसंघ हे राष्ट्रीयत्वाचे पोषक न ठरतां ज्ञातिनिष्ठ कलहाचे आजच्यापेक्षां अधिक भीषण प्रसंग वारंवार ओढवून आणतील यांत संशय नाहीं. किंबहुना मुसलमानांच्या चौदा मागण्या मान्य करून हिंदुस्थानाला जें "स्वराज्य" लाभावयाचें आहे त्याला कोणत्या अर्थानें "स्वराज्य" म्हणता येईल हा प्रश्नच आहे. संयुक्त मतदारसंघ अमलांत आल्यानें जी एक राष्ट्रीय बुद्धि उत्पन्न होण्याची आशा आहे ती मुसलमानांच्या ज्ञातिनिष्ठ मागण्या मान्य केल्यास समूळ नष्ट होणारी आहे. अर्थात्, या मागण्या मान्य करण्यापेक्षां पूर्वीचे विभक्त मतदार–संघ पुरवले असेंच राष्ट्रीय बुध्दीच्या हिंदूंना वाटावें, हें अगदीं स्वाभाविक आहे. "प्रांतिक स्वायत्तता पूर्णपणे देतों, मात्र दिवाणांना आज अधिकार आहेत तेवढेहि न देतां त्यांना निवळ बाहुलीं बनवून ठेवतों" असे सरकारनें म्हटल्यास "असली प्रांतिक स्वायत्तता नको, त्यापेक्षां आजची द्विदल पध्दति पुरवली" हे उत्तर जितकें खणखणीत राष्ट्रीय ठरेल; तितकेंच नोकऱ्यांत, मंत्रिमंडळात, स्थानिक संस्थांत, देणग्यांत, खर्चात, परीक्षेच्या उमेदवारींत सर्वत्र जातवारी माजवावयाची असेल तर ते संयुक्त मतदारसंघच नकोत; त्यापेक्षां आजची स्थिति पुरवली हे म्हणणेहि शुद्ध राष्ट्रीय बुद्धीचेंच होय. पहिल्या उदाहरणांत "पाहा हे हिंदी लोक, प्रांतिक स्वायत्तता देत असतां नको म्हणतात" असें सरकारानें म्हणणें ढोंगीपणाचें व स्वतः हिंदी लोकांनींच म्हणणें बावळटपणाचे ठरेल. त्याचप्रमाणें दुसऱ्या उदाहरणांतहि "पाहा हे हिंदू संयुक्त मतदारसंघासारखी राष्ट्रहिताची गोष्ट लाथाडीत आहेत" असें म्हणणारे मुसलमान मतलबी व तसें म्हणणारे हिंदु बावळटच होत. आणि पहिल्या उदाहरणांत बावळट हिंदी लोक जसे आढळतात तसेच दुर्दैवानें दुसऱ्या उदाहरणांत वर्णिलेले बावळट हिंदु लोकहि कित्येक ठिकाणी आढळतात!

पूर्वबंगाल प्रांतांत मुसलमानांनीं गेल्या पन्नास वर्षांत चढाईनें आपली संख्या वाढविली व अजून ही चढाई चालू आहे. अशा ठिकाणीं राष्ट्रीय व्यवहारांत बहुसंख्य मुसलमानांच्या कलानें बोलून आपला बोज राखणारे हिंदु पुढारी अधिक. स्त्रियांना पळविण्याच्या प्रकाराकडे सध्याच्या स्वराज्याच्या लढ्याचे वेळीं आम्ही कानाडोळा केला आहे असेहि म्हणणारे राष्ट्रीयमन्य हिंदु पुढारी त्या प्रांतांत आहेत! अशा या दूरच्या प्रांतांतहि हिंदु परिषद इतक्या मोठ्या प्रमाणांत झाली व त्यांत राष्ट्रीय, असहकारितावादी व स्वातंत्र्यवादी अशा सर्व प्रकारच्या कार्यकर्त्यांनीं भाग घेतला ही गोष्ट या कार्यासंबंधीं आस्था बाळगणाऱ्याला चांगलीच आशा उत्पन्न करणारी आहे. असहकारितावादी किंवा स्वातंत्र्यवादी म्हटला म्हणजे तो हिंदुसभेचा व संघटनेचा विरोधी असलाच पाहिजे अशा समजुतीनें कित्येकजण लिहीत व बोलत असतात. पण ही समजूत चुकीची आहे. महाराष्ट्रांतहि जसे कित्येक कट्टे असहकारितावादी व स्वातंत्र्यवादीहि हिंदुसंघटनेचे पुरस्कर्ते आहेत

तसेच ते पूर्वबंगालसारख्या प्रांतांतहि आहेत.या गोष्टी-नें हिंदूसभेची मूलभूत राष्ट्रीय भूमिकाच अधिक स्पष्ट होते. हिंदूसंघटन ही चळवळ ब्राम्हणांची म्हणणें हें जसें खोटें तसेंच ती स्वराज्यसाधनाचे बाबतीत एका विशिष्ट मतवाल्यांची आहे असें म्हणणेंहि खोटें. कारण या चळवळींत सनातनी ब्राह्मणां-पासून तों आर्य–ब्राह्मोपर्यंत जसे सर्व येऊं शकतात व येतात, तसेच जुन्या संकुचित मर्यादेच्या कट्टया सनदशीरांपासून तो क्रांतिकारकांपर्यंतहि सर्व प्रकारचे स्वराज्यसाधनवादी यांत भाग घेतात.

हिंदूसभेच्या बहुविध आत्मसुधारणेच्या तपशि-लांत मतमतांतरें नाहींत असे नाहीं. आणि प्रांत-भेदानें या तपशिलांत उत्कटतेचा अगर धिमे-पणाचा थोडाबहुत फरक दिसणेंहि अपरिहार्य आहे. शारदा बिलाला पाठिबा देणारा ठराव विषय नियामक मंडळांत पास झाला असतांहि परिषदेंत तो बहुमतानें नापास होतो व सर्व हिंदूंना ब्राम्हण म्हणावें हा ठराव मात्र पास होतो हे कोडे पर-प्रांतीयांना उलगडणार नाही. पण याला प्रांतिक विशिष्ट परिस्थिति हेच कारण होय. संमतिवयाच्या कमिटीपुढें साक्षी देणाऱ्या कित्येक हिंदूंनीं सांगि-तलें कीं, मुसलमानी राज्यातील परिस्थिती-मुळें बालविवाह रूढ झाले. या हिंदु साक्षीदारांच्या म्हणण्याचा कमिटीवरील मुसलमान सभासदांना कितीहि राग आला असला तरी कोणीहि इतिहा-सज्ञ हिंदु या साक्षींत बरेंच तथ्य आहे असें म्हणेल. याच विचारसरणीनें पाहिल्यास सर्व हिंदूंना ‘ब्राम्हण’ म्हणणारे पूर्व-बंगाल्यांतील उदार हिंदु विवाहाचें वय वाढविण्यास कां तयार नाहींत याचा उलगडा होण्यासारखा आहे. पण हा एक प्रकारचा विरोध सांडला तर बाकीच्या हिंदूसभेच्या आत्म-सुधारणेच्या व पुनर्घटनेच्या कार्यक्रमास परिषदेने एकमुखाने पाठिबाच दिला आहे.

हिंदूसंघटनेचा कार्यक्रम हा राष्ट्रीयत्वाच्या आड न येतां स्वराज्यांतील ‘राज्य’ इच्छि-णाऱ्या, मिळविणाऱ्या व भोगणाऱ्या ‘स्व’चें अधि-ष्ठान खंबीर करणारा आहे. आजची राज्यघटनेची चर्चा म्हणजे त्या कार्यक्रमाचें केवळ एक अंग होय. जसे व्यापक आत्मसुधारणेच्या कार्यांत तपशिलांचे लहानसान मतभेद नांदू शक-तात तसे ते राज्यघटनेच्या अंगासंबंधींहि असू शकतील व हिंदूसभेत उभे राहून त्यासंबंधीं बोल-ण्यालाहि वाव आहे. पण असें बोलणे निराळें, व ज्यांना कोणत्याहि प्रकारचा स्वत्वाचा पीळ नाहीं त्यांनीं आपल्या उदासीनतेला उदार राष्ट्रधर्माचें सोयीचें नांव देऊन हिंदूसभेवर व तिच्या पुरस्कर्त्यांवर टीका करणें निराळें.अशा प्रकारचे टीकाकार हे कोणत्या प्रका रचे स्वराज्य कसें मिळवणार आहेत हे त्यांचें त्यांनाच ठाऊक. पण बाकीच्या सर्व हिंदूंना या संघटनेच्या कार्यांत स्वराज्याचा पाया व राष्ट्रीयत्वाचा खरा आग्रह आहे हे पटण्यासारखें आहे. आणि स्वराज्य-विरोधाच्या किंवा अराष्ट्रीयतेच्या पोकळ आक्षेपास न जुमानतां संघटनेचें आवश्यक कार्य इतर राष्ट्रीय व राजकीय चळवळीबरोबरच करतां येतें, करणें आवश्यक आहे आणि वेळींच न केले तर राष्ट्र,स्वराज्य व स्वत्व हीं तीनहि गमावून बसण्याची पाळी येईल हे हिंदूंना परिस्थितीनें व संघटनवाद्यांच्या प्रयत्नानें अधिकाधिक पटत चालले आहे, हेंच सुरतेपेक्षांहि अधिक ठळकपणें डाक्याला दिसून आलें.

# स्फुट सूचना

१ ले.असेंब्लीच्या बैठकीचे प्रारंभीच अध्यक्षाच्या अधिकाराबद्दल लॉर्ड आयर्विन व पटेल यांच्या वादाचा खळबळ उडविणारा असा कांहीं तरी स्फोट होईल अशी पुष्कळांची अटकळ होती. पण ती खोटी ठरली असून असेंब्लीच्या बैठकींतील हा पहिला अपेक्षित बॉंब फुसका ठरला. वादाचे दोन भाग; पैकीं एक लॉर्ड आयर्विन यांनीं असेंब्लींत केलेल्या भाषणांत अध्यक्षांच्या अधिकाराचा उपमर्द केला अशा समजुतीनें पटेल यांनीं त्यांना पाठविलेलें पत्र व त्याजकडून आलेले उत्तर हा होय. पण अध्यक्षाचे अधिकार आपल्याला मान्य आहेत त्या अधिकाराबद्दल शंका घेण्याचा माझा हेतु नव्हता व तशी कोणाची समजूत झाली असल्यास मला खेद होतो इ. नमत्या सुरांत आयर्विन यांनीं पत्र पाठविल्यामुळें हा वाद शमला. पटेल व आयर्विन यांचा पत्रव्यवहार पाहि-ल्यास हा एक खेळीमेळीचा व्यवहार दिसतो. आय-र्विन यांच्या भाषणामुळें पटेलांचा उपमर्द झाला असे हिंदुस्थानांतील कित्येक पुढाऱ्यांनीं उद्गार काढले होते. स्वतः पटेल यांना मनांतून तसें वाटत नसावें. पण लोकांची समजूत तशी झाली असतांना आपण स्वस्थ बसलों असें होऊं नये इतकी चाणा-क्षता पटेल यांचे अंगीं असल्यामुळें त्यांनीं आय-र्विन यांच्याकडे लांबलचक पत्र धाडून त्यांचेकडून लोकांना समाधानकारक असा खुलासा करवून घेतला. हा सर्व व्यवहार कशाकरितां आहे याची

दोघांनाहि जाणीव होती, असेंच या पत्रव्यवहारावरून दिसतें.

---

२ दुसरा प्रश्न अध्यक्षांचे अधिकार मर्यादित करण्यासंबंधीं व्हाइसरॉयांनीं केलेल्या व स्टेटसेक्रेटरीची संमति मिळालेल्या कामकाजांच्या नियमांतील दुरुस्तीसंबंधाचा. या संबंधाचा ठराव युसुफ इमाम यांचा होता. पण ते गैरहजर असल्यामुळें त्यांनीं तो मांडण्यास मि. एस्. सी. मित्र यांना तारेनें अधिकार दिला. असेंब्लीची संमति असल्याशिवाय स्टेटसेक्रेटरींनीं नव्या नियमाला संमति देऊं नये अशा अर्थाचा मूळ ठराव होता. पण ही संमति यापूर्वीच दिली गेली असल्यामुळें 'लॉर्ड आयर्विन यांनीं असेंब्लीचा विश्वास गमावला व यापुढें असेंब्लीच्या कामकाजाच्या नियमांवर असेंब्लीचाच पूर्ण अधिकार राहावा' अशा आशयाचा या ठरावांत फरक करण्यांत आला. असेंब्लीच्या नियमाप्रमाणें व्हाइसरॉयांच्या वर्तणुकीवर टीका करण्यास मनाई आहे. पण तसा ठराव आल्यास त्यास बंदी करण्याचा स्पष्ट अधिकार अध्यक्षांस नियमान्वयें नाहीं. अर्थात् पब्लिक सेफ्टी बिलाचे वेळीं जसा प्रसंग होता तसाच हाहि प्रसंग उत्पन्न झाला. पण त्या वेळीं अध्यक्षाचा अधिकार चालूं नये अशी सरकार पक्षाची इच्छा होती ती आतां उलट झाली. आतां अध्यक्षांनीं आपला अधिकार चालवून स्पष्ट नियम नसतां, पुढील नियमबाह्य अशी भाषणें टाळण्यासाठीं, ठरावांतील आयर्विन यांच्या संबंधाचा भागच गाळावा असें म्हणण्याची सरकार पक्षावर पाळी आली! आणि पटेलांनीं हा उलट पेंच सरकार पक्षाला घालून त्याचेकडून असें वदवून घेतलें कीं, जरी ठरावास बंदी करण्याचा स्पष्ट नियमानें अधिकार नसला तरी पुढें होणारीं भाषणें बंद करण्याचा अधिकार अध्यक्षास आहे व या दुसऱ्या अधिकारावरून अनुमानानें ठरावालाहि बंदी करण्याचा अधिकार अध्यक्षास प्राप्त होतो. पब्लिक सेफ्टी बिल आगाऊ प्रविष्ट झालें होतें म्हणून त्या वेळीं अध्यक्षांच्या या सामान्य अधिकाराला आम्ही हरकत घेतली, पण आतां हा ठराव नियमबाह्य ठरविण्याचा पूर्ण अधिकार अध्यक्षांना आहे, अशी लटपट करून सरकारी कायदेपंडितांना या पेंचांतून सुटका करून घ्यावी लागली.

---

३ पण व्हाइसरॉयासंबंधाचा भाग गाळला तरी असेंब्लीच्या नियमांवर असेंब्लीचाच अधिकार चालावा हा ठरावाचा भाग शिल्लक राहिलाच. पण यासंबंधीं सरकारतर्फे असा गुळमुळीत खुलासा करण्यांत आला कीं, 'यापुढें होणारी नियमदुरुस्ती बहुधा असेंब्लींत पुढें मांडूं, पण नेहमींच हें बंधन पाळणार नाहीं, जरूरीच्या एखाद्या प्रसंगीं असेंब्लीला न विचारतांहि नियमदुरुस्ती करावी लागेल.' या गुळमुळीत खुलाशानें कोणाचेंच समाधान होण्यासारखें नव्हतें. शिवाय असेंब्लीला न विचारतां केलेल्या नियमदुरुस्तीबद्दलहि असेंब्लीचें मत व्यक्त होणेंहि जरूर होतें. पण लॉर्ड आयर्विन यांजकडून पत्रद्वारें अध्यक्षांच्या अधिकाराबद्दल मिळविलेली मान्यता व सरकारी सभासदांना पेंचांत घालून त्यांचेकडून मिळविलेली अध्यक्षाच्या अधिकाराबद्दलची कबुली या दोन गोष्टींनंतर आणखी हें प्रकरण ताणूं नये अशी पटेल यांची इच्छा दिसली व त्यांनींच मित्र यांना राहिलेला ठराव परत घेण्याची विनंति केली. ज्या अध्यक्षाच्या अधिकाराबद्दल भांडावयाचें त्याचीच इच्छा हें प्रकरण संपविण्याची दिसली, तेव्हां मित्र यांनींहि आग्रह धरला नाहीं व असेंब्लीनेंहि ठराव परत घेण्यास संमति दिली. अशा रीतीनें त्वयार्धं मयार्धं होऊन हें प्रकरण निकालांत काढण्यांत आलें.

# सिमल्याचें बातमीपत्र

( आमच्या प्रतिनिधिकडून )

सिमला तारीख ६ सप्टेंबर १९२९

वरिष्ठ कायदे-मंडळाची बैठक म्हटली म्हणजे चमत्काराचे कांहीं तरी गोड घांस खावयाला मिळणार अशी अपेक्षा करण्याची संवय लोकांना सहजच लागून राहिली आहे. व ती दिल्लीच्या बैठकींत पूर्वी एकदां पडलेल्या बॉबने पक्की करून ठेवली आहे. पण दरवेळीं खराखुरा बॉंब कसा पडणार? तेव्हां निदान वादाच्या स्फोटाची तरी अपेक्षा उरतेच. एप्रिल ते ऑगस्टच्या दरम्यान सरकारने एक नवा नियम करून असेंब्लीच्या अध्यक्षाचे हातपाय बांधण्याचा प्रयत्न केला हे प्रसिद्धच आहे. नियम झाला तो झालाच ! पण त्यावर स्वतः अध्यक्ष काय करणार किंवा असेंब्ली काय करणार याकडे लोकांचे डोळे लागून राहिले होते. कित्येकांना वाटत होते कीं, पहिल्याच दिवशीं पटेल अध्यक्षपदाचा राजीनामा जाहीर करून आपलें तेज प्रगट करतील. कित्येकांना वाटे कीं, सिमल्यास सभासद थोडे जमतात याचा फायदा घेऊन अध्यक्ष पटेल यांच्यावर सेफ्टी बिल अटकावून टाकल्याबद्दल निंदाव्यंजक ठराव आणावा व पास करून घ्यावा, म्हणजे अध्यक्षांना राजीनामा देणे मनांत नसलें तरी प्राप्तच होईल. दिल्लीस शेवटल्या दिवशीं लॉर्ड आयर्विन यांनीं केलेलें भाषण हे अध्यक्षांच्या रूलिंगवर निषेधपर होतें तेव्हां असा निंदाव्यंजक ठराव करणें हे सरकार पक्षांतील कुचेष्टेखोर लोकांना सहज शोभण्यासारखें होतें. पण त्यांना हें काय माहीत कीं, दरम्यान पटेल व लॉर्ड आयर्विन यांचा पत्रव्यवहार होऊन उभय पक्षीं दिलसफाईबरोबर दिलजमाईहि झाली होती. अर्थात् निंदाव्यंजक ठराव येणे शक्यच नव्हतें.

***

उरला असेंब्लींतील लोकपक्ष. त्याला स्टेटसेक्रेटरींच्या नव्या नियमाचा निषेध करणें प्राप्तच होतें व तशा अर्थाच्या कांहीं सूचना-उपसूचना सिमल्याच्या बैठकीच्या पहिल्या दिवसाकरितां दाखल होऊन तयार राहिल्या होत्या. पण त्याहि शेवटीं जागच्या जागींच राहिल्या. याचे कारण असें कीं, पहिल्या दिवशीं प्रारंभीच पटेल यांनीं लॉर्ड आयर्विन यांच्याशीं झालेला सर्व दुतर्फी पत्रव्यवहार वाचून दाखविला व लॉर्ड आयर्विन यांच्या खुलाशानें माझ्यापुरतें माझें समाधान झाले आहे असें वरती स्पष्ट बोलूनहि दाखविलें. इतकेच नव्हे तर नव्या नियमाला अनुलक्षून स्टेटसेक्रेटरी व लॉर्ड आयर्विन यांचा तीव्र निषेध करण्याचे ठराव दाखल झाले असले तरी ते कोणी पुढें मांडूं नयेत असा जाहीर सल्ला दिला ! अर्थात् सभासदांनींहि तो मान्य केला.

***

पण हें सर्व घडवून आणतांना त्यांतल्या त्यांत एक छोटेसें नाटक रंगविण्यास पटेल यांनीं सोडले नाहीं. सरकारच्या निषेधाच्या ठरावाची भाषा चालू नियमांना सोडून होती हे उघड होते. तेव्हां ठराव मांडण्याचा आग्रह धरून अध्यक्षांच्या उपदेशाला जुमानलें नसतें तर पटेल हे आपला अधिकार चालविण्याला समर्थ व तयार होते.आणि हे ठराव मांडणे जसे अनिष्ट तसेंच ते नियमाच्या दृष्टीने गैरशिस्त आहे असा स्पष्ट अभिप्राय त्यांनीं दर्शविला. पण नाटक असें केलें कीं, ठराव मांडणारांना विचारलें "ठराव गैरशिस्त नाहीं म्हणण्याला तुमचा आधार दाखवा."पण उलट होम मेंबर केरर यांनाहि सवाल टाकला कीं " ठराव गैरशिस्त आहे असे म्हणण्याला तुमचा तरी काय आधार आहे तो दाखवा." व या प्रश्नांचीं उत्तरें देतांना पायाखालचे आधार गेल्यामुळे, एखादे वेळीं प्लॅटफॉर्मवरचे लोक जसे एकमेकांवर कोलमडून पडतात तशी स्थिति झाली ! नव्या नियमांत असें बंधन घातलें आहे कीं, स्पष्ट शब्दांचा अधिकार असल्याशिवाय अध्यक्षाला कांहीं करतां येत नाहीं ! पण जे निंदाव्यंजक ठराव पुढे आले त्यांनाच अनुलक्षून दिलेला अधिकार कसा मिळणार? अर्थात् सरकारला अध्यक्षांच्या जुन्याच व संकीर्ण व अनुमानिक अधिकारांचा आधार दाखवावा लागला. तेव्हां पटेल त्यांना म्हणूं लागले कीं, " अशाच अधिकाराचा उपयोग सेफ्टी बिल अटकावण्याच्या वेळीं मी केला त्याला तर तुम्ही नांवे ठेवलीं व गिल्ला केला ! त्याअर्थीं तेव्हांचा तुमचा कांगावा हा जर सरळपणा म्हणावा तर आजचा हा सरळपणा कांगावा कां म्हणूं नये !" तात्पर्य, एकच मनुष्य कोणत्याहि गोष्टीचें उलटसुलट समर्थन आपल्याच तोंडानें करूं लागला म्हणजे जशी मौज होते व वावदूक खजिल होतो तशी स्थिति सरकारची झाली. पण नाटक अजून पुढेच होतें. म्हणून ठरल्याप्रमाणें एका

बाजूला निंदाव्यंजक ठरावाचा फक्त उच्चार करून पण त्यावर भाषण न करून लगेच दुसऱ्या बाजूला 'तुम्ही अखेर काय म्हणतां ?' असें पटेल यांनीं विचारतांच सरकारी लॉ मेंबरांनीं खुलासा लिहूनच आणला होता तो वाचला. त्याचें तात्पर्य असें कीं, असेंब्लीच्या कामकाजाचे नियम नवीन करणें झाल्यास आम्ही असेंब्लीचा सल्ला आधीं विचारूं,पण अखेर कोणता नियम करावा न करावा या निर्णयाचा अधिकार सरकाराकडेच राहील. या खुलाशानें सर्व प्रकरण संपलें. शेवटीं निष्कर्ष उरला तो असा, 'मी दिल्हांस केलें तेंच योग्य व साधिकार' हें आपलें म्हणणें पटेल यांनीं तडीला नेलें. नवा नियम करण्याचा हक्क सरकारनेंहि प्रतिपादिला व शेवटीं तो अधिकाराच्या जोरावर तडीला नेला. आणि नवा नियम करतांना आमची संमति अगोदर घ्यावी असें लोकपक्षाचें म्हणणें होतें तेंहि तडीला गेलें. या सर्व प्रकरणांत पटेल यांचा सावधपणा व चाणाक्षपणा जसा दिसून आला तसाच लॉर्ड आयर्विन यांचा समंजसपणाहि दिसून आला ही गोष्ट नाकबूल करतां येत नाहीं.

* * *

चालू बैठकींत सरकारी बिलें बरींच आहेत. पण तीं वादग्रस्त अशीं फारशीं नाहींत. खरीं वादग्रस्त बिलें दोन(१)शारदा यांचें विवाहांतील वयोमर्यादेचें व(२)साराभाई हाजी यांचें किनाऱ्यावरील वाहतुकीसंबधांचें. पैकीं शारदा बिलच सगळी बैठक खाणार असें दिसतें. हाजी यांच्या बिलाला हात लावण्याला बहुधा अवसरच मिळणार नाहीं! कारण खासगी बिलाकरितां दिलेल्या चारपांच दिवसांपैकीं दोन दिवस शारदा बिलाच्या प्रास्ताविक चर्चेंतच निघून गेले व ती चर्चाहि अजून पुरी झाली नाहीं. आणि उपसूचना तर भाराभर आहेत. तेव्हां लागला तर एखाददुसरा अधिक दिवस या बिलाच्या चर्चेलाच सरकारला द्यावा लागेल. इतर खासगी बिलांचेंहि भेंडोळें येऊन पडलें आहे. पण तें जागच्या जागींच राहील ! तात्पर्य, अशा रीतीनें यंदाची सिमल्याची बैठक व शारदा बिल यांचीच बहुधा सांगड पडेल व समव्याप्ति होईल. मात्र जो कांहीं रंग म्हणून भरावयाला पाहिजे तो भरण्याला या बिलांतच पुष्कळसा अवसर आहे.

* * *

या बिलाला विरोध करण्यांत पुढारीपण एम. के. आचार्य यांच्याकडे आलेलें आहे. किंबहुना मद्रासकडील जितके हिंदु सभासद आहेत तितके सर्व प्रायः या बिलाला विरोधीच दिसतात. श्रीनिवास अय्यंगार यांनीं या बिलाला पूर्ण पाठिंबा दिलेला आहे. पण ते अजून हजर नाहींत. या कामाकरितां मद्रासेहून पुराणमतवादी लोकांचें शिष्टमंडळ आलेलें आहे, व त्यानें आपलें काम करून चालविलें आहे. बंगालचेहि बरेच प्रतिनिधी बिलाला प्रतिकूल दिसतात. पैकीं कांहीं मनानें अनुकूल आहेत पण इतर कारणांमुळें त्यांना विरोध करावा लागत आहे. वादविवादाच्या पहिल्या दिवशीं विरोधी लोकांचीं व दुसऱ्या दिवशीं प्रायः अनुकूल असणाऱ्या लोकांचीं भाषणें झालीं. परंतु विरोधी अशींहि दोनतीन भाषणें झालीं. तीं पं. मदन मोहन मालवीय व ना. बेळवी यांचीं. जयकर यांनीं बिलाचें सरसकट समर्थन केलें. केळकर यांनीं मुख्यतः दुसऱ्या वाचनाला अनुकूल असें भाषण केलें. परंतु महत्त्वाच्या उपसूचनांचा निकाल लागल्यावर तिसऱ्या वाचनाचे वेळीं अखेर मत कोणत्या बाजूला द्यावयाचें याविषयीं आपला हक्क राखून ठेवला. खऱ्या अर्थानें विवाह होण्याचें मुलीचें वय चौदाच काय पण यापुढेहि जाणें इष्ट आहे असेंच विरोधकांनींहि प्रतिपादिलें. किंबहुना १२ वर्षांच्या आत लग्नं होतात तीं थांबवण्याकरितां कायदा करणें आज अवश्य झालें आहे असें पं. मदन मोहन यांनींहि प्रतिपादिलें. तसेंच प्रत्येक विरोधकानें मी बालविवाहालाच प्रतिकूल आहे इतकेंच नव्हे तर रजोदर्शनानंतर विवाह करण्याचा आचार स्वतःच्या घरीं प्रत्यक्ष अमलांत आणला आहे असेंहि कबूल केलें.वादाचा मुद्दा इतकाच राहिला कीं, केवळ कागदांतलें स्मृतिवचन म्हणून रजोदर्शनानंतरचा विवाह कित्येक लोक अशास्त्र मानीत असले तर त्यांना हा कायदा लागू करावा कीं नाहीं? पण या गोष्टीचा निर्णय बिलाचा अखेर निकाल लागेल तेव्हांच होणारा असल्यामुळें आज त्याविषयीं कांहीं निश्चित अनुमान करतां येत नाहीं.

* * *

दिल्ली येथील बैठकींत बॉंब पडल्यामुळें प्रेक्षकांस हजर राहाण्याचीं तिकिटें देण्यासंबंधानें विशेष सावधगिरी ठेवण्यांत येणार आहे व कांहीं नवीं बंधनेंहि आतांच घातलीं गेलीं आहेत. परंतु कायमचीं बंधनें काय असावीं याची चौकशी करण्याकरितां अध्यक्षांनीं एक कमिटी नेमली आहे. तिचा निर्णय होईल तेव्हां कळेल. परंतु कमिटी नेमण्यांत अध्यक्षांचा रोख असा आहे कीं, सभागृहांतील व्यवस्था ठेवण्याचा अधिकार अध्यक्षांचा आहे व तो पोलीस अधिकाऱ्यांच्या हातीं जातां कामा नये.

# पुणें येथील आठवें औद्योगिक प्रदर्शन

पुणें येथें शनिवार ता. ७ रोजीं सकाळीं ८॥ वाजतां टिळक स्मारक मंदिरांत स्वदेशी बाजार व औद्योगिक प्रदर्शन उघडण्याचा समारंभ औंध संस्थानाचे अधिपति **श्री.बाळासाहेब पंतप्रतिनिधी** यांच्या हस्तें साजरा झाला. समारंभास गांवांतील बरीच निमंत्रित मंडळी आली होती. नामदार जाधवरावहि उपस्थित होते. पेटीवादन व स्वागतपर पद झाल्यानंतर प्रदर्शन कमिटीचे सेक्रेटरी श्री. घारपुरे यांनीं थोडेसें भाषण केलें. त्यांत अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर हे सिमल्यास गेले आहेत व डॉ. नायडू हे आजारी असल्यानें ते आज येऊं शकले नाहींत असें सांगितलें. प्रदर्शनासंबंधानें बोलतांना ते म्हणाले, "कांहीं माल अद्यापि यावयाचा आहे. तो येण्यास आणखी दोनतीन दिवस लागतील. कारखानदारांचे कांहीं प्रतिनिधी आले आहेत व कांहीं येणार आहेत व कांहींच्याबरोबर पत्रव्यवहार सुरू आहे. तेव्हां प्रदर्शनांतील सर्व दुकानें आज भरलीं नसलीं तरी लवकरच भरून जातील असें वाटतें. या प्रदर्शनासाठीं बहुतेक सर्व भागांतून माल येतो.

आतांपर्यंत जो माल आला आहे त्यांत जीवन लाल कंपनीची ॲल्युमिनियमचीं भांडीं, गोद्रेज कंपनीचा साबू व तिजोऱ्या, कॅनानूरचें चेकचें कापड सोडावॉटर तयार करण्याचीं यंत्रें, मेटल वर्क्स पुणे येथील लोखंडी सामान, सरकारी तुरुंगांतील सतरंज्या वगैरे माल, कानपूरच्या गिरणींतील माल, विठ्ठलदास जरीवाले यांच्या कारखान्यांतील जरीकांठी माल, खादी-भांडारांतील निरनिराळा माल, सुताची दोरखंड, हरगोविंद दास यांचीं शिसवीच्या लाकडावरील चित्रें, शिमोगा येथील चंदनापासून झालेला माल, ओगले बंधु व किर्लोस्कर यांचा माल, अलीगड येथील पितळी सामान, श्री. आगाशे यांच्या कारखान्यांत तयार झालेलीं घड्याळें, श्री. जोशी यांचीं विजेच्या बॅटरीवर चालणारीं घड्याळें वगैरे जिन्नस प्रदर्शनात आले आहेत. श्री. ओगले यांनीं आपल्या कारखान्यांत मुलांचीं खेळणीं नवीनच तयार केलीं आहेत तीं आणि पुणे येथें नवीन पध्दतीनें तयार करण्यांत आलेला 'ग्लांय' हे जिन्नस नवीन आहेत. परदेशी मालावर परिणाम होणारा असा माल कोणी तयार केल्यास त्यास कमिटीनें १०५ रुपयांचें बक्षीस ठेवलें असून योग्य वाटल्यास १०० रुपयांचें जादा बक्षीसहि देण्यांत येईल" असें त्यांनीं सांगितलें. वरील माहिती दिल्यानंतर त्यांनीं श्रीमंत पंतप्रतिनिधी यांना प्रदर्शन खुलें करण्यास विनंति केली. या प्रसंगीं श्रीमंतांनीं पुढील आशयाचें भाषण केलें.

### श्रीमंतांचें भाषण

असल्या प्रदर्शनांचा उद्देश काय असावयास पाहिजे हे आम्ही आपल्यास सांगावयास पाहिजे असें नाहीं. तथापि आपल्या देशांतील कच्चया मालाचें पक्कया मालांत रूपांतर व्हावें आणि तेहि परकीय देशांतील मालाप्रमाणेच सुबक व स्वस्त होऊन आपणास मिळावें आणि अशा रीतीनें देशांतील संपत्ति बाहेर जाण्याचा ओघ अंशतः तरी कमी व्हावा हा एक उद्देश मुख्य आहे. सुशिक्षितांची बेकारी हाहि एक मोठा अवघड प्रश्न आपल्या समाजापुढें आहे. कोणत्याहि शाळा-कॉलेजांमधून शिक्षण घेऊन परीक्षेंत यश संपादन करणाऱ्या तरुणास, आपल्या पोटास खात्रीनें मिळेलच असा आज भरंवसा वाटत नाहीं. तेव्हां अशा सुशिक्षित तरुणांना थोडेंबहुत तरी अन्नवस्त्र मिळेल, असा कांहीं उद्योग शोधणें व तो समाजापुढें प्रामुख्यानें ठेवणे हाहि उद्देश असल्या प्रदर्शनांचा असला पाहिजे असें आम्हास वाटतें.

पुण्याच्या प्रदर्शन कमिटीनें येथील प्रदर्शनांत पहिल्या वर्षापासून आतांपर्यंत कोणत्या तऱ्हेचा माल आला, कोठून आला, त्यामध्यें उत्तरोत्तर सुबकपणा, स्वस्ताई, मोहकता इत्यादि गोष्टींत प्रगति होत आहे कीं काय याविषयीं सांगोपांग चर्चा करून एक रिपोर्ट तयार केला पाहिजे. त्यांत ज्या ठिकाणाहून माल आला त्या प्रांतीं पूर्वीं हाच माल कशा तऱ्हेचा तयार होत होता, त्याला गिऱ्हाईक कोठलें होतें, त्यास लागणारा कच्चा माल कोठून आणतात, त्यास पाहिजे असलेलीं यंत्रें कोठून आणतात, भांडवल कसें जमा होतें, भांडवलावर व्याज किती द्यावें लागतें, या सर्व गोष्टी विचारांत घेतां आज धंद्यामध्यें फायदा आहे किंवा कसें आणि हा धंदा वाढविण्याकरितां देशामध्यें व परदेशामध्यें आपलाच माल खपावा यासाठीं कोणत्या उपायाची योजना केली पाहिजे इत्यादि गोष्टींचा ऊहापोह केला तरच प्रदर्शनांचा खरा उपयोग देशाला, कारागिरांना व बेकारांना होणार.

या अवाढव्य देशांत ठिकठिकाणीं कोणते पदार्थ तयार होतात हे समजण्याकरितां अशा प्रदर्शनांतून त्या त्या पदार्थांचे नमुने असावयास हरकत नाहीं. कारण त्यायोगें आपणास पाहिजे तो स्वदेशी माल हिंदुस्थानांत अमुक ठिकाणीं मिळतो असें खरोखरी कळकळ असणाऱ्या माणसाला समजेल. पण यायोगानें आम्ही वर जे प्रदर्शनाचे उद्देश असावेत म्हणून

म्हटलें त्या दृष्टीनें फारसा उपयोग होणार नाहीं. हिंदुस्थानातील सर्व प्रांतांतील सर्व प्रकारच्या मालाची उत्क्रांति करण्याचा प्रयत्न असल्या एका प्रांतीय प्रदर्शनाकडून होणें राजाश्रयाविना आज अशक्यप्राय आहे असें आम्हास वाटते. यासाठीं असलींच प्रदर्शनें प्रांतनिहाय दरवर्षास भरलीं पाहिजेत असें आमचें मत आहे.

मुंबई इलाख्यांत १८ जिल्हे आहेत. या प्रत्येक जिल्ह्यांतल्या गांवीं प्राचीन काळापासून जे जे धंदे होते त्यांची आज स्थिति काय आहे याची चौकशी प्रथम केली पाहिजे. नंतर त्या त्या धंद्याला उत्तेजन देऊन त्यांत काम करणारांचें पोट भरेल अशी तजवीज करण्याकरितां काय केले पाहिजे या गोष्टीचा सांगोपांग विचार करून काय ते केलें पाहिजे.

याच वेळीं बाहेरील देशाचा याच तऱ्हेचा माल आज बाजारांत येतो, तो आपल्या मालापेक्षा सुबक असतो कीं काय, गिऱ्हाइकांच्या मनांत जास्त भरण्यासारखा असतो कीं काय, स्वस्त पडतो कीं काय, त्यांत आपल्या मालापेक्षा कांहीं विशेष सुधारणा केली आहे किंवा कसे, तसलाच माल आपल्या कच्च्या मालापासून आपल्या कारागिरांनीं करावयासाठीं काय योजना केली पाहिजे याहि गोष्टीचा विचार असल्या प्रदर्शन कमिटीनेच केला पाहिजे.

औंध संस्थानांत ओगले यांनी कंदील करावयास सुरवात केली. तेव्हां वरच्या कडीस एक खांच घेऊन ती खुंटीरा सहज अडकवितां यावी अशी सुधारणा केली. हें पाहिल्याबरोबर जर्मन कारागिरानी आपल्याहि कंदिलांमध्यें ती सुधारणा करून ते कंदील हिंदुस्थानाच्या बाजारांत दोन महिन्यांत पाठविले! अशा रीतीनेंच आपणहि परकीय मालाकडे पाहून आपला माल सुधारला पाहिजे. केवळ भावनेवर जोर देऊन हल्लींच्या सुधारणेच्या काळांत आपला कसलाहि माल लोकांनीं खरेदी केला पाहिजे अशी अपेक्षा करणें वेडेपणाचें आहे. आपण म्हणाल सरकारांनीं हा विचार करावा. पण ही गोष्ट अशक्य आहे. कारण ज्याच्या पोटांत दुखते, त्यानेच तें दुखूं नये म्हणून उपाय शोधला पाहिजे, ही गोष्ट आपण विसरून चालणार नाहीं.

आपल्या प्रांतांत खनिज पदार्थ आहेत व ते वांया चालले आहेत. त्यांचे काय करावे हाहि विचार केला पाहिजे. उदाहरणार्थ, सातारा जिल्ह्यांतील कित्येक तालुक्यांत प्लास्टर ऑफ पॅरिसचे दगड सांपडतात. त्यांचा उपयोगहि बरा होतो. उत्तम उपयोग होणारे दगडहि सांपडतील. पण त्या दृष्टीनें शोध केला पाहिजे, व त्या मार्गानें उद्योग केला पाहिजे.

मुंबई इलाख्यांतील बहुतेक प्रांतांत थोडाबहुत कापूस पिकतो. हल्लीं हातसुताचें, हातमागाचे कसलेंहि जाडेभरडे का होईना कापड वापरावें अशा मनोभावनेचे व क्रियावान पुष्कळ लोक आहेत. या गोष्टींचा आणि परिस्थितीचा फायदा घेऊन ज्या शेतकऱ्याला शेत लहान असल्याकारणानें वर्षभर भरपूर काम नाहीं व त्यामुळे शेतांतील उत्पन्न वर्षभर पुरत नाहीं अशा माणसानें मजुरीसाठीं मुंबईस जाऊन वाईट हवा, नाना प्रकारची प्रलोभनीय व्यसने यामध्यें आपल्या शरिराची, मनाची व कुटुंबाची हानि करावी, यापेक्षां आपल्या घरीं बसून सूत काढले, कापड विणले तर बरें असाहि उपदेश शेतकऱ्यांना करून त्यांस सरळ मार्गाला लावावयास पाहिजे. हल्लीं प्रचलित असलेल्या चरख्यावर जास्तीत जास्ती सूत कातलें तरी एक आणा, दीड आण्यापेक्षां माणसास जास्त मिळणार नाहीं असा आक्षेप कित्येक आंकडेपंडित घेत असतात. पण ज्या ठिकाणीं हिंदुस्थानाच्या लोकांचें रोजचें माणशीं उत्पन्न मुळीं एक आणा तीन पै आहे त्या ठिकाणीं आणखी दीड आणा मिळाला तर तो टाकून द्यावा कीं काय?

आपल्या जातीचा उद्धार करण्याकरितां कमरा बांधलेल्या पुढाऱ्यांनीं केवळ नोकरी करण्यासाठीं विद्यार्थी तयार न करतां उद्योगधंद्यांची ऊर्जितावस्था करण्यासाठीं प्रयत्न केला पाहिजे.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांतून आपल्या प्रदर्शनांत ज्या वस्तू येतात त्यांची वर्गवारी लागली आहे असें वाटते. पण त्याच प्रांतांत या वस्तू तयार होतात, त्याचें कारण काय असावें याचा विचार केला पाहिजे. उदाहरणार्थ, रेशमास तांबडा उत्तम आणि टिकाऊ रंग फक्त सातारा आणि नागपूरजवळ उम्रेठ या गांवीं होतो. असें का? काय कच्चा माल किंवा विशेष पाणी तेथे आहे? किंवा कारागीर लोकांस आणिखी सोयी कांहीं आहेत? याचा विचार करून ठिकठिकाणच्या रेशीम रंगविणाऱ्या लोकांकरितां सर्व ठिकाणीं तसाच रंग व्हावा असे करण्यास काय केलें पाहिजे याचाहि विचार करावयास पाहिजे.

अनेक कारणांमुळें ज्या ठिकाणीं कांहीं नामांकित धंदे होते, त्या ठिकाणचे ते धंदे सर्वस्वीं बुडाले आहेत असें तपासाअंतीं दिसून येतें. पैठणास पैठणी, शालू, जरीकांठी खण, पीतांबर, पामऱ्या, नारळी पदरी पागोटीं हें जरतारी काम अत्यंत उत्तम तेजदार व टिकाऊ होत होतें. यावरून स्त्रियांच्या महावस्त्रास पैठणी हे नांव पडले आहे हें आपणास माहीत आहे. पंचवीसतीस वर्षांपूर्वीदेखील आमच्या घरीं लागणारा अशा तऱ्हेचा माल



सरदार वल्लभभाई पटेल व न. चिं. केळकर (पृ. २२१)



हुतात्मा जातेंद्रनाथ दास (पृ. ३८०)

आम्ही पैठणाहूनच आणवीत होतों. त्या वेळीं पैठणास असल्या जरीचें कापड विणणाऱ्या लोकांची वस्ती सातआठ हजारांवर होती. आणि माग एकंदर सात–साडेसातशें होते. आज तेथें तपास केला तर असलें काम करणारीं दहापांच घरेंहि नाहींत ! व तींहि पोटाला दिल्यास न्याल तिकडे यावयास तयार आहेत !

आजकालहि जरतारी मालाला मागणी कमी आहे असें नाहीं. असे असून त्या सुप्रसिद्ध ठिकाणच्या लोकांचें असें दैन्य कां झालें, ही विचार करण्या सारखी गोष्ट आहे. येवलें येथील असल्या मालाच्या कारखानदारांचेंहि असेंच दैन्य ओढवलें आहे असें समजतें.

आपल्या इलाख्यांतहि कित्येक गांवीं असे कांहीं कारखाने पूर्वीं होते. त्या गांवांची भरभराट कमी झाली. कारखाने बुडाले याचें कारण अनेक प्रसंगीं रेल्वे स्टेशन त्या गांवाला आलें नाहीं हें असतें. आपल्या सातारा शहराचा सर्व तऱ्हेचा व्यापार बुडाला आहे. याचें कारण रेल्वे स्टेशन दहा मैल लांब गेलें. आणि तेथील लोकांनीं खटपट करून खोदकाम, भराव निम्म्या रस्त्याचे तयार होऊनहि रेल्वेचा फांटा त्या शहराला अजून येत नाहीं ! त्यापासून साताऱ्चा सोन्याचांदीचा, उत्तम प्रकारच्या तांब्यापितळेच्या भांड्यांचा, रेशमाचा, तेलाचा असे अनेक धंदे बुडाले आणि धंदेवाले परगांवाला गेले, किंवा मजूर झाले. १८८८ सालीं साताऱ्ची लोकसंख्या २८००० हजार होती. ती आतां १६००० हि नाहीं !

कऱ्हाडास आमच्या लहानपणीं उत्तम रेशीमकांठी धोतरजोडे, उपरणेजोड्या निघत असत. वास्तविक विचार केला तर कऱ्हाड रेल्वे स्टेशन नदीअलीकडे असूनहि भरभराटीस येत आहे. शेंगदाणा, पेंड, हळद वगैरे व्यापाराचें तें केंद्र आहे. गांवाची वस्तीहि वाढत आहे. पण हा वस्त्रांचा विशेष व्यापार मात्र चांगला चालत नाहीं. याचें कारण शोधून काढण्याची खटपट कऱ्हाड म्युनिसिपालिटीनें केली पाहिजे, व तो व्यापार पुनः पहिल्यापेक्षां जास्त वाढेल अशी खटपट केली पाहिजे.

आमच्या सर्व ठिकाणच्या पुढाऱ्यांनींहि या दृष्टीनें विचार व चर्चा केली पाहिजे, कच्च्या मालाच्या चौकशा केल्या पाहिजेत, माहिती मिळविली पाहिजे. ती वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केली पाहिजे. त्यावांचून सामान्य जनतेचें लक्ष या गोष्टीकडे वेधणार नाहीं.

आज आपल्या महाराष्ट्रांत अनेक वर्तमानपत्रें, मासिकें, साप्ताहिकें, द्विसाप्ताहिकें निघत आहेत. कांहीं विशिष्ट जातीच्या उद्धारार्थ म्हणून निघत आहेत. पण अशांतहि अमुक एका विशिष्ट जातींत पूर्वीं कोणता व्यापार होता, त्याचें आतां काय झालें, तो त्याच जातीचे हातीं आहे किंवा दुसऱ्या जातीकडे गेला, त्याची पुनः पूर्वीप्रमाणें भरभराट होण्याकरितां काय केलें पाहिजे इत्यादि ऊहापोह एकाहि वर्तमानपत्रांत किंवा मासिकांत येत नाहीं.

राजाश्रयाशिवाय पुष्कळ गोष्टी नडून अपुऱ्या राहतात हें खरें आहे. पण कोणीहि आला तरी सरकारास आज काय मागतो हे पाहिलें तर काय वाटेल ? प्रत्येक जातीचा माणूस आमच्या जातीस जास्त नोकऱ्या द्या असेंच म्हणतो. हिंदुस्थानांतील अनेकविध धंद्यांचें उच्चाटन होत असतांनाहि कोणाहि शिकलेल्या, बिनशिकलेल्या माणसास आपला उद्योग सोडून भलतें काम करण्याची खोड लागली आहे.

आपण इतकें शिकलो पण आपण या गोष्टींचा विचार करतों का ? या सर्व गोष्टींचा विचार धंदेवाईक लोकांनीं करावा अशी योजना डायरेक्टर ऑफ इंडस्ट्रीज यांनीं करावी अशी आमची शिफारस आहे. आपल्या प्राचीन व अर्वाचीन उद्योगधंद्यांत देशकालवर्तमान पाहून काय सुधारणा करावयास हवी हेंहि आम्हास त्यांनीं दाखवावें.

मुंबई इलाख्यापैकीं धारवाड जिल्ह्यांत वीस कोटी रुपयांचा कापूस पिकतो. एकट्या हुबळी म्युनिसिपालिटीला एका गठ्ठ्यास चार आणेप्रमाणें वीस हजार रुपयांचें उत्पन्न आहे. पण हाहि व्यापार तेथील लिंगायत लोकांच्या हातून आज गेला आतां सर्व कापूस बाहेर जातो, सरकीहि बाहेर जाते. म्हणून आमचीं जनावरें उपाशीं व शेतास खत कमी.

सर्व जगांतील व्यापाराचें जें औद्योगिक वर्चस्व आपणावर झालें आहे तें दूर करण्याकरितां आपण सर्वांनीं प्रयत्न करून आपली औद्योगिक प्रगति करण्याची खटपट केली पाहिजे. याकरितां गांवोगांवीं औद्योगिक सुधारणामंडळ स्थापन करून निदान आपल्या महाराष्ट्राचें तरी औद्योगिक पुनरुज्जीवन करून उद्यां येऊं घातलेल्या बऱ्याच अंशीं स्वायत्त सरकारला आपण मदत कराल अशी आशा आहे.

वरील आशयाचें विचारपरिप्लुत असें भाषण झाल्यानंतर शहर म्युनिसिपालिटीचे नवे अध्यक्ष श्री. **हरिभाऊ तुळपुळे** यांनीं श्रीमंतांचे, व निमंत्रित सद्गृहस्थांचे योग्य शब्दांत आभार मानले. नंतर श्रीमंतांस पुष्पहार घालण्यांत आला व 'वंदेमातरम्' हें पद झाल्यानंतर हा समारंभ संपला.

# शुध्दलेखन कमिटी

## पहिल्या बैठकीचा वृत्तान्त

बेळगांवच्या साहित्य-संमेलनांत ठरल्याप्रमाणे शुद्धलेखन कमिटीची बैठक ता. ११-१२ ऑगस्ट रोजी पुणें येथें भारत-इतिहाससंशोधक मंडळांत भरली होती. त्या वेळीं कमिटीपैकीं खालील गृहस्थ हजर होतेः- श्री. ना. गो. चापेकर, श्री. चिं.वि. वैद्य, श्री. ब. ग. खापर्डे, श्री. रा. दा. देसाई, श्री. कृ. पां. कुलकर्णी. कमिटीचे दुसरे दोन सभासद श्री. न. चिं. केळकर व श्री. ना. दा. बनहट्टी हे या बैठकीस हजर राहूं शकले नाहींत.

जादा सभासद घेण्याचा अधिकार कमिटीला आहे किंवा नाहीं याचा संशय असल्यामुळे प्रथम गैरसमजाने श्री. रं. बा. रड्डीशास्त्री व श्री. गो. कृ. मोडक यांना सभासद करून घेण्यांत आलें होतें. परंतु तसा अधिकार या कमिटीला नाहीं असें कमिटींत निश्चितपणें ठरल्यावर वरील गृहस्थांस चुकीनें सभासद करून घेतलें याबद्दल दिलगिरीचीं पत्रें पाठविण्याचें ठरलें.

यानंतर कामास सुरुवात झाली. प्रथम निर-निराळ्या गृहस्थांकडून आलेलीं पत्रें व त्याचप्रमाणें श्री. कुलकर्णी यांच्या प्रश्नावलीचीं उत्तरें बैठकींत वाचलीं गेलीं.

शुद्धलेखनासंबंधीं सामान्य तत्त्वें सभेला जीं ग्राह्य वाटलीं व विवेचन करतांना जीं उपयुक्त होतील असें सभेला वाटलें तीं निश्चित करण्यांत आलीं. तीं तत्त्वें येणेंप्रमाणेः—

( १ ) केवळ उच्चाराप्रमाणेंच लेखन असावें हें तत्त्व ह्या कमिटीस संमत नाहीं.

(२) परंपरा, वर्तमान रूढि, व्युत्पत्ति व उपयुक्तता यांचा विचार करून शुद्धलेखनाचा निर्णय व्हावा.

वरील तत्त्वांना अनुसरून कमिटीनें ज्या प्रश्नांचा विचार करून सध्या एकमतानें तात्पुरता निर्णय ठरविला ते प्रश्न व त्यांचे निर्णय खालीं दिल्याप्रमाणें आहेतः—

### अनुस्वार

(अ) मराठीमध्यें परसवर्णाच्या ठिकाणीं नेहमीं शीर्षबिन्दु द्यावा. अर्थभेद होत असेल तर मात्र परसवर्णच लिहावा.

उदा.—देहांत (सप्तमी); देहान्त (शिक्षा).

(आ) य, र, ल, व, श, ष, स, ह, ज्ञ यांच्या पूर्वीच्या अनुस्वाराबद्दल केवळ शीर्षबिंदूच द्यावा. उदा.--सिंह, संसार.

( इ ) नामांच्या व सर्वनामांच्या अनेकवचनी सामान्य रूपांवर शीर्षबिंदु द्यावा. उदा.—लोकांस, टिळकांस.

( ई ) नपुंसकलिंगी एकारान्त शब्दांच्या एक-वचनी व अनेकवचनी रूपांवर शीर्षबिंदु द्यावा. उदा.—केळें, केळीं; बोलणें, बोलणीं.

(उ) नपुंसकलिंगी ईकारान्त शब्दांच्या एकवचनी रूपांवर शीर्षबिंदु नसावा. उदा.—पाणी, दही, मोती.

( ऊ ) हास, धाव, केस, काच, लाकूड इत्यादि शब्दांवरील शीर्षबिंदु गाळावेत.

( ए ) मी तृतीयान्त असतांनाहि त्या शब्दावर शीर्षबिंदु देऊं नये. उदा.—मी केलें.

तूं ह्या सर्वनामावर प्रथमा व तृतीया असतां बिंदु द्यावा. आम्ही, तुम्ही यांवर प्रथमा विभक्ति असतांना बिंदु देऊं नये. उदा.—आम्ही जातों; तुम्ही बोलतां.

( ऐ ) मराठींत व्युत्पत्तीनें आलेले अनुनासिक शीर्षबिंदू अर्थभेदास जरूर असतील तेथेंच कायम ठेवावेत. उदा.—नांव, नाव, पांच, पाच; इतरत्र गाळावेत. उदा०—गाव.

### विभक्ति प्रत्ययांवरील अनुस्वार

( ओ ) तृतीया—नें, नीं—शीर्षबिंदुविरहित.
आं एं ई हे शीर्षबिंदुसहित लिहावेत.
द्वितीया व चतुर्थीः—ना--ना--बिंदुरहित.
सप्तमीः—ई आं—बिंदुसहित.

### क्रियाविशेषण अव्ययें

(औ) स्थलकालवाचक अव्ययांवर बिंदु देऊं नये. उदा.—जेथे, तेथे, एकदा, दोनदा, आता, कधी.

(अं) धातुसाधित क्रियाविशेषणांवर शीर्षबिंदु द्यावा. उदा.—करूं, चालूं, जातां, बोलतांना.

### ऱ्हस्वदीर्घ अन्त्यस्वर

(क) मराठींतील ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त तत्सम शब्द प्रथमेच्या एकवचनांत ऱ्हस्व लिहावेत. अनेकवचनांत दीर्घ लिहावेत.

(ख) ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त तत्सम अव्ययें ऱ्हस्वान्तच लिहावीं. उदा.—परंतु, अद्यापि, यथामति.

### उपान्त्य स्वर

( ग ) अकारान्त तत्सम शब्दांतील उपान्त्य स्वर ऱ्हस्व इ किंवा उ असल्यास तो ऱ्हस्व इ किंवा उ मराठींत प्रथमेच्या दोनहि वचनांत ऱ्हस्वच लिहावा. उदा.—गुण.

( घ ) कोल्हापूर, नागपूर, इत्यादि तद्भव शब्दां-तील उपान्त्य अक्षरांतील ऊकार दीर्घ लिहावा.

( ङ ) उपान्त्य दीर्घ ई ऊ असलेले अकारान्त तत्सम शब्द मराठींत आत्मसात् झाले असल्यास सामान्य-रूपाचे वेळीं त्यांचा उपान्त्य स्वर ऱ्हस्व लिहावा. उ.—शरीर शरिराचा. आत्मसात् न झालेल्या शब्दांच्या

बाबतींत मात्र दीर्घच कायम ठेवावा.—सूत्र-सूत्रांत गीता—गीतेंत.

**कांहीं शब्द**

( च ) राहणें, वाहणें, पाहणें, हीं रूपें शुध्द समजावीं. वहाणे, वाहाणें, रहाणे, राहाणें, पहाणें-पाहाणें हीं अशुध्द समजावीं.

कोणत्या, एखादा हीं रूपें ग्राह्य, कोणच्या, एकादा, हीं अग्राह्य हि अव्यय ऱ्हस्व लिहावें. हि, च, देखील, सुद्धां, हीं अव्ययें शब्दाला जोडून लिहावीं.

उरलेल्या मुद्द्यांचा विचार कमिटीच्या पुढील बैठकींत करण्यांत यावा असें ठरलें. या निर्णयासंबंधानें ज्या कोणास आपलें मत व्यक्त करावयाचें असेल तें त्यांनीं कृपा करून चिटणिसा-कडे लवकर कळवावें.

कृ. पां. कुलकर्णी
७१९सदाशिव पेठ पुणें.

ना. गो. चापेकर
अध्यक्ष.

# शारदा बिलावरील आक्षेपांस उत्तर

## ( संमतिवय कमिटीच्या रिपोर्टावरून )

### लेखांक १ ला

शारदा बिलावरील वादविवादांत संमतिवयकमिटी-च्या रिपोर्टाचा उल्लेख वारंवार येणार असल्याने आणि वादांत भाग घेणाऱ्यांना रिपोर्टातील विचारसरणीची माहिती अवश्य असल्या कारणाने त्या कमिटीच्या रिपोर्टातून कांहीं महत्त्वाचे भाग सारांशरूपाने आम्ही मराठी वाचकांकरितां देण्याचे योजिले आहे. त्यांत 'आक्षेपकांच्या आक्षेपांस उत्तरे' हा भाग विशेष महत्त्वाचा वाटल्याने तेथूनच सारांश देण्यास सुरुवात केली आहे.

**आक्षेपांची माळ**

(१) खासगी स्वरूपाच्या सामाजिक व धार्मिक बाबतींत सरकारने कायदा करून हात घालूं नये, सुधारणेची गोष्ट समाजावर सोंपवावी व समाजानें ती चळवळीनें लोकमत जागृत करून घडवून आणावी. लोकांनीं कायदा करा अशी मागणी केल्याशिवाय सरकाराने कायदा काय म्हणून करावा ?

(२) सरकार परधर्मीय आहे. राणीच्या जाहीर-नाम्यानें सरकारनें धार्मिक बाबतींत आपण हात घालणार नाही, तटस्थ राहूं असें लोकांना आश्वासन दिलें आहे. म्हणून सरकारला या धार्मिक बाबतींत लोकांवर कायदा लादण्याचा हक्क नाहीं.

(३)सध्यांची कायदे-कौन्सिलें प्रातिनिधिक नाहींत.

(४) कायदे—मंडळांत निरनिराळ्या धर्मांचे लोक असतात. त्यांनीं दुसऱ्यांच्या सामाजिक चाली-रीतींत हात घालणें गैर आहे !

(५) संमतीचें वय किंवा लग्नाचा कायदा हे दोनहि कायदे हिंदूमुसलमानांचे धार्मिक हक्क व चालीरीति यांच्याविरुद्ध आहेत.ब्राह्मणांप्रमाणेंच इतर जातींतहि ऋतुप्राप्तीनंतर लग्न करणे हें पाप आहे असें समजतात, व रजोदर्शनापासून सोळा दिवसांचे आंत गर्भाधानाचा संस्कार झालाच पाहिजे असें धर्मशास्त्र आहे.

( ६ ) रजोदर्शन हें मुलीची पतिसंसर्गाविषयीं पात्रता असल्याचें सहज सिद्ध करतें. कन्या ऋतुमती झाल्यावर तिला थोड्याच काळांत मातृत्व प्राप्त झालें तर त्यापासून स्त्रियांना किंवा त्यांच्या संततीला मोठा घातपात होतो असे आजपर्यंत तरी दिसून आले नाहीं ! स्त्रियांची व बालकांची मृत्युसंख्या वाढण्याला आर्थिक विपन्नावस्था व इतर गोष्टी कारण आहेत.

( ७ ) स्त्रियांची लग्नें रजोदर्शनानंतर योग्य काळीं झालीं नाहींत तर त्या स्वाभाविकपणेंच अनीतीच्या मार्गाकडे जातील व समाजांतील मुलगे व मुली कुमार्गी होतील. विलायती सुधारणेचा बोजवारा कसा झाला हें लिंडसे यांच्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेंच आहे !

(८) धार्मिक चालीरीतींत सरकारनें हात घातला तर लोकांत तीव्र असंतोष माजेल.

(९) आपल्यांतील बालविवाहाच्या चालींत फार खोल अर्थ आहे. पतिधर्म व नवऱ्याविषयीं निष्ठा या गोष्टी अल्प वयांत लग्न झालेल्या कुमारि केच्या अंगीं आपोआप येतात. सासू—सासऱ्या-विषयीं तिला आदर वाटतो व त्यांच्या घराण्याशीं सहजच ती एकजीव होते. अविभक्तहिंदुकुटुंबपद्धति याच गोष्टीमुळें टिकली आहे.

(१०) संमतीचें वय ठरवून तसा कायदा तुम्ही करणार.पण लग्नानंतर हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें नवऱ्याला आपल्या पत्नीवर अनिर्बंध हक्क प्राप्त होतात, त्यांत तुम्ही हात घालतां त्याची वाट काय ?

(११) अहो, कालांतरानें या गोष्टी आपोआप होतच आहेत, मग कायद्याची जरूर काय ? लोकां-

च्यांत आर्थिक त्राण नाहीं आणि सध्यां सुधारणाहि जोरावर आहे, त्यामुळें मुलींचें लग्नाचें वय आपोआप वाढतेंच आहे!

(१२) १९२५ सालींच संमतीच्या कायद्यांत तुम्हीं सुधारणा केली, व ( कारण नसतांना ) तें वय १३ वर आणलें. आतां पुनः सुधारणा करावयाला असें कोणतें नवें कारण किंवा परिस्थिति उत्पन्न झाली आहे ?

(१३) तुम्हीं कायदा केला तर त्याचा दुरुपयोग झाल्याखेरीज कधींहि राहणार नाहीं.

(१४) सध्याचा कायदा पास झाल्याला चाळीस वर्षें झालीं! त्याचा कितीदा उपयोग झाला? आणि न्यायाधीशांच्या पाठीवरची झूल अशा खटल्यांत कितीदां हालली? बुकाला भार असे कायदे बुकांत काय करावयाचे? कायदा झाला आणि धूळ खात मात्र पडला. तुम्हीं नवा कायदा करून आणखी वय वाढविलें तरी, आहे ती स्थिति सुधारण्याची आशा नको!

ही यादीच इतकी विस्तृत आहे कीं, सामान्य रीतीनें घेण्यांत येणारा आक्षेप यांतून राहिला असेल असे वाटत नाहीं. आतां वरील आक्षेपांचीं क्रमशः उत्तरें कमिटीनें कशीं दिलीं आहेत तीं पाहा.

**१ धार्मिक बाबतींत सरकारनें हात घालूं नये**

सर्वसाधारण रीतीनें पाहिलें तर खासगी, सामाजिक व धार्मिक सुधारणा ही कायद्यांनीं होत नाहीं हें खरें आहे. हजारों व लाखों माणसांचा समाज व त्यांत शेकडों वर्षें रूढ असलेल्या चाली व समजुती यांत बदल करावयाचा असला तर त्यांना प्रथम सुशिक्षित करून त्यांच्यामध्यें सुधारणेची चळवळ करणें हीच गोष्ट युक्त होय. पण सामाजिक आपत्ति अगर दुष्ट चाली या दूर करण्याला एखाद्या विशिष्ट गोष्टींत केव्हांहि कायदा करूंच नये किंवा करतां येणारच नाहीं, हें म्हणणें मात्र खरें नाहीं. सतीचा कायदा, विधवापुनर्विवाहाचा कायदा, सिव्हिल मॅरेज अॅक्ट, धर्मांतर केलेल्यांच्या वारसासंबंधीं कायदा हीं कायद्यानें रुढीवर व धर्माच्या बाबतींत हात घातल्याचीं उदाहरणें आहेत. सतीची चाल अमानुष होती, व वरील इतर बाबतींत सार्वत्रिक दृष्टीनें अन्याय होत होता म्हणून सरकारनें कायदे केले. यांपैकीं कांहीं कायदे बंधनकारक आहेत व इतर केवळ अनुज्ञापक आहेत. पण हिंदु व मुसलमानी धर्मशास्त्रांत सरकारनें कायद्यानें आजवर हात घातलाच नाहीं असें कांहीं त्यावरून सिद्ध होत नाहीं! आजवर हात घातला म्हणूनच कायद्यानें तो यापुढें घालावा हें 'कारण' होऊं शकत नाहीं हें आम्ही जाणतों. पण हिंदूंनीं अगर मुसलमानांनीं धर्मशास्त्र ही सर्वस्वीं व्यक्तिविशिष्ट किंवा भावनेची गोष्ट (Personal law) म्हणून आजवर मानिली असतांहि, अत्यंत जरूरीच्या व योग्य कारणाच्या वेळीं सरकारनें त्यांत हात घालावयास मागेंपुढें पाहिलें नाहीं. इतकाच मुद्दा आम्हाला लोकांच्या निदर्शनास मुद्दाम आणावयाचा आहे. हिंदु वारसाच्या बाबतींत अगदीं अलीकडची सुधारणा तर १९२९ सालीं झाली व तिला लोकांनीं 'संमति' दिली असली तरी, हिंदुधर्मशास्त्रांत हात घालूनच सरकारला ती करावी लागली, त्याशिवाय ती झाली नाहीं! सामाजिक किंवा धार्मिक बाबतींत सरकार मुद्दाम बहुधा हात घालीत नाहीं, कारण प्रसंग लोकांच्या मनोभावना दुखविण्याचा असतो! पण ढळढळीत अन्याय अगर सामाजिक असमता दिसून येऊं लागली, तर सरकारलाहि अशा बाबतींत हात घालण्यावांचून गत्यंतर नसतें. इतर देशांतहि लग्न व संमतिवय या बाबतींत सुधारणा कायद्यानें झाल्या आहेत.

ईजिप्त व तुर्कस्थान या देशांनींहि १६ व १५ या वयाखालीं लग्न होऊंच नये असें कायद्यानें ठरविलेलें आहे! इंग्रज सरकार हें परकी याबद्दल वाद नाहीं. पण देशी संस्थानिकांनीं असे कायदे केले आहेत व आज ते तेथें अनेक वर्षे चालू आहेत याची वाट काय? इंदूर, राजकोट, कोटा, मंडी, म्हैसूर, बडोदें इत्यादि संस्थानांत लग्न व संमतिवय यांचे कायदे होऊन बरींच वर्षे झालीं आहेत व अपराधी लोकांना शिक्षाहि होत आहेत. आणि संस्थानांनीं कायदा केला त्यांच्यावर धर्मांत हात घातल्याचा आरोप येत नाहीं, तर तो ब्रिटिश हिंदुस्थानांतच कां यावा?

# दंगा कमिटीच्या शिफारशींचा सारांश

(१) मुंबईमध्यें कम्युनिस्टांच्या ज्या चळवळी चालत आहेत त्यांवर ताबडतोब सक्त इलाज करण्यांत यावा.

(२) कम्युनिस्टांच्या चळवळीच्या खालोखाल गुंडांची अतिशय भीति असते. तेव्हां अशा गुंडांचे (पूर्वी शिक्षा झालेल्या गुंडांसहित) व विशेषतः मुंबईस बाहेरून येणाऱ्या गुंडांचे नियंत्रण करण्याकरितां त्यांना एकदम पकडण्यांत येऊन त्यांचा योग्य बंदोबस्त करण्यांत यावा.

(३) मुंबई आणि सबर्बनभाग यांत जे पठाण सावकारीचा धंदा करतात त्यांच्यावर नियंत्रण कसे घालावें व कोणत्या उपायानें ते राखावे याबद्दल उपाययोजना सुचविण्याचा प्रश्न बॅंकिंग इन्कायरी कमिटीकडे सोंपवावा.

(४) इंग्लंडांत गुंडांचे नियंत्रण करण्यासाठीं जे कायदेकानू आहेत त्याच पद्धत्यनुरूप मुंबईच्या बाहेर असलेल्या गुंडांचें नियंत्रण करण्यासाठी एक योजना करणें आवश्यक आहे व त्याप्रमाणे ती करण्यांत यावी.

(५) आकस्मिक कारणानें जर दंगा उपस्थित झाला तर बिनहत्यारी लोकांची सोडवणूक करण्याकरितां स्पेशल कॉन्स्टेबल्सची भरती करण्याची तजवीज करण्यांत यावी.

(६) मुंबईच्या कायदेकौन्सिलाने मुंबईच्या पोलीसच्या संख्येत जी वाढ नुकतीच मंजूर केली आहे त्या संख्येपेक्षां पोलीस कमिशनाच्या शिफारशीप्रमाणे जास्तींत जास्त ५०० शे पोलिसांची जादा भरती करण्यांत यावी.

(७) मुंबईच्या कायदे कौन्सिलापुढे जे इमरजन्सी सिक्युरिटी बिल पुढे आले आहे तें पास व्हावें असें आम्हास सामान्यतः वाटते.

(८) ज्याअर्थी धमकावणीसंबंधाचा कायदा पास झाला आहे त्याअर्थी त्या कायद्याचा अंमल जारी व्हावा असे आम्हास वाटते.

(९) इं. पि. कोड कलम १५३ अ आणि २९५ अ अगर तत्सम कलमान्वयें जीं वर्तमानपत्रे, हस्तपत्रकें अगर पुस्तकें जातीजातींत मत्सर अगर द्वेष पसरवीत असतील त्यांच्यावर ताबडतोब इलाज करण्यांत यावा.

(१०) आकस्मिक रीतीनें उद्भवणाऱ्या दंग्याचें काम चालविण्याकरितां जास्त ऑनररी मॅजिस्ट्रेटांची जरूरी लागते, सबब त्यांची एक जादा यादी तयार करून ठेवण्यांत यावी. दंग्याच्या वेळीं दंग्याच्या भागांतून जेव्हां यांना फिरण्याचा प्रसंग येतो तेव्हां त्यांच्या सुरक्षिततेची शक्य ती काळजी घेण्यांत यावी.

(११) ज्या ठिकाणीं लष्करी पहारा सुरू केला असेल त्या भागांत लष्कराचे आरोग्य चांगले राहाण्यासाठीं शक्य ती तजवीज करण्यांत यावी.

(१२) दंग्याच्या खटल्यांची चौकशी लवकर सुरू करण्यांत यावी.

(१३) मालकांच्या खर्चानें घराची अगर दुकानांची देखरेख वॉचमनच्या ऐवजी पोलिसांनीं करावी असे वाटल्यास या सूचनेचा विचार व्हावा.

(१४) मायन्या घालून तयार केलेल्या व अणकुचीदार टोकांच्या काठ्या अगर लाठ्या दंग्याचे वेळीं मुंबई शहरांत वापरण्याच्या असतील तर त्याबद्दल लायसेन्सची अट ठेवण्यांत यावी.

(१५) दंग्याच्या वेळी शहरांत शांतता प्रस्थापित करण्याकरितां पठाणांनीं आपल्यापैकीं मोकदम निवडावेत म्हणून त्यांचे मन वळवावे व अशा मोकदमांना पोलीस कमिशनरांनीं मान्यता द्यावी.

(१६) दंगा चालू असतांना वर्तमानपत्रांनीं ठळक अक्षराच्या शिरोलेखाखालीं मजकूर छापूं नये. तसेच भीति उत्पन्न होईल असे लेख अगर खोडसाळ बातम्या प्रसिद्ध करूं नयेत.

(१७) दंग्याचें भीषण स्वरूप असतांना दंग्याच्या भागांत शांतता राखण्याकरितां लष्कर बोलावणें, कर्फ्यू ऑर्डर जाहीर करणे, पांचापेक्षां अधिक लोकांच्या जमावास प्रतिबंध करणें, बदमाषांवर सक्त नजर ठेवणें, लोकांना निःशस्त्र करणें, दंग्याच्या भागांतील दारूचीं दुकानें बंद करणें वगैरेसारखी उपाययोजना अगर दंग्याचा उपशम अन्य तऱ्हेनें होईल अशी उपाययोजना ताबडतोब अमलांत आणावी.

(१८) हिंदु-मुसलमान यांसारख्या जातिविषयक वादानें दंगे न होण्याला प्रत्येक जातीचा दृष्टिकोन बदलला पाहिजे. परस्परानीं परस्परांवर विश्वास ठेवणें जरूर आहे हा प्रश्न फक्त मुंबई शहराचा नसून सर्व भरतखंडाचा आहे याकडे लक्ष द्यावें.

गेल्या फेब्रुवारींत मुंबई शहरांत झालेल्या दंग्यासंबंधाची चौकशी करण्यासाठीं कायदेमंडळाच्या ठरावास अनुसरून एक कमिटी नेमण्यांत आली होती. त्या कमिटीचे अध्यक्ष मि. पर्सीव्हल हे होते, व कमिटींत एक हिंदु व एक मुसलमान असे दोन सभासद होते. या कमिटीचा रिपोर्ट नुकताच प्रसिद्ध झाला आहे. त्या कमिटीनें ज्या सर्वसामान्य सूचना केल्या आहेत त्या आजच्या अंकात दुसरीकडे दिल्या आहेत. त्या शिफारशींत वावगें असें कांहीं फारसें नाहीं. पण त्याचबरोबर त्या सूचनांत नवीन असेंहि कांहीं

फारसे नाहीं. कमिटी न नेमतां आणि साक्षीपुरावा घेण्याचा एवढा खटाटोप न करतांदेखील या सूचना कोणीहि समंजस माणसानें केल्या असत्या. अर्थात् तच चौकशी कमिटी नेमण्याचा जो कित्येकांकडून आग्रह धरण्यांत आला तो असल्या सर्वसामान्य स्वरूपाच्या उपदेशपर सूचना करण्याकरितां नव्हे, तर कमिटीनें आपल्या रिपोर्टात ज्या सूचना आतां केल्या आहेत त्या धोरणानें दंग्याच्या पूर्वी व दंग्याच्या वेळीं काम चाललें होतें काय याचा निर्णय देण्याकरितां. पण त्या दृष्टीनें रिपोर्ट वाचल्यास वाचकांची या रिपोर्टानें निराशाच होईल.

कमिटीचे अध्यक्ष न्यायखात्यांत नांवाजलेले असे एक जज्ज असून दोघेहि सभासद एम. ए. एलएल. बी. आहेत. असे असतां त्यांचा हा रिपोर्ट वाचून पाहिल्यास त्यात त्याच्या न्यायकौशल्याचा नमुनेदार मासला असा कोठेंच दृष्टीस पडत नाही. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास हा कमिटी नेमण्यापूर्वीच कमिशनर मि. केली यांनी दंग्याची माहिती देणारा जो एक रिपोर्ट प्रसिद्ध केला होता त्या रिपोर्टाला पाठिंबा देण्यासाठीच हा रिपोर्ट लिहिला आहे कीं काय असेंच ठिकठिकाणचा मजकूर वाचून वाटूं लागतें. केलीसाहेबाचे जिगर दोस्त जे पठाण त्यांची बाजू जितकी खुलवून व निर्दोष दिसण्यासारखी मांडतां येईल तितकी यात मांडली आहे. लष्कर लवकर न बोलावण्यांत हयगय झाली हा आक्षेपहि खोडून काढण्याचा प्रयत्न केला गेला आहे, आणि ना. हॉटसन व केली यांच्यात जो मतभेद उत्पन्न झाला होता त्याचीहि सारवासारव या रिपोर्टात केली आहे. एकंदरीत हा रिपोर्ट एखाद्या न्यायविशारद अशा कमिटीनें लिहिल्यासारखा दिसत नसून एखाद्या खात्याच्या वरिष्ठानें स्वतःच्या खात्याच्या कारभाराविषयीं जसा रिपोर्ट लिहावा तशाच मासल्याचा हा रिपोर्ट आहे.

कमिटीच्या शिफारशींत फारसे वावगें असे कांहीं नाही असे आम्ही वर म्हटलें खरें; परंतु या दंग्याची बहुतेक सर्व जबाबदारी कमिटीनें कम्युनिस्टांच्यावर लोटून सरकारने त्यांचा बंदोबस्त करावा असे जे आग्रहपूर्वक पुनः पुनः सांगितले आहे ते आम्हास गैर दिसतें. कम्युनिस्टांची संपाच्या बाबतींतली वागणूक योग्य का अयोग्य हा मतभेदाचा प्रश्न आहे. आणि त्याच्याविषयींचें खरें मत पिअर्सन कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होईल त्या वेळीं देतां येईल. वास्तविक पाहतां फेब्रुवारींत झालेल्या दंग्याचा व कम्युनिस्टांच्या चळवळीचा फारच दूरान्वित असा संबंध आहे. असें असतां या कमिटीने कम्युनिस्टांच्या चळवळीलाच प्राधान्य देऊन आपल्या रिपोर्टाचा बराचसा भाग त्यानें अडविला आहे. आणि कम्युनिस्टांच्या विरुद्ध म्हणून ज्या शिफारसी केल्या आहेत त्या अगदींच एकतर्फी केल्या आहेत. या संबंधाने आम्हास सध्या अधिकाऱ्यांना एवढेंच सुचवावयाचें आहे कीं, पिअर्सन कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होईपर्यंत या कमिटीच्या रिपोर्टातील कम्युनिस्टांच्या विरुद्ध केलेल्या सूचना अमलांत आणल्या जाऊं नयेत.

दंगा कोणी सुरू केला या संबंधांतला कमिटीचा निर्णय आम्हास मान्य आहे. परंतु ऑइल कंपनींतले पठाण आणि संपवाले मजूर यांच्यांतलें हे भांडण सर्व मुंबईभर कोणी पसरविलें व त्याला हिंदु-मुसलमानांच्या तंट्याचें स्वरूप कोणी दिलें याविषयींचें कमिटीचे मत अगदींच गुळमुळीत आहे. महंमद अली व शौकत अली यांची जी मुलाखत टाईम्समध्यें प्रसिद्ध झाली ती गैरवाजवी होती व ती त्या वेळीं प्रसिध्द करण्यांत टाईम्सच्या संपादकाकडून अविवेक झाला असे कमिटीनें म्हटले आहे. पण लगेच दुसरीकडे कोणाहि हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांनीं या दंग्याला ज्ञातिविषयक तंट्याचें स्वरूप दिले नाही असेंहि म्हटलें आहे! गुंड लोकांना मुंबई शहराबाहेर काढून दुसरीकडे ठेवण्याची व्यवस्था करावी अशी एक कमिटीची शिफारस आहे. परंतु त्याबरोबरच पठाण हे कांहीं गुंड नसून त्यांच्यांतला बहुतेक मोठा समाज कायद्याला धरून वागणारा आहे असें कमिटीनें म्हटलें आहे! पठाण सावकरांचा जाच गोरगरिबांना असह्य होतो व तो दूर करण्याकरितां बँकिंग चौकशी कमिटीनें उपाययोजना करावी असे सांगणारी ही कमिटी पठाणांना कायदेशीर वागणारे असेंच अद्यापिहि समजते! दंग्याच्या वेळी हिंदूंच्या हातांतल्या मात्र काठ्या देखील काढून घेण्यात आल्या, पण पठाणांच्या हातांतली हत्यारें काढून घेतली नाहीत असा पक्षपात पहिल्या तीनचार दिवसांपर्यंत तर पोलिसांच्या सांगण्यावरूनच चालू होता आणि काळबादेवी रस्त्यावरच्या मुसलमानांच्या मिरवणुकींतील लोकांच्या हातांत काठ्या होत्या, पण त्या काढून घेतल्या गेल्या नाहींत असेंहि आतां साक्षीवरूनच सिद्ध झालें आहे! तथापि त्याबद्दल कमिटीनें पोलिसांना दोष दिलेला नाहीं! अशाच प्रकारच्या आणखी कित्येक बाबतींतहि हा रिपोर्ट असमाधानकारक असा आहे. पण त्याचें सविस्तर निरीक्षण सवडीनुसार करूं. ज्यांना हा रिपोर्ट पाहिजे असेल त्यांना तो मुंबईच्या सरकारी छापखान्याच्या सुपरिंटेंडंटाकडून अवघ्या दोन आण्यांस मिळेल.

# यतिंद्राचें देवलोकीं प्रयाण

६२ दिवसांच्या प्रायोपवेशनानंतर हुतात्मा यतिंद्रनाथ दास यानें लाहोर येथें बोरस्टल तुरुंगांत देह ठेवला. प्रत्यहीं तिळतिळ आहुती देत देत अखेर यतिंद्रानें शुक्रवार ता. १३ रोजीं दुपारीं एक वाजन पांच मिनिटांनीं स्वदेहाची पूर्णाहुती दिली. आज हातपाय गार पडले, उद्यां नाडी मंद वाहूं लागली, परवां डोळे थिजले, तेरवां श्रवणेंद्रियांनीं सोडलें. या प्रमाणें नित्यशः यतिंद्रानें झिजून झिजून मातृदेवतेच्या चरणीं आत्मार्पण केलें.

यतिंद्रनाथ देवलोकीं जाणार, त्यानें ठेवलेलें प्रस्थान सत्य ठरणार हे भविष्य आगाऊ ठरल्यासारखेंच झालें असल्यानें त्याचा देह कोठें न्यावयाचा इत्यादि गोष्टीहि पूर्वीच ठरून गेल्या होत्या. माझी माता व भगिनी यांनीं ज्या ठिकाणीं देह ठेवला तेथेंच माझेंहि शव न्या ही यतिंद्राची अखेरची इच्छा असल्यानें त्याप्रमाणें त्याचा देह कलकत्ता येथें नेण्याची सर्व योजना करण्यांत आली होती. त्याचे बंधु किरण चंद्र दास यांना या सर्व गोष्टींची वर्दी देण्यांत आली असून यतिंद्राचें देहावसान झाल्यानंतर सायंकाळीं ४॥ वाजतां बोरस्टल तुरुंगाच्या फाटकांत त्यांच्या बंधूंच्या स्वाधीन त्याचा देह करण्यांत आला. तुरुंगाजवळ अलोट जनसंमर्द लोटला होता. डॉ. गोपीचंद, लाला दुनीचंदप्रभृति सर्व पुढारी तेथें उपस्थित होते. त्यांनीं यतिंद्राचा प्रचंड जयजयकार केला. व नंतर जंगी मिरवणूक निघाली. मुलतान रोड, माल, अनारकेली या मार्गानें लोहारी वेशींतून मिरवणूक शहरांत शिरली व तेथून दिल्ली दरवाजानें बाहेर पडली. मिरवणुकीबरोबर अफाट जनसमुदाय यतिंद्राचा जयजयकार करीत चालला होता. मिरवणूक सुमारें एक मैलावर पसरली होती. सर्व शहरांवर शोकाची छाया पसरली असून शहरांतील सर्व व्यवहार पूर्ण बंद होते. रस्त्यांतून यतिंद्रावर सारखी पुष्पवृष्टि होत होती.

रात्रीं ९ वाजतां मिरवणूक संपली व नंतर म्यु० बागेंत जंगी जाहीर सभा डॉ. अलम यांचे अध्यक्षतेखालीं होऊन यतिंद्राचे गुणानुवाद गाण्यांत आले. यतिंद्रानें आपल्यापुढें जें उच्च ध्येय ठेवलें होतें व नोकरशाहीच्या जाचांतून मातृभूमि मुक्त करण्यासाठीं त्यानें जो आत्मयज्ञ केला तो तरुणांनीं मनन करावा असें डॉ. अलम यांनी सांगून सरकाराचा निषेध म्हणून पंजाब कायदेमंडळांतील सदस्यपदाचा आपण व डॉ. गोपीचंद यांनीं राजीनामा दिल्याचें जाहीर केलें. यतिंद्राच्या मृत्यूनिमित्त लाहोर सेंट्रल जेल व बोरस्टल जेल येथील कैद्यांनीं ता. १३ रोजीं रात्रीं अन्नग्रहण केलें नाहीं. रात्रीं त्याचें शव स्टेशनावर नेण्यांत आलें. ता. १४ रोजीं सकाळीं ६॥ वाजतां यतिंद्राचा देह हौरा एक्सप्रेसनें कलकत्त्यास नेण्यांत आला. हुतात्मा यतिंद्र याच्या मृत्यूची वार्ता विद्युद्गतीनें सर्व देशभर पसरतांच सर्वत्र औदासीन्याची छाया पसरली.

लाहोरच्या कटाच्या खटल्यातील एक आरोपी जतींद्रनाथ दास हा ६२ दिवस सतत अन्नत्याग करून अखेरीस शुक्रवारीं दोनप्रहरीं दीड वाजतां इहलोक सोडून सूर्यमंडळ भेदून वर गेला. योगयुक्त परिव्राट् किंवा रणांत अभिमुख असतांना प्राण सोडणारा वीर यांनाच सूर्यमंडळाचा भेद करून शाश्वत ब्रम्हलोकाप्रत जातां येतें असें शास्त्रकार सांगतात. प्रायोपवेशन करणारा यतींद्रनाथ हा मनोनिग्रहाच्या दृष्टीनें योगयुक्त संन्यासी होता. आणि सत्याग्रहाच्या शस्त्रानें झगडणारा तो वीर असून त्यानें प्रत्यक्ष मृत्यूलाहि न डरतां त्याच्या तोंडांत उडी टाकली; त्यामुळें 'रणे चाभिमुखो हतः' या कोटींतहि त्याचा समावेश झाला. अर्थातच आपल्या धगधगीत देशभक्तीनें आणि अढळ तत्त्वनिष्ठेनें सूर्यमंडळाचा भेद करून त्यानें स्वतःस आणि आपल्या मायभूमीसहि धन्य म्हणवून घेतलें आणि आपली कीर्ति इहलोकांत अजरामर करून ठेविली.

असो. बिलाचें भवितव्य काय व्हावयाचें असेल तें होईल. परंतु यतींद्राच्या या दिव्य बलिदानाचें चीज त्याचे देशबांधव कोणत्या प्रकारानें करणार ? आज यतींद्र गेला, उद्यां शिववर्मा जाईल. परवां तिसरा कोणी जाईल ! अशा आहुती एकामागून एक पटापट पडणार असें धडधडीत दिसत असूनदेखील त्यांचें रक्त असेंच थंडगार राहणार काय ? यतींद्राच्या राष्ट्रबांधवांचें मन देखील असेंच निर्विकार असल्यास परकी नोकरशाहीलाच पाषाणहृदयी म्हणण्याचा आपणास काय हक्क पोंचतो ? स्वातंत्र्यदेवतेच्या आराधनेसाठीं आनंदानें प्राणाचें बलिदान करण्याइतकी देशभक्ति बाणल्याचें व स्वातंत्र्यप्रेम फोफावत चालल्याचें प्रत्यक्ष प्रमाण पाहिल्यावर तरी हिंदी राष्ट्राला स्वराज्याची तहान लागली आहे कीं नाहीं व त्याच्या संपादणीसाठी तें स्वार्थत्याग करील का नाहीं असल्या शंका विचारीत बसण्याचें कारण नाहीं. हत्तीच्या

पावलांत ज्याप्रमाणे सगळ्या पावलांचा समावेश होतो त्याप्रमाणे प्रायोपवेशनाच्या या भयंकर दिव्यांत इतर सर्व सटरफटर स्वार्थत्यागाचा समावेश सहज होतो. अर्थातच देशभक्तांनी आपल्या तत्त्वनिष्ठेची परम सीमा गांठून देश स्वार्थत्यागाला किती तयार आहे याची खात्री पटविली आहे. परंतु हे बलिदान नोकरशाहीच्या जुलमाचे जें आगर अशा तुरुंगांतच प्रायोपवेशनाच्या मार्गानें होत राहावयाचें का या तत्त्वनिष्ठेचा दुसऱ्या कोणत्या तरी सद्यःफलदायी मार्गाकडे उपयोग करून घ्यावयाचा याचा विचार व्हावयास नको काय ?

# क्रिमिनल प्रोसीजर कोडाचें नवें बिल

## ( न. चिं. केळकर यांचें भाषण )

या बिलावर माझी अशी उपसूचना आहे कीं, त्यावर सर्वसामान्य लोकांचें व कायदेपंडितांचें काय मत आहे तें समजण्याकरितां हें बिल रीतीप्रमाणें बाहेर पाठवावें. होम मेंबर क्रेरर यांनी प्रथमच कबूल केलें कीं, हें बिल फार वादग्रस्त आहे. त्या वादांतील सरकारी बाजू त्यांनी मांडली तरी माझी बाजू काय आहे हें मी आतां या सभेला थोडक्यांत सांगतो.

उपसूचनेचा उद्देश हे बिल कांहीं दिवस लांबणीवर टाकण्याचा आहे हें मी स्पष्टपणें कबूल करतों. त्याला माझीं दोन कारणें आहेत. एक असें कीं, एक नवीन मोठें तत्त्व या बिलांत प्रथमच घातलें जात आहे. म्हणून त्यावर देशांतील अनेक तज्ज्ञांचे अभिप्राय कळणें अवश्य आहे. दुसरें कारण असें कीं, लाहोरच्या खटल्यांतील दूषित वातावरणांतून हें बिल बाहेर निघालें तर तें मला हवें आहे.

### तज्ज्ञांचें मत

पण हें माझें अतज्ज्ञाचें मत झालें. माझे कित्येक वकील, बॅरिस्टर, स्नेही मला म्हणाले कीं, न्यायाच्या दृष्टीनें हें तत्त्व चुकीचें आहे. ज्या लाहोर हायकोर्टाच्या एका विशिष्ट निकालातून हें बिल निघालें असें म्हणणें आहे तें कोर्ट तरी हें बिल अभिप्रायाला गेलें असतां, या तत्त्वाला संमति देईल कीं नाहीं कोणी सांगावें ? इतर देशाच्या कायद्यातून अशीं कलमें आहेत कीं काय? तात्पर्य, सर्व बाजूंनी अभिप्राय मिळविल्याशिवाय हें बिल मंजूर करण्याची घाई करणें योग्य नाहीं.

### सत्याग्रही लोकांची बहादुरी

पण बिल पुढें ढकलण्याचें माझें तिसरें व अधिक महत्त्वाचें कारण अजून पुढेंच आहे. तें असें कीं, बिल कसेंहि असो, त्याला या प्रकरणांतील सत्याग्रही लोक बळी देऊं नयेत असें माझें आग्रहाचें म्हणणें आहे. कारण बिल सत्याग्रहानें उत्पन्न झालें. पण सत्याग्रह कशानें उत्पन्न झाला हें पाहिलें पाहिजे. खरोखर या सत्याग्रही लोकानीं एक प्रकारची बहादुरी केली आहे. तुरुंगांत राजकीय कैद्यांना नीट वागवीत नाहींत. आणि तेथेंहि काळा-गोरा हा भेद करतात अशी सगळ्या देशभर आज किती तरी वर्षांची तक्रार चालू आहे, आणि यांत बाहेर आम्हा लोकांना जें करतां आलें नाहीं तें यांनी तुरुंगासारख्या कठीण परिस्थितींत केलें. वकील लोक आपल्या खोलींत आरामखुर्चीवर पडून वाद उत्पन्न करतात किंवा गुन्हेगारांच्या शास्त्रांत संशोधन करणारे पंडित ग्रंथसंग्रहालयांत बसून कल्पना चालवितात तसें यांनीं केलेलें नाहीं. तुरुंगांतला जाच सोशीत व अन्नत्यागानें देह झिजवीत एका मोठ्या महत्त्वाच्या राजकारणी तत्त्वाचा वाद त्यांनीं उभारला. इतकेंच नव्हे तर कांहीं अंशीं तो जिंकलाहि. हें लोकपक्षाचें मोठें काम ज्यांनीं केलें त्यांना या बिलाला आम्ही कधीं तरी बळी देऊं काय ? कधींहि नाहीं.

### सत्याग्रहाचे शुद्ध हेतु

अन्नत्याग सत्याग्रह करावा कीं नाहीं याबद्दल दुमत असूं शकेल. कोणी म्हणतील ही पापी आत्महत्या आहे, आततायीपणा आहे. पण खुद्द गांधींसारख्या पुण्यवंतानें २० दिवस उपोषण करून, जगाला चिंतेंत पाडलें. त्याला जर तपःसाधन हें उज्ज्वल नांव द्यावयाचें तर तें यालाहि कां देऊं नये? दोहोंतहि अन्नत्याग हा मुद्दा सारखाच आहे. कोणी म्हणतील हा सत्याग्रह म्हणजे भावनाप्राधान्याचा कडेलोट होय. पण तसेंहि नाहीं. कारण या सत्याग्रहाचा हेतु मर्यादित, निश्चित व राजकारणी स्वरूपाचा आहे व त्यामागें तीक्ष्ण भावनेइतकीच सूक्ष्म विवेकबुद्धि आहे असें उघड दिसतें. कोणी म्हणतील कीं, खटल्यांतील शिक्षा चुकविण्याचा हा प्रयत्न आहे. पण ही शुद्ध बदनामी होय. तुरुंगाला किंवा फांसाला भिणारे हे लोक खचित नाहींत. तुरुंगांतून मनुष्य सुटूं शकतो. फांशीस जाणारा मनुष्य एकदम दुःखमुक्त होतो. पण तिळतिळानें झिजून प्राण घालविणें व तोहि स्वेच्छेनें हें या

देहोंहून अवघड आहे. अन्नत्यागाची थट्टा करणारांनीं तो चारदोन दिवस करून पाहावा. मग हे लोक आपला प्राण तिळतिळ घालविण्याला कां तयार झाले ? तर त्याचें उत्तर हें कीं, त्यांची प्राण देण्याची तयारी आहे. पण त्यांना तो सरकारला फार महाग विकावयाचा आहे. आपल्या प्राणाचा मोबदला म्हणून सरकाराकडून त्यांना जनतेकरितां विशेष कांहीं मिळवावयाचें आहे. व तो लाभ म्हणजे राष्ट्रीय चळवळींतील लोकांच्या स्वाभिमानाला योग्य अशी सरकारकडून तुरुंगांतील वागणूक !

### तुरुंगांतील गैरव्यवस्था

या सत्याग्रही लोकांनीं एक मोठा राजकीय वाद पायावर खडा केला असें मी पूर्वी म्हटलेंच आहे. पण आणखीहि असें म्हणतो कीं, तो जिंकण्याचेंहि थोडेसें कार्य त्यांनीं केलें आहे. भगतसिंग व दत्त यांच्या तक्रारीचा कागद माझ्या हातीं नाहीं. पण मियानवाली तुरुंगांतील सरदार गोपाळसिंग यानें अन्नत्यागाच्या गुन्ह्याच्या चौकशींत खुद्द मॅजिस्ट्रेटपुढें जो लेखी जबाब दिला तोच मी वाचून दाखवितो. (अर्ज वाचून दाखविण्यांत आला.) बरं, सत्याग्रही लोक विक्षिप्त असतात आणि भलतेंच कांहीं घेऊन बसतात असें म्हणावें तर अलाहाबाद सरकारनें नेमलेल्या तुरुंग कमिटीचे सभासद पं. जगत् नारायण व हफीज हिदायत हुसेन यांनीं रिपोर्टाच्या भिन्न पत्रिकेंत बरोबर तसल्याच तक्रारी, विशेषतः काळ्या-गोऱ्या कैद्यांच्या वागणुकींत फरक असण्याच्या तक्रारी खऱ्या आहेत. असें स्पष्ट लिहिलें आहे. याचेंच प्रत्यंतर असें कीं, हिंदुस्थान-सरकारनेंहि याच मुद्द्याची चौकशी करण्याकरितां प्रांतिक सरकारांना लिहिलें आहे व आतां कांहीं तरी होणार असें दिसत आहे. तात्पर्य, १९२२-२३ सालच्या सरकारी तुरुंगचौकशीच्या कमिशननें जें ठरविलें तें मान्य नाहीं असे सर्वांचें म्हणणें असतां त्यांत बदल करण्याचा प्रसंग आम्हा कौन्सिलांतील लोकांना जो उपस्थित करतां आला नाहीं तो तुरुंगांत अन्नत्याग करून या तरुण मुलांनीं उभा केला. ही त्यांची केवढी थोरवी वर्णावी !

असो. अशा प्रकारचे हे लोक असल्यामुळे व त्यांनीं राजकारणांत एक नवें कार्य केल्यामुळें त्या कार्यांतूनच उत्पन्न झालेल्या या बिलाला आम्ही त्यांना आपल्या हातानें बळी कसें देऊं ? व देऊं असें सरकाराला वाटतें तरी कसें ? या देशभक्तांची करणरूप कांहीं सेवा आमच्या हातून न घडली तरी एवढी ही अकरणरूप सेवा तरी घडावी अशीच आमची इच्छा आहे.

# आर्थिक व व्यापारी समालोचन

## अमेरिकन व हिंदी भांडवलाचें सहकार्य

टाटा कंपनीनें एका अमेरिकन सिंडिकेटला आपली अर्धी भागीदारी दिल्याकारणानें हिंदी-व्यापारी, अर्थशास्त्र व राजकारणी लोक यांच्या-पुढे एक महत्त्वाचा प्रश्न उभा राहिला आहे. एखाद्या हिंदी कंपनीनें आपल्या धंद्यांतील भागीदारी परकीय भांडवलवाल्यांच्या पदरीं टाकली एवढ्यापुरता हा प्रश्न त्या कंपनीच्या दृष्टीनें खासगी असूं शकेल. परंतु देशांत राष्ट्रीय म्हणून गणल्या गेलेल्या देशी धंद्यांतील भागीदारी परकीय भांडवलवाल्यांच्या हातीं जाण्याची वहिवाट पडली तर त्यामुळें देशाच्या आर्थिक उन्नतीवर काय परिणाम होतील याचा विचार करणें हें लोकांचें काम आहे. वीज उत्पन्न करणाऱ्या मुंबई इलाख्यांतील तीन मोठ्या कारखान्यांची व्यवस्था पाहणाऱ्या कंपनीची भागीदारी अमेरिकनांकडे गेल्याकारणानें या धंद्यांत लागणारी यंत्रसामुग्री अमेरिकेंतून आणण्यांत येईल. व व्यवस्थापक मंडळाला झालेल्या फायद्यांतील अर्धा फायदा परदेशांत जाईल. यापुढेंहि जर सर्व साधारण हिंदी लोकांच्या सहाय्यावर ऊर्जितावस्थेस आलेले उद्योगधंदे परकीय भांडवलवाल्यांच्या हातीं जाणार असले व पुढें परकीय भांडवलवाल्यांची मगरमिठी पक्की व्हावयाची असली तर निरनिराळे धंदे संरक्षक जकातीच्या सहाय्यानें वाढविण्यापूर्वी लोकांना विशेष विचार करावा लागेल. एखाद्या वस्तूवरील आयात जकात तशी वस्तु देशांत तयार होण्याकरितां वाढविली गेली तर त्यामुळे किंमती वाढतात. याचा अर्थ देशी धंद्यांच्या उन्नतीकरितां रयतेला स्वार्थत्याग करावा लागतो असा आहे. पुढे मागे जर तो धंदा परकीयांच्या घशांत जावयाचा असेल तर लोकांना अशा तऱ्हेचा स्वार्थत्याग करावयास लावणें योग्य ठरेल काय असा प्रश्न आहे.

परदेशी भांडवलाच्या गळफासानें राजकीय पारतंत्र्य वाढतें ही गोष्ट हिंदुस्थानच्या, चीनच्या व इजिप्तच्या पूर्वेतिहासावरून स्पष्ट दिसते. बॅ. हाजी यांनीं किनाऱ्यावरील वाहतूक देशी कंपन्यांचे हातीं यावी म्हणून खटपट चालविली आहे. अशा वेळीं

एक मोठ्या देशी धंद्याच्या व्यवस्थापक मंडळाची भागीदारी परदेशी भांडवलवाल्यांच्या हातीं दिली जावी हा अशुभ योगायोग होय. या टाटा-अमेरिकन भागीदारीचा फायदा हार्जी यांच्या बिलाच्या विरोधकांच्या पदरात पडत आहे व त्यांच्याकडून असे स्पष्ट विचारण्यांत येत आहे कीं, टाटा यांनी अमेरिकन सिंडिकेटला भागीदार करून घेतले. या गोष्टीवरून हिंदी लोकांनीं हिंदी उद्योगधंदे हिंदी लोकांच्या मालकीचे असावे अशा-विषयीं जी चळवळ चालली आहे ती अव्यवहार्य ठरत नाहीं काय? आज टाटा यांनी विद्युदुत्पादनाच्या धंद्यांतील व्यवस्थापक मंडळाची भागीदारी दिली तशीच उद्यां आणखी एखाद्या धंद्यांतील दिली तर कोण काय करणार ! अमेरिकन भांडवलवाल्यांचा डोळा हिंदुस्थानावर आहे ही गोष्ट त्यांच्या हस्तका-कडून अमेरिकन व हिंदी भांडवलवाल्यांच्या सह-कार्याने हिंदुस्थानांत कोठे कोठे धंदे काढता येतील याचे जे निरीक्षण चालू आहे त्यावरून सहज कळ-ण्यासारखे आहे. अमेरिकन भांडवलवाले सांप्रत हिंदुस्थानांतून अशा नव्या धंद्यासंबधींच्या सूचना मागवीत आहेत. महायुद्धापूर्वी ब्रिटिश भांडवलशाही आपले पाय जगभर पसरीत होती. परंतु महा-युद्धानंतर अमेरिका धनको बनून ग्रेटब्रिटनचे स्थान घेऊ पाहत आहे. अशा वेळीं हिंदी लोकांना या टोळधाडीपासून त्रास होणार नाहीं याबद्दल खबर-दारी घेणे जरूरीचे आहे.

राष्ट्रीय बुद्धीने रयतांना स्वार्थत्याग करण्यास भाग पाडून ज्या धंद्यांचें संरक्षण करण्यांत येईल असे धंदे तरी व्यवस्था पाहणाऱ्या एजन्सीच्या लहरीपणामुळे व स्वार्थांधतेमुळे परकीयांच्या हातीं जाणार नाहींत अशा तऱ्हेची वेळींच सावध-गिरी बाळगली गेली पाहिजे. टाटा कंपनीला आपली मॅनेजिंग एजन्सीतील भागीदारी चुटकी-सरशी देतां आली. याचे कारण टाटा कंपनीचा विद्यु-दुत्पादक कंपन्यांशी स्वार्थी व दूरदर्शीपणाने केलेला करार हे होय. त्या कराराप्रमाणे टाटा सन्स लिमि-टेड यांना आपली भागीदारी पूर्णपणे अगर अंशत: दुसऱ्या कोणालाहि विकण्याचा अधिकार देण्यांत आलेला आहे. अर्थातच टाटा कंपनीच्या अमेरिकन सिंडिकेटबरोबरच्या कराराला विद्युदुत्पादक कंप-न्यांच्या भागीदारांची संमति घेण्याची जरूरी राहि-लेली नाहीं. जर करार एकांगी नसता तर निदान शेअर–होल्डरांची तरी संमति वरील कराराला घ्यावी लागली असती. जर राष्ट्राने झीज सोसून वाढवलेले धंदे परकीयांच्या घशात पडूं द्यावयाचे नसतील तर कोणत्याहि धंद्याला संरक्षण देतांना पुढील गोष्टींचा विचार केला पाहिजे—(१) ज्या धंद्यांना सरकारने लोकांच्या जमिनी मिळवून दिल्या असतील, ज्या धंद्यांच्या संरक्षणाकरितां आयात जकाती बसविल्या अगर असलेल्या वाढ-विल्या असतील अगर कर्जाऊ अगर देणगीच्या रूपाने पैसा दिला असेल, ज्या धंद्याच्या भांडवला वरील नफा अगर कर्जावरील व्याज आणि परत-फेड यांची सरकारने हमी घेतली असेल असे सर्व धंदे लोकांनीं झीज सोसून वाढवलेले आहेत असे समजण्यांत यावे (२) असले धंदे कर-णाऱ्या कंपन्या हिंदुस्थानांत नोंदविलेल्या असून त्यांचें भांडवल रुपयांत असावे (३) त्यांच्या भांडवलापैकीं निदान तीन–चतुर्थांश भांडवल हिंदी लोकांचे असून तितक्याच प्रमाणांत डायरे-क्टर हिंदी असावेत (४) कारखान्यांत शिक्षणा-करितां हिंदी तरुणांची सोय करण्यांत यावी (५)जर मॅनेजिंग एजन्सी (व्यवस्था पाहणारी कंपनी )असेल तर तिला स्वेच्छेनुसार वाटेल तेव्हां आपली भागी-दारी (अ) परदेशी कंपनीला विकण्याची आणि(ब) शेअर–होल्डरांच्या संमतीविना नवा भागीदार घेण्याची मोकळीक असूं नये (६) धंदा आपल्या पायावर उभा राहिल्यानंतर कृत्रिम संरक्षण बंद केल्यावरहि अशा धंद्यांत शेकडा पंचवीस टक्क्यां-पेक्षां जास्त परकीय शेअर–होल्डर अगर मॅनेजिंग एजन्सींत परकीय भागीदार घ्यावयाचे झाल्यास त्याला हिंदुस्थान–सरकाराची परवानगी घेणें आवश्यक असावे. असो.

वरील सूचना व्यवहारांत आणल्या गेल्यास आज टाटा–अमेरिकन भागीदारीने जी विचित्र व गुंतागुंतीची परिस्थिति उत्पन्न झाली आहे ती होणार नाहीं.परंतु हें सर्व घडून येणे न येणें सरकार, हिंदी भांडवलवाले, व जनता यांच्यावर अवलंबून आहे.

# संपचौकशीचा निकाल

मुंबई—सरकारनें गेल्या ता. ३ जुलै रोजीं ट्रेड डिस्प्यूट्स ॲक्टाच्या चौथ्या कलमान्वये मुंबईच्या गिरण्यांतील संपाचा विचार करण्यासाठीं चौकशी-मंडळ (कोर्ट) नेमलें. न्या. पियर्सन (अध्यक्ष) बॅ. तालियारखान व रूपचंद बिलाराम या तिघांची या मंडळावर नेमणूक केली. या मंडळाकडे ज्या चार प्रश्नांचा निर्णय देण्याचें काम दिलें ते प्रश्न पुढीलप्रमाणें—

(१) १९२९ च्या मार्च-एप्रिल महिन्यांत मुंबईच्या गिरण्यांतील मजुरांचे जे संप झाले त्यांना कारणीभूत झालेल्या मालक व मजूर यांच्या वादाची चौकशी करून त्या वादाचें नक्की स्वरूप काय होतें हें ठरविणे.

(२) असा वाद आढळून आल्यास त्याला मालक किंवा मजूर किंवा हे दोघेहि जबाबदार आहेत कीं काय व ते कोणत्या प्रमाणांत जबाबदार आहेत ?

(३) संप लांबण्याचीं कारणें कोणती ? याबद्दल जबाबदार कोण, मालक का मजूर ? का दोघेहि ? व ते कोणत्या प्रमाणांत ?

(४) मालक व मजूर यांचे वाद मिटविण्याचे बाबतींत काय अडचणी आहेत ?

ता. ६ जुलैपासून या मंडळाच्या बैठकी सुरू झाल्या. ता. २१ ऑगस्टपर्यंत एकदर २९ बैठकी होऊन ३५ साक्षीदारांच्या साक्षी घेण्यांत आल्या. (१) मिलओनर्स असोसिएशन (२) गिरणीकामगार यूनियन (३) मुंबई टेक्स्टाईल लेबर यूनियन (४) गिरणीकामगार महामंडळ (५) मुंबई मिलवर्कर्स यूनियन (६) जाम मॅन्युफॅक्चरिंग कंपनी लि. यांच्यातर्फे साक्षी झाल्या. मीरतच्या खटल्यांत उपस्थित झालेल्या प्रश्नासंबंधीं म्हणजे गिरणी-कामगार यूनियनहि कम्युनिस्ट आहे कीं काय या प्रश्नासंबंधीं पुरावा घेण्याचे व विचार करण्याचे चौकशीमंडळानें नाकारलें.

## चौकशीमंडळाचा निर्णय

मंडळाचा निर्णय थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे—

(१) ऑक्टोबर १९२८ च्या सुमारास गिरणी-कामगारांत असंतोष माजला होता. आपली मजुरी कमी करण्यांत येईल, सर्व गिरण्यांस एकच इयत्ता (स्टँडर्डायझेशन) लागू केल्यास आपल्यांपैकीं कांहजिणांवर बेकारीचा प्रसंग येईल. या भीतीमुळे कामगार असंतुष्ट झाले होते. त्या असंतोषाचा गिरणीकामगार यूनियनच्या पुढाऱ्यांनीं फायदा घेतला.

(२) मिल कमिट्या या सल्लागार कमिट्या होत. पण गिरणीकामगारसंघानें गैरसनदशीर-पणाने त्यांच्या कार्यकारी कमिट्या बनविल्या. सदर मिल कमिटींतील सभासदांस व्यक्तिशः संप पुकारण्यास उत्तेजन दिले. कमिटीनें संप पुकारणें सनदशीर होय, पण कमिटींतील एखाद्या सभासदानें तो पुकारणें बिनसनदशीर होय. त्यांनीं कामगार व गिरणी-वाले यांचे दरम्यान द्वेष वाढविला, व कामगारां कडून लहान लहान संप करविले. १९२८ च्या ऑक्टोबरांत त्यांस सार्वत्रिक संप घडवून आणावयाचा होता. त्याची पूर्वतयारी त्यांनीं छोट्या संपांमार्फत चालविली होती. त्या-प्रमाणें सार्वत्रिक संप ठरल्यावेळेस त्यांनीं पुकारा-लाहि. गिरणीवाले व गिरणीकामगारसंघ यांची बैठक २४ एप्रिल रोजीं भरली होती. पण सदर बैठकींत ज्यायोगानें कामगार-संघास सार्वत्रिक संप पुकारावा लागेल अशी कोणतीहि आगळीक गिरणी-वाल्यांच्या प्रतिनिधींच्या हातून घडली नव्हती. त्यांनीं गिरणीकामगार-संघाची पहिली मागणी कबूल केली होती. दुसऱ्या मागणीचा विचार करण्यास ते नाकबूल नव्हते, आणि तिसऱ्या व चौथ्या मागणीपर्यंत वाटाघाट पोचलीहि नाहीं. आपल्या अधिकाऱ्यांस गिरणवाल्यांनीं खुनशीपणानें वाग विले असे कामगारसंघास सिद्ध करतां आले नाही व वाडिया मिलमधून काढून टाकलेल्या कामगारांस पुनः कामावर कां घ्यावे याचेंहि समर्पक कारण त्यांस दाखवितां आलें नाहीं. (३) ज्या भांडणामुळें संप घडून आला तशा प्रकारचे भांडण किंवा वाद गिरणीवाले व गिरणीकामगार यांजमध्यें अस्तित्वांत होता कीं नाहीं हें सांगणे कठीण आहे. भांडण किंवा वाद असलाच तर तो कामगारसंघाचे अधिकारी व गिरणीवाले यांज-मध्यें होता व तो संघाचे अधिकारी व मिल कमिट्यांचे अधिकारी यांचें धोरण व हालचाली या-मुळें उद्भवला होता. या भांडणांत गिरणीवाल्यांचें धोरण स्वतःचा बचाव करणें एवढेच होतें. कांहीं बाबतींत गिरणीवाले व त्यांचे अधिकारी यांनीं जितकें विचारपूर्वक वागावयास पाहिजे तितकें ते वागले नाहींत. तथापि दोषाचें सगळें खापर संघाच्या माथींच फुटतें.

### संप कां लांबला ?

(१) गिरणीकामगारसंघाच्या पुढाऱ्यांची चढाईची व खोडसाळपणाची चळवळ व कामगारांस चिथवणारे लेख व भाषणें.

( २ ) संपवाल्यांनीं केलेले पिकेटिंग, दिलेला धाकदपटशा व संपांत सामील न झालेल्यांवर केलेला अत्याचार या कारणांनी संप लांबला.

जे संपवाले आपापल्या गांवी गेले ते पावसाळा संपून अजून परत न आल्यामुळे गिरण्या पूर्णपणें जोरांत सुरू नाहींत. संप लांबण्याचे कारणहि गिरणीकामगारसंघाचे अधिकारीच होत असे आमचे मत आहे.

गिरणीवाले व गिरणीकामगार यांजमधील वाद मिटविण्यास मुख्य अडचण अशी कीं, गिरणीकामगारसंघाचे अधिकारी हे हटवादी आहेत. विणकरांची मजुरी ७॥ टक्क्यांनीं कापली याबद्दल कामगार मनांतून असंतुष्ट आहेत असें आम्हास वाटते. त्याचप्रमाणें लायकीची योजना लागू केल्यास काम जाईल की काय याची भीति व एप्रिल महिन्याचा पगार दिला नाहीं याहि कारणांमुळें कामगार असंतुष्ट आहेत, व त्याचा भरपूर फायदा कामगारसंघानें घेतला आहे. गिरणीवाले व गिरणीकामगार यांचा संबंध येण्यास कांहीं साधन नाहीं व भांडण उपस्थित झाल्यास ते मिटविण्यास लवादाची स्थापना नाहीं. यायोगानें तडजोड घडवून आणणें बिकट झाले आहे.

# तळेगांवचें बातमीपत्र

## मिरवणुकीच्या लढ्याचा शेवट

सन १९२६ ते २९ हा चार वर्षांचा अवधि तळेगांवकरांना व त्याचबरोबर सर्व महाराष्ट्रीयांना, तळेगांववाद्यप्रकरणाच्या बाबतींत चिरस्मरणीय वाटल्यावांचून राहणार नाहीं. सन १९२५ सालापर्यंत ज्या पद्धतीनें येथील मिरवणुकी जात असत त्या पद्धतींत दोष आढळला नाहीं,पण त्यानंतर १९२६ साली सरकारी अधिकाऱ्यांनीं त्या पद्धतींत दोष आहे असें खोटेंच ठरवून ती पद्धत बंद पाडण्याचा अव्यापारेषु व्यापार केला आणि येथील मिरवणुकीच्या वाद्यसंख्येवर निष्करण बंधन घालून वाद्यसंख्या नियमित केली. अर्थात् अगदीं आयते वेळीं अपमानास्पद अटी कबूल करून मिरवणूक नेण्यापेक्षां त्या बंद ठेवणेंच इष्ट असें तळेगांवकरांनीं ठरविलें. या सालीं सर्वच मिरवणुकी त्यांनीं बंद ठेविल्या; पण मिरवणुकी बंद ठेविलेल्या पाहून अधिकाऱ्यांस सहजच समाधान झाल्यासारखें दिसलें व त्यापुढील १९२६ सालापेक्षां अधिक बंधन घालून गळचेपी करण्यांत आली. या वेळीं सर्व कायदेशीर दिसणारे प्रयत्न आमदार गुंजाळ यांच्या नेतृत्वाखालीं करण्यांत आले, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. इतकेंच नव्हे तर सरकारी अधिकाऱ्यांनीं त्या वेळीं आमदार गुंजाळसारख्यांचा अपमान करण्यासहि कमी केलें नाहीं. कित्येक वेळां त्यांना व त्यांचेबरोबर असणारे शिष्टमंडळास भेटण्याचें सौजन्यहि अधिकाऱ्यांनीं दाखविलें नाहीं !

### सत्याग्रहाचा अवलंब

या प्रकारें सर्व बाजूंनीं हताश झाल्यावर श्री. विश्वासराव डावरे यांच्या नेतृत्वाखाली श्रीपांडुरंगाच्या पालखीची मिरवणूक १९२७ सालीं सत्याग्रहानें कायद्याचीं सर्व बंधनें झुगारून सवाद्य नेण्यांत आली. त्याचा व्हावयाचा तोच परिणाम होऊन त्यांत सुमारें १५०० रुपये दंड व शिक्षा झाल्या. त्या सर्वांनीं आनंदानें स्वीकारल्या. पण त्याबरोबरच एक गोष्ट सिद्ध झाली कीं, सवाद्य मिरवणूक गेली तर त्यांत कांहीं अस्मानीसुलतानी होत नाहीं. जुन्या पध्दतीप्रमाणेंच मिरवणूक नेण्याचा तळेगावकरांचा निश्चय पाहून सरकारी अधिकाऱ्यांनीं पुढाऱ्यांशीं बोलणीं सुरू केलीं. १९२९ सालीं पुढाऱ्यांच्या आज्ञेनुसार सर्वच मिरवणुकी बंद ठेविल्या व शेवटीं अधिकारी वर्गास आपली चूक पदरांत घेऊन पूर्वापार वहिवाटीप्रमाणें परवानगी देणें जरूर झालें, व त्याप्रमाणे या वर्षी परवानगी मिळाली व शिराळशेट मिरवणूक, पांडुरंगाची मिरवणूक, जैनांच्या देवतांची मिरवणूक अशा तीन मिरवणुकी मशिदीवरून यापूर्वीच सवाद्य गेल्या.

### चार वर्षांचे अविसर्जित गणपती

राहतां राहिली एक मिरवणूक, व ती म्हणजे सरदार दाभाडे यांच्या गणपतीची. ज्या दाभाड्यांनीं एक वेळ पेशव्यांचे सेनापतित्व पत्करून दिगंत कीर्ति गाजवून शत्रूस जेरीस आणिलें त्या सेनापतींच्या वंशजांना आपल्या देवतेचें विसर्जन परकी सरकारच्या अधिकाऱ्यांच्या परवानगीच्या अभावीं तहकूब करावें लागलें हें दैवदुर्विलसित तर खरेंच; पण 'कालाय तस्मै नमः' म्हणून स्वस्थ बसण्याखेरीज आजच्या वंशजाना तरी दुसरा मार्ग नव्हता, हें सन १९२७ सालीं त्या वेळच्या सरकारी अधिकाऱ्यांचे वागणुकीवरून सर्वत्रांचे लक्षांत आले असेलच. याच वेळीं गणपतिविसर्जनाचे बाबतींत श्री.

विश्वासराव डावरे व हॅचसाहेब यांचा उडालेला खटका प्रसिद्ध आहे. सन १९२६ पासून सर्वच सालचे गणपती अविसर्जित असेच ठेवावे लागले. श्रीपांडुरंगाच्या कृपेनें या वर्षी सर्वच मिरवणुकींना परवानगी मिळाली. यामुळे तळेगांवकरास मोठा हुरूप आला व आपण भोगलेल्या कष्टाचें फळ परमेश्वराने यंदाचे वर्षी दिलें असें त्यांस वाटून गणेशोत्सव मोठ्या थाटानें करण्यांत आला.

भाद्रपद शुध्द १० रोजीं दुपारीं एक वाजतां सरदार दाभाडे यांच्या गणपतीची मिरवणूक निघाली. चार वर्षांचे ८ अविसर्जित गणपती वेगवेगळया पालख्यांतून बसविण्यांत आले होते. सर्वांपुढें नगरखाना, त्यामागें भजनी मेळा, त्यामागें जरीपटका निशाण, त्यामागें नागरिक व त्यामागे पालख्या व पालख्यांचे मागे सरदार दाभाडे आपल्या जुन्या पध्दतीच्या रुबाबदार पोषाकांत चालले होते. बरोबर समाज सुमारे ४००० होता. मिरवणूक दाभाडे वाड्यावरून निघून बाजारपेठेतील नव्या मशिदीवरून सवाद्य टाळ विणा—मृदंग रणशिंग वाजत तेथील सुप्रसिद्ध तलावावर गेली, व येथें सायंकाळीं ४ वाजतां मूर्तींचे विसर्जन करण्यांत आलें. कलेक्टर, प्रांत, मामलेदार, पो. सु. वगैरे हजर होते. अशा रीतीनें लोकपक्षाचा पूर्ण विजय होऊन तळेगांवच्या चारहि मिरवणुकी निर्विघ्नपणें पार पडल्या.

# गुंडांच्या नियंत्रणाच्या बिलाची अतिव्याप्ति व अव्याप्ति

गेल्या फेब्रुवारी महिन्यांत मुंबई शहरांत जे दंगेधोपे व खून झाले त्या वेळीं गुंडांना मुंबई शहरांत येऊं देऊं नये; आणि ते जर आगाऊच आले असतील तर त्यांना मुंबई इलाख्याच्या बाहेर घालवून द्यावे अशी सूचना अनेकांकडून करण्यांत आली. पण त्या वेळीं अशा रीतीनें वाटेल त्या इसमास केवळ संशयावरून हद्दपार करण्याचा अधिकार पोलीस कमिशनरास नसल्यामुळें गुंडांचा बंदोबस्त ताबडतोब करतां आला नाहीं. ही कायदेशीर अडचण दूर करावी या उद्देशानें या बिलाची रचना केली गेली आहे. कलकत्ता शहराच्या सुरक्षिततेसाठीं १९२६ सालीं अशाच स्वरूपाचा एक कायदा तेथे करण्यांत आला आणि त्याचेच अनुकरण करून मुबई शहराकरितां हा नवा कायदा बनविण्यांत येत आहे. गेल्या महिन्यांत प्रांतिक कायदेमंडळाची बैठक चालू असतां प्रस्तुतचें बिल व त्याचेंच एक जुळें भावंड अशीं दोन बिलें गृहमंत्र्यांनीं कौन्सिलापुढें मांडलीं होतीं. त्यांतलें 'इंटिमिडेशन बिल' (धमकी देणें हा गुन्हा कॉग्निझेबल करण्याबाबतचें बिल) त्याच बैठकींत झटपट पास करून घेण्यांत आलें. परंतु कांहीं सभासदांच्या समंजसपणामुळें व दूरदर्शित्वामुळें हें गुंडांना हद्दपार करण्याचें बिल तितक्या तांतडीनें पसार न होतां सिलेक्ट कमिटीकडे धाडलें गेलें. अशा रीतीनें या बिलाचें सूक्ष्म निरीक्षण करण्यास संधि मिळाल्यानें या बिलाचें घातक स्वरूप विशेष स्पष्ट दिसूं लागलें असून तें पास करण्यापूर्वीं आमदारांनीं किती सावधानता बाळगावी याची जाणीव सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट व त्यास जोडलेल्या दोन भिन्न मतपत्रिका यावरून होण्याजोगी आहे.

सिलेक्ट कमिटीनें या कायद्याची आयुर्मर्यादा पांच वर्षांचीच असावी अशी पहिली महत्त्वाची दुरुस्ती केली असून ती सर्वमान्य होण्याजोगी आहे. दुसरी महत्त्वाची दुरुस्ती बिलाची क्षेत्रमर्यादा संकुचित करण्यासबंधाची. बिलाच्या पहिल्या मसुद्यांत हें बिल मुंबई शहर व उपनगरें यांना लाग असून शिवाय त्या उपनगरांच्या शेजारच्या ज्या ज्या जिल्ह्यांना तें लागू करण्याचें सरकार जाहीर करील त्या त्या जिल्ह्यांना तें लागू होईल असें म्हटलें होतें. त्या योगानें बिलाची क्षेत्रमर्यादा कुलाबा, ठाणें, सुरत या जिल्ह्यांनाहि व्यापून टाकण्याइतकी अघळपघळ पसरूं शकली असती, परंतु सिलेक्ट कमिटीनें कलम तीनची छाटाछाट करून बिलाचें क्षेत्र मुंबई शहर व उपनगरे एवढ्यापुरतेंच मर्यादित केलें. एवढ्या दोन दुरुस्त्या करून सिलेक्ट कमिटीनें आपला समंजसपणा व्यक्त केला खरा; पण तिच्या शहाणपणाला यापुढें ओहटी लागून कमिटीच्या बुध्दिमत्तेचें दिवाळें निघालें असेंच मानणें प्राप्त आहे! कारण यापुढें सिलेक्ट कमिटीनें मूळ मसुद्यांत जो जांवई—शोध घातला आहे त्याचा भयंकरपणा कमिटींतील बहुसंख्याकांच्या लक्षांत आला नाहीं असे दिसतें. शांतताभंग करणें, धमकी देणें किंवा शरीर व मालमत्ता यांना अपाय करणारा नॉन-बेलेबल गुन्हा करणे हे गुन्हे करणाऱ्यांस किंवा तसा प्रयत्न करणाऱ्यांस हे बिल लागू असावें एवढीच मूळ बिलाची व्याप्ति आहे; आणि या बिलाचा हेतूच गुंडगिरीचे नियंत्रण करण्याचा असल्यानें त्याची व्याप्ति इतकीच मर्यादित ठेवणें स्वाभाविक आहे. परंतु सिलेक्ट कमिटींतल्या निवडक शहाण्यांनीं 'जो कोणी आपल्या लेखानें किंवा भाषणानें वरील प्रकारचे गुन्हे करण्याविषयीं चिथावणी देतो' त्यासहि हे

बिल लागू करावें अशी शिफारस केली आहे ! कमिटीच्या या जांवईशोधामुळें मुंबई शहरांतला सभ्यांतला सभ्य मनुष्यहि गुंड ठरूं शकेल, व त्याजवर हद्दपारी भोगण्याची पाळी येईल.

काल्पनिक उदाहरण न घेतां प्रत्यक्ष घडलेलेंच उदाहरण घेतल्यास हा मुद्दा चांगला स्पष्ट होईल. गेल्या फेब्रुवारींत मुंबईंत जो दंगा झाला त्या वेळीं अल्लीबंधूंची मुलाखत छापण्यांत टाइम्स पत्राच्या हातून आणि मुलें पळवून नेण्याची उठलेली हूल खरी आहे असें प्रसिद्ध करण्यांत इंडियन नॅशनल हेरल्ड, हिंदुस्थान, प्रजामित्र, मुंबईसमाचार वगैरे पत्रांच्या हातून अविचार घडला असें दंगा-चौकशी कमिटीनें म्हटलें आहे. प्रस्तुतच्या गुंडांच्या नियंत्रणाच्या बिलांत सिलेक्ट कमिटीनें घातलेला जांवईशोध कायम राहिल्यास असला अविचार करणारे लेखक आणि अशा दंग्यासंबंधानें जाहीर सभातून वाटाघाट करणारे वक्तेहि गुंड ठरूं शकतील, व त्यांची चौकशी न करतां त्यांस सहज लीलेनें वर्ष सहा महिने हद्दपार करण्याचा अधिकार पोलीस कमिशनरला प्राप्त होईल! अर्थातच सिलेक्ट कमिटीनें बिलाची व्याप्ति वाढविणारी ही जी पुस्ती जोडली ती अगदीं अनधिकृत असून कौन्सिलांतील आमदारांनीं तिचें हें भयंकर स्वरूप ओळखून तिची योग्य संभावना केली पाहिजे.

पण एवढ्यानें देखील या बिलाचें स्वरूप निर्दोषी ठरत नाहीं. या बिलाचा सगळा कटाक्ष गुंड Hooligans व बदमाष Bad characters यांचा बंदोबस्त कसा करतां येईल या गोष्टीवर आहे. बिलाचा उद्देश व हेतु बिलाच्या प्रारंभीं नमूद आहे, व त्यात ' गुंड व बदमाष ' यांचें नियंत्रण करतां यावें आणि तें हल्लींच्या कायद्यान्वयें ( म्हणजे क्रि. प्रो. कोडाचा आठवा चाप्टर व १९०२चा बॉंबे सिटी पोलीस ॲक्ट या अन्वयें) ताबडतोब करतां येत नाहीं म्हणून हा सगळा खटाटोप आहे. अर्थातच हा नवा झटपट कायदा कोणाला लागू व्हावयाचा त्याचा खुलासा Hooligans & Bad characters यांच्या व्याख्या देऊन केला पाहिजे. परंतु या बिलांत पाहावें तों त्या शब्दांच्या व्याख्या मुळींच दिलेल्या नसून बिलांतील ५ वें कलम आधींच वाजवीहून अधिक व्यापक करण्यांत आलें आहे आणि त्यांत सिलेक्ट कमिटींतल्या कांहीं मासलेवाईक शहाण्यांनीं त्याची व्याप्ति पराकाष्ठेला पोंचविली आहे ! यास्तव हें बिल पास करण्यापूर्वी त्याची व्याप्ति निश्चित मर्यादित होईल असी 'गुंड व बदमाष' या शब्दांची व्याख्या स्पष्ट करून त्यांत समाविष्ट करावी.

एवढ्यानें देखील या बिलाची विषारी नांगी पूर्णपणें तुटून तें निरुपद्रवी होतें असें नाहीं. तसें ते निरुपद्रवी होण्याला रा. ब. काळे यांनीं आपल्या भिन्न मतपत्रिकेंत नमूद केल्याप्रमाणे हा हद्दपारीचा हुकूम देण्याचा अधिकार पोलीस कमिशनराकडे न ठेवतां चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटकडे ठेवावा आणि त्या हुकमावरील अपील सरकारकडे किंवा सरकारनियुक्त कमिटीकडे न ठेवतां हायकोर्टाकडे ठेवावें. नोकरशाहीच्या राजवटींत न्यायकोर्टाकडून देखील निर्भेळ न्याय मिळण्याची मारामार, मग पोलीस अधिकारी आणि त्या अधिकाऱ्यांचेच प्रपितामह यांच्याकडून कांटेतोल न्याय मिळण्याचा कितपतसा संभव राहील याची कल्पना वाचकांस येईलच. यास्तव 'दगडापेक्षां वीट मऊ' या न्यायानें असला अनियंत्रित अधिकार द्यावयाचाच असला तर तो हडेलहप्पी अधिकाऱ्यांकडे न देतां निदान न्यायासनावर बसणाऱ्या प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटकडे द्या व त्याच्यावरील अपिलाची सुनावणी हायकोर्टाकडे ठेवा ही रा. ब. काळे यांची सूचना अवश्य ग्राह्य आहे. याखेरीज हद्दपारीची मुदत सहा महिन्यांची असावी का वर्षाची असावी, हद्दपारीचें क्षेत्र शहरापुरतेंच मर्यादित असावें का मुंबई इलाख्याइतकें व्यापक असावें वगैरे मुद्दे किरकोळ आहेत, व त्याचा योग्य निर्णय कायदेमंडळांत होईलच.



कै. प्रो. शि. म. परांजपे (पृ. ३९५)

# 'काळ'कर्ते दे. भ. शि. म. परांजपे यांच्यावर काळाची झडप

सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः। —भर्तृहरि

महाराष्ट्रांतील एक सुप्रसिद्ध वाङ्मयसेवक, देशभक्त पुढारी आणि माजी 'काळ' पत्राचे संपादक शिवराम महादेव ऊर्फ अण्णासाहेब परांजपे यांच्यावर काळाने अचानक झडप घातली हें वृत्त वाचून वाचकांचें मन दुःखावेगानें भरून जाईल व सर्वत्र हाहाःकार उडेल यांत शंका नाहीं. कै. शिवरामपंतांची प्रकृति अलीकडे पांच-सात महिन्यांपासून पूर्वीसारखी सुदृढ नव्हती. त्यांतून बेळगांवच्या साहित्यसंमेलनापूर्वी तर त्यांची प्रकृति मधुमेह व गळवे यांनीं बरीच ढांसळली होती आणि संमेलनाचे अध्यक्षत्व तरी स्वीकारावें का नाकारावें अशा विचारांत ते पडले होते. पण सुदैवानें त्या वेळीं त्यांची प्रकृति बरीच सुधारली आणि त्यांनीं बेळगावास जाऊन मराठी साहित्यसंमेलनाचें कार्य त्यांनीं अत्यंत कुशलतेनें आणि उत्साहाने केलें. परंतु ईश्वरी नेमानेम असा दिसला कीं, ती जाहीर सार्वजनिक कामगिरी हीच अखेरची ठरावी! बेळगांवाहून आल्यानंतर कांहीं दिवस त्यांची प्रकृति बरी होती. परंतु पुनः पावसाळ्याच्या प्रारंभीं त्यांना घशांतला कांहीं विकार झाला. तो बरा होतो न होतो तोंच त्यांच्या कानांतल्या ठणक्याचा विकार पुनः बळावला. आणि त्याच्यावरील औषधोपचार चालू असून तो विकार कमी होत आहे असें वाटत असतां एकाएकीं त्यांचा मधुमेहाचा आजार बळावून गेल्या बुधवारीं ते बेशुद्ध झाले आणि त्या वेळेपासून अनेक डॉक्टरांनीं हरप्रयत्न चालविला आणि मिठाच्या पाण्याचें इंजेक्शन देण्याचा अखेरचा उपाय करून पाहिला तरी ते सर्व उपाय निष्फळ ठरून अखेरीस **शुक्रवार ता. २७ रोजी सकाळीं** साताचे सुमारास काळानें त्यांच्यावर झडप घालून त्यांस इहलोकांतून परलोकांत ओढून नेलें. जुने 'काळ' पत्र चालू असतां दरशुक्रवारीं सकाळीं त्यांच्या वाड्यांतून 'काळ' बाहेर पडत होता. पण अखेर काळाने दावा साधून शुक्रवारीं सकाळीं त्यांनाच घरांतून बाहेर काढलें!!

दे. भ. शिवरामपंत परांजपे यांचा जन्म शके १७८६ सालीं ज्येष्ठ कृ. ७ स महाड येथे झाला. त्यांचा प्राथमिक अभ्यास कांहीं महाडास व कांहीं रत्नागिरीस झाल्यावर पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलची कीर्ति ऐकून पुढील अभ्यासाकरितां ते रत्नागिरी सोडून पुण्यास आले. त्या वेळीं महाडचेच रहिवासी वामन मोरेश्वर पोतदार हे त्यांचे सहाध्यायी होते. न्यू स्कुलांत आल्यावेळेपासून शिवरामपंतांच्या बुद्धिमत्तेचें तेज चमकूं लागलें आणि त्या वेळचे न्यू स्कूलचे रत्नपारखी सुपरिंटेंडेंट वामनराव आपटे यांनीं शिवरामपंतांना हातीं धरून त्यांच्याकडून संस्कृतचा विशेष अभ्यास करविला आणि १८८४ च्या मॅट्रिक परीक्षेंत शिवरामपंतांनीं संस्कृतची जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति मिळविली. पुढें एक वर्ष फर्ग्युसन कॉलेजांत काढल्यावर ते डेक्कन कॉलेजांत गेले आणि १८९० सालीं बी. ए. होऊन ते तेथेंच फेलो नेमले गेले. १८९५ सालीं ते भाषाविषयांत एम. ए. ची परीक्षा पास झाले आणि त्यांत संस्कृत भाषेच्या नैपुण्याबद्दल त्यांनीं भगवानदास प्राईझ व गोकुळदास झाला वेदान्त प्राईझ अशीं बक्षिसें मिळविलीं.

अशा प्रकारें अत्युच्च शिक्षण पूर्ण करून आणि इंग्लिश व संस्कृत या दोन भाषांत प्रावीण्य संपादन करून आपल्या भाषाप्रभुत्वाचा देशकार्याकडे उपयोग करण्याकरितां शिवरामपंतांनीं तत्कालीन चळवळीच्या महासागरांत आपलीहि नाव पुढें ढकलली. त्याच वेळीं भावेस्कूलचे प्रमुख प्रो. विष्णुपंत गोखले यांनीं महाराष्ट्र कॉलेज स्थापन करण्याचें ठरविलें होतें आणि आपल्या कर्तृत्वास तें योग्य क्षेत्र आहे असें जाणून अण्णासाहेब परांजपे हे त्या कॉलेजाच्या अध्यापक मंडळांत सामील झाले. विष्णुपंत गोखले, शिवरामपंत परांजपे, नटेशराव द्रविड, अच्युतराव साठे अशी आपापल्या विषयांतील तज्ज्ञ आणि ताज्या दमाची मंडळी कॉलेजाला लाभल्यानें महाराष्ट्र कॉलेजाचें नांव लवकरच सर्वतोमुखीं झालें आणि या नव्या कॉलेजाच्या तेजापुढें पुण्यांतील दोनहि जुनीं कॉलेजे लवकरच हतप्रभ होतील अशीं लक्षणें दिसूं लागलीं. परंतु अल्पवयांत इतकें बाळसें आलेल्या या गोंडस व होतकरू बाळाला दृष्ट लागली आणि १८९६–९७ च्या उलाढालीच्या पहिल्याच झटापटींत सरकारच्या विरोधामुळे हें कॉलेज बंद करावें लागलें. महाराष्ट्र कॉलेजांत संस्कृतच्या प्रोफेसरीचें काम करीत असतांनाच अण्णासाहेब परांजपे यांनीं आपल्या वक्तृत्वाचा उपयोग व्याख्यानें, पुराणें व प्रवचनें यांच्या द्वारें करण्यास प्रारंभ केला. प्रारंभापासूनच रंगदेवता त्यांच्यावर सुप्रसन्न असून तिनें वरद हस्त ठेवल्यामुळें त्यांच्या वक्तृत्वाची छाप महाराष्ट्रावर

इतकी पडली कीं, त्यांचें पुराणश्रवण करण्याकरितां हजारों श्रोते, त्या वेळीं मोटारीची सोय नव्हती तरी, किती तरी लांबचा प्रवास करून येत असत. महाभारतांतल्या 'असंतोषः श्रियो मूलं । संतोषो हरति श्रियं ' एवढ्या लहानशा वचनावर त्यांच्या वक्तृत्वाचा ओघ तासानतास अस्खलित चालत असे आणि त्यांत हजारों श्रोत्यांच्या चित्तवृत्ति अगदीं तल्लीन होऊन जात असत. उद्योगपर्वांतील विदुलाख्यान, आदिपर्वांतील कणिकनीति, शांतिपर्वांतील शक्र–बलिसंवाद इत्यादि भाग त्यांचे फार आवडते असून त्यावरील स्फूर्तिदायक पुराणद्वारें त्यांनीं महाराष्ट्रांतील तरुण पिढीला आधुनिक राजकीय चळवळीचे धडे दिले आणि आपल्या राष्ट्रीय ग्रंथांविषयीं व संस्कृतीविषयींहि अभिमान जागृत केला.

पुराणें व व्याख्यानें यांनीं सगळा महाराष्ट्र गदगदा हलवून सोडल्यावर या नैमित्तिक साधनापेक्षां चळवळीचें कांहीं तरी नित्य साधन आपल्या हातीं असावें या कल्पनेनें १८९८ सालीं त्यांनीं '**काळ**' पत्र सुरू केलें. आणि प्रत्येक शुक्रवारीं त्या पत्रांतून अण्णासाहेबांचें देशभक्तीचें पुराण सुरू झालें. थोड्याच दिवसांच्या अनुभवावरून सरकारला हें ' काळ ' पत्र खरोखरच काळासारखें वाटूं लागून नोकरशाहीच्या डोळ्यांत तें पत्र खुपूं लागलें. तथापि दे. भ. शिवरामपंत यांची लेखनशैलीच अशी युक्तिबाज असे कीं, सरकारला त्यांचे लेख शल्यासारखे सतत टोंचत असले तरी तें शल्य काढून टाकूं म्हटल्यास कोठेंच प्रत्यक्ष हातीं लागत नसे. १८९८ पासून १९०८ पर्यंतच्या 'काळ' पत्राच्या पहिल्या अमदानींत अण्णासाहेबांनीं आपल्या लेखनद्वारें महाराष्ट्र वाङ्मयांत किती विविध प्रकारची अमोलिक भर घातली याची कल्पना त्यांचे 'काळ' पत्रांतल्या निवडक लेखांचे सगळे खंड विद्यमान असते तर वाचकांना आली असती. भाषासौष्ठवाच्या आणि ललित वाङ्मयाच्या दृष्टीनें त्यांचे आरंभापासून अखेरपर्यंतचे सगळेच लेख नमुनेदार म्हणून अवश्य संग्रहणीय असे होते. पण त्यांतल्या त्यांत कर्झनशाहींतल्या दिल्ली दरबारापासून राजकीय चळवळीला निराळें वळण लागत चाललें त्या वेळेपासून दे. भ. अण्णासाहेब यांच्यावर राजद्रोहाचा खटला होईपर्यंतचे त्यांचे लेख विशेष संस्मरणीय असे होते. परंतु नतद्रष्ट सरकारनें १९१० सालच्या प्रेस आक्टाच्या वेताळाला त्यांच्या'काळ' पत्राचीहि आहुति दिली आणि त्यांच्या 'काळ'पत्रांतील निवडक लेखांच्या पुस्तकांचीहि आहुति दिली ! त्यामुळें महाराष्ट्र साहित्याचें वाङ्मयदृष्ट्या अपरिमित नुकसान झालें आहे.

'काळ ' पत्रांतले संकलित केलेले सगळेच लेख जप्त झाल्यानें नवीन पिढीच्या वाचकांना त्या लेखांची सामान्य कल्पनाही देतां येणें शक्य नाहीं. तथापि त्या वेळचे जे जुने वाचक असतील त्यांच्या अंतःकरणांत वास करणारें अण्णांच्या लेखनशैलीचें कौतुक आजच्या प्रसंगीं जागृत करावयाचें म्हटल्यास ' ईश्वरी करणी अगाध आहे ' ' आहे कीं नाहीं मी सव्हेंट ' ' माझ्यावर राज्य आलें ' ' पोलंडची अधोगति ' ' रावणाच्या अपराधांचे दिग्दर्शन ' ' दिल्लीचे तक्त आणि भाऊसाहेबांचा घण ' 'कानपूरची विहीर ' ' पितृतर्पण ' ' टायरोल ' 'रॉबर्ट' ' एमेट' ' वुल्फटोन ' ' यंग इटली' ' गोविंदरावाची आपल्या मुलांस पत्रें' 'पीकपाणी' इत्यादि लेखांची पुसट पुसट स्मृति करून देतां येईल. त्यांतल्या त्यांत 'लोकमान्य आणि राजमान्य' हा लेख तरी लोकमान्यांच्या अनुयायांच्या स्मृतींतून कधींच नष्ट होणार नाहीं. कारण टिळकांना 'लोकमान्य' ही पदवी प्रथम कोणी कोणत्याहि प्रसंगीं दिलेली असो. परंतु दे. भ. अण्णासाहेब यांच्या लेखणींतून 'काळ' पत्रांत 'लोकमान्य आणि राजमान्य'हा अग्रलेख जेव्हां उतरला त्या वेळेपासून टिळकांची **लोकमान्य** ही पदवी **वज्रलेप** झाली आणि त्या वेळेपासून लोकमान्यांच्या मत्सरग्रस्त प्रतिपक्षानें कितीहि अकांडतांडव केलें तरी ती पदवी नष्ट होऊं शकली नाहीं.

अशा रीतीनें 'काळ'पत्रद्वारें महाराष्ट्रांतील राजकीय चळवळीला विलक्षण तेज चढत चाललेलें पाहून आणि महाराष्ट्रांतील तरुण पिढीवर स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीची छाप पडत चाललेली सहन न होऊन १९०८ सालाच्या दडपशाहीच्या सत्रांत सरकारनें 'काळ'पत्रावर दांत धरून शिवरामपंतांवर राजद्रोहाचा खटला भरला. या खटल्याचे वेळीं अण्णासाहेबांनीं आपल्या खटल्याचें काम स्वतःच इतक्या उत्तम रीतीनें चालविलें कीं स्वतः न्यायाधीशानें देखील असे बोलून दाखविलें कीं, 'वकिलाच्या कामाची माहिती नसतां आपण आपला 'डिफेन्स' इतक्या उत्कृष्टपणें देऊं शकलां हें पाहून खरोखरच तुमच्या बुद्धिमत्तेचें कौतुक वाटतें.' त्याचप्रमाणें त्या वेळच्या वातावरणांत ज्यूरीकडून आरोपी '**निर्दोषी**' आहे असा निर्णय मिळणें असंभवनीय असल्यामुळे ज्यूरीनें त्यांना दोषी ठरविलें असलें तरी ज्या लेखावरून हा आरोप लादण्यांत आला होता ते लेख देशभक्तीच्या प्रेरणेनें लिहिले गेले आहेत ही गोष्ट न्यायाधीशांनीं लक्षांत

घ्यावी अशी ज्यूरीनें एकमतानें शिफारस केली आणि जज्जानें १९ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा दिली. अशा रीतीनें आपणावर ओढवलेली ही आपत्ति अण्णासाहेबांनीं लोकोत्तर धैर्यानें सोसली आणि मुदत पुरी होऊन ठाण्याच्या तुरुंगांतून ते सुटून परत पुण्यास आले. पुण्यास येऊन ते दाखल होतांच त्यांना जाहीर पानसुपारी करण्याचा बेत जाहीर झाला आणि सरकारनें दडपशाही करून ती सभा बंद पाडली! अशा रीतीनें शिवरामपंतांना भावी दडपशाहीची चुणूक त्याच वेळीं कळून आली आणि पुढें थोड्याच दिवसांत प्रेस आक्टाच्या तडाख्यामुळें 'काळ' पत्र बंद करावें लागलें.त्याबरोबरच 'मनोहर' छापखानाहि नाहींसा होण्याची पाळी आली होती. परंतु अण्णासाहेबांच्या चतुराईमुळें तो प्रसंग त्या वेळीं टळला आणि त्या छापखान्याचें 'गोवर्धन प्रेस' असे नामांतर होऊन छापखाना बचावला.

१९१० पासून १९१४ सालापर्यंतचीं चार वर्षें महाराष्ट्रांत सुप्तावस्थेतच गेल्यानें अण्णासाहेबांच्या वक्तृत्वाला कोठें फारसा वाव मिळाला नाहीं. तथापि या वेळीं त्यांचें इतर विषयांवरील लेखन चालू होतें. १९१४ च्या मे महिन्यांत साताऱ्यास प्रांतिक परिषद भरली आणि त्या वेळीं तडजोडीच्या ठरावाची खूपच वाटाघाट झाली. त्या वेळचें तेथलें शिवरामपंतांचें भाषण ज्यांनीं ऐकले असेल त्यांना १९०६ ते १९०८ सालांतली त्यांची भाषणशैली अद्यापि कायम असल्याची खात्री पटली असेल. १९१४ सालीं लोकमान्य टिळक सुटून आल्यानंतर जी होमरूलची चळवळ सुरू झाली तींतहि अण्णासाहेबांनीं यथाशक्ति भाग घेतला आणि त्यांच्या चटकदार व व्याजोक्तिपूर्ण भाषणांचा तरुण पिढीस पुनः लाभ मिळू लागला. असहकारितेची चळवळ सुरू होण्यापूर्वी ते नव्या सुधारलेल्या कौन्सिलाकरितां उमेदवार म्हणून उभे राहण्यास तयार झाले होते. परंतु असहकारितेच्या युगाला प्रारंभ होतांच कौन्सिलाची भाषा त्यांनीं सोडली आणि पुनः तारुण्याचा संचार झाल्याप्रमाणें वीस वर्षांपूर्वीच्याच जोमानें या नव्या चळवळींत ते पुढाकार घेऊं लागले. अशा वेळीं आपल्या हातीं चळवळीचें साधन असावें म्हणून त्यांनीं 'स्वराज्य' नांवाचें नवें पत्र आपल्या छापखान्यांत चालू केलें. याच असहकारितेच्या काळांत मुळशीच्या सत्याग्रहाची चळवळ निघून त्या चळवळींत स्वतः सत्याग्रह करून अण्णासाहेबांनीं सहा महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा आपल्यावर ओढवून घेतली. त्या वेळीं त्यांचें वय ५७ वर्षांचें होतें. एवढ्या उतरत्या वयांत सक्तमजुरीची कैद आणि तदनुषंगिक हालअपेष्टा सोसाव्या लागल्या तरी त्यांनीं त्या अत्यंत शांत चित्तानें व धैर्यानें सोसल्या. त्या वेळीं त्यांचा कर्तव्यदक्ष व करारी स्वभाव चांगलाच कसोटीस लागला.

या तुरुंगवासांतून सुटून परत आल्यानंतर त्यांची प्रकृति बरीच खालावली आणि त्या वेळेपासून ते विशेष दगदगीचीं कामें अंगावर घेतनासे झाले. त्यानंतर थोडेच दिवसांनीं त्यांनीं 'स्वराज्य' पत्र आणि 'गोवर्धन छापखाना' यांचीहि वासलात केली. तथापि त्यांचे प्रासंगिक लेखन वाचन व भाषण हे व्यवसाय चालूच होते. लो. टिळकांच्या पश्चात् पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या अध्यक्षपदाचा मान त्यांस मिळाला होता आणि दोन वर्षांपूर्वींपर्यंत ते सार्वजनिक सभेचे अध्यक्ष होते. १९२८ सालीं संयुक्त पक्षाची महाराष्ट्र प्रांतिक परिषद पुण्यास भरवावी असें ठरून सुभाषबाबूंच्या अध्यक्षतेखालीं जी परिषद झाली तिच्या स्वागताध्यक्षाचें काम दे. भ. अण्णासाहेब यांनीं मोठ्या कुशलतेनें व कळकळीनें केलें. बेळगांवच्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षस्थानीं त्यांची योजना झाल्यावर त्यांची प्रकृति बरीच बिघडली व त्यामुळें तो मान त्यांना नाकारावा लागतो कीं काय असे वाटूं लागलें होतें. परंतु सुदैवानें त्यांची प्रकृति त्या वेळीं सावरली आणि बेळगांवास जाऊन त्यांनीं मराठी-कानडीच्या वादाच्या वादळांत सांपडलेल्या साहित्यपरिषदेचें काम मोठ्या चातुर्यानें कोणासहि न दुखवतां पार पाडलें. त्या परिषदेंतलें त्यांचें समारोपाचें भाषण तर अत्यंत कळकळीचें व हृदयास हलवून सोडणारें असें झालें. एवढ्या महत्त्वाच्या जाहीर प्रसंगीं झालेलें तेच त्यांचें अखेरचें भाषण होय अशी कल्पना त्या वेळीं कोणाच्याहि मनांत आली नसेल. परंतु ईश्वरी योगायोगच तसा होता. कारण त्यानंतर पुनः कांहीं त्यांचे तसें भाषण ऐकण्याचा योग आला नाहीं व यापुढें सुतरां येणार नाहीं! त्याचप्रमाणे गेल्या महिन्याच्या चित्रमय जगतमध्यें ' गीतेंतील एक शंकास्थळ ' या मथळ्याखालीं एक विचारप्रवर्तक असा लेख त्यांनीं लिहिला आहे तोच त्यांच्या लेखणींतून उतरलेला शेवटचा लेख ठरला.

असो. अशा रीतीनें १८९५ सालापासून तों १९२९ पर्यंतच्या ३४ वर्षांत अनेक प्रकारांनीं देशसेवा आणि महाराष्ट्र वाङ्मयाची सेवा करून हा सरस्वतीच्या कंठाभरणांतील तेजस्वी हिरा गळून पडला. सरकारजमा झालेले त्यांचे लेख सोडून दिले तरी त्यांच्या वाङ्मयाचा पसारा बराच मोठा आहे. त्यांत मानाजीरावासारखीं नाटकें आहेत; तर्क, साहित्य,

अलंकार इत्यादि विषयांवरील शास्त्रीय ग्रंथ आहेत! अर्थसंग्रहासारखे मीमांसाशास्त्रावरील गहन ग्रंथ आहेत,गोविंदाची गोष्ट किंवा विंध्याचल यासारख्या छोट्या किंवा मोठ्या गोष्टीवजा कादंबऱ्या आहेत आणि महाराष्ट्रांतील किल्ले किंवा मराठेशाहीच्या लढाया यांसारखे ऐतिहासिक ग्रंथहि आहेत. अशा या साहित्याच्या द्वारें त्यांनीं महाराष्ट्र वाङ्मयांत आपलें नांव चिरस्थायी करून ठेवलेलें आहे. परंतु त्यांच्या सहवासापासून व प्रत्यक्ष दर्शनापासून होणारी देशभक्तीची प्रेरणा आणि विशेषतः फारच थोड्यांना साधणारे त्यांचें मार्मिक वक्तृत्व याला मात्र महाराष्ट्रीय श्रोते यापुढें कायमचे आंचवले. प्रतिपक्षाचीं स्थानें शोधून काढून आपल्या मर्मभेदी आणि उपरोधिक व व्याजोक्तिपूर्ण अशा भाषणांनीं विरुद्ध बाजूची दाणादाण उडवून टाकणारे परिणामकारक भाषण करण्याची दे. भ. शिवरामपंत यांना जी हातोटी साधली होती ती कांहीं अपूर्वच होय! त्यांचीं भाषणें देशभक्तीच्या प्रेमानें थबथबलेलीं असल्यामुळें गंभीर स्वरूपाचीं व प्रभावशाली असत. तरी पण त्यांच्या कोठल्याहि भाषणांत हास्यविनोद व प्रतिपक्षावर नाजूक टीका नाहीं असे सहसा होत नसे. त्यामुळे त्यांचें भाषण ऐकण्याकरितां श्रोते अत्यंत उत्सुक असत. आणि आपल्या भाषणांत कोणताहि रसाविर्भाव हमखास उभा करावयाची कला त्यांना करतलामलकवत् साध्य झाली असल्यानें ते मनांत आणतील तो रस श्रोतृवृंदाच्या मनावर पगडा बसवूं शके. असा विद्वान, रसिक, विचारक्रान्तिकारक, तेजस्वी, चतुरस्र साहित्यसेवक, जहाल देशभक्त आणि श्रेष्ठ दर्जाचा वक्ता आपल्यांतून नाहींसा झाला ही महाराष्ट्राची आणि मराठी भाषेची मोठीच हानि होय.

दे. भ. अण्णासाहेब यांची राहणी जुन्या खानदानीच्या घराण्यांतल्यासारखी आणि टापटिपीची असे. स्वभावानें ते विनोदी, रसिक व प्रेमळ असत. मरणसमयीं त्यांचे वय ६४ वर्षे ३ महिने होतें. त्यांच्या मृत्यूमुळे त्यांच्या कुटुंबांतील मंडळींवर तर मोठाच घाला पडला आहे.परंतु महाराष्ट्राची जी मोठी हानि झाली आहे तिच्या मानानें वैयक्तिक हानि कमीच समजून आणि आपल्या दुःखांत सगळा महाराष्ट्र वांटेकरी आहे हें लक्षांत घेऊन त्यांच्या कुटुंबांतील मंडळींनीं आपला दुःखावेग विवेकानें आवरून धरावा.

मानीव पवित्रतेला मदतच होईल व बळकटी येईल.

आपल्या घरच्या देवघरांसंबंधानेंहि आपण असेच कांहीं निर्बंध घालीत व पाळीत नाहीं काय? सदरेवर बसून करावयाच्या गोष्टी आपण देवघरांत वर्ज्य मानतों; व घरचे लोक सगळेच एका दर्जाचे असतां, म्हणजे स्पृश्यास्पृश्य हा भेद नसतां, त्यांपैकीं कोणी कोणत्या स्थितींत देवालयाचें दार उघडून प्रत्यक्ष स्पर्श करावा किंवा करूं नये याविषयीं आपण होऊनच निर्बंध घालतों, व आपण होऊनच ते आनंदानें पाळतों. या दृष्टीनें प्रथम घरांतलें देवघर व फिरून देवघरांतला देव्हारा असा प्रत्यक्ष भेद आपण पवित्रपणा राखण्याकरितां म्हणून करतों. तसाच खासगी किंवा सार्वजनिक स्वरूपाच्या देवालयासंबंधानेहि करावा असें आमचें स्पष्ट मत आहे. कोणी म्हणेल कीं, हें नवें बंधन अस्पृश्यांकरितां म्हणूनच सुचविण्यांत येत आहे. पण खरी स्थिति तशी नाहीं. स्पृश्यांनींहि देवाच्या मूर्तीला प्रत्यक्ष शिवण्यासंबंधानें बंधन असावें असें आमचें पूर्वीपासूनच मत आहे, व पुष्कळ देवस्थानांतून अशी वहिवाट पूर्वीपासून असल्याचेंहि आम्हाला माहीत आहे.

देवाच्या मूर्तीला प्रत्यक्ष स्पर्श केल्यापासून तो करणाराला अधिक बरें वाटत असेल. पण बिचाऱ्या देवाच्याहि दृष्टीनें यांत थोडेसें पाहिलें पाहिजे! स्वच्छता राहण्याला संसर्ग कमी करणें हाच पहिला व मुख्य उपाय होय. आणि देवाला प्रत्यक्ष स्पर्श करण्याला न मिळाल्यामुळें धार्मिक भावनेच्या समाधानांत जर किंचित् कमीपणा येत असेल, तर देवळाच्या गाभाऱ्यांत स्वच्छता व पवित्रपणा अधिक राखला जाईल या भावनेनें दुसऱ्या प्रकारचें समाधान व मोबदला मिळाला असें होईल. देवादेवांतहि कांहीं देव गोडवे असतात, व ते भजकपूजकाला आपल्या अंगाला हात लावूं देतात किंवा गळामिठी घालूं देतात. पण उलट कांहीं देव तुसडे, तिरसट, माणूसघाणे असतात, व ते भाविक पूजकालाहि चार हात दूरच ठेवतात! ही दुसऱ्या प्रकारची वृत्तीच सर्व देवांनीं यापुढें सरसकट स्वीकारावी अशी आमची त्यांना प्रार्थना आहे. कारण असें केल्यानें त्यांच्या परिस्थितीत स्वच्छता नांदेल व पवित्रपणाचें वातावरण अधिक निर्माण होईल.

नांदेड येथील शीख मंदिरासंबंधानें आम्ही तेथें गेल्यावेळीं असें सांगण्यांत आलें कीं, प्रख्यात गुरु गोविंदसिंग यांची समाधि गाभाऱ्यांत बांधल्यापासून नंतरच्या इतक्या वर्षांत, वेळोवेळचे विद्यमान पुजारी सोडून दुसऱ्या कोणीहि त्यांत आजवर पाऊल घातलें नाहीं. खास हिंदूंच्याहि कित्येक देवस्थानांतून अशीच वहिवाट आहे. गाभाऱ्याच्या उंबऱ्याअलीकडे एखाद्या ठराविक मर्यादेजवळ कोणी उभे राहिल्यास त्याला देवदर्शन घडण्याला अडचण पडणार नाहीं; व देवाला उद्देशून ज्या वस्तू कोणाला अर्पण करावयाच्या त्या ठराविक पुजाऱ्याच्या हातीं देऊन देवाला अर्पण झालेल्या पाहिल्यास विचारी माणसाच्या समाधानांत कांहीं कमी पडूं नये.

अशी मर्यादा घातल्यानें देवळाच्या गाभाऱ्याची म्हणजे मुख्य देवस्थानाची स्वच्छता व पवित्रपणा हीं साधतात, त्याचप्रमाणें दुसऱ्या बाजूसहि त्याचे अनेक फायदे आहेत. व सर्वांत मुख्य हा कीं, या मर्यादेपर्यंत वाटेल त्याला जाऊं दिल्यास वरील स्वच्छता पवित्रपणा यांना बाध न येतां, भजकपूजकांमध्यें आज जो भेदभाव व विषमता आढळून येते ती नाहींशी करणें सोपें होईल. मर्यादा सुचविण्याचा हाच आमचा दुसरा हेतु. देवळांतहि खासगी व सार्वजनिक भाग असा किंचित् स्थलभेद योग्य तारतम्यानें केल्यास, देवापरी देवाचें व व माणसापरी माणसाचें काम होईल. देवाचें काम म्हटलें तरी एक प्रकारें तेंहि आपलेंच काम, म्हणजे स्वच्छता व पवित्रपणा राहणें. आणि आपलें काम म्हणजे बोलूनचालून आपलेंच काम. म्हणजे हिंदुधर्मीयांतील अन्यायी व उद्वेगकारक विषमता काढून टाकणें.

ही विषमता ज्या वर्गांना पक्षपात करते त्यांच्या अंगावर धार्मिकतेचें किंवा पुण्याचें मूठभर अधिक मांस ती चढवीत नाहीं. पण ज्या वर्गाविरुद्ध या विषमतेचा अंमल होतो त्यांच्या मनाला ती खोल जखम करते यांत मात्र शंका नाहीं. ही विषमता घालविण्याकरितां कोठें ब्राह्मणांचे तर कोठें ब्राह्मणेतरांचेहि विशेष हक्क आज उपभोगांत असलेले काढून घ्यावे लागतील. पण ते काढून घेतल्यानें, व या गोष्टीला ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांनीं संमति दिल्यानें, एक फार मोठें कार्य होणार आहे. कारण स्वार्थत्याग ही एक दैवी किमया आहे, व तिच्यायोगानें विद्वेषी भावनांच्या विषाचें प्रेममय भावनेच्या अमृतांत रूपांतर होतें असा अनुभव आहे. एकच उदाहरण द्यावयाचें तर तें जपानाचें देतां येईल. इतिहासज्ञांना हें माहीत आहे कीं, पूर्वी जपानांत 'सॅमुराय' लोकांना विशेष हक्क होते. ते त्यांनीं आपखुषीनें सोडून दिल्याबरोबर त्या राष्ट्रांत ऐक्याचें चैतन्य एकदम संचारलें.

आणि देवदर्शनाच्या बाबतींत ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर यांनीं आपापले विशेष हक्क सोडून देऊन, अस्पृश्यांसुद्धां ते सर्व जर देवालयांत

एकाच ठरीव स्थानापासून देवदर्शन करूं लागतील तर हिंदु समाज एकजीव होण्याला, त्याचें संघटन होण्याला, फार सोपें जाईल. देवाला प्रत्यक्ष स्पर्श करून त्याची पूजाअर्चा करण्याचें सुख हें कांहीं विशेष असलें तर ते घरच्या खासगी देवघरांत वाटेल तितकें अनुभवितां येण्यासारखें आहे. पण बाहेरच्या म्हणजे सार्वजनिक किंवा अर्ध सार्वजनिक देवालयांतहि या सुखाचा अभिलाष धरणे यांत धर्मभावनेंच खरें बीज नसून, मानवी अहंकाराचेंच तामस बीज आहे. देवासमोर उभें राहून माणसानें इतरांना विषमता भासवून स्वतः-संबंधानें चढ्या हक्काचा वाद सांगणें हे देवाला तरी कसें आवडेल? निदान हल्लीं ते देवाला आवडेनासें झालें आहे, म्हणूनच अलीकडे कांहीं वर्षांपासून देवालयप्रवेशाची ही नवी चळवळ या देशांत सुरू झाली असें आम्ही समजतो. असो.

अशा रीतीनें स्पृश्य वर्गांनीं आपल्या हक्कांना बंधन घालण्याची तयारी दाखविल्यास तें बंधन अस्पृश्यांवरहि ओघानेंच पडणारे आहे. त्याचें अतिक्रमण करण्याचें मग त्यांना शोभणार तर नाहींच, पण सुचणारहि नाहीं. येऊनजाऊन प्रश्न इतकाच उरेल कीं, त्यांना सभामंडपांत ठराविक मर्यादेपर्यंत इतरांबरोबर येऊं द्यावें कीं नाहीं? व याचें नकारार्थी उत्तर कोणीहि देऊं शकणार नाहीं. कारण अस्पृश्य झाले तरी ते हिंदूच आहेत, आणि हिंदुहिंदूंनीं आपापसांत 'देवदर्शना'च्या बाबतींत विषमता ठेवावी हें कोणत्या देवानें सांगितलें आहे?

महाराष्ट्रांतील संतमालिका लक्षांत घेतली तर त्यांत अस्पृश्य वर्गांतले साधुसंत किती तरी आहेत! आणि या व्यक्ती साधुसंतांच्या पदवीला जाऊन पोंचल्या म्हणूनच त्यांना विशेष हक्क प्राप्त झाले, असें म्हणणाऱ्या ब्राह्मण ब्राह्मणेतराला उलट विचारतां येईल कीं, "बाबा, तूं जो हा आपल्यापुरता चढा व विशेष हक्क सांगतोस तो तूं तरी त्या साधुसंताच्या पदवीला कोठें पोंचलेला आहेस? अर्थात् तुझ्या हक्काचा आधार विशिष्ट जातींतील जन्म इतकाच होय. पण देवापुढेंहि जर हा हक्क तूं मिरवूं लागलास तर तो यापुढें टिकणें शक्य नाहीं. तूं तर आपल्याच हातानें यापूर्वी अनेक रीतींनीं आपलें वैशिष्ट्य काढून टाकलें आहेस. तुझ्या जातींतीलहि गुण किंवा कर्में तुझ्या ठिकाणीं राहिलेलीं नाहींत. मग तूं स्वतःला कितीहि मोठें मानलेंस तरी तो तुझा मोठेपणा दुसरे लोक काय म्हणून मानतील?"

बरें, नाहीं म्हणावें तर देवळाच्या सभा-मंडपांत अस्पृश्यांना येऊं देण्याची वहिवाट कोठेंहि नाहींच असें नाहीं. कोंकण प्रांतांतले लोक मोठे शिवाशिवीचे वेडे असें आपण समजतो. पण कोंकणच्या कोणत्याहि देवळांत खुद्द सभामंडपातच स्पृश्यांशेजारीं अस्पृश्या-करितां म्हणून एक ठराव भाग आंखून दिलेला असतो, व यांच्या त्यांच्या दरम्यान मर्यादा म्हणून एखादें आडवें लाकूड बांधलेलें असतें. पण स्पृश्य व अस्पृश्य यांतील प्रत्यक्ष अंतर चारदोन वितींचेंहि नसतें. एकाच पंक्तीला बसलेले ब्राह्मण रांगोळीच्या पट्ट्यानें, किंवा वेगळ्या पाटानें, किंवा पानाभोंवतीं पाणी फिरविल्यानें जितके एक-मेकांपासून वेगळे ठरतात, तितकेच कोंकणच्या सभामंडपांत स्पृश्य आणि अस्पृश्य हे या मर्यादेनें 'वेगळे' बसतात. मग कोंकणच्या देवळांतून खुद्द सभा-मंडपांत अस्पृश्य बसल्यानें जर कोंकणचे ब्राह्मण ब्राह्मणेतर किंवा कोंकणचा देव विटाळत नाहीं, तर अस्पृश्यांनीं सभामंडपांत उभें राहिल्यानें देशावरचे ब्राह्मण ब्राह्मणेतर किंवा देव हे तरी कां बाटावे?

# पर्वतीवरील सत्याग्रह

आगाऊ प्रसिद्ध झाल्याप्रमाणें अस्पृश्यांचा सत्याग्रहाचा दिवस ता. १३ रोजीं उगवला. श्री. नारायणराव गुंजाळ आदि सर्व सनातन धर्मीयांनीं असा सत्याग्रह अस्पृश्यांनीं करूं नये अशाबद्दल हस्तपत्रिका वांटल्या होत्या. अस्पृश्यता दूर करण्याचे व मंदिरप्रवेश करण्याचे हे योग्य मार्ग नव्हत असें हस्तपत्रिकेंत नमूद केलें होतें. मतपरिवर्तनाखेरीज सत्याग्रह दुराग्रहाचा बनतो अशी अस्पृश्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न झाला होता. पण त्याचा उपयोग न होतां अस्पृश्यांनीं व त्यांच्या पुढाऱ्यांनीं ठरविल्याप्रमाणें त्यांनीं ता. १३ रोजीं सकाळीं ९ वाजतां पर्वतीच्या पायथ्याशीं जमण्यास सुरुवात केली. अस्पृश्यांचे सल्लागार व युवकसंघाचे अध्यक्ष श्री. न. वि. गाडगीळ हे सकाळपासून कै. रा. ब. केंजाळे यांच्या समाधीपाशीं बाहेरच्या जागेंत बसले होते व त्यांचे इतर अनुयायी इकडे तिकडे दिसत होते. पर्वती संस्थानाचे बहुतेक पंच बंदोबस्तासाठीं आगाऊच आले होते. पर्वतीच्या देवळात व इतर देवालयांत जाऊन दर्शन घेण्यास परवांपासून सर्व जातीनाच बंदी करण्यांत आली होती. ब्राह्मण ब्राह्मणेतर हा भेद ठेवण्यांत आला नव्हता. दर्शनास बंदी असल्यानें सर्वांना बाहेर पायरीवर बसणें

भाग होतें. ब्राह्मण ब्राह्मणेतर मिळून समाज पांच हजारांवर जमला होता. सनातनी धर्माभिमानी मंडळींनीं अस्पृश्यांना वर चढतांना नंदीपाशीं रोखून धरण्याचें प्रथम ठरविलें होतें. पण अखेर तसें न करतां सर्वजण वरच्या पायऱ्यावर बसून राहिले. पोलीसबंदोबस्त नगारखान्याच्या शेजारीं ठेवण्यांत आला होता. परिस्थिति पाहण्यास कलेक्टर, अ. कलेक्टर, मामलेदार, पोलीस सुपरिंटेंडट व असिस्टंट सुपरिंटेंडंट आपल्या दुय्यम अधिकाऱ्यांसह हजर होते. दंगा वगैरे झाल्यास तो मोडण्यास सशस्त्र पोलिसांची एक लहान तुकडीहि तेथें सज्ज होती.

८॥ वाजतां अस्पृश्यांची एक लहानशी टोळी प्रथम पायथ्यापाशीं दिसूं लागली. टोळीबरोबर २-३ बायका १०-१५ मुलें मिळून सर्व समाज सुमारें २५-३० होता. तेथें आल्यावर आपले सल्लागार श्री. गाडगीळ व भुस्कुटे यांची भेट घेऊन "आंबेडकरकी जय' "महात्मा' गांधीकी जय" अशा गजरांत अस्पृश्य आपल्या जथ्यासह पायऱ्या चढूं लागले. अस्पृश्यांचे टोळीबरोबर सनातन धर्मीय गृहस्थहि वर येऊं लागले. सर्व पायऱ्या चढून आल्यावर श्रीशिवमंदिराकडे वळतांना जो नंदी आहे त्या ठिकाणीं समाज आल्यानंतर एकदम गलग्यास सुरवात झाली. वरची मंडळी खालीं उतरूं लागली व खालची मंडळी वर चढूं लागली. तेव्हां साहजिकच नंदीच्या जवळ बेसुमार गर्दी जमली. श्री. गाडगीळ व भुस्कुटे यांना अस्पृश्यांबरोबर पाहिल्यावर सर्व मंडळींनीं शेम शेमचा गजर करून त्यांना परत फिरण्यास सांगितलें. पण त्याचा उपयोग न होतां ते वर चढण्याचा प्रयत्न करूं लागले. पण तेथें सर्व जमावाचा जोर होता, त्यामुळें अस्पृश्यांना वर चढतां येणें अशक्य होऊं लागलें. उभयतांची रेटारेटी सुरू झाली. पुढें भांडणावर प्रसंग येऊं नये, म्हणून श्री. गद्रे, नारायणराव गुंजाळ, श्री. विश्वासराव डावरे, इत्यादि मंडळी सर्वांना शांततेनें वागण्याबद्दल सारखा उपदेश करीत होतीच. त्याचा परिणाम बराच झाला. तथापि या रेटारेटींत कांहींजणांना बराच मार बसला. नंतर नगारखान्याच्या पायऱ्यांपर्यंत शिपायांच्या संरक्षणाखालीं अस्पृश्यांना नेण्यांत आलें. त्यांनीं पायरीस नमस्कार केल्यानंतर त्यांस तसेंच पोलीसबंदोबस्तांत खालीं आणून शहरांत परत नेण्यांत आलें. त्यानंतर विशेष कांहीं गडबड न दिसल्यानें जमलेली सर्व मंडळी परत घरोघर निघून गेली. पर्वतीवर पोलीसबंदोबस्त कांहीं दिवस राहणार आहे असें कळतें. अशा रीतीनें हा पर्वतीचा 'सत्याग्रह' संपला.

# शारदेची आकाशवाणी

( लेखांक १ )

फार वर्षांपूर्वींच मी कृष्णा नदीच्या डोहांत बुडालें. कै० देवलांनीं मला आपल्या नाटकाच्या सोईकरितां मरूं दिलें नाहीं. नाटक आनंदपर्यवसायी व्हावें असा एक नाट्यशास्त्राचा नियम आहे म्हणतात. आणि किर्लोस्कर नाटक कंपनीचा म्हणे तसा आग्रहच होता. म्हणून त्यांनीं नाटकांत आयत्या वेळीं कोदंडांना घाटावर आणून माझा हात धरवून माझी आत्महत्या वांचविली, आणि कोदंडाशीं माझें लग्न लावून दिलें. पण देवलांच्या पहिल्या योजनेत मीं मरावें असेंच होतें, व त्याप्रमाणें मी मेलेंहि, आणि मग परलोकांतूनच मी पुढचा सर्व प्रकार पाहत होतें. रंगभूमीवर कोदंडांच्या हातीं लागलें तें माझें भूत होतें; पण परोपकारी कोदंडांना भय वाटूं नये म्हणून माझ्या भुताला त्यांच्याशीं मीं सुखानें संसार करूं दिला. कोणाच्या आनंदाचा भंग उगीच कशाला करा !

पण मी मृत्युभूमि सोडली तरी जगावरचें माझें लक्ष कमी झालें नाहीं. माझ्या स्थितींतल्या मुलींची माया मला रात्रंदिवस वाटते. मला झालेलें दुःख त्यांना होऊं नये म्हणून प्रौढविवाह करीत जाण्याची, व त्याहूनहि विशेष म्हणजे प्रौढविवाहाला नांवें न ठेवण्याची प्रेरणा, मी माझ्या दैवी शक्तीनें लोकांच्या मनांत करीत असतें. यामुळे 'वाढली उंच ही किती । स्वजन बोलती । नाक मुरडिती । स्त्रिया परभारां । तुज ठावें ईश्वरा' असें रडगाणें गाण्याची पाळी आतां अविवाहित मुलींवर फारशी येत नाहीं. इंदिरा काकूहि आतां कांचनभटाच्या मागें मुलींच्या लग्नाचा तगादा फारसा लावीत नाहींत. मुली आतां इतक्या मोठ्या होतात कीं कित्येक वेळां स्वतःचीं लग्नें स्वतःच ठरवितात म्हणे !आणि एका वधूनें व तिच्या स्वयंवरित वरानें-दोघांनीं मिळून आपल्या सहीनें स्वतःच्या लग्नचिठ्या काढल्या असेंहि मला समजलें आहे ! या गोष्टी मला अगदीं नापसंत आहेत. पण एक गोष्ट अजून झाली नाहीं. ती ही कीं, मला मागणी घातलेल्या श्रीमंतां-

सारखे म्हातारे अजूनहि तरुण मुलींशीं लग्नें करतात तें पुरें बंद झालें नाहीं.

माझ्या नांवाच्या नाटकांत देवलांना प्रौढ-विवाहाचें समर्थन करावयाचें होतें असें कित्येक समजतात. पण ती चूक आहे. त्यांचा हेतु वृद्ध-तरुण विवाहाचा, आणि मुलीचा विक्रय करून श्रीमान होऊं पाहणाऱ्या 'कसाबां'चा, निषेध करण्याचा होता. पण देवलांचें कौशल्य या कामीं अपुरें पडल्यामुळें 'श्रीमंतां'-च्या निंदेच्या कोणच्याहि पदापेक्षां, देवलांच्या मनांत नसतां, माझ्या थट्टेचें पद—म्हणजे "वाढली उंच ही किती" हेंच—अधिक लोकप्रिय होऊन लोकांच्या तोंडीं बसलें आहे, आणि शारदा म्हणचे 'घोडनवरी' असा माझ्या नांवाला अर्थ जडला आहे इतकेंच.

माझ्या 'जन्माचें नाटक' झालें तेव्हां मी किती वर्षांची होतें बरें? देवलांनीं याविषयीं कांहीं गमकें ठेवली आहेत. उदाहरणार्थ, माझ्या वडिलांनीं माझ्या आईला लग्न वयोमर्यादेची 'शास्त्रवचनें' (!) सांगितलीं त्यावरून मी चौदा वर्षांची होतें असा ध्वनि निघतो. तसेंच श्रीमंत धुंडिराज यांनी वधूविषयींची आपली आवड सांगतांना 'सुदर खाशी सुबक ठेंगणी स्थूल न कृशहि न वय चवदाची' असें वर्णन केलें. त्यावरून मी चौदा वर्षांची होतें असें वाटेल. दोनहि अनुमानेंच. पण मी सुमारें चौदा वर्षांची होतें ही गोष्ट खरी. माझा उलट-हुंडा घेण्याकरितां वडिलांनीं मुद्दाम मला बिनलग्नाची वाढविली, पण तें वय कांहीं त्या वेळीं सर्रास सर्वसंमत झालें नव्हतें. कारण ही गोष्ट ३०-३५ वर्षां पूर्वीची आहे. माझें नाटक पाहणा-रांची मात्र माझ्या वयाच्या बाबतींत फार धांदल होई. कारण नाटकांत माझी भूमिका घेणारा मुलगा जसा मिळेल तसें माझें वय दिसून यावयाचें. मुलगा एखादे वेळीं चांगला गाणारा मिळाला पण फार लहान मिळाला, तर 'वाढली उंच ही किती' हें पद म्हणतांना प्रेक्षकांना हंसू येई. उलट तिशी उलटलेलेहि गायक नट माझी भूमिका वठवीत तेव्हां त्यांनीं पोषाक कितीहि ठाकठीक सजविला तरी लोक हंसतच.

असो. माझें वय नक्की माहींत नसलें तरी 'म्हाताऱ्या नवऱ्याला देण्या' पेक्षां 'तूं टाक चिरुन ही मान' असें आईला स्पष्ट सांगण्या-इतकी मी मोठी झालें होतें. माझें वय १४।१५ वर्षांचें झालें तरी माझें लग्न होत नाहीं तें होऊं दे असा धांवा मी ईश्वराचा करी हें खरें. पण त्याचें कारण कोण पाहातो! संसार करूं लाग-ण्याची तळमळ कांहीं मला खरोखर लागलेली नव्हती, आणि आतां माहेरीं राहणे पुरें झालें असेंहि मला कधीं वाटलें नाहीं. तर माझ्या चिंतेचें खरें कारण म्हणजे माझ्या आईची चिंता. बाबा तर मला विकायलाच बसलेले. त्यांना कसली जनाप-वादाची लाज! पण माझ्याकडे पाहून समाजांतील स्त्रिया आईच्या तोंडाकडे पाहत, तेव्हां तिचें तोंड कसें गोरेमोरें होई, हें पाहूनच मला माझें लग्न लवकर होऊन जावेंसें वाटे. शिवाय मी जितकी मोठी होईन तितका अधिक म्हाताऱ्या नवऱ्याच्या गळ्यांत पडण्याचा संभव हें मला दिसत होतें. म्हणूनहि लवकर लग्न होऊन जावें असें वाटे.

अशा रीतीनें मी बाबांच्या हातून सुटावें असें जरी मला वाटत असले, तरी आईचा हात सुटावा असें मला वाटत नव्हतें खास. "बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडिघडी" हे शब्द अगदी बाहुली खेळवण्याच्या स्थितींतल्या अज्ञानी बाळपणाला उद्देशून मी लावलें होतें खरें. पण सज्ञान अवस्थेंतलें बाळपण म्हणून कांही नाहींच कीं काय! दुर्दैवानें आठ आठ वर्षांच्या मुलींचीं लग्नें होत, तेव्हां डाव्या हातांतली बाहुली काढून घ्यावी आणि उजव्या हातांत वराच्या गळ्यांत घालण्याची माळ तिला द्यावी असा प्रकार होत असे! पण बाहुली आणि बोहले या दोहों शब्दांच्या प्रारंभीं ब-कारच असला तरी एक पाय पहिल्या ब-वर तर दुसरा दुसऱ्या ब-वर अशीच स्थिति होणें योग्य होत काय? आतां तेव्हां तरी सगळ्याच सासवा कजाग होत्या असें नाहीं. पुष्कळ सासवा सुनांना लेकीसारख्या वाग-वीत. पण आईच्या घरचें बाळपण आणि सासूच्या घरचें बाळपण यांत जमीनअस्मानाचा फरक असतो. आणि सासू कितीहि प्रेमळ असली तरी तो फरक निघून जाणें अशक्य असतें. कारण स्वातंत्र्याची खरी मर्यादा बाहेरच्या गोष्टींपेक्षां मनानेंच अधिक घातली जाते.

जुन्या काळच्या गुलामगिरीच्या पद्धतींतहि गुला-मांना ममतेनें वागविणारे मालक नव्हते असें नाहीं. पण ममता म्हटली तरी त्यांतल्या त्यांत फरक असतो. घरच्या आवडत्या गाईबैलांविषयीं मालकांस वाटणारी ममता, गुलामाविषयीं वाटणारी ममता, घरच्या नोकराविषयीं धन्यास वाटणारी ममता, घरच्या सुनांविषयीं सासवांस वाटणारी ममता, आणि घरच्या मुलींविषयीं आईला वाटणारी ममता —या सर्वांमध्यें ममता हा एकच शब्द असला तरी त्याच्या प्रकारांत व व्याप्तींत किती तरी फरक असतो! व तो असणारच. सासू कितीहि सुस्वभावी आणि प्रेमळ असली तरी, स्वतः सुनेच्या मनांत आजवरच्या परंपरेनें जो एक आदबशीरपणा, जी एक मर्यादा, जी एक लाज उत्पन्न होते ती कांहीं केल्या जाऊं शकत नाहीं. सासू सुनेला कितीहि प्रेमळपणानें वागवीत असली तरी आजवर कोण-

त्या सुनेनें भूक लागली असतां सासूजवळ खावयाला मागितलें आहे ? कोणत्या सुनेनें खेळण्याची भातुकली मागितली आहे ? कोणत्या सुनेनें दुखणें आलें असतां तें मोकळ्या मनानें एकदम सासूला सांगितलें आहे ? कोणत्या सुनेनें आपल्या मैत्रिणींना सासरीं खेळावयाला फराळाला बोलावलें आहे ?

सासू प्रेमळ असली तरी घरांतील नवऱ्याच्या वावरण्यामुळें तिची मोकळीक कायमची निम्मी गेलेली असते. सासूपुढें ती एक वेळ स्वस्थपणें बसेल. पण आपणामध्यें नवऱ्याच्या दृष्टीला बायको बसलेली दिसावयाचीच नाही. ती बसली असली तर उठलीच पाहिजे. तिला 'उठूं नकोग' असें खऱ्या मनानें कोणी दहादां सांगितलें तरी ती उठणारच. कारण पध्दतच तशी पडलेली. नवऱ्याच्या येण्याजाण्यानें बायकोला खोखोच्या डावासारखें होतें. केव्हां खो मिळून बसलें उठावें लागेल याचा नियमच नाहीं. मोठ्या घरांतून देखील सुनेनें बाजूला जाऊन स्वतःच्या मालकीचा वेळ म्हणून स्वस्थ बसण्या निजण्याचा परिपाठ नाहीं. मग लहान घरांतून सुनांची अवस्था काय होत असेल बरें ? सासर म्हटलें म्हणजे कांहीं एका मर्यादेपलीकडे तिचा आवाज उंच जातांच कामा नये. आणि मन मोकळें करून बोलणें हें तर नाहींच. एकंदरीनें स्वतः सून संसार करूं लागेपर्यंत सासरीं ती अर्ध्या जीवानें जगते असें म्हणण्यांत मुळींच अतिशयोक्ति नाहीं.

तेंच माहेरीं पहा. या सर्व गोष्टी ती हट्टी नसतांहि आपल्या आईजवळ मोकळ्या मनानें करील. शिवाय कांहीं मर्यादेंत निरुपद्रवी हट्ट करणें हा एक किती अवर्णनीय अशा नाजूक आनंदाचा प्रकार आहे ? आईपेक्षां बापाजवळ मुलगी कमी मोकळेपणानें वागते हें खरं. तरी पण बाप बसला असतां मुलगी सदरेवर जाऊन बसेल, त्याच्या टेबलावरचे कौतुकाचे जिन्नस हातांत घेऊन त्याच्याशीं ती खेळेल, त्यांतला एखादा मागूनहि घेईल. त्याच्याजवळ पडलेलें एखादें वर्तमानपत्र किंवा पुस्तक घेऊन वाचील. फार काय पण एखादे वेळीं आईनें हौस हट्ट पुरविला नाहीं तर त्याविरुद्ध तक्रार करून तो पुरवून घेण्याचें एक सत्तेचें स्थान म्हणजे बाप हा होय. दिवसांत आई आई म्हणून दहादां हांक मारिली आणि बापाला एकदांच बाबा म्हणून हांक मारिली तरी तिची किंमत प्रेमळपणांत व लडिवाळपणांत अधिक भरेल !

हें मी सांगतें याचा हेतु काय ? इतकाच कीं, माहेरच्या आनंदाचे व मोकळेपणाचें चार दिवस तुमच्या आमच्या मुलींबाळींना अधिक मिळाले तर हवेच आहेत. आज नाहीं उद्यां सासर ठेवलेंच आहे. व मुली एकदां सासरीं गेल्या कीं मग माहेरीं येणें राहणें ही गोष्ट कांहींशी जिकीरीचीच होऊन बसते. सासर माहेर गांवांतच असलें तर कांहीं तरी सोय निघेल. पण परगांवी सासर असलें म्हणजे प्रवासाचा खर्च व सोबत या अडचणींची भर त्यांत पडते. पुष्कळ प्रेमळ सासवा, मुलीसारखें सुनेचें कौतुक हातून घडावें म्हणून, मुलग्यांचीं लग्नें लहानपणीं करतात. पण सुनांचें कौतुक म्हणजे सासूचें वैभव मिरविणें असाच प्रायः अर्थ असतो. कारण या सुना म्हणजे शृंगार घालून सजविलेले मुके प्राणी. सुनेच्या शृंगाराइतकें तिच्या सुखसोईकडे सासूचें लक्ष जात नाहीं. शिकारखान्यांत पक्षी कोंडून ठेवून त्यांना चारापाणी घालतात, व ते पिंजऱ्यांत तरी उडतात बागडतात. कारण राखणारा फार तर दिवसांतून एक वेळ पिंजरा उघडतो. पण सुनेच्या पिंजऱ्याजवळ तिची राखणारीण सासू दिवसभर असते.

बारा व चौदा या वर्षांतच मुलींचे दिवस माहेरीं अधिक सुखाचे व जाणत्या आनंदाचे जातात. 'जाणता आनंद' मी म्हणते याचें कारण असें कीं, बारा वर्षांपर्यंत मुली खेळत असतात म्हणून आनंदांत असल्या तरी, किंचित् प्रौढपणामुळें घरचें बाहेरचें कळूं लागल्यानंतर त्यांना स्वतंत्रतेचा जो आनंद वाटतो तो नेणत्या वयांतील आनंदापेक्षां श्रेष्ठ आहे. या वयांत मुली कामेंहि करतात, पण ती कोणी 'लादली' म्हणून नाहीं, तर घरच्या प्रेमाखातर. एखादे वेळीं कोणी काम सांगितलें तर "मी नाहीं करीत जा" असें म्हणण्याची जी स्वतंत्रता मुलींना माहेरीं असते ती सासरीं असत नाहीं. या स्वतंत्रतेचा हक्क मुली फारसा बजावतात असेंहि नाहीं. पण हक्क तो हक्क. एरवीं कामाला त्या चुकारपणा करतात असें नाहीं. आई किंचित् आजारी असली, किंवा घरीं पाहुणे आले, किंवा घरीं व्रतवैकल्य किंवा सणसमारंभ असला, म्हणजे मुली हौसेनें आईच्या बरोबरीनें काम करतात. आणि शेवटीं आईने 'दमली बाळ माझी' असें म्हणून पाठीवरून हात फिरविला म्हणजे मुलीला जो काय सात्त्विक गर्व, मोठेपणा, धन्यता वाटते त्याचें तेज तिच्या तोंडावर पाहून घ्यावें. सुनेनें केलेलें काम सासूला दिसतें, उमजतें, सर्व कांहीं खरें.पण तिच्या तोंडून शाबासकीचा शब्द उघडपणे निघत नाहीं. आणि तो निघाला तरी त्याची जाणीव प्रकट करण्यालाहि सुनेला मर्यादा वाटते.

माझें स्वतःचें लग्न प्रौढ होईपर्यंत झालें नाहीं म्हणून या सगळ्या गोष्टींचा अनुभव मला आला. पण माझ्या आनंदाच्या दुधांत मिठाचा खडा पडला होता. तो असा कीं, लग्न न झाल्यामुळें लोकापवा-

दाची आईला रात्रंदिवस वाटणारी चिंता. पण आतां या चिंतेचें कारण राहिलें नाहीं. मुली खुशाल चौदा वर्षांच्या झाल्या तरी जनापवाद येत नाहीं.आयांना चिंता वाटत नाहीं. यामुळें अज्ञानांतलें माहेर आणि प्रौढपणचें सासर या मधला, माहेरचें जाणतें सुख भोगण्याचा, काळ असतो तोच खरा आनंदाच्या बहारीचा व मनोहर असतो, व तो हल्लींच्या मुलींना पूर्वीपेक्षां अधिक लाभतो.

## ले. २ रा

शारदा नाटक कालांतरानें सहजच मागें पडलें. तेव्हां लोकांच्या तोंडचा 'शारदा' 'शारदा' हा शब्द कमी ऐकूं येऊं लागला. तेव्हां मला वाटले, "बरें झालें. लोक मला विसरलें." त्यांच्या स्मरणात निरंतर राहावें असे मी तरी काय केले होतें ! मुळुमुळू रडले आणि शेवटीं नदींत जीव दिला ! किती तरी कुमारिकांवर माझ्यासारखे किंवा माझ्यापेक्षां अधिक कठीण प्रसंग येत असतील. त्या साऱ्याच का असा जीव देतात ? कोणाचीं लग्नें वृद्ध वरांशीं झालीं; पण त्यांनीं गृहिणीपेक्षां इस्पितळातल्या नर्सचें परोपकारी कामच आपल्याला देवाने दिले असें समजून, नवऱ्याची शुश्रुषा करून, बिनबोभाट जन्म काढला. कोणाचीं लग्नें तरुण वरांशीं झालीं असतां त्यांचें नवरे शील व स्वभाव यांत हीन असल्यामुळे त्यांना दुःखांत व मनःसंतापांत जन्म काढावा लागला ! म्हातारा नवरा सुस्वभावामुळें किंवा " त्या व्यंग ठाउके अंगिचें " यामुळें " राखितो लौकिक घरच्या घरीं " असें ह्मणवून घेण्यासारखा संभावितीनें वागतो.आणि "ती नवरा तो स्त्री परी" असा वागणारा भेटला तर मग काय? तिला मोठ्या अभिमानानें व आढ्यतेनें संसार करतां येतो!

पण तरुण तथापि दुःशील नवरा मिळाला तर बायकांना बिनलग्नाच्या सवतीच्या सेवा बटिकीप्रमाणें करण्याची पाळी येते. मग स्वाभिमान सोडून तसें तरी करावें एक, किंवा कायद्याच्या दृष्टीनें नव्हे पण वस्तुस्थितींतली काडी मोडून घेऊन, नवऱ्याकडून मिळणारी पोटगी घेऊन,स्वतंत्र राहून, जिवाला दुसरा कसला तरी लळा लावून घेऊन जन्म काढावा ! तिसरा मार्ग नाहीं. इतर कोणाला मनासारखा नवरा मिळाला असतां दुर्दैवच आडवें येतें, आणि मग सर्व जन्म वैधव्याच्या दुःखांत काढावा लागतो. तात्पर्य, लग्न होऊनसुध्दां "मी कुमारी कां विधवा " असा प्रश्न विचारण्याचा प्रसंग माझ्यासारख्या पुष्कळ मुलीवर येतो. पण त्या कांहीं माझ्यासारख्या जीव देत नाहींत.माझ्या या कृत्याचा मलाच पश्चात्ताप होऊन मनांत मीं नेहमीं रंजीस असे. म्हणून माझें नांव लोक विसरले हें पाहून मला बरें वाटलें, पण गेल्या दोन वर्षांपासून पुनः " शारदा " " शारदा " या नांवाचा उच्चार होऊं लागला. म्हणून स्वस्थान सोडून जरा खालच्या अंतराळांत येऊन पाहूं लागलें, तों कळलें कीं, नांव तेंच खरे, पण ही स्त्री नसून तो कोणी एक साठीच्या घराला पोंचलेला वृध्द गृहस्थ आहे.

पण त्या नांवाबरोबर दुसरेंहि एक नांव जोडलेलें आढळलें. नुसतें शारदा नव्हे, तर शारदा बिल. मी कांहीं इंग्रजी शिकलें नव्हतें. मला बिल हा शब्द कसा ठाऊक असणार? भिल्ल हा शब्द मात्र ऐकलेला होता. तेव्हां वाटलें कीं "तंट्या भिल्ल"-प्रमाणें हाहि कोणी एखादा पराक्रमी भिल्ल होऊन गेला असेल, म्हणून त्याचें नांव ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें आहे. पण पुनः बारीक चौकशी केली तों कळलें कीं, बिल हे नांव कोणा वाटमाऱ्या दरवडेखोर भिल्लाचें नसून, नव्या झालेल्या एका कायद्याच्या योजनेचें आहे. आणि शारदा ही स्त्री नसून ती योजना घडवून आणणारा, समाजांतल्या अल्पवयाच्या मुलींची माया बाळगणारा तो एक पेन्शनर न्यायाधीश आहे. ' गोदीचा गोविंदा ' झाल्याची अद्भुत गोष्ट मी ऐकली होती.पण स्वतः माझ्याच नांवाचा संबंध येत असल्यामुळें, या शारदेच्या नांवाचे असे तंतोतंत अक्षरशः रूपांतर झालेलें पाहून मला फारच मौज वाटली. आणि मी हिमालय पर्वतावर जाऊन त्या माझ्या आडनांवाच्या गृहस्थाला पाहूनहि घेतलें. मनुष्य संभावित व रुबाबदार दिसला. आणि वाटलें कीं, अलीकडचे कांहीं वृद्ध लोक माझ्या ' श्रीमंत 'पतीसारखे तरुण मुलीशीं लग्नें करण्याच्या उद्योगांत न पडतां, मुलींचीं लग्नें अगदीं लहान वयांत न होतां किंचित् प्रौढपणीं करण्याच्या सार्वजनिक खटपटींत गुंतलेले आहेत, तेव्हां खरोखरच समाजचरित्राचें चक्र फिरूं लागलें.

थोडें लक्ष घातल्यावर मला 'शारदा बिल' म्हणजे काय हें तर समजलेंच. पण त्याबरोबर आणखीहि कांही गोष्टी समजल्या. त्या अशा. हें बिल घडवून आणू पाहणारा गृहस्थ जसा वृद्ध, तसाच त्याच्या विरुध्द भांडणारा म्हणून ज्याची प्रसिध्दि झाली तो गृहस्थहि वृध्दच आहे. त्याचें नांव शर्मा असें आहे. तो पुरस्कर्ता क्षत्रियाचा पोषाक घालणारा, व हा विरोधक कपाळभर त्रिपुंड्र लावणारा, दाढी वाढ-

लेला ब्राम्हणी पोषाक घालणारा, असें पाहून मला वाटलें कीं, वैदिक काळांतला ब्राम्हण–क्षत्रियांचा, वशिष्ठ–विश्वामित्रांचा वाद पुनः हिमालयांत उपस्थित झाला की काय? पण हें तसें नव्हतें. ब्राह्मण-क्षत्रियांच्या हक्कांचें हें भांडण नव्हतें. मुलींचा लग्नविधि करण्याला वयाची कांहीं मर्यादा घालावी कीं नाहीं इतकाच तो वाद होता. पण लग्नविधीपुरताच हो! कारण उलट शारदा म्हणत होने कीं, फलशोभन होण्याला चौदा वर्षांची मर्यादा पुरे, तर शर्मा म्हणत, "नाही ती मर्यादा पंधरा वर्षांची असली पाहिजे !"

मग मला वाटलें हे भांडतात तरी का? संसार करूं लागण्याचें वय जर चौदा-पंधरा असावे असें हे कबूल करतात, तर मग उगीच चार-दोन वर्षे लग्नविधि आधीं करण्यांत यांनीं काय हित साधलें? मी पूर्वी सांगितलेंच नाहीं का, कीं बारा व चौदा या वयांच्या आंत बाहेरच मुलींना माहेरचें खरें सुख मिळते. लहानपणीं अज्ञानावस्थेंत भातुकली खेळतांना ते मिळत नाही, किंवा मोठेपणी मुलांचा मेळा बरोबर घेऊन चार दिवस माहेरीं येण्यानें मिळत नाही. कारण पुनः सासरचें 'पाठवून द्या' म्हणून पत्र येण्याची, किंवा यजमानांना खाणावळींतलें कदान्न खावें लागतें या जाणिवेची, चिंता त्यांच्या मनांत असते. लहानपणीं माहेरघरीं मुलगी फुलपांखरासारखी असते. या फुलावरून त्या फुलावर उडण्या प्रमाणें या खेळावरून त्या खेळावर तिचे चित्त जात असतें. तिला घरांत काय चाललें आहे याची वार्ताच नसते. मोठेपणीं माहेरपणाला येणारी मुलगी आनंदानें वावडीप्रमाणें सुखसंवेदनाचें गुंजन करीत असते; पण वावडीला जसा सडा मागें खेंचीत असतो, तशी तिची सासरची आठवण आपोआपच ओढ घेत असते.

आम्हा मुलींचीं लग्नें दहाबारा वर्षांच्या आंत झालीं असतां, आमच्या लहानपणाच्या खेळांतच ती एक भर पडते यांत शंका नाहीं. या खेळांतून बाहुल्यांच्या रूपानें मुलींना मुलें होतात. त्या त्यांना न्हाऊ माखूं घालतात. आपल्या–दुसऱ्यांच्या बाहुला–बाहुलींचीं लग्नें लावतात. पण अशा रीतीनें मातृपदस्थ झाल्याचा खेळ त्या खेळत असल्या तरी, स्वतःच्या लग्नाचा खेळ खेळतांना आढळतात काय ? खेळगड्यांपैकीं घेतला एक मुलगा, म्हटला त्याला आपला नवरा, आणि लावीत बसल्या स्वतःचें लग्न, असें कोणी कधीं पाहिलें नाहीं. स्वतःकडे मातृपद घेण्यांत त्यांना जी लाज वाटत नाहीं ती स्वतःचा विवाहसमारंभाचा खेळ खेळण्यांत वाटते खचित. पण आपलें लटोपटीचें लग्न आपण खेळांत न करतां आईबापांनीं खरोखरीचें आरंभलें तरी, बालवयांत खेळापेक्षां मुलींच्या दृष्टीनें त्याला अधिक महत्त्व किंवा वेगळें स्वरूप नसतें. शाळेंत बक्षिससमारंभाच्या वेळीं संभाषणाचा पाठ म्हणण्याकरितां जरतारीनें नटवून—सजवून मास्तरणी आपणाला नेतात, तसेंच बोहल्यावरचा खेळ खेळण्याच्या वेळीं पिंवळी साडी नेसवून नेतात इतकाच काय तो फरक.

मोठेपणीं लग्नें केलीं तर लहान मुलींचाच काय पण हौशी आईबापांचाहि तो एक खेळ बुडतो हें अगदीं खरें आहे! हलव्याच्या मुडावळया बांधल्या असतां हळूच जिभेनें एक पदर तोंडांत घेऊन त्याचे एकदोन दाणे तोडून खातां येतात ते मोठेपणीं कसें करतां येईल ? प्रौढपणी सुपारी लपविण्याच्या जागा मर्यादित होतात व चोरी लवकर उमगते. नवरा–नवरी लहान असलीं म्हणजे त्यांना एकत्र न्हावयाला घालण्याचा खेळ, स्त्री–पुरुषांचा मेळा सभोंवतीं उभा राहून, सर्वांना पाहावयाला सांपडतो. तेच थोरपणीं अपुरी पातळपडदणी लावून घेऊन नवऱ्याच्या अंगाला अंग भिडवून स्नान करणे, आणि पाण्यानें अंग व पडदणी भिजल्यानें शरीर संगमरवरी पुतळीसारखें दिसतें हे मुलींना सहजच आवडत नाहीत. लहान मुलींना उखाण्यांचें कौतुक वाटतें तसें प्रौढ मुलीना वाटत नाहीं. विड्या तोडण्याचा खेळ तर प्रौढ मुलांकडूनच बंद झाला आहे. वरातीचाहि थाट कमी होत चालला आहे. व कित्येक लग्नातून अक्षतीसारख्या निष्कारण समारंभावर, व एकंदरींत सरसकट वाद्यांवर, बहिष्कार घालण्यांत येऊं लागला आहे. ही किती तरी हौस गमावली ! यांतल्या पुष्कळाला प्रौढ विवाहच कारण आहे.

पण लहान मुलींच्या खेळांत बालविवाहानें भर पडते म्हणून, किंवा प्रौढविवाह केल्यानें आईबापांच्या हौसेंत कमीपणा येतो म्हणून, बालविवाह करावा असें म्हणाल काय, असें तुम्हा आईबापांनाच मी शारदा विचारतें! स्वतः मुलीचें माहेरपणचें सुख, किंवा वधू–वरपसंतींमध्यें मुलाप्रमाणें मुलीचा अल्पस्वल्प विचार घेण्याचा हक्क या गोष्टीकरतां लग्नाची मर्यादा थोडी वाढवावयाला नको काय? वधू–वरपसंतीच्या कामीं समाजाचें पाऊल कालांतरानें कसें पुढें पुढें पडत चाललें आहे हें थोडक्यांत मीं तुम्हाला सांगतें. फार जुन्या काळीं एक समाज दुसऱ्या समाजाशीं लग्नें करी. तीं मुलामुलींचीं नसत तर समाजासमाजाचींच असत. पुरुषार्थाचे अनेक प्रकार आहेत. त्यांत जुन्या काळीं असा एक होता कीं, एका समाजानें दुसऱ्यावर स्वारी करून त्याच्या मुली पळवून आणावयाच्या. या बलात्कारविवाहाची खूण अजूनहि कित्येक जातींत उरली आहे. हल्लीं

प्रत्यक्ष बलात्कार होत नाहीं, पण बलात्काराचें नाटक होतें. तें असें कीं, नवऱ्यानें मुलीला उचलून आणावें व तिच्या आप्तांनीं नवऱ्याला हंसत-खेळत विरोध करावा. म्हणजे बलात्काराचें अत्याचाराचें स्वरूप जाऊन त्याला समारंभाचें स्वरूप आलें आहे.

श्रीकृष्णानें रुक्मिणी पळवून आणली, अर्जुनानें सुभद्रा पळवून आणली. या उदाहरणांत वधूची संमति असली तरी त्यात्या-त्यांच्या दृष्टीनें तो बलात्कारच होय. रोमन इतिहासांत साबियन टोळीच्या मुली रोमन लोकांनीं पळवून आणल्या व लग्नें केलीं अशी दंतकथा आहे. अशा विवाहांत ज्याच्या हाताला लागेल ती त्याची नवरी. याच्या पुढची पायरी अशी कीं, एका राजानें दुसऱ्या राजाला जिंकलें असतां जित राजाची बहीण किंवा मुलगी जेत्या राजाला बायको म्हणून अर्पण करण्याची अट तहांत घालावयाची, व ती पुरी झाली म्हणजे दोन राज्यांचें सख्य व्हावयाचें. हा राजकारणी विवाह होय. यानंतर शांततेच्या काळांतहि, दोन गांवांनीं स्नेहसंबंध जोडण्याकरितां एका गांवाची मुलगी दुसऱ्या गांवाला द्यावयाची असा प्रकार आढळतो. याची खूण कांहीं ठिकाणीं अजून अशी उरली आहे कीं, लग्न झाल्यावर मुलीचा बाप जसा जावयाच्या घरीं जेवीत नाहीं त्याप्रमाणे ज्या गांवानें मुलगी दिली त्या गांवच्या कोणाहि मनुष्यानें, ज्या गांवांत मुलगी दिली त्या गांवचें अन्न खावयाचें नाहीं किंवा पाणी प्यावयाचे नाहीं. अशी चाल अजूनहि जुन्या चालीच्या कांहीं गांवांतून दिसून येते. याचें कारण द्वेष नव्हे, तर मुलीचे दान केलें म्हणजे त्या वेळीं तिचें सर्वस्वदान झालें म्हणून तिच्या घरचें पाणीहि प्यावयाचें नाहीं ही स्वत्वनिवृत्तीची अत्यंत उदात्त सात्विक कल्पना. अर्थात् एक गांव दुसऱ्या गांवाचा व्याही झाला म्हणजे, एका गांवानें दुसऱ्या गांवाचें पाणी प्यावयाचें नाही हा त्याच कल्पनेचा विस्तार होय.

यानंतर गांव सुटून घराणें हा सामाजिक घटक ( Unit ) झाला, तेव्हां एका घराण्यानें दुसऱ्या घराण्याला मुलगी दिली असा विवाहाचा अर्थ झाला. या कल्पनेच्या स्थितींत व्यक्तिशः मुलगा पाहणें किंवा मुलगी प्रत्यक्ष पाहणें याला अवकाशच उरत नव्हता. दोन घराण्यांचा स्नेहसंबंध किंवा सोयरीक जमविणें, संपादणें हें ध्येय, व वधू-वर हीं त्या ध्येयाचीं फक्त साधनें! जुन्या खानदानीच्या घराण्यांतून अजूनहि असले विवाह झालेले पाहण्यांत येतात. ही स्थिति जाऊन वधू-वरांची पसंति समक्ष पाहून पारखून करावयाची अशी चाल पडली. पण यांतहि वराला वधूचें दर्शन नाहीच. यानंतर वराकरितां आई-बापानींच वधू पसंत करावयाची, पण ती त्याला सहज नजरेला घालावयाची अशी चाल पडली. यांत वराला फार तर नकार दर्शविण्याचा ( Veto ) अधिकार मिळाला. पण अमुक नवरी नको म्हणण्याप्रमाणें अमुक हवी असें म्हणण्याचा अधिकार त्याला मिळाला नाहीं. त्यानंतरची अलीकडची पायरी म्हणजे वराला अनेक वधू दाखवावयाच्या, व त्यांतील वाटेल ती त्यानें पसंत करावी, व मग त्या मुलीशीं त्याचा विवाह करावा ही होय. पण यांतहि वधूला वराचें दर्शन घडावयाचें तें वरानें वधू पाहण्याच्या व्यवहारांत ओझरतें घडावयाचें. पण अलीकडे कांहीं सुज्ञ आईबाप वधूलाहि वर हवा नको म्हणण्याचा अधिकार आहे असें न्यायबुद्धीनें मान्य करून वधूवरदर्शनाचा व्यवहार दुतर्फी हेतूनें करतात. म्हणजे आज मुलीला फारच झालें तर नकाराचा म्हणजे Veto चा अधिकार मिळाला आहे इतकाच त्याचा अर्थ होय. पण हा अधिकार बजावणारी मुलगी आमच्या पुराणप्रिय शास्त्र्यांच्या मताप्रमाणें "अष्टवर्षा गौरी" खास नव्हे. ती तेरा—चौदा वर्षांची तरी निदान असली पाहिजे व असतेहि.

हा सर्व सामाजिक इतिहास पायरी-पायरीनें सांगण्याचा हेतु इतकाच कीं, विवाहकल्पनेच्या दृष्टीनें आपल्या 'सनातनी' हिंदु समाजाच्या पायाखालील वाळू किती तरी निघून गेली आहे हें दाखवावयाचें. समाज हा पोहावयाला पडलेल्या गड्याप्रमाणें आहे. तो प्रवाहाबरोबर वाहवत असतो, पण स्वतःहि हात टाकीत राहिल्यानें त्याला वाटतें कीं मी कांहीं प्रवाहामुळें स्थानभ्रष्ट झालो नाहीं. एका टोळीनें दुसऱ्या टोळीवर स्वारी करून मुली पळवून आणून विवाह करणें हें जितकें एक वेळ 'सनातन' म्हणजे शुद्ध मानलें जात होतें, तितकेंच आज वधूवरांना परस्पर दर्शन घडवून व त्यांना निदान नकाराचा अधिकार देऊन त्यांच्या अकरणरूपी पसंतीनें त्यांचे विवाह करणें हें तितकेंच शुद्ध व 'सनातन' मानलें जाऊं लागलें आहे. या दोन सनातन चालींतील अंतर जमीन-अस्मानाचें नाहीं काय? पण या भेदांतहि एक चमत्कारिक साधर्म्य आहे. तें असें कीं, या दोनहि चालींत विवाहाची मुलगी अज्ञान असत नाहीं तर खरी उपवर असते!

## लेखांक ३ रा

किंचित् प्रौढपणीं मिळणारें माहेरच्या रहिवासाचें सुख, आणि "मला वधूला अमुक वर नको" इतकेंच आईबापांना मानेनें किंचित् दर्शविण्यापुरता स्वयंनिर्णय, या दोहोंच्या दृष्टीनें मुलींच्या लग्नाचे वय चौदा वर्षांपर्यंत वाढवावें असें मी म्हटलें. पण त्यापेक्षां त्याला आणखीहि कारणें आहेत. मात्र तीं माझीं नाहींत हो! तुमचीं तुम्हींच उत्पन्न केलीं आहेत. कसें तें पाहा. राजकारणांत आपण घराबाहेर सभांतून वर्तमानपत्रांतून काय बोलत असतो व कायदेकौन्सिलांतून काय करीत असतों, याची शुद्ध तुम्हा पुरुषांना सामाजिक बाबतींत राहात नाहीं असेंच मी शारदा म्हणते! प्रथम सक्तीचें सार्वजनिक शिक्षण घेऊं. ही सक्ती तुम्ही मुलांप्रमाणे मुलींच्याहि आईबापांवर करावयाला तयार आहां. याचा अर्थ मुलीनें लहानपणीं शिक्षण घेण्याला सुरुवात करावी अशी आज सर्व समाजाची इच्छा आहे. सरकार पैसा देत नाहीं आणि तुमच्या लोकल बोर्डाजवळ पैसा नाहीं, म्हणून घोंगडें भिजत पडलें आहे ही गोष्ट वेगळी. पण पैसा असल्यास कुणबी कोळी महार मांग वडार कातवडी या सर्वांच्या मुलींना सहा वर्षांपासून तुम्ही शाळेंत शिकावयाला पाठविण्याची सक्ती करावयाला तयार. म्हणजे इतक्या लहानपणीं मुलीचें पाऊल घरांतून बाहेर तुमचे तुम्हींच काढलेलें !

मुलगी शाळेंत जाते! या गोष्टीचें दूषण न वाटतां ते आतां भूषण वाटूं लागलें आहे! लग्नाला मुलगी पाहावयाला लोक आले म्हणजे त्यांनीं विचारण्याच्या आधींच 'ती अमक्या इयत्तेंत आहे' असें थोडेसें फुगवून तुमचें तुम्हीच सांगतां. ती इंग्रजी शाळेंत जाऊं लागली असल्यास तिजकडून आग्रहानें चार छापील अक्षरें लावून दाखविलीं म्हणजे तुम्हाला किती तरी धन्य वाटतें. या अप्रत्यक्ष शिफारशीमुळें हुंडा कमी होईल अशी आशा कांहीं तुम्हाला फारशी नसते म्हणा. पण मुलगी मुलाला पसंत होण्याचा संभव थोडा अधिक, म्हणूनच तिच्या शिक्षणाची किंचित् अतिशयोक्ति करण्याचें धाडस तुम्ही करतां. याचें कारण तुम्हाला आतां माहीत झालें आहे कीं लिहितां वाचतां येणारी मुलगी नवऱ्या मुलाला अधिक आवडते. उघडच आहे. विद्या हें जर स्वतःच भूषण असें मुलगे समजतात, तर त्या भूषणानें थोडीबहुत तरी मंडित अशीच सहचारिणी वधू आपल्याला असावी असें मुलांना वाटल्यास त्यांत काय आश्चर्य ? अर्थात् मुलग्यांना सुशिक्षित करून, त्यांना लग्नाचे मोठे ठेवून, थोडीबहुत त्यांजकडून वधूची पसंती करवून, लग्नें करण्याचा प्रघात तुम्ही पाडला त्यामुळें मुली शिकलेल्या असाव्यात हे ओघानच प्राप्त होतें.

पण बारा वर्षांपर्यंत मुलींचें अध्ययन तें कितपत होणार? आणि समजा, तिची बुद्धि चालूं लागली, ती वर्गांत वरचा नंबर व बक्षिसें मिळवूं लागली, तर मग काय तिला तुम्ही बळजबरीनें मागें खेंचणार? तुम्हाला पाहिजे तितकेंच शिक्षण तिनें मिळविणें हे भूषण! आणि त्यापुढें अधिक शिक्षण मिळविण्याची इच्छा धरणें हे मात्र दूषण काय ? आतां केवळ शिक्षणाची हौस पुरी करण्याकरितां अविवाहित राहणाऱ्या मुली किंवा त्यांना अविवाहित ठेवणारे आईबाप थोडे असतात. पण त्या मुली आपण विचारांतूनच वगळूं. लग्नें चौदा-पंधरा वर्षांपुढें ठेवावयाचीं नाहींत असें म्हटलें तर, बाराच्यापुढें आणखी फार तर दोनतीन वर्षें शिकतील. आणि त्यानें ह्मणजे त्यांचें शिक्षण पुरें झालें असें होत नाहीं हें खरें. पण मुलग्यांचें तरी शिक्षण मनानें खरोखर पुरें झाल्यावरच ते विद्यापीठ सोडतात असें आहे काय ? कोणी मॅट्रिक झाला ह्मणजे घरचा संपन्न ह्मणून इतकेंच पुरें म्हणतो; तर कोणी श्रेष्ठ पदवी घेऊन पुरे ह्मणतो. पण "पुरें" याचा अर्थ खरा काय असतो? विद्या व शिक्षण हें कधींच कोणाचें पुरें होऊं शकत नाहीं. पण "आतां उदरनिर्वाहाचें साधन पाहावयाला लागूं" असें म्हणण्यानें मुलांच्या शिक्षणाला जशी स्वाभाविक मर्यादा पडते, तशीच "आतां संसार करावयाला लागूं या" असें वाटण्यानें मुलींच्या शिक्षणालाहि मर्यादा पडते व ती तेथें पडावी हे योग्यच आहे.

पण एखाद्या मुलीला विद्याच अधिक शिकावी आणि संसारप्रारंभ थोडा लांबवावा असें वाटलें तर मग काय करणार ? नुसतें पोटाला मिळविणें हें जसें तुम्ही मुलग्यांचें ध्येय ठेवलें नाहीं तसेंच नुसता संसार करणें हे तुम्ही मुलींचेंहि ध्येय ठेवलें नाहीं! तर तुम्हाला आपल्या देशाला स्वयंनिर्णयानें ठरविलेलें 'स्वराज्य' किंबहुना 'स्वतंत्र स्वराज्य' पाहिजे! आणि मुलामुलींच्या भावी पिढ्यांकडून तुम्ही तें मिळविणार टिकविणार व चालविणार! या सर्व गोष्टी बारा वर्षांच्या मुली व अठरा वर्षांचे मुलगे यांचीं लग्नें उरकून घेऊन मग तुम्ही करणार ! पण हें सर्व शक्य किंवा निदान बरोबर आहे असें तुम्हाला वाटतें का ? जुन्या काळीं हें शक्य होतें असें मीच आपण होऊन म्हणते. कारण सगळें जगच तसें होतें. पण जग बदलल्यावर तुमचे तुम्ही मात्र

जागेवर राहून जगाच्या बरोबरीनें त्यांच्याशीं व्यवहार करून यश मिळवाल हें शक्य आहे काय ! स्वराज्य मागण्याची हुक्की आली म्हणजे नेहरू रिपोर्टांत काय असेल नसेल त्या सकट तो मान्य करण्याची तुमची तयारी. पण त्या रिपोर्टांत स्त्रियांना पुरुषाबरोबरीचे सर्व हक्क दिले आहेत ते द्यायला तुम्ही तयार आहां काय ? तयार नसलां तर नेहरू रिपोर्टांतील त्या कलमाविषयीं निषेधपर सभा तुम्ही कां भरवीत नाहीं ? आणि तयार असलां तर, आपला लग्नवर डोळ्यानें पाहून हुकार नकार निदान डोळ्यानें देण्याइतक्या त्या लग्नाच्या वेळीं प्रौढ असाव्या असा त्यांनीं किंवा त्यांच्याकरितां दुसऱ्या कोणा हक्क सांगितला तर तो तुम्ही अमान्य करणार काय ?

स्वराज्याच्या चळवळींत जो कोणी हितशत्रु विरुद्ध बोलेल त्याचें तें म्हणणें खोडून टाकावयाला तुम्ही सहजच तयार असतां. एखाद्या इंग्रजानें असें म्हटलें कीं, "तुम्ही हिंदी लोक स्वराज्याला नालायक आहां. कारण तुमच्यांत स्त्रियांना शिक्षण नाहीं, तर त्याला खोडून काढावयाला तुम्ही असें नाहीं म्हणत कीं, "वा स्त्रीशिक्षणावर स्वराज्याची लायकी अवलंबून असते वाटते? आमची अहिल्याबाई कुठ इंग्रजी शिकली होती ! तिला पोथी पुस्तक देखील वाचतां येत नव्हत. पण तिनं राज्य हांकल व मुत्सद्यांत गणना करून घेतली", असें तुम्ही म्हणत नाहीं, तर लगेच सरोजिनी नायडूकडे अंगुली दाखवितां आणि म्हणतां "पाहा ही आमची विदुषी! साहेबा, तूं तरी बोलून पाहा तिच्यासारखं फटाकड इंग्रजी. आम्ही तिला राष्ट्रीय सभेची अध्यक्ष केली, आणि आमचा परराष्ट्रीय वकील म्हणून अमेरिकेला पाठविली." पण असें उत्तर देऊन "तुम्ही स्त्रीशिक्षण व प्रौढविवाह गळ्यांत घेतां हें आहे का ठाऊक?" पदवीधर स्त्रियांचीं चित्रे अभिमानानें वर्तमानपत्रांतून देतां. कोणतीहि परिषद किंवा सभा स्त्रीनें एखादें भाषण केल्याशिवाय सांग झाली असें तुम्हाला वाटत नाहींसें झालें आहे. झगा घालून एखाद्या नव्या वकिलीणबाईनें खटला चांगला चालविला म्हणजे, न्यायाधीशानें तिच्या स्तुतिपर काढलेले शब्द तुम्ही उद्धृत करतां. एखादी स्त्री स्थानिक स्वराज्यसंस्थेची किंवा कायदेकौन्सिलाची सभासद झाली तर तुम्ही 'मर्यादा सुटली' असें म्हणून निषेधप्रदर्शक सभा भरविता काय? तात्पर्य, स्त्रीशिक्षण स्त्रीकर्तृत्व हें भूषण मानण्याची संवय तुमच्या चोरट्या मनाला लागून राहिली आहे हे तुम्हाला माहीत आहे कांहें?

या अपवादात्मक गोष्टी सोडून दिल्या तरी, केवळ मुलांच्या लग्नाची मर्यादा वाढूं लागल्यामुळेंहि मुलींच्याहि लग्नाची मर्यादा वाढूं लागली आहे. मुलांना सहजच वाटूं लागलें आहे कीं, आपण उदरनिर्वाह करण्याचें साधन मिळवूं लागेपर्यंत लग्न करून, आपल्याबरोबर बायकोचा उदरनिर्वाह करण्याची जबाबदारी आणखी कशाला पत्करा? ती पात्रता आली म्हणजे लग्न करू. मोठी वधू आयतीच मिळेल, मग एकदम संसाराला सुरुवात करूं ! पण मुलांचें लग्नवय वाढलें म्हणजे मुलींचें वय याहि कारणानें वाढते. वधू–वरांच्या वयांत कांहीं ठराविक अंतरच असावें, जास्त असूं नये, ही गोष्ट सर्वमान्य आहे. अर्थात् सुईमागें दोरा हा न्याय येथें लागू पडतो. व्याकरण दृष्ट्या ही उपमा चूक ठरेल. पण व्यवहारदृष्ट्या खचित बरोबर आहे. सुईमागें दोरा असें न म्हणता वाटल्यास 'टोच्यामागें दोरी' असें म्हणा. पण पुरुषलग्नमर्यादेची वाढ ही अनुयोगी, आणि स्त्रीलग्नमर्यादेची वाढ ही त्याची प्रतियोगी एक कारण दुसरें अनुबंधी कार्य हें कांहीं खोटें ठरत नाहीं.

परवां माझ्या नांवाच्या बिलाची चर्चा कायदेमंडळांत चालू होती तेव्हा मी बिनतिकिटानें गॅलरींत बसून कानोसा घेत होतें. नवा कायदा नको म्हणणारे व पाहिजे म्हणणारे यांच्यांत एरवीं विरोध हवा तितका दिसला. पण एका गोष्टींत त्यांचें ऐकमत्य दिसलें. ती ही कीं, गर्भाधानसंस्काराची मर्यादा चौदाच काय पण पंधरा–सोळा वर्षांचीहि ठेवावी. कायद्याला विरोध करणारे लोक तर ही गोष्ट इतरांपेक्षां अधिक जोराजोरानें व आग्रहानें प्रतिपादन करीत होते हें पाहून मला हसूं आलें! पण त्याचबरोबर ते हें मात्र प्रतिपादीत होते कीं, मुलींचा नुसता लग्नविधि मात्र बारा वर्षांच्या आंत उरकून घ्यावा. हें केवळ शास्त्राच्याच दृष्टीनें नव्हे, पण आम्हा मुलींवर विश्वास ठेवतां येत नाहीं म्हणूनहि बरें का ? आमचें लग्न इतक्या लवकर उरकण्याला आतां योग्य वरच मिळत नाहींत हें वेगळें. पण मिळाले तर उरकून घ्यावें असें त्यांचें म्हणणें. कां ? तर गुन्हेगाराकडून जसा सद्वर्तन ठेवण्याबद्दल जामीन घ्यावयाचा, किंवा क्रिमिनल ट्राईबसच्या लोकांकडन गुन्हे होऊं नयेत म्हणून त्यांच्यामागे रात्री चौकीवर हजेरी देण्याची सक्ती ठेवावयाची, त्याचप्रमाणे आम्ही मुली बारा वर्षांच्या झाल्याबरोबर आमचें पाऊल वांकडें पडूं नये याकरितां लग्न करून आम्हाला जामिनकींत गुंतवावयाचें! येऊनजाऊन आम्हा मुलींवर तेवढा तुमचा अविश्वास ! ठीक आहे. शहाण्या इसॉपनें सिंह आणि चितारी याची गोष्ट लिहिली ती खोटी कां होईल ?

पण अशा लग्नानें एकांत अनेक तोटे कसे होतात पाहा. आम्हा मुलींचें शिक्षण लवकरच

अकालीं संपुष्टांत येतें. कारण लग्नानंतर फार थोड्या मुलींना सासरचीं माणसें शाळेंत पाठवितात. किंचित् प्रौढपणीं मिळणाऱ्या माहेरच्या सुखाला व आनंदाला आम्ही आंचवतों. मुलींच्याप्रमाणें नवऱ्याच्या अभ्यासाला एक नसता अडथळा येतो. नवऱ्याच्या परीक्षेच्या काळजींत संसाराच्या काळजीची अकालीं भर पडते. आणि वैधव्ययोगाचा संभव तितकाच दोनतीन वर्षांनीं विनाकारण वाढतो. आमच्या पतिप्रेमाची वेळ फळाला यावयाची तर, ती रुजत घालण्याला योग्य ऋतु आमच्या ऋतुकालापूर्वींचाच असतो असें कांहीं सामाजिक स्थितींतील तज्ज्ञ बागवानांनीं ठरवून ठेवल्याचें दिसतें. ही वेल कांहींजण मृगाच्या झडींत लावावी म्हणतात, तर ती गोष्ट त्यापूर्वी रोहिणी मंडपांतच उरकून घ्यावी असें इतर म्हणतात. प्रो. गोळे यांनीं 'हिंदुधर्म आणि सुधारणा' या ग्रंथांत आम्हा मुलींच्या पतिप्रेमाच्या वेलीच्या जोपासनेचें जे वर्णन दिलें आहे तें मोठें रम्य आहे. पण तें पटत नाहीं ! इतकेंच नव्हे तर त्यामुळें आमच्या स्वाभिमानाला धक्काहि बसतो.

# दे० शंकरराव देव यांचा तुरुंगांतील अनुभव

प्र.—आपल्यास तुरुंगांत वागविण्याची पध्दत कशी काय होती ?

उत्तर—जेलमध्यें १२४।१२१ वगैरे कलमाखालीं येणारे कैदी व इतर कलमाखालीं येणारे कैदी यांच्यामध्यें कोणताहि भेद कायद्यानें बाळगला जात नाहीं. या दृष्टीनें कायद्याला धरून जितक्या उदार वृत्तीनें वागवितां आलें तितक्या उदार वृत्तीने त्या वेळचे सु. मेजर डायल व जेलर मि. काउपर यांनीं आम्हास वागविलें. याबद्दल आम्ही (देव व हरोलीकर) त्यांचे जाहीर आभार मानतों.

प्र.—तुरुंगांतील कपडा, अन्न, काम या संबंधी आपलें काय मत आहे ?

उ.—या बाबतींत राजकीय कैदी व इतर कैदी असा भेद करीत नाहींत. आह्मांस सुरुवातीस चक्कीचें काम देण्यांत आलें. अजमासें दररोज ३ पायली दळण प्रथम देण्यांत आलें. पूर्वीपेक्षां हल्लीं चक्कीची वर्दी वाढविण्यांत आली आहे. पूर्वी तीस पौंड होती, आतां चाळीस पौंड केली. ही जास्त आहे असें मला वाटतें. ही वाढ कमी होणें जरूर आहे असें माझें मत आहे. आज चक्की सामान्य काम म्हणून दिली जाते ती तशी न देतां फक्त शिक्षा म्हणून दिली जावी. विशेष कष्टाचीं कामें म्हणजे दळण काम, लोहार काम, करवत काम वगैरे. हीं कामें करणाऱ्यांना हल्लीं मिळत असलेलें अन्न अपुरें पडतें. तें त्यांना त्यांच्या कष्टाच्या मानानें जास्त देण्यांत यावें. देण्यांत येणाऱ्या अन्नामध्यें पूर्वीचे प्रकार व प्रमाण कमी झालें आहे. उदाहरणार्थः—हल्लीं कैद्यांस गहूं बिलकुल मिळत नाही! व त्याचप्रमाणें पूर्वी डाळ व भाजी अलग मिळत असे ती हल्लीं एकत्रच चोथापाणी झालेली मिळते! मिळणारें अन्न अत्यंत अस्वच्छ व कच्चें असें मिळतें. तेंच अन्न पण पक्कें शिजलेलें व स्वच्छ मिळावें अशी आम्ही मागणी केली होती. तीन दिवसांच्या अन्नत्यागानंतर ही मागणी मान्य झाली. इतर कैद्यांची या बाबतींत तक्रार आहे पण तिकडे कोणी लक्ष देत नाहीं. तीन महिन्यांनी कैद्यांची स्थिति कशी आहे हे पाहण्यासाठीं एक कमिटी येते. पण तिला खरी वस्तुस्थिति अधिकाऱ्यांच्या सान्निध्यामुळे कळत नाहीं, व कैदी खरी वस्तुस्थिति सांगण्यास धजत नाहींत. कारण उलट शिक्षेच्या रूपानें ताप होण्याचा जास्त संभव असतो.

प्र.—तुरुंगाच्या सुधारणे-संबंधानें आपल्यास कांहीं सुचवावेंसें वाटतें काय ?

उ.—वर सांगितलेल्या कमिटीचा कांहींएक उपयोग होत नाहीं. शिवाय गव्हर्नरसारख्या अधिकाऱ्यांच्या वार्षिक भेटी निरुपयोगी आहेत. कारण त्या केवळ समारंभवजा असतात. जेल व्यवस्थेमध्यें सुधारणा व्हावी अशी इच्छा असेल तर लोकप्रतिनिधीनीं या बाबतींत विशेष लक्ष घालून त्या दृष्टीने प्रयत्न केला पाहिजे. जेलकडे पाहण्याचा अधिकाऱ्यांचा हल्लींचा दृष्टीकोन लष्करी स्वरूपाचा आहे. तो बदलणें इष्ट आहे. आंत येणाऱ्या कैद्यांचें चारित्र्य कसें सुधारतां येईल, व बाहेर गेल्यावर त्यांना फिरून आंत येण्याचा मोह अगर जरूरी कशी पडणार नाहीं, अशा धोरणानें आंतील कारभार चालणें जरूर आहे. या दृष्टीनें आंत धार्मिक शिक्षण व मनास सुसंस्कृत करणारें शिक्षण, देण्याची जास्त व्यवस्था सरकारनें करणें जरूर आहे.

प्र.—धार्मिक बाबतींत हिंदू व इतर कैदी यामध्यें भेद दिसून आला काय ?

उ.—प्रत्यक्ष धार्मिक वृत्तीचा विचार केला तर इतर जातीप्रमाणेंच ती हिंदु कैद्यांतहि असते. पण या वृत्तीच्या पोषणाकरितां जी व्यवस्था अगर ज्या

सवलती आंत असणें जरूर आहेत त्या बाबतींत हिंदु कैदी आपल्या भेकड स्वभावामुळें फार मागें आहेत. आषाढीएकादशी सारखे मुख्य उपास पाळणारे शेंकडो कैदी आंत आहेत. पण सरकारकडून त्यांच्या उपोषणाची कोणत्याहि प्रकारची तजवीज करण्यांत येत नाहीं. त्यांस केवळ पाणी पिऊन रहावें लागतें. व यदाकदाचित् त्या दिवशीं सुटी नसल्यास अशा उपोषित स्थितींतच काम करावें लागतें. या बाबतींत हिंदु कैद्यांनीं संघटित प्रयत्न केल्यास त्यांच्या धार्मिक व्रतांची काळजी घेण्यांत येईल असें वाटतें; व बाहेरूनहि हिंदु पुढाऱ्यांनीं अत्यंत जोरानें खटपट केली पाहिजे असें मला वाटतें. मुसलमान, शीख वगैरे इतर ज्ञातींनीं स्वावलंबनाच्या जोरावर हे धार्मिक प्रश्न सोडवून घेतले आहेत. त्याचप्रमाणें आंतील व बाहेरील हिंदुधर्माभिमान्यांनीं हे प्रश्न जास्त धसास लावावे असें मला वाटतें.

प्र.—तुरुंगांत देण्यांत येणाऱ्या अंतर्गत शिक्षे-बद्दल आपलें काय मत आहे ?

उ.—वर सांगितल्याप्रमाणें शिक्षेपेक्षां शिक्षणाकडे जास्त लक्ष असावें. विशेषतः हल्लीं ज्या अनेक शिक्षा दिल्या जातात त्यांपैकीं दोन दोन, चार चार दिवस कैद्यांस अन्नपाण्यावांचून ठेवणें, व तीस फटक्या-पर्यंत शिक्षा दिली जाणे, या गोष्टी कायमच्या नाहींशा झाल्या पाहिजेत.

प्र.—अधिकाऱ्यांचें सामान्यतः सर्व कैद्यांशीं कोणत्या प्रकारचें वर्तन असतें ?

उ.—जेलमधील अंतर्गत व्यवस्था लष्करी शिस्तीच्या पायावर उभारलेली असल्यामुळें सामा-न्यतः अधिकाऱ्यांचें कैद्यांशीं जें वर्तन असतें तें अत्यंत मगरूरीचें व उपमर्दकारक असतें. कैदी हीं माणसें आहेत अशी जाणीव असल्याचें दिसून येत नाहीं.

प्र.—कोणतीहि विशेष सवलत आपल्यास मिळाली होती काय ?

उ.—लिहिण्यास व वाचण्यास आम्हाला पूर्ण मोकळीक देण्यांत आली होती.

प्र.—राजकीय कैदी म्हणून ही सवलत मिळाली होती कीं कसें ?

उ.—ही सवलत हक्क म्हणून मिळाली नव्हती. राजकीय कैद्यास कायद्यानें आज घटकेस कोणत्याहि सवलती नाहींत. या दृष्टीनें सामान्यपणें सर्वच कैद्यांच्या बाबतींत पुढील प्रमाणें सुधारणा होणें जरूर आहे. (१) गुन्हा करण्याचा हेतु (२) गुन्ह्याचें स्वरूप (३) त्याचा सामाजिक दर्जा हीं लक्षांत घेऊन कैद्यांचें विभाग करण्यांत यावेत, व त्याप्रमाणें त्यांच्या कामाची, खाण्याची, राहण्याची व शिक्षणाची अलग व्यवस्था असावी.

# हर्टॉग शिक्षण कमिटीचा रिपोर्ट

सायमन कमिशनाचें एक उपांग म्हणून हिंदुस्था-नांतील केवळ शिक्षणप्रसाराचा विचार करण्या-करितां सर फिलिप हर्टॉग यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमण्यांत आली होती. त्या कमिटींत सर आम्हर्स्ट सेल्बी बिग, सर सय्यद सुलतान अहमद, सर जॉर्ज अंडरसन, राजा नरेंद्रनाथ आणि श्रीमती मुथुलक्ष्मी रेड्डी हे सभासद होते. या कमि-टीनें हिंदुस्थानांत ता. १६ जून १९२८ पासून मार्च १९२९ पर्यंत फिरून चौकशी केली. या चौकशींत रंगून, मंडालें, मद्रास, हैद्राबाद (दक्षिण), पुणें, लाहोर, लखनौ, कानपूर, दिल्ली, कलकत्ता, डाक्का, पाटणा, काशी, प्रयाग इतक्या ठिकाणीं तोंडी साक्षी घेतल्या. आतां सदर कमिटीचा रिपोर्ट विलायतेंत व हिंदुस्थानांत एकदम प्रसिध्द करण्यांत आला आहे. त्याचा सारांश पुढीलप्रमाणें आहे—

### शिक्षणाची सार्वत्रिक वाढ

प्राथमिक शाळांतून विद्यार्थ्यांची संख्या पुष्कळच वाढली आहे. यावरून बहुजनसमाजाची शिक्षणा-विषयींची बेफिकीरी नाहींशी होत चालली आहे असे दिसतें. विशेषतः स्त्रियांत राजकीय व सामाजिक जागृति उत्पन्न झाली असून त्यांच्या-कडून सामाजिक सुधारणेविषयीं व शिक्षणप्रसारा-विषयीं जोराची मागणी सुरू आहे. मुसलमान विद्यार्थ्यांची संख्या झपाट्यानें वाढत आहे. अस्पृष्ट वर्गाची स्थिति सुधारण्याविषयींचे प्रयत्न चालू असून अस्पृष्ट वर्गांतूनहि जागृतीचीं चिन्हे दिसत आहेत, व शिक्षण संपादण्याचा आपला हक्क ते सांगूं लागले आहेत. एकंदरींत लोकमताचें नेतृत्व ज्यांच्याकडे आहे असे समाजधुरीण हा कठीण व गुंतागुंतीचा प्रश्न कसा सोडवावयाचा या विचारांत मग्न आहेत. शिक्षणमंत्री शिक्षणखात्याकरितां अधिकाधिक खर्चाची मागणी करीत असून कायदे-मंडळांतून अधिक खर्चाला आनंदानें मंजुरी दिली जात आहे.

### दुसरी बाजू

चित्राची ही एक बाजू झाली. पण याच चित्राला दुसरीहि एक बाजू आहे. त्या बाजूनें पाहिल्यास शिक्षणाच्या कामीं होणारा किती तरी

खर्च अनाठायीं जात आहे, आणि प्राथमिक शिक्षण किती निष्फळ होत आहे ते दिसून येतें. प्राथमिक शिक्षणानें साक्षरता वाढली पाहिजे आणि त्या शिक्षणाच्यायोगानें आपल्याला मिळालेला मताधिकार योग्य रीतीनें उपयोगांत आणण्याची पात्रता वाढली पाहिजे. पण या बाबतींत किती तरी श्रम केवळ वांया जात आहेत !

आमच्यापुढें जी माहिती आली तीवरून पाहतां प्राथमिक शाळांत जेवढ्या प्रमाणांत विद्यार्थ्यांची संख्यावाढ झाली तेवढ्या प्रमाणांत कांहीं निरक्षरता मागें हटली नाहीं ! प्राथमिक शाळांत असणाऱ्या विद्यार्थ्यांतले फारच थोडे विद्यार्थी चौथ्या इयत्तेपर्यंत जाऊन पोचतात. एका प्रांतांत तर प्राथमिक शिक्षणाच्या खर्चात वाढ झाली, खालच्या इयत्तांतून विद्यार्थ्यांचीहि वाढ झाली; परंतु चौथ्या इयत्तेतल्या विद्यार्थ्यांची संख्या पाहिल्यास ती मात्र पूर्वीच्या वर्षापेक्षां ३० हजारांनीं कमी ! खेडेगांवांतील परिस्थिति आणि साक्षरता वाढविण्याला उपयुक्त अशा पुस्तकांची उणीव लक्षांत घेतां जे इसम लहानपणीं शाळेत गेले नसतील ते पुढे साक्षर होण्याचा संभव तर दूरच राहिला,पण जे लहानपणीं खेड्यांतल्या शाळेत जाऊन शिकतात व पुढें शिक्षण सोडून देतात त्यांची साक्षरता देखील शाळा सोडल्यावर कायम न राहतां तेहि फिरून निरक्षरांतच सामील होतात !

स्त्रियांच्या शिक्षणाच्या वाढीसाठीं जे श्रम करावे लागतात ते तर निष्फळ होण्याचा संभव याच्याहून अधिक असतो. यामुळें स्त्रिया व पुरुष यांच्या साक्षरतेंतले अंतर कमी होण्याच्या ऐवजीं तें उलट वाढत असल्याचें दिसून येतें! त्याचप्रमाणे देशांतला संपन्न भाग व निर्धन भाग यांतलें साक्षरतेचें अंतरहि वाढत आहे.

### दुय्यम शिक्षण

दुय्यम शिक्षणाच्या कांहीं बाबतींत सुधारणा व्यक्त होत आहे. उदाहरणार्थ, शिक्षकांची सर्वसामान्य लायकी, त्यांचें विशिष्ट शिक्षण-परिस्थिति आणि दुय्यम शाळांच्या कामाचा व्याप यांत प्रगति होत आहे. परंतु येथेहि संघटनेची मोठी उणीव आहे. त्याचप्रमाणे दुय्यम शाळेंत दाखल होणारा प्रत्येक विद्यार्थी उच्च शिक्षणाकरितां कॉलेजांत जाणारा आहे अशाच समजुतीनें प्रत्येक विद्यार्थ्याचें शिक्षण चालू असते. आणि मग प्रवेशपरीक्षेत किंवा युनिव्हर्सिटींत नापास होणाऱ्यांचें प्रमाण भलतेंच वाढून किती श्रम फुकट गेले तें दिसून येतें. कित्येक ठिकाणीं औद्योगिक किंवा धंदेशिक्षण देण्याची सोय केलेली दिसून येते.पण तो प्रयत्न स्वतंत्र असून त्याचा दुय्यम शिक्षणाशीं संबंध नसतो. अलीकडे कित्येक कॉलेजांचे व विश्वविद्यालयांचें शिक्षणाच्या पद्धतींत आणि संशोधनाच्या कार्यांत पुढें पाऊल पडलेलें दिसते. आणि बऱ्याच ठिकाणीं एकंदरींत नागरिकत्वाला उपयुक्त असे शिक्षण देण्याकडे कल दिसतो. तथापि युनिव्हर्सिटीचें अस्तित्वच मुळीं विद्यार्थ्यांची परीक्षा घेऊन त्यांना लायकीचें सर्टिफिकेट देण्याकरितां आहे ही कल्पना अद्यापि पूर्वीसारखीच कायम आहे. यास्तव स्वावलंबी, उदारवृत्तीचे आणि परमतसहिष्णु असे नागरिक तयार करणें हे आपलें आद्यकर्तव्य होय, ही जाणीव युनिव्हर्सिट्यांना यावी, अशी आमची इच्छा आहे. युनिव्हर्सिटीचें शिक्षण घेण्याची पात्रता ज्यांच्या अंगांत नाहीं आणि जे अन्य व्यवसायांत अधिक यशस्वी होतील अशा विद्यार्थ्यांचा कॉलेजांतून भरणा झाल्यामुळें त्यांच्या सुधारणेस अडथळा येतो.

### उपाययोजना व सुयंत्रित धोरण

कायदेमंडळाकडून शिक्षणाकरितां अधिकाधिक रकमेची मंजुरी मिळूं शकेल याविषयीं आम्हास शंका नाहीं. परंतु केवळ पैशानें सर्व सुधारणा होऊं शकत नाहींत. सुधारणा व प्रगति करण्यास पैसा तर हवाच, पण त्यापेक्षां सुयंत्रित धोरण अमलांत आणण्याची लायकी व साधनें यांची जरूरी आहे. शिक्षणाच्या कार्याची संघटना कशी करावी असें आम्हास विचारण्यांत आलें आहे; पण आम्हास तर पदोपदीं संघटनेचा अभावच दिसत असल्याने खालपासून वरपर्यंत सर्वच ठिकाणीं संघटनेची जरूरी भासत आहे.

दिल्लीसरकाराचा शिक्षणखात्याशीं असलेला संबंध तुटत चालला ही गोष्ट अनिष्ट अशी झाली. शिक्षण हें राष्ट्रकार्याचें मुख्य अंग असल्यामुळें दिल्लीसरकाराचा संबंध कायम राहिला पाहिजे. यास्तव आमची अशी सूचना आहे कीं, शिक्षणविषयक माहितीचें केंद्र म्हणून आणि प्रांताप्रांताच्या शिक्षणविषयक चळवळींना एकरूपता देण्याचें साधन म्हणून मध्यवर्ती सरकाराचा शिक्षणखात्याशीं संबंध कायम असावा, एवढेंच नव्हे तर प्राथमिक शिक्षणाचा सर्वत्र प्रसार होत आहे कीं नाहीं, हें पाहण्याची जबाबदारीहि मध्यवर्ती सरकारावर असावी. कित्येक प्रांतांना इच्छा असून देखील प्राथमिक शिक्षणाला लागणारा पैसा त्यांस उभारतां येणार नाहीं. अशा वेळीं सर्व देशाच्या कल्याणासाठीं त्या प्रांतांस द्रव्यसहाय्य करतां येईल अशी कायद्यानें सवड ठेवली पाहिजे.

शिक्षणखात्यांत दिवसेंदिवस जगांत विविध सुधारणा होत आहेत.त्या सुधारणांची माहिती प्रत्येक प्रांतां-

ला वेगवेगळी मिळविणें खर्चाचें व त्रासाचें होईल; यास्तव हिंदुस्थानसरकारनें तसली माहिती पुरविण्याचें काम करावें. त्याचप्रमाणें शिक्षणविषयक जें जें नवें वाङ्मय निर्माण होईल त्याचा संग्रहहि मध्यवर्ती सरकारानें करावा आणि त्याची माहिती प्रांताप्रांतांना द्यावी. त्याच प्रमाणें देशांतल्या देशांत एका प्रांतांत होणारे प्रयोग इतर प्रांतांच्या नजरेस आणण्याचें कार्यहि मध्यवर्ती सरकारानें केले पाहिजे. याकरितां एक मध्यवर्ती 'ब्यूरो ऑफ एज्युकेशन' व 'शिक्षणविषयक पुस्तकसंग्रह' स्थापावा. या ब्यूरोनें प्रत्येक प्रांताला जरूर ती शिक्षणविषयक माहिती पुरवावी. या ब्यूरोचा खर्च हिंदुस्थानसरकारानें चालवावा.

शिक्षणखातें प्रांतिक सरकाराकडून काढून घ्यावें असा आमच्या शिफारशींचा अर्थ कोणीहि समजूं नये. प्रत्येक प्रांत आपल्यापुरता जबाबदार आहेच. परंतु ज्या प्रांताला तशी गरज लागेल त्याला सहाय्य करण्याला हिंदुस्थानसरकारला अधिकार असावा. प्रांतिक सरकारांच्या शिक्षणमंत्र्यांचे अधिकार कमी करावे असाहि आमचा अभिप्राय नाहीं. हल्लीच प्राथमिक शिक्षणाचा कारभार शिक्षणमंत्र्याकडून स्थानिकबोर्डाकडे गेला आहे, व त्याचें दुष्परिणाम दिसत आहेत. याकरितां शिक्षणखात्याची देखरेख वाढविली पाहिजे व त्याकरितां तपासनीसहि वाढविले पाहिजेत.

### स्त्रियांचें शिक्षण

स्त्रीशिक्षणाची वाढ अगदीं अपुरी व असमाधानकारक आहे. यास्तव यापुढें शिक्षणाचा प्रसार करतांना स्त्रीशिक्षणाला प्राधान्य दिलें पाहिजे.

आजमितीला प्राथमिक शिक्षण घेणारे मुलगे ७४ लक्ष ६० हजार व मुली १६ लक्ष ८२ हजार आहेत. यावरून अद्याप १कोटी ३ लक्ष मुलगे व १ कोटी ५१ लक्ष ३६ हजार मुली यांच्या प्राथमिक शिक्षणाची सोय लावणें जरूर आहे. प्राथमिक शिक्षण सर्वत्र सक्तीचें केलें तरी यांतील अवघे ८० टक्केच मुलगे व मुली शाळेला येऊं शकतील. प्रत्येक मुलग्यापाठीमागें प्राथमिक शिक्षणाचा खर्च ८ रुपये आणि प्रत्येक मुलीच्या प्राथमिक शिक्षणाचा खर्च ११ रुपये धरल्यास सुमारें २० कोटि रुपये शिक्षण सार्वत्रिक व सक्तीचें करण्यास लागतील. एवढा खर्च प्रांतिक व मध्यवर्ती सरकारांनीं मिळून करणें जरूर आहे.

### मुसलमान व अस्पृष्ट वर्ग यांना सवलती

मुसलमानांत शिक्षणाचा प्रसार झपाट्यानें होण्याकरितां पब्लिक स्कूलमध्यें त्यांच्यासाठीं कांहीं जागा राखून ठेवाव्या, आणि त्या शाळांतून मुसलमानांना त्यांच्या धर्माचें शिक्षण देण्याची सोय करावी ! अस्पृष्ट वर्गांना कोणत्या सरकारी शिक्षण संस्थेत प्रवेश मिळण्याला बंदी नसावी, आणि अस्पृष्ट वर्गांतले शिक्षक तयार करण्याची तरतूद करावी.

### मतभेदपत्रिका

वरील आशयाच्या रिपोर्टास राजा नरेंद्रनाथ व सर आम्हर्स्ट यांनीं मतभेदपत्रिका जोडल्या आहेत. मुसलमानांकरितां किंवा इतर कोणाकरितांहि शाळेंत जागा राखून ठेवणें आणि त्याच्या धार्मिक शिक्षणाची निराळी सोय करणें या सूचना राजा नरेंद्रनाथ यांस संमत नाहींत. सर आम्हर्स्ट यांची तक्रार अशी कीं, कमिटीनें दुय्यम शिक्षणाची चौकशी जशी करावी तशी केली नाहीं, व त्यांतील दोष उघडकीस आणून त्यावर उपाययोजनाहि केली नाहीं. त्याचप्रमाणें स्त्रीशिक्षणाची वाढ अधिक झपाट्यानें व्हावी ही सूचनाहि सर आम्हर्स्ट यांना मान्य नाहीं. त्यांच्या मतें शिक्षणाच्या प्रसारापेक्षां शिक्षणाच्या सखोलपणाकडे अधिक लक्ष दिलें जावें.

# हिंदी संस्थानें आणि बटलर कमिटीचा रिपोर्ट

## ( संस्थानिकांना कांहीं सूचना )

### ले. १ ला

आपले संबंध थेट बादशहाशीं आहेत, आणि तशाच प्रकारचा निर्णय आपणास खात्रीनें मिळेल, या भ्रामक समजुतीनें नरेंद्र मंडळांतील कांहीं प्रतिष्ठित संस्थानिकांनीं बटलर कमिटीची नेमणूक करून घेतली, आणि त्याप्रीत्यर्थ लाखो रुपये खर्च केले ही गोष्ट आतां मशहूरच आहे. एवढा अट्टाहास करून संस्थानिकांनीं आपल्या पदरांत काय पाडून घेतलें हेंहि आतां सर्वांना कळून चुकलेंच आहे. झाली इतकी शोभा बस्स झाली असें समजून, अजून देखील संस्थानिक स्वस्थ बसतील तर त्यांचा त्यांत

फायदाच होइल.पण असें होण्याचा रंग दिसत नाहीं. खुंटा हालवून आणखी घट्ट करण्याच्या प्रयत्नास संस्थानिक लागले आहेत असें दिसतें. एका ग्राम्य म्हणीप्रमाणें 'मुलगा नको व मुलगीहि नको' असें म्हणण्याची पाळी संस्थानिकांवर न येवो म्हणजे त्यांनीं मिळविली.

असो; संस्थानिकांच्या मागणीप्रमाणें यापुढें ब्रिटिश हिंदुस्थानांत जी राज्यव्यवस्था निर्माण करण्यांत येईल तिच्याशीं संस्थानी कारभाराचा संबंध असूं नये असें कमिटीनें ठरविलें आहे. पण त्या ऐवजीं संस्थानी प्रश्नांचा विचार करून निर्णय देण्यासाठीं कमिटीने जी व्यवस्था सुचविली आहे, त्या व्यवस्थेमुळें आपला फायदा खरोखर कितपत होईल याचा विचार संस्थानिकांनीं अवश्य करावयास पाहिजे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यव्यवस्थेशीं आपला कांहीं संबंध राहिला नसून आपण पूर्ण स्वतंत्र झालों, अशी कल्पना संस्थानिकांनीं उराशीं बाळगली असेल तर अखेर त्यामुळें त्यांना पश्चात्तापाची पाळी आल्याशिवाय राहणार नाहीं. बटलर कमिटीने सुचविलेलें नवीन राज्ययंत्र आपणास कसें जाचक होईल या गोष्टीचा संस्थानिकांनीं शांत डोक्याने विचार करून, वेळींच त्याबद्दल आपला निषेध प्रदर्शित केला पाहिजे. या बाबतींत आपलें मत काय आहे हें कळविण्याबद्दल साम्राज्य-सरकाराकडून संस्थानिकांना विचारण्यांत आलें असल्याचें समजतें. असें असेल तर संस्थानिकांनीं संधि वाया न दवडतां बटलर कमिटीनें सुचविलेली नवी योजना आपल्या हक्कास व इभ्रतीस कशी घातक आहे याची छाननी स्पष्टपणें केली पाहिजे. सामान्यतः या बाबतींत संस्थानिकांनीं कोणतें धोरण स्वीकारावें याची रूपरेखा लक्षांत यावी यासाठीं त्याबद्दल दोन शब्द लिहिण्याचें आम्हीं योजिलें आहे.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यघटनेंत महत्त्वाचे फेरफार होऊन प्रातिनिधिक स्वरूपाची राज्यपध्दति आज नाहीं उद्या स्थापन होणार हं तर ब्रह्मदेवच बोलून चुकला असल्यानें, आंतां खुषीनें वा नाखुषीनें त्याबद्दल सहानुभूति दर्शविणे संस्थानिकांना भागच आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यकारभार कायदेमंडळाच्या हुकमतीखालीं चालू लागल्यानंतर आपला संबंध या नवीन लोकसत्तात्मक सरकाराशी येईल, आणि आपणास आपल्याच धर्माच्या व हाडामासाच्या लोकांशीं सहकार्य करून त्यांच्या अनुरोधानें संस्थानाचा कारभार हाकावा लागेल, ही आपत्ति (!) टाळण्यासाठीं संस्थानिकांनीं आपला संबंध थेट बादशहाच्या दाढीपर्यंत नेऊन भिडविला. झाली गोष्ट ती ठीकच आहे. परंतु बटलर कमिटीचा रिपोर्ट पाहिला तर या बाबतींतहि संस्थानिकांनीं समाधान मानण्याजोगें त्यांच्या पदरांत काय पडलें आहे हें समजणें अत्यंत कठीण आहे. बादशहा या शब्दाचा अर्थ संस्थानिकांनीं आपल्या मनांत काय धरला आहे ? या शब्दाची व्याख्या अगर खुलासा रिपोर्टांत कोठेंहि केलेला नाहीं ही गोष्ट ध्यानांत धरणें जरूरीचें आहे. बादशहा म्हणून संबोधिली जाणारी साडेतीन हात देह धारण करणारी व्यक्ति आहे, आणि आपले सुखदुःखाचे सर्व धागेदोरे त्या एका व्यक्तीशींच निगडित झालेले आहेत, असें संस्थानिक मानीत असतील तर ती त्यांची कल्पना चुकीची ठरेल. शिवाय हाच संकुचित अर्थ बटलरसाहेबांना अभिप्रेत असेल तर आम्ही असेंहि म्हणूं कीं, संस्थानिकांनीं याचा उघडपणें निषेध करून बादशहा या शब्दाचा अर्थ ठरवून घेतला पाहिजे.

दहा-पांच हजार मैलांवर राहाणारा बादशहा आपल्याप्रमाणेच आपणास सर्वज्ञ समजून स्वेच्छेनें कारभार चालवील, आणि आपल्या स्वछंदी वर्तनास आळा बसण्याचा संभव तितकाच कमी होईल, अशा आपमतलबी बुद्धीनें संस्थानिकांनीं ही अव्यवहार्य संकुचित व्याख्या मान्य करूं नये. त्यांनीं पक्कें समजून राहावें कीं, इंग्रज बादशहाच्या अंतःकरणांतले स्वछंदी व बेलगामी वृत्तीचे अंकूरच ब्रिटिश राजवटींत जळून खाक झाले आहेत. राजा अगर बादशहा म्हणून डामडौलानें राहून ऐषआराम भोगण्यापलीकडे ब्रिटिश राज्यव्यवस्थेत ज्याला दुसरें कर्तव्य राहिलेलें नाहीं, तोच बादशहा संस्थानी प्रश्नांचे बाबतींत सुलतानी स्वरूप धारण करील आणि ब्रिटिश पार्लमेंटची इच्छा बाजूस सारून संस्थानिकांचा धिंगाणा चालू ठेवण्यास प्रोत्साहन देईल, अशी कल्पना देखील करवत नाहीं. तुमचे संबंध थेट बादशहापर्यंत भिडविलेत खरे; पण संस्थानी प्रश्नांचे बाबतींत निर्णय देऊन हुकमत चालविणारा बादशहाजवळ कोणी गोऱ्या कातडीचा सोम्यागोम्या असणारच. तो झाला तरी स्टेट सेक्रेटरी अगर ब्रिटिश पार्लमेंट यांच्या इच्छेबाहेर थोडाच जाणार ! अखेर निष्कर्ष काय कीं, संस्थानी प्रश्नांचा निकाल यापुढें एकटा स्टेट सेक्रेटरी करणार. ही स्थिति संस्थानिकांस मान्य आहे कीं काय याचा विचार संस्थानिकांनीं जरूर करावा.

आमच्या मतें शहाणपणाचा मार्ग म्हटला म्हणजे बादशहा या शब्दाचा अर्थ 'पार्लमेंट-स्वरूपी' बादशहा हाच अर्थ संस्थानिकांनीं मान्य करून त्याप्रमाणें आपल्या चळवळीची दिशा

आखावी. "नरेंद्रमंडळाच्या गेल्या मुंबईच्या सभेंत ही शंका निघाल्या वेळीं हाच अर्थ आम्हास अभिप्रेत आहे" असा खुलासा बिकानेरच्या महाराजांनीं केला असें म्हणतात. ही बातमी खरी असेल तर ठीकच आहे.तसें नसेल तर नरेंद्रांनीं वेळींच सावध होऊन या शंकेचें निरसन करून घ्यावें, आणि आपणास हवा असलेला अर्थ सरकाराकडून स्पष्ट करून घ्यावा अशी आमची त्यास विनंति आहे.ब्रिटिश साम्राज्याचा भार अंगावर घेणारें ब्रिटिश मुत्सद्दीमंडळ केव्हांहि अधिक कार्यक्षम असणारच; आणि आपले राजकीय हक्कसंबंध एका व्यक्तीच्या हवाली करण्यापेक्षां ब्रिटिश पार्लमेंटच्या हवालीं करणें संस्थानिकांच्या हिताच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर आहे, ही गोष्ट संस्थानिकांनीं दृष्टीआड होऊं देऊं नये.

बटलर कमिटीच्या रिपोर्टांत आणखी एकदोन महत्त्वाचीं तत्त्वें ग्रथित केलीं आहेत. त्याबद्दल आतां विचार करूं. ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यव्यवस्थेशीं संबंध राहू नये म्हणून यापुढें संस्थानी प्रश्नांचा विचार व्हाइसरॉय यांनीं आपल्या पोलिटिकल सेक्रेटरीच्या विचारानें करावा असें सुचविलें आहे. म्हणजे संस्थानिकांच्या डोक्यावर सासूपणाचा हक्क गाजविण्यासाठीं पोलिटिकल सेक्रेटरी हा एक नवीनच अधिकारी निर्माण करण्यात आला आहे. पण मौज अशी कीं, व्हाइसरॉय व ब्रिटिश इंडियांतील गव्हरनर जनरल या अधिकाराच्या व्यक्ति दोन निराळ्या असावयाच्या ? कीं एखाद्या लहानशा संस्थानांतील मुलकी व दिवाणी अधिकाऱ्याप्रमाणें हे दोनहि अधिकार एकाच व्यक्तीनें पण दोन ठिकाणीं बसून चालवावयाचे? याचा खुलासा रिपोर्टांत नाहीं. कोणत्याहि पक्षीं संस्थानिकांनीं ही सूचना ग्राह्य करण्याजोगी नाहीं. गव्हरनर जनरल व व्हाइसरॉय हे दोनहि अधिकार एकाच व्यक्तीकडे असतील तर, ब्रिटिश हिंदुस्थानांतील राजकारणाचा दाब प्रत्यक्षपणें संस्थानी प्रश्नांचे विचारावर पडणारच. आणि असें झालें म्हणजे ब्रिटिश हिंदुस्थानापासून फटकून राहून आपला सवता सुभा निर्माण करण्याची संस्थानिकांची इच्छा कशी फलद्रूप होणार? बरें, हे दोनहि अधिकार चालविणाऱ्या व्यक्ती निरनिराळ्या असतील तर, आपलें सर्व सुखदुःख आणि हितसंबंध, संस्थानिकांच्या आकांक्षा व त्यांच्या हक्कांची पूर्वपीठिका, माहीत नसणाऱ्या अशा विदेशी अधिकाऱ्यांच्या हातीं सुपूर्त करण्यापासून संस्थनिकांच्या हक्कांचें संरक्षण कशा प्रकारें होईल हाहि विचार करण्याजोगाच प्रश्न आहे. सारांश, कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी केवळ व्हाइसरॉय व त्याचा पोलिटिकल सेक्रेटरी यांच्यावर विसंबून राहून आपल्या दैवाचा कौल त्यांच्या हातीं देण्यापासून संस्थानिकांना कांहींच फायदा होणार नाहीं असें म्हणावें लागतें.

ही आपत्ति टाळण्यासाठीं व्हाइसरॉय व पोलिटिकल सेक्रेटरी यांचे जोडीला संस्थानी प्रश्नांचा विचार करून निर्णय देण्यासाठीं 'प्रिन्सेस कौन्सिल' स्थापन करण्यांत यावें. या कौन्सिलाची रचना निवडणुकीच्या तत्त्वावर करण्यांत येऊन हिंदुस्थानांतील सर्व संस्थानिकांचे हितसंबंध राखिले जावेत म्हणून, या संस्थेचें स्वरूप 'प्रातिनिधिक' असण्या विषयीं खबरदारी घेण्यांत यावी. हल्लीं ज्याप्रमाणें गव्हर्नर-जनरलचें कार्यकारी कौन्सिल आहे त्याचप्रमाणें या कौन्सिलाचा उपयोग करण्यांत यावा. संस्थानासंबंधीं प्रत्येक बाबीचा निर्णय व्हाइसरॉय साहेबांनीं केवळ आपल्या अधिकारांत न करतां या कौन्सिलाचा अभिप्राय घेऊन करावा, आणि मतभेद उत्पन्न होईल तर तो प्रश्न पार्लमेंटपुढें मांडण्यांत यावा, अशी योजना कायद्यानेंच निर्माण करण्याची मागणी संस्थानिकांनीं केली पाहिजे. आम्ही तर या बाबतींत एक पाऊल पुढें जाऊन संस्थानिकाना असाहि सल्ला देण्यास तयार आहों कीं, अशा प्रकारचें 'प्रातिनिधिक' स्वरूपाचें कौन्सिल निर्माण करण्याची कल्पना संस्थानिकांना रुचली नाहीं, अगर साम्राज्य सरकारास पचली नाहीं, तर व्हाइसरॉय व पोलिटिकल सेक्रेटरी यांच्या साम्राज्यशाहीच्या बेलगामी वर्तनास पायबंद बसावा म्हणून, संस्थानी प्रश्नांचा निर्णय व्हाइसरॉय यांनीं ब्रिटिश इंडियाच्या वरिष्ठ सरकाराच्या कार्यकारी कौन्सिलाचा अभिप्राय घेऊन करावा असा निर्बंध असण्यासहि संस्थानिकांनीं कबुली द्यावी. परंतु 'आपला तो परका व परका तो आपला' अशीच सामान्य भावना संस्थनिकांची असल्यामुळें, हा आमचा सल्ला त्यांना रुचणार नाहीं हें आम्ही जाणून आहों. आणि म्हणून "वाटल्यास आपल्या देशबांधवांच्या विचाराचें वारें देखील तुमच्या प्रश्नांना लागू देऊं नका पण तुमच्या स्वतःच्याच फायद्यासाठीं प्रातिनिधिक स्वरूपाचें कौन्सिल निर्माण करण्याची मागणी करा" असें संस्थानिकांना आमचें आग्रहाचें सांगणें आहे.

# सर व्हॅलेंटाईन चिरोल यांचा मृत्यु

'हिंदुस्थानांतील अस्वस्थता' या पुस्तकाचे कर्ते, लो. टिळकांच्या चरित्रभारतांतल्या 'चिरोल केस' या एका पर्वांतील त्यांचे प्रतिस्पर्धी, तज्ज्ञ व मुत्सद्दी यांच्या दर्जाला पोचलेले, लंडन टाइम्सचे पूर्वेकडील देशांचे प्रवासी बातमीदार आणि टिळकांना शत्रुत्वानें "हिंदी असंतोषाचे जनक" अशी अन्वर्थक पदवी देणारे सर व्हॅलेन्टाइन चिरोल यांना गेल्या बुधवारीं लंडन येथें न्युमोनियाच्या विकारानें वयाच्या सत्त्याहत्तराव्या वर्षी देवाज्ञा झाली. गतवर्षी ते हिंदुस्थानांत आले होते. त्या वेळींहि त्यांची प्रकृति ठीक नव्हती. हिंदुस्थानांतून परत जातांना वाटेत त्यांनीं इजिप्तमध्यें मुक्काम केला, व तेथेंच त्यांना न्युमोनियाचा विकार झाला, व तो वाढत जाऊन त्यांचा लंडन येथें अंत झाला.

सर व्हॅलेंटाईन चिरोल यांचे बहुतेक शिक्षण फ्रान्स व जर्मनी या देशांत झालें, व इंग्रजी भाषेप्रमाणें फ्रेंच व जर्मन या भाषाहि त्यांनी चांगल्या आत्मसात केल्या. वयाच्या पंचविसाव्या वर्षापासून त्यांनीं पूर्वेकडील देशांत प्रवास करण्यास सुरुवात केली; व इजिप्त, तुर्कस्थान, इराण, चीन, जपान इत्यादि देशांत हिंडून त्यांनीं तेथील परिस्थिति व घडामोडी यांचें बारकाईनें निरीक्षण केलें. १८९२ सालीं त्यांनीं 'लंडन टाईम्स' या कट्टर हुजूरपक्षीय पत्राच्या बर्लिन येथील बातमीदाराचें काम पत्करलें. पण त्यांचे धोरण जर्मन अधिकाऱ्यांना विघातक वाटल्यामुळें पांच वर्षांत त्यांना हें काम सोडून द्यावे लागलें. नंतर लंडन टाइम्सच्या परराष्ट्रीय खात्याचे मुख्य म्हणून त्यांनीं आणखी पंधरा वर्षे काम केलें. याच अवधींत त्यांनीं 'धी मिडल ईस्टर्न क्वश्चन' व 'इंडियन अनरेस्ट' हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. 'हिंदुस्थानांतील अस्वस्थता' या पुस्तकांत जहाल चळवळये व मुख्यतः टिळकादि जहाल पुढारी यांचा अत्याचारी क्रांतिकारकांशीं निकट व प्रेरकत्वाचा संबंध जोडण्याच्या त्यांच्या धोरणासंबंधीं पुष्कळांचा मतभेद असला तरी, त्यांचें येथील परिस्थिति व लोक यांच्यासंबंधीं मार्मिक निरीक्षण त्या पुस्तकांत जागोजाग व्यक्त झाले आहे. 'हिंदुस्थानांतील अस्वस्थता' व 'इजिप्तचा प्रश्न' हीं त्यांचीं पुस्तकें लंडन टाइम्सला पाठविलेल्या बातमीपत्रांचें संकलन करूनच तयार झालीं. त्यावरून वर्तमानपत्राच्या बातमीदारांची त्यांची भूमिका चालचलाऊ व उथळ अशी नसून अभ्यासी निरीक्षकाची होती असें सिद्ध होतें. परिस्थितीचें निरीक्षण इंग्लंडाच्या म्हणजे साम्राज्याच्या हिताकडे दृष्टी ठेवून ते करीत. यामुळें साम्राज्यवादी मुत्सद्यांना त्यांचीं पुस्तकें मार्गदर्शक व त्यांची सल्लामसलत महत्त्वाची वाटे.

पूर्वेकडील देशांतील अनेक घडामोडी त्यांनीं पाहिल्या असल्यामुळें परिस्थितीप्रमाणें आपल्या दृष्टिकोनांत बदल केला पाहिजे असें त्यांचें मत होतें; व या देशांतील परिस्थितीसंबंधी त्यांच्याहि मतांत थोडथोडा फरक पडत गेला. हिंदुस्थानासंबंधीं त्यांनीं अलीकडे जीं पुस्तकें लिहिलीं त्यांत "हिंदुस्थानांतील अस्वस्थता" या पुस्तकांत दिसून येणारा स्वराज्याच्या चळवळीसंबंधाचा आत्यंतिक विरोध त्यांनीं सोडून दिला, व हिंदी लोकांच्या न्याय्य आकांक्षांना आडवून धरण्यांत धोका आहे हें त्यांना दिसून आलें. "पालटणाऱ्या जगांतील पन्नास वर्षे" हें त्यांचें अखेरचें पुस्तक असून त्यांत त्यांनीं निरनिराळ्या देशांतील आपले अनुभव ग्रथित केले आहेत. टिळकांनीं केलेल्या फिर्यादीमध्यें कोर्टात चिरोल यांचा जय झाला तरी 'हिंदुस्थानांतील अस्वस्थता' या पुस्तकांत टिळकांचा राजकीय खुनाशीं जसा संबंध जोडला होता तसा जोडतां येत नाहीं, हे चिरोल साहेबांना या खटल्यांत स्पष्ट दिसून आलें. व त्याबद्दलची कबूली त्यांनीं अलीकडे प्रसिद्ध केलेल्या 'इंडिया' या पुस्तकांत नमूद केली आहे. केरोपासून टोकियो पर्यंतच्या भागांतील अनेक भिन्न देश, त्याचप्रमाणें बाल्कन राज्यें, फ्रान्स व जर्मनी इतक्या मोठ्या प्रदेशांतील लोक, राजकीय इतिहास व परिस्थिति यांच्याबद्दल मार्मिक व अनुभविक ज्ञान संपादन करून साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें तें प्रगट करणारा असा लेखक दुसरा आढळणार नाहीं. या दृष्टीनें कट्टर हुजूरपक्षीय साम्राज्यवादी कारस्थानी मुत्सद्यांचा एक बडा अनुभवी सल्लागार नाहींसा झाला.

# हिंदी संस्थानें आणि बटलर कमिटीचा रिपोर्ट

## ( संस्थानिकांना कांहीं सूचना )

ले. २ रा

बटलर कमिटीचा रिपोर्ट लिहिणाऱ्यांच्या डोक्यांत मागील अंकांत दर्शविलेल्या योजनेची कल्पना आलेली नाहीं असें नाहीं. रिपोर्टाच्या ६९ व ७० पॅराग्राफांत याचें दिग्दर्शन केलेलें आहे. ज्या वेळी संस्थानिक व ब्रिटिश इंडिया यांचे हितसंबंधांत विरोध उत्पन्न होईल, त्या वेळीं संस्थानिक व ब्रिटिश इंडिया या उभयतांच्या वतीनें सल्लामसलत देण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत यावी असें कलम ६९ मध्यें सुचाविलें आहे. या मिश्र कमिटींत एकमत न होईल तर पुनः व्हाइसरॉयसाहेबांनीं एक कमिटी नेमावी. ही कमिटी ब्रिटिश इंडियाचा एक प्रतिनिधि आणि संस्थानिकांचा एक प्रतिनिधि व हायकोर्ट जज्जाचे लायकीचा एक चेअरमन अशा तिघांची असावी. आणि या कमिटीनें आपला अभिप्राय व्हाइसरॉयांकडे पाठवावा तो अभिप्राय व्हाइसरॉय यांना पसंत न पडेल तर तो प्रश्न अखेरनिर्णयासाठीं स्टेट-सेक्रेटरी यांचेकडे पाठविण्यांत यावा असे कलम ७० मध्यें सुचविण्यांत आलें आहे. अशा प्रकारची योजना आजपर्यंत फलद्रूप झाली असून, मॉंटेग्यूचेम्सफर्ड रिपोर्टांतहि अशीच शिफारस करण्यांत आली आहे असे बटलर कमिटीच्या रिपोर्टांत नमूद करण्यांत आलेलें आहे. अशा रीतीनें व्हाइसरॉयसाहेबांना सल्लामसलत देण्यासाठीं कमिटी नेमण्यांत यावी असें सुचविलें असलें तरी, आम्ही सुचविलेल्या 'प्रिन्सेस कौन्सिल'ची गरज नीटशी भागत नाहीं. एक तर रिपोर्टांत सुचविण्यांत आलेली कमिटी मिश्र स्वरूपाची असणार, व ब्रिटिश इंडिया व संस्थानिक यांचे दरम्यान विरोध उत्पन्न होईल त्या प्रसंगींच ती नेमण्यांत येणार. दुसरें असें कीं अशी कमिटी नेमणें अगर न नेमणें ही गोष्ट व्हाइसरॉय यांचे इच्छेवर अवलंबून राहणार. विरोधाचे प्रसंगीं तरी अशा प्रकारची कमिटी नेमली गेलीच पाहिजे असें म्हणण्याचा हक्क संस्थानिकांना ठेवण्यांत आलेला नाहीं. व्हाइसरॉयसाहेबांच्या इच्छेच्या वाऱ्यावर संस्थानिकांच्या दैवाची वावडी कशी सोडण्यांत आली आहे याचा हा एक नमुनाच म्हणावयाचा!

पण या योजनेंत देखील खरी ठेच लागण्याचें स्थान निराळेंच आहे. या मिश्र कमिटींत ब्रिटिश इंडियाचे हितसंबंध जपले जाण्याची तजवीज खात्रीनें होईल. त्याबद्दल शंका बाळगण्याचेंच कारण नाहीं. पण संस्थानिकांचे हितसंबंध मात्र या कमिटींत जपले जातील असें म्हणवत नाहीं. नरेंद्र-मंडळाच्या स्टँडिंग कमिटीनें अगर नरेंद्रमंडळानें नेमलेल्या दुसऱ्या कमिटीनें वर सांगितलेल्या मिश्र कमिटींत संस्थानांचे तर्फेनें म्हणून काम करावें असे सुचविण्यांत आलें आहे. या सूचनेचें मर्म ओळखून वेळींच सर्व संस्थानिकांनीं याबद्दल आपली नापसंती दर्शविणें जरूर आहे असें आम्हास वाटतें. नरेंद्रमंडळ ही संस्था खरी प्रातिनिधिक नसून ती कांहीं विशिष्ट धेंडांच्या मिराशीची जागा आहे ही गोष्ट आतां उजेडांत आली आहे. नरेंद्रमंडळाचे दरवाजे आजपर्यंत अगदीं घट्ट लावलेले होते. बाहेरचा वारा देखील आंत येऊं नये अशी खबरदारी घेतली जात असे. गेल्या वर्षापासून हे गोषाचें स्वरूप बऱ्याच अंशांनीं नाहींसें झालें असल्यानें नरेंद्रमंडळ ही चीज तरी काय आहे हे कळण्यास आतां मार्ग खुला झाला आहे. अद्यापि पडद्याआड गोष्टी बऱ्याच आहेत. तथापि प्रसिद्ध झालेली हकीकत व घटनेचे नियम पाहतां उत्तरेकडील दहापांच बडे संस्थानिक म्हणजेच नरेंद्रमंडळ आणि नरेंद्रमंडळ म्हणजेच दहापांच संस्थानिक असें म्हणावें लागतें.

या मंडळांत चर्चेसाठीं अगर विचारासाठीं कोणताहि प्रश्न येवो, त्यावर या दहापांच बड्या धेंडांचा जो अभिप्राय पडेल तोच अभिप्राय नरेंद्रमंडळाचा आणि जी जी कामाची दिशा हे दहापांच संस्थानिक ठरवितील तीच दिशा नरेंद्रमंडळानें स्वीकारावयाची. मंडळाचे ठराव हिंदुस्थान-सरकाराला बंधनकारक नसून केवळ ते शिफारसवजा असतात ही गोष्ट तर सांगण्याचीच जरूरी नाहीं. मंडळाचें वार्षिक अधिवेशन दिल्लीस सुमारें एक आठवडाभर चालतें. बड्या लाटसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं, मंडळांतील नरेंद्र रोज तास दीड तास अधिवेशनाचें काम चालवितात. कामाचा मक्ता आपल्याकडेच घेणारे पांचचार संस्थानिक ठराव मांडतात, दुजोरा देतात, व समर्थनपर भाषणें करतात. चटावरील श्राद्धाप्रमाणें सर्व विधी झटपट उरकून टाकतात. पांचचार संस्थानिकच काय ते कार्यक्रमांत गुंतलेले. आरामशीरपणें मऊ गादीच्या कोचावर बसून झोपा ताणाव्या व मधूनमधून ठराव पास होतेवेळीं हात वर उचलावेत. अधिवेशनाचें काम त्या त्या दिवशीं संपल्यानंतर संस्थानिकांच्या मनोविनोदार्थ कुत्र्या-मांजरांचीं भव्य प्रदर्शनें

सज्ज आहेतच! अशा रीतीनें लाखों रुपये खर्च करून, आठपंधरा दिवस मजेंत घालवून, व्हाइसरॉयांकडे खाने झोडून आपआपल्या गांवीं निघून गेले म्हणजे वर्षभर प्रजेला भरडण्यास हरकत नाहीं!

नरेंद्रमंडळाची घटनाहि पण तितकीच सदोष आहे. हिंदुस्थानांत लहानमोठे मिळून एकंदर संस्थानिक सातशें. पण या सातशेंपैकीं आपल्या स्वतःच्या हक्कानें नरेंद्रमंडळांतील सुखासनावर बसूं शकणारे संस्थानिक अवघे एकशेंआठ! आणि बाकीच्या संस्थानिकांतर्फे निवडून आलेले किती? तर ते सबंध बारा!! बरें, जे संस्थानिक स्वतःचे हक्कानें सभासद आहेत त्यांनाच तो हक्क कां व इतरांना कां नाहीं याचे उत्तर काय? तर त्या संस्थानिकांना कांहीं विवक्षित तोफांची सलामी आहे म्हणून. आणि ही तोफांची सलामी अन्तर्गत राज्यकारभाराच्या अधिकारावर आहे म्हणावें तर तसेंहि नाहीं. तोफांच्या सलामीचा मान हिंदुस्थान सरकाराच्या कृपेवर अवलंबून! सरकारनें वाटेल त्या संस्थानिकाला सलामीचा शेंदूर फासावा आणि त्याला मंडळाचें द्वार खुलें करावें असा प्रकार आहे. याचा परिणाम मात्र किती चमत्कारिक झाला आहे ते पाहण्याजोगें आहे. श्रीमंत सांगलीकारांना सभासद होण्याचा हक्क आहे, आणि सारख्याच तहनाम्यानें बांधलेल्या आणि अन्तर्गत कारभाराचे दृष्टीनें सारखेच अधिकार असणाऱ्या जमखंडीकरांना अगर मिरजकरांना तो हक्क नाहीं. सारांश, काय तर गुळाचाच गणपति आणि गुळाचाच नैवेद्य! आपल्याच खर्चानें उडवून घेतलेल्या तोफांच्या धडाक्यानें संस्थानिकांना कांहीं विशिष्ट लायकी मिळत असल्यास न कळे!

बरें, हे दोष काढून टाकून नरेंद्रमंडळाचें स्वरूप खरें प्रातिनिधिक करावें म्हटलें तर ती गोष्टदेखील मंडळाच्या हातीं ठेविलेली नाहीं. असें ऐकिवांत आहे कीं, ज्या वेळीं नरेंद्रमंडळाची घटना निश्चित करण्याचा प्रश्न प्रथम सरकारापुढें विचारासाठीं होता त्या वेळीं संस्थानिकांचा अधिकार व दर्जा यावर सभासदत्वाचा हक्क अवलंबून असावा असा प्रयत्न कोल्हापूरचे माजी छत्रपति शाहूमहाराज यांनी केला होता. पण त्या कामीं त्यांना यश आलें नाहीं. आणि अखेर हिंदुस्थान-सरकारने आपल्या इच्छेप्रमाणें तोफांच्या सलामीवर सभासदत्वाचा हक्क अवलंबून ठेवून नरेंद्र-मंडळाची योजना निश्चित करून टाकली! याचा परिणाम मात्र असा झाला कीं, अन्तर्गत राज्यकारभाराच्या दृष्टीने ज्यांना विशेष अधिकारदेखील नाहींत, पण ज्यांना तोफांची सलामी आहे, असे संस्थानिक नरेंद्र-मंडळाचे कायमचे सभासद होऊन बसले. आणि ज्यांना अन्तर्गत कारभाराबद्दल पूर्ण स्वातंत्र्य, पण तोफांची सलामी नाहीं असे संस्थानिक मोकळे ते मोकळेच राहिले.

आम्हास असेंहि समजलें आहे कीं, हल्लींचे जमखंडीचे सुविद्य व तरुण अधिपति श्रीमंत आप्पासाहेब यांनींदेखील गेल्या वर्षी ही विषमता नाहींशी व्हावी म्हणून तशा आशयाचा एक ठराव प्रत्यक्ष नरेंद्रमंडळाचे बैठकींतच आणण्याचें ठरवून त्याप्रमाणें रीतसर नोटीसहि दिली होती. परंतु या बाबीची चर्चा करणारा ठरावच हल्लींच्या कार्यपद्धतीच्या नियमावरून मंडळांत आणतां येत नाहीं, या मुद्द्यावर श्रीमंत जमखंडीकर यांना ठराव मांडण्याचीच परवानगी सरकारनें दिली नाहीं अशीहि बोलवा आहे. ही गोष्ट खरी असेल तर नरेंद्रमंडळाची घटना किती सदोष आहे ही गोष्ट श्रीमंत जमखंडीकर यांच्या प्रयत्नामुळें स्पष्टपणें निदर्शनास आली हा एक फायदाच झाला म्हणावयाचा. सारांश 'आई जेवूं घालीना बाप भीक मागूं देईना' असाच न्याय नरेंद्र-मंडळाचे घटनेचे बाबतींत चालू आहे.

म्हणून आमची संस्थानिकांना आग्रहाची सूचना आहे कीं, नरेंद्रमंडळाच्या स्टँडिंग कमिटीनेंच व्हाइसरॉयसाहेबांच्या मिश्र कमिटींत संस्थानिकांतर्फे काम करावें ही बटलर कमिटीनें रिपोर्टांत केलेली सूचना संस्थानिकांनीं मान्य करूं नये. नरेंद्रमंडळाची घटना सदोष तर आहेच, पण सभासदाचा हक्क असणाऱ्या एकशेआठ संस्थानिकांशिवाय इतर संस्थानिकांतर्फे जे बारा प्रतिनिधी आहेत, त्यांना स्टँडिंग कमिटीच्या निवडणुकीचे वेळीं उमेदवार म्हणून उभे राहण्याचादेखील हक्क नाहीं ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. दक्षिणेकडील म्हैसूर कोचीनसारखीं मोठीं संस्थानें आणि बडोदा ग्वाल्हेर वगैरेसारखीं संस्थानें या नरेंद्रमंडळापासून फटकूनच आहेत असें म्हणतात. अशा स्थितींत नरेंद्रमंडळाची कमिटी सर्व संस्थानांचे तर्फे प्रातिनिधिक नात्यानें काम करूं शकेल ही कल्पनादेखील हास्यास्पद आहे.

बटलर कमिटीच्या रिपोर्टांत आणखीहि कांहीं विचार करण्याजोगे महत्त्वाचे प्रश्न आहेत. पण त्यांचा विचार स्थलसंकोचास्तव येथें करतां येत नाहीं. सायमन कमिशनाचा रिपोर्ट प्रसिद्ध होण्यापूर्वी संस्थानी प्रश्नाचा निर्णय हा होणारच. आणि बटलर कमिटीचा रिपोर्ट आधारभूत घेऊनच सायमनसाहेब झाले तरी या प्रश्नांचें विवेचन आपल्या रिपोर्टांत करणार. यासाठीं संस्थानिकांनीं वेळेवर जागें होऊन या प्रश्नांचा बारकाईनें विचार करावा. आणि आपल्या दैवचक्रास योग्य दिशेनें कलाटणी द्यावी अशी आमची त्यांना प्रेमपूर्वक आग्रहाची विनंति आहे.

# व्हाइसरॉय निघाले

( ले.—धर्मवीर विष्णु रघुनाथ करंदीकर.)

१४३-१४४, फ्लीट स्ट्रीट, लंडन.

ता. १०-१०-२९.

आज सकाळीं व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन व मद्रासचे नवे गव्हर्नर सर स्टॅन्ले हे ११ वाजतां गोल्डन ॲरो या गाडीनें गेले. येथें येतेवेळीं जो समुदाय जमला होता त्यापेक्षां दसपट तरी लोक स्टेशनावर हजर होते. त्यांना केसरीचा बातमीदार या नात्यानें मी प्लॅटफॉर्मवर भेटावयास गेलों. इतक्यांत रूटरच्या बातमीदारानें आघाडी मारली. श्री. सुब्रु हे दक्षिण-हिंदुस्थानांतील गृहस्थ रूटरच्या ऑफिसमध्यें काम करीत आहेत. त्यांना हिंदुस्थानाचे दुय्यम चिटणीस मि. ड्रमंड शील्स यांनीं पुढें घातलें. त्या वेळीं व्हाइसरॉय-साहेबांनीं हंसून "मला कांहीं सांगावयाचें नाहीं." असें उत्तर दिलें. झालें. 'प्रथमग्रासे मक्षिका-पातः' असा प्रकार झाल्यानंतर मीहि थोडासा थबकलों. इतक्यांत पुढें जाऊं नये असे मनानें ठरविलें व कॅप्टन वेजवुड बेन यांजबरोबर कांहीं गोष्टी करूं लागलों. इतक्यांत लॉर्ड आयर्विन मागें फिरून बेनसाहेबाकडे बोट करून म्हणाले, "हे पाहा आमचे Public spokesman. तुम्हाला जर कांहीं पाहिजे असलें तर त्यांना विचारा." आणखी ५--१० मिनिटें जाऊं देऊन पुनः लॉर्ड आयर्विन फिरत फिरत मी जेथें होतो तेथे आल्यावर माझ्याशीं हस्तांदोलन झालें व मग मी विचारलें कीं, "केसरीला पाठवण्यासाठीं कांहीं संदेश द्याल काय?"

व्हाइसरॉय—काय ! केळकरांचा केसरी ! तो मी नेहमीं वाचतों.

मी—शक्य नाहीं. केसरी मराठींत छापतात, तो आपणाला वाचावयाला यावयाचा नाहीं.

व्हा.—खरें. पण माझ्याकडे नेहमीं त्यांतील लेखांचीं भाषांतरें येत असतात, व तीं मी नेहमीं वाचतों.

मी—बरें. पण केसरींत देण्याकरितां आपण कांहीं निरोप द्याल काय ?

व्हा. ( थोडासा विचार करून )—हिंदुस्थान सोडून तीन महिने झाले व आतां परत जातांना मला खराखुरा आनंद होत आहे. I don't think I can give you a solid statement here असे म्हणत असतांना here या शब्दावर जोर दिला.

मी—मग हिंदुस्थानांत परत गेल्यावर मग काय तें जाहीर कराल असेंचना ? यावर व्हाइसरॉय हंसले व गाडींत बसले.

इतक्यांत माझ्या खांद्याला धरून कोणी तरी मागें ओढलें. आश्चर्यानें वळून पाहतों तों हिंदुस्थानाचे जुने मित्र जॉर्ज लॅन्सबरी हे मला आपल्याजवळ बोलावून घेत आहेत असें पाहिलें. हिंदुस्थाना-बद्दलचा प्रश्न अर्थात् निघाला. तुम्ही कांहीं निरोप द्याल का म्हणून मी विचारलें. तेव्हां 'नाहीं, मला कांहीं सांगतां येत नाहीं, पण जर बोललोंच तर एकच शब्द "Patience" उच्चारीन' असें मोठ्या गंभीर स्वरांत लॅन्सबरींनीं उत्तर दिलें. "पेशन्स हा शब्द कठीण आहेच व तो प्रत्यक्ष आचरणांत आणावयाला जास्तच कठीण जातो."

"पण हिंदुस्थान आज इतकीं वर्षे Patience Patience म्हणून थकून गेलें आहे असें अजून तुम्हाला वाटत नाहीं का ?"

लॅन्सबरी—होय, त्यांनीं आजपर्यंत खूप धीर धरला आहे, पण आतां वेळ अगदीं नजीक आली आहे. आतां फार वेळ लागूं नये. मग रॅ. परांजपे व मी असे दोघेहिजण स्टेशनमधून बाहेर पडलों.

## अफगाणिस्थान

येथील अफगाण वकिलांनीं आपल्या देशांत अंदाधुंदी चालू आहे असें पाहून आपला खिसा गरम करण्याबद्दल जो नीच प्रयत्न केला त्याबद्दल अफगाण वकिलातीचे चिटणीस युनसखान यांनीं प्रत्यक्ष खुलासा केला. गेल्या फेब्रुवारीपासून आतां-पर्यंत सुजांनीं एकंदरींत ४०००० पौंड लांबविले व शेवटीं राजे अमानुल्ला यांनीं येथें ठेवलेलें जवाहीरहि पळवून न्यावयाचा घाट घातला, पण युनसखान हे आपल्या मिठास जागले व सगळी मसलत फसली

# १९२९ चें पावसाचें भविष्य

( ले.—ज. स. करंदीकर. )

चालू वर्षारंभी ता. २३-४-२९ च्या केसरींत यंदाच्या पावसाचें एप्रिल ते ऑक्टोबरपर्यंतचें भविष्य प्रसिद्ध केलें होतें. त्याचा आतांपर्यंत काय अनुभव आला त्याचें सिंहावलोकन करून पुढील पांच महिन्यांचें म्हणजे कार्तिक ते फाल्गुनअखेरचा पावसाचा अंदाज द्यावयाचा आहे.

**एप्रिलमधील** २३, २६ व २८ या तीनहि तारखांस पाऊस पडला. त्यांत २३ तारखेचा पाऊस सर्वत्र पडला. मात्र तो २४ तारखेलाहि बऱ्याच ठिकाणीं तसाच पडत राहिला.

**मे**—या महिन्यांत ३, ७, २४, २६ व २८ या तारखांस भविष्याप्रमाणें पाऊस पडला. १३ तारखेस मात्र पाऊस कोठेंच पडला नाहीं, पण एक दिवस आधीं १२ तारखेस पाऊस पडला. १७ तारखेचा पाऊस अगदींच कमी ठिकाणीं पण पडला. याखेरीज २, ९, २० व ३१ या तारखांस भविष्याहून अधिक पाऊस पडला.

**जून**—या महिन्यांतल्या ३, ४, ९, १२, २०, २२ व २४ या सर्व तारखांस पाऊस पडला. पण खेरीज ६, १६, १७, २८ व ३० या तारखांसहि पाऊस बरेच ठिकाणीं पडला.

**जुलै**—हा महिना भरपावसाचा असल्यानें या दिलेल्या सर्व तारखांस पाऊस झाला हें सांगावयास नकोच. पण त्यांत विशेष हें कीं, या महिन्यांत पावसाच्या ज्या तारखा दिल्या होत्या त्यांतले ५, ७, १०, १३ व १९ हे दिवस विशेष पावसाचे ठरले. आणि त्यांतल्याच ता. १३ रोजीं गुजराथेंत अतिवृष्टि झाली. अर्थातच जोराचा पाऊस आला म्हणजे तो दुसरे दिवशींहि थोडा तरी पडत राहतो. त्याप्रमाणें वरील प्रत्येक तारखेच्या दुसऱ्याहि दिवशीं म्हणजे ६, ८, ११, १४ व २० या तारखांसहि पाऊस पडला, पण तो दिवस पावसाचा मुख्य दिवस मानण्याइतका पडला नाहीं.

**ऑगस्ट**—जुलैंत अतिवृष्टि झाल्यानें ऑगस्ट महिन्यांत पाऊस कमी पडला. तथापि या महिन्यांत दिलेल्या सर्व तारखांस पाऊस पडला. न दिलेल्या तारखांत १८ च्या जोडीनें १९, २२ च्या जोडीनें २३ व २४ च्या जोडीनें २५ हेहि दिवस वरच्याप्रमाणेंच पावसाचे म्हणून धरतां येतील.

**सप्टेंबर**—या महिन्यांत बुधाची युति नसल्यामुळें तारखा निश्चित करतां आल्या नाहींत. तथापि ज्या तारखा नमूद केल्या होत्या त्या त्या तारखांस थोडथोडा तरी पाऊस पडलाच. परंतु मुख्यतः ता. १६ ते १९ पर्यंत जो विशेष पाऊस पडला तो माझ्या भविष्यांत दिला गेला नव्हता. माझ्या भविष्यांत १२ ते १५ पर्यंतच्या तारखा होत्या. पण १७, १८ व १९ या तीन तारखा नव्हत्या.

**ऑक्टोबर**—या महिन्याच्या प्रारंभींच बुधाची युति होती व तीप्रमाणें १ ते ६ व ११ ते १६ पर्यंतच्या तारखांस पाऊस झाला. शेवटची तारीख २४ होती. त्या तारखेस पाऊस झाला का नाहीं हें अद्यापि कळलें नाहीं.

याप्रमाणें ऑक्टोबरअखेरचा अहवाल आहे. आतां नोव्हेंबरांत ता. २७ रोजीं बुधाची मोठी युति आहे व तिचा परिणाम ता. २१ पासून दिसूं लागेल. तथापि ही महाराष्ट्रांतल्या पावसाळ्याच्या अखेरची युति असल्यानें तिचा परिणाम महाराष्ट्रांत विशेष दिसणार नाहीं, पण कर्नाटकांत दिसेल.

त्यानंतर डिसेंबर महिन्यांत बुधाची युति नाहीं, पण ता. ३ डिसेंबरला रविमंगळयुति होऊन मंगळ रवीच्या मागें पडतो. ता. २५ डिसेंबरला रविशनियुति आहे. पुढें ता. २२ जानेवारीला रविबुध-युति आहे. त्यानंतर फाल्गुनअखेर म्हणजे ३० मार्चपर्यंत महत्त्वाची युति नाहीं. पण एप्रिलच्या प्रारंभींच बुधाची युति आहे व तिचा विचार मार्च महिन्याच्या भविष्यांत करावा लागेल.

वर नमूद केलेली ग्रहांची स्थिति लक्षांत घेतां नोव्हेंबरांत ता. ६ व ता. २१, डिसेंबर ता. ४ ते ६, जानेवारी ता. १५ ते २२ च्या दरम्यान, फेब्रुवारींत ता. २६ ते १ मार्चच्या दरम्यान आणि मार्चअखेर ता. २५ च्या सुमारास कांहीं ठिकाणीं पर्जन्यवृष्टि होईल असा अंदाज आहे.

# व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन
# यांचा जाहिरनामा

पुढील आशयाचा जाहिरनामा व्हाइसरॉय यांनीं ता. ३१ ऑक्टोबरच्या इंडिया गॅझेटाच्या खास अंकांत प्रसिद्ध केला. "मी नुकताच इंग्लंडाहून परत आलों. इंग्लंडांत असतांना ब्रिटिश सरकाराशीं दीर्घकालिक वाटाघाट करण्याची संधि मला मिळाली. विलायतेला जाण्यापूर्वी येथेंच मी जाहीर रीतीनें सांगितलें होतें कीं, हिंदी लोकांच्या भावना, आशंका व आकांक्षा यांची यथातथ्य माहिती इंग्लंडांतील लोकांना देणें हें राजप्रतिनिधि या दृष्टीनें माझें कर्तव्यच आहे. हें कर्तव्य बजावीत असतां माझ्या अपेक्षेप्रमाणे ब्रिटिश सरकार आणि इंग्लंडांतील सर्व पक्षांचे प्रमुख पुढारी यांनी माझ्या शिष्टाईकडे सहानुभूतिपूर्वक लक्ष दिलें व माझें सांगणे त्यांना पटलें.

हल्लींचा काल महत्त्वाच्या संक्रमणाचा असल्यानें एरवींच्या दिवसांत न उद्भवणारे गैरसमज या वेळीं उद्भवणें आणि जनतेच्या तीव्र भावना शब्दद्वारा व्यक्त होणें स्वाभाविक आहे. तथापि या सर्वांच्या बुडाशीं सर्व वर्गांत, सर्व पक्षांत आणि कोणत्याहि धर्माच्या अनुयायांत बादशहाविषयीं राजनिष्ठाच वसत आहे यांत शंका नाहीं. त्याचप्रमाणें इंग्लंडांतील जनता हिंदुस्थानांत चाललेल्या विविध चळवळींमुळें कितीहि बुचकळ्यांत पडली असली तरी हिंदुस्थानाचें भावी ध्येय काय असावें याविषयीं जीं वचनें आजपर्यंत इंग्लंडाकडून देण्यांत आलीं आहेत तीं वचनें अक्षरश: पाळलीं पाहिजेत व पूर्ण केलीं पाहिजेत असाच ब्रिटिश जनतेचाहि निश्चय असल्याचें मला आढळून आलें.

हिंदुस्थान व इंग्लंड यांजवर हल्लींच्या काळीं मोठीच जबाबदारी येऊन पडली आहे. कारण या दोन देशांचे संबंध परस्परांशीं स्नेहभावाचे राहणें किंवा शत्रुभावाचे राहणें यावर जगांतील शांतता अवलंबून आहे. हे संबंध योग्य प्रकारचे राखण्यांत आम्हास यश लाभलें तर त्या यशाचा किंवा अपयश आलें तर त्या अपयशाचा परिणाम जगावर एवढा मोठा होईल कीं त्याचें मोजमापच करतां येणार नाहीं.



**प्रधानमंडळाशीं झालेली वाटाघाट**

विलायतेंत गेल्यावर भारतमंत्री व ब्रिटिश प्रधान यांच्याशी याच संबंधाने माझें मुख्यत: संभाषण झालें. दोन वर्षांपूर्वी सायमन कमिशनाची जी नेमणूक झाली ती कशी झाली व ती योग्य झाली कीं नाहीं याची चर्चा आतां करीत बसण्यांत कांहीं हंशील नाहीं; कारण अमुक झालें असतें तर काय झालें असतें याचा काथ्याकूट करण्यापेक्षां प्रस्तुतच्या परिस्थितींत काय करणें योग्य आहे याचा विचार करणेंच अधिक समर्पक होय.

सायमन कमिशन आणि नायर कमिटी यांचे रिपोर्ट प्रसिध्द व्हावयाचे आहेत. ते रिपोर्ट प्रसिध्द होऊन पार्लमेंटपुढें येईपर्यंत हिंदुस्थानाच्या राज्यव्यवस्थेंत कोणते फेरबदल होणार याची आगाऊ चर्चा करणे शक्य नाहीं, आणि यदाकदाचित् ते शक्य असलें तरी, ब्रिटिश सरकारच्या मतें तें इष्ट नाहीं. तो रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर ज्याला जे फेरबदल सुचवावयाचे असतील ते सुचविण्याला प्रत्येक पक्ष मोकळा व स्वतंत्र आहे. आज ब्रिटिश सरकारापुढें एवढाच प्रश्न आहे कीं, कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर तरी जी राज्यघटना ठरवावयाची तिची वाटाघाट ब्रिटिश अधिकारी आणि हिंदुस्थानांतील जनतेच्या वतीनें जबाबदारीने बोलूं शकतील असे हिंदी प्रतिनिधी यांच्या दरम्यान सलोख्यानें कशी होईल ?

आठ महिन्यांपूर्वी असेंब्लींत भाषण करतांना मी बोललों होतों कीं, "हिंदी राज्यघटना कशी असावी हें ठरविण्याचा पार्लमेंटाला आज हक्क नाहीं असें म्हणणें जसें चुकीचें ठरेल तसेंच हिंदी राजकीय पुढाऱ्यांच्या संमतीशिवाय कोणतीहि राज्यघटना हिंदुस्थानावर लादली जाणें हेंहि चुकीचें ठरेल." याचबरोबर आणखी एक नवी गोष्ट सर जॉन सायमन यांनीं ब्रिटिश प्रधानाच्या नजरेस आणली आहे ती अशी कीं, भावी राज्यघटनेंत ब्रिटिश इंडिया आणि हिंदी संस्थानें यांचे संबंध कसे असावेत याचाहि या चौकशींत विचार होणे जरूर आहे व त्याकरितां हल्लींच्या ठरलेल्या कार्यक्रमांत फरकहि करावा लागेल. यासंबंधांत सर जॉन सायमन लिहितात

कीं, 'आमच्या कमिशनाचा व नायर कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर, परंतु जॉइंट पार्लमेंटरी कमिटी नेमण्याच्यापूर्वींच एक कॉन्फरन्स बोलवावें लागेल. त्या कॉन्फरन्समध्यें ब्रिटिश हिंदुस्थान, हिंदी संस्थानें आणि ब्रिटिश सरकार यांचे प्रतिनिधी एकत्र जमून त्यांनीं शक्य तितक्या मतैक्यानें भावी राज्यघटना तयार करावी व ती सरकारनें पार्लमेंटापुढें मांडावी.'

सायमन कमिशनाची नेमणूक करतांना असें ठरलें होतें व ता. ६ फेब्रुवारी १९२८ च्या पत्रांत सर जॉन सायमन यांनीं मला असें लिहून कळविलें होतें कीं, कमिशनाचा रिपोर्ट प्रसिद्ध होऊन त्यावर सरकारचें मत बनून पार्लमेंटपुढें बिल आल्यानंतर हिंदी प्रतिनिधींना या बिलाबाबत जॉइंट पार्लमेंटरी कमिटीशीं वाटाघाट करण्याची संधि दिली जाईल. अशी वाटाघाट होणें हें आजच्या बदललेल्या कार्यक्रमाप्रमाणेंहि आवश्यकच ठरेल. पार्लमेंटपुढें बिल आल्यानंतर ती वाटाघाट यापुढेंहि होईल. पण तत्पूर्वींच वर सुचविल्याप्रमाणे संयुक्त कॉन्फरन्स बोलावणें जरूर आहे. आणि ही कल्पना ब्रिटिश सरकारला पूर्णपणे मान्य आहे; कारण ब्रिटिश इंडिया आणि हिंदी संस्थानें यांचे परस्परांशीं संबंध कसे असावेत याचा व्यापक दृष्टीनें विचार ठरविण्याची जरूरी कमिशनाला जशी भासत आहे तशीच ती ब्रिटिश सरकारालाहि भासत आहे. ब्रिटिश धोरणाच्या बुडाशीं जो उद्देश आहे त्या उद्देशाच्या पूर्ण सिद्धीसाठीं हे संबंध योग्य रीतीनें जुळवून घेणें आवश्यक आहे. मग त्या हेतूच्या सिध्दीची पद्धति पार्लमेंट कशीहि ठरवो.

## हिंदुस्थानाचें अंतिम ध्येय

ब्रिटिश राजनीतीचें हिंदुस्थानांतील अंतिम ध्येय काय हें इ.स. १९१७च्या ऑगस्टमध्येंच जाहीर झालें आहे. राजप्रतिनिधि या नात्यानें बादशहांकडून माझ्या नेमणुकीच्या वेळीं मला जो खलिता दिला गेला त्यांतहि असेंच म्हटलें आहे कीं, १९१९ च्या आक्टांत दर्शविलेल्या पद्धतीनें हिंदुस्थानाला वसाहतीचा दर्जा प्राप्त व्हावा हेंच आपलें साध्य आहे. त्याचप्रमाणें ब्रिटिश मंत्र्यांनींहि अनेक वेळां अशीच आशा प्रकट केली आहे कीं, योग्य कालक्रमानें हिंदुस्थान हा आपला बरोबरीचा भागीदार होईल. तरी पण १९१९ चा ॲक्ट पास करण्यांत ब्रिटिश सरकाराचा हेतु काय होता याविषयीं हिंदुस्थानांत व विलायतेंतहि संशय प्रकट केला गेला असल्यामुळें ब्रिटिश सरकाराच्या वतीनें असें स्पष्ट जाहीर करण्याचा अधिकार मला देण्यांत आला आहे कीं, १९१७च्या जाहिरनाम्यांत जें धोरण जाहीर झालें आहे त्याची नैसर्गिक परिणति म्हणजे हिंदुस्थानाला 'डोमीनियन स्टेटस' (स्वायत्त वसाहतींचा दर्जा) प्राप्त होणें हीच होय.

हा वसाहतीचा दर्जा पूर्णत्वानें प्राप्त होण्याच्या कार्यक्रमांत हिंदी संस्थानांचें स्थान कोणतें असावे हें ठरविण्याचा संधि हिंदी संस्थानांना मिळावी. वसाहतीच्या स्वराज्याची परिणति कोणत्या पद्धतीनें व्हावयाची हें आजच सांगतां येण्यासारखें नसलें तरी आज जें पाऊल आपण पुढें टाकूं ते भावी ध्येयाला विसंगत न होतां सुसंगतच असेंच व्हावें एवढ्या दृष्टीनें तरी या प्रश्नाचा आतांच विचार करणें प्राप्त आहे.

## राऊंड टेबल कॉन्फरन्स

ब्रिटिश इंडियाच्या ध्येयसिद्धीच्या मार्गाचें संशोधन आणि भावी बृहद्भारताचा दुसरा महत्त्वाचा भाग अशीं जीं हिंदी संस्थानें यांचा, त्यांच्या हिताकडे दुर्लक्ष न होतां, इतर भागांशीं योग्य तऱ्हेचा संबंध ठरविणें या दोनहि गोष्टी साधण्याकरितां कमिशनानें कॉन्फरन्स बोलावण्याचा जो मार्ग सुचविला आहे तोच योग्य उपाय आहे. म्हणून मी असें जाहीर करतों कीं, सायमन कमिशन व नायर कमिटी यांचे रिपोर्ट हातीं येऊन प्रसिद्ध झाले आणि त्या सगळ्या साक्षी—पुराव्याचा हिंदुस्थान—सरकाराच्या सहकारितेनें ब्रिटिश सरकारनें विचार केला म्हणजे मग ब्रिटिश हिंदुस्थानांतील विविध पक्षांचे आणि हितसंबंधांचे प्रतिनिधी आणि हिंदी संस्थानांचे प्रतिनिधी यांना, एकत्र किंवा वेगवेगळ्या ठिकाणीं, सल्लामसलत घेण्याकरितां ब्रिटिश सरकाराकडून पाचारण करण्यांत येईल आणि त्या कॉन्फरन्समध्यें ब्रिटिश हिंदुस्थान आणि बृहद्भारत यांच्या भावी राज्यघटनेच्या प्रश्नाचा विचार केला जाईल.

अशा रीतीनें आगाऊ चर्चा करून जी घटना तयार केली जाईल व जी पार्लमेंटापुढें बिलाच्या स्वरूपानें मांडली जाईल तिला सर्व पक्षांकडून अधिकांत अधिक पाठिंबा मिळेल अशी आशा आहे. ब्रिटिश सरकारानें ही जी कॉन्फरन्स भरविण्याची इच्छा प्रदर्शित केली आहे तिला हिंदुस्थानांतील सर्व पक्षांच्या व सर्व वर्गांच्या प्रतिनिधींकडून योग्य जबाब मिळेल असा मला भरंवसा वाटतो हे मी सांगण्याची जरूरीच नाहीं. हल्लीं इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या परस्पर संबंधांत जी एक प्रकारची साशंक वृत्ति उत्पन्न झाली आहे आणि जिच्यायोगानें उभय-

तांच्या मार्गांत बांधा पडलेला आहे ती संशयवृत्ति दूर व्हावी अशीच हिंदुस्थानाच्या सर्व हितचिंतकांची इच्छा असणार. यास्तव हा जो मार्ग सुचविण्यांत आला आहे त्याचेयोगानें हिंदुस्थानाचें राजकीय वातावरण निवळेल आणि आम्हालाहि विधायक मुत्सद्देगिरी दर्शवून हिंदी राजकारणाचा महत्त्वाचा प्रश्न योग्य रीतीनें सोडवितां येईल असा मला पक्का भरंवसा वाटतो.

### सर जॉन सायमन यांचें

## प्रधानमंत्री मि. मॅक्डोनाल्ड यांस पत्र

सर जॉन सायमन यांनीं ता. १६ ऑक्टोबर रोजीं मि. मॅक्डोनाल्ड यांस पत्र लिहिलें. त्याचा मथितार्थ असा,—"आतां आमच्या कमिशनाच्या शेवटच्या, म्हणजे रिपोर्ट लिहिण्याच्या, कामास सुरुवात झाली आहे; आणि तो रिपोर्ट १९३० च्या प्रारंभीं तयार होईल. पण तत्पूर्वी मला एक पृच्छा करावयाची आहे व एक सूचनाहि करावयाची आहे. हिंदी राज्यघटनेचा आम्हीं जसा जसा अधिकाधिक खोल विचार करूं लागलों तसतशी एक गोष्ट प्रामुख्यानें आमच्या नजरेस आली की, ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थानें यांच्यांतील संबंध कसा असावा हे आगाऊ ठरविणें जरूरीचें आहे. बटलर कमिटीच्या चौकशीचें क्षेत्र काय किंवा आमच्या चौकशीचें क्षेत्र काय, हीं दोनहि आमच्या या नव्या विचाराच्या दृष्टीनें अपूर्णच आहेत. यास्तव आमच्या चौकशीचें काम पुढें चालविण्यापूर्वी आम्ही हिंदी संस्थानांच्या संबंधाचाहि विचार करण्याइतकें आमचें चौकशीचें क्षेत्र व्यापक करावें कीं काय याविषयीं आम्हास अनुज्ञा पाहिजे. तशी अनुज्ञा मिळून आम्ही संस्थानाच्या हितसंबंधाचाहि आमच्या रिपोर्टांत विचार केल्यास त्या रिपोर्टावरून बिल तयार करून पार्लमेंटापुढें मांडण्यापूर्वी हिंदी संस्थानांचे प्रतिनिधी व ब्रिटिश हिंदुस्थानाचे प्रतिनिधी यांच्याशीं वाटाघाट होणें अगत्याचें आहे. या बाबतींत मंत्रिमंडळानें कोणता मार्ग स्वीकारावा हें सुचविणें आमचें काम नव्हे. तथापि आम्ही आमच्या कार्यक्षेत्राचें उल्लंघन केलें असा आमच्यावर मागाहून आक्षेप येऊं नये म्हणून आम्ही हा आगाऊ कॉन्फरन्सचा मार्ग सुचवीत आहों."

### प्रधानमंत्री मि. मॅक्डोनाल्ड यांचें उत्तर

आपल्या पत्रांत उपस्थित झालेला मुद्दा इतका महत्त्वाचा आहे कीं, त्याचें उत्तर देण्यापूर्वी इतर पक्षांच्या पुढाऱ्यांचें मत समजून घेण्याची मला जरूरी भासली व त्याप्रमाणें मी त्यांचे मत विचारून घेतलें. आणि आतां आपल्यास मी जे उत्तर पाठवीत आहे त्या उत्तराला त्यांची संमति मिळाली आहे. तें उत्तर असें—

"आपल्या पत्राप्रमाणें कमिशनाच्या चौकशीचें क्षेत्र व्यापक करून हिंदी संस्थानांच्या संबंधाचा विचार करण्याची आपली सूचना आम्हास मान्य आहे. कारण त्यायोगानें आपल्या चौकशीला पूर्णत्व येईल. चौकशीचें क्षेत्र वाढवावयाचें झाल्यास भावी कार्यक्रमांत बदल करून बिल तयार करण्यापूर्वीच एक कॉन्फरन्स भरवावी लागेल असें जें आपण लिहितां तेंहि आम्हास मान्य आहे व तशी कॉन्फरन्स बोलावण्याची आमची तयारी आहे. अशा रीतीनें हिंदी संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थानांतील विविध पक्ष व हितसंबंध यांचे प्रतिनिधी बोलावून त्यांच्याशीं वाटाघाट करून जी राज्यघटना ठरेल तिला जास्तींत जास्त मतैक्याचा पाठिंबा आहे असें म्हणतां येईल. ब्रिटिश हिंदुस्थानासंबंधानें अधिकारयुक्त वाणीनें बोलण्याचा ज्यांना ज्यांना हक्क आहे त्यांची सहकारिता मिळविण्याचाहि हाच मार्ग असल्यानें आपली आगाऊ कॉन्फरन्स बोलावण्याची कल्पना आम्हास मान्य आहे. यास्तव तुमच्या कमिशनाचा रिपोर्ट प्रसिध्द होऊन त्यावरचा हिंदुस्थान-सरकाराचा अभिप्राय आम्हास कळतांच आम्ही ब्रिटिश हिंदुस्थान आणि हिंदी संस्थानें यांचे प्रतिनिधी कॉन्फरन्सकरितां बोलावूं. अशा रीतीनें अगोदरच चर्चा करून जे बिल तयार करून पार्लमेंटाकडे पाठविण्यांत येईल त्या बिलाला हिंदुस्थानांतल्या व ग्रेट ब्रिटनमधल्या अधिकांत अधिक लोकांचा पाठिंबा आहे असें मानण्यास हरकत नाहीं."

# स्वराज्याच्या जाहिरनाम्यावरील हिंदी लोकमत

## (१) हिंदी पुढाऱ्यांचा जबाब

व्हाइसरॉयांचा जाहिरनामा प्रसिध्द होतांच दिल्ली राजधानींत ता. १ व ता. २ नोव्हेंबर रोजीं हिंदी पुढाऱ्यांची बैठक झाली. तींत व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्याची भवति–न–भवति होऊन अखेरीस एकमतानें जो जबाब द्यावयाचें ठरलें त्याचा आशय पुढें दिल्याप्रमाणें आहे—

खालीं सह्या करणारे आम्ही हिंदी प्रतिनिधी असें जाहीर करतों कीं, व्हाइसरॉयांचा ता. ३१ ऑक्टोबरचा जाहिरनामा आम्ही वाचला व त्याचा मननपूर्वक विचार केला.

त्या जाहिरनाम्यांत जी कळकळ व्यक्त होत आहे आणि हिंदी लोकमत आपल्याकडे वळवून घेण्याचा जो इरादा त्यांत व्यक्त होत आहे तो आम्हास मान्य आहे.

हिंदुस्थानाच्या परिस्थितीस जुळणारी अशी वसाहतीच्या दर्जाची राज्यघटना तयार करण्याच्या कामगिरींत ब्रिटिश सरकाराशीं आम्हाला सहकार्य करतां येईल अशी परिस्थिति प्राप्त होईल असा आम्हाला भरंवसा वाटतो. पण तत्पूर्वी सरकारनें कांहीं मुद्दयाचा खुलासा करावा आणि प्रत्यक्ष कृति करून दाखवावी म्हणजे सर्व पक्षांच्या व सर्व वर्गांच्या लोकांस विश्वास वाटू लागेल आणि त्यांची सहकारिता सहज मिळू शकेल.

भावी कॉन्फरन्स यशस्वी होण्याकरितां सरकारनें प्रथम पुढील गोष्टी कराव्याः—

(१) हिंदुस्थानांतील प्रक्षुब्ध वातावरण शांत होण्याकरितां सरकारने सलोख्याचें धोरण स्वीकारावें (२) राजकीय कैद्यांना सरास माफी द्यावी (३) प्रगतिपर अशा राजकीय संस्थांचे प्रतिनिधी कॉन्फरन्समध्यें खात्रीपूर्वक येतील अशी तजवीज करावी, आणि त्यांतल्या त्यांत राष्ट्रीय सभा ही सर्वांत बडी राजकीय संस्था असल्यानें तिच्या प्रतिनिधींची संख्या इतर कोणत्याहि संख्येहून अधिक असावी.

व्हाइसरॉयांनी आपल्या भाषणांत ‘ डोमीनियन स्टेटस ’ संबंधीं जे विचार ग्रथित केले आहेत त्यांच्या अर्थासंबंधीं कित्येकांनी कांहीं शंका प्रदर्शित केल्यावरून आम्ही असें समजून चालतों कीं, “ हें जे भावी कॉन्फरन्स भरवावयाचें तें हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस केव्हां देण्यांत यावें याची वाटाघाट करण्यासाठीं भरणार नसून ‘डोमीनियन स्टेटस ’ ची राज्यघटना कशी तयार करावी याचाच विचार करण्याकरितां भरविण्यांत येणार आहे.”

व्हाइसरॉयांनी जो महत्त्वाचा जाहिरनामा प्रसिद्ध केला त्याचा आम्ही वर दिग्दर्शित केला आहे तसाच भावार्थ आहे ही आमची कल्पना चुकीची ठरणार नाही असा आम्हास भरंवसा वाटतो. डोमीनियन स्टेटसची भावी राज्यघटना तयार होऊन ती अमलांत येईपर्यंतच्या दरम्यानच्या काळांत सरकारने येथील राज्यकारभारांत अधिक उदार वृत्ति व सहानुभूति व्यक्त करावी. याचें एक स्पष्ट गमक असें कीं, कायदेकौन्सिलांविषयीं कार्यकारी कौन्सिलाची आजची जी वृत्ति आहे ती बदलून भावी राज्यघटनेला सुसंगत असें ऐक्य आतांपासूनच प्रस्थापित करावें आणि सगळा राज्यकारभार बेजबाबदार पध्दतीनें न चालतां सनदशीर व नियंत्रित राज्यघटनेप्रमाणेंच चालावा. हम करे सो कायदा ही वृत्ति आतांपासूनच पालटावी. सारांश नोकरशाहीच्या बेजबाबदार अरेरावीचें जुनें युग संपून जबाबदार व नियंत्रित राज्यपद्धतीनें नवें युग आतांपासूनच सुरू झालें असें सरकारानें दर्शवावें आणि या नव्या युगाची घटना भावी कॉन्फरन्समध्यें ठरविण्यांत यावी. शेवटचीच पण महत्त्वाची सूचना हीच कीं, ही कॉन्फरन्स यशस्वी होण्याकरितां ती जितक्या लवकर बोलावण्यांत येईल तितकें चांगलें.

**सह्या**

म. गांधी, पं. मोतिलाल नेहरू, पंडित मदन मोहन मालवीय, पं. जवाहरलाल नेहरू, सर तेज बहादूर सप्रू, डॉ. ॲनी बेझंट, डॉ. अनसारी, सरोजिनी नायडू, डॉ. मुंजे, ए. रंगास्वामी अय्यंगार, मि. शेरवानी, बॅ. सेनगुप्त, मा. श्री. अणे, डॉ. पी. सी. रॉय, वल्लभभाई पटेल, सय्यद महमुद, पं. जगत नारायण लाल, हलिख उलझमान, मि. ठाकुरदास, मि. नटेसन, शेख कुरेशी, न. चिं. केळकर, पट्टाभिसीतारामय्या, शार्दूलसिंग, ना. श्रीनिवास शास्त्री, महमुदाबादचे राजे, लाला दुनीचंद, घनश्यामदास बिरला, महंमदअली, पंडित नेकीराम शर्मा इ. इ.

---

## (२) केळकरांचें मत

श्री. न. चिं. केळकर यांनी आपलें मत पुढीलप्रमाणें ता. १ नोव्हेंबर रोजीं जाहीर केलें:— “ पुष्कळ दिवसांपासून अपेक्षित असलेला सरकारी

जाहिरनामा एकदांचा बाहेर पडला व ज्या एका वर्गाच्या राजकारणी लोकांना सायमन कमिशनावरील बहिष्काराचा ताण विशेष जाणवत होता त्या वर्गाला या जाहिरनाम्यानें जिंकलें. सरकाराशीं असलेला नेहरूंचा संबंध पुनः जोडला गेला याबद्दल या लोकांना आनंद होईल.

ता. १८ फेब्रुवारी १९२४ अगर ता. ७ सप्टेंबर १९२५ रोजीं ले. असेंब्लीनें जी मागणी केली अगर १९२८ च्या कलकत्ता कॉंग्रेसच्या ठरावानें जी अपेक्षा दाखविली ती या जाहिरनाम्यानें पुरी होते असे मला वाटत नाहीं. कांहीं हिंदी राजकारणी पुरुषांना सायमन कमिशनाच्या नेमणुकीच्या वेळीं त्या कमिशनावर बसून हिंदी राज्यघटनेच्या चर्चेत भाग घेण्याची संधि हवी होती. ती त्यांना या जाहिरनाम्यानें दिली इतकेंच. कॉंग्रेस व असेंब्ली यांनीं ज्या मागण्या केल्या त्या मान्य झाल्या असें म्हणतां येणार नाहीं.

पण कोणत्याहि देशांत लोकांच्या राजकीय मागण्या अगदीं तंतोतंत शब्दशः सरकारला मान्य करतां येणें शक्य नसते. लॉर्ड आयर्विन यांनी आपल्या प्रयत्नानें ब्रिटिश सरकारच्या दृष्टिकोनांत व वृत्तींत बदल घडवून आणला तेव्हां उलट गांधींनीं, ते स्वत: कधीं कधीं स्वयंस्फूर्तीनें समंजसपणा दाखवितात तसा समंजसपणा दाखविण्याबद्दल, कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचें मन वळवावें अशी आयर्विन यांची अपेक्षा दिसते.

. या सगळ्याचा इत्यर्थ इतकाच कीं, पुढील वर्षी केव्हां तरी एक 'राऊंड टेबल कॉन्फरन्स' भरविली जाणार. पण तींत अमुकच एक गोष्ट करावयाची अशी सरकारानें कांहीं हमी घेतलेली नाहीं. पण या कॉन्फरन्समुळें लोकमतापैकीं कांहीं भाग संतुष्ट होईल आणि सायमन कमिशनाचे बाबतींत जो समान दर्जा दिला गेला नाहीं तशा प्रकारच्या समान दर्जाच्या भूमिकेवर हिंदी पुढाऱ्यांशीं वाटाघाट करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करण्यांत आला असें हिंदी लोकांना भासविण्यांत येईल.

अशा रीतीनें मजूर पक्षानें हिंदी पुढाऱ्यांच्या सहकारितेसाठीं हात पुढें केला आहे. ब्रिटिश राजकारणांतील इतर पक्ष त्याना खावयास बसले असतां त्यांना येवढेच करतां येण्याजोगें होतें असें म्हणतां येईल. हिंदी राष्ट्राला शक्य तितकें त्वरित स्वराज्य हवें असल्यानें मजूर--सरकारच्या अडचणींचा विचार करून त्यास सवलत देण्यास हिंदी राष्ट्र बांधले गेलें नाहीं. पण मजूर पक्षावर अप्रामाणिकपणाचा आरोप कोणी केला तर त्याला आपल्या प्रत्यक्ष परिस्थितीची व बंधनांची सबब सांगतां येण्यासारखी आहे हें हिंदी राष्ट्रानेंहि ओळखलें पाहिजे.

पण हे सर्व विचार म्हणजे केवळ जाहिरनामा वाचून तात्काळ सुचले तेवढेच आहेत. कारण भावी राऊंड टेबल परिषदेची घटना, तींत कोणते मुद्दे विचारार्थ येणार व निकाल कोणत्या पध्दतीनें होणार यावर बऱ्याच गोष्टी अवलंबून राहतील. "

# स्फुट विचार

## १ ना. भास्करराव जाधव व ब्राह्मण वर्ग

वांईचे रा. महादेवशास्त्री दिवेकर यांनीं ना. भास्करराव जाधव यांची मुलाखत औंध मुक्कामीं घेऊन ती ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध केली आहे. महादेवशास्त्री हे हिंदुसंघटन व तदन्तर्गत ब्राह्मणसंघटन अशा दोन प्रकारच्या चळवळी करीत असतात, व भास्करराव जाधव हे ब्राह्मणेतर पक्षाचे एक पुढारी आहेत. यामुळें दिवेकरशास्त्री यांनीं मुलाखतींत विचारलेले प्रश्न मुद्देसूद व मार्मिक होते व त्यांस ना. जाधव यांजकडून मिळालेलीं उत्तरेंहि ब्राह्मणेतरांच्या पुढाऱ्यापासून केव्हांतरी मिळावयास पाहिजेत अशींच होतीं. दिवेकरशास्त्र्यांनीं ब्राह्मण ब्राह्मणेतर वाद हाच विषय चर्चेला घेऊन व हा वाद मिटविण्याकरितां महाराष्ट्रांतील ब्राह्मणांनीं परिषदांतून व अन्यरीतीनेंहि केलेल्या प्रयत्नांचा उल्लेख करून भास्कररावांस विचारलें कीं, सर्व हिंदु जाती सारख्या आहेत असा आम्ही अकोल्याच्या ब्राह्मण परिषदेत ठराव केला आहे व तो समंजस ब्राह्मणांना मान्यहि आहे, मग आतां ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद कोठें राहिला? या व इतर अनेक प्रश्नांस भास्कररावांनी मनमोकळेपणानें उत्तरें दिलीं. तीं सर्वच प्रकृत स्थळीं देणे शक्य नसल्यानें त्यांतील महत्त्वाचा भाग दिवेकरशास्त्री यांनीं ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध केलेल्या शब्दांतच देत आहों.

## २ संक्रांतीचा रोख बदलला

ना. भास्करराव जाधव म्हणाले, 'जातिभेद मोडणें हा एक विषमता नष्ट होण्याचा उपाय आहे. पण तेवढ्यानेंच समता येईल असें मात्र नाहीं. तो एक यत्न आहे ...जाती मोडणें म्हणजे सर्व हिंदु जातींत विवाहद्वारां ऐक्य होणें होय... ब्राह्मण हे शिक्षणांत पुढारलेले आहेत. त्यांची सांपत्तिक स्थिति चांगली आहे. व सरकारी नोकऱ्यांत

ते पुढें आहेत. आज प्रथम आम्हाला ही विषमता नष्ट करावयाची आहे. धार्मिक व सामाजिक बाबी आतां गौण आहेत.' यानंतर हिंदुसंघटनेच्या चळवळीस ब्राह्मणेतरांचा विरोध कां? या प्रश्नास त्यांनीं पुढीलप्रमाणें उत्तर दिलें, 'मुसलमानांचे व आमचे हितसंबंध एकच आहेत. तेहि आमच्याप्रमाणें शिक्षणांत, नोकऱ्यांत व राजकीय दृष्ट्या मागसलेले आहेत म्हणून ते व आम्ही एक आहों. परंतु धार्मिक दृष्ट्या ते व आम्ही एक नाहीं. हिंदुसंघटन ही चळवळ आम्हास ब्राह्मणी थोतांड वाटते, म्हणून आम्ही तिच्यांत पुढाकार घेत नाहीं. परंतु त्या चळवळीस आम्ही विरुध्द नाहीं...मुसलमानांचें व पठाणाचें (हिंदु-समाजावर) आक्रमण चाललें आहे हे खरें; पण हें नष्ट करण्याचा मार्ग शिक्षण व नोकऱ्या हा आहे असें आम्हास वाटतें. शिवाय आमच्याजवळ माणसें थोडीं आहेत. म्हणून तुमच्या दिशेने चळवळ करण्यास आम्हाला माणसें पुरवितां येत नाहीत. आम्ही चालविलेल्या दिशेनेंच ब्राह्मणेतर समाजाचा सर्व दृष्टींनीं उत्कर्ष होणार आहे.' भास्कर-राव जाधवांच्या या उत्तरांवरून त्यांची आतां सामाजिक व धार्मिक बाबतींत ब्राह्मणांच्या धोरणाविषयीं कांहीं कुरकूर राहिलेली नसून ब्राह्मणेतर पक्ष सांप्रत राजकारणाकडे केवळ नोकरीच्या स्वार्थी दृष्टीनें पाहत आहे या गोष्टी स्पष्ट झाल्या. सारांश, ब्राह्मणवर्गानें आपल्यावरील जबाबदारी पार पाडून ब्राह्मणेतरांशीं सहकार्यासाठीं हात पुढे केला आहे. पण तो ब्राह्मणेतर पक्षच स्वार्थासाठी झिडकारीत आहे. हा बोध सर्वांना झाल्यास ब्राह्मणाविषयी ब्राह्मणेतरवर्गांत माजलेले गैरसमज पुष्कळच दूर होणार आहेत.

## ३ पारोळें येथील मिरवणुकीचा तंटा

खानदेशांतील पारोळें येथें घडलेल्या हिंदु मुसलमानांच्या दंग्याची हकीकत आज दुसरीकडे सविस्तर दिलेली आहे. त्यावरून खरा प्रकार काय घडला हें दिसून येईल. दंगा एक दिवस घडतो, व खटल्याचें सत्र पुढें महिनेच्या महिने चालू राहतें. यामुळें त्यांतील प्रकारावर टीका करणें हें थोडसें अडचणीचें होऊन बसतें. परंतु केवळ शांततेच्या दृष्टीनें आम्हाला एक सूचना करावीशी वाटते. ती ही कीं, पारोळें गांवांतील मिरवणुकीच्या रस्त्याला लागून जीं बालाजीचीं वाहनें अडकून पडलीं आहेत तीं तेथून परत देवळांत जाणें इष्ट आहे. मूळ दंग्याचें कारण या वाहनांची मिरवणूक हेंच असल्यामुळें, तीं अशीं उघड्यावर बिनवारशासारखीं असुरक्षित राहाणें अनेक बाजूंनीं धोक्याचें आहे. त्यांच्याकडे पाहून हिंदूंना आपल्या हक्कांचा अन्यायानें भंग झाला ही गोष्ट शल्यासारखी मनाला बोचणार. आणि मुसलमान लोक त्या वाहनांचें कांहीं नुकसान किंवा त्यांचा कांहीं अपमान करणार नाहींत अशी हमी कोण देणार? म्हणून दंगा झाला नसता तर हीं वाहनें जशीं मिरवणुकीसह देवळांत परत गेलीं असतीं तशीच तीं आतांहि बंदोबस्तानें पोंचवून द्यावीं. आणि मग खटले सावकाश चालत राहिले तरी हरकत नाही. शिवाय वाहनें मिरवणूक चालू असतां मध्येंच खालीं ठेवलीं जाण्याचें कारण असें दिसतें कीं, मुसलमानांनीं दंगा करण्याचा धाक घातला तेव्हां त्याला दबकून पोलीस अधिकाऱ्यांनींच 'वरिष्ठां' कडून हुकूम व मदत आणवितों, थोडें थांबा असें आश्वासन दिल्यामुळें वाहनें खालीं ठेवण्यांत आलीं. अधिकाऱ्यांचा हा हुकूम मान्य केल्याचें हे फळ हिंदु लोकांच्या पदरांत पडलें!

## ४ अधिकाऱ्यांचें वर्तन

पोलिसांचा आयत्या वेळचा तोंडी हुकूम अमान्य करून हिंदूंनीं मिरवणूक दडपून तशीच पुढें नेली असती तर मग कदाचित् हा दंगा न टळून वाहनें रस्त्यांत अडकून पडण्याचा प्रसंग आलाच नसता. पण भित्यापाठीमागें ब्रह्मराक्षस लागतो तसाच अधिकाऱ्यांचा अनिश्चितपणा हा कायदे संभाळणाऱ्यांनाच जाचक होतो. तात्पर्य जेथें जेथें मिरवणुकीच्या भांडणाचा प्रश्न निघतो तेथें तेथें दंग्याचा धाक घालून मुसलमान लोक आपलें म्हणणें तडीस नेतात; पण या धाकामुळें त्यांचे म्हणणें तडीस जाऊं शकतें हा अधिकारी म्हणविणारांना कमीपणा नाहीं काय? यामुळें एक वेळ असेंहि वाटूं लागतें कीं, बंदोबस्ताकरितां म्हणून पोलीस पार्टी जाते, ती न जाईल तरी बरें. कारण हुकूम मान्य केल्यामुळें दुबळे ठरणारे हिंदु संघशक्तीच्या जोरावर व संख्येच्या बळावर आपल्या मिरवणुकी तरी तडीला नेतील. मग हुकूम अमान्य केल्याचेच खटले काय व्हावयाचे ते होतील. आणि आज हुकूम मान्य केले तरी हे खटले कोठें चुकत आहेत? गेल्या कांहीं वर्षांत वाद्यांच्या मिरवणुकीचे दंगे कोठे कोठें झाले, तेथें हुकूम तोडण्याची खरी आगळीक कोणी केली, दंग्याची दहशत घालून आपलें कार्य कोणी साधलें, दंग्यांत कोणत्या जमातीचे लोक अधिक जखमी झाले, व अखेर कोणत्या जमातीच्या लोकांवर अधिक खटले होऊन शिक्षा झाल्या—या सर्वांची माहिती एकत्र केल्यास, अधिकारी व हिंदू आणि अधिकारी व मुसलमान यांचे संबंध कसकसे आहेत हें दिसून येईल.

# जेहलम व जालंदर येथील लष्करी शाळा

## डॉ. मुंजे यांचा अभिप्राय

असेंब्लीच्या गेल्या बैठकींत **बॅ. मुकुंदराव जयकर** यांनीं जेहलम व जालंदर येथील लष्करी शाळांमधून लष्करी अंमलदारांच्या मुलांप्रमाणें इतर वर्गांतील मुलांनाहि घेण्यांत यावें अशा अर्थाचा एक ठराव आणला होता. त्या ठरावाला जोड म्हणून, जेहलम व जालंदर येथील लष्करी शाळांप्रमाणें आणखीहि अनेक ठिकाणीं लष्करी शाळा उघडून इतर वर्गांतील मुलांना शिक्षण द्यावें अशी सूचना **डॉ. मुंजे** यांनीं केली होती. पण अध्यक्षांनीं ती नियमबाह्य ठरविल्यामुळें बॅ. जयकर यांचा मूळ ठरावच मंजूर झाला. डॉ. मुंजे हे लष्करी खात्याचा अभ्यास करतात व बरेंच लक्ष घालतात असें पाहून अलीकडे त्यांना लोक कर्नल म्हणूं लागले आहेत. गतवर्षी सँढर्स्ट कॉलेजमध्यें प्रवेश मिळवूं इच्छिणाऱ्या मुलांचे एक डॉक्टरी परीक्षक म्हणून हिंदुस्थानसरकारानें त्यांची नेमणूक केली होती. व गेल्या महिन्यांत ते जालंदर व जेहलम येथील लष्करी शाळा व डेहराडून येथील रॉयल इंडियन मिलिटरी कॉलेज यांची पाहणी करण्याकरितां गेले होते. या पाहाणीवरून त्यांचा जो ग्रह झाला, त्यासंबंधीं त्यांनीं आपला अभिप्राय एक जाहीर पत्रक काढून प्रसिध्द केला आहे. तो अभिप्राय असा:—

### जेहलम व जालंदर येथील लष्करी शाळा

'जेहलम व जालंदर येथील लष्करी शाळांत फक्त हिंदी सैन्यांतील अंमलदारांच्या मुलांनाच प्रवेश मिळतो. साधारणपणें या अंमलदाराला 'व्हाइसरॉय' कमिशन अगर 'किंग' कमिशन मिळालेलें असावें. पण कमिशन न मिळालेल्या अंमलदारांचे मुलांनाहि शिफारसीवरून जादा सवलत म्हणून घेण्यांत येतें. या शाळांतून प्रत्येकीं सुमारें २५० मुलें लष्करी शिक्षण घेत आहेत. मुलें १० ते १५ वयाचीं आहेत. जेहलम येथील शाळेंत फक्त पंजाबी मुसलमान व पठाण अमलदार यांचींच मुलें घेण्यांत येतात ! व जालंदर येथील लष्करी शाळा हिंदु मुलांकरितां आहे. या शाळेंत शीख, डोग्रा व रजपूत या तीन जातींतील मुलेंच बहुधा आढळतात. या शाळांचा मुख्य उद्देश हाच कीं, मुलानें आपल्या बापाच्या पलटणींत शिरावें. पण तीं मुलें कमिशन मिळण्यास पात्र होतील असें मात्र नाहीं !

### डेहेराडून कॉलेज

डेहेराडून येथील रॉयल इंडियन मिलिटरी कॉलेजांत इंडियन व अँग्लो-इंडियन मुलांना घेण्यांत येतें. रॉयल कॉलेज असें मोठें नाव असलें तरी इंग्लंडांतील पब्लिक स्कूलप्रमाणें हें एक पब्लिक स्कूल आहे. सँढर्स्ट, क्रॅनवेल, वुलविच वगैरे लष्करी शिक्षणाच्या कॉलेजांतून प्रवेश मिळण्यापूर्वी जी पूर्वतयारी व जो प्राथमिक अभ्यास व्हावा लागतो तो या कॉलेजांतून होतो. स्थानिक सरकारी अधिकारी व पोलिटिकल एजंट ज्या मुलांची शिफारस करतात त्या मुलांपैकीं कांहीं मुलें **कमांडर-इन-चीफ** हे निवड करून दरवर्षी घेतात.

### भोजनव्यवस्था

या तीनहि संस्थांतर्फे जेवण्याखाण्याची व राहण्याची व्यवस्था केलेली असते. या वसतिगृहांतच विद्यार्थ्यांना राहावें लागतें, व सर्व बाबतींत त्यांस लष्करी शिस्तीनें वागविलें जातें. जेहलम व जालंदर येथील शाळेंत भोजनाव्यतिरिक्त पोषाख, कपडे, पुस्तकें शाळेची फी वगैरे इतर खर्च मोफत केला जातो. भोजनखर्चाचे म्हणून फक्त ७½ रुपये मुलांचे पालक देतात झालें. तथापि एक गोष्ट पाहून मात्र मी चकित झालो. ती ही कीं, जालंदर येथील शीख, रजपूत, डोग्रा या जातींच्या मुलांपेक्षां जेहलम येथील पठाण व पंजाबी मुसलमान यांचीं मुलें अधिक सुदृढ व बळकट दिसलीं. पण त्यांची राहणी व एकंदर सामाजिक दर्जा हीं सर्व सारखींच होतीं असें म्हणतां येईल. तसेंच लढाऊ जातींतील विशिष्ट वर्गांतीलच तीं मुलें होतीं, व दोघांनाहि सारखेंच लष्करी शिक्षण देण्यांत येतें. तरी पण थोडी बारकाईनें चौकशी केली, तेव्हां असें आढळून आलें कीं, जेहलमच्या शाळेंतील मुलांना दररोज एक वेळ तरी बकऱ्याचें मांस देण्यांत येतें. व कांहीं दिवस तर दोनहि वेळां तें मिळूं शकतें. तथापि जालंदर शाळेंतील हिंदु मुलांना मात्र आठवड्यांतून एकच वेळ मांस पुरविण्यांत येतें. पण दोहोकडे ७½ रुपये ही भोजनफी सारखीच असते! ही एक गोष्ट सोडून दिली तर जेवणाखाणाची बाकी सर्व व्यवस्था चांगली आहे. सर्व पदार्थ चांगले रुचकर असतात. शाळेच्या आवारांतच बिनखर्चानें पोल्ट्री फार्म चालू शकेल अशी एक सूचना मी केली आहे.

## डेहेराडून कॉलेजाचा खर्च

या लष्करी शाळेची वार्षिक फी १५०० रुपये आहे! पण एक वर्ष म्हणजे ८ महिने ६ दिवस! याशिवाय दरमहा ५० रुपये इतर किरकोळ खर्च करावा लागतो. मुलाला शाळेत घेतांना त्याचें वय ११ ते १२ या दरम्यान असावें लागतें व ७ वर्षांचा अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर तो तरुण विद्यार्थी सँढर्स्टच्या प्रवेशपरीक्षेला लायक होतो. मुलाचे पालकाला या शिक्षणाकरितां या ७ वर्षांत सुमारें १५ ते १७ हजार रुपये खर्च येतो. व मुलगा या प्रवेश-परीक्षेंत उत्तीर्ण होऊन इंग्लंडांत लष्करी कॉलेजांत गेलाच तर आणखी १० हजार रुपयांची तरतूद बापाला करावी लागते! इंग्लंडच्या लष्करी कॉलेजांतील कोर्स १८ महिन्यांचा असतो. पण शाळेंतील हजेरीचे दिवस असे ४३६ च असतात. या सर्वांचा अर्थ असा कीं, ज्या मुलाच्या बापाला अगर पालकाला आपल्या मुलाला कमिशन मिळावें अशी इच्छा असेल त्यानें २५ ते ३० हजार रुपयांची तरतूद केली पाहिजे; आणि एखाद्या बापाला चार मुलगे असले म्हणजे झालेंच. त्यानें कमींत कमी १ लाख रुपयांची सोय केली पाहिजे. पण हिंदुस्थानासारख्या परतंत्र राष्ट्रांत मुलांच्या अंगांत जात्याच लष्करी शिक्षणाची आवड व बापाजवळ पैसा अशा दोन गोष्टी एके ठिकाणीं असणें फारच विरळा. सरस्वती व लक्ष्मी या दोन बहिणी एके ठिकाणीं क्वचितच नांदत असलेल्या दृष्टीस पडतात. आणि इतके करूनहि हिंदी विद्यार्थ्यांच्या आंगचे सर्वच दोष जातात असें नाहीं. 'हिंदी' 'इंग्लिश' हा भेद राहतोच! इंग्लंडांत ८ व्या वर्षापासून मुलें पब्लिक स्कूलमध्यें जातात; व दोघेहि एकाच परीक्षेला बसतात. पण हिंदी मुलें ८ वर्षांपासून शाळेंत जाऊं लागलीं तर ४०-५० हजार रुपये तरी या प्राथमिक लष्करी शिक्षणावर खर्च करावे लागतील.

## आदर्श

पण या सर्वांचा व्यावहारिक दृष्ट्या विचार केला असतां हल्लींच्या परिस्थितींत या प्राथमिक लष्करी शिक्षणाची अत्यंत जरूरी आहे. शाळेंतील इतर विषय या लष्करी शाळांतून शिकविले जातात, व इतरहि शिक्षण दिलें जातें. मला अशी खात्री वाटते कीं, जेहलम व जालंदर येथील लष्करी शाळा डेहराडून कॉलेजापेक्षांहि चांगल्या आहेत, व ह्या शाळा आदर्श आहेत असें म्हणण्यास कोणत्याहि प्रकारें मला हरकत दिसत नाहीं. जेहलम व जालंदर येथील शिक्षणक्रम व व्यवस्था पाहून मला फारच संतोष झाला. कारण या शिक्षणाचा उद्देश राष्ट्रीय सैनिक बनविण्याचा असून मुलांमध्यें वक्तशीरपणा, व्यवस्थितपणा, नीटनेटकेपणा, शिस्तीची आवड हे गुण अंगीं पूर्णत्वानें उतरतील असेंच शिक्षण या शाळांमधून देण्यांत येतें. तसेंच येथील तरुण मुलें शरीरानें व त्याचप्रमाणें मनानेंहि सुदृढ बनतील आणि स्वदेशाभिमानी नागरिक, व हिंदी सैन्याचे नेते होतील असा भरंवसा वाटतो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे या शाळांतील शिक्षण परिणामकारक व स्वस्ताईचे असून, सर्व दर्जाच्या मुलांना तें घेतां येण्यासारखें आहे. व लष्करी शिपायांच्या व वैमानिक दलाच्या अंगीं असावें लागणारें धैर्य व साहस हे गुण मुलांच्या अंगीं पूर्णत्वानें उतरतील अशा प्रकारें अभ्यासक्रमाची व राहण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे.

## खासगी लष्करी शाळा काढाव्या

शिक्षणखात्याच्या दिवाणांनीं आणि सरकारी व बिनसरकारी संस्थाच्या चालकांनीं या शाळांतील मुलांना देण्यांत येणारें शारीरिक शिक्षण, कवाईत, शिस्त, तेथील राहणी व व्यवस्था यांचें अवश्य अवलोकन करावें, व आपल्या प्रांतांत या शाळांच्या धर्तीवर नवीन शाळा स्थापन कराव्यात अशी माझी शिफारस आहे. अशा तऱ्हेचें लष्करी प्राथमिक शिक्षण इतके कमी खर्चाचें व स्वस्त झाल्यास, दरवर्षी इंग्लंडांतील लष्करी कॉलेजात पाठविण्याकरितां, शरीरानें सुदृढ व पुढारीपणाचे गुण अंगा असलेलीं व ब्रिटिश ऑफिसरांच्या परीक्षेस उतरतील अशीं निदान ३२ तरुण मुलें सहज पुढें येऊं शकतील.

कर्नल हचीसन, कॅप्टन शार्प व इतर हिंदी व ब्रिटिश अधिकारी यांनीं संस्थेसंबंधानें जी जी माहिती मी बारकाईनें मागितली ती सर्व आनंदानें दिली, व ते माझ्याशीं पूर्ण स्नेहाच्या सहकार्यानें वागले याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. या शाळांतील मुलांचे तेथील लष्करी अधिकारी शिक्षकांवरील आपल्या पित्यासारखें प्रेम व अधिकारी वर्गाचीहि विद्यार्थ्यांशीं आपल्या मुलांप्रमाणें वागणूक पाहून मला अतिशय समाधान झालें.

# स्वराजयचा ‘ वसाहती ’ नमुना

वरील शब्द आतां सर्वांच्या तोंडीं झाले आहेत. टांकसाळींत एखादें नवें नाणें पाडलें गेलें म्हणजे प्रथम त्याचें कौतुक होतें. जो तो त्याला घेऊन हाताळून पडताळून पाहतो. आणि इतर नाण्यांनीं मिळून त्याचें काम भागण्यासारखें असलें तरी, हें नवें नाणें मुद्दाम संग्रहीं ठेवून, तो प्रथम कांहीं दिवस त्याचाच हौसेनें उपयोग करतो. याचें कारण नाण्याचें नाविन्य हें तर खरेंच, पण त्याची ओळख हाताला असावी अशी इच्छा हेंहि दुसरें एक कारण होय. आपणाला नाण्यांचा उपयोग कित्येक प्रसंगीं रात्रीं अपरात्रीं उजेड नसतां म्हणजे केवळ हाताच्या ओळखीनें, करावा लागतो. म्हणून दोन चवल्यांनीं एका पावलीचें कार्य होत असलें तरी त्यांचे ऐवजीं तितकेंच काम करणारी पावलीहि खिशांत असावी असें वाटत असतें. शिवाय दुसऱ्या कोणी पावलीचें नवें निकली नकली नाणें आपल्या हातांत टाकलें तर, चांदीच्या पावलीची संवय झालेल्या हाताला हें नवें नाणेंहि स्पर्शानें कळावें व आपण फसूं नये अशी इच्छा असते.

"वसाहती नमुन्या"च्या स्वराज्याचीहि गोष्ट अशीच आहे. कमींत कमी १९०५ पासून आपण या नांवाचा उपयोग करीत आलों आहों. इतकेंच नव्हे तर त्या नमुन्याचे स्वराज्य हिंदुस्थानाकरितां हवें म्हणून मागत आलों आहों! पण आतां नुसत्या नांवाचा उच्चार न करतां त्याचा नमुना प्रत्यक्ष हातानें बनविण्याची वेळ आली आहे. तेव्हां त्या नांवाच्या अर्थामध्यें अधिक खोल शिरून त्याचें मर्म समजून घेणें-देणें अवश्य झालें आहे. नेहरू कमिटीनें 'वाटोळ्या मेजा'भोंवतीं बसून असा एक नमुना पूर्वीं बनविलाच आहे. पण सरकारासुद्धां सर्व पक्षांचे हात या कारागिरीला लागले नव्हते ही त्यांत मोठीच उणीव राहिलेली आहे. नव्या जाहिरनाम्यांत उल्लेखिलेली परिषद जर भरविण्यांत आली, तर तिच्यापुढें हा नमुना कसा असावा हाच विषय मुख्यतः येणार आहे. आणि या निरनिराळ्या हातांच्या समाईक कारागिरीच्या तडाख्यांत, गणपति करतां करतां माकड न बनलें तर, तो सर्वमान्य असा स्वराज्याचा नमुना ठरून, त्याप्रमाणें शेवटीं अधिकृत छाप म्हणजे पार्लमेंटरी कायदा बनेल. आणि त्याचा अंमल हिंदुस्थानांत होऊं लागेल.

हा स्वराज्याचा कायदा करण्याचा अधिकार तत्त्वतः ब्रिटिश पार्लमेंटलाच आहे. व ही गोष्ट नेहरू रिपोर्टांतहि मान्य केली आहे.

हिंदुस्थानांत एखादें बंड होऊन, हल्लींच्या राजसत्तेचा विध्वंस किंवा पराभव होऊन, नवीनच राष्ट्रसत्ता निर्माण व्हावयाची असेल तर मग असल्या कायद्याची व असल्या राऊंड टेबल कॉन्फरन्सची आवश्यकताच नाहीं. आणि या गोष्टीचें अमेरिकेंत घडलेलें उदाहरण आपल्या डोळ्यापुढें आहेच. तें असें कीं, ब्रिटिश राजसत्ता झुगारून देण्याचा जो जाहिरनामा यशस्वी बंडखोर अमेरिकन पुढाऱ्यांनीं काढला, त्याच्या आदल्या दिवसापर्यंत अमेरिकेवर इंग्रज राजाची (म्हणजे राजा व ब्रिटिश पार्लमेंट यांची) सत्ता, त्या वेळीं अमलांत असलेल्या पार्लमेंटरी कायद्याप्रमाणें प्रचलित होती. ज्या दिवशीं स्वातंत्र्याचा जाहिरनामा प्रसिद्ध झाला त्या दिवशीं जुनी सत्ता नष्ट होऊन तिच्या जागीं नवी सत्ता आली. पण अमेरिकेची नवी राज्यघटना त्या क्षणीं बनावयाचीच होती. या घटनेचा नमुना त्यांनाहि करावा लागला, व त्यांनाहि वाटोळ्या मेजाभोंवतीं बसून हा नमुना बनविण्याकरितां समाईक कामगिरी करावी लागली. पण फरक इतकाच कीं, या वाटोळ्या मेजाभोंवतीं जे बसले ते या यशस्वी बंडखोर पुढाऱ्यांपैकींच १०-५ बसले. त्यांत इंग्लंडचे कोणी प्रतिनिधी नव्हते.

या वाटोळ्या मेजाभोंवतीं जो नमुना सर्वमान्य झाला तोच त्या लोकांच्या सह्यांनीं कायदाहि बनला. आणि त्या कायद्यान्वयें मग अमेरिकेचें पार्लमेंट अस्तित्वांत आलें. त्यानंतर अमेरिकेसंबंधानें कोणचाहि कसलाहि कायदा करावयाचा झाला तर, त्याचा संपूर्ण अधिकार त्या पार्लमेंटकडेच तेव्हांपासून राहिलेला आहे. आणि त्या पार्लमेंटला जर कांहीं बंधन म्हणून असलें तर तें विद्यमान कायद्याचेच आहे. वेद जसे 'स्वतःप्रमाण' समजले जातात, तसा अमेरिकन रिपब्लिकचा हा कायदा स्वतःप्रमाण आहे, परतःप्रमाण नाहीं. आणि स्वतःप्रमाण याचा अर्थ हाच कीं, कायद्यांत बदल करण्याचा प्रसंग आल्यास तो कसा करावा हें त्या कायद्यांतच स्पष्ट शब्दांनीं सांगून ठेवलेलें आहे. म्हणून बदल होईल तर तो त्यांत सांगितल्याप्रमाणेंच होऊं शकेल, इतर रीतीनें होणार नाहीं.

हा कायदा अशा रीतीनें स्वतःप्रमाण असण्याचें कारण तो घडविणारी सत्ता मुळांत उसनी नव्हती, तर स्वयंभू होती. व फिरून एखादी क्रांति होऊन ही सत्ता नष्ट होईपर्यंत तिच्या इच्छेप्रमाणेंच सर्व गोष्टी चालावयाच्या आहेत, व चालतातहि. आपल्या देहावर व इस्टेटीवर संपूर्ण सत्ता असलेला

मालक आपल्या मृत्यूनंतरहि आपलें और्ध्वदेहिक कशा प्रकारें व्हावें किंवा इस्टेटीची व्यवस्था कशी व्हावी हें मृत्युपत्रानें लिहून ठेवूं शकतो. आणि मनुष्याच्या 'मृत्युपत्रा'चाहि अंमल जर त्याच्या मृत्यूनंतर होऊं शकतो तर त्याच्या जिवंतपणीं त्याचीच इच्छा त्याच्यापुरती प्रभावी ठरावी यांत काय आश्चर्य?

पण आपण हें अमेरिकेचें उदाहरण आतां सोडून देऊं. कारण हिंदुस्थानांत जें स्वायत्त स्वराज्य निर्माण व्हावयाचें तत्प्रेरक सत्ता वर अमेरिकेच्या उदाहरणांत सांगितल्याप्रमाणे स्वयंभू नाहीं. म्हणून हिंदी स्वराज्यघटनेचा जो कायदा होईल तो स्वतःप्रमाण असणार नाहीं. परतःप्रमाणच असणार. म्हणजे तो प्रत्यक्ष कोणत्या शब्दांनीं बनावा किंवा बनूं नये हें आज ब्रिटिश पार्लमेंटच ठरविणार.आणि हें जर ब्रिटिश पार्लमेंटच ठरविणार तर या स्वराज्याचा नमुना बनविण्याच्या कामीं प्रथम कारागीर म्हटले म्हणजे ब्रिटिश पार्लमेंटचे प्रतिनिधी, मदतीकरितां, सहकार्याकरितांच, व समाईक कारागिरीच्या फायद्याकरितां, असणार तथापि हिंदुस्थानाचे प्रतिनिधीहि बोलाविले जाणार.

हें बोलावणें अधिकाराच्या दृष्टीप्रमाणें अभिरुचीच्या दृष्टीनेंहि होणार आहे. अधिकाराची बरोबरी ही वस्तुतः केवळ कायदेशीर रोखठोक बरोबरी असा अर्थ नाही. 'प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्' या नीतिवचनाप्रमाणे,वयांत आलेला मुलगा हा बापाचा मित्र या सदरांत पडला तरी तो केवळ लक्षणेने पडतो. आणि याची कसोटी हीच कीं, जेथें मतैक्य असेल तेथें बापानेंहि वाटेल तर 'मी मुलाचें ऐकलें' असें म्हणावें. पण जेथें मतभेद होईल तेथें बापाचाच अधिकार अखेर चालणार. ही गोष्ट वरील सूत्र किंवा नीतिवचन करणाराला माहीत नव्हती असें नाहीं. असो;पण ब्रिटिश पार्लमेंट व हिंदी लोकमत यांच्यांत जी सहकारिता व्हावयाची, व जो समान दर्जाचा देखावा घडावयाचा, तो अधिकारापेक्षांहि अभिरुचीच्या दृष्टीनेच अधिक आहे.

कारण युरोपांत महायुद्धकाळीं स्वयंनिर्णयाचें म्हणून जें तत्त्व पुढे आलें, त्यांत इच्छेलाच मुख्य किंमत दिली होती.प्रबळदुर्बळ हा भेद न मानन किंवा झुगारून देऊनहि दिली. न्यायासनापुढें श्रीमंत व गरीब, प्रबळ व दुर्बळ, हे दोघेहि 'मनुष्य' या एकाच नात्यानें समान दर्जाचे ठरतात. म्हणजे लक्षाधीशाचा खून भिकाऱ्यानें केला, किंवा भिकाऱ्याचा खून लक्षाधीशानें केला, तरी गुन्हा शाबीत ठरल्यास आरोपीला शिक्षा एकाच कायद्याप्रमाणें एकाच मापाची दिली जाते. किंवा बाजार म्हटला म्हणजे वजनें मापें श्रीमंतगरिबांना सारखींच. किंवा कुटुंब म्हटलें म्हणजे त्यांतील अधिकार श्रीमंतगरिबांना सारखेच. अशाच रीतीनें महायुद्धांत जित किंवा दुर्बल राष्ट्रांनाहि आपल्याला स्वराज्य कशा नमुन्याचें हवें, इतकेंच नव्हे, तर आपलें स्वराज्य हे कोणकोणा लोकांचें मिळून बनावें, याचाहि अधिकार लहानसान राष्ट्रांनाहि देण्यांत आला. तोच अधिकार हिंदुस्थानालाहि नवा देण्यांत आला म्हणा, किंवा जुना असलेलाच मानण्यांत आला म्हणा.पण तो अधिकार मिळाला खरा.

पण युरोपांतील लहानसान राष्ट्रांच्यापुढें आपण कोणाच्या राज्यांत सामील होऊन राहावें, अर्थात् कोणाची सत्ता मानावी, कोणाची सत्ता झुगारून द्यावी असा जो प्रश्न होता तसा आज हिंदी लोकांच्या पुढें नाहीं. म्हणजे उदाहरणार्थ, हिंदी लोकांनी अफगाणिस्थान आपल्या राज्याला जोडून घ्यावे ? किंवा आपण उठून अमीराच्या सत्तेखालीं जावें?किंवा तसेंच हिंदुस्थानांत आज समाविष्ट असलेल्या पांदेचरीवर अंमल असलेली फ्रेंच, किंवा गोवा—दमण यांवर असलेली पोर्तुगीज राजसत्ता ही आपल्यांत मिळवून घ्यावी, कीं आपण त्यांत मिळून जावें असलाहि प्रश्न हिंदी जनतेपुढें स्वयंनिर्णयार्थी उत्पन्न झालेला नाही.नेहरू—रिपोर्टांत झाले तरी ब्रिटिश साम्राज्यांतच हिंदुस्थान राहावें अशी कल्पना गृहीत घेतलेली आहे. मग स्वयंनिर्णय कशाबद्दल, तर अंतर्गत स्वराज्याच्या नमुन्याबद्दल. एकच स्वयंनिर्णयाचा अधिकार बजावून युरोपांत जसे अंतर्गत स्वराज्याचे दहा निरनिराळे नमुने बनले, तसा कदाचित् हिंदुस्थानांत त्याच स्वयंनिर्णयाच्या अधिकारानें एक निराळाच ११ वा नमुना कां बनूं नये ? आणि जो बनावयाचा त्यांत होतां होईतो,हिंदी राष्ट्राची विशिष्ट कांहीं अभिरुचि असेल तर, ती त्या कामीं आम्ही होईल तितकी मानूं असे इंग्रजसरकारचें गर्भित अभिवचन आहे.

हिंदुस्थानाच्या परिस्थितीला योग्य असें स्वराज्य आम्हाला हवें असें जेव्हां हिंदी जनतेचे पुढारी म्हणतात, तेव्हां त्याचा अर्थ हाच असतो कीं,आमची जी आवड असेल ती पुरी करण्याला इंग्रजांनीं सवड दिलीच पाहिजे. मुलाला घर बांधण्याकरितां लागतील ते पैसे पुरवावयाला जर बाप तयार होणार तर मग माझें घर असें असावें असें म्हणून त्यानें एखादा नमुना सुचविल्यास, ज्यां घराचें सुखदुःख सोय—गैरसोय ही आपल्यापेक्षां मुलालाच चार दिवस अधिक भोगावयाची या दृष्टीनें, त्याच्या अभिरुचीला अधिक मान देणें हें जसें बापाचें कर्तव्य समजलें जातें,तसेंच याहि बाबतींत

समजावयाचें आहे. मात्र हिंदी जनता याचा अर्थ संकीर्ण स्वरूपानें घ्यावयाचा आहे. म्हणजे प्रत्यक्ष धर्मजातिहितसंबध हें अगदीं अल्पप्रमाणावर न मानलें तरी, राष्ट्रीय दृष्ट्या यांतील जितके मूळ घटक बनूं शकतील तितक्या सर्वांचे प्रतिनिधी हिंदी जनता या सदराखालीं येतात. म्हणून त्या सर्वांचे मिळून प्रतिनिधी विलायत–सरकार परिषदेला बोलवणार. व अगदींच आपल्या खास अभिरुचीला किंवा हितसंबंधाला बाध न येईल इतका मान, व बरोबरीचा दर्जा, स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार त्यांना देऊन स्वराज्याचा नमुना त्यांच्या सहकारितेने ठरविणार. असा देखावा जाहिरनाम्यानें आज उत्पन्न केलेला आहे

पूर्वी वसाहतींना स्वराज्य वेळोवेळीं दिलें तेव्हां या रीतीचा अवलंब केलाच होता. व सरकार जर वसाहतीचें स्वराज्यच हिंदुस्थानाला देणार तर तें देतांना वसाहतींशीं इंग्लंडाने जसें वर्तन ठेवलें तसेंच हिंदुस्थानाशीं त्यानें ठेवावें अशी अपेक्षा कोणीहि करील.असो. अशा रीतीनें भरणाऱ्या परिषदेपुढें मुख्य विषय चर्चेला निघणार तो 'वसाहती स्वराज्याचा नमुना' खरा. पण तो म्हणजे कसा ? व हेंच प्रतिशब्दांनीं सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, (१) स्वराज्य देतांना ब्रिटिश पार्लमेंटनें कोणते अंतिम अधिकार आपणाकडे राखून ठेवावे व कोणते हिंदी राष्ट्रावर सोंपवून द्यावे (२) आणि जे अंतिम अधिकार हिंदी राष्ट्राकडे सोंपवून द्यावयाचे त्यांची फिरून वांटणी निरनिराळ्या प्रांतांत, आणि एकेक प्रांत घेतला तरी त्या प्रांतांतील निरनिराळ्या वर्गांत, कशी व्हावी ? हेच दोन प्रश्न मुख्यतः परिषदेनें सोडवावयाचे आहेत. आणि त्यांचीं उत्तरें मिळून,व उभय पक्षीं मान्य होऊन, जी मूर्त घटना बनेल, तीच हिंदुस्थानांतील वसाहती स्वराज्याची घटना!हिंदुस्थानांत कॅनडा,ऑस्ट्रेलियाप्रमाणे इंग्रजांचे तद्भव व तत्सम असे लोक नाहींत. म्हणून हिंदुस्थानांत इंग्रजांची 'वसाहत' आहे असें म्हणतां येत नाहीं, पण वसाहतीचें स्वराज्य याचा अर्थ हिंदुस्थानासंबंधानें वाच्यार्थानें घ्यावयाचा नसून लक्षणेनेंच घ्यावयाचा आहे.

# अस्पृश्यतानिवारण व सत्याग्रह

पुण्याच्या नेमस्त–पक्षीय "सर्व्हंट ऑफ इंडिया" पत्राला जयकर, जम्नालाल, केळकर हे पर्वती सत्याग्रहाची मध्यस्थी विफल झाल्यावर काय करणार याबद्दल मोठी फिकीर पडल्याचें त्या पत्राच्या गेल्या ता. ३१ च्या अंकावरून दिसते. मध्यस्थीला पर्वतीपंचांनीं धुडकावलें तेव्हां आतां सत्याग्रह्यांनीं इतर प्रयत्न केले नाहींत हा आरोप गेला; सत्याग्रह्यांची बाजू सबळ झाली; म्हणून आतां त्यांनीं ताबडतोब सत्याग्रह करावा व त्यास जयकर जम्नालाल यांनीं स्वतः सामील होऊन केळकरांचेंहि मन वळवावें असा या पत्राचा परोपदेश आहे.सत्याग्रहांत नेमस्त पक्षाला स्वतः पडावयाचें नसल्यामुळें त्यांनीं या प्रकरणांत पहिल्यापासूनच परस्मैपदी उपदेशाचा अंगचोरटा उद्योग चालविला आहे. देवस्थानाचे पंच आपली जुनी भूमिका सोडण्यास तयार होत नाहींत ही गोष्ट जुन्या सामाजिक सुधारकांना पूर्वीपासूनच माहीत आहे. म्हणून देवस्थानाचे पंच वळत नाहींत हें कळल्याबरोबर लगेच सत्याग्रह केला पाहिजे या तत्त्वाचे नेमस्त पक्षीय सुधारक जर खरोखर भोक्ते असते तर त्यांनीं किती तरी दिवसांपूर्वीच असे किती तरी सत्याग्रह करावयास पाहिजे होते. पण स्वतः कांहींएक न करतां समाजाला परस्पर आग लावण्याची नेमकी संधि साधून जागेवर बसून शक्य तेवढी तोंडपाटीलकी करणें हा या नेमस्त पक्षीय सुधारकांचा संवयीनें स्वभावच बनून गेला असल्यानें, त्यांना आपल्या बोलण्यानें स्वतःवर काय करावयाची जबाबदारी येते याची जाणीवदेखील नसते

***

पर्वतीपंचांचें उत्तर ऐकल्यावर खुद्द सत्याग्रही मंडळींना जितकी घाई झाली नसेल तितकी घाई हा दुरून रम्य दिसणारा सामाजिक बखेडा स्वतःच आंग सावरून परस्पर झालेला पाहण्याच्या उत्कंठेनें "सर्व्हंट ऑफ इंडिया" कारांना झालेली दिसते. पुण्यांत झालेला सत्याग्रह मध्यस्थीनें तरी कांहीं काळ थांबला. पण मुंबईचा सत्याग्रह अशी कोणतीहि मध्यस्थी नसतांना जागच्या जागीं जिरला. तेथेंहि नेमस्त पक्षीय सुधारकांनीं त्याला हातभार लावण्याचा कांहीं प्रयत्न केला नाहीं. सत्याग्रहानें कार्यभाग होतो किंवा कार्य नासतें हाच काय तो मुख्य प्रश्न आहे. ज्यांना कार्यभाग होतो असें वाटत असेल त्यांनीं दूरून काड्या न लावतां स्वतः त्यांत उडी घेऊन पुढाकार घ्यावा. सत्याग्रह मान्य असतांहि अंगचोरपणानें दूरून बोलणाऱ्यांना नुसत्या लुबलुबडीखेरीज कांहींच लाधणार नाहीं.

***

नेमस्त सुधारकांनीं आज सत्याग्रहाला शाब्दिक टेकू देण्याचे कितीहि अवसान दाखविलें तरी त्यांच्या सर्व तत्त्वज्ञानांत सत्याग्रहाला कोठेंहि स्थान नाहीं ही गोष्ट झांकणार कशी ? या पक्षांतील "इंडियन सोशल रिफॉर्मर"चे संपादक श्री. नटराजन यांना, 'सर्व्हंट 'कारांइतके पाचपेंच नसल्यामुळें त्यांनीं या बाबतींत सरळ मत सांगितलें आहे. ता. २ नोव्हेंबरच्या अंकांत "सत्याग्रह व समाजसुधारणा" या मथळ्याच्या पहिल्या स्फुटामध्यें ते लिहितात "अंत्यजांमधील विशेष चढाऊ पुढाऱ्यांनी सत्याग्रहाची धमकी दिल्यामुळे देवालयप्रवेशाच्या व धार्मिक समारंभाच्या बाबतीत या विशिष्ट वर्गास करण्यांत येणारा मज्जाव दूर करावा याबद्दल देवळांच्या मालकाचीं मनें वळविण्याच्या शेठ जमनलाल बजाजप्रभृति हिंदी पुढाऱ्यांच्या चाललेल्या प्रयत्नास मोठाच अडथळा आला आहे. समाजाच्या धार्मिक व सामाजिक पुढाऱ्यांबरोबर बोलणें करण्यास हिंदु समाजसुधारकांना निर्वेध सवड दिली गेली असती तर हा प्रश्न शांततेन (अर्थात् कायमचा) व त्वरित सुटला असता. सामाजिक राजकीय अगर धार्मिक सुधारणेच्या बाबतींत सत्याग्रहाच्या साधनांवर आमचा कधींच विश्वास नव्हता."

***

केळकरांनीं तर तडजोड करण्याचे वेळींच, तडजोड फसली तरी, आपण सत्याग्रहांत सामील होणार नाहीं असे हडसून-खडसून सांगितले होतें. पण ज्या जमनालाल बजाज यांना 'सर्व्हंट ऑफ इंडिया'कार परस्पर सत्याग्रहाला प्रवृत्त करण्याचा उपव्याप करीत आहेत त्या जमनालाल बजाजांनीच ता. ३१ ऑक्टोबर रोजीं जाहीर विनंति लिहून सत्याग्रह करूं नका असे कळकळीनें विनविलें आहे. म्हणजे जमनालाल हे स्वतः तर सत्याग्रहांत सामील होत नाहीतच, पण सत्याग्रह कमिटीनेंहि हा सत्याग्रह सोडून द्यावा असे त्यांचें मत आहे. ते या विनंतिपत्रांत म्हणतात, "आज अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नाबद्दल हिंदु लोकांत जी कळकळ दिसून येत आहे ती कांहीं सत्याग्रहानें अगर निर्वाणीच्या खलित्यांनीं खास निर्माण झाली नाहीं. न्यायबुध्दीनें हिंदु समाजाचा विवेक जागृत करूनच हें परिवर्तन घडून आलें आहे. अशा परिस्थितींत अस्पृश्यांनीं कोठेंहि सत्याग्रह करणें हे माझ्या मतें अत्यंत अनुचित असें होईल. त्यायोगे सध्याचें अनुकूल वातावरण उधळून जाऊन उभय पक्षीं तेढ-द्वेष आणि दुराग्रह उत्पन्न होतील. आणि या गोष्टी उत्पन्न झाल्या म्हणजे या प्रश्नाचा समाधानकारक निकाल होणें कठीण होईल. माझ्या कमिटीसारख्या संस्थांचे मार्गहि बंद होतील. कारण एकीकडे ताबडतोब सत्याग्रह करणें व दुसरीकडे कांहीं मुदत घालून लोकांचें मन वळविणें हे दोन कार्यक्रम एकाच वेळीं चालणें कठीण आहे."

***

गेल्या ता. २९ च्या अंकांत आम्ही केसरींतील १९२७ २८ व २९ सालांतील उतारे देऊन अस्पृश्यतानिवारणासंबंधीं आम्ही पूर्वीपासून एकाच प्रकारचें मत कसें प्रतिपादन करीत आलों आहोंत हें दाखविलें होतें. या तीनहि सालांच्या पूर्वीचे दाखलेहि पुष्कळच मिळण्यासारखे आहेत. उदाहरणार्थ, दिवेकर-शास्त्र्यांनीं १९२० व २१ सालीं हिंदुधर्म परिषदेचे वेळीं केळकरांनीं हेच मत प्रतिपादन केल्याचा दाखला दिला आहे. त्याचप्रमाणें श्री. सकट यांनीं १९२२-२३ सालाच्या रा. गो. रा. हिंगणेकर यांनीं भरविलेल्या हिंदु समाजसभेंतील भाषणाचा दाखला दिला आहे. सुदैवानें या सभेच्या समग्र हकीकतीचें पत्रक आर्यभूषण प्रेसनें प्रसिद्ध केलें असून तें पांच आण्याला मिळतें. केळकरांचें हें भाषण महत्त्वाचें असल्यामुळें तें आम्ही जसेंच्या तसें पुढें उद्धृत करतों. श्री. केळकर म्हणाले कीं:—

"अस्पृश्यतानिवारणाचें व अंत्यजांना सार्वजनिक देवालयें खुलीं करण्याचें काम एकट्या ब्राह्मण जातीचेंच आहे असें नाहीं. ब्राह्मण जातीवर ही जबाबदारी टाकून मराठ्यांना निसटतां येणार नाहीं. मराठ्यांचाच समाज जास्त आहे. कांहीं देवळांचे पुजारी ब्राह्मण आहेत हें खरें; पण ब्राह्मणेतर गुरव जेथें पुजारी आहेत अशीं मारुतीचीं व इतर देवळें गांवोगांव आहेत. त्यांतून अंत्यजांचा प्रवेश करण्याकरितां मराठा जातीचे पुढारी काय करण्यास तयार आहेत ? ब्राह्मण लोक या कामीं पुढाकार घेतीलच व या कामीं इतर जातींच्या खास मागें राहणार नाहींत. मी या बाबतींत अशी विधायक सूचना पुढें मांडतों कीं, सार्वजनिक देवालयांत गाभाऱ्यांत मूर्तीपासून कांहीं अंतरावर एक आडवें दांडकें घालावें व या मर्यादेपर्यंतच सर्वांनीं जावें व पुजाऱ्याशिवाय दुसऱ्या कोणीच त्यापुढें देवाजवळ जाऊं नये. अंत्यजांनाहि जर आमच्याप्रमाणें देवाच्या मूर्तीपर्यंत येऊं द्याल व पायावर डोकें ठेवूं द्याल तरच आम्ही मूर्तीपर्यंत येऊं, नाहीं तर अंत्यजाबरोबर दुरूनच दर्शन घेत जाऊं असें म्हणून या बाबतींत स्वार्थत्याग करण्याचें ब्राह्मण समाजानें ठरवावें व ब्राह्मण जातीचे पुष्कळच लोक या गोष्टीस कबूल होतील अशी माझी खात्री आहे. देवळांचा प्रश्न सोडवितांना ब्राह्मण अगर ब्राह्मणेतर असे देवालयाचे जे कोणी पुजारी असतील त्यांचा वृत्तिछेद होऊं नये असें धोरण स्वीकारावें."

या सभेचे प्रवर्तक श्री. हिंगणेकर यांनीं या सभेंतील सर्व वादविवादाचा, निष्कर्ष व आपलें मत या पत्रकाचे शेवटीं दिलें आहे. त्यांत सार्वजनिक देवालयें या सदराखालीं ते लिहितातः—

"या बाबतींत रा. नरसोपंत केळकर यांची अशी सूचना आहे कीं, देवालयांत गाभाऱ्यामध्यें देवाच्या मूर्तीपासून थोड्या अंतरावर एक आडवें दांडकें घालावें व तेथपर्यंत अंत्यजांसुद्धां सर्वांनींच जाऊन देवदर्शन घ्यावें व त्याच्यापुढें कोणीच जाऊं नये व देवालयाच्या पुजाऱ्यांचा वृत्तिच्छेद करूं नये. रा. केळकर यांची ही सूचना मला पसंत असून या तडजोडीवर हा प्रश्न सुटावा असें मला वाटतें."

# वसाहतीच्या स्वराज्याची व्यापकता

व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनीं ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या संमतीनें हिंदुस्थानास जें वसाहतीचें स्वराज्य देण्याचा संकल्प जाहीर केला त्या वसाहतीच्या स्वराज्याची मागणी आपण १९०५ सालापासून कशी करीत आहों आणि ब्रिटिश सरकारनें १९१७ सालच्या जाहिरनाम्यांतच या देशाला वसाहतीचें स्वराज्य देण्याची प्रस्तावना कशी केली याचें सिंहावलोकन आम्ही पूर्वी केलेंच आहे.त्यावरून आजच्या जाहिरनाम्यांत ध्येयाच्या दृष्टीनें तरी नवें असें कांहींच नाहीं हें खरें.तथापि गूढ अभिवचनाचाच का होईना पण स्पष्ट पुनरुच्चार करण्यांतहि कांहीं महत्त्व असतें. विशेषतः जी वस्तु देऊं केली तिची किंमत जर चढती-वाढती असली तर त्या दृष्टीनें नवीन अभिवचनाला कालांतरानें अधिक महत्त्व येणार हेंहि उघडच आहे.अर्थातच या दोनहि दृष्टींनीं १९१७च्या जाहिरनाम्याची नव्या जाहिरनाम्याशीं तुलना करून नव्या जाहिरनाम्यानें कोणकोणत्या गोष्टींचा अधिक खुलासा झाला तें पाहूं.

१९१७ च्या जाहिरनाम्यांत ' जबाबदार राज्यपद्धति ' असाच शब्दप्रयोग होता 'वसाहतीचें स्वराज्य' असा शब्दप्रयोग नव्हता, त्यामुळें शंका घेण्यास सगळे रान मोकळें सांपडलें.त्या वेळचे मुख्य प्रधान लॉईड जॉर्ज यांनीं परवांच्या पार्लमेंटरी वादविवादांत बिनदिक्कतपणें सांगितलें कीं,त्या वेळीं आपण 'वसाहतीचे स्वराज्य' हे शब्द मुद्दाम टाळले होते. त्याचप्रमाणें माजी व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग यांनींहि आपला कपटभाव उघड करून मोठ्या दिमाखानें सांगून टाकलें कीं, मी माझ्या कारकीर्दींत 'वसाहतीचें स्वराज्य' हा शब्द एकदांदेखील चुकून सुद्धां वापरला नाहीं! ज्याअर्थी असले दोघे जाडे कायदेपंडित 'जबाबदार राज्यपद्धति' आणि 'वसाहतीचें स्वराज्य' या दोहोंत इतका फरक समजतात त्याअर्थी त्यांत कांहीं तरी अंतर असलेंच पाहिजे याविषयीं संशय नाहीं, आणि अभिवचन देणाऱ्याच्या हेतूकडे किंवा शब्दाच्या लक्षणेकडे न पाहतां केवळ वाच्यार्थाकडेच पाहूं लागल्यास या दोन शब्दांत तसा थोडासा फरक आहे, ही गोष्ट कोणासहि नाकबूल करतां येणार नाहीं. जबाबदार राज्यपध्दतींत कायदेमंडळाच्या संमतीविना देशांतला राज्यकारभार चालू शकत नाहीं, आणि कार्यकारी मंडळ हें आपल्या प्रत्येक कृत्याबद्दल कायदेमंडळास जाब देण्यास बांधलें गेलें असतें. तथापि कायदेमंडळाच्या अधिकाराची व्याप्ति किती असावी याचा कांहींच खुलासा 'जबाबदार राज्यपद्धति' या शब्दप्रयोगानें होत नाहीं. जबाबदार राज्यपद्धतीचा वाद कायदेमंडळ व कार्यकारी मंडळ यांच्या दरम्यानचा आहे. पण या दोघांच्याहि डोक्यावर बसलेलें जें साम्राज्य-सरकार त्याचा अधिकार अंतर्गत कारभारांत कितीसा चालावा याचा खुलासा 'जबाबदार राज्यपद्धति' या शब्दानें होत नाहीं. पण तो 'वसाहतीचें स्वराज्य' या शब्दानें होतो. आणि हा सूक्ष्म श्लेष लक्षांत ठेवूनच लॉईड जॉर्ज व लॉर्ड रेडिंग यांनीं १९१७ पासून आतांपर्यंत 'डोमीनियन स्टेटस' हा शब्द हिंदुस्थानाला अनुलक्षून एकदांदेखील वापरला नाहीं; आणि त्यांचा हा प्रच्छन्न मतलब सर माल्कम हेले यांच्या असेंब्लींतील भाषणानें उघडकीस आला.

१९२४ सालीं असेंब्लींतील वादविवादाच्या वेळीं हेले यांनीं मनकवडेपणा करून १९१७ च्या जाहिरनाम्याच्या किंवा १९१९ च्या आक्टाच्या सरनाम्याच्या वेळीं 'डोमीनियन स्टेट्स'ची कल्पनादेखील नव्हती असें जें ठासून सांगितलें तो मात्र शुद्ध कांगावा होता. कारण तत्पूर्वींच राष्ट्रसंघांत हिंदुस्थानाचा प्रवेश होण्याच्या वेळीं राष्ट्रसंघापुढें ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं अशी स्पष्ट कबुली दिली होती कीं, हिंदुस्थान हाहि देश लवकरच ब्रिटिश साम्राज्यांतला स्वायत्त घटक व भागीदार असा होणार आहे आणि त्या कबुलीवर विश्वास ठेवूनच राष्ट्रसंघानें हिंदुस्थानाला आपल्या संघांत सभासद म्हणून प्रविष्ट करून घेतलें. अर्थातच गेलीं ९ वर्षें जर हिंदुस्थान देश राष्ट्रसंघाचा एक घटक म्हणून वावरत आहे तर व्हाइसरॉयांच्या नव्या जाहिरनाम्यानेंच त्याला स्वायत्त वसाहतीचा दर्जा प्राप्त

झाला असें म्हणणें भ्रामक नव्हे काय? तथापि जा गोष्ट मोघम होती ती स्पष्ट झाली, जो दर्जा अनुमानानें सिद्ध करावा लागत होता तो जाहीर घोषणेने प्रसिध्द झाला आणि ज्या 'डोमीनियन स्टेटस' च्या भूमिकेविषयीं लॉईड जॉर्ज, बर्कनेहेड, रेडिंग, हेलेप्रभृति हिंदद्वेष्टे संशय प्रदर्शित करीत होते ती भूमिका संशयातीत झाली हेंहि एका अर्थी बरेंच झाले. कोर्टातील पुराव्याच्या कायद्याच्या भाषेत बोलावयाचें झाल्यास आजपर्यंत जी गोष्ट हिंदी लोकांना पुराव्यानें सिध्द करावी लागत होती ती यापुढें कोर्टाला स्वतःसिद्ध मानावी लागणार एवढा तरी फरक या जाहीर घोषणेने निस्संशय घडवून आणला.

परंतु दुसऱ्या एका दृष्टीनें हिंदुस्थानाला 'डोमीनियन स्टेटस' देण्याची जाहीर घोषणा या वेळीं करण्यांत आणखीहि विशेष स्वारस्य आहे. १९१७ सालीं 'डोमीनियन स्टेटस' हे शब्द न वापरतां 'रिस्पॉन्सिबल गव्हर्मेंट' हे शब्द वापरण्याचें कारण असें कीं त्या वेळीं 'डोमीनियन स्टेटस' हा शब्द तितका रूढ नव्हता. त्या वेळी महायुद्ध चालू असल्याने साम्राज्यांतील घटकांचे परस्परांशीं संबंध कसे असावेत हें ठरवीत बसण्याची ती वेळ नव्हती. पण युद्धसमाप्ति होतांच ब्रिटिश वसाहतींनी हा प्रश्न उकरून काढला आणि आयर्लंडाच्या तहाच्या वेळीं तर हा प्रश्न बराच धसास लागला. त्या वेळेपासून या प्रश्नाची चर्चा होतां होतां १९२६ सालच्या साम्राज्य परिषदेत 'डोमीनियन स्टेटस' याची व्याख्या अशी ठरविण्यांत आली कीं, "डोमीनियन्स म्हणजे ब्रिटिश साम्राज्यांतर्गत स्वायत्त राष्ट्रे.ब्रिटिश साम्राज्याविषयींच्या व बादशहांविषयींच्या राजनिष्ठेने हे सर्व घटक परस्परांशी संबद्ध असले तरी संघांतील प्रत्येक घटकाचा दर्जा इतर घटकांशी सर्वथैव समानतेचा असल्यानें अंतर्गत व परराष्ट्रीय बाबतींतहि परस्परांची परस्परांवर हुकमत चालणार नाहीं." 'डोमीनियन स्टेटस' शब्दाला आज जो हा व्यापक अर्थ आला आहे तसा अर्थ १९१७ सालीं त्या शब्दांस आला नव्हता. अंतर्गत स्वायत्तता त्या वेळींहि सर्वमान्य झाली होती. परंतु परराष्ट्रीय व्यवहारांतहि एकाचा दुसऱ्यावर अंमल चालावयाचा नाहीं ही कल्पना त्या वेळीं ब्रिटिश मंत्रिमंडळाला कबूल नव्हती. परंतु महायुद्धसमाप्तीपासून आणि विशेषतः राष्ट्रसंघांत सैन्य व आरमार यांच्या नियंत्रणाची चर्चा चालू झाल्यापासून ब्रिटिश वसाहतींनीं आपल्या हक्कांचें घोडें पुढें दामटलें. आणि लोकार्नोच्या पॅक्टच्या वेळीं तर वसाहतींनीं ब्रिटिश मंत्रिमंडळास स्पष्ट बजावलें कीं,आमच्या संमतीशिवाय जर कोणत्याहि राष्ट्राशीं तुम्ही तहनामा केला व त्यामुळें युद्ध उपस्थित झालें तर आम्ही वसाहती त्या युध्दांत भाग न घेतां तटस्थ राहूं.

स्वायत्त वसाहतीची ही धमकी पोकळ नसून तिची अनेक वेळां अंमलबजावणीहि झाली आहे. शिवाय गेल्या महिन्यांत लंडन शहरीं जी एक 'डोमीनियन लॉज कॉन्फरन्स' भरली होती तिच्यापुढें ज्या प्रश्नांची वाटाघाट झाली त्यांवरून गेल्या बारा वर्षांत 'डोमीनियन स्टेटस' चा दर्जा किती वाढला आहे त्याचें प्रत्यतर पाहावयास सांपडतें. त्या परिषदेंत वादाचा पहिला प्रश्न असा निघाला कीं, स्वायत्त वसाहतींतील पार्लमेंट जो कोणताहि कायदा पास करील त्यावर बादशहांच्या 'व्हेटो'चें नियंत्रण चालू न ठेवतां बादशहाचा हा व्हेटोचाहि अधिकार काढून टाकण्यांत यावा ! परंतु तसा ठराव त्या परिषदेंत पास झाला नाही. तथापि तो ठराव पास न करण्यासाठीं जे कारण सांगण्यांत आलें तें मननीय आहे. बादशहांच्या वतीनें असे सांगण्यांत आलें कीं, "अहो, हा व्हेटोचा अधिकार उगाच नांवादाखल आहे; याचा आजपर्यंत कधीं प्रयोग करण्यांत आला नाहीं व पुढेंहि कधीं प्रयोग होणार नाही; मग उगाच शाब्दिक अधिकाराबद्दल वितंडवाद कशाला ?" अशी मखलाशी केल्यामुळें व्हेटोचा अधिकार कायम राहिला. त्यानंतर दुसरा प्रश्न असा उपस्थित करण्यांत आला कीं, वसाहतींची संमति न घेता इंग्लंडाने एखाद्या राष्ट्राशीं युद्ध सुरू केले तर वसाहती त्या राष्ट्राशीं तटस्थ या नात्यानें वागूं शकतील कीं नाहीं ? या प्रश्नाचा निकालहि यापूर्वींच झाल्यासारखा आहे.

युद्धसमाप्तीनंतर तुर्कस्थानाशीं तहाची वाटाघाट चालू असतां दार्दानेलीससंबंधाने भानगड उपस्थित झाली आणि लॉईड जॉर्ज यांनीं तलवार उपसण्याची धमकी दिली ! त्याबरोबर कानडा व आस्ट्रेलिया या वसाहतींनीं प्रधानमंडळास चक्क बजावलें कीं, तुम्ही आमचें मत न घेतां हे युद्ध उपस्थित करीत असल्याने आम्ही या युद्धांत मदत करणार नाहीं. प्रत्यक्ष मदत न करणें आणि तटस्थपणा जाहीर करणे यांत थोडेसें अंतर आहे खरें. परंतु १९२० सालापासून १९२९ सालापर्यंतच्या ९वर्षांत वसाहतींनी तेवढेहि अंतर गांठले असल्याने तसा स्पष्ट ठराव करण्याविषयीं लंडनच्या परिषदेत भवति न भवति झाली. अखेरीस असें ठरलें कीं, "सध्या लष्कर व आरमार कमी करण्याचा आणि राष्ट्राराष्ट्रांत उपस्थित झालेला वाद पंचायतीमार्फत तोडण्याचा विचार चालू असल्याने युद्धाची संभवनीयता अगदीं कमी झाली आहे. अशा वेळीं हा वाद उकरून काढल्यानें

राष्ट्रसंघाच्या कार्यांत व्यत्यय येण्याचा संभव असल्यामुळें तूर्त हा विचार तहकूब ठेवावा."

या चर्चेवरून निर्भेळ स्वातंत्र्य आणि साम्राज्यान्तर्गत डोमीनियन स्टेटस यांत वास्तविक अंतर किती थोडें राहिलें आहे, तें वाचकांच्या ध्यानीं आलेंच असेल. असो. सांगण्याचा मतलब एवढाच कीं, 'डोमीनियन स्टेटस' या शब्दांना १९२९ सालीं जी व्यापकता आली आहे तशी व्यापकता १९१७ सालीं आलेली नव्हती. अर्थातच त्या वेळच्या जाहिरनाम्यांत 'डोमीनियन स्टेटस' असे प्रत्यक्ष शब्द योजिले असते तरी देखील सर माल्कम हेल्यासारखे वावदूक असा वाद सांगण्यास सिध्द झालेच असते कीं, हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस देऊं पण इ.स. १९१७ सालीं त्याची जेवढी व्याप्ति होती तेवढयापुरतेंच देऊं. कारण अभिवचन देतांना त्या शब्दाचा जो अर्थ होता तेवढयालाच आम्ही बांधलों गेलो आहों! परंतु लॉर्ड आयर्विन यांनीं १९२९ च्या ऑक्टोबरमधील लंडनमधील परिषदेनंतर हा शब्द योजला असल्यामुळे त्याच्या अर्थाच्या व्यापकपणाविषयींची साशंकता आपोआपच दूर झाली हाहि एक या जाहीर घोषणेने फायदाच झाला.

या जाहीर घोषणेवर 'मूले कुठारः' अशा स्वरूपाचा आणखी एक आक्षेप घेण्यात येतो. तो असा की, डोमीनियन स्टेटसची बडेजावी कितीहि वाखाणली तरी हा अधिकार किती दिवसांत मिळणार याचा जोपर्यंत निर्णय ठरत नाहीं तोंपर्यंत या अभिवचनास फुटक्या कवडीचीहि किंमत नाहीं. उपासमारीनें मरू घातलेल्या एखाद्या भिकाऱ्यास तुला राज्यावर बसविणार आहे असें मोघम आश्वासन दिलें तरी त्याचा त्यास काय उपयोग? त्या आश्वासनाने त्याच्या पोटांतली भुकेची आग थोडीच शांत होणार आहे? ही शंका रास्त आहे; पण तिचा परिहार कसा करावयाचा याचा विचार करण्यासाठीं तरी तें आश्वासन देणाऱ्यांशींच वाटाघाट करावी लागणार ! डोमीनियन स्टेटस देणार म्हणता खरें; पण हें खरें कशावरून ? १८३३ पासून १९२९ पर्यंत, म्हणजे जवळ जवळ शंभर वर्षांत वेळोवेळीं जीं आश्वासनें देण्यांत आलीं तीं आजपर्यंत कितपत पाळण्यांत आलीं आहेत ? आतांपर्यंतचा नोकरशाहीचा वर्तनक्रम पाहिल्यास वचनभंग हाच मामुलीक्रम असून वचन पाळणें हा अपवादच होय, असें आढळेल. तस्मात् याहि आश्वासनाविषयीं जनतेचीं मनें साशंकच असणार आणि त्याचसाठीं दिल्ली येथें जमलेल्या पुढाऱ्यांनीं कांहीं अटी घालून सरकारचा दृष्टिकोन बदलला आहे कीं नाहीं याची कसोटी पाहण्याचें ठरविलें आहे. त्या अटींची वाटाघाट वर्किंग कमिटीच्या बैठकींत ता. १६ रोजीं आणि दिल्लीच्या जाहीर पत्रकावर सह्या करणाऱ्या पुढाऱ्यांच्या बैठकींत ता. १८ रोजीं होणार आहे. सबब त्या संबंधानें विस्तृत चर्चा मागाहून करूं.

पण समजा कीं, सरकारचा दृष्टिकोन बदलल्याची खात्री पटली, परंतु डोमीनियन स्टेटसचा पूर्णाधिकार मिळण्यास कालावधि लागणार असें निश्चित झालें; अशा परिस्थितींत डोमीनियन स्टेटस हिंदुस्थानाला देणार आहों या अभिवचनाचा उपयोग कांहीं आहे का नाहीं ? सरकारच्या दृष्टीनें त्याचा उपयोग आहे म्हणून तर सरकारने इतक्या घाईनें ही घोषणा केली. कारण साम्राज्यान्तर्गत स्वराज्य न मिळेल तर साम्राज्य सोडून बाहेर जाऊं असा संकेतार्थी ठराव करणाऱ्यांस आपलेकडे वळविण्याचा सरकारचा हेतु यांत स्पष्ट आहे. परंतु एवढ्या आश्वासनावर विसंबून राहण्यापासून प्रजेला आज लाभ काय? याचें उत्तर देतांना सरकारचा प्रामाणिकपणा गृहीत धरूनच विचार करावा लागेल. सरकारचा हा प्रयत्न प्रामाणिकपणाचा आहे अशी खात्री करून घेण्यासाठीं ज्याला जी कसोटी सुचेल ती त्यानें लावून पाहावी; आणि त्या कसोटीला सरकारचें वर्तन न उतरेल तर दाही वाटा मोकळ्याच आहेत. अर्थातच त्यांची चर्चा अशा वेळीं करणे अप्रस्तुत होय.

वसाहतीचा दर्जा हिंदुस्थानाला देण्याची मनःपूर्वक इच्छा आहे; मात्र तसे सर्वाधिकार आज देतां येत नाहींत असें जर सरकार म्हणेल तर, वसाहतीचा दर्जा हिंदुस्थानास आज ना उद्यां आम्ही देणार आहों अशी घोषणा तरी आजच कां केली असा प्रश्न विचारावासा वाटतो. त्यास उत्तर असे देतां येईल कीं, एखाद्या इसमास प्राप्त होणारा दर्जा आणि त्याची प्रत्यक्ष अधिकारप्राप्ति यांत कालावधि असल्यास उच्च दर्जा प्राप्त होण्याची जाहीर घोषणा आगाऊ केल्यास त्यापासून नुकसान नसून उलट त्यामुळें अनेक भानगडी मिटत असल्यानें फायदाच होतो. राजाचा ज्येष्ठ पुत्र पुढें राजा व्हावयाचा असला तरी प्रत्यक्ष गादीवर बसेपर्यंत त्याला वस्तुतः अधिकार कांहींच नसतो. तथापि त्याला युवराज म्हणून संबोधल्यानें भावी जबाबदारी पार पाडण्याची पूर्वतयारी करण्याकडे त्याचें स्वतःचें लक्ष वेधतें आणि राज्यांतील सर्व कामगार त्याजकडे भावी राजा या दृष्टीनें पाहूं लागतात. हाच न्याय हिंदुस्थानास लागू केल्यास वसाहतीच्या स्वराज्याची जाहीर घोषणा ही हिंदी लोकांस आपली स्वराज्य चालविण्याची पात्रता वाढवून पूर्व-तयारी करण्याची तर

सूचना आहेच; पण त्याबरोबरच लॉईड जॉर्ज यांनीं 'पोलादी चौकट' म्हणून संबोधिलेल्या नोकरशाहीसहि ती एक प्रकारची नोटीसच आहे! या नोटिशीचा अर्थ असा कीं, हिंदी लोक हे आपल्या स्वराज्याचे पूर्ण मालक असून आज ना उद्यां स्वराज्याचे सर्व अधिकार त्यांच्याच हातांत जावयाचे आहेत. तेव्हां त्यांचा हा भावी दर्जा ओळखून तुम्ही खरे 'सिव्हिल सर्व्हंट' व्हा. आजमितीला नाथाच्या घरांतल्याप्रमाणे असा उलटा न्याय आहे कीं, 'इंडियन सिव्हिल सर्व्हंट' म्हटला जाणारा कामगार इंडियन नसतो, सिव्हिल म्हणजे सभ्य नसतो आणि सर्व्हंटाप्रमाणें तर मुळीच वागत नसून मालकाच्याच डोक्यावर तो मिरीं वाटत असतो! ही स्थिति एकदोन दिवसांत बदलूं शकत नाहीं. परंतु सरकारचें जर एकदां धोरण ठरलें कीं, यापुढें हिंदी लोक हेच खरे राज्याचे मालक आणि आपण केवळ त्यांचे मुनीम आहों तर हिंदुस्थानातील कारभाराचे सुकाणूं ब्रिटिश लोकांच्या दृष्टीने न चालवितां हिंदी लोकांच्या हिताच्या दृष्टीनें चालवा असें आजपासूनच हक्कानें म्हणतां येईल. मात्र ही जाहीर घोषणा करण्यांत सरकारचा हेतु प्रामाणिकपणाचा आहे अशी जनतेची खात्री पटली पाहिजे. ती खात्री पटण्यासाठीं स्वतः सरकार काय करणार?

# स्फुट सूचना

१ नागपूर प्रांताचे सीनियर एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर रा. तांबे यांना, नागपूरचे गव्हर्नर सर मॉंटेग्यु बटलर यांच्या तीन महिन्यांच्या रजेच्या मुदतींत, विलायत–सरकाराकडून नागपूर प्रांताचे गव्हर्नर नेमल्याचें सरकारी रीत्या प्रसिद्ध झालें आहे. रा. तांबे हे नागपूर प्रांताच्या कायदे-कौन्सिलांत लोकनियुक्त सभासद म्हणून शिरले, आणि कौन्सिलाचा अध्यक्ष त्याच्या सभासदांनींच निवडून देण्याचा अधिकार मिळाला तेव्हां, त्यांची निवडणूक अध्यक्षाच्या जागीं झाली. नागपूर प्रांताच्या कौन्सिलाचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष होण्याचा मान रा. तांबे यांना मिळाल्यावर कांहीं दिवसांनीं, सर मोरोपंत जोशी यांच्या जागीं एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर म्हणून रा. तांबे यांची नेमणूक करण्यांत आली. त्या जागेवर त्यांनीं सुमारें ४ वर्षे काम केल्यावर, ते सीनियर एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर असल्यामुळें, ॲक्टिंग गव्हर्नरीचा हा मान त्यांना मिळणें हें स्वाभाविक होतें. किंबहुना या जागीं त्यांची नेमणूक सरकारनें न करतां, त्यांच्याहून मानानें कनिष्ठ अशा गोऱ्या सिव्हिलियन एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलराची नेमणूक केली असती, तर तो मोठाच अन्याय झाला असता. अशा प्रकारचा अन्याय सरकार मधून मधून करीत असतें हें प्रसिध्दच आहे. पण या प्रसंगीं तो झाला नाहीं याचें कारण हल्लींचें राजकीय वातावरण, व त्यांतूनहि भारतमंत्री वेजवुड बेन यांची समयज्ञता हें होय.



रा. तांबे.

२ स्वराज्याच्या चळवळीपैकीं एक निश्चित मागणी ही आहे की, हिंदुस्थानांत वरिष्ठ पगाराच्या, मानाच्या व अधिकाराच्या ज्या सर्व जागा आहेत त्या होतां होईतों हिंदी लोकांनांच मिळाल्या पाहिजेत. आणि जर या जागा हिंदी लोकांना मिळल्या पाहिजेत तर त्या दिल्या असतां घेण्याला हिंदी लोकहि तयार पाहिजेत. अर्थात् त्यांतल्या त्यांत अधिक नशीबवान असे जे गृहस्थ असतील त्यांना त्या मिळाल्यास, त्यांनीं त्या स्वीकारून आपल्या कर्तृत्वाचें व बुद्धि—सामर्थ्याचें तेज दाखवून लोकसेवा केली पाहिजे, व हिंदी लोकांना नालायक म्हणणाऱ्या सरकाराच्या तोंडाला खीळ घातली पाहिजे. आतां राजकारण व राष्ट्रीय चळवळ या यशस्वी करण्याची जरूरी, आजच्या घटकेला सरकारी नोकरी यशस्वी करून दाखविण्यापेक्षांहि, अधिक असल्यामुळें, त्यांतल्या त्यांत जे अधिक बुद्धिवान व कर्तृत्वसंपन्न हिंदी लोक असतील त्यांनीं, अशा जागा पत्करून पगार व बहुमान मिळविण्यापेक्षां, स्वार्थत्यागपूर्वक आपल्या सर्व शक्तीचा उपयोग राजकारणाला व राष्ट्रीय चळवळीला करून दिला तर तें अधिक भूषणास्पद हें कोणीहि म्हणेल. परंतु त्याबरोबर हेहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, 'नोकरीवाले' या अपमानास्पद नांवानें दुसऱ्याला नांवें ठेवणाऱ्या लोकांत असे किती तरी नादान लोक असतात कीं, यांना दुसऱ्याला नांवें ठेवण्याहून आधिक चांगली गोष्ट करण्याची अक्कलच अंगीं नसते. तात्पर्य, अधिकाराच्या जागांचें हिंदीकरण हा जो स्वराज्याच्या चळवळींतला एक भाग आहे त्या दृष्टीनें हा श्रेष्ठ मान रा. तांबे यांना मिळाला याबद्दल त्यांचें अभिनंदन करणें योग्य आहे.

# वसाहतींचें स्वराज्य आणि हिंदी संस्थानें

ता. ३१ आक्टोबरचा व्हाइसरॉयांचा जाहिरनामा प्रसिद्ध झाल्यापासून हिंदुस्थानाच्या संस्थानेतर भागांतील नागरिकांचें लक्ष त्या जाहिरनाम्यांतील दोनच गोष्टींकडे वेधून राहिलें. वसाहतीच्या स्वराज्याचा दर्जा आणि राऊंड टेबल कॉन्फरन्सचें आमिष याचाच सर्वत्र गाजावाजा चालू आहे. परंतु या जाहिरनाम्यांत तिसरीहि एक सूचक अशी नवी गोष्ट आहे. ती म्हणजे, नव्या राज्यघटनेंत हिंदी संस्थानांचाहि समावेश व्हावयाचा असून राऊंड टेबल कॉन्फरन्सकरितां हिंदी संस्थानांच्यहि प्रतिनिधींना निमंत्रण देण्यांत येणार आहे, ही होय. या मुद्दयाकडे पुढाऱ्यांचें लक्ष तितकेसें न वेधण्याला तशींच कांहीं सबळ कारणें आहेत. संस्थानांतील प्रजाजनांच्या पुढाऱ्यांना वाटलें कीं, बटलर कमिटीच्या चौकशीच्या वेळीं ज्या प्रमाणें केवळ संस्थानिकांच्या वतीनेंच सगळ्या साक्षी झाल्या, प्रजापरिषदांच्या प्रतिनिधींनीं साक्ष देऊं केली तरी ती घेण्यांत आली नाहीं, तसाच प्रकार पुनः या वेळींहि होईल, आणि संस्थानिकांचा दर्जा व त्यांचे ब्रिटिश सरकाराशीं संबंध, एवढयाच मुद्दयांची राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें वाटाघाट केली जाईल. यास्तव संस्थानी प्रजेला यांत लभ्यांश कांहींच नाहीं; आणि ज्याअर्थी संस्थानिकांनींहि आपल्या संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू केलीच पाहिजे अशी खडखडीत ताकीद ब्रिटिश सरकार या संस्थानिकांना देऊं इच्छीत नाहीं त्या अर्थी या राऊंड टेबल कॉन्फरन्सचा संस्थानी प्रजेला विचार करून तरी काय प्राप्ति होणार! अर्थातच राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें केवळ संस्थानिकांचेच प्रतिनिधी न बोलावतां प्रजा पक्षाचेहि प्रतिनिधी बोलवावे अशा आशयाची विनंतीवजा तार प्रधान मंडळाकडे पाठविण्याखेरीज संस्थानी प्रजेला या बाबतींत कांहींच करतां येण्याजोगें नाहीं, असें संस्थानी प्रजेच्या पुढाऱ्यांचें मत झालें असावें.

संस्थानेतर भागांतील पुढाऱ्यांना तर संस्थानिकांचें प्रतिनिधी रांउड टेबल कॉन्फरन्समध्यें येणार हें ऐकून हर्ष होण्याच्या ऐवजीं सकृद्दर्शनीं विषादच वाटणार. कारण हे संस्थानिक म्हणजे बोलून चालून स्वराज्याच्या चळवळीचे विरोधक. १९०५ सालापासून, म्हणजे स्वराज्याच्या चळवळीस सुरुवात झाल्या वेळेपासून, ही चळवळ हाणून पाडण्याकरितां प्रत्यक्ष ब्युरॉक्रसीनें जितका अट्टाहास केला नसेल तितका या संस्थानिकांनीं केला आणि अद्यापीहि त्यांचा विरोध नाहींसा झाला आहे असें नाहीं. आयर्लंडच्या होमरूलच्या चळवळीला अल्स्टर प्रांतानें जितका निकरानें विरोध केला तितक्याच निकरानें कित्येक संस्थानिकांनींहि हिंदुस्थानांतील स्वराज्याच्या चळवळीला विरोध केल्यामुळे १९११ सालापासून हे संस्थानिक म्हणजे हिंदुस्थानांतील अल्स्टरवालेच होत अशीच खूणगांठ हिंदी होमरूलवाल्यांनीं आपल्या मनांत बांधून ठेवली. एवढेंच नव्हे तर आयर्लंडांतले अल्स्टर एक वेळ पुरवलें, पण हें हिंदी अल्स्टर नको, असेंच प्रत्येक पुढाऱ्यास वाटत असे. कारण आयर्लंडांतला अल्स्टरचा भाग एकत्र सलग असल्यानें तेवढा भाग वगळून बाकीच्या आयर्लंडला तरी होमरूल देतां आलें. परंतु हिंदुस्थानांतलीं हीं संस्थानें इतस्ततः पसरलीं असल्यामुळें संस्थाने वगळून बाकीच्या हिंदुस्थानाला स्वराज्य ( डोमीनियन स्टेटस ) देऊं असें म्हटल्यास तें अशक्यप्राय असल्यानें संस्थानिकांचें शल्य आपणास कायमचें भोवतें कीं काय, अशी कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना अद्यापहि धास्ती वाटत आहे.

अशा परिस्थितींत राउंड टेबल कॉन्फरन्सकरितां ब्रिटिश इंडियांतील पुढाऱ्यांबरोबरच संस्थानिकांच्या प्रतिनिधींनाहि पाचारण करण्याचा संकल्प सुटलेला ऐकल्यानें संस्थानेतर भागांतील पुढाऱ्यांना हर्ष न वाटतां विषादच वाटावा हें स्वाभाविकच आहे कारण संस्थानिकांचें हे प्रतिनिधी वाटोळ्या मेजाभोंवतीं बसले असतां, हिंदी पुढाऱ्यांच्या मागणीला दुजोरा देऊन ब्रिटिश मंत्रिमंडळाला नामोहरम करण्याच्या ऐवजीं मंत्रिमंडळाशीं संगनमत करून संस्थानेतर पुढाऱ्यांच्या पायांत मात्र खोड्याप्रमाणें नसते अडथळे उत्पन्न करतील. यामुळेंच राऊंड टेबल कॉन्फरन्समध्यें संस्थानांच्या प्रतिनिधींचा समावेश होणार हे ऐकून संस्थानी प्रजेच्या पुढाऱ्यांना किंवा संस्थानेतर भागांतल्या राजकीय पुढाऱ्यांना त्यांत कांहीं विशेष रहस्य आहे असें न वाटतां उलट एक प्रकारची धाकधुकच वाटूं लागली.

पण हा केवळ वरवरचा विचार झाला. याच्या बुडाशीं जाऊन यांतील अंतस्थ मर्म शोधून काढल्यास यांतहि कांहीं आशेच्या किरणाला जागा आहे असेंच कोणासहि दिसून येईल. अल्स्टरवाले संस्थानिक हे स्वराज्यवाद्यांच्या पायांत खोड्याप्रमाणें बसून त्यांच्या प्रगतीस अडथळा करूं शकतात हें खरें. पण लाकडाच्या खोड्याइतकेंच

हेहि स्वतः निर्जीव आहेत यांत शंका नाहीं. खोडा जसा आपण होऊन कोणाच्या पायांत जाऊन बसत नाहीं त्याचप्रमाणें हे संस्थानिकहि आपण होऊन स्वराज्याला विरोध करतात असें थोडेंच आहे. याचा सगळा विरोध नोकरशाहीच्या नेत्रकटाक्षावर अवलंबून असल्यामुळे नोकरशाहीनेंच स्वराज्याचा विरोध सोडून दिला कीं संस्थानिकाचाहि विरोध मावळलाच. १९०८ सालची हिंदी संस्थानिकांची वृत्ति आणि आजची वृत्ति यांत केवढें जमीन-अस्मानाचें अंतर पडलें आहे बरें? आजकालच्या एकेका संस्थानिकाचें भाषण वाचून 'प्रातिनिधिक राज्यपद्धति' या ग्रंथाचा कर्ता जॉन स्टुअर्ट मिल्ल हाहि थक्क होऊन जाईल! संस्थानिकांच्या भाषणांत अलीकडे इतका अघळपघळपणा कां आला? तर ब्युरॉक्रसीनें स्वतःच हिंदी लोकांना स्वराज्य देण्यास काढलें म्हणून ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्याची चळवळ दडपून टाकण्याकरितां ज्या वेळीं नोकरशाहीनें महाकाळीचा अवतार धारण केला होता, त्या वेळीं त्या चळवळीचें नरडें दाबून टाकण्याकरितां याच भुतावेताळांचा केवढा धिंगाणा चालू होता! परंतु स्वराज्यवाद्यांच्या तपश्चर्येनें प्रसन्न होऊन त्याच महाकाळीनें सौम्य स्वरूप धारण करून वर देण्याकरितां हात वर करण्याबरोबर, तेच भूतवेताळ स्वराज्यवादी भक्तांची सेवा करण्यासहि तयार झालेले आढळून येऊं लागले. सारांश, आयरिश अल्स्टरवाल्यांत जें सामर्थ्य, जो कणखरपणा व जो आत्मप्रत्यय दिसून आला त्याच्या शतांशहि हिंदुस्थानांतल्या या अल्स्टरवाल्यांच्या अंगीं नाहीं.

हे संस्थानिक पोलिटिकल खात्यांतील नोकरशाहीच्या डोळ्यास डोळा देऊन वागणारे असल्यानें, ज्या राऊंड टेबल कॉन्फरन्समध्यें स्वतः प्रधानमंत्री मॅकडोनाल्ड व भारतमंत्री वेजवुड बेन किंवा त्यांचे प्रतिनिधी हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस देऊं करून त्याची घटना कशी असावी याची चर्चा करण्यास बसतील त्या कॉन्फरन्समध्यें हे अल्स्टरवाले स्वराज्याला कसला विरोध करूं शकणार? अर्थातच ब्रिटिश हिंदुस्थानाला स्वराज्य देऊं नका असें म्हणून अडवणूक करण्याचें धाडस हे करूं शकणार नाहींत. कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी राउंड टेबल कान्फरन्समधील त्यांचें प्रतिनिधित्व स्वराज्यवाद्यांना लोढण्यासारखें पदोपदीं अडवील ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं. यांच्या अडवणुकीची कमाल मजल निर्भेळ स्वातंत्र्यापर्यंतच जाऊं शकेल. साम्राज्यांतून फुटून बाहेर पडण्याची भाषा ते स्वतः कधींहि बोलणार नाहींत, आणि इतर कोणालाहि ते तशी भाषा तोंडांतून काढूं देणार नाहींत एवढें निश्चित. परंतु डोमीनियन स्टेटसचा दर्जा मान्य करून वाटाघाटीस जाणारे हिंदी प्रतिनिधी निर्भेळ स्वातंत्र्याची वाटाघाट तेथें कशाला करतील आणि ज्यांना निर्भेळ स्वातंत्र्य हेंच आजचें ध्येय मानावयाचें असेल ते प्रतिनिधी लंडनला जातील तरी कशाला? सारांश, ब्रिटिश हिंदुस्थानातील 'डोमीनियन स्टेटस'वाल्यांच्या दृष्टीनें हिंदी संस्थानिकांचा तांडा जरी राउंड टेबल कान्फरन्समध्यें येऊन बसला तरी त्यापासून कार्यहानि होण्याची फारशी भीति नाहीं.

आता संस्थानांत प्रजापक्षाच्या दृष्टीनें विचार केल्यास या संस्थनिकांचें राउंड टेबल कॉन्फरन्स मध्यें हजर राहणें कितपत श्रेयस्कर ठरेल ते पाहूं. या प्रश्नाचें उत्तरहि निराशाजनक देण्याचें कारण नाहीं. आज ज्याप्रमाणें ब्रिटिश सरकारानें ब्रिटिश हिंदुस्थानास डोमीनियन स्टेटसचें अभिवचन दिलें आहे तसलेंच आश्वासन संस्थानी कारभारासंबंधानें संस्थानी प्रजेस ब्रिटिश मंत्रिमंडळ देऊं इच्छीत नाहीं. त्यामुळें वरिष्ठांकडे डोळा ठेवून वागणाऱ्या या संस्थानिकांनाहि आपापल्या संस्थानांत आपण जबाबदार राज्यपध्दति चालू केलीच पाहिजे अशी आवश्यकता आजच वाटणार नाहीं; किंबहुना त्या संबंधाचा वादहि राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें प्रत्यक्षपणें निघण्याचा संभव नाहीं. तथापि तेवढ्यानें संस्थानी प्रजाजनांनीं निराश होण्याचें कारण नाहीं. डोमीनियन स्टेटसचा दर्जा नुसत्या संस्थानेतर भागापुरताच लागू व्हावयाचा नसून तेवढ्या दृष्टीनें सगळें हिंदुस्थान हें एक व अविभाज्य असेंच मानलें जाईल. केवळ ब्रिटिश हिंदुस्थानापुरताच वसाहतीचा दर्जा मान्य करावयाचा असता व तेवढ्यापुरतीच स्वराज्यघटना तयार करावयाची असती तर संस्थानिकांना परिषदेला पाचारण करण्याचेंच कारण नव्हतें. परंतु संस्थानें वगळून बाकीच्या राहिलेल्या हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस लागू करतों, असें जर कोणी म्हणेल तर त्याला राज्यघटनेचा ओनामाहि कळत नाहीं असें म्हणावें लागेल!

डोमीनियन स्टेटस शब्दानें संपूर्ण अंतर्गत कारभार आणि व्यापारी बाबतीपुरता परराष्ट्रीय संबंध एवढा अधिकार द्योतित होतो. दक्षिण आफ्रिका व कानडा यांनीं अनुक्रमें जर्मनीशीं व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांशीं व्यापारी तहनामे केलेच आहेत; आणि सर्वच स्वायत्त वसाहतींचे व्यापारी वकील परराष्ट्रांत राहत असतात. अंतर्गत कारभारांत लष्कर, आरमार, वैमानिक दळ, आयात-निर्गत जकाती, चलन, रेल्वे, किनाऱ्यालगतची दर्यावरील वाहतुक, पोस्ट व तार, अफू-मीठ-दारु वगैरेचें नियंत्रण इत्यादि गोष्टींचा समावेश होतो. या सर्व बाबतीत जर हिंदुस्थानाला संपूर्ण अधिकार

मिळणार तर त्याची बजावणी संस्थानें वगळून कशी करावयाची? हिंदुस्थानाच्या अंतर्बाह्य संरक्षणाकरितां किती सैन्य ठेवावयाचें, याचा विचार करतांना ब्रिटिश हिंदुस्थानांत किती सैन्य असावें व प्रत्येक संस्थानांत किती, सैन्य असावें याचाहि निर्णय करावा लागेल. त्याच प्रमाणें एखाद्या संस्थानांत बंडाळी झाल्यास ती मोडून शांतता प्रस्थापित करण्याकरितां जर ब्रिटिश हिंदुस्थानानें संस्थानास लष्करी मदत करावयाची तर अशी बंडाळी कां उपस्थित झाली, व तशी पुनः उपस्थित न होण्यास काय करावें, याचा विचार त्या संस्थानिकांस करावयास सांगण्याचा अधिकार संस्थानेतर हिंदुस्थानास असावयास नको काय? आणि या अधिकाराची बजावणी करतांना संस्थानिकांचा कारभार लोकतंत्रानें चालत नाहीं म्हणून तेथें बंडाळी होते, सबब संस्थानिकांनीं आपला कारभार लोकतंत्रानें चालवावा असा कानमंत्र त्यास देणें प्राप्त नाहीं काय ?

एवंच ब्रिटिश हिंदुस्थानांत डोमीनियन स्टेटसची संपूर्ण बजावणी करावयाची म्हटल्यास संस्थानांतील राज्यपद्धती अनियंत्रित ठेवून चालावयाचें नाहीं अमेरिकेंतल्या संयुक्त संस्थानांप्रमाणें हिंदुस्थान जर संयुक्तघटकांचा एक संघ बनवावयाचा झाला तर संस्थानांच्या सरहद्दींतील राज्यपध्दति आणि संस्थानेतर हद्दींतील राज्यपध्दति साधारणतः सारख्याच स्वरूपाची असावयास नको काय ? समान शासनपद्धति असलेल्या घटकांचाच खरा संघ बनूं शकतो, व तोच चिरकाल टिकतो; म्हणूनच हिंदुस्थान हें अविभाज्य असें एक राष्ट्र असून त्याला 'डोमीनियन स्टेटस'ची सत्ता द्यावयाची असें जेव्हां ब्रिटिश मंत्रिमंडळानें ठरविलें, त्याच वेळेस संस्थानी प्रजेलाहि त्यांचे योग्य व जन्मसिध्द हक्क देण्याची जबाबदारी ब्रिटिशमंत्रिमंडळावर येऊन पडली. कारण संस्थानांतून जबाबदार राज्यपध्दति सुरू केल्याशिवाय हिंदुस्थानाला वसाहतीच्या स्वराज्याचा दर्जा प्राप्तच होऊं शकत नाहीं.

या दृष्टीनें पाहिल्यास राउंड टेबल कॉन्फरन्साकरितां संस्थानिकांना जें पाचारण करण्यांत येणार तें डोमीनियन स्टेटसच्या मार्गांत अडथळा उत्पन्न करण्याकरितां आहे असे न समजतां उलट हें वचन लवकर पूर्ण करण्याकरितांच आहे असें समजण्यास हरकत नाहीं. डोमीनियन स्टेटसचा जेव्हां विचार देखील मनांत नव्हता त्या वेळीं मॉंटेग्यु-चेल्म्सफर्ड यांनीं संस्थानिकांशीं बिलकुल खलबत केलें नाहीं. त्याचप्रमाणें जेव्हा बर्कनहेड यांनीं सायमन कमिशनाची नेमणूक केली त्या वेळींहि डोमीनियन स्टेटसचा विचार त्यांच्या मनांत नसल्यानें त्यांनींहि सायमन कमिशनाच्या कार्यक्रमांत संस्थानी प्रश्नाचा समावेश केला नव्हता. परंतु जेव्हां मजूर पक्षाच्या मंत्रिमंडळांत हिंदुस्थानाचा प्रश्न कायमचा निकालांत काढावा असा विचार ठरला त्या वेळी संस्थानिकांना वगळून हा प्रश्न सुटूं शकत नाहीं, असें पाहून संस्थानिकांची बाजू ऐकून घेण्याकरितां राउंड टेबल कॉन्फरन्समध्ये त्यांना बोलवण्याचें ठरलें. किंबहुना संस्थानिकाची बाजू ऐकून घेऊन एकदाचा कायमचा निकाल करतां यावा म्हणूनच राउंड टेबल कॉन्फरन्सची कल्पना निघाली असेल. तें कसेंहि असो. डोमीनियन स्टेटसच्या जाहीर घोषणेला संस्थानिकांशीं वाटाघाट करणें हें विसंगत नसून सुसंगतच आहे एवढा तरी निष्कर्ष यांतून निघतो.

यापुढें संस्थानिकांशीं वाटाघाट करून त्यांच्याकडून डोमीनियन स्टेटसच्या प्राप्तीला पूर्ण पाठिंबा कसा मिळवावयाचा तें अर्थातच ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रतिनिधींच्या मुत्सद्दीपणावर अवलंबून राहील. परंतु हे अल्स्टरवाले स्वराज्याला कायमचा विरोध करूं शकत नाहींत हे खास. कारण यांचा मुलूख कांहीं अल्स्टरसारखा तोडून टाकण्यासारखा नाहीं. पांचसात संस्थानें सोडून दिल्यास इतरांना समुद्रकिनारा देखील नाहीं. अशा स्थितींत ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्यप्राप्तीच्या प्रयत्नास विरोध करून उशाशीं पायथ्याशीं शत्रु उत्पन्न करून हे संस्थानिक सुखानें कसें नांदू शकतील? त्यांना जर यापुढे सुखानें व अब्रूनें नांदावयाचें असेल तर त्यांनी संस्थानेतर भागांत होणाऱ्या स्वराज्यस्थापनेला संमति दिली पाहिजे. एवढेंच नव्हे तर आपापल्या संस्थानांतहि जबाबदार राज्यपध्दति लवकरच प्रस्थापित केली पाहिजे. तसें ते न करतील तर त्यांच्या विषयीं लोकमत कलुषित होऊन भावी झगड्यांत हीं संस्थानें अस्तित्वांत तरी कशाला ठेवावयाचीं असले बोलशेव्हिकी विचार सर्वत्र प्रसृत होऊं लागतील. बोलशेव्हिझमला आळा घालण्याकरितांच ब्रिटिश सरकारानें आज डोमीनियन स्टेटस देण्याचें जाहीर केलें आहे. म्हणूनच ज्या संस्थानिकांच्या अंगीं तितकें मुत्सद्दीपण वसत असेल तेहि त्याच कारणाकरितां आपापल्या संस्थानांतून लवकरच जबाबदार राज्यपद्धती सुरू करण्याची घोषणा करतील. आणि ज्यांच्या डोक्यांत हा भावी विधिघटनेचा प्रकाश पडणार नाहीं त्यांना त्यांच्या मठ्ठपणाचें किंवा हट्टीपणाचें प्रायश्चित्त भोगावें लागेल.

# न. चिं. केळकर यांची

# डेली एक्सप्रेसला तार

व्हायसरॉयसाहेबांचा जाहिरनामा सर्वसाधारणपणे हिंदी राष्ट्रीय मताच्या लोकांना पसंत आहे. ते ' डोमीनियन स्टेटस ' या ध्येयापेक्षां ' राउंड टेबल कॉन्फरन्स 'लाच अधिक महत्त्व देतात. डोमीनियन स्टेटसच्या मागणीचा पुनरुच्चार सतत गेलीं २५ वर्षे राष्ट्रीय सभा करीत आहे. १९१७ च्या जाहिरनाम्यांत व १९१९च्या कायद्यांच्या उद्देशपत्रिकेंत जरी जबाबदारीचें स्वराज्य Responsible Government अशी शब्द योजना केली होती तरी देखील हिंदुस्थानांतील लोक त्याचा अर्थ डोमीनियन स्टेटस असाच समजत होते. राष्ट्रसंघाला ब्रिटिश सरकारानें हिंदुस्थानाचा दर्जा वसाहतींचा आहे व तो वसाहतींचा दर्जा हिंदुस्थानाला लौकरच प्राप्त होईल असें स्पष्ट शब्दांनी सांगितलें व या आश्वासनावरच राष्ट्रसंघाच्या मूळ सभासदत्वाचा अधिकार व मत हिंदुस्थानाला देण्यांत आलें आहे. मालकम हेले यांनीं जबाबदारीचें स्वराज्य (Responsible Government)या शब्दांचा जो खोडसाळपणें अर्थविपर्यास केला होता तो आतां दुरुस्त करण्यांत आला एवढेंच कार्यंत. हे घडण्याचें कारण केवळ व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन व स्टेट सेक्रेटरी बेन हेच होत.हेले यांनीं अर्थविपर्यास केला नसता तर हिंदुस्थानाला वसाहतीचें स्वराज्य देण्याचें वचन देण्यांत आलें होतें कीं नाहीं याबद्दल प्रश्नच उद्भवला नसता. राष्ट्रीय वृत्तीचे लोकांना राउंड टेबल कॉन्फरन्सचें महत्त्व वाटतें तें याच दृष्टीनें कीं, या कॉन्फरन्सची समानतेच्या व सन्मान्यतेच्या अटीवर ज्याप्रमाणें आयर्लंड व इतर वसाहती यांचें बाबतींत योजना करण्यांत आली होती त्याचप्रमाणें हिंदुस्थानचे बाबतींत करण्यांत येईल असें दिसून येतें. आतां राउंड टेबल कॉन्फरन्सची घटना, तिच्या पुढील कार्य, कामकाजाची व निर्णय करण्याची पद्धत, कॉन्फरन्सची वेळ व जागा यासंबंधीं सविस्तरपणें माहिती देण्याची जबाबदारी सरकारावर आहे. कारण त्यावरूनच राष्ट्रीय पक्षाला सहकार्य कर्तव्य आहे किंवा नाहीं हें ठरवावयाचें आहे. अजूनहि लोकांना अविश्वास वाटत आहे, पण तो अविश्वास कॉन्फरन्सची सर्व माहिती लोकांपुढें मांडून सरकारला दूर करतां येणें शक्य आहे. कांहीं तरी अशक्य अटी घालून मार्ग बंद करावा अशा प्रकारची वृत्ति लोकांची नाहीं. मजूर पक्षाच्या अडचणींची त्यांना पूर्ण जाणीव आहे. पण त्याचबरोबर त्यांना आपला स्वाभिमान राखावयाचा आहे. दुर्दैवानें पार्लमेंटामधील वादविवाद फक्त डोमीनियन स्टेटसबद्दल झाला. प्रतिपक्षाच्या विरोधांत अगर मजूर पक्षाच्या समर्थनांत राउंड टेबल कॉन्फरन्सचा उल्लेखहि करण्यांत आला नाहीं. हिंदुस्थानाच्या प्रश्नावर कॅबिनेट्स मोडतील किंवा बनविलीं जातील तो काळ दूर आहे, पण हिंदुस्थानांतील सर्व पक्षांना असें वाटतें कीं, इंग्लंडमधील सर्वच राजकीय पक्षांनीं हिंदुस्थानविषयक धोरणाविषयीं जणूंकाय कट करून मौन धारण करावें,हे एक दुश्चिन्हच होय.

# पुढाऱ्यांची परिषद्

व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्याला दिल्लीस पुढाऱ्यांकडून जें सशर्त उत्तर देण्यांत आलें, त्यावर सह्या करणाऱ्या पुढाऱ्यांची सभा अलाहाबाद येथें ता. १८ रोजीं सायंकाळीं ५॥ वाजतां आनंदभुवनांत सुरू झाली. पं. मोतिलाल नेहरू, महात्मा गांधी, डॉ. अन्सारी, पं. जवाहरलाल नेहरू, पं. मालवीय, शेठ जमनालाल बजाज, श्री. पट्टाभिसीतारामय्या, श्री.सुभाषचंद्र बोस, श्री. सेनगुप्त व मौ. अबुल कलाम अझाद असे दहा वर्किंग कमिटीचे सभासद हजर होते. त्याचप्रमाणें सर तेजबहादुर सप्रू, महंमुदाबादचे राजे, श्री. सच्चिदानंद सिंह, श्री. राजेश्वर बली, रामदास पंतलु, ए. रंगस्वामी अय्यंगार, याकूब हसन, मि.शेरवानी,मि.किडवाई,श्री.गोविंद वल्लभपंत, मि. बिहारीलाल, श्री.वल्लभभाई पटेल,श्री. मणीलाल कोठारी, श्री. न. चिं. केळकर, श्री. माधवराव अणे, बॅ. अभ्यंकर, मि. द्वारकादास मिश्र, मि. जम्नादास मेथा, श्री. गिरधारीलाल, डॉ. अलम इ. पुढारी हजर होते. सभेंत वर्तमानपत्रांच्या बातमीदारांना बंदी होती.

प्रारंभी **पंडित मोतीलाल नेहरू** यांनीं सभेचा उद्देश सांगितला. पार्लमेंटांत झालेला

वादविवाद व कांहीं प्रांतिक कॉंग्रेस-कामि-ट्यांनीं केलेले ठराव यांचे योगानें उत्पन्न झालेल्या परिस्थितीचा विचार सभेंत करावयाचा आहे असें ते म्हणाले; पण वर्किंग कमिटीचे सभासद एक प्रकारच्या संयुक्त जबाबदारीनें बांधले गेले असल्यामुळें ते या सभेंत मतप्रदर्शन करणार नाहींत, असें त्यांनीं सांगितलें.

यानंतर प्रथम **सर तेज बहादुर सप्रू** यांस भाषण करण्याबद्दल पाचारण करण्यांत आलें. त्यांनीं दिल्लीस दिलेल्या जबाबालाच चिकटून राहण्याबद्दल सर्वांना विनविलें. त्याचप्रमाणें त्या जबाबातील अटी या'राऊंड टेबल' परिषदेपूर्वीच पूर्ण झाल्या पाहिजेत असा आग्रह धरून परिस्थिति बिघडवूं नये. त्यायोगें आपण हिंदुस्थानाच्या हितशत्रूंचें कार्य आयतेंच साधून देऊं असा त्यानीं इषारा दिला. नंतर ते म्हणाले, "योग्य वेळीं आपल्या अटी पूर्ण करण्यांत आल्या नाहींत तर राऊंड टेबल परिषदेस जाण्याचे नाकारण्यास प्रत्येक मोकळा आहेच पण या अटी प्रत्यक्ष पूर्ण झाल्याशिवाय राऊंड टेबल परिषदेच्या योजनेचा स्वीकार करावयाचा नाहीं असें म्हणणें व विशेषतः तें ब्रिटिश मजूर पक्षाला म्हणणें हें असमंजसपणाचें होईल

**पंडित मदन मोहन मालवीय** यांनीं तेज बहादुर यांच्या म्हणण्यास दुजोरा दिला. ते म्हणाले "व्हाइसरॉयांच्या प्रामाणिकपणाचा मला त्यांच्या भेटींत प्रत्यय आला. राऊंड टेबल परिषदेला अजून अवकाश आहे. या मुदतींत आपण घातलेल्या अटी पाळून अनुकूल वातावरण उत्पन्न करण्याची संधि आपण मजूरपक्षाला दिली पाहिजे. व्हाइसरॉय यांना या बाबतींत कांहीं करण्यापूर्वी पुढाऱ्यांशीं वाटाघाट करणे जरूर वाटत असल्यास अटी करण्याबद्दल आतांच आग्रह धरून त्याच्या मार्गांत अडथळा आणूं नये." **जम्नादास मेथा** व **बॅ. अभ्यंकर** यांनीं राऊंड टेबल कॉन्फरन्सला नकार द्यावा असें सांगितलें. कलकत्ता कॉंग्रेसच्या ठरावांतील ठरविलेल्या मुदतींत डोमीनियन स्टेटस देण्याचें नाकारल्यामुळे स्वातंत्र्याकरितां चळवळ करावी असा त्यांचा मुद्दा होता.

**न. चिं. केळकर** म्हणाले, "सर्वपक्षीय परिषद व नेहरू कमिटी यांच्या योगानें उत्पन्न झालेलें ऐक्याचें वातावरण राऊंड टेबल परिषदेपर्यंत कायम ठेवणें जरूर आहे. कारण सर्वपक्षीय परिषदेंत आपल्यालाच नेहरू रिपोर्टाबद्दल आग्रह धरावा लागेल." **रामदास पंतलू** यांनीं पुढाऱ्यांनीं घातलेल्या अटींवर जोर दिला. **महंमुदाबादचे राजे व राजेश्वर बली** यांनीं राजकीय कैद्यांमध्यें फक्त १२४ कलमाखालीं शिक्षा झालेल्यांचा अंतर्भाव करावा असें मत दिलें. **महात्मा गांधी** यांनीं सांगितलें कीं, कलकत्ता कॉंग्रेसनें ३१ डिसेंबर ही मुदत घातली आहे, तोंपर्यंत थांबावे. तोंपर्यंत कांहींच करूं नये. **याकुब हसन** म्हणाले कीं, जातीजातींमध्यें ऐक्य झाल्याशिवाय परिषद यशस्वी होणार नाहीं.

यानंतर वर्किंग कमिटीच्या बैठकीसाठीं ही सभा ९॥ ते ११॥ वाजेपर्यंत तहकूब ठेवण्यांत आली.

## वर्किंग कमिटीचा ठराव

रात्रीं ११ वाजेपर्यंत वादविवाद होऊन नंतर कॉंग्रेस वर्किंग कमिटीमध्यें पुढीलप्रमाणे ठराव मंजूर झाला—

"व्हाइसरॉयांचा जाहिरनामा, त्यास कॉंग्रेसच्या व देशांतील इतर पक्षांच्या पुढाऱ्यांनीं मिळून दिल्ली येथें दिलेलें उत्तर व त्यानंतर झालेल्या गोष्टी यांचा विचार करून दिल्लीच्या उत्तरांत फेरबदल करण्यापूर्वी त्याला ब्रिटिश सरकाराकडून काय जबाब मिळतो याची वाट पहावी, असें कित्येक मित्रमडळींचे मत पाहून, कॉंग्रेसवाल्यांनीं दिल्लीस जें केलें त्यास वर्किंग कमिटी पाठिंबा देत आहे. पण त्याच वेळीं हे स्पष्ट करीत आहे कीं, हा पाठिंबा नियमाप्रमाणें येत्या कॉंग्रेसच्या बैठकीपर्यंतच मर्यादित आहे".

## पुढारी परिषदेचा ठराव

यानंतर रात्रीं एक वाजल्यानंतर पुढाऱ्यांच्या परिषदेमध्ये पुढील ठराव मंजूर झाला—

"व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्यावर नुकत्याच पार्लेमेंटमध्यें झालेल्या वादविवादांनीं या सभेला असमाधान व साशंकता वाटत आहे. पण दिल्लीस दिलेल्या जबाबाला चिकटून राहावें असें ही सभा ठरवीत असून त्या जबाबाला सरकाराकडून लवकर व पूर्णपणे मान्यता मिळेल अशी या सभेस आशा आहे".

# अलाहाबाद येथील सभेचा निष्कर्ष

व्हाइसरॉयसाहेबांचा जाहिरनामा प्रसिध्द झाल्या-बरोबर लोकमताची पहिली सरबत्ती उडाली. त्यानंतर पार्लमेंट सभेंत वादविवाद झाला, त्यामुळें हल्लीं लोकमताची दुसरी 'फैर' झाडण्यांत आली आहे. पहिल्या सरबत्तींतून प्रायः बहुतेक फुलेंच निघालीं. दुसरी फैर झडली तींतूनहि पुष्कळशीं फुलेच निघालीं, पण कोठे कोठे बारीक छरेहि उडाले. या सर्व गोष्टी एका प्रकारं अनुयोगी—प्रतियोगीसंबंधानेच घडून आल्या व्हाइसरॉय-साहेबांच्या जाहिरनाम्यांत नांव घेण्यासारखें पुष्कळच होतें. आणि नाव ठेवण्यासारखे असे जें थोडेसें वाटले तेंहि मऊ मऊ अशा शब्दांच्या वेष्ट-नांत बांधलले होते. यामुळे त्याची कोणी बेसुमार स्तुति केली तर, त्याला इतर कोणी जपून जपून सावरीत सावरीत तरी चांगले म्हटले. त्याला स्पष्टपणें नांवे ठेवणारा असा फारसा कोणीच भेटला नाहीं.

यानंतर पार्लमेंटमध्यें जो वादविवाद झाला, त्यांत उलट बाजूनें अप्रिय अशा पुष्कळ गोष्टी बोल-ण्यांत आल्याच. पण सुलट बाजूनें म्हणून जीं भाषणे झालीं त्यांतहि हिंदी जनतेला न आवडण्यासारख्या अनेक गोष्टी दिसून आल्या. शत्रु पक्षाच्या भाष-णांना दुष्ट हे विशेषण सरसकट बेधडक लावतां येण्यासारखे होतेच. पण मित्र पक्षाकडील झालेल्या भाषणांतहि कांहीं उद्गार असे बाहेर पडले कीं, त्यांवरून कांहीं हिंदी लोकांना फिरून निराशा वाटली, तर इतर कांहींना निदान थोडे असमाधान किंवा मळमळ वाटल्याशिवाय राहिली नाही. शत्रु पक्ष बोलूनचालून अहित करावयालाच निघा-लेला. तेव्हां तो कडु अप्रिय असे बोलणारच. पण दुसरा पक्ष जर मित्रपक्ष म्हणवितो, आणि बोलूनचालून हिंदुस्थानाचें बरें करावयाला प्रवृत्त झाला, तर त्यानें तसें अधिक ठासून निश्चयात्मक किंवा प्रतिज्ञा-पूर्वक कां बोलूं नये, असें कित्येकांना सहजच वाटलें. लोकमताच्या पहिल्या सरबत्तींत बहुधा फुलेच बाहेर पडली. आणि लोकमताची दुसरी फैर झडली तींतून कांहीं छरे उडाले, असे जें आम्ही म्हटलें त्याचे कारण आतां वाचकांच्या लक्षांत येईल.

पार्लमेंटमधील वादविवादांत जी एक गोष्ट कांहींना विशेष दिसून आली ती ही कीं, मजूर पक्षाचे पुढारी इकडे व्हाइसरॉयांच्या जाहिर-नाम्याचें समर्थन करीत असतां, इकडे असेंहि म्हणत आहेत कीं, "१९१७ चा जाहिरनामा व १९१९ चा कायदा यांमध्यें आम्ही कांहींच बदल केलेला नाहीं. जुनें धोरण तेंच पुढें चालविलें आहे." तेव्हां सहजच प्रश्न असा उपस्थित झाला कीं, जुनें धोरणच जर पुढें चालावयाचें तर मग जाहिरनामा काढला कशाला? आणि हिंदी लोकमतांत ज्या निरनिराळ्या रंगांच्या छटा हल्लीं उमटल्या आहेत त्यांत, पार्लमेंटांत झालेल्या भाषणांच्या चिकित्से-पेक्षां इकडील लोकमत प्रगट करणाऱ्या पुढाऱ्यांचे निरनिराळे मनोगुणच अधिक प्रगट झाले आहेत. म्हणजे असें कीं, ज्यांचे धोरण थोडेबहुत सामोपचाराचें, आशावादित्वाचें, किंवा दूरदृष्टीचें आहे त्यांनीं पार्लमेंटमधील वादविवादाची चिकित्सा आपल्याला अनुकूल अशी केली. उलट ज्यांचें धोरण चीरफाड करण्याचें, निराशावादित्वाचें व कोत्या दृष्टीचें आहे त्यांनींहि सदर वादविवादाचा अर्थ आपणाला अनुकूल असा केला !

वास्तविक शब्द एकच असें असतां त्यांचा अर्थ असा निरनिराळ्या दोन तऱ्हांनीं कसा होऊं शकतो ? याचें उत्तर 'होऊं शकतो' असेंच देणे भाग आहे. मात्र त्याला मानस-शास्त्र व शब्दशास्त्र यांचा थोडाबहुत तरी तात्त्विक परिचय असावा लागतो. कारण एकाच शब्दसमूहांतून अनेक अर्थ प्रतीत होणे ही गोष्ट केवळ राजकारणां-तच घडून येते असें नाहीं. तर ती मनुष्यभाषेच्या कोणत्याहि व्यवहारांत घडून येणारीच आहे. जेथें अर्थ हा शंका उत्पन्न न होईल असा म्हणजे स्पष्टच असावा अशा कायदेशीर व्यवहारांत, कायदेपंडि-तांनी सर्व बुध्दि खर्चून लिहिलेल्या कागदपत्रांतून व दस्तऐवजांतून, शब्दच्छल केल्याने किंवा सहजा-सहजींहि, अर्थभेद उत्पन्न होऊन रणें माजतात, तेथें घाईनें किंवा बेसावधपणे केलेल्या शब्दप्रयोगां-तून वाद उत्पन्न होणे हें स्वाभाविकच होय. पण त्याच्याहि पलीकडची एक पायरी असते. तिची गांठ राजकारणांत पडते. म्हणजे राजकारणांत जे शब्द वापरले जातात ते उद्देश स्पष्ट व्यक्त होण्या-पेक्षां राहतील तितके गूढ राहावे, व आपणास कोणाला सहसा शब्दांत पकडतां येऊं नये, अशा हेतूनें सावधपणानें, व किंचित् दिशाभूल करणारे असेच, वापरण्यांत येतात. यामुळें राजकारणांत शब्दच्छल व अर्थभेद होण्याला इतर सर्व व्यवहारांपेक्षां अधिक सवड उत्पन्न होते. अर्थात् 'आकांक्षा' 'सान्निधि' इत्यादि साध-नांचा उपयोग अर्थाची समजूत पटण्याला करणें,

किंवा शब्दांचा उपयोग खरोखर वाच्यार्थानें, लक्षणेनें किंवा व्यंजनेनें केला आहे असले भेद लक्षांत घेणें, हें राजकारणांत जितकें प्राप्त होतें तितकें इतरत्र होत नाहीं.

पार्लमेंटांतील वादविवादाचा अनुकूल किंवा प्रतिकूल आधार घेणारांनीं वरील सर्व प्रकार आपापल्या परीनें केले आहेत. तथापि या वादविवाद ग्रंथाचा ऊहापोह असल्या शास्त्रीय दृष्टीनें करीत बसण्याची जरूरी नाहीं व आम्हाला ते करण्याची इच्छाहि नाहीं. भाषाशास्त्राचा हा वरील ओझरता उल्लेख करून आम्हाला इतकेंच दर्शवावयाचें होतें कीं, पार्लमेंटमधील वादविवादाचा अर्थ निरनिराळ्या हिंदी राजकीय पक्षांनीं मीमांसाशास्त्रापेक्षां आपापल्या मनोगुणाप्रमाणेंच अधिक केला आहे. यामुळें या वादविवादानंतर या पक्षांनीं फिरून जे आपापले जाहिरनामे प्रगट केले, त्यांत त्यांनीं जवळ जवळ आपली पूर्वीचीच भूमिका स्वीकारलेली आढळते.

सर चिमणलाल सेटलवाड यांच्यासारखे लिबरल पक्षाचे पुढारी व जिनाप्रभृति मुंबईच्या जाहीर पत्रकावर सह्या करणारे लोक, यांनीं असे अभिप्राय प्रगट केले आहेत कीं, "व्हाइसरॉयसाहेबांच्या जाहिरनाम्याला कमीपणा ज्याच्या योगानें आणला जाईल असें पार्लमेंटमधील वादविवादांत कोणी कांहींच बोललें नाहीं. झालें असलें तर त्या जाहिरनाम्याचें चौफेर समर्थनच झालें. व अधिक म्हटलेंच तर हें घडलें कीं, "भारतमंत्री वेजवुड बेन यानीं कॉन्झर्व्हेटिव्ह व लिबरल पक्षांतील आगलाव्या शत्रूंना वकिली बाण्याचेंच पण खरपूस उत्तर दिलें." याच्या अगदीं उलट म्हटलें म्हणजे स्वातंत्र्यवादी पक्षांतील लोकांनीं केलेला अर्थ. त्यांच्या मतें "पार्लमेंटमधील वादविवादामुळें व्हाइसरॉयसाहेबांचा जाहिरनामा जागेवर आतां मुळींच उरला नाहीं. व झांकल्या तोंडानें मजूर पक्षाच्या प्रधान–मंडळानें जी आपली अब्रू कांहीं थोडी आबांत ठेवली होती, ती या वादविवादांत तोंड उघडण्यानें सगळीच्या सगळी गेली. म्हणजे मजूर पक्ष हाहि हिंदुस्थानाच्या दृष्टीनें कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाच्या ओळीला येऊन बसला, व त्या एकाच माळेंतील मणी ठरला. अर्थात् स्वावलंबन हाच उपाय शिल्लक उरतो. आणि व्हाइसरॉयसाहेबांचा जाहिरनामा निघालाच नाहीं असें समजून, किंवा राऊंड टेबल कॉन्फरन्सला निमंत्रण आलें तरी तें धिःकारपूर्वक झिडकारून, मद्रास व कलकत्ता येथील राष्ट्रीय सभांनीं ठरविल्याप्रमाणें, स्वातंत्र्याचेंच निशाण उभारल्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं."

पण या दोन टोकांच्यामध्यें तिसरा असाहि एक पक्ष शिल्लक उरलेला आहे. तो पक्ष दिल्ली येथे जमून ज्यांनीं जाहीर पत्रक काढलें त्या लोकांचा. किंबहुना राष्ट्रीय सभेच्या आजच्या वर्किंग कमिटीचा असेंहि म्हटलें तरी चालेल. वाचकांना हें माहीतच आहे कीं, दिल्लीस जमलेल्या लोकांनीं काढलेल्या जाहिरनाम्यांत हुरळून जाण्याची किंवा एकान्तिक आशावादाची भाषा नव्हती; पण उलटपक्षीं सुभाष बोस, श्रीनिवास अय्यंगार किंवा नरीमन यांच्यासारखी धिःकाराची किंवा आत्यंतिक निराशेचीहि भाषा नव्हती. आणि हल्लीं पार्लमेंटमध्यें झालेल्या वादविवादानंतरहि या मध्यम पक्षानें आपला मध्यमपणा तसाच टिकवून धरला आहे. शिवाय या मध्यम पक्षाशीं ऋणानुबंधीपणानें अजून वागणाऱ्या कॉंग्रेस वर्किंग कमिटीनेंहि तोच मार्ग स्वीकारला आहे. म्हणून या दोघांनीं परवां अलाहाबाद येथें एकत्र जमून जी विचारसरणी प्रगट केली तिचाच थोडासा खुलासा करण्याचें आज योजिलें आहे.

पूर्वी मुंबईच्या जाहीर पत्रकांत व्हाइसरॉयसाहेबांच्या जाहिरनाम्याचा स्वीकार जसाच्या तसा केला आहे. व स्वातंत्र्यवादी पक्षाने जाहिरनाम्याला दुरूनहि हातानें स्पर्श केला नाहीं. पण मध्यम पक्षानें जाहिरनाम्याचा स्वीकार करतांना कांहीं गोष्टींचा स्पष्ट खुलासा केला म्हणजे आपण कोणत्या समजुतीनें कोणत्या भावनेनें व कोणत्या आशेनें जाहिरनाम्याचा स्वीकार करतों हें सरकारला आधींच स्पष्ट जाणविलें. यांत खालील गोष्टी होत्या–(१) पहिली ही कीं, राऊंड टेबल कॉन्फरन्स यशस्वी व्हावयाचें तर सर्वसामान्य रीत्या देशांत शांततेचें व दिलजमाईचें वातावरण निर्माण करण्याला सरकारनें निश्चितपणें प्रारंभ करावा. (२) ज्यांना राजकीय गुन्ह्यांकरितां शिक्षा झाल्या अशा लोकांना सरसकट माफी देऊन बंधमुक्त करावें. (३) राऊंड टेबल कॉन्फरन्समध्यें सभासद म्हणून बोलावले जातील त्यांमध्यें, राजकारणांत प्रगतिपर अशा मानल्या जाणाऱ्या पक्षांचा व त्यातल्या त्यांत राष्ट्रीय सभेच्या प्रतिनिधींचा भरणा अधिक असावा (४) परिषद भरावयाची तर तींत वसाहतीच्या स्वरूपाचें स्वराज्य हिंदुस्थानाला केव्हां द्यावयाचें याचा विचार करावयाचा नसून, त्या स्वराज्याची घटना कशी असावी याचाच विचार करावयाचा आहे अशा समजुतीनेंच परिषदेला येणारे आम्ही येऊं हें ध्यानांत ठेवावें. (५) दरम्यानहि सरकारनें उदारमतवादी व सामोपचाराचें असेंच, म्हणजे प्रगतिपर व लोकपक्षानुकूल असेंच, धोरण ठेवावें. असें कीं, नव्या स्वराज्ययुगाला आजच सुरुवात झाली आहे असें लोकांना वाटावें. ( ६ ) आणि परिषद शक्य तितक्या लवकर भरविण्यांत यावी.

मध्यम पक्षाचें जाहीर पत्रक अशा अर्थाचें असल्याकारणानें, पार्लमेंटांतील वादविवादामुळें या पत्रकांतील धोरणांत कांहीं फेरबदल करावयास पाहिजे कीं काय हें ठरणें अवश्य होतें. म्हणून पं. मोतीलाल नेहरू यांनीं दिल्ली पत्रकावर सह्या करणाऱ्या सर्व लोकांना तारीख १८ नोव्हेंबर रोजीं अलाहाबादेस निमंत्रण केलें, व त्याचबरोबर ज्यांनीं सह्या केल्या नव्हत्या अशाहि कांहीं पुढाऱ्यांना निमंत्रणें केलीं. सह्या न करणारे असे फारसे कोणी या सभेला आले नाहींत. पण जे जे आले त्या सर्वांचें सुदैवानें एकमत होऊन जो ठराव झाला तो शब्दशः आज आम्हीं दुसरीकडे दिलाच आहे. तो पाहिला असतां हें लक्षांत येईल कीं, या लोकांनीं पार्लमेंटांत झालेल्या वादविवादाला उलटसुलट योग्य ते महत्त्व दिलेंच आहे. तथापि त्यांनीं मुख्य बाबतींत आपली पूर्वीचीच भूमिका कायम ठेवली आहे. व दिल्ली येथील मतपत्रकांत उल्लेखिलेल्या गोष्टींना सरकारनें लवकरच अनुकूल असें उत्तर द्यावें अशी सूचना व आशा प्रगट केली आहे. याचा उघडच अर्थ असा कीं, या पक्षाच्या मतें पार्लमेंटमधील वादविवादामुळें कोणाहि आपल्या मनाची डळमळ होऊं देण्याचें कारण नाहीं. अखेर परिषदेचें निमंत्रण स्वीकारावें कीं नाहीं हें ठरविण्याच्या गोष्टी वेगळ्याच आहेत. त्यांना या वादविवादांत कोणी होय म्हटलें नाहीं, कोणी नाहीं म्हटलें नाहीं. म्हणजे त्यांचा निकाल अद्यापि व्हावयाचाच आहे. व तो होईल त्याप्रमाणें निमंत्रण स्वीकारलें जाईल किंवा न जाईल. त्याविषयीं आजच कांहीं बोलण्याचें कारण नाहीं.

या ठरावासंबंधानें सांगण्याच्या दुसऱ्याहि दोन गोष्टी आहेत. पहिली अशी कीं, दिल्ली पत्रकावर सह्या करणारांपैकीं जितके लोक अलाहाबादेला हजर होते त्या सर्वांनीं या ठरावाला संमति दिली. दुसरी गोष्ट ही कीं, दिल्ली पत्रकांत संकेतार्थी म्हणून ज्या पांच—सहा गोष्टी नमूद करण्यांत आल्या त्या सर्व 'अटी'च अशा समजावयाच्या कीं काय, याचाहि खुलासा अलाहाबादेच्या सभेंत झाला. तो असा कीं, या पांच-सहा गोष्टी होणें इष्ट महत्त्वाचें व अवश्य होय. तथापि त्या नक्की अटी अशाच जर म्हणावयाच्या होत्या तर त्याकरितां वरील पर्याय शब्द न योजतां, या आमच्या प्राथमिक अटी आहेत असेंच स्पष्ट शब्दांनीं तेव्हांच लिहिलें गेलें असतें. 'अटी' हा शब्द दिल्लीच्या सभेंत कोणास माहीत नव्हता किंवा सुचला नसेल असें नाहीं. अर्थात् तो शब्द गाळला गेला असला तर बुद्धिपुरःसरच गाळला गेला असला पाहिजे हें सामान्य अनुमानानें कोणीहि म्हणेलच. पण इतक्यावर न भागतां अलाहाबाद येथें हा मुद्दा चर्चेलाच निघाला तेव्हां कित्येकांनीं असें प्रतिपादिलें कीं, आपण अटी या अर्थानें कोणत्याच गोष्टी सुचवीत किंवा घालीत नाहीं, या समजुतीनेंच आपण सही केली. तशी समजूत असती तर आम्ही सही केली नसती. व हें त्यांचें म्हणणें बरोबर म्हणून इतरांना तें मान्य करावें लागल्यामुळें, ठरावांत इतर कोणत्याहि रीतीनें या पांच-सहा गोष्टींबद्दलची भाषा बदलण्यांत आली नाहीं.

आतां हेंहि खरें कीं, इतर कांहीं लोकांनीं, दिल्लीस असेंहि सांगितलें कीं, आम्ही अटी हा शब्द वापरला नसला तरी, आम्ही मनानें त्या अटी अशाच समजतों. पण याचा अर्थ असा होतो कीं, अटी हा शब्द नको म्हणणारांचाच आग्रह शेवटीं चालला, व तो शब्द असावा असें म्हणणारांनींच नमतें घेतलें. आणि अशा समेटामुळेंच या दोहों प्रकारच्या लोकांच्या सह्या एका कागदावर झाल्या. दिल्लीस प्रत्यक्ष हजर असणारांमध्येंच जर जाहीर पत्रकासंबंधीं हा सूक्ष्म मतभेद शिल्लक राहिला, तर जे दिल्लीस हजर नव्हते त्यांचा राहिल्यास काय नवल! त्यांनीं जर प्रसिद्ध झालेला रोकडा ठराव वाचून त्यावर सह्या केल्या असतील, तर त्यांच्यापैकींहि कित्येकांनीं, हें पत्रक अटीतटीचें नाहीं तर केवळ खऱ्या दिलखुलाशाचें आहे, असें मानल्यास त्यांना तो अधिकार सहजच राहणार. पण मतभेद चालविण्याचा अधिकार प्रत्येकास असतांहि तो अधिकार बाजूस ठेवून फिरून एखाद्या नव्या ठरावावर सर्व मिळून सही करतात, तेव्हां मतभेदाचा अधिकार गाजविण्यापेक्षां एकजुटीनें राहण्याचेंच अगत्य त्यांना अधिक वाटतें हें उघड होत नाहीं काय?

पण याहून महत्त्वाची गोष्ट ही कीं, काँग्रेसच्या वर्किंग कामटींतील अगदीं दुसऱ्या टोकास जाणाऱ्या पं. जवाहरलाल नेहरू यांसारख्या लोकांनींहि या ठरावाला संमति दिली. आतां दिल्ली येथें काँग्रेसच्या 'वर्किंग कमिटीची' सभा भरलेली नव्हती. ती अलाहाबाद येथें भरविण्यास सवड झाली. म्हणून तिचाहि एक ठराव करण्यांत आला हें सहजच घडलें पण त्यांत झालें तरी सर्वपक्षीय अशा या दुसऱ्या ठरावाला विरोधकारक असें कांहींहि म्हटलेलें नाहीं. वर्किंग कमिटीचा खास ठराव होण्यापूर्वीं त्या कमिटीच्या कित्येक सभासदांनीं व्यक्तिशः दिल्लीच्या जाहीर पत्रकावर सह्या केल्या. तेव्हां ही गोष्ट कशी काय घडली, अशी शंका उपस्थित झाल्यावरून, कमिटीनें अलाहाबाद येथें असें ठरविलें कीं, या व काँग्रेसचे अनुयायी म्हणविणाऱ्या इतर लोकांनीं दिल्लीच्या जाहीर पत्रकावर सह्या केल्या ही गोष्ट योग्य अशीच केली. मात्र त्या जाहीर पत्रकांतील धोरण बदलावें

कीं नाहीं याचा निर्णय लाहोर येथील राष्ट्रीय सभेत होईल व या लोकांनीं त्यानंतर त्याप्रमाण वर्तावयाचें आहे.

तात्पर्य, कॉंग्रेस पक्षांतील व कॉंग्रेसबाहेरील इतर पक्षांतील नरम गरम पण प्रमुख अशा लोकांनीं आज जो निर्णय संयुक्त मध्यम पक्षाचा म्हणून दिला तो असा कीं (१) व्हाइसरॉयसाहेबांच्या जाहिरनाम्यांत लोकांकडून जी सहकारिता मागितली आहे ती देतां येईल अशी आशा वाटते (२) ही सहकारिता द्यावयाची तर, कोणी अटी म्हणो कोणी न म्हणो, पण साधारणतः संकेतार्थी अशा कांहीं गोष्टी घडण्याची अपेक्षा आहे (३) जाहिरनाम्यानंतर पार्लमेंटांत झालेल्या वादविवादामध्यें कांहीं विधानें असमाधानकारक अशीं बाहेर पडलीं व कांहीं शंकास्थानें निर्माण झालीं (४) तथापि उलट सरकाराकडून हवे ते खुलासे उत्तरादाखल किंवा वाटाघाटींत निघाल्यास, अखेर सहकारिता करतां येईल. तसें न घडलें तर करतां येणार नाहीं.

म्हणजे या गोष्टीचा निकाल लागण्याला, केवळ कॉंग्रेसनिष्ठ अशाहि लोकांच्या मतानें, अजून पांच-चार आठवड्यांचा अवकाश आहे. व दिल्ली-पत्रकावर सह्या करणारांमध्यें दुस्तर असें दुमत व्हावयाचेंच असेल तर, त्याचा विचार येत्या डिसेंबरच्या ३१ तारखेनंतर करण्यांत येईल. अशा रीतीनें केवळ राष्ट्रीय सभेंतील एकांतिक जहाल मताचें कांहीं न चालल्यामुळे म्हणा किंवा त्यानें किंचित् माघार घेतल्यामुळे म्हणा, आज तरी या मध्यम पक्षांत एकी राहिलेली आहे. व ती तशी पुढेंहि राहिल्यास राष्ट्राचा फायदा होईल असें आम्हाला वाटतें. तथापि या एकीचें कोरडें समाधान मानण्यापेक्षां पुढील धोरण काय राहावें याचा विचारच अधिक महत्त्वाचा असल्यामुळें तो पुढील अंकीं करण्याचें योजिलें आहे.

# महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस-कमिटी

## (१) वार्षिक अहवाल सन १९२८-१९२९

म. प्रां. कॉं. क. च्या ता. २४-११-२९ रोजीं पुणें येथें भरलेल्या वार्षिक सभेत मंजूर झालेल्या अहवालवाचनाचा त्रोटक सारांश खालीं देण्यांत येत आहे.

### राष्ट्रीय सभेचे सभासद

गुदस्त सालीं मुंबई येथें झालेल्या ऑल-इं. कॉं. क. च्या ठरावाप्रमाणें महाराष्ट्रांत राष्ट्रीय सभेचे सभासद करण्याकरितां प्रां. कमिटीनें शक्य तितका प्रयत्न केला. त्याकरितां प्रां. क. नें ४ विनंतिपत्रें काढिलीं. व ठिकठिकाणच्या कार्यकर्त्या पुढाऱ्यांस वेळोवेळीं पत्रें पाठवून विनंति करण्यांत आली. व नमूद करण्यास समाधान वाटतें कीं, लोकसंख्येच्या प्रमाणांत महाराष्ट्राच्या वांटणीची आवश्यक संख्या २१५४२ असतां महाराष्ट्रांतील सभासदांची संख्या २६४९९ झाली आहे. सदर कामीं निरनिराळ्या जिल्ह्यांतील पुढाऱ्यांनीं व कार्यकर्त्यांनीं प्रांतिक कमिटीच्या विनंतीला मान देऊन अतिशय थोड्या मुदतीत महाराष्ट्राच्या वांटणीची संख्या पुरी केली याबद्दल कमिटी त्यांची अत्यंत आभारी आहे.

### नेहरू क. ची स्वराज्य-योजना

नेहरू कमिटीच्या स्वराज्ययोजनेचा महाराष्ट्रांत प्रसार करण्याचें व सदर योजना लोकांना समजावून देण्याचें काम महाराष्ट्र कमिटीनें अनेक सद्गृहस्थांच्या सहाय्यानें फार उत्कृष्ट व मोठ्या प्रमाणांत केलें हें नमूद करण्यास फार आनंद वाटतो. आमच्या समजुतीप्रमाणें सदर योजनेचा प्रसार करण्याचें व ती योजना लोकांना समजावून देऊन त्या योजनेस लोकांचा पाठिंबा मिळवण्याचें कार्य इतक्या मोठ्या प्रमाणांत महाराष्ट्राशिवाय इतर कोणत्याहि प्रांतांत झालें नसावें.

### महाराष्ट्रांतील कार्य

१ प्रांतिक कॉं. कमिटीच्या कार्यकारी मंडळाच्या विनंतीला मान देऊन श्री. न. चिं. केळकर यांनीं सदर योजनेचा मराठींत सारांश तयार केला व तो केसरींत क्रमशः प्रसिद्ध केला. त्यामुळें त्याचा प्रसार निदान १००००० लोकांत तरी झाला.

२ सदर योजनेला पाठिंबा देण्याकरितां महाराष्ट्रांतील सर्व पक्षांची परिषद नोव्हेंबर महिन्यांत पुणें येथें श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली, सदर परिषदेकरितां प्रां. कॉं. क. नें ६०० निमंत्रणें पाठविलीं व सर्व जिल्ह्यांतून सुमारें सर्व पक्षांचे ३०० प्रतिनिधी परिषदेला आले होते.

३ नेहरू कमिटीच्या स्वराज्य-योजनेच्या ३५००० प्रती छापून घेऊन त्या प्रत्येक तालुक्यांतील पुढारी गृहस्थांकडे पाठवून त्या वांटण्याबद्दल विनंति करण्यांत आली.

४ **सर्व पक्षीय दौरा**—नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत महाराष्ट्रांतील निरनिराळ्या पक्षांतील नामांकित पुढाऱ्यांनीं पुणें, नगर, पूर्व आणि पश्चिम-

खानदेश, नाशिक व ठाणें या जिल्ह्यांतून दौरा काढून सदर योजना हजारों लोकांस समजावून देऊन त्यांचा त्या योजनेला पाठिंबा मिळविला.

५ लो. टि. स्मा. ट्रस्ट या संस्थेचे दुय्यम चिटणीस श्री. स. वि. बापट यांनीं पुणें, सातारा, सोलापूर, व नगर या चार जिल्ह्यांतील ३६ तालुके व इतर २५ गांवें फिरून सदर योजना लोकांना समजावून दिली.

अशा प्रकारें नेहरू योजना लोकांना पटवून देऊन सदर योजनेला लोकांचा पाठिंबा मिळविण्याचें कार्य महाराष्ट्रांत झालें. सदर कार्याचे श्रेय मुख्यत: श्री. न. चिं. केळकर व श्री. स. वि. बापट यांस आहे. त्यांनीं दिलेल्या ५०० रु. च्या देणगींतून स्वराज्य योजनेच्या ३५००० प्रती फुकट वांटण्यांत आल्या. आणि सर्वपक्षीय दौऱ्यांत जे निरनिराळ्या पक्षांतील पुढारी गेले होते ते व दौऱ्यांत निरनिराळ्या गांवच्या ज्या कार्यकर्त्यांनीं दौऱ्याची उत्तम व्यवस्था ठेविली ते, या सर्वांस याचें श्रेय आहे. सबब त्या सर्वांचेहि कमिटी फार फार आभार मानते.

## शेतकरी संघ

गेल्या वर्षांत म. प्रां. कमिटीनें जीं महत्त्वाचीं कामें केलीं त्यांपैकीं शेतकरी संघ स्थापन करणें हें काम अत्यंत महत्त्वाचें होय. गुदस्त सालीं धारावाढीविरुद्ध व जमिनीच्या तुकड्यांच्या बिलाविरुद्ध चळवळ प्रां. कमिटीनें केली होतीच. परंतु तेवढ्यानें धारावाढीचा प्रश्न सुटला नव्हता व सदर बाबतींत संघटित व व्यवस्थित चळवळ करणें फार जरूर होतें, सबब वांद्रा येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेनें सदर चळवळीकरितां एक संघ प्रां. क. च्या कार्यकारी मंडळानें निर्माण करावा असा ठराव केला. सदर ठरावाप्रमाणें संघ स्थापन करण्याकरितां म. प्रां. कॉं. क. च्या कार्यकारी मंडळानें ता. ७-७-२९ रोजीं मुंबई येथें सरदारगृहांत सरदार वल्लभभाई पटेल यांचे अध्यक्षतेखालीं सभा भरविली. सदर सभेकरितां निरनिराळ्या तालुक्यांतील सुमारें ३०० गृहस्थांकडे निमंत्रणें पाठविण्यांत आलीं व सुमारें १०० गृहस्थांकडे प्रश्नपत्रिका पाठवून त्यांचीं मतें मागविण्यांत आलीं. शिवाय श्री. माधवराव गोसावी यांस मुद्दाम बागलाण व पालघर या तालुक्यांत पाठवून तेथील परिस्थिति अवलोकन करून अहवाल सादर करण्याविषयीं विनंति करण्यांत आली व त्याप्रमाणें त्यांनीं वरील दोनहि तालुक्यांत जाऊन अहवाल सादर केला. मुंबईतील सभेला सुमारें १०० शेतकरी प्रतिनिधी आले होते. सदर सभेंत निरनिराळ्या तालुक्यांतील शेतकऱ्यांनीं व कार्यकर्त्यांनीं आपल्या अडचणी सभेपुढें मांडल्या व एकंदर चर्चेनंतर सरकारच्या जमीनधाऱ्याच्या धोरणाबद्दल निषेधप्रदर्शक ठराव होऊन असें ठरलें कीं, जुलै महिन्याच्या अखेरीस पुणें येथें एक खासगी परिषद भरविण्यांत यावी व त्या परिषदेंत शेतकरी लोकांचीं दुःखें दूर करण्याकरितां शेतकरी संघ कसा स्थापन करावा याविषयीं विचार व्हावा.

सदर ठरावाप्रमाणें ता. २३ जुलै रोजीं पुणें येथें टिळक स्मारक मंदिरांत सरदार वल्लभभाई पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं परिषद भरविण्यांत आली. व सदर परिषदेंत 'शेतकरी संघ' स्थापन करण्यांत आला,

अशा रीतीनें महाराष्ट्र प्रां. कमिटीनें पुढाकार घेऊन अत्यंत महत्त्वाची व जरूरीची एक संस्था निर्माण केली. म. प्रां. कमिटीचेच एक चिटणीस शेतकरी संघाचें काम करीत असतात.

वरील कामाशिवाय वेळोवेळीं विनंतिपत्रकें प्रसिद्ध करणें, राष्ट्रीय सभेचे अध्यक्षपदाकरितां नांवें सुचविणें वगैरे मामुली कामें प्रांतिक कमिटीनें केलीं. त्याचा सविस्तर अहवाल व जमाखर्च सभेपुढें मांडण्यांत आला.

## (२) वार्षिक सभा

म. प्रां. कॉं. क. ची वार्षिक सभा पुणें येथें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत तारीख २४-११-२९ रोजीं भरली होती. सभेला निरनिराळ्या जिल्ह्यांतील सुमारें ६० सभासद हजर होते.

प्रथम अध्यक्ष श्री. आण्णासाहेब भोपटकर यांनीं श्री. चि. वि. वैद्य व श्री. ह. वि. तुळपुळेप्रभृति २० सभासदांनीं प्रां. क. च्या सभेवर बहिष्कार घालावा अशा अर्थाचा जो जाहिरनामा प्रसिद्ध केला आहे त्याबद्दल सभासदांना माहिती सांगून नंतर सभेच्या कामास सुरुवात केली. सभेंत खालील कामें झालीं.

१ कै. दे. भ. शिवरामपंत परांजपे यांच्या मृत्यूबद्दल दुखःप्रदर्शक ठराव सर्वांनीं उभें राहून मंजूर केला. २ चिटणीस श्री. दिवेकर यांनीं गेल्या वर्षाचा अहवाल व जमाखर्च वाचून दाखविला तो सर्वानुमतें मंजूर झाला. (सदर अहवालांतील ठळक महत्त्वाच्या गोष्टी वर दिल्या आहेत.)

३ पुढील वर्षाकरितां जमाखर्चाचें अंदाजपत्रक मंजूर करण्यांत आलें व राष्ट्रीय सभेकरितां प्रतिनिधी निवडण्यांत आले.

४ खालीलप्रमाणें अधिकारी व कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.

अध्यक्ष—श्री. ल. ब. भोपटकर.

उपाध्यक्ष—श्री. पां. के. शिराळकर, बाबूराव फुले, गो. ध. वर्तक, जयसुखलाल मेहता.

चिटणीस—दि. वा. दिवेकर, रा. ना. मंडलीक, ग. वि. पटवर्धन, प. वि. महाजन.

खजिनदार—श्री. दा. वि. गोखले व ग. कृ. फडके. हिशोबतपासनीस श्री. केतकर. याशिवाय प्रत्येक जिल्ह्यांतील दोन–दोन सभासद मिळून कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें.

५ ऑल इं. कॉ. कमिटीवर खालील सभासद निवडण्यांत आले—

१ श्री. न. चिं. केळकर, २ ल. ब. भोपटकर, ३ दा. वि. गोखले, ४ र. पां. करंदीकर, ५ ग. वि. केतकर, ६ दि. वा. दिवेकर, ७ शं. द. देव, ८ स. खं. आळतेकर, ९ डॉ. वेलकर, १० छोटालाल श्रॉफ, ११ ह. वि. पाटसकर, १२ जयसुखलाल मेहता, १३ बा. गं. खेर, १४ रा. ना. मंडलीक, १५ ना. रा. गुंजाळ, १६ पां. म. साठे.

६ कॉ. वर्किंग कमिटीनें व्हाइसरॉय यांचे जाहिरनाम्याचे बाबतींत अलाहाबाद येथें जो ठराव केला त्याला पुष्टि देण्यांत आली.

**राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधी**

७ लाहोरच्या राष्ट्रीय सभेला ज्यांना जावयाचें असेल व जे ता. १ ऑक्टोबरपूर्वी राष्ट्रीय सभेचे सभासद झालेले असतील त्यांनी ता. १ डिसेंबरपूर्वी प्रां. कॉ. क. ला कळवून प्रतिनिधींनें भरून यावयाचा दाखला मागवून ता. १० च्या पूर्वी तो भरून पाठवावा म्हणजे जागा रिकामी असल्यास त्यास निवडून दाखला पाठविण्यांत येईल. कित्येक लोकांचा असा समज आहे कीं तेथें आयत्या वेळीं जे प्रतिनिधी आलेले नसतात त्याऐवजीं आलेल्या दुसऱ्यांना दाखले मिळतात. परंतु हा समज साफ चुकीचा आहे. नियमाप्रमाणें असे दाखले तेथें मिळणे अशक्य आहे. तरी ज्यांस जावयाचे असेल त्यांनीं आतांपासूनच दाखले मागवून ठेवावेत.

**दि. वा. दिवेकर रा. ना. मंडलीक**
**ग. वि. पटवर्धन प. वि. महाजन**
**चिटणीस.**

# श्रीगीताजयंती–तिथीवाद

(लेखक—**प्रि. गोविंद सदाशिव आपटे**, माधव कॉलेज उज्जयिनी.)

[ या वादांतील पंच प्रि. गो. स. आपटे यांच्या सविस्तर निर्णयांतला महत्त्वाचा तेवढा निवडक भाग केसरीच्या वाचकांकरितां देण्यांत येत आहे. —सं. के. ]

महाभारतीय युद्धकालनिर्णय या विषयावर नागपूरचे **रा. केशव लक्ष्मण दप्तरी** यांनीं सन १९१८ चे विविधज्ञानविस्तारातून लेख प्रसिद्ध केले. त्यांत त्यांनीं त्या काळाचें गणिताप्रमाणें युध्दारंभतिथि कार्तिक वद्य ३० म्हणजे खरी तिथी मार्गशीर्ष शु. २ ठरविली. त्यानंतर १९२१ चे जानेवारीचे 'चित्रमय जगताचे' अंकांत पुण्याचे **रा. ज. स. करंदीकर** यांनीं 'भारतीय युध्ददिननिर्णय अथवा गीताजयंती' हा लेख प्रसिध्द केला. त्यांत रा. दप्तरी यांच्या लेखावर आक्षेप घेऊन आपलीं प्रमाणें देऊन युध्दारंभतिथि मार्गशीर्ष शु. ११ सिध्द केली. त्यानंतर उभयतांमध्यें बराच वाद होऊन उभयतांनीं त्याचा निर्णय कोणा तरी पंचाकडून करवून घेण्याचें ठरविलें. त्या संबंधांत वादी–प्रतिवादींत पत्रव्यवहार होऊन दोघांनीं मला पंच निवडिलें, व प्रत्येकानें मला पंच होण्याबद्दल आग्रहपूर्वक विनंति केली व ती मान्य करणें मला भाग पडलें. दोघांनीं आपला पुरावा मजकडे पाठवून देण्याचें कबूल केलें.

दोघाहि वादींनीं मी मागितलेली माहिती पुरविली. महाभारताचा अवश्य तेवढा व आणखीहि थोडा अधिक भाग मी वाचला. माधव कॉलेजाचे एक लेक्चरर रा. पराडकर एम. ए. व संस्कृतचे मुख्याध्यापक व्याकरणाचार्य व काव्यतीर्थ पंडित गोपीकृष्णशास्त्री यांनींहि निरनिराळ्या ठिकाणचे भारताचे भाग वाचून व माझ्याशीं चर्चा करून जी मला मदत दिली तिजबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

श्रीकृष्णाचा अर्जुनास गीतोपदेश युध्दारंभीं झाला. म्हणून जो युद्धारंभाचा दिवस तीच गीताजयंती. याकरिता युध्दारंभदिनासंबंधीं जो प्रत्येकानें पुरावा दिला आहे त्याचा आतां विचार करूं. गीताजयंतीतिथि व भारतयुध्दवर्ष हे दोनहि वाद कांहीं प्रमाणांत परस्परावलंबी आहेत. म्हणून पहिल्याचा विचार करतांना ओघानेच दुसऱ्याचाहि विचार करावा लागतो. पण तो सर्वांगपूर्ण करावा लागत नाहीं. भारतीय युद्ध कोणत्याहि वर्षी झालें असलें तरी मजपुढे जीं प्रमाणें आलीं आहेत त्यावरून पाहतां गीताजयंतीतिथिनिर्णयांत फरक करावा लागणार नाहीं असें वाटतें.

आतां ज्या वचनावर वादी-प्रतिवादींची मुख्य भिस्त आहे त्यांचा विचार करूं.

(१) मघाविषयगः सोमस्तद्दिनं प्रत्यपद्यत।
दीप्यमानाश्च संपेतुर्दिवि सप्तमहाग्रहाः ॥
—भी. अ. १७।२

यांत रा. दप्तरींनी अथर्वज्योतिषाधारें विषय शब्दाचा जो अर्थ केला आहे, त्याप्रमाणें मघापासून ९ वें नक्षत्र मूळ येतें, व तेथून ९ वें अश्विनी येतें. अश्विनी सपल्यानंतर त्या दिवशीं भरणीहि येऊं शकते. त्याकरितां रा. करंदीकर यांनीं भरणीचाच निर्देश केला आहे. उभयतांसहि मार्गशीर्ष महिना कबूल आहे. त्यावरून त्या महिन्यांत अनुक्रमें मूळ व भरणी हीं नक्षत्रें ज्या तिथींस येतात त्या तिथी उभयतांनीं युद्धारंभतिथी मानल्या आहेत. भारतसावित्री स्तोत्र श्लोक ६२ यांतः--

'प्रवृत्त भारतं युद्धं नक्षत्रे यमदैवतम' असें सांगितलें आहे. यमदैवतम नक्षत्र म्हणजे भरणी होय. व मार्गशीर्ष महिन्यांत भरणी नक्षत्र शु. ११ स येते. या दृष्टीनें दोघांचेहि अर्थ ग्राह्य होऊं शकतात; परतु त्यावरून तिथिनिर्णयास खरोखर कांहीं मदत होऊं शकत नाहीं. श्लोकाच्या द्वितीयार्धांत सप्तग्रह एकत्र आले असें म्हटलें आहे. करंदीकर यांनीं हें वर्णन औपचारिक म्हणून सोडून दिलें आहे. दप्तरी यांचा मुख्य भर या सप्तग्रहांच्या गणितावरच आहे. या गणिताचा विचार पुढें एके ठिकाणीं केलेला आहे.

(२) चत्वारिंशदहानाद्य द्वे च मे प्रस्थितस्य वै ।
पुष्येण संप्रयातोऽस्मि श्रवणे पुनरागतः ॥
—शल्य अ. ४१६

या वचनाला प्रधानत्व दिल्याकारणानें प्रत्येक टीकाकाराला श्लोकांत फेरबदल सुचवावे लागले आहेत, आणि इतकें करूनहि श्लोकाचा अर्थ समाधानकारक लागत नाहीं. उभयतां वादींनींहि आपापल्या परीनें या श्लोकांत बदल केला आहे; पण तो समाधानकारक वाटत नाहीं. याकरितां या तिथिनिर्णयांत या श्लोकाचें महत्त्व मुळींच न समजणें बरें.

(३) अष्टपंचाशतं रात्र्यः शयानस्याद्य मे गताः ।
शरेषु निशिताग्रेषु यथा वर्षशतं तथा ॥
माघोऽयं समनुप्राप्तो मासः सौम्यो युधिष्ठिर ।
त्रिभागशेषः पक्षोऽयं शुक्लो भवितुमर्हति ॥
—अनु. अ. १६७।२८

युद्धारंभापासून भीष्मनिर्याणापर्यंत ६८ दिवस गेले असें दोघेहि वादी मान्य करतात व आपण मानलेल्या युद्धारंभदिनापासून त्या मानानें भीष्मनिर्याणतिथी अमुक येते असें ते दाखवितात. दप्तरींच्या मताप्रमाणे अनुवत्सरी उत्तरायण माघ शु.७ स येतें. करंदीकर यांच्या मताप्रमाणे इद्वत्सरी उत्तरायण माघ कृ.४ स येतें. दोनहि दिवस वेदांगज्योतिषाला धरूनच आहेत. पण 'माघोऽयं समनुप्राप्तः' याचा अर्थ करंदीकर यांस समाधानकारक लावून दाखवितां येत नाहीं; तर 'शुक्लो भवितुमर्हति' याचें स्वारस्य दप्तरी यांस दाखवितां येत नाहीं. पण भीष्माष्टमी जी आज चोहोंकडे प्रचारांत आहे तिला जवळ दप्तरी यांची तिथी येते. याविषयीं आणखी विचार पुढें केला आहे.

(४) उषित्वा शर्वरीः श्रीमान् पंचाशन्नगरोत्तमे ।
समयं कौरवाग्रस्य सस्मार पुरुषर्षभ ॥
स निर्ययौ गजपुरात् याजकैः परिवारितः ।
दृष्ट्वा निवृत्तमादित्यं प्रवृत्तं चोत्तरायणम् ॥
—अनु. अ. १६७।६

धर्म हस्तिनापुरांत ५० दिवस राहिल्यानंतर सूर्य उत्तरेस वळला व उत्तरायण सुरू झालें, असें पाहून धर्मराजाला भीष्माच्या संकेताची आठवण झाली व तो भीष्माकडे गेला. हा अर्थ उभयतांसहि मान्य असून यांत वादग्रस्त असें कांहीं नाहीं.

(५) सप्तमाच्चापि दिवसादमावास्या भविष्यति ।
संग्रामो युज्यतां तस्यां तामाहुः शक्रदेवताम् ।
—उद्योग अ. १४३-१८

या श्लोकांत आजपासून ७ वे दिवशी अमावास्या आहे, त्या दिवशीं युद्ध सुरू करावें अशी सूचना आहे, हे उभयतांसहि मान्य आहे. पण दप्तरी म्हणतात कीं, त्या सूचनेप्रमाणें त्या दिवशीं युद्ध सुरू झालें. करंदीकर यांचें म्हणणें कीं, त्याच दिवशीं युद्ध सुरू झालें असा स्पष्ट निर्देश कोठेंहि नाहीं. सैन्याची हालचाल करण्यास, छावणीची व्यवस्था करण्यास कालावधि लागला असेल. उलूकाच्या भाषणांत 'लोहाभिहारः संवृत्तः' म्हणजे शस्त्रपूजनविधि झाला आहे, असा जो उल्लेख आहे तो चंपाषष्ठीच्या शस्त्रपूजनाला अनुलक्षून आहे, असें करंदीकर म्हणतात. युद्धाला जाण्यापूर्वी शस्त्रपूजा करावी असा प्रचार त्या काळीं क्षत्रियांत असण्याचा संभव आहे. पण हल्लीं चंपाषष्ठीचें महत्त्व उत्तर-हिंदुस्थानांत नाहीं.

(६) हते कर्णे ग्रहश्च तिर्यग्ज्वलनार्कवर्णः।
सोमस्य पुत्रोऽभ्युदियाय तिर्यक् ॥
—कर्ण. अ. ९४ श्लो. ४९

भीष्मनिर्याण उत्तरायणारंभीं झालें हें जसें ऐतिहासिक सत्य आहे तसें वरील श्लोकांत वर्णिलेलें बुधाचा उदयास्त हें ऐतिहासिक सत्य नाहीं. कर्ण मेल्यावर नद्या वाहण्याच्या बंद झाल्या, इत्यादि दुश्चिन्हांप्रमाणेंच ही एक गोष्ट सांगितली आहे, त्यांतून इतक्या दूरच्या काळाचें बुधाचें गणिताबद्दल खात्री देतां येत नाहीं. शिवाय रवि-बुधाचें अंतर ११·७२ असतां बुध दिसला ही गोष्ट मान्य करवत नाहीं. कारण

हल्लींच्या गणिताप्रमाणें बुधाचे कालांश १३ पाहिजेत, तितके दप्तरी यांनी येत नाहींत. याकरितां या मुद्याला महत्त्व देण्याचें कारण नाही. ज्वलनार्कवर्ण असा सोमपुत्र हा करंदीकर यांनीं सुचविल्याप्रमाणें धूमकेतूहि होऊं शकतो.

ततो विनिद्रा विश्रान्ताश्चंद्रमस्युदिते पुनः ।
संसाधयिष्यथान्योन्यं संग्रामं कुरुपाण्डवाः ॥
—द्रो. अ. १८४।२८

ततो मुहूर्ताद्भगवान् पुरस्तात् शशलक्षणः ।
अरुणं दर्शयामास ग्रसन् ज्योतिःप्रभां प्रभुः ॥
—द्रो. अ. १८४।४८

त्रिभागमात्रशेषायां रात्र्यां युद्धमवर्तत ।
कुरूणां पाण्डवानां च संहृष्टानां विशांपते ॥
—द्रो. अ. १८६।१.

या श्लोकांतून द्रोणपर्वतांतील घटोत्कचवधानंतरच्या रात्रियुध्दाचें वर्णन आहे. त्यांत मध्यरात्रीनंतर अर्जुनाच्या सांगण्यावरून कौरव व पांडव यांचीं सैन्यें निजलीं. नंतर दोन घटकांनीं चंद्रोदय झाला व पुनः युध्दास प्रारंभ झाला, व त्या वेळीं सहा घटका रात्र शिल्लक होती असें वर्णन आहे. रात्र व अंधार यासंबंधी रा. करंदीकर यांनीं पर्ववार पाठविलेलीं वचनें मी काळजीपूर्वक भारतांत काढून पाहिलीं. त्या त्या ठिकाणच्या रात्रीच्या अंधारासबंधानें दप्तरी यांस विचारतां त्यांनीं कळविलें कीं, चंद्राचा उजेड विस्तृत अशा रणभूमीवर युद्ध करण्यास पुरेसा नसल्यानें सापेक्षत्वानें त्यास अंधार असें म्हटलें आहे. दप्तरी यांचे हें विवरण मला ग्राह्य वाटत नसून द्रोणपर्वांतले वर दिलेलें रात्रियुद्धाचें व चंद्रोदयाचे वर्णन कृष्ण पक्षाच्या नवमी–दशमी नंतरचें असावें असें वाटतें. याशिवाय भारतकाळीं गणितागत तिथी व प्रत्यक्ष तिथी यांत दोन तिथींचें अंतर पडत असे असें सिद्ध करण्याकरितां रा. दप्तरी यांनीं पुरावा दिला आहे. त्यांनीं पाठविलेले वेदांगज्योतिषपध्दति, भारतकाळीं प्रचलित असलेली पध्दति, कंसवधकालवर्णन हे निबंध वाचले. त्यांचा या वादांत उपयोग होण्यासारखा नाहीं.

अशा रीतीने दोनीहि बाजूंच्या पुराव्याचा विचार करतां मी असा निर्णय देतो कीं, विवादविषयक दोन तिथींपैकीं **मार्गशीर्ष शु. ११** हीच गीताजयंती–तिथी होय. याचीं कारणें पुढें दिल्याप्रमाणें आहेत—

रा. दप्तरी हे उत्तम गणिती असल्याकारणानें 'दीप्यमानाश्च संपेतुर्दिवि सप्तमहाग्रहाः' व 'सोमस्य पुत्रोऽभ्युदियाय तिर्यक्' या गणितसाध्य वचनांवर त्यांनीं आपल्या पुराव्याची सर्वस्वी भिस्त ठेवला व तदनुरोधानें इतर वचनांस वाकावयास लाविलें. रा. करंदीकर यांनीं युद्धवर्णनभर पसरलेल्या चंद्रोदय व निशांधकार यांच्या वर्णनाकडे विशेष लक्ष दिलें व त्याच मुख्य पुराव्याला अनुसरून इतर वचनांचा अर्थ केला. यांत प्रत्येकास कांहीं स्थळीं प्रक्षेप कल्पावे लागले व अर्थाची फिरवाफिरव करावी लागली. त्यांत रा. दप्तरी यांना तर चंद्रोदयवर्णनाचें व कांहीं शब्दांचें स्थलांतर करावें लागलें. असो. भारतांत जो सर्वसंमत असा ऐतिहासिक भाग आहे त्याचा विपर्यास न होऊं देतां किंबहुना त्याला संभाळून कोणी आपलें प्रतिपादन इतर वचनाशीं अविरोधी ठेविलें आहे हे आपल्यास पाहिलें पाहिजे.

हा ऐतिहासिक भाग म्हणजे, भारतीय युद्ध १८ दिवस झालें. त्याचे पूर्वी गेलेल्या कार्तिक अमावास्येस ग्रहण आलें होतें. भीष्म लढाईचे १० वे दिवशीं पतन पावले व आपल्या इच्छाशक्तीनें शरशय्येवर उत्तरायण लागण्याची वाट पाहत तरोच पडून राहिले, आणि सूर्य उत्तरेकडे वळतांच त्यांचें निर्याण झालें, इत्यादि गोष्टी होत. ते किती दिवस पडून राहिले हे उत्तरायण लागण्याच्या अवधीवर अवलंबून आहे. नीलकंठानें ते दिवस ४२ मानले आहेत. इतरांनीं ५८ मानले आहेत. दोघींहि वादी हे दिवस ५८ च मानतात. अर्थात् युद्धारंभापासून ६८ वा दिवस उत्तरायणांत साधला असला पाहिजे; म्हणजे त्या दिवशी सायनार्क २७० अंश ( सायन मकरसंक्रमण ) असणें अवश्य आहे.

मकर–संक्रमणाच्या सुमारास सूर्याची रोजची गति सुमारें ६१ कला असते. म्हणून युद्धारंभापासून ६८ दिवसांत रवि सुमारें ६९ अंश पुढे जाईल. २७० अंशांत हे ६९ अंश वजा केल्यास युद्धारंभकाळाचा सायन रवि २०१ येतो. सूर्य उत्तरेकडे वळलेला पाहून भीष्मांनीं देह ठेवला हें दोघांहि वादींना मान्य आहे. कारण हें एतिहासिक सत्य आहे.

युद्धारंभीं सप्तग्रही होती असें धरून कुट्टक गणिताचा आश्रय घेऊन दप्तरींनीं युद्धारंभकाळ शकपूर्व १२७५ हा ठरविला आहे. त्या वर्षाचे मार्गशीर्ष शु. १ चे सकाळचे स्पष्ट निरयन ग्रह दप्तरींनी दिले आहेत. त्यांत स्पष्ट रवि २५१.८ आहे. या रवींत भीष्मनिर्याणापर्यंतचे रवीचे ६९ अंश मिळविले आणि अयनांश २४.६ वजा केले म्हणजे भीष्मनिर्याणाच्या वेळचा सायन रवि २९६.२ अंश येतो. म्हणजे यापूर्वीच २६ दिवस आधीं उत्तरायण सुरू झालें होतें असें दिसतें. आणि तेथपर्यंत रवि उलटल्याचें कोणालाच दिसलें नाहीं असली अप्रयोजक गोष्ट गृहीत धरावी लागते !

भीष्म तर सूर्याचे प्रतिनिवर्तनाची आकाशाकडे दृष्टि लावून आतुरतेनें प्रतीक्षा करीत होते. तेव्हां सूर्याचें उत्तरायण दृग्गोचर होतांच त्यांनीं आपल्या निर्याणाची तयारी केली असली पाहिजे हे उघड आहे. रा. दप्तरी यांनीं कुट्टक गणित सोडवितांना भीष्मांच्या निर्याणदिवशीं सायन रवि २७० अंश असला पाहिजे ही अट लक्षांत ठेवली नव्हती असें दिसतें.

आतां हीच कसोटी करंदीकर यांचे तिथीस कितपत लागू पडते हें पाहिलें पाहिजे. त्यांनीं स्वतः गणित केलें नाहीं. पण हें कसोटीचें तत्त्व त्यांनीं स्पष्टपणें मान्य केलें. तेव्हां मीच गणित करून पाहिलें. करंदीकर यांचा तिथीबद्दल जसा ठाम निर्णय आहे तसा वर्षाबद्दल नसून त्यांनीं युद्धारंभकाल शकपूर्व २०१४ हा दिला आहे. तथापि यांत पांचदहा वर्षें मागेंपुढें असें कोणतेंहि वर्ष घेण्यास त्यांची हरकत नाहीं. त्याप्रमाणें त्याच्याजवळच व कार्तिक व. ३० रोजीं ग्रहण येण्याचें वर्ष शकपूर्व २०१९ हें निघालें. ते घेण्यास करंदीकर यांना कबुली दिल्यावर त्या वर्षाचे मार्गशीर्ष शु. ११ चे स्पष्टग्रह काढले. त्यांत निरयन रवि २४२–७ आला. त्यांत भीष्मनिर्याण पर्यंतचे ६९ अंश मिळवून ३४·९ अयनांश वजा केले. तेव्हां सायन रवि २७६·८ अंश आला. हा रवि ठीक आला. गणितागत रवि व प्रत्यक्ष भीष्मनिर्याणायांत ६-७ दिवसांचें अंतर उपेक्षणीय आहे. शकपूर्व १२७५ च्या कार्तिक व. ३० चा रवि २२१° येतो व तो बरोबर आहे असें दप्तरींनींहि कळविलें आहे. त्या वर्षींच्या माघ कृ. ४ चा रवि २२९ अंश येतो व त्यांत अयनांश २५ वजा केल्यास सायन रवि २७४ अंश येतो. म्हणजे उत्तरायणांत चारच दिवसांचें अंतर पडतें. म्हणजे दप्तरींच्या युद्धारंभकालाच्या वर्षींहि भीष्मनिर्याण माघ कृ. ४ ला जुळतें म्हणजे त्या वर्षींहि युद्धारंभ मार्गशीर्ष शु. ११ लाच येतो. तात्पर्य, भीष्मनिर्याणकाळाच्या सायन रवीच्या गणिताप्रमाणें मार्गशीर्ष शु. ११ हीच गीताजयंतीतिथी निश्चित होते व यांत मार्गशीर्षांतील मोक्षदा एकादशीचाहि मान राखला जातो.

वर दिलेली युद्धारंभाची तिथी गणितविचारानें सुनिश्चित झाली आहे तरी रा. करंदीकर यांचा ज्या पुराव्यावर विशेष भरंवसा आहे त्याविषयीं चार शब्द लिहिल्याशिवाय निवाड्याच्या कारणांची पूर्तता झाली असें मानणें योग्य होणार नाहीं. चंद्रोदयाचें वर्णन रा. दप्तरी यांस सुरवातीपासूनच नडत आहे. त्याची विल्हेवाट लावण्याकरितां त्यांनीं त्या वर्णनाला स्थानभ्रष्ट केलें आहे. कांहीं भागाला प्रक्षिप्तहि ठरविलें आहे व 'चंद्रमस्युदिते' याचा सहज दिसणारा अर्थ 'चंद्र उगवेल तेव्हां' असा न घेतां 'चंद्र वर असतांनाच' असा अर्थ त्यांना प्रतिपादावा लागला आहे.

रा. दप्तरी यांचा विशेष भर सप्तग्रहीवर आहे; पण त्या संबंधाचें एकच वचन असून तें जरी घटकाभर भारतांतून काढून टाकिलें तरी एकंदर वर्णनांत खंड पडत नाहीं. पण चंद्रोदय व अंधकार यांच्या वर्णनाचा प्रकार तसा नाहीं. तें वर्णन आवश्यक आहे व त्यांतील प्रत्येक वचनाचा सरळ अर्थ घेऊनहि सर्व वचनांची संगति लावतां येते. असें करणें अशक्य असतें तर रा. दप्तरी म्हणतात त्याप्रमाणें ओढाताणीचे अर्थ स्वीकारणें भाग पडलें असतें. लढाईच्या क्रमागत वर्णनामध्यें ज्या दिवशीं चंद्रोदयवर्णन करण्याचा प्रसंग आला त्या दिवशींच योग्य ठिकाणीं योग्य शब्दांनीं तो वर्णिला आहे.

द्रोणपर्व अ. १५५ श्लो. १२ यामध्यें सैन्याला प्रकाश कसा मिळाला म्हणून जो प्रश्न आहे त्याचें उत्तर तेथेंच यावयास पाहिजे होतें असा रा. दप्तरी यांचा आग्रह आहे तो कां हें लक्षांत येत नाहीं. अ. १५५ मध्यें सैन्याला प्रकाश कसा मिळाला हा प्रश्न प्रश्नमालिकेतील शेवटचा आहे. आणि त्या मालिकेंतील प्रश्नांचीं उत्तरें अ. १६३ पर्यंत आलीं आहेत. तरी या प्रश्नाचें उत्तर आलें नाहीं म्हणून अ. १६४ मध्यें तो प्रश्न पुनः केला आहे व त्याचें उत्तर पुढें १२ व्या श्लोकांत आलें आहे. आणि लगेच १६ व्या श्लोकांत दीपप्रज्वलनाची बजावणीहि झाली आहे. अशी सरळ गोष्ट असतां रा. दप्तरी म्हणतात कीं, अ. १८४ मधील चंद्रोदयवर्णन मूळ १५५ व्या अध्यायांतच होतें. तेथून कोणी अनाड्यानें तें पुढें १८४ व्या अध्यायात नेऊन टाकलें. कां तर त्याला 'चंद्रमस्युदिते' याचा खरा अर्थ (दप्तरी करतात तो) समजला नाहीं! अशा प्रकारचे कल्पनातरंग वाहविण्याचें जें धाष्टर्य दप्तरी यांनीं केलें आहे तें मला अनाठायीं वाटतें.

त्याचप्रमाणें पुढें सौप्तिकपर्वांत कत्तलीच्या रात्रीं चंद्रप्रकाशाचें दिग्दर्शनहि नाहीं. उलट—

तेषामेवं प्रधवतां चरणोदीरितं रजः।
अकरोच्छिबिरे तेषां रजन्यां द्विगुणं तमः ॥

—सौ. अ. श्लो.

या श्लोकांत मूळचा अंधार धुरोळ्यानें दुप्पट झाला असें स्पष्ट म्हटलें आहे. याचा अर्थहि त्या दिवशीं काळीकुट्ट रात्र होती असा उघड असतां

रा. दप्तरी आपल्या उत्तरांत लिहितात कीं, " चंद्रप्रकाशांत सूर्यप्रकाश नाहीं म्हणून एकपट अंधार व धुरोळ्यामुळें तो वाढला म्हणून दुप्पट अंधार असें म्हटलें आहे." असलें उत्तर देण्याची पाळी त्यांजवर यावी हीच गोष्ट माझ्या मतें त्यांच्या समर्थनाचा लंगडेपणा दाखविते. एकंदरींत १८ दिवसांच्या युद्धभर पसरलेलें रात्र्यंधकाराचें व रजोंधकाराचें वर्णन रा. करंदीकर यांच्या मार्गशीर्ष शु॥ ११ या युद्धारंभदिवसाशीं जसें सुसंगत आहे तसें तें रा. दप्तरी यांच्या कार्तिक व॥ ३० किंवा मार्गशीर्ष शु. २ या तिथीशीं सुसंगत नाहीं असा माझा निर्णय आहे.

# येती लाहोरची कॉंग्रेस

कलकत्त्याच्या ठरावांतील मुदतीची तारीख ही ब्रह्मलिखितासारखी मानून ब्रिटिश मजूर पक्षानें सहकारितेसाठीं केलेला हात झिडकारावयाचा का ही मुदतबंदी बाजूला सारून, राऊंड टेबल पारषदेची संधि पडताळून पाहावयाची हा लाहोरच्या कॉंग्रेसपुढें मुख्य प्रश्न आहे. गांधी आज याबद्दल स्पष्ट न बोलले तरी यापूर्वी ते जें कांहीं बोलले आहेत त्यावरून ही संधि स्वाभिमान संभाळून उगवून घेतां येईल तितकी उगवून घ्यावी याच मताचे ते आहेत. कलकत्त्याच्या ठरावावर त्यांनीं मागाहून जीं भाष्यें लिहिलीं त्यांत त्यांनीं हें स्पष्ट केलें होतें कीं, 'ता. ३१ डिसेंबर रोजीं कांहीं अभूतपूर्व चमत्कार घडणार आहे असें मी मुळींच मानीत नाहीं. त्याचप्रमाणें त्या मुदतींत प्रत्यक्ष डोमीनियन स्टेटस पदरांतच पडलें पाहिजे असा माझा आग्रह नाहीं. त्या दृष्टीनें निश्चित पाऊल टाकण्याइतका सरकाराच्या अंतःकरणवृत्तींत बदल झाल्याची मला खूण पटली म्हणजे झालें.' आणि व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्यांत या अंतःकरणपरिवर्तनाचा संभव दिसत असल्याशिवाय दिल्ली व अलाहाबाद येथें व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्याला दिलेल्या संकेतार्थी स्वीकाराच्या उत्तरावर गांधींनीं सही केली नसती. एका बाजूला सप्रू--शास्त्री--बेझंट व दुसऱ्या बाजूला जवाहरलाल--सुभाषचंद्र या दोघांनाहि त्या उत्तरांत गोवून घेण्याचा जो प्रयत्न करण्यांत आला तोहि मजूर--सरकाराच्या नव्या धोरणाला राष्ट्रांतून एकमुखी उत्तर दिलें जावें या इच्छेनेंच. आणि हा एकमुखीपणा फक्त लाहोरच्या कॉंग्रेसपर्यंतच टिकावयाचा व पुढें मोडावयाचा अशी खरोखरच गांधी--मोतीलाल--वल्लभभाई यांची निश्चिती असती तर तेवढ्या अल्प मुदतीसाठीं त्यांनीं एकमुखीपणा राखण्यास इतका खटाटोप मुळींच केला नसता. अर्थात् लाहोर कॉंग्रेसनंतरहि, किंबहुना त्याच्यापुढें राऊंड टेबल परिषद होऊन जाईपर्यंत, हा एकमुखीपणा टिकावा अशी त्यांची इच्छा असली पाहिजे. म्हणूनच, त्यांनीं 'लाहोर कॉंग्रेस करील तें खरें' असें म्हणून स्वस्थ न बसतां त्या मुदतींत कॉंग्रेसमधील मत आपल्या बाजूला वळविण्याची आतां महिनाभर खटपट केली पाहिजे.

लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें एका बाजूला गांधी--मोतीलाल--वल्लभभाई व दुसऱ्या बाजूला जवाहरलाल-सुभाष-श्रीनिवास असा लढा आहे. 'स्वातंत्र्य कीं वसाहत-स्वराज्य' हा वाद तेथें निर्णीत होणार आहे. आज असहकार--प्रतिसहकार हा वाद अस्तित्वांतच नाहीं. असहकारिता कॉंग्रेसनें तहकूब केल्याला बरेच दिवस होऊन गेले, व तिचा पुनः उच्चार झाला तर लाहोर कॉंग्रेसमध्यें स्वातंत्र्याचें साधन म्हणून होईल व त्या असहकारितेचें स्वरूपहि पूर्वीच्या असहकारितेपेक्षां पुष्कळ निराळें राहील. असा कालप्राप्त झाला असतांना महाराष्ट्रांतील बुढ्ढक कट्टरांपासून चिल्लर कट्टरांपर्यंत बरेच लोक एका बुरणुस बुद्धीच्या पर्यंकपंडिताचे नादीं लागून असहकार--प्रतिसहकार वादाच्या जीर्ण चिंध्या चिवडीत बसण्यास प्रवृत्त झाले आहेत! यावरून ते कालाच्या किती मागें आहेत हेंच दिसून येतें.

गांधी मोतीलाल-वल्लभभाई एका बाजूला व जवाहरलाल- सुभाष--अय्यंगार दुसऱ्या बाजूला असा पूर्वीच्या असहकार पक्षांतच आज भेद झालेला आहे. यांपैकीं कोणता पक्ष आपल्याला ग्राह्य आहे हें महाराष्ट्रीय कट्टरांनीं एकमुखानें स्पष्ट बोलावें व त्याप्रमाणें शक्य तर लोकांचें मतपरिवर्तन करण्याचा प्रयत्न करावा. तरच ते आजच्या कालांत उभे आहेत असें मानतां येईल. नाहीं तर, त्यांनीं आपल्या सह्यांनिशीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस-कमिटीवर असहकार पुकारण्याचा जो जाहिरनामा नुकताच काढला आहे त्याला कालाच्या मागें रेंगाळणाऱ्यांच्या हाकाहाकीपेक्षां अधिक कांहींच किंमत नाहीं. कॉंग्रेस--कमिट्यांकडे त्यांनीं गेल्या वर्षांत लक्ष दिलें असतें तर त्यांचें म. प्रां. कॉं. कमिटीमध्यें बहुमत झालें असतें. पण तें गेल्यामुळें आतां अपरिहार्यतेला सद्गुणस्वरूप देण्यासाठीं राजिनामे देऊन ते जुनीं भांडणें उकरून काढीत आहेत. पण गांधींच्या नांवावर विकण्याचे दिवस गेले हें त्यांनीं ओळखावें.

असो. या बाबतींत आमचें मत गांधी–मोतीलाल–वल्लभभाई यांस अनुकूल आहे. आणि या मताचें दिग्दर्शन आम्ही वर केलेंच आहे. त्याच मतास कॉंग्रेसला जाणाऱ्या प्रतिनिधींनींहि पाठिंबा द्यावा असें आमचें सांगणें आहे. कारण स्वातंत्र्यवाद्यांचा आजचा उद्योग केवळ विध्वंसक स्वरूपाचा आहे डोमीनियन स्टेटसला व राऊंड टेबल परिषदेला विरोध करणें एवढेंच त्याचें आज नकारात्मक स्वरूप आहे. स्वातंत्र्याकरितां काय चळवळ करावयाची याच्या स्पष्ट कल्पना स्वातंत्र्यवाद्यांनी लोकांपुढें मांडलेल्या नाहींत; मग त्यासाठीं लोकांची तयारी करण्याची गोष्ट तर दूरच राहिली. किंबहुना आज सुभाषबाबू, जवाहरलाल व श्रीनिवास अय्यंगार हे प्रमुख स्वातंत्र्यवादी स्वातंत्र्यसंपादनाचा कार्यक्रम आंखावयास बसले तर तिघांचीं तीन मते होतील. एक म्हणतील, असहकार व कायदेभंग करून हिंदुस्थानाच्या संस्कृतीला अनुसरून असें स्वातंत्र्य मिळवावें; तर दुसरे म्हणतील, रशियाप्रमाणें शेतकरी व मजूर यांचें बंड उभारून कामकरी–शेतकरी राज्य स्थापावें; तर तिसरे म्हणतील कीं, इकडे स्वातंत्र्यवादाचा नुस्ता शाब्दिक पुकारा करून कौन्सिलांतहि जावें व तेथें मनांत हरकत ठेवून ( मेंटल रिझर्व्हेशन ) शपथाहि घ्याव्या !

समजा, लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें स्वातंत्र्यवाद्यांचें बहुमत झालें; तसें होण्याचा बराच संभवहि आहे. कारण कॉंग्रेसमधील प्रतिनिधी उत्साहाचे भरांत, व्यवहार्यतेकडे किंचिन्नहि लक्ष न पुरवितां व जबाबदारीहि न ओळखतां, सर्वांत अधिक भडक दिसणाऱ्या सूचनेच्या बाजूनें बेधडक हात वर उचलतात हा पूर्वापार अनुभव आहे. याप्रमाणें बहुमत झालें तरी एक प्रबळ अल्पमत डोमीनियन स्टेटसच्या बाजूला राहणार.म्हणजे स्वराज्य पक्षस्थापनेच्या वेळीं कॉंग्रेस जशी दुभंगली होती तशी आतां पुनः दुभंगणार. आणि या भांडणांतच अल्पमताला नियंत्रण घालीत स्वातंत्र्यवाद्यांना कॉंग्रेस संस्था चालवावी लागेल. या खटाटोपात स्वातंत्र्याचा कार्यक्रम ठरविणें व तो अमलांत आणणें ही गोष्ट बाजूलाच राहील. मद्रास कॉंग्रेसपासून स्वातंत्र्य पक्ष अस्तित्वांत असून तो सारखा डोमीनियन स्टेटसवाल्यांशीं झगडत आहे. या गडबडींत स्वातंत्र्यसंपादनाच्या अशा कोणत्याहि कार्यक्रमाची या पक्षानें तयारी केलेली नाहीं, आणि कॉंग्रेसलाच स्वातंत्र्य-संघ बनवावयाचा अट्टाहास स्वातंत्र्यपक्ष करूं लागेल तर त्यांतच त्याचें सर्व बळ खर्चून जाईल.

महात्मा गांधींचा अनुभव या बाबतींत स्वातंत्र्य पक्षानें लक्षांत घेण्यासारखा आहे. त्यांनीं पूर्वी कॉंग्रेसला सूतसंघ बनविण्याचा घाट घातला होता, पण यामुळें कॉंग्रेसचें हित होणार नाहीं, व सूतसंघाचेंहि हित होणार नाहीं हें त्यांच्या लक्षांत आलें. आणि उशीरा कां होईना पण कोणतीहि चूक ध्यानांत आल्याबरोबर त्वरित दुरुस्ती करण्याच्या गांधींच्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें त्यांनीं सूतसंघ निराळा काढण्याचें ठरविलें. सूत-वर्गणीला व खादी पोषाकाला कॉंग्रेसच्या घटनेंत मानाचें स्थान मिळालें येवढ्यांतच त्यांनीं समाधान मानलें व कॉंग्रेस ही इतर राजकीय कार्यक्रमास मोकळी ठेवली. कारण त्यांचे अंगांत एक नवी स्वतंत्र अखिल भारतीय संघटना निर्माण करून ती चालविण्याचें सामर्थ्य व आत्मविश्वास होता.

स्वातंत्र्य पक्षाच्या हल्लींच्या पुढाऱ्यांनीं स्वतंत्र 'स्वातंत्र्य संघ' यापूर्वीच काढलेला आहे; पण उद्देशपत्रिका जाहीर करण्यापलीकडे त्यानें कांहींच केलेलें नाहीं. आणि स्वातंत्र्य संघाचे प्रमुख अध्वर्यु रुसतफुगत कां होईना अखेर कॉंग्रेसशीं तडजोडी करून वेळ मारून नेत आहेत ! यावरूनच त्यांची स्वतंत्र संघटनेची धमक कितपत आहे तें दिसून येतें. फार लांब कशाला, मद्रासच्या कॉंग्रेसच्या वेळेपासून स्वतंत्र अखिल भारतीय स्वातंत्र्य संघाची संघटना चालवून स्वातंत्र्यसंपादनाचा स्पष्ट कार्यक्रम त्या संघटनेकडून आचारला गेला असता तर आज कांहीं वृद्ध पुढाऱ्यांनाहि डोमीनियन स्टेटसचें आश्वासन झिडकारण्याचें बळ आलें असतें. निदान स्वातंत्र्यवादी पुढारी कॉंग्रेसच्या तडजोडींत आज घुटमळत आहेत, तसे खास घुटमळले नसते. पण आज अशी स्थिति आहे कीं, स्वातंत्र्यवादी म्हणून मिरवावयाचें, पण वृद्ध पुढाऱ्यांची भीड मोडवत नाहीं, आणि कॉंग्रेसचा आसरा सोडून स्वतंत्रपणें वावरण्याचा आत्मविश्वास नाहीं.म्हणून डोमीनियन स्टेटसच्या जाहिरनाम्यावर दृष्टि ठेवून घुटमळत राहवयाचें असें त्यांचें दुटप्पी वर्तन चालू आहे.

आज लाहोरच्या कॉंग्रेसमध्यें बखेडा उत्पन्न करणें येवढेंच स्वातंत्र्य पक्षाचें उद्दिष्ट दिसत आहे. या पक्षाला मोठा आधार म्हणजे कॉंग्रेसच्या मुदतबंदीच्या ठरावाचा. पण या ठरावाबरोबरच जी कार्ये करण्याची अट होती तिचें काय ? सरकारला कोणत्या अटी घालावयाच्या या बाबतींत पुढें असणारे, व त्या अटी तंतोतंत पाळल्या गेल्या पाहिजेत याबद्दल आग्रह धरणारे लोक कॉंग्रेसनें ठराविक कार्यें करण्याची जी अट आपल्याला घालून घेतली ती विसरून जात आहेत. ३१ डिसेंबर ही कालाची मुदत नसून कार्याची मुदत होती. तें कार्य झालें

आहे काय ? साधी काँग्रेसचें सभासदत्व वाढविण्याची गोष्ट घ्या. ठराविक सभासद-संख्या न भरल्यास काँग्रेस कमिटी रद्द होईल, असा धाक घालूनहि फक्त सात प्रांतांची सभासद-संख्या पुरी झाली ! आणि त्यांतहि कित्येक प्रांतांच्या संख्येबद्दल काँग्रेसचे सेक्रेटरी संशयांत आहेत ! परदेशी कापडावरील बहिष्कार कमिटीचें कार्य चांगले चाललें असलें तरी हा बहिष्कार अपेक्षेप्रमाणें सफल झाला आहे काय ? आणि जातीजातींत कितपत ऐक्य प्रस्थापित झालें आहे. या सर्व गोष्टींचा विचार करतां केवळ ३१ डिसेंबरच्या मुदतीला चिकटून बसणें वेडेपणाचें होय. ज्या संस्थेनें आपण होऊन मुदत घातली त्याच संस्थेला ती बदलतां व वाढवितांहि येतें. आणि अपेक्षित काम जर झालें नाही तर नसत्या तारखेबद्दल आग्रह धरीत बसण्यांत काय अर्थ आहे ? का त्या तारखेला एखादी यक्षिणीची कांडी फिरून आजच्या देशाच्या परिस्थितींत एकदम पालट होणार आहे ?

स्वातंत्र्यवाद्यांना खरोखरच जर स्वातंत्र्याचा कार्यक्रम राष्ट्रापुढें मांडून अमलांत आणावयाचा असेल तर त्यांना दुभंगलेली काँग्रेस कितीशी उपयोगी पडणार आहे ? यापेक्षां, मद्रासला झालेल्या स्वातंत्र्याच्या ठरावानें स्वातंत्र्यवाद्यांना काँग्रेसमध्यें मानाचें स्थान प्राप्त झालें आहे, तेवढ्यावर समाधान मानून ते स्वतंत्र अशी स्वातंत्र्यवाद्यांची कार्यक्षम संघटना निर्माण करतील तर वृद्ध पुढारीहि ही त्यांची तयारी पाहून, राऊंड टेबल कॉन्फरन्समध्यें थोडीशी निराशा वाटल्याबरोबर बाहेर येऊन त्यांना मिळतील. उलट काँग्रेसमध्ये भावनेच्या भरात स्वातंत्र्यपुरस्कार व राऊंड टेबल परिषदेचा इनकार यांच्या ठरावाला हात वर करणारें बहुमत जरी स्वातंत्र्यवाद्यांनीं प्रयासानें मिळविलें तरी, ज्या काँग्रेसच्या पुढाऱ्यांना राउंड टेबल परिषदेची संधी पडताळून पहावयाची आहे ते स्वराज्य--पक्षासारखा वेगळा पक्ष स्थापन करून त्यांना योग्य दिसेल त्या मर्यादेपर्यंत राउंड टेबल परिषदेंत भाग घेतल्याशिवाय राहाणार नाहींत. आणि या काँग्रेसमधील बंडाळीला आवरण्यांतच स्वातंत्र्यवाद्यांचे सर्व श्रम खर्च होतील व स्वातंत्र्यसंपादनाचा असा कार्यक्रम करण्याची त्यांस फुरसतच राहणार नाही. ही आपत्ती टाळण्यासाठीं एका बाजूनें गांधी, नेहरू, वल्लभभाई यांच्यासारख्या पुढाऱ्यांनीं अप्रियतेस न भितां आपलीं मतें स्पष्ट मांडून कॉंग्रेसमधील मत आपल्या बाजूला वळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे व स्वातंत्र्यवाद्यांनींहि आपल्या मतांची गवसणी कॉंग्रेसला घालण्याच्या खटाटोपांत इतक्यांतच न पडतां आपली स्वतंत्र संघटना निर्माण करून या पुढील कार्यक्रम काय व तो कसा अमलांत येईल याच्या विचारास लागले पाहिजे.

# अक्कलकोट संस्थान प्रजा परिषद्

## अध्यक्ष न. चिं. केळकर यांचें भाषण

अक्कलकोट येथें रविवार ता. १ डिसेंबर रोजीं **श्री. न. चिं. केळकर** यांचे अध्यक्षतेखालीं अक्कलकोट संस्थान प्रजा परिषद झाली. अध्यक्ष या नात्यानें केळकर यांनीं केलेल्या भाषणांतला कांहीं मुद्द्यांचा भाग सारांशरूपानें पुढें दिला आहे.

"अक्कलकोटच्या प्रजेची ही तिसरी परिषद आज खुद्द अक्कलकोट येथेंच भरत आहे. या पूर्वी ती संस्थानांत भरविण्याची परवानगी नव्हती म्हणून पहिल्या दोन परिषदा बाहेर सोलापुरास भरल्या. संस्थानी परिषद बाहेर भरविण्याची पाळी येणें, हें संस्थानी अधिकारी व प्रजा या दोहोंच्याहि दृष्टीनें अनिष्ट होय. कारण अधिकारी प्रजेचे मूलभूत हक्क नाकारतात म्हणून व प्रजेला हे हक्क चालविण्याचें धैर्य नाहीं म्हणून दोघे वाईटच ठरतात. आणि सार्वभौम सरकार संस्थानांस या कामीं योग्य सल्ला देत नाहीं म्हणून त्यालाहि दूषणच. जी गोष्ट कांहीं थोडे मैल बाहेर जाऊन सुरक्षितपणें करतां येते तीच संस्थानांत मात्र करतां येऊं नये, हे हास्यास्पद दिसतें. जो संस्थानाचा पोलिटिकल एजंट तोच जवळच्या ब्रिटिश हद्दींतील शहराचा मॅजिस्ट्रेट असतो. एकीकडची बंदी तो चालू देतो व दुसरीकडे तीच गोष्ट त्याचेच अमलांत घडली तरी ती अपायकारक मानीत नाहीं ! ही विलक्षण स्थिति पालटली, याबद्दलें संस्थानी अधिकारी आणि प्रजा या दोघांचें मी अभिनंदन करतो.

आजपर्यंत संस्थानांत एकतंत्री अमलाचा प्रजेवर जुलम होता. आतां उलट अनियंत्रित राज्यकर्त्यांना लोकसत्तेचें भय उत्पन्न झालें आहे. पण परस्परांचें भय नाहींसें होऊन खऱ्या प्रातिनिधिक संस्थांचे रूपानें दोघांनाहि राज्यघटनेंत योग्य स्थान मिळावे, अशी आमच्यासारख्या दोघांच्याहि हितचिंतकांची इच्छा असणार. संस्थानांतील स्वराज्याची प्रगति

ब्रिटिश मुलखांतील स्वराज्याच्या मार्गानेंच होणारी आहे. या दोनहि स्वराज्यांचा मेळ घालणाऱ्या राउंड टेबल परिषदेंत संस्थानी प्रजेला स्थान मिळेल ल का नाहीं ही गोष्ट संशयित आहे. व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्यांतील संस्थानी प्रतिनिधी या शब्दांचा अर्थ केवळ संस्थानिक असा ठरविण्याचे प्रयत्न सुरू आहेत. ब्रिटिश हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस मिळण्याच्या मार्गांत संस्थानिक आडकाठी करणार नाहींत अशी बिकानेरच्या महाराजांनीं संस्थानिकांचे वतीनें घोषणा नुकतीच केली आहे. आजपर्यंतच्या त्यांच्या वृत्तीवरून येवढ्याबद्दलहि त्यांचे उपकारच मानले पाहिजेत! त्यांना यापुढें असा अडथळा आणणें कितपत शक्य आहे, ही गोष्ट सोडा. पण ब्रि. मुलखांतील स्वराज्याच्या प्राथमिक लढ्यांत हे स्वराज्य आपल्याला भोवूं नये म्हणून संस्थानिकांनीं विरोधी भाव ठेवला नव्हता काय? हिंदुस्थानाला सुधारणा देण्यांत ब्रि. सरकारने कमकुवतपणा दाखविला असें मानणारे व हे स्वराज्यवादी चळवळ्ये आमच्या संस्थानांत असते तर त्यांना गडावरील तुरुंगांत कायमचें डांबून त्यांचा निकाल केला असता, असें आढ्यतेनें सांगणारे संस्थानिक मला माहीत आहेत. आतां नव्या जाहिरनाम्यानें अशा प्रकारच्या राजामहाराजांना स्वराज्यद्रोह करून सरकाराशीं स्नेह वाढविण्याची संधि कायमची गेली याबद्दल ते मनांतल्या मनांत ब्रि. सरकारला शिव्याशाप देत असतील! आजपर्यंत या स्वराज्यद्रोहाच्या मोबदल्यांत संस्थानांतील जुलमाकडे ब्रि. सरकारचा कानाडोळा होण्याची व्यवस्था होई. ही पापमय देवघेव आतां संपली.

बटलर कमिटीनें संस्थानाच्या अंतर्गत राज्यकारभारावरहि देखरेख करण्याचा साम्राज्य-सरकारचा हक्क व वहिवाट आहे असाच निर्णय दिला. बटलर कमिटीच्या बाबतींत हात दाखवून अवलक्षण करून घेतलेल्या संस्थानिकांना राउंड टेबल परिषदेत आपल्याला स्थान मिळेल व ब्रिटिश मुलखांतील लोकप्रतिनिधींबरोबर न बसतां वेगळें बसतां येईल या योजनेनें त्यांतल्या त्यांत समाधानाची दुहेरी संधि लाभली. कारण लोकांच्या प्रतिनिधींबरोबर खांद्याशीं खांदा लावून बसण्यांत त्यांना कमीपणा वाटतो आणि आपल्याच प्रजेच्या प्रतिनिधींशीं बरोबरीनें वागण्यांत तर अपमानाचा कडलोटच ते मानतील. वेगळ्या बैठकीनें त्यांचा मान राखला गेला व बटलर कमिटीचा निकाल आपण अजून स्वीकारला नसून त्याबद्दल राउंड टेबल परिषदेंत विरोध करू असें भासविण्याची संधि सध्या त्यांस सांपडली आहे.

आपलें अंतर्गत स्वातंत्र्य अबाधित राखूं इच्छिणाऱ्या बिकानेरच्या महाराजांना राउंड टेबल परिषदेंत संस्थानी प्रजेच्या प्रतिनिधींचा उल्लेख नाहीं याबद्दल समाधान वाटलें. आणि राष्ट्रीय सर्व-पक्षीय परिषदेत सरकारचे प्रतिनिधी नव्हते व संस्थानी प्रजेचे प्रतिनिधी होते म्हणूनच संस्थानिकांनीं तींत भाग घेतला नाहीं, असे बिकानेरच्या महाराजांनीं आत्मसमर्थन केलें आहे. सरकारचे प्रतिनिधी नाहींत तेथें संस्थानिकांनीं न येणें हे त्यांच्या स्वभावानुसारच झालें! पण परिषदेत प्रजेचे प्रतिनिधी आहेत म्हणून तींत भाग न घेणें या दुसऱ्या सबबीनें मात्र आम्हांस अतिशय चीड येते. राजांना प्रजेच्या अधिकृत प्रतिनिधींचा विटाळहि खपू नये काय? राजा हाच प्रजेचें मनोगत खरें जाणतो आणि हे प्रतिनिधि जाणत नाहींत असें बिकानेरचे महाराज म्हणतात. पण हा जुनाट युक्तिवाद आतां यापुढें टिकणार नाहीं. संस्थानांत प्रातिनिधिक संस्था स्थापन करून त्यांना अधिकार देईपर्यंत स्वस्थ बसावयाचें नाहीं व राजांनाहि स्वस्थता लाभूं द्यावयाची नाहीं असा संस्थानी प्रजेचा आतां निश्चय झाला आहे. संस्थानिक हेच जर प्रजेचे प्रतिनिधी म्हटले तर सेक्रेटरी ऑफ स्टेट हेच ब्रिटिश प्रजेचे प्रतिनिधि मानावे लागतील! पण स्टेट सेक्रेटरींचें असे प्रतिनिधित्व हिंदी लोकांनीं कधींच मान्य केलेलें नाही. सरकाअधिकारी व लोकप्रतिनिधि हा भेद जसा खालसांत मानला तसाच तो संस्थानांचे बाबतींतहि कां मानूं नये? असे प्रजेचे प्रतिनिधी फार तर दोन-तीन घेतां येतील व तेहि सस्थानाबाहेर राहून संस्थानी प्रश्नांत मन घालणारे असे घेतां येतील. यांत संस्थानिकांचा अपमान कोणत्याहि प्रकारें होण्यासारखा नाहीं. बिकानेरचे महाराज हे आपल्या संस्थानांतील प्रजेच्या प्रतिनिधींची सल्लामसलत घेण्यांत कमीपणा मानीत नाहींत, असें त्यांच्या भाषणावरूनच दिसतें. मग संस्थानांचे प्रतिनिधी म्हणजे एकटे संस्थानिक असा मक्ता त्यांनीं आपणाकडे कां घ्यावा? या बाबतींत इतकें विवेचन करण्याचें कारण हेंच कीं, हिंदुस्थानांत अनियंत्रित राजसत्ता कायमची चालू ठेवण्याच्या संस्थानिकांच्या प्रयत्नाला जोराचा विरोध करण्याची वेळ आली आहे.

पत्याळाचे महाराजांनीं परवां अशी उपमा घेतली कीं, "संस्थानिक हे आईच्या घरीं (ब्रिटिश साम्राज्यांत) कन्या या नात्यानें वागले तरी आपल्या घरांत (संस्थानांत) ते घरधनिणीप्रमाणें स्वतंत्र आहेत" पण लग्न झालेल्या मुलीची दोन प्रकारची स्थिति असूं शकते. सधवा किंवा विधवा. संस्था-

निक सधवा मुलीप्रमाणें मानले तर त्यांचा पति कोण ? ब्रिटिश सरकार हें माबाप असल्या-मुळें तें पति होऊं शकत नाहीं. तेव्हां तो पति दुसरीकडेच हुडकला पाहिजे. तो प्रजेशिवाय दुसरीकडे कोठें सांपडणार ? बरें, या मुलीची वैधव्यावस्था मानली तर तिला इस्टेटीवर मर्यादितच अधिकार राहणार. भावी वारसाच्या हक्काला बाध येईल, अशा रीतीनें इस्टेटीची विल्हेवाट तिला लावतां यावयाची नाहीं. हे भावी वारस म्हणजे त्यांची प्रजाच होय. अशा रीतीनें आपल्या मत लबासाठीं पत्याळाच्या महाराजांनीं पुढे केलेली उपमा त्यांच्यावरच बरोबर उलटवितां येते. जुन्या परंपरेंत वाढलेले संस्थानिक झाले तरी 'मी म्हणजेच संस्थान' असे ते वाटेल त्या बाबतींत म्हणूं शकत नाहींत. स्वयंनिर्णयाचें सध्या युग सुरू आहे, हें खरें. पण हा स्वयंनिर्णयाचा हक्क केवळ अनियंत्रित राजांनाच बहाल केलेला नाहीं. उलट या राजांना न जुमानतां प्रजेनेंच हा हक्क चालवायचा आहे. पाश्चात्य देशांतील सर्व राजमुगुट वितळविण्याच्या कढईंत पडले आहेत. आजचें वातावरण ओळखण्याच्या दृष्टीनें ही गोष्ट संस्थानिकांच्या निदर्शनास आणावीशीं वाटते, त्यांचा पाणउतारा करण्यासाठीं नव्हे.अशा वेळी भोंवतालच्या परिस्थितीकडे संस्थानिकांनीं दुर्लक्ष करणें वेडेपणाचें ठरेल. एका बाजूनें ब्रि. सरकार व दुसऱ्या बाजूनें ब्रि. प्रजा या दोन शक्तींच्या मध्ये सांपडलेल्या संस्थानिकांनीं यापुढे शहाणपणानें व जपूनच वागलें पाहिजे. नाही तर लोकसत्तेच्या क्षोभाच्या तुफानांत कांहीं एका मर्यादेपलीकडे त्यांना ब्रि. सरकारहि वाचवूं शकणार नाहीं."

# १८२९—१९२९—२०२९

इंग्रजी अमदानी महाराष्ट्रांत सुरू झाल्यावर इ.स. १८२९ मध्यें नोव्हेंबरच्या २९ व्या तारखेस पुणे जिल्ह्यांतील तळेगांवढमढेरे या गांवीं सरकारी प्राथमिक मराठी शाळा उघडण्यांत आली. त्या गोष्टीला गेल्या शुक्रवारीं बरोबर शंभर वर्षे झालीं. म्हणून ग्रामस्थ पुढारी व शाळेचे चालक यांच्या सहकार्यानें शाळेचा प्रथम शतसांवत्सरिक समारंभ मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. समारंभाकरितां उत्सवाच्या चालकांनीं एक 'त्रोटक इतिहास' सुमारें पन्नास पानांचा तयार करून छापून वाटला. तो मोठा नमुनेदार असून, त्यांत संशोधक बुद्धीनें परिश्रमपूर्वक या शाळेसबंधीं अनेकविध माहिती दिली आहे. ती वाचणारास क्षणभर कौतुक वाटून मनोरंजन होतें. या समारंभाचे महत्त्व व त्याचा अभिमान हा अर्थात् स्थानिक स्वरूपाचा असणार हें उघड आहे. म्हणजे विशेषत: तळेगांवचे ग्रामस्थ आणि ज्या जिल्ह्याच्या अधिकारक्षेत्रांत हें गांव येतें त्या पुणें जिल्ह्यापुरत्या तो असावा यांत आश्चर्य नाहीं. परंतु इंग्रजी अमदानींत स्थापन झालेल्या एका प्राथमिक मराठी शाळेचा शतसांवत्सरिक उत्सव हे शब्द कानावर येतांच अनेक प्रकारचे विचार मनांत खळबळून उठल्याशिवाय राहात नाहींत. म्हणून त्यासंबंधानें दोन शब्द लिहिण्याचें आज योजिलें आहे.

कोणत्याहि नव्या अमदानींतील कोणत्याहि कार्याचा शतसांवत्सरिक उत्सव म्हटला म्हणजे प्रथम मनावर आघात करणारी गोष्ट म्हटली म्हणजे त्यापूर्वी होऊन गेलेल्या अमदानीचें स्मरण. प्राथमिक शाळा ही चीज वास्तविक किती क्षुद्र. तथापि राज्यांच्या घडामोडीच्या संबंधांत आज एक शंभर वर्षे गेलीं अशी आठवण करून देण्याचें सामर्थ्य तिच्याहि अंगीं असल्यामुळें ती त्या दृष्टीने महत्त्वाचीच ठरते. तथापि आपणाला आज या जुन्या व नव्या अमदानींसंबंधानें केवळ राजकीय असा विचार किंवा विवेचन कर्तव्य नाहीं. तळेगांवास झालेल्या समारंभानें जुन्या व नव्या शिक्षणाविषयींच तुलनात्मक विचार मनांत उद्भवतो. पण कोणत्याहि वाटेने गेलें तरी शेवटीं, लवकर किंवा उशीरा कां होईना, मनुष्याच्या मनांत मुक्काम कायम आहे तोपर्यंत तो त्या मुक्कामालाच पोंचणार. त्या प्रमाणे तुलनात्मक शिक्षणाच्या मार्गानें मन गेलें तरी तें शेवटीं राजकीय स्वराज्याच्या विचाराचा मुक्कामच गांठतें.

असो. सन १८२६ सालीं महाराष्ट्रांत इंग्रजी अमदानींत नव्या पद्धतीच्या शिक्षणाला प्रारंभ झाला. प्रथम शिक्षण कोणत्या प्रकारचें द्यावे या विषयीं तें देणारांना किंवा घेणारांनाहि निश्चित किंवा दूरदृष्टीची कल्पना अर्थातच नव्हती. म्हणून सामान्य साक्षरतेच्या शिक्षणापासून प्रारंभ झाला. त्या वेळचे वरिष्ठ शिक्षण म्हटलें म्हणजे संस्कृत विद्येतील शास्त्रज्ञान व तें मिळवून देण्याचा उपक्रम पुणे येथील विश्रामबागेंत चालू होणाऱ्या संस्कृत पाठशाळेंत करण्याचें इंग्रज सरकारानें योजलें.पण सर्व महाराष्ट्रभर सार्वजनिक शिक्षण म्हणून देण्याचे जे योजण्यांत आलें तें मराठींतूनच होय.

महाराष्ट्रांतील जुनी शिक्षणाची पद्धत म्हटली म्हणजे ज्यांना तात्या पंतोजीच्या शाळा म्हणत अशा खासगी

शाळांची. या शाळांना सरकाराकडून आश्रय नसे. पंतोजींना देखील करारानें ठराविक फी दरमहा वसूल करण्याची पद्धत नव्हती. तर सण सुगी समारंभ अशा निमित्ताने विद्यार्थ्यांनी गुरूला कांहीं तरी पूजाद्रव्य म्हणून देण्याची वहिवाट होती, व हे नित्यनैमित्तिक गुरूचे ऋण मनुस्मृतींत सांगितल्याप्रमाणें छत्री जोडा आसन, धान्य, भार्जापाला, वस्त्र इत्यादींच्या दानानें फेडण्यांत येत असे. सरकारी शाळा झाल्यानंतर ही पद्धती अर्थातच बदलली. त्याबरोबर शिक्षणाचे हेतूहि बदलले. सामान्यतः असें दिसतें कीं, नव्या अमदानींतील शिक्षणाचे प्रारंभींचे हेतू तीन प्रकारचे होते. १ सरकारी राज्यकारभाराकरितां उपयोगी पडेल अशा कारकुनी फडाची निरंतर भरती करणें. हा हेतूच अद्यापिहि अबाधित सुरू आहे; आणि आज शंभर वर्षांत कारकुनी फडाच्या कल्पनेचा विस्तार होऊन साध्या खर्डेघाशीपासून कौन्सिलदारी किंवा गव्हर्नरी येथपर्यंत मजल गेली असली तरी मुख्य सत्ता व धोरण परक्यांचा हातीं असल्यामुळें अजूनहि वरिष्ठ शिक्षण पावलेले व कौन्सिलदारी गव्हर्नरीपर्यंत चढलेले हिंदी नोकर या कारकुनी फडांतील आसामीच होत. शिवशाहीमध्ये अष्टप्रधानांनाहि सर कारकून अशीच संज्ञा होती, आणि आजच्या हिंदी कौन्सिलदारांना, प्रधानांना किंवा अॅक्टिंग गव्हर्नरांनाहि शिवशाहींतील अष्ट प्रधाना इतकेहि स्वतंत्र अधिकार ज्याअर्थी नाहींत त्याअर्थी त्यांना कारकुनी फडांतील आसामी असें म्हणण्यास काय प्रत्यवाय आहे !

असो. इंग्रज सरकाराचा हा शिक्षण विषयक हेतु आज पूर्ण फलप्रद झालेला आढळतो व पुढेंहि तो असाच फलप्रद होत राहाणार; कारण सरकारी नोकरीला सुशिक्षित व बुद्धिमान लोक मिळण्याची जरूरी उभयपक्षां सारखीच आहे. सरकाराला असे लोक पाहिजेत, व लोकांना अशा नोकऱ्या पाहिजेत आणि उष्टें खावयाचे तर तुपाच्या आशेनें तरी खावें, या दृष्टीनें सरकारी नोकरी करावयाचीच तर त्या नोकरींतील वरिष्ठांतल्या वरिष्ठ जागा आपल्या हस्तगत व्हाव्या, अशी आंकाक्षा या कारकुनी फडाकडे वळणाऱ्या लोकांनीं बाळगल्यास तींत व्यक्तिदृष्ट्या कांहीं वावगें नाहीं. पण नव्या अमदानींत शिक्षण सुरू झालें त्याचे दुसरे दोन परिणाम राज्यकर्त्यांना दिसत होते. पैकीं एक घडून यावा अशी त्यांची उत्कट इच्छा होती, व दुसरा घडून न आल्यास बरा अशी त्यांना मनांतून इच्छा असली तरी तो घडून आल्याशिवाय राहाणार नाहीं याची जाणीवहि त्यांतल्या दूर दृष्टीच्या राजकारणी पुरुषांना होती. पैकीं पहिला परिणाम म्हणजे महाराष्ट्रांतील जुनी संस्कृति नष्ट होऊन इंग्रजी संस्कृतीनें तिची जागा घ्यावी. इतकेंच नव्हे तर, शिक्षणाच्या योगानें महाराष्ट्रांतील हिंदू धर्म नष्ट होऊन त्याच्या जागीं ख्रिस्ती धर्माचा प्रसार व्हावा हा होय ! १८२० ते १८२७ या वर्षांत म्हणजे महाराष्ट्रांत नव्या शिक्षणाच्या शाळा सुरू होण्याच्या वेळीं पुण्या–मुंबईस जो सर्वांत नांवाजलेला मुत्सद्दी माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन होता त्याचे विचार या विषयीं नमूद करण्यासारखे आहेत. तो एके ठिकाणीं म्हणतो "I am convinced that the Convertion of the natives must infallibly result from the diffusion of Knowledge among them". १८३१ सालीं प्रसिद्ध झालेल्या मोल्स्वर्थच्या शब्दकोशाच्या प्रस्तावनेंत याचेंच प्रत्यंतर खालील शब्दांनीं सांपडते "It was undertaken from a desire to promote the propagation of the glorious gospel."

तथापि शिक्षणद्वारें धर्मांतर घडवून आणण्याचा हा हेतु मनांत ठेवावा, बाहेर प्रगट करूं नये असें शाहाण्या इंग्रजाना माहीत होतें. कारण शिक्षणाच्या द्वारें धर्मांतर घडविण्याचा द्राविडी प्राणायाम करीत बसण्यापेक्षां म्हणजे उजव्या हातानें डावीकडून तोंडांत घास घालण्यापेक्षां प्रत्यक्ष नवीन शाळांतून ख्रिस्ती धर्माचें शिक्षणच महाराष्ट्रीयांना दिलें तर काय बिघडलें असा प्रश्न कांहीं उतावळ्या आधाशी मिशनऱ्यांनीं उपस्थित केला. त्याला एल्फिन्स्टन यानें खालील उत्तर दिलें–"The only effect of christianity in our Schools would be to sound the alarm and to warn the Brahmins of the approaching danger." पुण्याच्या ब्राह्मणांची भीति इंग्रजांना आजकालचीच नाहीं, तर शभर वर्षांच्या पूर्वींहि ती होती आणि पुढील इतिहासावरून पाहतां शेवटीं या ब्राह्मणानेंच ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराला विरोध केला, व त्यामुळें शिक्षणाचा हा एक मूळ हेतु सर्वस्वी फसला, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां शिक्षणाचा दुसरा जो एक परिणाम म्हणून वर सांगितला त्याविषयीं थोडें लिहूं. हा परिणाम घडून येऊं नये अशीच त्यांची इच्छा खरी, पण तो घडून आल्याशिवाय राहूं शकणार नाहीं असेंहि दूरदर्शी इंग्रजांना वाटत होतें, हें वर सांगितलेंच आहे. तो परिणाम म्हटला म्हणजे राष्ट्राचा पुनरुद्धार करण्याची तीव्र आकांक्षा सुशिक्षितांमध्यें उत्पन्न होणें हा होय. किंवा आजच्या भाषेनें बोलावयाचें

म्हणजे स्वराज्य, राजकीय स्वातंत्र्य, मिळविण्याची बुद्धि उत्पन्न होणें हा होय. नव्या शिक्षणामुळें ही बुद्धि उत्पन्न होणार, तिला अनुसरून शक्य ते प्रयत्न होणार व त्या प्रयत्नांचा अवश्य तो परिणाम घडणार ही गोष्ट एल्फिन्स्टनसारख्या मुत्सद्यांना माहीत होती. तो एके ठिकाणीं म्हणतो, "A time of separation must come and it is for our interest to have an early separation from a civilised people than a violent rupture with a barbarous nation." "हातचे राज्य जाणारच तर तें लवकरहि जावो. पण तें काढून हातीं घेणारे लोक तरी सुशिक्षित व्हावे, सुधारावे व संपन्न व्हावे. कारण पुढें अशा लोकांशीं व्यवहार व इतर स्नेहसंबंध तरी ठेवतां येतो व त्यापासून आपला आर्थिक फायदा तरी होत राहतो. पण उलट जित लोकांना अज्ञानांत डांबवून ठेवल्याने ताटातुटीचा प्रसंग जरा उशिराने येईल हें खरें. तरी पण तो येईल तेव्हां अपघातच होईल व ताटातूट कायमची टिकेल."

महाराष्ट्रांत नवीन शिक्षण सुरू करण्याच्या सुमारास ले. ब्रिग्ज हे एकदां एल्फिन्स्टनसाहेबांच्या भेटीला गेले होते; तेव्हां त्यांच्याजवळ आजूबाजूला शिक्षणोपयोगी अशा पुस्तकांचा भारा पडला होता! तो पाहून ब्रिग्ज याने विचारलें कीं, या पुस्तकांचा काय उपयोग? त्यावर एल्फिन्स्टन याने उत्तर दिलें कीं, हीं पुस्तकें एतद्देशीय लोकांना शिकविण्याकरितां आहेत. पण त्याबरोबर तो असेंहि म्हणाला कीं, 'आम्ही या लोकांना शिक्षण देत आहों खरें, पण तें शिक्षण देणें म्हणजे आम्हाला परत विलायतेंत चंबूगबाळें घेऊन जाण्याकरितां रस्ता बांधण्यासारखेंच आहे हेंहि मी जाणून आहे.' एल्फिन्स्टन याच्या या उद्गारांत या नव्या शिक्षणाचा अंतिम परिणाम व तें देणारांच्या मनाची दुहेरी म्हणजे स्वार्थ व परार्थ किंवा सत्प्रवृत्ति व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या संकटांची जाणीव अशी दुहेरी मनःस्थिति स्पष्टपणें पाहण्यास सांपडते.

असो. अशा स्थितींत साध्या मराठी शिक्षणाचा प्रारंभ झाला. व पुढें एक पिढीनंतर वरिष्ठ शिक्षण कोणतें द्यावें याचा विचार सुरू झाला. तेव्हां संस्कृत विद्येऐवजीं इंग्रजी विद्या एतद्देशीय लोकांना शिकवावी, हें लॉर्ड मेकॉले यानें प्रतिपादलेलें धोरण प्रभावी ठरलें. परंतु त्याहि शिक्षणाचा परिणाम अजमासाप्रमाणेंच झाला. मराठींतून बायबल वाचलें म्हणून कोणी शिकलेले लोक धर्मांतराला प्रवृत्त झाले नाहींत, हा जसा एक निश्चित परिणाम घडला, तसाच दुसराहि निश्चित परिणाम घडला, तो हा कीं, इंग्रजी शिक्षणांतून अखेर राष्ट्रोद्धारक बुद्धि व राजकीय स्वातंत्र्याची आकांक्षा उत्पन्न होऊन अखेर राष्ट्रीय चळवळीकडे लोकांची प्रवृत्ति झाली. याचें प्रत्यंतर म्हणून विषयानुसंधानानें तळेगांवचेंच उदाहरण घेऊन असें सांगतां येईल कीं, या शाळेंत शिकलेल्या विद्यार्थ्यांपैकीं कांहीं तरतरीत लोक सरकारी नोकरींत म्हणजे इंग्रजी कारकुनी फडांत शिरले आहेत; कांहीं वकील झाले आहेत; कांहीं खासगी कॉलेजांतून प्रोफेसरीचें काम करीत आहेत तर एखादादुसरा विद्यार्थी, म्हणजे कै. विष्णु गणेश पिंगळे यांच्यासारखा, असाहि निघाला कीं, त्यानें राष्ट्रीय बुद्धीनें परदेशाची सफर केली, व परत येऊन राज्यक्रांति करण्याच्या हेतूनें यथाशक्ति उद्योग करून त्यांत आपल्या प्राणाची आहुति देऊन देशाभिमानाप्रीत्यर्थ स्वार्थत्यागाची कड पोंचविली! अशा दृष्टीनें नवीन शिक्षणाच्या कल्पनेला शंभर वर्षे झालीं असें म्हणतां येईल तर त्या शिक्षणामुळें परदास्यबुद्धीचींहि शंभर वर्षे भरलीं असेंहि विधान निराळ्या रीतीनें आज करतां येत आहे, व एल्फिन्स्टनचा भविष्यवाद सफळ होत आहे.

कालगणनेचे योगायोग कित्येक वेळां चमत्कारिक असतात. व असा एक योगायोग म्हटला म्हणजे हा कीं, ज्या १८२९ सालीं तळेगांवची ही प्राथमिक शाळा उघडण्यांत आली, त्याच सालीं कॅप्टन केपन व बाबा साने यांनीं मिळून तयार केलेला 'ग्रँटडफची मराठ्यांची बखर' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. म्हणजे एका गोष्टीनें मराठेशाही बुडाल्याची साक्ष पटून एका विशिष्ट आशेचा दहनविधि झाला, तर दुसऱ्या गोष्टीनें आगामी काळांतील नव्या आशेचें बीज त्याच राखेच्या खतांत रुजत घातलें गेलें आणि त्या बीजाचा वृक्ष होऊन अकालीं मोहोर गळून पडावा त्याप्रमाणें का होईना पण मोहोर येण्याइतकी त्या आशेच्या वृक्षाची वाढ या शंभर वर्षांत झाली, हे पिंगळे यांच्या वरील उदाहरणावरून दिसून येतच आहे. याच क्रमानें पाहतां आणखी शंभर वर्षांनीं जर तळेगांवच्या या शाळेचा द्वितीय शत–सांवत्सरिक उत्सव करण्याचा प्रसंग आला तर त्या वेळीं वाचला जाणारा वृत्तांत कसा असेल व त्यांत काय काय गोष्टी उल्लेखिल्या जातील, याची कल्पना प्रतिभासपन्न सहृदय मनुष्याला आजहि होऊं शकेल. १९२९ सालीं वाचलेला वृत्तान्त पन्नास पानांचा होता तर २०२९ सालीं वाचण्यांत येणारा वृत्तांत ५०० शें पानांचा सहज होऊं शकेल. हल्लींच्या वृत्तांतांत शिक्षणपद्धती, शिक्षणाधिकारी व शिक्षण मिळविलेल्या लोकांचीं जीं वर्णनें आलीं आहेत त्यापेक्षां या सर्व गोष्टींचीं वेगळीं वर्णनें या पुढील समारंभाच्या

वृत्तांतांत वाचावयास सांपडतील यांत काय नवल!

पुढील शंभर वर्षांत स्वराज्य मिळालें तरी प्राथमिक शिक्षण म्हणून राहणारच. तसेंच वरिष्ठ शिक्षणाधिकारी म्हणून असणारच. तसेंच शाळेंतून निघणाऱ्या विद्यार्थ्यांत विद्वान व कीर्तिमान असेंहि निपजणारच; परंतु परकी राज्यांत होणाऱ्या या गोष्टी व स्वराज्यांत होणाऱ्या या गोष्टी यांच्या स्वरूपांत किती अंतर असतें हें सांगावयास नको. म्हणून तळेगांव येथील शंभर वर्षे झालेल्या आपल्या शाळेचा अभिमान धरणाऱ्या ग्रामस्थांना आमची अशी सूचना आहे कीं, त्यांनीं आपल्या शाळेचें यश असेंच चिंतीत जावें व तिच्या भरभराटीकरितां असेंच परिश्रम करावे. पण त्याबरोबर त्यांना आमची राष्ट्रीय दृष्ट्या मनोरंजक वाटण्यासारखी अशी ही एक सूचना आहे कीं, त्यांच्यांतील प्रतिभासंपन्न लोकांनीं या शाळेचें पुढील शंभर वर्षांचें भविष्य कल्पनेनें वर्तवून लिहून ठेवावें. किंबहुना हें भविष्य एखाद्या ताम्रकलशांत घालून शाळागृहाच्या वास्तूंत पुरून ठेवून त्यावर तद्दर्शक असा एखादा दगडी स्तंभ करून ठेवावा. हेतु हा कीं, १०० वर्षांनीं होणाऱ्या उत्सवांत तें भविष्य काढून वाचलें जाईल, व भृगुसंहितेच्या बाडांतील एखाद्या जन्मलग्नाची व्यक्तिविषयक पत्रिका पडताळल्यानें त्यांतील जुळणाऱ्या गोष्टींविषयीं जसें कौतुक वाटतें तसें तळेगांवच्या तत्कालीन पिढीला त्या भविष्याचें कौतुक वाटेल. खरें संशोधन हें आगगाडीच्या एंजिनाप्रमाणें दुतोंडें असतें. आणि गतकालांतील संशोधन करतांना तें एंजिन चालण्याला जुन्या पिढीच्या अभिमानाची वाफ ही जशी प्रेरक शक्ति लाभते, तशीच भविष्यकाळांतील संशोधन करतांना तें इंजीन चालण्याला नव्या पिढीच्या उत्कर्षाच्या आकांक्षेची वाफ ही प्रेरक शक्ति खचित लाभण्यासारखी आहे.

# लाहोरला नागपूरची पूर्वसूचना

लाहोर काँग्रेसमधील वाद विकोपाला गेला तर तेथें कशा प्रकारची फूट किंवा दुही दिसणार याची थोडीशी पूर्वसूचना गेल्या आठवड्यांत नागपूरला झालेल्या ट्रेड यूनियन काँग्रेसच्या सभेवरून मिळाली. हिंदुस्थानांतील मजुरांच्या चळवळींत नरम–गरम असे पक्ष पूर्वीपासून आहेत. मजुरांच्या तक्रारींची व गाऱ्हाण्यांची दाद लावण्यास संप हें नित्य साधन मानावयाचें का नैमित्तिक मानावयाचें, मुख्य भर सामोपचाराच्या सौम्य उपायांवर ठेवावयाचा का जेव्हां तेव्हां संपाचें हत्यार उपसावयाचें हें या भेदाचें मुख्य स्वरूप होतें. हिंदुस्थानांत जे कांहीं थोडे मोठे कारखाने व धंदे निघाले तेहि युरोपांत झालेल्या औद्योगिक क्रांतीमधील यांत्रिक शोधांवर आधारलेले होते. अर्थात् या धंद्यांतील मजुरांची चळवळ तिकडे ज्या मार्गांनीं जात आहे त्याच मार्गांनीं इकडील मजुरांची चळवळहि क्रमाक्रमानें चालली आहे. हिंदुस्थानांत मजूरसंघाच्या चळवळीचा प्रारंभ नारायणराव जोशांसारख्या कार्यकर्त्यांनीं केला. त्यांनी ठिकठिकाणीं मजुरांचे संघ स्थापन करून थोडक्याच अवधींत अ. भा. ट्रेड यूनियन काँग्रेसची स्थापना केली. या अ. भारतीय संस्थेला महत्त्व प्राप्त झालें, आणि आंतरराष्ट्रीय मजूर परिषदेंत हिंदुस्थानातर्फे जे प्रतिनिधी जावयाचे त्यांची निवड सरकार ट्रेड यूनियन काँग्रेसच्या शिफारशीवरून करूं लागलें.

## मजूर–चळवळीचें नवें वळण

परंतु तीनचार वर्षांपूर्वीपासून या चळवळीला नवें वळण लागलें. रशियामध्यें लेनिननें झारशाही नेस्तनाबूद करून व तेथें कामकऱ्यांचें राज्य स्थापून कम्युनिझमच्या महामंत्राचा प्रणेता कार्ल मार्क्स यांच्या तत्त्वप्रसाराला चालना दिली आणि जे मार्क्सनें लिहिलें तें जागतिक क्रान्ति घडवून आणून स्वतः प्रत्यक्ष सृष्टींत आणण्याची आपली मनीषा प्रकट केली. रशियन राज्यक्रांतीनें निरनिराळ्या देशांतील कम्युनिस्ट मतांच्या लोकांना कार्यप्रवृत्त केलें, व ठिकठिकाणीं कम्युनिस्टांनीं डोकें वर काढलें. हिंदुस्थानांतील कांहीं लोकांच्या मनावर लेनिनच्या तत्त्वज्ञानाचा व मार्गाचा पगडा बसला, व असे लोक मजुरांच्या चळवळीमध्यें पडूं लागले. पोटभर अन्न व अंगभर वस्त्र नसणाऱ्या अशा अशिक्षित मजुरांना या नवमतवादी व चढेल वृत्तीच्या पुढाऱ्यांचीं भाषणें आवडून त्यांचा हात मजूरसंघटनेंत दिवसेंदिवस सहजीं जास्त शिरकला. मुंबई व कलकत्ता येथें नव्या मजूर–पुढाऱ्यांच्या अमदानीपूर्वीहि संप घडून येत असत; परंतु ते कधीं काळीं. कारण नारायणराव जोशीप्रभृति पुढाऱ्यांची विचारसरणी अशी कीं, संप हा मजुरांच्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्याचा न्याय्य व योग्य मार्ग असला तरी त्या हत्याराचा उपयोग इतर उपाय हरल्यावर

करावयाचा. नव्या पुढाऱ्यांचा मुख्य भर संपावर असल्यानें त्यांची छाप मजूर—चळवळीवर पडल्यापासून जास्त जास्त संपं घडून येऊं लागले. स्प्रॅट ब्रॅडले यांच्यासारखी बाहेरची मंडळीहि हिंदी मजुरांच्या चळवळींत प्रामुख्यानें लक्ष घालूं लागली. गेल्या तीन वर्षांच्या हिंदी मजुरांच्या चळवळीच्या इतिहासाचा ज्यांनी अभ्यास केला त्यांना ती चळवळ रशियन तत्त्वज्ञानाशीं तादात्म्य पावण्याच्या मार्गावर आहे हें कळून चुकलें. नवमतवादी कार्यकर्ते तरुण व त्यांचीं मतें ज्वलज्जहाल असल्यानें मजूरसंघांत त्यांचा प्रवेश झपाट्यानें झाला. व ऑल—इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या अधिवेशनांतहि ते आपलें अस्तित्व गाजवूं लागले.

### झेरियाच्या परिषदेंतील वादळ

गतवर्षी झेरिया येथें भरलेल्या अखिल भारतीय ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या बैठकींतच असें स्पष्ट दिसून चुकलें कीं, नवमतवादी मजूरपुढाऱ्यांना ऑल-इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेस आपल्या कबजांत घेऊन तिची इंग्लंडमधील सौम्य वृत्तीच्या मजूर-चळवळीपासून कार्डामोड करण्याची इच्छा आहे. झेरिया येथील बैठकींत नवमतवाद्यांनीं पंडित जवाहरलाल नेहरू यांची अध्यक्षाचे जागी निवड होऊ नये म्हणून आपल्यापैकींच कुळकर्णी यांना अध्यक्षपदाच्या जागेकरितां उभे केलें. कारण नवमतवाद्यांची तक्रार अशी होती कीं, जवाहरलाल नेहरू रशियाशीं समरस झालेले नाहींत! सकलातवाल्यांच्या वर्कर्स वेल्फेअर लीगला ऑल-इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसचा ग्रेट-ब्रिटनमधील प्रतिनिधि नेमण्याचा यत्न त्यांनी करून पाहिला. ट्रेड यूनियन कॉंग्रेस पॅनपॅसिफिक सेक्रेटॅरियटला जोडावी म्हणून जंग जंग पछाडले, व एशियाटिक लेबर कॉन्फरन्सला ऑल-इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसनें निमंत्रण देऊं नये असा हट्ट धरला. परंतु झेरियाच्या परिषदेंत नवमतवाद्यांना मुळींच यश मिळाले नाहीं पंडित जवाहरलाल नेहरूंचें राजकारण जुन्या मजूरपुढाऱ्यांना मानवणारे नसले तरी नवमतवाद्यांपैकीं कोणास अध्यक्ष होऊं देण्यापेक्षां जवाहरलाल नेहरू त्यांस जवळ वाटून त्यांना त्यांनीं आपलीं मतें दिलीं. वर्कर्स वेल्फेअर लीगला प्रतिनिधित्व देण्याच्या ऐवजीं तें ब्रिटिश ट्रेड यूनियन कॉंग्रेसला देण्यांत आलें. पॅन ट्रेड यूनियन सेक्रेटॅरियटला ऑल-इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेस जोडण्यांत आली नाहीं. व दिवाण चमनलाल यांचा एशियाटिक लेबर कॉन्फरन्स हिंदुस्थानांत बोलावण्याचा ठरावहि संमत झाला. परंतु झेरियाला एक गोष्ट कळून चुकली ती अशी कीं, लवकरच कम्युनिस्ट मतांची छाप पडलेल्या तरुणांच्या ताब्यांत ऑल–इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेस जाणार.

### व्हिटले कमिशनाची नेमणूक

पंडित जवाहरलाल नेहरूंना कम्युनिस्टांचे मार्ग पसंत नसले तरी एकंदरींत त्यांचा जास्त कल नवमतवाद्यांकडेच होता व आहे. यामुळें गेल्या वर्षांत ऑल--इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसनें नवमतवाल्यांवर दाब ठेवण्याची कांहींच व्यवस्था केली नाहीं. तेवढ्यांतच मजुरांच्या परिस्थितीची पाहणी करण्याकरितां व्हिटले कमिशन नेमण्यांत आलें. या कमिशनावर कॉंग्रेस पक्षाचे असेंब्लीचे सभासद दिवाण चमनलाल व मजुरांच्या चळवळीचे जुने आधारस्तंभ नारायणराव जोशी यांनीं जागा स्वीकारल्या. याच्या उलट ऑल--इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसचे अध्यक्ष पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं व नवमतवादी पुढाऱ्यांनीं व्हिटले कमिशनावर बहिष्कार घाला अशी जाहीर घोषणा केली. मध्यंतरीं बादशहांचें राज्य उलथून टाकण्याच्या कटाच्या आरोपावरून हिंदुस्थानांतील ठिकठिकाणच्या बत्तीस मजूरपुढाऱ्यांना पकडण्यांत आलें. त्यांत पुष्कळ मजूरसंघाचे कार्यकर्ते, डांग्यांसारखे ऑल–इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसचे असिस्टंट सेक्रेटरी व धुंडिराज पंत ठेंगडी यांच्यासारखे त्या संस्थेचे जुने अध्यक्ष होते. अर्थातच 'बहिष्कार घाला' असें म्हणण्याला या मजूरपुढाऱ्यांच्या गिरफदारींचें उत्तम कारण सांपडलें. त्यांतच ऑल-इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसची बैठक केव्हां भरवावी यासंबंधीं वाद उत्पन्न झाला. परंतु अखेरीस नवमतवाद्यांच्या म्हणण्याला यश येऊन, कॉंग्रेसचें अधिवेशन नोव्हेंबरच्या शेवटीं भरण्याचें ठरलें, व त्याप्रमाणें तें गेल्या आठवड्यांत पारहि पडलें.

### फूट विकोपास गेली

मात्र या वर्षीच्या अधिवेशनांत नवमतवाद्यांचें बहुमत होऊन जे ठराव गेल्या वर्षी संमत झाले नाहींत ते सर्व या वर्षी संमत झाले. त्यांतच व्हिटले कमिशनाच्या बहिष्काराचा ठराव पास झाल्यानें श्री. जोशी व चमनलाल यांना कमिशनावरील जागांचा राजीनामा देणें अगर ऑल--इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसमधून फुटून बाहेर पडणें याशिवाय गत्यंतर नव्हतें. अर्थातच त्यांनीं दुसरा मार्ग स्वीकारला व नवी संस्था काढली. जोशी व चमनलाल यांनी काढलेल्या स्वतंत्र संघटनेला ऑल--इंडिया ट्रेड यूनियन फेडरेशन असें नांव दिलें असून तींत मि. एस. सी. जोशी, बखले, शिवराव, गिरि इत्यादि मजूरसंघाचे कार्यकर्ते व पुढारी आहेत. ट्रेड यूनियन कॉंग्रेसमधून हे लोक निघाल्यावर बाकीच्या प्रतिनिधींनीं एशियाटिक मजूर

परिषद न भरविणें, व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्याचा इनकार करणें, राऊंड टेबल परिषदेवर बहिष्कार घालणे, नेहरू रिपोर्ट भांडवलवाल्यांना अनुकूल म्हणून त्याचा धिःकार करणे, साम्राज्यविरोधी संघास सहानुभूति दाखविणें यांप्रमाणें ठराव मंजूर केले ! कामगार-वर्गाचें रिपब्लिक स्थापन करण्यांत यावें असाहि ठराव झाला ! ट्रे. यू. कॉंग्रेसच्या कार्यकारी मंडळामधून जोशी--चमनलाल पक्षानें अंग काढल्यानें ट्रेड युनियन कॉंग्रेसचें स्वतंत्र कार्यकारी मंडळ बनवण्यांत येऊन त्याचें अध्यक्षपद दे. सुभाष चंद्र बोस यांना देण्यांत आलें आहे. सुभाषबाबूंनी अजून अध्यक्षपदाचा स्वीकार केल्याचें कळविलें नाहीं असें म्हणतात. सुमारे ५० मजूरसंघांनीं ट्रेड यूनियन कॉंग्रेसशीं असलेला संबंध तोडून टाकला असून ते बहुधा नव्या फेडरेशनमध्यें सामील होतील.

## समाजस्थितीची उलथापालथ

या भांडणामध्यें मुख्य तत्त्वाचा असा मतभेद कोणता आहे हें नागपूरच्या परिषदेचे अध्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू यांच्या भाषणावरून चांगलें निदर्शनास येतें. मजुरांची स्थिति सुधारणें व त्यांना पोटभर खावयास मिळेल इतकी मजुरी मिळणें येवढयावर नवीन पक्षाचें समाधान नाहीं. त्यांच्या मतें मजुरांचीं दुःखें ही आजच्या समाजाच्या विशिष्ट आर्थिक घटनेमुळें निर्माण झालेलीं आहेत. तेव्हां ही समाजाची आर्थिक घटनाच मुळापासून बदलावयास पाहिजे. राज्यघटनेंत मजुरांचें वर्चस्व होऊन सर्व उत्पादक धंदे व कारखाने सा ायिक म्हणजे सरकारी मालकीचे व्हावयास पाहिजेत. अशी आर्थिक परिस्थितींत उलथापालथ झाल्याशिवाय मजुरांची स्थिति सुधारणार नाहीं असें पं. जवाहरलाल नेहरू यांनीं आपल्या भाषणांत प्रतिपादन केलें. या आर्थिक क्रांतीकरितां हा पक्ष आहे. आणि या क्रांतीचें स्वरूप जवाहरलाल यांच्या भाषणांत त्यांनीं त्रोटकपणें दिग्दर्शित केलें असलें तरी या नव्या पक्षाच्या नेहमींच्या प्रतिपादनावरून ही क्रांति म्हणजे रशियाच्या धर्तीवर व्हावयाची आहे हें उघड दिसतें. नेहरू रिपोर्टावरील सर्व--पक्षीय परिषदेमध्यें नव्या राज्यघटनेंत खासगी मालकी हक्क अबाधित ठेवण्याची हमी नसावी अशी सूचना पंडित जवाहरलाल यांनीं केली होती. पण ती फेटाळली गेली. यावरून भावी हिंदी राज्यघटनेंत या आर्थिक क्रांतीची पूर्वतयारी या पक्षाला हवी होती हें अनुमान सहज निघतें. म्हणूनच या पक्षाचा नेहरू रिपोर्टावर राग आहे.

## जवाहरलाल यांचीं मतें

पंडित जवाहर ाल याना वसाहतस्वराज्य नको व स्वातंत्र्य पाहिजे ते यासाठीं कीं वसाहत स्वराज्य स्वीकारलें तर साम्राज्यशाहीची व भांडवलशाहीची आर्थिक व्यवस्था मान्य केल्यासारखें होतें. ही आर्थिक व्यवस्था त्यांना मोडावयाची आहे. म्हणून त्यांना 'डोमीनियन स्टेटस' नको. पण खरें पाहिलें तर त्यांनीं हा आर्थिक क्रांतीचा प्रश्न स्वराज्य-स्वातंत्र्य वादांत घुसडणें अप्रस्तुत होय. कारण हिंदुस्थानाला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यावरहि हा आर्थिक क्रांतीचा झगडा करावाच लागेल. रशियाखेरीज जगाच्या पाठीवर इतके देश असतां सर्व कारखाने सरकारच्या मालकीचे होण्याइतकी आर्थिक क्रांति कोठेंच झालेली नाहीं. म्हणजे स्वातंत्र्य व मजूरसत्तेची आर्थिक क्रांति यांचा तसा नित्यसंबंध मुळींच नाहीं. तो एक स्वतंत्र वादविषयक प्रश्न जगांतील सर्व राष्ट्रांपुढे आज आहे. हिंदी लोकांच्या, परकीय सरकाराविरुध्द चाललेल्या, झगड्यांत या वादाची गुंतागुंत करून या राष्ट्रीय झगड्यांतील राष्ट्रीय सभेचे आजचे महत्त्वाचे निर्णय या आर्थिक वादाच्या दृष्टीनें देणें चुकीचें ठरेल.

जवाहरलाल नेहरू यांचा ब्रिटिश मजूर पक्षावर राग आहे तोहि अशासाठीं कीं, हा मजूर पक्ष रशियन कम्यनिझमच्या रुळावर विलायतेंतील आपल्या चळवळीची गाडी नेत नाहीं. अशा रीतीनें या आर्थिक वादांतील रागाचें उट्टें हिंदी स्वराज्याच्या वादांत काढून मजूर पक्षानें पुढें केलेल्या राउंड टेबल परिषदेला कॉंग्रेसकडून नकार देवविण्याचा प्रयत्न करणें अश्लाघ्य होय. प. जवाहरलाल नेहरू हेच लाहोरच्या कॉंग्रेसचे अध्यक्ष असल्यानें त्यांच्या विचारसरणीची थोडीशी दिशा नागपुरास व्यक्त झाली हें एका अर्थी बरेंच झालें. जवाहरलाल यांना राउंड टेबल कॉन्फरन्स नाकारण्याची जी इतकी घाई झाली आहे तिच्या बुडाशीं ही आर्थिक क्रांतीची लालसा आहे. या प्रकारच्या आर्थिक क्रांतीला रशियाखेरीज जगांतील मोठमोठ्या सुधारलेल्या व स्वतंत्र देशांतहि अजून यशप्राप्ति झालेली नसतांना, हिंदुस्थानासारख्या मागसलेल्या परतंत्र देशानें आजच्या राजकारणाचे प्रश्न या क्रांतीवर डोळा ठेवून बिघडविणें हें ज्यांना इष्ट वाटत असेल त्यांनीं लाहोरला खुशाल राउंड टेबल परिषद नाकारावी. पण ज्यांना ही आर्थिक क्रांति अजून दूर आहे असें वाटत असेल त्यांनीं या क्रांतीच्या अभिलाषानें आजचें राजकारण बिघडविण्यास कारणीभूत होऊं नये.

## प्रसादोऽपि भयंकरः

ट्रेड युनियन कॉंग्रेसमधील या फुटीसंबंधानें आणखीहि बरेंच लिहितां येण्यासारखें आहे. पण आज फक्त लाहोरच्या कॉंग्रेसला त्यांतून मिळणाऱ्या पूर्वसूचनेपुरताच विचार केला आहे. मजु-

रांच्या चळवळीनें आजच्या राष्ट्रीय चळवळीशीं सहकारिता ठेवावी असें पंडित जवाहरलाल यांनीं सांगितलें. पण त्याच वेळीं आजची राष्ट्रीय चळवळ ही संकुचित आहे, व ती मजुरांच्या एका मोठ्या शत्रूविरुद्ध लढत आहे इतकेंच तिचें महत्त्व आहे हेंहि त्यांनीं दर्शविलें. ही राष्ट्रीय चळवळ व्यापक करण्याचा मजुरांनी प्रयत्न करावा असा त्यांनीं उपदेश केला. आज राष्ट्रीय चळवळ ही केवळ परकीय भांडवलवाल्यांविरुद्धच आहे; पण ती मजुरांची कड घेऊन सवर्च भांडवलशाहिविरुद्ध झगडेल त्या वेळीं ती जवाहरलाल यांच्या अर्थानें खरी व्यापक होईल! या व्यापकपणाचे उद्रेक आजहि आत्यंतिक मजूरपक्षीयांच्या तोंडून ऐकूं येतात. "मी अस्सल लँकेशायरचें कापड मुद्दाम वापरतों, हिंदी गिरण्यांचें कापड त्याज्य समजतों. कारण लँकेशायरचा भांडवलवाला ज्याप्रमाणें मजुरांना चांगल्या रीतीनें वागवितों तसा आपला भांडवलवाला वागवीत नाहीं. जगांतील मजूर हे सर्व एक. मजूर आपल्या चळवळींत स्व-राष्ट्र परराष्ट्र हा भेद जाणत नाहींत. जगांत आज भांडवलवाला व मजूर हे दोन वर्गच आम्ही जाणतों. मजुरांमध्यें आपलीं दुःखें निमूटपणें सहन करण्याची वृत्ति उत्पन्न करण्यासाठीं 'धर्म' या कल्पनेचा अफूसारखा उपयोग करण्यांत आला ! तशाच प्रकारची राष्ट्रीयत्वाचीहि कल्पना आहे!" अशा आशयाचे उद्गार मजूर चळवळींतील पुष्कळ तरणेबांड अविचारी पुढारी बोलत असतात. मजूर चळवळीला राष्ट्रीय चळवळीशीं जी सहकारिता करावयाची तिचें पर्यवसान राष्ट्रीय चळवळींतून अशा प्रकारें राष्ट्रीयत्वच घालविण्यांत व्हावयाचें असेल तर त्या चळवळीचा "प्रसादोऽपि भयंकरः" असेंच म्हटलें पाहिजे.

## फुटीचा दुष्परिणाम

पं. जवाहरलाल नेहरूंना डोमीनियन स्टेटस नको, राउंड टेबल कॉन्फरन्सद्वारा ब्रिटिश मजूर पक्षाशीं सहकार्य नको व नेहरू रिपोर्टहि नको. याचीं खरीं कारणें अनुक्रमें अशीं आहेत कीं, डोमीनियन स्टेटस मिळून आर्थिक समाजरचनेंत मजूरसत्तावादी क्रांति करणें सुलभ नाहीं; ब्रिटिश मजूरपक्ष अशा आर्थिक क्रांतीला अनुकूल नाहीं व नेहरू रिपोर्टांत खाजगी मालमत्तेला संरक्षणाची हमी दिली असल्यामुळें संपत्ति सामायिक करण्याच्या ध्येयाला तो आड येतो. ट्रेड यूनियन काँग्रेसच्या नव्या कार्यकारी मंडळाचें अध्यक्षस्थान दे. सुभाष बोस यांना देण्यांत आलें आहे; पण त्यांनीं तें अजून स्वीकारलें नाहीं. कारण त्यांचे अजून कांहीं समेटाचे प्रयत्न चालू आहेत म्हणतात. पण यावरून येवढें दिसून येतें कीं, आजच्या मजूर-चळवळींत देखील भावी आर्थिक क्रांतीच्या दृष्टीनें फूट पाडण्यासारखी वेळ आलेली नाहीं, याची अंधुक जाणीव सुभाष बोस यांच्या सारख्या भावनावश माणसालाहि टोंचत असली पाहिजे. भावी जागतिक आर्थिक क्रांतीच्या दृष्टीनें आजच्या बाल्यावस्थेंत असलेल्या मजूर चळवळींत फूट पडणें जर वाईट तर त्याच क्रांतीवर डोळा ठेवून राष्ट्रीय सभेमध्यें फूट पाडणें हें शतपटीनें वाईट होय.

## प्रयोगावारी शक्ति घालवूं नका

लाहोरास स्वातंत्र्यवाद क्रीडरूपानें जाहीर करून राउंड टेबल परिषदेवर बहिष्कार पुकारावा व गांधी-मोतीलाल वल्लभभाई यांच्या मताला विरोध करावा असें म्हणणाऱ्या लोकांत कांहीं थोडे राष्ट्रीय लोकहि आहेत. त्यांनीं सध्यांच काँग्रेसमध्यें फूट पाडण्यांत आपण कोणाशीं सहकारिता करणार आहोंत याचा जरूर विचार करावा. अहिंसेनें स्वराज्य मिळवावयाचें व अहिंसा-तत्त्व जगाला शिकवावयाचे या अभिनव प्रयोगावारी राष्ट्राचीं कांहीं वर्षे गेलीं. अहिंसा हें तत्त्व जागतिक व राष्ट्रीय राजकार्य व्यवहारांत अगदीं नवीन असें होतें. तें राष्ट्रीय चळवळींतहि टिकलें नाहीं, मग जगाची गोष्ट दूरच राहिली. आतां जगांतलि सध्याची आर्थिक घडी सर्वस्वी बदलून नव्या प्रकारची घडी बसविण्याचा नवा प्रयोग हिंदुस्थानावर लादण्यांत येणार आहे. हा प्रयोग रशियांतहि पूर्णपणे यशस्वी झालेला नाहीं. रशियाशीं संगनमत केल्यानें अलीकडे चीनमध्यें झालेल्या घोंटाळ्यावरून सावध होऊन आपण रशियाशीं पूर्णपणे समरस होऊं नये असा इषारा पं. जवाहरलाल यांनींच नागपुरास दिला आहे. याचा अर्थ असा कीं, रशियाच्या प्रयोगांत प्रत्यक्ष ठेंचा लागतील तेवढ्यापुरता तो प्रयोग चूक धरून बाकीचा मात्र बरोबर धरून चालावयाचें! आणि त्यांना दुसरी ठेंच लागेल तेव्हां आपण शहाणें व्हावयाचें! यापेक्षां त्यांचा तो प्रयोग यथासांग यशस्वी होऊन जगांत इतरत्रहि त्याचें अनुकरण होण्याची वेळ येईपर्यंत वाट पाहाणें बरें नव्हे काय? हिंदुस्थानाला अशी वाट पाहाण्यास अवकाशहि आहे. इतकी घिसाडघाई करण्याचें कारण नाहीं. हिंदुस्थानाला आधीं परतंत्रतेंतून मुक्त होऊं द्या, मग त्याच्यावर हवे ते अभिनव, अपूर्व व अतिराष्ट्रीय असे आर्थिक, धार्मिक प्रयोग खुशाल करा. पण आजच्या असहाय, मागासलेल्या स्थितींत राष्ट्रांत

जी कांहीं थोडीशी शक्ति आहे ती अशी नव्या नव्या जागतिक "एक्सपेरिमेंटावारी" वाया दवडण्याचें पाप करूं नका. ती सर्व शक्ति तूर्त राष्ट्राला पारतंत्र्यांतून मुक्त करण्याच्या कामींच पुरवून खर्चिली पाहिजे. नागपुरास मिळालेल्या पूर्वसूचनेनें इतके सुविचार राष्ट्रीय पुढाऱ्यांस व अनुयायांस लाहोरास सुचले तर ते खास असेंच मत देतील कीं, राउंड टेबल परिषद सध्यां जितकी उगवून घेतां येईल तितकी उगवून घेऊं, मग पुढचा मार्ग आपल्याला मोकळा आहेच.

# हिंदी कापडाच्या गिरण्यांचें परराष्ट्रीय चढाओढीपासून संरक्षण

अलीकडे परराष्ट्रीय चढाओढीमुळें येथील कापडाच्या गिरण्या डबघाईस आल्या, व गिरणीवाल्यांनीं सरकारकडे संरक्षक जकातीची मागणी केली. सरकारनें टॅरिफ बोर्डाला चौकशी करण्याचा हुकूम केला, आणि टॅरिफ बोर्डानें कापडावरील जकात सरसकट वाढविण्याचें कारण नाहीं असा अभिप्राय दिला. सरकारला तेवढेंच निमित्त पुरले आणि गिरणीवाल्यांना वाटण्याच्या अक्षता मिळाल्या! पण त्या वेळेपासून गिरणीवाल्यांचा ससेमिरा सरकारच्या पाठीशीं आहेच. त्यांतून गेल्या मार्च महिन्यापासून मुंबईतल्या गिरण्यांतून संप झाल्यामुळें परदेशी व्यापाऱ्यांना चांगलेच फावले आणि परदेशी कापडाची आयात वाढत जाऊन देशी गिरण्यांचें गिऱ्हाईक तुटत चाललें. त्यावरून मुंबईच्या गिरणीवाल्यांनीं सरकारकडे पुनः एकवार संरक्षक जकातीची मागणी केली. आणि सरकारनें ती मागणी एकदम न फेटाळतां कलकत्त्याचे कस्टम्सचे कलेक्टर मि. हार्डी यांना चौकशी करण्याकरितां नेमलें.

टॅरिफ बोर्डाच्या चौकशीहून हार्डी यांच्याकडे सोपविलेली चौकशी कमी व्यापक होती. तीन वर्षांपूर्वी टॅरिफ बोर्डानें देशी गिरण्या व परदेशी आयात कापड यांच्या चढाओढीची जी परिस्थिति वर्णिली होती तिच्यांत कांहीं फरक होऊन ही चढाओढ अधिक बाधक होऊं लागली आहे काय, एवढ्या मुद्द्यावरच हार्डी यांचा रिपोर्ट सरकारनें मागविला होता; पण त्या बरोबरच हल्लींची कापडावर जकात आकारण्याची जी पध्दत आहे ती बदलून किंमतीवर जकात न आकारतां कापडाची जात व वाण यावरून जकातीची आकारणी करणें श्रेयस्कर होईल काय, या विषयींचा अभिप्रायहि विचारला होता. या संबधांत मि. हार्डी यांनीं तीन महिन्यांत चौकशी करून आपला खुलासेवार रिपोर्ट सरकारला सादर केला आहे. सरकारनें हार्डी यांना ज्या दोन प्रश्नांवर अभिप्राय देण्याविषयीं सांगितलें होतें, त्यांपैकीं पहिल्या म्हणजे परदेशी चढाओढीच्या प्रश्नावर सविस्तर माहिती देऊन परदेशी चढाओढ हिंदी गिरण्यांना विशेषतः मुंबईच्या गिरण्यांना, तीव्रपणें जाणवत आहे, मात्र ही चढाओढ लँकेशायरची नसून जपानची आहे व ती दूर करण्याकरितां संरक्षक जकात बसविली पाहिजे, असा त्यांनीं अभिप्राय दिला, आणि त्याबरोबरच दुसऱ्या प्रश्नाचेंहि उत्तर देऊन जकातीची आकारणी मालाच्या जातीवर व वाणावर न ठरवितां किंमतीवरच ती ठरवावी असेंहि सांगितलें. हार्डी यांच्या या अभिप्रायाचा विचार करून त्यावर आपलें धोरण ठरविण्याकरिता सरकारनें दिल्लीस एक खासगी बैठक भरविण्याचें ठरविलें आहे. व त्या बैठकीकरितां हिंदुस्थानांतील गिरणीवाल्यांचे मोदीप्रभृति प्रतिनिधि हे दिल्लीस जाऊन बसले आहेत. या वाटाघाटींत काय निष्पन्न होते तें लवकरच कळेल. पण मि. हार्डी यांनीं इतक्या काळजीपूर्वक माहिती जमा करून जो रिपोर्ट प्रसिध्द केला आहे त्यावरून या धंद्याची परिस्थिति कशी आहे, आणि देशी कापडाला परदेशाची चढाओढ कितपत बाधक होत आहे, तें पाहूं.

सुती कापडाच्या गिरण्या हिंदुस्थानांत सर्वत्र सारख्या पसरल्या नसून मुंबई इलाख्यांतच त्यांचा भरणा विशेष आहे. आणि मालाला गिऱ्हाईक पाहिल्यास बहुतेक गिऱ्हाईक मुंबई इलाख्याच्या बाहेरच आहे. गिरण्या एकीकडे आणि गिऱ्हाईक दुसरीकडे अशी स्थिति असल्यामुळे परदेशाच्या चढाओढीला आयतीच संधि मिळते. आणि परदेशाचे धाडसी व्यापारी तिचा फायदा घेतल्यावांचून राहात नाहींत. या परिस्थितीमुळेंच महायुद्धाच्या सुरुवातीपर्यंत इंग्लंडच्या मालानें जणुं काय कलकत्त्याच्या बंदराचा मक्ताच घेतला होता, आणि अलीकडे जपान तीच जागा व्यापूं पाहात आहे. हिंदुस्थानांत जेवढें सुती कापड तयार होतें, त्यांतलें सुमारें अर्धे कापड मुंबई बेटांत तयार होतें. २२ टक्के कापड अहमदाबादला तयार होतें. ७ टक्के कापड मुंबई इलाख्यांतीलच इतर भागांत पैदास होतें. बाकी राहिलेल्या २१ टक्के कापडापैकीं ९ टक्के कापड संस्थानांच्या हद्दींत तयार होत असून इतर सर्व प्रांतांत मिळून अवघें १२।१३ टक्के कापड तयार होतें. पण गिऱ्हाइकांच्या मानानें पाहातां ३१ कोटींपैकीं २९

कोटी लोकसंख्या मुंबई इलाख्याच्या बाहेरच आहे! त्यामुळें परदेशाच्या मालाच्या चढाओढीला तेथें अधिक संधि मिळते.

हिंदुस्थानांतील कापडाची निपज आणि परदेशी मालाची आयात यांचे तुलनात्मक आंकडे मि. हार्डी यांनीं आपल्या रिपोर्टात दिले आहेत, व ते फारच बोधप्रद आहेत. महायुद्धाच्या सुरुवातीपर्यंत आयात कापड व देशांत पैदास होणारें कापड यांची शर्यत जणूं काय ससा व कासव यांच्या शर्यतीसारखीच भासत होती; आणि महायुद्धामुळें परदेशी मालास पायबंद बसला नसता तर कासवानें सशाला गांठलेंहि नसतें! पण महायुद्धामुळें ही परिस्थिति पालटली, आणि १९१७।१९१८ सालीं प्रथमच कासवानें सशाला गांठलें! त्या वेळेपासून हिंदुस्थानांतील कापडाची निपज परदेशाच्या आयातीहून थोडी तरी अधिकच आहे. तथापि गेल्या ३।४ वर्षांपासून परदेशाच्या मालानें पुन्हां डोकें वर काढलें असून चालू सालच्या मुंबईच्या संपामुळें तर येत्या सालांत परदेशी मालाचें पारडें अधिक जड होऊं लागतें कीं काय असें वाटूं लागलें आहे.

हिंदुस्थानांतील कापडाला खरे प्रतिस्पर्धी दोन. एक लँकेशायरचे गिरणीवाले व दुसरे जपानचे गिरणीवाले. या दोघांहि प्रतिस्पर्ध्यांची देशी गिरणीवाल्यांना सारखीच भीति असून त्या दोघांच्याहि तडाख्यांतून आपला बचाव व्हावा अशीच गिरणीवाल्यांची अपेक्षा असली पाहिजे. पण मि. हार्डी यांच्या रिपोर्टांत इंग्लंडच्या चढाओढीचा कोठें फारसा उल्लेख देखील नसून इंग्लंडच्या मानानें चिमुकल्या अशा जपानच्या चढाओढीचा गाजावाजा या रिपोर्टांत सर्वत्र आढळून येतो! इ. स. १९१०-११ पर्यंत जपानचें कापड खिसगणतींतहि घेण्यासारखें नव्हतें व त्या वेळीं इंग्लंडचे कापड २२५ कोटी वार हिंदुस्थानांत येत होतें. विलायतच्या कापडाच्या आयातीची ज्यास्तींत जास्त भरती १९१३-१४ सालीं झाली व त्या वेळेपासून त्याला ओहटी लागली; म्हणून त्या वर्षाचे सर्वच आंकडे लक्षांत घेण्यासारखे आहेत. १९१३-१४ सालीं इंग्लंडांतून ३१० कोटी वार कापड हिंदुस्थानांत आलें. त्याच वर्षी हिंदुस्थानांतल्या कापडाची पैदास ११६ कोटी वार झाली. जपानचें कापड त्या वर्षी अवघें ९० लक्ष वार आलें; आणि इतर सर्व परदेशांतून सुमारें ९ कोटी वार कापड येऊन एकंदर खपाचा आंकडा ४३६ कोटी वार एवढा मोठा झाला. याच्याच जोडीनें तुलनेकरितां १९२७-२८ सालचे आंकडे मांडल्यास ते अनुक्रमें इंग्लंडची आयात १५४ कोटी वार, हिंदुस्थानांतली पैदास २३६ कोटी वार, जपानची आयात ३३ कोटी वार आणि इतर सर्व परदेशांची आयात १० कोटी वार मिळून ४३३ कोटींची भरती होते.

१९१३-१४ सालचे आंकडे व १९२७-२८ सालचे आंकडे यांची तुलना केल्यास दोनहि वर्षांचा एकंदर खप जवळ जवळ सारखाच आहे. पण इंग्लंडची आयात २२५ कोटींवरून घसरत घसरत १५४ कोटींवर आली आहे; हिंदुस्थानाची पैदास ११६ कोटींवरून चढत चढत २३६ कोटीला पोंचली आहे. इतर देशांतली आयात जवळ जवळ सारखीच राहिली आहे, आणि जपानाने मात्र ९० लक्षांवरून ३३ कोटींपर्यंत मोठीच उडी मारली आहे! हे आंकडे पाहिले म्हणजे सकृद्दर्शनीं असें वाटतें कीं, हिंदी गिरण्यांचा खरा प्रतिस्पर्धी जपान नसून इंग्लंडच आहे; आणि एका अर्थी तें खरेंहि आहे. तथापि हिंदुस्थानांत तयार होणाऱ्या मालाचा आजचा दर्जा लक्षांत घेतल्यास जपानचा माल जितका हिंदी गिरण्यांना घातक आहे तितका इंग्लंडचा घातक नाहीं. याचे कारण असें कीं, पूर्वी सगळाच कापडाचा बाजार इंग्लंडानें व्यापला होता. त्यांतला तेवढा शक्य तेवढा भाग हिंदी गिरण्यांतील कापडानें आतापर्यंत आक्रमण केला आहे. पन्नास वर्षांपूर्वी जाडेभरडें व तलम असें सगळेंच कापड इंग्लंडांतून येत होतें. त्यांतलें जाडेभरडें कापड आतां हिंदुस्थानांत तयार होऊं लागलें व तलम कापड काढण्याची अद्यापि हिंदुस्थानाची तयारी झालेली नाहीं. एवंच इंग्लंडच्या कापडाने व्यापलेल्या प्रदेशांतला बराचसा भाग हिंदुस्थानानें आतांपर्यंत हस्तगत केला आहे, आणि बाकीचा भाग हस्तगत करण्याची त्याची तयारी चालू आहे. पण जपानाच्या चढाओढीचा क्रम याच्या उलट आहे- हिंदुस्थानानें जो बाजार इंग्लंडच्या तावडींतून सोडवून आपल्या हातीं घेतला तोच बाजार आपल्या मालानें भरून टाकून एक प्रकारें जपान हा हिंदुस्थानाच्या पायाखालचीच जमीन पोखरीत आहे!

हिंदुस्थानांतल्या कापसापासून जे सूत निघतें तें सामान्यतः ३६ नंबरच्या आंतलेंच असतें. फार तर त्याची मजल ४० नंबरापर्यंत जाऊं शकेल. अर्थातच ४० नंबरावरील सूत वापरावयाचें झाल्यास आजमितीला तरी अमेरिकेचा किंवा इजिप्तचा कापूस आणावा लागतो किंवा परदेशांतलें सूतच आणून कापड विणण्यांत येतें! हल्लीं हिंदुस्थानांत धोतरें, पातळें किंवा त्याच जातींचें जें कापड तयार होतें त्यांतलें शेंकडा ८८ टक्के कापड ३० नंबरच्या आंतल्या सुताचें असतें. ९ टक्के कापड ३० ते ४० नंबरापर्यंतच्या सुताचें असतें आणि ४० नंबरांवरच्या सुताचें कापड अवघें

३ टक्के भरतें. अर्थातच ४० नंबराहून अधिक तलम कापडाचा प्रदेश आजमितीला हिंदुस्थानच्या आटोक्या बाहेरचा आहे. ३० ते ४० नंबरा पर्यंतच्या प्रदेशांत हिंदुस्थानाचा शिरकाव थोडासा झाला असून खरी झटापट जपान व इंग्लंड यांच्यांत आहे. आणि ३० नंबराच्या आंतला प्रदेश हिंदुस्थानानें इंग्लंडापासून गेल्या ३० वर्षांत जिंकून आक्रमण केला असून आतां जपान तोच प्रदेश व्यापूं पाहात आहे. या झगड्याची स्पष्ट कल्पना येण्याकरितां हार्डी यांच्या रिपोर्टांतलें नं. २३ चें कोष्टकच पाहा.

**धोतरांची निपज व आयात**

| सुताचा नंबर | देशी धोतरें | परदेशी धोतरें |
|---|---|---|
| ३० नंबरापर्यंत | ५४२० लक्ष वार | ३५० लक्ष वार |
| नं.३० ते ४० | ५६० ,, ,, | ९६० ,, ,, |
| नं. ४० च्या पुढें | १९० ,, ,, | ४२६० ,, ,, |
| एकूण | ६१७० ,, ,, | ५५७० ,, ,, |

वरील कोष्टकावरून एकंदर झगड्याचें स्वरूप वाचकांच्या लक्षांत येईल. हिंदी राष्ट्राच्या दृष्टीनें विचार केल्यास परदेशी कापडाची सगळीच आयात राष्ट्राला हानिकारक असल्यानें एक तसूभर देखील कापड बाहेरून येऊं नये असें आपण म्हणणार. पण गिरणीवाल्यांची दृष्टि संकुचित व स्वार्थपर असल्यानें ते आपल्या पायांपुरतेंच पाहून सरकारला असें म्हणत आहेत कीं, ३० नंबराच्या आंतल्या प्रदेशांत जपाननें आमच्यावर हल्ला चढविला आहे, त्याला तुम्ही संरक्षक जकातीची भिंत बांधून प्रतिबंध करा, ३० ते ४० पर्यंतचा प्रदेशहि आम्हास आक्रमूं द्या आणि ४० नंबराच्या पलीकडील प्रदेशांत तुम्ही व जपान वाटेल तसें भांडत बसा. कारण तो प्रदेश आक्रमण करण्याची ताकद अद्यापि आमच्या अंगांत आली नाहीं. हिंदी गिरणीवाल्यांची ही स्वार्थपर दृष्टि लँकेशायरचें भाईबंद असें जें आमचें सरकार त्याच्या पथ्यावरच पडणारी असल्यानें सरकारनें हार्डी यांस त्या दृष्टीनें चौकशी करून रिपोर्ट करण्यास फर्माविलें आणि म्हणूनच हार्डी यांच्या संबंध रिपोर्टांत लँकेशायरच्या चढाओढीचा उल्लेखदेखील नसून सगळा भर काय तो जपानाच्या आक्रमणावर आहे!

पूर्वी टॅरिफ बोर्डानें याच विषयासंबंधानें चौकशी केली त्या वेळीं आयात जकात हल्लीं ११ टक्के आहे तीच आणखी अधिक वाढवावी कीं काय असा प्रश्न बोर्डापुढें होता. आणि आयात जकात एकट्याच जपानच्या मालापुरती वाढवितां येत नाहीं, आणि सर्वच मालावर जकात वाढवावी तर जपान बरोबरच लँकेशायरचें नुकसान होतें, म्हणूनहि सरकारनें टॅरिफ बोर्डाची जकात वाढविण्याची सूचना अमलांत आणली नाहीं. पण त्या वेळेपासून हिंदी गिरण्यांची स्थिति अधिकच हलाखीची झाल्यामुळें आतां अशी क्लृप्ति निघाली आहे कीं, कापडावरील जकात किंमतीवर न आकारतां ती कापडाच्या जातीवर व वाणावर आकारावी. या नवीन पद्धतीनें जकात बसविल्यास जपानाचा माल नेमका टिपून त्या त्या जातीच्या मालावर जादा जकात ठेवतां येईल. आणि लँकेशायरचा माल आयताच अलग राहून शिवाय अशा प्रकारच्या पक्षपाती जकातीच्या धोरणाला कोणत्याहि कायद्याची किंवा जपानच्या तहनाम्याची हरकत येणार नाहीं!

किंमतीच्या प्रमाणावर जकातीची आकारणी न करतां मालाच्या प्रकारावरून आकारणी करावी ही शक्कल लँकेशायरच्या व्यापाऱ्यांच्या डोक्यांतून निघाली असो किंवा मुंबईच्या गिरणीवाल्यांच्या डोक्यांतून निघालेली असो; वरिष्ठ सरकारला ते तत्त्व कबूल आहे असें दिसतें. तत्संबंधीं चौकशी करण्यासाठीं मि. हार्डी यांची नेमणूक झाली, ती केवळ तपशीलापुरतीच असावी असें हार्डी यांच्या रिपोर्टावरूनच वरवर पाहाणाऱ्यासहि दिसतें. परंतु मि. हार्डी यांना किंमतीवर जकात न आकारतां वेगवेगळ्या प्रकारच्या मालावर वेगवेगळी ठराविक जकात घेण्याचें तत्त्वच मान्य नाहीं! आणि सामान्यतः खुल्या व्यापाराची पद्धत चालू असून जेथें केवळ उत्पन्नासाठीं जकात बसविली जाते तेथें ती किंमतीवरच आकारली जाते. परंतु संरक्षक जकातच ठेवावयाची म्हटल्यास ती केवळ किंमतीवर न ठरवितां मालाच्या जातीवर व वाणावर ठरवावी लागणार हे उघड आहे. अमेरिकेंत हीच पद्धत आहे आणि इतरहि कित्येक देशांतूनहि ती प्रचलित आहे. परंतु हार्डी हे पडले कस्टम कलेक्टर! त्यांची दृष्टि आपल्या कामाच्या सुकरतेकडे वळणारच. अर्थातच त्यांनीं असा अभिप्राय दिला कीं, किंमतीवरून जकातीचे दर न ठरवितां कापडाच्या जातीवरून ते ठरवूं लागल्यास कापडाची पारख करण्याची व जात ठरविण्याची मोठी मुष्कील पडेल. आणि प्रत्येक वेळीं जकातकामगार व व्यापारी यांच्यांत तंटा उपस्थित होऊन कामाचा घोटाळा होईल; यास्तव किंमतीवरच जकातीची आकारणी करावी. परंतु सरकाराचा तसाच मानस असल्यास मालाचा प्रकार व किंमत या दोहोंचाहि मेळ बसेल अशी संमिश्र जकात पद्धति ठरवितां येईल. उदाहरणार्थ, दररत्तलास २२ आण्यांहून कमी दर्जाचा कोणत्याहि जातीचा माल असला तरी त्यावर शेंकडा १५ टक्के जकात किंमतीवरून आकारावी; दररत्तलास २२ ते ३० आण्यांपर्यंतचें कापड असेल त्यावर दररत्तलास ३½ आणे जकात वजनावर घ्यावी आणि ज्या कापडाची

किंमत दररत्तलीं ३० आण्यांहून अधिक असेल त्यावर शेंकडा ११ टक्के जकात किंमतीवरच आकारण्यांत यावी.

मुंबईतल्या गिरणीवाल्यांची मागणी, लँकेशायरच्या व्यापारला धक्का न लावतां मुंबईवाल्यांचें समाधान करण्याची सरकारची आतुरता आणि कस्टम्स खात्यांतले तज्ज्ञ मि. हार्डी यांनी सुचविलेली ही क्लृप्ति या सर्वांचा एकसमयावच्छेदेंकरून विचार केला असतां हें सगळें कारस्थान आगाऊच शिजून तयार झाले असून दिल्लीस जी काल रोजीं बैठक झाली ती त्या कारस्थानावर केवळ शिक्कामोर्तब करण्याकरितांच असावी असा संशय येतो.

मुंबईतले गिरणीवाले जर या संमिश्र पध्दतीला कबूल होतील तर त्यांनीं तलम कापड काढण्याचा आपल्या धंद्याच्या उत्कर्षाचा मार्ग आपणच बंद केला असें होईल, आणि जाड्याभरड्या कापडावर जकात वाढविल्यानें तें कापड परदेशांतून येण्याचें बंद पडून तसलें कापड वापरणाऱ्या गरीब गिऱ्हाइकांवरचा बोजा मात्र वाढेल; आणि ३०आण्यांहून अधिक किंमतीच्या तलम कापडावरचा बोजा पूर्वीइतकाच कायम राहिल्यानें तें कापड विलायतेहून व जपानांतून पूर्वीसारखेंच येत राहील. एवढेंच नव्हे तर ज्या कापडाची किंमत दररत्तलास २२ ते ३० आणेपर्यंत असेल असल्या कापडावरील जकात वजनावर ठरविल्यानें कापड जितकें तलम तितकी जकात कमी होणार असल्यानें त्यांतहि लँकेशायर व जपान यांची मुंबईशीं चढाओढ चालूच राहाणार. अर्थातच दररत्तलास २२ आण्यांहून कमी किंमतीचा अगदींच जाडाभरडा माल असेल तेवढ्यावरील जकात १५ टक्के केल्यानें त्या मालाचा मात्र हिंदी गिरण्यांना मक्ताच मिळेल. पण हे गिरणीवाले असल्या जाड्याभरड्या मालावरच कायमचे संतुष्ट राहणार कीं काय ? त्यांच्या महत्त्वाकांक्षेची उडी याच्यापलीकडे जातच नाहीं कीं काय ? आणि स्वार्थांध अशा गिरणीवाल्यांची दृष्टि ठराविक मर्यादेच्या पलीकडे जात नसली तरी हिंदी राष्ट्रानें आपल्या महत्त्वाकांक्षेस ही मर्यादा काय म्हणून घालून घ्यावी ? आणि लँकेशायरच्या मालाला सगळें रान मोकळें काय म्हणून सोडून द्यावें ? आणि साम्राज्यांतर्गत मालाला जकातीची सवलत मिळावी असा जो इंग्लंडांतील साम्राज्यवाद्यांचा कावा आहे तो अशा अप्रत्यक्ष रीतीनें कां साधूं द्यावा ? मुंबईतल्या गिरणीवाल्यांना स्वतःच्या फायद्यापलीकडे दुसरें कांहीं दिसत नसल्यानें दिल्लीच्या बैठकींत त्यांची बहुतकरून या हार्डीसाहेबांच्या क्लृप्तीला संमति मिळेल. परंतु सोलापूरच्या व्यापारी परिषदेचे अध्यक्ष शेठ घनश्याम दास बिर्ला यांनी आपल्या भाषणांत दिलेला इषारा लक्षांत ठेवून असेंब्लीच्या सभासदांनीं हें इंपीरिअल प्रेफरन्सचें उंटाचे पिल्लूं या गुप्त दरवाजानें आंत शिरूं देऊं नये.

# ट्रेड यूनियन कॉंग्रेसचीं शकलें कां उडालीं ?

नागपुरास ट्रेड यूनियन कॉंग्रेसचीं दोन शकलें पडून त्यांतील जुन्या मताच्या पुढाऱ्यांना आपला सवतासुभा स्थापन करावा लागला. जुन्या पुढाऱ्यांत दिवाण चमनलाल,रा.नारायणराव जोशी,शिवराव इत्यादि अनुभविक व कर्तृत्ववान गृहस्थ असल्यामुळें त्यांनीं निर्माण केलेली ट्रेड यूनियन फेडरेशन ही संस्था लवकरच रंगारूपास येईल अशीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. जुनी ट्रेड यूनियन कॉंग्रेस नांवारूपास आणण्यास त्यांचेच परिश्रम व धोरण बऱ्याच अंशीं कारण झाले असल्यामुळें नव्या फेडरेशनला ठिकठिकाणचे मजूरसंघ येऊन मिळण्यास विलंब लागणार नाहीं. मद्रासेस तेथील मजूरसंघाच्या कार्यकारी कमिटीची सभा नुकतीच भरून तिनें ट्रेड यूनियन कॉंग्रेसशीं संबंध तोडण्याचा ठराव सर्वानुमतें पास केला, व नवीन फेडरेशनला येऊन मिळण्याचें जाहीर केलें. त्याच प्रकारचा उपक्रम नागपुरास व इतरत्रहि होत आहे.

ट्रेड यूनियनच्या नव्याजुन्या पुढाऱ्यांनीं वेगवेगळे मार्ग आखले हें ठीकच झालें. कारण त्यांचा मतभेद तात्त्विक आहे. नवे पुढारी कम्युनिस्ट मताचे असून त्यांना भांडवलवाल्यांचा नायनाट करून टाकावयाचा आहे. जुन्या पुढाऱ्यांचें शत्रुत्व भांडवलवाल्यांशी नाहीं. त्यांना भांडवलवाले व त्यांचे कारखाने यांस जिवंत राखून मजूर वर्गाची सर्वांगानीं उन्नति करावयाची आहे. उभयतांत मूलतःच भेद असल्यामुळें त्यांनी एकत्र राहाण्यानें दोघांचीहि कुचंबणा होऊन मजूरवर्गाची दिशाभूल चालू होती. आतां मजुरांपुढें दोन रस्ते मोकळे आहेत. नव्या-जुन्या पुढाऱ्यांनी आपलीं मतें व धोरण मजुरास समजून देऊन आपल्या बाजूस ओढण्याचा प्रयत्न खुशाल करावा. नव्या पुढाऱ्यांचा मार्ग मजूर वर्गास कसा झेपणार नाहीं यांचें प्रत्यंतर नागपूर-वऱ्हाड या प्रांतांत नुकतेंच दिसून आलें. त्या प्रांतांतील मजुरांच्या पुढाऱ्यांनीं व्हिटले कमिशनपुढें साक्षी

दिल्या, व बहिष्कारवाल्यांनीं जंगंजग पछाडलें तरी कामिशन वेगवेगळ्या शहरांस भेटी देत असतां तांबडीं निशाणें मिरवून त्याचा धिःकार केला नाहीं.

हिंदुस्थानांत शेतकरी वर्गाच्या खालोखाल मजूर वर्गाचें महत्त्व आहे. त्यांची संख्याहि शेतकऱ्यांच्या खालोखाल आहे. एवढ्या प्रचंड वर्गाची चळवळ योग्य दिशेनें चालली तरच त्यांत त्यांचें व राष्ट्राचे हित आहे. नवमतवाद्यांच्या नादास लागल्यानें त्यांचें कसें नुकसान होतें हें मुंबईच्या संपांत अनुभवास आलेंच आहे. अशा स्थितींत नवमतवाद्यांचा मार्ग चुकीचा कां व जुन्या पुढाऱ्यांचा मार्ग बरोबर कां याची नीट कल्पना मजरवर्गास व एकंदर जनतेस येणें आवश्यक असल्यामुळें त्याचेंच दिग्दर्शन आजच्या लेखांत करण्याचें आम्ही योजिलें आहे. तें वाचलें असतां ट्रेड यूनियन कॉंग्रेसचीं शकलें कां उडालीं याचाहि खुलासा सहजच होईल.

### जुन्या-नव्या पुढाऱ्यांची दृष्टि

मजुरांची संघटना करण्याबाबतची दिवाण चमनलाल, जोशी वगैरे जुन्या पुढाऱ्यांची दृष्टि व नवमतवाद्यांची दृष्टि यांत फरक आहे हें जुन्या लोकांचा एशियाटिक लेबर कॉन्फरन्सवर भर कां व नवमतवाद्यांचा ऑल इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेस ही संस्था पॅन पॅसिफिक ट्रेड यूनियन सेक्रेटॅरियटला जोडण्याचा हट्ट कां ह्याचा बारकाईनें अभ्यास केल्यास ध्यानांत येण्यासारखें आहे. १९२५ सालीं जिनीव्हा येथें हिंदी मजुरांचे प्रतिनिधी खासदार नारायणराव जोशी व जपानी मजुरांचे प्रतिनिधी सुझुकी यांची भेट झाली असतां एशियाटिक लेबर कॉन्फरन्सची कल्पना निघाली. त्या बाबतीत हिंदी मजुरांचें म्हणणें असें कीं, हिंदी मजुरांच्या सुस्थितीच्या आड जपानी मजूर येतात. कारण जपानमधील गिरण्यांत काम करणाऱ्या मजुरांची स्थिति वाईट असल्यानें तेथील उत्पादनाचा खर्च हिंदुस्थानापेक्षां पुष्कळच कमी पडतो, व यामुळे हिंदी मालाबरोबर जपानी मालाची मारक चढाओढ होऊन हिंदी व जपानी मजुरांचा तोटा होतो. तेव्हां दोनहि देशांतील मजुरांनीं एकमेकांची स्थिति सुधारण्याकरितां सहकार्य करावें. १९२५ सालीं या कल्पनेचा उगम झाला असला तरी मध्यंतरीं सव्वीस व सत्तावीस सालीं या दृष्टीनें पुढें पाऊल मुळींच पडलें नाहीं. परंतु अठ्ठावीस सालीं दिवाण चमनलाल व कॅप्टन योनेक्यूबो यांचें या विषयीं पुनः बोलणें होऊन त्या कल्पनेला चालना मिळाली. त्या वेळीं असें ठरविण्यांत आलें होतें कीं, १९२९ च्या मे महिन्यांत हिंदुस्थानांत ही परिषद भरविण्यांत यावी. दिवाण चमनलाल यांनीं गेल्या वर्षीच्या ऑल इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या अधिवेशनांत एशियाटिक लेबर कॉन्फरन्स बोलावण्यांत यावी असा ठराव मांडला, व त्याला कम्युनिस्ट मताच्या ब्रॅडलेसारख्या गृहस्थांनीं कसून विरोध केला. एशियाटिक लेबर कॉन्फरन्स भरविण्यांत जपानी व हिंदी मजुरांच्या पुढाऱ्यांचा हेतु मजुरांची स्थिति सुधारावी एवढाच होता. त्यामध्यें भांडवलवाल्यांशीं भांडण्याचा किंवा त्यांचा निःपात करण्याचा हेतु नव्हता.

### पॅन पॅसिफिक ट्रेड-यूनियन सेक्रेटॅरीयट

आतां आपण पॅन पॅसिफीक ट्रेड यूनियन सेक्रेटॅरियटकडे दृष्टि वळवूं. झेरियाची परिषद होण्यापूर्वी पॅन पॅसिफिक सेक्रेटॅरियटनें ऑल इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसला उद्देशून काढलेलें पत्रक एका कलकत्त्याच्या वृत्तपत्रांत झेरिया परिषदेपूर्वी प्रसिध्द झालें होतें, व त्यामध्यें त्या वर्षाच्या ऑल इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसला पॅन पॅसिफिक यूनियनास मिळण्याविषयीं विनंति केली होती. त्याच पत्रकांत मॅक्डोनॉल्ड प्रभृति ब्रिटिश मजूर पुढाऱ्यांवर शिव्यांची लाखोली वाहण्यांत आली होती; व 'जर ऑल इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसनें योग्य तो मार्ग दाखविला तर हिंदी मजूर दडपशाहीला न जुमानतां पुढें जातील अशी चिथावणी ऑल इंडिया ट्रेड यूनियन कॉंग्रेसला देण्यांत आली होती. सुझुकी व एन. एम. जोशी यांनीं एशियाटिक मजूर परिषद भरविण्याचा जो बेत केला होता त्याला इंम्पीरियॅलिस्टिक असें शेलकें नांव ठेऊन ही परिषद भरविण्याचा हेतु पॅन पॅसिफिक सेक्रेटॅरियटला मारून टाकण्याचा आहे असें प्रसिद्ध करण्यांत आलें होतें.

पॅन पॅसिफिकला ज्या दोन प्रमुख संस्था जोडण्यांत आल्या आहेत त्यांत इंग्लंडमधील 'नॅशनल मायनॉरिटी मुव्हमेंट' व रशियांतील 'ऑल रशियन कौन्सिल ऑफ ट्रेड यूनियन्स' आहेत. या दोनहि संस्था कम्युनिस्टांच्या आहेत. या 'पॅन पॅसिफिक ट्रेड यूनियन सेक्रेटॅरीयट म्हणजे काय' ह्या पत्रकांत या संस्थेची माहिती दिली असून त्यांत हिंदुस्थानविषयक पुढील मजकूर होता.—"बत्तीस कोटी लोकांच्या हिंदुस्थान देशाच्या किनाऱ्यावर जरी पॅसिफिक महासागराच्या लाटा आदळत नसल्या तरी ज्या देशांत तिसरी राष्ट्रीय व सामाजिक क्रान्ति घडून येण्याच्या मार्गांत आहे त्या देशाला पॅन पॅसिफिक ट्रेड यूनियन सेक्रेटॅरियटपासून अलिप्त ठेवण्याला फक्त भौगोलिकच सबब सांगतां येण्यासारखी आहे. हें पत्र लिहिलें जात असतांच हिंदुस्थानांतील मजूर हिंदी भांडवलवाल्यांविरुद्ध व साम्राज्यशाहीविरुद्ध उठले असून आपल्या न्याय्य हक्काच्या संपादना-

करितां ते संप करीत आहेत अशा तारा येत आहेत. आम्ही मजुरांना असें समजावून सांगूं कीं तुमचा खरा शत्रू तुमच्या देशांतील भांडवलवाले हा होय." या पत्रकांतील पुढील वाक्यें वाचल्यावर या संस्थेच्या ध्येयाची सहजच कल्पना येण्यासारखी असल्यानें तीं जशींच्या तशीं देत आहोंत—

"आमचें भांडण वर्णाविरुद्ध नाहीं. वर्गाविरुध्द ( भांडवलवाल्या ) आहे. आमचें भांडण जातीविरुद्ध नाहीं वर्गाविरुध्द आहे. आम्हाला जात, वर्ण राष्ट्र यांच्या आधारावर भेद पाडावयाचे नाहींत. फक्त भांडवलवाला व कामकरी या स्वरूपाचा आमचा वाद आहे. जगांतील कामकऱ्यांनीं एक व्हावें हें आमचे ब्रीदवाक्य आहे."

वर दिलेल्या त्रोटक माहितीवरून ही संस्था कम्युनिस्ट मतांची असून मजुरांच्या हातीं राज्ययंत्र देण्याकरितां तिला जागतिक क्रांति घडवून आणावयाची निदान त्या दृष्टीनें यत्न करून पाहावयाचा आहे हें स्पष्ट दिसतें.या पॅन पॅसिफिक कॉन्फरन्सला नवमतवादी पुढाऱ्यांनीं उचलून धरलें आहे. अर्थातच नव्या व जुन्या पुढाऱ्यांच्या दृष्टींत व कार्यपध्दतींत काय फरक आहे हें त्यांनीं उचलून धरलेल्या दोन बाजूंवरून सहज ध्यानांत येतें.

## पं. जवाहरलाल नेहरू

गेल्या वर्षी झेरियाच्या परिषदेंत अगदीं थोड्या मतांनीं दिवाण चिमनलाल यांच्या पक्षाचा विजय झाला असला तरी त्या वेळींच ऑल-इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेसमध्यें नवमतवाद्यांचा हात चांगला शिरला आहे हें निरनिराळ्या ठरावांवरील मत मोजणीवरून सहज कळत होतें. या वर्षीच्या अधिवेशनांत गिरणीकामगार यूनियन व जी. आय. पी. रेल्वे मेन्स यूनियन या नवमतवादी लोकांच्या संस्थांचे प्राबल्य वाढून जुन्या पुढाऱ्यांचा न भूतो न भविष्यति असा पराभव झाला. पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं आपल्या भाषणांत कमिट्या-कमिशनें हीं लोकांच्या उत्साहावर व चळवळीवर पाणी ओतण्याकरितांच सरकार नेमीत असतें असें सांगून व्हिटले कमिशनावरील बहिष्काराचें समर्थन केलें. परंतु ऑल-इंडिया ट्रेड युनियन काँग्रेस कोणत्याच बाहेरच्या संस्थेला जोडूं नये व आपसांतील दुही टाळावी असा योग्य सल्ला त्यांनीं परिषदेला दिला. पं. जवाहरलाल नेहरू यांचा कल कम्युनिस्टांकडे असला तरी रशियांतील बऱ्याच गोष्टी त्यांना पसंत नाहींत ही गोष्ट त्यांचें 'सोव्हिएट रशिया' हें पुस्तक वाचल्यास तेव्हांच समजतें. त्यांनीं हीच गोष्ट आपल्या भाषणांत स्पष्ट केली. ते म्हणाले, "कम्युनिझमचीं बरींच तत्त्वें मला आवडत असलीं तरी कम्युनिस्टांची कार्यपद्धति व मार्ग मला पसंत नाहींत. अर्थातच थर्ड इंटर नॅशनलला आपली काँग्रेस जोडूं नये. परंतु मला सेकंड इंटर नॅशनल ही संस्थाहि आवडत नाहीं. कारण त्या संस्थेचे पुढारी आज निरनिराळ्या देशांत मंत्रिमंडळांत असून साम्राज्यशाहीचे पाठीराखे बनले आहेत. अशा स्थितींत आपण आपल्या चळवळीची सांगड तिच्याशीही घालूं नये. ज्या ज्या संस्थांशीं आपल्या चळवळीच्या हिताकरितां सहकार्य करावें असें वाटेल त्या संस्थांशीं आपण वेळोवेळीं सहकार्य करावें.

## वरातीमागून घोडें

जवाहरलाल नेहरू यांचा उपदेश जसा परिषदेच्या पचनीं पडावयास पाहिजे होता तसा पडला नाही. परिषदेमध्यें ज्वलज्जहाल ठराव गेल्या वर्षी होऊं शकले नाहींत. ते सर्व या वर्षी झाले.पॅन पॅसिफिक ट्रेड यूनियन सेक्रेटॅरियेटला ऑल इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेस जोडण्याचा ठराव विषयनियामक मंडळांत संमत झाला, व जाहीर अधिवेशनांतहि तो संमत झाला असता. परंतु काँग्रेस कोणत्या संस्थेशी जोडावी या प्रश्नाचा विचार आणखी एक वर्षपर्यंत तहकूब करावा ही उपसूचना जाहीर अधिवेशनांत मान्य करण्यांत आली. वरात आटोपल्यावर हें घोडें श्रृंगारून आणण्याचा उपयोग काय? इटातटाचे इतर ठराव पास झाल्यामुळें जुने पुढारी ऑल इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेस सोडून गेल्यावर पॅन पॅसिफिक ट्रेड यूनियन सेक्रेटॅरियटला ऑल इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेस जोडण्याचा विचार एक वर्ष तहकूब ठेवण्याच्या उपसूचनेचा एकीच्या दृष्टीने कांहींहि उपयोग होणें शक्य नव्हतें.

दिवाण चमनलाल, नारायणराव जोशी प्रभृति जुन्या पुढाऱ्यांनीं मजुरांची स्थिति सुधारणें एवढाच उद्देश डोळ्यांपुढें ठेवून सनदशीर चळवळ करण्याकरितां ट्रेड यूनियन्स फेडरेशन ही नवी संस्था काढली व ह्या संस्थेच्या वाऱ्यालाहि कम्युनिस्टांना उभें राहूं द्यावयाचें नाहीं असें ठरविलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे या वर्षापर्यंत ऑल इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेस जीं कामें करीत होतीं तींच कामें ही नवी संस्था पुढें चालू ठेवणार आहे. या नव्या संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे श्री. गिरी हे अध्यक्ष असून श्री. बखले हे सेक्रेटरी आहेत. फेडरेशन स्थापण्याकरितां भरलेल्या सभेंत व्हिटले कमिशनाशीं सहकार्य करण्याचा, राऊंड टेबल कॉन्फरन्सला पाठिंबा देण्याचा व त्या परिषदेमध्यें मजुरांचे भरपूर प्रतिनिधि असावे अशी मागणी करण्याचा इत्यादि ठराव संमत झाले. त्याचप्रमाणें जिनीव्हाच्या आंतरराष्ट्रीय परिषदेकरितां हिंदी मजुरांच्या प्रतिनिधींचीं नांवेंहि सुचविण्यांत आलीं.

## काँग्रेसची दिशा

ऑल इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेस हे नांव जरी आज शिल्लक असलें तरी त्या संस्थेची कार्यदिशा मात्र एकदम बदललेली आहे. काँग्रेसने जिनीव्हाशीं संबंध तोडून टाकला, कम्युनिस्टांच्या वर्कर्स वेल्फेअर लीगसाठीं आपला इंग्लंडमधील प्रतिनिधि निवडला आणि संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाला पाठिंबा देऊन नेहरू कमिटीचा रिपोर्ट, व राउंड-टेबल कॉन्फरन्सची योजना यांचा धिक्कार केला. व्हिटले कमिशनवर बहिष्कार घालण्याचे ठरविण्यांत येऊन जाहीर अधिवेशनांत नसला तरी विषयनियामक कमिटींत जोशी-चमनलालांचा निषेध करण्यांत आला. प्रत्यक्ष व्यवहारांत ट्रेड यूनियन काँग्रेसचा पॅन-पॉसीफिक यूनियनशीं प्रत्यक्ष संबंध येणार नसला तरी त्या संस्थेशीं ट्रेड यूनियन काँग्रेसचें प्रेमाचें नातें जोडल्या सारखेच आहे. एका शब्दांत सांगावयाचे म्हणजे ट्रेड यूनियन कॉंग्रेस कम्युनिस्ट मताच्या लोकांच्या ताब्यांत गेली आहे. मुंबईच्या कामगार यूनियनचे पुढारी श्री. एस. व्ही. देशपांडे हे पुढील वर्षाच्या कार्यकारीमंडळाचे चिटणीस असून संपूर्ण स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते दे. भ. सुभाषचंद्र बोस याना अध्यक्ष निवडण्यांत आलें आहे. सुभाषबाबूंनीं अजून अध्यक्षस्थान स्वीकारलें नाहीं ही गोष्ट वेगळी. त्यांची जुन्या पुढाऱ्यांशीं बोलणीं चालू असून कांहीं तडजोड होण्यासारखी असली तर ती घडवून आणण्याचा त्यांचा विचार दिसतो.

ऑल इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेसच्या वरील ठरावांवरून त्या संस्थेचे ध्येय, कार्यपद्धति हीं क्रान्तिकारक बनलीं आहेत हे स्पष्ट होते. या उलट ट्रेड-यूनियन फेडरेशनचें धोरण सुधारणावादी आहे. सुभाषबाबूंनीं जुन्या व नव्या लोकांची एकी करण्याचा कितीहि यत्न केला तरी तो प्रयत्न सद्यःस्थितींत तरी यशस्वी होईल असें वाटत नाहीं. आज तरी जुन्या व नव्या मजूर पुढाऱ्यांचा दृष्टिकोन अगदीं भिन्न आहे. हिंदी मजुरांच्या चळवळींत हें स्थित्यंतर घडून आलें त्यांत नवीन असें कांहींच नाहीं. इंग्लंडच्या मजुरांच्या चळवळीच्या इतिहासांत सुधारणावादी व क्रान्तिवादी यांच्या झटापटींत सुधारणावाद्यांची सरशी झाली, व इंग्लंडांतील मजूरसंघटना प्रभावी ठरून गेल्या दशकांत मजूर-पक्षाचें दुसरें मंत्रिमंडळ बनलेलें पाहावयास मिळत आहे. परंतु तेथेहि आज लहान प्रमाणांत कां होईना मजुरांचा क्रान्तिवादी पक्ष अस्तित्वांत आहे.

नवे ट्रेड यूनियन फेडरेशन व जुनी ट्रेड यूनियन काँग्रेस यांच्या मधील खरा फरक त्यांच्या कार्यपद्धतींत आहे. दिवाण चमनलाल, नारायणराव जोशी, शिवराव वगैरे मंडळींचें जास्त लक्ष व्यवहाराकडे असल्यानें व तें आंधळ्या ध्येयवादाला बळी न पडल्यानें अर्थातच सुधारणावादी आहेत. नवमतवाद्यांचा सर्व भर भावनेवर असून ते रशियन कार्यपद्धतीवर भाळलेले आहेत. मनुष्यस्वभावाची व येथील परिस्थितीची ते ओळख विसरले आहेत असेच दिसते. गेल्या दोन-तीन वर्षांत नवमतवाद्यांनीं मजूर संघटनेला चालना दिली असली तरी त्यांचें नित्य कार्य विध्वंसक स्वरूपाचें झाल्यानें व मनुष्याच्या ध्येयनिष्ठ स्वार्थत्यागाला सीमा असते याची जाणीव त्यांना न राहिल्यानें या लोकांच्या चळवळीपासून मजुरांचें हित झालें नाहीं असें स्पष्ट दिसत आहे. आणखी कांहीं कालपर्यंत आपल्या जहाल भाषणांनीं ते मजुरांना भारतील, नाहीं असें नाहीं; परंतु संपांनीं यश मिळण्याऐवजीं गांजवणूक मात्र वाढते असें मजुरांना एकदां कळून चुकलें म्हणजे भावनेच्या पायावर उभारलेले नवमतवाद्यांचे मनोरथ जेथल्या तेथेंच जिरतील. एवढेंच नव्हे, तर मजुरांची सर्व शक्ती विध्वंसक कार्यांत संपल्यानें मजूरसंघटनेचें पाऊल पुढें पडण्याऐवजी त्याची पिछेहाट मात्र झालेली दिसेल.

भावनेला व्यावहारिक विचाराची जोड मिळणें आवश्यक असतें. हिंदी मजुरांच्या दुर्दैवानें नवमतवाद्यांमध्ये व्यावहारिक विचाराची वाण दिसते. मुंबईत गिरणी कामगारांची संघटना करण्याचें काम त्यांनीं हातीं घेतलें. जुन्या पुढाऱ्यांपासून ते फटकून वागले. त्यांचा त्यांनीं धिक्कार केला. पुढे कामकऱ्यांच्या राज्याचीं मोहक वर्णनें केलीं व एका पाठीमागून एक संप घडवून आणले. परंतु त्यांचा उपयोग झाला नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. उलट नवमतवादी मजूर पुढारी आपापसांतच इतके भांडत राहिले कीं, यांत खरा कोण याचा विचार करतांना अज्ञ मजूर माल किंकर्तव्यतामूढ बनले. नव्या अगर जुन्या कोणत्याहि पुढाऱ्यांचें त्यांच्यावर वजन उरलेलें नाहीं. या सर्व आपत्तींचें मूळ नवमतवाद्यांच्या अविचारांत आहे. मुंबईतलि कार्याचा झालेला खेळखंडोबा पाहून तरी ते शाहणे होतील असें वाटलें होतें; परंतु नागपुरास ऑल इंडिया ट्रेड यूनियन काँग्रेसमध्यें त्यांनीं जें धोरण स्वीकारलें त्यावरून मात्र ते शहाणे झालेले नाहींत व मजुरांचें नष्टचर्य संपलेलें नाहीं असे म्हणावें लागतें. आमच्या मते काँग्रेसचीं शकलें पडूं न देतां तडजोड करून नवमतवादी व जुने पुढारी या दोघांनीं मजूर संघटनेचा खचलेला पाया भरभक्कम करावयास पाहिजे होता. मजुरांच्या चळवळींत आज स्थित्यंतर होऊन क्रान्तिवाद्यांचा वरचष्मा झाला असला तरी थोडक्या काळांत क्रान्तीपेक्षां सुधारणावादच फिरून डोकें वर काढील असे वाटतें.

# फर्ग्युसन कॉलेजाचें गॅदरिंग

( ले.--**काशिनाथ नरसिंह केळकर**, माजी विद्यार्थी )

यंदाचें फर्ग्युसन कॉलेजचें गॅदरिंग फार यशस्वी रीतीनें पार पडलें. व त्या यशाची मुख्य खूण हीच कीं, इतका उत्साह, समाधान व आनंद यापूर्वी कोणत्याही संमेलनाच्या वांट्याला आला नसेल! कॉलेजच्या अकराशें विद्यार्थ्यांपैकीं एक हजारावर विद्यार्थी यंदा संमेलनांत वर्गणी देऊन सामील झाले होते. विद्यार्थ्यांचे संमेलन व कॉलेजाचा वार्षिक दिवस यासंबंधाचे सर्व वाद सलोख्यानें व उभय पक्षीं दिलजमाईनें नव्या कारकीर्दींत मिटले होते. म्हणून संमेलनाच्या प्रसंगीं विद्यमान व माजी विद्यार्थ्यांची इतकी गर्दी लोटली होती कीं, कॉलेजच्या इतिहासांत इतकें उत्साहानें भरलेलें संमेलन बहुधा दुसरें झालेंच नसेल असेंच प्रत्येकाला वाटलें.

कोणत्याहि वादाकडे पाहिलें तरी तो वाढणें किंवा मिटणें हें वाद करणाऱ्या व्यक्तींवरच बरेचसें अवलंबून असतें. सुदैवानें रँग्लर महाजनी यांच्यासारखे कुशल कर्णधार या कॉलेजच्या अवाढव्य गलबतास लाभले. मध्यंतरीं या गलबताचें मुख्य यंत्र बिघडून तें निकामी होतें कीं काय अशी भीति वाटत होती; पण प्रि. महाजनी यांची विद्वत्ता, मनमिळाऊपणा व विनयसंपन्न स्वभाव यांमुळें, विद्यार्थी व सरकारी अधिकारी या दोघांचींहि मनें त्यांना आपल्याकडे ओढून घेतां येतात असें या थोड्या अवधींतहि दिसून आल्याखेरीज राहिलें नाहीं. तात्पर्य, कोणाची कोणतीहि तक्रार राहिली नव्हती.

संमेलनाचे निमंत्रित पाहुणे **श्री. जयकर** हे आदल्याच दिवशीं आजारी पडल्यानें **श्री. न. चिं. केळकर** यांना तें स्थान देण्यांत आलें होतें. आपण स्वतः १८८९ सालीं फर्ग्युसन कॉलेजांत असतांना काय परिस्थिति होती, एका खोलींत मावणाऱ्या कॉलेजाचा व लायब्ररीचा पुढें केवढा अवाढव्य विस्तार झाला, आगरकर, आपटे, गोळे, केळकर, गोखले कसे शिकवीत व मुलांना त्यांच्याबद्दल काय वाटे याबद्दल त्यांनीं मनोरंजक आठवणी सांगितल्या. आणि मातृभाषेला प्रमुख स्थान मिळून पुण्याला स्वतंत्र युनिव्हर्सिटी स्थापन होणें किती आवश्यक आहे हे सांगितलें. रँग्लर महाजनी यांना दिलेली जहाजाच्या कप्तानाची उपमा पुढें चालवून त्यांनीं विनोदानें महाजनी यांना विचारलें कीं, 'कॉलेज हे जहाज व तुम्ही त्याचे कप्तान हें खरें! पण हे जहाज पूर्वेला जाणार कीं, पश्चिमेकडे?' या प्रश्नाला आभार मानतांना, महाजनी यांनींहि केळकरांना हंसत उत्तर दिलें कीं, "पुढल्या वर्षीं असेंच कॉलेजच्या समारंभाला फिरून या म्हणजे आपोआप दिसेल!"

पण या संमेलनाचें अपूर्वत्व व उत्साह या इतर गोष्टीप्रमाणेंच आणखी एका गोष्टीमुळें विशेष दिसून येत होता. ती गोष्ट अशी कीं, संमेलनाच्या अगोदर एकच दिवस प्रस्तुत लेखकानें पूर्वींच्या टिळक स्मारकाचा चिटणीस या नात्यानें रँग्लर महाजनी यांना लो. टिळकाचा पुतळा फर्ग्युसन कॉलेजच्या भव्य व नव्या बांधलेल्या वाडिया लायब्ररीत नेऊन ठेवण्याची विनंति केली होती. त्या विनंतीला मान देऊन त्यांनीं तो पुतळा तावडतोब, चोवीस तासांचा देखील विलंब न लावतां, मुख्य इमारतींत नेला, व प्रमुख स्थानीं मांडून ठेवला. नव्या जुन्या प्रिन्सिपालांच्या अमदानींची या एकाच उदाहरणानें तुलना होण्यासारखी असली तरी आतां ती करण्यांत अर्थ नाहीं. तथापि, टिळकांचा पुतळा वादांत पडला असतां ज्या ऋणानुबंधी गृहस्थांनीं त्याकरितां निष्कारण अपमानाचे व मानहानीचे प्रसंग सोसले त्यांना प्रि. महाजनी यांच्या मनाच्या दिलदारीचें किती कौतुक वाटलें असेल हें वाचकांस वेगळें सांगण्याचें कारण नाहीं! लो. टिळकांचा पुतळा त्यांनीं स्थापन केलेल्या कॉलेजांत, लायब्ररीसारख्या योग्य ठिकाणीं मांडून ठेवण्यांत आला या औचित्यपूर्ण गोष्टीचें समाधान संमेलनास आलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याच्या चेहऱ्यावर दिसून येतच होतें; पण फर्ग्युसन कॉलेजाविषयीं खरी कळकळ व आस्था बाळगणारे जे अनेक माजी विद्यार्थी व गृहस्थ महाराष्ट्रभर पसरले आहेत त्यांनाहि या गोष्टीनें समाधान वाटेल.

रँग्लर महाजनी यांनीं आपल्या शिरावर घेतलेलें कर्णधारत्वाचें काम जबाबदारीचें व जोखमीचें आहे हें तर खरेंच, तथापि त्यांच्या अंगीकृत कार्यांत कॉलेजचे सर्व विद्यमान व माजी विद्यार्थी यांची सहानुभूति व पाठिंबा त्यांना खात्रीनें लाभेल, असें विद्यार्थ्यांचेतर्फे त्यांना आश्वासन देण्यास हरकत नाहीं. नुकतेंच टाइम्सनें रँग्लर महाजनी यांचें वर्णन "स्टूडंट प्रिन्सिपाल" असें केलें होतें. पण विद्यार्थ्यांचा त्यांचेवरील विश्वास पाहता, "सर्वः सगंधेषु विश्वसिति" हे कविवचन खरेंच आहे असें सहज दिसून येईल.

# डॉ. परुळेकर यांचा सन्मान

रविवार ता. १५ रोजीं सायंकाळीं ६ वाजतां सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत **श्री. न. चिं. केळकर** यांच्या अध्यक्षतेखालीं **डॉ. परुळेकर** यांचा सार्वजनिक सभेमार्फत जाहीर सन्मान करकरण्यांत आला. प्रथम अध्यक्षांचें प्रास्ताविक भाषण झालें. ते म्हणाले, "डॉ. परुळेकर हे येथील अनाथ विद्यार्थी गृहांतील एक विद्यार्थी होते. येथें होणारा अभ्यासक्रम सर्व पुरा करून ते अमेरिकेस उच्च शिक्षण मिळविण्याकरितां गेले.ही जी धडाडी त्यांनीं दाखविली तिचें कौतुक करावेसें वाटतें. अमेरिकेसारख्या परक्या देशांत स्वावलंबनानें राहून त्यांनीं कोलंबिया युनिव्हर्सिटींतील आपला शिक्षणक्रम संपवून पी. एच. डी. ची पदवी मिळविली. वृत्तपत्राच्या धंद्यासंबंधानेंहि त्यांनीं आस्थापूर्वक अभ्यास केला. व हिंदुस्थानदेशाबद्दल त्यांनीं निरनिराळ्या पत्रांतून लेख लिहून व व्याख्यानें देऊन खरें लोकमत अमेरिकेंत कळविलें. याबद्दल ते प्रशंसेसपात्र आहेत. ही देशसेवा फार महत्त्वाची आहे. अमेरिका खंड सर्व जगांत सर्व बाजूंनीं श्रेष्ठ आहे. जगांतील प्रत्येक देश तिकडील लोकांची सहानुभूति मिळविण्यासाठीं आपल्या मताचा प्रसार करण्याची खटपट करीत आहे. इंग्लंडसारखें बलाढ्य राष्ट्रहि तेथें मतप्रसार करीत आहे. त्यांत एक गोष्ट आपल्यास दिसून येईल कीं, तें राष्ट्र आपल्या अब्रूस फार भितें. लोकमताची पर्वा त्याला करणें भाग आहे. अशा स्थितींत अमेरिकेसारख्या परठिकाणीं जाऊन डॉ. परुळेकर यांनीं राष्ट्राभिमानानें प्रेरित होऊन स्वयंस्फूर्तीनें आपल्या देशाची माहिती तेथील लोकांना देण्याची योग्य कामगिरी केली. तेथील मोठ्यांतल्या मोठ्या वर्तमानपत्रांशीं त्यांचा संबंध जडला आहे. आणि आतां येथे राहून तिकडील पत्रांशीं ते अखंडित संबंध ठेवणार आहेत."

वरील आशयाचें भाषण झाल्यानंतर डॉ. परुळेकर यांना सभेमार्फत हार घालण्यांत आला. नंतर ज. स. करंदीकर, ल. ब. भोपटकर, दा. वि. गोखले व तारकुंडे वकील यांचीं भाषणें झालीं. राष्ट्रीय दृष्टीनें तिकडील सरकार तरुण पिढींत स्वातंत्र्याची तळमळ वाढविण्यास काय उपाय योजतें, याची माहिती देण्याबद्दल त्यांनीं सुचाविलें. नंतर डॉ.परुळेकर यांचें पुढील आशयाचे भाषण झालें.

ते म्हणाले, "तिकडे जाऊन मी चार प्रकारांनीं माहिती मिळविली. पाश्चात्य व पौर्वात्य यांचा यापुढें एकमेकांशीं बौद्धिक संबंध अधिक येणार असल्यानें मी तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. नंतर स्वावलंबनाच्या द्वारें मी तेथील वर्तमानपत्रासंबंधीं अभ्यास केला. निरनिराळ्या राष्ट्रांतील विद्वान लोक येथें स्थापन झालेल्या संस्थेंत अभ्यास करण्यासाठीं येतात. त्या संस्थेंत माझा प्रवेश होऊन तेथें येणाऱ्या तरुण विद्यार्थ्यांचा सहवास मला घडला व त्यांची विचारसरणी काय आहे, हे मला पाहतां आलें. आणि हिंदुस्थानासंबंधानें मी तिकडे निरनिराळ्या प्रकारें माहितीचा प्रसार केला.अशा चार बाजूंनी मी अनुभव मिळविला. त्या अनुभवावरून मला असें वाटतें कीं, गेल्या १५ वर्षांत पाश्चात्य देशांत जी कांहीं विचारक्रान्ति झाली आहे,तिची माहिती इकडे असावी तशी नाहीं, असें मला येथे आल्यावर दिसून आलें. गेल्या २० वर्षांत तिकडे मोठीच क्रांति झाली आहे. फ्रेंच क्रांतीच्या वेळच्या Equality, Liberty and Fraternity या शब्दांतली जादू आतां नाहींशी झाली आहे. आज तिकडे Humanityस किंमत देण्यांत येत आहे. स्पेंडरच्या 'डिक्लाइन ऑफ वेस्टर्न सिव्हिलायझेशन' या पुस्तकानें पाश्चात्य संस्कृतीच्या श्रेष्ठ पदाविषयीं संदेह उत्पन्न केला आहे.आणि हिंदु तत्त्वज्ञानाबद्दल आतां तेथें आस्थापूर्वक विचार सुरू झाला आहे. पौर्वात्य व पाश्चात्य तत्त्वज्ञानांचा मिलाफ आज नाहीं तरी २५ वर्षांच्या आंत खात्रीनें होईल अशी तेथील तत्त्वज्ञांची समजूत आहे. त्यांना हिंदुस्थानांतील तेहतीस कोटी लोकांच्या विचारक्रांतीचें महत्त्व फार वाटत आहे. अशा वेळीं तिकडे जाऊन आपल्या देशासंबंधी माहिती देण्याचा उपक्रम केल्यास त्याचा विशेष उपयोग होईल." या आशयाचें भाषण झाल्यानंतर अध्यक्षांनीं आभार मानल्यावर हा गोड समारंभ संपला.

याखेरीज मुंबई व वांद्रें या ठिकाणीं जाहीर सभांतून आणि पुणें येथें सर परशुरामभाऊ कॉलेजांत, ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन,महाराष्ट्र विद्यालय, व टिळक महाविद्यालय या ठिकाणीं डॉ. परुळेकर यांचा सन्मान करण्यांत येऊन परुळेकर यांनीं वरील ठिकाणीं अमेरिकेंतील आपला अनुभव सांगितला.

# स्टार्ट कमिटीपुढील कांहीं साक्षी

मुंबई इलाख्यांतील अस्पृश्य वर्ग व रानटी जाती यांत शिक्षणाचा प्रसार कसा करतां येईल व त्यांची सांपत्तिक स्थिति कशी सुधारेल याविषयीं उपाययोजना सुचविण्याकरितां मुंबई–सरकारानें एक कमिटी नेमली आहे. कमिटीचे अध्यक्ष मि. स्टार्ट आय. सी. एस. हे असून कमिटीच्या सभासदांत डॉ.आंबेडकर, डॉ.सोळंके, आमदार देशपांडे इत्यादि गृहस्थ आहेत. कमिटीची बैठक ता. ९ डिसेंबरपासून पुण्यांत कौन्सिल हॉलमध्यें सुरू झाली. कमिटीपुढें पुण्याचे कलेक्टर मि. गूल्ड, वि. रा. शिंदे, शिक्षण खात्याचे डायरेक्टर मि. लॉरी, इन्स्पेक्टर–जनरल ऑफ पोलीसचे पर्सनल असिस्टंट मि. स्मिथ इत्यादिकांच्या साक्षी झाल्या. त्यांचा थोडक्यांत गोषवारा पुढे देण्यांत येत आहे.

**मि. गूल्ड** यांनीं आपल्या साक्षींत पुढीलप्रमाणें माहिती सांगितली. 'आपण अस्पृश्य आहों या विचारानें दबून जाऊन ते आपली उन्नति करून घेत नाहींत. त्यांची स्थिति सुधारण्यासाठीं निराळा असा योग्य अधिकारी नेमला तरच ती सुधारेल. स्पृश्य लोक अस्पृश्यांच्या उन्नतीसाठीं प्रयत्न करीत आहेत. भलता अधिकारी नेमला तर तो स्पृश्यांची सहानुभूति गमावील. अस्पृश्यांना शिक्षणाची आवड नाहीं. त्यांच्याकरितां वसतिगृहे उघडलीं व शिष्यवृत्त्या ठेवल्या तर शिकण्याची गोडी त्यांस लागेल. अस्पृश्यांकरितां वेगळी शाळा काढण्यापेक्षां सर्वांकरितां काढलेल्या शाळेंत त्यांस पाठविणेंच चांगलें.मात्र सर्वसामान्य शाळेंत अस्पृश्य मुलांना घेण्याचे बाबतींत जबरदस्तीचा अवलंब करूं नये. अस्पृश्यांची संख्या ज्या मानानें आहे त्या मानानें त्यांचे प्रतिनिधी लोकल बोर्डांत आहेत. पण त्यांत लायक इसम फार कमी आहेत.'

डॉ. आंबेडकरांच्या प्रश्नास उत्तर देतांना मि. गूल्ड म्हणाले 'अस्पृश्य लोक आपले हक्क स्पृश्यांवर जबरदस्तीनें लादतील तर त्यांजवर बहिष्कार पडण्याची भीति आहे. यासाठीं स्पृश्यांशीं सामोपचारानेंच वागलेलें चांगलें.गांवकामगार महारांना वाईट रीतीनें वागवीत नाहींत. जसा कलेक्टराचा पट्टेवाला तसाच पाटलाचा किंवा तलाठ्याचा महार. सरकार अस्पृश्यांना नोकऱ्या देण्याची शर्थ करीत आहे, परंतु त्यांच्यांत लायक माणसेंच मिळत नाहींत.'

**श्री. वि. रा. शिंदे**—आपल्या साक्षींत म्हणाले, अस्पृश्यांसाठीं सार्वजनिक शाळांशिवाय स्वतंत्र शाळा काढण्यांत याव्यात. देवळांत भरणाऱ्या शाळांत अस्पृश्यांना मनाई होत असल्यास ती शाळाच बंद करावी. अस्पृश्यता घालविण्याला सरकारनें प्रयत्न करावयास पाहिजेत. यासाठीं शक्य तर कायद्याचीहि मदत सरकारने घ्यावी. कारण अस्पृश्यता गेल्याशिवाय समाजाचा उत्कर्ष होणार नाहीं.

**मि. पी. बी. अडवानी** ( डायरेक्टर ऑफ इंडस्ट्रीज)—यांनीं सांगितलें, 'धंदेशिक्षणाची आवड असणारांना तसें शिक्षण देण्यांत यावें. विणकाम, दोर तयार करणें इ. धंदे शिकविण्याची सोय सरकार करील. पुढील महिन्यांत पुण्यास विणकाम शिकविण्याचा एक वर्ग सुरू करण्यांत येणार आहे.

**श्री. भागवत** (चीफ ऑ० पुणें शहर म्यु०)—माझा स्कूलबोर्डाशीं संबंध नसल्यानें अस्पृश्यांसाठीं वेगळ्या शाळा आहेत कीं नाहींत हे मला सांगतां येणार नाहीं. शहरांत अस्पृश्यांसाठीं काढलेली ऋणमुक्त करणारी सोसायटी असून ती रजिस्टर करण्यांत आली आहे; व आतांपर्यंत तिनें सोसायटीच्या सभासदांपैकीं ४०६ इसमांची सावकारांच्या कचाट्यांतून मुक्तता केली आहे. त्यांच्यासाठीं संसारोपयोगी सामानाचें दुकानहि उघडण्यांत आलें आहे. माझा अस्पृश्य मजुरांशीं प्रत्यक्ष संबंध गेल्या जूनमध्यें आला.जेव्हां त्यांची स्थिति मी पाहिली तेव्हां असें आढळून आलें कीं,पठाण सावकार त्यांजपासून रुपयास चार आणे म्हणजे वर्षाला शेंकडा ३०० रु. प्रमाणें व्याज घेतो. त्यांना वरील सोसायटीनें ऋणमुक्त केलें, व आमची योजना यशस्वी होईल असा विश्वास आहे अशाच प्रकारच्या संस्था सर्वत्र काढण्यांत याव्यात. या लोकांत मद्यपानाचें व्यसन थोडेसें आहे. परंतु ते असेच व्यसनी राहिल्यास त्यांना सोसायटीकडून मदत होणार नाहीं असें बजावण्यांत आलें आहे. चांगले कपडे वापरण्याचा प्रश्न खर्चाचा असल्यानें तो तूर्त बाजूला ठेवला आहे. नंतर भांबुर्डा येथें डि. क्लासेससाठीं काढलेल्या वसाहतीची त्यांनीं माहिती सांगितली व केवळ नाममात्र भाडें त्यांजकडून घेण्यांत येतें असेंहि सांगितलें.

**श्री. तावडे** (प्रिन्सिपाल)–अस्पृश्यांना इतरांशीं मिसळण्यांत कांहीं अडचण येते असा मला अनुभव नाहीं. त्यांच्यासाठीं स्वतंत्र शाळांची गरज नाहीं. या लोकांना शिष्यवृत्तीसाठीं रोख पैसा देऊं नये. कारण त्यांचे आईबाप तो पैसा दारूंत उडवितात !

**मिस नवलकर** ( लेडी सुपरिंटेंडेंट फीमेल ट्रे. कॉलेज )--अस्पृश्यांत शिक्षकांची संख्या वाढत आहे. अस्पृश्य व स्पृश्य मुली एकत्र शिकण्यास अडचण पडत नाही.

**श्री. रावजी पुनाजी व ए. बी. त्रिभुवन** (नगर)--सक्तीचें शिक्षण सरसहा तावडतोब सुरू करावें. मुलींना इंग्रजी पांचवीपर्यंत शिक्षण देण्यांत येऊन त्यांस शिष्यवृत्त्याहि द्याव्यात. देवळें विहिरी व बाजार यांत प्रवेश करण्यास अस्पृश्यांना मुभा मिळाली तर त्यांचा दर्जा सहज वाढेल. इतर वर्गापेक्षां अस्पृश्यांकडून मारवाडी जास्त व्याज घेतो !

**रे. फेअरबँक** (नगर)--महार ख्रिस्ती झाला तरी त्याला अस्पृश्य म्हणूनच स्पृश्य समाज मानतो. साळी पिंपरी येथें तर त्यांजवर कांहीं कारणानें इतका कडक बहिष्कार पडला कीं, त्यांस बाजारांत माल मिळेना. तेव्हां त्यासाठीं सहा मैल दूर जावें लागे. मराठा माणूस अगर भिल्ल ख्रिस्ती झाला तर त्यांना स्पृश्य समाज विहिरीतून पाणी काढूं देत नाही, व जोंपर्यंत लोकमताचा एवढा कटाक्ष अस्पृश्यांविरुध्द आहे तोंपर्यंत कांहीं कायदेशीर उपाय करणें इष्ट होणार नाही. आमचें मिशन आपल्यापरीनें खटपट करीत आहे, परंतु लोकमतच इतकें विरुध्द आहे कीं, यशाची फारशी आशा नाही. अस्पृश्य व ख्रिस्ती मुलें यांना शाळांतून स्पृश्याप्रमाणे वागविण्यांत येत आहे असें मी नेवासें येथें समक्ष पाहिलें. अस्पृश्यांना विहिरी खुल्या कराव्या. अस्पृश्य शिक्षक असले तर अस्पृश्य विद्यार्थ्यांत जास्त विश्वास उत्पन्न होईल हे खरें असलें तरी स्पृश्य व अस्पृश्य यांतील भेद मोडेल असें वाटत नाहीं.

**राजभोज**--शाळांतून स्पृश्यास्पृश्य विद्यार्थी एकत्र बसविण्यांत आल्यावर हा भेद मोडेल. एखाद्या स्पृश्य हिंदूपेक्षां अस्पृश्यांना शिकविण्यासाठीं अस्पृश्य शिक्षकच अधिक चांगला. अस्पृश्यासाठीं शिक्षण सक्तीचें करावें. ज्या शाळांत अस्पृश्यांच्या मुलांना मनाई होईल त्या शाळांची सरकारनें देणगी बंद करावी. अस्पृश्यांना सरकारनें चांगल्या जमिनी द्याव्या.

**डिखळे**--(सुपरवायझर जिल्हा लोकल बोर्ड स्कूलबोर्ड पुणें) आमच्या भागांत स्पृश्य अस्पृश्य विद्यार्थी एकत्रच शिक्षण घेतात. त्यांत आम्हास अडचण आली नाही. माझ्या भागांत ११ शाळा देवळांत भरतात. पैकीं दहा शाळांत अस्पृश्यांचीं मुले जातात. दोन्ही मुलें सरमिसळीनें बसतात, व त्याबद्दल कोठें तक्रारहि नाहीं. भिगवण येथील शाळेंत तर अस्पश्यांचीं मुलें मूर्तीजवळच बसतात.

# भारतमंत्र्यांनीं हिंदुस्थानसरकाराकडे बोट दाखविलें

पार्लमेंटांत पुनः एकदां हिंदुस्थानासंबंधाने महत्त्वाची चर्चा होणार आहे व त्या वेळीं भारतमंत्री वेजवुड बेन हे हिंदी लोकांच्या सर्व शंकाकुशंकांचें पूर्ण समाधान होईल असें भाषण करणार आहेत अशी वार्ता गेल्या आठवड्यांत सर्वत्र पसरली होती व तीप्रमाणे बुधवार ता. १८ रोजी पार्लमेंटांत महत्त्वाचा वादविवाद झाला. पार्लमेंटांतले मजूर पक्षाचे एक सभासद मि. फेनर ब्रॉकवे याच्या ठरावावर हा सगळा वादविवाद झाला व त्या प्रसगानें भारतमंत्री मि. वेजवुड बेन यांचें लांबलचक व खुला सेवार भाषण झालें. या चर्चेच्या वेळीं एक मोठी आश्चर्यकारक गोष्ट दिसून आली ती ही कीं, हिंद-द्वेष्टया हुजूर पक्षाच्या सभासदांनीं या वेळीं आपले नाक कापून फेनर ब्रॉकवे यांच्या ठरावास अपशकून करण्याचा आचरटपणा केला नाहीं ! या वादविवादांत कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें विरोध करावयाचा नाहीं असेंच पूर्वीपासूनच ठरलें होतें कीं काय कोण जाणे ! कारण देखावा तरी असा दिसला कीं, पार्लमेंटांतील पूर्वीच्या वादविवादामुळें हिंदी लोकांच्या मनांत जशी शंका उद्भवली होती तशी शंका उद्भवूं नये, याकरितां हुजूर पक्ष मुद्दामच विरोधाचा प्रसंग टाळीत आहे. आणि असा बेत जर आधींपासूनच ठरला असला तर त्याची ही रंगीत तालीम चांगलीच वठली असें म्हणण्यास हरकत नाहीं ! कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचे दोघेच सभासद या ठरावावर बोलले. त्यांत ले. कर्नल हॉवर्ड बेरी यांच्या भाषणांत सर्वच राजकीय कैद्यांना माफी दिल्यास पुनः शांतता बिघडेल असा मोघम उल्लेख होता; तरी पण हिंदी लोकांचे समाधान होईल अशी वृत्ति आतां आपण ठेवली पाहिजे या धोरणाला त्यांनीहि संमतीच दिली. दुसरे कॉन्झर्व्हेटिव्ह सभासद सर सॅम्युअल होअर. यांनीं तर आपल्या भाषणांत विरोधापेक्षां ऐकमत्य कसें दिसून येईल याचीच अधिक काळजी घेतली ! आणि पूर्वीच्या वादाच्या वेळीं कॉन्झर्व्हेटिव्ह पक्ष हिंदी लोकांच्या आंकाक्षेला विरोधक आहे अशी जी सकारण समजूत झाली होती ती जणुं काय साफ पुसून टाकण्यासाठीं त्यांनीं पुनः पुनः सांगितलें कीं, फेनर ब्रॉकवे यांच्या ठरावाविषयीं कोणत्याहि पक्षाचा

कोणताहि मतभेद नसून इंग्लंडांतील सर्व पक्षांचे एकमतानें हिंदुस्थानाला हा संदेश पाठविण्यांत येत आहे. कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें या वेळीं अशा प्रकारें नमतें घेण्याचें कारण काय असेल तें असो. पण ऐक्य–विच्छेद होऊं नये म्हणून तो पक्ष मुद्दाम आपलें मन उघड करून बोलत नव्हता असे या भाषणावरून दिसतें.

फेनर ब्रॉकवे यांचा ठराव अगदीं साधा व मोघम शिफारसवजा आहे. हिंदुस्थानाची राज्यघटना ठरविण्यासाठीं व्हाइसरॉयांनीं जी राऊंड टेबल कॉन्फरन्स बोलावण्याचें जाहीर केलें त्या कॉन्फरन्सशीं सहकारिता करण्याची हिंदी पुढाऱ्यांची इच्छा दिसून आली याबद्दल पार्लमेंटाला आनंद होत आहे असे त्या ठरावांतल्या पहिल्या भागांत म्हटलें आहे आणि या सहकारितेच्या वृत्तीला उत्तेजन देण्याकरितां हिंदुस्थान-सरकार आपल्या कारभारांत आणखी अधिक सहानुभूति दर्शवील आणि विशेषत: राजकीय मतप्रदर्शनाच्या बाबतींत ही सहानुभूति अधिक स्पष्ट होईल असा पार्लमेंटला भरंवसा वाटतो असें ठरावाच्या शेवटच्या भागांत म्हटलें आहे. ठरावांतील शब्दांचे अक्षरश: परीक्षण केल्यास त्यांतील दोनहि विधानें वस्तुस्थितीस सोडून आहेत. हिंदुस्थानांतून राऊंड टेबल कॉन्फरन्सविषयीं सार्वत्रिक सहकारिता दिसून आलेली नाहीं. प्रथम दिल्लीस व नंतर अलाहाबादेस जमलेल्या सर्व-पक्षीय पुढाऱ्यांनीं अमर्याद सहकारिता दर्शविली नसून तिच्या मुळांत कांहीं समजुती आहेत. आणि सहकारिता करण्यापूर्वी अनुकूल वातावरण उत्पन्न करण्याकरितां म्हणून राजकीय कैद्यांची मुक्तता करणें, डोमीनियन स्टेटस मिळाल्याप्रमाणें हिंदुस्थानास आतांपासूनच वागविणे इत्यादि ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्या किरकोळ स्वरूपाच्या नसून अशा महत्त्वाच्या आहेत कीं त्यायोगानें सरकारला चांगलाच पेच पडेल. ही झाली सर्व पक्षीय पुढाऱ्यांच्या सहकारितेची स्थिति. याखेरीज कित्येक प्रांतिक परिषदांतून आणि सर्वच युवक परिषदांतून व खास स्वातंत्र्य परिषदेंतून व्हाइसरॉयांच्या जाहिरनाम्याला काय जबाब मिळाला ते जाहीर झालेंच आहे!

। असें असतां फेनर ब्रॉकवे हे आपल्या ठरावांत हिंदी पुढाऱ्यांनीं सहकारितेची वृत्ति दर्शविली याबद्दल आनंद प्रदर्शित करतात याचा अर्थ काय? याचा अर्थ एवढाच कीं त्यांची तशी सदिच्छा आहे आणि जी गोष्ट घडून यावी अशी आपली प्रबळ इच्छा असते ती गोष्ट जणू काय घडून आलीच असें मानून चालणें हा एक प्रकारचा शिष्टाचारच आहे. अर्थातच हिंदी पुढाऱ्यांनीं सहकारिता करावी अशी पार्लमेंटची इच्छा आहे एवढेंच या ठरावावरून ध्वनित होतें. ठरावाच्या उत्तरार्धाचीहि हीच स्थिति. हिंदी पुढाऱ्यांनीं मनमोकळेपणानें सहकारिता करावी अशा हेतूने हिंदुस्थानसरकारनें आपलें दडपशाहीचें धोरण बदलल्याचें अद्याप तरी कोठें दिसून आलें नाहीं. व्हाइसरॉयांचा जाहिरनामा प्रसिद्ध झाल्यावेळेपासून राजद्रोहाबद्दल नवीन खटला आम्ही केला नाहीं असें भारतमंत्री तिकडे पार्लमेंटांत सांगत आहेत व इकडे नवे नवे खटले पुढें येतच आहेत! परंतु आपल्या ठरावांत अशी सदिच्छा दर्शविण्यांत फेनर ब्रॉकवे यांचा हेतु काय असावा तो स्पष्ट दिसून येतो. शिष्टाचारासाठीं म्हणून ठरावाच्या भाषेची रचना कशीहि केली असली तरी हिंदुस्थानांतील राजकीय कैद्यांना माफी देण्यांत यावी आणि केवळ मतभिन्नतेवरून कोणालाहि तुरुंग पाहण्याचा प्रसंग येऊं नये असा पार्लमेंटाकडून हिंदुस्थान सरकारला पर्यायानें हा इषाराच आहे. आणि ठरावांतल्या उत्तरार्धाची ही कडू गोळी गिळण्याला पार्लमेंटानें कुरकुर करू नये म्हणून ठरावाच्या पूर्वार्धांत हिंदी पुढारी सहकारिता करीत आहेत असे म्हणून ती कडू गोळी शर्करावगुंठित केली आहे. दरबारी भाषा सोडून देऊन स्पष्ट सडेतोड भाषेत बोलावयाचें झाल्यास या ठरावांतील खरें मर्म हेंच कीं, हिंदुस्थान–सरकार जर यापुढें हिंदी जनतेशीं 'डोमीनियन सेटस'ला शोभेल अशा वृत्तीनें व सहानुभूतीनें न वागेल तर हिंदी पुढाऱ्यांच्या सहकारितेस सरकार मुकेल.

असो. फेनर ब्रॉकवे यांना हिंदुस्थानाविषयीं खरी कळकळ वाटत असल्यानें त्यांनीं या शर्करावगुंठित ठरावाच्या रूपानें ब्रिटिश सरकारास व हिंदुस्थानसरकारास कडू औषधाचा एक चांगलाच डोस दिला. आतां त्याचा परिणाम कसा काय होतो त्याकडे सर्व हिंदी राष्ट्राचें लक्ष लागून राहील. पार्लमेंटांतील वादविवादाकडे पाहिल्यास या वेळचीं भाषणें पूर्वीच्या वेळच्या भाषणांहून अगदीं निराळ्या तऱ्हेचीं होतीं हें उघड आहे. बर्कनहेडसाहेबांच्या कोणत्याहि हस्तकानें धमकीचा एकहि शब्द उच्चारला नाहीं अथवा रक्तपाताच्या प्रसंगाचीहि आठवण करून दिली नाहीं! पार्लमेंटांतील सभासदांत हिंदुस्थानाच्या दर्जाविषयीं मतभेद नसून मतैक्यच आहे असाच देखावा दिसावा व चुकूनदेखील भलताच एखादा शब्द उच्चारला जाऊन रंगीत तालीम बिघडूं नये अशाविषयीं प्रत्येकजण जपत होता असे दिसतें. त्यामुळें निदान या वादविवादाकडे बोट दाखवून तरी असल्य लोकांशीं सहकारिता कशी करावी असा प्रश्न विचारण्याला त्यांनीं जागाच ठेवली नाहीं.

भारतमंत्री वेजवुड बेन यांना खुलासेवजा

भाषण करण्याची संधि मिळावी ह्याच तर हेतु या ठरावाच्या मुळाशीं असल्यानें त्यांनीं या संधीचा फायदा घेऊन अनेक शंकांचें निरसन करण्याचा प्रयत्न केला. इंग्लंडांतील 'मॉर्निंग पोस्ट, डेली मेल' सारखीं कित्येक पत्रें कांहींहि बहकलीं तरी त्यांना आतां कोणी बिचारींत नाहीं आणि म्हणून त्यांच्या लिहिण्यावरून तुम्ही आपला गैरसमज करून घेऊं नका अशी हिंदी लोकांना त्यांनीं सूचना दिली. आणि 'डेली मेल'च्या आचरट लेखाचा मासला म्हणून त्यांनीं असें सांगितलें कीं, हिंदुस्थानाला आतां इंग्लंडांतून कर्ज देऊं नका असा उपदेश त्या पत्रानें नुकताच केला असतां आम्हांला ९ कोटींचें कर्ज पाहिजे होतें त्याच्या ऐवजी १२ कोटींचीं टेंडरें मिळालीं ! राजकीय कैद्यांना माफी देणें व केवळ मतभेदावरून खटले करणें न करणें या गोष्टी व्हाइसरॉयांच्या अधिकारांतल्या असल्यानें त्याचें लोण त्यांनीं त्यांच्याकडे परतवून टाकलें आणि ट्रेड यूनियनसंबंधानें एवढाच खुलासा केला कीं, आम्हाला मजूर वर्गाच्या हितासाठीं झटणाऱ्या खऱ्या ट्रेड यूनियन्स पाहिजेत. ट्रेड यूनिअन्सच्या नांवाखालीं राज्यक्रांति करणाऱ्या संस्था मात्र आम्ही चालू देणार नाहीं!

हिंदुस्थानाला डोमीनियनचा दर्जा जर देणार तर त्यास तुम्ही आतापासून डोमीनियनप्रमाणें कां वागवीत नाहीं याचें उत्तर म्हणून वेजवुड बेन म्हणाले कीं, १९१९ पासूनच हिंदुस्थानाशीं आम्ही डोमीनियनप्रमाणें वागत आहों ! हिंदुस्थानाच्या वतीनें व्हर्सेलीसच्या तहावर सही करण्यांत आली, हिंदुस्थानाला राष्ट्रसंघाचा घटक मानण्यांत आलें, इंपीरिअल कॉन्फरन्समध्यें त्यास प्रवेश मिळतो, जिनीव्हा येथें होणाऱ्या सर्व परिषदांतून हिंदी प्रतिनिधी हजर असतात इ. इ. त्यावर तेथल्या तेथेंच एका स्पष्ट-वक्त्या सभासदानें प्रश्न टाकला कीं, हे प्रतिनिधी व्हाइसरॉय निवडतात का असेंब्ली निवडते? हा प्रश्न अचानक आंगलट आलेला पाहतांच भारतमंत्री म्हणाले, माझ्या स्नेह्यानीं जी आता प्रश्नरूपानें सूचना केली तिची मी साभार नोंद करून ठेवतों व प्रसंग येईल त्या वेळीं तिचा विचार करण्याचें आश्वासन देतों !

अशा रीतीनें हा आंगलट येणारा मुद्दा टाळून भारतमंत्री हिंदुस्थानाच्या आर्थिक स्वातंत्र्याकडे वळले आणि असेंब्ली व व्हाइसरॉय यांचें एकमत झाल्यास आम्ही त्यांत ढवळाढवळ करीत नाहीं आणि हिंदुस्थानाला ज्या देशांतून माल स्वस्त मिळेल त्या देशांतून तो घेण्यास मुभा आहे व येथील कमिशनराच्या हुद्दयावर सर अतुलचंद्र चतर्जीसारख्या हिंदी अधिकाऱ्याचीच नेमणूक झाली आहे वगैरे गोष्टी त्यांनीं पाल्हाळपूर्वक सांगितल्या. त्या ठिकाणीं हुंडणावळीच्या भावाची चढउतार करण्यांत व ली कमिशन नेमून सिव्हिल सर्व्हंटांना खैरात वांटण्यांत हिंदुस्थानाचा कितपत बोज राखला गेला असें विचारणारा कोणी असता तर ह्याहि मुद्दा त्यांच्या आंगलट आला असता. पण तो प्रसंग टळला.

परंतु सर्वांत महत्त्वाचा व खरा वादाचा मुद्दा राऊंड टेबल कॉन्फरन्सचा होता. त्यासंबंधीं त्यांनीं असा खुलासा केला कीं, ही परिषद आम्ही शक्य तितकी लवकर बोलावू. पण लवकर म्हणजे केव्हां ? नक्की तारीख व महिना तर ते सांगू शकलेच नाहींत. परंतु सायमन कमिशनाचा व व्हिटले कमिशनाचा रिपोर्ट तयार होऊन तो प्रसिध्द झाला व प्रांतिक सरकार व हिंदुस्थानसरकार यांचें त्याविषयीं मत काय पडतें तें मंत्रिमंडळाला कळले म्हणजे मग कॉन्फरन्स बोलावणार, तत्पूर्वी नाहीं, असेंच त्यांच्या भाषणावरून अनुमान निघतें. पण सायमन कमिशनाच्या रिपोर्टासाठीं थांबण्याची आतां जरूरी काय हेंच आह्मांस कळत नाहीं. सरकारी मत ह्मणून परिषदेपुढें कांहीं मांडलें जाणार नाहीं, तुम्ही तेथें बसा, तुम्हाला जें योग्य वाटेल तें मांडा, तुम्हाला पूर्ण मुभा आहे, असें एकीकडे म्हणावयाचें; आणि त्याच वेळीं माहितीसाठीं म्हणून सायमन कमिशनाचा रिपोर्ट व त्यावरील सरकारी मत आमच्याजवळ असलें पाहिजे असेंहि सांगावयाचें ! यांत दुटप्पीपणा दिसून येतो. 'सरकारी सवाल' म्हणून जर तुम्ही कोणतीहि सूचना स्वतः परिषदेपुढे मांडणार नाहीं तर तुम्हाला त्या रिपोर्टाची इतकी आवश्यकता कां वाटावी व सायमनसाहेबांना तरी रिपोर्ट लिहिण्याची एवढी तसदी कां देण्यांत यावी ?

तेंहि असो. पण या राऊंड टेबल कॉन्फरन्सला प्रतिनिधी कसे निवडले जाणार याचा तरी कांहीं खुलासा व्हावयास पाहिजे होता. पण तोहि खुलासा करण्यांत आला नाहीं. अद्यापि आमचा विचार ठरला नाहीं असें मोघम सांगण्यांत आलें ! परंतु निरनिराळ्या राजकीय संस्थांनीं आपले प्रतिनिधी स्वतः निवडून द्यावयाचे का व्हाइसरॉयांनीं त्यांची नेमणूक करावयाची हा तत्त्वाचा प्रश्न असल्यानें तेवढा तरी खुलासा भारतमंत्र्यांनीं करावयास हवा होता. राजकीय संस्थांना आपले प्रतिनिधी पाठविण्यास संधि मिळेल असल्या मोघम विधनावरून हिंदी लोकांनीं काय समजावयाचें ? अर्थातच परिषद केव्हां बोलावणार याचा जसा निश्चित जबाब या भाषणांत नाहीं, त्याचप्रमाणें प्रतिनिधींची निवड कोणत्या पध्दतीनें व्हावयाची याचाहि उलगडा या भाषणांत नाहीं.



रा. सा. हरविलास सारदा (पृ. ४०१)



प्रि. गो. स. आपटे (उज्जयिनी)
(पृ. ४६०)



प्रि. रँ. ग. स. महाजनी (पृ. ४८१)



मजूर कमिशनचे अध्यक्ष मि. व्हिटले
(पृ. ४८७)

शेवटचा व सर्वांत खरा जिव्हाळ्याचा प्रश्न असा कीं,या परिषदेंत 'डोमीनियन स्टेटस' आतांच द्यावें असें ठरलें तर लष्कर-आरमारसुद्धां सर्वच अधिकार हिंदुस्थान-सरकारकडे सोपवून देणार का 'हातचे राखले' म्हणून हे अधिकार आपल्याकडे ठेवून घेणार? हा मुद्दा तर वेजवुड बेन यांनीं अगदींच टाळला. त्यांनीं त्याचा उल्लेख देखील केला नाहीं. तरी पण मूळ ठराव मांडणारे मि. फेनर ब्रॉकवे यांनीं आपल्या भाषणांत त्याचें दिग्दर्शन केलेंच होतें. त्यांचें मत असें कीं, आजच कांहीं लष्कर-आरमारसुद्धां सगळे हक्क देतां येत नाहींत; परंतु डोमीनियन स्टेटस देणार असा स्पष्ट उल्लेख आक्टांतच करावा आणि पुनः कमिशन नेमणें, चौकशी करणें वगैरे भानगडी शिल्लक न ठेवतां नव्या आक्टांतच असा कालक्रम ठरवून द्यावा कीं, त्या वेळापत्रकाप्रमाणें आपोआपच एकेक पायरी चढत चढत 'डोमीनियन स्टेटस'चे ध्येय गांठतां येईल. फेनर ब्रॉकवे यांच्या भाषणांतील या सूचनेविषयीं भारतमंत्री कांहींच बोलले नाहींत. अर्थातच त्यांनीं त्याला मूकसंमति दिली असें मानण्यास हरकत नाहीं! व हें अनुमान जर खरे तर डोमीनियन स्टेटस पूर्णपणें केव्हां पदरांत पडावयाचें ही मुख्य महत्त्वाची गोष्टच संशयास्पद राहिली.

सारांश, भारतमंत्री यांनीं हिंदुस्थानांतील लोकांच्या सगळ्या आक्षेपांना उत्तर देऊन अनुकूल वातावरण निर्माण करण्यासाठीं म्हणून जरी एवढा खटाटोप केला तरी त्यांत आपली सगळी मूठ उघडी न करितां ती अर्धवट झांकलेली ठेवलीच. पण त्याशिवाय राजकीय कैद्यांची बंधमुक्तता व नवे खटले न करणें या संबंधाचें आश्वासन देण्याची जबाबदारी त्यांनीं व्हाइसरॉयांवर टाकली आहे. आतां येत्या २३ तारखेस व्हाइसरॉय आणि हिंदी पुढारी पं. मोतीलाल, म. गांधी वगैरेंची मुलाखत होणार आहे. त्या वेळीं व्हाइसरॉय तरी या शंकेचें निरसन करतात का तेहि भारतमंत्र्याप्रमाणेंच अर्धी मूठ झांकलेलीच ठेवतात पाहावें. राजकीय कैद्यांची बंधमुक्तता, केवळ मतवैचित्र्यावरून खटले न करणें, परिषदेकरितां हिंदी प्रतिनिधींची निवड करण्याची हिंदी राजकीय संस्थांनाच मुभा देणें आणि त्या परिषदेंत सायमन कमिशनाच्या रिपोर्टांतील चतकोर स्वराज्याची चर्चा न करतां संपूर्ण डोमीनियन स्टेटसची योजना ठरविणे व ती पार्लमेंटमध्यें पास करून घेऊन ताबडतोब अंमलात आणण्याची तजवीज करणें इतक्या मुद्द्यांविषयीं व्हाइसरॉय जर म. गांधी व पं. नेहरू यांची खात्री पटवूं शकतील तर त्या पुढाऱ्यांना राष्ट्रीय सभेच्या बैठकीच्या आधीं सर्वांना कांहीं निश्चित माहिती सांगतां येईल व त्या धोरणानें कॉंग्रेसकडून राऊंड टेबल कॉन्फरन्सला संमति घेतां येईल. पण व्हाइसरॉयांचें भाषण जर भारतमंत्र्यांच्या भाषणाप्रमाणेंच अर्धवट गुळमुळीत होईल तर कॉंग्रेसचें तारूं सहकारितेकडे न झुकतां असहकारितेकडे झुकल्यास त्याचा दोष हिंदी लोकांकडे न येतां सरकाराकडेच येईल.

# व्हिटले कमिशन व मुंबईसरकार

व्हिटले कमिशनचें आगमन हिंदुस्थानांत होऊन आज जवळ जवळ २-२॥ महिने झाले. व्हिटले कमिशन अहमदाबाद, जळगांव, नागपूर, कानपूर, दिल्ली येथील आपला दौरा आटोपून परत मुंबईस आलें. मजूरसंघांपैकीं ज्यांचें पुढारीपण रणदिवे व देशपांडे यांचेकडे आहे अशा संघांनीं बहिष्कार पुकारला असला तरी इतर मजूरसंघांनीं व्हिटले कमिशनपुढें आपल्या तक्रारी मांडून तक्रारींची दाद लावून घेण्याचें ठरविलें. गिरणीच्या मालकांनीं व इतर कारखानदारांनींहि आपली कैफीयत त्यापुढें सादर केली. मालक व मजूर यांचें नातेंच सेव्यसेवकाचें असल्यामुळें या दोघांच्याहि कैफीयतींत थोडीफार अतिशयोक्ति असूं शकेल. त्यांज प्रमाणें मुंबईसरकारनेंहि आपली कैफीयत म्हणून एक २६० पानांचें छापील चोपडें पाठविलें आहे. या चोपड्यांत मुंबई, अहमदाबाद, सोलापूर, जळगांव येथील गिरण्यांतून व इतर कारखान्यांतून कामें करणाऱ्या मजूर-वर्गासंबंधानें सरकारी दृष्टीने माहिती दिली आहे. व्हिटले कमिशनपुढें शेतीच्या धंद्यांत काम करणाऱ्या मजुरांच्या स्थितीसंबंधाचा प्रश्न नसल्यामुळें त्यासंबंधानें एक अक्षरदेखील या चोपड्यांत सांपडणार नाहीं. केवळ मजूर म्हणजे कारखान्यांत यंत्राजवळ काम करणारे लोक अशाच दृष्टीनें ही माहिती संकलित केली गेली आहे. रेल्वेच्या कारखान्यांतील मजूरवर्गासंबंधानेंहि या चोपड्यांत माहिती नाहीं. मुंबई इलाख्यांत खनिज संपत्ति फारच कमी, त्यामुळें खाणींत काम करणारा मजूरवर्ग मुंबई इलाख्यांत फारच थोडा, त्या संबंधानेंहि विशेषशी माहिती यांत दिलेली नाहीं. तथापि मुंबई, अहमदाबाद, सोलापूर येथील कापडाच्या गिरण्यांतून काम

करणारे मजूर, गोदींत व आगबोटीवर काम करणारे खलाशी व इतर मजूर, छापखाने, कागदाच्या गिरण्या, जिन फॅक्टरीज,म्युनिसिपालिटया इ.संस्थांमध्यें काम करणारे मजूर यासंबंधानें जी माहिती देण्यांत आली आहे तिच्यापैकीं महत्त्वाचा भाग या लेखमालेंत देण्याचें योजिलें आहे.

### मजुरांचें उगमस्थान

कारखान्यांतून व गिरण्यांतून काम करणारे मजूर शहरचे रहिवासी नसतात. ते आजूबाजूच्या खेड्यांतून व परप्रांतांतून पोटाकरितां शहरांत येऊन राहतात. खेडेगांवांतून लोक किती येतात हें समजण्याचें खात्रीलायक साधन नाहीं. पण मुंबई शहरांत जे कायमचे वस्ती करून राहिले त्या लोकांचा जन्म कोंठ झाला हे पाहूं गेलें तर असें आढळतें कीं, मुंबई शहरांत जन्मलेले असे लोक शेंकडा १६ च आढळतात! मुंबई शहरांतील गिरण्यांमधील मजूरांमध्यें शेंकडा ६६ मजूर कोंकण प्रांतांतून येतात ! याखेरीज पुणे, सातारा, काठेवाड व सं. प्रांत यांतूनहि मोलमजुरी करणारे पुष्कळ लोक इकडे येतात. अहमदाबादच्या गिरण्यांतून काम करणारे मजूर राजपुताना, मारवाड, काठेवाड, बडोदें या ठिकाणांहून येतात.

खेडेगांवाची स्वच्छ व मुबलक हवा सोडून देऊन शहरांतील गलिच्छ वस्तींत व कोंदट हवेंत राहण्याचें मुख्य कारण म्हटले म्हणजे उदरनिर्वाहाच्या साधनांची वाण हेंच होय. खेडेगांवातील मालकीच्या जमिनीचें उत्पन्न इतकें कमी कीं, अविभक्त कुटुंबांतील लहानथोर सर्वच माणसांना दोन वेळां पोटभर अन्न मिळण्याची मारामार! मोलमजुरीला खेडेगांवांत मोल फार कमी. शहरांत मोलमजुरी केली तर स्वतःचें पोट भागून आपल्या नातेवाइकांना चार पैसे पाठवितां येतील ही आशा मजुरी करणाराला असते. तसेंच खेड्यांतील सावकाराचा व्याजाचा बडगा दरदिवशीं पाठींत बसतच असतो. तो चुकविण्याकरितां, निदान त्यांतून अंशतः मुक्त होण्याकरितां, बाप आपल्या १५-२० वर्षांच्या मुलाला गांवच्या ओळखीच्या माणसाबरोबर शहरांत पाठवितो.याशिवाय दुष्काळ हे एक कारण आहेच.पण खेडेगांवांतून आलेले लोक मजूरवर्गाचा पेशा पत्करून कायमचेच शहरांत राहतात असें नाहीं. त्यांचा खेड्याचा संबंध कायम असतो.

### अविभक्त कौटुंबिक पद्धति

इंग्लंडांतल्याप्रमाणें शहरांतून कायमची वस्ती करून राहणारा मजूरवर्ग फारच थोडा. कायमची वस्ती करून राहणाऱ्या मजुरांचें प्रमाण काय पडेल हें सांगतां येत नाहीं, पण हें प्रमाण शोधून काढण्याचें ठोकळ साधन असें आहे कीं,पुरुष वस्तीच्या प्रमाणांशी स्त्री वर्गाच्या वस्तीचें प्रमाण काय पडतें तें पाहाणें. मुंबई शहरांत१००० पुरुष वस्तीला ५२५ स्त्रिया हें प्रमाण आढळतें. हेंच प्रमाण मुंबई इलाख्याशीं ताडून पाहतां १०००:९१९ असें आढळतें. पुणें, अहमदनगर, नाशिक या भागांतून येणारे शेंकडा७५मजूर आपल्या बायकामुलांना बरोबर घेऊन येतात.अहमदाबादेस स्त्रीपुरुषांच्या लोकसंख्येचें हें प्रमाण १८८१ सालीं १०००:१०१० असें होतें तें १९२१ सालीं १०००:७६५ वर आलें आहे! हिंदुस्थानची वस्ती मुख्यतः खेड्यांतून असते. त्यामुळे मजूरवर्गाला आपल्या गांवचा ओढा असतो. पण सरकारच्या मतें कायमचा मजुरीपेशा पत्करून राहण्याच्या मार्गांत आड येणारी आणखी एक धोंड म्हणजे अविभक्त कौटुंबिक पद्धति ही होय. कुटुंबांतील १-२ कर्ती माणसें शहरांत मोलमजुरी करितात व गांवच्या वृद्ध माणसांना व पोरा बाळांना पैसे पुरवितात. यामुळे त्यांचें चित्त आपल्या कामावर नसतें. पण मुंबईतील कापडाच्या गिरण्यांतील मजूरवर्ग बऱ्याच अंशीं कायमचा टिकणारा आहे.

### बेकारी

इंग्लंड, अमेरिका या देशांतील बेकारीची नोंद घेणाऱ्या कचेरीप्रमाणें हिंदुस्थानांत बेकारीची नोंद ठेवणारी सरकारी अगर खासगी संस्था अस्तित्वांत नाहीं. तसेंच मजूरसंघाची संघटनाहि असावी तितकी जोरांत नाहीं, यामुळे बेकार मजूर किती फिरत असतात याची खात्रीलायक नोंद मिळत नाहीं. फॉसेट कमिटीच्या रिपोर्टावरून असें दिसतें कीं, गतवर्षी जो संप पुकारण्यांत आला तो १३ हजार मजूर बेकार होते म्हणून.जेथे मुंबईच्या गिरण्यांत १९२१ सालीं १, ४६,३०० मजूर काम करीत होते त्याचठिकाणीं १९२७ सालीं लोकसंख्या वाढली तरी १४५००५ च मजूर काम करीत होते.१९२७ सालीं अगोदरच १३ हजार मजूर बेकार झाले होते व नवीन यंत्र सुधारणा,व एका विणकरावर तीन तीन चार चार साचे चालविण्याची जबाबदारी मालकांनीं टाकल्यामुळें आणखी १३ हजार मजूर बेकार वर्गांत समाविष्ट होण्याचा संभव उत्पन्न झाला. पण इकडील कारखान्यांत बेकारीची झळ इतकीशी लागत नाहीं. कारण साधारपणें मजूर वर्गातील हजेरींत गैरहजेरीचें प्रमाणहि तितकेंच पडतें. मुंबईच्या गिरण्यांतून मजुरी करणाऱ्या वर्गात हें प्रमाण शेंकडा ८'२६ असें असतें. स्त्रीमजूर वर्गामध्यें शेंकडा ११'२६ असें पडतें. अहमदाबादच्या गिरण्यांतून हें प्रमाण शेंकडा ७·९० असें पडतें. सोलापूरच्या गिरण्यांत काम करणाऱ्या

मजूर वर्गाची भूक थोडी फार का होईना पण शेतीच्या जोंधळ्याबर भागत असल्यामुळें, या मजूर वर्गांत गैरहजेरीचें प्रमाण शेंकडा १२·१९ पडतें. एकाच गिरणींत टिकून राहिलेले मजूर किती आहेत हें पाहूं लागलें तर अशा पांच गिरण्या नाहींत कीं, ज्यांमध्यें ५-१० वर्षे टिकून राहिलेले १० मजूर सांपडतील ! यामुळें गैरहजेरींत अगर बदलींत बेकार मजुरांना महिन्यांतून ५-१० दिवस काम मिळूं शकतें व त्यांना कशी तरी आपली गुजराण करतां येते.

## बेकारीवर एक उपाय

बेकार होणाऱ्या मजुरांचा प्रश्न सोडविण्याकरितां म्हणून फॉसेट कमिटीनें अशी एक सूचना केली आहे कीं, "मालक व मजूर या दोघांनीं सहकार्य करून, 'बेकार मजूर देणगी फंड' असा एक फंड काढावा व त्या फंडाला मालकांनीं प्रत्येक मजुरामागें दर महिना १ आणा याप्रमाणें देणगी द्यावी. त्याचप्रमाणें मजुरांनींहि दर महिना १ आण्याप्रमाणें देणगी द्यावी. अशा फंडाची रक्कम दर वर्षी २ लक्ष २५ हजार रुपये जमेल. अर्ध्या आण्याप्रमाणें वर्गणी अगर देणगी दिल्यास ही रक्कम याच्या अर्धी होईल. या फंडांतून बेकार होणाऱ्या मजुराला चारसहा आठवड्याची मजुरी जादा देणगी म्हणून देण्यांत यावी. व या फंडाची व्यवस्था मजूर व मालक यांच्या संयुक्त कमिटीकडे असावी."

## मजूरवर्गाची राहणी

मुंबईतील गिरण्यांपैकीं फक्त २८ गिरण्यांच्या मालकांनीं मजूरवर्गाची राहण्याची व्यवस्था केली आहे. यांपैकीं ७ गिरण्या रामोशी, चपराशी यांचीच फक्त व्यवस्था करतात. २२ गिरण्यांच्या मालकांनीं मजुरांना राहण्याच्या चाळी बांधल्या आहेत. व या २२ गिरण्यांत काम करणाऱ्या ६०७२० मजुरांपैकीं फक्त १२१४९ मजुरांची (म्हणजे शेंकडा २० या प्रमाणांत) राहण्याची व्यवस्था केली आहे. पण मुंबईतील कापडाच्या गिरण्यांत काम करणाऱ्या मजुरांच्या राहण्याच्या सोईचा प्रश्न विचारांत घेतला तर जेमतेम शेंकडा ८ मजुरांची राहण्याची व्यवस्था गिरणीवाले करतात ! बाकीच्या शेंकडा ९२ मजुरांना उन्हाळ्याच्या व थंडीच्या दिवसांत रस्त्याच्या बाजूचा पायमार्ग ही रात्रीच्या वेळची निवाऱ्याची जागा असें मानून राहावें लागतें ! पण राहण्याची व्यवस्था जी केली जाते ती तरी कशी असते हें पाहिलें तर कोणालाहि कींव आल्याशिवाय राहणार नाहीं. शेंकडा ९७ मजुरांना एकच खोली असते व या खोलीचें क्षेत्रफळ १०३ चौरस फूट असते. म्हणजे प्रत्येक माणसाच्या वांटणीला जेमतेम २४ चौरस फूट जागा येते ! अहमदाबाद व सोलापूर येथें हें प्रमाण ४७ व ३६ चौरस फूट असें आढळतें. या जागेचें भाडें साधारणपणें Economic rent च्या ५०--६० टक्के असतें. भाड्याच्या दृष्टीनें जागा महाग असते अशांतला भाग नाहीं. तरी पण इतकें भाडे देण्याचीहि ताकद मजूरवर्गांत नाहीं. त्याचप्रमाणें एकानें आपल्या नांवावर जागा घ्यावयाची व त्याच जागेंत आणखी दोघांचौघांना भाड्यानें घ्यावयाचें ही पद्धतीहि थोडीफार प्रचारांत आहे. याचीं कारणें अनेक असूं शकतील. जागा मालकाच्या परवानगीशिवाय भाड्यानें देण्यांत पैसे वांचविण्याचा उद्देश नसेल असें नाहीं. तरी पण आपल्याच गांवचा जातवाला रस्त्यावर पडलेला पाहून 'बाबा रे माझ्या खोलींत ये.आम्ही चार राहतों तेथें तूं पांचवा राहा' अशी भूतदयाहि येणें स्वाभाविक आहे. पण सरकारतर्फे १९२२ सालीं एका लेडी डॉक्टरणीनें मजूरवर्गाच्या राहणीची पाहणी केली व आपला रिपोर्ट सादर केला. तो रिपोर्ट वाचून कोणच्याहि अंगावर शहारे आल्यावांचून राहणार नाहींत. आपल्या रिपोर्टांत या डॉक्टरीणबाई म्हणतात, १५ × १२ अशा दुसऱ्या मजल्यावरच्या एका चाळीच्या खोलींत तर ६ कुटुंब राहत असलेलीं आढळलीं. कारण या खोलींत ६ चुली अंतराअंतरानें मांडल्या होत्या. चौकशी करतां असें आढळलें कीं, मोठीं माणसें व मुलें मिळून या एका खोलींत ३० मनुष्यप्राणी राहात होते. तसेंच १९२२ मध्यें नेमलेल्या इंडस्ट्रियल डिस्प्यूट कमिटीच्या रिपोर्टांत असेंहि नमूद केलेलें आढळतें कीं, ज्या जागेचें भाडें मालकाला ३ रुपये पोंचतें.त्याच जागेच्या भाडेकऱ्यानें त्याच जागेंत आणखी भाडोत्री ठेवून १० रुपये कमाई केली ! दोनहि टोंकांचीं दोन उदाहरणें देण्याचा उद्देश इतकाच कीं, मजूरवर्गाची राहणी किती खालावली आहे हें निदर्शनास यावें. म्युनिसिपालिटी व इंप्रूव्हमेंट ट्रस्टच्या चाळी बऱ्याच चांगल्या आहेत असें म्हणतां येईल. डेव्हलपमेंटच्या १६५२४ खोल्यांपैकीं फक्त ६८०५ खोल्याच भाड्यानें गेल्या आहेत. बाकीच्या खोल्या रिकाम्या राहाण्याचें कारण मजुरांना या खोल्यांचें भाडें द्यावयास परवडत नाहीं असेंच कोणीहि अनुमान काढील यांत शंका नाहीं.

## मजुरांचें आरोग्य

मजूर वर्गाच्या राहणीवरून त्यांचें आरोग्य कसें असेल याची कल्पना कोणालाहि करतां येईल. गिरण्यांच्या सभोंवतालच्या भागांत मलेरियानें आपलें कायमचे ठाणें दिलेलें आहे. वरळी व परेल

या भागांत तर मलेरियाचें प्रमाण वाढतें आहे असें खुद्द मेजर कॉव्हेल यांनींच म्हटलें आहे. केवळ कारखान्यांतून काम करणाऱ्या मजूर वर्गामध्यें अर्भकांच्या जनन–मृत्यूची नोंद स्वतंत्र रीतीनें केलेली नाहीं. तरी पण अर्भकांच्या मृत्यूचे दर हजारीं खालील आकडे पाहून अंगावर शहारे आल्यावांचून राहाणार नाहींत.

| सन | मुंबई इलाखा शहर | अहमदाबाद | सोलापूर | कराची |
|---|---|---|---|---|
| १९२० | १८३ ५५५ | ३६० | २८१ | २५१ |
| १९२५ | १६२ ३५९ | ३२२ | २३२ | २२२ |
| १९२७ | १६१ ३१९ | २८९ | १९९ | २११ |

पण या शिवाय मेजर कॉव्हेल यांनीं १९२८ सालीं जी पाहाणी केली त्यावरून असें संशोधन केलें कीं, जितकी दाट वस्ती व कोंदट राहणी तितकी मृत्यूसंख्या अधिक आणि मजूर लोकांची राहणी अशी कीं, जेमतेम साडेतीन हात देह जमिनीवर रात्रीच्या वेळीं टाकतां येईल. एका लहानशा खोलींत बोलणें, रडणें, जेवणें, खाणें, झोंपणें अंगधुणें, सर्व कांहीं तेथेंच. अशा स्थितींत मोकळी हवा कशी मिळणार ? ज्यांच्या कुटुंबाला राहण्याला एकच खोली आहे व ज्यांच्या मुलांचा जन्म तेथेंच होतो व तीं तेथेंच वाढतात अशीं कुटुंबें शेंकडा ५३ असतात व अशा अर्भकांपैकीं शेंकडा ८३ लवकरच चारदोन महिन्यांत मृत्युमुखीं पडतात ! पण याशिवाय अर्भकांच्या मृत्यूचें आणखी एक कारण म्हणजे लहान बाळांना अफू घालण्याची संवय हें होय. मजूरवर्गामध्ये अफू घालण्याचें हें व्यसन परमावधीला गेलें आहे. आईनें मुलाला अंगावरचें दूध पाजून व वर एक अफूची गोळी देऊन एका पांघरुणाखालीं निजवून ठेवून घरीं जावें व दिवसभर श्रम करून तान्ह्या मुलाचें दर्शन घेण्याकरितां जीव टाकीत घरीं जावें अशी स्थिति. कारण दिवसभर काबाडकष्ट केल्याशिवाय लहान कच्च्याबच्च्या पोरांच्या पोटांत तरी ती काय घालणार? आणि याकरितां मुलाला दूर करून कामावर जावें या बुद्धीनें कांहीं तरी सोय केली पाहिजे. आणि ती सोय म्हणजे ही अफूची गुटिका! मजूरवर्गातील या शेंकडा ९८ मुलांना ही अफूची संवय लावलेली असते. अफूनें दृष्टि बारीक व मेंदु क्षीण होतो व याचा परिणाम शरीरावर होतो. २५ ते ३० वर्षांच्या जवानींतल्या मजुरांचें वजन जेमतेम १०५ पौंड असेल झालें. सूत कातण्याच्या खात्यांतील मजुरांचें वजन १०० कधींच नसावयाचें. रीळ व बाबिनी भरणाऱ्या बायकांचें वजन तर ९०-९५ म्हणजे शिकस्त ! अहमदाबाद व सोलापूर येथील मजुरांचें वजन ५–७ पौंडांनीं अधिक असतें झालें. मुंबईचे पुष्कळसे मजूर शाकाहारी असतात. कोंकणांतील मजुरांचें मुख्य अन्न भात हेंच होय. घाटी लोक ज्वारी व बाजरी खातात. मजुरांच्या खर्चापैकीं अर्धा—अधिक खर्च जेवणखाण यांवरच होतो. दुधाच्या वांटणीला २ टक्के मजुरी येते ! अहमदाबाद येथील मजूर ज्वारी, गहूं खातात, तुपावर ६ टक्के मजुरी खर्च करतात. सोलापूर येथील मजूर १७ टक्के मजुरी ज्वारीवर खर्च करतात. २½ टक्के तुपावर खर्च होतो. मजूरवर्गांत दारूचें व माडीचें व्यसन फैलावत चाललें आहे.

## औषधोपचाराची सोय

मुंबई म्युनिसिपालिटीनें अलीकडे औषधोपचाराची मोफत सोय थोडीफार केली आहे. १९२७ सालीं २९१० लोकांना औषधोपचार करण्यांत आला. १३३० मजूर स्त्रियांचीं बाळंतपणेंहि करण्यांत आलीं. अर्भकांना दूध चांगलें मिळावें याकरितां म्युनिसिपालिटीनें दुधाची व्यवस्था केली आहे. त्यांतून २१२६३ शेर दूध वांटण्यांत आलें. तसेंच इन्फंट वेलफेअर सोसायटीमार्फत ११२६ बाळंतपणें सोसायटीच्या परिचारिकांमार्फत करण्यांत आलीं व २४४३० शेर दूध वांटण्यांत आलें. मुंबईंत ६८ गिरण्यांनीं औषधाची सोय केली आहे. यांपैकीं ६६ गिरण्यांमध्यें औषध मोफत दिलें जातें. दररोज किती रोगी येतात याची मोजदाद १३ गिरण्यांनीं पाठविली नाहीं, पण साधारणपणें दररोज २००० माणसें औषधें घेऊन जातात. अहमदाबादेस १० गिरण्यांनीं औषधाची सोय केलेली नाहीं. अहमदाबादच्या २५ गिरण्यांत साधारणपणें ८५० लोक औषधें घेतात. सोलापूरला हें प्रमाण शें. ३५० पडतें.

## प्रसूतिकालाच्या सवलती

स्त्री मजुरांना प्रसूतीच्या पूर्वी ३-४ आठवडे व नंतर मजुरी घरबसल्या देण्याची पद्धति मुंबई, अहमदाबाद व सोलापूर या सर्व ठिकाणीं मिळून २३ गिरण्यांतून अमलांत होती. कांहीं गिरण्यांतून ६ आठवड्यांची मजुरीहि दिली जात असे; पण सवलती देण्यासंबंधींचें बंधन मात्र गेल्या वर्षापर्यंत घातलें गेलें नव्हतें. गेल्या वर्षी मुंबईचे आमदार आसवले यांनीं एक खासगी बिल आणून बरा--वाईट एक कायदा करून घेतला. त्या कायद्याची फलश्रुति अशीः---प्रसूत होण्याच्या पूर्वी सुमारें ३ आठवडेपर्यंत जितके दिवस बाई कामावर येणार नाहीं तितके दिवस व प्रसूतीनंतर ४ आठवडेपर्यंत दररोज ८ आण्यांप्रमाणें मजुरी मिळावी. पण अशी बाई ६ महिने तरी त्या कारखान्यांत मजुरी करीत असली पाहिजे, व या सवलतीचा फायदा घ्यावयाचा असेल तर प्रसूत होण्याच्या पूर्वी निदान १ महिना तरी मालकाला आपल्या प्रसूतीसंबंधानें नोटीस दिली गेली पाहिजे.

# तुरुंगांतील कैद्यांना कसें वागवावें ?

( दि. ब. पी. केशव पिले )

आजमितीला हिंदुस्थानांत सर्वांच्या तोंडीं कोणता एक विषय असेल तर तो कैद्यांना कसें वागवावें हा होय. या संबंधानें वरिष्ठ सरकारच्या सूचनेवरून कित्येक प्रांतांतून चौकशी कमिट्या नेमल्या जाऊन त्यांच्या सूचना बाहेर पडत आहेत. याच वेळीं मद्रास इलाख्यांतील एक सुप्रसिद्ध पुढारी दि. ब. पी. केशव पिले यांनीं ' हिंदु ' पत्रांत जो एक मननीय लेख लिहिला आहे, त्याचा सारांश मराठी वाचकांकरितां देण्यांत येत आहे. दि. ब. केशव पिले लिहितात—

कैदी तुरुंगांत आला कीं, त्याचें व्यक्तित्व निर्दयपणें दडपून टाकण्यांत येतें. कोणतीहि हालचाल करावयाची झाली तरी ती त्यानें वॉर्डरच्या देखरेखीखालींच केली पाहिजे. शिक्षा झाल्यावेळेपासून तों मुक्त होईपर्यंत तो सतत वॉर्डरच्या नजरेखालींच असला पाहिजे. रविवारची देवाची प्रार्थना करावयाची झाली तरीदेखील त्यानें वॉर्डरच्या नजरबंदींतच ती केली पाहिजे! सारांश, कैद्यानें तुरुंगांत पाऊल टाकलें कीं, त्याची माणुसकी नष्ट होऊन तो हलतें बोलतें यंत्र बनतो !

एका कैद्यानें वॉर्डर होऊन दुसऱ्या कैद्यांवर देखरेख करण्याची आचरट पद्धति तर सुधारलेल्या जगांत हिंदुस्थानाखेरीज दुसरीकडे कोठेंहि नाहीं ! त्याचप्रमाणें राजकीय कैदी व इतर कैदी यांच्यांत या देशांत बिलकुल भेद मानण्यांत येत नाहीं, हाहि एक मोठा दोष होय. अलीकडे कैद्यांच्या संपामुळें व अन्नत्यागाच्या चळवळीमुळें सरकारचें लक्ष या प्रश्नाकडे वेधूं लागलें आहे. या वेळीं पुढील माहितीचा व सूचनांचा बराच उपयोग होईल.

'राजकीय कैदी ' म्हणजे काय याची आम्हास कल्पनाच येत नाहीं असें येथील सरकार म्हणतें! याकरितां त्यांना हॅव्हेलॉक एलिसचें पुस्तक वाचण्याची मी शिफारस करतों. हॅव्हेलॉक एलिस लिहितो—राजकीय कैद्यांना कैदी असें म्हणणें हेंच चूक आहे. एक प्रकारचा तो बहुमतवाल्यांचा अल्पमतवाल्यांवर जुलूम असतो. राजकीय कैदी हा भावी काळांतला संत किंवा सुधारक आणि आजचा तो हुतात्मा असतो. अशा कैद्यांत तुम्हास एखादा येशू ख्रिस्तहि आढळेल! याकरितां राजकीय कैदी व इतर कैदी हे समसमान लेखणें चुकीचें आहे. सरकारला आपली सत्ता टिकावी म्हणून अशा इसमास कैदेंत टाकणें आवश्यक वाटेल.परंतु जनतेला त्याची खरी योग्यता कळते आणि म्हणूनच अशा राजकीय कैद्याची सरकार जितकी अधिक छळणूक करील तितका जनतेकडून त्यास अधिक मान मिळतो.

इंग्लंड, स्कॉटलंड, आयर्लंड इत्यादि देशांतल्यापेक्षां हिंदुस्थानांत गुन्हेगारीचे मान कमी आहे. तरी पण येथें इंग्लंडांतल्यासारखी कैद्यांची वर्गवारीची पद्धति नाहीं. सक्तमजुरीची शिक्षा व साधी शिक्षा असा फरक येथें आहे; पण तो गुन्ह्याच्या स्वरूपावर अवलंबून असतो; गुन्हेगाराच्या दर्जावर किंवा शिक्षणावर अवलंबून नसतो. आणि शिक्षा देणाऱ्या मॅजिस्ट्रेटांतहि इतका विवेक दर्शविण्याच्या लायकीचीं माणसें थोडींच असतात.

## इंग्लंडांतील कैद्यांची वर्गवारी

इंग्लंडांतील न्यायाधीश गुन्ह्याचें स्वरूप व आरोपींचें शील यांचा विचार करून त्यास पहिल्या किंवा दुसऱ्या वर्गांत दाखल करण्याविषयीं हुकूम देऊं शकतो.

इंग्लडांतील पहिल्या वर्गांतील कैद्यांना पुढील सवलती मिळतातः—

१ पहिल्या वर्गांतील कैद्यांस इतरांपासून वेगळ्या खोलींत ठेवण्यांत येतें.

२ व्हिजिटिंग कमिटीच्या परवानगीनें व स्वतःच्या खर्चानें त्यास आपल्या खोलींत जरूरीचें तें सामान अंथरूणपांघरूण घेतां येतें.

३ खोलीची झाडलोट करण्याला व बिछाना घालण्याला त्याला पगार देऊन नोकर ठेवतां येतो.

४ त्याला आपल्या खर्चानें पुस्तकें व वर्तमानपत्रें घेतां येतात व आपल्या खर्चानें त्याला मितमद्यपानहि करतां येतें! मितमद्यपान म्हणजे एका दिवसांत ½ ते १ पिंट !

५ त्याला जर कांहीं कारागिरीचें काम करावयाचें असलें तर हत्यारें वापरतां येतात व तो जें कारागिरीचें काम करील त्याचें उत्पन्न त्याला स्वतःला मिळतें.

६ आप्तेष्टांना भेटण्यास पंधरा दिवसांतून एकदां त्याला परवानगी मिळते. त्याचप्रमाणें पत्रव्यवहारहि पंधरवड्यांतून एकदां करतां येतो.

दुसऱ्या वर्गांतील कैद्यांना मिळणाऱ्या सवलतीः—

१ दुसऱ्या वर्गांतील कैद्यांना शक्य असल्यास वेगळी खोली मिळते. पण वेगळी खोली दिलीच पाहिजे असा नियम नाहीं.

२ महिन्यांतून एकदां पत्रव्यवहार करतां येतो किंवा आप्तेष्टांची भेट घेतां येते.

३ तुरुंगांतील कारखान्यांत काम करून शिक्षेची सूट किंवा रोकड रक्कम मिळवितां येते.

इतर कैद्यांमध्येंहि नवे गुन्हेगार व निर्ढावलेले कोडगे गुन्हेगार असा भेद केलेला असतो आणि १८९७-९८ सालापासून नव्या गुन्हेगारांना अट्टल बदमाषांपासून वेगळें राखण्यांत येते.

## हिंदुस्थानांतील पद्धतींतील दोष

हिंदुस्थानांतहि अलीकडे कैद्याला 'खास' वर्गांत दाखल करण्याचा हुकूम कोर्टाला देतां येतो. परंतु साधारणतः साध्या कैदेच्या बंदिवानासच ही सवलत मिळूं शकते. एका गुन्हेगारानें दुसऱ्या गुन्हेगारावर हुकमत चालवूं नये, हें तत्त्व इतर सर्वत्र पाळलें जातें; पण हिंदुस्थानांत जो अट्टल बदमाष तोच वॉर्डर होऊन इतरांवर सत्ता गाजवितो! त्याचप्रमाणें एकच इसम जेल सुपरिंटेंडेंट व मेडिकल ऑफिसर असल्यामुळें तिकडूनहि कैद्याचे हाल होतात.

अलीकडे कांहीं ठिकाणीं तरुण गुन्हेगारांकरितां बोर्स्टल-पद्धति चालू केली आहे आणि कोडगे गुन्हेगार व पहिल्या खेपेचे गुन्हेगार यांना वेगळे ठेवण्याचीहि पद्धति सुरू झाली आहे. तरी पण इंग्लंडांतल्याप्रमाणें कैद्यांचे तीन वर्ग केल्याखेरीज खरी सुधारणा होणार नाहीं व तुरुंगांतला असंतोष, संप व अन्नत्याग यांस आळा पडणार नाहीं.

सुधारणा करण्यासंबंधीं अलीकडे मद्रास सरकारनें बंदिखान्याचा एक ' खास वर्ग ' निर्माण केला आहे. पण या वर्गांत साध्या कैदेच्या इसमांसच प्रवेश मिळतो. आणि तो देखील त्याचा गुन्हा अत्याचाराच्या स्वरूपाचा नसेल तर मिळतो. माझी सूचना अशी आहे कीं, ज्या गुन्ह्यांत नैतिक अधःपात दिसून येत नाहीं, अशा गुन्हेगाराची राहणी, शिक्षण व शील लक्षांत घेऊन त्यास खास वर्गांत दाखल करावें. त्याचप्रमाणें खेड्यापाड्यांतून जमिनीच्या किंवा इतर तंट्याबखेड्यांत आकस्मिकपणें घातापाताचे गुन्हे घडून येतात, पण मागाहून गुन्हेगारास पश्चात्ताप होतो. अशा गुन्हेगारास देखील मॅजिस्ट्रेटनें योग्य वाटल्यास ' खास वर्गांत ' दाखल करावें. एखाद्या गुन्हेगारास मॅजिस्ट्रेटने खास वर्गांत दाखल करण्याचे नाकारले तर तेवढ्यापुरतें त्यास डि. मॅजिस्ट्रेटमार्फत प्रांतिक सरकारकडे अपील करतां यावें.

खास वर्गाच्या कैद्याच्या खोलींत खुर्ची व टेबल असावें. त्याला रात्रीं १० वाजेपर्यंत वापरण्यास दिवा मिळावा. त्याला आंथरुण व पांघरुण भरपूर व स्वच्छ असावें व त्यास मच्छरदाणी वापरण्यालाहि मुभा असावी. याखेरीज आणखी अधिक सोय पाहिजे असल्यास कैद्यास आपल्या खर्चानें व सुपरिंटेंडेंटच्या परवानगीनें ती करून घेतां यावी. त्याचप्रमाणें या कैद्याकरितां वेगळे शौचकूप असावे किंवा त्यानें आपल्या खर्चानें वेगळ्या खोलींत कमोडची व्यवस्था करावी.

खास वर्गाचा विचार सोडून सर्वसामान्य कैद्यांच्या सोयींचा विचार केला तरी त्यांची शौचकूपाची व्यवस्था अत्यंत किळसवाणी असते. सहा-सहा कैद्यांना मध्यें कांहीं आडोसा नसतां दावणीप्रमाणे ओळीनें शौचास बसविण्यांत येतें! आणि प्रत्येक कैद्याला पांच मिनिटांहून अधिक वेळ देण्यांत येत नाहीं! चांगल्या निकोप प्रकृतीच्या इसमासहि पांच मिनिटें ही वेळ अगदींच अपुरी आहे. त्याचप्रमाणें सामान्य कैद्यांना नागव्या उघड्या अंगानें एकत्र स्नान करण्याचा प्रसंग येतो, त्यामुळे तर कैद्यांना माणुसकीलाच मुकावें लागतें!

बिहार व ओरिसा प्रांतांतील कैद्यांच्या वर्गीकरणाची पध्दति जास्त चांगली आहे. तेथें सक्त मजुरीची शिक्षा झालेल्या कैद्यानांहि खास वर्गांत दाखल होण्याची संधि मिळते. इतर प्रांतांतूनहि अशीच सवलत त्यांस मिळणें जरूर आहे.

कैद्यांना तुरुंगांतून कोर्टांत व कोर्टांतून तुरुंगांत नेतांना राजरस्त्यांवरून हातकड्या घालून नेणें, संगिनींचा पहारा ठेवणें, चालत नेणें वगैरे प्रकारहि गैरशिस्त असल्यानें ते बंद केले पाहिजेत. त्या योगानें सरकारविरुद्ध असंतोष वाढतो आणि कैद्याबद्दल सहानुभूति वाढून त्याला आपोआपच मोठेपणा येतो.

स्त्रियांच्यासंबधानेंहि कांहीं सूचना करणें अवश्य आहे. स्त्रीकैद्यांना एके ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेण्याचें व त्यांना कोर्टांत हजर करण्याचें काम स्त्रियांच्याकडेच असावें. पुरुष-पाहरेकऱ्यांच्या ताब्यांत त्यांना दिल्यास अनेक अनर्थ घडून येतात. आपल्या अब्रूवरील घाला टाळण्याकरितां एका स्त्रीनें आत्महत्या केल्याचें आणि एका तुरुंगांतील स्त्री तुरुंगांत गरोदर राहिल्याचें वृत्त सरकारच्या रेकॉर्डांतच नमूद आहे.

सारांश, इंग्लडांतल्याप्रमाणें कैद्यांचे तीन वर्ग करण्याची पद्धति इकडे प्रचारांत यावी. ती पद्धति इंग्लंडाच्या हवेंतच तेवढी मानवते, हिंदुस्थानच्या हवेंत मानवत नाहीं, असा कांहीं आक्षेप येऊं शकणार नाहीं असें मला वाटतें.

# शेतीकडून धंद्याकडे

( लेखक—दा. ना. शिखरे, एम. ए. पुणें. )

शेजारीं–शेजारीं राहणाऱ्या हिंदुस्थान व जपान या दोन राष्ट्रांच्या प्रगतीची तुलना फार बोधप्रद आहे. निसर्गानें आपलें सर्व वैभव हिंदुस्थानाच्या सेवेला सादर केलेलें आहे तर जपानावर सृष्टिदेवतेची वक्रदृष्टि आहे. जगांतील सर्व प्रकारच्या हवामानाचे, जमीनपाण्याचे व नद्याडोंगरांचे नमुने प्रदर्शनांतल्याप्रमाणें निसर्गानें हिंदुस्थानांत मांडले आहेत. उलट जपानाच्या कपाळीं धरणीकंपाचा शिक्का मारला आहे. सोन्याच्या व कोळशाच्या खाणी हिंदुस्थानाच्या पोटांत नांदत आहेत पण जपानमध्ये कारखान्याला अन्नपाण्याप्रमाणें आवश्यक असणाऱ्या कोळशालोखंडाची टंचाई आहे. तथापि केवळ स्वातंत्र्याचें वारें शिडांत भरलें असल्यानें जपानाचें कुजकें व फुटकें होडगेंहि उत्कर्षाचीं बंदरें झपाझपा गांठीत चाललें आहे आणि खनिज संपत्तीनें भारावलेलें हिंदुस्थानाचें प्रचंड जहाज पारतंत्र्याच्या गाळांत नांगरून पडलें आहे ते तसेंच आहे!

महायुद्धाच्या पूर्वी व नंतर हिंदुस्थान व जपान यांची स्थिति कशी होती व झाली हे पाहिले म्हणजे स्वातंत्र्याची मातब्बरी उमटून दिसते. लढाईच्या आधीं हिंदुस्थानाप्रमाणे जपानहि शेतीप्रधान होता. कच्चा माल स्वस्त भावानें बाहेर पाठवावा आणि त्याचाच बनलेला पक्का माल जादा किंमतींत खरेदी करावा, अशी जगाची आत्मघातकी गिऱ्हाइकी दोनहि देश करीत होते. इ. स. १८८० त जपानामध्यें अवघे दोनशें कारखाने होते, व त्यांत फक्त दीड हजार कामगार होते. कामकऱ्यांची संख्या १९१४ त साडेनऊ लाख होती. परंतु महायुध्दामुळें उघड्या पडलेल्या बाजारपेठा काबीज करण्यासाठीं जपानानें कारखान्यांचें जाळे इतके दाट पसरले कीं, १९२१ मध्ये अदमासें पन्नास हजार कारखान्यांत सतरा लाख लोक काम करूं लागले. म्हणजे १८८० च्या अडीचशेपट कारखाने १९२१ मध्यें जपानांत अस्तित्वांत आले ! आतां हिंदुस्थानाची कशी स्थिति आहे ती पाहा. १८९२ त साडेसहाशे कारखाने घरघरत होते, व १९२५ त त्यांची संख्या सात हजार झाली; म्हणजे अवघी दसपट वाढ झाली. विहंगमार्ग व पिपीलिकामार्ग यांचे हे खासे नमुने होत ! आकाशांतून धांवणाऱ्या विमानाकडे पाहून पायीं रखडणाऱ्या माणसानें तोंडांत बोट घालावें त्याप्रमाणें जपानाची प्रगति पाहून हिंदुस्थान आश्चर्यानें वेडावून जातो.

जपानानें महायुध्दापासून एक धडा घेतला. तो हा कीं, आपण दुसऱ्या राष्ट्रावर फारसें विसंबून राहूं नये. आपल्या गरजा आपल्या देशांतच पुरविल्या गेल्या पाहिजेत. जपानाच्या या स्वावलंबनाच्या इच्छेला लोकसंख्येच्या अभिवृद्धीचा पाठिंबा मिळाला. गेल्या पन्नास वर्षांत जपानाच्या लोकसंख्येची दामदुप्पट होऊन आज ती सहा कोटी झाली आहे. या सर्वांची सोय चिमकुल्या जपानांत कशी होणार? कोरियाची ओसरीहि त्याला अपुरी पडूं लागली. म्हणून जपानी लोकांनीं आपले पाय पर-राष्ट्रांकडे वळविले. परंतु जपानी राहणी कंगाल, तिचा बाट आपल्या गबर देशांना लागावयाला नको या विचारानें अनेक राष्ट्रांनी दारें लावून घेतलीं. अमेरिकेनें तर प्रतिबंधाचा कायदा करून अतिथि-सत्काराचा चमत्कार दाखविला! तेव्हां आपली मायभूमीच आपल्याला जेऊं घालील या आशेनें जपानी लोक परत आले, व त्यांनीं उद्योगधंद्याची कास धरली. आजमितीला शें. ५० लोक शेती करीत असून तितकेच लोक उद्योगधंद्यावर पोट भरीत आहेत. हिंदुस्थानांत मात्र शें. ७२ लोक शेतीवर कसाबसा गुजारा करीत आहेत. हिंदुस्थानांत उद्योगधंद्याकडे शें. ११·२, व्यापाराकडे ५·६, नोकरी वगैरेकडे १० आणि बाकीचे आफ्रिका वगैरे देशांत अपमान सोसून हालांत दिवस कंठीत आहेत !

जपानानें महायुध्दांत उद्योगधंद्यांना हात घातला हे खरें; पण त्याच्या वाटेंत एकामागून एक अडचणी दत्त म्हणून उभ्या राहिल्या. १९२० सालीं किंमती उतरल्या, १९२३ त धरणीकंपाचा धक्का बसून बरेंच नुकसान झालें. १९२७ त आर्थिक घोटाळा झाला, आणि चीननें जपानी मालावर बहिष्कार घातला. परंतु या दैवी व मानवी अडथळ्यांना काखेत मारून जपान तुरुतुरु चालत होतेंच. त्यानें राष्ट्रीय कर्जाचा निम्मा भाग फायदेशीर धंद्याकडे खर्ची घातला. १९१४ सालीं जितके रेशीम बाहेरदेशीं पाठविण्यांत येई त्याच्या चौपट–पांचपट किंमतीचें रेशीम आतां निर्गत होत आहे. केवळ रेशीमच नव्हे तर इतर सगळाच व्यापार १९१४ च्या दुप्पट वाढला असून कापसाच्या धंद्यानें तर लँकेशायरला

जोराचा धक्का दिला आहे. कापसाप्रमाणेंच लोंकरीचा माल, लोखंड, पोलाद इत्यादि जिनसांतहि जपान इतर मोठ्या राष्ट्रांच्या बरोबरीनें थोड्याच दिवसांत धांवूं लागेल. व्यापारी गलबतांच्या बाबतींत तर त्याचा आतांच जगांतील राष्ट्रांत तिसरा नंबर आहे. तात्पर्य, परवांपर्यंत गिऱ्हाईक म्हणून तोंड पसरणारें हें चिमकुलें राष्ट्र आज ना उद्यां बलाढ्य पाश्चात्य राष्ट्रांशीं टक्कर मारणार, आणि हिंदुस्थानासारखा अवाढव्य देश पायाखालीं खनिज संपत्ति लोळत असतांना दिवसेंदिवस भुकेकंगाल होत राहणार. या विरोधाचा परिहार स्वातंत्र्याशिवाय कोण करील ?

*'फॉर्टनाइटली रिव्ह्यू'च्या नोव्हेंबर १९२९ च्या अंकांतील एका लेखाच्या आधारानें.

# व्हाइसरॉयांशीं झालेली मुलाखत फुकट गेली !

सूर्यवंशांतील उत्तानपाद राजाचा पुत्र ध्रुव याची कथा भरतखंडांत तरी आबालवृद्धांना विदितच आहे. ध्रुव हा सुनीतीचा पुत्र आणि राज्याचा कायदेशीर वारसदार. परंतु उत्तानपाद राजा सुनीतीचा अव्हेर करून सुरुचीच्या नादीं लागला आणि त्यानें ध्रुवाला त्याचें हक्काचें आसन देण्याचीहि टाळाटाळ चालविली. पण एके दिवशीं योगायोग असा आला कीं, राजाचे सन्निध सुरुची नसतां ध्रुव बाळ तेथें आला व राजानें पुत्रप्रेमानें त्याला मांडीवर घेतलें. इतक्यांत सुरुची तेथें आली आणि सवतीमत्सरानें बेफाम होऊन तिनें ध्रुवाला लत्ताप्रहार करून त्यास राजाच्या मांडीवरून खालीं ढकलून दिलें.हा अपमान सहन न होऊन ध्रुव तेथून निघाला आणि आपल्या मातेच्या उपदेशावरून उत्तानपाद राजाच्या राज्यातून निघून जाऊन जेथून आपल्याला कोणतीहि सापत्न माता ढकलून देऊं शकणार नाहीं असें अढळ पद प्राप्त करून घेण्याचा त्यानें निश्चय केला. ध्रुव बाळ आपल्या राज्यांतून निघून जात आहे हें कळतांच राजाला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला व तो ध्रुवाला परत आपल्या राज्यांत आणण्याकरितां त्याचे आर्जव करूं लागला. त्या वेळचा त्यांचा जो संवाद चिंतामणि कवीनें वर्णिला आहे तो सद्यःस्थितींत बराच बोधप्रद असल्यानें तो आम्ही समग्र देत आहों.

लवलाही लागला ध्रुवापाठीं । म्हणे बाळा ऐक बा एक गोष्टी ॥ १ ॥ फीर मागें देईन एक गांव । ध्रुव बोले देईल देवराव ॥ २ ॥ पांच गांव दीधले फीर आतां । ध्रुव बोले मागेन जगन्नाथा ॥ ३ ॥ राय बोले देईन एक देश । ध्रुव बोले देईल जगदीश ॥ ४ ॥ अर्ध राज्य दीधलें आण तुझी । ध्रुव बोले देवासी लाज माझी ॥ ५ ॥ सर्व राज्य दीधलें फीर मागें । ध्रुव बोले देइजे रमारंगें ॥ ६ ॥ स्नेह कांरे सोडिला ध्रुवा आजी । काळतोंडा जाहलों जगामाजी ॥ ७ ॥ ध्रुव बोले पितयास तात देवा । आतां येतों मी लोभ असो द्यावा ॥ ८ ॥

उपमान आणि उपमेय यांत तंतोतंत साम्य कधींच नसतें हें लक्षांत ठेवल्यास हिंदुस्थानांत आजमितीला चालू असलेल्या झगड्याचें एक प्रकारचें प्रतिबिंब या वरील संवादांत दृग्गोचर होत नाहीं असें कोण म्हणेल? ब्रिटानियाचे लाड पुरवण्याच्या नादीं लागून हिंददेवीच्या सुपुत्रांची आजपर्यंत आबाळ करणाऱ्या अधिकाऱ्यांचे डोळे आतां किंचित् उघडूं लागले असून हिंदपुत्रांनीं आपल्या साम्राज्यांतून बाहेर जाऊं नये म्हणून आतां तडजोडीची भाषा सुरू झाली आहे. पण त्या भाषेंतहि उपमानभूत गोष्टींतल्याप्रमाणेंच मारवाडी कावा भरलाच आहे. उत्तानपाद राजानें ध्रुवाची समजूत करण्याकरितां पहिल्या प्रथम एक गांव देऊं केला; पण ध्रुवाचें समाधान तेवढ्यानें झालें नाहीं. ध्रुवाचा निश्चय पाहून नरम झालेल्या राजानें पांच गांव, एक देश, अर्धे राज्य आणि अखेरीस सर्व राज्य देण्याचें अभिवचन दिलें.परंतु राजाचा सवाल जसजसा चढत चालला तसतसा ध्रुवाचा निश्चयहि अढळ होत चालला. आणि अखेरीस त्यानें राजास साफ सांगितलें कीं, मला जें पाहिजे आहे तें अढळपद मी तुझ्याकडून देणगी म्हणून न घेतां ईश्वराच्या भक्तीच्या जोरावर आत्मसामर्थ्यानें मिळवीन.

हिंदुस्थानाचें समाधान करण्यासाठीं ब्रिटिश सरकारनें असाच चढता सवाल बोलण्यास सुरवात केली नाहीं काय? १८९२ पर्यंत कायदेमंडळांत एकहि हिंदी गृहस्थ लोकनियुक्त म्हणून हक्कानें बसूं शकत नव्हता. पण मूठभर लोकनियुक्त प्रतिनिधी घेण्यापासून तों प्रांतिक द्विदल राज्यपद्धतीपर्यंत या राष्ट्रानें आतांपर्यंत मजल गाठली; तथापि तेवढ्यानेंहि राष्ट्राच्या स्वाभिमानाचें समाधान होऊं शकत नाहीं म्हणून ही अखेरची चळवळ चालू आहे आणि या चळवळींत संपूर्ण स्वराज्य आपण संपादन करूं अशी राष्ट्रानें उमेद धरली आहे. अशा परिस्थितींत मजूर पक्ष अधिकारारूढ झाला

आणि हिंदुस्थानानें साम्राज्याच्या बाहेर जाऊं नये म्हणून त्यानें हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस देण्याचें अभिवचन जाहीर करून टाकलें.पण मत्सरग्रस्त हुजूर पक्षाच्या दटावणीस भिऊन मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यानीं बाल्डविन यांस पत्र लिहिलें कीं, १९१७ सालाच्या जाहीर झालेल्या धोरणापासून आम्ही यत्किंचितहि ढळलों नसून आमचें पूर्वीचेंच धोरण कायम आहे ! या दुटप्पी भाषणाने हिंदी राष्ट्राचा मंत्रिमंडळाच्या अभिवचनावरचा विश्वास उडाला.तथापि लॉर्ड आयर्विन यांनी हिंदी पुढाऱ्यांशी वाटाघाट करण्याचें ठरविल्यावरून म. गांधी, पं. मोतीलाल नेहरू,तेज बहादूर सप्रू,बॅ. जिना आणि ना. विठ्ठलभाई पटेल यांनीं ता. २३ रोजीं नव्या दिल्लींत व्हाइसरॉयांच्या नव्या वाड्यांत त्यांची मुलाखत घेतली. त्या शिष्टाईत दोन तासपर्यंत वाटाघाट कसली झाली तें अद्यापि प्रसिद्ध झालें नाहीं; परंतु मुलाखतीचा निष्कर्ष जाहीर झाला; तो असा कीं, व्हाइसरॉयसाहेब हे 'डोमीनियन स्टेटस' चें अभिवचन देण्यास तयार नसल्यानें तूर्त तरी ही शिष्टाई फिसकटली आणि पंडितजी व गांधीजी लाहोरला निघून गेले.

राजकीय कैद्यांची बंधमुक्तता, राऊंड टेबल कॉन्फरन्सचा कार्यक्रम व त्या कॉन्फरन्सकरितां प्रतिनिधींची करावयाची निवड इत्यादि प्रश्नांचीहि या मुलाखतींत वाटाघाट व्हावयाची होती. 'परंतु प्रथमग्रासे मक्षिकापातः' व्हावा त्याप्रमाणें 'डोमीनियन स्टेटस' देण्याचें आधीं मान्य केल्यास मगच इतर तपशीलाची चर्चा आपल्या या मुलाखतींत व्हावी असा लोकप्रतिनिधींनीं आग्रह धरला आणि व्हाइसरॉयांनीं हा शिष्टाईचा मूळ पायाच नाकारल्यामुळें इतर मुद्द्यांची चर्चा देखील न होतां शिष्टमंडळ जसे गेलें तसें हात हलवीत परत आलें !

गेल्या आठवड्यांत पार्लमेंटांत भारतमंत्री वेजवुड बेन यांनीं मोठा उदारपणाचा आव आणून सांगितलें होतें कीं, अहो, डोमीनियन स्टेटस आज कसलें मागतां, तें तर तुम्हास मिळून चुकलें आहे!१९१९ सालापासून ग्रेटब्रिटन हें हिंदुस्थानाला बरोबरीच्या भागीदारासारखें वागवीत आलें आहे. त्यावरून डोमीनियन स्टेटस मिळालेंच आहे अशी तुमची खात्री होत नाहीं काय? वेजवुड बेन यांच्या या शब्दांत निवळ शब्दजालापेक्षां अधिक कांहीं अर्थ असता तर व्हाइसरॉयांनीं शिष्टमंडळाला असें एकदम निराश कां केलें असतें? एकीकडे म्हणावयाचें कीं, तुम्हास डोमीनियन स्टेटस देऊन चुकलों आहों; आणि लगेच दुसरीकडे सांगावयाचें कीं, 'डोमीनियन स्टेटस' चालविण्याची तुमची पात्रता नसल्यानें आजच कांहीं तुम्हाला सर्वाधिकार देतां येत नाहींत ! डोमीनियन स्टेटस चालविण्याच्या पात्रतेच्या या शंकेला पं. मोतीलाल नेहरू यांनीं तेथल्या तेथेंच व्हाइसरॉयांच्या तोंडावरच सडेतोड उत्तर दिलें कीं, 'स्वराज्य चालविण्याची पात्रता अंगी येण्याला स्वराज्य चालविणें हाच एक उपाय आहे. तुम्ही जर आम्हाला स्वराज्य चालवूंच देत नाहीं तर मग ही पात्रता यावयाची तरी कशी'? परंतु यावर व्हाइसरॉयांकडून कांहींच जबाब न मिळतां नुसता नकार तेवढाच बाहेर आला आहे.

शिष्टमंडळांत सर तेज बहादूर सप्रू व बॅ. जिना यांचाहि समावेश झाला होता. त्यांच्या बोलण्याचा आशय असा होता कीं, आजच कांहींहि मागणी न करतां राऊंड टेबल कॉन्फरन्सला जावें आणि तेथें आपली मागणी करावी. परंतु म. गांधी व पं. नेहरू यांचें असें मत पडलें कीं, राऊंड टेबल कॉन्फरन्सला जसे कॉंग्रेसचे प्रतिनिधी बोलावणार तसेच व्यापारी, जमीनदार, अँग्लो इंडियन्स इत्यादि वर्गांचे प्रतिनिधीहि बोलावणार; मग तेथें दहाजणांच्या दहा मागण्या पुढें आल्या असतां सर्वांना सामान्य अशी जी मागणी असेल तेवढ्या बाबतींत सर्वांचें एकमत आहे असें म्हणून ब्रिटिश सरकार तेवढी मागणी देऊं करणार! दहाजणांच्या मागणींतून एक मतानें ठरणारी मागणी मान्य करण्याची कृति म्हणजे दृढभाजक काढण्याची ही कृति कांहीं नवी नाहीं.मॉंटेग्यू चेम्सफर्ड रिफॉर्म्सच्या वेळीं हीच कृति पुढें आली असतां राष्ट्रीय सभेच्या शिष्ट मंडळाचे प्रमुख लो. टिळक यांनीं साफ सांगितलें कीं, "परस्पर विरोधी अशा दहा मंडळांतून जेवढें सर्वांना मान्य असेल तेवढें देतों म्हणणें म्हणजे जवळ जवळ कांहींच देत नाहीं असें म्हणण्यासारखें आहे व तें आम्हास मान्य नाहीं. राष्ट्रीय सभा ही सर्व राष्ट्राच्या वतीनें बोलणारी संस्था आहे व त्या संस्थेनें जी योजना मान्य केली आहे ती आमच्या हातीं लागेल तरच राष्ट्राचें समाधान होईल, नाहीं तर होणार नाहीं." याच दृष्टीनें पं. मोतीलाल व गांधी यांनीं व्हाइसरॉयांस सांगितलें कीं, राष्ट्रीय सभेचा गतवर्षीचा ठरावच असा आहे कीं, डोमीनियन स्टेटसहून कमी असा कोणताच दर्जा पत्करावयाचा नाहीं; तेव्हां राष्ट्रीय सभेचे प्रतिनिधी जर राऊंड टेबल कॉन्फरन्सला हजर राहावयास पाहिजे असतील तर डोमीनियन स्टेटस हा चर्चेचा पाया समजून त्यावर स्वराज्यघटना कशी करावयाची त्याचा विचार करण्याकरितांच ते येतील.

यावर व्हाइसरॉयांचा आक्षेप असा कीं, "कायदा करण्याचा अखेरचा अधिकार पार्लमेंटाचा आहे. अर्थातच आपण अगाऊ अभिवचन देणें म्हणजे पार्लमेंटाचा अधिकार बळकावल्याप्रमाणे होतें; सबब आम्हांस तसें करतां येत नाहीं!" हें जर खरें, तर मग वेजवुड बेन यांनीं तुम्ही राऊंड टेबल कॉफरन्समध्ये येऊन वाटेल ती मागणी करा; तुम्हांस दाही दिशा मोकळ्या आहेत. आम्ही तुम्हांस कोणताच निर्बंध घालूं इच्छित नाहीं असें जें सांगितलें त्याचा अर्थ काय? डोमीनियन स्टेटसचें आगाऊ वचन आम्ही देऊं शकत नाहीं, असें सांगणे म्हणजे तुम्ही ती मागणी करून न करून सारखीच, कारण आम्ही तिला पाठिंबा देऊं शकत नाहीं, हाच यांतला भावार्थ नव्हे काय ? पं. मोतीलाल व गांधी यांनीं आपल्या मागणीसंबंधानें असा स्पष्ट खुलासा केला होता कीं, "आजच तुम्ही डोमीनियन स्टेटस दिलें असे म्हणा असा आम्ही आग्रह धरीत नाहीं; कारण तुमच्या डोक्यावर पार्लमेंटरूपी सासू आहे, हे आम्ही जाणतों. परंतु तुम्ही एवढेंच करा कीं, आमच्या 'डोमीनियन स्टेटस' ला तुम्ही मंत्रिमंडळातर्फे पुष्टि द्या. मग पार्लमेंटरूपी सासू तिची विल्हेवाट वाटेल तशी लावो, पण तुमचा तरी या मागणीला पूर्ण पाठिंबा पाहिजे. संयुक्त हिंदी राष्ट्राची एकमुखी मागणी आणि तिला आजच्या मजूर-मंत्रिमंडळाचा पाठिंबा इतकी जोड मिळाली म्हणजे आमचा तुमच्यावर शब्द राहिला नाहीं." परंतु या अटीलाहि व्हाइसरॉयांनीं संमति दिली नाहीं. त्यांना स्वतःला किंवा मजूर-मंत्रिमंडळाला वचनबद्ध करून ठेवावयाचें नव्हते. आणि त्यांनीं जर असें वचन दिलें नाहीं तर पुढें पार्लमेंटांत या वादाला अनेक फांटे फुटतील अशी पंडितजी व गांधीजी यांना धास्ती वाटत असल्यामुळें त्यांनीं व्हाइसरॉयांच्या निमंत्रणास मान्यता दिली नाहीं. आतां हा प्रश्न राष्ट्रीय सभेपुढें जाईल आणि व्हाइसरॉयांशीं केलेली शिष्टाई फिसकटल्यामुळें इंडिपेंडन्स हें ध्येय ठरविण्याचा ठराव कॉंग्रेसमध्यें बहुतकरून मंजूर होईल असें वाटतें. तसा ठराव पास होऊन राऊंड टेबल कॉन्फरन्सचा राष्ट्रीय सभेनें अव्हेर केल्यास प्रारंभींच्या ध्रुवाच्या दृष्टान्ताप्रमाणें नोकरशाहीनें देऊं केलेल्या स्वराज्याची देणगी न स्वीकारतां आपण आपल्या सामर्थ्याच्या जोरावर स्वराज्य मिळवूं अशी कॉंग्रेसने प्रतिज्ञा केल्याप्रमाणें होणार आहे. परंतु ही प्रतिज्ञा पार पाडण्याइतकें कॉंग्रेसचें सामर्थ्य आहे काय ? आणि आज जर तें नसेल तर तें लवकरच संपादन करण्याइतका कॉंग्रेसचा निश्चय अढळ आहे काय हा एक विचार करण्यासारखाच प्रश्न आहे. पण त्याहून अधिक महत्त्वाचा प्रश्न असा कीं, राष्ट्रीय सभा नुसतें स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर करून बसणार का त्याबरोबरच कायदे-कौन्सिलें, शाळा, कोर्टें वगैरेवरहि बहिष्कार घालणार ? आणि असा बहिष्कार कॉंग्रेसनें घातल्यास त्यास राष्ट्रांतून कितपत पाठिंबा मिळणार? मुस्लीमलीग, हिंदुसभा, शीख लीग इत्यादि संस्था हा बहिष्कार पाळतील असें दिसत नाहीं. अशा परिस्थितींत कॉंग्रेसचें हें तारूं कोठपर्यंत वाहवत जाणार व त्याचा परिणाम काय होणार याचा विचार कॉंग्रेसचे ठराव जाहीर झाल्यावरच करणें बरें.

# नायर कमिटीचा रिपोर्ट

सायमन कमिशनाशीं सहकार्य करण्याकरितां हिंदुस्थानसरकारानें ही नायर–कमिटी नेमली होती. सदर कमिटीचे अध्यक्ष सर शंकरन् नायर हे असून कमिटींत डॉ. हरीसिंग गौर, सर झुलफीकार अल्लीखान, डॉ. सुऱ्हावर्दी, सर आर्थर फ्रूम, किकाभाई प्रेमचंद, एम. सी. राजा, नबाब अल्लीखान, सरदारसिंग उबेराय हे सभासद होते. राजा हे अस्पृश्यांतर्फे होते. मुख्य रिपोर्टावर सहा सभासदांनीं सह्या केल्या आहेत. त्यांपैकीं बहुतेकांनीं आपल्या भिन्न मतपत्रिका लिहिल्या आहेत. सदर रिपोर्ट गेल्या सोमवारीं प्रसिद्ध झाला. त्यांतील मुख्य रिपोर्टाचा सारांश पुढीलप्रमाणें आहे—

## सिंध व ब्रह्मदेश

कमिटीनें प्रथम आपल्या रिपोर्टांत मॉंटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणेपासून राज्यकारभारांत झालेल्या फेरफारांचें सिंहावलोकन केलें आहे. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांमध्यें दोष पुष्कळ होते. तथापि त्यांस न जुमानतां १९१९ चा कायदा पुष्कळ यशस्वी झाला आहे असे कमिटीचे मत आहे. शिक्षण हा विषय सोंपीव आहे. या बाबतींत पुष्कळच प्रगति झाली आहे. यामुळें राजकीय सुधारणेच्या बाबतींत पुढचें पाऊल टाकण्यास आतां हरकत नाहीं. कमिटीनें यानंतर प्रांताप्रांताच्या कारभाराचा विचार केला आहे. कमिटी पुढें म्हणते, "आमच्यापैकीं कांहीं-जणांच्या मतें खर्चाची जबाबदारी सिंध प्रांतानें आपल्यावर घेतल्यास सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून वेगळा करण्यांत यावा अशी आमची शिफारस आहे. ब्रम्ही लोकांचीहि आपला प्रांत हिंदुस्थानापासून वेगळा व्हावा अशी इच्छा आहे. पण त्या गोष्टीचा विचार करतांना ब्रम्हदेशाच्या संरक्षणाची व खर्चाची तरतूद लक्षांत घेतली पाहिजे. पण त्या संबंधाचा पुरावा आमच्यापुढें नसल्यामुळें त्या बाबतींत निश्चित असें मत आम्हास देतां येत नाहीं.

## सर्व खातीं दिवाणांच्या ताब्यांत

आतां इतर प्रांतांचा विचार. हिंदुस्थानांतील नऊ मोठे प्रांत व मुंबईपासून वेगळा केला तर सिंध हा प्रांत, यांच्या कारभारी मंडळांत बादशहानें नेमलेला गव्हर्नर असावा व कायदेकौन्सिलांस जबाबदार असे दिवाण असावेत. खात्यामधील सोंपीव व राखीव हा भेद काढून टाकावा आणि मध्यवर्ती सरकाराच्या ताब्यांतील खातीं वगळून बाकीचीं सर्व खातीं प्रांताच्या ताब्यांत देण्यांत यावींत. या खात्यांच्या बाबतींत बंगाल हीं अपवाद आहे. बंगालमधील कायदा व बंदोबस्त हें खातें कायदेकौन्सिलास प्रत्यक्ष जबाबदार नाहीं अशा मंत्र्याकडे सोंपविण्यांत यावें. मंत्रिमंडळामध्यें दिवाण असावेत. त्यांची वांटणी पुढीलप्रमाणें—आठ मद्रासकरितां, सहा संयुक्त प्रांताकरितां, पांच मुंबई बंगाल पंजाब व ब्रह्मदेश यांजकरितां, चार बिहार आणि ओरिसा आणि आसाम याकरितां आणि तीन मध्यप्रांताकरितां. हे मंत्री ऊर्फ दिवाण गव्हर्नरानें नेमावेत. हे दिवाण कायदेकौन्सिलांतील लोकानियुक्त सभासदांपैकीं असावेत किंवा त्याबाहेरचा कोणी एखादा असल्यास त्यानें आपली नेमणूक झाल्यापासून सहा महिन्याच्या आंत कायदेकौन्सिलामार्फत निवडून यावें. दिवाणांची निवडणूक कायदेकौन्सिलानें करूं नये.

## दिवाणांची नेमणूक

दिवाणांची नेमणूक करतांना इंग्लंडांतील वहिवाटीप्रमाणें गव्हर्नरांनीं प्रथम मुख्य दिवाणाची निवडणूक करावी आणि त्याच्या शिफारशीप्रमाणें इतर दिवाण नेमण्यांत यावेत. कमिटींतल्या दोन सभासदांस असें वाटतें कीं, ज्या प्रांतांत मुसलमानांची संख्या कमी आहे त्या प्रांताच्या मंत्रिमंडळांत एक मुसलमान दिवाण असावा. पण हें मत आम्हास ग्राह्य नाहीं. कारण त्यायोगानें मंत्रिमंडळावर जी संयुक्त जबाबदारी टाकावयाची आहे तिला बाध येतो. गव्हर्नर हा मंत्रिमंडळाचा सभासद नसावा. बंगाल्यांत भांडणें विशेष आहेत म्हणून कायदा व बंदोबस्त हें खातें गव्हर्नरानें नेमलेल्या अधिकाऱ्याकडे असावें व तो अधिकारी कायदेकौन्सिलाच्या बाहेरचा सभासद (Ex-Officio) असावा असा आमचा अभिप्राय आहे. मंत्रिमंडळ वारंवार न बदलणें इष्ट आहे. त्याकरितां पुढील उपाय आम्ही सुचवितों. कायदेकौन्सिलांतील हजर सभासदांपैकीं ⅔ सभासदांनीं मंत्रिमंडळावरील अविश्वाच्या ठरावास संमति दिल्यावांचून मंत्रिमंडळ विसर्जन पावूं नये. मंत्र्याचे पगार व कौन्सिलाच्या अध्यक्षाचा पगार प्रांतिक कायदेकौन्सिलानें कायदा करून कायमचा ठरवून टाकावा.

## गव्हर्नराचा अधिकार

प्रांताच्या राज्यकारभाराची मुख्य जबाबदारी मंत्रिमंडळावर असावी. गव्हर्नर रोजच्या व्यवहारांत बाजूला राहावा. पण विशेष प्रसंगीं कारभारांत ढवळाढवळ करण्याचा व आपला ताबा चालविण्याचा त्यास अधिकार असावा. या अधिकाराचा

उपयोग बहुधा करण्यांत येऊं नये व हळूहळू तो नामशेष व्हावा. प्रांताच्या गव्हर्नराला मंत्रिमंडळास बडतर्फ करण्याचा सनदशीर अधिकार असावा. परंतु मंत्रिमंडळांतील फक्त एखाद्याच व्यक्तीस कमी करण्याचा अधिकार असूं नये. मंत्रिमंडळ नेमण्याचा किंवा कमी करण्याचा अधिकार स्वराज्य भोगणाऱ्या ब्रिटिश वसाहतींतील गव्हर्नर ज्याप्रमाणें चालवितो त्याप्रमाणें याहि गव्हर्नरानें तो चालवावा. मंत्रिमंडळावरील ही सत्ता त्यानें शांतता व बंदोबस्त या दृष्टीनें जरूर पडली तरच गाजवावी. एखाद्या दिवाणानें सोडलेला हुकूम शांततेच्या दृष्टीनें अनिष्ट असल्यास तो गव्हर्नरानें आपल्या अधिकारांत बाजूस सारावा; किंवा शांतता राखण्याकरितां दिवाणानें सोडावयाचा हुकूम सोडला नसल्यास

सेंट्रल कमिटीचे अध्यक्ष



सर शंकरन नायर



डॉ. सुऱ्हावर्दी



सर झुलपीकार

गव्हर्नरानें तो सोडावा. धर्म किंवा धार्मिक हक्क यांस बाध येणारी एखादी गोष्ट एखादें मध्यवर्ती खातें किंवा दोन प्रांतांचा परस्परांशीं येणारा संबंध अशा प्रश्नांविषयीं गव्हर्नर व त्याचें मंत्रिमंडळ यांत भेद उत्पन्न झाल्यास तो प्रश्न शेवटच्या निर्णयाकरितां गव्हर्नर-जनरलाकडे पाठविण्यांत यावा.

प्रांतिक कौन्सिलास स्वायत्तता द्यावयाची तर तीं कौन्सिलें हल्लींपेक्षां मोठीं व अधिक लोकमतप्रदर्शक बनलीं पाहिजेत. यासाठीं आमची शिफारस अशी आहे कीं, हल्लींचा मतदारसंघ दुप्पट मोठा करण्यांत यावा. हा नवा कायदा अमलांत येऊन सात वर्षें पुरीं होईपर्यंत अशा प्रकारचा फरक करूं नये असें आमच्यापैकीं तिघां सभासदांस वाटतें. मताधिकार हल्लींपेक्षां वाढवावा किंवा कमी करावा, हें ठरविण्याचा अधिकार नवीन कायदे-कौन्सिलाकडे असावा. मात्र अशा प्रकारच्या ठरावास हजर असलेल्या सभासदांपैकीं २/३ सभासदांची अनुकूलता असावी. वयांत आलेल्या निदान १/३ लोकांना मताधिकार मिळावा. १९५१ त २/३ लोकांना आणि १९६१त सर्व वयांत आलेल्या लोकांना मताधिकार मिळावा.

ब्रह्मदेशास हा नियम लागू होऊं नये. कारण त्यांची या कामीं पूर्वींच प्रगति झाली आहे.

**सभासदांची प्रांतवार संख्या**

ठिकठिकाणच्या प्रांतिक कौन्सिलांत पुढीलप्रमाणें सभासदांची संख्या असावी.

| प्रांताचें नांव | सध्याची संख्या | पुढे व्हावयाची संख्या |
|---|---|---|
| मद्रास | १३२ | १५० |
| मुंबई (सिंध वगळून) | ९५ | ११४ |
| बंगाल | १४० | २०० |
| संयुक्त प्रांत | १२३ | १८२ |
| पंजाब | ९४ | १५० |
| बिहार व ओरिसा | १०३ | १५० |
| मध्यप्रांत | ७३ | १२५ |
| आसाम | ५६ | ७५ |
| ब्रह्मदेश | १०३ | १२० |

कौन्सिलामधील सरकारी सभासद अजीबात काढून टाकण्यांत यावेत. परंतु एखाद्या विशेष बिलाचा विचार करण्यासाठीं तज्ज्ञांची मदत हवी असें गव्हर्नरास वाटल्यास त्याला दोन तज्ज्ञ नेमण्याचा अधिकार असावा. पण या तज्ज्ञांना मत देण्याचा अधिकार असूं नये. आम्ही वेगवेगळ्या समाजांचे व हितसंबंधाचे प्रतिनिधी कौन्सिलांत घेण्याची तजवीज केली असल्यामुळे त्याकरितां तसल्या प्रकारच्या लोकांची कौन्सिलांत सरकारानें नेमणूक (नॉमिनेट) करण्याची आतां गरज राहिलेली नाहीं. याला कदाचित् अपवाद राहूं शकेल.

### जातवार प्रतिनिधित्व

जातवार प्रतिनिधित्व हा कमिटीपुढें एक बिकट प्रश्न उभा आहे. आमच्यापैकीं बहुसंख्येच्या मतें जातवार प्रतिनिधित्व हें दुष्ट व अपायकारक असल्यानें अजीबात हुसकून लावावें असें आहे. सांप्रत ब्रह्मदेश वगळल्यास इतर सर्व प्रांतांतून मुसलमानांचा स्वतंत्र मतदारसंघ आहे. सहा प्रांतांतून तर त्यांना त्यांच्या लोकसंख्येपेक्षांहि जास्ती प्रतिनिधी देण्यांत आले आहेत. पंजाब व बंगाल या दोन प्रांतांत मुसलमानांस त्यांच्या संख्येच्या मानानें कमी प्रतिनिधी आहेत. हिंदुस्थानांतील बहुसंख्य मुसलमानांस आपले मतदारसंघ हल्लीप्रमाणें यापुढेंहि वेगळे राहावेत असें वाटतें. पण कमिटीचें मत असें आहे कीं, हिंदू व मुसलमान यांचा मतदारसंघ समाईक करून त्यांस एकत्र आणल्यावांचून त्यांच्यामध्यें समाईक नागरिकत्वाची भावना उत्पन्न होणार नाहीं. आणि ती उत्पन्न झाल्यावांचून जबाबदारीचा राज्यकारभार त्यांस समाधानकारक रीतीनें चालवितां येणार नाहीं. अशा या महत्त्वाच्या व वादग्रस्त बाबीसंबंधानें कमिटींतील लोकांचें एकमत झालें नाहीं याबद्दल खेद वाटतो. आमच्यापैकीं कांहींचें मत असें आहे कीं, हल्लीं जे मतदारसंघ स्वतंत्र आहेत ते त्या त्या समाजाची



सर आर्थर फ्रूम

संमति घेतल्यावांचून मोडूं नयेत. पण आमच्यांतील बहुमतास असें वाटतें कीं, अधिक व्यापक विचार मनांत आणून विशिष्ट समाजाच्या इच्छेस आम्ही भीक घालूं नये.

### मुसलमान मतदारसंघ

मद्रास, मुंबई, संयुक्त प्रांत, बिहार आणि ओरिसा, मध्यप्रांत आणि आसाम यांत मुसलमान संख्येनें कमी आहेत. आमच्यांतील बहुमताची शिफारस अशी आहे कीं, या प्रांतांतील मुसलमानांस जे स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत आले आहेत ते रद्द करावे. यामुळे त्यांची होणारी गैरसोय पुढील उपायानें दूर होईल. सर्व जातीकरितां एकच मतदारसंघ असावा, आणि त्यांतील कांहीं जागा मुसलमानांकरितां राखून ठेवाव्या. त्यांचें प्रमाण मुसलमानांची इच्छा असेल त्याप्रमाणे त्यांच्या लोकसंख्येवरून ठरवावें किंवा त्यांच्या मतदारांच्या संख्येवरून ठरवावें. ही पध्दत वयांत आलेल्या सर्व लोकांस मताधिकार मिळेपर्यंत चालू राहावी व नंतर ती बंद करण्यांत यावी. पंजाबांत हिंदू व शीख यांसंबंधीं आम्ही हेंच धोरण स्वीकारलें आहे. पंजाबांत हिंदू व शीख यांजकरितां ज्या जागा राखून ठेवावयाच्या त्या त्यांच्या इच्छेस येईल त्याप्रमाणें त्यांच्या लोकसंख्येवर अवलंबून असाव्या किंवा त्यांच्या मतदारांच्या संख्येवर अवलंबून असाव्या. बंगाल्यांत मुसलमान संख्येनें अधिक आहेत. यासाठीं त्या प्रांतांत मुसलमानांकरितां वेगळा मतदारसंघ असण्याचें कारण नाहीं. सदर प्रांतांत हिंदूंचीहि संख्या मोठी व वजनदार आहे. म्हणून त्यांच्याहि हितसंबंधाचें रक्षण विशेष उपायानें करण्याचें कारण नाहीं. वयांत आलेल्या सर्वांस मताधिकार मिळेपर्यंत ज्या प्रांतांतून शीख लोक लोकसंख्येनें थोडे आहेत त्या प्रांतांतून त्यांजकरितां जागा राखून ठेविलेल्या असाव्यात.

### अस्पृश्य वर्ग

आतां इतर लहान जातींचा विचार करूं. मद्रास इलाख्यांत स्थिति अशी आहे कीं, अस्पृश्य वर्गाकरितां तेथें स्वतंत्र मतदारसंघ स्थापन करणें शक्य आहे. जातवार प्रतिनिधींचें तत्त्व आम्हास बिलकुल मान्य नाहीं हें खरें; तथापि अस्पृश्य वर्गास राजकीय शिक्षण मिळणें जरूर असल्यामुळें आम्ही त्यांजकरितां स्वतंत्र मतदारसंघ असावा अशी शिफारस करतो. मात्र ही व्यवस्था १० वर्षांपुरतीच समजावी. नंतर हे स्वतंत्र मतदारसंघ मोडून अस्पृश्यांकरितां समाईक मतदारसंघांत जागा राखून ठेवण्यांत याव्यात. त्या पुढीलप्रमाणेः— मद्रास १४, मुंबई ८, बंगाल ८, संयुक्त प्रांत १०, पंजाब ६, बिहार आणि ओरिसा ६, मध्यप्रांत ८, आसाम ९. मुंबई इलाख्यांत या जागा अस्पृश्यांच्या इच्छेस येईल त्याप्रमाणे त्यांच्या लोकसंख्येवर किंवा त्यांच्या मतदारांच्या संख्येवर अवलंबून असाव्यात. आसामांतील ९ जागा याच प्रकारच्या असून त्यांत सुरमा प्रदेशांतील व इतर ठिकाणच्या मागसलेल्या व अस्पृश्य जातींचा समावेश व्हावा. मद्रास व आसाम या प्रांतांच्या कौन्सिलांत मागसलेल्या भागाकरितां एक सभासद हल्लीप्रमाणेंच नेमलेला असावा. संयुक्त प्रांतांत अस्पृश्यांस दिले-

त्या १० प्रतिनिधींशिवाय आणखी ५ प्रतिनिधी मागसलेल्यांसाठीं असावेत. या ५ जागा समाईक मतदारसंघांत राखलेल्या अशा असाव्या. बिहार व ओरिसा या प्रांतांत अशाच राखलेल्या असाव्या.

**ख्रिस्ती-युरोपियन व अँग्लो-इंडियन**

हिंदी ख्रिस्ती लोकांच्याकरितां राखीव जागा असाव्या. पण त्याखेरीज त्यांस इतर जागाहि मिळविण्याची स्वतंत्रता असावी. त्यांच्या जागांची वांटणी पुढीलप्रमाणेः—मद्रास ६, मुंबई शहरासुद्धां १, बंगाल २, संयुक्त प्रांत ३, पंजाब २, बिहार आणि ओरिसा २, आसाम १, युरोपियनांना हल्लींप्रमाणेंच स्वतंत्र मतदारसंघ असावेत. ते अशाकरितां कीं, त्यांना इकडील देशी भाषांमधून अस्खलितपणे बोलून आपले ह्मणणें सर्वसामान्य मतदारसंघास समजून देतां येत नाहीं. युरोपियनांकरितां पुढीलप्रमाणे जागा असाव्यातः— मद्रास २, मुंबई २, बंगाल ७, संयुक्त प्रांत २,पंजाब १, बिहार आणि ओरिसा २, आसाम १, ब्रह्मदेश २, मध्यप्रांतांत युरोपियन व अँग्लो-इंडियन यांस मिळून २ सभासद असावेत. अँग्लो-इंडियनांस समाईक मतदारसंघांतूनच पुढीलप्रमाणें राखीव जागा देण्यांत याव्याः— मद्रास १ समाईक मतदारसंघांतून व १ स्वतंत्र मतदारसंघांतून, मुंबई २ स्वतंत्र मतदारसंघांतून, संयुक्त प्रांत ३ पंजाब १ बंगाल ४ बिहार आणि ओरिसा १ या जागा समाईक मतदारसंघांतून राखून ठेविलेल्या असाव्या.व ब्रम्हदेश २. मद्रास इलाख्यांत ब्राह्मणेतरांकरितां जागा राखून ठेवलेल्या आहेत त्या रद्द व्हाव्या. आणि मुंबई इलाख्यांत मराठ्यांकरितां राखलेल्या जागा रद्द व्हाव्या.

**व्यापार व उद्योगधंदे**

व्यापार व उद्योगधंदे यासंबंधानें पुढीलप्रमाणे प्रतिनिधी असावेत—मद्रास ५ जागा आहेत त्याऐवजीं ६. ही सहावी जागा सदर्न इंडिया चेंबर ऑफ कॉमर्सकरितां आहे. मुंबई इलाखा ७ जागा आहेत त्याऐवजीं ८. त्यांतील ४ युरोपियनांकरितां व ४ हिंदी लोकांकरितां. त्यांची वांटणी मुंबईसरकारानें ठरवावी. बंगाल इलाखा १५ आहेत त्याऐवजीं २१ त्यांतील १४ युरोपियनांकरितां आणि ७ हिंदी व्यापाऱ्यांकरितां. संयुक्त प्रांतांत ३ आहेत त्याऐवजीं ५. पंजाबांत २ जागा आहेत त्या तशाच राहाव्या. त्यांतील १ व्यापाराकरितां व उद्योग-धंद्याकरितां. बिहार आणि ओरिसा १ आहे त्याऐवजीं २, मध्यप्रांतांत २ आहेत त्या तशाच राहाव्या. आसामांत १ आहे ती तशीच राहावी. ब्रह्मदेशांत सध्या एक नेमलेल सभासद असतो. त्याऐवजीं ३ जागा हिंदी व्यापार व उद्योग-धंदा यांजकरतां असाव्यात. बाकीच्या जागांची वांटणी पुढीलप्रमाणेंः—चायनीज चेंबर ऑफ कॉमर्स २ बर्मा चेंबर ऑफ कॉमर्स ४ बर्मीज चेंबर ऑफ कॉमर्स २ रंगून ट्रेडस असोसिएशन १. हल्लीं मद्रास, आसाम आणि बिहार व ओरिसा यांतील चहाच्या मळेवाल्यांकरितां स्वतंत्र प्रतिनिधी आहेत. मद्रास इलाख्यांत ते तसेच राहावेत. आसामांत ५ आहेत ते ७ व्हावेत, बिहार आणि ओरिसा यांत १ आहे त्याऐवजी २.

जमीन धारण करणारास (कुळे), त्यांचे प्रतिनिधी त्यांच्या स्वतंत्र मतदारविभागांतून (कॉन्स्टिटयुअन्सी) निवडून देतां यावे. त्यांची संख्या पुढीलप्रमाणेः—मद्रास ७, मुंबई ( सिंध वगळून ) २, बंगाल ५, संयुक्त प्रांत १६, पंजाब ४, बिहार आणि ओरिसा ८, मध्यप्रांत ५. युनिव्हर्सिट्यांनीं निवडून द्यावयाच्या प्रतिनिधींची संख्या आहे तीच राहावी; मात्र संयुक्त प्रांतांत अलाहाबाद, आग्रा व लखनौ येथील युनिव्हर्सिट्यांस सध्या १ च जागा आहे त्याऐवजीं २ जागा असाव्या. स्त्रियांना आपले प्रतिनिधी प्रांतिक कौन्सिलांतून निवडून देतां येतील अशी व्यवस्था व्हावी. प्रत्येक प्रांतांत एकंदर जागांपैकीं ५ टक्के जागा स्त्रियांकरितां राखून ठेवाव्या. त्यांची निवडणूक त्यांच्या विशिष्ट मतदारसंघांतून व्हावी. बिहार आणि ओरिसा व मध्यप्रांत यांत खाणीवाल्यांकरितां स्वतंत्र प्रतिनिधी आज आहेत ते तसेच राहावेत.

**मजुरांचे प्रतिनिधी**

ते पुढीलप्रमाणें असावेत—मद्रास १, मुंबई ४, बंगाल ३, संयुक्त प्रांत २, पंजाब १, बिहार आणि ओरिसा २, मध्यप्रांत २, आसाम ३, मुंबई इलाख्यांत ४. सर्वसामान्य मतदारविभागांत चार जागा मजुरांकरितां राखीव असाव्यात त्या अहमदाबाद १, सोलापूर १ व मुंबई शहर २ याप्रमाणे. आसामांत चहाच्या मळ्यांत काम करणाऱ्या मजुरांनी आपल्यातर्फे ३ प्रतिनिधी निवडून द्यावे. इतर प्रांतांतून मजुरांकरितां स्वतंत्र मतदारसंघ असावेत. त्या जागा कशा भरावयाच्या हें स्थानिक सरकाराने ठरवावें. त्यांची निवडणूक समाईक मतदारसंघांतून व्हावी किंवा स्वतंत्र मतदारसंघांतून व्हावी. आणि हेंहि शक्य नसल्यास त्यांची नेमणूक करण्यांत यावी.

**मुख्य सरकाराचें नियंत्रण**

प्रांतिक कौन्सिलाची मुदत ४ वर्षांची असावी. जरूर पडल्यास कौन्सिलांतील कायदेकानूवर नियंत्रण घालण्याचा अधिकार मुख्य सरकारास म्हणजे हिंदुस्थानसरकारास असावा. मुख्य सरकार हें

नोकरशाहीचें आहे आणि प्रांतिक सरकारें स्वायत्त आहेत. तेव्हां मुख्य सरकार स्वायत्त होईपर्यंत त्याचा अधिकार प्रांतिक सरकारांवर चालूं नये असेंहि आम्हास वाटतें. अशा स्थितींत गव्हर्नर-जनरल-इन्-कौन्सिल यांनीं प्रांतिक कायदेकौन्सिलांवर जे नियंत्रण ठेवावयाचें तें कानडांतील गव्हर्नर-जनरल ठेवतात त्या प्रकारचें असावें. जीं बिलें गव्हर्नर-जनरल यांच्या विचाराकरितां ठेविलेलीं असतात त्यांस त्यांनीं संमति द्यावी किंवा बारा महिन्यांच्या आंत तीं नामंजूर करावीं. गव्हर्नरस कमिटीनें शांतता राखण्याकरितां कांहीं विशिष्ट अधिकार दिले आहेत त्याअर्थी ते अधिकार चालविण्याकरितां विशेष खर्च करावा लागल्यास तो करण्याची मुखत्यारी गव्हर्नरास असावी. प्रांतिक सरकारास आपल्या प्रांताचें संरक्षण करण्याकरितां सैन्य ( लोकल आर्मी ) उभारण्याचा अधिकार असावा.

### दुसरें कौन्सिल (सेकंड चेंबर)

सध्या प्रत्येक प्रांताला एक कायदेकौन्सिल आहे. त्याच्या जोडीस आणखी एक कौन्सिल ठेवण्याची जरूरी आम्हास वाटत नाहीं. कारण तसें करण्यास बऱ्याच व्यावहारिक अडचणी आहेत. संयुक्त प्रांतास मात्र तशी अडचण नाहीं. कारण त्या प्रांतांत दुसरें कौन्सिल स्थापन करण्यास जरूर असणारा जमीनदारांचा मोठा वर्ग अस्तित्वांत आहे. म्हणून अशा प्रकारचें दुसरें कौन्सिल १० वर्षेपर्यंत संयुक्त प्रांतास देण्यांत यावें. त्यानंतर त्याचा फेरविचार व्हावा. या दोन कौन्सिलांत मतभेद झाल्यास दोघांची एकत्र बैठक करून त्याचा परिहार करावा. हिंदुस्थानसरकारची सत्ता लोकतंत्री झाली नाहीं तोंपर्यंत प्रांतांतून जो वसूल होतो तो सर्व प्रांतिक सरकारांकडेच राहावा. मात्र या वसुलांतून हिंदुस्थानसरकाराच्या खर्चाकरितां जी रक्कम देणे जरूर पडेल त्याची हिस्सेरशीने येईल ती वांटणी प्रांतिक सरकारानें दिली पाहिजे. म्हणून आमचा अभिप्राय असा आहे कीं, जकात, प्राप्तीवरील कर, आणि मिठावरील कर यासुध्दां सर्व वसूल प्रांतिक सरकारानें आपल्या ताब्यांत ठेवावा. मात्र यांतून किती रक्कम प्रांतिक सरकाराने मुख्य सरकारास द्यावी. हें ठरविण्याकरितां एक निःपक्षपाती ट्रायब्यूनल नेमण्यांत यावें. त्यांत प्रांतिक सरकार आणि मुख्य सरकार यांचे प्रतिनिधी सारखे असावेत. सध्या प्रांतिक सरकारें आपापल्या प्रांतांतील हायकोर्टावर आपली सत्ता चालवितात पण ती सत्ता यापुढें हिंदुस्थानसरकारनें चालवावी. प्रांतांस जबाबदार राज्यपध्दति मिळत असल्यामुळें त्यांचें राजकीय वर्चस्व हायकोर्टावर चालूं नये याकरितां ही व्यवस्था आहे. हायकोर्टातील दोनतृतीयांश जज्जांच्या जागा इंडियन सिव्हिल सर्व्हिसकरितां सध्या आहेत व चीफ जस्टिस हा बॅरिस्टर असला पाहिजे असें ठरलेलें आहे. ही वहिवाट यापुढें चालूं ठेवण्याचें कारण नाहीं.

### वरिष्ठ नोकऱ्या

मुंबई व मद्रास हे प्रांत खेरीजकरून बाकीच्या प्रांतांना आपल्या हद्दीतील अखिल भारतीय नोकऱ्यांपैकीं प्रांतिक नोकऱ्या किती कराव्या व भारतीय नोकऱ्या किती ठेवाव्या हें ठरविण्याची मुखत्यारी असावी. मात्र या नोकऱ्यांतून सध्या जे लोक आहेत त्यांचें संरक्षण हल्लींप्रमाणें पुढेंहि होईल. मद्रास इलाख्यांत आय. सी. एस. व पोलीस या नोकऱ्या हल्लींप्रमाण भारतीय असाव्या. पण बाकीच्या भारतीय नोकऱ्या प्रांतिक व्हाव्या. दिवाणांनीं जें धोरण ठरविलें असेल त्या धोरणाप्रमाणें भारतीय नोकरांनीं वागलें पाहिजे. तसें ते न वागतील तर दिवाणाच्या शिफारशीवरून गव्हर्नरानें दुसरे अधिकारी त्या जागीं नेमावे. गव्हर्नराची अनुमति मिळाल्यावांचून दिवाणांनीं कोणाहि प्रांतिक किंवा भारतीय अधिकाऱ्याची गैरसोय होईल, त्याचें नांव बद्द होईल किंवा त्याच्या पेन्शनास बाध येईल अशा प्रकारचा हुकूम सोडूं नये. अशा प्रकारचा हुकूम सोडल्यास ज्यांची नेमणूक आज भारतमंत्र्यानें केली आहे त्यांस त्याविरुद्ध दाद भारतमंत्र्याकडे मागतां येईल.

### मुख्य सरकार

सध्याचे हिंदुस्थान-सरकार व त्याचे असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांजबरोबर असलेले संबंध असे आहेत कीं त्यामुळें हिंदुस्थानसरकाराची सत्ता दुर्बळ झाली आहे. हिंदुस्थानसरकार हें सनदशीर रीत्या हिंदुस्थानाबाहेरच्या सत्तेस जबाबदार आहे व ते असेंब्लीस जबाबदार नाहीं. यामुळें हिंदुस्थानसरकार व असेंब्ली यांच्यांत सलोखा नांदत नाहीं. या मुख्य सरकाराची इच्छा असेंब्ली आपल्या मताप्रमाणें चालावी अशीच आहे. परंतु असेंब्लीच्या या आधारावर मुख्य सरकारास विसंबून राहतां येत नसल्यामुळें त्याची वागणूक अनिश्चित व डळमळित झाली आहे. असेंब्लीवर जबाबदारी अशी कांहींच नाहीं. तिच्यांत बहुसंख्या लोकनियुक्त सभासदांची आहे. पण तिला आपल्या इच्छेपुढें कार्यकारी मंडळास वांकवितां येत नाहीं व कार्यकारी मंडळ आपल्या सनदशीर अधिकाराच्या जोरावर असेंब्लीच्या निर्णयास झुगारून देतें. यामुळें लेजिस्लेटिव्ह असेंब्ली ही अस्वस्थ व कधीं कधीं बेफामहि बनावी हें स्वाभाविक होय. कार्यकारी

मंडळ असेंब्लीस जबाबदार नाहीं यामुळें असेंब्लीसहि आपल्यावर जबाबदारी आहे असें वाटत नाहीं. यासाठीं मुख्य सरकारास थोड्याबहुत प्रमाणांत असेंब्लीस जबाबदार केलें पाहिजे. म्हणून आम्ही असें सुचवितों कीं, हिंदुस्थानाचें संरक्षणखातें, त्याचे परराष्ट्रीय संबंध व हिंदी संस्थानिकांशीं असलेले संबंध हे वगळून बाकीचीं सर्व खातीं दिवाणांच्या ताब्यांत यावीं. आणि दिवाण हे कायदेमंडळास जबाबदार असावेत. राष्ट्रीय कर्ज, हिंदुस्थानाचा वसूल किंवा हिंदुस्थानाच्या वसुलावर एखादा नवा खर्च लादणें, धर्म अथवा धार्मिक वहिवाटी व ब्रिटिश प्रजाजनांच्या चालीरीती, हिंदुस्थानाचें संरक्षक सैन्य, आरमार व हवा खातें यांची तरतूद, परराष्ट्रीय राजांशीं व हिंदी राजेरजवाड्यांशीं सरकारचे संबंध, जें खातें मुख्य सरकाराच्या स्वाधीन नसेल ते, प्रांतिक कौन्सिलानें केलेला कायदा रद्द करणें किंवा दुरुस्त करणें आणि गव्हर्नर–जनरलानें केलेला कायदा किंवा काढलेला वटहुकूम रद्द करणें किंवा दुरुस्त करणें या बाबी मध्यवर्ती कायदेमंडळाच्या कक्षेंत येत नाहींत. प्रांतिक कारभारांतून द्विदल राज्यपद्धतीचें उच्चाटन आम्ही केलें आहे आणि मुख्य सरकारांत मात्र आम्ही द्विदलपद्धति सुरू करीत आहों, यांत कोणास विसंगतता दिसेल. पण आम्ही जीं हिंदुस्थानसरकारचीं खातीं राखीव ठरविलीं आहेत तीं इतर खात्यापासून अगदीं अलग आहेत व त्यामुळें इतर खात्यांच्या कारभारांत घोटाळा उत्पन्न होणार नाहीं. दिवाणावर सर्व खात्यांची जबाबदारी टाकणें आजच्या स्थितींत जर अशक्य आहे तर मग आम्ही सुचविलेल्या द्विदल पध्दतीशिवाय गत्यंतर नाहीं.

गव्हर्नर-जनरलाच्या मंत्रिमंडळांत दोहोंपेक्षां अधिक कार्यकारी मंत्री असूं नयेत व सहापेक्षां अधिक दिवाण असूं नयेत. मंत्री व दिवाण यांची नेमणूक गव्हर्नर-जनरलानें करावी. पण मंत्रिमंडळांतील निम्मे सभासद तरी हिंदी असावेत. एक मंत्री किंवा दिवाण कौन्सिल ऑफ स्टेटचा सभासद असावा आणि बाकीचे असेंब्लीचे सभासद असावेत. असेंब्लींत जर ते निवडून आले नसतील तर ते बाहेरचे सभासद आहेत असे समजावें. त्यांना दोनहि सभागृहांत भाषण करण्याचा हक्क असावा. पण त्यांनीं जें मत द्यावयाचें तें ज्या सभागृहाचे ते सभासद असतील त्यांतच द्यावें.

### ले. असेंब्लीचे सभासद

असेंब्लीचे सभासद ३०० असावेत. त्याशिवाय तज्ज्ञ या नात्यानें १० च सभासद नेमण्याचा गव्हर्नर–जनरलास अधिकार असावा. त्यांनीं असेंब्लींत बसावें, बोलावें पण मत देऊं नये. सात दिवाण व कार्यकरी मंत्री यांखेरीज २० सभासद नेमण्याचा अधिकार गव्हर्नर-जनरलास असावा. बाकीच्या २७३ जागा प्रत्येक प्रांतांतून निवडणुकी होऊन भरण्यांत याव्या. त्या पुढीलप्रमाणें—

| निवडणार | जागांची संख्या |
|---|---|
| हिंदु | १०४ |
| मुसलमान | ७९ |
| अस्पृश्य | १२ |
| शीख | ६ |
| युरोपियन | १७ |
| अँग्लो–इंडियन | ३ |
| हिंदी ख्रिस्ती | ३ |
| जमीन धारण करणारे | १० |
| हिंदी व्यापारी | ८ |
| असोशिएटेड चेंबर्स ऑफ कॉमर्स (युरोपियन) | ३ |
| मजूर | ५ |
| स्त्रिया | ५ |
| ब्रह्मदेश | ८ |
| सरहद्द प्रांत | ६ |
| दिल्ली | २ |
| अजमीर-मेरवाडा | २ |
| एकूण | २७३ |

युरोपियनांना स्वतंत्र मतदारसंघ असावेत. पण मजूर व स्त्रिया यांनीं समाईक मतदारसंघांतूनच निवडून यावें. पण जमीन धारण करणारे युरोपियन व्यापारी व हिंदी व्यापारी यांचे मतदारविभाग स्वतंत्र असावेत. असेंब्लीचा अध्यक्ष असेंब्लीनें आपल्या सभासदांतून निवडलेला असावा आणि असेंब्लीची मुदत पांच वर्षांची असावी. अस्पृश्यवर्ग, अँग्लो-इंडियन, हिंदी ख्रिश्चन मजूर आणि स्त्रिया यांच्या बाबतींत असें सुचविण्यांत येत आहे कीं, समाईक मतदारसंघांतून त्यांची निवडणूक करणें अडचणीचें असल्यास त्यांजकरितां अप्रत्यक्ष निवडणुकीची सवड असावी.

स्टेट कौन्सिलाचे सभासद आज ६० आहेत ते १०० व्हावे. पण त्याच्या घटनेंत फरक होऊं नये. निवडलेले व नेमलेले यांचें आज जें प्रमाण आहे तेंच पुढें कायम राहावें.

### भारतमंत्री

भारतमंत्र्यास हिंदुस्थानाकरितां कर्ज उभारण्याचा अधिकार आहे तो यापुढें हिंदुस्थानसरकारास मिळावा. हिंदुस्थान–सरकारानें कर्ज उभारण्याचें कार्य आपल्या इच्छेस येईल त्याकडून घडवून आणावें. नोकरींत भरती करावयाची ती करण्याचा अधिकार हिंदुस्थानसरकाराकडे किंवा प्रांति-

कसरकाराकडे असावा. तें कार्य त्यांनीं आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें करावें. राष्ट्रसंघासारख्या आंतरराष्ट्रीय संस्थांस हिंदी प्रतिनिधी पाठवावयाचे ते हिंदुस्थान-सरकारनें पाठवावे. ते भारतमंत्र्यानें पाठवूं नये. सर्व खातीं जबाबदार मंत्रिमंडळाकडे दिलीं गेलीं असल्यामुळें भारतमंत्र्यांस प्रांतिक कारभारांत ढवळाढवळ करण्याची सत्ता मर्यादित असावी. भारतमंत्र्याचें कौन्सिल रद्द करण्यांत यावें. तें जर जिवंत राखावयाचें असेल तर त्यांतील निम्मे सभासद हिंदुस्थानाच्या मुख्य कायदेमंडळांतून निवडून घेतलेले असावेत. भारतमंत्र्यांच्या मदतीस दोन हिंदी अंडर सेक्रेटरी असावे. त्यांपैकीं एकास पार्लमेंटांत बसतां यावें. हिंदुस्थानास डोमीनियन स्टेटस मिळाल नाहीं तोंपर्यंत हिंदुस्थानाची बाजू पार्लमेंटांत मांडली गेली पाहिजे व ती हिंदी प्रतिनिधीकडून मांडली गेली पाहिजे.

## स्कीन कमिटीचा रिपोर्ट

हिंदुस्थानांत लष्करी कॉलेज तावडतोब काढण्यांत यावें व स्कीन कमिटीच्या इतर सर्व शिफारशी अमलांत याव्या. हिंदुस्थानांत सुप्रीम कोर्टाची स्थापना झाली पाहिजे अशी आमची खात्री पटली आहे. या कोर्टास प्रांताप्रांतांतील वादग्रस्त प्रश्न किंवा प्रांत व मुख्य सरकार यांमधील वादग्रस्त प्रश्न यांचा निर्णय करण्याचा अधिकार असावा हिंदुस्थानसरकाराच्या कायद्यांत हिंदी लोकांचे मूलभूत हक्क पुढीलप्रमाणें नमूद करण्यांत यावेः– बादशहाचा हिंदुस्थानांतील कोणताहि प्रजाजन धर्मानें, जन्मानें, रंगानें, किंवा जातीनें अमुक प्रकारचा आहे, म्हणून त्यास अमुक एका सरकारी जागेवर नेमण्यास प्रतिबंध असूं नये. त्यास कोणताहि व्यापारधंदा करतां यावा, हक्क, पदवी जिंदगी संपादितां यावी, सरकारी पैशांतून चाललेल्या कोणत्याहि संस्थेंत प्रवेश मिळावा, सार्वजनिक रस्ते विहिरी व इतर जागा त्यास वापरतां याव्या. या हक्कांविरुध्द जर कांहीं हुकूम, कायदे आज आस्तित्वांत असतील तर ते यापुढें रद्द समजावेत. मित्र शेतकऱ्यांच्या हितसंरक्षणार्थ पंजाब लँड एलिनिएशन कायद्यासारखे जे कायदे केले असतील ते अपवाद समजावे.

## शेवटचा इषारा

पूर्ण डोमीनियन स्टेटस हें हिंदुस्थानाचें ध्येय आहे असें ब्रिटिश पार्लमेंटांनें स्पष्टपणें जाहीर करावें. प्रांतांना उदार मनानें स्वायतत्ता देऊन व हिंदुस्थान-सरकार कायदेमंडळास जबाबदार ठेवून डोमीनियन स्टेटसचा टप्पा बराच गांठला जावा. तसेंच हिंदुस्थानसरकाराच्या कायद्यांत असेंहि नमूद केलेलें असावें कीं, यापुढें कमिशनें किंवा इतर कोणत्याहि संस्था न नेमतां हिंदुस्थानास आपलें ध्येय गांठता यावें. आम्ही जो मार्ग दाखविलेला आहे त्या मार्गानें हिंदुस्थानाची प्रगति होणें व हिंदी लोकांनीं आजपर्यंत केलेल्या चळवळीस ब्रिटिश सरकारानें शरण जावें या दोहोंच्या दरम्यान मुक्काम करावयास धर्मशाळाच नाहीं, अशी आमची खात्री झाली आहे. आम्ही आपलें म्हणणें अत्यंत स्पष्टपणानें व जोराने मांडलें आहे. त्याचें कारण असें कीं, हिंदुस्थानांतील अधिक शहाणा व अधिक जबाबदार वर्ग आपल्या निशाणाखालीं गोळा करण्याची ब्रिटिश सरकारास ही शेवटची संधि आहे. इतिहासाच्या शिकवणीकडे डोळेझाक करून ब्रिटिश सरकार आलेली संधि गमावाल असें आम्हास वाटत नाहीं. त्यांनीं दूरदृष्टीनें व व्यापक मुत्सद्दीपणानें सर्व गोष्टींचा विचार करून आजपर्यंत हिंदुस्थानांत ब्रिटननें जें महत्कार्य केलें आहे त्यावर कळस चढवावा.

या रिपोर्टावर कमिटींतील किकाभाई प्रेमचंद याखेरीज बाकीच्या सर्व सभासदांच्या सह्या आहेत. इतरांनींहि आपल्या भिन्न मतपत्रिका जोडल्या आहेत. मुख्य रिपोर्ट ७२ पानांचा आहे आणि या भिन्नमतपत्रिकांनीं ३४८ पानें व्यापलीं आहेत.

# व्हाइसरॉयांच्या गाडीवर बाँब

दक्षिण हिंदुस्थानांतील संस्थानिकांना भेटी देत व त्यांचा पाहुणचार घेत व्हाइसरॉयसाहेब दिल्लीस परत निघाले असतां ता. २३ रोजीं त्यांच्या गाडीवर एक बाँब फेंकण्यांत आला. परंतु सुदैवानें व्हाइसरॉयांना लवमात्र दुखापत झाली नाहीं. सकाळीं आठाचा सुमार होता व दिल्लीभोंवतीं धुकें दाटलें होतें. अशा स्थितींत निझामुद्दीन व नवी दिल्ली या दोन स्टेशनांचे दरम्यान बाँबचा स्फोट झाला. तो इतका न कळत झाला कीं, कर्नल हार्वे यानें वर्दी देईपर्यंत व्हाइसरॉयांना त्याची कल्पनाहि नव्हती. ज्यांनीं बाँबचा आवाज ऐकला त्यांनींहि तो धुक्यांतील बारांचा किंवा सलामीच्या तोफांचा असेल अशी अटकळ बांधली. हा अपघात झाला तरी गाडी न थांबतां नव्या दिल्लीला ठरलेल्या वेळेसच पोंचली, आणि नंतर व्हाइसरॉयांनीं

तेथल्या म्युनिसिपालिटीच्या मानपत्र--समारंभांत भागहि घेतला.

ज्या एका किंवा अनेक व्यक्तींनीं हें आततायी वर्तन केलें असेल त्यांचा कोणालाहि संतापच येईल, हें खरें. परंतु त्या वर्तनांत जी हुशारी व चलाखी दिसून येते ती पाहून कोणीहि तोंडांत बोटच घालील. पहिली गोष्ट म्हणजे हा अपघात नव्या दिल्लीपासून अवघ्या दोन मैलांचे अंतराबर घडला म्हणजे राजधानीच्या बंदोबस्तांतहि अत्याचाराला प्रवेश करण्याएवढें बिळ मिळालें. बॉंब रुळावर ठेवला असून त्याचा संबंध एका तारेनें ज्या बॅटरीशीं जोडण्यांत आला होता ती रुळापासून फक्त दोन--तीनशें यार्डांच्या अंतरावरच होती. तसेंच पुरोगामी एंजीन पुढें निघून गेले तव्हां बॉंब नव्हता आणि त्यानंतर केवळ पंधरावास मिनिटांनीं व्हाइसरॉयांची स्पेशल येतांच धूमधडाका उडाला. इतकी खबरदारी घेतली तरी अत्याचाऱ्याच्या हातून एक चूक झाली व तिनेच व्हाइसरॉयांचा बचाव केला. ती म्हणजे सदर बॉंब व्हाइसरॉयांच्या डब्याखाला न उडतां त्या डब्यापुढचे तीन डबे टाकून उडाला. ज्या डब्याखालीं बॉंबचा स्फोट झाला त्याचा बरीच खराबी झाली असून काचेच्या खिडक्या फुटून गेल्या आणि एक नोकर जखमी झाला.

### अत्याचारानंतर

बरोबर सतरा वर्षांपूर्वी याच दिवशीं माजी व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांनीं दिल्लीस प्रवेश करण्याचे वेळीं असाच बॉंब टाकण्यांत आला होता. या अत्याचाऱ्यांचा तीव्र निषेध हिंदी पुढाऱ्यांनींहि लाहोर, दिल्ली वगैरे शहरीं केला. इंग्लिशमनसारख्या पत्रांना तर आतां ठिणगीचा वणवा करून आग पाखडावयास चांगली संधि सांपडली आहे! डेली टेलिग्राफनें तर चौकशीच्या आधींच या प्रकरणाचे घोंगडें हिंदुस्थान सोशॅलिस्ट आर्मीच्या गळ्यांत बांधून टाकले! अशा आग भडकविणाऱ्या उपद्व्यापी लोकांनीं व्हाइसरॉयांचा उपदेश ध्यानीं धरावा. बादशहांना पाठविलेल्या तारेंत व्हाइसरॉयांनीं विनंति केली आहे कीं, या अत्याचाराच्या फुगवून बातम्या कानावर येतील त्यामुळें चित्ताचें स्वास्थ्य ढळूं देऊं नये.

### चौकशी, अटक, वगैरे

या इषाऱ्यावरून इतर अधिकाऱ्यांनींहि शांत वर्तन ठेवणें जरूर आहे. पोलीस--तपास जारीनें चालू आहे. अत्याचाराची जागा पोलिसांनीं आपल्या ताब्यांत घेतली आहे. गुप्त पोलिसांनींहि आपलें जाळें पसरलें आहे. आणि रसायनशास्त्रज्ञ व हस्तमुद्राशास्त्रज्ञ हेहि दिल्लीला दाखल झाले आहेत. आतांपर्यंत पोलिसांनीं सात असामींना अटक केली आहे. त्यांत राष्ट्रीय सभेचे दोन स्वयंसेवक आहेत व एक जतींद्रदासाचा भाऊ आहे. पकडलेल्या इसमांना प्रत्येकीं पांच हजारांचा जामीन घेऊन ता. २६ रोजीं सोडून देण्यांत आलें आहे. अत्याचारी माणसाला यथायोग्य शिक्षा झालीच पाहिजे, त्याचप्रमाणें संन्यासी सुळावर जाणार नाहीं याबद्दलहि सरकारने सावधगिरी बाळगली पाहिजे.

# तुमची स्वराज्यटना आधीं राष्ट्रापुढें मांडा

यंदाचा कॉंग्रेसचा कार्यक्रम हिंदी राजकारणांत कांहीं तरी वादळ निर्माण करील अशीं स्वप्नें पूर्वीपासून पडत होतीं. त्यांतून ज्या वेळीं म. गांधींनीं व सरदार वल्लभभाई पटेल यांनीं कॉंग्रेसचें अध्यक्षपद स्वीकारण्याचें नाकारलें आणि अध्यक्षाच्या मानाची माळ जवाहरलाल नेहरू यांच्या गळयांत पडली, त्या वेळीं तर हें वादळ निश्चितपणें येणार, एवढेंच नव्हे तर तें तुफान-वेगानें येणार असेहि वाटूं लागलें. तथापि ज्या जहाजाचीं नांगर, सुकाणू, शीड इत्यादि साधनें बळकट व कार्यक्षम असतात त्या जहाजाला जशी तुफानाचीहि तादृश भीति नसते त्याप्रमाणेंच वसाहतीच्या स्वराज्याचें ध्येय, नेहरू रिपोर्टाचें साधन आणि अनत्याचारी बहिष्काराची प्रेरक शक्ति इत्यादि साधनें कायम असल्यास राष्ट्रीय सभेलाहि क्रान्तिरूपी वादळाची भीति बाळगण्याचें कारण नाहीं असें वाटत होतें, परंतु व्हाइसरॉयाशीं होणारी तडजोड फिसकटल्यामुळें या तुफानी वादळांत कॉंग्रेसरूपी जहाजाचीं नांगर, सुकाणू, शीड इत्यादि साधनें तरी जाग्याला टिकतात का नाहीं याची शंकाच वाटूं लागली असून या वादळाचा आपल्या भावी राज्यघटनेवर कोणता परिणाम होईल त्याचा आतांच तर्क करवत नाहीं.

पं. जवाहरलाल नेहरू यांचें भाषण, ते स्वतःला सोशॅलिस्ट म्हणवून घेत असल्यामुळें, सोशॅलिस्टांच्या कार्यक्रमाच्या स्वरूपाचे असेंच झालें आहे. त्यांच्या या सोशॅलिस्ट पक्षाच्या कार्यक्रमांत मजूर संघ, ट्रेड यूनिअन कॉंग्रेस, करबंदीची चळवळ, सार्वत्रिक संप इत्यादि साधनांवर भर असणार हें उघड आहे; व त्याप्रमाणें जवाहरलाल यांच्या भाषणांत तो आहे. पण त्यांच्या या सोशॅलिस्ट धोरणामुळेंच त्यांना डोमीनियनस्टेटसहि अमान्य आहे व नेहरू रिपोर्टहि अमान्य आहे ! नेहरू रिपोर्टांत भांडवलशाहीविरुध्द व जमीनदाराविरुध्द मोहीम नसून त्यांच्या हक्कांची त्यांत हमी घेतलेली आहे. आणि डोमीनियन स्टेटस मान्य केल्यास ब्रिटिश राज्यपध्दतीला मान्यता दिल्याप्रमाणें होतें व ब्रिटिशांची सध्याची राज्यपध्दति तर सोशॅलिझमच्या विरुध्द आहे म्हणूनच त्यांना नेहरू रिपोर्टहि नको व डोमीनियन स्टेटसहि नको ! परंतु ऑ. इं. कमिटींत ज्यांनीं डोमीनियन स्टेटसविरुध्द मत दिलें व स्वातंत्र्य हेंच कॉंग्रेसचें ध्येय असावें असें म्हटलें त्या सर्वांना स्वातंत्र्य आणि सोशॅलिझम या दोहोंतला फरक लक्षांत आला असेल कां नाहीं याची शंकाच वाटते.

तुम्ही गुलामगिरी पत्करणार का स्वातंत्र्य मिळविणार असा वाकिली पेंचाचा प्रश्न पुढें टाकल्यास मी गुलामगिरी पत्करतों असें कोणीहि म्हणणार नाहीं, व प्रत्येकजण मला स्वातंत्र्य पाहिजे असेंच म्हणेल हें उघड आहे. पण तेवढ्यावरून प्रत्येकानें डोमीनियन स्टेटस सोडून सोशॅलिस्ट राज्यपद्धती मान्य केली असा त्याचा अर्थ होत नाहीं; कारण वरील प्रश्नांत डोमीनियन स्टेटस म्हणजे गुलामगिरी आणि स्वातंत्र्य म्हणजे सोशॅलिस्ट राज्यपध्दती असें जे समीकरण गृहीत धरलें गेलें आहे तेंच मुळांत खरें नसून त्यांत शब्दच्छल आहे. आजमितीला स्वायत्त ब्रिटिश वसाहतींना जेवढे हक्क मिळाले आहेत तेवढे हक्क हिंदुस्थानास ताबडतोब प्राप्त झाल्यास त्या योगानें हिंदुस्थान देश आजच्यासारखाच गुलामगिरींत खितपत राहिल्याप्रमाणें होईल असें म्हणणें हा केवळ वस्तुस्थितीचा विपर्यास होय. आज कानडा देश आपल्याला गुलाम असें समजत नाहीं, आस्ट्रेलिया तसें समजत नाहीं किंवा दाक्षिण आफ्रिकाहि तसें समजत नाहीं. आणि आजमितीला ब्रिटिश साम्राज्याचें म्हणून जें कांहीं बंधन त्या वसाहतींवर आहे तें यापुढें अधिक बळकट तर व्हावयाचें नाहींच; पण आज आहे तेवढेंहि यापुढें कायम राहणार नसून तें दिवसेंदिवस ढिलेच होत जाणारें आहे. अशा परिस्थितींत डोमीनियन स्टेटस म्हणजे गुलामगिरी असलें समीकरण वस्तुस्थितिनिदर्शक खास नव्हे.

वसाहतींचें स्वराज्य आपण कां अमान्य करतें. याचें एक कारण म्हणून अध्यक्ष जवाहरलाल नेहरू यांनीं असें सांगितलें कीं, वसाहतीच्या दर्जानें या देशाचें द्रव्यशोषण थांबणार नाहीं, आणि आपला आर्थिक ऱ्हास असाच चालू राहील! वास्तविक पाहतां वसाहतीचा दर्जा आणि आर्थिक दृष्टीनें द्रव्यशोषण यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. आज हिंदुस्थानाचें जें द्रव्यशोषण होत आहे तें या देशाला 'वसाहतींचें स्वराज्य' नाहीं आणि आर्थिक स्वातंत्र्य देखील नाहीं म्हणून होत आहे. ब्रिटिश साम्राज्यांत ज्या वसाहतींना स्वायत्तता मिळाली आहे त्या वसाहतींपैकीं कोणत्या तरी वसाहतीची 'द्रव्यशोषणा' बद्दल तक्रार राहिली आहे काय? वसाहतीच्या दर्जांत सक्तीचें असें आर्थिक बंधन कोणतेंच राहात नाहीं. अर्थातच डोमीनियन स्टेटस मान्य केल्यास द्रव्यशोषण कायम राहील म्हणून डोमीनियन स्टेटस नको अशी कार्यकारणपरंपरा जोडणें हें जाणूनबुजून

वस्तुस्थितीचा विपर्यास करून श्रोत्यांचें मन कलुषित करण्यासारखें आहे.

वसाहतीचा दर्जा मान्य केल्यास परकीय सैन्य आमच्या देशांत कायम राहील असाहि एक आक्षेप पं. जवाहरलाल यांनीं आपल्या भाषणांत उपस्थित केला आहे; पण तोहि वरच्या आक्षेपासारखाच निर्मूल आहे. स्वायत्त वसाहतींत इंग्लंडचें सैन्य राहिलें पाहिजे असा निर्बंध कोणत्याहि कायद्यांत नाहीं, आणि आजमितीला कोणत्याहि स्वायत्त वसाहतींत ब्रिटिशांचें सैन्य त्या वसाहतीच्या इच्छेविरुद्ध असें ठेवलेलें नाहीं. हिंदुस्थान देश आजच आत्मसंरक्षणक्षम आहे कां नाहीं आणि तो जर तसा समर्थ व स्वावलंबी नसेल तर त्यानें कोणत्या सैन्याची मदत तूर्त घ्यावी हा प्रश्न केवळ हिंदी लोकांच्या मर्जीवर अवलंबून राहाणारा आहे. वसाहतीचा दर्जा मान्य केला कीं, त्या बरोबर आमच्या डोक्यावर ब्रिटिश लष्कर सक्तीनें लादलें जातें असा त्या दोहोंत कार्यकारण संबंध बिलकुल नाहीं. तो केवळ खुषीचा अगर आपल्या सोयीचा प्रश्न आहे.

पण तेंहि एक वेळ असो. सोन्याची सांखळी झाली तरी बंधन तें बंधनच; या दृष्टीनें ब्रिटिश साम्राज्याचा तेवढा देखील धागादोरा आपल्या भोवतीं असूं नये असा ज्यांचा कटाक्ष असेल त्यांच्या निर्भेळ स्वातंत्र्यवादाबद्दल कोणासहि आदरच वाटेल आणि फार तर तें परमोच्च ध्येय आजच गांठण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे कां नाहीं एवढाच वादाचा मुद्दा राहूं शकेल.

पण निर्भेळ स्वातंत्र्य पुकारले तरी राष्ट्राला राज्यघटना ही अवश्य लागतेच. यास्तव नेहरू रिपोर्टांतील राज्यघटना अमान्य करणाऱ्यांस आमचें पहिलें आग्रहाचे असें सांगणें आहे कीं, तुमची स्वराज्याची योजना कोणती ती तरी पुढें येऊं द्या; ती पुढें आल्यावर मग तिला कितपत पाठबळ मिळतें आणि किती विरोध होतो तें समजूं शकेल. आज तयार असलेली आणि राष्ट्रांतील बहुजन समाजास मान्य झालेली नेहरू योजना तुम्ही धुडकावून देत आहां; पण तिच्या जागीं दुसरी कोणती योजना मांडावयाची तिची विधायक कल्पना न देतां नुसतेंच विघातक ठराव करतां, त्यामुळें राष्ट्राची दिशाभूल होत आहे. मोठ्या नेहरूंची 'स्कीम' नको असेल तर छोट्या नेहरूंची 'स्कीम' कशी काय आहे ती तरी समजूं द्या. नवी स्कीम पुढें येऊन ती सर्वमान्य होण्यापूर्वीच जुनी स्कीम धुडकावून लावणें आणि मोघम 'स्वातंत्र्य' जाहीर करणें हें जहाजाच्या सुरक्षिततेचें नवें साधन निर्माण करण्यापूर्वींच त्याचा जुना नांगर तोडून टाकण्यासारखें आहे. त्या योगानें तें जहाज 'स्वतंत्र' होईल खरें; परंतु वादळाच्या तडाक्यांत सांपडून तें कोणत्या खडकावर केव्हां आपटेल याचा मात्र नेम नाहीं !

अध्यक्ष जवाहरलाल नेहरू यांचा मुख्य कटाक्ष भांडवलशाहीविरुद्ध आहे; परंतु त्या भांडवलशाहीचा संबंध त्यांनीं डोमीनियन स्टेटसशीं कां जोडावा हेंच समजत नाहीं. भांडवलवाले व मजूर यांच्या हितसंबंधांत एवढें अहिनकुलवत् शत्रुत्व असलेंच पाहिजे हें तत्त्वच आधीं चुकीचें आहे. उद्योगधंद्यांची अशी योजना करतां येणें शक्य आहे कीं, ज्या योगानें कारखानदार व मजूर या उभयतांचीहि भरभराट होऊं शकेल. हेन्री फोर्ड यानें अशा प्रकारचा प्रयत्न प्रत्यक्ष यशस्वी करून दाखविला आहे. परंतु हा अर्थशास्त्रांतील वादग्रस्त मुद्दा सध्या सोडून दिला तरी पं. जवाहरलाल यांना एवढें विचारणें प्राप्त आहे कीं, भांडशाहीविरुध्द मजूर हा तंटा देशाच्या स्वातंत्र्यावर किंवा गुलामगिरीवर अवलंबून नसतांना सध्यांच्या वादांत तो तुम्ही पुढें कां आणतां! जर्मनी, फ्रान्स, इंग्लंड, इटाली, अमेरिका इत्यादि देश तरी पूर्ण स्वतंत्रच आहेत ना ! मग त्या देशांत देखील हा वाद मिटलेला नाहीं; आणि रशियांत देखील हा नवा प्रयोग यशस्वी झाला आहे असेंहि अद्यापि म्हणवतें नाहीं. मग पारतंत्र्यांतून स्वातंत्र्य कसें मिळवावयाचे यांच्या वादांत भावी राज्यपध्दतींतील संभवनीय किंवा असंभवनीय अशा वादाचे मुद्दे तुम्ही निष्कारण का घुसडून देतां? रशियांतील झारशाहीच्या जुलमांतून सुटण्याचा प्रयत्न करीत असतांना लेनिन सारखा एक नवा ध्येयवादी पुढें आला, व त्यानें रशियांतील स्वातंत्र्याबरोबरच येथें कम्यूनिस्ट पध्दतीहि चालू केली. पण तेवढ्यानें कम्युनिस्ट पध्दती व स्वातंत्र्य यांचें नुसतें साहचर्य देखील प्रस्थापित होत नाहीं, मग त्यांच्यांतला कार्यकारण भाव प्रस्थापित होणें तर दूरच राहिलें! इंग्लंडच्या मगरमिठींतून आयर्लंड सुटलें, मांच्यू घराण्याच्या तडाक्यांतून चीन देश मुक्त झाला, आस्ट्रियाच्या कचाटींतून इटाली बाहेर पडला, पराजित बोअर राष्ट्रानें स्वायत्त वसाहतीचा दर्जा प्राप्त करून घेतला, पण त्यांतून कोणत्याहि एका राष्ट्रास कम्यूनिस्ट पद्धतीचा अवलंब करण्याची गरज पडली नाहीं. यास्तव हिंदुस्थानाच्या बाबतींतहि स्वातंत्र्य प्राप्तीच्या उपायांत कम्यूनिझमच्या अद्यापि अयशस्वी प्रयोगावस्थेंत असलेल्या राज्यघटनेला स्थान अवश्य दिलेंच पाहिजे असें कांहीं ठरत नाहीं; आणि कम्युनिस्ट राज्यपद्धती नको याचा अर्थ गुलामगिरी हवी असाहि होऊं शकत नाहीं.

ध्येयासिद्धीच्या साधनासंबंधानें अद्यापि ऑ. इं.



पं. जवाहरलाल नेहरू

४४ व्या हिंदी राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष (पृ. ५०७)

कॉं. कमिटींत व खुद्द राष्ट्रीय सभेच्या बैठकींत वादविवाद होऊन निर्णय ठरावयाचा आहे. तो निर्णय झाल्यावर त्यांतील विशिष्ट साधनांच्या युक्तायुक्तते संबधानें चर्चा करूं; परंतु ज्या अर्थी डोमीनियन स्टेटस नाकारून 'स्वातंत्र्य' जाहीर होणार आणि मोतिलाल नेहरूंचा राज्यघटनेचा रिपोर्ट झिडकारला जाणार हें उघड दिसत आहे त्याअर्थी तुमची तरी राज्यघटना कोणती ती एकदां ठरवा आणि प्रसिद्ध करा अशी मागणी करण्याचा राष्ट्रास हक्क आहे. नेहरू रिपोर्टांत अमुक दोष आहेत आणि तमुक गुण नाहींत किंवा त्या योगानें अमक्यांचें समाधान होत नाहींत, हें म्हणणें सोपें आहे. पण ज्या राज्यघटनेला हिंदुस्थानांतील जनतेकडून इतका तरी पाठिंबा मिळेल आणि जिच्या योगानें कोणताहि एखादा मोठा वर्ग नाखूष होणार नाहीं, अशी राज्यघटना ठरविणें तितकेसें सोपें नाहीं, यास्तव पं. जवाहार लाल नेहरू यांस आमची अशी सूचना आहे कीं, त्यांनीं आपल्या स्वराज्यघटनेची सविकल्प योजना तयार करून ती राष्ट्रापुढे मांडावी आणि त्या योजनेवर मते घ्यावीं. नुसता मोघम 'डोमीनियन स्टेटस विरुद्ध स्वातंत्र्य' असला शाब्दिक वाद घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं. राष्ट्राला निर्भेळ स्वातंत्र्य मिळालें तरी त्याला राज्यघटना आवश्यक आहेच. तेव्हां तुमची जी कोणती स्वराज्यघटना असेल ती राष्ट्रापुढें तरी येऊं द्या.

# राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांचें भाषण

ता. २९ रोजीं लाहोर येथें राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदावरून पं. जवाहिरलाल हिंदींत म्हणाले-

"यापुढें जगाच्या भवितव्यतेचीं सूत्रें आशिया आणि अमेरिका यांच्या हातांत खेळत राहाणार असून त्यांत हिंदुस्थानाला बराच मोठा वांटा उचलावा लागणार आहे. हिंदुस्थानापुढें स्वतःचे असे कांहीं बिकट प्रश्न असले तरी जगाच्या हालचालीकडे त्यानें दृष्टि लावली पाहिजे. नाहीं तर त्याचें नुकसान होणार आहे.

### जातिभेदाचा प्रश्न कसा सोडवावा !

जातिभेदाचें जें संकट आज हिंदुस्थानापुढें आ करून उभे आहे त्याचा परिहार हिंदु स्थानचे सामाजिक व आर्थिक प्रश्न सोडविण्यानें आपोआप होण्यासारखा आहे. वास्तविक आतां काळ असा आला आहे कीं, हिंदुस्थानांतील भेदभावांना केव्हांच समाधि मिळालेली आहे; आज जर कांहीं धुगधुगीपणा असेल तर एकमेकांबद्दल साशंकवृत्ति, अविश्वास व भीति. सध्यांच्या वैमनस्याचें बीज वरील भावनांतच सांपडतें हा अविश्वास व भीति नष्ट करण्याचे कामीं शांतपणें युक्तिवाद करीत बसणें निष्फळ आहे. निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांनीं परस्परांबद्दल विश्वास बाळगला पाहिजे आणि आदर्यानें जातिद्वेषाला जिंकलें पाहिजे. नाहीं तर आपली अशी इच्छा आहे काय कीं, ज्या उपऱ्या व परक्या लोकांनीं स्वातंत्र्याच्या आद्य हक्कावर 'मूले कुठार' घातला, त्यांचेकडून आपल्या चिल्लर हक्कांचें रक्षण व्हावे? अल्पसंख्याक लोक हेकाच धरून बसले तर त्यांचे हक्क बुडविणें कोणालाच शक्य नाहीं; उलट कायदेमंडळांत दोनचार जागा अधिक मिळाल्या म्हणजे त्यांच्या हक्कांचें रक्षण होईल असेंहि नाहीं. आज साऱ्या जगांत काय स्थिति आहे पाहा. सत्ता व धन यांची मालकी अल्पसंख्याकांकडेच नाहीं काय? आणि ते बाकीच्या बहुजनसमाजावर वर्चस्व गाजवित नाहींत काय! हिंदुस्थान स्वतंत्र झाला म्हणजे सत्ता हिंदूंच्याच हातीं खेळत राहणार हि गोष्ट स्पष्ट आहे. म्हणूनच माझ्या शीख व मुसलमान बंधूंना माझें असें सांगणें आहे कीं, बुद्धिवाद सांगत बसूं नका, निषेध करीत, जाऊं नका, तर तुम्हांला जे हवे असतील ते हक्क उचलीत जा.

### तडजोडीचें नाटक

आतां असा समय खचित येऊन ठेपला आहे कीं, जेव्हां आपण सर्वपक्षीय रिपोर्ट एका बाजूला ठेवून स्वातंत्र्याच्या ध्येयाकडे धांव ठोकली पाहिजे. राष्ट्रसभेच्या गेल्या बैठकींत ठरविल्याप्रमाणें आपण एक वर्षभर दम धरला; आतां स्वातंत्र्य पुकारणं व त्याचीं साधनें ठरविणें हें क्रमप्राप्त झालें आहे. नुकतेंच एक समेटाचें नाटक करण्यांत आलें होतें. ब्रिटिश सरकारच्या वतीनें व्हाइसरॉयानें राउंड टेबल कान्फरन्सचा पुकारा केला. ब्रिटिशाच्या ठकबाजीचा आम्हांला आजवर पुरा अनुभव असल्यानें व्हाइसरॉयाच्या आमंत्रणाचा स्वीकार करणें या विचारानें आमचें चित्त व्यथित झालें! व्हाइसरॉयांची सारी भाषा गुळमुळीत होती, आणि प्रत्यक्ष कृतीचें निश्चित अभिवचन असें कोणतेंच नव्हतें. कलकत्त्याच्या ठरावाला उत्तर म्हणून तें आमंत्रण मानतां आलें तर येईल. त्या आमंत्रणाचा अंगीकार करणाऱ्या शांति–प्रेमी पुढाऱ्यांनीं त्ययार्धेचें धोरण मनांत बाळगलें होतें; तरी त्यांनीं हें बरें केलें कां वाईट

केलें हें अद्याप मला समजत नाहीं. आमच्यांत फूट पडून आम्हाला भलत्या दिशेला लावावयाचें असा इंग्रजांचा डाव होता असें मला वाटते. पण समेट करण्याचे सदिच्छेनें वाटाघाटी चालू झाल्या, पार्लमेंटांत पुनः स्पष्टीकरणें झालीं, वर्किंग कमिटीनेंहि आवक-जावकांची वाहतुक सुरू ठेवली आणि निश्चित निर्णय करण्याची जबाबदारी राष्ट्रीय सभेच्या शिरावर टाकली. बेनसाहेब तर इंग्रजांच्या सचोटीची ग्वाही देत होते; आणि हिंदुस्थानांत वसाहतींचे स्वराज्य नांदत आहे असें ठांसून सांगत होते; पण या शब्दजालांत काडीचेंहि सत्य नव्हतं. आम्ही लंडनमध्यें हायकमिशनर हिंदी ठेविले, आणि राष्ट्रसंघावर हिंदी प्रतिनिधी पाठविले; आम्ही हिंदी लोकांच्या हातांत सामानखरेदी ठेविली आणि आम्ही हिंदी गव्हर्नर नेमले इत्यादि बेन साहेबांच्या बढाया फोल आहेत. असल्या अधिकाराची आम्ही कधींच मागणी केली नव्हती. हे पोकळ अधिकार म्हणजे खरी सत्ता नसून तिची निर्जीव छाया आहे! दोन चार अधिकारांच्या तुकड्यांसाठीं आम्ही लालचावलेले नसून आम्हांला सध्याचें द्रव्य-शोषण बंद व्हावयास व स्वातंत्र्याचा अंमल सुरू व्हावयास पाहिजे. गेल्या दहा वर्षांत ब्रिटिशांनीं हिंदुस्थानचें किती कोटकल्याण केलें, याच्या तपाशिलाची लांबलचक याद बेनसाहेबांनीं दिली आहे; परंतु पंजाबांतील तो लष्करी कायदा जालियनवाला बागेतील ती कसाबकत्तल आणि सतत चालू असलेली जुलमजबरदस्ती व आर्थिक शोषण यांची त्यांना याद नव्हती काय? वसाहतीच्या स्वराज्याच्या नांवाखालीं आम्हाला अधिक काय मिळणार हें त्यांच्या भाषणांत ध्वनित आहे. मूठभर हिंदी माणसांना पोकळ अधिकार व बाकीच्यावर जुलूम-लूट यांचा वरवंटा हीच वसाहती स्वराज्याची फलश्रुति दिसते!

## स्वातंत्र्याशिवाय तरणोपाय नाहीं

अशा स्थितींत या राष्ट्रीय सभेनें काय करावें? सहकार्य करण्यासारखी परिस्थिति नाहीं. स्वातंत्र्यप्राप्तीच्या निश्चित अभिवचनाशिवाय आपण सहकारितेसाठीं आपला हात पुढें करूं शकूं काय? आपले सहकारी लोक कारागृहांत जखडले असतांना समेटाच्या मृगजळामागें आपण धांवत जावें काय? समेटाची भाषा संगिनीच्या टोकानें कधींहि लिहिली जात नाहीं.

कलकत्त्याचा ठराव जर आपल्याला मान्य असेल तर स्वातंत्र्याशिवाय आपल्याला दुसरें ध्येयच उरत नाहीं. सध्यांच्या सुधारलेल्या काळांत स्वातंत्र्य शब्द कांहींना रुचण्यासारखा नाहीं. कारण स्वातंत्र्यांतून एकलकोंडेपणाचा व विभक्तपणाचा ध्वनि निघतो. हा ध्वनि जागतिक ऐक्याशीं विसंवादी ठरतो हें खरें; पण आमचा स्वातंत्र्याचा अर्थ इतर राष्ट्रांशीं फटकून राहणें असा मुळींच नसून ब्रिटिशांच्या साम्राज्यसत्तेपासून मुक्त होणें एवढाच आहे. हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळालें म्हणजे मग तो सर्व राष्ट्रांच्या ऐक्याला व सहकार्याला विरोध न करतां लावील, किंबहुना त्याच्या सिद्धीसाठीं स्वतःच्या कांहीं हक्कांचेंहि बलिदान करील. या ब्रिटिश साम्राज्यासाठीं मात्र तसें आम्ही करणार नाहीं. कारण या साम्राज्याच्या पायाखालीं लक्षावधि लोकांचे हक्क पुरले गेले आहेत!

स्वातंत्र्य म्हणा, कीं वसाहती स्वराज्य म्हणा, शब्दांसाठीं भांडण नको, खरी सत्ता आम्हाला हवी. ही खरी सत्ता म्हणजे सैन्य व तिजोरी यांवर परकीयांचा ताबा नसणें. या दोन सत्ता-केंद्रावरच आपली नजर खिळली पाहिजे. म्हणून आज आपण संपूर्ण स्वातंत्र्यासाठीं सज्ज होऊं या. ब्रिटिश पार्लमेंटानें आम्हांस कांहीं हक्क द्यावे असा या राष्ट्रीय सभेनें तिचा अधिकार कधींच कबूल केला नाहीं. आणि करणारहि नाहीं. आम्हांला ब्रिटिश पार्लमेंटची आर्जवें करावयाचीं नाहींत; तर सर्व जगाला आम्ही असें जाहीर करीत आहों कीं, अतःपर हिंदुस्थान पारतंत्र्यांत राहाण्यास तयार नाहीं ही आमची इच्छा सफळ करण्याचें सामर्थ्य आम्हाला आज येवो किंवा उद्यां येवो.

आपल्यापुढें तीन महत्वाचे प्रश्न उभे आहेत. अल्पसंख्याकांसंबंधीं मी आरंभीं विवेचन केलेंच आहे. तरी मला असें पुनः सांगावेंसें वाटतें कीं, आपण त्यांना आपल्या शब्दांनीं व कृतींनीं त्यांच्या संस्कृतीची सुरक्षितता पटवून देणें अगत्याचें आहे. दुसरा प्रश्न संस्थानांचा असून मजूर व शेतकरी यांचा तिसरा प्रश्न आहे.

## संस्थानी प्रजेचा अधिकार

ही संस्थानें म्हणजे विलक्षण कोडीं आहेत. बहुतेक संस्थानिकांचे हातीं भातुकलींचें राज्य असलें तरी आपण विष्णूचे अंश आहोंत व आपलें राज्य म्हणजे उधळपट्टी करण्याची खासगी मिळकत आहे अशा भावनेंतच ते तर असतात. या भ्रामक कल्पना त्यांचे डोक्यांत नाचत असतात. याला जबाबदार सदोष राज्यपध्दतीच होय व तिचें उच्चाटन व्हावयास हवें. एक संस्थानिक तर असें म्हणाले, उद्यां जर इंग्लंड व हिंदुस्थान यांमध्यें लढाई जुंपली तर आम्ही इंग्रजांच्या बाजूनें मातृभूमीविरुद्ध युद्ध करूं! हा यांचा देशाभिमान! मग संस्थानी प्रजेच्या वतीनें कोठेंहि आम्हीच काय ते बोलणार असें संस्थानिकांनीं म्हणावें व ब्रिटिश सरकारानें ते मानावें यांत नवल काय?

संस्थानाचें भवितव्य ठरविण्याचा हक्क संस्थानी प्रजा व संस्थानिक या दोघांना मिळून आहे. जें स्वयंनिर्णयाचें तत्त्व राष्ट्रीय सभा बजावतें, तें ती संस्थानी प्रजेला कशी नाकारील ? कांहीं संस्थानिकांनीं जर कालानुरूप बदल करण्याचें ठरविलें तर राष्ट्रीय सभा त्यांच्याशीं सलोखा ठेवील. पण संस्थानी प्रजेकडे दुर्लक्ष कधींहि होतां कामा नये.

### मजूर व शेतकरी यांचें बळ

तिसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे मजूर व शेतकरी यांचा. ते हिंदुस्थानचे प्रमुख घटक होत.त्यांचें जितकें सहाय्य आपल्या चळवळीला लाभेल तितकी ती अधिक सामर्थ्यवान होईल.यासाठीं आपण त्यांच्या कार्याला वाहून घेतलें पाहिजे. परंतु आतांपर्यंत त्यांच्या कार्याबद्दल सदिच्छा दाखविण्यापलीकडे राष्ट्रीय सभेनें अधिक कांहीं केलें नाहीं. असा एक मुद्दा पुढें केला जातो कीं, मजूर व भांडवलवाले आणि शेतकरी व जमीनदार यांचे संबंध समतोल ठेवणें हें राष्ट्रसभेचें काम आहे. पण आपण माणसापेक्षां पैशाला अधिक महत्त्व देतां कामा नये. मजुरांना उपाशी ठेवल्यावांचून एखादा धंदा चालत नसेल तर तो बंद केला पाहिजे; शेतांतून शेतकऱ्याला पुरेसें अन्न मिळत नसेल तर मधल्या मधेंच उत्पन्न खाणाऱ्या मध्यस्थांना दूर केलें पाहिजे. शेतांतील किंवा गिरणींतील कामकऱ्याला आरोग्य कायम ठेवून काम केलें असतां सुखानें राहतां येणें जरूर आहे.

### स्वातंत्र्य संपादनाचे मार्ग

राष्ट्रीय सभेचा या पुढील कार्यक्रम परिस्थितीस अनुसरून ठेवला पाहिजे; घटनेचें त्याला बंधन उपयोगीं नाहीं. कारण घटना काय, आपणच बदलूं शकतो. आपल्या घटनेंतील एक तत्त्व असें आहे कीं, न्यायाच्या व शांततेच्या मार्गानें आपण आपलें ध्येय संपादिलें पाहिजे. आपण आपल्या ध्येयाला कलंक लागेल असें वर्तन कधींहि करणार नाहीं. या दृष्टीनें आपण न्याय्य मार्गच अवलंबूं.तसेच शांततेचे मार्गहि आपण सोडणार नाहीं. कारण तेच टिकाऊ असतात. सध्यांच्या काळीं मुक्ततेचे जे प्रयत्न व्हावयाचे ते बहुजनसमाजांकडूनच आणि बहुजन समाजाच्या चळवळी–सुसंघटित बंडाचा बावटा उभारायाचा नसेल तेव्हां–शांततेच्याच असणें जरूर आहे.

### बहिष्काराचे वळसे चालू ठेवा

राष्ट्रीय सभेचा जुना कार्यक्रम म्हणजे कायदेमंडळें, न्यायकचेऱ्या व शाळा यांवर बहिष्कार घालणें हा होता; आणि लष्करी नोकरी नाकारणें व कर न देणें यांत त्याची परिणति होती. राष्ट्रीय चळवळ एकदां ऐन भरांत आली म्हणजे शाळाकचेऱ्यांत कोण गुंतून बसेल ? तथापि आजच्या स्थितींत शाळा-कचेऱ्यांवर बहिष्कार घालणें शहाणपणाचें होणार नाहीं असें मला वाटतें. कायदेमंडळावरील बहिष्कारावर रणें माजलीं होतीं. व त्यामुळें राष्ट्रसभेचीं शकलें पडलीं होतीं. पण आज स्थिति भिन्न आहे. कायदेमंडळावर बहिष्कार घालून करबंदीची चळवळ कांहीं विशिष्ट भागांत चालू केली पाहिजे; आणि मजुरांचे संपहि घडवून आणले पाहिजेत. यासाठीं योग्य ती व्यवस्था करण्याचा अधिकार । राष्ट्रसभेनें ऑ. इं. कॉं. कमेटीकडे सोंपवावा.

परदेशी कापडावरील व ब्रिटिश मालावरील बहिष्काराच्या चळवळीनें जलद प्रगति होत नसली तरी ती चिकाटीने चालू ठेविली पाहिजे.

हिंदुस्थानाला पारतंत्र्यांत डांबून ठेवण्यासाठीं म्हणून जें कर्ज उभारलें आहे त्याला आम्ही जबाबदार नाही, असा ठराव गयेच्या बैठकींत राष्ट्रसभेनें मंजूर केलाच आहे. तो पुनः आतां मंजूर करावा. हिंदुस्थानाच्या हितासाठीं काढलेलें कर्ज मात्र आम्ही निवारूं.

### प्रकट कट करा

सध्या देशांत ' कटवाल्यां 'वर खटले भरण्यांत आलेले आहेत; परंतु गुप्त कट करण्याचे दिवस आतां संपले. परक्यांच्या अमलांतून आपली मायभूमि सोडविण्याचे जाहीर कट उघडपणें करण्याचा काळ आतां आलेला आहे आणि, मित्रहो त्यांत आपण भाग घ्या. त्यासाठीं जरूर तीं संकटें, तुरुंगवास, फार काय मृत्यु, सर्व कांहीं सोसण्यास तयार व्हा; म्हणजे या आपल्या पुरातन पण सदा तरुण अशा भारतवर्षाला आणि त्यायोगें अवघ्या मानवजातीला दास्यांतून मुक्त केल्याच समाधान तुमच्या चित्ताला लाभेल."

# हिंदुस्थानांतील सावकारी पेढ्या

( ले. आत्माराम रावजी भट, एम. कॉम. )

### सावकारीचा धंदा कोण करतात ?

हिंदुस्थानांतील समाजरचना जातिसंस्थेवर उभारली गेली असल्यानें या देशांत हा धंदा कोणी विशिष्ट जातीच करतात कीं काय, असा एक प्रश्न साहजिकच विचारला जातो. या प्रश्नाचें उत्तर अस्तिपक्षीहि आहे व नास्तिपक्षीहि आहे. ज्या कोणाजवळ थोडाबहुत पैसा शिल्लक आहे तो मनुष्य तो पैसा शेजाऱ्यापाजाऱ्याकडे अगर गरजू कुळांकडे व्याजानें लावतो. हा व्याजबट्ट्याचा धंदा सर्व जाती करतात. परंतु व्याजबट्ट्यानें पैसा कर्जाऊ देणें याशिवाय ठेवी घेणे हुंड्या विकणें वगैरे कामें करणाऱ्या सावकारी पेढ्या बहुशः कांहीं विशिष्ट ज्ञातींतच सांपडतात. या ज्ञाती हा धंदा पिढ्यानुपिढ्या करीत आल्या आहेत.व त्यांच्या पेढ्या सर्व देशभर आहेत. हिंदु समाजांत परंपरागत पद्धतीप्रमाणे फक्त वैश्यांनींच व्यापार–उदीम करावा असें ठरलें आहे. या वैश्यांपैकीं जैन, मारवाडी व चेट्टी या जातीच सावकारीच्या व्यवहारांत पुढारलेल्या आहेत. वैश्यांच्या खालोखाल पंजाबांतील खत्री क्षत्रिय ज्ञाति या धंद्यांत पुढारलेली आहे. मुसलमानांना त्यांच्या धर्माप्रमाणे व्याजबट्ट्याचा धंदा करतां येत नाहीं. म्हणून त्यांच्या मोठ्या सावकारी पेढ्या विशेष आढळत नाहींत. अमानुल्लानें पडद्याची चाल नाहींशी केली म्हणून त्याला काफीर ठरवणारे पठाण मात्र या व्याजबट्ट्याच्या धंद्यांत पडलेले आहेत !

### मारवाड्यांच्या पेढ्या

मारवाडी हे जैन अगर वैष्णव धर्मपंथाचे अनुयायी असतात. त्यांपैकीं कांहीं सावकार गर्भश्रीमंत आहेत. त्यांची राहणी अतिशय साधी असून त्यांना व्यापाराचें व पैशाच्या देवघेवीचें शिक्षण आनुवंशिक मिळतें. त्यांची दानधर्मशूर म्हणून ख्याति असून जैनांनी अबूच्या पहाडावर सुंदर देवालयें बांधलीं असून देशभर शेंकडो अन्नछत्रें चालविलीं आहेत. कांहीं वर्षांपूर्वीपासून त्यांच्या दातृत्वाचा ओघ शिक्षणाकडेहि वळला आहे. मारवाड्यांमध्यें क्रोडो रुपयांची देवघेव करणाऱ्या लोकांप्रमाणें अगदीं लहान प्रमाणावर धंदा करणारेहि लोक आहेत. मारवाड्यांच्या मोठ्या पेढ्यांच्या शाखा हिंदुस्थानांतील बहुतेक प्रसिध्द व्यापारी शहरांतून पाहावयास मिळतात. शेट घनश्यामदास बिर्ला, बाबू पद्मराज जैन, शेट जमनालाल बजाज, सर सरूपचंदजी हुकूमचंदजी वगैरेंच्या पेढ्यांचीं नांवें आज सर्वतोमुखीं असून या सर्वांची दानशूर म्हणून ख्याति आहे. मारवाडी दानशूर असले तरी व्यवहारांत फारच दक्ष म्हणून त्यांचा लौकिक आहे. त्यांच्यापैकीं छोटेखानी सावकार मात्र अतिशय चिकट असतात. मारवाडी हे मध्यहिंदुस्थानांतील मारवाड देशचे राहणारे. परंतु त्यांच्या पेढ्या व दुकानें सर्व देशभर पसरलीं आहेत. व्यापाराकरितां ते शहरोशहरीं भटकत असतात. त्यांच्यापैकीं फारच थोडे इंग्रजी शिकलेले आहेत. पाश्चिमात्य पद्धतींचा व्यापारांत अंगीकार केलेले लोक त्यांपेक्षांहि कमी आहेत. मारवाड्याच्या मुलाला उपजतच जणुं व्यापाराचें बाळकडू मिळालेलें असतें. तो आठनऊ वर्षांचा झाला म्हणजे अंकगणित व हिशेब शिकतो व स्वतःच्याच पेढीवर समया घासावयाला लागून पेढीच्या व्यवहाराचे धडे घेण्यास प्रारंभ करतो ! मारवाड्याचा मुलगा हातांत पेन्सिल कागद न घेतां पटपट अगदीं आणे पैपर्यंत हिशेब करतो. मारवाडी पैशाच्या देवघेवीबरोबरच इतरहि व्यापार करतात. पेढ्या मोठ्या असतील तर पेढीवाले गिरणीमालक बनतील, कापसाचे सट्टे करतील, धान्याचा मोठ्या प्रमाणावर व्यापार करतील व बँकांचे डायरेक्टर होतील. पेढी छोटी असेल तर कापडाचें दुकान काढतील अगर किराण्या मालाचा व्यापार करतील. निवळ पैशाच्या देवघेवीचा व हुंड्यांचा व्यवहार करणाऱ्या पेढ्या विशेष आढळत नाहींत.

### नतुकोट्टी चेट्टींच्या पेढ्या

नतुकोट्टी चेट्टींची प्रसिध्दी दक्षिणहिंदुस्थान व ब्रह्मदेश यांमध्यें विशेष आहे. चेट्टींमध्यें पुवथ्थुकुडी चेट्टी व नतुकोट्टी अशा दोन पोटजाती आहेत. यांपैकीं पुवथ्थुकुडी चेट्टी हे व्यवहार लहान प्रमाणावर करतात व खांद्यांवर पिशव्या टाकून सर्व देशभर हिंडत असतात. परंतु नतुकोट्टी चेट्टींच्या पेढ्या इतिहासप्रसिध्द आहेत. ते जात्या साहसी आहेत. धूर्त व व्यवहारपटु म्हणून त्यांची ख्याति असली तरी धर्मकार्याकरितां देणग्या देण्याबद्दल त्यांची ख्याति आहे. ते शंकराचे भक्त असून शिवालयें बांधण्यांत पुष्कळ पैसा खर्च करतात. त्यांनीं अनाथालयें बांधलीं असून पुष्कळ वेदशाळा व शास्त्रशाळा चालवल्या आहेत. नतुकोट्टी चेट्टीहि गर्भश्रीमंत असून त्यांच्या वसतीच्या मदुरा जिल्ह्यांत इन्कमटॅक्सहि पुष्कळ

जमा होत असतो. यांची हिशेब ठेवण्याची पध्दत जुनी व गुंतागुंतीची असल्यानें त्यांचे उत्पन्न पाहून त्यांच्यावर प्राप्तीवरील कराची आकारणी करण्याचें काम मोठें घोटाळ्याचें आहे.

## नतुकोट्टी चेट्टींची राहणी

कुटुंबांतील लग्न झालेलीं माणसें कधींहि एकत्र जेवीत नाहींत. सर्वजण एकत्र राहतात परंतु लग्न झालेल्या जोडप्यांचा स्वयंपाक व जेवणखाण निराळे! मागें आलेली आई आपल्या लग्न झालेल्या मुलां-मुलींबरोबर जेवावयाची नाहीं! लग्न न झालेलीं मुलेंबाळें मात्र आपल्या आईबापांबरोबर जेवतात. चेट्टींच्या साम्राज्य—समान कुटुंबांतील स्वायत्त-वसाहतींमध्यें वर्षाला एकदां डाळ—कडदणाची वांटणी केली जाते. नतुकोट्टी चेट्टींचीं घरें मात्र फार भव्य असतात. प्रत्येक लग्न झालेल्या माणसानें आपल्या पायावर उभें राहिलें पाहिजे. डॉ. जैन म्हणतात, नतुकोट्टी चेट्टी व्यवहाराला इतके चोख आहेत कीं, पाहुणा जर कां एखाद्या दिवसापेक्षां जास्त थांबला तर लगेच घरधनी त्याचें जेवणाखाण्याचें बिल तो जाण्याच्या वेळीं त्याच्या हातीं देतो व पाहुणाहि निमूटपणें पैसे काढून देतो!

## एका रुपयाचे शंभर वर्षांत एक लाख रुपये

मारवाड्याप्रमाणेंच नतुकोट्टी चेट्टींमध्यें इंग्रजी शिक्षणाचा प्रसार नाहीं. सध्या ज्या तऱ्हेचें शिक्षण शाळांतून दिलें जातें तें घेतल्यानें उपयोगापेक्षां तोटाच जास्त होईल अशी त्यांची समजूत आहे! मुलगा आपल्या बापाच्या पेढीवरच व्यवहाराचें शिक्षण घेतो. नतुकोट्टी चेट्टी हे जन्मजात सावकार असतात. लहानपणापासून मुलांना काटकसरीनें वागण्याचें व पैसा शिल्लक टाकण्याचें शिक्षण दिलें जातें. त्यांच्या घराण्यांत मुलगा झाला म्हणजे एक विशिष्ट रक्कम चक्रवाढ व्याजानें बाजूला काढण्यांत येते व त्या पैशाचा उपयोग मुलाच्या शिक्षणाकडे करण्यांत येतो. मुलगा दहा—बारा वर्षांचा झाला कीं त्याला सावकारीच्या धंद्याची माहिती देण्यांत येते. व ते शिक्षण चालू असतांच तो बापाच्या पेढीवर काम करून आपल्या धंद्यांत पारंगत होतो. लग्न झाल्यापासून त्याला आपला संसार स्वतःच्या प्राप्तीवर चालवावा लागतो. त्याला धंद्याकरितां बाप भांडवल देतो. पैसे मिळवून श्रीमंत होण्याची लालसा या चेट्टी लोकांत इतकी असते कीं, त्यांच्या बायकाहि कांहींना कांहीं उद्योग करून पैसा मिळवतात व जो पैसा मिळेल तो शक्य तितक्या भारी व्याजानें कर्जाऊ देतात. चेट्टी लोकांमध्यें अशी एक म्हण प्रचलित आहे कीं, एक रुपया जर मुलाच्या जन्माच्या वेळीं दरशेंकडा बारा रुपये दरानें व्याजीं लावला तर त्या मुलाच्या शंभराव्या वर्षी त्या रुपयाचे चक्रवाढ व्याजानें एक लक्ष रुपये होतात.

## नतुकोट्टी चेट्टींचे गुमास्ते

नतुकोट्टी चेट्टींच्या मुख्य पेढ्या तिरुपत्तूर व देवकोट्टई या भागांत आहेत. ज्या लोकांजवळ स्वतः धंदा करण्याइतका पैसा नसतो ते आपल्या ज्ञातींतील मोठ्या सावकारांचे गुमास्ते अगर मदतनीस म्हणून काम करतात. कित्येक वेळां त्यांना व्यवहाराकरितां लाख रुपयांपर्यंत रक्कम देण्यांत येते. आणि त्या रकमेला वैयक्तिक पतीशिवाय दुसरें तारण नसतें! पैसे दिल्याबद्दल स्टँप लावूनहि पावती घेण्यांत येत नाहीं. फक्त ताडपत्रीवर पैसे पोंचल्याची पावती घेण्यांत येते! मुख्य पेढीपासून त्यांच्या पेढीचें जितकें अंतर असतें त्यावर गुमास्त्याचा पगार अवलंबून असतो. जर शाखा कमी दूर तर पगारहि कमी! साधारणपणे गुमास्त्याची नेमणूक तीन वर्षे करण्यांत येते. पहिल्या गुमास्त्याची मुदत संपण्याच्यापूर्वी सहा महिने दुसरा गुमास्ता त्या शाखेच्या कामाची माहिती करून घेण्याकरितां पाठविण्यांत येतो ज्या वेळीं तो शाखेचें काम पाहावयास दूर प्रदेशीं जातो त्या वेळीं आपल्या पत्नीला बरोबर नेत नाहीं! तीन वर्षांनीं तो आपल्या कामाचा हिशेब देण्याकरितां व घरच्या मंडळीबरोबर राहण्याकरितां परत येतो. जर त्याचें काम विशेष चांगले झालें असेल तर पेढीचा मालक त्याला फायद्यांतील कांहीं हिस्सा देतो. जर त्याला परत नोकरीच करावयाची असली तर तो प्रथम पूर्वीच्या मालकाकडे जातो व त्याला जरूर नसल्यास दुसरीकडे नोकरी पाहतो. कांहीं काल गुमास्त्याचें काम केल्यावर तो धंद्यांत वाकबगार होतो. व शक्य तितका पैसा शिल्लक टाकून त्या भांडवलावर स्वतंत्र धंदा सुरू करतो. नतुकोट्टी चेट्टींच्या पेढ्या हिंदुस्थानाबाहेर स्ट्रेट्स सेटलमेंट्स, सीलोन, सायगांव, मॉरिशस, दक्षिणआफ्रिका यांमध्येंहि आहेत. कांहींनीं आपले एजंट इंग्लंड व युरोपमधील प्रमुख देश यांमध्येंहि ठेवले आहेत!

## पिढीजात सावकारी पेढ्या असलेल्या इतर जाती

खत्री जातीच्या लोकांच्या मुख्य पेढ्या पंजाबांत आहेत. ते प्रसिद्ध व्यापारी आहेत. मध्य-एशिया, अफगाणिस्थान व तिबेट या देशांबरोबरील हिंदुस्थानाच्या व्यापाराला लागणारा पैसा ते पुरवतात. शाली, कांबळीं, गालिचे यांसारखे पदार्थ ते विक्रीकरितां यारकंद, काशगर यांसारख्या दूरदूरच्या व्यापारी शहरीं नेतात व तिकडून मीठ, रेशिम, लोकर, शेतीचीं जनावरें हिंदुस्थानांत आण-

तात.खत्र्यांची आरोरा नांवाची एक उपशाखा आहे. पश्चिम-पंजाबमध्यें यांच्या धंद्याचा मोठा व्याप असून ते मोठाले जमीनदार आहेत व शेतीकडे विशेष लक्ष पुरवितात. ते जात्या साहसी असून त्यांच्या पेढ्या अफगाणिस्थान व मध्यएशिया यांमध्यें आढळतात. शिकारपुरी मुलतान्यांच्या पेढ्या सिंध प्रांतांत विशेष आहेत. गुजराथ व संयुक्त प्रांतांतील वायव्यभागांत बोहरा जातींच्या लोकांच्या पेढ्या आहेत. बोहरा हें नांव मारवाड-मधील पैशाची देवघेव करणाऱ्या ब्राह्मणांचे आहे! गुजराथचे शेख व्यापारीहि या नांवानें ओळखले जातात. हे बोहरे सहाशें वर्षांपूर्वी बाटून हिंदूचे मुसलमान झाले. अशी एक म्हण आहे कीं, "बोहऱ्यांचा सकाळचा रामराम म्हणजे मृत्यूचेंच बोलावणें होय."

## खेडेगांवांतील व शहरांतील सावकार

येथपर्यंत विशिष्ट जातींच्या सावकारी पेढयांची माहिती करून घेतल्यानंतर आपण सर्वसाधारण सावकारीच्या धंद्याकडे वळूं. प्रत्येक गांवांत गरजू लोकांना पैसे देणारा सावकार हा असतोच. सध्या-च्या काळांत त्याच्याविना लोकांचा व्यवहार सुरळीत चालावयाचा नाहीं अशीच स्थिति आहे. आपला शेतीचा अगर किराण्या मालाच्या व्यापाराचा व्यवसाय संभाळून सावकारी करणारे चार-दोन इसम प्रत्येक खेड्यांत असतातच. धंद्या-करितां लागणारें भांडवल या लोकांचे स्वतःचें असतें व सावकारी हा त्यांचा बहुशः दुय्यम धंदा असतो. हे लोक खेड्यांतील लोकांना शेतीकरितां व इतर कौटुंबिक गरजांकरितां लागणाऱ्या पैशाचा पुरवठा करतात. कित्येक वेळां हे सावकार स्वतःच धान्याचे अगर कापसाचे व्यापारी असतात व आपल्याला कर्जदारानें माल विकावा या अटीवरच पैसा देतात. त्याचप्रमाणें ते खेड्यांतील विणकऱ्याला पैसे कर्जाऊ देतात व तेहि त्यानें विणलेलें कापड आपल्याला विकावें या अटीवर. बहुधा हा विणक-ऱ्यांना द्यावयाचा पैसा मारवाडी देतो. मारवाडी विणकऱ्याला लागणारें सूतहि आणून देतो. प्रथम स्वतःजवळ जमीन नसलेले सावकार रयतांना कर्ज देऊन नंतर त्यांच्या जमिनी या अगर त्या मार्गे घशांत घालून जमीनदार बनल्याचीं उदाहरणें आहेत. या सावकारांच्या खेड्यांतील व्यवहारांत हुंडीचा प्रश्नच येत नाहीं.खेड्यांतील सावकार पैशाच्या देवघेवीबरोबर दुसरा धंदा करीत असल्यानें त्यांना एका बाजूनें कर्जाऊ दिलेल्या पैशावर व्याज मिळतें व शेतावर राबण्याकरितां थोड्या मजुरीवर मजूर मिळतात आणि दुसऱ्या बाजूनें व्यापारांत भरपूर फायदा व कमिशन मिळतें तें निराळेंच. शहरचे सावकार , व्यापारउदीमाकरितां लागणारा पैसा पुरवतात. ते स्वतःहि बरेच वेळां व्यापारी असतात व खेड्यांतून माल खरेदी करण्याकरितां तेथील सावकारांना पैसे आगाऊ देतात. एवढ्यापुरताच खेड्यांतील सावकार व शहरचे सावकार यांचा पैशाचा संबंध येतो. आणि ज्या वेळीं या दोहोंचा व्यापारी संबंध असतो त्या वेळीं हुंड्यांचा उपयोगहि केला जातो.मोठ्या सावकारांच्या पिढीजात पेढ्या असतात. त्यांच्या शाखा निरनिराळ्या ठिकाणीं पसरलेल्या असतात. त्या मोठ्या पेढ्या लोकांच्या ठेवी व्याजानें घेतात व हुंड्यांचाहि व्यवहार करतात.

## महाजन--सभा

पिढीजात व्यापार व सावकारी करणाऱ्या लोकांच्या मध्यवर्ती संस्था महाजन--सभा या नांवानें ठिकठिकाणीं अस्तित्वांत आहेत. या महाजन--सभा कोणाहि सावकाराच्या वैयक्तिक कारभारांत ढवळाढवळ करीत नाहीत. त्या सामा-जिक व धार्मिक कामें करतात. परंतु सभासदांचे आपापसांतील तंटे लवादामार्फत सोडविण्याकरितां त्यांचा उपयोग होतो. व कित्येक वेळां नादारीच्या न्यायालयाचें कामहि या महाजन--सभा करतात. त्यांची घटनाहि साधी असते. कोणी तरी मोठा सावकार त्याचा अध्यक्ष असतो व त्याचा गुमास्ता महाजन--सभेच्या कारकुनाचें काम करतो. सर्व कामहि लोकमतानुवर्ती पद्धतीनें चालतें. इन्दूरची "ग्यारापंच" ही महाजन--सभा प्रसिध्द असून राजमान्य आहे. त्याचप्रमाणें आधुनिक पध्दती-वर मुंबईत "बॉम्बे श्रॉफ असोसिएशन", "मार-वाडी चेंबर ऑफ कॉमर्स", "कमिशन एजंट्स असोसिएशन", "मुलतानी बँकर्स असोसिएशन" या संस्था अस्तित्वांत आल्या असून उत्तम काम करतात.

# सूचिपत्र.



---